# भाग दुसरा

## कालदर्शिका ते ज्वालासदृश शिल्प


संपादक :

**यशवंत रामकृष्ण दाते**, बी. ए., एल्एल्. बी.

**चिंतामण गणेश कर्वे**, बी. ए.

संपादक—ज्ञानकोश, शब्दकोश, वाक्संप्रदायकोश,
शास्त्रीय परिभाषाकोश, इत्यादि.



१ जुलै १९४२

किंमत २५ रुपये

# विश्व विकास

## २

## भौगोलिक परिस्थिति आणि मानववंश

### मागील प्रस्तावनेंत काय येऊन गेलें—

आतांपर्यंत हें विश्व कसें निर्माण झालें यासंबंधीं अत्यंत प्राचीन काळापासून बुद्धिवान् व कल्पक लोक आपआपल्या परीनें कसा विचार करीत होते व या विश्वाचें कोडें उलगडण्याचा प्रयत्न किती विविध तऱ्हेनें चालू होता व एकंदरींत या प्रश्नासंबंधींच्या विचारांचा विकास कसकसा होत गेला याचें थोडक्यांत निरीक्षण मागील विभागांत करण्यांत आलें व ही विश्वसंस्था निर्माण होऊन किती काल लोटला असावा व या विश्वसंस्थेचें स्थूल स्वरूप कसें काय आहे, यासंबंधींच्या कल्पनाहि त्या वेळीं पुढें मांडण्यांत आल्या. या अफाट विश्वसंस्थेमध्यें आपली सूर्यमालिका ही केवळ एखाद्या सिंधूमध्यें जलबिंदु असावा त्याप्रमाणें असून सर्व ग्रहमालिकेसुद्धां आपला सूर्य हा कोटयवधि खगोलांपैकीं एक आकाशस्थ गोल असून तो त्याच्यापेक्षां आकारानें अनेक पटींनीं मोठ्या अशा दुसऱ्या एखाद्या सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा करीत करीत एखाद्या विशिष्ट ताऱ्याकडे गमन करीत आहे, असें आपणांस अलीकडे अवगत झालें आहे.

त्यानंतर आपण ज्या भूगोलावर राहतों त्याची उत्पत्ति या आकाशस्थ गोलाच्या तेजोमेघावस्थेपासून हळूहळू कशी होत गेली व त्याचें प्रथम वायुमय, नंतर जलमय व त्यानंतर प्रस्तरमय असें त्रिविध रूप कसें बदलत गेलें हेंहि आपण अवलोकन केलें. त्यानंतर या भूगोलाच्या अंतर्रचनेचा अभ्यास भूस्तरशास्त्राच्या साहाय्यानें करून या आपल्या पृथ्वीरूप गोलाची घटना कसकशी होत गेली असावी, त्यास वायुरूपापासून घनरूपांत येण्यास किती काल लागला असावा, त्या कालांत त्याचें जलस्थलमय रूप कसें असावें, त्यावर कोणत्या प्रकारचें हवामान असावें, व त्यावर निरनिराळ्या प्रकारच्या वनस्पती व प्राणी कसकसे तयार होत गेले असावे, व ते तयार होत असतांना कोणते मोटमोठाले कालखंड पडले असावे, इत्यादि गोष्टींचा स्थूल अभ्यास आतांपर्यंत भूस्तरशास्त्राच्या साहाय्यानें अनेक विद्वानांनीं करून त्याचें फळ नमूद करून ठेवलें आहे, तें आपण अवलोकन केलें ; व मनुष्यप्राण्याच्या विकासापूर्वी अजीव कोटीपासून सजीव कोटी कशा निर्माण झाल्या असाव्या व प्रथम एकपेशीपासून अनेकपेशीमय व चित्रविचित्र आकारांच्या व पर्णपुष्पफलादि धारण करणाऱ्या वनस्पती कशा झाल्या असाव्या, तसेंच जीवनरसमय पेशीपासून अनेकपेशीमय प्राणी कसे तयार होऊन त्यांच्या अवयवांचा व निरनिराळ्या शक्तींचा विकास कसा झाला असावा ; तसेंच या प्राण्यांत प्रथम शारीरिक विकास होऊन नंतर मानसिक विकास कसकसा होत गेला असावा, व त्यानंतर केवळ नैसर्गिक व अनैच्छिक वंशोत्पादनापासून हळूहळू ऐच्छिक व भावनामूलक अपत्योत्पादन आणि अपत्यसंगोपन व वंशरक्षण या क्रिया कशा होत गेल्या, व त्यामुळें जीवसृष्टीमध्यें मानवविकास कसकसा होत गेला, व त्याचा अंतिम सर्वोत्कर्ष मानवप्राण्यामध्यें कसा झाला, याचें अवलोकन केलें आहे. तसेंच हा मानसिक विकास कसकसा होत गेला याचें सूक्ष्म निरीक्षण करून त्याचें प्रत्यंतर आपणांस गर्भपिंडाच्या वाढीमध्यें आज कसें येत आहे, हें अवलोकन केलें ; व जीवविकासाच्या सर्व अवस्था आपणांस गर्भपिंडविकासामध्यें दिसून येत असल्यामुळें त्याचा सर्व इतिहास आपल्यापुढें आदर्शाप्रमाणें प्रत्यक्ष ठेवण्यांत या सृष्टीच्या उत्पादकाचें चातुर्य किती आश्चर्यकारक रीतीनें प्रकट होत आहे, हें पाहून आपण स्तिमित झाल्याशिवाय राहत नाहीं.

### भूगोलपरिचय—

अशा या दीर्घकालीन निरनिराळ्या अवस्थांतून रूपांतर होऊन तयार झालेल्या ज्या या भूगोलावर आपण वस्ती करून राहत आहोंत त्या भूगोलाचें बाह्य स्वरूप कशा प्रकारचें आहे, याचें ज्ञान आपणांस करून घेणें आवश्यक आहे. या अभ्यासासच भूवर्णन किंवा भूपरिचय असें म्हणतां येईल. या भूगोलाचा परिचय आज आपण अनेक वर्षे करून घेत आहोंत. ज्या कालापासून विद्यालयें अस्तित्वांत आलीं त्या कालापासून भूगोल हा विषय अभ्यासक्रमांत ठेवलेला असतो. परंतु आपण विद्यालयांत अभ्यास करीत असतांना जो या भूगोलाचा अभ्यास करीत होतों त्यांत केवळ कांहीं देश व त्यांच्या राजधान्या, नद्या,

पर्वत, वगैरेंच्या लांबलचक कंटाळवाण्या याद्या, यांच्यापलीकडे कांहींहि शिकत नव्हतों. त्या वेळीं शाळेंत शिकत असणारा प्रत्येक विद्यार्थी आपणांस आशिया मायनर-स्मर्ना एजिअन समुद्रावर, सीरिया-दमास्कस सीरियाच्या मध्यभागीं, आर्मीनिया-अर्झरूम अर्झरूमच्या मध्यभागीं, अशा तऱ्हेच्या याद्या घोकीत असलेला दृष्टीस पडत असे. आज या अभ्यासाची दिशा अगदीं *पालटून गेलेली आहे. आज भूगोलाचा अभ्यास अधिक* पद्धतशीर रीतीनें होऊं लागला आहे. त्या वेळच्या भूगोलाच्या अभ्यासाची कल्पना केवळ राजकीय परिस्थितीचें स्थूलज्ञान यापलीकडे गेलेली नव्हती. त्यामुळें निरनिराळ्या भूभागांत राहणारे लोक, तेथील हवामान, त्यांची राहणी, त्यांच्या सामाजिक संस्था, वगैरेंचें ज्ञान आपणांस मुळींच अवगत नसे. तसेंच, भूगोलावरील मानवांपेक्षां तेथील पर्वत व नद्या यांचाच फक्त आपणांस परिचय असे. परंतु आतां तेवढ्यानें आपली तृप्ति होत नाहीं.

### हवामानांत फरक कशानें पडतो—

पृथ्वी ही स्वतःभोंवतीं एका दिवसांत एक प्रदक्षिणा करीत असल्यामुळें दिवस व रात्र असे दिवसाचे दोन भाग होतात; परंतु ती ज्या आकाशवृत्तांतून सूर्याभोंवतीं फिरते तें आकाशवृत्त पृथ्वीच्या अक्षाशीं काटकोण करीत नसल्यामुळें हें दिनमान सर्वत्र सारखें नसतें व त्यामुळें पृथ्वीच्या निरनिराळ्या भागांत दिनमानांत फरक आढळून येतो. तसेंच हें दिनमान एकाच स्थळींहि सर्व वर्षांत समान असत नाहीं, तर पृथ्वीच्या अक्षाच्या तिरपेपणामुळें तें निरनिराळ्या काळांत बदलत असतें व यामुळें दिवस-रात्रीप्रमाणेंच निरनिराळे ऋतूहि अस्तित्वांत येतात व त्याचा परिणाम एकाच ठिकाणच्या हवामानांत वर्षाच्या निरनिराळ्या काळांत बदल होण्यांत घडून येतो व त्यामुळें आपल्या भरतखंडांत उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा असे ऋतू होतात. या पृथ्वीच्या अक्षाच्या तिरपेपणामुळें सूर्यकिरणांचे पृथ्वीवर होणारें पतन निरनिराळ्या कोनांमध्यें होत असल्यामुळें सूर्यकिरणांपासून मिळणाऱ्या उष्णतेचें प्रमाण निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळें असतें; त्यामुळें त्या त्या प्रदेशांतील हवामानांत फरक पडत असतो, इत्यादि गोष्टी सर्वपरिचितच आहेत.

या गोष्टींचा परिणाम जगांतील निरनिराळ्या प्रदेशांतील हवामानावर होऊन भिन्न भिन्न प्रदेशांत भिन्न भिन्न प्रकारचें हवामान आढळण्यांत येतें. दिनमान व ऋतुमान यांचा ज्याप्रमाणें हवामानावर परिणाम होतो त्याप्रमाणेंच पर्वत, नद्या व खोरीं यांचाहि हवामानावर परिणाम होतो. पृथ्वीचा पृष्ठभाग सर्वत्र एकसारखा नाहीं. कांहीं ठिकाणीं दूरवर अफाट मैदानें पसरलेलीं आहेत तर कांहीं ठिकाणीं उंच उंच व दूरवर पसरलेल्या पर्वतश्रेणी आकाशाशीं स्पर्धा करीत असलेल्या आढळून येतात. कांहीं ठिकाणीं मोठमोठीं लांववर पसरलेलीं रुक्ष वाळवंटें दृष्टीस पडतात, तर कांहीं ठिकाणीं मोठमोठ्या नद्यांचे प्रवाह, वाळवंटें व त्यांच्या कांठीं दूरवर पसरलेली गाळाची सुपीक जमीन दृष्टीस *पडते. पर्वतांच्या उंच शिखरांपासून अगदीं निकटच्याच प्रदेशांत* खोल दऱ्या आढळून येतात. या सर्व गोष्टींचा तेथील हवामानावर परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं.

### वनस्पती व प्राणी यांची विविधता—

अर्थातच पृथ्वीच्या पाठीवर ज्या निरनिराळ्या वनस्पती, वृक्ष, वगैरेंची उत्पत्ति व वाढ होते ती निरनिराळ्या ठिकाणच्या हवामानावर अवलंबून असते. विशिष्ट हवामानाच्या प्रदेशांत विशिष्ट प्रकारचीच झाडें वगैरे वाढूं शकतात व झाडांचीं पानें, फुलें, फळें, उंची, विस्तार, एवढेंच नव्हे तर त्यांची दृढता अथवा मृदुता, त्यांचें सकंटकत्व अथवा अकंटकत्व, त्याचप्रमाणें त्यांच्या मुळांची, शाखांची, पानांची, वगैरे लांबी किंवा रुंदी अथवा आकार या सर्व गोष्टी, विशिष्ट ठिकाणचे हवामान, जमिनीची मृदुता अथवा दृढता, जमिनीमध्यें असणारा ओलावा अथवा रुक्षता, इत्यादि गोष्टींवर अवलंबून असतात व त्यामुळें कांहीं ठिकाणीं आपणांस सूर्याच्या किरणांसहि प्रवेश मिळणार नाहीं अशीं घनदाट अरण्यें, तर कांहीं ठिकाणीं अगदीं खुरटीं, क्षुद्रपर्णयुक्त, एवढेंच नव्हे तर कंटकयुक्त झुडपे किंवा केवळ गवतच दृष्टीस पडतें. याप्रमाणें पृथ्वीचा पृष्ठभाग, हवामान, आर्द्रता अथवा उष्णता, मृदुता अथवा काठिण्य, निम्नता अथवा उच्चता, इत्यादि अनेक गोष्टींवर विशिष्ट ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या व वाढणाऱ्या वनस्पतींचे वर्ग अथवा जाती अवलंबून असतात.

अर्थात् या वनस्पतींवर जगणारे प्राणीहि निरनिराळ्या प्रकारच्या वनस्पतींच्या क्षेत्रांत निरनिराळ्या प्रकारचे आढळतात व प्राण्यांचीं शरीरें, कातडीं, रंग, वगैरेहि निरनिराळ्या हवामानाच्या प्रदेशांत तेथील परिस्थितीस अनुकूल अशीं निरनिराळ्या प्रकारचीं असतात.

### भौगोलिक परिस्थितीचा अभ्यास—

याप्रमाणें भूपृष्ठाच्या रचनेवर अवलंबून जसे हवामान, वनस्पती व प्राणी हे भिन्न भिन्न प्रकारचे आढळतात त्याप्रमाणें या भिन्न भिन्न क्षेत्रांत आढणारे मानवप्राणीहि भिन्न भिन्न प्रकारचे आढळतात. तेव्हां आपणांस पृथ्वीवरच्या मानवप्राण्याच्या विकासाचा म्हणजेच विश्वविकासाच्या एका मह-

त्याच्या भागाचा अभ्यास करावयाचा, म्हणजे या निरनिराळ्या प्रकारच्या मानववंशांचा अथवा जातींचा अभ्यास केला पाहिजे व त्याकरितां आधीं भिन्न भिन्न ठिकाणच्या भौगोलिक परिस्थितीचा अभ्यास केला पाहिजे. हा अभ्यास करावयाचा म्हणजे पृथ्वीच्या पृष्ठभागावरील निरनिराळ्या प्रदेशांतील हवामानांत कसकसा फरक पडत जातो या गोष्टीचा प्रथम विचार केला पाहिजे; व याप्रमाणें हवामानाच्या दृष्टीनें पृथ्वीच्या पृष्ठभागाचे निरनिराळे विभाग कसे नैसर्गिक पद्धतीनेंच पडत जातात, त्याचें अवलोकन केलें पाहिजे. याकरितां आपण प्रथम भूमध्यप्रदेशापासून उत्तर व दक्षिण ध्रुवांकडे जात असतां आपणांस भिन्न भिन्न प्रकारचें हवामान कसकसें दृष्टीस पडतें व त्याचा परिणाम तेथील नैसर्गिक वनस्पतिवर्गावर वगैरे कसा होतो व त्यामुळें तेथील प्राणिवर्गहि कसा भिन्न असतो तें पाहिलें पाहिजे. कारण या सर्व गोष्टी विश्वविकासाच्या दृष्टीनें व त्यांतल्या त्यांत मानवसंस्कृतीच्या विकासाच्या दृष्टीनें फार महत्त्वाच्या आहेत.

### भूपृष्ठरचनेचे परिणाम—

अर्वाचीन भूगोलशास्त्रज्ञ पृथ्वीचा अभ्यास ती मानवाचें वसतिस्थान आहे या कल्पनेनें करीत असतो. प्रथम तो मनुष्याच्या सभोंवतालची जी परिस्थिति असते तींत महत्त्वाचे घटक कोणकोणते आहेत याचें ज्ञान करून घेतो व ते घटक पृथक् करून त्यांचा मानवाच्या जीवनावर कसकसा परिणाम होतो याचा पृथक्पणें व सामुदायिक रीतीनें विचार करतो. उदा., स्वित्झर्लंडसारख्या डोंगराळ प्रदेशांत मनुष्यानें कितीहि प्रयत्न केला तरी त्यास तेथील पर्वत काढून टाकून सपाट मैदान बनविणें शक्य नाहीं. तसेंच एखादा प्रदेश सपाट असला तर त्या ठिकाणीं मनुष्यास पर्वत रचतां येणार नाहीं. यावरून हें उघड होतें कीं, भूपृष्ठाच्या रचनेचा प्रत्येक देशावर अत्यंत महत्त्वाचा व कायमचा परिणाम होत असतो. एखाद्या डोंगराळ प्रदेशांत जर कांहीं लोक शेती करीत असतील तर त्या शेतींतील उत्पादन फार अल्प प्रमाणावरच शक्य असल्यामुळें त्यांची संख्या त्या डोंगराच्या पायथ्याशीं असलेल्या मैदानांतील शेतकऱ्यांच्या संख्येच्या मानानें अल्पच असणार. जगांतील कोणत्याहि प्रदेशाकडे आपण नजर टाकली तर आपणांस असें दिसून येईल कीं, सपाट प्रदेशामध्येंच लोकवस्ती दाट असते. सर्व जगांतील अत्यंत दाट वस्तीचा देश म्हटला म्हणजे चीन देश होय, व त्यांतहि तेथील नद्यांच्या खोऱ्यांत जो सपाट प्रदेश आहे त्यांतच लोकवस्तीची दाटी आढळून येते, व त्याच खोऱ्यांच्या दरम्यानचा डोंगराळ प्रदेश बहुतेक ओसाड असलेला दृष्टीस पडतो. त्यामुळें चीनमध्यें ज्याप्रमाणें जगांतील अत्यंत दाट वस्तीचा प्रदेश आहे त्याप्रमाणें, बराचसा प्रदेश अगदीं ओसाड व जवळजवळ निर्मनुष्य आहे.

### सांस्कृतिक परिणाम—

भूपृष्ठरचनेचा म्हणजेच भूपृष्ठावरील नद्यांचीं खोरीं, सपाट प्रदेश, पर्वत, टेंकड्या, वगैरे गोष्टींचा परिणाम त्या प्रदेशांतील लोकांच्या राहणीवर व समजुतींवरहि होत असतो. सामान्यतः नद्या ह्या वाहतुकीचे मार्ग असून त्यांच्यामार्फत संस्कृतीचाहि प्रसार होत असतो आणि त्यामुळें नदीच्या दोन्ही तीरांवरील लोकांचा परस्परांशीं अधिक संबंध येऊन त्यांच्यामध्यें एकत्व उत्पन्न होतें. याच्या उलट ज्या दोन लोकांमध्यें एखादी पर्वताची रांग असते त्यांचें परस्पर दळणवळण फारसें नसल्यामुळें त्यांचे आचार व विचार यांमध्यें पुष्कळच अंतर दिसून येतें. उदा., ब्रह्मदेशामध्यें इरावती नदीच्या खोऱ्यांत असलेले लोक सर्व ब्रह्मी असून त्यांचा आयुष्यक्रम व राहणी एकाच स्वरूपाची आहे. परंतु त्याच्या सभोंवतींच असलेल्या डोंगराळ प्रदेशांत रानटी लोकांची वस्ती आहे. या दोहोंमध्यें जाती, संस्कृति किंवा आर्थिक बाबी यांमध्यें कोणतेंच साम्य आढळून येत नाहीं आणि त्यामुळें या मध्यंतरीं असलेल्या डोंगरांच्या रांगांमुळें व त्यांतील दळणवळणाच्या मार्गांच्या अभावामुळेंच हिंदुस्थान व ब्रह्मदेश हे परस्परांपासून भिन्न झालेले आहेत. एवढेंच नव्हे तर या डोंगराळ भागांतील लोक हे हिंदी व ब्रह्मी या दोन्ही लोकांपासून अगदीं निराळे आहेत व ते आज असंस्कृत स्थितींतच असलेले दिसतात व त्यामुळें तेथें आज वंडें होत आहेत. ज्याप्रमाणें नैसर्गिक भूरचनेचा परिणाम लोकांच्या आयुष्यक्रमावर होतो त्याप्रमाणेंच एखाद्या लहानशा क्षेत्रांतील भूपृष्ठाची पाहणी केल्यास आपणांस दळणवळणाचे मार्ग—उदा., मोठमोठाल्या सडका किंवा आगगाडीचे रस्ते हे—स्वाभाविकपणेंच कसकसे जातात, व त्यांच्या मार्गांत शहरें किंवा गांवें हीं कसकशीं वसलेलीं असतात यांचें स्पष्टीकरण मिळतें. याकरितां भूपृष्ठाची पाहणी व नकाशे यांचें भूवर्णनशास्त्रांत फार महत्त्व आहे.

मनुष्यानें कितीहि प्रयत्न केला तरी भूपृष्ठाच्या स्वाभाविक रचनेवर त्याला फारच थोडा परिणाम करतां येतो. एखाद्या शहरांत असलेली लहानशी टेंकडी अनेक शतकें होऊन गेलीं तरी अजीबात नाहींशी होत नाहीं, हें आपणांस लंडनमधील सेंटपॉलच्या देवळाच्या टेंकडीवरून किंवा मुंबईतील डोंगरी अथवा मलबार टेंकडीवरून दिसून येतें. मनुष्यानें जरी डोंगरांतून बोगदे पाडून व मैदानांतील दलदली भरून भूपृष्ठाची रचना बदलण्याचा कांहींसा प्रयत्न केला तरी तो प्रयत्न

मर्यादित असून त्यापासून एकंदर नैसर्गिक भूरचनेवर फारसा परिणाम होत नाहीं.

### भूस्तर-रचना : पाषाणवर्ग—

कोणत्याहि प्रदेशाच्या भूपृष्ठाची रचना ही त्या पृष्ठाखालीं असलेल्या भूस्तर–रचनेवर अवलंबून असते. वास्तविक आपणांस भूपृष्ठापेक्षां भूस्तरांचाच आधीं विचार केला पाहिजे. परंतु भूपृष्ठ हें आपल्या नजरेस सहज पडतें तर भूस्तरांचा अभ्यास जमिनीखालीं खोदून पाहून करावा लागतो, व या दोहोंचा संबंध जोडणें ही गोष्टहि अभ्यासकाच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून असते. भूवर्णनकारास पृथ्वीच्या कवचांतील सर्व खडकांचा अभ्यास करणें आवश्यक नसतें. तें कार्य प्रस्तरविज्ञान्याचें किंवा पाषाणशास्त्रज्ञाचें आहे. परंतु भूपृष्ठावर जे पाषाण आढळतात त्यांचें ज्ञान त्यास त्यांत आढळणाऱ्या खनिज द्रव्यांची माहिती होण्याकरितां अवश्य आहे. भूवर्णनकाराच्या दृष्टीनें अशा तऱ्हेच्या भूपृष्ठावर आढळणाऱ्या पाषाणाचे चार मोठाले वर्ग करण्यांत येतात : ( १ ) पहिला वर्ग जुन्या कठिण खडकांचा पाडण्यांत येतो. हे पाण्याच्या प्रवाहानें फारसे झिजत नाहींत त्यामुळें त्यांचीं मोठमोठीं पठारें बनतात. हे स्वभावतःच कठिण असल्यामुळें या ठिकाणचीं जमीन रुक्ष असते. हे पाषाण स्फटिकमय ( रूपांतरित ) किंवा गाळ घट्ट होऊन बनलेले असतात. अशा तऱ्हेचीं पठारें म्हटलीं म्हणजे ब्राझीलमधील पठार, दक्षिण अमेरिकेंतील गियानामधील उंच पठार, आफ्रिकेंतील बहुतेक दक्षिण भाग व्यापणारें पठार, अरबस्तानचें पठार, हिंदुस्थानमधील दख्खनचें पठार व इंडोचीनचें पठार हीं होत. तसेंच ऑस्ट्रेलियामधील दोन-तृतीयांश भाग व्यापणारे पठार आणि सैबेरिया व स्कॅन्डिनेव्हिया यांच्यांतील पठार हींहि महत्त्वाचीं आहेत. (२) दुसरा वर्ग म्हणजे ज्या प्रदेशामध्यें जुने खडक पाण्यानें झिजून जाऊन समुद्रसपाटीबरोबर सखल झाले आहेत असा प्रदेश. अशा प्रदेशांत कॅनडामधील लॅरेन्शियाचा भाग, युरोपमधील रशियाचा बराचसा भाग व फिनलंड, हे प्रदेश येतात. ( ३ ) तिसरा वर्ग नवीन मऊ खडकांचा प्रदेश हा होय. या प्रदेशांत बहुतेक सपाट, सखल मैदानें येतात, व त्यांमध्यें शेतीस लायक अशी उत्तम जमीन आढळते. अशा तऱ्हेचे प्रदेश म्हटले म्हणजे उत्तर अमेरिकेंतील मध्यभागाचें मोठें मैदान, दक्षिण अमेरिकेंतील ओरिनोको, अमेझॉन आणि पॅराग्वे हीं मैदानें, उत्तर युरोप खंडांतील बराच भूभाग व्यापणारें मैदान, पश्चिम सैबेरियांतील प्रदेश, तैग्रीस, युफ्रेटीस, सिंधु, गंगा, ब्रह्मपुत्रा व चीनमधील नद्यांचीं खोरीं आणि ऑस्ट्रेलियांतील मध्यभागांतील सखल प्रदेश, हे होत. (४) चौथ्या वर्गात मोठमोठ्या पर्वतांच्या रांगा दुमडल्या जाऊन जे घडी पडल्यासारखे गाळाचे खडक बनले आहेत त्यांचा समावेश होतो. यांपैकीं बरेचसे पर्वत तृतीय युगाच्या मध्यकालीं, जेव्हां जमिनीच्या पृष्ठभागापासून नवीन पर्वत तयार होऊन उंचावले, त्या कालीं बनलेले आहेत. याच कालांत हिमालय, रॉकी, आणि ॲंडीज पर्वत हे उत्पन्न झाले. भूस्तरशास्त्रज्ञांच्या मतें हें तृतीय युग फार महत्त्वाचें असून याच कालांत सस्तन प्राणी तयार झाले व मनुष्याचा पूर्वज प्रथमच भूमीवर अवतीर्ण झाला.

### खनिज संपत्ति—

वरील वर्गांपैकीं पहिला जो प्राचीन पाषाणांचा वर्ग आहे त्यामध्यें जसे धातुमय खनिज पदार्थ आढळतात, तसे ते नवीन खडकांत किंवा दुमडलेल्या खडकांत फारसे आढळत नाहींत. लोखंड व कांहीं अशुद्ध धातू ज्या गाळाच्या बनलेल्या थरांत कांहीं ठिकाणीं आढळून येतात त्या या गोष्टीस अपवाद होत. याच्या उलट अधातुमय खनिज, विशेषतः दगडी कोळसा व तेल हीं गाळाच्याच खडकांत आढळून येतात. मनुष्याला कांहीं या पृथ्वीच्या पोटांतील खाणी कृत्रिम रीतीनें इकडून तिकडे हालवितां येत नाहींत. त्या जेथें असतील तेथेंच जाऊन खणून शोधून काढून त्यांचा फायदा घ्यावा लागतो. जेथें भूमीच्या पोटांतच द्रव्य नसेल तेथें कितीहि खोदलें तरी त्यास तें आढळणार नाहीं. त्याला ज्याप्रमाणें जमिनीवर खत घालून एखादी जमीन सुपीक करतां येते त्याप्रमाणें जमिनीच्या पोटामधून खनिज पदार्थ काढतां येणें शक्य नाहीं. तेथें ते नैसर्गिक रीत्याच असावे लागतात. यामुळें या खनिज पदार्थांचीं क्षेत्रें ठरून गेलीं आहेत व आज सामर्थ्यवान् राष्ट्रें अशी भूमिगत संपत्ति आपल्या वर्चस्वाखालीं आणण्याचा प्रयत्न करीत आहेत. अर्थात् अशीं खनिज संपत्तीनें भरलेलीं क्षेत्रें मिळणें ज्यांस असाध्य आहे तीं राष्ट्रें त्या द्रव्यांऐवजीं इतर द्रव्यें योजण्याच्या बाबतींत संशोधन करीत आहेत.

### हवामानाचे प्रत्यक्ष परिणाम—

भूपृष्ठाची रचना व स्वरूप याप्रमाणेंच हवामानाचाहि परिणाम मनुष्यसमाजावर झाल्याशिवाय राहत नाहीं. आपण आपली राहणी आपल्या स्थानिक हवामानास इतकी अनुकूल करून घेतों कीं, ती गोष्ट आपल्या लक्षांतहि येत नाहीं. मनुष्य आपल्या घराची रचनाहि हवामानाप्रमाणें करीत असतो. उत्तरेकडील प्रदेशांतील घरें, छपरावरील बर्फ लवकर पडून जावें म्हणून अगदीं उतरत्या छपरांचीं बांधलेलीं असतात, तर कोरड्या प्रदेशांमध्यें किंवा उष्ण कटिबंधांत घरांचीं छपरें सपाट असतात; व मारवाडप्रमाणें कांहीं

ठिकाणीं तर पावसाचें पाणी छपरावर धरून ठेवतां यावें म्हणून तीं स्वच्छ व मध्यभागीं सखल करावीं लागतात. हवामानाचा परिणाम वनस्पतींच्या बाबतींत आपणांस विशेष दिसून येतो. कांहीं वनस्पती, उदा., चहा, कॉफी, कोको, या उष्ण प्रदेशांतच तयार होतात. तसेंच जेथें फार थंडी व फार पाऊस असेल तेथें गहूं पिकत नाहीं, इत्यादि गोष्टी आपणांस परिचितच आहेत. यामुळें अन्नधान्याच्या बाबतींतहि निरनिराळ्या देशांत विकट प्रश्न उत्पन्न होत असतात हें आपण आज पाहतच आहों. निरनिराळ्या प्रदेशांतील जमीनहि तेथील हवामानाप्रमाणेंच बनत असते; उदा., उष्णकटिबंधांत जेथें उन्हाळा व पावसाळा एकामागून एक येत असतात तेथें भू-पृष्ठाखालीं कोणत्याहि जातीचे दगड असले तरी तांबडसर जमीन तयार होत असते. ज्या ठिकाणीं उन्हाळ्यांतच पाऊस पडतो त्या ठिकाणीं जमीन लवकर तयार होते व उलट ज्या ठिकाणीं थंडींत पाऊस पडतो (उदा., भूमध्यसमुद्राच्या आसपासच्या प्रदेशांत) तेथें जमीन तयार होण्यास दीर्घ काळ लागतो.

वर सांगितलेल्या तीनहि गोष्टी म्हणजे भूपृष्ठाची रचना, अंतर्गत रचना व हवामान यांचा जसा जमिनीवर परिणाम होतो तसा तो वनस्पतींवरहि होतो. वनस्पतींच्या बाबतींत मनुष्यास कांहीं कृत्रिम फरक करतां येतात. उदा., नैसर्गिक रानटी गवत अथवा तृण यांच्याऐवजीं कांहीं सुधारणा करून मनुष्य तृणधान्याची वाढ करूं शकतो. परंतु कित्येकदां या गोष्टींचा विपरीत परिणाम होतो. उदा., ऑस्ट्रेलियांत प्रथम गुरांना चारा म्हणून फड्या निवडुंगांची लागवड करण्यांत आली. परंतु ते सर्वच जमीन व्यापूं लागले म्हणून त्यांचा नायनाट करावा लागला. तसेंच हिंदुस्थानांत कांहीं ठिकाणीं पाण्यांत शोभेकरितां लावलेल्या हायासिन्थ नांवाच्या वनस्पतीपासून नद्यांच्या पात्रांत इतका उपद्रव होऊं लागला कीं, या सुंदर वानस्पतिक शत्रूचा बीमोड करण्याकरितां लाखों रुपये खर्च करावे लागले.

वरील गोष्टींचा ज्याप्रमाणें वनस्पतिवर्गावर परिणाम होतो तसाच प्राणिवर्गावरहि होत असतो. उदा., वानर हा प्राणी जंगलें असतील तेथेंच राहतो; काळवीट हे गवताळ मैदानावरच जगूं शकतात; व ध्रुव प्रदेशीय अस्वलें आर्क्टिक प्रदेशांतच राहूं शकतात. मनुष्यानें कोणते प्राणी पाळावयाचे हीहि गोष्ट वनस्पतिवर्गावरच अवलंबून असते. उदा., मेंढ्यांचे मोठमोठे कळप पाळणें ही गोष्ट दक्षिण गोलार्धांतील समशीतोष्ण गवताळ प्रदेशांतच होऊं शकते.

## हवामानावरून प्रदेशविभागणी—

वरील विवेचनास अनुसरून पृथ्वीचे भिन्न भिन्न हवामानांप्रमाणें निरनिराळे विभाग पाडण्यांत येतात: (१) भूमध्य प्रदेशीय हवामान—हें हवामान असलेला पृथ्वीचा भाग म्हटला म्हणजे भूमध्यरेषेपासून उत्तरेकडे व दक्षिणेकडे ५ ते १० अंशांपर्यंत पसरलेला देश होय. या प्रदेशाचें उत्तम उदाहरण म्हणजे ॲमेझॉन नदीचें खोरें हें होय. म्हणून यास ॲमेझॉन पट्टा असें म्हणतात. या प्रदेशामध्यें उंच व नेहमीं हिरव्यागार असणाऱ्या वृक्षांचीं अरण्यें आढळतात. या प्रदेशांतील उष्णमान नेहमीं सरासरी ७८ ते ८० अंशांचें असतें (या लेखांतील सर्व हवामान फॅरनहीट अंशांत दिलें आहे). या हवामानांत थंडीच्या किंवा उन्हाळ्याच्या दिवसांत ५ अंशांपेक्षां अधिक फरक पडत नाहीं व दिवसाच्या आणि रात्रीच्या उष्णमानांत १० पासून २० अंशांपेक्षां अधिक फरक पडत नाहीं. या प्रदेशांत सर्व वर्षभर मधून मधून पाऊस पडत असतो. उदा., सिंगापूर येथें दररोज बहुतेक तिसऱ्या प्रहरीं पाऊस पडतो. पावसाचें सरासरी मान ७० ते ८० इंच इतकें असतें. भूमध्यरेषेच्या जवळच्या प्रदेशांत भयंकर उन्हाळा असतो अशी जी समजूत आहे ती चुकीची आहे. या प्रदेशांत नेहमींच उष्णमान बरेंच असतें ही गोष्ट खरी; परंतु तें १०० अंशापेक्षां क्वचितच वर जातें, व नेहमीं पडणाऱ्या पावसानें तें लवकरच थंड होतें. अरण्यामध्यें जेथें पाऊस पडत नाहीं व हवा अगदीं शांत असते तेथें मात्र उन्हाळा जास्त भासतो. मात्र येथील हवामानांत वर्षभर मुळींच बदल होत नसल्यामुळें तें कंटाळवाणें होतें. या प्रदेशांतील जंगलांत मनुष्य निरुत्साही व मंद बनतो; ही स्थिति आपणास ॲमेझॉनच्या खोऱ्यांतील इंडियन लोक व कॉंगोमधील ठेंगू लोक यांच्यामध्यें दृष्टीस पडते. ही गोष्ट दाट अरण्यांतील झाली. परंतु जेथें अरण्य विरळ असतें तेथील लोक थोडे आळशी पण काटक असतात. अशी वस्तुस्थिति आपणास मलाया, जावा व बोर्निओ यांमध्यें आढळते. या प्रदेशांतील अरण्यें तोडावयास फार अवघड असतात, व जंगल तोडून जमीन साफ केली तरी तेथें लवकरच बांबू व इतर झुडपें वाढूं लागतात. परंतु एकदां जमीन साफ केली म्हणजे मात्र ती फार सुपीक असते. येथें ठराविक हंगाम नसतो व वाटेल तेव्हां पेरणी करून पीक घेतां येतें. त्यामुळें तांदुळाचें पीक एकाच वर्षांत अनेकदां काढतां येतें. या प्रदेशांत रबर, खोबरें, खोबरेल तेल, साखर, कोको हीं पिकें होतात. त्यांपैकीं रबर तर याच पट्ट्यापलीकडे दुसऱ्या कोठेंहि होत नाहीं. ही रबराची लागवड दक्षिण अमेरिकेंतून १८७६ मध्यें बीं आणून सिलोनमध्यें प्रथम करण्यांत आली व

मर्यादित असून त्यापासून एकंदर नैसर्गिक भूरचनेवर फारसा परिणाम होत नाहीं.

### भूस्तर-रचना : पाषाणवर्ग—

कोणत्याहि प्रदेशाच्या भूपृष्ठाची रचना ही त्या पृष्ठाखालीं असलेल्या भूस्तर–रचनेवर अवलंबून असते. वास्तविक आपणांस भूपृष्ठापेक्षां भूस्तरांचाच आधीं विचार केला पाहिजे. परंतु भूपृष्ठ हें आपल्या नजरेस सहज पडतें तर भूस्तरांचा अभ्यास जमिनीखालीं खोदून पाहून करावा लागतो, व या दोहोंचा संबंध जोडणें ही गोष्टहि अभ्यासकाच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून असते. भूवर्णनकारास पृथ्वीच्या कवचांतील सर्व खडकांचा अभ्यास करणें आवश्यक नसतें. तें कार्य प्रस्तरविज्ञान्याचें किंवा पाषाणशास्त्रज्ञाचें आहे. परंतु भूपृष्ठावर जे पाषाण आढळतात त्यांचें ज्ञान त्यास त्यांत आढळणाऱ्या खनिज द्रव्यांची माहिती होण्याकरितां अवश्य आहे. भूवर्णनकाराच्या दृष्टीनें अशा तऱ्हेच्या भूपृष्ठावर आढळणाऱ्या पाषाणाचे चार मोठाले वर्ग करण्यांत येतात : ( १ ) पहिला वर्ग जुन्या कठिण खडकांचा पाडण्यांत येतो. हे पाण्याच्या प्रवाहानें फारसे झिजत नाहींत त्यामुळें त्यांचीं मोठमोठी पठारें बनतात. हे स्वभावतःच कठिण असल्यामुळें या ठिकाणचीं जमीन रुक्ष असते. हे पाषाण स्फटिकमय ( रूपांतरित ) किंवा गाळ घट्ट होऊन बनलेले असतात. अशा तऱ्हेचीं पठारें म्हटलीं म्हणजे ब्राझीलमधील पठार, दक्षिण अमेरिकेंतील गियानामधील उंच पठार, आफ्रिकेंतील बहुतेक दक्षिण भाग व्यापणारें पठार, अरबस्तानचें पठार, हिंदुस्थानमधलि दख्खनचें पठार व इंडोचीनचें पठार हीं होत. तसेंच ऑस्ट्रेलियामधील दोन-तृतीयांश भाग व्यापणारें पठार आणि सैबेरिया व स्कॅन्डिनेव्हिया यांच्यांतील पठार हींहि महत्त्वाचीं आहेत. ( २ ) दुसरा वर्ग म्हणजे ज्या प्रदेशामध्यें जुने खडक पाण्यानें झिजून जाऊन समुद्रसपाटीबरोबर सखल झाले आहेत असा प्रदेश. अशा प्रदेशांत कॅनडामधील लॅरेन्शियाचा भाग, युरोपमधील रशियाचा बराचसा भाग व फिनलंड, हे प्रदेश येतात. ( ३ ) तिसरा वर्ग नवीन मऊ खडकांचा प्रदेश हा होय. या प्रदेशांत बहुतेक सपाट, सखल मैदानें येतात, व त्यांमध्यें शेतीस लायक अशी उत्तम जमीन आढळते. अशा तऱ्हेचे प्रदेश म्हटले म्हणजे उत्तर अमेरिकेंतील मध्यभागाचें मोठें मैदान, दक्षिण अमेरिकेंतील ओरिनोको, अमेझॉन आणि पॅराग्वे हीं मैदानें, उत्तर युरोप खंडांतील बराच भूभाग व्यापणारें मैदान, पश्चिम सैबेरियांतील प्रदेश, तैग्रीस, युफ्रेटीस, सिंधु, गंगा, ब्रह्मपुत्रा व चीनमधील नद्यांचीं खोरीं आणि ऑस्ट्रेलियांतील मध्यभागांतील सखल प्रदेश, हे होत. (४) चौथ्या वर्गांत मोठमोठ्या पर्वतांच्या रांगा दुमडल्या जाऊन जे घडी पडल्यासारखे गाळाचे खडक बनले आहेत त्यांचा समावेश होतो. यांपैकीं बरेचसे पर्वत तृतीय युगाच्या मध्यकालीं, जेव्हां जमिनीच्या पृष्ठभागापासून नवीन पर्वत तयार होऊन उंचावले, त्या कालीं बनलेले आहेत. याच कालांत हिमालय, रॉकी, आणि अँडीज पर्वत हे उत्पन्न झाले. भूस्तरशास्त्रज्ञांच्या मतें हें तृतीय युग फार महत्त्वाचें असून याच कालांत सस्तन प्राणी तयार झाले व मनुष्याचा पूर्वज प्रथमच भूमीवर अवतीर्ण झाला.

### खनिज संपत्ति—

वरील वर्गांपैकीं पहिला जो प्राचीन पाषाणांचा वर्ग आहे त्यामध्यें जसे धातुमय खनिज पदार्थ आढळतात, तसे ते नवीन खडकांत किंवा दुमडलेल्या खडकांत फारसे आढळत नाहींत. लोखंड व कांहीं अशुद्ध धातू ज्या गाळाच्या बनलेल्या थरांत कांहीं ठिकाणीं आढळून येतात त्या या गोष्टीस अपवाद होत. याच्या उलट अधातुमय खनिज, विशेषतः दगडी कोळसा व तेल हीं गाळाच्याच खडकांत आढळून येतात. मनुष्याला कांहीं या पृथ्वीच्या पोटांतील खाणी कृत्रिम रीतीनें इकडून तिकडे हालवितां येत नाहींत. त्या जेथें असतील तेथेंच जाऊन खणून शोधून काढून त्यांचा फायदा घ्यावा लागतो. जेथें भूमीच्या पोटांतच द्रव्य नसेल तेथें कितीहि खोदलें तरी त्यास तें आढळणार नाहीं. त्याला ज्याप्रमाणें जमिनीवर खत घालून एखादी जमीन सुपीक करतां येते त्याप्रमाणें जमिनीच्या पोटामधून खनिज पदार्थ काढतां येणें शक्य नाहीं. तेथें ते नैसर्गिक रीत्याच असावे लागतात. यामुळें या खनिज पदार्थांचीं क्षेत्रें ठरून गेलीं आहेत व आज सामर्थ्यवान् राष्ट्रें अशी भूमिगत संपत्ति आपल्या वर्चस्वाखालीं आणण्याचा प्रयत्न करीत आहेत. अर्थात् अशीं खनिज संपत्तीनें भरलेलीं क्षेत्रें मिळणें ज्यांस असाध्य आहे तीं राष्ट्रें त्या द्रव्यांऐवजीं इतर द्रव्यें योजण्याच्या बाबतींत संशोधन करीत आहेत.

### हवामानाचे प्रत्यक्ष परिणाम—

भूपृष्ठाची रचना व स्वरूप याप्रमाणेंच हवामानाचाहि परिणाम मनुष्यसमाजावर झाल्याशिवाय राहत नाहीं. आपण आपली राहणी आपल्या स्थानिक हवामानास इतकी अनुकूल करून घेतों कीं, ती गोष्ट आपल्या लक्षांतहि येत नाहीं. मनुष्य आपल्या घराची रचनाहि हवामानाप्रमाणें करीत असतो. उत्तरेकडील प्रदेशांतील घरें, छपरावरील बर्फ लवकर पडून जावें म्हणून अगदीं उतरत्या छपरांचीं बांधलेलीं असतात, तर कोरड्या प्रदेशांमध्यें किंवा उष्ण कटिबंधांत घरांचीं छपरें सपाट असतात; व मारवाडप्रमाणें कांहीं

ठिकाणीं तर पावसाचें पाणी छपरावर धरून ठेवतां यावें म्हणून तीं स्वच्छ व मध्यभागीं सखल करावीं लागतात. हवामानाचा परिणाम वनस्पतींच्या बाबतींत आपणांस विशेष दिसून येतो. कांहीं वनस्पती, उदा., चहा, कॉफी, कोको, या उष्ण प्रदेशांतच तयार होतात. तसेंच जेथे फार थंडी व फार पाऊस असेल तेथें गहूं पिकत नाहीं, इत्यादि गोष्टी आपणांस परिचितच आहेत. यामुळें अन्नधान्याच्या बाबतींतहि निरनिराळ्या देशांत बिकट प्रश्न उत्पन्न होत असतात हें आपण आज पाहतच आहों. निरनिराळ्या प्रदेशांतील जमीनहि तेथील हवामानाप्रमाणेंच बनत असते; उदा., उष्णकटिबंधांत जेथें उन्हाळा व पावसाळा एकामागून एक येत असतात तेथें भू-पृष्ठाखालीं कोणत्याहि जातीचे दगड असले तरी तांबडसर जमीन तयार होत असते. ज्या ठिकाणीं उन्हाळ्यांतच पाऊस पडतो त्या ठिकाणीं जमीन लवकर तयार होते व उलट ज्या ठिकाणीं थंडींत पाऊस पडतो (उदा., भूमध्यसमुद्राच्या आसपासच्या प्रदेशांत) तेथें जमीन तयार होण्यास दीर्घ काळ लागतो.

वर सांगितलेल्या तीनहि गोष्टी म्हणजे भूपृष्ठाची रचना, अंतर्गत रचना व हवामान यांचा जसा जमिनीवर परिणाम होतो तसा तो वनस्पतींवरहि होतो. वनस्पतींच्या बाबतींत मनुष्यास कांहीं कृत्रिम फरक करतां येतात. उदा., नैसर्गिक रानटी गवत अथवा तृण यांच्याऐवजीं कांहीं सुधारणा करून मनुष्य तृणधान्याची वाढ करूं शकतो. परंतु कित्येकदां या गोष्टींचा विपरीत परिणाम होतो. उदा., ऑस्ट्रेलियांत प्रथम गुरांना चारा म्हणून फड्या निवडुंगांची लागवड करण्यांत आली. परंतु ते सर्वच जमीन व्यापूं लागले म्हणून त्यांचा नायनाट करावा लागला. तसेंच हिंदुस्थानांत कांहीं ठिकाणीं पाण्यांत शोभेकरितां लावलेल्या हायासिन्थ नांवाच्या वनस्पतीपासून नद्यांच्या पात्रांत इतका उपद्रव होऊं लागला कीं, या सुंदर वानस्पतिक शत्रूचा बीमोड करण्याकरितां लाखों रुपये खर्च करावे लागले.

वरील गोष्टींचा ज्याप्रमाणें वनस्पतिवर्गावर परिणाम होतो तसाच प्राणिवर्गावरहि होत असतो. उदा., वानर हा प्राणी जंगलें असतील तेथेंच राहतो; काळवीट हे गवताळ मैदानावरच जगूं शकतात; व ध्रुव प्रदेशीय अस्वलें आर्क्टिक प्रदेशांतच राहूं शकतात. मनुष्यानें कोणते प्राणी पाळावयाचे हीहि गोष्ट वनस्पतिवर्गावरच अवलंबून असते. उदा., मेंढ्यांचे मोठमोठे कळप पाळणें ही गोष्ट दक्षिण गोलार्धांतील समशीतोष्ण गवताळ प्रदेशांतच होऊं शकते.

## हवामानावरून प्रदेशविभागणी—

वरील विवेचनास अनुसरून पृथ्वीचे भिन्न भिन्न हवामानांप्रमाणें निरनिराळे विभाग पाडण्यांत येतात: (१) भूमध्य प्रदेशीय हवामान—हें हवामान असलेला पृथ्वीचा भाग म्हटला म्हणजे भूमध्यरेषेपासून उत्तरेकडे व दक्षिणेकडे ५ ते १०° अंशांपर्यंत पसरलेला देश होय. या प्रदेशाचें उत्तम उदाहरण म्हणजे ॲमेझॉन नदीचें खोरें हें होय. म्हणून यास ॲमेझॉन पट्टा असें म्हणतात. या प्रदेशामध्यें उंच व नेहमीं हिरव्यागार असणाऱ्या वृक्षांचीं अरण्यें आढळतात. या प्रदेशांतील उष्णमान नेहमीं सरासरी ७८ ते ८० अंशांचें असतें (या लेखांतील सर्व हवामान फॅरनहीट अंशांत दिलें आहे). या हवामानांत थंडीच्या किंवा उन्हाळ्याच्या दिवसांत ५ अंशांपेक्षां अधिक फरक पडत नाहीं व दिवसाच्या आणि रात्रीच्या उष्णमानांत १० पासून २० अंशांपेक्षां अधिक फरक पडत नाहीं. या प्रदेशांत सर्व वर्षभर मधून मधून पाऊस पडत असतो. उदा., सिंगापूर येथें दररोज बहुतेक तिसऱ्या प्रहरीं पाऊस पडतो. पावसाचें सरासरी मान ७० ते ८० इंच इतकें असतें. भूमध्यरेषेच्या जवळच्या प्रदेशांत भयंकर उन्हाळा असतो अशी जी समजूत आहे ती चुकीची आहे. या प्रदेशांत नेहमींच उष्णमान बरेंच असतें ही गोष्ट खरी; परंतु तें १०० अंशांपेक्षां क्वचितच वर जातें, व नेहमीं पडणाऱ्या पावसानें तें लवकरच थंड होतें. अरण्यामध्यें जेथें पाऊस पडत नाहीं व हवा अगदीं शांत असते तेथें मात्र उन्हाळा जास्त भासतो. मात्र येथील हवामानांत वर्षभर मुळींच बदल होत नसल्यामुळें तें कंटाळवाणें होतें. या प्रदेशांतील जंगलांत मनुष्य निरुत्साही व मंद बनतो; ही स्थिति आपणास ॲमेझॉनच्या खोऱ्यांतील इंडियन लोक व काँगोमधील ठेंगू लोक यांच्यामध्यें दृष्टीस पडते. ही गोष्ट दाट अरण्यांतील झाली. परंतु जेथें अरण्य विरळ असतें तेथील लोक थोडे आळशी पण काटक असतात. अशी वस्तुस्थिति आपणास मलाया, जावा व बोर्निओ यांमध्यें आढळते. या प्रदेशांतील अरण्यें तोडावयास फार अवघड असतात, व जंगल तोडून जमीन साफ केली तरी तेथें लवकरच बांबू व इतर झुडपें वाढूं लागतात. परंतु एकदां जमीन साफ केली म्हणजे मात्र ती फार सुपीक असते. येथें ठराविक हंगाम नसतो व वाटेल तेव्हां पेरणी करून पीक घेतां येतें. त्यामुळें तांदुळाचें पीक एकाच वर्षांत अनेकदां काढतां येतें. या प्रदेशांत रबर, खोबरें, खोबरेल तेल, साखर, कोको हीं पिकें होतात. त्यांपैकीं रबर तर याच पट्ट्यापलीकडे दुसऱ्या कोठेंहि होत नाहीं. ही रबराची लागवड दक्षिण अमेरिकेंतून १८७६ मध्यें बीं आणून सिलोनमध्यें प्रथम करण्यांत आली व

सध्यां सिलोन, दक्षिण हिंदुस्थान, मलाया, व डच ईस्ट इंडीज याच प्रदेशांत उत्तम रबर तयार होतें. इंग्रज सरकारनें हिंदुस्थानांत इतरत्र रबराची लागवड करण्याचे प्रयत्न केले; परंतु त्या प्रयत्नास त्यास यश आलें नाहीं. उदा., कलकत्त्यास रबराचीं झाडें लावण्याचा प्रयोग अयशस्वी झाला; तसेंच पश्चिम किनाऱ्यावरहि अशा तऱ्हेचे प्रयोग करण्यांत आले होते, परंतु ते फारसे यशस्वी झाल्याचें दिसत नाहीं.

### उष्णकटिबंध—

(२) यानंतर उष्णकटिबंधाचा प्रदेश येतो. उष्णकटिबंध प्रदेशाला उष्णकटिबंध हवामानाची निश्चित मर्यादा अशी घालण्यांत आली आहे कीं, भूमध्य प्रदेशाच्या दोन्ही बाजूस जी उष्ण हवामानाची पट्टी असते ती होय. असा ठळक प्रदेश म्हटला म्हणजे आफ्रिकेंतील सुदान प्रांत होय. म्हणून अशा प्रकारच्या प्रदेशास सुदानी प्रदेश असेंहि म्हणण्यांत येते. तसेंच या प्रदेशास उष्ण प्रदेशांतील गवताळ हवामानाचा प्रदेश किंवा सॅव्हानाचा प्रदेश असेंहि नांव देण्यांत येतें. या प्रदेशांतील हवामानामध्यें उन्हाळ्यांत आणि थंडीच्या दिवसांत उष्णमानामध्यें फार फरक असतो. भूमध्यरेषेच्या बाजूकडे किंवा समुद्राजवळ पर्जन्यमान अधिक असल्यामुळें या दोन हवामानांतील फरक जरा कमी असतो; परंतु कोरड्या हवेच्या प्रदेशांत या दोन उष्णमानांतील अंतर सरासरी ३०° असतें. तसेंच दिवस व रात्र यांतील उष्णमानांतहि बरेंच अंतर असतें.

अशा तऱ्हेचे गवताळ प्रदेश म्हटले म्हणजे भूमध्य प्रदेशांतील अरण्यमय प्रदेश आणि उष्ण ओसाड मैदानें यांच्या दरम्यानचे प्रदेश होत. यांतील पर्जन्यमान अरण्याच्या बाजूस ७०।८० इंच तर वाळवंटाच्या बाजूस १५ इंचांपर्यंत असतें. कांहीं आर्द्र भागांत २०० इंचांपर्यंतहि पाऊस पडतो. उन्हाळा व पावसाळा हे ऋतू अगदीं स्वतंत्र असतात, व बहुधा थंड व रुक्ष ऋतु, उष्ण व रुक्ष ऋतु असे एकामागून एक येतात. एप्रिल–मेमध्यें उन्हाळा संपून पावसाळा सुरू होतो. नंतर पुन्हां थोडा उन्हाळा होऊन नंतर थंडी पडते. पावसाळ्यांत गवताची वाढ होते. झाडांची वाढ होण्यास वर्षभर पाण्याचा किंवा आर्द्रतेचा पुरवठा व्हावा लागतो. रुक्ष हवेंत झाडें वाढत नाहींत. परंतु थोडा पाऊस पडला तरी तेवढ्या ओलाव्यावर गवत वाढूं शकतें. अशा रुक्ष प्रदेशांत दर वर्षी पडणाऱ्या पर्जन्यास फार महत्त्व असतें. पाऊस पडला तरच पिकें येतात, नाहीं तर दुष्काळ पडतो. यामुळें उष्णकटिबंधांतील गवताळ प्रदेशांत वरचेवर दुष्काळ पडतो.

### गवताळ प्रदेश—

भूमध्य प्रदेशांत जंगलें असल्यामुळें तेथें आढळणारे प्राणी झाडावर चढतां येणारे असतात. परंतु गवताळ प्रदेशांत झाडें नसल्यामुळें त्या ठिकाणीं दोन प्रकारचे प्राणी दृष्टीस पडतात: १. काळवीट, जिराफ, वगैरे शाकाहारी व जलद पळणारे प्राणी; आणि २. सिंह, वाघ, चित्ता, वगैरे वरील तृणभक्षक वर्गावर उपजीविका करणारे मांसाहारी प्राणी. सॅव्हाना प्रदेशांतील मनुष्य बहुतेक शिकारीवर उपजीविका करतो. परंतु तेथें गवत मुबलक असल्यामुळें पशुपालनाचाहि धंदा त्यास करतां येतो. व शिकारीकडून तो हळूहळू पशुपालनाकडे वळतो. अशा गवताळ प्रदेशांत जेथें प्रथम रानटी गवत वाढतें तेथें हळूहळू तृणधान्यांची लागवड करतां येते, आणि त्यामुळें मनुष्याची प्रवृत्ति शेतकी करण्याकडे होते. अशा तऱ्हेचे गवताळ प्रदेश दक्षिण अमेरिकेमध्यें व्हेनेझुएला व ब्राझील या देशांत असून त्यांस अनुक्रमें लॅनो व पंपास असें म्हणतात. आफ्रिकेमध्यें जसा मोठा सॅव्हाना प्रदेश आहे तसाच उत्तर ऑस्ट्रेलियामध्येंहि गवताळ प्रदेश आहे. यांतील फारच थोडा प्रदेश लागवडीस आणण्यांत आलेला आहे. सध्यां शाकाहार व मांसाहार यांमध्यें लढा चालू आहे. हळूहळू मांसाचा पुरवठा कमी पडूं लागला, व गुरांच्या कळपाच्याऐवजीं लोक गहूं पिकवूं लागले म्हणजे या प्रदेशाकडे साहजिकच लोकांचें लक्ष लागेल. अद्यापि उत्तर व दक्षिण ऱ्होडेशिया, अँगोला, पूर्व आफ्रिका व उत्तर ऑस्ट्रेलिया यांमध्यें फारशी वस्ती नाहीं. या प्रदेशांत शेतीची वाढ होण्यास पुष्कळ जागा आहे. या ठिकाणीं मका, ज्वारी, बाजरी यांसारखीं कांहीं धान्यें, व कापूस, ऊंस, भुईमूग व इतर गळिताचीं धान्यें पिकूं शकतील. या प्रदेशांत जें हवामान आहे व ज्या तऱ्हेचीं पिकें येतात तीं पाहिलीं म्हणजे हा प्रदेश हिंदुस्थानांतील बऱ्याच मोठ्या प्रदेशाशीं सदृश असल्याचें दृष्टीस पडतें व यामुळें हा प्रदेश हिंदुस्थानांतील हवापाणी व अन्न यांस परिचित असलेल्या लोकांस वसाहत करण्यास योग्य आहे ही गोष्ट सहज लक्षांत येईल. दक्षिण अमेरिकेंतील कांहीं शेतकी कंपन्या तिकडे गर्दी होऊं लागल्यामुळें आफ्रिकेत जमिनी घेऊं लागल्या आहेत. परंतु या भागांत मजूर मिळणें फार कठिण जातें. आफ्रिकेमध्यें कांहीं भागांत दर मैलास २० इतकीहि मनुष्यवस्ती आढळत नाहीं व उत्तर ऑस्ट्रेलियामध्यें तर मनुष्यवस्तीच झालेली नाहीं. तसेंच दळणवळणाचे मार्गहि नाहींत. त्यामुळें उत्पन्न केलेला मालहि बाहेर पाठविणें शक्य होत नाहीं. जसजसे आगगाडीचे रस्ते वगैरे होतील तसतशी अशा प्रदेशांतील वस्ती वाढत जाईल.

**उष्णकटिबंधांतील मोसमी हवामान—**

या प्रदेशांतील हवामान वरील उष्णकटिबंधांतील हवामानाप्रमाणेंच असतें. परंतु तेथें पाऊस पडण्याचें कारण मात्र निराळें असतें. हे दोन्हीहि प्रदेश उष्णकटिबंधांतच मोडतात. परंतु उष्णकटिबंधांतील गवताळ प्रदेशांत पडणारा पाऊस व्यापारी वाऱ्यांमुळें समुद्रावरून येतो तर मोसमी प्रदेशांतील व्यापारी वारे उलट दिशेनें वाहूं लागले म्हणजे येतो. उन्हाळ्यांत हवा तापून वर जाऊं लागली म्हणजे समुद्रावरील आर्द्रांश असलेली थंड हवा आंत शिरते व तिजबरोबर अत्यंत आवश्यक असलेला पाऊस पडूं लागतो. अशा तऱ्हेचा मोसमी पावसाचा प्रदेश म्हटला म्हणजे हिंदुस्थान, इन्डोचीन व दक्षिण चीन देश हा होय. या प्रदेशांत कधीं कधीं मध्य व उत्तर चीन, आणि जपान यांचाहि अंतर्भाव करण्यांत येतो. या दुसऱ्या प्रदेशांत पडणारा पाऊस जरी मोसमी वाऱ्यांमुळें येतो तरी ते प्रदेश उष्णकटिबंधाच्या पलीकडे आहेत; व त्यांतील हिंवाळा अधिक कडक असतो. यांतील केवळ मोसमी प्रदेश म्हटला म्हणजे हिंदुस्थान हा होय. यामध्यें तीन ऋतु असतात. नोव्हेंबरपासून फेब्रुवारीपर्यंत हिंवाळा असून त्यांत थोडाच पाऊस पडतो. त्यानंतर मार्चपासून जूनच्या मध्यापर्यंत कडक उन्हाळा असतो, व यांत मुळींच पाऊस पडत नाहीं. जुलै ते ऑक्टोबर पावसाळा असतो. या वेळीं पुष्कळ पाऊस पडून हवा थंड होते. या प्रदेशांतील पर्जन्यमानांतहि बराच फरक आहे. समुद्रावरून येणारे वारे उंच पर्वतामुळें जेथें अडविले जातात तेथें पर्जन्यमान फार असतें व तें कांहीं ठिकाणीं ५०० इंचांपर्यंतहि आढळतें. हा प्रदेश जगांतील सर्वांत अधिक पर्जन्यमानाचा होय. ज्या प्रदेशावर पर्जन्य वारे फार लांबून येतात तेथें ते बहुतेक कोरडे होऊन येतात. त्यामुळें तेथें पावसाचें मान सरासरी ५ इंच असतें.

**चार मोसमी प्रदेश—**

ज्या मानानें हवेंत आर्द्रांश असेल त्या मानानें वनस्पती व पिकें यांची वाढ होते. मोसमी प्रदेशाचे सामान्यतः चार विभाग पाडण्यांत येतात: (१) ८० इंचांवर पाऊस पडणारा प्रदेश—या प्रदेशांत उष्णकटिबंधाप्रमाणें सतत हिरवीं राहणारीं झाडें वाढतात व येथें बहुतेक भाताचें पीक होतें. या प्रदेशांत अवर्षणाची भीति नसून पुरापासून जास्त भीति असते. याकरितां इरावतीच्या खोऱ्याप्रमाणें बांध घालावे लागतात. (२) ४० ते ८० इंच पर्जन्यमानाचा प्रदेश—या ठिकाणीं दरवर्षी पानें गळणारे वृक्ष वाढतात व त्यांचीं पानें उन्हाळ्यांत गळून पडतात. या प्रदेशांतहि बहुतेक भाताचेंच पीक येतें. परंतु



त्यास अवर्षणापासून भीति असते; याकरितां या प्रदेशांत कालवे काढावे लागतात. भाताशिवाय मका, ऊंस व गळिताचीं धान्यें हीं पिकेंहि ह्या प्रदेशांत होतात. (३) २० ते ४० इंच पर्जन्यमानाचा प्रदेश—या प्रदेशांत बहुतेक कांटेरी झाडें व झुडपें वाढतात. अशा प्रदेशांत सागवानासारखीं झाडें होऊं शकत नाहींत. मधून मधून मोकळ्या मैदानांत गवत पुष्कळ वाढतें, व या बाबतींत हा प्रदेश वरील सॅव्हानासारखा दिसतो. या प्रदेशांत ज्वारी, बाजरी यांसारखीं तृण धान्यें होतात. कांहीं ठिकाणीं रब्बीच्या हंगामांत गहूं तयार होतो. हीं पिकें व इतर गळिताचीं धान्यें आणि कापूस हीं या प्रदेशांतील महत्त्वाचीं पिकें होत. या प्रदेशांत अवर्षणाची व दुष्काळाची वारंवार भीति असते. (४) २० इंचांपेक्षां कमी पर्जन्यमान असणारा प्रदेश—या प्रदेशांत ओसाड मैदानें येतात. या ठिकाणीं कोणतेंहि पीक काढावयाचें झालें तरी कालवे व पाट यांची आवश्यकता असते. अशा प्रदेशांत केवळ लहान लहान झुडुपांची व कांटेरी झाडांची वाढ होते.

अशा तऱ्हेच्या प्रदेशामध्यें एक गोष्ट विशेष असते कीं, भूमध्य प्रदेशांतील जंगलाप्रमाणें येथील जंगल फार दाट नसल्यामुळें सहज तोडून साफ करतां येतें व एकदां जमीन झुडपें तोडून मोकळी केली म्हणजे तींत पिकें काढणें सोपें होतें. यामुळें अशा मोसमी हवामानाच्या प्रदेशांत लोकवस्ती फार दाट असून जेथें जमीन सुपीक असेल तेथें लोकवस्तीची वाढ विशेष होते व लोकसंख्येचें प्रमाण अतिशय वाढलेलें असतें. हिंदुस्थानांत अशा तऱ्हेच्या चांगली शेती असलेल्या प्रदेशांतील लोकसंख्येचें प्रमाण फार मोठें असून त्यांतील शेंकडा ९० लोक शेतीवर उपजीविका करतात. मोसमी (मॉन्सून) प्रदेशांत सामान्यतः हिंदुस्थान, ब्रह्मदेश, इंडोचीन व दक्षिण चीन यांचा समावेश होतो, हें वर सांगितलेंच आहे. हिंदी महासागराभोंवतीं असलेल्या प्रदेशांत विशेषतः ऑस्ट्रेलियाच्या वायव्य भागांत आणि आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावर अशाच तऱ्हेचें हवामान असतें. दक्षिण अमेरिका व मध्य अमेरिका यांच्या वायव्य किनाऱ्यावर असेंच मोसमी हवामान दृष्टीस पडतें. सध्यां मोसमी प्रदेशांतील हिंदुस्थान व दक्षिण चीन यांतील वस्ती अत्यंत दाट आहे. फ्रेंच इंडोचीन, ब्रह्मदेश व सयाम यांतहि बरीच वस्ती आहे. ब्रह्मदेशांत बरेचसे हिंदी लोक गेलेले आहेत. फ्रेंच इंडोचीन व सयाम या देशांत चिनी लोक प्रवेश करीत आहेत. परंतु यापेक्षां ऑस्ट्रेलियाचा वायव्य भाग आणि आफ्रिकेचा पूर्व किनारा यांतील हवामान हिंदुस्थानसारखें असून तेथें हिंदुस्थानांत होणारीं पिकें सहज होण्यासारखीं आहेत व या प्रदेशांत वसाहत करणारास हिंदी शेतीचा अनु-

भव उपयोगी पडण्यासारखा आहे व हिंदी लोकांसहि वसाहत करण्यास या भूमींतील परिस्थिति अनुकूल आहे.

## ओसाड मैदानांतील उष्ण हवेचे प्रदेश—

भूमध्य प्रदेशापासून दोन्ही बाजूंकडील ध्रुवांच्या बाजूस असलेले प्रदेश ओसाड वाळवंटाचे आहेत. या प्रदेशांतील हवेवर वातावरणाचा फार मोठा दाब पडलेला असतो व त्यामुळें वाऱ्याचे प्रवाह वरून खालीं येऊं लागतात व या प्रदेशांतून बाहेरच्या प्रदेशाकडे वाहूं लागतात. त्यामुळें या वाऱ्यांच्या प्रवाहांत महासागरावरून आंत येणाऱ्या वाऱ्याप्रमाणें आर्द्रांश नसतो. असे वाऱ्याचे प्रवाह बहुधा भूमध्य प्रदेशाच्या पश्चिम दिशेकडे उत्पन्न होतात. कारण पूर्वेकडील त्याच अक्षांशावरील प्रदेशांत व्यापारी वाऱ्यांमुळें थोडासा पाऊस पडतो तसें येथें होत नाहीं. यामुळें आकाशांत ढग बहुधा नसतात. याचा परिणाम असा होतो कीं, उघड्या जमिनीवर सूर्याचे प्रखर किरण पडून जमीन अतिशय तापते व रात्रीं तीच उष्णता वेगानें बाहेर पडून जमीन थंड होते. जेव्हां सूर्य डोक्यावर असतो त्या वेळीं उन्हाळ्यांतील व हिंवाळ्यांतील उष्णमानांत अंतर फार असतें. पाऊस मुळींच नसल्यामुळें हें उष्णमान कमीहि होत नाहीं. बहुतेक हीं ओसाड मैदानें सखल प्रदेशांत असल्यामुळें उन्हाळ्यांतील उष्णता पर्वत, वगैरेंच्या उंचीमुळेंहि कमी होण्याची शक्यता नसते. त्यामुळें या प्रदेशांत जगांतील अत्यंत उच्च उष्णमान असतें. साहारामधील गोलीया येथें जानेवारींतील सरासरी उष्णमान ३९° तर जुलैमधील ९३° असतें. यामुळें उन्हाळा व हिंवाळा यांतील अंतर ५४ अंशांचें असतें. हिंदुस्थानांतील जाकोबाबाद येथें हेंच अंतर जानेवारी व जून महिन्यांमध्यें सरासरी ५७° व ९८° अंश असतें. जेथें पावसाचें मान ९ इंचांपर्यंत असतें तेथें वाळवंटाची तीव्रता थोडी कमी होते. टिंबक्टू हें शहर अशा प्रदेशांत वसलेलें आहे. परंतु पर्जन्यमान २० इंचांपर्यंत गेल्याशिवाय गवताळ प्रदेशास सुरुवात होत नाहीं. पृथ्वीच्या उत्तर गोलार्धांत जमिनीचा भूभाग अधिक असल्यामुळें दक्षिण गोलार्धापेक्षां उत्तर गोलार्धांत वाळवंटाचे प्रदेशहि अधिक व मोठाले आहेत. उत्तर आफ्रिकेंतील साहारा वाळवंट प्रसिद्धच आहे. व तें अटलँटिक महासागरापासून तांबड्या समुद्रापर्यंत पसरलेलें आहे. यावरून या हवामानास साहारा हवामान म्हणतात. हेंच वाळवंट पुढें अरबस्तानापासून बलुचिस्तानापर्यंत व तेथून सिंधमधून कच्छच्या रणापर्यंत पसरलेलें आहे. उत्तर अमेरिकेमध्यें संयुक्त संस्थानें व मेक्सिको यांच्या सरहद्दीवर मोठें वाळवंट आहे. दक्षिण अमेरिकेंत पेरू व चिली देशांत मोठालीं वाळवंटें असून तीं अँडीज पर्वत व पॅसिफिक महासागर यांच्या दरम्यान पसरलीं आहेत. दक्षिण आफ्रिकेमध्यें कलहारी वाळवंट अटलँटिक महासागरापर्यंत पसरलें असून ऑस्ट्रेलियामध्यें १० इंचांपेक्षा कमी पर्जन्यमान असलेलें एक मोठें वाळवंट आहे.

## ओलवणें—

ज्या वाळवंटांत कोणत्याच प्रकारची वनस्पति उगवत नाहीं अशीं वाळवंटें फार थोडीं आहेत. वाळवंटांत उगवणाऱ्या झाडांस पाणी सांठवून ठेवण्याकरितां कांहीं विशेष सोय असते. कांहींचीं मुळें लांब असून तीं पाण्यापर्यंत पोंचूं शकतात. कांहींच्या खोडामध्यें पाण्याचा संचय करून ठेवतां येतो, व बहुतेकांस कोणी प्राण्यानें खाऊं नये म्हणून कांटे असतात. वाळवंटांत मधून मधून कांहीं सुपीक भाग असतो, त्यास ओलवण असें म्हणतात. हीं बहुतेक खोलगट भागांत आढळतात व तेथें जमिनीच्या पृष्ठभागाखालीं जवळच पाणी सांपडतें. कांहीं ओलवणें अगदींच लहान असून त्यांत केवळ थोडीं ताडाचीं झाडें असतात, परंतु कांहीं विस्तृत असून त्यांत बरीच मोठी लोकवस्ती असते. अशा तऱ्हेच्या वाळवंटांत आढळणाऱ्या लोकांचे मुख्यतः तीन वर्ग पाडतां येतात : १. उंटावरून निरनिराळ्या स्थळीं माल वाहून नेणारे भटके लोक. २. ओलवणांवर कायमची वस्ती करून राहून शेती व पशुपालन हे धंदे व खजुराची लागवड करणारे लोक. ३. जमिनींतील खनिज संपत्ति खोदून काढून तिचा व्यापार करणारे लोक; उदा., चिली देशांतील नत्रयुक्त पदार्थ किंवा पश्चिम ऑस्ट्रेलियांतील सोन्याच्या खाणींतून सोनें काढणारे लोक.

मनुष्याच्या राहणीवर या वाळवंटाच्या प्रदेशाचा फार महत्त्वाचा परिणाम दिसून येतो. सर्व बाजूंनीं सपाट व एकरूप प्रदेश, स्वच्छ आकाश आणि रात्रीं प्रवास करीत असतां वाट ओळखण्याची आवश्यकता या गोष्टींमुळें या लोकांचें लक्ष जमिनीपेक्षां आकाशाकडे अधिक लागलेलें असतें. त्यामुळें अशा प्रदेशांत तत्त्वज्ञानविषयक विचार करणारे, तसेंच गणित व ज्योतिषशास्त्र यांचा अभ्यास करणारे लोक उत्पन्न होतात. ही गोष्ट आपणांस मिसरी व अरब या लोकांवरून लक्षांत येते.

एखाद्या ओलवणांत राहत असलेल्या लोकांचा जर त्या ओलवणांतील पाण्याचा सांठा संपला तर त्यांस ती जागा सोडून दुसऱ्या ठिकाणीं जाऊन वस्ती करणें भाग पडत असतें. याच कारणामुळें हिक्सॉस लोकांनीं ईजिप्तवर आक्रमण केलें, व अब्राहम यानें अरबस्तानांतून निघून पॅलेस्टाइनमध्यें वस्ती केली. आजहि आपणांस या वाळवंटांचें महत्त्व प्रतीत झालें पाहिजे. कारण, अशा वाळवंटांतील जमीन बहुतेक गाळाची बनलेली असते व जर तेथें कालवे बांधून पाण्याची सोय केली तर ती

सुपीक होते. ईजिप्तमधील नाईल नदीचें खोरें, तसेंच अमेरिकेमधील कोलोराडोचें वाळवंट, हिंदुस्थानांतील सिंधु नदीकांठचा प्रदेश व तेथील सक्कर धरणाचे कालवे, यांवरून ही गोष्ट आपणांस सहज प्रतीत होईल. पॅलेस्टाइनमधील मरुभूमींत नवीन वसाहत करून राहिलेल्या यहुदी लोकांनीं तेथील जंगलाचें कसें मंगल केलें तें आपणांस प्रत्यक्ष दिसतच आहे.

या वाळवंटांमुळें मनुष्याच्या भ्रमणास अडथळा उत्पन्न होऊन दोन निरनिराळ्या प्रकारचे लोक परस्परांपासून दूर ठेवले जातात हीहि गोष्ट बरीच महत्त्वाची आहे. साहारा वाळवंटामुळें उत्तरेकडील श्वेतवर्णी लोक व दक्षिणेकडील कृष्णवर्णी लोक यांस आतांपर्यंत परस्परांपासून अलग राखलें होतें व त्यामुळें या प्रदेशांत या भिन्न वर्णी लोकांचा आतांपर्यंत संकर झाला नव्हता. परंतु अमेरिकेमध्यें गुलाम म्हणून नीग्रो लोकांस नेल्यानंतर तेथें हा संकर सुलभ झाला व त्याचे परिणाम आपणांस आज व यापुढेंहि दिसून येणार आहेत.

### भूमध्य समुद्रीय हवामान—

भूमध्य समुद्राच्या सभोंवतीं असलेल्या प्रदेशाचें हवामान एका विशिष्ट प्रकारचें आहे. भूमध्य रेषेजवळील उष्ण वाळवंटाप्रमाणें या प्रदेशांतील हवा उन्हाळ्यामध्यें उष्ण व रुक्ष असून वाऱ्यांचे प्रवाह आंतरभागांतून बाहेर वाहत जातात. परंतु हिंवाळ्यांत या प्रदेशावरून पश्चिम दिशेकडून वारे वाहत असल्यामुळें हिंवाळा फारसा कडक नसतो व त्या वेळीं पाऊस पडतो. उष्ण कटिबंधांतील उन्हाळी मोसमी पावसाच्या प्रदेशाच्या उलट हे हिंवाळी मोसमी पावसाचे प्रदेश आहेत. शिवाय भूमध्यसमुद्र हा समशीतोष्ण असल्यामुळें येथील हवा थंड असते. या प्रदेशांत सर्व वर्षभर स्वच्छ ऊन पडतें. उन्हाळ्यांत आकाश बहुतेक निरभ्र असतें व हिंवाळ्यांतहि तें फारसें अभ्राच्छादित नसतें. या हवामानाचा प्रदेश ३० ते ४५ अक्षांशाच्या दरम्यान व युरोप खंडाच्या पश्चिमेकडील भागांत पसरलेला आहे. भूमध्य समुद्राभोंवतालचा सर्व प्रदेश यांत येतो; तसेंच उत्तर अमेरिकेंतील कॅलिफोर्निया, दक्षिण अमेरिकेंतील चिली देशाचा मध्यभाग, द. आफ्रिकेंतील केप प्रांताचा नैऋत्य भाग व पश्चिम भाग, व पश्चिम ऑस्ट्रेलियाचा नैऋत्य भाग आणि दक्षिण ऑस्ट्रेलिया व व्हिक्टोरिया प्रांतांचा कांहीं भाग, इतका प्रदेश या हवामानांत येतो.

अर्थात् या निरनिराळ्या प्रदेशांतील हवामानांत थोडाफार फरक असतोच. या हवामानांत हिंवाळ्यांत मिळणारा आर्द्रांश वनस्पतींना उन्हाळ्याकरितां संचय करून ठेवावा लागतो. यामुळें वरवर मुळें असणारीं झाडें या हवेंत जगत नाहींत. *येथील झाडें बहुतेक वर्षभर हिरवीं राहणारीं व झुडुपांच्या* स्वरूपाचीं असतात व गवतांच्या ऐवजीं फुलझाडें पुष्कळ होतात. कांहीं झाडांच्या पानांवर आर्द्रांश संचित करण्याकरितां मेणासारखी तकतकी असते तर कांहींच्या पानास लव असते. द्राक्षाचा वेल या प्रदेशांत होतो व त्यास लांब मुळें असतात. तसेंच बुचाच्या जातीचीं ओक व चेस्टनट हीं झाडें युरोप खंडांत व जारा नांवाचा साग ऑस्ट्रेलियांत पुष्कळ होतो. या प्रदेशांतील उन्हाळा कोरडा असल्यामुळें अनेक प्रकारचीं फळें येथें उत्पन्न होतात. उदा., संत्रीं, लिंबें, वगैरे आंबट फळें; तशींच जरदाळू, पीच, पिअर, सफरचंद, इत्यादि फळें; आणि बदाम, अंजीर, तुती, द्राक्षें, ऑलीव्ह, वगैरे अनेक प्रकारचीं फळें येथें होतात. कित्येक प्रकारचीं बार्ली, गहूं व इतर धान्यें या प्रदेशांत पिकतात. या प्रदेशांत डोंगरमाथ्यावर पडणाऱ्या बर्फापासून मिळणाऱ्या पाण्याचे कालवे काढण्यांत आल्यामुळें त्यांचा शेतीस फार महत्त्वाचा उपयोग झाला आहे, व त्याचा या प्रदेशांतील एकंदर आर्थिक परिस्थितीवर फार मोठा परिणाम झालेला आहे.

भूमध्य प्रदेशांतील हवामानांतच ग्रीस, क्रीट, कार्थेज व रोम येथील संस्कृती उदय पावलेल्या आहेत; त्याचें कारणहि येथील सुसह्य हवामानच होय. परंतु त्याचाच परिणाम कदाचित् पुढें आलस्य व अवनति या गोष्टींस कारण झालेला असावा. विशेषतः उन्हाळ्यांत मनुष्यास स्वाभाविकच ग्लानि येण्याचा संभव असतो. तथापि भूमध्य समुद्रीय हवामान लोकवस्तीच्या वृद्धीस उपकारक आहे. यामुळें अशा तऱ्हेचें हवामान असलेल्या दक्षिण अमेरिका व ऑस्ट्रेलिया या प्रदेशांची भरभराट झाली आहे. द. आफ्रिकेंतील अशाच तऱ्हेच्या हवामानाच्या प्रदेशांत प्रथम डच लोकांनीं वसाहत केली व अद्यापि त्या वसाहतीस विशेष महत्त्व आहे. कॅलिफोर्निया या संस्थानची प्रगति तर स्पष्टच दिसत आहे.

### उष्ण-समशीतोष्ण हवामान—

भूमध्य समुद्रीय हवा सामान्यतः भूखंडाच्या पश्चिम बाजूला असते. परंतु त्याच अक्षांशावर पूर्वेकडील समशीतोष्ण कटिबंधाच्या भागांत उष्णमान तेंच असलें तरी पाऊस उन्हाळ्यांत पडतो. अशा प्रकारच्या प्रदेशांत उ. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील कापसाचा प्रदेश, चीनमधील बराचसा भाग, ऑस्ट्रेलियाचा आग्नेय किनारा, द. आफ्रिका, युरुग्वे आणि ब्राझिलचा आग्नेय भाग हे प्रदेश येतात. या प्रदेशांतील हवामान भूमध्य समुद्रीय प्रदेशासारखें अगदीं एकाच तऱ्हेचें असतें असें नाहीं; तर प्रत्येक प्रदेशांत थोडा फरक असतो. कापसाचें पीक येण्यास सामान्यतः वसंत ऋतूंतील अखेरच्या *थंडीच्या कडाक्यापासून शरद् ऋतूंतील थंडीच्या कडाक्यापर्यंत*

निदान दोनशें दिवसांचा अवधि लागतो. पावसाचें सरासरी मान २० ते २३ इंच असावें लागतें. कालव्याची सोय असली तर पाऊस कमी असला तरी चालतो. या उष्ण-समशीतोष्ण प्रदेशामध्यें जरी निरनिराळ्या प्रकारचीं झाडें वाढत असलीं तरी सामान्यतः उंच वाढणारीं जंगलें आढळतात. कधीं कधीं हीं विपुव प्रदेशाइतकीं दाट पालवीचीं असतात. तथापि सामान्यतः विरळ असून तितकीं निबिड नसतात. कांहीं ठिकाणीं ताड व वृक्षनेचे आढळतात. जपानमध्येंहि याच प्रकारचें हवामान असतें. परंतु तो देश एक द्वीपसमूह असल्यामुळें त्यांतील परिस्थिति थोडी भिन्न असते. अर्थात् या प्रदेशांतील हवामान मनुष्याच्या वस्तीस आणि वाढीस फार अनुकूल असतें. मध्य चीनमधील खोऱ्यांत तांदूळ, कापूस, चहा व रेशीम हे जिन्नस होतात व त्यामुळें त्या प्रदेशांत मोसमी हवा असणाऱ्या हिंदुस्थानइतकीच किंबहुना त्यापेक्षांहि दाट लोकवस्ती आहे. या प्रदेशांतील वस्तीचें प्रमाण दर चौरस मैलास तीन हजारांपेक्षांहि अधिक आहे. अमेरिकेंतील मेक्सिकोच्या आखातावरील संस्थानें, तसेंच पूर्व ऑस्ट्रेलिया व नाताळचा किनारा यांवरील वस्तीहि बरीच दाट होत चालली आहे. दक्षिण अमेरिकेंतील जंगलांत मात्र फारशी वस्ती नाहीं ; कारण तो प्रदेश दलदलीचा व रोगट आहे.

### थंड-समशीतोष्ण सामुद्रिक हवामान—

भूमध्य समुद्रीय प्रदेशाच्या पलीकडील व उत्तर ध्रुवाकडच्या बाजूच्या प्रदेशाचा आपण विचार करूं लागलों म्हणजे युरोपमध्यें ब्रिटिश बेटें व उत्तर अमेरिकेंतील ब्रिटिश कोलंबिया हे भाग आपल्या नजरेसमोर येतात. या प्रदेशावर समुद्रावरून नेहमीं थंड व पावसाळी वारे म्हणजेच प्रतिव्यापारी वारे वाहत असतात. या प्रदेशांतील उन्हाळा व हिंवाळा यांतील हवामानांत फारसा फरक नसतो व सर्व वर्षभर पाऊस पडत असतो. प्रतिव्यापारी वारे हे व्यापारी वाऱ्यांसारखे सतत व सारख्या वेगानें वाहत नसून मधून मधून वातचक्रें व प्रति-वातचक्रें अशा प्रकारानें वाहतात. या प्रदेशांत वायव्य युरोप, ब्रिटिश कोलंबिया आणि संयुक्त संस्थानांचा वायव्य भाग हे मुख्यतः मोडतात. दक्षिण गोलार्धांत चिलीचा दक्षिण भाग, ऑस्ट्रेलेशियांतील टास्मानिया व न्यूझीलंड बेटें हा प्रदेश येतो. आफ्रिकेचा कोणताच भाग इतका खालीं गेलेला नाहीं. युरोपमध्यें उपसागरी प्रवाहांच्या योगानें हिंवाळा फारसा कडक होत नाहीं. पश्चिम किनाऱ्यावरील हवामानांत उन्हाळ्यांत व हिंवाळ्यांत फारसें अंतर नसतें ; परंतु जसजसें पूर्वेकडे जावें तसतसें हें अंतर वाढत जातें. या प्रदेशांतील डोंगराळ भागांत, उदाहरणार्थ, ब्रिटिश बेटांतील सरोवरांच्या भागांत, ८० इंचांपर्यंत पाऊस पडतो. उलट पूर्वेकडे तो सामान्यतः २० इंचांपर्यंत पडतो, व जर्मनींत तर १८ च इंच पडतो.

थंड-समशीतोष्ण हवामानांतील वृक्षांचीं पानें हिंवाळ्यांत गळून पडतात, तर मोसमी वाऱ्यांच्या प्रदेशांत तीं उन्हाळ्यांत गळून पडतात. या प्रदेशांतील जंगलांतील झाडें विपुव-प्रदेशांतील झाडांपेक्षां नरम असतात ; परंतु सूचीपर्ण वृक्षांपेक्षां कठिण असतात. यांमध्यें ओक, एल्म, मेपल, बीच व बर्च हे वृक्ष येतात.

हें हवामान मानवाच्या वस्तीस व वाढीस फार अनुकूल असतें. या हवामानांत हातांनीं श्रम करून आपल्या अंगांत उष्णता कायम ठेवावी लागण्याइतकी थंडी असते व श्रम करणें त्रासदायक वाटेल इतका कडक उन्हाळा नसतो. येथें मनुष्याची वाढ उष्ण कटिबंधापेक्षां थोडी मंद होते, परंतु ती टिकाऊ असते. ब्रिटन, फ्रान्स, जर्मनी, बेल्जिअम, झेकोस्लोव्हाकिया हे देश या हवामानांत येतात. या प्रदेशांतील बऱ्याच भागावरील जंगल तोडून तेथें शेती, कुरणें किंवा कारखाने उभारण्यांत आले आहेत. या प्रदेशांत गहूं, बार्ली, ओट, राय, कांहीं भागांत मका हीं सर्व धान्यें होतात. सफरचंद, पीयर, वगैरे फळेंहि होतात. डोंगराळ भागांत मेंढ्यांचे कळपहि पाळतां येतात. दमट भागांत उत्तम गवत वाढतें व सुंदर कुरणें तयार होतात. उत्तर अमेरिकेंतील यासारखा प्रदेश म्हटला म्हणजे ब्रिटिश कोलंबिया हा होय. परंतु त्यांत डोंगर फार असून नद्यांच्या खोऱ्यांत पावसाचें मान सरासरी ५ इंच इतकें कमी आहे. परंतु व्हँकोव्हरसारख्या ठिकाणचा हिंवाळा कानडापेक्षां कमी तीव्र असतो. न्यूझीलंड बेटें याच प्रदेशांत येत असून त्यांस दक्षिणेंतील 'प्रकाशमय ब्रिटन' असें म्हणतात. चिलीमध्यें मात्र पाऊस फार पडतो व तो प्रदेश डोंगराळ असल्यामुळें त्याची वाढ फारशी झाली नाहीं.

### समशीतोष्ण हवामान—

वरील प्रदेश सोडून आपण भूखंडाच्या अंतःप्रदेशांत प्रवेश केला असतां उत्तर अमेरिकेंतील बराचसा मोठा प्रदेश व युरोप आणि आशियांतील बराच भाग आपल्या नजरेसमोर येतो. या प्रदेशांतील उन्हाळ्यांतील उष्णता कमी करावयास समुद्रावरील वारे तेथपर्यंत पोंचत नाहींत. तसेंच गरम पाण्याचे आखातप्रवाह हिंवाळ्यांतील भयंकर थंडीची तीव्रता कमी करूं शकत नाहींत. जेव्हां उन्हाळ्यांत जमीन तापते तेव्हां जमिनीवरील हवेचा दाब कमी झाल्यामुळें समुद्रावरील थंड वारे आंत शिरून थोडाफार पाऊस पडतो. हा पाऊस बहुधा वसंत व ग्रीष्म या ऋतूंत

पडतो. याचा उपयोग झाडें वाढण्यापेक्षां गवत वाढण्यास चांगला होतो. यामुळें या प्रदेशांत जगांतील सर्वांत मोठे गवताळ प्रदेश आहेत. यांतच उत्तर अमेरिकेंतील प्रेअरी मैदानें आणि दक्षिण युरोप व दक्षिण सैबेरिया यांमधील स्टेपीचा प्रदेश येतो. या प्रदेशांत हिंवाळा दीर्घकाल व कडक असून उन्हाळा मात्र लहान पण कडक असतो. हिंवाळ्यामध्यें शून्यांशाखालीं पारा अनेकदां जातो. पण उन्हाळ्यामध्यें नेहमीं उष्णमान ६० अंशाच्यावर असून ७० अंशापर्यंत जातें.

दक्षिण गोलार्धांत भूखंड चिंचोळा असल्यामुळें तेथें अशा तऱ्हेचें हवामान फारसें नसतें; परंतु अँडीज पर्वताच्या योगानें ज्या प्रदेशावर पश्चिमेकडील समुद्राचे वारे पोंचत नाहींत त्या पंपास नांवाच्या प्रदेशांत सामान्यतः समशीतोष्ण हवा असते. द. आफ्रिकेंतील पठारावरहि गवताळ मैदानें आढळतात. परंतु तेथील हवामान उष्ण असून बर्फ क्वचितच पडतें. ऑस्ट्रेलियामध्यें मरे-डार्लिंग नद्यांच्या खोऱ्यांत अशाच तऱ्हेचें हवामान असतें.

हा गवताळ प्रदेश म्हणजे एक अगदीं स्वतंत्र प्रकार आहे. या प्रदेशामध्यें आढळणारें गवत विषुवप्रदेशामध्यें आढळणाऱ्या गवतापेक्षां जरी नरम असलें तरी अफाट मैदानांत दूरवर पाहिलें तरी एकहि वृक्ष आढळत नाहीं. तसेंच या प्रदेशांत वसंत ऋतूंत सर्वत्र हिरवीगार पालवी, तर उन्हाळ्यांत वाळलेला रुक्ष प्रदेश, आणि हिंवाळ्यांत अफाट बर्फाचे थर, हे तीन ऋतूंत तीन निरनिराळे प्रकार आढळतात. उष्ण प्रदेशांतील गवताळ भागाप्रमाणेंच या प्रदेशांतहि गवतावर उपजीविका करणारे व चपळ हरणासारखे प्राणी आणि त्यांना खाणारे मांसाहारी प्राणी या दोन प्रकारचे प्राणी आढळतात.

या प्रदेशांतील मानव प्रथम शिकारी वृत्तीचे होते, परंतु नंतर पशुपालनवृत्तीचे बनले; व मेंढ्या, बकऱ्या, बैल, घोडे, वगैरे प्राणी पाळूं लागले. सामान्यतः गोपालनवृत्तीचे धंदे त्यांच्यामध्यें वाढीस लागून त्यांच्या योगानें त्यांमध्यें भ्रमणवृत्ति उत्पन्न झाली. अद्यापहि ऑस्ट्रेलिया, दक्षिण आफ्रिका व अर्जेंटाइन यांमध्यें मेंढ्या पाळणें हा पहिल्या प्रतीचा धंदा समजण्यांत येतो. कानडा व रशिया या देशांत या गवताळ भागांतच तृणधान्यांची वाढ झाली. व तो प्रदेश आतां जगांतील महत्त्वाचा धान्योत्पादक प्रदेश झाला आहे. हा बहुतेक सर्व प्रदेश लागवडीखालीं आलेला असून आशियांतील रशिया, मंगोलिया व मांचुरिया यांतच थोडा वाव आहे. दक्षिण गोलार्धांत अर्जेंटाइन व युरुग्वे या प्रदेशांत पशुपालन जरी महत्त्वाचें असलें तरी अलीकडे तें मागें पडून शेतीची वाढ होत आहे.

### पूर्व किनाऱ्यावरील थंड-समशीतोष्ण हवामान—

उत्तर गोलार्धामध्यें पश्चिमेकडील बाजूला थंड समशीतोष्ण सामुद्रिक हवामान असतें. कारण तेथें पश्चिमेकडील समुद्रावरील वारे वाहून येत असतात. परंतु पूर्वेकडील किनाऱ्यावर असे वारे वाहत नाहींत. समुद्राच्या सान्निध्यामुळें जरी तेथील हवामान अति उष्ण किंवा अति थंड होत नसलें तरी पूर्व किनाऱ्यावरील प्रदेशांत अधिक थंडी पडते; त्यामुळें त्या किनाऱ्यावरील मॉंट्रिल, व्लूलाडिवोस्टॉक ह्यांसारखीं बंदरें हिंवाळ्यांत बर्फ गोठून बंद पडतात. उलट उन्हाळाहि अधिक कडक असतो. उत्तर अमेरिकेंतील समुद्रकिनाऱ्यावरील संस्थानें व कॅनडामधील सेंट लॉरेन्स नदीचें खोरें या प्रदेशांत पाऊस चांगला पडत असल्यामुळें दूधदुमत्याचा धंदा व कोरडवाहू शेती करतां येते. अशाच तऱ्हेच्या आशियांतील मांचुरिया व अमुरिया या प्रदेशांत मोसमी वारे वाहतात. परंतु तेथें उन्हाळ्यांतील हवा फार उष्ण व दमट असते. आणि थंडीहि कडाक्याची पडून हिंवाळ्यांत पाऊस मुळींच पडत नाहीं. दक्षिण गोलार्धांतील जमीन फारच अरुंद असल्यामुळें अशा तऱ्हेचें हवामान तेथें कोणत्याच ठिकाणीं आढळत नाहीं.

उत्तर गोलार्धांतील नमूद केलेल्या वरील दोन प्रदेशांत जीं अरण्यें आहेत त्यांतील झाडें वार्षिक पानें गळणारीं व सूचीपर्णी अशा मिश्र जातींचीं आहेत. पश्चिम युरोपांतील थंड समशीतोष्ण प्रदेशाप्रमाणें हा प्रदेशहि '*प्रयत्नशील मानवांचा प्रदेश*' आहे असें म्हणतां येईल. या प्रदेशांत असणाऱ्या उत्तर अमेरिका व कानडा या भागांत औद्योगिक वाढ किती झाली आहे त्याचें वर्णन करण्याचें कारण नाहीं. परंतु त्या मानानें आशियांतील प्रदेशांत औद्योगिक वाढ फारशी झाली नाहीं. मांचुरिया हा प्रांत अद्यापहि मागासलेलाच आहे, व त्याची अमेरिकेप्रमाणेंच वाढ होण्याची शक्यता आहे, ही गोष्ट स्पष्ट आहे. त्यामुळेंच तेथें आज चीन, जपान व रशिया यांचा संघर्ष चालू आहे. येथें जपानी भांडवलाच्या साहाय्यानें चिनी वसाहतींची वाढ होत होती. ती मध्यंतरींच्या युद्धांमुळें जरी आज स्थगित झाली असली तरी यापुढें अधिक जोमानें होत जाईल यांत शंका वाटत नाहीं. दक्षिण मांचुरिया रेल्वे ही कॅनेडियन पॅसिफिक रेल्वेप्रमाणें हा प्रदेश भरभराटीस आणण्यास कारणीभूत होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं.

### समशीतोष्ण वाळवंटांतील हवामान—

या हवामानाचे प्रदेश युरोप व आशिया यांच्या संधिभागांत आणि उत्तर अमेरिकेच्या मध्यभागांत बऱ्याच मोठ्या प्रमाणावर आढळतात. दक्षिण अमेरिकेंतहि पॅटॅगोनियन वाळवंट याच

प्रकारचें आहे. उत्तर गोलार्धांतील हा प्रदेश डोंगरपठारांचा असून समुद्रापासून फार दूर व पर्वताच्या रांगांनीं वेष्टिला आहे. या प्रदेशांत उन्हाळा व हिंवाळा यांतील हवामानांत फार मोठा फरक असतो व पावसाचें प्रमाणहि अत्यल्प असतें. आशियांतील या तर्‍हेचा प्रदेश म्हटला म्हणजे इराणचें पठार व तिबेटचें पठार हा होय. येथील वनस्पती सभोंवतालच्या प्रदेशाप्रमाणेंच असतात. कांहीं भागांत अगदी खुरटें गवत उगवतें. उष्ण प्रदेशांतील वाळवंटाप्रमाणेंच हे प्रदेशहि कष्टकारक आयुष्यक्रमाचे प्रदेश होत. येथें कितीहि श्रम केले तरी योग्य फळ मिळण्याची खात्री नसते. त्यामुळें जेथें सर्वत्र खनिज पदार्थ सांपडतात तो भाग सोडला असतां बाकीच्या भागांत फारच तुरळक वस्ती असते.

## थंड-समशीतोष्ण हवामान—

उत्तर गोलार्धामध्यें असा एक रुंद आडवा पट्टा पसरला आहे कीं, तेथें दीर्घकाल बर्फ पसरलेलें असतें. येथें वाढणारीं झाडें बहुतेक सूचीपर्ण जातीचीं असतात. येथें उन्हाळा फारच अल्पकाल असल्यामुळें तृणधान्यें पिकूं शकत नाहींत. फार तर ओट, बार्ली अशा प्रकारचीं कांहीं धान्यें होतात; पण गहूं मुळींच होऊं शकत नाहीं. येथील उष्णमान सर्वसाधारण ४० अंशाच्या खालीं असून सुमारें एक महिनाभर ६० अंशाच्यावर जातें. कांहीं भागांत उन्हाळा व हिंवाळा यांतील उष्णमानांत फारसा फरक नसला तरी कांहीं ठिकाणीं तो जगांतील इतर सर्व भागांपेक्षां अधिक म्हणजे १०० अंशापर्यंत असतो. अशाच तर्‍हेचें हवामान युरोप आणि उत्तर अमेरिकेंतील पर्वतश्रेणीवर आढळून येतें. दक्षिण गोलार्धांत दक्षिण अमेरिकेंतील अगदीं दक्षिणेकडचा भाग आणि न्यूझीलंडमधील पर्वत या ठिकाणीं अशा तर्‍हेचें थंड हवामान असतें. या प्रदेशांत शेती करणे अशक्य असल्यामुळें नैसर्गिक वनस्पतींवरच अवलंबून असावें लागतें. या प्रदेशातील वृक्ष बहुतेक वर्षभर हिरवेगार राहणारे व सूचीपर्णी असतात. यांचीं पानें जाड व राळेनें युक्त असल्यामुळें त्यांतील आर्द्रांश लवकर बाहेर पडून जात नाहीं व त्यामुळें त्याचें थंडीपासून रक्षण होतें. त्यांतल्या त्यांत दक्षिणेकडील भागांत थोडी उष्णता असल्यामुळें तेथें कांहीं झाडें वाढतात, पण उत्तरेकडे तीं कमी कमी होत जातात व त्यांची वाढहि फार मंद गतीनें होते. दक्षिण प्रदेशांत जीं झाडें ५०।६० वर्षांत वाढतात तींच उत्तरेकडील प्रदेशांत वाढण्यास २०० वर्षें लागतात. तायगा नांवाच्या प्रदेशांतील सूचीपर्ण वृक्ष, उदाहरणार्थ, देवदार, पाइन व फर हे जगांतील सर्वांत अधिक नरम लांकूड पुरवितात. युरोपमध्यें स्कँडिनेव्हिया व उत्तर रशिया यांमध्यें अशाच तर्‍हेचीं अरण्यें आढळतात. तसेंच वायव्य आणि मध्य युरोपांतील पर्वतांवरहि अशींच अरण्यें दृष्टीस पडतात. या प्रदेशांतील नद्या बर्फानें थिजलेल्या आर्क्टिक महासागरास मिळतात व हिंवाळ्यांत त्याहि गोठून जातात. वसंत ऋतूंत नद्यांच्या खालच्या भागांतील बर्फ तसेंच राहतें व वरच्या भागांतील बर्फ वितळून मोठमोठे पूर येतात व सर्व तायगा प्रदेश जलमय होऊन जातो.

सूचीपर्ण वृक्षांच्या अरण्यांतील प्रदेशांत मनुष्यवस्ती बहुधा विरळच असते व तीहि प्रारंभीं शिकारी लोकांचीच असते. त्या प्रदेशांत मऊ लोंकर अंगावर असलेले प्राणी पुष्कळ सांपडतात व त्यांचीं कातडीं हे शिकारी लोक जमा करून जगांतील बाजारास पुरवितात. अशा तर्‍हेचा प्रदेश म्हटला म्हणजे कानडामधील हडसन उपसागराभोंवतींचा प्रदेश व सैबेरियांतील अरण्यें होय. या प्रदेशांत जंगली लांकडांचा व्यापार आणि कागदाकरितां रांधा तयार करण्याचा धंदाहि मोठ्या प्रमाणावर चालतो. या प्रदेशांतील लांकूड बहुधा नदीच्या प्रवाहांतून खालच्या प्रदेशांत पाठविण्यांत येतें.

युरोपांतील अरण्यांतील लांकडांचा पुरवठा आतां कमी होत चालला असून सध्यां कानडा व रशिया यांमध्येंच तो आढळून येतो.

## टुंड्रा अथवा थंड वाळवंटी हवामान—

आर्क्टिक महासागराच्या कटिबंधांत हिंवाळा अतिशय कडक व दीर्घकालीन असतो. वर्षांतून कांहीं दिवस तरी सूर्य अजीबात दिसत नाहीं. उलट उन्हाळा फार थोडा काळ असतो. जरी वर्षांतून कांहीं दिवस प्रत्यक्ष सूर्य मावळत नाहीं तरी तो क्षितिजावर फारसा उंच येत नाहीं. यामुळें येथें इतकी थंडी असते कीं, अरण्यें वाढत नाहींत. येथील स्वाभाविक वनस्पती म्हणजे शेवाळ व त्या जातीच्या इतर वनस्पती, कांहीं खुरटलेलीं झुडपें व प्रदेशाच्या सीमेवर कांहीं लहान झाडें एवढ्याच असतात. वर्षांतले नऊ महिने जमिनीवर बर्फ असल्यामुळें शेती करणें अशक्य असतें. तथापि जो थोडाफार उन्हाळ्याचा काळ असतो, त्यामध्यें गवत व बारीकसारीक वनस्पती पुष्कळ वाढतात, त्यामुळें या प्रदेशास आर्क्टिक प्रेअरी असेंहि म्हणतात.

जरी सध्यां या प्रदेशांत जवळजवळ मुळींच वस्ती नसली तरी पुढेंमागें या भागांत स्वाभाविकपणें राहणाऱ्या रेनडियर अथवा कॅरिबो याच प्राण्यांची पैदास जर पुष्कळ केली तर त्यांचें मांस आणि कातडीं यांच्या योगानें हा प्रदेश समृद्ध व्हावयास हरकत नाहीं. टुंड्रा प्रदेशाच्या उत्तरेकडील भागांत नेहमींच हिम व बर्फ असतें. या थंड प्रदेशांतील वाळवंटाच्या

भागांत ग्रीनलंड हा सर्वांत उत्तरेकडील वस्तीचा भाग होय. या उत्तर गोलार्धांतील प्रदेशांशीं दक्षिण गोलार्धांतील अँटार्क्टिक प्रदेश सदृशस्वरूपाचा आहे.

वर वर्णन केलेल्या निरनिराळ्या प्रदेशांमध्यें मध्यंतरीं कांहीं पट्टे दोन्ही हवामानास सामान्य असणारे अशा स्वरूपाचे असतात ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे व या निरनिराळ्या मुख्य प्रदेशांतहि कांहीं स्थानिक हवामानांत फरक असतो, हीहि गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. आपण उष्णकटिबंधांतील एखाद्या उंच पर्वतावर चढूं लागलों तर आपणांस उष्णकटिबंधांतून ध्रुवाच्या दिशेनें प्रवास करीत असतांना ज्या प्रकारचें हवामान आढळेल त्याच प्रकारचें आढळून येतें. हिमालय, आल्प्स व कार्पेथियन पर्वतांवरील नरम लांकडांचीं अरण्यें हीं उत्तर आशिया व युरोप यांमधील सूचीपर्ण वृक्षासारखींच असतात. यांच्यापेक्षां उंचीवरील पठारांवर कुरणें असतात. ज्यांना अल्पाइन कुरणें म्हणतात तीं आर्क्टिक कुरणांसारखींच असतात. स्वाभाविक वनस्पतींतील निरनिराळे प्रकार व नैसर्गिक संपत्ति यांमध्यें जो स्थानिक फरक असतो तो अर्थात् विशेष महत्त्वाचा असतो.

## हवामानाचें आंतरराष्ट्रीय महत्त्व—

भौगोलिक हवामानास आंतरराष्ट्रीय व्यवहारामध्यें फार महत्त्व असतें. पहिलें महत्त्व आर्थिकदृष्ट्या असतें. आजच्या सुसंस्कृत जगामध्यें निरनिराळ्या भौगोलिक प्रदेशांत तयार होणारे सर्वच जिन्नस लागतात व या निरनिराळ्या भौगोलिक प्रदेशांत उत्पन्न होणाऱ्या पदार्थांची अदलाबदल म्हणजेच आंतरराष्ट्रीय व्यापार होय. आज सर्व तऱ्हेचें भौगोलिक हवामान ज्या एका राजकीय सत्तेखालीं आढळत होतें अशी सत्ता म्हटली म्हणजे ब्रिटिश साम्राज्य ही होती. परंतु आतां ब्रिटिश साम्राज्याच्या ठिकाणीं एक राष्ट्रसंघ निर्माण झाला आहे व त्यांतील राष्ट्रांचे ब्रिटिश लोकांशीं व परस्परांशीं असणारे हितसंबंध अद्यापि ठरावयाचे आहेत.

दुसरा असाच मोठा राजकीय भूभाग म्हटला म्हणजे अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें होत. याचें क्षेत्रफळ ३० लक्ष चौरस मैलांइतकें असलें व त्यांतील बहुतेक भाग उत्तम भौगोलिक हवामानांत असला तरी त्याचा विस्तार उष्णकटिबंधांत नसल्यामुळें उष्णकटिबंधांत होणाऱ्या वस्तूंकरितां त्यास परकीय देशांवर अवलंबून राहावें लागतें. उदाहरणार्थ, अमेरिकेंत रबराचा खप सर्व जगापेक्षां अधिक होतो; परंतु या रबराकरितां अमेरिकेस डच व ब्रिटिश लोकांवर अवलंबून राहावें लागतें; किंवा त्यांच्या प्रदेशांत आपले कारखाने काढावे लागतात. अर्थात् अशा प्रसंगीं संयुक्त संस्थानांच्या सरकारास आपलें परराष्ट्रीय धोरण अशा तऱ्हेच्या आपल्या आर्थिक गरजा पुरवून घेण्याच्या दृष्टीनें आंखावें लागतें. क्युबा बेटांतून पुष्कळच साखर निर्यात होते, व तें एक प्रजासत्ताक राष्ट्र आहे. तरी त्यास संयुक्त संस्थानें हें त्याचें गिऱ्हाईक असल्यामुळें त्याच्या कलानें आपलें धोरण ठेवावें लागतें. हीच गोष्ट हायटी व पोर्टोरिको या वेस्ट इंडीजमधील बेटांची आहे. याकरितांच अमेरिकेला मनरोतत्त्वाविरुद्ध डेन्मार्क देशाकडून व्हर्जिन बेटें विकत घ्यावीं लागलीं. उलट फिलिपाइन बेटें अमेरिकेच्या संरक्षणाखालीं असल्यामुळें ती गोष्ट तिच्या अंगलटीसच आली. अमेरिकेला आपला चहा, कॉफी, कोको हा सर्व माल परकीय राष्ट्रांकडून विकत घ्यावा लागतो. याच्या उलट अमेरिकेसारखेंच हवामान असलेल्या अर्जेंटिना व ऑस्ट्रेलिया या देशांशीं जो अमेरिकेचा व्यापार होतो तो गिऱ्हाईक या स्वरूपाचा असून तेथें अमेरिकेस तयार माल विकावयाचा असतो.

आतां अमेरिकेची जी गरज आहे तीच कॅनडाचीहि आहे. त्यामुळें कॅनडाहि आपलें वर्चस्व वेस्ट इंडीज बेटांवर प्रस्थापित करूं पाहत आहे.

रशिया हा देश संयुक्त संस्थानें व कॅनडा यांसारख्याच हवामानांत वसलेला आहे. परंतु रशियाचें क्षेत्रफळ जरी ८० लक्ष चौरस मैल असलें व त्यांत १५ कोटींच्यावर वस्ती असली तरी त्यास उष्णकटिबंधांत व विषुवप्रदेशांत होणाऱ्या जिनसांकरितां परकीयांवरच अवलंबून राहावें लागतें. रशियामध्यें उष्णसमशीतोष्ण हवामानाचा प्रदेशहि नाहीं. परंतु रशियन तुर्कस्तानांत समशीतोष्ण वाळवंटी प्रदेश आहे. या प्रदेशांत कालवे काढले असतां तो सुपीक होण्याचा संभव आहे व तेथें कांहीं उष्णकटिबंधांतील जिन्नस तयार होण्याचा संभव आहे. अशा जिनसांत प्रमुख म्हणजे कापूस होय व त्याची गरज रशियाला फार आहे. परंतु रशियाला धान्याचीहि आवश्यकता असल्यामुळें धान्यास योग्य असलेल्या प्रदेशांत कापूस पिकविणें परवडणार नाहीं; याकरितां रशिया सैबेरियाकडे बघत असून तुर्कस्तान व सैबेरिया रेल्वेनें जोडण्यांत आले आहेत. कारण सैबेरियामध्यें पुष्कळ धान्य तयार होतें. तें तुर्कस्तानांत पाठवून तेथें कापूस पिकविणें सोईचें होऊं शकेल, व ही गोष्ट रशिया आज प्रत्यक्ष करीत आहे.

## हवामानाचा लोकसंख्येशीं संबंध—

परराष्ट्रीय व्यापाराबरोबरच लोकसंख्येच्या योग्य वांटणीचा प्रश्न हाहि हवामानाशीं संबद्ध आहे. कांहीं प्रदेशामध्यें पुष्कळ लोकांची उपजीविका होऊं शकते व कांहीं प्रदेशांत फार थोड्या लोकांचा निर्वाह होतो. याशिवाय जेव्हां एका प्रदेशांतील

प्रकारचें आहे. उत्तर गोलार्धांतील हा प्रदेश डोंगरपठारांचा असून समुद्रापासून फार दूर व पर्वताच्या रांगांनीं वेष्टिला आहे. या प्रदेशांत उन्हाळा व हिंवाळा यांतील हवामानांत फार मोठा फरक असतो व पावसाचें प्रमाणहि अल्यल्प असतें. आशियांतील या तऱ्हेचा प्रदेश म्हटला म्हणजे इराणचें पठार व तिबेटचें पठार हा होय. येथील वनस्पती सभोंवतालच्या प्रदेशाप्रमाणेंच असतात. कांहीं भागांत अगदीं खुरटें गवत उगवतें. उष्ण प्रदेशांतील वाळवंटाप्रमाणेच हे प्रदेशहि कष्टकारक आयुष्यक्रमाचे प्रदेश होत. येथें कितीहि श्रम केले तरी योग्य फळ मिळण्याची खात्री नसते. त्यामुळें जेथें सर्वत्र खनिज पदार्थ सांपडतात तो भाग सोडला असतां बाकीच्या भागांत फारच तुरळक वस्ती असते.

## थंड—समशीतोष्ण हवामान—

उत्तर गोलार्धामध्यें असा एक रुंद आडवा पट्टा पसरला आहे कीं, तेथे दीर्घकाल बर्फ पसरलेलें असतें. येथें वाढणारीं झाडें बहुतेक सूचीपर्ण जातीचीं असतात. येथें उन्हाळा फारच अल्पकाल असल्यामुळें तृणधान्यें पिकूं शकत नाहींत. फार तर ओट, बार्ली अशा प्रकारचीं कांहीं धान्यें होतात; पण गहूं मुळींच होऊं शकत नाहीं. येथील उष्णमान सर्वसाधारण ४० अंशाच्या खालीं असून सुमारें एक महिनाभर ६० अंशाच्यावर जातें. कांहीं भागांत उन्हाळा व हिंवाळा यांतील उष्णमानांत फारसा फरक नसला तरी कांहीं ठिकाणीं तो जगांतील इतर सर्व भागांपेक्षां अधिक म्हणजे १०० अंशापर्यंत असतो. अशाच तऱ्हेचें हवामान युरोप आणि उत्तर अमेरिकेंतील पर्वतश्रेणींवर आढळून येतें. दक्षिण गोलार्धांत दक्षिण अमेरिकेंतील अगदीं दक्षिणेकडचा भाग आणि न्यूझीलंडमधील पर्वत या ठिकाणीं अशा तऱ्हेचें थंड हवामान असतें. या प्रदेशांत शेती करणें अशक्य असल्यामुळें नैसर्गिक वनस्पतींवरच अवलंबून असावें लागतें. या प्रदेशातील वृक्ष बहुतेक वर्षभर हिरवेगार राहणारे व सूचीपर्णी असतात. यांचीं पानें जाड व राळेनें युक्त असल्यामुळें त्यांतील आर्द्रांश लवकर बाहेर पडून जात नाहीं व त्यामुळें त्याचें थंडीपासून रक्षण होतें. त्यांतल्या त्यांत दक्षिणेकडील भागांत थोडी उष्णता असल्यामुळें तेथें कांहीं झाडें वाढतात, पण उत्तरेकडे तीं कमी कमी होत जातात व त्यांची वाढहि फार मंद गतीनें होते. दक्षिण प्रदेशांत जीं झाडें ५०।६० वर्षांत वाढतात तींच उत्तरेकडील प्रदेशांत वाढण्यास २०० वर्षें लागतात. तायगा नांवाच्या प्रदेशांतील सूचीपर्ण वृक्ष, उदाहरणार्थ, देवदार, पाइन व फर हे जगांतील सर्वांत अधिक नरम लांकूड पुरवितात. युरोपमध्यें स्कँडिनेव्हिया व उत्तर रशिया यांमध्यें अशाच तऱ्हेचीं अरण्यें आढळतात. तसेंच वायव्य आणि मध्य युरोपांतील पर्वतांवरहि अशींच अरण्यें दृष्टीस पडतात. या प्रदेशांतील नद्या बर्फानें थिजलेल्या आर्क्टिक महासागरास मिळतात व हिंवाळ्यांत त्याहि गोठून जातात. वसंत ऋतूंत नद्यांच्या खालच्या भागांतील बर्फ तसेंच राहतें व वरच्या भागांतील बर्फ वितळून मोठमोठे पूर येतात व सर्व तायगा प्रदेश जलमय होऊन जातो.

सूचीपर्ण वृक्षांच्या अरण्यांतील प्रदेशांत मनुष्यवस्ती बहुधा विरळच असते व तीहि प्रारंभीं शिकारी लोकांचीच असते. त्या प्रदेशांत मऊ लोंकर अंगावर असलेले प्राणी पुष्कळ सांपडतात व त्यांचीं कातडीं हे शिकारी लोक जमा करून जगांतील बाजारास पुरवितात. अशा तऱ्हेचा प्रदेश म्हटला म्हणजे कानडामधील हडसन उपसागराभोंवतीचा प्रदेश व सैबेरियांतील अरण्यें होय. या प्रदेशांत जंगली लांकडांचा व्यापार आणि कागदाकरितां रांधा तयार करण्याचा धंदाहि मोठ्या प्रमाणावर चालतो. या प्रदेशांतील लांकूड बहुधा नदीच्या प्रवाहांतून खालच्या प्रदेशांत पाठविण्यांत येतें.

युरोपांतील अरण्यांतील लांकडांचा पुरवठा आतां कमी होत चालला असून सध्यां कानडा व रशिया यांमध्येंच तो आढळून येतो.

## टुंड्रा अथवा थंड वाळवंटी हवामान—

आर्क्टिक महासागराच्या कटिबंधांत हिंवाळा अतिशय कडक व दीर्घकालीन असतो. वर्षांतून कांहीं दिवस तरी सूर्य अजीबात दिसत नाहीं. उलट उन्हाळा फार थोडा काळ असतो. जरी वर्षांतून कांहीं दिवस प्रत्यक्ष सूर्य मावळत नाहीं तरी तो क्षितिजावर फारसा उंच येत नाहीं. यामुळें येथें इतकी थंडी असते कीं, अरण्यें वाढत नाहींत. येथील स्वाभाविक वनस्पती म्हणजे शेवाळ व त्या जातीच्या इतर वनस्पती, कांहीं खुरटलेलीं झुडपें व प्रदेशाच्या सीमेवर कांहीं लहान झाडें एवढ्याच असतात. वर्षांतले नऊ महिने जमिनीवर बर्फ असल्यामुळें शेती करणें अशक्य असतें. तथापि जो थोडाफार उन्हाळ्याचा काळ असतो, त्यामध्यें गवत व बारीकसारीक वनस्पती पुष्कळ वाढतात, त्यामुळे या प्रदेशास आर्क्टिक प्रेअरी असेंहि म्हणतात.

जरी सध्यां या प्रदेशांत जवळजवळ मुळींच वस्ती नसली तरी पुढेंमागें या भागांत स्वाभाविकपणें राहणाऱ्या रेनडियर अथवा कॅरिबो याच प्राण्यांची पैदास जर पुष्कळ केली तर त्यांचें मांस आणि कातडीं यांच्या योगानें हा प्रदेश समृद्ध व्हावयास हरकत नाहीं. टुंड्रा प्रदेशाच्या उत्तरेकडील भागांत नेहमींच हिम व बर्फ असतें. या थंड प्रदेशांतील वाळवंटाच्या

भागांत ग्रीनलंड हा सर्वांत उत्तरेकडील वस्तीचा भाग होय. या उत्तर गोलार्धांतील प्रदेशांशीं दक्षिण गोलार्धांतील अँटार्क्टिक प्रदेश सदृशस्वरूपाचा आहे.

वर वर्णन केलेल्या निरनिराळ्या प्रदेशांमध्यें मध्यंतरीं कांहीं पट्टे दोन्ही हवामानास सामान्य असणारे अशा स्वरूपाचे असतात ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे व या निरनिराळ्या मुख्य प्रदेशांतहि कांहीं स्थानिक हवामानांत फरक असतो, हीहि गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. आपण उष्णकटिबंधांतील एखाद्या उंच पर्वतावर चढूं लागलों तर आपणांस उष्णकटिबंधांतून ध्रुवाच्या दिशेनें प्रवास करीत असतांना ज्या प्रकारचें हवामान आढळेल त्याच प्रकारचें आढळून येतें. हिमालय, आल्प्स व कार्पेथियन पर्वतांवरील नरम लांकडांचीं अरण्यें हीं उत्तर आशिया व युरोप यांमधील सूचीपर्ण वृक्षांसारखींच असतात. यांच्यापेक्षां उंचीवरील पठारांवर कुरणें असतात. ज्यांना अल्पाइन कुरणें म्हणतात तीं आर्क्टिक कुरणांसारखींच असतात. स्वाभाविक वनस्पतींतील निरनिराळे प्रकार व नैसर्गिक संपत्ति यांमध्यें जो स्थानिक फरक असतो तो अर्थात् विशेष महत्त्वाचा असतो.

## हवामानाचें आंतरराष्ट्रीय महत्त्व—

भौगोलिक हवामानास आंतरराष्ट्रीय व्यवहारामध्यें फार महत्त्व असतें. पहिलें महत्त्व आर्थिकदृष्ट्या असतें. आजच्या सुसंस्कृत जगामध्यें निरनिराळ्या भौगोलिक प्रदेशांत तयार होणारे सर्वच जिन्नस लागतात व या निरनिराळ्या भौगोलिक प्रदेशांत उत्पन्न होणाऱ्या पदार्थांची अदलाबदल म्हणजेच आंतरराष्ट्रीय व्यापार होय. आज सर्व तऱ्हेचें भौगोलिक हवामान ज्या एका राजकीय सत्तेखालीं आढळत होतें अशी सत्ता म्हटली म्हणजे ब्रिटिश साम्राज्य ही होती. परंतु आतां ब्रिटिश साम्राज्याच्या ठिकाणीं एक राष्ट्रसंघ निर्माण झाला आहे व त्यांतील राष्ट्रांचे ब्रिटिश लोकांशीं व परस्परांशीं असणारे हितसंबंध अद्यापि ठरावयाचे आहेत.

दुसरा असाच मोठा राजकीय भूभाग म्हटला म्हणजे अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें होत. यांचें क्षेत्रफळ ३० लक्ष चौरस मैलांइतकें असलें व त्यांतील बहुतेक भाग उत्तम भौगोलिक हवामानांत असला तरी त्याचा विस्तार उष्णकटिबंधांत नसल्यामुळें उष्णकटिबंधांत होणाऱ्या वस्तूंकरितां त्यास परकीय देशावर अवलंबून राहावें लागतें. उदाहरणार्थ, अमेरिकेंत रबराचा खप सर्व जगापेक्षां अधिक होतो; परंतु या रबराकरितां अमेरिकेस डच व ब्रिटिश लोकांवर अवलंबून राहावें लागतें; किंवा त्यांच्या प्रदेशांत आपले कारखाने काढावे लागतात. अर्थात् अशा प्रसंगीं संयुक्त संस्थानांच्या सरकारास आपलें परराष्ट्रीय धोरण अशा तऱ्हेच्या आपल्या आर्थिक गरजा पुरवून घेण्याच्या दृष्टीनें आंखावें लागतें. क्युबा बेटांतून पुष्कळच साखर निर्यात होते, व तें एक प्रजासत्ताक राष्ट्र आहे. तरी त्यास संयुक्त संस्थानें हें त्याचें गिऱ्हाईक असल्यामुळें त्याच्या कलानें आपलें धोरण ठेवावें लागतें. हीच गोष्ट हायटी व पोर्टोरिको या वेस्ट इंडीजमधील बेटांची आहे. याकरितांच अमेरिकेला मनरोतत्त्वाविरुद्ध डेन्मार्क देशाकडून व्हर्जिन बेटें विकत घ्यावीं लागलीं. उलट फिलिपाइन बेटें अमेरिकेच्या संरक्षणाखालीं असल्यामुळें ती गोष्ट तिच्या अंगलटीसच आली. अमेरिकेला आपला चहा, कॉफी, कोको हा सर्व माल परकीय राष्ट्रांकडून विकत घ्यावा लागतो. याच्या उलट अमेरिकेसारखेंच हवामान असलेल्या अर्जेंटिना व ऑस्ट्रेलिया या देशांशीं जो अमेरिकेचा व्यापार होतो तो गिऱ्हाईक या स्वरूपाचा असून तेथें अमेरिकेस तयार माल विकावयाचा असतो.

आतां अमेरिकेची जी गरज आहे तीच कॅनडाचीहि आहे. त्यामुळें कॅनडाहि आपलें वर्चस्व वेस्ट इंडीज बेटांवर प्रस्थापित करूं पाहत आहे.

रशिया हा देश संयुक्त संस्थानें व कॅनडा यांसारख्याच हवामानांत वसलेला आहे. परंतु रशियाचें क्षेत्रफळ जरी ८० लक्ष चौरस मैल असलें व त्यांत १५ कोटींच्यावर वस्ती असली तरी त्यास उष्णकटिबंधांत व विषुवप्रदेशांत होणाऱ्या जिनसांकरितां परकीयांवरच अवलंबून राहावें लागतें. रशियामध्यें उष्णसमशीतोष्ण हवामानाचा प्रदेशहि नाहीं. परंतु रशियन तुर्कस्तानांत समशीतोष्ण वाळवंटी प्रदेश आहे. या प्रदेशांत कालवे काढले असतां तो सुपीक होण्याचा संभव आहे व तेथें कांहीं उष्णकटिबंधांतील जिन्नस तयार होण्याचा संभव आहे. अशा जिनसांत प्रमुख म्हणजे कापूस होय व त्याची गरज रशियाला फार आहे. परंतु रशियाला धान्याचीहि आवश्यकता असल्यामुळें धान्यास योग्य असलेल्या प्रदेशांत कापूस पिकविणें परवडणार नाहीं; याकरितां रशिया सैबेरियाकडे वघत असून तुर्कस्तान व सैबेरिया रेल्वेनें जोडण्यांत आले आहेत. कारण सैबेरियामध्यें पुष्कळ धान्य तयार होतें. तें तुर्कस्तानांत पाठवून तेथें कापूस पिकविणें सोईचें होऊं शकेल, व ही गोष्ट रशिया आज प्रत्यक्ष करीत आहे.

## हवामानाचा लोकसंख्येशीं संबंध—

परराष्ट्रीय व्यापाराबरोबरच लोकसंख्येच्या योग्य वांटणीचा प्रश्न हाहि हवामानाशीं संबद्ध आहे. कांहीं प्रदेशामध्यें पुष्कळ लोकांची उपजीविका होऊं शकते व कांहीं प्रदेशांत फार थोड्या लोकांचा निर्वाह होतो. याशिवाय जेव्हां एका प्रदेशांतील

असें दिसून येतें कीं, जरी मानवाची उत्पत्ति आशियामध्यें झाली असली तरी हायडेलबर्ग व पिल्टडाउन जातीचे मानव पश्चिम युरोपमध्यें नवनूतन ( प्लिओसिन ) युगामध्यें म्हणजेच भूस्तरशास्त्रज्ञांच्या मतें चतुर्थ युगामध्ये आढळून येत होते, ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. तृतीय युगांतील मानवांचा अवशेष कोठें आढळून येत नाहीं. तसेंच अमेरिकेमध्यें पूर्वपाषाणयुगांतील मानवांचे अवशेष मुळींच दृष्टीस पडत नाहींत. अमेरिकेंत मानववस्ती होमोसेपाइन मानवांनींच केली असावी असें दिसतें. येथें मानववंश याचा अर्थ हॅडन यानें केल्याप्रमाणें ज्यामध्यें स्पष्ट असें कांहीं तरी स्वरूपसाम्य आहे अशा मानवांचा संघ असा घेऊन चालावें. या ठिकाणीं स्वरूप या शब्दामध्यें केंस, कातडी, रंग, उंची, डोक्याचा, चेहऱ्याचा व नाकाचा आकार, इतक्या गोष्टींचा समावेश होतो. अर्थात् या गोष्टींमध्यें स्थानिक परिस्थितीमुळें थोडाफार फरक असणें साहजिक आहे. उदाहरणार्थ, उष्णकटिबंधामध्यें नीग्रो वंशाची वस्ती असते हें जरी खरे आहे तरी उष्णकटिबंधांतील सर्वच कृष्णवर्णीय लोक नीग्रो या वंशांत समाविष्ट होऊं शकत नाहींत. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतहि बरेच लोक कृष्णवर्णी असतात; परंतु ते नीग्रो वंशाचे नसतात. तसेंच उष्णकटिबंधांतच आढळणारे अरब लोक कृष्णवर्ण नसतात, ही गोष्ट आपण लक्षांत ठेविली पाहिजे. तथापि वरील जीं चिन्हें सांगितलीं तीं मनुष्याचा वंश ओळखण्यास महत्त्वाचीं असतात.

१. केंस—हे साधारण तीन प्रकारचे असतात : ( अ ) सरळ, ( आ ) नरम व कुरळे, व ( इ ) लोंकरीसारखे.

२. रंग—केंसांच्या किंवा डोळ्यांच्या रंगापेक्षां कातडीचा रंग हा अधिक महत्त्वाचा आहे. तथापि बहुधा काळी कातडी आणि काळे केंस यांचें सान्निध्य असतें. परंतु केंस आणि डोळे यांच्या वर्णांत नेहमींच साधर्म्य असतें असें नाहीं. काळ्या कातडीचे लोक उष्णकटिबंधांत आढळतात, ही गोष्ट खरी असली तरी त्याच प्रदेशांत भूमध्यसमुद्रीय वंशांतील कांहीं कॉकेशियन लोकहि आढळतात. या लोकांचा रंग साधारणतः गोधूमवर्णी असतो.

३. उंची—उंचीप्रमाणें साधारणतः मानववंशाचे पांच वर्ग करण्यांत येतात : ( अ ) ठेंगू–५८$\frac{3}{4}$ इंच; ( आ ) बुटका–५८$\frac{3}{4}$ ते ६२$\frac{3}{4}$ इंच; ( इ ) मध्यम–६२$\frac{3}{4}$ ते ६६ इंच; ( ई ) उंच–६६ ते ६७$\frac{3}{4}$ इंच; ( उ ) फार उंच–६७$\frac{3}{4}$ इंचापेक्षां अधिक. कोणत्याहि मानवसमाजामध्यें निरनिराळ्या उंचीचे लोक आढळून येतात, ही गोष्ट आपणांस परिचित आहे. परंतु सामान्यतः एखाद्या समाजांतील ३०।४० लोकांची उंची मोजून जी सरासरी उंची येईल ती त्या समाजाची सर्वसाधारण उंची समजण्यांत येते.

४. डोक्याचा आकार—मनुष्याच्या डोक्याकडे एका बाजूनें पाहिलें तर कांहीं डोकीं लांबट व कांहीं आंखूड दिसतात. तसेंच वरून पाहिलें असतां कांहीं लांबट तर कांहीं वाटोळीं आढळतात. या लांबी-रुंदीच्या प्रमाणास शीर्षांक असें म्हणतात. हा शीर्षांक रुंदी व लांबी यांच्या भागाकाराच्या १०० पटींनीं धरण्यांत येतो. हा शीर्षांक साधारणतः ६५ पेक्षां कमी व ९० पेक्षां अधिक नसतो. या शीर्षांकावरून मानवाचे तीन वर्ग पाडण्यांत येतात : ( अ ) दीर्घशीर्ष ( डॉलिको सेफॅलिक ) ७५ पर्यंत; ( आ ) मध्यमशीर्ष ( मेसॅटी सेफॅलिक ) ७५ ते ८०; व ( इ ) वर्तुलशीर्ष ( ब्राची सेफॅलिक ) ८० किंवा वर.

५. चेहरा—सामान्यतः आपण रुंदट चेहऱ्याचा, लांबट चेहऱ्याचा, वगैरे जीं विशेषणें लावतों तीं सर्वपरिचित आहेत. तसेंच कांहीं मनुष्यांचें कपाळ पुढें आलेलें असतें व कांहींच्या गालांचीं हाडें वर आलेलीं असतात. तसेंच कांहींचा जबडा पुढें आलेला असतो. या गोष्टीहि आपणांस परिचित आहेत.

६. नाक—कांहीं मानववंशांतील लोकांचें नाक लांब असतें तर कांहींचें आंखूड असतें. कांहींचें रुंद असतें, तर कांहींचें अरुंद असतें. याबाबतहि नासांक ठरविण्यांत येतो, व तो रुंदीस लांबीनें भागून शंभरानें गुणून काढण्यांत येतो. या नासांकाप्रमाणें मनुष्याचे तीन वर्ग पाडण्यांत येतात : ( अ ) अरुंद नासांक–५५ ते ७०; ( आ ) मध्यम नासांक–७१ ते ८५; ( इ ) रुंद नासांक–८६ ते १००. नासांकाचा विशेष उपयोग जेथें मिश्र वंशाची वस्ती असते त्या ठिकाणीं–उदाहरणार्थ, हिंदुस्थानांत–वंशज्ञान होण्याच्या कामीं चांगला होतो.

### मानववर्गीकरण—

मनुष्याच्या शरीरांतील रक्तावरूनहि त्याचें चार प्रकारांत वर्गीकरण करण्यांत येतें; परंतु अलीकडे या गोष्टीस फारसें महत्त्व देण्यांत येत नाहीं.

मानवांचें वर्गीकरण निरनिराळ्या प्रकारांनीं करण्यांत येतें. त्यांत वंश, राष्ट्र व लोक या तीन शब्दांमधील फरक लक्षांत ठेवला पाहिजे. वंश हा शारीरिक रचनेवरून ठरविण्यांत येतो. राष्ट्र या शब्दाचा अर्थ ऐतिहासिक आणि राजकीय आहे. एका राष्ट्रामध्यें अनेक वंशांचे लोक असूं शकतात व लोक हा शब्द तर अगदींच अनिश्चितपणें वापरण्यांत येतो. त्या शब्दानें वंश किंवा राष्ट्र किंवा भाषा यांपैकीं कोणतीच एक गोष्ट निश्चित अशी व्यक्त होत नाहीं. भाषा हाहि एक मानववंशाचें वर्गीकरण करणारा धर्म समजतात. भाषेचा अभ्यास इतर गोष्टींपेक्षां पुष्कळच झालेला आहे; कारण तिचें सामाजिक व राजकीय महत्त्व फार आहे. हा एक स्वतंत्रच सांस्कृतिक प्रश्न आहे, व

कधीं कधीं भाषा व वंश यांचा घोंटाळाहि होण्याचा संभव असतो. सेमिटिक ही वास्तविक भाषा असून तिचा वंश दाखविण्याकडे उपयोग करण्यांत येतो. परंतु आर्यन शब्द तसा वापरतां येणें शक्य नाहीं. याच्या उलट आफ्रिकेमध्यें भाषिक वर्गीकरण आणि वांशिक वर्गीकरण हें बहुतेक समानच असतें. मनुष्यस्वभाव हाहि एक वर्गीकरणाचा प्रकार समजण्यांत येतो. पण तो अगदींच अनिश्चित आहे.

### वंशभेद—

सामान्यतः मानवजातीचे पुढें दिल्याप्रमाणे मुख्य सहा वंश मानण्यांत येतात:— (१) उत्तरवंश ( नॉर्डिक रेस ); (२) आल्पवंश ( अल्पाइन रेस ); (३) भूमध्यसमुद्रीय वंश ( मेडिटरेनियन रेस ). या तीन वर्गांच्या मानवांस कॉकेशियन मानव असें म्हणतात. (४) मंगोलवंश अथवा पीतवंश; (५) नीग्रोवंश; व (६) ऑस्ट्रेलियन वंश.

(१) उत्तरवंशामध्यें स्कॅन्डिनेव्हियाफ्लेमिंग, डच, उत्तर जर्मन, कांहीं रशियन, बरेचसे इंग्लिश व स्कॉच हे लोक येतात.

(२) आल्पवंश—यामध्यें स्विस, दक्षिण जर्मन, स्लाव्ह, फ्रेंच व उत्तर इटलींतील लोक, तसेंच इराणांतील ताजिक लोक, पामिर पठारावरील लोक, पश्चिम आशियांतील ऑर्मेनॉइड म्हणजेच प्राचीन हिटाइट लोकांचे वंशज व तुर्क लोक येतात.

(३) भूमध्यसमुद्रीय वंशामध्यें भूमध्यसमुद्रांतील बेटांतील लोक, अरबस्तानांतील सेमाइट लोक, आफ्रिकेंतील साहारा वाळवंटाच्या उत्तरेकडील लोक, ईजिप्ती लोक, बेजा, बर्बराइन, अबिसिनियन, सोमाली आणि गाला या जाती येतात. हिंदुस्थानांतील तामीळ लोक याच वंशांतील असावे असा कांहींचा तर्क आहे. हॅमिटिक लोकहि याच वर्गांतील असून पूर्वी एक हॅमिटोसेमिटिक संस्कृति असावी असें अनुमान आहे.

(४) मंगोलवंश— या वंशांतील लोक आशियामध्यें पूर्वरेखांश ८०° व पॅसिफिक महासागर यांच्या दरम्यानच्या भागांत आढळतात. यांची उत्पत्ति बहुधा पीत नदी व यांगत्सीकँग नदी यांच्यामधील सुपीक खोऱ्यांत झाली असावी. तेथून त्यांचा प्रसार मंगोलिया, मांचुरिया, पूर्वसैबेरिया, तसेंच पश्चिमेकडे तुर्कस्तान आणि तिबेट, दक्षिणेकडे युनान, ब्रह्मदेश, इंडोचीन, मलाया द्वीपकल्प व द्वीपसमूह, इत्यादि प्रदेशांत झाला. यांच्या कातडीचा रंग पिवळा किंवा पिंगट असून डोळेहि पिंगट असतात. केंस राठ, सरळ पण तुरळक असतात. डोकें बहुधा वाटोळें परंतु क्वचित् मध्यम वाटोळें आढळतें. गालाचीं हाडें रुंद व पुढें आलेलीं असतात व चेहरा बसका असतो. उंची साधारण ६४ इंच असते. परंतु उत्तर चीनमध्यें ७० इंच किंवा त्यापेक्षांहि अधिक उंच लोक आढळतात. या वंशाचे पुन्हां दक्षिण, उत्तर व महासागरीय असे तीन भेद करण्यांत येतात. त्यांपैकीं दक्षिण वर्गांतील लोक. तिबेट, हिमालयाचा दक्षिण उतार, चीन आणि इंडोचीन यांमध्यें आढळतात. हे साधारण ठेंगणे असतात. तिबेटमध्यें यांच्यापैकीं कांहीं हिंदु लोकांशीं मिसळले आहेत. उत्तर वर्गांतील लोक सैबेरिया, जपान व लाप्लाटापासून चिनी भिंतीपर्यंत व उत्तर तिबेटमध्यें आढळतात. तुर्की व फिनिश लोकांमध्येंहि यांचें मिश्रण आढळतें. महासागरीय वर्गांतील लोक इंडोनेशिया, फिलिपाइन, निकोबार व मादागास्कर बेटांत आढळतात. सर्व मंगोल लोकांत हे फारच खुजे असून यांची उंची साठ इंच भरते, व हे थोडे काळसरहि असतात व त्यांचें डोकें वर्तुळाकृति असतें. आसाममधील टोळ्या बहुतेक याच वर्गांत मोडतात. मंगोलवंशांतील लोक पॅसिफिक महासागर ओलांडून बेहरिंगच्या सामुद्रधुनींतून अमेरिकेंत जाऊन वस्ती करून राहिले व अमेरिकन इंडियन लोक हे यांचेच वंशज होत, ही गोष्ट महत्त्वाची आहे.

(५) नीग्रो वंश—नीग्रोवंशांत दोन मुख्य वर्ग पडतात: (अ) आफ्रिकन अथवा नीग्रो, व (आ) ओशियानिक अथवा महासागरीय अथवा मेलॅनेशियन. या वंशांतील बरेचसे लोक जंगलांत राहणारे असून रानटी अवस्थेंत आढळतात. यांमध्यें पिग्मी अथवा नेग्रिटो हे येतात. यांसच आफ्रिकेंत नेग्रिलो म्हणतात. या वंशाची उत्पत्तिं प्रथम कोठें झाली तें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. कोणी म्हणतात कीं, हे इतर मानवांपासूनच अवनत होऊन बनले असावे. याविरुद्ध कोणी असें म्हणतात कीं, मानवाची पूर्ण वाढ होण्याच्या पूर्वींच्या अवस्थेंतील हे लोक असावे. साहारा वाळवंटाच्या दक्षिणेकडील सर्व आफ्रिका खंडामध्यें नीग्रोंची वस्ती आहे असें जरी मानण्यांत येतें तरी त्यामध्यें नीलोट, बांटू, वगैरे लोक हॅमिटिक रक्ताचे असून खरे नीग्रो पश्चिम आफ्रिकेंत गिनीच्या किनाऱ्यावर राहतात. खरा नीग्रो हा उंच असून (६८ इंच) त्याचे केंस लोंकरीसारखे असतात. कातडीचा रंग पूर्णपणें काळा असतो. शरीराचा बांधा किंचित् स्थूल असून पाय आखूड असतात व हात लांब असतात. डोकें लांब असून चेहरा पुढें आलेला असतो. ओठ जाड असून बाहेर वळलेले असतात. कपाळ पुढें आलेलें व नाक रुंद असतें.

महासागरीय नीग्रोंची जात म्हटली म्हणजे पाप्युअन लोक होत. यांचे केस काळे व लोंकरीसारखे असतात; कातडीचा रंग काळा असतो; उंची मध्यम, डोकें लांबट व नाक रुंद असतें. कपाळ मागें गेलेले असून भिंवया पुढें आलेल्या अस-

तात. यांची वस्ती विशेषतः न्यू-गिनीमध्यें आढळते. तथापि ते मेलॅनेशिया व ऑस्ट्रेलिया यांमध्यें असून टासमानियामध्येंहि त्यांची वस्ती असावी.

नेग्रिटो लोकांस ठेंगू अथवा पिग्मी म्हणण्यांत येतें. ते अतिशय खुजे असून त्यांचा रंग काळा असतो, व केंस लोकरीसारखे असून नाक रुंद असतें त्यांचें डोकें मध्यम किंवा वर्तुलाकृति असतें. अंदमानी लोक, मलाया द्वीपकल्पांतील सेमँग, फिलिपाइन्समधील क्विटा व न्यू-गिनीमधील टापिरो हे याच वर्गांत मोडतात. पश्चिम आफ्रिकेंतील भूमध्यप्रदेशांतील अरण्यांतील अक्का, बटवा, वगैरे नेग्रिटो जाती सर्व जगांत अतिशय ठेंगू आहेत. त्यांची उंची सुमारें ५४ इंच भरते. यांचे हात व पाय लांबट असून चेहरा लहान मुलासारखा दिसतो. बुशमेन या जातीचे लोकहि पिग्मी वर्गांतीलच असावे. यांच्या स्त्रियांचे नितंब फार लठ्ठ असतात. हॉटेंटॉट लोकहि असेच पण बांटू आणि हॅमिटिक यांच्या मिश्रणानें झाले असावे. यांच्या कानास पाळी नसते.

( ६ ) ऑस्ट्रेलियन वंश—या वंशामध्यें ऑस्ट्रेलियांतील लोक व दक्षिण हिंदुस्थान आणि सिलोन यांमधील द्राविडपूर्व लोक (वेद्द), मलाया द्वीपकल्पांतील सकई आणि सेलिबिस बेटांतील तोऑला लोक हे येतात. या लोकांचे केंस काळे असून कुरळे असतात. यांची उंची मध्यम असते. कातडीचा रंग सांवळा असतो व अंगावर बरेच केंस असतात. यांचें डोकें लांब असून कपाळ मागें गेलेलें व जबडा पुढें आलेला असतो. भिवयांचीं हाडेंहि पुढें आलेलीं असून नाक चक्कें व रुंद असतें. सकई हे लोक ठेंगणे असून त्यांचे केंस लालसर व नाक मध्यम असतें. दक्षिण हिंदुस्थानांतील कुरुंबा, इरूला, पणियन, इत्यादि व सिलोनमधील वेद्द हे ठेंगू असून लांबट डोक्याचे असतात. यांच्या भिवया पुढें आलेल्या व नाक निमुळतें असतें. केंस बहुधा कुरळे असतात.

### आशिया खंडांतील मानव—

भौगोलिक दृष्ट्या जरी आपण उरल पर्वताच्या पूर्वेकडील भूखंडास आशिया खंड म्हणतों तरी मानववंशशास्त्रदृष्ट्या आशियांतच युरोपांतील रशियाचा अंतर्भाव केला पाहिजे. आशिया खंडांत मानवाची उत्पत्ति प्रथम कोठें व केव्हां झाली व त्याचा आद्यकालीन इतिहास काय होता यासंबंधीं अद्याप अज्ञानच आहे. पश्चिम आशिया व हिंदुस्थान यांमध्यें नद्यांच्या प्रवाहाबरोबर वाहून आलेलीं मानवाचीं आयुधें पुष्कळच प्रमाणांत सांपडतात. पॅलेस्टाइन प्रांतांतील उत्खननांत मौस्टेरियन मानवाची कवटी सांपडली आहे. आणि जावामध्यें पिथेकँन्थ्रॉपस या आद्यमानवाचे अवशेष सांपडले असून अलीकडे सिनँन्थ्रॉपस मानवाचे अवशेषहि मोठ्या प्रमाणांत आढळत आहेत. परंतु या सर्व अवशेषांवरून भूस्तरशास्त्रीय चतुर्थ युगामध्यें मानवाचें भ्रमण किती दूरवरच्या प्रदेशांत झालें होतें हेंच केवळ व्यक्त होतें. अलीकडच्या काळांतील मानवासंबंधीं विचार करूं लागलें असतां ऐनू जातीचे कॉकेशियन वंशांतील लोक दृष्टीस पडतात. ते युरोपियन वंशाचेच असले पाहिजेत याबद्दल फारशी शंका घेतां येत नाहीं. जरी त्यांची कवटी अल्पाइन वंशीय अर्वाचीन मानवापेक्षां निराळी असली तरी त्यांचें रशियांतील शेतकरी वर्गाशीं असलेलें साम्य पाहिलें म्हणजे ते युरोपियन वंशातील असावे याबद्दल शंका राहत नाहीं.

आशिया खंडाचें त्यांतील मानवाच्या जाती व संस्कृती या दृष्टीनें अवलोकन केलें असतां साधारणतः समान स्वरूपाचे असे तीन पट्टे आढळून येतात: १ पॅसिफिक महासागरापासून युरोपपर्यंत पसरलेला डोंगरपठाराचा प्रदेश—यामध्यें तिबेट, पूर्व तुर्कस्तान, वायव्य मंगोलिया व गोबीचें वाळवंट, तसेंच इराण, आर्मेनिया, व अनाटोलिया यांचा समावेश होतो; २ दक्षिणेकडे हिंदुस्थान व इंडोनेशिया हा भाग; व ३ पश्चिमेकडे अरबस्तान देश येतो. या प्रत्येक प्रदेशाचा इतिहास व मानववंश स्वतंत्र आहे.

यांपैकीं प्रत्येक प्रदेशाचें अवलोकन केलें असतां आपणांस निरनिराळ्या मानवजातींचे लोक आढळून येतात. जिला युरोपियन लोक निकटपूर्व म्हणतात तींत अनाटोलिया, मेसॉपोटेमिया व सीरिया हे देश येतात; पण अरबस्तान या प्रदेशांत मोडत नाहीं. यामध्यें भूमध्यसमुद्रीय लोकांचीच बहुतेक वस्ती आढळते. तथापि त्यामध्ये वर्तुलशीर्षी लोकांचें मिश्रण दृष्टीस पडतें. उदा., क्रीट बेटांत ज्या सर्वांत जुन्या कवट्या आढळल्या आहेत त्या शुद्ध भूमध्यसमुद्रीय मानवाच्या दिसत नाहींत. उलट ऊर या शहरीं वूले यानें ज्या खि. पू. चार हजार वर्षांच्या काळांतील कवट्या खणून काढल्या आहेत त्यांवरून सुमेरियन लोक हे भूमध्यसमुद्रीय असावे असें स्पष्ट दिसून येतें.

यानंतर मध्यपूर्व प्रदेशाकडे पाहूं गेल्यास त्यामध्यें तुर्कोमन आणि उझबेग हीं रशियांतील लोकराज्यें व इराण, बलुचिस्तान आणि अफगाणिस्तान हे देश येतात. यांमधील मानवजातींमध्यें बरेंच मिश्रण झालेलें आहे. विशेषतः या प्रदेशांत वर्तुलशीर्षी अल्पाइन लोक दृष्टीस पडतात. परंतु तुर्कोमन लोकांत उत्तर मानवाचे गुणधर्म आढळून येतात. परंतु यामध्यें भूमध्यसमुद्रीय लोकांचें मिश्रण झालें असावें. कारण हे लोक द्राविड

लोकांसारखे असून बलुचिस्तानमध्यें कांहीं बलुची लोक अद्यापिहि द्राविड वंशांतील ब्राहुहि भाषा बोलतांना आढळतात.

तुर्की लोकांमध्यें विशेषतः किरगिझ, कझाग, उझबेग, तुर्कोमन, इत्यादि जाती आढळतात. यांमध्यें अतिशय मिश्रण झालेलें दिसून येतें. उझबेग हें नांव जातिवाचक नसून राजकीय असावें आणि किरगिझ लोकांत तर मंगोल रक्त आढळतें. हे लोक प्राचीन इतिहासांतील हिऊंगनु व तुंगहू ( तुंगुस ) या जातींचे वंशज असावे. यांच्या स्वाऱ्यामुळेंच चिनी भिंत बांधली गेली व त्यानंतर ते पश्चिमेकडे वळले, ही गोष्ट गिबन या इतिहासकारानेंहि नमूद करून ठेविली आहे.

मीड अथवा इराणी लोक हे हॅडनच्या मताप्रमाणें प्रोटोनॉर्डिक किंवा पूर्वउत्तरीय लोक असावे. यांचे वंशज फारसी या नांवानें पर्सिपोलीस या शहरांत आढळतात. हे गौरवर्ण असून यांना केंस व दाढी काळी व मुबलक असते. याशिवाय इराणी लोकांची दुसरी एक उंच, दीर्घशीर्षी व श्यामल अशी जात असून त्यांचीं चित्रें आपणांस इराणी चित्रांमध्यें आढळून येतात. याखेरीज इराणी व ताजिक या जाती असून त्यांमध्यें काव्यांत आढळणाऱ्या सुंदर तरुणी उत्पन्न होत असाव्या.

अरबस्तान—यानंतर अरबस्तानामध्यें आपणांस सेमाइट व कदाचित् हेमाइट लोकांचेंहि मूळ आढळतें. यापैकीं उत्तरेच्या भागांत खरे सेमिटिक वंशाचे अरब राहत असून ते दीर्घशीर्षी असतात. परंतु दक्षिणेकडे जे बेदूइन नांवाचे लोक आढळतात त्यांमध्यें दीर्घशीर्षी लोकांचें प्रमाण शेंकडा १० असून त्यांचा बांधाहि ठेंगणा असतो. अरब लोकांमध्यें ज्या सद्गुणांची–विशेषतः त्यांचा इमानीपणा आणि आतिथ्य–स्तुति करण्यांत येते ते गुण या उत्तरेकडील लोकांत आढळतात. परंतु ते लोभीहि असतात. हे सेमाइट लोक पॅलेस्टाइन व मेसापोटेमिया या प्रांतांत ख्रिस्ती सनापूर्वीं कांहीं हजार वर्षें येऊन राहिले. कॅनेनाइट लोक हे सेमिटिक वंशाचे तर ॲमोराइट हे उत्तर वंशाचे समजण्यांत येतात. अब्राहम व त्याचे अनुयायी हे सेमिटिक वंशाची एक शाखा असून ते हिक्सॉस विजेत्यांबरोबर ईजिप्तमध्यें गेले व तेथून हांकून दिल्यामुळें पॅलेस्टाइनमध्यें स्थायिक होऊन त्यांनीं तेथील लोकांस आत्मसात् करून घेतलें. त्यामुळें त्यांमध्यें आर्मेनियन अथवा प्राचीन काळचे हिटाइट या वंशाचें मिश्रण झालें. असीरियन लोकहि आर्मेनियन आणि सेमिटिक वंशांच्या मिश्रणापासून उत्पन्न झाले असावे असें त्यांच्या निमरुड येथील कोरीव चित्रांवरून दिसून येतें. हीं चित्रें खि. पू. नवव्या शतकांतील आहेत. सध्यांचे यहुदी लोक हे बहुतेक वर्तुळशीर्षी असून त्यांचे अस्केनाझीम व सेफार्दिम् असे दोन वर्ग पाडण्यांत येतात.

सैबेरिया—या अत्यंत अफाट प्रदेशांतील मानवजातीबद्दल फारशी माहिती उपलब्ध नाहीं. परंतु त्यांचे मुख्यतः पूर्व व उत्तर किंवा प्राचीन आणि अर्वाचीन असे दोन भाग करण्यांत येतात. प्राचीन विभागामध्यें चुकची, कोरयाक, कामचाडल, गिलयाक, युक्धीर, येनिसी आणि ओस्तियाक, इत्यादि लोक येतात. कांहीं मानवशास्त्रज्ञांच्या मतें यापैकीं कांहीं लोक वायव्य अमेरिकेंतून परत आले असावे; कारण त्यांची भाषा आशियांतील भाषांसारखी नसून अमेरिकन इंडियन भाषांसारखी आहे. हाच एक नव्या आणि जुन्या जगांतील भाषांमध्यें दुवा आहे. अर्वाचीन सैबेरियन लोकांत फिनी, मंगोली, तुर्की व तुंगुसी हे लोक येतात. कझालिका या ग्रंथकारानें पाटकनॉफ याच्या ग्रंथावरून यांची बरीच मोठी नामावली दिली आहे. परंतु ते बहुतेक अर्वाचीन फिनिश, सामोयिद, तुर्की, व तुंगुस लोकांत मोडतात. हे सर्व लोक टुंड्रा आणि तायगा या प्रदेशांत राहतात आणि पशुपालन करून आपला उदरनिर्वाह करतात.

जपान—जपानमध्यें असलेल्या लोकांचा वंश कोणता याबद्दल अद्यापहि मानवशास्त्रज्ञांमध्यें निश्चिति आढळत नाहीं, व त्यांची भाषाहि कोणत्या वंशांतील असावी हें अद्याप निश्चित झालें नाहीं. जपानी लोकांत मंगोली व दैम्यौ असे दोन वर्ग पाडण्यांत येतात. पहिला ठेंगू असून दुसरा उंच व सुंदर असतो. जपानमध्यें अत्यंत प्राचीन काळीं ऐनु लोकांची वस्ती होती व ते अजूनहि उत्तरेकडील येझो बेटांत आढळतात.

चीन—चीनमध्यें अत्यंत प्राचीन संस्कृति होअंगहो अथवा पीत नदीच्या खोऱ्यांत आढळते. तेथील लोक उंच बांध्याचे ( ६६ इंच ) असून जरी त्यांचें वर्तुलशीर्षी म्हणून वर्णन करण्यांत येतें तरी सामान्यतः ते मध्यमशीर्षी असावेत. त्यांच्या चेहऱ्यांत वैचित्र्य असावें. कांहीं लोकांचे चेहरे लांबट व नाकाचें हाड उंच आढळतें, व डोळे केवळ मंगोलियन वर्गाचे आढळत नाहींत. त्यांच्यामध्यें परकीय रक्ताचें बरेंच मिश्रण झालें असावें. उत्तर चीनवर तुंगुस, तुर्की व मंगोल लोकांनीं वरचेवर स्वाऱ्या केलेल्या असल्यामुळें त्यांचें मिश्रण या लोकांत बरेंच झालें असावें. पीत नदीच्या खोऱ्यांत उदय पावलेली संस्कृति यांगत्सी नदीच्या शाखांमार्फत दक्षिण चीनमध्यें खि. पू. एक हजार वर्षांच्या सुमारास पसरली असावी. त्या वेळीं चिनी लोकांचा आयुष्यक्रम शेतकीप्रधान असावा. दक्षिणेकडील चिनी लोक उत्तरेकडील लोकांपेक्षां वाटोळ्या डोक्याचे व श्यामलवर्णी असतात. तिबेट, मंगोलिया आणि मांचुरिया हे प्रदेश चीनच्या सीमेवर असून गेलीं दोन हजार वर्षें या प्रदेशावर चिनी संस्कृतीचा परिणाम घडून आला आहे. तसेंच दक्षिण चीनमधील लोक टॉंकिन,

ॲनॉम, कोचीन चीन, कांबोडिया, सयाम व ब्रह्मदेश यांमध्येंहि पसरलेले आहेत.

मलाया—प्रत्यक्ष मलायाचा अर्वाचीन इतिहास बाराव्या शतकाच्या मध्यापासून सुरू होतो. त्या वेळीं मलायामध्यें ओरंग-मलयु या नांवाचे मलयु भाषा बोलणारे मुसलमान लोक राहत असत. हे प्रथम सुमात्रा बेटांतील मेनंगकबऊ नांवाच्या प्रदेशांत उदय पावले होते. यांनीं प्रथम सिंगापूर अथवा सिंहपूर या ठिकाणीं वसाहत केली. सिंहपूर या नांवावरूनच त्या वेळीं हिंदु संस्कृतीचा प्रसार त्या प्रदेशांत किती झाला होता हें दिसून येतें. हे लोक अर्धवट बौद्ध व अर्धवट मुसलमान असून त्यांनीं आजू-बाजूचीं टिमोर, टर्नेट, जिलोलो, बांदा, सुला व सुलु, वगैरे बेटें आणि बोर्निओ, बटेव्हिया, वगैरे प्रदेश व्यापले. तथापि या सर्व प्रदेशांत पूर्वीचे मलयु लोक वस्ती करून राहिलेच होते. यांचें मिश्रण होऊन ही मंगोल वंशाची पूर्व महासागरांतील शाखा बनली आहे; या सर्व प्रदेशांत जावा बेटांतील संस्कृती-प्रमाणें एक भारतीय संस्कृतीची शाखा प्रसृत झाली आहे.

हिंदुस्थान—भारत देशामध्यें हिमालयीन प्रदेश, हिंदुस्थानी मैदानें व दख्खनचें पठार असे सामान्यतः तीन भाग पाडण्यांत येतात; पण हे विभाग मानवशास्त्रदृष्ट्या लोकवस्तीचे विभाग म्हणून मानतां येत नाहींत. हिंदुस्थानच्या मानवेतिहासाचा शोध करणें बरेंच कठीण आहे व आजचें ज्ञान या कामीं अपुरें आहे. अत्यंत प्राचीन काळीं पूर्वद्राविड असें ज्यांस संबोधण्यांत येतें असे लोक या विस्तीर्ण प्रदेशांत वस्ती करून राहिलेले होते. हे जंगलांत राहून शिकारीवर उपजीविका करीत असत. अद्यापिहि आपणांस दक्षिणेमध्यें इरुला, कुरुंबा, पणियन, इत्यादि टोळ्या व सिलोनमधील वेद्द या लोकांच्या रूपानें आढळतात. सध्यां भरत-खंडामध्यें सामान्यतः पुढील निरनिराळ्या वंशांतील लोक आढळून येतात: १. द्राविड वर्ग—सिलोनपासून गंगा नदीच्या खोऱ्या-पर्यंत द्राविड लोकांचा प्रसार झालेला आढळतो. यांमध्यें दक्षिण हिंदुस्थानांतील डोंगरांत राहणारे पणियन लोक व छोटा नागपूर-मध्यें आढळणारे संताळ लोक हे विशेष अभ्यसनीय आहेत. यांचा बांधा ठेंगू असून चेहरा कृष्णवर्णी व केंस कुरळे, डोळे काळे, डोकें लांब व नाक रुंद असतें. २. मंगोलो-द्राविड वर्ग—यांची वस्ती दक्षिण बंगाल व ओरिसा या भागांत आढळते. यांमध्यें मंगोल व द्राविड या वंशांचें मुख्यतः मिश्रण असून आर्य-वंशाचाहि अंश आढळतो. यांचा बांधा मध्यम, वर्ण सांवळा, डोकें रुंद, नाक मध्यम पण थोडें रुंदट असून चेहऱ्यावर केंस बरेच आढळतात. ३. इंडो-द्राविड वर्ग—हे लोक संयुक्तप्रांत, राजपुताना, बिहार व सिलोन यांमध्यें आढळून येतात. यांत उच्च वर्णीय ब्राह्मणापासून चांभारापर्यंत सर्व जातींचे लोक आढळून येतात. हे इंडो-आर्यन व द्राविड यांच्या मिश्रणानें उत्पन्न झालेले असून त्यांचा बांधा मध्यम, वर्ण गोधूम वर्णापासून कृष्णवर्णापर्यंत निरनिराळ्या प्रकारचा आढळतो. यांचें डोकें लांबट असून कांहींचें मध्यम आकाराचें असतें. नाकहि मध्यापासून रुंद आकाराचें दृष्टीस पडतें. ४. सिथो-द्राविड वर्ग—यांची वस्ती पश्चिम हिंदुस्थानांत असून त्यांत महाराष्ट्रीय व कूर्ग लोक येतात, असें कांहीं मानवशास्त्रज्ञ मानतात. ग्रीस्टले यांच्या मतें हे शक व द्राविड यांच्या मिश्रणापासून उत्पन्न झाले असावे. परंतु त्यांच्या डोक्याच्या वाटोळेपणावरून हें फारसें सिद्ध होत नाहीं; उलट ते अल्पाइन वंशाचे असावे असें कांहींचें मत आहे. यांचा बांधा मध्यम असून डोक्यावर केंस विशेष दाट नसतात. यांचा वर्ण गौर असून डोकें रुंद असतें. नाक मध्यम आकाराचें व फार लांब नाहीं असें, पण सुंदर असतें. ५. मंगोलॉइड वर्ग—या वर्गांतील लोक हिमालय, नेपाळ, आसाम आणि ब्रह्मदेश यांत आढळ-तात. तसेंच कुलु खोऱ्यांतील कनेत, दार्जिलिंगजवळील लेप्चा, नेपाळमधील लिंबू, मुरमी आणि गुरुंग, आसामांतील बोदो, व बर्मी लोक येतात. यांचा बांधा खुजा असून कातडीचा वर्ण पिवळसर पिंगट असतो. डोकें रुंद असून चेहरा सपाट असतो. नाक रुंदट असतें. भिवया तिरप्या असतात, आणि तोंडावर केंस फारसे नसतात. ६ इंडो आर्यन वर्ग—या वर्गां-तील लोक पंजाब, राजपुताना व काश्मीर या भागांत आढळ-तात. हे जवळजवळ भरतखंडांत प्राचीन काळीं वसाहत केलेल्या आर्य लोकांशीं सदृश दिसतात. यांचा बांधा उंच असून वर्ण गौर असतो. चेहऱ्यावर केंस पुष्कळ असतात. डोळे काळे, डोकें लांबट व नाक अरुंद असतें व बांध्यानें हे उंचेले असतात. ७ तुर्को-इराणी वर्ग—या वर्गांत बलुची, ब्राहुई आणि अफगाण हे वायव्येकडील लोक येतात. रिस्ले यानें हे लोक बहुधा तुर्की व इराणी लोकांचें मिश्रण असून त्यांमध्यें आर्मेनियन अंशहि असावा, असें म्हटलें आहे. यांचा बांधा उंच असून चेहरा गौरवर्ण असतो. डोळे बहुधा काळे असून कांहींचे करडेहि असतात. तोंडावर केंस बरेच असून डोकें रुंद, नाक मध्यम व उंचेलें असतें.

या वरील वांशिक वर्गीकरणासंबंधीं पुष्कळ मतभेद आहेत. व शक, द्राविड वंशासंबंधीं बोलावयाचें तर शक लोक विशेष संख्येनें हिंदुस्थानांत आले असावे असें मानण्यास फारशी जागा नाहीं. अद्यापि भरतखंडांतील मानववंशांचा अभ्यास पद्धतशीर रीतीनें फारसा झालेला नाहीं. भरतखंडामधील मानवाची वस्ती अत्यंत प्राचीन कालापासून होत आलेली असून त्यांत मुख्यतः तीन थर आढळतात. पहिला थर येथें अत्यंत प्राचीन कालापासून वस्ती करून राहिलेल्या मानवांचा होय. यांची वस्ती केन्द्रां

झाली यासंबंधीं नक्की अनुमान काढण्याइतका या लोकांसंबंधीं अभ्यास झालेला नाहीं. परंतु हे अत्यंत प्राथमिक सांस्कृतिक अवस्थेंत असून अद्यापिहि त्यांच्यामध्यें फारशी सांस्कृतिक वाढ झालेली नाहीं व आजहि ते अगदीं प्राथमिक स्वरूपाचा आयुष्यक्रम आचरीत असलेले आढळून येतात व त्यांच्या भाषाहि अशाच प्राथमिक अवस्थेंत असलेल्या दृष्टीस पडतात. अशा तऱ्हेचे लोक डोंगराळ व अरण्यमय भागांतच आतां दृष्टीस पडतात; कारण सपाट व सुपीक असा प्रदेश त्यांच्या-मागून आलेल्या लोकांनीं व्यापून टाकून त्यांस या डोंगराळ व जंगली भागांत हांकून दिलें आहे. अशा तऱ्हेच्या वन्य जाती दक्षिण व उत्तर हिंदुस्थानांत व आसाममध्येंहि आढळतात व यांस तोडा, कोडगू, वगैरे नांवें असलेलीं दिसतात. तसेंच मध्य हिंदुस्थानांत आढळणारे भिल्ल व कातकरी लोक, तसेंच गोंड, कोरकू, खोंड वगैरे लोक, संताळ लोक व आसाममधील नाग, बोदो, वगैरे लोक अशा प्रकारचेच होत. या आद्य मानवांस ऑस्ट्रोएशियाटिक असें संबोधण्यांत येतें. नंतर द्राविड लोकांची वस्ती बलुचिस्तानपासून दक्षिण टोंकापर्यंत एका काळीं झालेली असावी. याचें प्रत्यंतर ब्राहुई भाषेवरून येतें. परंतु सध्यां द्राविड लोक बहुधा हिंदुस्थानांतच आढळतात. यानंतर आलेले आर्य लोक भरतखंडभर पसरलेले असून त्यांचें भरतखंडाच्या निरनिराळया स्थानिक लोकांशीं मिश्रणहि झालेलें आढळतें.

### युरोप खंडांतील मानव—

युरोपमध्यें होमोसेपाइन या जातीचा मनुष्य प्रथम ऑरिग्ने-शियन अथवा अपरपूर्व अश्मायुध युगामध्यें आढळतो. हा दीर्घ-शीर्षी असून वर्तुलशीर्षी मनुष्य मध्य अश्मायुधकालापूर्वी आढळत नाहीं. या कालांतील मानवाचे अवशेष फुरफुज (बेल्जिअम), ऑफनेट (बव्हेरिया), मुधेम (पोर्तुगाल) मध्यें आढळतात. हे बहुधा मध्य युरोपांतील अल्पाइन वंशी मानवांचे पूर्वज असावे. परंतु यांच्याबद्दल फारशी माहिती आढळत नाहीं.

नूतन अश्मायुध युगामध्यें भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर एक साधारण मध्यम उंचीच्या व वाटोळया डोक्याच्या मानव-जातीची वस्ती आढळते. याच लोकांनीं फ्रान्स, ब्रिटिश बेटें व पश्चिम युरोप यांमध्यें भव्य पाषाणसंस्कृतीचा (मेगॅलिथिक) प्रसार केला असावा. हे भूमध्यसमुद्रीय वंशाचे मानव असून नाइल नदीच्या खोऱ्यांतील संस्कृतीचे आद्य जनक असावे. हे खि. पू. पांचव्या सहस्रकामध्यें शेती व बागायत करून धान्य व फळें पिकवीत असावे. तसेंच ते पशुपालन करीत असून त्यांचीं हत्यारें गुळगुळीत दगडाचीं असत. त्यांस मातीचीं नक्षीदार भांडीं करितां येत असून विणकामहि येत असावें, व पुढें पुढें ते धातूंचाहि उपयोग करीत असावे असें हॅडन या ग्रंथकाराचें मत आहे. सरोगृहांतील संस्कृतीचा उदय यांनींच केला असावा, व हालस्टाट व लातेने येथील संस्कृतींचेहि जनक हेच असावे. तथापि यांच्या संस्कृतीवर उंच, गौरवर्ण व दीर्घ-शीर्षी उत्तर वंशांतील मानवाच्या संस्कृतीचाहि बराच परिणाम झाला असावा.

या उत्तरीय मानववंशाची उत्पत्ति कोठें झाली हें अद्यापि निश्चित झालें नाहीं. बहुधा ती दक्षिण रशियांतील पठारावर किंवा जवळपास झाली असावी व पूर्व युरोप आणि पश्चिम आशिया यांतील पठारावर राहणारे लोक उत्तरेकडे स्कॅंडि-नेव्हिआमध्यें गेल्यावर या उत्तरीय वंशाचे पूर्वज बनले असावे.

युरोप खंडांतील मानवेतिहास म्हणजे या लोकांचाच इति-हास होय. यांत उत्तरकालीं हंगेरी व बाल्कन द्वीपकल्प यांमध्यें कांहीं तुर्की, मग्यार, वगैरे लोकांचें मिश्रण झालेलें आहे. त्यांपैकीं मग्यार हे पूर्णपणें युरोपियन बनले आहेत. बल्गर लोक हे आपल्या देशांत १७ व्या शतकांत आले व ते पूर्णपणें स्लाव्हा-निक लोकांशीं मिसळून गेले. तथापि त्यांच्या भाषेंत बरेच तुर्की शब्द आढळतात.

याखेरीज फ्रान्स व स्पेन यांच्या दरम्यान असलेल्या बास्क या नांवाच्या लोकांचा स्वतंत्रपणें उल्लेख करणें आवश्यक आहे. यांच्यासंबंधीं पुष्कळच वाङ्मय लिहिलें गेलें आहे. विशेषतः यांची भाषा चिकटी भाषा या वर्गांत येते. म्हणजे ती प्रत्यय-रहित असून शब्दाला शब्द जोडून वाक्य तयार करण्यांत येतें. तसेंच यांच्या भाषेंत अमूर्तकल्पनावाचक शब्द आढळत नाहींत.

### आफ्रिका खंडांतील मानव—

आफ्रिकेमध्यें साधारणतः पुढील मानवजाती आढळण्यांत येतात:— १ बुशमेन, २ हॉटेंटॉट, ३ नेग्रिटो, ४ नीग्रो, ५ हॅमाइट, व ६ सेमाइट. यांपैकीं सेमाइट लोक हे आफ्रिके-मध्यें गेल्या हजार वर्षांच्या आंतच आले असून त्यांचें वर्चस्व साहारा वाळवंटाच्या उत्तरेकडील भागांतच आढळून येतें व कांहीं मिश्रण अबिसिनियामध्यें आढळतें.

मानववंशाच्या दृष्टीनें आफ्रिका खंडाचे साधारणपणें दोन भाग करण्यांत येतात. यापैकीं उत्तरेकडील भागांत कॉकेशियन वंशांतील हॅमाइट व सेमाइट हे गौरवर्णी लोक राहतात व दक्षिणेकडील भागांत कृष्णवर्णी व लोंकरीसारख्या केसांचे नीग्रो राहतात. या दोहोंमधील हद्द साधारणतः सेनेगॉल नदीपासून जुबा नदीपर्यंत काढलेल्या रेषेनें दाखवितां येईल. यांपैकीं पश्चिमेकडील भागांत फक्त शुद्ध नीग्रो वंशाचे लोक राहतात.

बाकीच्या लोकांत हॅमिटिक लोकांच्या रक्ताचें मिश्रण झालेलें आहे.

हॅमाइट हे लोक भूमध्यसमुद्रीय मानववंशाचे असून त्यांच्या पूर्व व उत्तर अशा दोन शाखा पडतात; व ते मूळ आशिया खंडांतील अरबस्तानच्या दक्षिण भागांत उत्पन्न झाले असावे. हॅमाइट व सेमाइट हे दोन्हीहि मूळ एकाच वंशापासून निघाले असावे. हॅमाइट लोकांचे पुन्हां उत्तरेकडील व पूर्वेकडील असे दोन भाग करण्यांत येतात. उत्तरेकडील भागांत ट्रिपोली, ट्युनिस व अल्जेरिया आणि मोरोक्को यांतील वर्बर लोक, साहारामधील ट्वारेग व टिब्यू लोक, नायगेरियांतील फुला व कॅनेरी बेटांतील ग्वॉंची हे लोक येतात.

पूर्वेकडील हॅमाइट लोकांत ईजिप्शियन, बेजार, बर्बराईन गॅला, सोमाली, गॅनाकिल व अबिसिनियन हे लोक येतात.

आफ्रिकेमध्यें सर्वांत प्राचीन मानव पूर्वहॅमाइट जातीचे आढळतात. ते ईजितमध्यें खि. पू. बत्तीसशें वर्षांपूर्वी म्हणजे राजघराण्यांच्या उदयापूर्वी वस्ती करून असावे. यांच्या स्मशानभूमींत यांचे अवशेष आढळलेले आहेत, त्यांवरून हे पूर्व ईजिप्तमधील वाळवंटांत आढळणाऱ्या बेजा लोकांचे पूर्वज असावे यांत संशय नाहीं व हेच हॅमिटिक वंशाचे आज हयात असलेले शुद्ध वंशज होत.

उत्तर हॅमाइट वंशाच्या लोकांचें उदाहरण म्हणजे वर्बर लोक होत. हे शेती व बागायत करून पशुपालनहि करीत असत. त्यांची समाजव्यवस्था अरब लोकांपेक्षां निराळी असे. तसेंच ते अनेक कलांमध्यें निपुण असत व अद्यापहि आढळून येतात.

अरब लोकांनीं ईजित देशावर सन ६३९ ते ६४१ या कालांत स्वाऱ्या केल्या. परंतु त्यांची संख्या इतकी अल्प होती कीं, नाइल खोऱ्यांतील लोकांच्या संस्कृतीवर प्रथम त्यांचा फारसा परिणाम झाला नाहीं; परंतु ११ व्या शतकांतील स्वाऱ्यांनीं मात्र या प्रदेशांत अरबी वळण स्पष्टपणें दिसूं लागलें व अरब हें नांव वंशापेक्षां इस्लामी संप्रदायामुळें अधिक प्रसार पावलें. अरबांचे सामान्यतः (१) भटके, (२) अर्ध भटके (बकारा), व (३) स्थायिक, असे तीन वर्ग पाडतां येतात. अँग्लो-ईजिप्ती-सुदानमध्यें हे तीनहि वर्ग आपल्या दृष्टीस पडतात.

आफ्रिका खंडांतील सर्वांत जुने लोक नीग्रोवंशाचे असल्यामुळें व त्यांमध्यें फारसा फरक करतां येण्यासारखा नसल्यामुळें त्यांचें वर्गीकरण करणें बरेंच कठिण आहे. याकरितां सामान्यतः त्यांच्या भाषांवरून त्यांचे पुढें दिल्याप्रमाणें वर्ग पाडण्यांत येतात: १ अर्ध हॅमाइट–हे पूर्व आफ्रिका व पूर्वमध्य आफ्रिका, केनिया व टॅंगानिका यांमध्यें राहतात. २ निलोटी–हे नाइल नदीच्या खोऱ्यांत ॲंग्लो-ईजिप्शियन सुदानपासून युगांडापर्यंत पसरले आहेत. ३ बांटू– हे आफ्रिका खंडाच्या दक्षिणेकडील ⅔ भागांत आढळतात.

बुशमेन हा स्वतंत्र वर्ग आहे. यांची वस्ती आफ्रिकेमध्यें हजारों वर्षांपूर्वीपासून असावी. हे गेल्या शतकापर्यंत अश्मायुध युगांतील आयुधांप्रमाणें हत्यारें वापरीत असत. हे पूर्वी पूर्व व पूर्वमध्य आफ्रिकेंत उत्पन्न होऊन तेथून निरनिराळ्या ठिकाणीं पसरले असावे व त्यांचे जुने अवशेष दक्षिण आफ्रिकेंत सर्वत्र आढळतात. सध्यां ते कलहारी वाळवंटांत आणि नैर्ऋत्य आफ्रिकेच्या दक्षिण भागांत आपला पूर्वींचा आयुष्यक्रम आचरतांना आढळतात.

आफ्रिकेमधील ठेंगू नेग्रिटो लोकांबद्दल अद्यापपर्यंत फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. त्यांची स्वतंत्र अशी भाषा आहे किंवा नाहीं याबद्दलहि शंका आहे. सध्यां ते भूमध्य प्रदेशांतील दाट जंगलांत राहतात, परंतु प्राचीन काळीं ईजितचे बादशाह फॅरोहा हे त्यांस आपल्या दरबारांत नृत्य करण्याकरितां नेत असत असें दिसतें. मादागास्कर बेटांत मंगोल व नीग्रो आणि इतर अनेक लोक यांचें मिश्रण आढळून येतें.

### अमेरिकेंतील मानव—

अमेरिका खंडामध्यें उत्तर अमेरिकेच्या आर्क्टिक किनाऱ्यावर व ग्रीनलंड बेटांत एस्किमो लोकांची वस्ती आढळते. ईशान्य आशिया खंडांतहि हेच लोक आढळतात, व ते आशियांतूनच या प्रदेशांत आले असावे. ते ठेंगू असून लांबट डोक्याचे असतात. त्यांचा चेहरा रुंद असून गालाचीं हाडें उंच असतात. नाक अरुंद व किंचित् उंच असतें. डोळे काळे असतात.

बाकीच्या अमेरिकेच्या सर्व भागांत अमेरिकन इंडियन लोक राहतात. उत्तर अमेरिकेंतून यांची वस्ती बहुतेक नाहींशी होत आली असून दक्षिण अमेरिकेंत यांच्या कांहीं मिश्र जाती आढळतात. यांचे केंस काळे व राठ असतात. कातडीचा रंग पिवळट असतो, बांधा उंच असतो, व डोकें मध्यम वर्तुलाकार असतें, पण किंचित् लांबट असतें. चेहरा रुंद असून गालांचीं हाडें वर आलेलीं असतात. डोळे पिंगट असतात. यांवरून ते मंगोल वंशाचे असावे. नाक सरळ व तरतरीत असतें. मानवशास्त्रज्ञांच्या मतें मानवाची उत्पत्ति अमेरिकेंत झाली नसून आशियांतच झाली असावी व आशियांतूनच हे लोक बेहरिंगच्या सामुद्रधुनींतून अमेरिकेंत आले असावे. हा काल खि. पू. पांच हजार वर्षांच्या आसपास असावा.

यांची भाषा अनेकाक्षरी असून त्यांची संख्याहि पुष्कळ आहे. व निरनिराळ्या टोळ्यांचीं भाषा परस्परांस समजत

नाहीं व त्यांत इंग्लिश व जर्मन या भाषांतील फरकाइतकें अंतर आढळून येतें. या लोकांची संस्कृति अमेरिकेचा शोध लागला त्या वेळींहि अगदीं प्राथमिक स्वरूपांत होती. त्यांस धान्य दळण्याचें जातें माहीत नव्हतें, नांगर माहीत नव्हता व चाकहि ठाऊक नव्हतें.

नव-अश्मायुध युगाच्या कालांत मंगोलियन लोक प्रथम अमेरिकेंत आले. अर्थातच ते बेव्हरिंगच्या सामुद्रधुनीच्या मार्गें येऊन दक्षिणेकडे पसरत गेले. त्यांना प्रथम कॅरिबो आणि नंतर रेनडियर हे प्राणी उत्तर अमेरिकेंत आढळले व त्यानंतर दक्षिण बाजूस गव्यांचे मोठाले कळप आढळून आले. ते जेव्हां दक्षिण अमेरिकेंत गेले तेव्हां त्यांस तेथें अजस्र आर्माडिलो जातीचे प्राणी आणि मेगॅथेरीयम म्हणजे हत्तीएवढ्या उंचीचे स्लॉथ म्हणजे आस्वलासारखे सुस्त प्राणी आढळले. यांचा त्यांनीं लवकरच निःपात केला.

या लोकांची सांस्कृतिक वाढ नव-अश्मायुधयुगांतील भ्रमण करणाऱ्या शिकारी लोकांच्या संस्कृतीपलीकडे फारशी कधींच झाली नाहीं. त्यांस लोखंडाचा शोध लागलाच नाहीं. सोनें व तांबें या धातू मात्र त्यांस आढळून आल्या. मेक्सिको, युकॅटन आणि पेरू या भागांत स्थायिक होऊन वसाहत करून शेती वगैरे करण्यासारखी परिस्थिति त्यांस आढळून आली. येथें एका निराळ्याच संस्कृतीची वाढ खि. पू. एक हजाराच्या सुमारास झालेली आपणांस आढळून येते. या लोकांमध्यें शेतीच्या पेरणीच्या व कापणीच्या वेळीं नरमेध करण्याची चाल आढळून येते. या लोकांत पुरोहितांचें महत्त्व फार असे. तसेंच ज्योतिषशास्त्राची वाढ बरीच झालेली असून त्यामध्यें अचूकपणा दिसून येतो. त्यांस वर्षाचें गणित बरेंच बिनचूक करतां येत असे. युकॅटन प्रांतांत तेथील मय लोकांनीं लेखनकलाहि उपयोगांत आणली होती. परंतु आज तिचें ज्ञान नष्ट झालें आहे व तत्कालीन लेखांचा अर्थ करतां येत नाहीं. येथील पुरोहितांनीं पंचांग करण्याच्या बाबतींत बरीच प्रगति केली होती असें दिसतें.

मय संस्कृति ही सामान्यतः इ. स. ७०० ते ८०० च्या सुमारास कळसास पोहोंचली होती. त्या वेळचीं त्या लोकांनीं दगडांत केलेलीं खोदकामें फार अजस्र असून त्यांच्या भव्यपणामुळें आजहि मनुष्यास तीं आश्चर्यचकित करतात. अशा तऱ्हेचीं कामें फक्त प्राचीन हिंदुस्थानी अवशेषांमध्यें आढळून येतात. या लोकांतील सामान्य लोकांचा आयुष्यक्रम इतर असंस्कृत लोकांच्या आयुष्यक्रमासारखाच आढळून येतो. या लोकांत मातीचीं भांडीं, विणकाम व रंगकला यांची बरीच प्रगति झाली होती. मय लोक केवळ दगडावरच कोरून लेख लिहीत असें नव्हे तर ते चामडें व इतर पदार्थ यांवरहि रंगानें अक्षरें काढीत. अशा तऱ्हेचे लेख युरोप व अमेरिका खंडांतील अनेक पदार्थसंग्रहालयांत आढळून येतात. पण अद्यापि त्यांच्या कालगणनेखेरीज इतर गोष्टींसंबंधीं त्या लेखांचें वाचन करण्यांत फारशी प्रगति झालेली नाहीं.

उत्तर अमेरिकेमध्यें मिसिसिपी नदीच्या खोऱ्यांत कांहीं जुने अवशेष आढळतात त्यांवरून तेथें पूर्वी एका संस्कृतीचा बराच विकास झाला असावा असें दिसतें. या संस्कृतीचे आजचे वारस प्युब्लो इंडियन हे होत. यांची वस्ती रायओ ग्रँड खोऱ्यापासून मेक्सिकोपर्यंत आढळते. यांचीं घरें दगडांचीं व उन्हांत वाळविलेल्या विटांचीं असून ते मका पिकवीत असत. उभ्या चौकटींत कापड विणीत असत. त्यांस जात्याचा उपयोग माहीत होता, आणि ते टर्की जातीचीं कोंबडीं बाळगीत असत. या प्युब्लो लोकांचा व दक्षिण मेक्सिकोंतील अझटेक लोकांचा संबंध असावा असें वाटतें. तथापि त्या दोहोंमध्यें प्रत्यक्ष अवशेषांचें सातत्य आढळत नाहीं. प्युब्लो इंडियन लोक शिंपा व अस्थी यांचे व वैडूर्य व खनिजांगार यांचे कोरलेले दागिने वापरीत असत असें दिसतें; व या लोकांकडून अझटेक लोक या वस्तू घेत असावे, असें आढळतें.

मेक्सिको—मेक्सिको व मध्य अमेरिका यांतील लोकांस नहुआ संस्कृतीचे लोक असें म्हणतात. यांच्याबरोबरच न्हॉक्सटेकन लोक व त्यांची संस्कृति यांचें मिश्रण झालेलें दिसून येतें. स्पॅनिश लोकांनीं मेक्सिको प्रांत जिंकला त्या वेळीं तेथें अझटेक या मेक्सिको शहरांतील लोकांची संस्कृति अस्तित्वांत होती. यापूर्वी कांहीं शतकें ही संस्कृति मय लोकांमध्यें प्रथम होंडुरासमध्यें व नंतर युकॅटनमध्यें प्रचलित होती. मय लोकांमध्यें एक चित्रलिपि प्रचलित होती, व त्यांस कांसें (ब्रॉन्झ) व लोखंड या धातू माहीत नसल्या तरी त्यांच्यामध्यें कलांची वाढ बरीच झाली होती. खि. पू. ३०० या कालाचे स्तंभ आढळून येतात. त्यांवरून शिल्पकलेमध्यें व ज्योतिषशास्त्रांत त्यांनीं इतकी प्रगति केलेली दिसून येतें कीं, त्यावरून त्यापूर्वी तीन सहस्रकें तरी या संस्कृतीचें संवर्धन होत असावें. त्यांनीं जरी भव्य इमारती बांधलेल्या आहेत तरी त्यास चुन्याचा उपयोग, सांधमोड व कमानीची रचना माहीत असल्याचें दिसत नाहीं. शिल्पकामाचे नमुने मात्र बरेच कौशल्याचे आढळतात. मातीचीं भांडीं पुष्कळच चांगल्या आकाराचीं व रंगीत आकृती काढलेलीं दृष्टीस पडतात. त्यांचा मुख्य देव वृष्टिदेवता असावी.

स्पॅनिश लोकांनीं जेव्हां मेक्सिको जिंकला त्या वेळीं मय शहरें ओसाड असून तेथें जंगलें वाढलीं होतीं. या भागांत मयभाषा

बोलणारे कांहीं लोक अद्यापि आढळतात. परंतु त्यांस लेखन-कलेची किंवा पंचांगाची माहिती दिसत नाहीं.

मय संस्कृति नष्ट होण्यापूर्वीं तिचा प्रसार मेक्सिकोच्या खोऱ्यांत झाला होता व तेथें तिचा प्रथम टोल्टेक व नंतर अझ-टेक लोकांमध्ये प्रसार झाला. या लोकांनीं मयपंचांग व त्यांचे यज्ञविधी यांचा स्वीकार केला.

दक्षिण अमेरिकेमध्यें एकंदर पांच निरनिराळ्या संस्कृती आढळतात. त्यांपैकीं दोन म्हणजे चिबच्या आणि इंका यांची बरीच वाढ झालेली दिसून येते. या दक्षिणेकडील लोकांत एक अत्यंत रानटी वर्ग व दुसरा स्थापत्य, शिल्प व राजनीति यांमध्यें बराच पुढारलेला वर्ग आढळून येतो. चिबच्या लोकांनीं पाट-बंधाऱ्याचीं मोठमोठीं कामें केलेलीं आढळतात. ते सूर्योपासक असून त्यांच्या इमारती दगडी नसत. त्यांस तांब्याचा उपयोग माहीत नव्हता परंतु सोन्याच्या वस्तू मात्र ते पुष्कळच कौशल्य-पूर्ण करीत असत. यांच्याच दक्षिणेकडे इंका लोक राहत असत.

इंका लोकांच्या साम्राज्यस्थापनेपूर्वी टिटिकाका सरोवरावर समुद्रसपाटीपासून १२ हजार फूट उंचीवर तिआव्हानाको येथें जीं अजस्र दगडी बांधकामें आढळून येतात तीं बांधणाऱ्या लोकांचें एक साम्राज्य होतें. हीं बांधकामें कधीं झालीं याचा पंचांगाच्या अभावीं नक्की कालनिर्णय करतां येत नाहीं. पेरू प्रांतामध्यें कालगणनेकरितां पंचागाऐवजीं दोऱ्यास गांठी मारीत असत. वर उल्लेखिलेल्या तिआव्हानाको येथील अजस्र दगडी अवशेषांमध्यें एक भव्याकृति एका शीलेचाच अजोड दरवाजा बसविलेला आढळतो. बांधकामांतील दगड बहुकोनी असतात. तसेंच मातीचीं भांडींहि चाकाचा उपयोग न करतांहि फार कौशल्यानें घडविलेलीं दृष्टीस पडतात. या लोकांस सोनें व तांबें यांचा उपयोग माहीत असून मय लोकांपेक्षां या धातूंचा उपयोग ते अधिक करीत असत.

इंका—इंका संस्कृतीचा उदय इसवी सनाच्या अकराव्या शतकांत झाला असावा. हे लोक बोलीव्हियन पठारावरून दक्षिणे-कडून पेरू देशांत आले असावे. युरोपीय लोकांस यांचा शोध लागला त्या वेळीं अकरा इंका राजे पेरू देशावर राज्य करून गेले होते. या वेळीं त्यांचें राज्य इक्वेडोरमधील किटोपासून चिली-मधील मौले नदीपर्यंत सुमारें ३५° अक्षांश इतक्या अंतरावर पसरलें होतें. यांच्या राज्यांत एखाद्या जमातीची सत्ता नसून एका जातीची सत्ता असे. इंका राजास देव मानण्यांत येत असे. प्रत्येक मनुष्यास शेती करणें व सैन्यांत दाखल होणें सक्तीचे असे, व आपला गांव अथवा प्रदेश सोडून बाहेर जाण्यास बंदी असे. इंका लोक सडका बांधण्यांत फार पटाईत होते. यांच्या इमारती बिनचुन्याच्या पण फार प्रमाणशीर बांधलेल्या आढळतात. या लोकांत नरमेध प्रचलित होता. परंतु तो फार मोठ्या प्रमाणावर नव्हता. कुइच्युआ या नांवाची एक बोली या भागांत अद्यापि प्रचलित आहे.

ॲमेझॉन नदीचें खोरें हाहि एक जगांतील अजब असा उष्णकटिबंधांतील प्रदेश आहे. या प्रदेशांत जरी केवळ जंगली लोकांची वस्ती असली तरी मधून मधून शेती केलेली आढळून येते. त्यामध्यें तेथील लोक टापीओका नांवाच्या आरारूटसारख्या मुळाची लागवड करितात. हे लोक केवळ शेतीवर अवलंबून नसल्यामुळें ती बहुतेक बायकाच करितात. ॲमेझॉन व ओरीनोको या नद्यांच्या खोऱ्यांत वायव्येकडच्या भागांत आरा-वाक व कॅरिब हे लोक राहतात, व आग्नेयेकडे तुपी व तापुया हे लोक आढळतात. या लोकांचीं हत्यारें लांकडी असून ते दगडा-वर काम करीत नाहींत. हे भ्रमणवृत्ती असून जंगलामध्यें मुळें व फळें खाऊन राहतात. हे नरभक्षक आहेत व थोडींफार शेतीहि ते करतात.

बोलिव्हियाचें पठार पॅटागोनिया आणि चिलीचा खालचा भाग यास ग्वानॅको प्रदेश असें म्हणतात. या भागांत आरॉकॅ-नियन, प्युएल्चियन, त्सोनेकन जातीचे लोक राहतात. या प्रदे-शांत लामा आणि अल्पाका या जनावरांचें पालन करण्यांत येतें. स्पॅनिश वसाहतकारांनीं घोडे व इतर पशू आपल्याबरोबर आणले. तेव्हांपासून येथील लोक घोड्यांची पैदास करूं लागले. या लोकांचा चेहरा व मनाची ठेवण युरोपियन लोकांसारखी आढळते. पांपीयन अथवा पंपास इंडियन हे आरॉकॅनियन जातीचे असून त्यांच्या मिश्र संततीस गौक्यो म्हणतात. याखेरीज दक्षिण अमेरिकेंत व जवळच्या बेटांवर ज्या कांहीं रानटी जाती राहत होत्या त्यांचें अलीकडे बहुतेक उच्चाटन झालें आहे.

**ओशियानियांतील मानव—**

या खंडामध्यें ऑस्ट्रेलिया व त्यासभोंवतालचीं बेटें यांचा समा-वेश होतो. परंतु त्यामध्यें उत्तर पॅसिफिक महासागरांतलि अल्युं-शियन बेटें आणि इंडोनेशियांतील बेटें यांचा समावेश होत नाहीं. या खंडाचे मुख्य भौगोलिक विभाग म्हटले म्हणजे पॉलिनेशिया, मायक्रोनेशिया, मेलॅनेशिया, ऑस्ट्रेलिया आणि टॅस्मानिया हे होत. यामध्यें नेग्रिटो, पॉलिनेशियन, मायक्रोनेशियन, मेलॅने-शियन आणि पॉप्युअन लोकांची वस्ती आढळते. पॉप्युअन लोकांच्या टॅस्मानियन आणि पूर्व द्राविड अशा दोन प्राचीन शाखा आहेत. यांपैकीं नेग्रीटो, टॅस्मानियन आणि पूर्व द्राविड हे अत्यंत प्राथमिक अवस्थेंत आहेत.

पॉप्युअन लोक-हे ठेंगू, काळे व दीर्घशीर्षी असतात. तथापि त्यांमध्यें कांहीं वर्तुलशीर्षीहि आढळून येतात. हे लोक व ऑस्ट्रेलियन लोक मलाया द्वीपकल्पांतून व इंडोनेशियामधून दक्षिणेकडे गेले असावे. पॉलिनेशियन, मायक्रोनेशियन व मेलॅनेशियन हे लोकहि बऱ्याच प्राचीन काळीं दक्षिणेकडे गेले असावे. ऑस्ट्रेलियामध्यें क्वीन्सलंडमधील तलगाई येथें दोन प्रस्तरीभूत कवट्या सांपडल्यापासून तशाच तऱ्हेच्या कांहीं कवट्या जावामध्यें वज्जक या ठिकाणीं सांपडल्या आहेत.

पॉलिनेशियन लोक—त्यामानानें हे अलीकडे गेले असावेत. मायक्रोनेशियन लोकांबद्दल अद्यापि कांहींच माहिती आढळली नाहीं. सामान्यतः न्यूझीलंडपासून फिजी ते हवाई अशी रेघ काढली तर पूर्वेकडे पॉलिनेशियन व पश्चिमेकडे मेलॅनेशियन लोक आढळून येतात. मध्यंतरीं निरनिराळ्या बेटांत असलेल्या वस्तीवरून त्यांचा मार्गहि आपणांस काढतां येतो. सामान्यतः हा मार्ग न्यूगिनीच्या उत्तर किनाऱ्यावरून बिस्मार्क द्वीपसमूहाकडे पश्चिमेकडे वळून तेथून आग्नेयेकडे सालोमन बेटांवरून तीकोपीयाकडे जातो. हे लोक बहुधा इंडोनेशियामधून दोन हजार वर्षांपूर्वी दक्षिणेकडे गेले असावे.

या पॉलिनेशियन लोकांच्या अनेक निरनिराळ्या टोळ्या निरनिराळ्या काळीं भ्रमण करीत गेल्या असल्या पाहिजेत. हॅडन याच्या मतें या लोकांत मुख्य दोन वर्ग असले पाहिजेत. त्यांपैकीं एक वर्ग मॉओरी हे उंच व सडपातळ असून त्यांचें डोकें लांबट असतें. डोळे मोठे असून नाक अरुंद व उंच असतें. ओठ पातळ असून चेहऱ्यावर व शरीरावर बरेच केंस असतात. यांचा वर्णहि गोरा असल्यामुळें हे बहुतेक युरोपीय लोकांसारखे दिसतात. दुसऱ्या वर्गांतील लोक वाटोळ्या डोक्याचे असून ठेंगू व ओबडधोबड चेहऱ्याचे असतात. यांचा रंगहि काळा असतो.

मेलॅनेशियन लोक-हे पॉप्यअन लोकांचीच एक शाखा असून त्यांत गेल्या दोन हजार वर्षांमध्यें पॉलिनेशियन लोकांचें मिश्रण झालें आहे. या लोकांचा वर्ण गौर असून कातडी नरम असते व केंसहि फारसे राठ नसतात.

मायक्रोनेशियामधील लोकांबद्दल आपणाला फारच थोडी माहिती मिळते. या लोकांत इंडोनेशियन रक्ताचें मिश्रण बरेंच असावें. या लोकांतील निरनिराळ्या जातींत बराच फरक आढळतो. पूर्वेकडील लोकांचा रंग गौर असून केंस सडक व कुरळे असतात. उलट पश्चिमेकडील लोक कृष्णवर्णाचे असून त्यांचे केंस राठ असतात.

### मागील विवेचनाचा आढावा—

आतांपर्यंत केलेल्या वर्णनावरून आपणास साधारणतः या भूपृष्ठावरील निरनिराळ्या प्रदेशांत कोणकोणते मानववंश वस्ती करून राहिले आहेत; व त्यांचे शारीरिक विशेष कोणकोणते आहेत; व त्यांवरून मानवशास्त्रवेत्त्यांनीं त्यांचें वर्गीकरण कसकसें केलें आहे; तसेंच पूर्वीं सांगितल्याप्रमाणें निरनिराळ्या ठिकाणच्या भौगोलिक परिस्थितीमुळें त्यांचें शरीर, त्यांच्या शरीरावरील त्वचेचा रंग, त्यांचे केंस, नासिका, नेत्र, व शीर्षे यांच्या आकारांत व वर्णांत वगैरे कसे भिन्न भिन्न प्रकार आढळतात; तसेंच त्यांच्या भोंवतालच्या परिस्थितीमुळें आयुष्यक्रमहि भिन्न भिन्न प्रकारचा कसा आढळून येतो; उष्ण अथवा समशीतोष्ण हवामानाप्रमाणें त्यांच्यामध्यें आलस्य अथवा उद्यमशीलता वगैरे गुण कसकसे वृद्धिंगत होतात; भूमीच्या पृष्ठभागाच्या रचनेमुळें तेथें नैसर्गिक रीतीनें कोण कोणतीं धान्यें, वृक्ष, फळफळावळ अथवा तृणादि वनस्पती उत्पन्न होतात; व त्यांस अनुसरून त्यांचा जीवनक्रम किती भिन्न प्रकारचा आढळून येतो; व त्या जीवनक्रमाचा विकासहि कसा भिन्न भिन्न गतीनें चालू असतो; व त्यामुळें तेथील संस्कृतीची प्रगतिहि कशी मंद अगर धीमेपणानें किंवा द्रुतगतीनें होते; निरनिराळ्या प्रदेशांतील लोकवस्तीचें प्रमाणहि नैसर्गिक भूरचनेमुळें व तेथें होणाऱ्या वृष्टि, हिमपात, वगैरे गोष्टींमुळें कसें विविध प्रकारचें असतें, या गोष्टींचेंहि आपणांस आकलन करतां आलें.

### विविध मानववंशांचें भवितव्य—

या सर्व गोष्टींवरून या अफाट भूप्रदेशावर किती निरनिराळ्या प्रकारचे मानववंश अथवा मानव जाती वस्ती करून राहिल्या असून त्यांचा जीवनक्रम कसा निरनिराळ्या सांस्कृतिक अवस्थांत आहे, ही गोष्ट आपल्या प्रत्ययास येते. एकंदर जगांतील मानवी संस्कृतीच्या विकासास ही भिन्न भिन्न ठिकाणची भौगोलिक व नैसर्गिक परिस्थिति कशी पोषक अथवा अपकारक ठरते, याचेंहि प्रत्यंतर आपणांस सहज या भिन्न भिन्न मानव समाजाचें अवलोकन केलें असतां येतें. अशा प्रकारें हा निरनिराळ्या क्षेत्रांत विखुरलेला समाज आपआपल्या परीनें, भिन्न भिन्न गतीनें का होईना पण आपला सामाजिक विकास करून घेत आहे. आतांपर्यंत दळणवळणाच्या कांहीं अंशीं अभावामुळें किंवा काठिण्यामुळें या भिन्न भिन्न वंशांचें आपणांस फारसें ज्ञानहि होत नव्हतें. व या भिन्न मानवसमाजांचा परस्परसन्निकर्षहि फारशा प्रमाणांत होत नव्हता. परंतु आतां दिवसेंदिवस या पृथ्वीवरील सर्व मानव-समाज अधिकाधिक जवळ जवळ येत चालले आहेत व हळू-

हळू सर्व मानवजातच प्रगतिपथावर आक्रमण करीत आहे. अर्वाचीन काळामध्यें कोणताहि भूभाग अथवा तेथील मानव समाज एकाकी राहूं शकत नाहीं. तो कमीअधिक प्रमाणांत या जागतिक संघर्षांत ओढला जात आहे व त्यामुळें आपणांस आज निरनिराळ्या भूभागांत निरनिराळे मानवसमाज निरनिराळ्या सांस्कृतिक अवस्थांमध्यें जे आढळून येत आहेत, ते यापुढें हळूहळू एका मोठ्या सांस्कृतिक संघर्षांत सामील झाल्याशिवाय राहणार नाहींत; व त्यामध्यें ज्या समाजांत अधिक सामर्थ्य किंवा विशेष उच्च संस्कृति असेल तो समाज बलवान् होऊन त्याच्या तंत्रानें इतर समाजांस आपली सांस्कृतिक अवस्था अनुकूल करून घ्यावी लागेल. या संस्कृतीच्या संघर्षांत कांहीं समाज कदाचित् नष्टहि होतील; कांहीं इतर समाजांत पूर्णपणें अन्तर्भूत होऊन जातील; कांहीं समाजांमध्यें संमिश्रण अथवा संकर होऊन ते मिश्र स्वरूपांत आपलें अस्तित्व कायम ठेवतील; तर कांहींमध्यें भिन्न भिन्न प्रकारचें रूपांतर होऊन जाईल.

या विश्वविकासामध्यें अशा तऱ्हेचे सांस्कृतिक संघर्ष केवळ आजच होत आहेत किंवा यापुढें होणार आहेत असें नव्हे तर ही सांस्कृतिक संघर्षांची क्रिया विश्वोत्पत्तीपासून सुरू आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. मानवप्राणी जन्मास येण्याच्या पूर्वीं ती तत्कालीन भिन्न भिन्न प्राण्यांमध्यें चालू होती. श्रेष्ठतमातिजीवन-न्यायानें श्रेष्ठतर सांस्कृतिक किंवा विकासात्मक अवस्थेंतील प्राणी या संघर्षांमध्यें टिकून राहिले व बाकीचे कांहीं शरीरानें अवाढव्य असलेले प्राणीहि नष्ट झाले, हें आपण पूर्वीं पाहिलेंच आहे. त्याप्रमाणेंच आतां मानवी संस्कृतीच्या संघर्षांत जी संस्कृति अधिक प्रगत व श्रेष्ठ असेल ती टिकून राहील व बाकीच्या नष्ट होतील असें म्हणण्यास हरकत नाहीं. व त्याप्रमाणें या विश्वविकासाच्या पुढील अवस्थांत आपणास सांस्कृतिक प्रगतीचा इतिहास पाहावयास मिळेल.

**मानवाचा बौद्धिक विकास—**

अर्थात् मानवविकासामध्यें व इतर प्राण्यांच्या विकासामध्यें हा एक मोठा फरक आहे कीं, मानवेतर प्राण्यांमध्यें ज्याप्रमाणें शारीरिक विकास आपणांस पाहावयास सांपडतो त्या मानानें मानसिक विकासाच्या निरनिराळ्या पायऱ्या अथवा प्रगति आढळत नाहीं. यामुळें मानवप्राणी हा इतर जीवसृष्टीपासून सर्वथा भिन्न असा अजब प्राणी निर्माण झाला आहे. व त्यानें आपल्या बुद्धीच्या अथवा मानसिक विकासाच्या योगानें सर्व चराचर सृष्टीवर आज विजय मिळविला आहे व त्यांत तो दिवसेंदिवस आपल्या शास्त्रीय ज्ञानाच्या प्रगतीनें भर घालीत आहे.

तेव्हां मानवी संस्कृतीच्या विकासामध्यें हा बौद्धिक अथवा मानसिक विकास हा मोठा महत्त्वाचा मुद्दा आहे व त्यावरच सर्व मानवी समाजाची प्रगति अथवा अधोगति अवलंबून आहे. आतांपर्यंत या पृथ्वीवर होऊन गेलेल्या निरनिराळ्या मानववंशांमध्यें किंवा जातींमध्यें जो संघर्ष उत्पन्न होत गेला त्यामध्यें आपणांस या बौद्धिक विकासाचा धागा सुसूत्रपणें गुंफलेला आढळतो व याकरितां आपणांस मानवी संस्कृतीच्या अथवा जगद्विकासाच्या निरनिराळ्या अवस्थांचा अभ्यास करावयाचा म्हणजे जगांत ज्या आतांपर्यंत महत्त्वाच्या मानवी संस्कृती उत्पन्न झाल्या व विकास पावल्या व ज्यांपैकीं कांहीं नष्टहि होऊन गेल्या, त्यांचा अभ्यास करणें अवश्य आहे. तेव्हां आतां आपण प्राचीन कालापासून ज्या निरनिराळ्या प्रदेशांत भिन्न भिन्न संस्कृती उदयास आल्या त्यांचें यानंतर पुढील विभागांत अवलोकन करूं.

# भाग दुसरा

## क [चालू]

**कालदर्शिका**—(कॅलेंडर). कालमानाचे वर्ष, महिने, आठवडे आणि दिवस असे जे विभाग पाडतात ते दाखविणाऱ्या पुस्तकास कालदर्शक म्हणतात. निरनिराळ्या प्राचीन राष्ट्रांतून या कालगणनेचे निरनिराळे प्रकार होते. ईजिप्शियन लोक फक्त वर्ष व त्यांतील ऋतू धरीत. वर्षाचे ३६५ दिवस, ३० दिवसांचा एक असे बारा महिने व वर्षाच्या शेवटीं पांच दिवस मिळवावयाचे, अशी पद्धत होती. ज्यू लोक बारा चांद्रमास धरीत व ठराविक महिन्यांत ठराविक ऋतू येण्यासाठीं जरूर तेव्हां एक महिना अधिक मिळवीत. ग्रीकांची पद्धतहि साधारणपणें अशीच होती. रोमन लोकांनीं पण ज्यूलिअस सीझरनें बदल करीपर्यंत हाच क्रम ठेविला होता. सीझरनें खि. पू. ४६ मध्यें मागें पडलेले दोन महिने वर्षांत मिळवून घेतले व पुढें दर सालाचे ३६५ दिवस व चार वर्षांनीं एक दिवस अधिक, अशी पद्धत सुरू केली. तथापि दरसाल अकरा मिनिटांची चूक सांचत जाऊन १५८२ सालीं मेषसंपात कॅलेंडरमध्यें दिलेल्या दिवसाहून दहा दिवस अलीकडे आला. तेव्हां पोप १३ वा ग्रेगरी यानें ज्यूलियन कॅलेंडर कॅथॉलिक राष्ट्रांत रद्द करून सुधारलेलें ग्रेगोरियन कॅलेंडर सुरू केलें. हेंच आज युरोपांत चालू आहे. त्या वेळीं दहा दिवस एकदम गाळले व दर चौथें वर्ष 'प्लुत' वर्ष (लीप ईयर) म्हणून धरण्यांत येऊं लागलें. या प्लुत वर्षी फेब्रुवारी महिन्याचे २९ दिवस धरतात.

हिंदुस्थानांत शक आणि संवत् पंचांगांप्रमाणें कालमान धरण्यांत येत असतें. पंचांग, शक, संवत् पाहा.

**कालना**—बंगाल, बरद्वान जिल्ह्याचा आग्नेयीकडील विभाग. क्षेत्रफळ ३८६ चौ. मैल. लोकसंख्या सु. अडीच लाख. कालना धरून तीन तालुके या विभागांत आहेत. या विभागांतील नानद घाट येथें नदीमार्गानें तांदुळाचा मोठा व्यापार चालतो.

मुसलमानी अमलांत कालना शहर फार महत्त्वाचें ठिकाण असून भागीरथीच्या कांठावर पूर्वी असलेल्या एका विस्तीर्ण किल्ल्याचे अवशेष येथें अद्यापि पाहावयास सांपडतात. बाराहि महिने येथपर्यंत बोटी येऊं शकतात. पूर्वी येथें मोठा व्यापार चालत असे; परंतु ईस्ट इंडिया रेल्वे सुरू झाल्यापासून या गांवचें महत्त्व उत्तरोत्तर कमी होत गेलें.

**कालमुक**—रशियांतील एक मानववंश. हा मंगोल महावंशांत मोडतो. रशियाच्या आस्ट्राखान मुलुखांत कालमुक नांवाचा जो प्रदेश आहे तो या लोकांचा होय. याचें क्षे. फ. ३६,९०० चौ. मैल असून लो. सं. सुमारें १,३०,००० आहे. या प्रदेशांत ६० हून अधिक बौद्ध मठ आहेत. बहुधा घोडे व गुरें पाळून लोक

राहतात. १७ व्या शतकांत हुंगारियांतून ते व्होल्गामुखाकडे आले. १८४८ त साया पंडितानें कालमुक लिपि निर्माण करून मंगोल भाषेला सुलभता आणली. कालमुकांचा धर्म लामा संप्रदायी आहे. त्यांचे आचारविधी फारसे उच्च व सुसंस्कृत दिसत नाहींत.

**कालयवन**—कोणा एका यवनाधिपतीनें यादवांच्या पराभवार्थ एका गोपाली स्त्रीच्या ठायीं गर्ग मुनीपासून निर्माण करविलेला पुत्र. हा मोठा प्रतापी व यादवांस अजिंक्य असे. एकदां हा मोठ्या सैन्यासहित यादवांवर चालून आला असतां त्यांशीं याचा मोठा भयंकर संग्राम झाला. त्यांत कृष्णानें पाहिलें कीं, यापुढें युद्ध करून जय मिळणें मोठें कठिण दिसतें. तेव्हां यास युक्तीनें मुचकुंदाकडून मारविलें.

**काललेखक**—(क्रोनोग्राफ). कालाचा अगदीं बारीक भागहि दर्शविणारें एक यंत्र. जेव्हां शर्यतीचा घोडा पळण्यास सुरुवात होते तेव्हां प्रेक्षक दोरी ओढतो व सेकंदकांट्यासमोर घड्याळाच्या तबकडीवर एक खूण केली जाते. व पुन्हां घोडा इष्ट स्थळीं पोंचल्यावर दोरी सोडली जाते. यावरून घोड्यानें पळण्यास किती वेळ घेतला हें नक्की समजतें. म्हणजे तरफेच्या घड्याळासारखें हें यंत्र असतें. ज्योतिषशास्त्रीय काललेखक यंत्रें विजेनें चालतात व एखादें नक्षत्र वेधशाळेंतील प्रत्येक तार केव्हां ओलांडतें, हें या यंत्रावरून कळून येतें.

**कालव**—हा एक शिंपल्यांत राहणारा प्राणी आहे. (शिंप पाहा). याचे शिंपल्यांतील दोन्ही भाग सारखे नसून एक थोडा लहान व एक मोठा असतो व ते मोकळे किंवा जोडलेले असतात. यांच्यापासून असंख्य पिल्लांची उत्पत्ति होते. यांचा प्रसूतिसमय मे किंवा जूनपासून सप्टेंबरपर्यंत असतो. कालवे उत्पादन करून मोठ्या प्रमाणावर बाहेर पाठविण्याचा फ्रान्स-अमेरिकेमध्ये धंदा चालू असतो व अमेरिकेमधून युरोपमध्यें फार मोठ्या प्रमाणांत कालव्यांची निर्यात होते. इंग्लंडमध्येंहि टेम्स नदीमध्ये हा धंदा मोठ्या प्रमाणांत चालतो. मोत्यांचीं कालवें निराळ्या जातीचीं असतात.

**कालवे**—एका जागेवरून दुसऱ्या जागीं पाणी नेण्याकरितां जें बांधकाम केलेलें असतें त्यास कालवा म्हणतात. अशा तऱ्हेचे कालवे रोमन लोकांनीं पुष्कळच बांधले होते. व अद्यापहि युरोपमध्यें त्यांपैकीं कांहीं अस्तित्वांत असून प्रत्यक्ष उपयोगांतहि आहेत. अशांपैकीं एक कालवा फ्रान्स देशांत निमेपासून १४ मैलांवर अद्यापि जशाचा तसाच चालू स्थितींत आहे. यास 'पॉदाग्युगार्द' असें म्हणतात. सेगोव्हिया येथील कालवा २९०२१ फूट लांब आहे. चौदाव्या लुईनें युरे नदीचें पाणी व्हर्साय येथें नेण्याकरितां जो कालवा बांधला तो अर्वाचीन कालव्यांमध्यें उत्कृष्ट प्रतीचा आहे. अलीकडे धातूचे किंवा सीमेंटचे मोठमोठे नळ वापरण्यांत येऊं लागल्यामुळें जुन्या तऱ्हेच्या कालव्यांचें महत्त्व आतां राहिलें नाहीं. परंतु याकरितां जुन्या तऱ्हेचे पूल मात्र अद्यापिहि पाणी नेण्याकरितां बांधण्यांत येतात. मँचेस्टर येथें ज्या कालव्यानें पाणी आणण्यांत आलें आहे त्यामध्यें ४५ मैल ओतीव लोखंडाचे नळ वापरण्यांत आले आहेत.

पाणी नेण्याखेरीज माल पाठविण्याकरितां किंवा जहाजें चालविण्याकरितां मोठमोठाले कालवे कृत्रिम रीतीनें खोदण्यांत व बांधण्यांत येतात. कांहीं मोठ्या कालव्यांचे अनेक भाग असतात, व प्रत्येक भाग किंवा तुकडा जरी समपातळींत असला तरी इतरांपेक्षां वर किंवा खालीं असूं शकतो. अशा कमी-अधिक उंचीवर असलेल्या एका भागांतून दुसऱ्या भागांत गलबतें नेण्याकरितां गोद्यांची रचना केलेली असते. अशी गोदी म्हणजे दोन्ही बाजूंस तोंडें व दरवाजे असलेला एक मोठा पाण्यानें भरलेला चौक किंवा तळें असतें. हें कालव्यांच्या दोन तुकड्यांच्या मध्यमार्गी बांधलेलें असतें. जेव्हां एखादें गलबत उंचावरील कालव्यांतून खालच्या कालव्यांत आणावयाचें तेव्हां या गोदींत पाणी सोडून तीमधील पाण्याची पातळी वर चढविण्यांत येते. ती इतकी कीं, तें पाणी उंचीवरच्या कालव्यांतील पाण्याशीं समपातळींत येतें. यानंतर गोदीचा त्या तोंडाचा दरवाजा उघडून तें गलबत वरच्या कालव्यांतून गोदींत घेण्यांत येतें. नंतर वरील दरवाजे बंद करण्यांत येतात. यानंतर खालील दरवाजे हळूहळू उघडण्यांत येऊन पाणी खालच्या कालव्यांत सोडून देण्यांत येतें व गोदींतील पाणी खालच्या पाण्याशीं समपातळींत आणण्यांत येतें, व गलबत खालच्या कालव्यांत घेण्यांत येतें.

असे कालवे खोदण्याची कला फार प्राचीन कालापासून लोकांस परिचित आहे. ईजिप्तमध्यें नाइल नदीपासून तांबड्या समुद्रापर्यंत व त्या देशाच्या इतर भागांत कालवे नेलेले होते. हॉलंड देशांत १२ व्या शतकापासून कालवे खोदलेले आढळतात. त्यानंतर युरोपमध्यें बरेच कालवे खोदण्यांत आले व हे कालवे जाण्यायेण्याच्या नद्यांशीं जोडण्यांत आले आहेत. हॉलंडमधील सर्वांत मोठा कालवा नॉर्थ हॉलंड शिप कॅनॉल हा असून तो २०० पासून ३०० फूट रुंद व २६ फूट खोल आहे. या कालव्याच्या योगानें ॲमस्टरडॅम हें शहर उत्तर समुद्रास जोडलें आहे. फ्रान्समध्यें अनेक कालवे आहेत. त्यांतील सर्वांत मोठा कॅनॉल ख्युपिदी हा असून तो टुलूझ या शहरापासून गॅरोन नदींतून निघतो आणि बिस्केचा उपसागर भूमध्य समुद्राशीं जोडतो. फ्रान्समध्यें एकंदर ५१०४ मैल लांबीचे कालवे आहेत. बेल्जममध्यें

द्वीप शिप कॅनॉल नांवाचा मोठा कालवा आहे. जर्मनींमधील सर्वांत मोठा कालवा कीलकालवा या नांवानें प्रसिद्ध आहे. हा एल्ब नदीच्या मुखापासून निघून बाल्टिक समुद्रास मिळतो व याप्रमाणें उत्तर समुद्र व बाल्टिक समुद्र यांस जोडतो. इंग्लंडमधील सर्वांत मोठा कालवा ३८ मैल लांब आहे. हा लँकेशायर व चेशायर या परगण्यांत असून त्यास ब्रिज वॉटर कालवा म्हणतात. स्कॉटलंडमध्यें फोर्थ अँड क्लाईड कॅनॉल हा ३५ मैल लांब आहे. ब्रिटनमधील सर्वांत मोठा कालवा मँचेस्टर कालवा होय. अमेरिकेमध्यें सर्वांत मोठा कालवा एरी सरोवर व हडसन नदी यांस जोडणारा होय. हा ३६३ मैल लांब आहे. सुएझचा कालवा १०० मैल लांब आहे. पनामा कालवा १९१४ झाली पुरा झाला; त्याची लांबी ४० मैल आहे.

खि. पू. अनेक शतकांच्या वाङ्मयांत हिंदुस्थानांतील कालवे व पाटबंधारे यांचा उल्लेख असून सिंधु नदी व तिला मिळणाऱ्या नद्या यांचे कालवे प्राचीन कालापासून आहेत. ब्रिटिश अमदानी-पूर्वी मुसलमान, मोंगल व शीख राज्यकर्त्यांनीं गंगा व यमुना यांचे कालवे बांधले होते. तथापि शेतीला व शहरांना पाणी-पुरवठ्याकरितां ब्रिटिश सरकारनें सरकारी इंजिनियरांमार्फत गंगा, चिनाब, झेलम, गोदावरी, कृष्णा, कावेरी, नीरा, प्रवरा, मुठा, वगैरे अनेक नद्यांचे कालवे बांधून या कालव्यांच्या पाण्यानें १९० लक्ष एकर, विहिरीच्या पाण्यानें १६० लक्ष एकर, तलावांच्या पाण्यानें १०० लक्ष एकर, आणि इतर साधनांनीं ८० लक्ष एकर, एकूण ५३० लक्ष एकर जमिनीला पाणीपुरवठा करण्याचें काम १९०१ सालपर्यंत पुरें केलें. सदर सालीं सरकारनें एक कमिशन नेमलें. त्या कमिशनच्या रिपोर्टांत ४४ कोटी रुपये खर्चून सुमारें ६५ लक्ष एकर अधिक जमिनीला पाणी पुरव-ण्याची योजना होती. सिंध प्रांतांत सक्कर धरणाची योजना हातीं घेऊन ती पुरी करण्यांत आली. आगगाड्यांचे रस्ते वाढल्या-मुळें वाहतुकीच्या कालव्यांची जरूरी उरली नाहीं.

१९४४–४५ सालीं हिंदुस्थानांत ३,५०,००,००० एकर जमिनीला पाणी पुरविलें जात होतें. पंजाब प्रांतांत सर्वांत जास्त पाणीपुरवठा होतो. त्यानंतर मद्रास व नंतर संयुक्त प्रांत येतो.

पाणीपुरवठ्याच्या प्रश्नांचा विचार संशोधकीय आणि शास्त्रीय पद्धतीनें करण्यासाठीं पुण्याजवळ खडकवासलें येथें 'इंडियन वॉटरवेज एक्सपेरिमेंट स्टेशन' उघडलें आहे. या मध्यवर्ती सरकारच्या प्रयत्नाखेरीज इतर प्रांत आणि संस्थानें यांच्या संशोधकीय शाखा आहेतच. अमेरिकेंतील टेनेसी व्हॅली योजनेप्रमाणें कांहीं योजना करण्याच्या विचारांत सरकार आहे. गेल्या महायुद्धानंतर मोठमोठ्या पाणीपुरवठ्याच्या योजना (उदा. दामोदर, कोसी, महानदी, नर्मदा, तापी, कोयना, रामपदसागर, इ.) आंखून काम सुरू आहे. मद्रासेंत १९४५ पासून तुंगभद्रा धरण बांधलें जात आहे. मुंबई सरकारनें सु. दहा कोटी रुपयांचा खर्च होईल अशी पंचवार्षिक योजना तयार केली आहे. बंगाल सरकारच्या तिस्ता, गंगा आणि ब्रह्मपुत्रा नद्यांवर धरणें बांध-ण्याच्या योजना कधींपासून आहेत. पाकिस्तानामुळें त्यांत कांहीं अडचणी येणार आहेतच. संयुक्त प्रांत सरकार या योजनांच्या बाबतींत मागें नाहीं. तथापि पंजाब प्रांताइतका अग्रेसर कोणी नाहीं. १९४७ त थळ कालवा सुरू झाला व आतां कोठेंहि नद्यांच्या पाण्याचा पूर्णपणें उपयोग करण्याचें उरलें नाहीं. पूर्व पंजाब प्रांतानें भक्रा धरण बांधण्याचें योजलें आहे, त्याला ४२ कोटी रु. खर्च येणार आहे. पत्याळा संस्थानाचीहि एक ५ कोटी रुपयांची डोची धरणाची योजना आहे. सिंधमध्यें पंजाबप्रमाणें कालवे भरपूर असूनहि आणखी दोन योजना आंखल्या आहेत.

**कालसमीकरण**—(ईक्वेशन ऑफ टाइम). पृथ्वी सूर्या-भोंवतीं क्रांतिवृत्तांत फिरते ती सारख्या गतीनें फिरत नाहीं. गति कधीं जास्त तर कधीं कमी. सूर्य-छायायंत्रानें दाखविलेला वेळ व यांत्रिक घड्याळानें दाखविलेला वेळ यांमध्यें जें अंतर पडतें त्यास कालसमीकरण म्हणतात. वर्षांत फक्त चार वेळां सूर्य–छायायंत्राचा काल व यांत्रिक घड्याळाचा काल जमतो. नोव्हेंबरप्रारंभीं हें अंतर पूर्ण सोळा मिनिटें होतें.

**कालाबिया**— इटली द्वीपकल्पाच्या अगदीं नैर्ऋत्य भागा-कडील प्रदेशाला प्राचीन काळीं हें नांव होतें, परंतु हल्लीं हें नांव या द्वीपकल्पाच्या वायव्येकडील प्रदेशाला आहे. या प्रदेशाचें क्षे. फ. ५,८२३ चौ. मैल आणि लोकसंख्या १९,०७,९५३ आहे. या प्रदेशाच्या मध्यभागांत अॅपेनाइन डोंगर आहे. आणि किनारा दलदलीचा व रोगट हवायुक्त आहे. परंतु डोंगराच्या पायथ्यालगतचा प्रदेश फारच सुपीक आहे, व तेथें गहूं, भात, कापूस, केशर, ताग, जवस, ऑलिव्ह, बदाम, विलायती मंजिष्ठ, जेष्ठमध, हीं पिकें विपुल होतात. शिवाय मेंढ्या, गाई, आणि घोडे यांची पैदास पुष्कळ आहे. रेशमी किड्याची जोपासना अतिशय प्रमाणांत करतात. संगमरवरी दगड, चुना, खनिज मीठ, तुरटी, पांढरा दगड, वगैरे सांपडतात. मच्छीमारीचा धंदा मोठ्या प्रमाणावर चालतो.

**कालिकत**—मद्रास, मलबार जिल्ह्यांतील तालुका व समुद्र-कांठचा विभाग. क्षे. फ. ३७९ चौ. मैल. येथें एक म्युनिसिपालिटी आहे. सर्व तालुकाभर जंगल असून कोठें कोठें तांदुळाचें पीक काढतात. कालिकत हें तालुक्याचें मुख्य ठिकाण फार प्रेक्षणीय असून तेथें मोठमोठे वृक्ष आहेत. येथें एक वेड्यांचें इस्पितळ आहे. लो. सं. १,२६,३५२ आहे. चेरमान पेरुमल नांवाचा मलबारचा शेवटचा राजा मक्केस गेला व त्यानें आपलें राज्य आपल्या सर-

दारांस वांटून दिलें. त्या वेळीं कोंबड्याचें आरवणें ऐकूं जाईल इतकी जागा त्यानें झामोरिनास दिली व ह्यावरून त्यास 'कोलीकोड' हें नांव मिळालें. झामोरीननें पोर्तुगीज लोकांस वखार घालण्याची परवानगी दिली. १४८६ सालीं पोर्तुगीज धार्टी कोविलहाम कालिकत येथें येणारा पहिला युरोपियन होय. १६९८ त फ्रेंचांनीं व १७५२ त डॅनिश लोकांनीं येथें वखार उघडली. नंतर १७९२ त तें ई. इं. कंपनी सरकारकडे कायमचें आलें. येथें कापूस पिंजण्याच्या व सूत काढण्याच्या गिरण्या व कॉफीचे, विटांचे कारखाने आहेत. येथें तीन कॉलेजें, बरींचशी हायस्कुलें व स्त्री-पुरुष शिक्षकांकरितांहि शाळा आहेत.

**कालिको**—एक कापड; चीट. पूर्वी विलायतेंत हिंदुस्थानांतील कालिकत बंदरांतून हें कापड जात असे, म्हणून असें नांव पडलें. कच्च्या कापसाचा दर्जा, विणकामांतील सुताचा जाडबारीकपणा व सुताची कमीजास्त ठासीव वीण यामुळें या कापडांत निरनिराळे कमी-अधिक चांगले प्रकार होत असतात. कॉम्रिक, जॅकोनेट (नैनसुख), लॉंगक्लॉथ व मॅदापोलम असे कांहीं प्रकार आहेत. कालिको धुवट, बिनधुवट, छापील, रंगीत, वगैरेहि तऱ्हा असतात. पण साधारणपणें कालिको पांढरें असतें.

**कालिंगडा**—हा राग भैरव थाटांतील आहे. याच्या आरोहावरोहांत साताहि स्वर लागत असल्यानें ह्याची जाति संपूर्णसंपूर्ण झाली आहे. याचा वादी स्वर पंचम असून संवादी षड्ज आहे. याचा गानसमय रात्रीचा चौथा प्रहर मानितात. या रागाची प्रकृति गंभीर नाहीं. या रागांत ऋषभ व धैवत हे दोन स्वर आंदोलित झाल्यास भैरव रागाचें स्वरूप उत्पन्न होण्याचा संभव असतो.

**कालिंगी, कालिंजी**—मद्रास इलाख्यांतील दोन शेतकरी जाती. कालिंगींची लो. सं. सु. ऐंशीं हजार व कालिंजींची पन्नास हजार आहे. बुरागम, लिंतक व ओडिया हे कालिंगी जातीचे मुख्य विभाग आहेत. कालिंगी हे उडिया व तेलगू भाषा बोलतात. कालिंगी खेड्याचे पुढारी व उपाध्ये असतात. पुरागम जातींत विधवा-विवाह नाहीं. कालिंगी लोक श्रीराधाकृष्ण व चैतन्य यांची उपासना करितात. मृतास पुरण्याची चाल यांच्यामध्यें आहे. कालिंजी हे गंजम, विजगापट्टण व ओरिसा येथील रहिवासी असून ते शेती करितात. कालिंगी हे जानवें घालतात, पण कालिंजी घालीत नाहींत. भानु, शुक्र, शंख, नाग, इत्यादि कालिंजी जातींचीं गोत्रे आहेत.

**कालिंजर**—संयुक्त प्रांत, बांदा जिल्हा, गिर्वाण तहशिलींतील एक गांव आणि किल्ला. लो. सं. सु. पांच हजार. समुद्रसपाटीपासून उंची १२०३ फूट. बुंदेलखंडांतील हा एक अति प्राचीन किल्ला होय. महाभारतांत याचा उल्लेख आलेला आहे. शिवपुराणांत नऊ उत्कलांपैकीं हा एक आहे असें म्हटलें आहे. येथें कालिंजराचें देऊळ आहे. येथील देवतलावांत जो कोणी स्नान करील त्याला हजार गाई दान दिल्याचें पुण्य लागतें. किल्ल्याचा परिघ ४।५ मैलांचा असून तटबंदी अगदीं कड्यापासून आहे. खडकांत खोदलेलीं तळीं, कांहीं देवळें व इतस्ततः पडलेले शिलालेख पुष्कळ दिसतात. तसेंच येथें पुष्कळच लेणीं असून त्यांपैकीं कांहींवर लेख आहेत.

**कालिदास**—एक विख्यात संस्कृत कवि. हा जातीचा ब्राह्मण असून बाळपणींच पोरका झाल्यामुळें त्याचें पालनपोषण एका गवळ्यानें केलें. कालिदासाचें एका राजकन्येशीं लग्न झालें. काली देवीवरील नितान्त भक्तीमुळें कालिदास लवकरच महासाधु व पंडित बनला. खि. शकाच्या ६ व्या शतकांतील कुमारदास कवि व सिंहली राजा यांचा कालिदास हा समकालीन असावा. कालिदास हा त्याच्या ग्रंथांवरून वेदान्तपंथी शैव दिसतो. हिमालयावरील सृष्टिसौंदर्याशीं तर त्याचा चांगलाच परिचय होता. 'मेघदूतां'तील उज्जयिनी नगरीचें प्रेमळ वर्णन वाचून तो त्या ठिकाणचा रहिवासी असावा हेंच सिद्ध होतें. विक्रमादित्याच्या दरबारीं कालिदास होता. इ. स. ३५० ते ४६० या कालाच्या दरम्यान तो होऊन गेला असला पाहिजे. पुढील ग्रंथ त्याचेच आहेत हें निश्चित आहे:—महाकाव्यें—कुमारसंभव व रघुवंश. नाटकें—शाकुंतल व विक्रमोर्वशीय. रसात्मक काव्य—मेघदूत. मालविकाग्निमित्र हें नाटक व ऋतुसंहार हा गीतसमुच्चय हीं पण त्याचींच असावींत. रघुवंशांत रामकथा सांगितली असून कुमारसंभवांत पौराणिक महादेवाच्या चारित्र्याचें वर्णन आहे. कुमारसंभव हें बहुतेक त्याचें पहिलें महाकाव्य असावें. त्यांत हिमालयकन्या उमा हिनें आपल्या तारुण्यगत सौंदर्यानें व भक्तीनें उग्र व तपस्वी शिवाला कसें प्रेमवश केलें, याचें वर्णन १ ते ८ सर्गांत केलें आहे. रघुवंशावरून कालिदासाचें नीतिशास्त्रविषयक ज्ञान दिसून आल्यावांचून राहत नाहीं. कुमारसंभवावर २० व रघुवंशावर ३३ टीका आहेत. त्याचें हृदयस्पर्शी काव्य मेघदूत हेंच होय. त्याच्या नाटकांत व महाकाव्यांत उत्कृष्ट भावनाप्रधान वर्णनें आढळतात. यावरूनच कालिदासास आद्य संस्कृत भावनाप्रधान कवि असें मानतात. मेघदूतांतील एक संवत्सरपर्यंत हद्दपार झालेल्या यक्षानें आपल्या दुःखी दयितेकडे मेघदूत पाठविला, हा प्रसंगच मुळीं कालिदासाच्या कौशल्यास खुलावट व पूर्ण अवकाश देणारा आहे. अलीकडे या काव्याचे अनेक पाठ आढळून येतात. ऋतुसंहारांत षड्ऋतूंचें वर्णन दिलेलें आहे. 'श्रुतबोध', 'सेतुबंध', 'नलोदय'

'शृंगारतिलक' हें कालिदासावर चुकीनें लादलेलें वाङ्मय आहे.

**कालिंदी**— १. कृष्णाची सातवी बायको. कृष्ण हा पति मिळावा म्हणून ही यमुनातीरीं तप करीत होती. ही प्रायः यमुनेची मूर्तिमंत देवता असावी. एकदां कृष्ण चातुर्मास्यांत इंद्रप्रस्थीं असतां, अर्जुनास समागमें घेऊन मृगयेस गेला होता; त्या काळीं त्यानें हिला तेथें तप करतांना पाहिलें; नंतर चातुर्मास्य संपून द्वारकेस गेल्यावर कृष्णानें हिचें विधीनें पाणिग्रहण करून आपल्या अष्टनायिकांत हिची गणना केली. हिला श्रुत वगैरे पुत्र होते.

२. अंशुमती नदीचें एक नांव. यमुना नदीसहि हें नांव आढळतें.

**कॉलिन्स, जॉन** (१८४८–१९०८)—एक इंग्रज वाङ्मय-टीकाकार. त्यानें अनेक नियतकालिकांत मर्मभेदक लेख लिहिले. ढोंगी भाषाशास्त्रज्ञांचा तो कट्टा शत्रु बनला होता. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते–'ए स्टडी ऑफ डीन स्विफ्ट' आणि 'ग्रीक इन्फ्लुएन्स ऑन इंग्लिश पोएट्री' (इंग्रजी काव्यावर ग्रीकचा परिणाम).

**कॉलिन्स, मिचेल** (१८९०–१९२२)— एक आयरिश क्रांतिकारक. त्यानें १९१६ च्या ईस्टर बंडांत भाग घेतला, व पुढें आयरिश रिपब्लिकन सैन्याचा प्रमुख झाला, व अर्थमंत्री झाला. १९२१ च्या तहनाम्यावर सह्या करणारांपैकीं तो एक असून त्या तहनाम्यानें आयरिश फ्री स्टेट स्थापन झाल्यावर रिपब्लिकन पक्षाकडून तो मारला गेला.

**कॉलिन्स, विलयम** (१८२४–१८८९)— एक इंग्रज कादंबरीकार. त्यानें अनेक ग्रंथांच्या लेखनांत डिकन्सशीं सहकार्य केलें. तथापि त्याच्या स्वतःच्या उत्तम कादंबऱ्या आहेत त्या— 'आफ्टर डार्क' (१८५६), 'दि वुमन् इन् व्हाइट्' (१८६०), 'नोनेम', (१८६२), 'दि मूनस्टोन' (१८६८); 'मॅन ॲंड वाइफ' (१८७०), 'दि लॉ ॲंड दि लेडी' (१८७५), 'दि ईव्हल जीनस' (१८८६) आणि 'दि लीगसी ऑफ केन' (१८८८) या होत.

**कालिंपॉंग**—बंगाल, दार्जिलिंग जिल्ह्यांतील एक डोंगराळ प्रदेश. क्षेत्रफळ ४१२ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें पन्नास हजार. हा प्रदेश इ. स. १८६४–६५ मधील मोहिमेनंतर भूतानपासून ब्रिटिशांस मिळाला.

कालिंपॉंग हें मुख्य ठिकाण पेडोंग–तिबेटच्या व्यापारी मार्गावर असून तेथें मोठा बाजार भरतो. मुनसंग येथें सिंकोनाची लागवड आढळते.

**कालिया**— काद्रवेय कुलोत्पन्न नाग. त्याला पांच फणा होत्या. याचें विष इतकें उग्र होतें कीं, डोहावरून गेलेला पक्षीहि त्या जलवायुस्पर्शानें प्राणास मुकत असे; त्यामुळें तो डोह अगदीं वर्ज्य असतांहि कृष्णाचे गोपाळ एके वेळीं अजाणतां तेथें गायींसहवर्तमान गेले व तेथील जलप्राशन केल्यानें सर्व मरण पावले. हें कृष्णास कळतांच तो तेथें गेला व त्यानें आपल्या अद्‌भुत शक्तीनें त्याला धरलें आणि जेरीस आणलें. इतक्यांत त्याच्या स्त्रियांनीं त्यास प्राणदान द्यावें अशी कृष्णाची प्रार्थना केली व तोहि शरण आला. तेव्हां कृष्णानें यमुनेचें जल अगदीं शुद्ध करवून व गायीं–गोपाळांस पूर्वस्थितीवर आणवून त्यास रमणक द्वीपाकडे हांकलून दिलें.

**काली**— वैदिक काळीं काली हें अग्निजिह्वानाम होतें. अग्नीच्या सात जिह्वांपैकीं काली जिह्वा कृष्णवर्ण व भयंकर होती. पण आज हा अर्थ राहिला नसून देवीचें एक स्वरूप म्हणून हें नांव रूढ आहे. सतीनें हिमालयाच्या उदरीं जन्म घेतला असतां तिची अंगकांति श्यामवर्ण झाल्यामुळें तिला हें नांव पडलें. बंगाल्यांत हिची उपासना विशेष दृष्टीस पडते.

दीपावलींत लक्ष्मीपूजेबद्दल कालीपूजाहि करतात. कालीपूजेचा मोठा सण कार्तिक व॥ ६ ला असतो. कालीची मूर्ति दिसण्यांत भयप्रद दिसते. हिच्या थैमानामुळें जेव्हां विश्वाचा प्रलय होण्याची वेळ आली तेव्हां शंकरानें स्वशरीर हिच्या पायाखालीं लोटून दिलें. आपल्या पतीच्या शरीरावर आपण नाचत आहों असें जेव्हां हिनें पाहिलें तेव्हां लज्जेनें जीभ चावली व नृत्य बंद ठेविलें, अशी कथा दर्शविणारें कालीचें स्वरूप देवळांतून असतें. महाराष्ट्रांत पांचाल जातींच्या लोकांचें उपास्य दैवत कालीच आहे.

**कालीघाट**— कलकत्त्याच्या दक्षिणेस हा घाट व कालीचें प्रख्यात देवस्थान आहे. हुगळीपासून निघालेल्या गंगेच्या एका प्रवाहाच्या कांठीं हें देवालय बांधिलें आहे. मूळ कालीचें देवालय खुद्द कलकत्ता शहरांत होतें. इ. स. १४९५ च्या सुमारास कालीघाट व कलकत्ता हीं दोन्ही वेगवेगळीं अस्तित्वांत होतीं. 'गंगाभक्तितरंगिणी' नांवाच्या ग्रंथांत कालीघाटाचें वर्णन आढळतें. दुर्गापूजा–उत्सवाच्या वेळीं येथें असंख्य बकऱ्यांचे बळी देतात.

**कॉलीफ्लॉवर**— फुलवर; फुलकोबी. ही एक कोबीच्या जातीची उत्तम भाजी आहे. ही विलायतेकडून हिंदुस्थानांत आली. हवेंत थंडी असेपर्यंत ही भाजी खाण्यास स्वादिष्ट लागते. हीं झाडें थंडींत फुलावयास लागतात व तीं कंबरेपासून छातीइतकीं उंच वाढतात. फुलवरचें बीं श्रावणांत पेरतात. जमिनींत लागणीच्या वेळीं याला कुजलेलें खत घालावें लागतें. कॉली-

फ्लॉवरला महाराष्ट्रांत बीं येत नाहीं. गंगायमुना नद्यांच्या कांठच्या भागांत फुलवरीस बीं येतें. पण त्या बियांपासून दुसऱ्या प्रांतांत चांगली पैदास होत नाहीं, म्हणून विलायतेकडील हळवें बीं वापरणेंच श्रेयस्कर होतें.

**कालेलकर, दत्तात्रय बाळकृष्ण** ( १८८५- )—एक महाराष्ट्रीय साहित्यिक, लेखक व कार्यकर्ते. यांचें शिक्षण कारवार, बेळगांव व पुणें फर्ग्युसन कॉलेजमध्यें झालें. एल्‌एल्. बी. ची पहिली परीक्षा झाल्यावर यांनीं कायद्याचा अभ्यास सोडून देऊन 'राष्ट्रमत' या राष्ट्रीय दैनिक पत्रांत काम करण्यास सुरुवात केली. नंतर यांनीं राष्ट्रीय शिक्षण देण्याचें कार्य पत्करून बेळगांव येथें गणेश विद्यालय, बडोदें येथें गंगानाथ विद्यालय, हरद्वार येथें ऋषिकुल व हैद्राबाद येथें सिंह ब्रह्मचर्याश्रम या संस्थांत शिक्षकाचें काम केलें. १९१५ मध्यें कांहीं काल शांतिनिकेतनमध्यें कार्य केलें. यानंतर त्यांनीं हिमालयांत सुमारें २,००० मैल पायीं प्रवास केला. यानंतर त्यांनीं ब्रह्मदेश व सीलोन इकडे प्रवास केला. १९१६ मध्यें हे गांधीजींच्या आश्रमांत आले. १९२१ मध्यें गुजरात विद्यापीठ स्थापन करण्याच्या कामीं मदत केली व १९२७ ते १९३४ पर्यंत त्या विद्यापीठाचे कुलगुरु ( व्हाइस चान्सेलर ) व आचार्य होते. गांधीजी तुरुंगांत असतां यांनीं 'नवजीवन 'चें संपादन केलें. यांस १९२२, १९३०, १९३२ व १९३४ मध्यें सत्याग्रहासाठीं तुरुंगवासाची शिक्षा झाली होती. अनेक शैक्षणिक व राजकीय परिषदांचे हे अध्यक्ष होते. नागरी लिपि-सुधार-समितीचे हे संयोजक होते. यांनीं गुजराथी व मराठी भाषेंत बरेच ग्रंथ लिहिले आहेत.

**कालोल**—बडोदें संस्थान; कडी प्रांताचा दक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ २६७ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें नव्वद हजार. यांत कालोल गांव व ८९ खेडीं आहेत.

कालोल हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून राजपुताना-माळवा रेल्वेचें स्टेशन आहे.

**कालका**—पंजाब, अंबाला जिल्हा, खरार तहशिलींतील एक गांव. दिल्ली-अंबाला-कालका आणि कालका-सिमला रेल्वे यांचें हें जंक्शन आहे. लोकसंख्या सुमारें दहा हजार. उंची २,४०० फूट. या गांवाभोंवतीं पत्याळाचा मुलूख असून तो हिमालयाच्या पायथ्याशीं आहे. इ. स. १८४४ मध्यें पत्याळा संस्थानापासून ब्रिटिशांनीं हें गांव मिळविलें. येथें जंगली जिनसांचा मोठा व्यापार चालतो. येथें कुरुंद दगड बरेच चांगले सांपडतात.

**कॉल्डेकॉट, रॅन्डोल्फ** ( १८४६-१८८६ )—हा इंग्रज कलावंत असून त्यानें लहान मुलांकरितां रंगीत चित्रांचीं पुस्तकें तयार केलीं आहेत व तीं अतिशय लोकप्रिय झालीं आहेत. त्यांपैकीं कांहीं—'जॉन गिल्पिन', 'दि एलेजी ऑन दि डेथ् ऑफ ए मॅड डॉग' (पिसाळलेल्या कुत्र्याच्या मृत्यूवर एक शोकगीत ) आणि 'दि ग्रेट पंजन्ड्रम हिमसेल्फ' हीं आहेत.

**काल्डेरॉन, डॉन पेड्रो** ( १६००-१६८१ )—एक स्पॅनिश नाटककार. याचें शिक्षण सालामान्का येथें झाल्यावर त्यानें पुष्कळ वर्षें सैन्यांत नोकरी केली. १६६१ मध्यें धर्मोपदेशकाच्या व्यवसायांत शिरला. तो 'आत्मसंस्कार शपथ' ( ओटोस सॅक्रॅमेन्टॅलीज ) लिहिण्यांत फार प्रवीण असे, म्हणून असलें लिखाण लिहून देण्याबद्दल स्पेनमधील मुख्य मुख्य शहरांतून त्याच्याकडे फार मागणी येत असे. शिवाय त्यानें वीररसात्मक सुखान्त नाटकें आणि ऐतिहासिक नाटकें लिहिलीं आहेत. त्यानें लिहिलेलीं ९५ ओटोस सॅक्रॅमेन्टॅलीज, २०० प्रिल्यूड्स आणि १०० प्रहसनें आज उपलब्ध आहेत. त्यानें लिहिलेलीं १२८ नाटकें आहेत व त्यांचीं इंग्रजी भाषांतरें झालेलीं आहेत. त्याचीं नाटकें अद्यापिहि रंगभूमीवर होतात व तीं बरींच लोकप्रिय आहेत.

**काल्पनिक संख्या**—अधिक किंवा उण्या संख्यांचा वर्ग अधिकच येतो; उदा., $( ४ )^२ = १६, ( -५ )^२ = २५$. वर्गमूळ अधिक संख्यांचेंच काढतां येईल. $क्ष^२ + १ = ०$ असें समीकरण सोडवावयाचें असेल तर $क्ष^२ = -१$, $क्ष = \sqrt{-१}$ ही नवीनच संख्या मानली पाहिजे. $\sqrt{-१}$, $\sqrt{-५}$ अशा संख्यांस काल्पनिक संख्या म्हणतात. आधुनिक गणितविश्लेषणशास्त्राच्या प्रगतीस ही संख्येची कल्पना फार उपयोगी पडली. वास्तविक व काल्पनिक संख्या एकत्र करून मिश्र संख्या होतात. जसें $३ \pm \sqrt{-५}$ ह्या संख्या $( क्ष - ३ )^२ + ५ = ०$ ह्या समीकरणाचीं उत्तरें आहेत.

**काल्पी**—संयुक्त प्रांत, जालवण जिल्ह्याची पूर्वेकडील तहशील. क्षे. फ. ४०५ चौ. मै.. या तहशिलींत मोठें गांव काल्पी व १५९ खेडीं आहेत. लो. सं. सु. ऐशीं हजार. काल्पी तहशिलीचें मुख्य ठिकाण यमुनेवर आहे. इ. स. १८०६ मध्यें हा गांव ब्रिटिशांकडे आला. १८५७ च्या शिपायांच्या युद्धांत शिपायांचा मोड झाला त्या वेळीं इंग्रज शिपायांनीं काल्पी लुटून साखर रस्त्यावर ओतली. हा गांव बराच प्राचीन असल्यामुळें येथें पुष्कळ जुन्या इमारती आहेत. अकबराच्या वेळीं येथें एक टांकसाळ होती. नदीकांठावर एका पडक्या किल्ल्याचे अवशेष दिसत असून त्या भागांत हल्लीं एकच इमारत शाबूत आहे. येथें धान्य व कापूस यांचा व्यापार बराच चालतो. लो. सं. १०,०००.

**कॉल्व्हिन, सर सिडने** ( १८४५-१९२७ )—हा इंग्रज विद्वान् लेखक केंब्रिज येथें ललितकलेचा प्रोफेसर ( १८७३-

१८८५) होता. आणि ब्रि. म्यूझियममध्यें 'प्रिन्ट्स ॲन्ड ड्रॉइंग्ज' (छाप आणि रेखाकृति) या शाखेचा पालक (कीपर) होता. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—'ऑन कीट्स, हिज लाइफ ॲन्ड पोएट्री', आर्. एल्. स्टीव्हन्सनचीं पत्रें, 'मेमॉयर्स ॲन्ड नोट्स ऑफ पर्सन्स ॲन्ड प्लेसेस' (व्यक्ती आणि स्थळें यांचीं टांचणें).

**काव**— मातीचा एक प्रकार. हा रंगद्रव्य म्हणून उपयोगी पडतो. ही माती लोहप्राणिदांची असून हिचे रंग निरनिराळे असतात. कृत्रिम रीतीनेंहि काव मोठ्या प्रमाणांत तयार करून विकली जाते. इंग्लंड, फ्रान्स व हॉलंड या देशांतून बहुधा काव येते. आपल्याकडे तांबडी काव घरांना रंग देण्यासाठीं व वस्त्रें रंगविण्यासाठीं वापरतात. भगवा रंग कावेपासूनच करतात.

**कावजी कोंढाळकर**—एक मराठा सरदार. हा कान्होजी जेधे याचा आश्रित होता. पुढें यानें निजामशाहींत व आदिलशाहींत मनसबदारी मिळवली व नंतर कान्होजीबरोबर प्रथम शहाजीच्या पदरीं व नंतर शिवाजीच्या पदरीं राहून शिवाजीस हिंदुराज्यस्थापनेच्या कामीं मदत केली. शिरवळ येथील विजापूरच्या सैन्याचा कावजीनें धुव्वा उडविला होता (१६४९). मराठ्यांच्या अफझुलखानाबरोबर जावळींत व पारघाटांत झालेल्या लढाईंत यानें चांगलेंच शौर्य गाजविलें. सन १६६० त याची नेमणूक कुलाबा जिल्ह्यांतील देहरी गडावर झाली असतां शाहिस्तेखानाचा सरदार खुलासी यानें गडास वेढा दिला. त्या वेळीं कावजीनें शौर्यानें वेढा परतवून लावला.

**कावळा**— हा एक पक्ष्यांचा स्वतंत्र वर्ग आहे. हे सर्वत्र

आढळतात. यांची लांबी दीड फुटापर्यंत असते. यांच्यापैकीं कांहीं पूर्ण काळे व कांहीं मानेशीं भुरके असतात. भुरक्यांना डोमकावळे म्हणतात व पहिल्यांस महार कावळे म्हणतात. हे मेलेल्या प्राण्यांचें मांस वगैरे खातात. हे बहुधा कळप करून राहत नाहींत, तर स्वतंत्रपणें घरटीं करून राहतात. यांस दीर्घायुष्य असतें असें मानतात.

कावळ्याची चोंच व पाय बळकट असतात. तो फार धूर्त व कावेबाज दिसतो. या गुणावरून बरेच वाक्प्रचारहि सर्व भाषांत पडलेले आढळतील. हा चोरून वस्तु नेण्यांत फार पटाईत. जखमांवर टोच्या मारण्यांत त्याला मौज वाटते. कावळ्याचें घरटें उंच झाडावर असतें. त्यांत मादी अंडीं घालते व त्यांना फार जपते. कावळे बहुधा मनुष्यवस्तीजवळच राहतात.

**कावीळ**— या रोगाचा प्रादुर्भाव रक्तामध्यें पित्तांतील पिवळा रंग शिरल्यामुळें होतो व त्यामुळें शरीराची कातडी पिवळी दिसूं लागते. याचे दोन प्रकार आहेत : १ विषजन्य–यामध्यें शरीरांत एखादें रासायनिक किंवा सूक्ष्मजंतुजन्य विष रक्तांतून पसरत असतें. २ प्रतिबंधात्मक—यामध्यें पित्तावहिन्यांवर दाब पडून पित्ताच्या प्रसरण पावण्याच्या क्रियेंत कोठें तरी अडथळा होतो. या दुसऱ्या प्रकारास कधीं कधीं काळी कावीळ म्हणतात व तीमध्यें कातडीचा रंग हिरवट काळा दिसूं लागतो.

कावीळ झालेल्या माणसाचें सर्व अंग पिवळें होतें, इतकेंच नव्हे तर त्याचे कपडेहि पिवळे होतात.

**कावेरी**— दक्षिण हिंदुस्थानांतील एक मोठी नदी. धार्मिकदृष्ट्या ही पवित्र मानली जाते. ही कूर्गमधील ब्रह्मगिरी येथील डोंगरांतून उगम पावून आग्नेय मार्गानें म्हैसूरच्या सपाट मैदानांतून वाहत जाते. या नदीची लांबी ४७५ मैल आहे. भाविक हिंदू लोक हिला दक्षिण गंगा म्हणतात. स्कंदपुराणांत अशी कथा आहे कीं, विष्णुभार्या ही ब्रह्मदेवाची मुलगी असून ती कावेर मुनीपाशीं त्यास आपला पिता समजून राहिली. पापी जनांना पुनीत करण्याकरितां तिनें नदीचें रूप घेण्याचा निर्धार केला. कावेरीच्या दोन्ही बाजूंस जमीन सुपीक असून हिरवीगार झाडें आहेत. कक्कबे, कदनूर, कुम्महोल, मुतारमुडी, हारंगी या उपनद्या कावेरीस मिळतात. हिचे 'गगनचक्की' व 'भारचक्की' हे दोन धबधबे फार प्रेक्षणीय आहेत. म्हैसूर आणि मद्रास या भागांत कावेरीच्या पाण्याचा उपयोग शेतकीकडे करतात. तीवर धरणें बांधलेलीं आहेत. म्हैसूर संस्थानच्या समृद्धीचें बरेंचसें श्रेय कावेरीस आहे.

**कावेरीपट्टणम्**— मद्रास, सालेम जिल्ह्यांतील कृष्णगिरी तालुक्यांतील एक खेडें. करिकाल चोल यानें हें शहर वसवून तेथें आपली नवी राजधानी केली. या शहरावर 'पट्टिनपालई' नांवाचें एक काव्य झालें असून त्यांत करिकालाच्या वेळची माहिती ग्रथित केलेली आहे. शहराच्या रक्षणाकरितां या राजानें कावेरी नदीस मोठीं धरणें बांधलीं आहेत. या काव्याच्या कर्त्याला त्यानें १ लक्ष ६० हजार होन बक्षीस दिले. म्हैसूरच्या लढायांच्या वेळीं या ठिकाणास फार महत्त्व असून तेथें तटबंदीहि

केली होती. १७९० सालीं कर्नल मॅक्सवेल यानें टिपूवरच्या स्वारीच्या वेळीं आपल्या फौजेचें मुख्य ठाणें येथें ठेवलें होतें.

**कावेल्ली** ( १६९८–१७२५ )— कावेल्ली व्यंकट बोरय्या. एक तेलंगी कवि. फारसी, हिंदी व इंग्रजी भाषा अवगत करून घेऊन वयाच्या १५ व्या वर्षी इंग्रजी सैन्यांत पगार वांटण्याची नोकरी यानें धरली. इंग्रज व टिपू यांच्यामध्यें झालेल्या युद्धाचा वृत्तान्त यानें तेलगूंत पद्यरूपानें लिहिला. हें काव्य करुणरसपूर्ण व बहारीचें आहे. मॅकेन्झीला हिंदुस्थानचा इतिहास लिहिण्याला लागणारें साहित्य यानेंच पुरविलें. श्रीरंगचरित्र, एका साधूचें शतश्लोकी चरित्र व आणखी कांहीं ग्रंथरचना यानें केली आहे.

**काव्य**— हा एक वाङ्मयाचा प्रकार आहे. छंदोबद्ध रचना व भावनामय भाषा हे याचे विशेष आहेत. प्रास, यमकें आणि छंदोबद्ध रचना नसलेलींहि मोठमोठीं प्रसिद्ध काव्ये सर्व भाषांतून आढळतात. काव्याचे अनेक प्रकार आहेत व ते ते स्वतंत्रपणें वर्णिलेले आहेत. छंदःशास्त्रामध्यें कवितारचनेचे नियम दिलेले असतात. गद्यापेक्षां पद्य हें जुने आहे, असें अनेक राष्ट्रांतील प्राचीन वाङ्मयावरून सिद्ध करतां येतें. पद्यामुळें वाङ्मय विसरत नाहीं व परंपरागत राहतें. लिहिण्याची–छापण्याची कला नव्हती तेव्हां तोंडी लवकर बसणारीं पद्येंच लोकांच्या स्मरणांत व पठणांत असत. वृत्तें आणि अलंकार कवितेला असले म्हणजे ती लोकांना आवडती होऊन ध्यानांत राहते. गाण्याला तर काव्य लागतेंच; तेव्हां संगीत आणि काव्य यांची संगत फार जुन्या काळची आहे व पुढें राहीलहि. प्रथम काव्यविषय देव आणि वीर यांचे पराक्रम हेच होते.

काव्यरचनेचे सामान्यतः दोन काल-विभाग पाडतां येतात. एक ख्रिस्तपूर्व आणि दुसरा ख्रिस्तोत्तर. ख्रिस्तपूर्व काव्यामध्यें भारतीय, फारसी, सीरियन आणि अरबी काव्याचे कांहीं अवशेष आढळतात. त्यानंतर हिब्रू लोकांचें काव्य आपल्या दृष्टीस पडतें; यामध्यें जगाची उत्पत्ति व त्यानंतर त्याच्या इतिहासांत झालेलीं युद्धें यांचें वर्णन असून डेव्हिड राजाच्या कालपर्यंतचीं धार्मिक गीतें आढळतात. सालोमन राजाच्या कारकीर्दींत या काव्याची पूर्ण परिणति दृष्टीस पडते. त्यानंतर याचें स्वरूप प्रवक्त्याचें अथवा भविष्यवाद्यासारखें आढळतें. ग्रीक काव्याचे तीन कालविभाग पाडतां येतात. पहिला विभाग ग्रीक व इराणी लोक यांच्या युद्धापर्यंतचा होय. ग्रीक काव्याची सुरुवात आशिया मायनरमधील थ्रेस या प्रांतांत होते, त्या वेळीं होमर याचें काव्य व इतर बरींच मोठ्या प्रमाणावर काव्यें झालेलीं दृष्टीस पडतात. यानंतर वीणाकाव्याची बरीच वाढ झालेली दृष्टीस पडते. दुसरा कालविभाग इराणी युद्धापासून अलेक्झांडरच्या कालापर्यंत पडतो. या वेळीं नाट्याचा आणि ग्रीक काव्याचा विशेष परिपोष झालेला आढळतो. अलेक्झांडर-नंतरच्या कालांत म्हणजे तिसऱ्या कालविभागांत काव्याला उतरती कळा लागलेली दिसून येते आणि त्याचा अवशेष फक्त अलेक्झांड्रियामध्यें दृष्टीस पडतो.

रोमन लोकांच्या भाषेमध्यें दुसऱ्या प्युनिक युद्धापर्यंत अथवा त्यांचा ग्रीक लोकांशीं विशेष संबंध येईपर्यंत फारसें काव्य आढळत नाहीं व जें आढळतें तें अगदींच प्राथमिक स्वरूपाचें दिसतें. ऑगस्टसची कारकीर्द हें रोमन काव्याचें सुवर्णयुग होतें. परंतु त्यास हळूहळू उतरती कळा लागून ख्रिस्ती धर्माच्या आगमनाच्या व रानटी लोकांच्या हल्ल्यांच्या वेळीं तें बहुतेक नामशेष झालें. ख्रिस्ती संप्रदायाची प्रस्थापना झाल्यानंतर ख्रिस्ती उपासनांमध्यें लॅटिन भाषेंतील कांहीं सांप्रदायिक गूढ काव्याचा उपयोग केलेला आढळतो. यानंतर ९ व्या, १० व्या आणि त्यानंतरच्या शतकांमध्यें कांहीं विद्वान् लोकांनीं लॅटिनमध्यें रोमन लोकांच्या कवितांचें अनुकरण केलेलें दिसून येतें. याच सुमारास अरबी भाषेंतील काव्यास मात्र भर आलेला दृष्टीस पडतो. ११ व्या शतकामध्यें फ्रेंच लोकांत एका विशिष्ट पद्धतीचीं काव्यें प्रचलित असलेलीं आढळतात. त्यांचे विषय भक्ति, पराक्रम आणि प्रेम हे आहेत. परंतु या काव्यास १२ व्या शतकांतच उतरती कळा लागली. पहिल्या फ्रॅन्सिस राजाच्या कारकीर्दींत काव्याचें पुनरुज्जीवन झाल्याचें दृष्टीस पडतें. परंतु फ्रेंच काव्याचें सुवर्णयुग म्हणजे १४ व्या लुईची कारकीर्द होय. प्रॉव्हेन्कल काव्यापासूनच इटालियन काव्याची उत्पत्ति झाली. परंतु वास्तविक, स्वाभाविक अशा इटालियन काव्याची सुरुवात सिसिली-मध्यें १३ व्या शतकांत होऊन त्याची वाढ डांटे आणि पेट्रार्क यांच्या कालांत विशेष झाली व ऑरिओस्टो आणि टॅसो या कवींच्या कालापर्यंत सारखी त्याची भरभराट होत गेली व पुढें १३ व्या, १४ व्या आणि १५ व्या शतकांत सारखी वाढच होत गेली. यानंतर मात्र इटालियन काव्याचें स्वरूप शब्दाव-डंबर आणि अनुकरणात्मक झालें. प्रॉव्हेन्कल काव्याचीच एक शाखा स्पेनमध्यें वाढीस लागली व कॅस्टिलियन काव्याची विशेष वाढ आपणास १३ व्या शतकांतच झालेली आढळून येते. पहिल्या चार्लस राजाच्या कारकीर्दींत त्यास ऊर्जितावस्था येऊन चौथ्या फिलीपच्या कारकीर्दींत उतरती कळा लागली. पोर्तुगीज काव्याचाहि उदयास्त याच सुमारास आढळून येतो. जर्मन काव्याची सुरुवात स्वतंत्र रीतीनें उत्तरेकडे होऊन यांतील महा-काव्याचे विषयहि स्वतंत्र होते, व या काव्याची भरभराट परकीयांचें अनुकरण होण्यापूर्वी विशेष झालेली होती. इंग्रजी व स्कॉच काव्येंहि फार दूरच्या अशा प्राचीन कालीं होऊन गेलेल्या शाहिरांच्या गीतांमध्येंच वास्तविक आढळून येतात. या

काव्यामध्यें नॉर्मन-फ्रेंच काव्यामुळें सुधारणा झाली. इंग्रजी काव्याचें सुवर्णयुग म्हणजे एलिझाबेथ राणीची कारकीर्द समजली जाते. परंतु इंग्रजी काव्याच्या जनकत्वाचा मान चॉसर या कवीस देण्यांत येतो. स्कॅन्डेनेव्हियांतील काव्य हें वीररसात्मक असून तें उत्तरेकडील प्रदेशांत व स्वतंत्र रीतीनें उदय पावलें व त्याचे विषयहि स्वतंत्रच आहेत. याची उत्पत्ति सामान्यतः १३ व्या शतकामध्यें झालेली दिसून येते.

भारतीय—काव्य हें गद्य, पद्य व मिश्र असूं शकतें. नुसत्या यमकांनीं व वृत्तांनीं साधलेली कविता काव्य नव्हे. कोणत्याहि भाषेत किंवा बोलींत काव्य होऊं शकतें. वैदिक सूक्तांत व संवादात्मक गीतांत आपणांस भारतीय प्राचीन काव्याचे नमुने आढळतात. रामायण-महाभारतांत प्राचीन सूत किंवा भाट काव्यांचे अवशेष सांपडतात. अशिक्षित कवींची जागा पुढें पंडितांनीं घेतली. वाल्मीकि हा आदि कवि समजला जातो. पाणिनि हाहि कवि होता असें दिसतें. त्याचे पातालविजय व जांबवंतिविजय हे काव्यग्रंथ पुढल्या कवींनीं उल्लेखिले आहेत. पिंगलाच्या वृत्तांवरील ग्रंथावरून खि. पू. दोनशें वर्षांपासून शृंगारपर काव्यें सुरू झाल्याचें कळतें. यानंतर प्राकृत काव्याची वाढ झालेली दिसून येते. हालाची सतशति, गुणाढ्याची बृहत्कथा वगैरे ग्रंथ याची साक्ष देतात. शिलालेख हेहि गद्यकाव्य म्हणतां येईल. उदा.—महाक्षत्रप रुद्रदामन्‌चा शिलालेख. भारतीय काव्याच्या पूर्वअभिजात युगांत तंत्राख्यायिका, भासाचीं नाटकें, अश्वघोषादिकांचीं काव्यें, सप्तशति व बृहत्कथा हीं पडतात. काव्याचें सुवर्णयुग गुप्त घराण्याच्या राजवटींत झालें असें म्हणतां येईल. कालिदासादि कवि याच कालांतील. हर्ष, बाण, माघ हे सातव्या शतकांतले. भवभूति व गौडवाहाचा कर्ता हे यानंतरच्या काळांत होऊन गेले. नवव्या शतकांत काश्मीर दरबारीं राजानक रत्नाकर हा महाकवि होऊन गेला. यानंतर राजशेखर आला. ११ व्या शतकांत माळव्यांत धार येथें मोठें वाङ्मयकार्य झालेलें आढळेल. मुंज-भोज हे राजे काव्यांचे जनक प्रसिद्धच आहेत. काश्मीरकडे बिल्हण दिसेल. क्षेमेंद्र हाहि तिकडलाच. तो एक विख्यात व महान् कवि म्हणतां येईल. श्रीकंठचरिताचा मंख व राजतरंगिणीचा कल्हण हे १२ व्या शतकांतले काश्मीरी कवी असेच प्रसिद्ध आहेत. राजतरंगिणी हा प्राचीन काश्मीरचा इतिहासच आहे.

याच काळांत बंगाल्यांत लक्ष्मणसेनाच्या आश्रयानें जयदेवप्रभृति कवि उदयास आले. जयदेवाचें गीतगोविंद किती मधुर आहे हें सांगणें नकोच. पुढील स्तोत्रें हींहि काव्यांतच धरावीं लागतील. नारायणीय स्तोत्र हें एक महाकाव्यच म्हणतां येईल. अर्वाचीन काळांत संस्कृत-प्राकृत काव्यांची निर्मिति फारच थोडी झाली; याचें कारण त्या भाषा प्रचारांत राहिल्या नाहींत. बोलण्याच्या भाषांतूनच यापुढें ग्रंथरचना होऊं लागणें साहजिक होतें.

हिंदुस्थानांतील हिंदी, बंगाली, ऊर्दू, द्राविडी, गुजराती, इ. भाषांतील काव्यासंबंधीं विवेचन त्या त्या भाषांच्या वाङ्मयावरील लेखांत येईलच. फक्त मराठी काव्याचा खालीं थोडक्यांत आढावा घेत आहों.

मराठींतील काव्याचा प्रारंभ महानुभावी ग्रंथ आणि मुकुंदराज-ज्ञानेश्वर यांचे ग्रंथ यांपासून करावा लागतो. त्यापूर्वी फारसें लेखनिविष्ट पद्यवाङ्मय आढळत नाहीं. जुनीं मराठी काव्यें म्हणजे संस्कृत कथापुराणांचीं पद्यमय भाषांतरें किंवा रूपांतरें म्हणतां येतील. धार्मिक व भक्तिपर काव्य वगळल्यास गेल्या शतकापर्यंत फारसें काव्य उरत नाहीं. स्वतंत्र काव्यरचना म्हणजे लावण्या आणि पोवाडे हेच मानावे लागतात. पण त्यांतहि खरें काव्य ज्याला म्हणतां येईल असें थोडेंच सांपडतें.

प्राचीन मराठी काव्यांत ज्ञानेश्वरीइतकी टिकाऊ छाप कोणत्याच ग्रंथाची दिसत नाहीं. अद्यापिहि तिचा रस ताजा आहे व नवीन नवीन अभ्यासू निघत आहेत. यानंतर नामदेव-तुकारामादींचें अभंगवाङ्मय डोळ्यांत भरतें. हे अभंग सार्वकालीन, सर्वविषयस्पर्शी व प्रासादिक वाटतात खरे. यांत उष्टें पांडित्य नाहीं कीं शब्दावडंबर नाहीं. नंतर एकनाथांच्या काव्यांतील ओवीछंद सुबोध व रसाळ आहे. श्रीधरानें त्यांचाच कित्ता चांगला गिरवून आबालवृद्धापर्यंत पुराणांचें लोण पोंचविलें. त्याचें आख्यानवाङ्मय मराठी वाङ्मयाला लोकप्रिय आणि चिरंतन करणारें आहे. वामन आणि मुक्तेश्वर पंडिती पठडींतील आहेत व मोरोपंतानेंहि त्यांचेंच आधिक्यानें अनुकरण केलेलें दिसेल. रामदास मात्र आपल्या कालांतला राष्ट्रीय कवि म्हणतां येईल. राष्ट्रीय बाण्याचे लोक आजहि त्याच्या काव्याचा अभ्यास करतात व आधार देतात. 'दासबोध' ग्रंथ हा प्रवृत्तिपर आहे. त्यांत वामन-मुक्तेश्वरांच्या काव्यांतील अलंकार, शब्दमाधुर्य व टाकाठिकी जरी नाहीं तरी त्यांतील सरळ गद्यरूपी मांडणी मनाला पटते व परिणाम करते. आनंदतनय, अमृतराय यांची भाषा चटकदार व साधी आहे. कटावांनीं श्रोते तन्मय होऊन जातात.

मोरोपंताची काव्यरचना मराठी भाषेला संस्कृताच्या द्वारें चांगली समृद्ध करणारी झाली यांत शंकाच नाहीं. संस्कृत वाङ्मयांतील साहित्यालंकार त्यानें मराठीवर चढविले. या कवीचे मराठीवर फार उपकार झाले आहेत. यानंतर लावणीकार व शाहीर आलेले दिसतील. त्यांचा शृंगारावरच सर्व भर. त्यामुळें

केली होती. १७९० सालीं कर्नल मॅक्सवेल यानें टिपूवरच्या स्वारीच्या वेळीं आपल्या फौजेचें मुख्य ठाणें येथें ठेवलें होतें.

**कावेली** ( १६९८–१७२५ )— कावेली व्यंकट वोरय्या. एक तेलंगी कवि. फारसी, हिंदी व इंग्रजी भाषा अवगत करून घेऊन वयाच्या १५ व्या वर्षी इंग्रजी सैन्यांत पगार वांटण्याची नोकरी यानें धरली. इंग्रज व टिपू यांच्यामध्यें झालेल्या युद्धाचा वृत्तान्त यानें तेलगूंत पद्यरूपानें लिहिला. हें काव्य करुणरसपूर्ण व बहारीचें आहे. मॅकेन्झीला हिंदुस्थानचा इतिहास लिहिण्याला लागणारें साहित्य यानेंच पुरविलें. श्रीरंगचरित्र, एका साधूचें शतश्लोकी चरित्र व आणखी कांहीं ग्रंथरचना यानें केली आहे.

**काव्य**— हा एक वाङ्मयाचा प्रकार आहे. छंदोबद्ध रचना व भावनामय भाषा हे याचे विशेष आहेत. प्रास, यमकें आणि छंदोबद्ध रचना नसलेलींहि मोठमोठीं प्रसिद्ध काव्यें सर्व भाषांतून आढळतात. काव्याचे अनेक प्रकार आहेत व ते ते स्वतंत्रपणें वर्णिलेले आहेत. छंदःशास्त्रामध्यें कवितारचनेचे नियम दिलेले असतात. गद्यापेक्षां पद्य हें जुनें आहे, असें अनेक राष्ट्रांतील प्राचीन वाङ्मयावरून सिद्ध करतां येतें. पद्यामुळें वाङ्मय विसरत नाहीं व परंपरागत राहतें. लिहिण्याची–छापण्याची कला नव्हती तेव्हां तोंडीं लवकर बसणारीं पद्येंच लोकांच्या स्मरणांत व पठणांत असत. वृत्तें आणि अलंकार कवितेला असले म्हणजे ती लोकांना आवडती होऊन ध्यानांत राहते. गाण्याला तर काव्य लागतेंच; तेव्हां संगीत आणि काव्य यांची संगत फार जुन्या काळची आहे व पुढें राहीलहि. प्रथम काव्यविषय देव आणि वीर यांचे पराक्रम हेच होते.

काव्यरचनेचे सामान्यतः दोन काल-विभाग पाडतां येतात. एक खिस्तपूर्व आणि दुसरा ख्रिस्तोत्तर. खिस्तपूर्व काव्यामध्ये भारतीय, फारसी, सीरियन आणि अरबी काव्याचे कांहीं अवशेष आढळतात. त्यानंतर हिब्रू लोकांचें काव्य आपल्या दृष्टीस पडतें; यामध्यें जगाची उत्पत्ति व त्यानंतर त्याच्या इतिहासांत झालेलीं युद्धें यांचें वर्णन असून डेव्हिड राज्याच्या कालापर्यंतची धार्मिक गीतें आढळतात. सालोमन राजाच्या कारकीर्दींत या काव्याची पूर्ण परिणति दृष्टीस पडते. त्यानंतर याचें स्वरूप प्रवक्त्याचें अथवा भविष्यवाद्यासारखें आढळतें. ग्रीक काव्याचे तीन कालविभाग पाडतां येतात. पहिला विभाग ग्रीक व इराणी लोक यांच्या युद्धापर्यंतचा होय. ग्रीक काव्याची सुरुवात आशिया मायनरमधील थ्रेस या प्रांतांत होते, त्या वेळीं होमर याचें काव्य व इतर बरींच मोठ्या प्रमाणावर काव्यें झालेलीं दृष्टीस पडतात. यानंतर वीणाकाव्याची बरीच वाढ झालेली दृष्टीस पडते. दुसरा कालविभाग इराणी युद्धापासून अलेक्झाडरच्या कालापर्यंत पडतो. या वेळीं नाट्याचा आणि ग्रीक काव्याचा विशेष परिपोष झालेला आढळतो. अलेक्झांडर-नंतरच्या कालांत म्हणजे तिसऱ्या कालविभागांत काव्याला उतरती कळा लागलेली दिसून येते आणि त्याचा अवशेष फक्त अलेक्झांड्रियामध्यें दृष्टीस पडतो.

रोमन लोकांच्या भाषेमध्यें दुसऱ्या प्युनिक युद्धापर्यंत अथवा त्यांचा ग्रीक लोकांशीं विशेष संबंध येईपर्यंत फारसें काव्य आढळत नाहीं व जें आढळतें तें अगदींच प्राथमिक स्वरूपाचें दिसतें. ऑगस्टसची कारकीर्द हें रोमन काव्याचें सुवर्णयुग होतें. परंतु त्यास हळूहळू उतरती कळा लागून खिस्ती धर्माच्या आगमनाच्या व रानटी लोकांच्या हल्ल्यांच्या वेळीं तें बहुतेक नामशेष झालें. खिस्ती संप्रदायाची प्रस्थापना झाल्यानंतर खिस्ती उपासनांमध्यें लॅटिन भाषेंतील कांहीं सांप्रदायिक गूढ काव्याचा उपयोग केलेला आढळतो. यानंतर ९ व्या, १० व्या आणि त्यानंतरच्या शतकांमध्ये कांहीं विद्वान् लोकांनी लॅटिनमध्यें रोमन लोकांच्या कवितांचें अनुकरण केलेलें दिसून येतें. याच सुमारास अरबी भाषेंतील काव्यास मात्र भर आलेला दृष्टीस पडतो. ११ व्या शतकामध्यें फ्रेंच लोकांत एका विशिष्ट पद्धतीचीं काव्यें प्रचलित असलेलीं आढळतात. त्यांचे विषय भक्ति, पराक्रम आणि प्रेम हे आहेत. परंतु या काव्यास १२ व्या शतकांतच उतरती कळा लागली. पहिल्या फ्रॅन्सिस राजाच्या कारकीर्दींत काव्याचें पुनरुज्जीवन झाल्याचें दृष्टीस पडतें. परंतु फ्रेंच काव्याचें सुवर्णयुग म्हणजे १४ व्या लुईची कारकीर्द होय. प्रॉव्हेन्कल काव्यापासूनच इटालियन काव्याची उत्पत्ति झाली. परंतु वास्तविक, स्वाभाविक अशा इटालियन काव्याची सुरुवात सिसिलीमध्ये १३ व्या शतकांत होऊन त्याची वाढ डांटे आणि पेट्रार्क यांच्या कालांत विशेष झाली व ऑरिओस्टो आणि टॅसो या कवींच्या कालापर्यंत सारखी त्याची भरभराट होत गेली व पुढें १३ व्या, १४ व्या आणि १५ व्या शतकांत सारखी वाढच होत गेली. यानंतर मात्र इटालियन काव्याचें स्वरूप शब्दावडंबर आणि अनुकरणात्मक झालें. प्रॉव्हेन्कल काव्याचीच एक शाखा स्पेनमध्यें वाढीस लागली व कॅस्टिलियन काव्याची विशेष वाढ आपणास १३ व्या शतकांतच झालेली आढळून येते. पहिल्या चार्लस राजाच्या कारकीर्दींत त्यास ऊर्जितावस्था येऊन चौथ्या फिलीपच्या कारकीर्दींत उतरती कळा लागली. पोर्तुगीज काव्याचाहि उदयास्त याच सुमारास आढळून येतो. जर्मन काव्याची सुरुवात स्वतंत्र रीतीनें उत्तरेकडे होऊन यांतील महाकाव्याचे विषयहि स्वतंत्र होते, व या काव्याची भरभराट परकीयांचें अनुकरण होण्यापूर्वी विशेष झालेली होती. इंग्रजी व स्कॉच काव्येंहि फार दूरच्या अशा प्राचीन कालीं होऊन गेलेल्या शाहिरांच्या गीतांमध्येंच वास्तविक आढळून येतात. या

काव्यामध्यें नॉर्मन-फ्रेंच काव्यामुळें सुधारणा झाली. इंग्रजी काव्याचें सुवर्णयुग म्हणजे एलिझाबेथ राणीची कारकीर्द समजली जाते. परंतु इंग्रजी काव्याच्या जनकत्वाचा मान चॉसर या कवीस देण्यांत येतो. स्कॅन्डेनेव्हियांतील काव्य हें वीररसात्मक असून तें उत्तरेकडील प्रदेशांत व स्वतंत्र रीतीनें उदय पावलें व त्याचे विषयहि स्वतंत्रच आहेत. याची उत्पत्ति सामान्यतः १३ व्या शतकामध्यें झालेली दिसून येते.

भारतीय—काव्य हे गद्य, पद्य व मिश्र असूं शकतें. नुसत्या यमकांनीं व वृत्तांनीं साधलेली कविता काव्य नव्हे. कोणत्याहि भाषेंत किंवा बोलींत काव्य होऊं शकतें. वैदिक सूक्तांत व संवादात्मक गीतांत आपणांस भारतीय प्राचीन काव्याचे नमुने आढळतात. रामायण–महाभारतांत प्राचीन सूत किंवा भाट काव्यांचे अवशेष सांपडतात. अशिक्षित कवींची जागा पुढें पंडितांनीं घेतली. वाल्मीकि हा आदि कवि समजला जातो. पाणिनि हाहि कवि होता असें दिसतें. त्याचे पातालविजय व जांबवंतिविजय हे काव्यग्रंथ पुढल्या कवींनीं उल्लेखिले आहेत. पिंगलाच्या वृत्तांवरील ग्रंथावरून खि. पू. दोनशें वर्षांपासून शृंगारपर काव्यें सुरू झाल्याचें कळतें. यानंतर प्राकृत काव्याची वाढ झालेली दिसून येते. हालाची सतशति, गुणाढ्याची बृहत्कथा वगैरे ग्रंथ याची साक्ष देतात. शिलालेख हेहि गद्यकाव्य म्हणतां येईल. उदा.–महाक्षत्रप रुद्रदामन्‌चा शिलालेख. भारतीय काव्याच्या पूर्वअभिजात युगांत तंत्राख्यायिका, भासाचीं नाटकें, अश्वघोषादिकांचीं काव्यें, सतशति व बृहत्कथा हीं पडतात. काव्याचें सुवर्णयुग गुप्त घराण्याच्या राजवटींत झालें असें म्हणतां येईल. कालिदासादि कवि याच कालांतील. हर्ष, बाण, माघ हे सातव्या शतकांतले. भवभूति व गौडवाहाचा कर्ता हे यानंतरच्या काळांत होऊन गेले. नवव्या शतकांत काश्मीर दरबारी राजानक रत्नाकर हा महाकवि होऊन गेला. यानंतर राजशेखर आला. ११ व्या शतकांत माळव्यांत धार येथें मोठें वाङ्मयकार्य झालेलें आढळेल. मुंज-भोज हे राजे काव्यांचे जनक प्रसिद्धच आहेत. काश्मीरकडे बिल्हण दिसेल. क्षेमेंद्र हाहि तिकडलाच. तो एक विख्यात व महान् कवि म्हणतां येईल. श्रीकंठचरिताचा मंख व राजतरंगिणीचा कल्हण हे १२ व्या शतकांतले काश्मीरी कवी असेच प्रसिद्ध आहेत. राजतरंगिणी हा प्राचीन काश्मीरचा इतिहासच आहे.

याच काळांत बंगाल्यांत लक्ष्मणसेनाच्या आश्रयानें जयदेवप्रभृति कवि उदयास आले. जयदेवाचें गीतगोविंद किती मधुर आहे हें सांगणें नकोच. पुढील स्तोत्रें हींहि काव्यांतच धरावीं लागतील. नारायणीय स्तोत्र हें एक महाकाव्यच म्हणतां येईल. अर्वाचीन काळांत संस्कृत–प्राकृत काव्यांची निर्मिति फारच थोडी झाली; याचें कारण त्या भाषा प्रचारांत राहिल्या नाहींत. बोलण्याच्या भाषांतूनच यापुढें ग्रंथरचना होऊं लागणें साहजिक होतें.

हिंदुस्थानांतील हिंदी, बंगाली, ऊर्दू, द्राविडी, गुजराती, इ. भाषांतील काव्यासंबंधीं विवेचन त्या त्या भाषांच्या वाङ्मयावरील लेखांत येईलच. फक्त मराठी काव्याचा खालीं थोडक्यांत आढावा घेत आहों.

मराठींतील काव्याचा प्रारंभ महानुभावी ग्रंथ आणि मुकुंदराज-ज्ञानेश्वर यांचे ग्रंथ यांपासून करावा लागतो. त्यापूर्वीं फारसें लेखनिविष्ट पद्यवाङ्मय आढळत नाहीं. जुनीं मराठी काव्यें म्हणजे संस्कृत कथापुराणांचीं पद्यमय भाषांतरें किंवा रूपांतरें म्हणतां येतील. धार्मिक व भक्तिपर काव्य वगळल्यास गेल्या शतकापर्यंत फारसें काव्य उरत नाहीं. स्वतंत्र काव्यरचना म्हणजे लावण्या आणि पोवाडे हेच मानावे लागतात. पण त्यांतहि खरें काव्य ज्याला म्हणतां येईल असें थोडेंच सांपडतें.

प्राचीन 'मराठी काव्यांत ज्ञानेश्वरीइतकी टिकाऊ छाप कोणत्याच ग्रंथाची दिसत नाहीं. अद्यापिहि तिचा रस ताजा आहे व नवीन नवीन अभ्यासू निघत आहेत. यानंतर नामदेव–तुकारामादींचें अभंगवाङ्मय डोळ्यांत भरतें. हे अभंग सार्वकालीन, सर्वविषयस्पर्शी व प्रासादिक वाटतात खरे. यांत उष्टें पांडित्य नाहीं कीं शब्दावडंबर नाहीं. नंतर एकनाथांच्या काव्यांतील ओवीछंद सुबोध व रसाळ आहे. श्रीधरानें त्यांचाच कित्ता चांगला गिरवून आबालवृद्धापर्यंत पुराणांचें लोण पोंचविलें. त्याचें आख्यानवाङ्मय मराठी वाङ्मयाला लोकप्रिय आणि चिरंतन करणारें आहे. वामन आणि मुक्तेश्वर पंडिती पठडींतील आहेत व मोरोपंतानेंहि त्यांचेंच आधिक्यानें अनुकरण केलेलें दिसेल. रामदास मात्र आपल्या कालांतला राष्ट्रीय कवि म्हणतां येईल. राष्ट्रीय बाण्याचे लोक आजहि त्याच्या काव्याचा अभ्यास करतात व आधार देतात. 'दासबोध' ग्रंथ हा प्रवृत्तिपर आहे. त्यांत वामन–मुक्तेश्वरांच्या काव्यांतील अलंकार, शब्दमाधुर्य व ठाकठिकी जरी नाहीं तरी त्यांतील सरळ गद्यरूपी मांडणी मनाला पटते व परिणाम करते. आनंदतनय, अमृतराय यांची भाषा चटकदार व साधी आहे. कटावांनीं श्रोते तन्मय होऊन जातात.

मोरोपंताची काव्यरचना मराठी भाषेला संस्कृताच्या द्वारें चांगली समृद्ध करणारी झाली यांत शंकाच नाहीं. संस्कृत वाङ्मयांतील साहित्यालंकार त्यानें मराठीवर चढविले. या कवीचे मराठीवर फार उपकार झाले आहेत. यानंतर लावणीकार व शाहीर आलेले दिसतील. त्यांचा शृंगारावरच सर्व भर. त्यामुळें

वरच्या समाजांत योग्य मान्यता लाभली नाहीं. पोवाडे शिवकालापासून होत होते व त्यांत वीरश्री भरलेली असे. पण त्यांनाहि मिळावी तशी मान्यता पेशवाईत मिळालेली दिसत नाहीं. त्यांत राजकीय आणि ऐतिहासिक विवेचन असल्यामुळें आज त्यांचें महत्त्व पटत चाललें आहे. मराठी काव्यांचा पदें–गाणीं हा जो भाग आहे तो विशेष उल्लेखनीय आहे; त्यांत मनोवृत्ति हालवून सोडण्याचा उत्कट गुण दिसून येईल. पण हरदास आणि स्त्रिया यांच्या तोंडीच हें वाङ्मय उरलें आहे.

ब्रिटिश अमदानी झाल्यावर स्वतंत्र काव्यरचना फारशी झाली नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत समाजांत अनेक क्षेत्रांत क्रांति दिसूं लागली व काव्याच्या क्षेत्रांतहि ती झाली. कांहीं कवी जुन्या धर्तीवर कविता करीतच होते, पण कांहींनीं नवीन वळण घेतलें. ते इंग्रजी कवितांचीं भाषांतरें किंवा रूपांतरें करूं लागले, त्यांच्या काव्यविषयांत वैचित्र्यहि आलें. मोगरे, टिळक, केशवसुत, इ. चीं नांवें दुसऱ्या वर्गांत पडतील. केशवसुतापासून अर्वाचीन मराठी काव्याचा आरंभ धरतात. त्यांनीं सामाजिक दुःखांना तोंड फोडलें; सुधारणेची, क्रांतीची तुतारी फुंकली. त्यांची परंपरा पुढें चालली व चालू आहे. लेंभे, खरे, चंद्रशेखर, विनायक, ठोमरे यांसारख्यांची रचना स्वतंत्र आहे. कांहींनीं ऊर्दू, बंगाली, गुजराती भाषांतील कवितांचीं रूपांतरें केलीं, तर कांहींनीं (लेले, पांगारकर, आगाशे, अनंततनय, भिडे, इ.) संस्कृतची कास धरूनच ठेविली. गोविंद आणि सावरकर यांनीं स्फूर्तिदायक देशभक्तिपर राष्ट्रीय काव्याचा इष्ट पायंडा पाडला; पण तो फारसा गिरवला गेला नाहीं. बहुतेक पुढील कवी प्रेमाधीनच झाले. गोविंदाग्रज जरा स्वतंत्र वळणाचे व केशवसुतांचे चेले दिसतात. या सर्व कवींची कविता बहुतेक स्फुट व त्रुटितच आहे. महाकाव्यें तर राहोच, पण खंडकाव्येंहि म्हणण्यासारखीं निघालीं नाहीत.

१८८५ नंतर मराठी काव्याला इंग्रजी वळण पुरें लागलेलें वर सांगितलेलेंच आहे. केशवसुत, दत्त, विनायक, माधवानुज, गडकरी, टिळक, इ. कवींनीं हें वळण दिलें. १९२० नंतर या वळणांतूनच नवीन नवीन काव्यप्रकार निर्माण झाले. या पूर्वीच्या कवींत ग्वाल्हेरचे तांबे व बडोद्याचे चंद्रशेखर हे उठून दिसतात. नंतरच्या कवींत गिरीश, माधव जूलियन्, मायदेव, यशवंत, अत्रे वगैरे नवोदित कवी पुढें आले. व त्यांनीं काव्यप्रांताला चांगला तजेला दिला. १९३५ पर्यंत यांच्या काव्याला जी भरती होती ती पुढें ओसरली.

या नवीन कवींनीं 'सुनीत' रचना पुढे आणली. नाट्यगीतें, जानपदगीतें, शिशुगीतें, कणिका, गज्जल, मुक्तछंद यांसारखे प्रकार अर्वाचीन काव्यांत शिरले व कवींना नवीन दृष्टि आली असें वाटावयास लागलें. काव्याच्या अंतरंगाप्रमाणें बहिरंगांतहि फरक पडूं लागला. नवीं नवीं वृत्तें तयार झालीं व त्यांना पदांच्या विशिष्ट चरणांवरून नांवें देण्यांत आलीं (उदा०– मुद्रिका, अभिमन्यु, सुरेख–संगम, इ.). कोठें जुनीं रचनाविषयक बंधनें तुटून मुक्तछंद सुरू झाले.

महाराष्ट्रांत पुण्यामुंबईकडेच नव्हे तर इतर भागांतहि कवी निघाले. विदर्भ, मध्यभारत, मराठवाडा, कोंकण व कर्नाटक या बाजूंस नांव घेण्यासारखे कवी दिसून आनंद वाटतो. काव्यविषयांत पूर्वी प्रणयाला प्राधान्य असे. पण पुढें प्रसंगपर, बोधपर, देशभक्तिपर, गूढगुंजनात्मक अशा तऱ्हेचीं काव्यें बरींच होऊं लागलीं. सत्याग्रह, बेचाळीसची चळवळ, राजकीय आकांक्षा, देशभक्त, महात्मे, इ. गोष्टींचा समाचार कवी घेऊं लागले, हें त्यांच्या जागृतीचें व आधुनिकतेचे लक्षण म्हणतां येईल. राष्ट्रीय गीतांत कुसुमाग्रज हे अग्रेसर आहेत. काव्यगायन कवींनीं करण्याचा प्रकार मध्यंतरीं फार रूढ होता, पण आतां चांगले गातां येणारेच फक्त विविध कवींचीं गीतें म्हणून पैसाहि मिळवितात. रविकिरण मंडळासारखीं नवीन कविमंडळें आज स्थापन होत नाहींत व थोड्याच नव्या कवींना प्रसिद्धि लाभली आहे. कांहीं शाहीर आपला भाव चढवून आहेत. पण स्वातंत्र्याच्या उदयाबरोबर शाहिरीपेशा कमी होत जाणार आहे.

आतां मानवतेची उपासना करण्याकडे कवींचा कल होणार आहे. अनिलसारखे कवी तिकडे वळलेलेच आहेत. सामाजिक, आर्थिक किंवा कसलीहि विषमता राहूं द्यावयाची नाहीं, विश्वबंधुत्व आलें पाहिजे, असा टाहो फोडला जात आहे. यंत्रयुगांतील मानवाचे हाल मर्ढेकरांनीं अगदीं विटल्याप्रमाणें पण यथार्थ वर्णिले आहेत. बोरकर, शांताबाई शेळके यांच्यासारखे निसर्गाचें सौंदर्य पुन्हां रसिकांना दाखवीत आहेत. प्रेमगीतें आतांहि कांहीं लिहितात, पण त्यांत भावनोत्कटता नाहीं. तीं रटाळ वाटतात. भावगीतांत शेळके, चिंधडे, माडगूळकर, संत, वगैरे आज आघाडीवर आहेत. काव्याचे निरनिराळे आणखी प्रकार जे आहेत त्यांचे विवेचन त्या त्या लेखांत येईलच.

**काव्हूर** (१८१०–१८६१)—एक प्रसिद्ध इटालियन मुत्सद्दी. हा दहा वर्षांचा असतांना ट्यूरीन येथील लष्करी शिक्षणाच्या शाळेंत दाखल झाला. उदारमतवादी असल्याने एकतंत्री राज्यपद्धति आणि भिक्षुकशाही यांविरुद्ध तो होता. पुढें तो सरकारविरोधी पक्षाला मिळाला. यापुढचीं कांहीं वर्षे त्याने राजकीय व सामाजिक प्रश्नांचा अभ्यास करण्यांत घालविलीं व परदेशांत प्रवास करून तेथील माहिती मिळविली. फ्रान्स देशांत जी राज्यक्रांति झाली तिचा पगडा काव्हूरच्या राजकीय मतांवर बराच बसला. काव्हूरच्या विचारांचा विकास

होत गेला, व इटली देशास परकीयांच्या बंधनापासून अजीबात मुक्त करण्याचे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. ऑस्ट्रियाच्या विरुद्ध पक्षाचें आधिपत्य स्वीकारण्यास तो तयार झाला. काव्हूरनें प्रसिद्ध केलेल्या लेखांचा एवढा परिणाम झाला कीं, थोड्याच काळांत पिडमाँटनें ऑस्ट्रियाविरुद्ध लढाई पुकारली. किरकोळ चकमकी झाल्यानंतर तात्पुरता तह करण्यांत आला. दुसरा व्हिक्टर इमॅन्युअल गादीवर आला. त्या वेळीं क्रीमिअन युद्ध सुरू झालें होतें. तेव्हां काव्हूरनें आपली मुत्सद्दीगिरी चांगली प्रत्ययास आणून दिली. ऑस्ट्रियाच्या विरोधास न जुमानतां काव्हूरनें पिडमॉटला जगाच्या राजकारणांत मोठ्या राष्ट्राचा दर्जा मिळवून दिला. पुढें काव्हूरनें पिडमाँटचें लष्करी सामर्थ्य वाढविलें. नेपोलिअननें काँग्रेस बोलावून इटलीच्या प्रश्नाचा निकाल लावावा, अशी योजना काढली, परंतु ऑस्ट्रियानें ही गोष्ट नाकबूल करून पिडमाँटनें शस्त्रसंन्यास करावा, अशाबद्दल निर्वाणीचा खलिता पाठविला. फ्रान्स व इंग्लंड या दोन्ही राष्ट्रांनीं इटलीची बाजू पत्करली. झुरिच येथील तह झाल्यानंतर पुन्हा १८५९ मध्यें काव्हूर मुख्य प्रधान झाला. नाईस प्रांत काव्हूरच्या कृतीनें हातचा गेल्यामुळें काव्हूर व गॅरीबॉल्डी यांच्यांत वितुष्ट आलें. गॅरीबॉल्डीची तयारी पाहून काव्हूरनें पोपच्या सत्तेखालील संस्थानें आपल्या राज्यास जोडावयाचीं, मात्र रोमला हात लावावयाचा नाहीं असें ठरविलें. रोम व व्हेनीस हीं शहरें वगळून काव्हूरची बाकीची 'संयुक्त इटली' स्वतंत्र झाली होती. त्याच्यासारख्या बुद्धिमान् व मुत्सद्दी पुरुषाची इटलीला अद्यापिहि गरज होती. सत्य व साध्य असेल तें करण्यापलीकडे काव्हूरनें आपल्या प्रयत्नांचा संचार जाऊं दिला नाहीं. मुत्सद्दीपणा व दूरदर्शित्व हे काव्हूरच्या अंगचे ईश्वरदत्त गुण होते. काव्हूरचें ध्येय इटली स्वतंत्र करून तिची पुनर्घटना करणें, हे होतें व त्याच्या प्रीत्यर्थ त्यानें आपलें आयुष्य व बुद्धिमत्ता हीं खर्चीं घालून तें गांठलें.

**कॉव्हेंट्री**—इंग्लंडमध्यें वॉरविकशायरमधील म्युनिसिपल व पार्लमेंटरी बरो. लो. सं. २,२१,३००. शेरवॉर्न व रेडफर्डब्रूक या नद्या आहेत. येथें बरींच प्रार्थनामंदिरें आहेत. येथें मोफत व्याकरण-शाळा, धंदेशिक्षणाची शाळा, कलाभुवन व मुलींकरितां शाळा व बालगुन्हेगारांची शाळा ह्या संस्था आहेत. बॉन्ड व फोर्ड हीं धर्मार्थ रुग्णालयें आहेत. मोटारी, सायकली, शिवणकामाचीं यंत्रें, सत्रंज्या, रंग, धातुकाम, घड्याळें, वगैरेंचे कारखाने येथें आहेत. अर्ल जिऑफ्रिक व त्याची पत्नी गॉडिव्हा यांनीं येथें बेनिडिक्टाइन मठ स्थापिल्यामुळें हें शहर अस्तित्वांत आलें. स. १२१६ पासून हें लोंकरीच्या कपड्यांच्या व टोप्यांच्या व्यापाराकरितां प्रसिद्ध आहे.

**कॉव्हेनंटर पंथ**—धर्मरक्षणासाठीं ज्यांनीं फार हाल सोसले त्यांमध्यें स्कॉटलंडमधील कॉव्हेनंटर पक्षांतील लोकांचा समावेश होतो. या पक्षानें इ. स. १६३७ पासून १६८८ च्या राजक्रांतीपर्यंत धर्मस्वातंत्र्यासाठीं मोठी चळवळ केली. १६६२ मध्यें जेव्हां कायदा होऊन 'सॉलेमलीग आणि कॉव्हेनंट' चा करार रद्द करण्यांत आला तेव्हांपासून प्रेसबिटेरियन संप्रदायाच्या संरक्षणासाठीं जे 'बंडखोर' लढले त्यांनाच विशेषतः कॉव्हेनंटर असें सार्थपणें मानण्यांत येतें.

**काशी**—संयुक्त प्रांत, बनारस जिल्ह्यांचें मुख्य ठिकाण व हिंदूंचें सर्वांत पूज्य क्षेत्र. हें गंगेच्या कांठीं वसलेलें असून संयुक्त प्रांतांत लोकसंख्येच्या मानानें लखनौच्या खालोखाल आहे.

काशी घाट

एकंदर लो. सं. २,६३,१००. काशी हें भरतखंडांतील अत्यंत प्राचीन शहरांपैकीं एक शहर होय. याला हिंदुस्थानचें अथेन्स अगर रोम असें म्हणतां येईल. आर्यांच्या संस्कृतीचें, विद्यांचें व तत्त्वज्ञानाचें माहेरघर म्हणून या शहराची ख्याति असून अद्यापिहि ती थोड्याफार फरकानें तशीच कायम आहे. वैदिक धर्म व बौद्ध धर्म हे या ठिकाणाहून सर्व भरतखंडांत विस्तार

पावले. सर्व भरतखंडांत हें शहर अत्यंत पवित्र असें यात्रेचें ठिकाण मानलें जातें. या शहराला काशी नांवाच्या प्राचीन वेदकालीन राष्ट्रावरून हें नांव पडलें असावें असें दिसतें. या काशी लोकांच्या राजाला काशीराज असें म्हणत असत. काशी यांचा धात्वर्थ ( काश् ) चकाकणें असा असून सर्व शहरांत चकाकणारें शहर यावरून त्याला काशी हें नांव पडलें असावें. पण या शहराला काशी हें नांव पडण्यापूर्वी 'वाराणशी' हें नांव असावें. कारण वारणा व असी या दोन नद्यांमधील प्रदेशांत हें शहर वसलें आहे. किंवा बनार राजा या देशावर राज्य करीत होता, त्यावरून त्याला बनारसी— वाराणशी हें नांव पडलें असावें. या शहराला जातक ग्रंथांत सुदस्सन, पुष्पावती, वगैरे उपनामें दिलेलीं आहेत. १८ व्या शतकांत दिल्लीच्या महंमदशहानें या शहराचें नांव 'महंमदाबाद' ठेवण्याचा यत्न केला, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं.

राजा दिवोदासानें हें काशीनगर वसविलें अशी दंतकथा आहे. महंमद घोरी हा काशीस लुटालूट करण्यास आला होता. तेथील विश्वेश्वराचें देऊळ औरंगजेबानें स. १६६९ त मोडलें. काशी व प्रयाग हीं क्षेत्रें मुसलमानांकडून परत घेण्याबद्दल पेशव्यांनीं अखेरपर्यंत खटपट केली. पुढें स. १७७५ च्या नंतर इंग्रजांचा अमल या शहरावर सुरू झाला. चिनी प्रवासी ह्युएनत्संग हा ७ व्या शतकांत हिंदुस्थानांत आला होता. त्यावेळीं काशीमध्यें ३० बौद्धविहार व १०० हिंदूंचीं देवालयें होतीं. आजमितीस काशींत १५०० हून अधिक देवळें आहेत. नदीच्या कांठावरील घाट फार सुंदर बांधलेले आहेत. घाटांची संख्या ४० हून अधिक आहे. असीसंगम, दशाश्वमेध, मणिकर्णिका, पंचगंगा हे प्रसिद्ध घाट आहेत. पुष्कळ हिंदु राजांनीं आपापल्या खर्चानें आपल्या नांवाचे घाट बांधविले आहेत. केदारघाट, नेपाळघाट व सर्वांत महत्त्वाचा घाट मणिकर्णिका हे आहेत. त्रिलोचन घाटावर त्रिलोचनाचें देवालय आहे. अन्नपूर्णेचें देवालय तेथें होणाऱ्या अगणित अन्नदानासाठीं प्रसिद्ध आहे. सर्वांत प्रमुख देऊळ विश्वेश्वराचें आहे. हे देऊळ फारसें सुंदर नाहीं व विशेष मोठेंहि नाहीं. लाहोरचा राजा रणजितसिंग यानें या देवळाला सोन्याचा मुलामा दिला. हें देऊळ इंदूरच्या अहल्याबाई राणीनें बांधलेलें आहे. विश्वेश्वराच्या खालोखाल भैरवनाथाचें देऊळ महत्त्वाचें मानलें जातें. ज्ञानवापी, नागकूप, पिशाचमोचन कुंड हीं प्रसिद्ध कुंडेहि आहेत. काशीच्या भोवतालची कांहीं मैल जागा अत्यंत पवित्र मानली जाते. प्रत्येक यात्रेकरूला काशीभोंवतीं प्रदक्षिणा घालावी लागते. याला पंचक्रोशीची यात्रा असें म्हणतात. फार प्राचीन काळापासून काशी शहराची तीर्थस्थान या नात्यानें प्रसिद्धि आहे. जैनांचा सातवा तीर्थंकर सुपार्श्वनाथ याचा जन्म काशींतच झाल्यानें हें स्थान जैनांनींहि पवित्र मानिलें आहे. मुसलमानांच्याहि मशिदी या ठिकाणीं पुष्कळ आहेत. काशी प्राचीन काळापासून सर्व विद्यांचें पीठ होतें. इ. स. १८१७ मध्यें वेदांचें अध्ययन करणारे ९८३ विद्यार्थी असून वेदशास्त्रपारंगत असे ४८ आचार्य होते. १८।१९ व्या शतकांत या शहरांत पुष्कळच शास्त्रीपंडितांचा भरणा होता. इ. स. १८९८ मध्यें डॉ. ॲनी बिझांटबाईच्या खटपटीनें सेंट्रल हिंदु कॉलेजची स्थापना झाली. १९१६ त येथें मदनमोहन मालवीय यांनीं हिंदु युनिव्हर्सिटी स्थापिली. तिला आज १४ कॉलेजें जोडलेलीं आहेत. येथें पितळेचें सामान चांगल्या प्रकारचें तयार होतें. किनखाफ, जर, रेशीम, यांचें कापड, दागिने व लाखेचें सामान उत्कृष्ट प्रकारचें तयार केलें जातें. येथें बर्फाचे कारखाने, विटांच्या भट्ट्या, दोन रसायनशास्त्रीय संस्था असे बरेच कारखाने व कांहीं छापखाने आहेत. सारनाथाच्या आसपासचीं जुनीं देवळें खणून बाहेर काढण्याचें काम चालू आहे. मुसलमानांनीं उध्वस्त केलेल्या अशा बऱ्याच इमारती येथें आहेत. काशी शहराच्या पश्चिमेस युरोपियन लोकांचें राहण्याचें ठिकाण आहे. या ठिकाणीं टांकसाळ, प्रिन्स ऑफ वेल्स हॉस्पिटल, टाउन हॉल, इत्यादि मोठ्या इमारती आहेत.

**काशीनाथ उर्फ बाबा पाध्ये** ( १७९०-१८०६ )—अनंतोपाध्यायाचा हा ज्येष्ठ पुत्र पंढरपुरांत राहत असे. जातीनें हा कऱ्हाडा ब्राह्मण. धार्मिक बाबतींत यानें लिहिलेल्या धर्मशास्त्रावरील 'धर्मसिंधु' ग्रंथाचा दक्षिणेंत फार उपयोग केला जातो. याशिवाय 'वेदस्तुति टीका', 'विठ्ठलऋङ्मन्त्रसारभाष्य' व 'कुण्डदिक्पाल' या ग्रंथांचा कर्ताहि हाच होय.

**काशीपूर**—संयुक्तप्रांत, नैनिताल जिल्ह्याच्या नैर्ऋत्येकडील तहसील व पोटविभाग. क्षे. फ. १८९ चौ. मैल. लो. सं. ६१,४८४ आहे. या तहसिलींत १३८ खेडीं व काशीपूर व जयपूर हीं दोन मोठीं गांवें आहेत. काशीपूर हें तहसिलीचें मुख्य ठिकाण. लो. सं. सु. पंधरा हजार. गांवाजवळ प्राचीन किल्ल्याचे व देवालयांचे पुष्कळ अवशेष आहेत. आसपास पुष्कळ तळीं आहेत. इ. स. १८०१ त हें गांव इंग्रजांकडे गेलें. कापड, भांडीं व इतर जिन्नस यांचा व्यापार येथें चालतो.

**काशीफळ**—ही भोपळ्याची जात आहे. या फळास चक्की असेंहि म्हणतात. हें फळ फार मोठें नसतें. भोपळ्यापेक्षां काशीफळाची भाजी कमी गोड असते. कांहीं जातींची भाजी फिकी लागते.

**काशीबाई पेशवे** ( मृ. १७५८ )—ही थोरल्या बाजीरावाची पत्नी व चासकर जोशी यांच्या घराण्यांतील महादाजी-

पंत याची मुलगी. लग्न १७११ च्या सुमारास झालें. ही पती-बरोबर स्वाऱ्यांत जात असे. हिचा स्वभाव शांत व गरीब असे. बाजीराव माळव्यांत शेवटच्या स्वारीस गेला असतां ही त्याच्या-बरोबर होती. बाजीराव नर्मदाकांठीं रावेरखेडी येथें वारला. नंतर सैन्यासह बाई पुणें येथें परत आली. पुढें ही देवधर्मांत काळ काढी. काशी-रामेश्वराची यात्रा हिनें केली होती.

**काशीराज पंडित**—काशीराज शिवाजी हा महाराष्ट्रीय ब्राह्मण असून दिल्लीच्या बादशहाचा वजीर सफदरजंग याच्या पदरीं प्रथम नोकरीस राहिला. त्याचा मुलगा अयोध्येचा नबाब सुजाउद्दौला यानें त्यास आपल्या बापाच्या वेळचा जुना व माहितगार माणूस समजून आपल्या दरबारांत वकिलातीचें काम दिलें. इ. स. १७६१ मध्यें पानिपत येथें जें मराठे व दुराणी यांचें घनघोर युद्ध झालें त्या वेळीं पंडित काशीराज हा तेथें हजर होता. यानें या प्रसंगीं युक्तीनें व शहाणपणानें मराठ्यांस शक्य तितकी मदत केली. या युद्धांत मराठ्यांचे मुख्य सेनापति भाऊसाहेब व विश्वासराव पेशवा हे रणभूमीवर पतन पावले. त्या वेळीं काशीराज यानें त्यांचीं प्रेतें शोधून काढून त्यांस त्यानें चंदनादि काष्ठें जमवून अग्नि दिला व त्यांची उत्तरक्रिया हिंदु-धर्माप्रमाणें उत्तम प्रकारें केली. याची एक बखर प्रसिद्ध आहे व कांहीं पत्रव्यवहारहि सांपडतो.

**काशी रामदास** (१६००–७८)— एक बंगाली कवि. बंगालमधील बरद्वान जिल्ह्यांतील सिंजी या गांवीं याचा जन्म झाला. आवासगढ (मिदनापूर) या गांवीं हा शिक्षक होता. यानें महाभारतांतील आदि, सभा, वन, विराट हीं पर्वें बंगाली भाषेत आणलीं. याचा भारतपुराण नामक ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. सिंजीच्या एका तलावास याच्या स्मरणार्थ 'केशेपुकुर' असें नांव देऊन लोकांनीं याच्यावरील आपली भक्ति व्यक्त केली आहे.

**काश्गर**—चिनी तुर्कस्तानांतील एक महत्त्वाचें शहर. मध्य आशि-यांतील इतर शहरांप्रमाणें बऱ्याच लोकांच्या हातांत हें शहर गेलें. तैमूरनें १३९० सालीं काश्गर बेचिराख केलें. मिर्झा अबूबकर यानें इ. स. १५१४ त या शहराचा नाश केला. काश्गर शहरावर चिनी अमल १७५९ नंतर चालू झाला. इ. स. १८६४–७७ पर्यंत अमीर याकुब बेग यानें येथें छोटेखानी राज्य स्थापिलें. तो १८७७ सालीं मरण पावल्यावर चिनी सरकारचा अमल तेथें पुन्हां बसला. रेशमी कापड, गालिचे व जिनाचें सामान येथें तयार होतें. लो. सं. ३०,०००.

**काश्मीर संस्थान**—हें एक पहिल्या प्रतीचें संस्थान हिंदुस्थानच्या उत्तरेस हिमालयाच्या पश्चिम भागांत वसलेलें आहे. क्षे. फ. ८४,४७१ चौ. मैल व लो. सं. ४०,२१,६१६ असून त्यांत शें. ७६ मुसलमान व २२ हिंदू व बाकीचे जैन, शीख, ख्रिस्ती, वगैरे आहेत. हें संस्थान चिनाब, झेलम, व सिंधु या तीन नद्यांच्या एकावर एक उंच अशा खोऱ्यांत वसलेलें आहे. दुसरें खोरें झेलम नदीचें ८,००० फूट उंचीवर आहे. तिसरी सिंधु नदी हिच्या खोऱ्यांत जातांना दरम्यान एक सुंदर दरी आहे, तिला 'नंदनवन' म्हणतात. या तिसऱ्या खोऱ्याच्या वर चढून गेल्यावर २०,००० फूट उंचीवर काराकोरम पर्वत आहे. या संस्थानांतलें सर्वांत उंच शिखर गॉड्विन ऑस्टेन हें २८,२६५ फूट उंच आहे. वरील तीन मोठ्या नद्यांखेरीज ८।१० लहान नद्या आहेत. सरोवरांना काश्मीरांत तोटा नाहीं. सर्वांत मोठीं सरोवरें दल व उलर हीं असून शिवाय मानसबल, अंचर, शिव-संगर, कंसनाग, पद्मी, शतपूर, इत्यादि गोड्या पाण्याचीं सरोवरें; पंगकॉंग, पंगूर, सोमोरिरी, हीं मोठालीं खाऱ्या-पाण्याचीं सरोवरें आहेत. शिवाय कोकारनाग व चष्मशाही येथील झरे उत्कृष्ट पाण्याबद्दल प्रसिद्ध आहेत. अनंतनाग हें

काश्मीर-दृश्य

स्थान-अगणित झऱ्यांबद्दल विख्यात आहे. मलिकनाग नांवाचा झरा गंधकयुक्त पाण्याचा असून त्याचें पाणी बागांना फार मानवतें. काश्मीरचा प्रदेश पीरपिंजाल पर्वताच्या रांगेनें सुरक्षित असल्यामुळें येथे पाऊस नियमित पडत नाहीं. ऑक्टोबर ते मार्चपर्यंत अतोनात बर्फ पडतें. जानेवारी–फेब्रुवारींत कडक थंडी पडते. जुलै-ऑगस्टांत उन्हाळा बराच असतो. काश्मीरमध्यें दऱ्या पुष्कळ व पाणी विपुल असल्यामुळें हरतऱ्हेचीं झाडें-झुडपें फार आहेत; देवदारु, अक्रोड, तुती, इत्यादि झाडांचीं जंगलेंच्या जंगलें आहेत, भूर्जवृक्षांच्या राया पसरल्या आहेत, हिंगाचीं झाडें मुबलक आहेत. भांग वनस्पतीची समृद्धि आहे. निरनिराळे रंग तयार होतील अशा वनस्पती पुष्कळ आहेत. काळवीट, अस्वलें, कस्तुरीमृग, तित्तिरपक्षी, लावीपक्षी, बदकें, कोकिळा, राघू शिवाय सर्प अनेक जातीचे व विषारी आहेत. वज्रतुंड, जंबूर, व खडूचे दगड यांचे थरच्याथर आहेत. येथें दुष्काळ, पूर, धरणीकंप, व आगी हीं संकटें, विशेषतः पुराचे संकट वरचेवर येतें, लदख प्रांतांत धरणीकंपाची बाधा नेहमीं होते.

काश्मीरचा प्राचीन इतिहास १२ व्या शतकांत कल्हण पंडितानें 'राज- तरंगिणी' नामक ग्रंथांत सन ११४८ पर्यंतचा लिहिला, नंतर जोनराजकवीनें १४२० पर्यंतचा, श्रीधरकवीनें १४८६ पर्यंतचा, आणि प्रज्ञाभट्ट कवीनें आपल्या 'राजवल्लीपदक' ग्रंथांत १५८८ पर्यंतचा इतिहास लिहिला. प्राचीन काळीं येथें नाग नांवाचे लोक राहात असत, व गोनर्द नांवाचा राजा राज्य करीत होता, त्याच्या गोनर्दीय वंशानें इ. स. ६०२ पर्यंत राज्य केलें. दरम्यान ख्रिस्तीशकारंभाच्या सुमारास कुशान घराण्यांतील हुविष्क, जुष्क व कनिष्क यांनीं येथें राज्य केले व बौद्धधर्माचा प्रसार केला. नंतर कर्कोटक वंशानें ८५० पर्यंत, नंतर उत्पल घराण्यानें १००३ पर्यंत, लोहर घराण्याने ११०१ पर्यंत, नंतर सातवाहन घराण्याने १३३९ पर्यंत राज्य केल्यावर हा प्रदेश मुसलमानांनीं घेतला; तो दिल्लीच्या मोगली सत्तेखालीं १७५१ पर्यंत होता, नंतर अफगाणी व दुराणी लोकांनीं १८१९ पर्यंत सत्ता चालविली, पण त्यांनीं प्रजेवर फार जुलूम केल्यामुळें रणजितसिंगानें हा प्रदेश जिंकला. तेथे शीखांचे सुभेदार कारभार करूं लागले. १८४० च्या सुमारास गुलाबसिंग या डोग्रा रजपूत कर्तृत्ववान् वीरानें काश्मीरवर आपली सत्ता बसविली, इंग्रजांशीं सलोखा राखला; शीख युद्धांत व १८५७ च्या बंडांत इंग्रजांना मदत केली. त्यामुळें इंग्रजांनीं गुलाबसिंगाचें व त्याच्या वंशजांचें काश्मीरवरील आधिपत्य मान्य केलें.

या संस्थानचे जम्मू, काश्मीर व सरहद्दप्रांत असे तीन विभाग, आणि जम्मू, जसरोटा, उधमपूर, रैसी, मिरपूर, उत्तरकाश्मीर, दक्षिण काश्मीर,-मुझफराबाद, लदख व गिलजित असे १० जिल्हे आहेत, आणि पुनिअल, इकोमन, यसीन, झुंझा, नगर व छिलस हीं सहा मांडलिक संस्थानें, तसेंच पुंच, मदखह, व चनेनी या तीन जहागिरी आहेत. अलीकडील महाराज गुलाबसिंग (१८२०–१८), रणवीरसिंग (१८५७–१८५८), प्रतापसिंहजी (१८८५–१९२५), हरीसिंहजी (१९२५–) यांच्या कारकीर्दींत आधुनिक सुधारणा होऊन १९२२ पासून एक्झीक्यूटिव्ह कौन्सिलच्या हातीं राज्यकारभार देण्यांत आला. संस्थानचे उत्पन्न साडे चार कोटी रु. आहे. येथें मुख्य धंदा शेती असून भात, गहूं, मका, बार्ली, कापूस, तीळ, तमाखू, अक्रोड, केशर, व अनेक प्रकारचीं फळें होतात. जंगलें मोठालीं आहेत. सोनें, तांबें, जस्त, शिसें, दगडी कोळसा, इत्यादि खनिज द्रव्यें सांपडतात. पदर इलाख्यांत नीलमण्यांची खाण १८८२ सालीं सांपडली, ती सरकारच्या ताब्यांत आहे. रेशीम, गालीचे, ब्लँकेटें, नक्षीकाम, तेल, दारू, इत्यादि अनेक प्रकारचे कारखाने येथें आहेत. रेशमी शाली व गालिचे यांबद्दल काश्मीरची फार प्रसिद्धि आहे. येथे तीन कॉलेजे व एक ओरिएंटल कॉलेज आणि इतर शिक्षणसंस्था आहेत. प्राथमिक शिक्षण १९२९ पासून सक्तीचें करण्यांत आलें आहे. १९४७ सालीं हिंदुस्थानची फाळणी झाल्यानंतर काश्मीर संस्थान कोणाकडे सामील व्हावें याबद्दल तंटे सुरू झाले. सरहद्दीवरील टोळ्यांनीं आक्रमण केलें व हिंदीसंघराज्यानें त्याला आडकाठी केली व राष्ट्रसंघाकडे तक्रार नेली, ती अद्यापि चालू आहे. येथें शैव, वैष्णव, शाक्त, गाणपत्य हे पंथ असून त्यांत शैवपंथ मुख्य आहे. काश्मीरी पंडित सर्व शैव आहेत. राजभाषा उर्दू, शिवाय काश्मीरी, पहाडी, डोग्री या प्रमुख भाषा आहेत. येथें शिव, राम, कृष्ण, महावीर, भैरवनाथ, शारदादेवी, या प्रमुख देवता असून त्यांप्रीत्यर्थ असंख्य यात्रा व उत्सव साजरे होतात; त्यांत अमरनाथ, त्रिकूटतीर्थ, शिवजी या जत्रा फार प्रसिद्ध आहेत.

काश्मीरला हिंदुस्थानचे 'नंदनवन' म्हणतात. त्याप्रमाणें सर्वच काश्मीर प्रदेश पाहण्यासारखा आहे. सोनामार्ग, गुलमार्ग यांसारखीं शीतल निवासस्थानें; नंगापर्वत, अमरनाथ, वगैरे हिमाच्छादित शिखरें; मानसबल, डाल यांसारखीं रमणीय सरोवरें; पीरपंजाल, झोझिला, यांसारखे नयनरम्य घाट; सुखनाग, नीलनाग, यांसारखे झरे इत्यादि शेंकडों स्थळें पाहण्यासारखीं आहेत. श्रीनगरमध्यें व आसपास शालिमार बाग जहांगीर बादशहाने बांधलेली, जुम्मामशीद शिकंदर लोदीनें बांधलेली, निषातबाग नूरजहानचा भाऊ असफशाहानें बांधलेली, शंकराचें देऊळ अशोकाचा पुत्र जलौक यानें ख्रि. पू. २७ सालीं बांधलेलें,

काश्मीर— रस्त्यावरील कमळें (पृ. ४७८)

काश्मिरी पंडित (पृ. ४७८)

कोनारक— सूर्यमंदिर (पृ. ५५२)

स्थान अगणित झऱ्यांबद्दल विख्यात आहे. मलिकनाग नांवाचा झरा गंधकयुक्त पाण्याचा असून त्याचें पाणी बागांना फार मानवतें. काश्मीरचा प्रदेश पीरपंजाल पर्वताच्या रांगेनें सुरक्षित असल्यामुळें येथें पाऊस नियमित पडत नाहीं. ऑक्टोबर ते मार्चपर्यंत अतोनात बर्फ पडतें. जानेवारी–फेब्रुवारींत कडक थंडी पडते. जुलै–ऑगस्टांत उन्हाळा बराच असतो. काश्मीरमध्यें दऱ्या पुष्कळ व पाणी विपुल असल्यामुळें हरतऱ्हेचीं झाडें-झुडपें फार आहेत; देवदारु, अक्रोड, तुती, इत्यादि झाडांचीं जंगलेंच्या जंगलें आहेत, भूर्जवृक्षांच्या राया पसरल्या आहेत, हिंगाचीं झाडें मुबलक आहेत. भांग वनस्पतीची समृद्धि आहे. निरनिराळे रंग तयार होतील अशा वनस्पती पुष्कळ आहेत. काळवीट, अस्वलें, कस्तुरीमृग, तित्तिरपक्षी, लावीपक्षी, बदकें, कोकिळा, राघू शिवाय सर्प अनेक जातीचे व विषारी आहेत. वज्रतुंड, जंबूर, व खड्ड्चे दगड यांचे थरच्याथर आहेत. येथें दुष्काळ, पूर, धरणीकंप, व आगी हीं संकटें, विशेषतः पुराचें संकट वरचेवर येतें, लदख प्रांतांत धरणीकंपाची बाधा नेहमीं होते.

काश्मीरचा प्राचीन इतिहास १२ व्या शतकांत कल्हण पंडितानें 'राज- तरंगिणी' नामक ग्रंथांत सन ११४८ पर्यंतचा लिहिला, नंतर जोनराजकवीनें १४२० पर्यंतचा, श्रीधरकवीनें १४८६ पर्यंतचा, आणि प्रज्ञाभट्ट कवीनें आपल्या 'राजवल्लीपदक' ग्रंथांत १५८८ पर्यंतचा इतिहास लिहिला. प्राचीन काळीं येथें नाग नांवाचे लोक राहात असत, व गोनर्द नांवाचा राजा राज्य करीत होता, त्याच्या गोनर्दीय वंशानें इ. स. ६०२ पर्यंत राज्य केलें. दरम्यान ख्रिस्तीशकारंभाच्या सुमारास कुशान घराण्यांतील हुविष्क, जुष्क व कनिष्क यांनीं येथें राज्य केले व बौद्धधर्माचा प्रसार केला. नंतर कर्कोटक वंशानें ८५० पर्यंत, नंतर उत्पल घराण्यानें १००३ पर्यंत, लोहर घराण्यानें ११०१ पर्यंत, नंतर सातवाहन घराण्याने १३३९ पर्यंत राज्य केल्यावर हा प्रदेश मुसलमानांनीं घेतला; तो दिल्लीच्या मोगली सत्तेखालीं १७५१ पर्यंत होता, नंतर अफगाणी व दुराणी लोकांनीं १८१९ पर्यंत सत्ता चालविली, पण त्यांनीं प्रजेवर फार जुलूम केल्यामुळें रणजितसिंगानें हा प्रदेश जिंकला. तेथें शीखांचे सुभेदार कारभार करूं लागले. १८४० च्या सुमारास गुलाबसिंग या डोग्रा रजपूत कर्तृत्ववान् वीरानें काश्मीरवर आपली सत्ता बसविली, इंग्रजांशीं सलोखा राखला; शीख युद्धांत व १८५७च्या बंडांत इंग्रजांना मदत केली. त्यामुळें इंग्रजांनीं गुलाबसिंगाचें व त्याच्या वंशजांचें काश्मीरवरील आधिपत्य मान्य केलें.

या संस्थानचे जम्मू, काश्मीर व सरहद्दप्रांत असे तीन विभाग, आणि जम्मू, जसरोटा, उधमपूर, रैसी, मिरपूर, उत्तरकाश्मीर, दक्षिण काश्मीर, मुझफराबाद, लदख व गिलजित असे १० जिल्हे आहेत, आणि पुनिअल, इश्कोमन, यसीन, हुंझा, नगर व छिल्स हीं सहा मांडलिक संस्थानें, तसेंच पुंच, मदरवह, व चनेनी या तीन जहागिरी आहेत. अलीकडील महाराज गुलाबसिंग (१८२०–१८), रणवीरसिंग (१८५७–१८५८), प्रतापसिंहजी (१८८५–१९२५), हरीसिंहजी (१९२५–) यांच्या कारकीर्दींत आधुनिक सुधारणा होऊन १९२२ पासून एक्झीक्यूटिव्ह कौन्सिलच्या हातीं राज्यकारभार देण्यांत आला. संस्थानचे उत्पन्न साडे चार कोटी रु. आहे. येथें मुख्य धंदा शेती असून भात, गहूं, मका, बार्ली, कापूस, तीळ, तमाखू, अक्रोड, केशर, व अनेक प्रकारचीं फळें होतात. जंगलें मोठालीं आहेत. सोनें, तांबें, जस्त, शिसें, दगडी कोळसा, इत्यादि खनिज द्रव्यें सांपडतात. पदर इलाख्यांत नीलमण्यांची खाण १८८२ सालीं सांपडली, ती सरकारच्या ताब्यांत आहे. रेशीम, गालीचे, ब्लँकेटें, नक्षीकाम, तेल, दारू, इत्यादि अनेक प्रकारचे कारखाने येथें आहेत. रेशमी शाली व गालिचे यांबद्दल काश्मीरची फार प्रसिद्धि आहे. येथें तीन कॉलेजें व एक ओरिएंटल कॉलेज आणि इतर शिक्षणसंस्था आहेत. प्राथमिक शिक्षण १९२९ पासून सक्तीचें करण्यांत आलें आहे. १९४७ सालीं हिंदुस्थानची फाळणी झाल्यानंतर काश्मीर संस्थान कोणाकडे सामील व्हावें याबद्दल तंटे सुरू झाले. सरहद्दीवरील टोळ्यांनीं आक्रमण केलें व हिंदीसंघराज्यानें त्याला आडकाठी केली व राष्ट्रसंघाकडे तक्रार नेली, ती अद्यापि चालू आहे. येथे शैव, वैष्णव, शाक्त, गाणपत्य हे पंथ असून त्यांत शैवपंथ मुख्य आहे. काश्मीरी पंडित सर्व शैव आहेत. राजभाषा उर्दू, शिवाय काश्मीरी, पहाडी, डोग्री या प्रमुख भाषा आहेत. येथे शिव, राम, कृष्ण, महावीर, भैरवनाथ, शारदादेवी, या प्रमुख देवता असून त्यांप्रीत्यर्थ असंख्य यात्रा व उत्सव साजरे होतात; त्यांत अमरनाथ, त्रिकूटतीर्थ, शिवजी या जत्रा फार प्रसिद्ध आहेत.

काश्मीरला हिंदुस्थानचे 'नंदनवन' म्हणतात. त्याप्रमाणे सर्वच काश्मीर प्रदेश पाहण्यासारखा आहे. सोनामार्ग, गुलमार्ग यांसारखीं शीतल निवासस्थानें; नंगापर्वत, अमरनाथ, वगैरे हिमाच्छादित शिखरें; मानसबल, डाल यांसारखीं रमणीय सरोवरें; पीरपंजाल, झोझिला, यांसारखे नयनरम्य घाट; सुखनाग, नीलनाग, यांसारखे झरे इत्यादि शेंकडों स्थळें पाहण्यासारखीं आहेत. श्रीनगरमध्यें व आसपास शालिमार बाग जहांगीर बादशहानें बांधलेली, जुम्मामशीद शिकंदर लोदीनें बांधलेली, निशातबाग नूरजहानचा भाऊ असफशाहानें बांधलेली, शंकराचें देऊळ अशोकाचा पुत्र जलौक यानें ख्रि. पू. २७ सालीं बांधलेलें,

काश्मीर— रस्त्यावरील कमळें (पृ. ४७८)

काश्मिरी पंडित (पृ. ४७८)

कोनारक— सूर्यमंदिर (पृ. ५५२)

श्रीनगर येथील अजबखाना, झेलम नदीच्या दरींतलें मार्तंडाचें देवालय, झेलम नदीवरील सात पूल व पुलांखालील देवालयें, झेलम व दूधगंगा या नद्यांच्या संगमानजीक क्षेमगौरीश्वराचें देवालय, इत्यादिक प्रेक्षणीय ठिकाणें पुष्कळ आहेत.

**काश्मीरी बकरा**—हा सामान्यतः इतर बकऱ्यांप्रमाणेंच असतो, परंतु याचे केंस लांब व मऊ असतात. या जातीचे सर्वांत चांगले बोकड तिबेटमध्यें आढळतात. जितका प्रदेश थंड असेल तितकी याची लोंकर लांब वाढते. सामान्यतः एका बकऱ्यापासून पावशेर लोंकर मिळते.

**काश्मीरी ब्राह्मण**—काश्मीरांतील सर्व हिंदू बहुधा ब्राह्मणच आहेत. या ब्राह्मणांना पंडित असें म्हणतात. काश्मीरी ब्राह्मण पूर्ण मांसाहारी आहेत. कांहीं लोक यांना सारस्वत समजतात. कौल नांवाचा वर्ग उच्च मानला जातो. काश्मीरी ब्राह्मणांचा धंदा म्हणजे बहुधा लेखकाचा किंवा पुस्तकविक्याचा होय. हे लोक फारसी उत्तम जाणतात. हिंदुस्थानचे पंतप्रधान जवाहिरलाल नेहरू हे काश्मीरी ब्राह्मण आहेत.

**काश्मीरी भाषा**—काश्मीर खोरें व त्याच्या आजूबाजूचे डोंगर यांतून ही भाषा चालते. काश्मीरी भाषा बोलणारे एकंदर पंधरा लक्ष लोक आहेत. या भाषेचा समावेश पैशाची भाषेच्या दर्द संघांत होतो. काश्मीरमध्यें पुष्कळ शतकांपर्यंत, संस्कृत भाषेचा अभ्यास चांगला चालू असे, त्यामुळें काश्मीरी शब्दसंग्रह व व्याकरण हीं अलीकडे पुष्कळांशीं भारतीय बनलीं आहेत. कल्हणाच्या संस्कृत राजतरंगिणीनें शुद्ध काश्मीरी शब्द संरक्षिलेले आहेत. काश्मीरींत बरेंच मोठें साहित्य आहे. पण ते कोणी फारसें अभ्यासिलेलें दिसत नाहीं.

**काश्यप**—१. कश्यप कुलोत्पन्न ऋषि. हा दक्षिणेंतील एक आद्य वसाहतकार मानला जातो. एक वैय्याकरण काश्यप आहे व दुसरा धर्मशास्त्रकार आहे.

२. एक मांत्रिक ब्राह्मण. परीक्षित राजास सर्पदंश झाला असतां यानें आपल्या मंत्रसामर्थ्यानें त्यास द्रव्य घेऊन सजीव करण्याचें मनांत आणलें, पण तक्षकानें याला अधिक द्रव्य देऊन परस्पर वाटेस लावलें.

**काश्यप मातङ्ग**—गांधार देशांतील एक श्रमण. चिनी राजा मिंगति याच्या निमंत्रणाचा स्वीकार करून हा तिबेट मार्गानें चीनमध्यें बौद्ध धर्मोपदेशक म्हणून गेला. चिनी राजानें यास स्वतंत्र मठ बांधून देऊन बौद्ध धर्माच्या प्रसारासाठीं सर्व तऱ्हेचें साहाय्य दिलें. तेथील भाषेचा अभ्यास करून यानें बौद्ध ग्रंथांचें त्या भाषेंत भाषांतर केलें. हा तेथेंच मरण पावला. एवढा अवघड प्रवास खुषीनें स्वीकारून चीनमध्यें बौद्ध धर्माच्या प्रचाराचें भरीव कार्य करणारा हा पहिलाच धाडसी धर्मोपदेशक होय.

**काष्ठतेल**—( क्रिओसोट ). लांकडाचें किंवा दगडी कोळशाचें डांबर घेऊन त्याचें उर्ध्वपातन केलें असतां जें एक निरनिराळ्या पदार्थांचें मिश्रण उत्पन्न होतें त्यास म्हणतात. या दोन द्रव्यांपासून मिळणाऱ्या तेलांत फरक असतो. डांबरापासून मिळणारें तेल २३० ते २७० शतांश उष्णमानामध्यें मिळूं शकतें. लांकडाच्या डांबरापासून मिळणारें तेल बहुधा बीच झाडाच्या लांकडापासून काढतात. हें निर्वर्ण असतें. हें प्रथम १८३२ मध्यें काढण्यांत आलें.

**काष्टिन**—( क्सायलीन ). याचें दुसरें नांव द्विमथिल ऊदिन ( डायमेथिल बेंझिन ) असें आहे. कोळशाच्या डामराचें ऊर्ध्वपातन केलें असतां जो हलक्या तेलाचा भाग येतो त्यांत काष्टिन असतें. याचीं तीन समवटक रूपें ( आयसोमर्स ) आहेत.

**कास** ( खोकला )—( इं. ब्रॉंकिटिस ). श्वासनलिकांतील श्लेष्मल आवरणाचा दाह झाला किंवा त्यास सूज आली म्हणजे खोकला येऊं लागतो. सामान्यतः निरोगी प्रौढ माणसास यापासून फारसा अपाय होत नाहीं. परंतु लहान मुलांच्या किंवा वृद्ध माणसाच्या बाबतींत याची वाढ पुढें श्वासनलिका फुप्फुसदाहामध्यें होते. सामान्यतः थंडी झाली म्हणजे खोकला होतो व याचें कारण मस्तकामध्यें शैत्य होणें हें असतें. खोकला हा इतर अनेक रोगांबरोबर आनुषंगिक असूं शकतो. उदा.—गोवर, डांग्याखोकला, विषमज्वर, हिंवताप, तसेंच मूत्राशयाचे रोग, गुडघी रोग, हृद्रोग, वगैरेंमध्यें कायमचा खोकला जडण्याचा संभव असतो. याचीं पूर्वचिन्हें म्हणजे हिंव येणें, डोकें दुखणें, अशक्तता वाटणें, कळा येणें, किंचित् ताप येणें वगैरे रोगाच्या मानानें होत असतात. विशेषतः छातींत बांध बसल्यासारखें होऊन खोकल्याची उचल येणें व त्यामुळें पोट दुखूं लागणें हीं लक्षणें सामान्य आहेत.

सामान्य खोकला झाला असतां, गरम पाण्यांत पाय ठेवणें, गरम पाण्यानें स्नान करणें, गरम पेय पिणें, तसेंच मोहरीचें पोटीस छातीवर ठेवणें या गोष्टी उपयुक्त आहेत. विशेष जोराचा खोकला असल्यास रोग्यानें निजून राहून घसा दाटला असेल तोंपर्यंत औषधोपचार करावे. तसेंच रोग्याच्या खोलींत दमटपणा उत्पन्न केल्यास त्यापासून खोकला कमी होतो. कायमचा खोकला बरा होणें कठीण असतें.

**कासगंज**—संयुक्त प्रांत, याच नांवाच्या तहशिलीचें मुख्य ठिकाण. हें कानपूर-अछनेरा रेल्वेवर व मथुरा-बरेली रस्त्यावर आहे. हें जिल्ह्यांतील व्यापाराचें मुख्य ठिकाण असून येथील लो. सं. सु. वीस हजार आहे. येथें साखर स्वच्छ करण्याचा धंदा वाढत असून, गांवांत कापूस पिंजण्याचे व दाबण्याचे कारखानेहि आहेत.

**कॉसग्रेव्ह, विल्यम थॉमस** (१८८०- )—एक आयरिश राजकारणी पुरुष. तो डेलआयरेन (आयरीश पार्लमेंट)-मध्यें स्थानिक स्वराज्यखात्याचा मंत्री होता. १९२२ मध्यें तो आयरीश फ्री स्टेटच्या कारभारी मंडळाचा अध्यक्ष निवडला गेला. १९३२ पर्यंत तो त्या जागीं होता, पण त्या वर्षी त्याच्या पक्षाचा निवडणुकींत पराभव झाला.

**कासव**—हा एक सरपटणाऱ्या प्राण्यांचा वर्ग आहे. याच्या

अनेक जाती आहेत. या प्राण्याचें वैशिष्ट्य म्हणजे याच्या शरीराची व याच्या शरीरांतील सांपळ्याची अगदीं भिन्न प्रकारची रचना, तसेंच शरीरावरचें कठिण अस्थिमय पेटीसारखें कवच. यांची एक जात जमिनीवर राहणारी असून त्यांचे अवयव आंखूड व खुजट असतात व त्यामुळें त्यांस जमिनीवर चालतां येतें. यांच्या पायाचीं बोटें आंखूड असून तीं कातड्यानें एकत्र बांधलेलीं असतात आणि त्यांस चांगलीं नखें असतात. हीं कासवें भूमध्यसमुद्राच्या कांठच्या देशांत आढळतात. यांचें आयुष्य फार दीर्घ असतें. या जातीचें सर्वांत मोठे राक्षसी प्राणी गॅलॅपगॉस बेटें आणि हिंदी महासागरांतील कांहीं बेटें यांत आढळतात.

याच्या कांहीं जाती पाण्यांत राहतात, तसेच कांहीं जाती चिखलांत राहतात. कासव शे-दीडशें वर्षें जगतें म्हणतात. याच्या पाठीच्या ढाली पूर्वी करीत. हल्लीं चष्म्याच्या फ्रेमी करतात.

फार मोठ्या आकाराचें कासव उष्णकटिबंधांतील समुद्रांत असतें व यांच्याच पाठी मुख्यत्वें विकल्या जातात. ही पाठ साधारणपणें १०० शेरांहून जास्त वजनाची नसते व हें कासव ॲटलांटिक व हिंदी महासागरांत मिळतें. या कासवाच्या पाठीवरील शृंगी खवले सुंदर रीतीनें जडलेले असतात व सुंदर तांबूस व पिवळ्या रंगानें रंगलेले असतात. इकडे पूर्वी कासवाच्या पाठीच्या ढाली करीत व त्याकरितां या पाठींचा इकडे खप होत असे. पण विलायतेंत शिंगाप्रमाणें कांसवाच्या पाठीचा अनेक पदार्थ करण्यास उपयोग करीत असल्यानें तिकडे या पाठींचा खप पुष्कळ होतो. फक्त विलायतेंत दरसाल दोन अडीच लक्ष रुपयांच्या कासवाच्या पाठी खपतात व त्या मुख्यत्वें सिंगापुराहून जातात.

**कांसार**—तांब्यापितळेचीं भांडीं करणारी जात. यांची वस्ती मुंबई प्रांत, मध्यप्रांत, वऱ्हाड व मध्यहिंदुस्थान यांतून आहे. १९११ त लोकसंख्या ३६,२२८ होती. त्वष्टा कासार भांडीं तयार करतात व बोगारकासार तीं विकतात. बांगड्या विकण्याचें कामहि बोगार करतात. त्वष्टा कासार आपणांस पांचाल ब्राह्मण म्हणवितात. कांहीं कासार जैनधर्मी आहेत. कासार हे कालीचे उपासक आहेत. संयुक्त प्रांतांत कासारांना कसेरा म्हणतात, व ते आपणांस क्षत्रिय म्हणवितात. त्वष्टा कासारांतील बरेच लोक सुशिक्षित असून त्यांनीं समाजोन्नतीसाठीं कांहीं संस्थाहि चालविल्या आहेत.

**कासारबारी** (द्वार)—हा घाट अथवा बारी पूर्व खानदेशांत सातमाळाच्या डोंगरांत आहे. खानदेशांतून पैठणकडे जाण्याचे जे तीन चार घाट होते त्यांपैकीं कासारबारीचा हा एक घाट आहे असें पेरिप्लस म्हणतो (इ. स. २४७). खानदेशांतून निजामशाहींत जातांना ही बारी लागते. दक्षिणेंतून उत्तरेकडे बऱ्हाणपूरच्या बाजूस जावयास हा राजरस्ता-सैन्य उतरेल असा प्रसिद्ध होता.

**कांसार-वाणी**—यांची संख्या सुमारें ८० हजार असून यांपैकीं निम्याहून अधिक वाणी संयुक्त प्रांतांत आढळतात. त्यांच्यापैकीं बरेचसे लोक रामानंदी संप्रदायाचे असून ते पांचोत्रन पीर व महावीर यांची उपासना करतात. कांहीं पांचोत्रन पिराचे उपासक मांसाशन करतात. परंतु महावीराचे उपासक निर्मांस आहेत.

**कासाव्हा**—दक्षिण अमेरिकेमध्यें आढळणारें एक झुडुप. याची उंची सुमारें आठ फूट असते. पानें रुंद, तकतकीत, हातांच्या पंजासारखीं असून सुंदर पांढरीं व गुलाबी फुलें येतात. याच्या मुळाचें पांढरें स्वच्छ सत्त्व निघतें त्यास कासाव्हा म्हणतात. हें काढण्याची कृति अशी असते. मुळें धुऊन तीं सोलून काढतात. नंतर किसून त्यांचा लगदा करतात. हा लगदा दाबून पिळून त्याचा रस काढतात. हा रस स्वाभाविक स्थितींत फार विषारी असतो. रस पिळल्यावर जो चोथा किंवा पीठ राहतें त्याच्या वड्या करतात व त्या लोखंडी तव्यावर भाजतात. यांचा अन्न म्हणून दक्षिण अमेरिकेंतील पुष्कळ लोक उपयोग करतात. या कासाव्हापासूनच बाजारांत जें टापिओका नांवाचें सत्त्व मिळतें तें तयार करतात. याची एक निराळी गोडी जात (एम. ऐपी) आहे तिचा रस विषारी नसतो. तें चवदार व पौष्टिक असतें.

**कासिटेराइट धातु**—( वंग प्राणिद ). हा काळ्या पिंगट रंगाचा धातु कठिण, जड व चकचकीत असतो. जस्ताशीं हा संयुक्त असून वज्रतुंड ( ग्रॅनाइट ) दगडांत सांपडतो. कॉर्नेवॉल-मध्यें यान्या खाणी आहेत.

**कासीमबझार**—बंगाल, मुर्शिदाबाद जिल्ह्यांतील एका पोट-विभागाचें प्रमुख ठिकाण. ह्या गांवाचें ऐतिहासिक दृष्टीनें अधिक महत्त्व आहे. १९ व्या शतकाच्या आरंभीं तर इंग्रज लोक भागीरथी नदीस 'कासीमबझार' नदी म्हणत असत. कलकत्ता शहराची स्थापना होण्यापूर्वीं कासीमबझार फार मोठें व महत्त्वाचें शहर होतें. स. १६८६ सालीं नबाब शाइस्तेखानाच्या हुकुमावरून कासीमबझार येथील वसाहत सरकारजमा करण्यांत आली. कासीमबझार हें शहर त्या वेळीं अगदीं भरभराटींत होतें. इंग्रजांच्या येथील वखारीस महत्त्व येण्याचें कारण मुर्शिदाबाद हें राजधानीचें शहर होय. येथें कांहीं भव्य वाडे आहेत. वॉरन हेस्टिंग्जच्या पहिल्या बायकोचें थडगें येथें आहे.

**कासूर**—पंजाब, लाहोर जिल्ह्याचा पोटविभाग. यांत कासूर व चुनियान या तहशिली आहेत. कासूर तहसील सतलज नदीच्या उत्तर तीराला असून क्षे. फ. ८१२ चौ. मैल आहे. यांतून बारी-दुआब कालवा जातो. या तहशिलींत ३४२ खेडीं व कासूर हें तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. सुमारें तीन लक्ष आहे. सोब्रॉनचें रणक्षेत्र याच तहशिलींत आहे. कासूर शहराची लो. सं. ( १९४१ ) ५३,१०१ होती. पैकीं $\frac{1}{4}$ हिंदू व $\frac{3}{4}$ मुसलमान आहेत. १८०७ मध्यें रणजितसिंगानें सरदार कुतुबुद्दीन याचा पराभव करून कासूर लाहोरच्या राज्यास जोडलें. कासूर हें सर्वांत मोठें गांव असून धान्य, कापूस, वगैरे-च्या स्थानिक व्यापाराचें तें केंद्र आहे. तेथें कापूस दाबण्याचे व सरकी काढण्याचे कारखाने आहेत. या गांवीं १९१९ सालीं रौलट कायदा पास झाल्या वेळीं दंगल झाली होती.

**कांसें**—ही मिश्रधातु ४ भाग कथील व १ भाग शिसें यांपासून होते. उंची कांस्यांत थोडें तांबें मिसळतात. ब्रिटानिया धातु तयार करतांना कथील, पितळ, ॲंटिमनी व बिसमथ यांचें मिश्रण करतात. कांशाच्या घंटा व इतर भांडीं करतात.

**कासेगवत**—( सं. काश ). हिंदुस्थान व सिलोनमधील ६, ००० फूट उंचीच्या उष्ण प्रदेशांत हें गवत सांपडतें. याची वाढ फार जोराची असल्यामुळें हीं रोपें समूळ उपटून काढतां येत नाहींत. विशेषतः आसाम व बंगालमधील चहाच्या मळ्यांत याचा फराच उपद्रव होतो. हें गवत मोठें जाड व राठ असून घरांची शाकारणी करण्यास याचा उपयोग होतो. पानें, देंठ वगैरेपासून दोर व चटया करतात. हें गवत म्हशी व रेडे यांना विशेषेंकरून घालतात. देशी लेखण्यांसाठीं बोरूसारखीं याचीं कांडीं फार उपयोगी पडतात.

**कासेगांव**— १. मुंबई, सोलापूर जिल्हा. हें सोलापूरच्या ईशान्येस ८ मैलांवर आहे. गांवांत कासेश्वराचें हेमाडपंती देवालय आहे. येथें १७७४ सालीं रघुनाथराव पेशवा व बार-भाईतर्फे त्र्यंबकराव मामा पेठे यांची लढाई होऊन तींत मामाचा पराभव झाला.

२. मुंबई, सातारा जिल्ह्याच्या वाळवे तालुक्यांतील एक खेडें. येथील लो. सं. सु. सहा हजार आहे व तालुक्यांतील भर-भराटीच्या गांवांपैकीं हें एक आहे. येथील व्यापारी सधन असून ते कोंकण प्रांताशीं तंबाखू, मिरची व ऊंस या जिनसांचा व्यापार करतात.

**कास्पियन समुद्र**—युरोप आणि आशिया यांमधील जमिनीनें वेढलेला समुद्र. याची दक्षिणोत्तर लांबी ७६० मैल व रुंदी १०० ते २०० मैल आहे. याचें क्षे. फ. सुमारें १,६९,३३० चौरस मैल असून त्यांपैकीं ८६५ चौरस मैल यांतील बेटांनीं व्यापिलें आहे. व्होल्गा, उरल, टेरेक, सुलाक, कुरा आणि ऑक्सस या मोठ्या नद्या कास्पियनला मिळतात. प्राचीन युगांत कास्पियन समुद्र वर असून फार विस्तृत होता. महासागरांतील पाण्यापेक्षां याचें पाणी बरेंच गोडें आहे. ऑपशेरॉन द्वीपकल्पांतला पेट्रोलचा व्यापार वाढल्यापासून व ट्रॅन्सकॅस्पियन रेल्वे सुरू झाल्यापासून ( स. १८८६ ) कास्पियन समुद्रावरचें दळणवळण फार वाढलें आहे. रशियाचेंच एक लहान आरमार या समुद्रांत असतें. कोणत्याहि अंतर्भौम समुद्रांत यांतील माशांच्या समृद्धी-इतकी समृद्धि नाहीं. येथील माशांपासून चांगलीं आर्थिक द्रव्येंहि तयार होतात.

रशियांतील बाकूपासून १० मैल अंतरावर सुरखनी येथें एक हिंदु देवालय आहे. भक्तांना राहण्यासाठीं भिंतींत खोल्या बांधल्या आहेत. गणपति, शिव व ग्रहदेवता यांच्या मूर्ती तेथें आहेत. जमिनींतून वर येणाऱ्या पवित्र ज्वाला या देवालयाला प्रकाशित करतात. ही नैसर्गिक व भव्य दीपावली अत्यद्भुत सृष्टिचमत्कारांपैकीं एक आहे.

**काळपुळी**—१. ( इं. कार्बंकल ). त्वचेमध्यें एकाच ठिकाणीं एकदम दाह उत्पन्न होऊन त्वचेच्या खालच्या पापुद्र्यापर्यंत तो दाह जाऊन त्वचा कुजणें हीं या रोगाचीं मूळ लक्षणें आहेत. ही पुळी बहुधा मानेच्या मागें, पाठीवर किंवा तोंडावर असते. ही पुळी एखादे वेळीं वाढत जाऊन लहानशा ताटलीच्या घेराएवढी होते. हिच्यामधील भागांस छिद्रें पडून त्यांतून रक्त, लस, वगैरे घाण झिरपत असते. मानसिक चिंतेनें अगर मूत्रपिंड

विघडून शरीर खंगत जाऊन मग रोग्यास ही पुळी होण्याचा संभव असतो.

रोग्यास भूल देऊन ही गांठ चिरतात, व जेथपर्यंत सूज असेल तेथपर्यंत विस्तृत छेद करून तेथील जंतूचा भाग काढून टाकतात. गाभा खरवडल्यावर त्या ठिकाणीं तीव्र जंतुघ्न औषध लावून ती जागा दोषरहित करतात.

२ (इं. ॲन्थ्रॅक्स). हा रोग एका अत्यंत सूक्ष्म अशा जंतूंपासून उत्पन्न होतो. हे जंतू रक्तामध्यें उत्पन्न होतात व त्यामुळें मेंढ्या, घोडे, कुत्रे, कोंबड्या वगैरे प्राणी मरण पावतात, परंतु मांजरास हा रोग होत नाहीं. कधीं कधीं ह्या रोगाची सांथ फार मोठ्या प्रदेशावर पसरते. याला पाणथरीचा ताप असेंहि म्हणतात व तो क्वचित् मनुष्यालाहि जडतो व त्यापासून गळवें, वगैरे उत्पन्न होतात.

**काळवथरी**—(इं. ट्रॅप). पूर्वजीव (पॅलीओझोइक) आणि मध्यजीव (मेसोझोइक) युगांतील सर्व अग्निजन्य प्रस्तरास पूर्वी काळवथरी दगड म्हणत असत. हा कारी (बसाल्ट) सारखा असून झिजला असतां याचे पायऱ्यापायऱ्यासारखे थर बनतात. याचा सामान्य प्रकार म्हणजे कारीचा दगड होय.

**काळवीट**—हरण जातीचे हे प्राणी हिंदुस्थानांत आढळतात. यांची उंची सरासरी अडीच फूट असून हे फार सुंदर व चपळ असतात. हरणांतील नरासहि काळवीट म्हणतात. काळवीट

हरणांच्या कळपाचें रक्षण करतो. याला शिंगें असून तीं हंगामीं झडतात पण लगेच नवीं येतात.

**काळा आजार**— हा रोग हिंदुस्थान, चीन, आसाम, आल्जीरिया, अरबस्तान, मिसर, इ. देशांत पाहण्यास सांपडतो. लीशमन डोनोव्हन नामक जंतू या रोगाचा माशा, डांस, ढेकूण यांसारख्या कीटकांच्या द्वारें प्रसार करतात. अनियमित, सतत अशा रीतीनें तापास सुरुवात होऊन पंडुरोग उत्पन्न होतो व शरीर फार फिकट होतें. यकृत् व प्लीहा मोठ्या होतात. तोंड व ओटे या ठिकाणीं कधीं सूज येते, व कधीं तर रोग्यास जलोदर होतो. अतिसार, हगवण, कफ, श्वास हे रोग बहुतकरून होतात. हा रोग म्हणजे हिंवताप अगर विषमज्वर नाहीं हें रोग-जंतूंच्या अस्तित्वावरून सिद्ध होतें. हा रोगी कित्येक महिने जगतो. कोयनेल जास्त प्रमाणांत दिल्यानें उपयोग होतो. एटाक्सील व ॲंटीमनी टार्ट्रेट हीं औषधें गुणकारी आहेत. ताप कमी होण्यास १०।१२ आठवडे लागतात.

**काळा पहाड**— वायव्येकडील सरहद्दीवरच्या प्रांतांत हजारा जिल्हा आहे. त्याच्या वायव्य सरहद्दीवर ही डोंगराची रांग आहे. इ. स. १८५१ पासून ते १८९१ पर्यंत पठाण व स्वाती लोकांनीं खालसा मुलखांत दरवडे घालून अथवा इंग्रजी अधिकाऱ्यांना ठार मारून इंग्रज सरकारास मधून मधून उपद्रव देण्याचा क्रम चालू ठेविला होता.

**काळाबाग**—पंजाब, मिआनवाली जिल्ह्यांतील एक जमीनदारी. क्षे. फ. १०७ चौ. मैल. शीखांनीं इ. स. १८२२त ही जमीनदारी खालसा केली. तथापि मांडलिक या नात्यानें ती मालक याजकडेच राहिली. येथील जहागीरदारास तुरटी तयार करण्याबद्दल १,००० रुपये मिळतात. गांव इसाखेल तहशिलींत आहे व सिंधु नदीच्या उजव्या तीरावर मिठाच्या डोंगराच्या पायथ्याशीं वसलेला आहे. जवळपासच्या डोंगरांत तुरटी सांपडते. १९०४ सालीं ३,५०० मण तुरटी निघाली.

**काळा समुद्र**—युरोप आणि आशिया या खंडांच्या मधोमध हा असून रशिया, कॉकेशिया, आशिया मायनर, बल्गेरिया व रुमानिया हे देश याच्याभोंवतीं आहेत. अझोव्हचा समुद्र हा याचा एक उपसागर असून दोहोंमिळून क्षे. फ. सुमारें १,७५,००० चौ. मैल आहे. डॅन्यूब, नीस्टर, नीपर व डॉन या नद्या काळ्या समुद्रांत येऊन पडतात. ओडेसा, खेरसॉन, निकोलेव्ह, कर्च, नोव्होरोसिस्क, बाटुम, ट्रेबिझोंड, सॅमसुन, सिनोप, कुस्टेंडिज व व्हारना हीं प्रमुख बंदरें याच्या किनाऱ्यावर आहेत.

**काळी सिंध**—(पूर्व). हिचें खरें नांव कालिंदी. ही नदी संयुक्त प्रांतांतून वाहत जाणारी असून चंबळा नदीस मिळते. विंध्याद्रि पर्वतांत बरझिरी खेड्याजवळ उगम पावून कोटा संस्थानांतील पिपरा गांवाजवळ चंबळा नदीस मिळते. तिची एकंदर लांबी २२५ मैल आहे.

**काळे, अनसूयाबाई** (१८९६- )—एक राष्ट्रसेवक महिला. यांचा जन्म बेळगांव येथें झाला. कै. स. वा. भाटे, वकील, यांच्या कन्या होत. यांचें शिक्षण बडोदें व पुणें येथें झालें. यांचा १९१६ मध्यें विवाह झाला. १९१८ मध्यें जमशेटपूर

येथें अमृतलाल ठक्कर यांच्या हाताखालीं शिक्षणाचें कार्य केलें. १९२४ मध्यें या नागपूर प्रांतिक महिला परिषदेचें कार्य पाहूं लागल्या व तेथील कैद्यांस शिक्षण देण्याचें कार्य करूं लागल्या. या कांहीं वर्षें ऑनररी मॅजिस्ट्रेट होत्या. यांची कांहीं दिवस लेबर कमिशनवर असिस्टंट कमिशनर म्हणून नेमणूक झाली होती. यांनीं १९३० मध्यें कायदेमंडळाच्या सभासदत्वाचा राजीनामा देऊन काँग्रेस प्रचाराचें कार्य सुरू केलें. १९३० च्या नोव्हेंबरमध्यें प्रांतिक काँग्रेस कमिटीच्या अध्यक्ष असतां कौन्सिलवर निरोधन केल्याबद्दल यांस शिक्षा झाली. १९३७ मध्यें या काँग्रेस पक्षातर्फे मध्यप्रांत असेंब्लीमध्यें निवडून आल्या व असेंब्लीच्या डेप्युटी स्पीकर होत्या. यांनीं केलेली विशेष कामगिरी म्हणजे चिमूर व अष्टी येथील दंग्याबद्दल फांशीची शिक्षा झालेल्या तरुणांस बादशहांची माफी मिळवून देणें, ही होय.

**काळे, त्र्यंबक गुरुनाथ** ( मृ. १९१४ )— एक महाराष्ट्रीय पंडित. यांचा प्राचीन भारतीय विद्यांचा अभ्यास बराच असून 'पुराणनिरीक्षण', 'भारतीय रसायनशास्त्र', 'रामायण निरीक्षण' वगैरे ग्रंथ लिहिले. 'भारतीय रसायनशास्त्राचीं' इतर भाषांतून भाषांतरें झालीं आहेत. हे पुण्यास न्यू इंग्लिश स्कूलमध्यें संस्कृतचे शिक्षक होते.

**काळे, यादव माधव** ( १८८७–१९४३ )— एक महाराष्ट्रीय कार्यकर्ते. यांचा जन्म लोणार येथें झाला. यांनीं प्रथम बुलढाणा जिल्ह्यांत मेहेकर येथें व नंतर बुलढाणा येथें वकिली सुरू केली. १९२४ ते १९३६ पर्यंत ते मध्यप्रांत कायदेमंडळाचे सभासद होते. १९२६ मध्यें हैदराबाद संस्थान प्रजापरिषदेचे मुंबई येथें अध्यक्ष होते व त्याच वर्षी रावेरखेडी येथील बाजीराव उत्सवाचे अध्यक्ष होते. मध्यप्रांत-वऱ्हाड व्हर्न्याक्युलर अॅकॅडमीचे हे अध्यक्ष होते. विदर्भ साहित्य संघाचे उपाध्यक्ष होते. नागपूर विद्यापीठाच्या अॅकॅडमिक व एक्झीक्यूटिव्ह कौन्सिलचे हे सभासद होते. देशी भाषांचे परीक्षक असत. नागपूर विद्यापीठातर्फे मध्यप्रांत–वऱ्हाडच्या इतिहासावर व्याख्यानें दिलीं ( १९३८ ). हे मध्यप्रांत कायदेमंडळाचे कांहीं वर्षें अध्यक्ष होते. यांनीं वऱ्हाडचा इतिहास लिहिला आहे. व शशिसेना काव्य, 'नागपूरकर भोसले यांची बखर', पत्रें, यादी, वगैरेचें संपादन केलें आहे.

**काळे, वामन गोविंद** (१८७६–१९४५)—एक महाराष्ट्रीय अर्थशास्त्रज्ञ. हे एम्. ए. झाल्यावर पुण्याच्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद होऊन फर्ग्युसन कॉलेजांत अध्यापन करूं लागले. १९२१ मध्यें ते हिंदुस्थान सरकारच्या 'कौन्सिल ऑफ स्टेट' चे सभासद व पुढील वर्षी 'इंडियन टॅरिफ बोर्ड' चे सभासद झाले. राजकारणांत त्यांचीं मतें प्रागतिक असत. ते रानडे–गोखले यांचे प्रत्यक्ष शिष्यच होते. प्रो. काळे यांनीं रानड्यांच्यानंतर हिंदी अर्थशास्त्राचा खोल अभ्यास करून ग्रंथ लिहिले. सरकार व व्यापारी संस्था त्यांचा वारंवार सल्ला घेत. सहकारी पतपेढ्यांच्या बाबतींतहि त्यांनीं बरेंच कार्य केलें. त्यांचीं इंग्रजींत १२ व मराठींत १ ( पेढ्या व त्यांचे व्यवहार ) अशीं अर्थशास्त्र, जमाबंदी, व्यापार, चलन, इ. विषयांवर पुस्तकें आहेत. इतिहाससंशोधनांतहि ते लक्ष घालीत. 'अर्थ' नांवाचें मराठी साप्ताहिक काढून तें स्वखर्चानें चालवीत असत.

**क्किआंगसी** —हा प्रांत चीन देशांत असून त्याचें क्षेत्रफळ ७७,२८१ चौ. मैल व लोकसंख्या १,५८,२०,४०३ आहे. या प्रांतांत पाण्याचा पुरवठा भरपूर आहे, त्यामुळें बहुतेक जमीन फार सुपीक असून मुख्यतः भात व ऊंस हीं पिकें होतात. येथें मुख्य कारखानें कापूस व रेशीम यांचा माल, कागद आणि चिनीमातीचीं भांडीं करणें यांचे आहेत. याची राजधानी नानचँग आहे. किऊकिअँग हें बंदर याच प्रांतांत आहे.

**किआंगसु**—हा समुद्रकिनाऱ्यावरचा प्रांत चीन देशात आहे. या प्रांतांतून ग्रँड कॅनॉल गेलेला असून दक्षिण भागाला यांगत्सीकियँग नदीच्या पाण्याचा पुरवठा आहे. याचें क्षेत्रफळ ४१,८१८ चौ. मैल असून लोकसंख्या ३,६४,६९,३२१ आहे. चेनकिआंग हें शहर राजधानी आहे. नानकीन व शांघाय हीं मुख्य बंदरें आहेत. चहा, भात, कापूस आणि उत्तम रेशीम येथें होतें.

**किओटो**—हें शहर जपानांतील होनशू बेटावर ओसाकापासून ३० मैलांवर आहे. हें विद्येचें केंद्र व कलाकौशल्याच्या कारखान्यांचेंहि केंद्र आहे व येथें १८९७ सालीं एक विद्यापीठहि स्थापलेलें आहे. लो. सं. १०,८०,५९३ आहे.

**किंकरी**—हें झाड मूळचें *अमेरिकेंतील* असून बहुतेक उष्ण प्रदेशांतहि तें आढळतें. हिंदुस्थानांत व ब्रह्मदेशांत याची लागवड झाली आहे. ह्या झाडास विलायती बाभूळ म्हणतात. या झाडाचीं फुलें सुवासिक असल्यामुळें फ्रान्समध्यें त्यांची लागवड बरीच होते. या झाडापासून गोंद व इतर पदार्थ उत्पन्न होतात. या झाडाच्या फुलांपासून अत्तर करण्याच्या प्रयत्नास यश आलेलें नाहीं. चहा, बुंद किंवा नीळ यांच्याबरोबर हेंहि आडपीक हिंदुस्थानांत काढतां येईल.

**किंकेड, चार्लस ऑगस्टस** (१८७०– )—मराठ्यांचा इतिहास लिहिणारा एक इंग्रज अधिकारी. आय्. सी. एस्. झाल्यावर मुंबई इलाख्यांत यांनीं नोकरी केली. ती करीत असतांना त्यांनीं हिंदी लोकांच्या संस्कृतीचा विशेष अभ्यास केला व ग्रंथरचना केली. तुळशीच्या झाडाचें महत्त्व त्यांनीं आमच्या

सुधारकांना पटवून दिले. रा. ब. पारसनीस यांच्या मदतीनें 'हिस्टरी ऑफ मराठा पीपल' (मराठे लोकांचा इतिहास) तीन विभागांत सुंदर रीतीनें लिहिला. हिंदी लोकांच्या जुन्या गोष्टी आणि आख्यायिका त्यांनीं इंग्रजींतून चटकदार रीतीनें मांडून हिंदुस्थानची एक प्रकारें चांगली सेवाच केली. सेवानिवृत्त होतांना ते मुंबई हायकोर्टाचे न्यायाधीश होते.

**किंग, विल्यम लिऑन मॅकेन्झी** (१८७४- )—कानडा वसाहतीचा एक मुख्य प्रधान. आठ वर्षें 'लेबर गॅझेट' पत्र चालवून मग पार्लमेंटमध्यें शिरले. १९२१ सालीं प्रथम पंतप्रधान झाले. नंतर पुन्हां १९३५ पासून १९४८ पर्यंत एकसारखे पंतप्रधान होते. ते ब्रिटिश साम्राज्याचा एक चांगला आधार आहेत.

**किंगलेक, अलेक्झांडर विल्यम** (१८०९-१८९१)—हा इंग्रज इतिहासकार १८८४ मध्यें 'एओथेन' या नांवाचें प्रवास वर्णनपर पुस्तक लिहून प्रसिद्धीस आला. 'इनव्हेजन ऑफ दि क्रिमिया' (क्रिमियाची मोहीम) या इतिहासाचा पहिला भाग १८६३ मध्यें प्रसिद्ध केला. आणि शेवटचा आठवा भाग १८८७ मध्यें प्रसिद्ध झाला. हा ऐतिहासिक ग्रंथ चिरस्मरणीय झाला आहे.

**किंगस्टन**—१. कानडा देशांतील ओंटारिओ प्रांतात शहर आहे. लो. सं. २१,७५३ असून येथें एक विद्यापीठ (स्थापना १८४१) व एक मोठें रॉयल मिलिटरी कॉलेज आहे. येथें जहाजें बांधण्याचे कारखाने व विणकामाचे कारखाने आहेत.

२. जमेका बेटाची राजधानी. ही दक्षिण किनाऱ्यावर असून हें बंदरहि सर्व लहानमोठ्या बोटी लागण्याला उत्तम आहे. लोकसंख्या १,०९,०५६.

३. अमेरिकन सं. संस्थानांतील न्यू यॉर्क संस्थानांतील शहर. लो. सं. २८,५८९ असून येथें तमाखू, सीमेंट, विटा वगैरेंचे कारखाने आहेत, आणि इमारती लांकूड, दगडी कोळसा व धान्य यांचा व्यापार चालतो.

**किंगस्टन, विल्यम हेनरी जाईल्स** (१८१४-१८८०)—एक इंग्रज कादंबरीकार. १८५० मध्यें त्यानें मुलांकरितां पुस्तकें लिहिण्यास सुरवात केली व त्यामुळेंच त्याची विशेष प्रसिद्धि झाली. त्यानें लिहिलेल्या गोष्टींपैकीं अतिशय प्रसिद्ध आहेत त्या— 'पीटर दि व्हेलर', 'दि थ्री मिडशिपमेन्', 'दि थ्री लेफ्टनंट्स्', 'दि थ्री कमांडर्स्' आणि 'दि थ्री अॅडमिरल्स.'

**किंगस्ले, चार्लस** (१८१९-१८७५)—एक इंग्रज उपाध्याय, कादंबरीकार व कवि. याचें शिक्षण लंडनचें किंग्ज कॉलेज व केंब्रिजचें मॅगडलेन कॉलेज यांमध्यें झाल्यावर त्यानें 'दि सेंट्स् ट्रॅजिडी' व 'व्हिलेज सर्मन्स' एक भाग प्रसिद्ध केला. नंतर त्याच्या कादंबऱ्या 'अल्टन लॉक' (१८४९), 'यीस्ट' (१८५१), 'हिपाटिआ' (१८५३), 'वेस्टवर्ड हो' (१८५५) निघाल्या. यांपैकीं शेवटच्या दोन त्याच्या फार उत्तम ऐतिहासिक कादंबऱ्या आहेत. शिवाय त्याचे प्रसिद्ध ग्रंथ 'टू इयर्स अॅगो', 'हिअरवर्ड दि वेक्', 'दि वॉंडरर्स ऑफ दि शोअर', 'दि वॉटर बेबीज', व 'अॅट् लास्ट' हे आहेत. १८६०-६९ पर्यंत तो केंब्रिज येथें अर्वाचीन इतिहास या विषयाचा प्रोफेसर होता.

**किंगस्ले, हेन्री** (१८३०-७६)—हा चार्लस किंगस्लेचा भाऊ. कॉलेजशिक्षण झाल्यावर १८५३ मध्यें ऑस्ट्रेलियांत गेला व १८५८ मध्यें परत आला. नंतर त्याच्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. त्यांत 'जिऑफ्रे हॅमालिन', 'रॅव्हेनशू', 'दि हिलिअर्स अॅंड दि बर्टन्स' आणि 'ऑस्टिन एलिअट' या चार कादंबऱ्या उत्तम आहेत.

**किचनेर, लॉर्ड** (१८५०-१९१६)—एक इंग्रज सेनापति. याचें नांव हर्बर्ट असें होतें. याचा बापहि एक लष्करी अधिकारी होता. हर्बर्ट हा १८७१ त सैन्यांत दुय्यम लेफ्टनंट म्हणून दाखल झाला. ईजिप्तच्या सैन्याची पुनर्घटना होत असतांना त्याला तिकडे नेमलें. तेथें त्याला बढती मिळून तो इंग्रजी सैन्याचा मुख्य झाला. त्यानें १८९६ मध्यें खारटुम येथें महादीचा पूर्ण पराभव केला. यामुळें त्याला खारटुमचा लॉर्ड बनविलें व ३० हजार पौंड बक्षीस दिले. द. आफ्रिकेतील प्रिटोरियाच्या लढाईत त्यानें भाग घेतला. या वेळीं त्याला ५० हजार पौंड बक्षीस देऊन कांहीं पदव्या दिल्या. नंतर हिंदुस्थानांत सरसेनापति या जागेवर नेमणूक झाली. तेथील सैन्याची त्यानें सुधारणा व पुनर्घटना केली. सैन्यसुधारणेच्या बाबतींत याचें व व्हाइसरॉय कर्झन यांचें पटेना व स्टेट सेक्रेटरीनें किचनेरचा सल्ला ग्राह्य ठरविला व त्यामुळे कर्झननें राजीनामा दिला. किचनेर हा १९०९ त इंग्लंडांत परत आला. १९११ त याची ईजिप्तमध्यें कॉन्सल जनरल म्हणून नेमणूक झाली. पुढें पहिल्या महायुद्धांत त्याच्याकडे युद्धखातें सोंपविण्यांत आलें. त्यानें तावडतोब मोठी सैन्यभरती केली. रशियन सेनानींशीं खलबत करण्यासाठीं आर्चेंजल येथें जात असतां तो ज्या लढाऊ जहाजांत बसला होता, तें जहाज जर्मनीनें आपल्या टॉर्पेडोने बुडविलें व त्यांत किचनेर हाहि बुडून मेला.

**किचलू, डॉ. सैफउद्दीन**—एक हिंदी पुढारी. यांनीं १९१३ मध्यें रावळपिंडी येथें वकिली सुरू केली. १९१९ च्या सत्याग्रहाच्या चळवळींत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता व त्या वेळीं लष्करी कायद्याखालीं यांस जन्मठेप-हद्दपारीची शिक्षा झाली होती. परंतु डिसेंबर १९१९ मध्यें यांची सुटका झाली,

१९२० मध्यें यांनीं खिलाफत व कॉंग्रेस चळवळीकरितां वकिली सोडून दिली. नंतर झालेल्या असहकारितेच्या व सत्याग्रहाच्या चळवळींत यांनीं प्रमुख भाग घेतला होता. हे तात्पुरते कॉंग्रेसचे अध्यक्ष होते व त्यांनीं १९३४ मध्यें एक आठवडा अन्नत्याग केला होता.

**किड, थॉमस** ( १५५८-१५९४ )—एक इंग्रज नाटककार. यानें स्पॅनिश भाषेंत १५८४-१५८९ च्या दरम्यान दुःखान्त नाटकें लिहिलीं व हीं नाटकें हॉलंड व जर्मनी या दोन्ही देशांत लोकप्रिय झालीं. शेक्सपिअरपूर्वी लिहिलें गेलेलें हॅम्लेट हें नाटक यानेंच लिहिलें असावें. त्याचीं नाटकें अगदीं साधीं असून त्यांत प्रौढपणा दिसून येत नाहीं.

**किड, बेंजामिन** ( १८५८-१९१६ )—एक इंग्रज समाजशास्त्रज्ञ. यानें 'सोशल इव्होल्यूशन' (सामाजिक विकास) या नांवाचें पुस्तक १८९४ सालीं प्रसिद्ध केलें. नैसर्गिक निवड व जीवनार्थ कलह यांवर प्रगति अवलंबून असणें अपरिहार्य असून या कलहाशीं विरोधी असणाऱ्या मजूर वर्गाच्या आंकुचित दृष्टीमुळें उद्भूत झालेला समाजसत्तावाद टिकणें शक्य नाहीं. तो वाढत्या सरकारी नियंत्रणानें नष्ट होईल. उद्योगधंद्याची मालकी व कारभार यांत हें सरकारी नियंत्रण दिसून न येतां सर्व हक्क दूर करून टाकण्यानें उत्पन्न होणाऱ्या स्पर्धेत तें दिसून येईल-अशीं तत्त्वें त्यानें वरील ग्रंथांत प्रतिपादन केलीं. 'दि कंट्रोल ऑफ ट्रॉपिक्स' (उष्ण प्रदेशावरील वर्चस्व) यांत उष्ण कटिबंधांतील लोकांस थंड प्रदेशांतील लोकांनीं राखावें हा यानें सृष्टीचा नैसर्गिक नियम म्हणून प्रतिपादला आहे.

**किंडत**—उत्तर ब्रह्मदेशांतील वरच्या चिंदविन जिल्ह्याचा मध्यभाग. या भागांत किंडत व टमू हे दोन पेटे आहेत. किंडत पेट्याचें क्षे. फ. १,०८८ चौ. मैल, लो. सं. सुमारें वीस हजार असून पेट्यांत किंडत हें गांव व ३८ खेडीं आहेत. यांत पुष्कळ जंगलें आहेत. किंडत गांवची लो. सं. सुमारें चार हजार आहे. शहराच्या आसपास जंगल आहे.

**किंडरगार्टन**—या जर्मन शब्दाचा अर्थ 'मुलांचा बाग' असा असून फ्रेडरिक फ्रोबेलनें मुलांच्या शारीरिक, नैतिक व बौद्धिक उन्नतीकरितां एक नवीन खेळण्याची शाळा काढली. निसर्गनिरीक्षणाची आवड व वृक्ष आणि वनस्पती यांवरून सादृश्यें काढण्याचा नाद यांमुळें बालपणास विशिष्ट महत्त्व यानें दिलें आहे. पेस्टॅलोझी व कोमोनियस प्रभृतींना माता हीच खरी शिक्षक आहे असें वाटत असे. परंतु गरिबीमुळें मातेला मुलांच्या शिक्षणाकडे लक्ष पुरविण्यासहि अवसर नसतो, म्हणून त्यांनीं अर्भकांकरितां एक अनाथगृह काढिलें. अशा शाळांना नेदर्लंड मध्यें 'प्ले-स्कूल' (क्रीडाशाला) व इंग्लंडमध्यें 'इनफंट स्कूल' (बालकशाला) असें म्हणतात. फ्रोबेलचें असें मत होतें कीं, मुलांना शारीरिक, नैतिक व बौद्धिक शिक्षण एकदमच दिलें पाहिजे, व बालवयांत सर्व व्यवसाय खेळ हाच काय तो असला पाहिजे. याबद्दल फ्रोबेल व मॉंटेग यांचें मतैक्य होतें. त्याचें पहिलें तत्त्व सामर्थ्य व समतोलपणाचा नियम हें होय. मुलांच्या वाढीचा नियम हें दुसरें तत्त्व. तिसरें तत्त्व म्हणजे चिन्हांच्या द्वारां शिक्षण देण्याचा नियम हें होय. सहा रंगीत चेंडू, एक लांकडी चेंडू, एक पंचपात्रासारखें भांडें, एक घन, आठ लहान भाग पडतील अशा बेतानें कापलेला दुसरा एक घन, नमुने तयार करण्याकरितां वर्तुळें, काडी व लांकडी पट्ट्या इतकें सामान ओळीनें मुलांच्या 'बक्षीस'-संग्रहांत असे. आधुनिक पद्धतींत वाळूवरील रेखाकला, माती व कागद यांचीं चित्रें करणें, घड्या घालणें, यांसारख्या गोष्टींना महत्त्व दिलेलें असतें. सन १८४० मध्यें रूडोलस्टॅडननजीक ब्लॅकेनबर्ग येथें पहिली किंडरगार्टन शाळा सुरू झाली. १८५१ मध्यें फ्रोबेलच्या तत्त्वानुसार चालणाऱ्या शाळांना बंदी करण्यांत येईल असें प्रशियन सरकारनें फर्माविलें. पुढें १८५४ मध्यें प्रसिद्ध रॉंजेसनें फ्रोबेलची कल्पना इंग्लंडांत प्रचलित केली. बॅरोनेस मारेन होल्ढझ ही बाई फ्रोबेलच्या तत्त्वांची पुरस्कर्ती झाली. तिनें फ्रेंच सरकारचें लक्ष किंडरगार्टनकडे वेधून घेतलें. प्रसिद्ध मिचेलेट यानें तर असें प्रसिद्ध केलें कीं, फ्रोबेलनें मानवी शिक्षणाचा प्रश्न सोडविला. इ. स. १८७२ नंतर फ्रोबेल पद्धतीचा झपाट्यानें प्रसार झाला. ती आता युरोपांतील सर्व सार्वजनिक शाळांतून सुरू करण्यांत आली आहे. अमेरिकेंत इ. स. १८६३ त ७३ शाळा, १८८२ मध्यें ३४८, १८९२ मध्यें १३११ व १९०८ मध्यें ४३६३ शाळा होत्या. १९०४-५ सालीं खाजगी किंडरगार्टन शाळांतून १,०५,९३२ मुलें होतीं. जपानमध्यें १९०१ मध्यें २५४ किंडरगार्टन शाळा होत्या. हिंदुस्थानांत स्वतंत्र किंडरगार्टन शाळा नाहींत, पण प्राथमिक शाळांत किंडरगार्टन पद्धतीचा बराच अवलंब करतात.

**किण्व**—ही एक बुरशीची जात आहे. या वनस्पतीची *पुनरुत्पादनपद्धति अथवा जननेंद्रियें विशिष्ट प्रकारचीं असतात* व यांचीं फळें बंद असतात. या सर्व वनस्पती परोपजीवी आहेत व त्या पानें, खोडें, व फळें यांवर पांढऱ्या चट्ट्याप्रमाणें किंवा बुरशीप्रमाणें उत्पन्न होतात. उन्हाळ्यामध्यें यांचा प्रसार फार जलद होतो. वर्षाकालांत त्यास फळें येतात व त्यांपासून पुन्हां हिवाळ्यांत या रोगाचा प्रसार होतो.

**कितान**—कंतान, कॅन्व्हसचें कापड. हें नांव निरनिराळ्या जाड कापडांना लावतात. कापसाचें सूत किंवा ताग, वाख यांपासून हें बनवितात. तागाच्या कंतानापेक्षां वाखाचें जास्त

टिकाऊ व कोरडें राहतें. हिरवें कापसाचें कंतान न कुजणारें असून पाणी किंवा कीड यांनाहि प्रतिबंधक असतें. तें गाड्यांना, पेट्यांना, बोटींना, वगैरे वापरतात. तंबूच्या कापडालाहि कंतानच म्हणतात. शिंप्यांना कपड्यांत घालण्यासाठीं जें कंतान लागतें तें न आकसणारें किंवा वाढणारें असावें लागतें ; नाहीं तर कपड्याचा आकार बिघडतो. चित्रकारांना तैलचित्रासाठीं लागणारें कंतान विशिष्ट वाखाचें केलेलें असतें. कंतान एकेरी किंवा दुहेरी दोऱ्याचें असतें. सुंदर भरतकामासाठीं एकेरी दोऱ्याचें कंतान लागतें.

**कित्ताशाई**—(कॉपिइंग इंक). ज्या पत्रांची नक्कल करावयाची असते ती या शाईनें लिहितात. दहा भाग शाईचें वाष्पीकरण (इव्हॅपोरेशन) करून सहा भाग उरवतात व तींत चार भाग ग्लिसरिन मिसळतात. ग्लिसरिनच्याऐवजीं खडी-साखर चालते. ग्लिसरिन लावून जिलेटिनच्या पानावर पुष्कळ प्रती छापण्याचें यंत्र जें हेक्टोग्राफ त्याला लागणाऱ्या शाईची कृति अशी—७ औंस पाणी आणि १ औंस मेथिलेटेड स्पिरिट यांच्या मिश्रणांत १ औंस मेथिल व्हायोलेट ॲनिलिन रंग मिसळतात.

**कित्तूर**—मुंबई, बेळगांव जिल्हा. संपगांवच्या दक्षिणेस सुमारें ७ कोसांवर हें एक जुनाट गांव आहे. येथें दर सोमवारीं व गुरुवारीं बाजार भरतो. येथें विणकामाचे व कांचेच्या बांगड्या तयार करण्याचे धंदे चालतात. येथें एक बसवाचें देऊळ असून त्यांत गोव्याचा राजा जयकेशी तिसरा याच्या वेळचा एक शिलालेख आहे. लो. सं. सरासरी ५॥ हजार आहे. येथील किल्ला हल्लीं पडका आहे. एकांत एक असे दोन किल्ले आहेत. त्याबाहेर दोन खंदक आहेत. देवळाच्या सज्जांत कित्तूरचा देसाई, त्याच्या दोन बायका व एक दिवाण यांच्या मूर्ती आहेत. विजापूरकरांच्या सैन्याबरोबर हिरेप्पा व चिकाप्पा हे दोन लिंगाईत मल्ल आडनांवाचे भाऊ संपगांवास राहिले, हेच कित्तूरकर देसायांचे मूळ पुरुष होते. इ. स. १७८९ मध्यें परशुरामभाऊनें गोकाक सर केलें व देसायांस कैद केलें. श्रीरंगपट्टणच्या तहान्वयें कित्तूरकर देसायांचा हा प्रदेश पुन्हां मराठ्यांकडे आला. या देसायांनीं मराठ्यांना अतोनात त्रास दिला होता. कित्तूर परगणा धोंडया वाघाच्या ताब्यांत बरेच महिने होता. इ. स. १८१८ मध्यें झालेल्या धामधुमींत कित्तूरकर देसायांनीं आपले यजमान पेशवे यांच्याविरुद्ध इंग्लिशांस मदत केली. कित्तूरच्या प्रजेने १८२४ सालीं बंड केले व कलेक्टर थॅकेरे यास कैद केलें. इ. स. १८३९ मध्यें सांगोलीच्या रायाप्पा पाटलानें देसायांच्या दत्तक मुलास पुढें करून पुन्हां बंड उभारलें. परंतु लवकरच त्याचाहि मोड करण्यांत आला.

**किनारी जरकाम**—(लेस). रेशीम, ताग किंवा सूत यांची विणून केलेली पट्टी. ही हातांनीं किंवा यंत्रानें तयार करतात. हातांनीं करावयाची किनारी सुईनें विणतात. सुईनें विणून केलेल्या किनारीस पॉइंट म्हणतात. उशीवर विणलेल्या किनारीस बॉबिन किंवा बोन किनारी म्हणतात. सुईनें विणलेल्या किनारी एका दोऱ्याच्या विणून तयार करतात ; यांना ब्रूसेल्स, अलेनसॉन, मालटीज, वगैरे नांवें आहेत. नॉटिंगहॅम वगैरे ठिकाणीं यंत्राच्या साहाय्यानें कृत्रिम किनारी तयार करतात. या जाळीसारख्या असतात व त्यांस त्या यंत्रावरून पॉइंटनेट व वॉर्पनेट म्हणतात.

**किनो**—हा एक कातासारखा तुरट पदार्थ आहे. हा अनेक प्रकारच्या झाडांपासून काढतात. मूळ हा पदार्थ पूर्वे-कडील बेटांत आढळणाऱ्या एका झाडापासून [ प्टेरोकार्पस मार्सोपियम- वर्ग-लेग्युमिनोसी ] काढण्यांत आला. या झाडाचें लांकूडहि उपयुक्त असतें. या पदार्थांत टॅनिन, गोंद व कांहीं अर्क असतात. हा फार तीव्र स्तम्भक (अस्ट्रिंजंट) आहे.

**किन्नर**—या नांवाचा शब्दशः अर्थ 'कोणतीं माणसें' असा होतो. या पौराणिक व्यक्तींची शरीररचना विचित्र असे. तोंड घोड्याचें पण धड माणसाचें अशी यांची ठेवण होती. हे स्वर्गीय गायक असून कैलासावर कुबेर लोकांत राहात. यांचा धंदा गायकाचा असे. यक्षांबरोबर यांचीहि ब्रह्मदेवाच्या अंगठ्यापासून उत्पत्ति झाली, असें कांहीं पुराणांत लिहिलेलें असून दुसऱ्या कांहीं पुराणांतून यांना काश्यपपुत्र असें म्हटलें आहे. यांना अश्वमुख, तुरगवक्त्र, मयु अशींहि नांवें आहेत.

**किन्हई**—मुंबई. हें पंतप्रतिनिधींच्या ताब्यांतलें गांव कोरे-गांवच्या उत्तरेस आहे. वसना नदीच्या एका ओहोळाच्या तीरावर हें गांव वसलेले आहे. येथील शेतजमीन चांगली असून सभोंवार दाट आमराई आहे. नंदगिरी नांवाचा जुना किल्ला आहे. टेकडीची उंची ४०० फूट असून तिच्यावर यमाई देवीचें देऊळ आहे. ही देवी पंतांची कुलस्वामिनी आहे. देवळास तटबंदी केलेली आहे. पंतप्रतिनिधींचा मोठा वाडा आहे.

**किप्लिंग, रुडयार्ड** (१८६५-१९३६)— हा ब्रिटिश

ग्रंथकार १७ व्या वर्षी लाहोर येथील 'दि सिव्हिल ॲन्ड मिलिटरी गॅझेट' आणि 'पायो-निअर' यांचा दुय्यम संपादक झाला. त्यानें १८८६ मध्यें 'डिपार्टमेंटल डीटीज्' हा काव्य-संग्रह आणि १८८७ मध्यें 'प्लेन टेल्स फ्रॉम दि हिल्स' हा लघुकथासंग्रह प्रसिद्ध केला. नंतर त्यानें पुढील लघुकथासंग्रह प्रसिद्ध केले—'सोल्जर्स

फ्री', 'इन् ब्लॅक ॲन्ड व्हाइट', 'दि फॅन्टम रिक्शा', 'दि विलीविंकी', इत्यादि. या लघुकथा लिहिण्याची त्याची शैली फार उत्तम आणि नावीन्यपूर्ण असल्यामुळें काल्पनिक वाङ्मयलेखकांमध्यें तो अग्रगण्य ठरला. १८९१ मध्यें त्यानें आपली पहिली दीर्घकथा 'दि लाइट दॅट फेल्ड्' ही लिहिली. पण ती लोकप्रिय झाली नाहीं. १८९२ मध्यें त्याचा 'बॅरॅकरूम बॅलड्स' हा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. व त्यामुळें किप्लिंगची कीर्ति पुष्कळ वाढली. 'मेनी 'इन्व्हेन्शन्स' 'दि जंगल बुक' आणि 'दि सेकंड जंगल बुक' हे त्याचे कथासंग्रह उत्कृष्ट मानले जातात. त्याचे इतर आणखी ग्रंथ आहेत ते— 'किम' (१९०१), 'जस्ट सो स्टोरीज' (१९०२), 'रिवॉर्ड्स ॲन्ड फेअरीज' (१९१०), 'ए डायव्हर्सिटी ऑफ क्रीचर्स' (१९१७), 'दि इअर्स बिट्वीन' (१९१८), आणि 'लेटर्स ऑफ ट्रॅव्हल' (१९२०). वाङ्मयांत त्यानें ब्रिटिश शिपायाला नवीन स्थान मिळवून दिलें. प्राणिजीवनांत त्याच्या कल्पनेच्या भराऱ्या 'जंगल बुक' मध्यें दिसतात. तो साम्राज्यशाहीचा मोठा अभिमानी होता.

**किंबर्ले**—दक्षिण आफ्रिकेंतील केप प्रांतांतील एक शहर. हें पश्चिम ग्रीक्वालँडच्या हिऱ्यांच्या व्यापाराचें केंद्रस्थान आहे. येथील लो. सं. सुमारें चाळीस हजार असून त्यांपैकीं अठरा हजार युरोपियन आहेत. बाजारचौकाभोंवतीं कोर्ट, पोस्ट-तारखातें यांच्या कचेऱ्या व नगरभवन आहे. डुटॉइट्स् पॅन रोडवर सार्वजनिक वाचनालय व एक इस्पितळ आहे. सार्वजनिक बगीच्यांत व्हिक्टोरिया राणी व सेसिल ऱ्होड्स यांचे पुतळे आहेत. किंबर्ले व डीबीयर्स येथें हिऱ्याच्या खाणी आहेत. शिवाय बल्टफॉटीन, डुटॉइट्स पॅन व वेसेलटन या प्रमुख खाणी आहेत. कॉलेसबर्ग कोपजे खाणीसच वसाहतींचा चिटणीस किंबर्ले याच्या नांवावरून किंबर्ले हें नांव मिळालें. ज्या शेतांत प्रथम हिरे सांपडले तें शेत सरकारनें इ. स. १८७५ मध्यें १०,००० पौंडांना विकत घेतलें. दरसाल सरासरी ४५,००,००० पौंडांचे हिरे येथील खाणींतून निघतात. १८९९ सालीं अँग्लो-बोअर युद्धांत बोअर लोकांनीं या शहरास वेढा दिला. पण १९०० सालीं तो सर जॉन फ्रेंचनें उठविला. वेढ्यांतील लोकांत सेसिल ऱ्होडस हा होता.

**किंमत आणि मोल**—एखाद्या वस्तूची किंमत म्हणजे तिच्या मोबदला द्यावा लागणारा पैसा. दुसऱ्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे किंमत म्हणजे पैशाच्या रूपांतलें मोल होय. अर्थशास्त्रीय दृष्ट्या किंमत (प्राइस) आणि मोल (व्हॅल्यू) यांत फरक आहे; किंमतीपेक्षां मोलाचा अर्थ व्यापक आहे. एखाद्या वस्तूचें मोल म्हणजे त्या वस्तूच्या बदला इतर वस्तु मिळण्याची शक्ति होय. यावरून किंमत म्हणजे एक विशिष्ट वस्तु (पैसा) या रूपांत तिचें मोल. मोल या सामान्य (जीनस) चा किंमत हा एक विशेष (स्पीसीज) आहे. मोलाचे विनिमयमूल्य आणि उपयुक्तता मूल्य असे दोन प्रकार आहेत.

**किमया**—हलक्या धातूचें सोनें करण्याची विद्या. ही विद्या खरी होती कीं नव्हती याबद्दल शास्त्रज्ञांत अद्यापि वाद असला तरी हिच्यापासून प्राचीन काळांत रसायनशास्त्राचा उगम व उन्नति झाली यांत शंका नाहीं. मिसरी लोकांना ही विद्या माहीत होती व हर्मीज दि स्मेविस्टसचे अनेक ग्रंथ या विषयावर आहेत. हिला हर्मेट्रिक आर्ट म्हणजे हर्मीजची कला असेंच नांव पडलें. प्रथम चीनमध्यें उत्पन्न होऊन तेथून पुढें अरब लोकांनीं हिचें संगोपन करून ती युरोपांत नेली. युरोपांत पुष्कळ ख्रिस्ती भिक्षू हिच्या पाठीस लागले. ते इतके कीं, शेवटीं पोपला ही विद्या कोणीं शिकूं नये अशी बंदी घालावी लागली. इंग्लंडचा राजा पहिला एडवर्ड याला रेमंड लुली नांवाच्या एका किमयागारानें पाऱ्यापासून ५०,००० पौंड सोनें करून दिल्याची आख्यायिका आहे. रसायनशास्त्राची युरोपांत पुढें वाढ झाल्यापासून ही विद्या मेली. तथापि अद्यापि कोठें कोठें डोकावतेच. किमयेनें परीस तयार करण्याचे उल्लेख आपल्या देशांतहि जुने सांपडतात. 'परिसाचे सन्निधानें अष्टधातु होय सोनें।', असें मुकुंदराज म्हणतात (वि. सि. पू. १. ६५). संतवाङ्मयांत याचे किती तरी दृष्टान्त आढळतात. किमयाच्या नादीं लागून आयुष्य व द्रव्य घालविलेले अद्यापि पुष्कळ दिसतील.

**किमिरा**—युरोपांतील पुराणकथांतून वर्णन केलेला हा एक काल्पनिक प्राणी आहे. हा तोंडांतून आगीच्या ज्वाला बाहेर टाकीत असे. याच्या शरीराचा पुढील भाग सिंहासारखा असून मध्य बोकडासारखा व मागील भाग सापासारखा असे, असें वर्णन करण्यांत येतें. याच्या नांवावरून अस्वाभाविक कल्पना दर्शविणारा शब्द इंग्रजी भाषेंत तयार झाला.

**किमेदी जमीनदार**—मद्रासेंतील गंजम जिल्ह्यामध्यें पार्ला किमेदी, पेद्द किमेदी व चिन्न किमेदी अशा तीन जमीनदारी आहेत. यांचा वंश फार प्राचीन असून ते आपणांस ओरिसाच्या केसरी राजांचे वंशज म्हणवितात. पार्ला किमेदी—गंगा ते कृष्णा यांच्या दरम्यानचा पूर्वेकडील प्रदेश एके काळीं यांच्या ताब्यांत होता. या घराण्याचा जो वंशवृक्ष ११ व्या शतकांत तयार झाला त्यांत यांचा वंश उ. हिंदुस्थानांतील रजपूत राजवंशापासून सुरू झाला असें आहे. या राजपुत्रास गंगेच्या प्रसादानें एक पुत्र झाला. त्याचें नांव गांगेय असें ठेवलें आणि याच्या वंशजांना पुढें गंगराजे असें नांव पडलें. कलिंगनगर ही राजधानी पुढें तीन शतकें होती. तेथें त्या काळांत मोठमोठ्या, सुंदर व कलाकुसरीच्या

इमारती बांधल्या गेल्या. हे सर्व राजे गजपति हें उपपद धारण करीत असत. किमेदी घराण्यानें तीनचार शतकें गंजम व विजगापट्टम् या प्रांतांवर स्वतंत्रपणें राज्य केलें. या घराण्याचें ब्रीदवाक्य ' विश्वास व बळ ' असें आहे.

**किर्घी**—तार्तार राष्ट्रजातीच्या एका दूरवर पसरलेल्या मोठ्या लोकसमूहाला हें नांव आहे. लो. सं. सुमारें पन्नास लक्ष आहे. यांच्या कारा किर्घी व कझाक किर्घी अशा दोन शाखा आहेत. हे पश्चिमेकडे कुलजापासून व्होल्गा नदीच्या खालच्या भागापर्यंत व दक्षिणेकडे आंब नदीपासून पामीर व तुर्कोमन प्रदेशापर्यंत पसरलेले आहेत. त्यांचा मंगोल महावंशाशीं संबंध दिसतो. त्यांचा वर्ण पिंगट व क्वचित् पिवळसर असतो. कारा किर्घी लोक भटकणारे असून ढोरांची पैदास हा यांचा मुख्य धंदा आहे. गहूं, जव, वगैरे धान्यें ते पिकवितात. कारा किर्घी लोकांतील राजांना मनप म्हणतात. प्रजेपैकीं कोणालाहि विकण्याचा अगर ठार मारण्याचाहि अधिकार राजाला असतो. रशियाच्या माळरानांत राहणाऱ्या लोकांना बहुधा कझाक असें म्हणतात. हे लोक चांगले घोडेस्वार असून लुटारूपणाचा धंदा करीत. हे लोक सुनी पंथाचे असून फारसे धर्मवेडे नाहींत. ज्याला नुसतें लिहावयास येते त्याला विद्वान् समजतात. गायनाची व कवितेची त्यांना मूळचीच गोडी आहे. कातडीं कमावणें, लोंकर कातणें, व रंग देणें हीं कामें ते करतात.

**किर्घीझिआ**—आशिया, रशियामधलें एक लोकसत्ताक संस्थान. आरल सरोवराच्या भोंवतालून याचा प्रदेश आहे. क्षेत्रफळ ७८,००० चौरस मैल. लो. सं. १५ लक्ष. राजधानी फ्रुन्झे-कारा. कल्पेकिया व किर्घीझ असे याचे दोन भाग आहेत. किर्घी हे मोंगोलिअन वंशाचे लोक असून त्यांचीच वस्ती या भागांत असल्याने त्यांचेंच नांव या संस्थानास देण्यांत आले आहे. हें १९२७ सालीं स्थापन करण्यांत आलें. गुरांढोरांसाठीं हें संस्थान फार प्रसिद्ध आहे. १९४१ सालीं त्यांची संख्या तीस लक्ष होती. त्यांना चरण्यास डोंगरावर पुष्कळ कुरण आहे. खोऱ्यांतून पुरेसा गहूं पिकतो. कालवे काढले आहेत. प्राथमिक व दुय्यम शिक्षणाच्या शाळा आहेत.

**किरणमापक**—( रेडिओमीटर ). याचा शोध सर विल्यम क्रूक्स यानें १८७५ च्या सुमारास लावला. यामध्यें एक कांचेचा गोळा असून त्यांत एक क्रूसासारखी आकृति असते. हा क्रूस एका पोलादी टोकावर बसविलेला असून त्यावर उष्णता किंवा प्रकाशाचे किरण पाडले असतां हा क्रूस क्षितिजसमांतर पातळींत फिरूं शकतो. या क्रूसाच्या हातावर शिरा असतात. ष त्या एका बाजूस पांढऱ्या व एका बाजूस काळ्या असतात. या गोळ्यांत अतिशय कमी दाबाची हवा किंवा एखादा वायु भरलेला असतो. जेव्हां या क्रूसावर प्रकाशकिरण पडतात तेव्हां त्यावरील शिरांचा काळा भाग दुसऱ्या पांढऱ्या अथवा चकाकित भागापेक्षां थोडा अधिक उष्ण होतो. तसेंच जेव्हां वायूचे अणू या शिरांवर आदळतात तेव्हां काळ्या पृष्ठभागावर आदळणारे अणू गरम होऊन जोरानें परत फिरतात. यामुळें काळ्या भागाचे अपसारण होऊन हा क्रूस फिरूं लागतो.

**किरणविद्या**—( रेडिऑलॉजी ). रॉट्जेन यानें सन १८९५ मध्यें क्षकिरणांचा शोध लावल्यापासून किरणविद्येचा उगम झाला. वैद्यकीय उपचारामध्यें ज्या क्षकिरणांचा उपयोग केला जातो, त्यांच्या लहरींची लांबी $\frac{1}{10}$ ते १० अँगस्ट्रॉम मूलमानों-इतकी असते ( १ सेंटिमीटर = १० कोटी अँगस्ट्रॉम ). हे क्षकिरण निर्वात प्रदेशामध्ये असलेल्या टंगस्टनच्या पत्र्यावर एक तीव्र विद्युत्कणाचा प्रवाह सोडून तयार करण्यांत येतात. यामध्यें ५० हजार ते १२० हजार व्होल्ट शक्तीच्या विद्युत्क्षेत्रामुळें ही अतिशय उच्च गति निर्माण करतां येते. ज्या निर्वात नलिकेमध्यें हा विद्युत्कणांचा प्रवाह सोडण्यांत येतो तीस क्षकिरणनलिका असें म्हणतात. या नलिका दोन प्रकारच्या असतात. एक कांचेची नळी असते. दुसरी अतितीव्र उष्णता असलेली ऋणध्रुव नलिका असते. हिला कुलीज नलिका असें म्हणतात. पहिल्या नळीमध्यें ऋणध्रुवापासून निघणाऱ्या विद्युत्कणांचें विसर्जन हे त्या नळींतील शेष वायूमध्ये वातावरणाच्या केवळ $\frac{1}{1000000}$ दाबामध्यें विद्युद्विसर्जनाच्या साहाय्यानें केलें जातें. दुसऱ्या अतितीव्र उष्णमान असलेल्या ऋणध्रुवयुक्त नळीमध्यें बहुतेक पूर्ण निर्वातता उत्पन्न केलेली असते. त्यामुळें कितीहि तीव्र विद्युत्-क्षेत्र निर्माण केलें तरी शेष वायूमध्ये विद्युद्विसर्जन होत नाहीं. त्याऐवजीं अतितीव्र उष्णमानांत असलेल्या धातूपासून विद्युत्कणांचें विसर्जन करण्यांत येतें. या ठिकाणीं ऋणध्रुवहि टंगस्टनच्या सर्पिलाकृति तारेचा बनविलेला असून तो एका साध्या तीव्र उष्णताजन्य विद्युद्दीपाच्या साहाय्यानें तापविण्यांत येतो. विद्युत्कणांचा प्रवाह या टंगस्टनवर अतिशय अल्पक्षेत्रामध्यें केंद्रित केला जातो व त्यामुळें तो एक बिंदुरूप होऊन त्यापासून सर्व दिशांनीं क्षकिरण विसर्जन पावूं लागतात. हे किरण शरीरांतून जात असतां ज्या मानानें ते पेशींच्या कमी-अधिक दाट प्रदेशांतून जात असतात त्या मानानें त्यांचें शोषण होतें व त्यावरून पुढें प्रकाशलेखक कांचेवर आरपार गेलेल्या किरणापासून चित्र निघतें व त्या चित्रावरून शास्त्रज्ञास अवश्य ती माहिती मिळून कल्पना करतां येते.

वैद्यकामध्यें क्ष-किरणांचा उपयोग रोगाचें निदान व चिकित्सा या दोन्हीहि कामीं करण्यांत येतो व अलीकडे क्षकिरणांच्या साहाय्यानें पुष्कळच अचूक रोगांचें निदान करतां

येतें. एका सेकंदापेक्षांहि कमी वेळांत शरीराच्या कोणत्याहि भागाचें क्षकिरणजन्य चित्र काढून घेतां येतें. रोगोपचाराच्या कामीं क्षकिरणांचा उपयोग बऱ्याच अलीकडे करण्यांत येऊं लागला आहे. यांचा यशस्वी रीतीनें उपयोग प्रथम गजकर्णावर करण्यांत आला. तसेंच यांचा उपयोग गळवें व व्रण ( कॅन्सर ) यांवरहि बऱ्याच यशस्वी प्रमाणांत करण्यांत येतो. परंतु या किरणांचा प्रमाणाबाहेर उपयोग केल्यास त्यांपासून रोग्यावर वाईट परिणाम होतो. या किरणांचा उपयोग करणारे बरेचसे लोक प्रारंभीं अधिक उपयोगामुळें मृत्युहि पावले आहेत.

या उत्सर्जित किरणांपैकीं जे किरण आरपार जात नाहींत ते शरीरामध्यें शोषण केले जातात व त्यांमुळें त्वचारोग उत्पन्न होतात. व त्यामुळें शरीरांतील कांहीं पेशी अजीबात नष्ट होऊन खवले पडल्यासारखे दिसूं लागतात. याकरितां क्षकिरणांचा उपयोग करणारांनीं स्वतः आपलें संरक्षण चांगल्या तऱ्हेनें करून घेतलें पाहिजे. याकरितां क्षकिरणांच्या उपकरणामध्येंहि अलीकडे बऱ्याच सुधारणा करण्यांत आल्या आहेत.

किरणोत्सर्जक पदार्थापासून निघणाऱ्या किरणांचाहि वैद्यकामध्यें उपचारपद्धतींत उपयोग करण्यांत येत असतो. अल्फा किरण हे फार लवकर शोषले जातात. त्यामुळें त्यांचा उपयोग उपचाराच्या कामीं फारसा होत नाहीं. बीटा किरण हे अधिक पारगामी आहेत. तसेंच गॅमाकिरण हे क्षकिरणांसारखे व पारगामी असून क्ष–किरणांपेक्षांहि त्यांची ही शक्ति अधिक आहे. प्रत्यक्ष रेडियमपेक्षां रेडियमपासून निघणाऱ्या उत्सर्जनाचा उपयोग औषधोपचारांत अधिक करण्यांत येतो.

अतिनील किरण— हे किरण सामान्य विजेच्या प्रकाशकमानीमध्यें पाऱ्याच्या किंवा टंग्स्टनच्या ध्रुवांच्या दरम्यान उत्पन्न होतात. या किरणांचें कांचेकडून ताबडतोब शोषण होतें; परंतु गारेमधून ते पार जातात. या किरणांचा कांहीं त्वग्रोगांवर उपयोग होतो.

**किरणविसर्जन सिद्धान्त**—( रेडिएशन थिअरी ). किरणविसर्जन या क्रियेचे ज्ञात असे दोन प्रकार आहेत : ( १ ) कणविसर्जन; उदा०, अल्फा आणि बीटा किरण, ऋण आणि ध्रुव किरण. ( २ ) विद्युत् चुंबकीय किरणविसर्जन; उदा० हर्टझिअन किरण, प्रकाशकिरण, क्षकिरण आणि गॅमाकिरण. यांपैकीं येथें उष्णताजन्य किरणविसर्जनाचाच फक्त विचार केला आहे. कोणत्याहि वस्तूस पुरेशा उच्च उष्णमानाइतकी उष्णता दिली असतां त्या वस्तूपासून किरण निघूं लागतात. या किरणांचा वर्णपट घेतला असतां तो असंधवर्णपट असतो. या वर्णपटांतील प्रकाश ( हा प्रकाश निळसर आणि कमी लालसर असतो ) अधिक तेजस्वी असून त्याची साधारण कंपनसंख्या त्या वस्तूचें उष्णमान जितकें अधिक असेल त्या मानानें अधिक असतें. जरी त्या वस्तूचें प्रत्यक्ष उष्णमान दृश्य प्रकाश बाहेर पडतांना दिसेल इतकें नसलें तरी एक प्रकारचें किरणविसर्जन होत असतें. यास पूर्वी विसर्जक उष्णता असें म्हणत आणि सध्यां अधोरक्त किरणविसर्जन असें म्हणतात. या विसर्जित किरणांमध्यें दृश्यतेशिवाय सर्व गुणधर्म असतात आणि अलीकडे असें माहीत झालें आहे कीं, या किरणांची कंपसंख्या इतकी कमी असते कीं, ते सामान्य दृष्टीस दिसून येत नाहींत. याखेरीज त्यांमध्यें आणि सामान्य प्रकाशकिरणांमध्यें गुणधर्मविषयक दुसरा कोणताहि फरक नसतो. अलीकडे कोणत्याहि पदार्थांपासून कोणत्याहि उष्णमानामध्यें होणाऱ्या उष्णताजन्य किरणविसर्जनामध्यें आणि कोणत्याहि उगमापासून निघणाऱ्या प्रकाशामध्यें कोणत्याहि प्रकारचा फरक केला जात नाहीं. या दोहोंमध्यें किरणविसर्जनाची उत्कटता आणि कंपनसंख्या यांमध्येंच काय तो फरक असतो.

या दोन तऱ्हेच्या किरणविसर्जनांतील संबंधाबद्दल बरेंचसें संशोधन झालेलें आहे. न्यूटनच्या यांत्रिक सिद्धान्तावरून असा निष्कर्ष काढण्यांत येत असे कीं, काळ्या रंगाच्या पदार्थापासून जें किरणविसर्जन होतें त्याची उत्कटता ही त्या पदार्थाच्या मूल उष्णमानाच्या आणि कंपनसंख्येच्या वर्गाच्या प्रमाणांत असते. परंतु हा नियम उच्च उष्णमान किंवा अल्प कंपनसंख्या याखेरीज इतर बाबतींत केलेल्या प्रयोगाच्या विरुद्ध आढळून येऊं लागला. प्लँकनें आपल्या कण-उपपत्तीवरून या बाबतींतील सर्व प्रकारचें उष्णमान व कंपनसंख्या यांस लागू पडेल असा सिद्धान्त शोधून काढला व त्यासच किरणविसर्जन असें म्हणतात.

**किरणोत्सर्गशास्त्र**—( रेडिओ ॲक्टिव्हिटी ). वरुण ( युरेनियम ), शुर ( थोरियम ), रद ( रेडियम ), यांसारखीं कांहीं मूलद्रव्यें आपोआप सतत एका प्रकारचे किरण बाहेर टाकीत असतात व हे किरण सामान्य प्रकाशाचे किरण ज्या पदार्थांतून आरपार जात नाहींत अशा पदार्थांतून आरपार निघून जातात. या अशा मूलद्रव्यांच्या ठिकाणीं असलेल्या किरणविसर्जक शक्तीस किरणोत्सर्ग म्हणतात. व यासंबंधींच्या अभ्यासास किरणोत्सर्गशास्त्र म्हणतात. या किरणांचा परिणाम साध्या छायालेखनाच्या कांचांवर होतो. तसेंच या किरणांच्या योगानें एखाद्या पदार्थावर विद्युद्भार असला तर तोहि विसर्जन पावतो. या किरणोत्सर्गाच्या योगानें किरणविसर्जक द्रव्याचें विघटन होतें असेंहि आढळून आलें आहे व त्या द्रव्याचें रूपांतर दुसऱ्याच एका मूलद्रव्यामध्यें होतें असेंहि दाखविण्यांत आलें आहे.

यासंबंधीं पहिला महत्त्वाचा शोध बेक्केरेल या शास्त्रज्ञानें सन १८९६ च्या फेब्रुवारीमध्यें लावला. त्यास असें आढळून आलें कीं, युरेनियमच्या व पालाश ( पोटॅशियम ) च्या द्वित्तगंधकिता( डबल सल्फेट )पासून अशा प्रकारचे किरण बाहेर पडतात कीं, त्यांच्या योगानें प्रकाशलेखनाच्या कांचांवर त्या काळ्या अपारदर्शक कागदामध्यें गुंडाळून ठेवलेल्या असल्या तरी परिणाम होतो. अशाच तऱ्हेचा परिणाम युरेनियमच्या कोणत्याहि लवणापासून—युरेनियम या धातूपासूनहि—घडून येतो. यावरून युरेनियम या मूलद्रव्याचा हा विशेष गुणधर्म आहे ही गोष्ट सिद्ध झाली. युरेनियमच्या संयुक्त पदार्थापासून तीन प्रकारचे किरण विसर्जन पावत असतात. ते म्हणजे अल्फा, बीटा व गॅमा हे होत. बेक्केरेल यास प्रकाशलेखनाच्या कांचेवर जो परिणाम झालेला आढळून आला त्याचें कारण यांपैकीं बीटा किरण हे होत. कारण अल्फा किरण हे बाहेरील काळ्या कागदाच्या वेष्टनाकडून शोषून घेतले जातात व गॅमा किरण हे इतके दुर्बल असतात कीं, त्यांच्या योगानें तितक्या अल्पकालांत दृश्य परिणाम घडून येणें शक्य नाहीं. एखाद्या द्रव्याची किरणोत्सर्जक शक्ति उष्णमान वगैरेमध्यें बदल झाल्यानें बदलत नाहीं. यावरून इतर सामान्य रासायनिक क्रिया आणि किरणोत्सर्ग यांमधील फरक आपल्या लक्षांत येतो. या किरणोत्सर्जक शक्तीची उपपत्ति सर अर्नेस्ट रुदरफोर्ड यानें लाविली आहे. ती अशी कीं : ( अ ) कांहीं मूळच्या मूलद्रव्यांपासून त्यांच्या परिमाणांच्या प्रमाणांत सतत किरणोत्सर्जन होत राहून त्याच्या योगानें नवीन किरणोत्सर्जक द्रव्य तयार होण्याची क्रिया सतत चालू असते. ( आ ) हें नवीन तयार झालेलें किरणोत्सर्जक द्रव्यहि एकसारखी किरणोत्सर्जनाची क्रिया त्याच्या परिमाणाच्या प्रमाणांत करीत राहतें व त्या योगानें त्याचें सतत विघटन होत असतें. या किरणोत्सर्जनाची उत्कटता त्या किरणोत्सर्जक द्रव्याच्या परिमाणाच्या सरल प्रमाणांत असते. या दोन सिद्धान्तांवरून किरणोत्सर्गाच्या सर्व दृश्य परिणामांचा व क्रियांचा उलगडा करतां येतो.

मादाम क्यूरी यांनीं असे दाखवून दिलें कीं, युरेनियमपेक्षांहि कांहीं युरेनियमयुक्त अशोधित धातूंपासून अधिक प्रमाणांत किरणोत्सर्जन होत असतें. यावरून पुढें सन १८९८ मध्यें युरेनियमपेक्षां वीस लक्ष पटींनीं अधिक अशा किरणोत्सर्गकारी द्रव्याचा शोध लागला. त्यास रेडियम हें नांव देण्यांत आलें. सर्व किरणोत्सर्जक मूलद्रव्यांमध्यें रेडियम हा फार महत्त्वाचा आहे. याचें क्षीण होण्याचें अर्धप्रमाण ( मूल द्रव्याच्या निम्म्यानें प्रमाण होण्यास लागणारा काल ) कालतः १७३० वर्षे आहे. एकीकडे याचें पृथ्वीवर उत्पादन एकसारखें चालूच आहे व युरेनियमच्या अशोधित धातूंमध्यें असणारें रेडियमचें प्रमाण स्थिर असल्यामुळें तो एक युरेनियमपासून विघटनामुळें उत्पन्न होणारा पदार्थ असून त्याचा किरणोत्सर्जक धर्म युरेनियमशीं स्थिर प्रमाणांतच नेहमीं कायम असतो. रेडियम या द्रव्यापासून फक्त अल्फा किरण निघतात. परंतु रेडियम तयार झाल्यावर कांहीं वेळानें त्यांतून बीटा व गॅमा-किरणहि निघूं लागतात. याचें कारण त्यापासून दुसरे कांहीं किरणोत्सर्जक विघटमान पदार्थ तयार होऊं लागतात. यामुळें रेडियमच्या लवणानें भरलेल्या नळींतून सर्व तीनहि प्रकारचे किरण बाहेर पडत असतात. रेडियम या द्रव्यामध्यें किरणोत्सर्गाचे चमत्कार विशेषत्वानें आढळून येतात. यापासून विघटनानें उत्पन्न होऊन मिळणारा पहिला पदार्थ म्हणजे 'रेडियमजन्य वायु' होय. थोरियम या द्रव्यापासून मिळणारा अशा तऱ्हेचा एक वायु असावा अशी कल्पना प्रथम रुदरफोर्ड यास आली होती व थोरियम हेंहि एक किरणोत्सर्जद्रव्य आहे व त्याच्या किरणोत्सर्जकतेचें मापन करतांना असें आढळून आलें कीं, या शक्तीचें प्रमाण वरचेवर बदलत असतें. याचें कारण अखेरीस असें आढळून आलें कीं, या थोरियम द्रव्यापासून एक प्रकारचें उत्सर्जन एकसारखें बाहेर पडत असते व तें हवेच्या प्रवाहाबरोबर हवेंत मिसळत असतें. यास 'उत्सर्जन' ( एमॅनेशन ) हेंच नांव देण्यांत आलें. पुढें पुढें या उत्सर्जनामध्यें उच्च परमाणुभारांक असलेल्या वायूंचेच गुणधर्म असून रासायनिकदृष्ट्या त्याचें हेलियम, निऑन, अर्गान वगैरे अचेष्ट वायूंशींच साम्य असावें. रेडियमच्या उत्सर्जनाची अर्धशक्ति क्षीण होण्यास ३·८५ दिवस लागतात. यामुळें या उत्सर्जनामध्यें आणि मूळ किरणोत्सर्जक पदार्थामध्यें ( रेडियम ) समतोलन होण्यास कांहीं आठवड्यांचा अवधि पुरेसा होतो. या वेळीं रेडियममधून इतकें उत्सर्जन झालेलें असतें कीं, पूर्वी झालेल्या उत्सर्जनाचें विघटन होऊं शकत नाहीं किंवा दुय्यम उत्सर्जनामुळें येणारी तूट नवीन उत्सर्जनानें सारखी भरून निघत असते. एका ग्रामभाराच्या रेडियमपासून निघणाऱ्या उत्सर्जनास अशी समतोल स्थिति येण्याकरितां जें उत्सर्जन लागतें त्यास 'क्यूरी' असें नांव देण्यांत आलें आहे.

**किरमिजी रंग**—कोचिनील कृमींच्या वाळलेल्या शरीरांपासून किरमिजी रंग तयार होतो. हे कृमी निवडुंगावर राहतात. हे बहुधा अमेरिका, मेक्सिको, वगैरे देशांत आढळतात. कोचिनील, पाहा.

**किराईत**—यांत दोन जाती आहेत. एक काडे-किराईत व दुसरी पालेकिराईत. पालेकिराईत हिंदुस्थानांत बागांतून होतें. काडेकिराईत नेपाळकडून कलकत्त्याच्या मार्गानें मुंबईस येतें. याची चव फार कडू असते.

याचीं वाळलेलीं पानें, फुलें, मुळें व काढे यांच्या अंगीं पौष्टिक, ज्वरनाशक व सारक धर्म आहेत.

**किराड**—किरार. एक शेतकरी जात. यांची एकंदर लो. सं. (१९११) १,५१,४५२ आहे. पैकीं मध्य हिंदुस्थानात ८९,९२२, वऱ्हाड-मध्यप्रांतांत ४७,७९३, राजपुतान्यांत ११,८०४ व संयुक्त प्रांतांत १,९३३ आहे. हे किरातच असावेत. इतर दस्यू जातींबरोबर किरात हे क्रियालोपामुळें व ब्राह्मणांशीं संबंध न ठेवल्यामुळें जातिबाह्य झाले. आर्यांप्रमाणें त्यांच्याच मार्गानें नाग, किरात व खश हे हिंदुस्थानांत आले. सं. प्रांतांतील किरारांत जादोनबन्सी, जसावत, रावस, सेंगर, धाकरा, जादोन, इत्यादि रजपूत नांवें आढळतात. त्यावरून ते रजपूत असावे. मध्यप्रांतांत नरसिंगपूर, हुशंगाबाद, बेतूल, सिवनी व नागपूर या जिल्ह्यांत यांची वस्ती असून यांची संख्या ४८,००० आहे. जातीची पंचायत आहे. जातींचीं मंदिरें आहेत. यांच्यांत विधवाविवाहास मोकळीक आहे. काडीमोड प्रचलित आहे. मध्यप्रांतांतील किरार लोक चांगले उंच असून दिसण्यांत ते सुंदर दिसतात. नागपुरास हे चांगले शेतकरी आहेत. हे बागाईत व उंसाची शेती करतात.

**किरात**—वाजसनेयि संहितेप्रमाणें किरात हे दरींत (गुहांत) राहत असत; आणि पर्वताच्या दरडीवर किराताची मुलगी (कैरातिका) औषधि खणीत आहे अशा अथर्ववेदांतील उल्लेखावरून किरात हे लोक गिरिकंदरांत राहत असत असें दिसतें. तदनंतर किरात हे लोक पूर्व नेपाळांत वस्ती करूं लागले, पण हें नांव कोणत्याहि डोंगरी लोकांना—निःसंशय मूळ रहिवाशांना—लावीत असत, आणि मानवधर्मशास्त्र कमी योग्यतेच्या क्षत्रियांना हा शब्द लावतें.

ही एक प्राचीन अशी अनार्य जात आहे. हल्लींचें टिपरा संस्थान हा पूर्वींचा किरात देश होय असें म्हणतात.

या लोकांचा मुख्य धंदा पारध हा असे. अर्जुन पाशुपतास्त्र मिळविण्याकरितां तपश्चर्या करीत असतां शंकरानें किराताचें रूप घेऊन त्याच्याशीं युद्ध केलें होतें हें प्रसिद्धच आहे.

**किरिन**— चीनमधील मांचुरियांतील एक प्रांत व शहर. प्रांताचें क्षे. फ. १,०५,००० चौ. मैल व लो. सं. साठ लक्षांवर आहे. हा प्रदेश फार सुपीक असल्यामुळें याला मांचुरियाचें धान्याचें कोठार म्हणतात. किरिन शहराची लो. सं. १,३८,९१० असून हें इमारती लांकडाच्या व्यापाराचें मोठें केंद्र आहे, व तेल गाळण्याचे कारखाने येथें आहेत.

**किरीटी रामराजा**—अनागोंदी येथें राज्य करणारा व इ. स. १५६४ मध्यें हयात असणारा आणि ज्यानें पंढरपूरचा विठोबा अनागोंदीस नेला व जो भानुदासानें (एकनाथाचा पणजा) परत आणिला अशी कथा आहे असा जो रामराजा त्याला किरीटी हें टोपण नांव होतें. हा किरीटी रामराजा म्हणजेच विजयनगरचा शेवटचा रामराज साळुव होय. रामराय पाहा.

**किर्चाफ, गुस्टाव्ह रॉबर्ट** (१८२४-१८८७)— एक जर्मन पदार्थशास्त्रज्ञ. यानें विद्युद्वहन आणि पातळ सळयांचा लवचिकपणा यांच्या सिद्धान्तासंबंधीं बरेच महत्त्वाचे शोध केले. वर्णलेखविश्लेषणाची पद्धत याची व बुन्सेनची आहे.

**किर्लोस्कर, बळवंत पांडुरंग** ऊर्फ आण्णासाहेब (१८४३-१८८५)— एक प्रमुख महाराष्ट्रीय नाटककार. यांचा जन्म धारवाड जिल्ह्यांत गुर्लहोसूर येथें झाला. लहानपणींच हे हनुमानजयंतीसारख्या उत्सवाच्या वेळीं खेळगडी जमवून नाटकें करीत. धारवाडास त्यांनीं मुलकी परीक्षा दिली. कविता करण्याचा नाद त्यांना लहानपणापासून जडला. आण्णासाहेब पुण्यास विश्रामबागेंतील शाळेंत जात असत. त्यांना स्वच्छंदानें राहण्याची संवय होऊन ते नाटकें पाहूं लागले. त्यांनीं पुण्यास आपली एक नाटक कंपनी उभारण्याचा उद्योग चालविला. त्याप्रीत्यर्थ जवळचे दागिने विकून व कर्ज काढून पैसा उभा केला. शिवाजीवर त्यांनीं ५०० आर्या रचून त्या 'दक्षिणाप्राइज कमिटी'कडे परीक्षणार्थ पाठवून दिल्या होत्या. १८७३ सालीं त्यांनीं 'श्रीशांकरदिग्विजय' नांवाचें शंकराचार्यांवर एक गद्य नाटक लिहिलें. आपल्या भाषेंत चांगलें नाटक वठवावें असें त्यांच्या मनानें घेतलें. याच सुमारास मोरोबा वाघोलीकर, बाळकोबा नाटेकर ही मंडळी त्यांनीं आपल्यांत ओढली. किर्लोस्करांनीं शाकुंतलाचें मराठींत भाषांतर करण्यास सुरुवात केली. लवकरच हा प्रयोग नाटकगृहांत होऊन त्याचें उत्पन्नहि चांगलें झालें. 'संगीत सौभद्र' हें नाटक लिहून त्यांनीं बसविलें. 'रामराज्यवियोग' हें नाटक मात्र त्यांना दुर्दैवानें पुरें करतां आलें नाहीं. त्यांचा स्वभाव दिलदार व मनमिळाऊ असे. महाराष्ट्रनाट्याला मोहक व उच्च स्वरूप देणाऱ्यांत आण्णांचा दर्जा निःसंशय फार वरचा लागेल. आण्णांनीं आपल्या कंपनीची राहणी एखाद्या संस्थानाप्रमाणें ठेवली होती. पुणें येथील किर्लोस्कर थिएटर हें आण्णांचें स्मारकच आहे. १९१३ पर्यंत किर्लोस्कर कंपनी पहिल्या दर्जाची म्हणून चालली.

**किर्लोस्कर, लक्ष्मण काशीनाथ** (१८६९- )— एक महाराष्ट्रीय कारखानदार व किर्लोस्कर बंधु, लिमिटेड,चे संस्थापक. यांचें शिक्षण इंग्रजी पांचवीपर्यंत झालें. बेळगांव येथें प्रथम सायकल-दुरुस्तीचें दुकान काढलें. नंतर १९०० सालीं शेतकीचीं लोखंडी औतें तयार करण्याचा कारखाना सुरू केला. याचीच पुढें मोठी प्रगति होऊन मोठी भांडवलाची कंपनी निघाली.

किर्लोस्करवाडी ही आदर्श वसाहत आहे. येथें सर्व प्रकारचीं लोखंडी यंत्रें तयार होतात. सुमारें दोड हजारावर लोक काम करतात. इंजिनें तयार करण्याचीहि योजना झालेली आहे. हरिहर ( म्हैसूर संस्थान ) येथें कंपनीची एक शाखा आहे. महाराष्ट्रांत यांत्रिक सामानाचे उत्पादक म्हणून लक्ष्मणरावांना मान आहे.

**किलकिल यवन**—यांना दुसरें नांव कैकिल यवन असेंहि आहे. मध्ययुगांत हिंदुस्थानांत यवनांचें एक राज्य होतें. अजिंठ्याच्या लेण्यांच्या आसपास हें राज्य असावें. आंध्रदेशांत हे यवन लोक इ. स. ९६३ पर्यंत म्हणजे चारशें वर्षें राज्य करीत होते. त्या वेळीं बौद्ध धर्म प्रचल होता. हे यवन म्हणजे आयोनियन ग्रीक होत. मध्यप्रांत व आंध्रदेश यावर राज्य करणाऱ्या यवन घराण्याचा उत्कर्ष ५७६ ते ९०० पर्यंत चालू असून त्यांच्या सत्तेचा कळस ७८२ च्या वेळीं झाला होता. हें यवन राज्य कनोजच्या साम्राज्याचें मांडलिक होतें. भागवतांत व विष्णुपुराणांत या कैकिल यवनांचा उल्लेख आहे. मध्यप्रांतांतील हे यवन राजे आठ असून ते सर्व धर्मानें बौद्ध होते.

**किलकिला राजवंश**—आतांपर्यंत उपलब्ध झालेलीं नाणीं व ताम्रपट यांवरून असें दिसतें कीं, भारशिव किंवा वाकाटक घराण्यांतील राजे हेच किलकिला राजे असून यांची राजधानी कांचनका येथें किंवा पुरीकांचनका ( नाचणा ) येथें होती. पुरीकांचनका उर्फ नाचणा हें शहर पन्ना शहराच्या ईशान्येस असलेल्या गंज शहराच्या पश्चिमेस दोन मैलांवर असून येथील नागराजे आपणांस भारशिव म्हणवून घेत. या घराण्यांतील भवनागाच्या मुलीचा विवाह बुंदेलखंडांतील ओर्च्छा संस्थानांत झांशी जिल्ह्यांतील चिरगांवच्या पूर्वेस सहा मैलांवर असलेल्या वागाट गांवच्या, विष्णुवृद्धगोत्री ब्राह्मणांकडून निर्माण केलेल्या वाकाटक वंशांतील गौतमीपुत्र नांवाच्या राजकुमाराशीं होऊन भारशिव घराणें वाकाटक वंशांत विलीन झालें. वागाट, पद्मावती, वगैरे गांवें असलेल्या प्रदेशांतूनच किलकिला नांवाची नदी वाहते; त्यावरूनच या घराण्यांतील राजांस किलकिला राजे असें नाव पडलें असावें. वाकाटक घराण्यांतील मूळ पुरुष विंध्यशक्ति यानें भारशिव राजांना विंध्याद्रीच्या सभोंवतालच्या प्रदेशांत आपली सत्ता वाढवण्यास मदत केली. या भारशिव घराण्यांतील राजे शिवभक्त असून त्यांच्या नाण्यांवर नागाची फणा, ताडाचें झाड व राजास अभिषेक करीत असलेल्या गंगा-यमुनेच्या मूर्ती दिसून येतात. किलकिला राजांनीं बुंदेलखंडांत अथवा विदिशा प्रांतांत व कुशान साम्राज्याचें वर्चस्व कमी करून विंध्याद्रि पर्वताच्या आश्रयास चणका येथें राज्यें स्थापून, तेथील राज्यकारभार आपल्याच वंशांतील नातेवाइकांच्या हातीं सोंपवून तेथें त्यांना स्वतंत्रपणें परंतु आपले मांडलिक म्हणून राज्य करण्यास मुभा दिली व आपला नागवंश वृद्धिंगत केला. वाकाटकांचें राज्य हिंदुस्थानांत सन २८४ ते ३४८ पर्यंत होतें. यांनीं आपला राज्यविस्तार दक्षिण हिंदुस्थानांतहि केला. यानंतर गुप्त घराण्यांतील चंद्रगुप्त ( २ रा ) विक्रमादित्याची प्रभावती नांवाची मुलगी वाकाटकांच्या रुद्रसेन नांवाच्या कुमारास दिली व येथून पुढें वाकाटक घराणें मागें पडून गुप्त घराणें पुढें आलें. किलकिला राजवंशाच्या कारकीर्दींत संस्कृत भाषेला मान मिळून वाङ्मय, चित्रकला, शिल्पकला, इत्यादि कलांची वाढ झाली. भूमारा येथील देऊळ, नाचणा येथील शिल्प व अजिंठ्याचीं लेणीं यावरून त्या वेळच्या कलेंतील प्रगतीची कल्पना येते.

**किलिनदिनो**—आफ्रिका. हें केनिया कॉलनीमध्यें मोंबासा बेटावर मुख्य बंदर आहे. आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील हें उत्तम बंदर आहे. या बंदरावरील धक्का याऱ्या व गुदामें वगैरे सर्व साधनांनीं युक्त असून १९२६ सालापासून हा धक्का उपयोगांत आला. येथील पाण्याची खोली ओहोटीच्या वेळींहि ३३ फूट असते.

**किलीमांजारो**— पूर्व आफ्रिकेंत हा एक मोठा पर्वत आहे. ह्याचें सर्वांत उंच शिखर १९,३२१ फूट उंच आहे. पश्चिमेस किबो व पूर्वेस मावेंझी अशीं दोन शिखरें आहेत. डोंगराच्या उतारावरील झाडी दाट असून येथें शेतीहि करितात. इ. स. १८८८ पासून पहिल्या महायुद्धापर्यंत हा पर्वत जर्मनीच्या ताब्यांत होता. पण १९१८ सालापासून सबंध जर्मन पूर्व आफ्रिकेबरोबर हाहि ब्रिटिश आधिपत्याखालीं आला आहे.

**किल्ले, कोट व तटबंदी**—देशाच्या संरक्षणाकरितां किल्ले अगर गड बांधण्याची चाल फार पुरातन आहे. रामायण-महाभारतांत किल्ले उर्फ दुर्ग यांचीं सविस्तर वर्णनें आलीं आहेत. तसेंच शहरांना तटबंदी करण्याची चालहि फार प्राचीन आहे. श्रीकृष्णाच्या द्वारकेला तटबंदी फार उत्तम होती. चाणक्याच्या अर्थशास्त्रांत किल्ल्यांचें महत्त्व वर्णिलें आहे. त्यांत औदक ( जंजिरा ), पार्वत ( गड ), धान्वन ( भुईकोट ), व वनदुर्ग असे दुर्गांचे चार प्रकार सांगितले आहेत. किल्ल्याभोंवतीं खंदक एकापुढें एक असे तीन असावे; त्यांतून बाहेर पडण्याचे गुप्तमार्ग असावे, वगैरे सविस्तर वर्णन सदर ग्रंथांत आहे. उत्तर हिंदुस्थानांत डोंगर थोडे त्यामुळें भुईकोट किल्लेच फार आहेत. दक्षिणेंत सह्याद्रि, सातपुडा, चांदवड, वगैरे डोंगर-पर्वतांत डोंगरी किल्ले उर्फ गड पुष्कळ आहेत. महाराष्ट्रांतील किल्ले भोजराजे, शिलाहार व चालुक्य यांनीं बांधले, व शिवाय मराठी राजांनीं नवीन अनेक किल्ले बांधले. कोंकणांतील पाणकिल्ले उर्फ जंजिरे मराठ्यांनीं बांधले. तोफा व दारुगोळा यांचा

प्रचार होण्यापूर्वी धनुष्यबाण, तरवारी, भाले या शस्त्रयुद्धाच्या काळांत किल्ल्यांचें महत्त्व फार होतें. आतां विमानांच्या युगांत तर किल्ल्यांना मुळींच महत्त्व उरलें नाहीं. युरोपांत प्राचीन ग्रीक-रोमन काळांत व मध्ययुगांत किल्ल्यांचें महत्त्व फार होतें, व या शास्त्रावर डुरर, म्याकिआव्हेली, वगैरे अनेकांनीं ग्रंथ लिहिले आहेत. अगदीं पहिल्या महायुद्धापर्यंत अँटवर्प, पोर्ट आर्थर, व्हर्डुन, वगैरे किल्ले अजिंक्य मानले जात होते, पण हॉविट्झरसारख्या तोफा व विमानें यांच्या सामर्थ्यामुळें हे किल्ले निरुपयोगी बनले आहेत.

**किल्हॉर्न, डॉ. फ्रॅन्झ** ( १८४०-१९०८ )—एक जर्मन संस्कृत पंडित व प्राचीन इतिहासाचे संशोधक. हे १८६६ सालीं पूना कॉलेजांत संस्कृतचे प्राध्यापक होते. यांनीं व्याकरणशास्त्रावरील ग्रंथ व भाषांतरें प्रसिद्ध केलीं. शिलालेख-ताम्रपटांच्या वाचनानें प्राचीन इतिहासांत भर घालण्याच्या कामास यांनीं सुरुवात करून दिली. 'एपिग्राफिया इंडिका' हें त्रैमासिक यांनीं इंडियन अँटिक्वेरीचें परिशिष्ट म्हणून सुरू केलें तें अद्यापि चाललें आहे. यांनीं हिंदुस्थानांत प्रसिद्ध झालेल्या सर्व लेखांची यादी पद्धतशीरपणें तयार केली व संशोधकांचा मार्ग सुलभ करून दिला. हिंदुस्थानांतून सेवानिवृत्त झाल्यावर ते गॉटिंजेन विद्यापीठांत संस्कृतचे प्राध्यापक होते. यांच्यामुळेंच जर्मन विद्यार्थ्यांमध्यें संस्कृतची आवड उत्पन्न झाली.

**किशनगड संस्थान**—राजपुतान्याच्या मध्यभागांतील एक संस्थान. याचें क्षे. फ. ८५८ चौ. मैल आहे. उत्तरेकडील भाग हा दक्षिण भागापेक्षां मोठा असून तो बहुतेक वाळूकामयच आहे. सर्वांत मोठें शिखर २,०४५ फूट उंच आहे. दक्षिणेकडील भाग सपाट असून सुपीक आहे. रूपनगर, माशी व दैन या तीन नद्या आहेत. या पर्वतांच्या रांगांमध्यें व दऱ्यांमध्ये स्फटिकांचे रंगीबेरंगी दगड सांपडतात. सरवारजवळ अभ्रकाचे दगड विपुल सांपडतात. किशनगडच्या राजधानीनजीक सोडालाइटचे दगड सांपडतात. दक्षिणेंतील मैदानवजा भागांत वज्रतुंड दगडांची विपुलता आहे. काळवीट, हरणें, रानडुकरें व नीलगाई हे प्राणी आहेत. पावसाचें सरासरी प्रमाण २०।२१ इंच आहे. लो. सं. ( १९४१ ) १,०४,१५५ आहे. किशनगड, रूपनगर व सरवार या तिन्ही शहरांना म्युनिसिपालिट्या आहेत. ढुंढारी ही भाषा मुख्यतः प्रचलित आहे. येथील मुख्य धंदा शेतकीचा आहे. ज्वारी, बाजरी, मूग, मका, तीळ, गहूं, चणे व कापूस हीं पिकें होतात. शेळ्या व मेंढ्या यांची समृद्धि असून त्यांचा उपयोग लोंकर, दूध व मांस यांच्यासाठीं करण्यांत येतो. या शहरानजीक सिलोरा दगडाच्या खाणी असून त्याच्या उत्तम फरशा तयार होतात. चिटाचें कापड, निरनिराळ्या रंगांचीं कापडें, किनारी, पाणी पिण्याचीं भांडीं व गवतापासून तयार होणाऱ्या बाटल्या हा माल तयार होतो. संस्थानांत दुष्काळ वरचेवर पडतात. वार्षिक उत्पन्न अंदाजें १० लाख रुपये आहे. येथें बऱ्याच शिक्षणसंस्था आहेत. हल्लींचे महाराज सुमेरसिंग बहादुर हे १९३९ सालीं गादीवर आले. हें संस्थान आतां राजस्थान संघांत सामील झालें आहे.

किशनगड—हें संस्थानच्या राजधानीचें शहर असून तें राठोड रजपूत वंशांतील किशनसिंगानें १६११ त वसविलें. सरकारी हायस्कूल अलाहाबाद विश्वविद्यालयाला जोडलेलें आहे.

**किशनचंद**—एक फारसी कवि. हा दिल्लीचा राहणारा. काव्यांत यानें आपलें नांव इखलास असें दिलें आहे. यानें 'हमेश बहार' ( सतत वसंत ) नांवाचा तझकिर ( चरित्र ) ग्रंथ इ. स. १७३३ त केला असून त्यांत जहांगीरपासून महंमदशहापर्यंतच्या कारकीर्दींत झालेल्या हिंदुस्थानांतील साधारण २०० कवींचीं अकारविल्हे चरित्रें दिलेलीं आहेत. फारशींत हा निष्णात असून अलमगीरच्या हाताखालीं नोकर होता. यानें त्या शहाची 'बादशहा नामा' नांवाची एक बखर लिहिली आहे.

**किष्किंधा**—तुंगभद्रेवरील अनागोंदी म्हणून जें प्रख्यात राजधानीचें शहर तीच प्राचीन किष्किंधा होय, असा सर्वसाधारण लोकसमज आहे. येथें रामाच्या वेळीं वानरांचें राज्य होतें. वाली व सुग्रीव यांच्या राज्यव्यवस्थेवरून व हनुमान आणि अंगद यांच्या चातुर्यावरून वानर हा एक बराच सुधारलेला लोकसमाज होतासें दिसतें.

**किसान**—एक जात. यांची एकंदर लो. सं. ( १९११ ) ३,९३,४३६ आहे. बहुतेक किसान सं. प्रांतांतच आहेत. बंगाल, बिहार व ओरिसा यांमध्यें सुमारें ४०,००० आढळतात. संस्कृत कृशान म्हणजे नांगऱ्या यावरून हा किसान शब्द झाला असावा. बाधाम, गद्दार, हर्दिय, हलदी, जारीय, खागी, लोधा, पतारिया व सकसेन या नऊ पोटजाती आहेत. बालविवाह, प्रौढविवाह व पुनर्विवाह हे रूढ आहेत. हे हिंदू असून हिंदु देवतांचीच पूजा करतात. देवी व मिया यांना बकरीचा बळी देतात व तें मांस फकिरांना व धानुकांना वांटतात. हे ऊंस, तमाखू व इतर धान्यें पिकवतात. खागी हे उत्तम शेती करणारे असून मोठे उद्योगी आहेत.

**किस्फालुदी, अलेक्झांडर** ( १७७२-१८४४ )—हा एक हंगेरिअन कवि असून त्याचा मुख्य भावगीतसंग्रह 'हिंफेचीं प्रेमगीतें' या नांवाचा असून यानें त्याला तद्देशीय कवींमध्यें अग्रस्थान मिळवून दिलें. यानंतर त्यानें कांहीं ऐतिहासिक नाटकें लिहिलीं.

**किस्फाल्दी, चार्लस** ( १७८८–१८३० )—हा वरील कवीचा भाऊहि नाटककार होता. त्याचीं उत्तम सुखान्त नाटकें 'दि सूटर्स', 'दि मर्डरर्स' असून त्याचें उत्तम दुःखान्त नाटक 'इरेन्' हें आहे.

**किस्लिंग, विडकुन आब्राहाम लौरिझ** ( १८८७- )—एक नार्वेजियन सेनानी व मुत्सद्दी. प्रथम याचें रशिया व नंतर ब्रिटन यांशीं सूत होतें. पण हिटलरचा सार्वत्रिक विजय पाहून हा त्याच्या पक्षास मिळाला व नॉर्वे घेण्याच्या कामीं जर्मनीला त्यानें साहाय्य केलें. तेव्हां नॉर्वे जर्मनीच्या ताब्यांत असेपर्यंत याला हिटलरनें नॉर्वेचा मुख्य नेमिलें होतें. विश्वासघात आणि राज्यद्रोह यासंबंधांत त्याचें नांव दृष्टान्तादाखल दिलें जातें.

**कीकट**—एक प्राचीन राष्ट्र. ऋग्वेदांत फक्त एकाच ऋचेंत ( ३,५३,१४ ) या लोकांचा उल्लेख सांपडतो. यास्क म्हणतो कीं, कीकट हें एका अनार्य देशाचें नांव आहे ( निरुक्त ६–३२).

पुढील काळीं कीकट हें मगधाचें दुसरें नांव म्हणून ओळखण्यांत येऊं लागलें. कीकट या शब्दाचा संबंध कैकाडी या लोकांशीं इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनीं जोडला आहे, पण तो संभाव्य वाटत नाहीं.

**कीकीचें पान**— एक लहान मुलींचा खेळ. खेळणाऱ्या मुली टाळ्या वाजवून हातांच्या टिचा कानांच्या बाजूस लावतात व पुढें जाऊन मागें येतात. तोंडानें 'कीकीचें पान बाई की की। सागर मासा सू सू ॥' इ. म्हणतात.

'केतकीचें पान बाई की की' असाहि खेळ आहे. यांत दोन मुली समोरासमोर एक हात डोक्यावर व दुसरा कमरेवर अशा तऱ्हेनें उभ्या राहतात. नंतर गिरकी घेऊन एकमेकीं जागा बदलतात. एक बसते तर एक उभी राहते. पुन्हां गिरकी घेऊन जागा बदलतात.

**कीचक**—पूर्वे मत्स्यदेशाचा राजा जो विराट त्याचा हा सेनापति होता. विराटाची राणी सुदेष्णा हिनें याला आपला (मानीव) भाऊ मानलें होतें. हा केकय देशांतील असून सूत जातीचा होता. याला १०५ कीचक ( अनुकीचक या नांवाचे ) भाऊबंद होते. हा शक्तिमान् व शूर होता. अज्ञातवासांत पांडव विराटाच्या घरीं होते त्या वेळीं द्रौपदी सैरंध्रीचा वेष घेऊन सुदेष्णेची दासी म्हणून राहिली होती. तेव्हां कीचकाचें मन तिच्यावर गेलें व यानें तिजजवळ अतिप्रसंग केल्यामुळें यास भीमानें ठार मारलें. कृ. प्र. खाडिलकर यांचें 'कीचकवध' नांवाचें प्रसिद्ध नाटक प्रसिद्ध आहे.

**कीटकभक्षी**—( एन्टोमोफागा ). मुंग्या, मधमाशा वगैरेसारख्या प्राण्यांस हा शब्द लावण्यांत येतो. कारण यांच्या बाल्यावस्थेंत हे बहुधा कीटकांवर उपजीविका करतात. तसेंच कांगारूसारख्या पोटास पिशव्या असलेल्या प्राण्यांसहि कीटकभक्षी म्हणतात. कारण त्यांचाहि उदरनिर्वाह कीटकांवर होतो. याप्रमाणेंच मुंगीभक्षक यासारख्या दंतविहीन प्राण्यांसहि कीटकभक्षी म्हणण्यांत येतें.

**कीटकभोजी प्राणी**—( इन्सेक्टिव्होरा ). कीटकांवर उपजीविका करणारा सस्तन प्राण्यांचा एक मोठा वर्ग आहे. हे प्राणी बहुधा आकारानें लहान असून त्यांतील पुष्कळसे जमिनीच्या पोटांत बिळें करून राहतात, व त्यांपैकीं कांहीं वर्षांतून कांहीं महिने सुस्त पडून राहतात. श्रूमाइस, मोल व साळू हे या वर्गांतील प्राणी होत.

**कीटकशास्त्र**—( एन्टॉमॉलॉजी ). प्राणिशास्त्राच्या ज्या शाखेमध्यें कीटकांचा अभ्यास केला जातो त्यास कीटकशास्त्र असें म्हणतात. खऱ्या कीटक जातीच्या प्राण्यांमध्यें डोकें, ऊर आणि उदर हीं अगदीं स्वतंत्र असतात. तसेंच कीटकास तीनपेक्षां अधिक पायांच्या जोड्या नसतात, म्हणजे ते षट्पाद असतात. हे सर्व पाय त्यांच्या उराशीं जोडलेले असतात. प्रत्येक पायास सहा ते नऊ सांधे असतात. सामान्यतः पंखांच्या दोन जोड्या असतात; परंतु कांहीं जातींत पंखांची एकच जोडी नसते किंवा कांहीं जातींत मुळींच पंख नसतात. बिटल् म्हणजे श्रेणकिड्यासारख्या जातीच्या प्राण्यांत यांपैकीं पुढील पंखांच्या जोडीस इलेट्रा किंवा पक्षावरण असें म्हणतात. कीटक हे वायुनलिकाद्वारा श्वासोच्छ्वास करतात. डोक्याचे अनेक भाग एकत्र मिळून रचना झालेली असते व त्यास दोन पुढें आलेले संज्ञातंतु असतात, व त्यावरच डोळे असतात. हे डोळे संयुक्त ( क्वचित् एकाकी ) असतात व ते तोंडास जोडलेले असतात. उदराचे निरनिराळे भाग एकमेकांवर चलनवलन करून आणतां येतात आणि त्याला जोडून गतिदायक गात्रें नसतात, परंतु त्यांच्या अखेरीस जननेंद्रियांची रचना असून कांहींच्या बाबतींत तेथें नांगी असते. अन्नमार्गनालिका ही घसा अथवा *गळा, चुनाळासारखी अन्नाची पिशवी, स्नायुमय पक्वाशय,* उदर, आंतडीं आणि अखेरीस मलद्वार यांची बनलेली असते. यांच्या शरीरांत रक्तपेशींचा व्यूह किंवा रचना नसते. यांची सर्व रुधिराभिसरणक्रिया पाठीच्या आंत असलेल्या एका रक्तपेशीच्या चलनवलनानें होते. मज्जातंतुव्यूहांत म्हणजे डोक्यामध्यें दोन मज्जापिंड असतात व या मज्जातंतूंचा घशाभोंवतीं एक वलयाकार बनून त्यापासून दोन मज्जातंतू निघतात व त्यांस मधून मधून ग्रंथी असतात. यांमध्यें नर आणि मादी यांचा स्वतंत्र वर्ग असून त्याचीं स्वतंत्र ऐंद्रिय रचना असते. बहुतेक कीटक अंडीं घालतात. यांचें पुनर्जनन बहुधा ऐंद्रिय संयोगानें होतें. तथापि कांहीं कीटकांच्या बाबतींत

इंद्रियसंयोगविरहित पुनर्जनन( पार्थेनोजेनिसिस )हि होतें. यांचीं लहान पिलें मोठ्या कीटकांपेक्षां अगदीं निराळीं दिसतात व त्यांचें पुढें रूपांतर होऊन त्यांस प्रौढावस्था प्राप्त होते. यांच्या मुख्यतः पुढें दिल्याप्रमाणें जाती आहेत : आप्टेरा-छुपकेदार शेपटीचे ; २ हेमिप्टेरा-ढेकूण, वृक्षयूका, वगैरे ; ३ ऑर्थोऑप्टेरा-झुरळ, टोळ, वगैरे ; ४ न्युरोप्टेरा-वाळवी, ड्रेगनफ्लाय, वगैरे; ५ डिप्टेरा-माशा, डांस वगैरे; ६ लेपिडेप्टेरा-फुलपांखरें, पतंग वगैरे ; ७ हेमिनोप्टेरा-मधमाशा, मुंग्या, वगैरे ; ८ कोलीऑप्टेरा-काजवे, शेणकिडे वगैरे.

**कीटिंग, कर्नल**— एक इंग्रज सेनापति. पेशवाईत वारभाईच्या कारकीर्दीतील इंग्रज-मराठे युद्धांत नापारच्या लढाईच्या वेळीं राघोबादादानें सुरतेस जाऊन इंग्रजांकडे मदतीची याचना केल्यावरून इंग्रजांनीं त्याच्या मदतीस कर्नल कीटिंग या इंग्लिश सेनापतीची नेमणूक केली ( सन १७७५ ). परंतु राघोबाच्या अव्यवस्थितपणामुळें या मदतीचा त्यास कांहींच उपयोग झाला नाहीं. उलटपक्षीं कीटिंगनें राघोबास त्या फौजेचे थकलेले पगार भागवण्यासाठीं कांहीं रक्कम कर्जाऊ दिली. त्याबद्दल इंग्रजांकडून त्यास ठपका आला. यानें फत्तेसिंगास आपल्या बाजूस वळविण्यासाठीं केलेले प्रयत्न निष्फळ ठरले.

**कीट्स, जॉन** ( १७९५ – १८२१ )— एक इंग्रज कवि. लहानपणीं त्यानें वैद्यकीचा अभ्यास केला. काव्याकडे त्याचा तेव्हांपासूनच कल होता. त्याचीं पहिलीं दोन पुस्तकें लोकांना पसंत पडलीं नाहींत. त्याच्या तिसऱ्या पुस्तकाच्या प्रसिद्धीपासून मात्र त्याची उत्तम इंग्लिश कवींत गणना होऊं लागली. त्यानें लिहिलेलें 'लॅमिआ' हें काव्य इंग्लिश भाषेतील काव्यांत फारच

उत्तम ठरतें. 'ऑन फर्स्ट लुकिंग इन्टु चॅपमन्स होमर' . सर्वांत उत्तम आहे. 'ऑटम', 'नाइटिंगेल' व मेलँकली' हीं त्याचीं लघुकाव्येंहि चांगलीं आहेत. त्याच्या काव्यांतील वैशिष्ट्यें म्हणजे प्रबल वैषयिक कल्पना आणि सौंदर्यप्रेम चांगल्या रीतीनें वर्णन करण्याची हातोटी व अतिशय कर्णमधुर पद्यरचना हीं होत. शेले यानें त्याच्या मृत्यूवर एक 'ॲडोनिस' नांवाचें काव्य लिहिलें आहे.

**कोड व्रण**— हा रोग वृक्षास होतो. याचा उद्भव कांहीं परोपजीवी वनस्पतींपासून होतो. त्यामुळें झाडाची साल हळूहळू नष्ट होऊन मोठमोठाले उघडे चट्टे पडतात व ते वाढत जातात. हा रोग सफरचंद, वगैरे बऱ्याच झाडांना होतो.

**कीथ, आर्थर बेरीडेल** ( १८८९–१९४४ )— एक इंग्रज संस्कृतभाषापंडित व राज्यघटनाविशारद्. प्रथम इंग्लिश वसाहतींच्या विभागांत यांनीं उत्कृष्ट कामगिरी केली. नंतर ते प्रो. मॅक्डोनेल यांच्या जागीं संस्कृतचे 'बोडन प्रोफेसर' झाले. 'वेदिक इंडेक्स' हा त्यांनीं व मॅक्डोनेल यांनीं केलेला ग्रंथ संस्कृत वाङ्मयाच्या सूक्ष्म अभ्यासास व संशोधनास फार महत्त्वाचा आहे. तैत्तिरीय संहिता, ऐतरेय ब्राह्मण-आरण्यक, इ. चीं भाषांतरें, तसेंच संस्कृत नाट्य, वाङ्मय, तत्त्वज्ञान यांवर त्यांनीं लिहिलेलीं पुस्तकें हीं भारतीय प्राचीन साहित्याचा लौकिक जगांत वाढविण्यास व अभ्यासकांस उपयुक्त आहेत. राज्यघटनाशास्त्रावरहि त्यांचीं महत्त्वाचीं पुस्तकें आहेत.

**कीन**— फ्रान्समधील नॉर्मंडी प्रांतांतल्या काल्व्हाडॉस या जिल्ह्याचें ( डिपार्टमेंट ) मुख्य शहर. लो. सं. ६१,३३४ आहे. ओर्न नदीच्या मुखापासून सुमारें ९ मैल आंत हें शहर आहे, पण तेथपर्यंत लहान जहाजें जातात. येथें व्यापाराचें केंद्र असून या जिल्ह्यांत विपुल होणाऱ्या शेतीच्या मालाची हीच बाजारपेठ आहे. येथें कारखानेहि मोठाले आहेत. येथें विद्यापीठ (स्था. १४३२), वस्तुसंग्रहालय व एक लक्ष ग्रंथ असलेलें सार्वजनिक ग्रंथालय आहे. मूल्यवान् इमारती व दगडाच्या खाणी असून कलाबतु येथें पुष्कळ तयार होतो.

**कीन, एडमंड** ( १७८७–१८३३ )—हा इंग्रज नट १८१४ मध्यें ड्रुअरीलेन नाट्यगृहांत प्रथम शायलॉकच्या भूमिकेंत आणि नंतर ३ ऱ्या रीचर्डच्या भूमिकेंत स्टेजवर आला. हीं त्याचीं कामें फार उत्तम वठलीं. त्याला हें यश एकदम आणि अपूर्व लाभलें. नंतर त्यानें पुढील भूमिकाहि उत्तम वठविल्या : ऑथेलो, हॅम्लेट, मॅक्बेथ, आयागो, लिअर, इत्यादि. कोलिरिज या सुप्रसिद्ध लेखकानें आणि हॅझलीट आणि लॅंब यांनींहि या नटाची फार स्तुति केली आहे.

**कीन, चार्लस सॅम्युअल** ( १८२३–१८९१ )—एक इंग्रज चित्रकार व शिल्पकार. हा सॅम्युअल ब्राउन कीन नांवाच्या सॉलीसीटरचा मुलगा. चार्लस कीन हा कलाभिज्ञ म्हणून प्रसिद्ध आहे. पिलकिंगटण नांवाच्या एका शिल्पज्ञाकडे तो शिकावयास राहिला. हा फावल्या वेळांत ऐतिहासिक व नौकाविषयक चित्रें पाण्याच्या रंगानें काढीत असे. १८५१ सालीं 'पंच' पत्रांतून तो प्रथमच लोकांपुढें आला. कीनच्या चित्रांची सर्वत्र मागणी होऊं लागली. 'पंच' मधील त्याचीं प्रसिद्ध चित्रें चार्लस रीडच्या 'क्लॉयस्टर ॲंड दि हार्थ' आणि जॉर्ज मेरिडिथच्या 'इव्हॅन हॅरिंगटन' नांवाच्या पुस्तकामधील विविध प्रसंग ह्यांचीं

होत. कीनचें 'पंच' जास्त लोकप्रिय होऊं लागलें. वेणुवाद्य वाजविण्यांतहि तो कुशल होता. कुंचला व पेन्सिल यांत तो प्रवीण होताच, परंतु खोदकामांत व ठसे करण्याच्या कामांतहि त्याचें प्रावीण्य दिसून येतें.

**कीर**—एक शेतकरी जात. हिंदुस्थानांत कीरांची संख्या सु. पस्तीस हजार आहे. तींपैकीं निम्याहून जास्त राजपुतान्यांत आहे. यांनीं आपली मारवाडी भाषा कायम ठेविली आहे. यांच्यांत १२ गोत्रें आहेत. यांना विधवाविवाहास मोकळीक आहे. हे भैरव व देवी यांची पूजा करतात. कीर आपली गाय कसायास विकीत नाहींत. कीर लोक प्रेतें दहन करतात. जातिपंचायतीकडे साधारण तंटे मोडण्याचे काम असतें. हे लोक नदीकांठीं राहतात.

**कीरथर**—ही पर्वतांची रांग असून सिंध व बलुचिस्तानांतील झलवान देश यांच्यामधील सरहद्द बनलेली आहे. या पर्वताची सर्वांत मोठी रुंदी म्हणजे ६० मैल आहे व याचें सर्वांत उंच शिखर झरदक असून त्याची उंची ७,४३० फूट आहे. दुसरें सुंदर शिखर कुत्ताकबर (कुत्र्याचें थडगें) या नांवाचें असून त्याची उंची ६,८७८ फूट आहे. या पर्वताची मुख्य शाखा म्हणजे 'लखी' ही होय.

कीरथर पर्वतामध्यें मरी, जमाली, बलोच, जमोट, छूटाजाट हे लोक असून शिवाय खिद्रानी व सासोली ब्राहुइ जातींचे लोकहि येथें आढळतात. यांचा धंदा मेंढपाळाचा असून याशिवाय हे पर्वतामध्यें सांपडणाऱ्या खुज ताड यांची निर्गत करतात. सिंधमध्यें आढळणारी ऐबेक बकऱ्याची जात व डोंगराळ बकरीं हीं या पर्वतांत मुबलक आहेत.

**कीर्तन**—भक्तीच्या नऊ पायऱ्यांपैकीं कीर्तन ही दुसरी पायरी आहे. भगवंताची भक्ति करून त्याच्या चरित्राचें गायन करणें, जगाला सन्मार्गाला लावणें, हें प्रवर्तित झालेलें अनादि चक्र तसेंच चाललें पाहिजे अशी व्यवस्था करणें, हा कीर्तनाचा प्रधान हेतु आहे. हा संप्रदाय फार प्राचीन आहे. याचे आद्यगुरु नारद होत. भगवद्भक्त ध्रुव, प्रल्हाद, इत्यादिकांचेहि नारद हे गुरु होत. कीर्तनपरंपरा महाराष्ट्राइतकी इतरत्र हिंदुस्थानांत रुजलेली आढळत नाहीं. इतरत्र बृहन्महाराष्ट्रांत इकडूनच गेलेली आढळेल. या संप्रदायांतील ज्ञानेश्वर, नामदेव, भानुदास हे पहिले कीर्तनकार होत. रामदास व त्यांचे शिष्य कीर्तन करीत असत. नामदेवाच्या नंतर तुकारामानें कीर्तनाचा प्रसार जास्त केला. बंगालमध्यें 'कीर्तन' म्हणजे एक निराळाच प्रकार आहे. कीर्तन हें एक लोकजागृतीचें अत्यंत सुलभ व सद्यःफलदायी असें साधन आहे. पेशवाई नष्ट होण्यापूर्वी हरिदास मोलाशिवाय कीर्तन करीत असत. गेल्या शतकांत अनंतफंदी, रामजोशी, श्रीपतिबुवा, ब्रह्मनाळकर, सांगलीकर हे नामांकित कीर्तनकार होऊन गेले. अलीकडील कीर्तनकार गणेशशास्त्री मोडक, रामचंद्रबोवा काशीकर, मसूरकर व चाफेकर हे होत. पुण्यांत व मुंबईंत कीर्तनसंस्था असून त्यांचीं संमेलनें भरत असतात. दक्षिणेकडे तेलंगणांत व कर्नाटकांतहि कीर्तनांची चाल आढळते.

**कीर्तने, नीळकंठ जनार्दन** (१८४४-१८९६)—मराठ्यांच्या इतिहासाचे आद्य टीकाकार. हे विनायक जनार्दन कीर्तने यांचे धाकटे बंधु होत. यांनीं देवास संस्थानची दिवाणगिरी केली. यांना मराठ्यांच्या इतिहासाची कळकळ असे. ग्रांट डफ यांच्या इतिहासावर खरमरीत टीका प्रथमच यांनीं केली. मल्हार रामरावकृत शिवाजीचें सप्तप्रकरणात्मक चरित्र यांनीं प्रसिद्ध केलें. व न्या. रानडे यांना मराठ्यांचा इतिहास लिहिण्यास सामुग्री मिळवून दिली.

**कीर्तने, विनायक जनार्दन** (१८४०-१८९१)—एक महाराष्ट्रीय नाटककार. वयाच्या १२ व्या वर्षीं यांनीं एक निबंध लिहिला व त्याची फार तारीफ झाली. यांनीं १८६० मध्यें 'थोरले माधवराव' व दोन वर्षांनीं 'जयपाळ' हीं नाटकें लिहिलीं. १८७५ त सर टी. माधवरावांबरोबरच ते बडोद्यास नायब दिवाण म्हणून गेले. १८७७ त यांना रावबहादुरची पदवी मिळाली. १८८८ त पुन्हां इंदुरास दिवाण म्हणून आले. १८९० त यांचा आणि होळकरांचा बेबनाव होऊन त्यांनीं इंदूर सोडलें व पुण्यास वस्ती केली. त्या ठिकाणीं शारीरिक व मानसिक दुःखानें खंगत जाऊन १८९१ च्या डिसेंबरांत ते वारले. मालकमच्या 'मध्य हिंदुस्थान' या ग्रंथाचें कीर्तन्यांचें भाषांतर अगदीं नीरस वठलें अशी टीका विद्वद्वर्य वि. मो. महाजनी यांनीं केलेली आहे. (वि. विस्तार, पु. ३८ पा. ९२).

**कीर्तिकर, कान्होबा रणछोडदास** (१८४९-१९१९)—एक महाराष्ट्रीय शास्त्रज्ञ व साहित्यिक. वैद्यकीचा अभ्यास करून सरकारी नोकरी केली. कॉलेजमध्यें प्रोफेसर होते. लेफ्टनंट कर्नलच्या हुद्यापर्यंत चढले व १९०४ सालीं सेवानिवृत्त झाले. यांचे वनस्पतिशास्त्रावरचे ग्रंथ इंग्रजींत आहेत. हे लहानपणापासून कवि होते. कांहीं कविता व विविध विषयांवरचे ग्रंथ मराठींत रचले. महाराष्ट्र साहित्य संमेलन व कविसंमेलन यांचे ते एकेकदां अध्यक्ष होते.

**कीर्तिमुख**—एक शिल्पप्रकार. देवळाच्या शिखरापाशीं गाभाऱ्याच्या उंबरठ्यावर खालींवर, किंवा देवमूर्तीच्या शिरोभागीं एक सिंहासारखें अक्राळविक्राळ तोंड काढलेलें असतें, त्याला म्हणतात. स्कंद पुराणांत (शिवकांड, १७ वा अध्याय) याविषयीं एक कथा आहे. जालंदरला मारण्यासाठीं शंकराच्या

क्रोधावस्थेंत एक सिंहमुख–आकृतीचा पुरुष निर्माण झाला. जालंदरादिकांना मारूनहि त्याची क्षुधा शमेना; तेव्हां शंकरानें त्याला स्वतःचेंच शरीर खाण्यास सांगितलें व उरलेल्या तोंडाच्याच फक्त आकृतीला 'कीर्तिमुख' असें नांव दिलें व प्रत्येक शिवालयांत हें काढण्याविषयीं आज्ञा केली. लिंगायतांच्या 'अनुभव शिखामणीं'त वेगळीच कथा आहे. नारसिंह विष्णूच्या वरपूर्तीसाठीं शंकरानेंच हें रूप घेतलें, असें आहे.

प्राचीन शिल्पकर्मांतून शोभेसाठीं हें काढण्यांत येत असतें. इ. स. ५ व्या शतकापासून तरी हें आढळतें. जैन-बौद्ध शिल्पांतहि हें प्रामुख्यानें दिसेल.

अलंकारांतहि कीर्तिमुखाची आकृति दिसते. हत्तीच्या सुळ्यावरचा एक अलंकार म्हणून कानडी वाङ्मयांत उल्लेख सांपडतात (पंप भारत, पंप रामायण पाहा). याला गुजराथेंत ग्रास, ग्रासपति, ग्रासद अशीं नांवें आहेत, तर द्राविडी भाषेंत सिंहललाट, सिंहमुख असें म्हटलें जातें. इंडोनेशियांतहि कीर्तिमुखाचें अस्तित्व असून त्याचें स्वरूप मात्र वेलपत्तीच्या नक्षीनें सौम्य केलेलें दिसेल.

**कील कालवा**—युरोपमधील हा जहाजें–वाहतुकीचा कालवा ६१ मैल लांब व ४५ फूट खोल असून त्यानें एल्ब नदीच्या मुखाजवळील ब्रून्सबुटेल शहर बाल्टिक समुद्रावरील कील बंदराला जोडलें आहे. म्हणजे उत्तर समुद्र आणि बाल्टिक समुद्र या कालव्यानें जोडले जातात. हा कालवा १८९५ मध्यें वाहतुकीला चालू झाला. १९१९ पर्यंत हा कालवा जर्मन सरकारच्या ताब्यांत होता. आतां अलीकडे तो आंतरराष्ट्रीय व्यापाराला खुला केलेला आहे.

**कील शहर**—जर्मनी, कील उपसागरावरचें एक बंदर. कील कालव्याच्या एका टोंकाशीं असून जर्मनीच्या आरमाराचें एक केंद्रस्थान होतें. येथें १६ व्या शतकांतील एक राजवाडा व पुढील शतकांतील विद्यापीठ आहे. आतां या बंदराचा उपयोग व्यापारासाठीं मोठा होत आहे. जहाजांची बांधणी आणि ठेवणी यासाठीं कीलला महत्त्व आहे, तसेंच येथें मच्छीमारीचा धंदा मोठ्या प्रमाणांत चालतो. होलस्टीनचे ड्यूक येथें राहत. लो. सं. २,७२,३११.

**कीलाकृति लिपि**—पाचरी लिपि; बाणाग्र लिपि. आशिया खंडांतील युफ्रेटिस नदीच्या आसमंतात्, आज ज्याला दक्षिण मेसापोटेमिया म्हणतात त्या प्रदेशांत, सुमेरी लोक राहत होते. त्यांनींच प्रथम अशी बाणाच्या टोकासारखी किंवा पाचरीप्रमाणें दिसणारी लिपि तयार केली व ती पुढें बाबिलोनी व असुरी लोकांनीं उचलली. हीं अक्षरें लोखंडी किंवा लांकडी खिळ्यांनीं ओल्या मातीच्या विटांवर दाबून उठवीत, त्यामुळें त्यांस असा आकार येत असे. या लेखांस इष्टकालेख म्हणत. ही लिपि आरंभीं चित्रात्मक होती. तिला इराणी लोकांनीं वर्णात्मक स्वरूप दिलें. प्राचीन सुमेरी, बाबिलोनी, असुरी व इराणी ग्रंथ याच लिपींत आहेत. इराणचा बादशहा दरायस यानें बेहिस्तान येथें १,७०० फूट उंचीच्या खडकावर आपला वृत्तान्त याच लिपींत कोरून ठेवलेला आज पाहण्यास मिळतो. अठराव्या शतकाच्या अखेरीस लिपितज्ज्ञांनीं अशा कीलाकृति लिपींतील ग्रंथांचें वाचन करण्याचा प्रयत्न केला. पुढें बर्नोफ, लासेन, रॉलिन्सन, स्मिथ, वगैरे विद्वानांनीं तो तडीस नेला तेव्हां आज या लिपीचें वाचन अवघड राहिलें नाहीं.

**कीलिंग बेटें**—'कोकोस' अथवा 'कीलिंग' बेटें म्हणजे हिंदी महासागरांतील पोंवळ्यांच्या बेटांचा एक समुदाय. यांत एकंदर २० बेटें असून वर्तुलाकार प्रवाळखडकांची रुंदी ६॥ मैल आहे. कीलिंग बेटांत नारळाचें उत्पन्न फार होतें. तेथील सर्वसामान्य प्राणी म्हणजे नारळावर उपजीविका करणारा राक्षसी खेंकडा हा होय. बटेव्हियापासून केपपर्यंत जलपर्यटन करीत असतांना १६०९ सालीं कॅप्टन विल्यम कीलिंग यानें हीं बेटें शोधून काढलीं. १८५६ सालीं सर्व कीलिंग बेटें इंग्रजी अमलाखालीं आलीं. १९०३ सालीं स्ट्रेट्स सेटलमेंटच्या गव्हर्नरकडे या द्वीपसंघाची व्यवस्था गेली. लो. सं. (१९३१) १,१४२.

व्हिक्टोरिया राणीनें हीं बेटें रॉस कुटुंबाला बक्षीस दिलीं होतीं. बेटांचा राजा जॉन सिडने हा १९४५ सालीं वारला. त्याच सालीं जपाननें या बेटांवर बाँबहल्ला केला होता. बेटांवर चिनी, मलायी व हिंदी लोकांची वस्ती आहे. यावर निसर्गदत्त संपत्ति विपुल आहे. आतां हीं बेटें विकत घेण्याचा ब्रिटिश सरकारचा विचार आहे.

**कीव्ह**—हें पूर्वी रशियांत एक स्वतंत्र राज्य होतें. हल्लीं हा प्रदेश युक्रेनिअन सोशॅलिस्ट सोव्हिअट रिपब्लिकमध्यें सामील करण्यांत आला असून त्याचें क्षेत्रफळ १९,६७६ चौ. मैल आणि लोकसंख्या ५०,००,००० आहे. हा प्रदेश बहुतेक सपाट आहे व त्यांतून नीपर नदी वाहते. पहिल्या महायुद्धापूर्वी बीट साखरेच्या कारखान्यांचें केंद्र होतें.

कीव्ह शहर ओडेसाच्या उत्तरेस २८० मैलांवर नीपर नदीच्या उजव्या कांठावर आहे. हें शहर साखर आणि साखरेंत पाकवलेलीं फळें यांकरितां प्रसिद्ध आहे. येथें १५८८ सालीं स्थापन झालेलें विद्यापीठ असून हें पवित्र धार्मिक–स्थान आहे. याची लोकसंख्या ८,४६,२९३ आहे.

**कुआला लुंपूर**—मलाया फेडरेटेड स्टेट्समधील सर्वांत मोठें शहर. हें सेलांगोर संस्थानची राजधानी आहे. लो. सं.

(१९३९) १,३८,४२५. हें व्यापाराचें व राज्यकारभाराचें केंद्र आहे.

**कुओमिन्टंग**—हा चीनच्या दक्षिण भागांतला प्रबल राष्ट्रीय पक्ष आहे. त्याचा आद्य संस्थापक सन्-यत्-सेन हा असून १९१२ ची राज्यक्रान्ति याच पक्षानें घडवून आणली. १९२३ सालीं या पक्षाची पुनर्घटना होऊन चँग-कै-शेकच्या नेतृत्वाखालीं त्याचा मोठा प्रसार झाला. १९३७ च्या जपानी स्वारीला या पक्षानें चांगलें तोंड दिलें, आधुनिक लोकशाहीच्या पद्धतीनें चीनचा राज्यकारभार चालावा असें या पक्षाचें धोरण आहे. पण नुकतीच बोल्शेव्हिक लोकांची चढाई होऊन हा पक्ष सत्तात्याग करण्याच्या बेतांत आहे.

**कुओ मो-जो** (१८९२- )—या प्रसिद्ध चिनी साहित्यिकाचा जन्म १८९२ त झाला. यानें ५ कवितांचे ग्रंथ, ६ निबंध-ग्रंथ, ५ नाटकें, १० कादंबऱ्या, १२ जर्मन आणि रशियन ग्रंथांचीं भाषांतरें इतकें लेखन केलेलें आहे. यांमध्यें 'गॉडेस' हे खंडकाव्य व 'थ्री फीमेल रेबेल्स' हें नाटक हीं विशेष प्रसिद्ध आहेत. 'ए स्टडी ऑफ एन्शंट चायनीज सोसायटी' हा चिनी इतिहासाचें व्यावहारिक स्वरूप विशद करणारा ग्रंथ त्याच्या पुराणवस्तुशास्त्रावरील ग्रंथांत महत्त्वाचा गणला जातो. १९४० पासून तो चिनी राष्ट्रीय सरकारांत एक अधिकारी आहे.

**कुक, जेम्स** (१७२८-१७७९)—एक ब्रिटिश समुद्र-प्रवासी. तो १७५५ मध्यें इंग्लंडच्या रॉयल नेव्हीमध्यें (आरमार खात्यांत) शिरला. १७६८ मध्यें पॅसिफिक महासागरांत शास्त्रीय संशोधनार्थ केलेल्या सफरीचा तो मुख्य अधिकारी होता. त्यानें 'एन्डेव्हर' नांवाच्या जहाजांतून न्यूझीलंडपर्यंत प्रवास केला आणि न्यू साउथ वेल्स बेट शोधून काढलें. आणि केप ऑफ गुडहोप मार्गानें तो ब्रिटनला परत आला. नंतर २ वर्षांनीं तो उत्तरेकडून जलमार्ग शोधून काढण्याकरितां पुन्हां सफरीवर निघाला, आणि या प्रवासांत त्यानें उत्तर अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्याचें बरेंच संशोधन केलें आणि सॅंडविच बेटांचा शोध लावला. पण या बेटांपैकीं हवाई नांवाच्या बेटावर तो तद्देशियां-कडून मारला गेला.

**कुक बेटें**—पॅसिफिक महासागरांत न्यूझीलंडच्या अमला-खालीं हीं बेटे आहेत. यांचे एकंदर क्षे. फ. २८० चौ. मैल व लो. सं. १२,२४६ आहे. रारोटोंगा हें मुख्य बेट आहे. केळीं, टोमॅटो, कॉफी, खोबरें हे जिन्नस परदेशीं जातात. १९०१ सालीं हीं बेटें न्यूझीलंडला जोडलीं गेलीं.

**कुकुभ बिलावल**— हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. याचे आरोहावरोह सातहि स्वरांनीं होत असल्यामुळें याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी पंचम असून संवादी ऋषभ आहे. गानसमय सकाळचा पहिला प्रहर मानितात. या रागाची उत्पत्ति झिंझूटी व अलैय्या यांच्या मिश्रणानें होते. ऋषभ स्वराची पंचमाशीं संगति झाल्यानें जयजयवंती रागाचा यांत किंचित् भास होण्याचा संभव आहे. हा एक बिलावल प्रकार आहे.

**कुकरमुंडें**—मुंबई, पश्चिम खानदेश जिल्हा, तळोदें तालुका, तळोद्याच्या नैॠत्येस २,००० वस्तीचें गांव आहे. येथील जोडे फार प्रसिद्ध होते. संतोजी महाराज या नांवाचे एक वार-करी साधु राहत असून त्यांचा आधुनिक काळास अनुसरून हिंदु समाजाची व धर्मशास्त्राची रचना घडवून आणण्याचा प्रयत्न चालू असे. येथें एक तट असलेली पडकी गढी असून तींत जुने देवीचें देऊळ आहे.

**कुकी**— आसामांतील एक जात. एकंदर लो. सं. सुमारें नव्वद हजार आहे. या जातीचे लोक लुशाई लोकांचे नातेवाईक असून त्यांची वस्ती काचार, मणिपूर व नागा टेकड्यांतून आहे. जुने कुकी, व नवे कुकी अशा दोन जाती आहेत. जुने कुकी हे शरीरानें सर्व जातींत बळकट असतात. हे पोषाख नीटनेटका करतात. पुष्कळ अंगठ्या, कडीं, दंडकडीं, वगैरे अलंकार हे घालतात. नवे कुकी हे लोक ठेंगणे पण मजबूत बांध्याचे असतात. यांच्या बायका यांच्या गुलामाप्रमाणें असतात. त्यांना विकतां अगर गहाण टाकतां येतें. यांचा मुख्य देव आणि सृष्टिकर्ता बुथेन हा आहे. यांचे वैद्य म्हणजे उपाध्यायच असतात; आणि ते औषधांबरोबर देवांचे अंगारे वगैरेहि देतात.

**कुंकुम वृक्ष**—या झाडापासून होणारा महत्त्वाचा जिन्नस कुंकुम चूर्ण होय. रेशमी कपड्यांना नारिंगी रंग देण्याकरितां विशेषेंकरून या चूर्णाचा उपयोग करतात. याचीं पिकलेलीं फळे पिशवींत घालून त्यांच्या गांठींत असलेली पूड बाहेर येई-पर्यंत त्यांना झोडपून काढतात. बंगाल, सं. प्रांत, मद्रास व पंजाब या प्रांतांत हीं झाडें आहेत. वरील ब्रह्मदेशांत हीं झाडें जास्त आहेत. कुंकुम चूर्णाचा कपडे रंगविण्याकडे उपयोग होतो. याचा उपयोग नारूचा नाश करण्याकडेहि होतो.

**कुंकू**— हें तांबड्या रंगाचें चूर्ण असून हिंदुस्थानांतील सर्व सौभाग्यवती स्त्रिया व कुमारिका कपाळावर लावतात. कुंकू हें सौभाग्यचिन्ह मानतात व विधवा तें लावीत नाहींत. कुंकू लावण्याचा प्रघात महाभारतकालींहि असावा. देवाला वाहण्या-साठी बरेंच कुंकू लागतें. कुंकवास पिंजर असें दुसरें नांव आहे. कुंकू करण्याची एक कृति अशी : एक शेर हळकुंडें दीड शेर पाण्यांत भिजत घालावीं. २ तोळे पापडखार व २ तोळे

सवागी हीं एकत्र कुटून वस्त्रगाळ करावीं व त्याचा लिंबाच्या रसांत खल करावा. या रसाचीं पुटें हळकुंडांच्या सालींवर द्यावीं.

**कुक्कुटसंवर्धन**—( पोल्ट्री ). सामान्यतः मनुष्यास खावयाकरितां कोंबडीं, बदकें वगैरे जे निरनिराळ्या प्रकारचे प्राणी पाळण्यांत येतात व त्यांचें संवर्धन करण्यांत येतें त्यास कुक्कुट-संवर्धन असें म्हणतात. अशा प्रकारच्या प्राण्यांत सामान्यतः साधीं कोंबडीं, गिनी कोंबडीं, टर्की, हंस, बदकें, वगैरे प्राण्यांचा समावेश होतो. यांच्या निरनिराळ्या जाती असतात व त्यांचा निरनिराळा उपयोग करण्यांत येतो. उदाहरणार्थ, कांहीं जाती उत्तम अंडीं घालणाऱ्या असतात; तर कांहींचें मांस रुचकर असतें; तर कांहीं इतर दृष्टींनीं उपयोगी असतात; तर कांहीं चांगलीं पिलें देतात व त्यांची वाढ चांगली होतें. बहुधा टर्की व बदकें हीं खाण्याकरितां बाळगण्यांत येतात.

यांचें संवर्धन करण्याचे चार प्रकार आहेत: पहिला—मोकळा प्रकार. यांत कोंबड्यांस पूर्ण स्वातंत्र्य देऊन त्यांस इतस्ततः वाटेल तिकडे भटकूं देण्यांत येतें. दुसरा—विस्तृत प्रकार. यामध्यें विस्तृत पण मर्यादित क्षेत्र तयार करण्यांत येतें व त्यांत मधून मधून कोंबड्यांस बसण्याकरितां व अंडीं वगैरे घालून उबविण्या-करितां जागा तयार केलेल्या असतात. या आवारांतच कोंबड्यांस खाऊं घालण्यांत येतें व बाहेर जाऊं देत नाहींत. तिसरा प्रकार—अर्ध विस्तृत. या पद्धतींत क्षेत्र जरा आकुंचित असून त्यांत घरटीं करण्यांत येतात. या पद्धतींत सुमारें एकरीं चारशें कोंबड्या ठेवण्यांत येतात व मधूनमधून घरटीं बांधून त्यांत धान्य व इतर खाद्य पदार्थ पसरून ठेवलेले असतात. या घरट्यांभोंवतीं कांहीं जागा मोकळी सोडण्यांत आलेली असते व तेथें कोंबड्या फिरूं शकतात. या पद्धतींत हवामानाप्रमाणें कोंबड्यांस घरांत ठेवतां येतें व इष्ट तें हवामान राखतां येतें. चौथा प्रकार—बंदिस्त पद्धति. या प्रकारांत कोंबड्यांस इतर पक्ष्यांप्रमाणें पिंजऱ्यांत ठेवण्यांत येतें. परंतु अशा पद्धतीनें हंस, बदकें, टर्की वगैरेंस पाळतां येत नाहीं.

या बाबतींत सामान्यतः असें दिसून येतें कीं, उत्तम जमिनींत उत्तम अंड्यांची व कोंबड्यांची पैदास होते. सामान्यतः कोरडी व जींत झाडें, वनस्पति वगैरे पुष्कळ व जलद वाढतात अशी जमीन कोंबड्यांच्या पैदाशीस चांगली असते.

**कुंच**—संयुक्त प्रांतांत जालौन जिल्ह्यांतील एक तहशील. हिचें क्षे. फ. ३५६ चौ. मैल. लो. सं. सु. सव्वा लक्ष आहे. तहशिलींत एक शहर व १९७ खेडीं आहेत. कुंच शहराची लो. सं. सु. वीस हजार. १८०४ सालीं येथील 'अमंत मलाय' किल्ला घेण्याकरितां इंग्रजांनीं प्रयत्न केला होता. पण किल्ल्या-वरील शिंदेदास पेंढाऱ्यांची मदत मिळाल्यामुळें तो फसला. बंडाच्या वेळीं कुंच हें कित्येक वेळां बंडवाल्यांच्या ताब्यांत गेलें होतें. पूर्वभागीं एक मोठा जुना तलाव आहे. जालौन जिल्ह्यांत कुंच हें सर्वांत मोठें व्यापाराचें ठिकाण असून येथून धान्य परगांवीं जातें. येथें गुरांचा मोठा बाजार भरतो.

**कुचबिहार**—उत्तर बंगाल्यांतील एक संस्थान. क्षे. फ. १३०८ चौ. मैल व लो. सं. ६,३९,८९८ आहे. हा प्रदेश सखल असून तिस्ता, संकोश, धर्ला, तोरसा, कालजानी, रईदाक वगैरे नद्या आहेत व जमीन मळीची असल्यामुळें येथें सर्व पिकें होतात. आंबा, सुपारी, ताड, शिसव, बांबू हीं झाडें होतात. चित्ते, अस्वल, डुक्कर, हरीण वगैरे रानटी जनावरें आहेत. पाऊस सरासरी १२३ इंच पडतो. पुरातन कालीं ह्याचा कामरूप राज्यांत समावेश होत असे. १५ व्या शतकांत येथें सेन घराण्याचें राज्य होतें. १५१० पासून कोच घराण्यानें येथें राज्य स्थापलें. व त्यावरून याला कुचबिहार नांव मिळालें. १७७३ पासून हें संस्थान ब्रिटिशांचें मांडलिक बनलें, व खंडणी रु. ६७,७०० देऊं लागलें. मागचे महाराज जितेंद्र नारायण भूप बहादुर यांची पत्नी बडोद्याच्या सयाजीराव महाराजांची कन्या ( इंदिराराजा ) होय. जितेंद्र महाराज १९२२ त मरण पावल्यावर त्यांचे अज्ञान पुत्र जगद्दीपेंद्र गादीवर आले. त्यांनीं १९३६ पासून राज्यकारभार हातीं घेतला. उत्पन्न सुमारें ४२ लाख रुपये आहे. कुचबिहार हें राजधानीचें शहर तोरसा नदीकांठीं असून टुमदार आहे. येथें एक आर्ट्स कॉलेज, चार हायस्कुलें व इतर अनेक शाळा आहेत. येथें सतरंज्या व गालीचे उत्तम होतात.

**कुचला**—[ वर्ग-लोगानिआसी ]. हें एका जातीच्या झाडाचें फळ आहे. त्या झाडासहि कुचला ( एस्. नक्स व्हॉमिका-स्ट्रिक्नॉस ) म्हण-तात. हीं झाडें हिंदुस्थानांत व पूर्वेकडील बेटांत होतात. यामध्यें कुचलीन ( स्ट्रिक्नीन ) द्रव्य असतें. कुचलीन व त्यापासून तयार केलेलीं द्रव्यें शक्तीसाठीं आणि हृदयोत्तेजक म्हणून औषधांत घालतात. बी भयंकर विषारी आहे. नीलगिरीवरील डोंगरी लोक मासे मारण्यासाठीं याचा उपयोग करतात. हिंवतापावर याचा विशेष उपयोग आहे.

**कुचली**—[ वर्ग-उर्टिकासी उर्टिका ]. ही एक झाडांची जात आहे. हिला इंग्रजींत नेटल म्हणतात. या झाडांचीं पानें

एकासमोर एक किंवा एकांतराड एक अशीं असतात. या झाडाचीं फुलें फारशीं प्रेक्षणीय नसतात. या झाडाच्या अनेक जाती आहेत. त्यांपैकीं तीन ब्रिटनमध्यें आढळतात. त्यांपैकीं एकाचीं पानें करवतासारखीं असतात व ती दर वर्षास गळून पडतात.

**कुंचली** — (ब्रश). चित्रें काढणें, रेघा काढणें, लिहिणें वगैरेकरितां पहिल्याप्रथम रंगीत माती किंवा खडूच्या-हातांत धरण्यास सोईस्कर पडतील अशा-कांड्या वापरीत असत. त्यानंतर ओले रंग जेव्हां उपयोगांत येऊं लागले तेव्हां मऊ केसांच्या कुंचल्या वापरूं लागले. अशा कुंचल्यांकरितां उंट, खार, बकरा, सेवल, बॅजर वगैरे प्राण्यांच्या केसांचा उपयोग करण्यांत येतो.

**कुचलीन**— (स्ट्रिक्नीन). कुचल्याचें विष. हा एक अल्कयुक्त क्षार असून कुचल्याच्या अथवा त्या जातीच्या झाडांच्या बियांमध्यें आढळतो. याचे त्रिपार्श्वयुक्त स्फटिक असतात. हा फार कडू असून विषारी असतो. याचा $\frac{1}{2}$ ग्रेन एका मोठ्या कुत्र्याच्या मृत्यूस पुरेसा होतो. $\frac{3}{2}$ ग्रेन मनुष्यास भयंकर आंचके येण्यास पुरतो, आणि अर्ध्या ग्रेननें मृत्यु येण्याचा संभव असतो. या विषाचा परिणाम मज्जातंतुव्यूहाच्या केंद्रावर होतो आणि त्यामुळें संवेदना किंवा ज्ञानेंद्रियास चेतना मिळते. याचा कडु औषध म्हणून उपयोग करण्यांत येतो. अग्निमांद्यामध्यें पाचक रस उत्पन्न करण्याकरितां पौष्टिक म्हणून उपयोग करतात. शस्त्रक्रियेच्या वेळीं धक्का बसल्यास अथवा हृदयाची क्रिया मंद झाल्यास याचा उपयोग करण्यांत येतो. हें औषध १ ग्रेनपर्यंत कातडीखालीं टोंचून घालण्यांत येतें. हें क्लोरोफॉर्ममध्यें आणि उकळत्या मद्यार्कामध्यें विरघळतें, पण इथरमध्यें विरघळत नाहीं.

**कुजणें**—(प्युट्रेफॅक्शन). प्राणी किंवा वनस्पती वर्गांतील सेंद्रिय पदार्थ नासण्याच्या क्रियेस ही संज्ञा देण्यांत येते. ही क्रिया सूक्ष्म जंतूंच्या योगानें घडून येते. हे सूक्ष्म जंतू हवेमध्यें असंख्यात असतात. आणि ते सेंद्रिय द्रव्यावर येऊन बसतात, व तेथें त्यांची अनुकूल परिस्थितीमध्यें भयंकर झपाट्यानें वाढ होते. ही वाढ होत असतांना विपाकक्रिया होत असते व त्या क्रियेंत एन्झाइम्स तयार होतात. त्याच्या योगानें सेंद्रिय पदार्थांतील संयुक्त द्रव्यांचें विघटन होत असतें. ही कुजण्याची क्रिया पदार्थास अतिशय उष्णता दिल्यानें किंवा त्यांतील उष्णतेचें प्रमाण अतिशय कमी केल्यानें किंवा त्यांतील आर्द्रतेचा अंश काढून टाकल्यानें किंवा निरनिराळीं कृमिघ्न द्रव्ये (उदा. फार्मल डीहाइड, बोरॅक्स, सॅलिसिलिक ॲसिड, वगैरे) वापरल्यानें बंद करतां येते.

**कुंजपूर**—पंजाब, कर्नाळ जिल्हा व तहशील, एक जहागीर. ही मोगल बादशहाच्या वेळीं पठाण सरदार नजाबतखान यानें स्थापिली आहे. पानपतच्या मोहिमेंत याचा निर्देश येतो. सन १८४६ त कुंजपूरच्या नवाबाची सत्ता नाहींशी झाली.

**कुजलेलें सर्पण**—(पीट). दलदलीच्या जागांमध्यें ज्या वनस्पती उगवतात त्या तेथेंच तेथील दमट हवेमुळें कुजून जातात व त्यांवरच पुन्हां पुन्हां अधिक झाड-झुडपांची वाढ होत गेल्यामुळें एक प्रकारचा कुजट गवताळ थर उत्पन्न होतो. याचा स्कॉटलंड-मध्यें व आयर्लंडमध्यें जळणाकरितां उपयोग करतात. हें सर्पण वाळवण्याकरितां व दाबण्याकरितां निरनिराळ्या पद्धति उपयोगांत आणतात. याचा पेट्या वगैरे भरण्याकरितां भर (पॅकिंग) म्हणून उपयोग करतात. तसेंच याच्यापासून जळणाचा वायु (गॅस) व पॅराफिनहि तयार करतात.

**कुंजुरी**— किंवा मालकांगोणी. ह्या वनस्पतीच्या वेली असतात. पर्जन्यकाळीं ह्या वेलीस बारीक फळांचे मोठे घोंस येतात. ही वेल पूर्व बंगाल, बिहार, दक्षिण हिंदुस्थान, ब्रह्मदेश आणि सिलोन या ठिकाणीं आढळते. या फळांच्या बियांपासून पिवळ्या रंगाचें तेल निघतें. हें तेल औषधी आहे. त्याचें महत्त्व त्यापासून निघणाऱ्या ओलिअमनिग्रम नांवाच्या औषधामुळें आहे. हें तेल उत्तेजक व स्वेदोत्पादक आहे. अफूच्या विषावर मालकांगोणीच्या पाल्याचा रस पाजावा. खरजेवर बियांचें तेल लावावें.

**कुंज्रा**—एक जात. यांची वस्ती बिहार, ओरिसा, सं. प्रांत व इतर प्रांतांत आढळते. एकंदर लो. सं. सुमारें तीन लाख आहे. बहुतेक मुसलमान आहेत. भाजी व फळें विकणें हा यांचा मुख्य धंदा आहे. मेवा फरोश व सब्जी फरोश असेंहि त्यांस म्हणतात. कुंज्रा जातीचे ९४ वर्ग आहेत. हे वर्ग असले तरी कुंज्रा लोकांत आपसांत विवाह होतात. यांच्यांत असगोत्र विवाहच रूढ आहेत. बहुपत्नीत्वाची चाल आहे. कुंज्रा हे सुन्नी पंथाचे मुसलमान असून गाझीमियान व पीर या त्यांच्या देवता आहेत. कुंज्रा जात मोठी उद्योगी व सदाचरणी असते. विधवाविवाहाची चाल यांच्यांत आहे. हे मुसलमानी तलाक-पद्धतीनें घटस्फोट करतात.

**कुंझरू, पं. हृदयनाथ** (१८८७— )– एक हिंदी राजकीय पुढारी. १९०५ मध्यें गोपाळ कृष्ण गोखले यांनीं स्थापन केलेल्या भारतसेवक समाजाचे हे अगदीं प्रथम झालेल्या सभासदांपैकीं एक आहेत. हे कांहीं वर्षें त्या समाजाचे उपाध्यक्ष होते. गोपाळराव देवधर यांच्या मागून हे अध्यक्ष झाले (१९३५). हे कट्टे प्रागतिक आहेत. हे १९१८ सालीं राष्ट्रीय सभेपासून प्रागतिक पक्ष फुटून निघेपर्यंत काँग्रेसचे पक्के अनुयायी होते. त्यानंतर हे

ऑल इंडिया नॅशनल लिबरल फेडरेशनचे व त्या पक्षाच्या इतर अधिवेशनांचे अध्यक्ष होते. संयुक्त प्रांतांतील सेवासमितीचे हे प्रमुख कार्यकर्ते आहेत. हे अनेक वर्षें संयुक्त प्रांतांतील कायदेमंडळाचे सभासद होते. सध्यां वरिष्ठ विधिमंडळाचे सभासद आहेत. लष्कराचें हिंदीकरण, हिंदी परद्वीपस्थांचें स्वास्थ्य, हिंदी अर्थशास्त्र, इ. क्षेत्रांतील त्यांची कामगिरी प्रसिद्ध आहे.

**कुट-एल्-अमारा**— हें लहान शहर मेसापोटेमियांत तिग्रिस नदीवर आगबोटींना कोळसा घेण्याचें ठिकाण आहे. पहिल्या महायुद्धांत जनरल टाउनशेंडनें क्टेसीफोन येथून माघार घेतल्यावर या शहराजवळ शत्रूला फार शौर्यानें तोंड दिल्यामुळें या शहराला प्रसिद्धि मिळाली आहे.

**कुटकी**—कुटकीची उत्पत्ति हिमालय पर्वताच्या उतरणीवरील कुमाऊन प्रांतांत विशेष होते. या वनस्पतीचीं मुळें औषधांत वापरलीं जातात. वरील साल काढली म्हणजे आंतील भाग काळ्या रंगाचा असतो. ह्यावरून हीस काळी कुटकी हें नांव पडलें असें दिसतें. कामीण, हिंवताप, उचकी, इ. वर कुटकी देतात.

**कुटजारिष्ट**—एक आयुर्वेदीय औषध. कुडामुळाची साल, मनुका, मोहाचें फूल, शिवणमूळ, गूळ, धायटी फूल हीं यांत मुख्य औषधें आहेत.

जुनाट संग्रहणी, अतिसार, आमांश, शौचावाटें रक्त पडणें, इत्यादि विकारांवर हें एक उत्कृष्ट औषध आहे. रोग ज्या मानानें जुनाट असेल त्या मानानें याचा उपयोग विशेष होतो. श्वास, खोकला, ओकारी, अग्निमांद्य, पोटांत दुखणें, इत्यादि लक्षणांवर याचा चांगला उपयोग होतो. १। ते २।। तोळे पाण्याबरोबर दिवसांतून तीनदां देतात.

**कुटुंब**—कुटुंब हें समाजांतील जवळच्या नात्याच्या मंडळींचें आश्रयस्थान व राष्ट्राचा अगदीं तळाचा घटक म्हणतां येईल. कुटुंबांत पति, पत्नी, त्यांचीं मुलें व आश्रित इतक्यांचा साधारणपणें समावेश असतो. कुटुंब चालविण्याची जबाबदारी बहुतेक सर्वत्र पित्यावर असते व पित्यानंतर ती पुत्राकडे येते. याला पितापुत्रपरंपरा (पेट्रिआर्की) म्हणतात. जेव्हां मातेकडे ही जबाबदारी असते व तिच्यानंतर वारसा कन्येकडे जातो, तेव्हां मातृकन्यापरंपरा (मेट्रिआर्की) म्हणतात. मलबारांत मातृकन्यापरंपरा आहे. त्रावणकोरच्या राजाचा वारस त्याचा भाचा होतो. विवाहसंस्था निघाल्यापासून कुटुंबाची रचना झाली असली पाहिजे. प्राचीन काळापासून समायिक कुटुंबपद्धति रूढ आहे. पण आर्थिक परिस्थिति, वैयक्तिक स्वातंत्र्याची कल्पना, अंतःकलह, इ. गोष्टींमुळें आज मोठीं कुटुंबें नांदत नाहींत. लग्नानंतर मुलें बहुधा वेगळीं राहतात. दूर दूर नोकऱ्या व उद्योग असले तर आपोआपच कुटुंबांतील माणसें विभक्त होतात. समायिक कुटुंबाचे जसे फायदे आहेत तसे कांहीं तोटेहि आहेत. त्यांत प्रत्येकाला थोडा त्याग करावा लागतो; पण सहकार्याचा बराच फायदाहि मिळतो. तथापि आज मोठीं कुटुंबें वाढीस लागत नाहींत हें खरें.

**कुंटे, महादेव मोरेश्वर** (१८३५-१८८८)—एक महाराष्ट्रीय वैदिक पंडित, कवि व वक्ता. हे सरकारी शाळाखात्यांत प्रिन्सिपलच्या जागेपर्यंत चढले. सिंधमध्यें असतांना सिंधी भाषा चांगली शिकले. व पुढें संस्कृताचा दीर्घ व सूक्ष्म अभ्यास केला. 'आर्य संस्कृतीचीं स्थित्यंतरें' या अर्थाचा त्यांचा इंग्रजी ग्रंथ त्यांच्या वैदिक संशोधनांतील तज्ज्ञतेची साक्ष देतो. त्यांनीं 'षड्दर्शनचिंतनिका' हें मासिक चालविलें होतें. त्यांत ते दर्शनांवर इंग्रजी-मराठी भाष्य लिहीत. त्यांना अनेक भाषा येत व अनेक विषयांचा त्यांचा अभ्यास असे. ते रा. ब. रानडे यांच्या बरोबरीनें विविध चळवळींत भाग घेत. त्यांचें 'राजा शिवाजी' हें मराठी खंडकाव्य शुद्ध मराठी वळणाचें आहे. ते पहिल्या प्रतीचे वक्ते होते व पुण्यांतील वसंत व्याख्यानमाला गाजवून-गर्जून सोडीत. डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे हे यांचे धाकटे बंधु होत.

**कुडची**—मुंबई, बेळगांव जिल्हा. अथणीच्या नैर्ऋत्येस सुमारें १० कोसांवर हा गांव आहे. येथें सतरंज्या चांगल्या होतात. हें सदर्न मराठा रेल्वेचें स्टेशन आहे. येथून जमखंडीला जाण्याचा रस्ता आहे. शेख महमद पीर दादी या मुसलमान फकिराचा दर्गा आहे. महंमद तुघलकानें बहामनी राज्याचा संस्थापक हसन गंगु यास जी पहिली जहागीर दिली होती तींत कुंची-कुडची गांव होतें, असें फेरिस्ता म्हणतो. येथें सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने आहेत. येथें मुसलमान वस्ती बरीच आहे. वांगीं चांगलीं होतात. लो. सं. ७,९८४.

**कुडतन मिरची**—लहान मुलींचा एक खेळ. याचा 'खुर्चीन् मिरची' असाहि पाठ आहे. मुली एकमेकींचे हात धरून गोल उभ्या राहतात व एक मध्यें राहून त्यांच्या हातांखालून बाहेर जाण्याचा प्रयत्न करते व तोंडानें 'कुडतन मिरची' म्हणते व तिला इतर मुली 'जाशील कशी' असें उत्तर देतात. ती 'सासू (नवरा-दीर-इ.) मारते,' असें पुन्हां सांगते. त्यावर 'बरे करते' असें मुली उत्तर देतात. याप्रमाणें खेळ चालतो. जिच्या हाताखालून ती बाहेर जाते तिच्यावर डाव येतो.

**कुडवुडें**—एक वाद्य. ह्याचा आकार डौरासारखाच असून हें दोनहि अंगांस कातड्यानें मढविलेलें असते. हें डमरूच्या पावपट असतें. ह्याच्या मध्यभागीं एक दोरीचा तुकडा बांधलेला असतो व त्याच्या टोकाशीं चिकणमातीची किंवा

मेणाची गोळी. बसविलेली असते. हें हातांत घेऊन हाताचें मनगट असें हालवावयाचें कीं, त्यायोगें सदर गोळी वाद्याच्या दोनहि बाजूंच्या कातडी भागावर लागते. हें वाजविण्यांत एक प्रकारचें कौशल्य आहे. 'पांगूळ' ह्या नांवाची जी एक भिकाऱ्यांची जात आहे ते लोक सूर्योदयापूर्वी रस्त्यानें हें वाजवीत जातात व परमेश्वराचें नांव घेऊन भिक्षा मागतात. तसेंच भविष्य सांगणारे जे जोशी ( ब्राह्मणेतर ) त्यांना कुडबुडे जोशी म्हणतात.

**कुंडल**—मुंबई, सातारा जिल्हा. हा गांव पंतप्रतिनिधींच्या जहागिरींत आहे. हल्लीं या स्टेशनाचें नांव किर्लोस्करवाडी ठेविलें आहे. पुराणांत सांगितलेलें कौंडिण्यपूर हेंच असून या ठिकाणीं हिंगणदेव राजाची राजधानी होती असें म्हणतात. हिंगणदेव हा बहुतकरून देवगिरीच्या यादव राजांपैकीं पहिला सिंघण ( ११७९ ) किंवा दुसरा सिंघण राजा ( १२०९–१२४७ ) असावा. गांवास तट आहे. गांवाजवळील टेकड्यांत १६ ब्राह्मणी लेणीं आहेत. या ठिकाणीं कार्तिकांत यात्रा भरते. या देवळापैकीं पूर्वेकडील देवळें वैष्णवांचीं व पश्चिमेकडील शैवांचीं आहेत. प्रतिनिधींच्या जहागिरींत या नांवाचा तालुका आहे व त्याचें मुख्य ठिकाण कुंडलच आहे.

**कुडलगी**—या गांवास कुडाळ, कुडली, शृंगेरी अशींहि दुसरीं नांवें आहेत. हा गांव म्हैसूर संस्थानांत शिमोगा जिल्ह्यांत शिमोग्यापासून ईशान्येस ४ कोसांवर तुंगा व भद्रा नद्यांच्या संगमावर वसलेला असून त्यास क्षेत्राचें महत्त्व प्राप्त झालेलें आहे. येथें स्मार्त, माध्व, अद्वैत, इत्यादि पंथांचे मठ आहेत. प्रसिद्ध शृंगेरी मठ म्हणून शंकराचार्यांचें जें दक्षिणेकडील पीठ आहे तें येथेंच आहे. स. १७९१ च्या एप्रिलांत परशुरामभाऊ पटवर्धन यांनीं टिपूवर जी स्वारी केली त्या वेळीं त्यांच्या लष्करांतील पेंढाऱ्यांनीं हा शृंगेरीचा–आचार्यांचा–मठ लुटला होता.

**कुडवक्कल**—मुंबई प्रांतांतील एक शेतकरी जात. या जातीचे लोक विशेषतः बेळगांव, विजापूर, धारवाड, सोलापूर व दक्षिण महाराष्ट्र या ठिकाणीं आहेत. १९११ सालीं त्यांची संख्या २१,२०९ होती. हिंदू व लिंगायत असे दोन भेद कुडवक्कल जातींत आहेत.

**कुडा**—इंद्रजव. हें झाड ६।७ हातांपर्यंत उंच वाढतें. कोंकणांत याच्या पानांच्या पत्रावळी लावतात. याच्या फुलांची भाजी होते. याच्या शेंगा भाजी व लोणच्याच्या उपयोगी पडतात. शेंगातील जवाच्या आकृतीच्या बियांस 'इंद्रजव' म्हणतात. बिया व झाडाचें मूळ हीं कडू असतात. पोटांतील कृमी, अतिसार, जीर्णज्वर यांवर कुड्याचें मूळ उपयोगी पडतें. दुधी काळा कुडा हा एक प्रकार आहे. यापासून अशुद्ध रबर तयार करतात. दुसऱ्या कांहीं पदार्थांबरोबर रंगाच्या कामीं याचा उपयोग होतो. ह्याच्या लांकडाच्या बाहुल्या व प्रसिद्ध चेन्नपट्टणी खेळणीं तयार करतात.

**कुडालोर**—मद्रास, दक्षिण अर्काट जिल्ह्याचा एक पोटविभाग व तालुका. याचें क्षे. फ. ४४८ चौ. मै. असून लो. सं. सु. चार लाख आहे. येथील जमीन सुपीक आहे. हें कुडालोर तालुक्याचें मुख्य ठिकाण. देवनापट्टनम् व कुडालोर ह्या गांवांतून पोन्नेयार व गदिलम ह्या दोन नद्या समुद्रास जाऊन मिळतात. लो. सं. साठ हजार. दक्षिण अर्काटमध्यें कुडालोर हें पहिल्या प्रतीचें बंदर आहे. हवा फार निरोगी आहे. रेशमी व सुती कपडा येथें तयार करतात. तुरुंगामध्यें कैदी लोक सतरंज्या व रुमाल तयार करतात. येथें कांहीं हायस्कुलें व एक सरकारी ट्रेनिंग स्कूल आहे. या शहरांत १६८२ सालीं ब्रिटिशांचा प्रवेश झाला. ई. इ. कंपनीनें येथें सेंट डेव्हिड नांवाचा किल्ला बांधला. येथून धान्य बाहेर जातें व शिजविलेल्या सुपारीची आयात होते.

**कुडाळ**—पोर्तुगीज वसाहतींपैकीं गोंव्याच्या वसाहतींत हा प्रांत सांप्रत मोडतो. प्राचीन कुडाळ देशाचें नांव कुट्ट अथवा कुट्टापरास्त असें होतें व तो कोंकणच्या अपरान्त भागांत होता. या नांवाचें एक शहरहि संस्थानांतील एका भागाचें मुख्य ठिकाण आहे. याच्या भागाला १८ व्या शतकापासून सावंतवाडी संस्थान असें म्हणूं लागले. साळशीमहाल, मणेरी, पेडणें, डिचोली, फोंडा, सांखळी हा पंचमहाल सांप्रत पोर्तुगिजांच्या ताब्यांत आहे. या कुडाळ प्रांतावर ११ व्या शतकापूर्वी कदंब व चालुक्य यांची सत्ता होती. मुसलमानी अमलांत या प्रांताची राजधानी गोंव्यास गेल्यानें कुडाळ गांवाचें महत्त्व थोडें कमी झालें. येथें ब्राह्मणकालीन राजवटींतील पुढील अवशेष आहेत : ( १ ) भुईकोट किल्ला. ( २ ) त्यांतील घोडबाव. ( ३ ) नदीवरील संध्याघाट. ( ४ ) गांवाभोंवतालचा पडका कोट. कुडाळ व गोमांतक याची भाषा थोडी भिन्न आहे.

**कुडाळदेशकर ब्राह्मण**—यांचें दुसरें नांव आद्यगौड ब्राह्मण असें आहे. इ. स. १०१७ च्या सुमारास 'सामंत' नांवाचे एक ब्राह्मण संस्थानिक होते. महंमुदाच्या वेळीं यांच्या राज्याची वाताहत झाल्यामुळें हें घराणें देवगड तालुक्यांतील हिंदवें या गांवीं कदंब राज्याच्या आश्रयास येऊन राहिलें. यांचें गोत्र काश्यप असून त्यांच्याबरोबर आणखी तेरा गोत्रांचीं दुसरीं ब्राह्मण घराणीं कोंकणांत आलीं होतीं. कुडाळदेशकर ब्राह्मण हे मूळचे यजुर्वेदीच होते. कऱ्हाडे ब्राह्मणांचें साहचर्य त्यांस निकट असल्यामुळें व ते ऋग्वेदी असल्यामुळें हेहि ऋग्वेदी बनले. त्यांच्यांतील जुनीं व नवीं आडनांवें सामंत, प्रभु, नायक, ठाकूर, पंडित, पाटील,

महाजन, नाईक, देशपांडे, जुवंळे, बोंद्रे, नगारे, गिते, इत्यादि आहेत. कदंबांच्या राजवटींत या जातीला राजाश्रय होता. बहुतेक घराणीं पुढें क्षात्रवृत्तीचीं बनलीं. या घराण्यांत देमभैरवदेव, काईदेव आणि नागदेव या राजांचीं नांवें प्रामुख्यानें पुढें येतात. या जातींत शिक्षणप्रसार बरा झाला असून सरकारी व संस्थानांतील मोठ्या दर्जाच्या नोकऱ्या या लोकांनीं केल्या आहेत.

**कुडें**—मुंबई. कुलाबा जिल्ह्यांतील माणगांव तालुक्यामध्यें हें ५०० लोकवस्तीचें खेडें आहे. हें राजपुरीपासून १ कोसावर आहे. येथें २५० फूट उंचीच्या एका टेकडींत बौद्धांचीं २६ लेणीं व ११ पाण्याचे हौद आहेत. पूर्वेस तळें व उत्तरेस घोसाळें हे किल्ले आहेत. फक्त ६ व्या लेण्याशिवाय बाकीचीं सारीं लेणीं साधीं व बिनसकशीचीं आहेत. या २६ लेण्यांपैकीं ५ चैत्य असून त्यांत दागोबा आहेत. बाकीचीं २१ हीं राहण्याचीं आहेत. सहाव्या लेण्यांत एक पटांगण व दोन हत्ती आहेत. सातव्या लेण्यांत एक पाण्याचें कुंड व दोन अष्टकोनी खांब पडवींत आहेत. ८ व्या लेण्यांत दगडी ओटे, दार, खोल्या, वगैरे आहेत. या सर्व लेण्यांतून प्राचीन काळचे शिलालेख व खोदकाम आढळतें.

**कुणबी**—कुळंबी हा शब्द 'कुल्लूक' व्याख्येप्रमाणें असा बनला आहे: एकेक नांगरास सहा बैल याप्रमाणें दोन नांगरांनीं जेवढी जमीन नांगरली जाईल, तिला 'कुल' अशी संज्ञा आहे (मनुस्मृति ७·११९), व इतक्या कुलाचा किंवा कुळाचा जो पति तो कुळपति; त्यावरून कुळपति–कुळवई–कुळवी–कुणबी, असा हा शब्द बनला असावा. मराठा कुणबी यांच्या देवकांवरून हे मराठे जातीचे आहेत, असें दिसतें. 'कुणबी माजला, मराठा झाला' अशी एक म्हण आहेच. गरीब मराठा व श्रीमंत कुणबी यांच्यांत सोयरीक होते. हे मद्यमांसाहारी आहेत. यांच्यांत पाटाची चाल आहे. कोंकणी कुणबी यांच्या चालीरीती मराठा कुणब्याप्रमाणेंच आहेत. वऱ्हाड–मध्यप्रांतांतले कुणबी मूळ गुजरातेंतून खानदेशमधून आले; त्यांची लो. सं. १४ लाखांवर आहे.

गुजराती कुणबी यांना अहमदाबादेकडे पाटीदार म्हणतात, व बाकीच्यांना कणबी म्हणतात. यांच्यांत लेवा आणि कडवा या प्रमुख जाती असून शिवाय ६।७ जाती आहेत. त्यांचा आपसांत रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. यांच्यांत नात्र म्हणजे पाटाची चाल आहे. यांच्यापैकीं अंजणा जातीच्या कुणब्याशिवाय बाकीचे कुणबी मद्यमांस खात नाहींत.

**कुणाल मौर्य** (खि. पू. २३२-२२४)—हा मौर्य घराण्यांतील अशोकाचा पुत्र. कांहीं ठिकाणीं यास कुशाल व सुयशस् असेंहि म्हटलेलें आहे. याची सावत्र आई तिष्यरक्षिता हिनें याच्याजवळ केलेली प्रेमयाचना यानें झिडकारल्यामुळें याच्यावर तिचा राग होता. अशोकानें एकदां खुष होऊन तिष्यरक्षितेस सात दिवस राज्य चालविण्याची मुभा दिली होती. या संधीचा फायदा घेऊन तिष्यरक्षितेनें कुणालचे डोळे काढण्याबद्दल तक्षशिलेच्या अधिकाऱ्यांस अशोकाची मुद्रा बठवलेली आज्ञा दिली. परंतु कुणालचें रूप व त्याचें चारित्र्य यांबद्दल लोकांच्या मनांत इतका आदर होता कीं, त्याचे डोळे काढण्याचें काम सरकारी अधिकाऱ्यांच्या हातून झालें नाहीं. तेव्हां ही अशोक राजाची आज्ञा म्हणून स्वतः कुणालनेंच आपले डोळे आपणच काढून घेतले. यानंतर हा राजधानी सोडून बाहेर पडला. कांहीं वर्षांनंतर हा पाटलीपुत्र येथें आला व तंतुवाद्य वाजवून अशोकास यानें आपली ओळख पटवली. या वेळीं कुणालच्या अंधत्वास कारणीभूत झालेल्या तिष्यरक्षिता राणीस अशोकानें तिच्या खोलीस आग लावून ठार करण्याचा हुकूम दिला. परंतु कुणालनें त्यास तसें करूं दिलें नाहीं. 'बायको व मुलगा यांच्यावर जर माझें सारखेंच प्रेम असेल तर कुणालची दृष्टि येईल', असे अशोकानें उद्गार काढतांच कुणालला पूर्ववत् दिसूं लागलें. अशोकानंतर कुणाल गादीवर न बसतां त्याचा मुलगा विगताशोक हा गादीवर आला.

**कुंतल**—दक्षिणापथांतील एका प्राचीन देशाचें नांव. महाभारतांत कुंतल हें नांव उत्तरेकडील व दक्षिणेकडील या दोन्ही देशांच्या यादींत आलेले आहे. कुंतल देशापर्यंत आर्यांचा प्रवेश झाल्यावर येथें त्यांना अटकाव झाला. कारण तुंगापार द्राविड, चोल, पाण्डय, वगैरे महाभारतकालीन देश होते. पश्चिम चालुक्यांचें नेहमीं 'कुंतल प्रभु' असें वर्णन येत असतें. बृहत्संहितेंतहि या देशाचा नामनिर्देश येतो. या देशाच्या नैर्ऋत्येस केरल देश होता. चंद्रहास राजा येथील होता असें भारतांत म्हटलें आहे.

**कुंती**—यदुकुलोत्पन्न शूर राजाची कन्या पृथा, तिलाच कुंतीभोजानें दत्तक घेतल्यावरून हें नांव पडलें होतें. ही कुमारी असतां कोणी ऋषि कुंतीभोज राजाच्या घरीं आला होता. कुंतीनें उत्तम प्रकारें त्याची सेवा केली. त्यानें सूर्य, यमधर्म, वायु, इंद्र आणि अश्विनीकुमार या देवतांचे हिला मंत्र देऊन सांगितलें कीं, तूं यांतून ज्याचा जप करशील तो देव प्रगट होऊन तुला पुत्र देईल. पुढें सूर्यापासून कुंतीला कर्ण नांवाचा मुलगा झाला. कांहीं कालानें स्वयंवरांत हिनें पंडु राजाला वरलें. कुंतीनें ऋषींच्या वरामुळें युधिष्ठिरादिक पुत्र निर्माण केले. हीं मुलें तिच्या आज्ञेंत असत. कुरुयुद्धानंतर गांधारी, विदुर व धृतराष्ट्र हे महाप्रस्थानास निघाले तेव्हां त्यांच्याबरोबर कुंतीहि गेली व एका वणव्यांत जळून मेली.

महाजन, नाईक, देशपांडे, जुवंळे, चौंद्रे, नगारे, गिते, इत्यादि आहेत. कदंबांच्या राजवटींत या जातीला राजाश्रय होता. बहुतेक घराणीं पुढें क्षात्रवृत्तीचीं बनलीं. या घराण्यांत देमभैरवदेव, काईदेव आणि नागदेव या राजांचीं नांवें प्रामुख्यानें पुढें येतात. या जातींत शिक्षणप्रसार बरा झाला असून सरकारी व संस्थानांतील मोठ्या दर्जाच्या नोकऱ्या या लोकांनीं केल्या आहेत.

कुडें—मुंबई. कुलाबा जिल्ह्यांतील माणगांव तालुक्यामध्यें हें ५०० लोकवस्तीचें खेडें आहे. हें राजपुरीपासून १ कोसावर आहे. येथें २५० फूट उंचीच्या एका टेकडींत बौद्धांचीं २६ लेणीं व ११ पाण्याचे हौद आहेत. पूर्वेस तळें व उत्तरेस घोसाळें हे किल्ले आहेत. फक्त ६ व्या लेण्याशिवाय बाकीचीं सारीं लेणीं साधीं व बिननकशीचीं आहेत. या २६ लेण्यांपैकीं ५ चैत्य असून त्यांत दाघोबा आहेत. बाकीचीं २१ हीं राहण्याचीं आहेत. सहाव्या लेण्यांत एक पटांगण व दोन हत्ती आहेत. सातव्या लेण्यांत एक पाण्याचें कुंड व दोन अष्टकोनी खांब पडवींत आहेत. ८ व्या लेण्यांत दगडी ओटे, दार, खोल्या, वगैरे आहेत. या सर्व लेण्यांतून प्राचीन काळचे शिलालेख व खोदकाम आढळतें.

कुणबी—कुळंबी हा शब्द 'कुल्लक' व्याख्येप्रमाणें असा बनला आहे: एकेक नांगरास सहा बैल याप्रमाणें दोन नांगरांनीं जेवढी जमीन नांगरली जाईल, तिला 'कुल' अशी संज्ञा आहे (मनुस्मृति ७·११९), व इतक्या कुलाचा किंवा कुळाचा जो पति तो कुळपति; त्यावरून कुळपति–कुळवई–कुळबी–कुणबी, असा हा शब्द बनला असावा. मराठा कुणबी यांच्या देवकांवरून हे मराठे जातीचे आहेत, असें दिसतें. 'कुणबी माजला, मराठा झाला' अशी एक म्हण आहेच. गरीब मराठा व श्रीमंत कुणबी यांच्यांत सोयरीक होते. हे मद्यमांसाहारी आहेत. यांच्यांत पाटाची चाल आहे. कोंकणी कुणबी यांच्या चालीरीती मराठा कुणब्याप्रमाणेंच आहेत. वऱ्हाड–मध्यप्रांतांतले कुणबी मूळ गुजराथेंतून खानदेशमधून आले; त्यांची लो. सं. १४ लाखांवर आहे.

गुजराती कुणबी यांना अहमदाबादेकडे पाटीदार म्हणतात, व बाकीच्यांना कणबी म्हणतात. यांच्यांत लेवा आणि कडवा या प्रमुख जाती असून शिवाय ६।७ जाती आहेत. त्यांचा आपसांत रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. यांच्यांत नात्र म्हणजे पाटाची चाल आहे. यांच्यापैकीं अंजणा जातीच्या कुणब्याशिवाय बाकीचे कुणबी मद्यमांस खात नाहींत.

कुणाल मौर्य (खि. पू. २३२-२२४)—हा मौर्य घराण्यांतील अशोकाचा पुत्र. कांहीं ठिकाणीं यास कुशाल व सुयशस् असेंहि म्हटलेलें आहे. याची सावत्र आई तिष्यरक्षिता हिनें याच्याजवळ केलेली प्रेमयाचना यानें झिडकारल्यामुळें याच्यावर तिचा राग होता. अशोकानें एकदां खुष होऊन तिष्यरक्षितेस सात दिवस राज्य चालविण्याची मुभा दिली होती. या संधीचा फायदा घेऊन तिष्यरक्षितेनें कुणालचे डोळे काढण्याबद्दल तक्षशिलेच्या अधिकाऱ्यांस अशोकाची मुद्रा वठवलेली आज्ञा दिली. परंतु कुणालचें रूप व त्याचें चारित्र्य यांबद्दल लोकांच्या मनांत इतका आदर होता कीं, त्याचे डोळे काढण्याचें काम सरकारी अधिकाऱ्यांच्या हातून झालें नाहीं. तेव्हां ही अशोक राजाची आज्ञा म्हणून स्वतः कुणालनेंच आपले डोळे आपणच काढून घेतले. यानंतर हा राजधानी सोडून बाहेर पडला. कांहीं वर्षांनंतर हा पाटलीपुत्र येथें आला व तंतुवाद्य वाजवून अशोकास यानें आपली ओळख पटवली. या वेळीं कुणालच्या अंधत्वास कारणीभूत झालेल्या तिष्यरक्षिता राणीस अशोकानें तिच्या खोलीस आग लावून ठार करण्याचा हुकूम दिला. परंतु कुणालने त्यास तसें करूं दिलें नाहीं. 'बायको व मुलगा यांच्यावर जर माझें सारखेंच प्रेम असेल तर कुणालची दृष्टि येईल', असे अशोकानें उद्‌गार काढतांच कुणालला पूर्ववत् दिसूं लागलें. अशोकानंतर कुणाल गादीवर न बसतां त्याचा मुलगा विगताशोक हा गादीवर आला.

कुंतल—दक्षिणापथांतील एका प्राचीन देशाचें नांव. महाभारतांत कुंतल हें नांव उत्तरेकडील व दक्षिणेकडील या दोन्ही देशांच्या यादींत आलेलें आहे. कुंतल देशापर्यंत आर्यांचा प्रवेश झाल्यावर येथें त्यांना अटकाव झाला. कारण तुंगापार द्राविड, चोल, पाण्डय, वगैरे महाभारतकालीन देश होते. पश्चिम चालुक्यांचें नेहमीं 'कुंतल प्रभु' असें वर्णन येत असतें. बृहत्संहितेंतहि या देशाचा नामनिर्देश येतो. या देशाच्या नैर्ऋत्येस केरल देश होता. चंद्रहास राजा येथील होता असें भारतांत म्हटलें आहे.

कुंती—यदुकुलोत्पन्न शूर राजाची कन्या पृथा, तिलाच कुंतीभोजानें दत्तक घेतल्यावरून हें नांव पडलें होतें. ही कुमारी असतां कोणी ऋषि कुंतीभोज राजाच्या घरीं आला होता. कुंतीनें उत्तम प्रकारे त्याची सेवा केली. त्यानें सूर्य, यमधर्म, वायु, इंद्र आणि अश्विनीकुमार या देवतांचे हिला मंत्र देऊन सांगितलें कीं, तूं यांतून ज्याचा जप करशील तो देव प्रगट होऊन तुला पुत्र देईल. पुढे सूर्यापासून कुंतीला कर्ण नांवाचा मुलगा झाला. कांहीं कालानें स्वयंवरांत हिनें पंडु राजाला वरलें. कुंतीनें ऋषीच्या वरामुळें युधिष्ठिरादिक पुत्र निर्माण केले. हीं मुलें तिच्या आज्ञेंत असत. कुरुयुद्धानंतर गांधारी, विदुर व धृतराष्ट्र हे महाप्रस्थानास निघाले तेव्हां त्यांच्याबरोबर कुंतीहि गेली व एका वणव्यांत जळून मेली.

**कुंतीभोज**—कुंती देशाचा एक राजा. हा यदुकुलोत्पन्न शूर राजाचा परम मित्र असून अनपत्य असल्यामुळें, शूराचें प्रथम अपत्य दत्तक घ्यावें असा यानें निश्चय केला होता. त्यानें शूरास प्रथम झालेली पृथानामक कन्या दत्तक घेतली व तिचें नांव कुंती असें ठेवलें. पुढें यास पुरुजित् नांवाचा औरस पुत्र झाला. भारतीय युद्धांत हा द्रोणाचार्यांशीं युद्ध करीत असतां मरण पावला. यास भोज असेंहि म्हटलें आहे.

**कुतुबमिनार**—ही गगनचुंबित इमारत–विजयस्तंभ जुन्या दिल्लीपासून ११ मैलांवर आहे. जगामध्यें इतका उंच मनोरा दुसरा कोणताहि नाहीं. ही इमारत जमिनीपासून २३८ फूट उंच आहे. तिच्या पायाचा व्यास ४७ फूट २ इंच आहे आणि शिरोभागाचा व्यास ९ फूट आहे. हा मनोरा पूर्वी ३०० फूट उंच असून त्यावर एकंदर सात मजले होते. ही इमारत गुलाम-वंशांतील ऐबक ऊर्फ कुतुबुद्दीन यानें बांधण्यास सुरुवात केली. ती १३२५ त पूर्ण झाली. मिनारचें पुष्कळ नक्षीकाम हिंदूंच्या देवालयासारखें आहे. या मिनारावर कांहीं अरबी भाषेंत अक्षरें कोरलेलीं आहेत. जगांतील सर्व मनोऱ्यांमध्यें कुतुबमिनार सर्व-श्रेष्ठ आहे. पांच मजल्यांपर्यंत मिळून त्यास एकंदर ३७६ पायऱ्या आहेत. आंतील बाजूस हवा व उजेड यांची चांगली सोय असल्यामुळें व प्रत्येक मजल्यावर सज्जा असल्यामुळें प्रेक्षकांस जागोजाग विश्रांति घेण्याची सोय आहे. इमारतीवर अनेक लेख आहेत.

**कुतुबुद्दीन (ऐबक)** (१२०६–१२१०)— दिल्लीचा एक सुलतान. हा जातीचा तुर्क असून निशापूरमध्यें प्रथम एका श्रीमंताचा गुलाम होता. मालक मेल्यावर याला शहाबुद्दीन घोरीस नजर करण्यांत आलें. शहाबुद्दीननें हिंदुस्थानांत त्याला आपला प्रतिनिधि म्हणून ठेविलें. त्यानें दिल्लीस वास्तव्य केलें. तेव्हांपासून तें राजधानीचें ठिकाण चालूच आहे. शहाबुद्दीनाचा पुतण्या गियासुद्दीन महंमद यानें कुतुबुद्दीन याला राजचिन्हें पाठवून देऊन सुलतान ही पदवीहि दिली. हा गुलाम घराण्याचा मूळ पुरुष होय. १२१० सालीं हा घोड्यावरून पडून मेला. यानेंच कुतुबमिनार ही इमारत बांधण्यास आरंभ केला. पुढें हा मिनार अल्तमश व अल्लाउद्दीन खिलजी यांनीं पुरा केला. कुतुबुद्दीन हा मोठा दाता व कलाकौशल्याचा भोक्ता होता.

**कुत्बशाही**—हिंदुस्थानांतील हें मुसलमानी राज्य म्हणजे प्राचीन वरंगळचें काकतीयांचेंच राज्य होय. गोदा आणि कृष्णा यांमधील मुलखावर हें राज्य १५१८ ते १६८७ पर्यंत नांदत होतें. याचा संस्थापक कुलीकुत्बशहा असून त्यानें स्वपराक्रमानें हिंदु राजांकडून गोवळकोंड्याच्या आजूबाजूचा मुलूख मिळविला. गोवळकोंडा ही त्याची राजधानी होती. याच्या मुलानें १५४३ त याचा खून करविला. या घराण्यांतील इब्राहिम (१५५०-८०) हा चांगला शूर, विद्वान्, व दक्ष राजा होता. याच्या अमदानींत सुंदर इमारती झाल्या. विजयानगरचें राज्य बुडविण्याला हाच बव्हंशीं कारण होता. इब्राहिमचा मुलगा महंमद यानें गोवळ-कोंड्याहून हैद्राबादेस राजधानी नेली. हाहि चांगला विद्वान् होता. महंमदाचा मुलगा अब्दुल्लाहुसेन याच्या कारकीर्दींत मोंगल व मराठे यांनीं राज्यावर स्वाऱ्या करून खंडण्या मिळविल्या. याचा जांवई अबूहसन याच्या मागून राजा झाला. याचा दिवाण मादण्णा व सेनापति आक्कण्णा होता. यामुळें हिंदूंना फार सुख लाभत होतें. पण याच कारणानें औरंगजेबाच्या शहावर मोठा रोष होता. त्यानें अनेक क्लृप्त्या लढवून हें राज्य १६८७ सालीं बुडवून टाकलें. या घराण्यांतील सुलतानांच्या कबरी गोवळ-कोंड्यास पाहावयास मिळतात.

**कुत्रा**—हे प्राणी मूळ कोणत्या प्राण्यापासून उत्पन्न झाले याबद्दल शास्त्रज्ञांमध्यें मतभेद आहेत. कोणी लांडगा तर कोणी कोल्हा हा यांचा पूर्वज मानतात व मध्यंतरीं बरेच संकर झाले असावे असें समजतात मनुष्याच्या प्राथमिक अवस्थेंत कुत्रा आढळत नाही. हिंदुस्थानांत रानटी अवस्थेंत आढळणारा ढोल

किंवा ऑस्ट्रेलियांत आढळणारा डिंगो हे माणसाळलेल्या कुत्र्याचेच पुन्हां रानटी बनले असावे. याच्या सामान्यतः सहा जाती पाडण्यांत येतात: (१) लांडगा कुत्रा–यांत एस्किमो, वगैरे कुत्रे येतात. (२) ग्रेहाउंड–यांचें तोंड लांबट असतें. (३) स्पानिअल–न्यू फाउंडलंड जातीचा कुत्रा यांतील मोठ्या प्रकारचा होय. (४) हाउंड–यांत ब्लडहाउंड या प्रसिद्ध माग काढणाऱ्या जातीचा समावेश होतो. (५) मास्टिफ–यामध्यें तिबेटी कुत्रा मोडतो. (६) टेरियर–हे शिकारी व चाणाक्ष असतात.

माणसाला कुत्र्याची मोठी सोबत असते व तो घराचें रक्षणहि करतो. आर्क्टिक प्रदेशांत गाड्यांना कुत्रे जोडतात. कित्येक कुत्र्यांच्या शर्यती लावतात व त्यांचीं प्रदर्शनेंहि भरवितात.

वैदिक काळापासून कुत्रा माणसाळलेला आढळतो. तो चोर किंवा इतर बाहेरचे लोक यापासून घराचें संरक्षण करी. वराहाची

शिकार करतांना त्याचा उपयोग होत असे; पण सिंहापुढें त्याचा टिकाव लागत नसे. वालखिल्य सूक्तांमध्यें दानस्तुतींत शंभर कुत्र्यांच्या देणगीचा उल्लेख आला आहे. इतर ठिकाणीं या कुत्र्याविषयीं असा उल्लेख आला आहे कीं, तो गलिच्छ असल्यामुळें यज्ञांतल्या बळीला अयोग्य आहे, व यज्ञमंडपांतून त्याला हांकून देण्यांत येत असे. कुत्र्याचें मांस अगदीं निर्वाणीच्या वेळींच भक्षणीय असे. मेजवानीच्या वेळीं जनावर कापून त्याचें मांस खाल्ल्यावर जीं हाडें उरत तीं कुत्र्यास चघळावयास दिलीं जात असत (अथर्व- ६,३७,३). ऋग्वेदांत एका दंतकथेमध्यें गायींचा शोध करणाऱ्या एका इमानी कुत्रीचा म्हणजे सरमेचा उल्लेख आला आहे. महाभारत आणि पुराणें यांतून कुत्र्याच्या विश्वासूकपणाच्या अनेक गोष्टी आहेत.

**कुत्रें (घड्याळांतील)**—(इं. एस्केपमेंट). घड्याळांमध्यें जी एक अशा प्रकारची रचना केलेली असते कीं, जिच्यामुळें एकाच गतींत फिरत असलेल्या चक्रांचा दाब आणि लंबकाची अथवा समतोलन चक्राची आंदोलनात्मक गति यांचा परस्परांशीं मेळ बसावा, तीस कुत्रें असें म्हणतात. याच्या योगानें चक्रामुळें नियामक शक्तीला प्रेरणा मिळते. म्हणजे खिशांतील घड्याळांत समतोलन चक्रास आणि भिंतीवरील घड्याळांत लंबकास प्रेरणा मिळते व त्यामुळें प्रत्येक फेऱ्याबरोबर किंवा आंदोलनाबरोबर घर्षण आणि प्रतिबंध यांच्या योगानें जी त्यांची शक्ति क्षीण होते ती त्यांस पुन्हां प्राप्त होते.

**कुंदगोळ**—मुंबई, जमखंडी संस्थानांतील याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. याची लोकसंख्या सुमारें चार हजार. येथें सभोंवतालीं कापूस पिकतो. कुमठा, कारवार व हुबळी या ठिकाणीं येथून कापूस जात असतो.

**कुन्ड्ट (१८३९-१८९४)**—एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. यानें ध्वनि व प्रकाश या शास्त्रांत बरेच शोध लावले व प्रकाशशास्त्रांतील विकिरणा(डिस्पर्शन)संबंधानें नवीन माहिती करून दिली. ध्रुवीभूत प्रकाशाचें परिवर्तन होतें असें यानें सिद्ध करून दाखविलें.

**कुन्नूर**—मद्रास, नीलगिरि जिल्ह्यामधील एक पूर्वेकडील तालुका. याचें क्षे. फ. २४१ चौरस मैल. लो. सं. सुमारें सत्तर हजार आहे. कुन्नूर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. याच्या नैर्ऋत्येस ६ मैलावर रमणीय धबधबा आहे. कुन्नूर व कोटगिरि येथें कॉफीची लागवड करितात. येथें चहाचे मळे आहेत. बार्लीयार येथें सरकारी बगीचा आहे. हें हवा खाण्याचें ठिकाण आहे. उंची ६००० फूट. उटकमंडच्या खालोखाल थंड हवेचें ठिकाण कुन्नूर हेंच आहे. लो. सं. सुमारें पंधरा हजार. पाऊस सरासरी ५६ इंच पडतो. लेडी कॅनिंग-सीट, पाश्चूर इन्स्टिट्यूट, सिम्स पार्क, लो धबधबा, वाघटेंकडी (डोंगरी किल्ला), इ. येथील पाहण्यासारखीं स्थळें आहेत. सेन्ट जोसेफ कॉलेज, स्टेनीज युरोपियन हायस्कूल व इर्वीन गर्ल्स् स्कूल या शिक्षण-संस्था आहेत. चहा, कॉफी, भाजी, बटाटे व फळें हीं पिकें आहेत.



**कुन्लुन**—मध्य आशियांत तिबेटच्या उत्तर सरहद्दीवरील ही पर्वताची रांग असून यांतील कित्येक शिखरांची उंची २१,००० फुटांहून अधिक आहे.

**कुबेर**—दुष्ट प्राण्यांचा अथवा पिशाच्चांचा पुढारी म्हणून वेदात कुबेराचा उल्लेख केलेला आहे. हा ग्रीक प्लुटोप्रमाणें पृथ्वीवरील संपत्तीचा अधिपति असून वैश्रवण असें त्याचें पैतृकनाम आहे. गुह्यक व यक्ष यांचा अग्रणी आणि संपत्तीचा स्वामी या उभय अर्थी त्यास देव असें म्हणण्यांत येतें. कुबेर हा रावणाचा सावत्र बंधु होता. रामायण-महाभारतावरून असें दिसतें कीं, सिंहलद्वीपातील विश्वकर्मारचित लंका नगरी त्याच्या ताब्यांत प्रथम होती व तेथून त्यास पुढें रावणानें घालवून दिलें. हिमालयावरील अलका ही याची राजधानी होय. हा उत्तर दिशेचा अधिपति आहे.

**कुब्जा**— १. कंसाची एक दासी. ही तीन ठिकाणीं वांकडी होती. कृष्ण आणि बलराम या दोघास ज्या वेळेस मथुरेस धनुर्यागाथें कंसानें आणविलें, त्या वेळेस कृष्णाच्या कृपेनें ही सरळ झाली. अगदीं कुरूप स्त्रीस कुब्जा म्हणतात.

२. कैकयीची दासी मंथरा हिलाहि कुब्जा म्हणत असत.

**कुब्लईखान (१२१६-१२९४)**—हा चीनचा मोंगल बादशहा झेंगीजखानाचा नातू असून १२५९ मध्यें राज्यावर आला. त्यानें १२६० मध्यें सर्व उत्तर चीन काबीज केला. मार्को पोलोनें याच्या पेकिंग येथील दरबाराचें वर्णन दिलें आहे. यानें बौद्धधर्मास राजाश्रय दिला. कोलरीज कवीनें याच्यावर एक कविता लिहिली आहे.

**कुंभ (१५४३)**—मारवाडचा एक वीर. दिल्लीकर शेरशहा (सूर घराण्यांतील) यानें रजपुतांवर मोहीम केली. त्या वेळीं मारवाडचा मालदेव रणांगण सोडून गेला; पण त्याचा सरदार कुंभ यानें रणांगण सोडलें नाहीं. एकट्यानें लढून रजपुताचें नाव राखण्याचा कुंभानें निश्चय केला. शेरशहाजवळ ऐंशीं हजार तर कुंभाजवळ सारी १२ हजार फौज होती. तरी त्यानें जिवावर उदार होऊन इतक्या निकरानें हल्ला केला कीं शहाचा बहुतेक पराभव झाला.

**कुंभकर्ण**—विश्रवा ऋषीस केकसीपासून झालेला पुत्र. हा रावणाचा कनिष्ठ भ्राता होता. वराप्रमाणें कुंभकर्ण सहा सहा महिने निद्रिस्त असे. म्हणून हल्लीं फार झोंपाळू माणसाला

कुंभकर्णाची उपमा देतात. रावणावर एक भयंकर संकट आलें आहे असें त्यास कळतांच 'मी राम-लक्ष्मणास तावडतोब ठार करतों' अशी त्यानें प्रतिज्ञा केली व तो युद्धाकरितां निघाला. बराच काळपर्यंत त्यानें घनघोर युद्ध केलें. पण शेवटीं रामानें त्याचे भुज व मस्तक तोडलें.

**कुंभकर्ण गुहिलोत** (१४३३-६८).—कुंभराणा. उदेपूरचा राणा मोकल याच्या पश्चात् त्याचा ज्येष्ठ पुत्र कुंभकर्ण उर्फ कुंभा हा गादीवर आला. त्याच्या 'महाराजाधिराज, राजगुरु, दानगुरु' वगैरे बिरुदांवरून तो महाप्रतापी, विद्वान्, दानी, व शूर असल्याचें दिसून येतें. गादीवर येतांच आपल्या बापाचा वध करणाऱ्या चाचा व मेरा यांना यानें मंडोवरच्या रणमल्लाकडून ठार केलें. यानंतर याच्या दरबारीं रणमल्लाचें प्रस्थ फार वाढलें. या रणमल्लास महपा पवारानें ठार केलें. कुंभकर्ण यानें अबूचें राज्य जिंकलें. सिरोहीचा सैसमल व हाडौतीचा हाडा यांचा यानें युद्धांत पराभव केला. माळव्याचा सुलतान महंमूदशहा खिल्जी व गुजरातचा सुलतान यांनीं याजबरोबर अनेक लढाया देऊनहि त्यांत हा अजिंक्य ठरला. हा शिल्पशास्त्रज्ञ असून यानें कीर्तिस्तंभ, अनेक मंदिरें, जलाशय व किल्ले बांधले. हा कलाभिज्ञ व विद्यानुरागी असून विद्वानांचा आश्रयदाता होता. एकलिंगजीचा भक्त असूनहि यानें अनेक विष्णुमंदिरें बांधलीं. हा वेद, व्याकरण, राजनीति, स्मृति, मीमांसा यांत प्रवीण होता. तसेंच हा नाटककार असून संगीताचा निस्सीम भक्त होता. संगीतराज, संगीत-मीमांसा यांसारखे संगीतशास्त्रावर यानें ग्रंथ लिहिले. शेवटीं यास उन्माद रोग झाला. कुंभलगड येथें याचा मुलगा उदयसिंह यानें राज्यलोभानें यास ठार मारलें. यास अकरा पुत्र व एक कन्या होती.

**कुंभकोणम्**—मद्रास, तंजावर जिल्ह्यांतील एक पोटविभाग व तालुका. याचें क्षेत्रफळ २११ चौरस मैल असून लोकसंख्या सुमारें चार लाख आहे. या तालुक्यांत तांदूळ, केळीं व सुपारी हीं मुख्य पिकें असून तांबेपितळेचीं भांडीं आणि रेशमी व सुती कापड तयार होतें.

शहर— हें कावेरी नदीच्या कांठीं मद्रासपासून १९४ मैलांवर साउथ इंडियन रेल्वेवर आहे. १९४१ सालीं याची लोकसंख्या ६७,००० होती. उत्तरोत्तर कुंभकोणम् शहर आकारानें वाढत असून हल्लीं तें मद्रास इलाख्यांत ८ वें शहर आहे. कुंभकोणम् हें दक्षिण हिंदुस्थानांतील अगदीं जुन्या शहरांपैकीं एक आहे. सातव्या शतकांत चोलांची राजधानी कुंभकोणम् येथें होती. हें ब्राह्मणी धर्माचें व संस्कृतीचें माहेरघर होतें. शंकराचार्यांनीं येथें एक मठ स्थापन करून हस्तलिखित संस्कृत ग्रंथांचा मोठा संग्रह येथें ठेवलेला आहे.

शिवाचीं १२ व विष्णूचीं चार अशीं १६ मोठीं देवळें कुंभकोणास आहेत. व्यवस्था पाहण्यास एक देवस्थान समिति आहे. येथें इंग्रजी शाळा, वेदशाळा, औद्योगिक शाळा व कॉलेज यांसारख्या बऱ्याच शिक्षण-संस्था आहेत. कांहीं नियतकालिकें निघतात.

**कुंभार**—मातीचीं भांडीं घडणारी ही जात हिंदुस्थानांत सर्वत्र आहे. लो. सं. सु. चौतीस लाख आहे. त्यांपैकीं सर्वांत जास्त (सु. सात लाख) संयुक्त प्रांतांत आहे. संस्कृत 'कुंभ + कार = कुंभकार,' पासून कुंभार शब्द बनला आहे. त्यांच्या २३ कुळ्या असून त्यांचा आपापसांत रोटीबेटी व्यवहार होत नाहीं. मराठा कुंभार हे कुणब्यामराठ्याप्रमाणेंच पोशाख करतात. बेकायदा (अनौरस) संततीला 'कडू' म्हणतात. यांच्यांत बरेचसे कडू आहेत. हे मद्यमांसाहारी आहेत. पाटाची चाल आहे. कोंकणी कुंभार हे मूळचे मराठे आहेत. पूर्वीं हे ग्रामदेवतांचे पुजारीहि असत. यांचे उपाध्याय ब्राह्मण असतात. गुजराती कुंभार बहुतेक वैष्णवपंथी आहेत. महाराष्ट्रांत परदेशी कुंभार आहेत, ते उत्तर हिंदुस्थानातून आले. ते आपणास 'कुमावत क्षत्रिय' म्हणवतात. मेवाडच्या कुंभ राजाचे वंशज ते कुंभोज, त्यापासून कुंभावत व नंतर कुमावत अशी व्युत्पत्ति ते सांगतात. या जातींत मोठे मोठे बांधकाम करणारे कॉन्ट्रॅक्टर झाले आहेत. मद्रासेकडील तेलगू कुम्मर प्राचीन राजांजवळ स्वयंपाकी म्हणून असत, व अद्यापिहि पुष्कळसे स्वयंपाकी आहेत. हे जानवें घालतात व मांस खात नाहींत. कुंभार हा बारा बलुत्यांपैकीं असून तो ग्रामसंस्थेस मडकीं, वगैरे पुरवितो, त्याबद्दल त्यास बलुतें मिळतें.

**कुंभारकाम**—वेदकालापासून कुंभारकामाची माहिती आर्यांना होती. श्रौतप्रकरणांतील अग्निचयन विधींमध्यें विटांच्या वेदींचीं वर्णनें आलीं आहेत. विटांप्रमाणें, मडकीं, दोगड्या, माठ, परळ वगैरे कुंभारकामें त्या वेळीं प्रचारांत होतीं. हिंदूंच्या अनेक धार्मिक विधींत मातीच्या पात्रांची गरज लागते. बाबिलोनिया शहराच्या राजवाडे, मनोरे यांच्या अवशेषांत विटांचे ढीग आढळतात. बाबिलोनियन व असुर लोक रंगीत व मिना कामाच्या विटा करण्याबद्दल प्रख्यात होते. चिनी लोक वीटकामांत दर्दी म्हणवितात. इस्रायल लोकांत विटांचें काम प्राचीन काळीं होत होतें. ते विटा न भाजतां उन्हांत सुकवीत. ते नदीच्या गाळाची माती विटांकरितां वापरीत. इंग्लंडमध्यें १५ व्या शतकांत विटा उपयोगांत येऊं लागल्या. फ्ल्यांडर्समधून ही कला इंग्लंडमध्यें आली. स. १६३३ त अमेरिकेंत पहिली विटांची इमारत झाली. विटा, कौलें करण्याचे कारखाने अलीकडे युरोपियन लोकांनींहि इकडे काढले

आहेत. चिनी मातीचीं भांडीं वगैरेंस लागणाऱ्या मातीचे तीन वर्ग आहेत: (१) चिनी (केऑलिन) माती, (२) साधी पांढरी माती, व (३) लाल माती. अजमगड येथील खुजे; लखनौच्या बशा, पेलें; व सुर्जा येथील मडकीं; अल्लीगड, अमरोहा व सहारणपूर येथील पातळ, वर्ख चढविलेलीं भांडीं हीं नांवाजण्यासारखीं आहेत.

ऐतिहासिक अवशेषांचें उत्खनन करतांना वरीच मातीचीं जुनीं भांडीं सांपडतात; त्यांवरून त्यांचा काळ काढण्यांत येतो. खि. पू. तीन-चार हजार वर्षांपूर्वीच्या मोहेंजोदरो येथील उत्खननांत रंगीत भांडीं सांपडलीं आहेत. 'टेराकोट्टा' वस्तू वेगवेगळ्या प्रकारच्या आढळतात. कांचमिन्याच्या विटा मुसलमानी शिल्पांत दिसतात.

**कुंभेर**—हें राजपुतान्यांतील भरतपूर संस्थानामधील एक तहशिलीचें मुख्य ठिकाण असून तें भरतपूरच्या उत्तरेस आहे. लो. सं. ८,००० आहे. एके काळीं जाटांची राजधानी येथें होती. बदनसिंग नांवाच्या जाट राजानें एक किल्ला बांधिला. हा किल्ला फार बळकट होता. त्याचा तट मातीचा असून पुढें खंदक आहे. हें गांव मूळ एका कुंभ नांवाच्या जाटानें वसविलें होतें. मराठ्यांनीं सुरजमल जाटाचें पारिपत्य करण्यासाठीं कुंभेरीला वेढा घातला असतां मल्हारराव होळकराचा एकुलता एक मुलगा खंडेराव गोळी लागून मेला (१७५४). अहिल्याबाईनें कुंभेरीच्या उत्तरेस गंगरखोली येथें खंडेरावाची छत्री बांधिली आहे.

**कुमठा**—मुंबई, उत्तर कानडा जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षे.फ. २२४ चौ. मै. असून यांत कुमठा व गोकर्ण हीं दोन मोठीं गांवें आहेत. तालुक्याची लो. सं. ७१,७४५ आहे. समुद्रकिनाऱ्यालगतच्या पट्टींत तांदुळाचें पीक येतें. नारळ, तांदूळ, सुपारी, मिऱ्यें, ऊंस आणि कडधान्यें यांचें चांगलें पीक होतें. कुमठा हें तालुक्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. १२,४६६. कुमठ्यास पूर्वीं व्यापारी घडामोड फार होत असे. तेल, मीठ, तांदूळ यांच्या गिरण्या आहेत. कापूस, मसाले व धान्य यांचा व्यापार असून येथें चंदनाच्या लांकडाच्या पुष्कळ कोरीव जिनसा बनवितात. येथें चटयाहि होतात.

**कुमाऊन**—संयुक्त प्रांताचा अगदीं उत्तरेकडील विभाग. हा बहुतेक भाग हिमालयावर असून तिबेटच्या सरहद्दीपासून तराईपर्यंत गेलेला आहे. येथें समुद्रगुप्ताच्या वेळीं (इ. स. ३४०) कर्तृपुरचें राज्य होतें. याचें क्षेत्रफळ १३,७५७ चौ. मै. असून लोकसंख्या १९४१ सालीं १९,८१,२६२ होती.

नैनिताल हें उन्हाळ्यांत संयुक्त प्रांताच्या राजधानीचें ठिकाण असतें. नैनिताल, गढवाल व अल्मोडा असे या विभागात तीन जिल्हे आहेत. बदरीनाथ व केदारनाथ हीं यात्रेचीं मुख्य ठिकाणें आहेत.

**कुमारगुप्त** (राज्य. ४१३–४५५)— गुप्तवंशांतील दुसऱ्या चंद्रगुप्ताचा ध्रुवादेवीपासून झालेला मुलगा. उपलब्ध झालेले शिलालेख व नाणीं यांवरून असें दिसतें कीं, याच्या कारकीर्दींत साम्राज्यविस्तार झाला नव्हता. मात्र यानें अश्वमेध यज्ञ केला. त्यावरून यानें नवीन मुलूख मिळवला असावा असें वाटतें. यानें आपल्या नांवाचीं सोन्या-चांदीचीं नाणीं पाडलीं. महाराजाधिराज, परमराजाधिराज, अजितमहेंद्र, महेंद्रसिंह, महेंद्रादित्य अशीं बिरुदें यानें धारण केलीं होतीं. सन ४५० च्या सुमारास व सन ४५५ मध्यें हूण लोकांनीं याच्यावर स्वारी केली. त्या वेळीं लढाईत हा मरण पावला. स्कंदगुप्त, घटोत्कच, पुरगुप्त हे याचे तीन मुलगे. कुमारगुप्तानंतर स्कंदगुप्त हा गादीवर बसला.

**कुमारजीव**—एक बौद्ध ग्रंथकार. हा पांचव्या शतकाच्या प्रारंभीं होऊन गेला. यानें इ. स. ४०४ च्या सुमारास शतशास्त्र आणि बोधिचित्तोत्पादन शास्त्र या दोन ग्रंथांचें भाषांतर केलें. त्यानें ४०२ पासून ४१२ पर्यंत बऱ्याच ग्रंथांचें चिनी भाषेंत भाषांतर केलें. सुमारें ४१५ च्या सुमारास तो मृत्यु पावला असावा.

**कुमारपाल** (११४२–७३)—हा सोळंकी चालुक्यवंशीय अनहिलपट्टणचा राजा. प्रख्यात सिद्धराज जयसिंह यास संतति नसल्यानें त्याच्या पश्चात् कन्हरदेव प्रधानाच्या मदतीनें हा गादीवर बसला. कुमारपाल हा सिद्धराजाचा चुलतभाऊ जो त्रिभुवनपाल त्याचा पुत्र होय. त्यानें जैनधर्माला राजाश्रय देऊन आपणहि स्वतः जैनधर्मी बनला. त्याचा गुरु हेमचंद्रसूरि हा होता. कुमारपालानें आपल्या प्रजेस बलात्कारानें जैनधर्मी करण्याचा प्रयत्न केला. त्यानें पुष्कळ जैन मंदिरें व इमारती बांधल्या; विद्वानांस आश्रय देऊन पुस्तकालयें स्थापिलीं. त्यानें केदारेश्वर व सोमनाथ या देवळांचा जीर्णोद्धार केला. अहिंसाधर्माचे नियम मोडणारास तो देहदंड करीत असे. तो विद्वान्, शूर व साहसी होता.

**कुमार वाल्मीकि** (सु. १५००)— नरहरी. कानडी रामायण या ग्रंथाचा कर्ता. हा एक कानडी ब्राह्मण असून विजापूरजवळील तोरवे गांवचा असावा. तोरवे गांवच्या नरहरीच्या देवळांत यानें कानडी भाषेंत रामायण हा ग्रंथ लिहिला. मद्रि-

रावणाच्या युद्धासंबंधींचा ग्रंथहि याचाच असावा. याचें वर्णन-कौशल्य वाखाणण्याजोगें आहे.

**कुमार व्यास** (१४३०)—एक कानडी कवि. गदगजवळील कोळीवाड गांवचा हा ब्राह्मण असून याचें मूळ नांव नारायणप्पा असें होत. हा माध्व संप्रदायी असावा. गदगच्या वीर नारायणावर याची फार भक्ति. यानें कानडी भाषेंत संस्कृत महाभारताचीं पहिलीं दहा पर्वें लिहिलीं. तसेंच ऐरावत नांवाचा याचा एक ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. लिहितांना न थांबतां, शब्दांची फिरवाफिरव न करतां व वाङ्मय-चौर्यास आपल्या लिखाणांत जागा न देतां याची लेखणी चाले. सर्वांना पटेल व आवडेल अशा सोप्या भाषेंत हा लिहीत असे.

**कुमारस्वामी, डॉ. आनंद केंटेश** (१८७७-१९४७)—भारतीय कला, संस्कृति आणि तत्त्वज्ञान यांचा एक मोठा पंडित. वडील कोलंबो येथील बॅरिस्टर सर मुथुकुमारस्वामी यांच्या लहानपणीं वारल्यावर इंग्रज आईनें त्यांना इंग्लंडांत नेऊन शिक्षण दिलें. १९०२ सालीं ते कोलंबोस परत येऊन खनिज संशोधन खात्यांत नोकरीस राहिले. पण ती लवकरच सोडून त्यांनीं भारतीय कलेचा अभ्यास चालविला. १९१७ सालीं अमेरिकेंतील बोस्टन कलासंग्रहालयांत त्यांची प्राच्य कलाविभागाचे प्रमुख म्हणून नेमणूक झाली. तेथेंच ते शेवटपर्यंत होते. हिंदी, इराणी व इस्लामी कलांच्या विषयांत कुमारस्वामींना तज्ज्ञ समजलें जाई. या कलांचें उत्कृष्ट विवेचन त्यांनीं आपल्या ग्रंथांत आणि व्याख्यानांत कित्येकदां केलेलें आहे. नटराज स्वरूपात शिवाचें तांडवनृत्य तेच यथार्थ वर्णन करूं शकत. शेवटीं हिमालयांत जाऊन राहण्याचा त्यांचा विचार होता. पण बोस्टन येथेंच त्यांचा काळ झाला.

**कुमाराप्पा, जोसेफ कॉर्नेलियस** (१८९२— )—यांचें प्रारंभीचें शिक्षण डव्हटन व वेळयले कॉलेजमध्यें मद्रास येथें झालें व पुढील शिक्षण अमेरिकेंत झालें. १९१८ मध्यें लंडनमध्यें ते इनकॉर्पोरेटेड अकौंटंट झाले व कांहीं दिवस त्यांनीं लंडनमध्यें व नंतर मुंबईमध्यें अकौंटंट म्हणून काम केलें. १९२२ मध्यें त्यांनीं गुजरात विद्यापीठातर्फे मातर तालुक्याची आर्थिक पाहणी केली. मे १९३० ते फेब्रुवारी १९३१ पर्यंत ते 'यंग इंडिया' पत्राचे संपादक होते. कराची काँग्रेसनंतर त्यांस इंग्लंड व हिंदुस्थान यांच्यामधील आर्थिकसंबंधाची चौकशी करण्याकरितां नेमलेल्या समितीचे संयोजक नेमलें होतें. या समितीचा अहवाल जुलै १९३१ मध्यें प्रसिद्ध झाला. ऑक्टोबर ते डिसेंबर १९३१ मध्यें यांनीं पुन्हां 'यंग इंडिया' पत्राचें संपादन केलें. १९३१ मध्यें यांस यांच्या लेखांबद्दल एक वर्ष तुरुंगवासाची शिक्षा झाली. पुन्हां १९३२ मध्यें दोन वर्षांची शिक्षा झाली. १९३४ मध्यें बिहार भूकंप दुःखनिवारण समितीचे हे चिटणीस व हिशेबतपासनीस होते. मुंबई येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत यांस महात्मा गांधीजींच्या साहाय्यानें व दिग्दर्शनाखालीं अखिल भारतीय ग्रामोद्योग संघ स्थापन करण्याचा आदेश देण्यांत आला. त्याचे ते सध्यां प्रवर्तक व चिटणीस आहेत. यांचे आर्थिक विषयावर अनेक लेख व अहवाल प्रसिद्ध झालेले आहेत. हे गांधीवादाचे निष्ठावंत अनुयायी आहेत.

**कुमारी आसव**—एक आयुर्वेदीय औषध. कोरफड रस, गूळ, सुखारी हिरडा, मध, जायफळ, लवंग, कंकोळ, जटामांसी, चवक, चित्रक, जायपत्री, काकडशिंगी, बेहडा, पोखरमूळ, ताम्रभस्म, लोहभस्म हीं यांत मुख्य औषधें असतात. कुमारी म्हणजे कोरफड. हें औषध अतिशय सुप्रसिद्ध आहे. व्यवहारांत त्याचे १, २, ३ असे क्रमांक आहेत. पण त्याला शास्त्राधार नाहीं. पण संस्कृत वाङ्मयांत एकाच शब्दाचे एक, दोन, किंवा तीन अर्थहि होत असल्यानें त्या पाठाप्रमाणें थोडीशीं वेगवेगळीं औषधें घालावीं लागतात व त्याला हे क्रमांक देतात. क्रमांक १ च्या कुमारी आसवामध्यें ताम्र व लोह हीं भस्में असतात. क्रमांक २ मध्यें भांग असते. क्रमांक ३ मध्यें ताम्र व लोह हीं भस्में नसतात. हें आसव अतिशय लोकप्रिय व सुप्रसिद्ध आहे. दीपक, पाचक, थोडेसें सारक, मूत्रल असें औषध आहे. अन्नपचनाबद्दलच्या सर्व तक्रारी या आसवानें बऱ्या होतात. स्त्रियांच्या गर्भाशयावर याचा चांगला उपयोग होतो. यकृत्वृद्धि, पान्थरी वाढणें, बारीक ताप, हातापायाची जळजळ, डोकें दुखणें, पायाला सूज येणें, मूळव्याध, खोकला, इत्यादि विकारांवर याचा अतिशय चांगला उपयोग होतो. लहान मुलांना होणारी सर्दी, खोकला, पोट फुगणें, इत्यादींवर हें औषध फार चांगलें आहे. क्रमांक तीनचें आसव सर्वांत कमी तीक्ष्ण असल्यामुळें लहान मुलांना देतात.

**कुमारीलभट्ट** (सु. सातवें शतक)— पूर्वमीमांसा शास्त्रावरील वार्तिककार व कर्ममार्गाचा प्रवर्तक पंडित. यानें बौद्धमतास विरोध करून वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन केलें. नंतर आद्य शंकराचार्यांनीं अद्वैत मताचा प्रसार केला. हर्षवर्धनाच्या काळीं बौद्धधर्माचा ऱ्हास होण्यास प्रारंभ झाला होता. वेद व वेदविषयक आचारांवरील समाजाचा उडालेला विश्वास भट्टांनीं पुन्हां बसविला. या कारणावरून त्यांचा काल हर्षानंतर मानतात. भट्टांना संस्कृतखेरीज द्रविडादि इतर भाषा अवगत होत्या. त्यांनीं बौद्ध धर्माचा अभ्यास बौद्ध भिक्षूंपाशीं केला होता. हे न्याय-मीमांसा शास्त्रांत अत्यंत पारंगत होते. वार्ध-

क्यांत त्यांनीं आपला देह अग्नीस समर्पण केला. यांची सारी भिस्त वेदावर असून अग्निहोत्र व यज्ञादि कर्में हेंच उपासना-मार्ग लोकांना दाखवून देत. लोकांत जैन-बौद्ध धर्मामुळें हिंसेविषयीं तिटकारा व संन्यासाविषयीं आवड उत्पन्न झाल्यामुळें भट्टांचा हिंसाक्रियान्वित धर्ममार्ग फारसा रूढ झाला नाहीं. शंकराचार्यांनीं भट्टांचा अनुयायी जो मंडनमिश्र त्याचा पराभव करून त्याला आपला शिष्य केलें. बरेच मीमांसा वार्तिक ग्रंथ भट्टांच्या नांवावर मोडतात.

**कुयली**—कुहिटी, कांटेकुयली, खाजकुयली. एक वनस्पति. ही कोंकणांत व मावळांतील जंगलांत सांपडते. शेंगांवर केंसासारखी लव असते; ती अंगास लागल्यास अंगास खाज सुटून आग होते. कांटेकुयलीची भाजी खात नाहींत; परंतु औषधाकरितां तिच्या शेंगांची भाजी करतात. हीस रेडे कुयलीहि म्हणतात.

कुयलीची सुधारलेली दुसरी जात आहे, तिला 'व्हेलवेट बीन' ( मखमाली शेंगा ) किंवा गोडी कुयली अशा संज्ञा आहेत. कोवळ्या शेंगांची भाजी होते. त्या जून झाल्या म्हणजे आंतील दाण्यांची उसळ होते.

खाजकुयलीच्या शेंगांवरील कुसांचा जंतावर फार चांगला उपयोग होतो. कुयलीच्या बियांस 'कवचबीज' असें म्हणतात.

**कुरकुंब**—करकुंब पहा.

**कुरंगगड, अलंगगड**— हे किल्ले नाशिक जिल्ह्यांत नाशिक-अहमदनगर यांच्या सरहद्दीवर इगतपुरी स्टेशनच्या आग्नेयीस पांच कोसांवर आहेत. या दोहोंच्यामध्यें मदनगड नांवाचा किल्ला असून तो एका उभ्या खडकांत पायऱ्या खोदून केलेला होता. अलंग किल्ल्याच्या पूर्वेस नवरानवरी नांवाचा दोन अगदीं उभ्या सुळक्यांतून गेलेला एक घाट आहे. हे किल्ले कोणीं बांधले याबद्दल कांहीं नक्की माहिती नाहीं. हे १७६० मध्यें कावनई किल्ल्याबरोबर निझामाकडून पेशव्यांस मिळाले असावेत.

**कुरघोडी**—एक लहान मुलांचा खेळ. हा खेळ आज फारसा प्रचारांत नाहीं; संज्ञा मात्र वाक्प्रचारांत आढळते ( उदा०. कुरघोडी करणें ). यांत एका पक्षानें घोड्या व्हावयाचें व दुसऱ्यानें बसणारे ( राऊत ) व्हावयाचें. डाव देणाऱ्या पक्षापैकीं एकानें दोन्ही हात भिंतीस टेंकून खालीं वांकावयाचें. नंतर दुसऱ्यानें त्याच्या कमरेस घट्ट मिठी मारून तसेंच वांकावयाचें; तिसऱ्यानें दुसऱ्याच्या, चवथ्यानें तिसऱ्याच्या याप्रमाणें एकमेकांच्या कमरेस मिठ्या मारून घोड्या बनावयाचें असतें. डाव घेणाऱ्यांतील गड्यांनीं धांवत येऊन, उडी मारून एकेकाच्या पाठीवर बसावयाचें. उडी मारून बसतांना किंवा बसल्यावर कोणी घोडीवरून पडला तर डाव गेला व त्याच्या पक्षानें घोड्या व्हावयाचें. घोड्यावरील मुलानें हाताचीं कांहीं बोटें मिटून 'किती किती' असें खाल्ल्यास विचारावें. उत्तर बरोबर सांगितल्यास डाव जाऊन तो बसणाऱ्यावर येतो. घोड्यांना त्रास न होईल अशी काळजी घेण्यांत येते.

**कुरडू**—ही एक माठाच्या वर्गांतील जंगली भाजी आहे. कोंवळ्या पाल्याची व शेंड्याची रुचकर भाजी होते. ही भाजी मूत्रविकारानें व्यथित झालेल्या माणसांस वैद्य लोक खाण्यास सांगतात.

'नव्या पुनवेस' म्हणजे आश्विन शुद्ध पौर्णिमेस कुरडूची फुलें व नव्या झालेल्या धान्याचे ( कोकणांत भात व देशावर बाजरी ) तुरे व कुरडूच्या फुलांचें तोरण करून देवघरावर व घरांतील मुख्य दारावर शोभेकरितां बांधतात.

**कुरम एजन्सी**—हा प्रदेश वायव्य सरहद्द प्रांतांत असून कुरम नदीच्या थडीवरील प्रदेशाचा यांत समावेश होतो. याचें क्षे. फ. १,२७८ चौ. मै. आहे. कुरम जहागिरींत मुख्य पर्वत 'सफेत कोह'. कुरम ही एकच नदी आहे. तिला लहान लहान पुष्कळ नद्या मिळतात. यांत १६६ खेडीं असून पाराचिनार हें मुख्य शहर आहे. लो. सं. एक लाखावर आहे. पठाण लोकांचा विशेष भरणा आहे. लोकांची सामान्य भाषा पुश्तु आहे. मुख्य धंदा शेतकीचा आहे. येथें रेशीम पुष्कळ उत्पन्न होत असून त्याचे पुष्कळ जिन्नस तयार होतात. तांदूळ, मका, गळिताचीं धान्यें, गहूं व जव हीं पिकें होतात. फळझाडेंहि येथील लोक तयार करतात. शिक्षणांत एकंदर हा प्रदेश मागासलेला आहे.

**कुरमी**—ही शेती करणारी कुणब्याप्रमाणें एक जात आहे. एकंदर हिंदुस्थानांत यांची वस्ती सुमारें सदतीस हजार आहे. पश्चिमेकडील कुरमी लोक आपण भारतीय युद्धांतील कौरवकुलोत्पन्न आहों असें समजतात. कांहीं कुरमी आपण ब्राह्मण आहों असें समजूत यज्ञोपवीत धारण करितात. यांना बहुपत्नीत्वाची मुभा आहे. परंतु ही चाल अलीकडे बंद पडत चालली आहे. पुनर्विवाह रूढ आहे. सर्व धार्मिक विधी ब्राह्मणद्वारां करण्यांत येतात. कुरमी लोकांत पूर्वी हवेलिया नांवाची एक श्रेष्ठ जात होती. हे लोक गोंड राज्यांत उत्कृष्ट शेतकरी असून फार संपन्न स्थितींत असत. हे लोक मद्यमांस खात नाहींत. छत्तीसगड व जबलपूर येथें चंदनाहे हा एक मोठा वर्ग आहे. या लोकांमध्यें आदरातिथ्य पुष्कळ असतें.

**कुररी**—हा गरुड, ससाणा वगैरे पक्ष्यांच्या जातीचा एक पक्षी सर्वत्र आढळतो. हा बहुतेक मासे खाऊन आपली उपजीविका करतो व ते धरतांना एकदम त्यांच्यावर झडप घालतो. याची लांबी सरासरी दोन फूट असते. पंख या टोंकापासून त्या टोंकापर्यंत चार फूट भरतात. याच्या नांवानें जीं पिसें बाजारांत मिळतात तीं वास्तविक याचीं नसून इग्रेट (पाहा) या पक्ष्याचीं असतात.

**कुरवा**—कोरवा, कोरजा, कोरमा. एक जात. लो. सं. सु. अडीच लाख. मद्रास इलाख्यांत एक लाखावर आहेत. बाकी त्रावणकोर, म्हैसूर व मुंबई या भागांतून आहेत. महाराष्ट्रांत या लोकांना कैकाडी म्हणतात. कलकत्ता येथे त वैदूचा धंदा करतात. पल्ली, कवराई, इडायन, व खुडी अशींहि त्यांचीं नांवें आहेत. कोरवा जातीपैकी कांहींचा धंदा चोऱ्या करणें, घरें फोडणें, दरवडे घालणें अशा प्रकारचा आहे. साधारणतः मूळव्याधीसारखे रोग बरे करण्यासंबंधी त्यांची प्रसिद्धि आहे. त्यांच्या स्त्रिया गोंदण्याचाहि धंदा करतात. मासे, विंचू, किल्ले, घरें, इत्यादि आकृति शरीरावर मोठ्या कौशल्यानें हे गोंदतात. स्त्रियांची नर्तनाबद्दल प्रसिद्धि आहे. कोरवांचे घरगुती देव विष्णु व शिव हेच होत. एखादें बकरें कोल्हापुरी अम्मा किंवा पेरुमाल यांस बळी देऊन नारळ फोडण्यांत येतात. मुंबई इलाख्यांत कोरवा हे बेळगांव, विजापूर, धारवाड या जिल्ह्यांत आढळतात. पुनर्विवाह यांच्यांत रूढ आहे. घटस्फोटाची चाल नाहीं. हे लोक मांस खातात व दारू पितात. मारुति, यल्लमा व हुलीगेव ह्या त्यांच्या देवता आहेत.

**कुरवाई संस्थान**—मध्य हिंदुस्थानांतील एक संस्थान. याचे क्षे. फ. १४४ चौ. मै. व लो. सं. २९,५३७. संस्थानचें उत्पन्न चार लक्ष आठ हजार रु. आहे. संस्थानिक नबाब महंमद सरवर अलीखान बहादुर हे १९०६ सालीं लहान असतांना गादीवर बसले. यांनी सॅन्डर्स्ट येथें लष्करी शिक्षण घेतलें आहे. संस्थानांत यांनी बऱ्याच सुधारणा केल्या. व्हर्जिनिया तंबाकूची लागवड संस्थानांत मोठ्या प्रमाणावर केली आहे. शिक्षण व वैद्यकी इलाज मोफत आहे. संस्थानांत कायदेमंडळ स्थापलेलें आहे.

कुरवाई ही या संस्थानची राजधानी. घटना नदीकांठीं आहे. येथें जंबूर नांवाचा दगड मुबलक असल्यामुळें घरें या दगडाचीं बांधलेलीं आहेत. मुख्य धंदा शेती असून ज्वारी, गहूं, मका व धने हीं पिकें येथें होतात. १८२० पासून हें संस्थान ब्रिटिश अमलाखालीं होतें तें १९४८ सालीं मध्यभारत संस्थान संघांत सामील झालें.

**कुराइल बेटें**—चिशिमा हें जपानी नांव आहे. ही जपानी ४७ बेटांची मालिका पासिफिक महासागरांत जपानपासून कामश्चाटकापर्यंत पसरली आहे. क्षे. फ. ३,९४४ चौ. मैल व लो. सं.सुमारें ५,००० आहे. वस्ती बहुतेक कोळी लोकांचीच आहे.

**कुराण**—इस्लामी धर्मग्रंथ. 'अल् कोरान' म्हणजे वाचण्यायोग्य असा मूळ अर्थ आहे. मुसलमानांचे सर्व ऐहिक आणि पारलौकिक व्यवहार या धर्मग्रंथाला अनुसरून होत असतात. याची रचना गद्यमय असली तरी वाक्यांच्या निरनिराळ्या चरणांचे यमक साधलेले आहेत. याचे एकंदर ११४ सुरा किंवा अध्याय आहेत. यांत ७७,६३९ शब्द व ३,२३,०१५ वर्ण आहेत. निरनिराळ्या काळीं, निरनिराळ्या प्रसंगीं यांतील भाग लिहिले गेले असल्यानें साहाजिकच यांत एकसूत्रीपणा दिसणार नाहीं. भाषा मात्र शुद्ध अरबी समजली जाते. याच्या आरंभी जो फात्या आहे तो प्रत्येक मुसलमान रोज पांच वेळां प्रार्थनेच्या वेळीं म्हणतो. गाब्रिएल देवदूताच्या द्वारें महंमद पैगंबरांना जें प्रतीत झालें तें त्यांनीं लेखकांना सांगून लिहविलें. पुढें अबू बकरनें हें लिखाण एकत्र करवून घेतलें व नंतर याची संहिता बनली. याचे इमाम व दीन असे दोन भाग आहेत. पहिल्यांत धर्मतत्त्वें व दुसऱ्यांत आचार मार्ग सांगितले आहेत. आदम, नोहा, इब्राहिम, मूसा, ईसा (ख्रिस्त) व महंमद असे सहा पैगंबर कुराणांत दिले आहेत.

**कुरिया, मुरिया बेटें**—हा पांच बेटांचा समूह अरबस्तानच्या दक्षिण किनाऱ्यालगत आहे. हीं बेटें ब्रिटिशांना मस्कतच्या इमामाकडून १८५४ मध्यें मिळालीं व तीं एडन वसाहतीच्या ताब्यांत आहेत. येथें समुद्रांतील पक्षांच्या विष्ठेचे मोठाले थर आहेत. तांबड्या समुद्रांतील तारांचे वेध घेण्याचें ठिकाण या बेटांत आहे. क्षे. फ. २२ चौ. मैल आहे व लो. सं. सुमारें दोन हजार आहे.

**कुरु, कुरुपंचाल**—एक राष्ट्र. ब्राह्मण वाङ्मयांत कुरु लोकांना फार महत्त्व दिलेलें आहे. ब्राह्मण जात अथवा लोक हे कुरु किंवा कुरुपंचाल या देशांत उत्पन्न झाले अशाबद्दल सबळ पुरावा जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत आहे. कुरूंचा स्वतंत्र उल्लेख फारच क्वचित् आढळतो. त्यांचा पंचालांशींच निकट

संबंध असल्यामुळें पंचालांबरोबरच त्यांचा उल्लेख केलेला आढळतो. कुरुपंचाल हें एकच राष्ट्र होतें असा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आहे. ऋग्वेदांत कुरूंचा 'लोक' या अर्थानें उल्लेख नाहीं. अथर्ववेदांत परिक्षित् हा कुरूंचा राजा होता व शतपथ ब्राह्मणांत त्याचा मुलगा जनमेजय हा अश्वमेधयज्ञकर्त्यांत श्रेष्ठ होता असें म्हटलें आहे. कुरु लोकांची आणखी एक टोळी उत्तरेकडे उत्तर-कुरु हिमालयाच्या पलीकडे राहत असे. कुरुपंचालांचा देश म्हणजे ब्राह्मण संस्कृतीचें उगमस्थान होय व मागाहून ते चारी दिशेस पसरले यांत संशय नाहीं. पंचविंश ब्राह्मणांतील व्रात्य-स्तोम प्रकरणांत व शांखायन आरण्यकांत 'मगध देशांत ब्राह्मणानें वसती करणें म्हणजे अब्राह्मण्य होय' असें जें म्हटलें आहे त्याचा वरील गोष्टीमुळें उलगडा होतो. कुरुपंचाल ब्राह्मणांचा वरचेवर उल्लेख येणें हें त्यांच्या धर्मप्रसारक चळवळीचें द्योतक होय. कुरुपंचालांच्या भौगोलिक स्थानावरून ते कोसल, विदेह अथवा काशि यांच्यामागून हिंदुस्थानांत आले असावेत आणि पश्चिमेकडील नवीन आर्यन लोकांच्या लाटेनें आणखी पूर्वेस ढकलले गेले असावेत.

महाभारतांत कुरुवंशीय संवरणपुत्र जो कुरुराजा त्याच्या वंशजांना सामान्यतः कुरु हें नांव देतात. पण विशेषतः पांडव-शत्रु जे धृतराष्ट्राचे पुत्र व त्यांचे अनुयायी यांनाच कुरु किंवा कौरव म्हणण्यांत येतें.

कुरु देशाची राजधानी हल्लींच्या दिल्लीजवळ असलेलें इंद्रप्रस्थ शहर होय. याच्या पूर्वेस पांचाल व दक्षिणेस मत्स्य लोकांची वस्ती होती.

**कुरुंद, कुरुविंद**—(कॉर्बोरन्डम्). हा पदार्थ सिकता व कर्ब (सिलिकॉन कार्बाइड) यांचा संयुक्त पदार्थ असून वाळूवर कर्बाची (ग्राफाइट) क्रिया विजेच्या भट्टींत केली असतां तयार होतो. याचे स्फटिक पडतात व ते काळे व चकचकीत असतात. हा कठिण असल्यामुळें इतर पदार्थ घासण्याकरितां याचा उपयोग करण्यांत येतो. कुरुंदाच्या दगडाच्या जातीं, सहाणा वगैरे करण्यांत येतात.

**कुरुंद**—(कॉरन्डम्). हें एक अल्युमिनम प्राणिद खनिज द्रव्य असून त्याचे तिकोनी व एका बाजूस निमूळते होत गेलेले स्फटिक असतात. यांचा पृष्ठभाग खरखरीत असून कधीं कधीं तें लांबट वाटोळें असतें. हा दगड पुष्कराजाहून अधिक व हिऱ्याहून कमी कठिण असतो. याचा रंग करडा असून क्वचित् निळसर किंवा पिंगट तांबडा असतो. जेव्हां यांत अशुद्ध भाग नसतो व तो पारदर्शक असतो तेव्हां त्याच्या निळ्या जातीस इंद्रनीलमणी म्हणतात व तांबड्या जातीस माणिक म्हणतात.

रत्नासाठीं योग्य असा कुरुंद सिलोन, ब्रह्मदेश, सयाम या देशांत सांपडतो. घड्याळें आणि विद्युत् यंत्रें यांत कुरुंद रत्न वापरतात. झिलई देण्यासाठींहि बराच उपयोग करतात.

**कुरुंदवाड संस्थान**—मुंबई प्रांत, दक्षिण महाराष्ट्र. हीं संस्थानें कोल्हापूर येथील पो. एजंटच्या देखरेखीखालीं असत. संस्थानिक पटवर्धन आडनांवाचे कोंकणस्थ ब्राह्मण असून थोरली पाती व धाकटी पाती अशीं दोन निरनिराळीं संस्थानें आहेत. थोरल्या पातीचें क्षे. फ. १८२ चौ. मैल व लो. सं. ५२ हजार, आणि धाकट्या पातीचें क्षे. फ. ११६ चौ. मैल व लो. सं. ४७ हजार आहे. उत्पन्न अनुक्रमें तीन लक्ष व दोन लक्ष आहे. या संस्थानची राजधानी कुरुंदवाड पंचगंगा नदीकांठीं असून तेथील लो. सं. दहा हजारांवर आहे, व दोन्ही पातींचे अधिपती येथेंच राहतात. पटवर्धनांचें दैवत गणपति असल्यामुळें कुरुंदवाडास गणेशचतुर्थीचा उत्सव थाटाचा होतो. शिवाय येथें विष्णूचें देऊळ, आणि नरसिंहवाडीनजीक कृष्णेचा घाट हीं पाहाण्यासारखीं ठिकाणें आहेत. संस्थानांत गहूं, हरभरा, मका, कापूस, भात वगैरे पिकें होतात.

या पटवर्धन घराण्याचे मूळ पुरुष हरभट बाबा यांचे तिसरे पुत्र त्रिंबकपंत अप्पा हे या संस्थानचे मूळ संपादक होत. पेशव्यांनीं यांना लष्करी सरंजामासाठीं ही जहागीर दिली. त्रिंबकपंत, व त्यांचे पुत्र नीलकंठराव व कोन्हेरराव, आणि नीलकंठरावांचे पुत्र रघुनाथराव व शिवराव यांनीं पुष्कळ लढायांत पराक्रम केले; निळकंठराव १७७१ सालीं हैदरवरील स्वारींत आणि कोन्हेरराव १७७७ सालीं सावशीच्या लढाईंत सरकारकामीं आले. रघुनाथराव शिवराव हे परशुरामभाऊंबरोबर प्रत्येक लढाईंत असत व त्यांना त्यांत अनेक जखमा झाल्या होत्या. या जहागिरीच्या १८०० व १८५६ व १८८२ सालीं याप्रमाणें तीन वेळां वांटण्या झाल्या. थोरल्या पातीचे अधिपति चिंतामणराव धिप्पाड व व्यायामशास्त्राचे अभिमानी होते. ते १९०८ सालीं वारल्यावर भालचंद्रराव उर्फ आण्णासाहेब अधिपति झाले. ते बी. ए. असून संस्कृत विषयांत प्रवीण होते व हल्लीं त्यांचे चिरंजीव चिंतामणराव ऊर्फ बाळासाहेब अधिपति आहेत.

धाकट्या पातीचे अधिपति गणपतराव ऊर्फ तात्यासाहेब आहेत. धाकट्या पातींत पुन्हां दोन शाखा आहेत. त्या आळीपाळीनें राज्यकारभार पाहात.

१९४८ सालीं हीं संस्थानें मुंबई इलाख्यांत विलीन झालीं.

**कुरुंबा**—एक जात. मद्रास, म्हैसूर, हैदराबाद व कुर्ग या भागांतून यांची वस्ती आहे. लो. सं. सुमारें दहा लाख आहे. जंगलांत राहणारे आणि धनगराचा व कोष्टयाचा धंदा करणारे कुरुंबा असे दोन वर्ग आहेत. बेट्टा जातीचा धंदा शेती करणें हा

आहे. ही जात माहुताच्या धंद्यांत प्रवीण असते. ते शेतीहि करितात, पण हत्ती पकडण्याच्या कामीं ते फार वाकबगार आहेत. सचेपणा हा त्यांचा विशेष गुण आहे. कुरुंबांचे मुल्लू, जेन व ऊराळी असे तीन विभाग असून मुल्लूंचा धंदा शेती आहे व जेनांचा धंदा टोपल्या तयार करणें हा आहे. हे सर्व लोक धनुष्यबाण वापरतात. जेन कुरुंबांची देवता मास्ति नांवाची आहे. हे लोक धान्याची लागवड करून शिवाय जंगलांतील मध, डिंक इत्यादि वस्तू ते विकतात. कांहीं लोक कॉफीच्या कारखान्यांत काम करतात व कांहीं वाजंत्र्यांचाहि धंदा करितात. औषधी मुळ्या व वनस्पती यांचें ज्ञान या कुरुंबन् लोकांना चांगलें असतें. मध गोळा करणें हा ह्यांचा दुसरा उद्योग आहे. वायनाड येथील सोन्याच्या खाणींत कुरुंबन् लोकांचा चांगला उपयोग झाला. कुरुंबा धनगर गाईचें व डुकराचें खेरीज करून बाकीचें मांस खातात व दारू पितात. यांच्यांत जातपंचायती आहेत.

**कुरुयुद्ध**— हें पौराणिक महायुद्ध कौरव व पांडव यांच्यामध्यें मार्गशीर्ष शु॥ ११ पासून १० दिवस कुरुक्षेत्र या सुप्रसिद्ध रणक्षेत्रावर झालें. द्यूतांत हरल्यावर आणि कौरवांनीं दिलेली बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास असा काल पांडवांनीं कंठून प्रतिज्ञा पुरी केल्यावरहि पांडवांचें राज्य कौरव त्यांच्या हवालीं करीनात; व त्याकरितां श्रीकृष्णानें कौरवांकडे केलेली शिष्टाईहि फुकट गेली, त्यामुळें हें युद्ध उपस्थित झालें. श्रीकृष्णानें पांडवांना मदत केली व अखेर पांडव या युद्धांत विजयी झाले.

हें युद्ध कधीं झालें याबद्दल फार मतभेद आहेत. त्यांपैकीं सुप्रसिद्ध मतें—( १ ) कै. मोडक यांच्या मतें कुरुयुद्धाचा काल खि. पू. ५०००; (२) आर्यज्योतिषांचें मत खि. पू. ३१०१; ( ३ ) वराहमिहिर —खि. पू. २४४८; ( ४ ) रमेशचंद्र दत्त व कित्येक पाश्चात्य पंडित–खि. पू. १४००; (५) चिलडी अय्यर—खि. पू. ११९४. कार्तिक वा॥ ११ चित्रा नक्षत्र; (६) त्र्यं. गु. काळे–खि. पू. १२६३; (७) केशवराव दप्तरी–खि. पू. ११९७. मार्गशीर्ष शु॥ २ ज्येष्ठा किंवा मूळ नक्षत्र; ( ८ ) लोकमान्य टिळक–खि. पू. १४००; ( ९ ) ज. स. करंदीकर–खि. पू. १५०० मार्गशीर्ष शु॥ ११ रोजी युद्धास आरंभ झाला व ष तत्पूर्वी त्याच दिवशीं श्रीकृष्णांनी अर्जुनाला गीता सांगितली. युद्धाचा काल ठरविण्यास—(१) महाभारतांतील ज्योतिषविषयक उल्लेख, ( २ ) पौराणिक राजवंशावली, आणि ( ३ ) कलीयुगारंभ अशा प्रमाणांचा आधार घेतात. या सर्व प्रमाणांवरून खि. पू. १५०० चा सुमार हाच काल सर्वसंमत होण्यासारखा दिसतो.

**कुरुक्षेत्र**— पूर्व पंजाब, कर्नाळ जिल्हा. हे एक अति पवित्र स्थान मानिलें आहे. यांतून दृषद्वती, सरस्वती व आपया ह्या नद्या वाहत असत. तेथेंच शर्यणावत् नांवाचें सरोवर–शतपथ ब्राह्मणांतील अन्यतः प्लक्षा–होतें. पाश्चात्य वैदिक पंडित पिशेलच्या मताप्रमाणें ऋग्वेदांत कांहीं ठिकाणीं आलेला पस्त्या नांवाचा ओढाहि कुरुक्षेत्रांतच आहे. तैत्तिरीय आरण्यकांतील कुरुक्षेत्राची मर्यादा दक्षिणेस खाण्डव, उत्तरेस तूर्घ्न आणि पश्चिमेस परीणह अशी आहे. साधारपणें सध्यांच्या सरहिन्द प्रान्ताचीहि तीच मर्यादा आहे.

येथें कौरवांचा मूळ पुरुष कुरु या राजानें तप केलें तेव्हां इंद्र त्याला प्रसन्न झाला आणि त्याच्या प्रसादानें हें स्थळ पवित्र झालें. सरस्वती व दृषद्वती यांच्या दुआबांत हें असून हल्लीं हें कर्नाळ जिल्ह्यांत आहे. महाभारतकाळीं हें व पुष्कर अशीं दोन तीर्थें फार प्रख्यात होतीं. या क्षेत्रांत शेकडों तीर्थें असून त्यांत तीन मुख्य आहेत : ( १ ) पृथूदक, ( २ ) स्यमंतपंचक ,व ( ३ ) सन्निहती. सूर्यग्रहणांत येथें मोठी यात्रा भरते. भारतीय युद्धाच्या वेळीं या ठिकाणीं एवढें मोठें सैन्य राहिलें असेल हें संभवनीय नाहीं. तेव्हां पंजाबचा कांहीं भाग, सर्व कुरुजांगल, रोहितकारण्य, मरुभूमि, कालकूट, गंगापूर, वारण, या अर्वाचीन प्रदेशांत हें युद्ध झालें असावें.

आज कुरुक्षेत्र म्हणजे पंजाबांतून देशाच्या फाळणीमुळें हिंदी संघराज्यात आलेल्या हिंदू-शीख निर्वासितांचा मोठा तळ बनला आहे.

**कुरे**—जपानमधील एक बंदर व आरमाराचें ठाणें. हें होनशू बेटांत आहे. येथें पोलादाचे कारखाने, दारूगोळ्याचा कारखाना व लष्करी विद्यापीठ आहे. लो. सं. २,३१,३३३ आहे.

**कुरेर**—ॲमेझॉन नदीकांठच्या कांहीं टोळ्यांतील लोक आपल्या बाणास लावण्याकरितां एका झाडाच्या ( स्ट्रिक्नॉस टॉक्सिफेरा ) सालीपासून हा अत्यंत भयंकर विषारी क्षार काढतात. हा पिंगट, काळसर असून ठिसूळ असतो. याच्या योगानें पक्षघाताचीं व धनुर्वाताचीं लक्षणें होतात व छातीचे स्नायु बधीर झाल्यामुळें श्वासोच्छ्वास करणें जड होऊन मनुष्य गुदमरून मरतो. याचा उपयोग धनुर्वातावर, कुचल्याच्या विषावर आणि कुत्र्याच्या विषावर करतात.

**कुरोकी, काऊंट** (१८४४–१९२३)—एक जपानी सेनापति. चीन जपान युद्धांत वे - है - वे हस्तगत करण्याच्या वेळीं हा जपानी सैन्याचा कमांडर होता ( १८९५ ). पुढें रूसो जपानी युद्धाच्या वेळीं इंपीरियल कौन्सिल ऑफ वॉर्सचा सभासद आणि फर्स्ट आर्मी कमांडर होता. मांच्युरियामध्यें त्यानें केलेल्या पराक्रमामुळें तो एक श्रेष्ठ जपानी सेनाध्यक्ष गणला जातो.

**कुरोपाट्कीन, ॲलेक्सी निकोलैविश्**—(१८४८–१९२५). एक रशियन जनरल. रशियाचें जपानबरोबर

युद्ध सुरू झालें (१९०४) त्या वेळीं मांच्युरियामध्यें मुख्य सेनापति नेमला गेला. पण तेथें त्याला एकसारखी माघार घ्यावी लागली, आणि १९०५ च्या मार्च महिन्यांत मुगडेन शहर सोडून पळून जावें लागलें. म्हणून त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर उत्तर सरहद्दी-वरील रशियन सैन्याचा तो कमांडर होता.

कुर्दिस्तान--कुर्द लोकांच्या देशाला कुर्दिस्तान म्हणतात. बतमनसु बोहतन-सु वगैरे तैग्रिसला मिळणाऱ्या नद्या वाहत असलेला प्रांत व लहानथोर झाब नद्या वाहत असणारा डोंगराळ मुलूख इतका प्रदेश कुर्दिस्तानांत मोडतो. कुर्दांची लो. सं. २५ लाख असून त्यांपैकीं १६॥ लाख तुर्की, ८० हजार इराणी व ५० हजार रशियन आहेत. हे धर्मानें मुसलमान आहेत व ख्रिस्ती लोकांचे शत्रू आहेत. तथापि बायबलचें तुर्क भाषेत भाषांतर करण्यास व कांहींनीं वर्तमानपत्र चालविण्यास मदत केली आहे. कुर्द लोक गर्विष्ठ परंतु विश्वासू व आतिथ्यशील आहेत. यांची भाषा इराणी असून त्यांच्यांत सुनी व शफी असे दोन पंथ आहेत.

कुर्दिस्तान हा डोंगराळ असला तरी दऱ्यांतून तांदूळ, कापूस, ताग, फळें, वगैरे होतात. १९२० सालीं तुर्कस्तानानें कुर्दिस्तानाची राजकीय स्वायत्तता मान्य केली, पण लोसानच्या तहांत (१९२३) कुर्दांच्या स्वातंत्र्याचा मुळींच उल्लेख नव्हता.

कुर्ला—मुंबई, ठाणें जिल्हा, साष्टी तालुक्यांतील एक गांव. पण मुंबईच्या उपनगरांत याचा समावेश होतो. हें साष्टी बेटाच्या पूर्व टोंकावर असून जी. आय्. पी. रेल्वेचें स्टेशन आहे. येथें कापडाच्या २ मोठ्या गिरण्या आहेत. लो. सं. सु. वीस हजार. येथें म्यु. कमिटीची स्थापना १८७८ सालीं झाली.

पोर्तुगीजांच्या अमलाखालीं कुर्ला गांवाला बरेंच महत्त्व चढलें. १८०८ त मुंबई सरकारनें मुंबईतील अपोलो पीयर गेटाजवळील जमिनीच्या तुकड्याच्या मोबदला होर्मसजी बम्मनजी वाडिया या पारशी गृहस्थाला इतर पांच गांवांबरोबर कुर्ला देऊन टाकलें होतें.

कुऱ्हाड—हें लांकूड तोडण्याचें व फोडण्याचें एक हत्यार आहे. याला एक दांडा असून पुढें लोखंडाचा एका बाजूस निमुळता होत जाणारा जड तुकडा बसविलेला असतो. दांड्याची लांबी उपयोगाप्रमाणें कमी-जास्त असते. कुऱ्हाडीचा घाव घालतांना डावा हात दांड्याच्या टोंकाशीं धरून उजवा हात डोक्याजवळ धरून घाव घालतांना तो डाव्या हाताजवळ सरकवीत आणावयाचा असतो. झाडाच्या फांद्या तोडावयाच्या असल्यास फांदीच्या खालच्या बाजूनें घाव मारतात. झाडाचें खोड तोडावयाचें असल्यास प्रथम वरच्या बाजूनें आंत रुंद होत जाणारी खांच घेण्यांत येते व नंतर खालच्या बाजूनें दुसरी कमी उताराची खांच घेण्यांत येते. नंतर दुसऱ्या बाजूनें अशीच खांच पहिल्या खांचेस मिळेल इतकी घेण्यांत येते. कुऱ्हाडीची धार कुरुंदाच्या दगडावर घासून तीक्ष्ण करण्यांत येते. दांड्याच्या टोंकाशीं एक पाचर बसविण्यांत येते तीमुळें दांडा निखळून येत नाहीं.

कुल— ज्या जमिनीस वाहण्यासाठीं सहा बैलांनीं ओढले जाणारे असे दोन नांगर लागतात त्या जमिनीस कुल असें म्हणतात. यावरून सामान्यतः एका कुटुंबाच्या पोषणास लागणारी जमीन असा प्रथम कुल या शब्दाचा अर्थ असून लक्षणेनें तो शब्द पुढें कुटुंब दाखवूं लागला असावा. कुलपरंपरा दोन प्रकारची असूं शकते. एक पितापुत्रपरंपरा व दुसरी मातृ-कन्यापरंपरा. जेथें कुटुंबांतील मुख्य व्यक्ति पिता असतो, तेथें पितापुत्रपरंपरा ही कुलपरंपरा असते. जेथें स्त्रीकडे कुटुंबाचें नेतृत्व असतें, तेथें मातृकन्यापरंपरा ही कुलपरंपरा असतें. अशी मातृ-कन्यापरंपरा अद्यापि मलबारांत आढळते. इतरत्र पितापुत्रपरंपरा आढळते. रोमन लोकांमध्यें पितापुत्रपरंपरा हीच कुलपरंपरा होती. एकाच कुलांत एकाच वेळीं अनेक कुटुंबांचा समावेश होतो. हीं कुटुंबें एकमेकांशीं सपिंड, समानोदक, वगैरे संबंधांनीं निगडित असतात. गोत्र या संस्थेंत अनेक कुलें येतात. कुटुंब पाहा.

कुलपति मिश्र—एक हिंदी कवि. हा आग्रा येथें राहणारा असून याच्या बापाचें नांव परशुराम मिश्र होतें. हा जयपूरच्या रामसिंहाच्या पदरीं होता. 'रसरहस्य', 'युक्ति-तरंगिणी', 'नखशिख', 'गुणरसरहस्य', 'संग्रहसार', 'द्रोणपर्व', वगैरे ग्रंथ यानें लिहिले. अलंकारिक भाषा व सरस रचना हें याचें लेखनवैशिष्ट्य होय.

कुलशेखर—त्रावणकोरचा एक राजा. यानें फार चांगल्या रीतीनें राज्य केलें. या राजानें तिरुपति व श्रीरंग येथील यात्रा केल्या व जनसेवा म्हणजे ईश्वरसेवा करणें होय, असें आपल्या चारित्र्यानें दाखविलें. यानें तामिळ व संस्कृत या दोन्ही भाषांत ग्रंथ लिहिले. याचा 'तेट्टरुंदिरल' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

या नांवाचे कांहीं पांड्यराजे १२ व्या ते १४ व्या शतकांत होऊन गेले.

कुलाबा—मुंबईच्या दक्षिणेकडील एक जिल्हा. क्षे. फ. २,२१२ चौ. मैल व लो. सं. ६,६८,९२२ आहे. या जिल्ह्यांत अलीबाग, पेण, पनवेल, कर्जत, रोहें, माणगांव व महाड हे सात तालुके व नागोठणें, खालापूर व उरण हे तीन पेटे आहेत. लोकसंख्येंत शें. ९४ हिंदू, शेंकडा ३ मुसल्मान, बाकीचे ख्रिस्ती, जैन, ज्यू, पारशी, भिल्ल हे आहेत. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण अलीबाग (शहर) असून शिवाय इतर शहर व गांवें १,४६१ आहेत. हा

जिल्हा. सह्य पर्वत व समुद्र यांच्यामध्यें असल्यामुळें पुष्कळ टेंकड्या व डोंगर यांनीं व्यापलेला आहे, व त्यांत माथेरान, कनकेश्वर, वगैरे प्रसिद्ध डोंगर आणि कर्नाळ, माणिकगड, सागरगड, रायगड, वगैरे किल्ले आहेत. मुख्य नद्या उल्हास, पाताळगंगा, अंबा, कुंडलिका, मांदाड व सावित्री या आहेत. प्रमुख खाड्या उरण उर्फ पनवेल, अष्टे, नागोठाणें, कुंडलिका, रोहे उर्फ चौल, मांदाड व बाणकोट या आहेत. नागोठाण्यानजीक उन्हेरें, व महाड तालुक्यांत शोण व कोंडिवरी येथें ऊन पाण्याचे झरे आहेत. या जिल्ह्यांत पुष्कळ मोठालीं जंगलें आहेत, व त्यांत साग, ऐन, खैर, आंबा, चिंच, सावर, हिरडा, आपटा, आंवळा, वगैरे झाडें व शिकेकाई, गरुडवेल, कण्हेर, वगैरे झाडेंझुडपें व औषधी वनस्पती आहेत. डोंगराळ भागांत वाघ, चित्ते, तरस, कोल्हे, गवे, सांबरें, चितळ, वगैरे रानटी जनावरें, आणि पाणलावे, बदकें, पाखे, तित्तीर, लावे, इत्यादि पक्षी आहेत. साप विविध प्रकारचे व कांहीं विषारी आहेत. पाऊस सरासरी ८८ इंच पडतो.

येथील मुख्य पीक भात; शिवाय वरी, नाचणी, हरीक, वाल, मूग, तूर, उडीद, हरभरे, वगैरे धान्यें होतात. समुद्रकिनाऱ्याला ताडमाड, केळीं, कलमी आंबे, नारळ, सुपारी, वगैरे बागायती झाडें होतात. पेण व पनवेल तालुक्यांत दीडशेंच्यावर मिठागरें असून दरसाल २५ लक्ष मण मीठ तयार होतें. उरण येथें दारू, चौल येथें रेशमी कापड, पनवेल येथें बैलगाडीचीं चाकें, वगैरेंचे कारखाने आहेत. येथील कोळी लोक नावाडी असून मच्छीमारीचा धंदा करतात.

या जिल्ह्यावर आंध्र, चाळुक्य, देवगिरीचे यादव, नंतर १३४७ पासून मुसलमानी व कांहीं भागावर पोर्तुगीज अमल होता. १६३२ पासून मराठ्यांनीं हा जिल्हा आपल्या अमलाखालीं आणला, व १८१८ पासून येथें ब्रिटिश सत्ता सुरू झाली. या जिल्ह्यांत पालें, कोलें, कुडें, कोंडाणें, आंबीवली येथें बौद्धांचीं लेणीं आणि घारापुरी येथील 'एलेफंटा' हीं ब्राह्मणी लेणीं प्रसिद्ध आहेत. कुलाबा, खांदेरी व उंदेरी हे समुद्रांतले किल्ले आहेत; शिवाय पोर्तुगीजांचीं कांहीं चर्चें आहेत. जंजिरा संस्थान या जिल्ह्यांत मोडतें.

**कुलू**—पूर्व पंजाब, कांग्रा जिल्ह्यांतील एक तहशील. क्षे. फ. १,३४३ चौ. मैल असून लो. सं. सुमारें दोन लाख आहे. सुलतानपूर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. बियास नदी कुलू तहशिलींतून वाहत जाऊन मंडी संस्थानात शिरते. पर्जन्यमान ३१ ते ४२ पर्यंत असतें. या प्रदेशावर अनेक राजे व राजघराण्यांनीं सत्ता चालविली. गांवाजवळ बियास नदीवर झुलता पूल असून नदीचा देखावा भव्य आहे. कुलू खोऱ्याची प्रसिद्धि त्याच्या सृष्टिसौंदर्याबद्दल फार आहे. पठाणकोटहून इकडे जाण्याचा मार्ग आहे.

**कुलेन विल्यम** (१७१०–१७९०)—हा स्कॉटिश वैद्य व वैद्यकीय ग्रंथलेखक १७५६ मध्यें एडिनबर्ग युनिव्हर्सिटीमध्यें रसायनशास्त्राचा प्रोफेसर नेमला गेला. १७७३ मध्यें तो पदार्थविज्ञानाचा प्राध्यापक झाला. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते— 'ए ट्रीटाइज ऑफ मटेरिआ मेडिका' (औषधिविज्ञानावर एक प्रबंध), 'क्लिनिकल लेक्चर्स' (वैद्यकांवर व्याख्यानें), आणि 'फर्स्ट लाइन्स ऑफ दि प्रॅक्टिस ऑफ फिझिक' (वैद्यक्रिया धंद्याची पहिली रूपरेषा).

**कुलोत्तुंग (चोल) चालुक्य** (१०७०–१११८)— कुलोत्तुंग चोल हा चालुक्य वंशांतील प्रख्यात राजराजाचा नातू. चोल राज्यांतील अंतःकलहाचा फायदा घेऊन यानें चोल राज्य बळकावलें. यानें आपला चुलता विक्रमादित्य सातवा यास वेंगी प्रांतावर आपला प्रतिनिधि नेमून हा चोलांच्या प्रदेशावर राज्य करूं लागला. चोल वंशांतील अधिराजेंद्र हा निपुत्रिक असल्यानें हा दुसऱ्यांदां म्हणजे सन १०७४ त चोल साम्राज्याच्या सिंहासनावर अधिष्ठित झाला. त्यानें आपल्या राज्यारोहणाच्या चौथ्या वर्षी कुलोत्तुंग ही पदवी धारण केली. हा युवराज असतांना यानें वैरागरम् व चक्रकोट हीं महत्त्वाचीं ठाणीं काबीज केलीं. चोल साम्राज्याच्या सिंहासनावर बसण्याची याची इच्छा अधिराजेंद्राच्या वेळीं सफल झाली. याचा ध्वज चोलांचा व्याघ्रचिन्हांकित होता. यानें पांड्य राजाचा पराभव करून त्याजपासून मानार, तिनेवल्ली, कन्याकुमारी, कुट्टरू, मलबार, वगैरे प्रांत काबीज केले. म्हैसूर प्रांतावर स्वारी करून यानें विक्रमादित्यास तुंगापार पळवून लावलें व गंगामंडल व सिंधण हे प्रांत मिळवले. यानें कुंतल राजाचा पराभव केला, होयसळापासून गंगवाडी प्रांत काबीज केला व कलिंग देश दोनदां जिंकला. यानें पांड्य व चेर राजांना आपलें मांडलिकत्व कबूल करावयास लावलें. विक्रमादित्य चालुक्य व कुलोत्तुंक चोल हे बलिष्ठ सम्राट् समकालीन होते. राज्यप्रसार करीत असतांना कुलोत्तुंगानें आपली राज्यव्यवस्थाहि नमुनेदार अशी ठेवली होती. आपण मिळवलेल्या सर्व साम्राज्याची सन १०८६ मध्यें यानें मोजणी केली.

**कुल्लूक भट्ट** (१२ वें शतक)— मनुस्मृतीवरील एक टीकाकार. यानें काशी येथें 'मन्वर्थमुक्तावली' नांवाचा मनुस्मृतीवर एक उत्कृष्ट टीकात्मक ग्रंथ लिहिला. या ग्रंथाच्या प्रस्तावनेवरून याच्या चरित्राची त्रोटक कल्पना येते. बंगालच्या वीरेंद्र ब्राह्मण घराण्यांतील भट्ट दिवाकराचा हा मुलगा. गौड देशांतलि नंदवासिन् गांवचें हे मूळचे घराणें कुल्लूक भट्ट यानें

राजे पांचव्या शतकापर्यंत होते. कुशान व आंध्र यांचा अस्त व गुप्तांचा उदय यांमधील एक शतकाचा हिंदुस्थानचा इतिहास सर्व अंधारांत गडप झाल्याप्रमाणें आहे. कुशानांनी हिंदु संस्कृति स्वीकारली याचें ठळक उदाहरण म्हणजे यांच्यांतील एक राजाचें वासुदेव हें नांव होय. कुशान हे बौद्धधर्मीय होते.

**कुशिनगर**--(कुशनगर किंवा कुशिनारा). या नगराचें अत्यंत प्राचीन नांव कुशावती हें असून याचा संबंध ५३१ व्या जातककथेशीं आला आहे, व याचा राजा ओक्काक (इक्ष्वाकु) याचा पुत्र कुश हा असल्याचें सांगितलें आहे. बौद्ध आख्यायिकाप्रमाणें शाक्यमुनि गौतमबुद्ध याचे (कुशिनारा) या ठिकाणीं निर्वाण व दहन झालें व यामुळें बौद्ध यात्रेकरूंचें हें एक महत्त्वाचें यात्रेचें स्थान झालें आहे. सांप्रत हें शहर गोरखपूर जिल्ह्यांत पूर्वेकडे आहे.

**कुसाजी भोंसले**—हा शाहुमहाराजांचा लेकवळा होता. हा शूर असल्यानें याला मोहिमांवर नेहमीं धाडण्यांत येई. सातारा प्रांतानजीकच्या शिराळेचा सुभा याजकडे असे. पुढें कर्नाटक प्रांतावर बाबूजी नाइकाची नेमणूक झाली असतां त्याजकडे अर्धा कर्नाटक दिला, व अर्धा या कुसाजीकडे दिला. शिराळें येथें हल्लीं जें भोसल्यांचें घराणें आहे त्याचा हा संस्थापक होय. या घराण्यानें स्वराज्यांत बरेंच काम केलें आहे.

**कुसुंबा**—(करडी) करडई पहा. स्पेन, जर्मनीचा दक्षिण भाग, इटली, हंगेरी, इराण, ईजिप्त, दक्षिण अमेरिका, दक्षिण रशिया व हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांत यांत हीं झुडपें होतात. या झुडुपांच्या फुलांपासून रंगाचें द्रव्य व बियांपासून तेल निघतें. कुसुंबाच्या बिया लोक रेचक म्हणून खातात. बिन कांट्याच्या करडईच्यीं फुलें वाळवून त्यांचा कुसुंबा रंग करतात. कुसुंब्याच्या बिया भाजून खातात. या झाडाच्या फुलांपासून दोन जातींचे पिवळे रंग व एक तांबडा रंग असे तीन रंग मिळतात.

**कुळकर्णी**--महाराष्ट्राच्या प्राचीन ग्रामसंस्थेतील कुळकर्णी हा एक अधिकारी असून प्राचीन काळापासून सामान्यत्वेंकरून तो ब्राह्मण-वर्गापैकीं असतो. एकंदर जमिनीचा एक-पंचविसांशावा हिस्सा पाटील-कुळकर्णी व चौघुले यांना साऱ्यावांचून इनाम देण्याची तत्कालीन वहिवाट असून याशिवाय त्यांना आपल्या गांवांत दुसरे कित्येक हक्क असत. गांवच्या वसुलाचा हिशेब ठेवणें हें कुळकर्ण्याचें मुख्य काम होतें. कुळाचा जो करणीक तो कुळकरणीक (कुळकर्णी). शिवकालीन कुळकर्ण्यांना दोन चवाळी, एक जोडा, एक मुंडासें, एक पासोडी, एक धोतरजोडा, रुमाल, वगैरे हक्कबाबी असत. मुशाहिरा व हक्कलाजिमा मिळून सालिना सहाशें रुपयांपर्यंतची प्राप्ति कुळकर्ण्यास होई. हल्लीं सरकारनें वतनदार कुळकर्णी काढून टाकून त्यांच्या जागीं पगारी तलाठी नेमले आहेत.

**कुळीथ**—या धान्यास देशावर हुलगे असें म्हणतात. तृण धान्यांत जसा हरीक केवळ गरिबांचें धान्य समजलें जातें तसें द्विदल धान्यांत हुलगा हें धान्य आहे. हें सर्वत्र होतें. कुळीथ घोड्यांस व दुभत्या गुरांस खावयास घालतात.

कुळीथ हें धान्य हलक्या जमिनीवर येतें. या धान्यास फार पाऊस लागत नाहीं. हें बाजरी व काराळ्याबरोबर मिसळून पेरतात.

या धान्याचा माणसांना व गुरांना फार उपयोग होतो. कुळीथ शिजवून घोड्यांना व बैलांना खावयास घातल्यानें तीं पुष्ट होतात. कुळिथाचें पीक तागाप्रमाणें करून जमिनींत नांगरून टाकल्यास जमीन सुधारते. याचें बिवडहि चांगलें असतें.

**कूका**—शीख लोकांचा एक धार्मिक ग्रंथ. रामसिंग नांवाच्या सुतारास साक्षात्कार झाला. नंतर तो शीख धर्म जास्त पवित्र करण्याकरितां गुरु झाला. शीख लोकांमध्यें दहा गुरूंप्रमाणें दहा तत्त्वें आहेत. पैकीं पहिलीं पांच 'क' कार पुढीलप्रमाणें आहेत—करा, कच्छ, करपाल, कोंधी, केंस. कूकापंथी लोक हिंदु शास्त्रें मानीत नाहींत. त्यांचे लग्न-विधी व मृतसंस्कार निराळे आहेत. हे मद्य पीत नाहींत, मांस खात नाहींत व स्नान करण्यापूर्वी कांहीं खात नाहींत. यांच्या धर्मांत बहुतेक सर्व सुतार, गवंडी व कोष्टी, व कांहीं जाट येऊन मिळाले. त्यांच्या अनुयायांची संख्या एक लक्षापर्यंत वाढली. राजकीय भानगडीमुळें हा पंथ घटूं लागला व 'तत् खालसा' या धार्मिक चळवळीमुळें यांत फुटाफूट झाली.

**कू-क्लुक्स-क्लॅन**—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांनीं नीग्रो लोकांची गुलामगिरी बंद करण्याचा कायदा आपसांतील यादवीयुद्ध (१८६१-६४) संपल्यानंतर केला, तेव्हां त्या कायद्याला विरोध करण्याकरितां एक गुप्त संस्था स्थापण्यांत आली, तिला पुढें हें नांव मिळालें. प्रथम १८६५ सालीं टेनेसी संस्थानांत पुकलास्की येथें तरुण गोऱ्या लोकांचा एक क्लब स्थापन झाला, व पुढें त्याला सर्व अमेरिकेंत पसरलेल्या अशा व्यापक संस्थेचें स्वरूप प्राप्त झालें. संयुक्त संस्थानांतील नीग्रोंना दडपून टाकणें हाच या संस्थेचा मुख्य उद्देश होता. १८७१ सालीं ही कू-क्लुक्स-क्लॅन ही संस्था व इतर अशाच प्रकारच्या सर्व संस्था कू-क्लुक्स ॲक्ट उर्फ फोर्स बिल या कायद्यानें बंद पाडण्यांत आल्या. पुढें १९१६ सालीं सं. संस्थानांतील दक्षिण भागांत काळ्या लोकांनीं उचल केली, आणि पहिल्या महायुद्धानंतर युरोपांतले अनेक गुन्हेगार व गुप्तहेर अमेरिकेंत आश्रयार्थ आले, त्यामुळें ही संस्था पुन्हां कार्यप्रवृत्त झाली. पण एकंदरीनें या

संस्थेनें थोडेंबहुत उपयुक्त कार्य केलें त्यापेक्षां फार अधिक पटीनें भयंकर अत्याचार केले; आणि या गुप्तसंस्थेची चौकशी करण्याचे सरकारी प्रयत्नहि निष्फळ झाले.

**कूर्ग**—दक्षिण हिंदुस्थानांत म्हैसूर संस्थानच्या पश्चिमेस, पश्चिम घाटाच्या माथ्यावर व उतारावर असलेला लहानसा प्रांत. क्षे. फ. १,५९३ चौ. मै. व लो. सं. १,६८,७२५. या प्रांताचें मूळ नांव कोडगू असें आहे, व येथील मुख्य ब्राह्मणेतर जातीला कोडगू असें म्हणतात. कूर्ग हा कोडगू याचा इंग्रजांनीं केलेला अपभ्रंश होय. कॉफीचे मळे, लागवडीकरितां तयार केलेला प्रदेश, व खुलीं खोरीं याशिवाय बहुतेक सर्व प्रदेश अरण्याच्छादित आहे. कावेरी व लक्ष्मण-तीर्थ या नद्यांमधील पूर्व सरहद्दीवरच्या भागांत एकसारखें जंगल आहे. पश्चिमघाटाची मुख्य रांग वायव्येस सुब्रह्मण्यपासून दक्षिणेस ब्रह्मगिरीच्या पश्चिम टोंकावर सुमारें ६० मैल लांब पसरली आहे. मुख्य शिखरें-सुब्रह्मण्य किंवा पुष्पगिरी. सर्व रानांत, व विशेषतः पूर्व सरहद्दीकडे हत्ती पुष्कळ आहेत. येथील शेवटच्या राजानें जुलई १८२२ पासून एप्रिल १८२४ पर्यंत २३३ हत्ती मारल्याचा व १८१ पकडल्याचा उल्लेख एका शिलालेखांत केलेला आहे. याशिवाय गवे, वाघ, चित्ते, अस्वलें, जवादी मांजरें, काळीं व रानटी मांजरें, रानटी कुत्रे, वगैरे श्वापदें रानांत आढळतात. सांबर व हरण यांच्या निरनिराळ्या जाती व नाग, साप, माकडें हे प्राणीहि येथें आहेत. वार्षिक पाऊस सरासरी १३३ इंच पडतो.

कावेरी माहात्म्य नांवाच्या पुराणांत कावेरीच्या उगमाचा इतिहास दिलेला आहे. नवव्या व दहाव्या शतकांत कूर्ग प्रांत तळकाड (कावेरीच्या कांठीं) येथील गंग राजाच्या ताब्यांत होता असें शिलालेखांवरून समजतें. अकराव्या शतकाच्या आरंभीं चोल राजांनीं गंग राजांची सत्ता नाहींशी करून कूर्ग प्रांतहि घेतला. सोळाव्या शतकाच्या अखेरीस खुद्द कूर्गचा कारभार नायक राजाच्या हातीं होता. १८३४ सालीं येथील जुलमी राजाला पदच्युत करून ब्रिटिशांनीं हा प्रदेश आपल्याकडे घेतला.

कूर्गमधील जमीन सुपीक असून तेथें मुख्य पीक तांदुळाचें होतें. तांदुळाच्या खालोखाल वेलदोड्याचें उत्पन्न महत्त्वाचें आहे. गेल्या ५० वर्षांत कॉफीच्या लागवडीला कूर्ग प्रांतांत बरेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. केळीं व नारिंगें हीं येथील मुख्य फळें होत. मर्कारा हें मुख्य ठिकाण आहे. १९४० सालापासून या प्रदेशावर एका स्वतंत्र चीफ कमिशनरची नेमणूक झाली.

**कूर्मदास**—एक मराठी संतकवि. हा पैठण येथील रहिवासी असून जातीचा ब्राह्मण होता. हा जन्मल्या दिवसापासून पांगळा व थोटा असे. म्हणून याच्या मनांत पंढरीस जाऊन पडावें असें आलें. तेव्हां यानें पांडुरंगाची प्रार्थना केली; आणि भक्तिपूर्वक वारकऱ्याबरोबर देवास निरोप सांगून धाडिला कीं, कृपा करून येथें येऊन मला दर्शन द्यावें. या निरोपाप्रमाणें, असें सांगतात कीं, यास विठोबानें तेथें येऊन दर्शन दिलें. भक्तिविजयांत (अ. १६) याची कथा वर्णिली आहे. याची समाधि हल्लीं लऊळ येथें आहे. याचा काल सुमारें शके १२३० चा होय. याची कांहीं स्फुट कविता आहे.

**कूर्मपुराण**—अठरा पुराणांपैकीं पंधरावें. समुद्रमंथनाच्या वेळीं ज्या ऋषींनीं विष्णूची स्तुति केली त्या ऋषींना विष्णूनें आपल्या कूर्म (कांसव) अवतारांत हें पुराण सांगितलें; म्हणून याला कूर्मपुराण म्हणतात. यांत विष्णूच्या अवताराच्या अनेक कथा दिल्या आहेत. मधूनमधून इतर कथा व स्तोत्रेंहि दिलीं आहेत. पवित्र क्षेत्रें काशी (काशीमाहात्म्य) व प्रयाग (प्रयागमाहात्म्य) यांचें वर्णन व महत्त्व बऱ्याच मोठ्या प्रमाणांत पहिल्या भागांत दिलें आहे. पहिल्या भागाच्या आरंभीं ईश्वरगीता (भगद्गीतेसारखी) सांगितली आहे. या गीतेनंतर व्यासगीता दिली आहे. कांहीं भागांत सर्व पापांबद्दलच्या प्रायश्चित्तविधींचें वर्णन दिलें आहे व पातिव्रत्यधर्माचा उल्लेख आला आहे. यांत शिवाचाच महिमा विशेष गायिला असल्यानें यास शैवपुराण मानण्यांत येतें.

**कूलीज, कॅल्व्हिन** (१८७२-१९३३)—हा अमेरिकेंतील सं. संस्थानांचा १३ वा अध्यक्ष. तो वकिलीचा धंदा करीत असे. १९१२ मध्यें तो सेनेटचा सभासद झाला व १९१४ मध्यें सेनेटचा अध्यक्ष झाला. १९१६ ते १९१८ पर्यंत तो मॅसॅच्युसेट्स संस्थानचा लेफ्टनंट गव्हर्नर आणि १९१९ व १९२० सालीं गव्हर्नर होता. १९२१ मध्यें तो अमेरिकन सं. संस्थानाचा उपाध्यक्ष झाला आणि १९२३ मध्यें त्या वेळचा अध्यक्ष हार्डिंज मरण पावल्यामुळें कूलीजकडे अध्यक्षपद आलें. १९२४ मध्यें तो अतिशय बहुमतानें अध्यक्ष निवडून आला. तो रिपब्लिकन पक्षाचा सभासद होता. याच्या कारकीर्दींत अमेरिकेची औद्योगिक भरभराट झाली असली तरी मितव्यय आणि जुन्या गोष्टीविषयीं आदर हीं प्रामुख्यानें दिसत होतीं.

**कूलोंब, चार्लस ऑगस्टाइन** (१७३६-१८०६)—एक फ्रेंच पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. त्याची कीर्ति त्यानें विद्युत् व लोहचुंबक या बाबतींत केलेल्या शोधांमुळें झाली आहे. त्यानें पीडनतुला (टॉर्शन बॅलन्स) हा नवा शोध लावला.

**कृक**—(इं. लॅरिंक्स). नरडें. ज्या इंद्रियाच्या द्वारानें ध्वनि उत्पन्न होतो, त्यास कृक असें म्हणतात. हें कंठनालिकेच्या वरच्या भागास असतें. हें दोन कूर्चास्थींचे बनलेलें असतें. त्यांपैकीं एकीस कंठग्रंथि (थायरॉइड) व दुसरीस कृकाटिका (क्रिकॉइड) म्हणतात. या एकावर एक अशा असतात. याच्या

आतल्या बाजूस जी श्लेष्मल अंतस्त्वचा असते तिच्या घड्या असतात. या घड्यांस कंठरज्जू म्हणतात, आणि यांच्या हालचालीपासून ध्वनि उत्पन्न होतो. यांच्या वरच्या बाजूस दिखाऊ अथवा मिथ्या कंठरज्जू असतात. या वरच्या कंठरज्जूंचा ध्वनि उत्पन्न करण्याच्या कामीं मुळींच उपयोग होत नाहीं. खऱ्या कंठरज्जू या मध्यभागीं थोड्या पुढें येऊन त्यामध्यें एक फट पडते. तीस श्वासनलिका (ग्लॅटिस) म्हणतात. निरनिराळ्या स्नायूंच्या संकोचनानें ही फट अरुंद होते व तींतून दाबून हवा बाहेर सोडण्यात येते. त्यामुळें कंठरज्जूंचें कंपन होऊन ध्वनि उत्पन्न होतो. ध्वनि मूळ कृकामध्यें उत्पन्न होतो. परंतु श्वासनलिकेमुळे त्याचें नियमन करून निरनिराळ्या प्रकारचे पांच आवाज काढण्यांत येतात.

**कृकदाह**—(लॅरिंजिटिस). कृक अथवा स्वरस्रोतनलिकेच्या आंतील अंतत्स्वचेचा दाह झाला असतां त्यास कृकदाह असें म्हणतात. या रोगामध्यें प्रथम आवाज घोगरा येऊं लागून कांहीं वेळानें मुळींच बोलतां येत नाहींसें होतें. कोरडा खोकला येऊं लागतो. घशामध्यें अस्वस्थता वाटूं लागते व किंचित् ताप येतो. या रोगाच्या तीव्र अवस्थेनंतर कधीं कधीं सतत अवस्थेमध्यें याचे रूपांतर होते. या रोगाची तीव्र भावना असतांना रोग्यास बिछान्यांत निजवून ठेवून त्यास बोलूं देऊं नये व घशास वाफारा द्यावा. हा रोग बहुधा एका आठवड्यांत बरा होतो.

**कृकसंकोच**—(लॅरिंजिसमस्). हा विकार बहुधा लहान मुलांना शब्देंद्रियाचा संकोच झाल्यामुळें होतो. श्वासोच्छ्वास थोडा वंद होऊन पुन्हां सुरू होतो. त्याबरोबर एक विशिष्ट आवाज होऊं लागतो. कधीं वांति होते किंवा आचके येतात. गार पाण्याचें स्नान, गळ्यावर ऊन पाणी स्पंजानें लावणें किंवा अमोनिया हुंगायला देणें हे यावर उपचार आहेत.

**कृत्तिका**—एक नक्षत्रपुंज. यांत बारीक बारीक सात तारा आहेत. कार्तिकांत या अमावास्येस उगवतात. कृत्तिकांची आकृति देशी वस्तऱ्यासारखी किंवा विंचवासारखी असते. कालांतरानें कांहीं तारांच्या तेजांत फरक पडतो. या विषयींच्या पौराणिक उल्लेखांत कार्तिकस्वामीच्या कथा फार प्रसिद्ध आहेत. सहा कृत्तिका या त्याच्या माता होत म्हणून त्यास षाण्मातुर म्हणतात. सहा मातांपासून त्यास सहा मुखें प्राप्त झालीं. ग्रीक पुराणांत ॲटलासच्या या सात मुली म्हणून सांगितल्या आहेत. मोठ्या दुर्बिणींतून पाहिल्यास या नक्षत्रपुंजांत शेकडों तारे आढळतात.

**कृत्तिवास** (तेरावें शतक)—बंगाली रामायणाचा कर्ता. बंगाली रामायणांपैकीं अत्यंत लोकप्रिय रामायण कृत्तिवासाचें होय. अकराव्या वर्षापासून शाळेंत जाऊन तो संस्कृत व्याकरण व काव्य शिकूं लागला. शिक्षण पुरें झाल्यावर गौडेश्वराकडून मान्यता मिळविण्याकरितां त्यानें संस्कृत पांच श्लोक रचून राजाकडे पाठविले. तुळशीदासाच्या रामायणाची जशी लोकप्रियता उत्तरहिंदुस्थानांत आहे तशी कृत्तिवासाच्या रामायणाची बंगाल्यांत आहे.

**कृत्यसाधकतावाद**—(प्रॅग्मॅटिझम्). ही तत्त्वज्ञानांतील एक उपपत्ति आहे. सत्य ठरविण्याची कसोटी, उपयुक्तता आणि प्रत्यक्ष व्यवहारांत अनुभवाला येणारे परिणाम, ही आहे. तत्त्वज्ञान आणि सामान्य ज्ञान यांचा उपयोग मानवी जीवन, मानवी कार्यें आणि मानवी वर्तन या बाबतींत झाला पाहिजे, आणि मानवी जीवनाला लागणाऱ्या आवश्यक गोष्टींकडे या ज्ञानाचा उपयोग केला पाहिजे. नुसत्या तर्कशास्त्राप्रमाणें बिनचुक असणाऱ्या विचारांना कांहीं एक किंमत नाहीं, आणि तर्कबुद्धीला पटेल तें सत्य, ही सत्याची कसोटी नसून मानवी व्यवहारांत उपयुक्त ठरेल तें सत्य, असें या उपपत्तीचें सार आहे. प्रॅग्मॅटिझम् हा शब्द प्रथम सी. एस्. पेरी यानें १८७८ सालीं उपयोजिला, पण ही उपपत्ति फार जुनी, मनुष्य तत्त्वज्ञानाचा विचार करूं लागला तेव्हां इतकी प्राचीन आहे. आधुनिक तत्त्ववेत्त्यांपैकीं बेकन, हॉब्ज, पास्कल, कोम्ट, फिश्ते व मार्क्स हे या पंथाचे तत्त्ववेत्ते होत. नित्शे याचे विचार कांहीं अंशीं असेच आहेत, आणि बर्गसन हा या पंथाचा अतिशय तर्कशुद्ध पुरस्कर्ता होय. एफ्. सी. एस्. शिलरनें हेंच तत्त्व प्रतिपादिलें, पण त्याला नांव 'ह्यूमॅनिझम्' हें दिलें.

**कृत्रिम गात्रें**—मनुष्यास कृत्रिम गात्रें बसविण्याची पद्धति फार प्राचीन काळापासून प्रचलीत आहे. ख्रि. पू. तिसऱ्या शतकापासून अशीं कृत्रिम गात्रें बसवीत असावेत असें लंडनमधील वैद्यक पाठशाळेमध्यें असें एक गात्र ठेवलेलें आहे त्यावरून वाटतें. हा एक लांकडाचा पाय असून त्यावर काशाचा पत्रा बसविलेला आहे; त्याला लोखंडाचा तळवा असून तो पाय कमरपट्ट्याच्या साहाय्यानें शरीरास जोडण्यांत येत असे. गेल्या ५० वर्षांत कृत्रिम गात्रें करण्याच्या पद्धतींत पुष्कळ सुधारणा झाली आहे. विशेषतः युद्धात ज्याचे हातपाय तुटले आहेत त्यास असे हातपाय पुरविण्यांत येतात. यांचे अनेक प्रकार असतात व त्यांमध्यें चलनवलन करण्याची सोय केलेली असते. गेल्या महायुद्धांत ही विद्या फार पुढें आली व आतां हें एक स्वतंत्र शास्त्रच बनलें आहे.

**कृत्रिम प्रकाश**—सूर्यकिरणाच्या प्रकाशाशिवाय इतर कृत्रिम पद्धतींनी प्रकाश पाडण्याची कला फार प्राचीन काळापासून निरनिराळ्या देशांतील लोकांस माहीत होती. हिंदुस्थान, ईजिप्त, ग्रीस व रोम यांतील लोकांची संस्कृति जरी बऱ्याच

उच्च प्रकारची होती तरी त्यांस शहरांतील रस्त्यांत दिवे लावण्याची आवश्यकता भासली नाहीं. किंवा तशा प्रकारची कांहीं व्यवस्था त्यांनीं केलेली आढळत नाहीं. अर्वाचीन शहरांमध्यें पॅरिस शहरांत प्रथम रस्त्यांत दिवे लावण्याची पद्धति सुरू झालेली आढळून येते. मर्डॉक यानें १८०५ त दगडी कोळशाचा धूर या कामीं उपयोगांत आणून मोठी क्रांति केली व कित्येक वर्षेपर्यंत शहरांतील दिव्यांकरितां दगडी कोळशाच्या गॅसवांचून दुसरें कोणतेंहि जळण वापरण्यांत येत नव्हतें. परंतु विजेचे दिवे निघाल्यापासून यांतहि क्रांति घडून आली व त्यांतहि अलीकडे वायूनें भरलेल्या नळ्यांतील विजेचे दिवे वापरण्याची प्रथा अधिकाधिक वाढत आहे.

**कृत्रिम मत्स्यवृद्धि**—(पिसिकल्चर). कृत्रिम रीतीनें माशांचीं अंडीं उबवून त्यांपासून माशांची उत्पत्ति करणें, तसेंच माशांच्या अळ्या वाढवून त्यांपासून मासे उत्पन्न करणें, निरनिराळ्या हवामानांत जगतील व राहूं शकतील अशा तऱ्हेनें माशांची वाढ व जोपासना करणें; याप्रमाणें माशांच्या कृत्रिम जोपासनेसहि ही संज्ञा देण्यांत येते. कृत्रिम रीतीनें माशांची उत्पत्ति व वाढ करण्याकरितां एका विशिष्ट जागेमध्यें पूर्णपणें वाढलेले व तयार झालेले मासे निवडून ठेवण्यांत येतात. माशांची पूर्ण वाढ झाली आहे किंवा नाहीं हें तज्ज्ञ लोकांस नजरेनें कळून येतें. अशा माशांच्या माद्यांकडून त्यांचीं अंडीं त्यास थोडें दाबून एखाद्या परातीसारख्या भांड्यांत घालण्यास लावण्यांत येतें; या अंड्यांवर नर माशाकडून जननक्रिया करविण्यांत येते व याप्रमाणें माशांची उत्पत्ति करण्यांत येते. ट्राउट व सालमनसारख्या माशांचीं अंडीं चिकट नसतात व जड असतात. याकरितां तीं धुऊन छिद्रयुक्त परातीमध्यें ठेवण्यांत येतात. इतर जातींच्या माशांचीं अंडीं निराळ्या तऱ्हेनें उबवितात. अंड्यांतून जेव्हां अळ्या बाहेर पडतात तेव्हां त्या आपल्या वेष्टनावरच कांहीं काल उपजीविका करतात. दूर पाठवावयाचीं असल्यास याच अवस्थेंत अंडीं दूर पाठविण्यांत येतात. भरतीच्या वेळीं वर येणारे मासे लव्हाळे भरलेल्या अर्धवट उघड्या पेट्यांतून पकडण्यांत येतात व ते निरनिराळ्या ठिकाणीं पाठविण्यांत येतात. डेन्मार्कमध्यें असे धरलेले मासे किनाऱ्याजवळील डबक्यामध्यें जे मासे बाजारांत विकण्यासारखे नसतात त्यांच्यावर पोसण्यांत येतात.

**कृत्रिम रसायनें**—नैसर्गिक कच्च्या मालाचा उपयोग न करतां मूळ द्रव्यापासून तयार केलेलीं रसायनें. अशा प्रकारचीं रसायनें तयार करण्याची मूळ कल्पना चिलीमधील चिली सॉल्ट पीटर(नवसागर-सोडियम नायट्रेट)चा सांठा कमी होऊं लागला अशी लोकांना भीति वाटूं लागली तेव्हां प्रथम सुचली. आतां चिली साल्ट पीटरपासून नत्र (नायट्रिक) अम्ल तयार करण्याऐवजीं नत्र आणि प्राण (ऑक्सिजन) ह्यांचा विजेच्या साहाय्यानें सरळ संयोग घडवून आणून तयार करतात. त्याप्रमाणें अमोनिया आणि त्याचीं लवणें अशाच कृत्रिम पद्धतीनें तयार करतां येऊं लागलीं आहेत. औषधें, रंग, सुगंधी द्रव्यें आणि स्वादिष्ट पदार्थ ह्यांच्या बाबतींत तर ही कृत्रिम पद्धत पुष्कळच पुढें गेली आहे.

**कृत्रिम रेशीम**—हें पूर्णपणें कृत्रिम असून त्याचा रेशमाच्या धाग्यांशीं अर्थाअर्थी कांहींहि संबंध नाहीं. एकोणिसाव्या शतकामध्यें अनेक लोक कृत्रिम रेशीम तयार करीत. त्यांत स्वान यानें हें प्रथम १८८४ मध्यें तयार केलें. परंतु व्यापारी प्रमाणावर कृत्रिम रेशीम बनविण्याची कला प्रथम कॉट हिलेरी ड्रशार्डोनें शोधून काढली. शार्डोने यानें १८८९ मध्यें आपलें कृत्रिम रेशीम प्रथम पॅरिस येथील प्रदर्शनांत मांडलें. त्याकडे अनेक भांडवलवाल्यांचें लक्ष गेलें; परंतु हा धंदा प्रारंभीं फारसा जोरांत चालला नाहीं. पहिल्या महायुद्धानंतर या धंद्यास जोराची चालना मिळाली व १९२६ मध्यें एकंदर एक लक्ष टन कृत्रिम रेशीम तयार करण्यांत आलें. यामध्यें जरी खऱ्या रेशमाची तकाकी नसली तरी तें दिसावयास सुंदर, टिकाऊ व धुण्यासारखें असून स्वस्त असतें.

कृत्रिम रेशमामध्यें मुख्य द्रव्य लांकडाचा भुसा किंवा कापूस यांतील काष्ठतत्त्व (सेल्युलोज) असतें. यावर रासायनिक क्रिया करून (या क्रिया निरनिराळ्या पद्धतींत निरनिराळ्या असतात) त्याचा एक प्रकारचा चिकट द्रव तयार करतात. हा द्रव हवा लागल्यामुळें किंवा कांहीं रासायनिक मिश्रणानें घट्ट बनतो. हा द्रव बारीक छिद्रांच्या फवाऱ्यांतून दाबून उडविला म्हणजे तंतू तयार होतात. हे तंतू कांड्यांवर गुंडाळण्यांत येतात. कृत्रिम रेशीम करण्याच्या मुख्य चार पद्धती आहेत: (१) नायट्रोसेल्युलोज किंवा शार्डोनेपद्धति. ही बेलजममध्यें चालू असून हींत कापसाचें काष्ठतत्त्व वापरतात. (२) विस्कोप्स पद्धति. ही कोर्टोल्ड कंपनी वापरते. यांत लांकडाचा रांधा वापरतात. ही पद्धति गुप्त राखण्यांत आली आहे. (३) कुप्राअमोनियम पद्धति. ही प्रथम जर्मनीमध्यें निघाली. यांत कापसाचें काष्ठतत्त्व वापरतात. (४) ॲसिटेट पद्धति. ही ब्रिटिश सिलानेज कंपनी वापरते. हीहि गुप्त आहे. ही पद्धति बेसल येथील हेनरीक कॅमिले ड्रेफस यांनीं शोधून काढली. विमानांच्या पंखाकरितां सेल्युलोज ॲसिटेट फार उपयुक्त असल्यामुळें ही पद्धति ब्रिटिश सरकारनें गेल्या महायुद्धांत इंग्लंडमध्यें सुरू केली.

या बाबतींत सर्व कारखान्यांतून संशोधन चालू असून नवीन नवीन सुधारणा एकसारख्या चालू आहेत. तथापि हा धंदा

अद्यापि बाल्यावस्थेंतून बाहेर पडला नाही. याची पुढें पुष्कळच भरभराट होण्यासारखी आहे.

**कृत्रिम वान्याचा झोत**— तापका ( बॉयलर ) मध्ये ज्वलन होण्यासाठीं ताज्या हवेचा योग्य पुरवठा व्हावा व धूर निघून जावा, याकरितां हवा जोरानें दाबून सोडण्याची किंवा हवेचा जोराचा प्रवाह सुरू होण्याची योजना केलेली असते. पहिल्या पद्धतींत तापकांत ( बॉयलरमध्यें ) जोराचा दाबलेल्या हवेचा प्रवाह सोडण्यांत येतो व धूर चिमणींतून बाहेर जोरानें पळून जातो. दुसऱ्या पद्धतीमध्यें तापकांत होणारा धूर वाटेंतच एका यंत्राने पंख्याच्या साहाय्यानें खेंचून घेतला जातो, त्यामुळें मागाहून तापकामध्यें हवेचा प्रवाह सुरू होतो. पहिली पद्धत बहुधा जहाजामध्ये वापरण्यांत येते व जमिनीवर दुसऱ्या पद्धतीचा उपयोग करण्यांत येतो किंवा दोन्हीहि पद्धतींची संयुक्त योजना केलेली असते.

**कृत्रिम हिरे**—फ्रेंच शास्त्रज्ञ मॉसॉ यानें कर्ब आणि लोह याच्या मिश्रणाला ४०००° सेंटिग्रेड इतकी उष्णता देऊन सूक्ष्म कणस्वरूपांत प्रथम हिरे तयार केले. आर्मर रीसर्च फाउंडेशन (अमेरिका) या संस्थेच्या संशोधकांनींहि कृत्रिम रत्नें तयार केलीं आहेत. कांही रासायनिक द्रव्यें व ॲल्युमिनमसारख्या धातू यांच्या संयोगानें तीं तयार होतात. अशीं रत्ने फ्रान्स, जर्मनी, झेकोस्लोव्हाकिया या देशांत फार होतात.

**कृप**—गौतम कुलांतील शरद्वान् ऋषीस जुळीं मुलें झालीं. या मुलांचें शंतनु राजानें कृपेंकरून पालन केलें म्हणून कृप—कृपी अशीं नांवें पडली. कृपी द्रोणाचार्यांस दिली होती. कृप हा धनुर्विद्येंत निपुण झाला म्हणून कृपाचार्य या नांवानें प्रसिद्धीस आला. कौरव-पांडवांस द्रोणाचार्यांपूर्वी हाच धनुर्विद्येचें शिक्षण देत असे. भारती युद्धांत हा दुर्योधनाकडे होता व सर्व कौरव मरण पावल्यावर यास पांडवांनी आपल्याजवळ आश्रय दिला होता.

हा चिरंजीवी असून पित्याच्या शरद्वान् या नांवानेंच सावर्णि मन्वंतरांत सप्तर्षींपैकीं एक होणार आहे.

**कृपलानी, जीवनराम भगवानदास** ( १८८६– )—एक हिंदी पुढारी. हे १९१२ सालीं एम्. ए. झाले व १९१२ ते १९१७ पर्यंत ते बिहारमध्यें प्राध्यापक होते. त्यां वेळीं बिहार प्रांतांतील संस्था कलकत्ता विद्यापीठास जोडलेल्या असत. १९१७ मध्यें त्यांनी महात्मा गांधी यांच्याबरोबर चंपारण्य येथील सत्याग्रहांत भाग घेतला. तेथून ते त्यांच्यांबरोबर गुजरातमध्यें खेडा जिल्ह्यांत गेले. १९१८ मध्यें त्यांनीं पंडित मदनमोहन मालवीय यांच्या खासगी चिटणिसाचें काम केलें. १९१९ मध्ये ते बनारस हिंदु युनिव्हर्सिटीमध्ये राजनीति या विषयाचे प्राध्यापक होते. लवकरच त्यांनी बनारस युनिव्हर्सिटी सोडली व बनारस येथें गांधी आश्रम काढला. तोहि सोडून देऊन त्यांनीं १९२० मध्यें खेड्यांतून खादीचा प्रचार व ग्रामोद्धार करण्याचे कार्य चालविलें. १९२५ ते १९२७ पर्यंत हे गुजरात विद्यापीठांत आचार्य म्हणून होते. हे संयुक्त प्रांत, दिल्ली व हिंदी मध्यप्रांत यांतील गांधी आश्रम, खादी व ग्रामोद्धार या कार्यांचे चालक होते, त्याप्रमाणेच ते राष्ट्रीय सभेचे कार्यकर्ते, मुख्य चिटणीस व नंतर अध्यक्ष झाले. पण काँग्रेस आणि मंत्रिमंडळ यांमधील सहकार्याच्या बाबतींत मतभेद होऊन त्यांनी अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. हे उत्कृष्ट लेखक व वक्ते आहेत. 'दि गांधियन वे' ( गांधीमार्ग ), 'दि नॉन-व्हायोलेंट रेव्होल्युशन' ( अनत्याचारी क्रांति ), 'दि पॉलिटिक्स ऑफ चरखा' ( चरख्याची राजनीति ) इत्यादि त्यांचे ग्रंथ आहेत.

**कृपा**—( खिस्ती ग्रेस ). कृपा ही एक परमेश्वराची मनुष्यास त्याचें अन्तिम साध्य व्हावें, म्हणजे त्यानें परमेश्वराशीं धन्य स्वरूपांत ऐक्य पावावें याकरितां देण्यांत आलेली आंतरिक देणगी आहे. *हिचे दोन प्रकार असतात : ( १ ) कृपेच्या योगानें परमे*श्वराच्या आज्ञा पालन करणें व स्वर्गप्राप्ति करून घेणें. या कामीं मनुष्याची बुद्धि सतेज होते (त्याच्या बुद्धीवर प्रकाश पडतो) आणि त्यास साहाय्य मिळतें. ( २ ) बाप्तिस्म्यामध्यें पावित्र्यकारक कृपा प्राप्त होते आणि तीमुळें आत्म्यास, जीवनास नवीन अलौकिक अवस्था प्राप्त होते. मनुष्यास स्वाभाविकतः सामान्य मानवी जीवनाच्या पातळीवर असलेलें जीवन प्राप्त झालेलें असते ; परंतु परमेश्वरी कृपेनें त्यास दैवी पातळीवर असलेलें नवीन जीवन व चैतन्य प्राप्त होतें. तिच्या द्वारा मनुष्य अंतीं परमेश्वराशीं ऐक्य पावतो. परमेश्वराची कृपा ही मानवाच्या स्वभावधर्मानुसार मिळत नसते तर ती एक परमेश्वराची देणगी आहे. आपल्या दैनंदिन प्रार्थनेमध्यें वरच्यावर परमेश्वराची कृपा भाकणें अवश्य असतें.

**कृपाराम**—१. एक प्राचीन गणितज्ञ. बीजगणित, मकरंद, यंत्रचिंतामणि या ग्रंथांवर याच्या टीका आहेत. 'वास्तुचंद्रिका' या नांवाचा याचा एक स्वतंत्र ग्रंथ आहे. हा कृपाराम शके १४२० च्या सुमाराचा असावा.

२. लाला कृपाराम हा हिंदुस्थानी कायस्थ ब्राह्मण जयपुरकर सवाई जयसिंगाच्या पदरीं हुशार मुत्सद्दी म्हणून नांवाजलेला होता. याला जयपुरास मराठ्यांतर्फे वकिलीच्या कामगिरीवर नेमलें. याचा मुलगा ( तुळजाराम ), नातू ( सेवकराम ) व पणतू ( चिमणलाल व गुलाबराय ) हेहि अखेरपर्यंत मराठ्यांचे वकील म्हणून निरनिराळ्या दरबारीं काम करीत होते.

**कृमि**—हा शब्द लांबट सरपटत जाणाऱ्या अनेक प्रकारच्या जंतूंस लावण्यांत येतो. यांना पाय मुळींच नसतात. किंवा कांहीं

जातींस फार आंखूड असतात. यांचे अनेक प्रकार आहेत. त्यांमध्यें गांडूळ, अनेक प्रकारच्या किडी, जंत, नारू, वगैरे येतात. वैद्यकामध्यें हा शब्द परोपजीवी प्राण्यांस लावण्यांत येतो. हे बहुतकरून आंतड्यांत असतात; तसेंच या प्राण्यांपासून होणाऱ्या रोगासहि हाच शब्द लावण्यांत येतो. यांपैकीं जंत हे सर्वांच्या परिचयाचे आहेतच. कृमिवर्गाचे शरीररचनेप्रमाणें दोन मुख्य भाग पडतात: अखंड ( अन् सेगमेंटेड ) व वलयान्वित ( सेगमेंटेड ). पहिल्यांत चापट, गोल, सुतळीसारखे कृमी येतात व दुसऱ्यांत जळू, गांडूळ, वगैरे येतात.

ऋग्वेदोत्तर संहिता आणि अथर्ववेद यांत कृमिकीटकांचा बराच उल्लेख आला आहे. ते विषारी असतात; पर्वत, वनें, पाणी, झाडें यांत व मनुष्यदेहांत देखील ते असतात. मनुष्य आणि प्राणी यांचीं रोगाचीं कारणें हे कृमी होत अशी सार्वत्रिक समजूत असे. अथर्ववेदांत या कृमींना प्रतिबंधक उपाय म्हणून तीन सूक्तें आहेत. पहिलें सूक्त सर्वसाधारण आहे. दुसरें गुरांमधील कृमींचा नाश करण्याचे उपाय शिकवितें, आणि तिसरें मुलांना कीटकांपासून कसें बरें करावें हें सांगतें. मनुष्यामध्यें कीटकांची राहण्याची जागा म्हणजे डोकें आणि बरगड्या आणि नंतर तेथून डोळे, नाक आणि दांत. त्यांचा रंग काळसर पिंगट असून शरीराचा पुढचा भाग पांढरा, काळे कान आणि तीन डोकीं असतात. त्यांचीं विशिष्ट नांवें बरींच आहेत; उदा०, अलाडु, एजत्क, कषृकर्ष, कीट, कुरूरु, नीलांगु, येवाष वघा, वक्षसर्पी, शलुन, शवर्त, शिपविनुक व स्तेग.

**कृमिकुठार**—एक आयुर्वेदीय औषध. यांतील मुख्य औषधें— वावडिंग, हिंगूळ, बचनाग, इंद्रजव व नागकेशर; वावडिंगाच्या काढ्याची भावना देतात. पोट दुखणें, बारीक ज्वर, तोंडाला पाणी सुटणें, नाकाला व गुदद्वाराला खाज येणें, अंगावर गांधी उठणें, इत्यादि जंतांच्या लक्षणांवर या औषधाचा चांगला उपयोग होतो. जंतामुळें अनेक तऱ्हेचीं लक्षणें होतात व त्यामुळें चुकीचें निदान केलें जातें. लहान मुलांना त्यामुळें आंचके येतात, शौचाला पांढरें होतें, जुलाब होतात, पोट फुगतें. अशा वेळीं या औषधाचा उपयोग चांगला होतो. १ ते २ गुंजा वावडिंगाच्या काढ्याबरोबर देतात.

**कृष्ण**—पुराणकालांतील एक थोर विभूति व सर्व हिंदु देवतांमध्यें अतिशय लोकप्रिय देवता. कृष्ण हा विष्णूचा आठवा अवतार असें समजतात. हा धर्मवीर पुरुष बहुधा महाभारतकालीं होऊन गेला असावा. ऋग्वेदांत कृष्ण नांवाचा एक सूक्तकर्ता ऋषि येतो. देवकीपुत्र कृष्ण याचें नांव प्रथम छांदोग्य उपनिषदांत आलें आहे व त्याचा पौराणिक कृष्णाशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न बरेच पंडित करितात. महाभारतांत त्याचा प्रामुख्यानें उल्लेख केलेला आढळतो. सर्व जनसमूहाला अत्यंत प्रिय वाटणाऱ्या अशा श्रीकृष्णाच्या बाल्यावस्थेंतील लीला भागवत पुराणांत सविस्तर वर्णिल्या आहेत. वसुदेव-देवकीचा हा आठवा पुत्र. देवकीचा आठवा गर्भ तुझा नाश करील असें नारदानें कंसास आधींच सांगितलें होतें. कंसाच्या भयानें यशोदेकडे पोंचवलेला कृष्ण गोकुळांत वाढत होता. कृष्णाच्या नाशार्थ पाठविलेले अरिष्ट, केशिन्, आदिकरून राक्षस कृष्णानें मारिले. अखेरीस कृष्णानें कंसाला सिंहासनावरून ओढून ठार मारिलें व उग्रसेनास त्याच्या गादीवर बसविलें. एकदां इंद्रानें गोकुळावर प्रचंड वृष्टि केली असतां कृष्णानें आपल्या करंगुळीवर गोवर्धन पर्वत सात दिवस उचलून धरला व सर्व गोकुळाचें रक्षण केलें. या पराक्रमाबद्दल त्यास 'गोवर्धनधारी' असें नांव मिळालेलें पुराणांतून आढळतें. त्यानें गंधाराधिपतीच्या मुलीचें ( रुक्मिणीचें ) स्वयंवराच्या वेळीं हरण केलें. जरासंध व शिशुपाल यांचा त्यानेंच अंत केला. अंग, वंग, आदिकरून असंख्य टोळ्यांना त्यानें जिंकून आपल्या ताब्यांत आणलें. पाताळामध्यें जाऊन त्यानें पंचजन्याचा वध केला व पांचजन्य नामक अद्भुत शंख मिळविला. खांडव वनामध्यें अर्जुनासह त्यानें अग्नीची आराधना करून त्याजकडून सुदर्शन चक्र मिळविलें. गरुडावर आरूढ होऊन अमरावती नामक इंद्राच्या राजधानीवर त्यानें चाल केली व तेथून पारिजातक वृक्ष बरोबर आणिला. पांडव युद्धांत विजयी झाल्यावर त्यांच्यासह तो हस्तिनापुरास गेला व पांडवांनीं केलेल्या अश्वमेध यज्ञास जातीनें हजर राहिला. हा यज्ञ झाल्यावर कृष्ण द्वारकेस राहिला. पुढें यादवांनीं आपसांत कलह करून व दारूनें धुंद होऊन एकमेकांस ठार मारलें. त्यामुळें बलराम व कृष्ण अरण्यांत गेले. तेथें जरास नामक व्याधानें मृग समजून चुकीनें कृष्णावर बाण सोडला, व त्या बाणानेंच कृष्णाचा अंत झाला. नंतर थोड्याच दिवसांनीं समुद्रानें द्वारका नगर आपल्या उदरांत घेतलें.

भारतीय युद्धांत यानें सांगितलेली गीता आज अत्युत्कृष्ट तत्त्वज्ञान म्हणून जगद्वंद्य आहे. कृष्णभक्ति हिंदुस्थानांत बऱ्याच ठिकाणीं आहे. कृष्णचरित्रावर अनेक कथापुराणें, काव्यें व नाटकें झालीं आहेत. कृष्णलीलांनीं रंगून गेलेले असंख्य कवी, लेखक व श्रोते सांपडतील. लहान-थोर, अज्ञ-सुज्ञ, स्त्री-पुरुष या सर्वांना कृष्णाविषयीं प्रेम वाटावें अशी त्याची लीलाकृति आहे.

**कृष्ण** ( सन १६५३ )—शिवाजीच्या वेळचा हा एक ब्राह्मण ज्योतिषी असून शिवाजीच्या सांगण्यावरून यानें शके १५७५ मध्यें 'करणकौस्तुभ' नांवाचा एक करणग्रंथ लिहिला. हा ग्रंथ विशेष प्रचारांत आला नाहीं. याशिवाय 'तंत्ररत्न' नांवाचा दुसरा एक मोठा ग्रंथहि यानें लिहिला. 'करणकौस्तुभ' या ग्रंथांतील

वर्णनावरून असें दिसतें कीं, कृष्ण हा मावळांत राहणारा असावा.

**कृष्णकमळ**—(इं. पॅशन फ्लॉवर.) [वर्ग–पॅसे फ्लोरासी–पॅसि फ्लोरि] ही एक वेलांची मोठी जात आहे. या वेली तंतूंच्या साहाय्यानें वर चढतात. यांस फार सुंदर फुलें येतात. व त्यांमागून बहुधा नारिंगी रंगाचीं फळें येतात. पाणालिंबू हें याच जातीपैकीं एका जातीचें फळ आहे (पॅसिफ्लोरालॅरिफोलिया). तसेंच गोड कॅलॅबॅश नांवाचीं दुध्या भोपळ्यासारखीं फळें याच जातीपैकीं दुसऱ्या एका जातीच्या झाडापासून मिळतात (पी. मॅलिफॉर्मिस).

**कृष्ण काकतीय** (१३१४-७०)— मुसलमानांना विरोध करणारा दक्षिणेंतील एक राजा. कृष्ण नाईक व वीरभद्र या नांवांनींहि हा प्रसिद्ध आहे. हा वारंगळजवळ राहणारा असून प्रतापरुद्र काकतीयाचा मुलगा. सन १३३९-४० मध्यें महंमद तुघलखनें वारंगळच्या राजाशीं लढाई देऊन तैलंगणावर स्वारी करण्याचा बेत केला. त्या वेळीं यानें कर्नाटकाचा राजा बल्लाळदेव व इतर राजे यांच्या मदतीनें मुसलमानांना धुडकावून लावलें. परंतु त्याचा हा विजय फार काळ टिकला नाहीं. दिल्लीचा बादशहा मुहंमदशहा यानें परत स्वारी करून तैलंगणावर आपली सत्ता प्रस्थापित केली.

**कृष्णगर**—बंगाल, नदिया जिल्ह्याचा पोटविभाग. क्षे. फ. ७०१ चौ. मै.. कृष्णगर हें जिल्ह्याचें व पोटविभागाचें मुख्य ठिकाण व नवद्वीप हीं दोन मोठीं गावें व ७४० खेडीं आहेत. कृष्णगर जलंगी नदीच्या तीरावर आहे. लो. सं. सु. तीस हजार. येथें नदियाचे राजे राहतात. मातीच्या रंगीत चित्रांकरितां हें शहर प्रसिद्ध आहे. येथें एक कॉलेज, ३-४ हायस्कुलें, ख्रिस्ती प्रार्थना-मंदिरें, झनाना मिशननें चालवलेले दोन दवाखाने व एक इस्पितळ आहे. याच्या उत्तरेस इतिहासप्रसिद्ध प्लासीची रणभूमि आहे.

**कृष्णदयार्णव** (शके १५९६-१६६२)—हा मराठी संतकवि माध्यंदिनशाखी देशस्थ ब्राह्मण सातारा जिल्ह्यांत कऱ्हाडनजीक कोपरडे येथील राहणारा. मूळ नांव नरहरि नारायण. औरंगजेबाच्या स्वारीमुळें मूळ गांव सोडून जोगाईचे आंब्यास येऊन राहिला व तेथे आनंदसंप्रदायी गोविंदाकडून उपदेश घेतला; व तीर्थयात्रा केल्या. भागवताच्या दशमस्कंधावर यानें प्राकृत टीका लिहिली. तिची ओंवी संख्या ४२ हजार आहे. या प्रचंड ग्रंथास सोळा वर्षे लागलीं. विद्वत्ता, बहुश्रुतपणा व काव्य या तिन्ही दृष्टींनीं हा ग्रंथ चांगला वठला आहे. याशिवाय 'तन्मयानंद' या नांवाचा आणखी एक ग्रंथ, व बरेचसे अभंग आणि पदें इतकी कृति या कवीची सध्यां उपलब्ध आहे.

**कृष्णदास मुद्गल**— हा मराठी कवि पैठणचा रहिवासी असून याच्या बापाचे नांव नरसिंह व आईचे नांव मुद्गल होतें; याच्या गुरूचें नांव कृष्ण होतें. यानें वाल्मीकि रामायणांतील फक्त युद्धकांडावर टीका लिहिली आहे. 'माझी देशभाषा मराठी आहे' असें मोठ्या अभिमानानें सांगून यानें मराठी भाषेची प्रौढी गायली आहे. मराठी साम्राज्यात या रामायणाचें पारायण तत्कालीन शूर व मुत्सद्दी करीत असत.

**कृष्णदेव यादव** (सन ११४७-६०)—यादव घराण्यांतील जैत्रपाल उर्फ जैतुगी याचा हा मुलगा मोठा पराक्रमी असून मालवा व कोंकण प्रांतांत याचा दरारा असे. लक्ष्मीदेव व जल्हण या आपल्या कुशल मंत्र्यांच्या साहाय्यानें यानें गुजराथेवर स्वाऱ्या केल्या. हा कन्ह, कन्हार व कंधार या नांवांनींहि ओळखला जातो.

**कृष्णदेवराय तुळुव** (सन १५०९-१५२९)— विजयनगरचा हा कर्तृत्ववान् राजा तुळुव घराण्यांतील नरसिंह व नागलाई यांचा पुत्र. हा महापराक्रमी, राजकारणी, मनानें उदार व दिलदार असून आपल्या अलौकिक गुणांनी लोकप्रिय झाला. याच्या आधिपत्याखालीं बहुतेक सारें दक्षिण हिंदुस्थान होतें. रायचूरच्या किल्ल्याबद्दल आदिलशहाशीं रायचूरजवळ याने लढाई देऊन मुसलमानांवर आपला वचक बसवला. पाटबंधारे व कालवे यांसारखीं लोकहितांचीं कामें यानें केलीं. तुळुव घराण्यांतील सर्वांत मोठा असा हा राजा होऊन गेला.

**कृष्णद्वैपायन**—पराशर ऋषीचा पुत्र. यास द्वैपायन असेंहि दुसरें नांव आढळतें. बदरीवनांत तप केल्यामुळें बादरायण असेंहि यास म्हणत असत. यालाच वेदव्यास म्हणतात. यानें पुराणें व महाभारत नांवाचा इतिहास रचला.

यास वेदपरंपरा चालविणारे पैलादिक चार शिष्य असून पुराणपरंपरा चालविणारा रोमहर्ष नांवाचाहि एक शिष्य होता. याने छिन्न झालेला शंतनूचा वंश वृद्धिंगत केला. हा कल्पपर्यंत चिरंजीव असून पुढें सावर्णीच्या मन्वंतरांत बादरायण नांवानें सप्त ऋषींतील एक ऋषि होणार आहे.

**कृष्णमिश्र**— हा संस्कृत नाटककार अकराव्या शतकाच्या उत्तरार्धांतील असावा असे दिसतें. यानें इ. सन सुमारें १०५० ते ११६ या कालांत जेजाकभुक्तीच्या चंदेलवंशांतील कीर्तिवर्मन् राजाकरितां 'प्रबोधचंद्र' नांवाचें एक उपदेशपर नाटक लिहिले. या नाटकांत कृष्णमिश्रानें शंकराचार्यांच्या अद्वैत मताचें श्रेष्ठत्व प्रतिपादन केलें असून तत्कालीन जैन, बौद्ध, कापालिक, वगैरेंचीं वर्णनेंहि यांत आढळून येतात. या नाटकाचा प्रयोग कीर्तिवर्मन् राजापुढें करण्यांत आला.

**कृष्णमुनि किंवा कृष्णडिंभ विराट** ( १७ व्या शतकाचा प्रारंभ )—एक महानुभावी कवि. उपाध्य आम्नायांतील मयंक राजाचा हा शिष्य होता. यानें श्लोकबद्ध असा 'नवखंड रुक्मिणीस्वयंवर' नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. त्याचीं नऊ खंडें असून अगदीं अपरिचित अशा अनेक वृत्तांचीं योजना त्यांत दिसून येते. याशिवाय ऋद्धिपुरमाहात्म्य, कृष्णजन्माष्टमी, फलटणमाहात्म्य, भगवद्गीतामाहात्म्य, इत्यादि ओंवीबद्ध प्रकरणें, साधनामृत स्तोत्र, तीर्थमालिका, इत्यादि श्लोकबद्ध रचना व इतर कांहीं पदें व धांवे असें याचें लिखाण आहे.

**कृष्णमूत्रज्वर**—हा हिंवतापाशीं साम्य असलेला उष्ण-कटिबंध-प्रदेशांतील ज्वर आहे. फार थंडी वाजून ताप अंगांत वरचेवर भरतो. वरचेवर पित्तमय वांति होते. काळ्या लालसर रंगाची लघ्वी होते, त्यावरून हें नांव या ज्वराला पडलें आहे. लघ्वी साफ होण्याचीं औषधें रोग्यास द्यावीं. रक्तामध्यें हिंव-तापाचे कीटक असतील तर थोड्या प्रमाणांत कोयनेल द्यावें.

**कृष्णमूर्ति, जे.** ( १८९५- )— एक हिंदी तत्त्वज्ञानी. थिऑसफिकल सोसायटीच्या कार्यासाठीं ॲनी बेझंटबाईनीं यांना लहानपणापासून जवळ बाळगलें व उच्च प्रकारचें शिक्षण दिलें. ज्या जगद्गुरूच्या आगमनासाठीं सोसायटी वाट पाहत होती तो हाच जगद्गुरु अशी समजूत बरींच वर्षें पंथीयांमध्यें होती. 'ऑर्डर ऑफ स्टार इन् दि ईस्ट' ही संस्था बाईनीं कृष्णमूर्तींसाठींच काढली. कृष्णमूर्ति विलायतेंत उच्च शिक्षण घेऊन तत्त्वज्ञानपर व्याख्यानें देऊं लागले खरे, पण आपण जगद्गुरु आहों ही लोकांमध्यें असलेली भावना त्यांनीं काढून टाकण्याचा प्रयत्न केला. इतकेंच नव्हे तर आपली इस्टेट, घरदार व 'स्टार' संप्रदायहि त्यांनीं नाहींसा केला. त्यांचीं प्रवचनें व्यक्त्युद्धारावर भर देणारीं असतात. गुरुबाजीचा त्यांनीं निषेध केला आहे व स्वप्रयत्नानें, स्वतंत्र बुद्धीनें प्रत्येकानें आपली उन्नति करून घ्यावी ही शिकवण ते देत असतात. यांचे दहाबारा ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**कृष्ण याज्ञवल्कि** ( सु. १५४८-१६१३ )—एक मराठी संत कवि. यानें 'कथाकल्पतरु' नांवाचा एक मोठा थोरला पौराणिक ग्रंथ रचला. याचा काळ शके १५०० च्या सुमाराचा होता. ग्रंथांत अनेक पौराणिक कथा असून त्यांत व प्रचलित कथांत बराच फरक आढळतो. कथांशिवाय भूगोल, खगोल, चारी वर्ण, सर्व जातींची उत्पत्ति वगैरे इतर विषयहि त्यांत आहेत. भाषा सरळ व साधी आहे. कथाकल्पतरूखेरीज रुक्मांगदाख्यान व देवीमाहात्म्य हे त्याचे ग्रंथ आहेत.

**कृष्णराज वोडेयर** (१७९९-१८६८)—१. म्हैसूर संस्थान-चा एक राजा. हा तीन वर्षांचा असतांनाच गादीवर आला. याच्यापूर्वी म्हैसूर प्रांत टिपू सुलतानाच्या ताब्यांत होता. इंग्रज, मराठे व निजाम यांनीं टिपूस जिंकून त्यापासून म्हैसूर प्रांत घेतला. म्हैसूरचा बराचसा भाग इंग्रज व निजाम यांनीं आपा-पसांत वांटून घेतला व उरलेल्या भागावर म्हैसूरच्या हिंदु राजाचा वंशज कृष्णराज वोडेयर यास बसवलें. कृष्णराज हा अल्पवयीन असल्यानें त्याचा कारभार पाहण्यास इंग्रजांनीं टिपूचा मंत्री पूर्णय्या यास नेमलें. कृष्णराज सज्ञान झाल्यावर त्यानें आपल्या राज्याची व्यवस्था उत्तम प्रकारें ठेवली. यास संतति नसल्यानें यानें चामराजेंद्र नांवाच्या मुलास दत्तक घेतलें. यानें कानडी वाङ्मयांत पुष्कळ भर घातली आहे. याच्या नांवा-वर पन्नासांवर ग्रंथ आहेत.

२. ( राज्य. १८८४-१९४० ). मागचे म्हैसूरचे महाराज. हे १८८४ सालीं गादीवर आले तेव्हां अल्पवयीन होते. १९०२ सालीं यांना राज्याधिकार मिळाल्यापासून यांनीं संस्थानात विविध प्रकारच्या सुधारणा केल्या. यांचे दिवाण विश्वेश्वरअय्या यांनीं महाराजांच्या संमतीनें अनेक योजना पार पाडल्या. हे फार धार्मिक व साधुवृत्तीचे असत. यांना मूलबाळ नसल्यानें यांचा पुतण्या (सध्यांचे जयचामराजेंद्र) यांच्यामागून गादीवर बसला.

**कृष्णराव नारायणराव जोशी**—मराठ्यांचा एक पर-राष्ट्रीय वकील. हा उत्तर पेशवाईत अनेक कामांवर होता. नंतर सातारकर छत्रपतींच्या पदरीं होता. नानानें हैदरशीं तह करून इंग्रजांविरुद्ध कारस्थान करावयाचें ठरवलें, त्या वेळीं हैदराच्या सांगण्यावरून कृष्णराव जोशी यास मराठ्यांचा एक प्रतिष्ठित वकील म्हणून पुण्याहून हैदराच्या दरबारीं पाठवण्यांत आलें. यानंतर यानें बारभाईंच्या मसलतींत राहून दादांच्याविरुद्ध साबाजी भोसले व निजामअली यांस बारभाईंच्या बाजूस ठेवण्याची कामगिरी बजावली. सन १७८१ मध्यें हा परत हैदरकडे गेला. याचीं पत्रें म. इ. सा., १९ वा खंड, यांत प्रसिद्ध झालीं आहेत.

**कृष्णराव बल्लाळ काळे** ( मृ. १७८६ )—मराठ्यांचा एक परराष्ट्रीय वकील. हा नाना फडणीस याच्या विश्वासांतला असून निजामाकडे पेशवे यांच्यातर्फे वकील होता. हा मूळचा काशीचा; दक्षिणेंत येऊन बापूजी नाईक बारामतीकर याच्या वशिल्यानें नानासाहेब पेशवे यांच्या वेळीं यानें दरबारांत नोकरी धरली. पेशव्यांनीं जातइनाम व सरंजाम ( फौज ) इनाम मिळून तीस हजारांची नेमणूक केली. याचा मुलगा गोविंदराव हाहि स्वामिनिष्ठ वकील होता. टिपूविरुद्ध कारस्थानांत गोविंद-रावाचा बराच हात होता.

**कृष्णराव भगवंत खटावकर** ( मृ. १७१३ )— एक शिवकालीन ब्राह्मण वीर. हा माध्वमतानुयायी होता. मुळापासून

चंडखोर असून मराठी साम्राज्यांत धुमाकूळ घालणारा म्हणून प्रसिद्ध होता. दिल्लीच्या बादशहानें कृष्णरावास खटावची ठाणेदारी दिली. कृष्णराव फार शूर व विद्वान् होता; न्याय व व्याकरण या शास्त्रांत पारंगत होता. यानें खटाव येथील कोटांतील मशीद पाडून दत्तमंदिर बांधलें. त्या मंदिरांत त्याची पुस्तकशाळा होती. नवीन ग्रंथ उतरून घेण्यासाठीं त्यानें १२ लेखक पदरीं बाळगले होते. तो धार्मिक असून व्यंकोबाच्या गिरीवर त्यानें अनुष्ठान केलें. त्याचें कुलदैवत खंडोबा. जेजुरीच्या खंडोबाचें मुख्य देऊळ त्यानें बांधलें असून भोंवतालचा प्राकार होळकर वगैरेंनी बांधला. चंपाषष्ठीच्या दिवशीं पहिला नैवेद्य यांच्याकडचा असतो. संभाजीच्या वधानंतर हा मोंगलास मिळाला व मराठी साम्राज्यांत लुटालूट करूं लागला. मोंगलांनीं याला राजा हा किताब दिला व खटाव परगणा जहागीर दिला. शाहूनें त्याच्यावर सैन्य धाडलें, त्या वेळच्या लढाईत कृष्णराव व त्याचा वडील पुत्र हे दोघे पडले. दुसरा पुत्र शरण आला. त्यास शाहूनें त्याचें वतन परत दिलें.

**कृष्णराव माधवराव चिटणीस** (१७८०–१८०३)—नागपूरकर भोंसल्यांचा एक चिटणीस. चिमणाजी रखमांगद चिटणीस हा याचा मामा. चिमणाजीस पुत्र नसल्यानें त्यानें आपला भाचा कृष्णराव याचें पुत्रवत् पालन केलें व आपल्यामागें त्यास चिटणिशी मिळण्याची व्यवस्था केली. त्याप्रमाणें सन १७८० त दु. रघूजीच्या कारकीर्दींत चिमणाजीच्या पश्चात् कृष्णराव चिटणीस झाला. रघूजीनें कृष्णरावाची हुशारी पाहून त्यास आपला दिवाण श्रीधर लक्ष्मण उर्फ बापू मुनशी याचा मदतनीस म्हणून नेमलें, व त्याच्याकडे अंतर्गत कारभार सोंपवला. वऱ्हाडांत कुऱ्हा येथें हा मरण पावला. नागपूरचे प्रसिद्ध चिटणीस हे याचेच वंशज होत.

**कृष्ण राष्ट्रकूट** (७११–७२)—मालखेडच्या राष्ट्रकूट वंशांतील पहिल्या कर्काचा हा मुलगा. कर्कास याच्याखेरीज इंद्र, ध्रुव, नन्नराज असे तीन मुलगे होते. कर्काच्या पश्चात् इंद्र हा मालखेडच्या गादीवर आला. परंतु थोड्याच दिवसांत तो वारल्यानें त्याच्या गादीवर त्याचा मुलगा दंतिदुर्ग हा आला. हा दंतिदुर्गहि अनपेक्षितरीत्या मरण पावला व त्याच्यानंतर वयाच्या ४५ व्या वर्षी कृष्ण यास मालखेडची गादी मिळाली. दंतिदुर्गाप्रमाणेंच यानें चालुक्यांचा मोड करण्याचें धोरण ठेवलें. त्यासाठीं गोविंदराज नामक आपल्या मुलास यानें वेंगी येथील विष्णुवर्धन चालुक्यांवर पाठवून त्या राज्याचा बराचसा भाग बळकावला. तसेंच मन्न येथील श्रीपुरुष या वृद्ध गंग राजावर स्वारी करून यानें त्याचा पूर्ण पाडाव केला. तसेंच कोंकणच्या शिलाहार राजास यानें आपलें मांडलिकत्व कबूल करण्यास भाग पाडलें. एकंदरींत कृष्ण हा एक कर्तबगार राजा होऊन गेला. १८ वर्षांच्या आपल्या कारकीर्दींत यानें आपला राज्यविस्तार पूर्वींच्या तिप्पट केला. यानें वेरूळचें कैलास लेणें कोरविलें.

**कृष्णा जिल्हा**—मद्रास इलाख्याच्या ईशान्य भागांत आहे. क्षे. फ. ५,९०७ चौ. मैल. कृष्णा नदी या जिल्ह्यांतून वाहते, त्यावरून हें नांव या जिल्ह्याला पडलें आहे. पश्चिमेकडील भाग डोंगराळ असून उत्तरेकडील भाग व मध्यभाग सपाट सुपीक आहे. मुख्य पीक भात. पाऊस सरासरी ३० इंच पडतो, पण मच्छलीपट्टण, तेनाली, वगैरे भागांत पुष्कळ पडतो. जंबूर दगडांची समृद्धि असून अभ्रक, स्फटिक, हरायित, स्लेटीचे दगड, कुरुंदाचे दगड, खडूचे दगड, इत्यादि दगडांचे थर आहेत. हिंस्र पशू फारसे नाहींत. रानडुकरें, निरनिराळ्या प्रकारचे पक्षी पुष्कळ असून माशांची विपुलता आहे. प्रथम बौद्धधर्मी आंध्रांचें येथें राज्य होतें. त्या वेळचीं लेणीं बेझवाडा व उदवल्ली येथें असून बौद्ध भिक्षु राहण्याच्या गुहा अनेक ठिकाणीं आहेत. नंतर चालुक्य, चोल, विजयानगर, वगैरे राजांची सत्ता येथें होऊन अखेर मोंगली अमल येथें होता. १७५२ सालीं निजामानें हा मुलूख फ्रेंचांना दिला, व फ्रेंचांकडून इंग्लिशांच्या ताब्यांत आला. येथें १३ मोठीं शहरें व १७०२ खेडीं व १३ तालुके आहेत. लो. सं. १४,४४,२९४. (१९४१). कोल्लर येथें हिऱ्यांची खाण असून याच खाणींत ९०० कॅरेटचा एक हिरा सांपडला, व तोच 'कोहीनूर हिरा' असें कोणी म्हणतात.

**कृष्णा नदी**—दक्षिण हिंदुस्थानांतील ही एक मोठी नदी सह्याद्रि पर्वतांत महाबळेश्वराजवळ उगम पावून सातारा, सांगली, कुरुंदवाड, बेळगांव, विजापूर, निजामची हद्द व अखेर गंतूर व कृष्णा या जिल्ह्यांतून वाहत जाऊन बंगालच्या उपसागरास मिळते. तिची लांबी ८०० मैल आहे. हिला वेण्णा, कोयना, वारणा, पंचगंगा, घटप्रभा–मलप्रभा, भीमा, तुंगभद्रा, मूसी, वगैरे नद्या मिळतात. बेझवाडा जिल्ह्यांत हिला एक प्रचंड धरण बांधून अनेक कालवे काढले आहेत. हिंदुस्थानांतील अनेक पवित्र नद्यांत कृष्णा नदी प्रसिद्ध असून तिच्या कांठच्या तीर्थांचें वर्णन करणारें कृष्णामाहात्म्य पुराण, कृष्णामाहात्म्य वर्णन, वगैरे ग्रंथ आहेत. कन्या राशीस गुरु आला असतां कृष्णा नदीस भागीरथी भेटावयास येते, अशी समजूत असून भागीरथीतीरीं करावयाचे क्षौरश्राद्धादि विधी कृष्णातीरीं करावयाची वहिवाट आहे.

**कृष्णाकुमारी** (१८००–१८१६)—ही मेवाडचा राणा भीमसिंह याची मुलगी अप्रतिम सुंदर असल्यामुळें हिला 'राजस्थानचें फूल' म्हणत. ही १६ वर्षांची झाली, त्या सुमारास

तिच्या प्राप्तीसाठीं जयपूरकर जगत्सिंग व मारवाडचा मानसिंग यांच्यांत चुरस लागली. शिंद्यांनीं व होळकरांनीं मानसिंगाचा पक्ष घेऊन अमीरखान पठाणास उदेपुरीं पाठवलें. अमीरानें भीमसिंहास सांगितलें कीं, कृष्णेला मानसिंगास द्या, नाहीं तर ठार मारा. भीमसिंह दुर्बळ होता, त्यानें कृष्णेला ठार मारण्याकरितां विषाचा पेला पिण्यास दिला; तो ती शांतपणें प्याली, पण वांति होऊन विष बाहेर पडलें; असें दोन वेळां झालें. तिसऱ्या वेळीं अत्यंत जलाल कुसुंब्याचा रस (अफूचा अर्क) दिला, तो ती प्याली व निजली, ती कायमचीच. तिच्या पश्चात् तिची आई अन्नत्याग करून थोड्याच दिवसांत मेली. याच भीमसिंहानें इंग्रजांस मेवाडांत घेतलें (१८१७) व मेवाडचें स्वातंत्र्य नाहींसें झालें. या कृष्णाकुमारीच्या सत्य व करुणापर कथानकावर काव्यें झालीं आहेत.

**कृष्णाजी आटोळे**—नागपूरकर भोसल्यांकडील एक मराठा सरदार. रघूजी भोसले यानें सन १७३९ त आवजी कवडे या बाजीरावाच्या सरदाराचा मोड करण्यासाठीं यास पाठविलें. यानें आवजी कवडे यास शेवटीं नागपूर प्रांतांत लढाईत पळवून लावलें. जानोजी व मुधोजी यांच्यामधील तंट्यांत यानें जानोजीची बाजू घेतली होती.

**कृष्णाजी एकनाथ धर्माधिकारी**—उर्फ कृष्णदास वैरागी. एक मराठी कवि. शके १५९६ मध्यें यानें 'चैतन्यलीला' नांवाचा एक ग्रंथ लिहून शिवाजीमहाराजांना रायगडावर त्यांच्या राज्याभिषेक-समयीं अर्पण केला. केशव चैतन्यप्रभृति राजर्षि घराण्यांतील थोर पुरुषांचीं वर्णनें यांत केलेलीं असून या ग्रंथाचे २१ अध्याय व ३३७५ ओंव्या आहेत. हा केशव चैतन्यास गुरुस्थानीं मानतो. याची समाधि ओतूर येथें केशव चैतन्याच्या समाधीशेजारींच आहे.

**कृष्णाजी कंक**—शिवाजीचा बाळमित्र येसाजी कंक याचा हा मुलगा. हा मोठा शूर होता. येसाजी सरनोबत होता. व कृष्णाजी हा (संभाजी राजाच्या वेळीं) पदाती नाईक होता. या दोघांनीं १६८३ मध्यें फोंड्याच्या स्वारींत मोठा पराक्रम करून फिरंग्यांचा पराभव केला; पण दोघेहि जखमा होऊन कामास आले.

**कृष्णाजी त्रिमल**—हा मोरोपंत पिंगळे पेशवे याचा मेव्हणा मथुरेस राहात असे. शिवाजी आग्र्याहून निसटला व मथुरेस आला. तेथें कृष्णाजी, काशी व विसाजी असे तीन बंधू होते. त्यांच्याकडे संभाजी राजास ठेवून शिवाजी पुढें गेला. पुढें एकदां मोंगलांचें धरणें आलें असतां या कृष्णाजीनें संभाजीस आपल्या पानांत जेवावयास घेऊन एकत्र भोजन (दूध-पोहे) केलें व संभाजी आपला भाचा आहे, असें सांगून त्याचा बचाव केला. पुढें कांहीं महिन्यांनीं हे त्रिवर्ग बंधू आपल्या आईसह संभाजीस घेऊन रायगडास गेले. त्या वेळीं शिवाजीनें काशीपंतास व मातोश्रीस प्रत्येकीं २५।२५ हजार रु. बक्षीस दिलें (इ. स. १६६९).

**कृष्णाजी नाईक जोशी**—हा शिवकालीन मुत्सद्दी पन्हाळ्यास सुरनीस होता. त्यास शिवाजीनें तंजावरास व्यंकोजी राजाकडे जें शिष्टमंडळ पाठविलें त्यांत धाडलें होतें. यास पुढें शाहूनें सर्व राज्याची पोतदारी दिली. याचा पुत्र महादाजी हा चासकर घराण्याचा मूळपुरुष. महादाजीपंताची मुलगी लाडूबाई ही थोरल्या बाजीरावाला दिली होती. तिचें सासरचें नांव काशीबाई. महादाजी हा सावकार असल्यानें बाळाजीपंताला त्याचा बराच उपयोग झाला. साताऱ्यास व्यंकटपुऱ्यांत असलेलें कृष्णेश्वराचें देऊळ या महादाजी कृष्णरावांनींच बांधल्याचा उल्लेख करणारा शिलालेख (शके १६४५ चा) तेथें आहे.

**कृष्णाजी परशराम प्रतिनिधि** (सन १७१९)—हल्लींच्या विशाळगडकरांचा हा पूर्वज. विशाळगड व सभोंवतालचा प्रदेश ताब्यांत घेण्यासाठीं याचे वडील परशुरामपंत यांनीं यास मोहिमेवर पाठवलें. यानें विशाळगड आपल्या ताब्यांत आणला. पुढें कोल्हापुरास हा प्रतिनिधि झाला.

**कृष्णाजी भास्कर**—हा वांईच्या कुलकर्ण्यांपैकीं एक असून शिवाजीच्या नोकरीस होता. पुढें कदाचित् यानें शिवाजीची नोकरी सोडली असावी. कारण अफजल-प्रकरणांत यालाच खानानें आपला वकील म्हणून दौत्य करण्यास शिवाजीकडे पाठविलें होतें. खान हा वांईचा सुभा (सात आठ वर्षें) असल्यानें, या दोघांची दाट ओळख होती. पंत पूर्वी शिवाजीकडे नोकर असल्यानें व त्यानें त्याला सन्मानानें वागविल्यामुळें कृष्णाजीपंतानें शिवाजीला खानाचा खरा हेतु कळविला. त्यावरून पुढें खानाचा वध झाला. यानंतर कृष्णाजीपंत हा शिवाजीच्या पदरीं राहिला असावा. कारण औरंगजेब गादीवर बसला असतां शिवाजीनें त्या वेळीं (१६५९) जो वकील दिल्लीस पाठविला तो हाच कृष्णाजीपंत होता. राजाराम महाराजाच्या वेळीं हा जिवंत असावासें दिसतें.

**कृष्णाजी महादेव जोशी** (चासकर) (मृ. १७५४)—बाजीरावानें याचा भाऊ रामचंद्र महादेव याच्या पश्चात् यास सन १७३० मध्यें कल्याणचा सुभेदार नेमलें. मराठ्यांनीं याच्या मदतीनें येथें पोर्तुगीजांचा पराभव केला. थोरल्या बाजीरावाची पत्नी काशीबाई उर्फ लाडूबाई ही याची बहीण. कृष्णराव महादेवास पेशव्यांनीं चास तेथें सरंजाम दिल्यामुळें या घराण्यास चासकर म्हणूं लागले. कृष्णराव हा सन १७३३ मध्यें फिरंग्यांच्या

स्वारीवर गेला होता. उत्तरेकडील राजकारणांतहि यानें भाग घेतला होता. शके १६७६ मध्यें हा मृत्यु पावला.

**कृष्णाजी विनायक सोहोनी**—हा प्रसिद्ध ' पेशव्यांच्या बखरी 'चा लेखक होय. हा रत्नागिरी जिल्ह्यांतील सोमेश्वराचा रहिवासी होता. तेथून पुण्यास पेशवाईच्या अखेरीस आला व आपल्या कर्तबगारीनें सुभेदारीपर्यंत चढला. पुढें पेशवाई गेल्यानंतर याचें सर्व वैभव नष्ट झालें. व त्याने सर्व संसारकार्यें सोडून वैजनाथाच्या शिवालयांत पुढील आयुष्य तपस्व्याप्रमाणें घालविलें. त्या वेळीं त्यानें तोंडानें सांगावें व एका लेखकानें लिहून घ्यावें याप्रमाणें सदर बखर रचिली गेली. पंताचा काल वरील शिवालयांत इ. स. १८५४-५५ त झाला. त्या वेळीं त्याचें वय ७० च्या सुमारास होतें.

**केअर्नस, जॉन इलियट्** ( १८२३-१८७५ )—एक इंग्रज अर्थशास्त्रज्ञ. १८५४ सालीं एम्. ए. होऊन नंतर कायद्याची परीक्षा देऊन आयर्लंडांत वकिली करूं लागला; व तेथेंच त्यानें अर्थशास्त्राचा सांगोपांग अभ्यास केला; आणि १८५६ मध्यें डब्लिन येथें अर्थशास्त्राचा अध्यापक झाला. १८६२ सालीं त्यानें ' दि स्लेव्ह पॉवर ' ( गुलामांची अर्थोत्पादनशक्ति ) या निबंधांत गुलाम मजूर पद्धतींतील तोटे मार्मिकपणें पुढें मांडले, ते आतां अर्थशास्त्रांतले ठाम सिद्धान्त मानले जातात. अमेरिकेंत गुलाम पद्धति-प्रकरण युद्धावर जाणार, हें भविष्य त्यानें वर्तवलें होतें. १८६६ सालीं त्याला लंडन युनिव्हर्सिटी कॉलेजांत प्रोफेसर नेमलें. 'पोलिटिकल एसेज्' ( राजकीय निबंध ) व ' लीडिंग प्रिन्सिपल्स ऑफ पोलिटिकल एकॉनमी ' ( अर्थशास्त्राचीं प्रमुख तत्त्वें ) हीं पुस्तकें त्यानें लिहिलीं. स्मिथ, माल्थस, रिकार्डो, मिल्ल या अर्थशास्त्रज्ञपरंपरेंतील केअर्नस होता, तथापि मिल्लच्या बहुतेक सर्व प्रमुख सिद्धान्तांसंबंधाने त्याचीं मतें भिन्न आहेत. पदार्थांच्या किंमती व आंतरराष्ट्रीय व्यापार, तसेंच व्यापारी संघ व संरक्षणपद्धति यांसंबंधीं फार महत्त्वाचें विवेचन त्यानें केलें आहे.

**केई द्वीपसमूह**—हा डच ईस्ट इंडीजचा अम्बोयना रेसिडेन्सींतील एक द्वीपसमूह आहे. मोठें केई, लहान केई, टायन्डा व कुरसमूह हीं या द्वीपसमूहात आहेत. येथें नारळ, साबुदाणा, मासे, ट्रेपांग इमारती लांकूड, खोबरें, मका व तंबाखू हे जिन्नस होतात. येथील लोकसंख्या सुमारें २३,००० आहे. केई द्वीपाचे लोक खोदकामांत पटाईत असून त्यास उत्तम प्रकारची जहाजें बांधतां येतात.

**केओंझर संस्थान**—ओरिसा प्रांतांतील दुसऱ्या क्रमांकाचें मांडलिक संस्थान. क्षे. फ. ३,२१७ चौ. मै. व लो. सं. ५,२९,७८६. याचे उत्तर व दक्षिण केओंझर असे दोन भाग असून उत्तर भागांत पर्वतांच्या रांगा आणि दक्षिण भागांत दऱ्याच दऱ्या आहेत. सदर पर्वतांत गंधमादन हें सर्वांत उंच शिखर ३,४७९ फूट उंच आहे. या पर्वतामधून वैतरणी नदी उगम पावते. हा पर्वतमय प्रदेश शत्रूपासून बचाव करण्यास फार उपयुक्त आहे. या संस्थानचा समावेश पूर्वी मयूरभंज संस्थानात झाला होता, पण २०० वर्षांपूर्वी येथील डोंगरी जातींनीं आपलें स्वतंत्र संस्थान स्थापलें. येथील संस्थानिकानें १८५७ च्या बंडांत इंग्रजांना मदत केली, म्हणून त्याची खंडणी कमी करून त्याला महाराजा हा किताब देण्यांत आला. केओंझर हेंच राजधानीचें शहर असून बाकी सर्व १९३७ खेडीं आहेत. येथें चैतन्य हिंदू, कुर्मी, गौड, खोड, भूइया, वगैरे अनेक जातींचे लोक राहतात. संस्थानचें सालीना उत्पन्न पंधरा लाख आहे. सध्यांचे महाराज बलभद्र नारायण भंज देव हे १९२६ सालीं गादीवर बसले. संस्थान आतां ओरिसा प्रांतांत विलीन झालें आहे.

**केओंथल**— ( जुंगा ). पूर्व पंजाब, सिमल्याच्या भागांतील जीं डोंगराळ संस्थानें आहेत त्यांपैकीं एक. या संस्थानाचें क्षेत्रफळ १८६ चौरस मैल आहे. या संस्थानांत २१२ खेडीं असून एकंदर लो. सं. २७,७११ आहे. संस्थानचें वार्षिक उत्पन्न सु. अडीच लक्ष रु. आहे. हल्लीं या संस्थानचा राजा रजपूतवंशी हितेंद्रसेन हा आहे. पूर्वी या संस्थानच्या राजाला 'राणा' या नांवानें संबोधलें जात असे. पण १८५७ सालीं याला राजा हा किताब देण्यांत आला. आतां संस्थान हिमाचलप्रदेश संघांत सामील झालें आहे.

**केकती**—याला केकताड, घायाळ, घायपात, असेंहि म्हणतात. अननस किंवा केवड्याच्या पानासारखी या झाडाचीं पानें असून त्यांना कांटे व शेवटीं एक आंखूड कांटा असतो. त्यांचा रंग पिंवळसर हिरवा व कांहीं जातींत हिरवागार असतो. पानांतून एक उंच दांडा वर निघून त्याला फुलें येतात. याच्या अनेक जाती आहेत व त्या सर्वांचें जन्मस्थान अमेरिका आहे. मेक्सिकोंत ही झाडें विपुल आहेत. तथापि बहुतेक उष्ण प्रदेशांत याची वाढ झाली आहे. याच्या पानापासून व मुळापासून वाख निघतो. त्याचीं वस्त्रें होतात, तीं फार टिकाऊ असतात. याच्या दांड्यापासून आंबट रस पुष्कळ निघतो; तो शिजवून त्याची दारू करतात. तिचा इकडील ताडीप्रमाणें अमेरिकेंत फार खप होतो. या झाडाच्या पुऱ्या वाढीस १०-१२ वर्षें लागतात.

**केकूल, फ्रेडरिक ऑगस्ट** ( १८२९-१८९६ )— एक जर्मन रसायनशास्त्रज्ञ. कर्बयुक्त संयुक्त पदार्थांचें संशोधन हें त्याचें महत्त्वाचें कार्य होय. बेन्झिनच्या घटनेची त्यानें दिलेली उपपत्ति इतकी महत्त्वाची आहे कीं, सेंद्रिय रासायनिक पदार्थांपैकीं

जवळ जवळ तीन-चतुर्थांश पदार्थ या बेन्झिनच्या घटनेच्या ज्ञानामुळें तयार करतां येऊं लागले.

**केंजळगड**—अथवा घेरखेळज किल्ला हा वांईच्या वायव्येस ११ मैल अंतरावर असलेल्या महादेव पर्वतश्रेणीच्या मांढरदेव शिखरावर असून समुद्रसपाटीपासून हा ४,२६९ फूट उंच आहे. बाराव्या शतकांत जे पन्हाळ्याचे भोज राजे उदयास आले, त्यांनीं हा किल्ला बांधिला असें म्हणतात.

**केंट, डॉ. जे. टी.** ( १८४०- )—एक होमिओपथी वैद्य व लेखक. अमेरिकेंत वुडहल ह्या गांवीं यांचा जन्म झाला. अमेरिकन मेडिकल कॉलेजांत हे शारीरशास्त्राचे व हेरिंग मेडिकल कॉलेजांत आणि हानेमान मेडिकल कॉलेजांत औषधिगुणधर्म शास्त्राचे प्राध्यापक होते. खालील ग्रंथांमुळें हे जगभर प्रसिद्धि पावले: 'लेक्चर्स ऑन मटीरिया मेडिका', 'होमिओपाथिक फिलॉसॉफी' आणि 'रेपरटॉरी'.

**केंटकी**—अमेरिका, संयुक्त संस्थानांतील एक संस्थान. क्षे. फ. ४०,३९५ चौरस मैल. लो. सं. २८,४५,२६७. याची जास्तींत जास्त लांबीरुंदी ४०० व १७५ मैल आहे. पूर्वेस अपालीशिअन पर्वत आहेत. मिसिसिपि, कंबरलंड, केंटकी, टेनेसी वगैरे नद्या आहेत. फ्रँकफोर्ट राजधानी आहे. जनावरांचा धंदा मोठा आहे. येथील घोडे प्रसिद्ध आहेत. शेतीचा व्यवसाय महत्त्वाचा आहे. जंगल-उत्पन्न विशेषतः लांकूड विपुल आहे. उत्तर भागांत नीलघास ( blue grass ) गवताची समृद्ध व सुपीक जमीन आहे. आगगाडींचे लोखंडी रस्ते घालण्याचीं साधनें, यंत्रें, तंबाखू, कापड, तेल, पोलाद इ. माल येथें तयार होतो व त्यांचे बरेच कारखानेहि आहेत. लेक्झिंगटन येथें केंटकी संस्थानचें विद्यापीठ आहे. १६६९ मध्यें ला सेलीनें या भागांत प्रथम प्रवेश केला होता. १७६९ मध्यें बून हा आपल्या संशोधक टोळीसह येथें उतरला. १७८४ पावेतों ३०,००० लोक वसाहतीस आले. १७९० मध्यें केंटकी एक संस्थान म्हणून जाहीर झालें व १७९२ मध्यें तें युनिअन-मध्यें सामील झालें. केंटकीमधील गुहा विख्यात आहेत व आपल्याकडील घारापुरी, वेरूळचीं लेणीं वगैरेप्रमाणें त्या पाहाण्यास लोक मुद्दाम जातात. ह्या गुहा ९,००० चौ. मैलांच्यावर क्षेत्रांत पसरल्या आहेत.

**केटर, हेन्री** ( १७७७-१८३५ )—एक इंग्लिश-जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. प्रथम सैन्यांत प्रवेश केला. त्याला १२ व्या रेजिमेंटमध्यें कमिशन मिळालें य त्यामुळें तो हिंदुस्थानांत आला व त्यानें ( १७९४ ते १८०८च्या दरम्यान ) हिंदुस्थानची त्रिकोणमितीच्या साहाय्यानें पाहणी केली. सन १८१४ मध्यें पेन्शन घेऊन शेषायुष्य त्यानें शास्त्रीय शोधांत घालविलें. खगोल शास्त्रीय दुर्बिणींत त्यानें सुधारणा करून दाखविल्या. रशियांतील मापांच्या तुलनेसंबंधानें अत्यंत परिश्रम घेऊन तीं मापें निश्चित केलीं. त्याच्या या कामाबद्दल रशियन सरकारनें त्याचा बहुमान ( १८१४ ) केला. सन १८१५ मध्यें त्याला रॉयल सोसायटीनें आपला सभासद करून घेतलें.

**केटी**—सिंध, कराची जिल्ह्याचा घोडाबारी तालुक्यांतील एक शहर व बंदर. कराचीच्या खालोखाल या बंदराचा क्रम लागतो. हें बंदर ५० वर्षांपूर्वीचें आहे. या बंदरांतून ज्वारी, कडधान्य, लोंकर, कापूस इत्यादि पुष्कळ जिन्नस मुंबई, मद्रास, सोनमियानी, मक्राण इकडे जातात व मुंबई, मद्रास, मक्राण इत्यादि ठिकाणांहून नारळ, कापड, धातू, साखर, इत्यादि जिन्नस या बंदरांत येतात. १८५४ सालीं येथें म्युनिसिपालिटीची स्थापना झाली.

**केटो, मार्क्स पोर्शिअस** ( खि. पू. २३४-१४९ )—एक रोमन मुत्सद्दी व ग्रंथकार. टस्कुलम येथें जन्मला. त्याचें कुल लष्करी कामाबद्दल प्रसिद्ध होतें. रोम येथें लष्करी नोकरींत शिरून त्यानें ह्यामाच्या स्वारींत आणि नंतर सार्डिनिया व स्पेन यांमधील स्वाऱ्यांत चांगली कामगिरी केल्यामुळें त्याची कीर्ति वाढली. क्वेस्टर, एडाईल, प्रीटर व कॉन्सल असा वाढता दर्जा त्याला मिळून १९१ सालीं त्यानें ट्रिब्यूनचें काम केलें. लष्करी दृष्टीनें त्याची कीर्ति अढळ झाली. नंतर स्वदेशांत राहून तत्कालीन समाजसुधारणेचें कार्य अंगीकारलें. पूर्वीच्या साध्या रोमन राहणीचा नाश होऊन नवीन हेलेनिक संस्कृति रोमन लोकांत पसरत होती, तिला विरोध करण्याचें व्रत पत्करून सीनेटमध्यें तो नवविचारांचा प्रतिस्पर्धी बनला. लॅटिन भाषेंत गद्यग्रंथ लिहिण्यास त्यानेंच प्रथम आरंभ केला; शेतकीवर 'डी अॅग्रिकलचरा' उर्फ 'डी रेरस्टिका' नांवाचें पुस्तक, आणि 'ओरिजिन्स' नांवाचीं रोमच्या इतिहासाचीं सात पुस्तकें त्यानें लिहिलीं. लॅटिन भाषेंत रोमचा इतिहास लिहिणारा हा पहिला लेखक होय. त्याचीं भाषणेंहि संकलित आहेत.

**केडा**—मलाया देशांतील पण मलायाच्या संघसंस्थानांमध्यें सामील न झालेलें असें हें एक संस्थान. हें मलाया द्वीपकल्पाच्या पश्चिम भागास आणि सयामच्या दक्षिणेस आहे. याचें क्षेत्रफळ ३६६० आणि लोकसंख्या ५,१५,७५८ आहे. यापैकीं ६० हजारांवर हिंदी आहेत. उत्तर केंद्रांत तांदूळ पिकतो. दक्षिण भागांत रबर, नारळ व टापिओका हीं होतात. फेडरेटेड मलाया स्टेट्स रेल्वे लाईन मलायापर्यंत गेलेली आहे. राजधानी आलोर स्टार नांवाचें शहर आहे. केडाचा अधिपति मुसलमान आहे. सध्यां सुलतान अबदुल हमीद मालिमाशहा हे गादीवर आहेत.

**केडीझ**—हें स्पेनच्या वायव्य किनाऱ्यावर बंदर आहे. येथें एक वैद्यकीय आणि शास्त्रीय विद्यालय सेव्हिले विद्यापीठाला जोडलेलें आहे. केडीझ उपसागर मोठा असल्यामुळें बोटी किनाऱ्याला लागण्याची सोय चांगली आहे. येथें चार किल्ले असून त्यांपैकीं दोन किल्ले तेथल्या मोठ्या दारूगोळ्याच्या लष्करी कारखान्याच्या रक्षणार्थ आहेत. येथें १०,००० टन वजनी बोटी दुरुस्त करणें, व त्यांत माल भरणें–काढणे या कामाला उपयोगी अशा मोठाल्या गोद्या आहेत. केडीझ हें स्पेनचें मुख्य आरमारी ठाणें फार काळ आहे. येथें मोठा व्यापार चालतो, व दारू व फळें हाच मुख्य निर्गत माल आहे. शहराची लो. सं. ९२,९९८. केडीझ प्रांताचें क्षे. फ. २,८२७ चौ. मैल व लो. सं. ६,४१,७७० आहे.

**केणी**—ही एक जंगली भाजी आहे. ती पाणथळ जागेंत बारा महिने असते. कांहीं जाती पावसाळ्यांत ओसाड जागीं व शेतांतहि उगवतात. कित्येक लोक हिचीं कोंवळीं पानें शिजवून भाजी करतात.

**केतकर, व्यंकटेश बापूजी** (१८५४–१९३०)—एक ज्योतिषशास्त्रज्ञ. यांची नोकरी शिक्षण–खात्यांत झाली. यांचे वडील व वडील बंधु दोघेहि चांगले ज्योतिषी होते. यांनीं पाश्चात्य ज्योतिषशास्त्राचाहि अभ्यास करून ज्योतिर्गणित, केतकी ग्रहगणित, वैजयंती पचांगगणित यांसारखे ग्रंथ रचले. त्यांवरून त्यांचा सूक्ष्म ज्योतिर्गणिताचा अभ्यास दिसून आला. यांनीं आपलें केतकी पंचांग (चित्रापक्षाचे) काढण्यास शके १८११ पासून सुरुवात केली. लो. टिळकांचा रेवतीपक्ष यांना मान्य नव्हता म्हणून त्यांनीं तीन हजार रुपयांस त्या पंचागाचा करणग्रंथ करून देण्याचें नाकारलें व आपला स्वतंत्र बाणा राखला. यांचा 'इंडियन अँड फॉरिन क्रॉनॉलॉजी' हा ग्रंथ मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीनें प्रसिद्ध केला आहे.

**केतकर, श्रीधर व्यंकटेश** (१८८५–१९३७)—एक कोशकार व समाजशास्त्रज्ञ. यांचा जन्म मध्यप्रांतात रायपूर येथें झाला. यांचें शिक्षण उमरावती हायस्कूल व विल्सन कॉलेजमध्यें होऊन हे अमेरिकेमध्यें हॉर्वर्ड व कॉर्नेल युनिव्हर्सिटीमधून एम्. ए. व पीएच्. डी. झाले. यांनी बालपणांतच लेखनास सुरुवात केली होती. १८९९ मध्यें यांनीं शिवरामस्वामींचें चरित्र व काव्यग्रंथ व रा. भि. जोशी यांच्या व्याकरणावर टीका लिहिली होती. १९०६ मध्यें मुंबईस 'महाराष्ट्र वाग्विलास' नांवाचें मासिक सुरू केलें. अमेरिकेमध्यें 'हिस्टरी ऑफ कास्ट' चा पहिला भाग प्रसिद्ध केला व १९११ मध्यें लंडनमध्यें दुसरा भाग प्रसिद्ध केला. १९१६ साली यांनीं महाराष्ट्रीय ज्ञानकोश रचण्यासाठीं एक भागीदारांची लिमिटेड कंपनी काढली व तें अवाढव्य काम १९२७ त पुरें केलें. या महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचे हे मुख्य संपादक होते. नंतर यांनीं प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास लिहावयास घेतला, पण तो अपूर्ण राहिला. १९३१ सालीं हैदराबाद येथें भरलेल्या महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचे हे अध्यक्ष होते. यांनीं गोंडवनांतील प्रियंवदा, परागंदा, आशावादी, ब्राह्मणकन्या, गांवसासू, विचक्षणा, भटक्या या कादंबऱ्या लिहिल्या आहेत. 'निःशस्त्रांचें कारण' हें मराठी राजकीय विचारांचें पुस्तक त्यांचीं राजकीय मतें दर्शवितात. 'व्हिक्टोरिअस इंडिया' नांवाचें यांचें दुसरें इंग्रजी राजकारणी पुस्तक यांच्या मरणोत्तर प्रसिद्ध झालें. सामाजिक विचारप्रवर्तक कादंबऱ्या आणि अत्यंत व्यापक दृष्टीनें लिहिलेले निर्भीड लेख यांमुळें त्यांचें चिरकालीन महत्त्व राहील. कोशयुग त्यांनींच प्रवर्तित केलें. 'डॉ. केतकर यांचें सान्निध्य' या–त्यांचे सहकारी श्री. दाते-कर्वे यांनीं लिहिलेल्या–पुस्तकांत त्यांच्या कार्याचें निरीक्षण आलें आहे.

**केतकादास क्षेमानंद** (मु. १६४०)—एक हिंदी कवि. हा वर्धमान जिल्ह्यांतील कांथरा गांवचा असून जातीनें कायस्थ होता. क्षेमानंद हें याचें नांव असून केतकादास ही याची पदवी आहे. सन १६४० नंतर यानें 'मनसामंगल' नांवाचा एक ग्रंथ लिहिला. यानंतर यानें लिहिलेला 'मनसाभापण' हा व इतर लहानसहान ग्रंथहि प्रसिद्ध आहेत. याचें काव्य सरस व रुचिपूर्ण आहे. यानें आपलें आत्मचरित्रहि लिहिलें आहे.

**केदार**—हा राग कल्याण थाटांतून उत्पन्न होतो. ह्या रागाच्या आरोहांत ऋषभ व गांधार हे स्वर असत्प्राय आहेत व अवरोहांत गांधार असहाय आहे; म्हणून याची जाति औडुव–षाडव आहे. याचा वादी स्वर मध्यम, व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर आहे. ह्याच्या अवरोहांत कोमल निषादाचा अल्प प्रयोग धैवताशी केला जातो. अवरोहांत केव्हां केव्हां तीव्र व कोमल मध्यम स्वर एकापुढें एक जोडून गातात. ह्या रागाचा आरोहांत निषाद स्वर वक्र असतो. यांत तीव्र मध्यम बहुधा पंचमासंगती घेण्यांत येतो.

**केदारजी शिंदे** (मृ. १७६७)—एक मराठा सरदार. हा तुकोजीचा मुलगा व महादजीचा पुतण्या. पुण्यास राघोबादादा व माधवराव यांच्या तंट्याच्या गडबडींत शिंद्यांच्या सरदारकीचा निकाल लागला नव्हता. १७६३ सालीं नारो शंकराच्या प्रयत्नानें केदारजीस सरदारी मिळाली. परंतु दादांनीं १७६४ त ही सरदारी तीन लक्ष रुपये नजराणा घेण्याचा करार करून मानाजी शिंद्यांस दिली. सन १७६७ मध्यें केदारजी मरण पावला.

**केदारनाथ**—हिमालयांतील एक क्षेत्र. संयुक्त प्रांतांत गढवाल जिल्ह्यांतील महापथ नांवाच्या शिखरालगतचें हें देवस्थान ११,७५३ फूट उंचीवर आहे. याच्या चौफेर मोठाले उंच पर्वत असून मध्यें दोन–अडीच कोसांचें मैदान आहे. व त्यांत मध्यभागीं केदारनाथाचें मंदिर असून भोंवतालीं हिमालयाची बर्फाच्छादित शिखरें रुप्यासारखीं चकाकत असतात. या मंदिराभोंवतीं अष्टदिशांस ईशान्यतीर्थ, दक्षिणामूर्तितीर्थ, इत्यादि तीर्थें आहेत. हें देऊळ पांडवांनीं बांधलें, असें सांगतात. देवळावर शिखर नाहीं, व देवळांत नेहमीं गुडघाभर पाणी असतें. बाहेरील मंडपांत इतर देवतांचीं स्थानें असून गर्भगृहांत केदारेश्वर लिंगाकार नसून मोठा रेडा बसतो त्या आकाराचा आहे व मागच्या बाजूस पुच्छाचा आकार दिसतो. पांडवांचा स्पर्श होऊं नये म्हणून शंकरानें रेड्याचें रूप घेतलें, असें सांगतात. येथें बिल्ववृक्ष नाहींत. येथील पुजारी रावळ बहुधा नंबुद्री ब्राह्मणांपैकीं असतात. येथें भृगुपतन (भैरवझांप) नांवाचें हिमालयाचें शृंग असून तेथून उडी टाकून देहत्याग केल्यास आत्महत्येचा दोष नसून मनांतील वासना पुढील जन्मीं फलद्रूप होते, असें क्षेत्रमाहात्म्यांत लिहिलें असल्यामुळें पूर्वी येथून अनेक यात्रेकरू उडी घेत; पण ब्रिटिश सरकारनें ती चाल बंद केली. केदार येथें रुद्रकुंडतीर्थ (येथें स्नान केलें पाहिजे), विष्णुकुंडतीर्थ (येथें वंदन), वीरभैरव (येथें देवास वस्त्र वाहिलें पाहिजे), संगमेश्वर महादेव (येथें पिंडदान केलें पाहिजे), स्वर्गारोहण–मार्ग, महापथ (म्हणजे कैलास मार्ग), इत्यादि अनेक देवस्थानें व तीर्थें आहेत.

**केंदूर**—मुंबई, पुणें जिल्ह्यांत शिरूर तालुक्यांत शिरूरपासून १० कोसांवर हें गांव आहे. येथें बाजारपेठ आहे. थोरला बाजीराव पेशवा यानें हा गांव मस्तानीस इनाम दिला होता असें म्हणतात, पण याच्याजवळ असलेल्या पाचळगांवीं मस्तानीची कबर आहे, तिला इनाम म्हणून हें गांव दिलें असावें असें वाटतें. गांवाजवळ एक वलीबावा नांवाच्या मुसलमान अवलियाचें थडगें आहे. त्याचा उरूस भरतो. याच केंदूरचें प्रसिद्ध पाठक घराणें होतें.

**केंद्र**—१. (फोकस). दृक्शास्त्रामध्यें एखाद्या प्रकाशशलाकेचे किरण आरशावर पडून परावर्तन झालें असतां किंवा एखाद्या भिंगांतून जात असतांना वक्रीभवन झालें असतां ज्या एका विशिष्ट बिंदूंतून जातात त्यास केंद्र असें म्हणतात. हें वास्तविक अथवा दिखाऊ असें दोन प्रकारचें असूं शकतें.

२. भूमितिशास्त्रामध्यें एखाद्या वक्रामध्यें विशिष्ट गुणधर्म असणाऱ्या एका बिंदूस केंद्र असें म्हणतात. शंकुच्छेदामध्यें अशा तऱ्हेच्या केंद्रापासून निघणाऱ्या सर्व सरळ रेषांचें अंतर एका विशिष्ट दिग्दर्शक नांवाच्या स्थिर रेषेपासून सारख्या प्रमाणांत असतें.

३. (सेंटर्स). यंत्रशास्त्रामध्यें याचें फार महत्त्व आहे. यावर साऱ्या शक्तींचें कार्य होत असतें. उत्सारण–केंद्र (सेंटर ऑफ बायन्सी), गुरुत्वकेंद्र, जडत्वकेंद्र, भारकेंद्र, इ. केंद्रांचे प्रकार आहेत. उत्सारणकेंद्र म्हणजे ज्याच्या द्वारें पाण्याच्या परिणामी उत्सरणाची क्रिया होते असा; तर त्या पदार्थाचा बिंदु, म्हणजेच उत्सारित पाण्याचा गुरुत्वकेंद्र. पदार्थांतील कणभाराची फलित (रिझल्टंट) कार्यदिशा ज्या बिंदूंतून जाते तो बिंदु गुरुत्वकेंद्र होय. ज्या बिंदूंत पदार्थाचें सर्वस्व जणुं एकवटलें आहे असा गुरुत्वकेंद्रासारखा बिंदु भारकेंद्र होय. जलस्थितिशास्त्रांतील भारकेंद्र म्हणजे क्षेत्रफळाच्या एका बाजूवरील पाण्याचा फलित दाब ज्या निमज्जित क्षेत्रफळाच्या बिंदूंतून जातो तो बिंदु होय.

**केंद्रसत्तावादीपक्ष**—(कॉन्झर्व्हेटिव्ह पार्टी). हुजूरपक्ष, ब्रिटिश राजकारणांतील हल्लींचा एक पक्ष. हा पक्ष पूर्वीच्या टोरी पक्षाचाच तत्त्वतः बनलेला आहे; व तो उदारपक्षा–(लिबरल) चा प्रतिस्पर्धी आहे. १८३२ सालच्या रिफॉर्म ॲक्टनंतर लवकरच हें नांव रूढ झालें. आज प्रागतिक (लिबरल) आणि हा पक्ष यांत लोकशाहीच्या दृष्टीनें फारसा भेद नाहीं. या पक्षाला सुधारणा पाहिजेच आहेत. मात्र समाजसत्तावादाचा हा पुरस्कर्ता आहे. सरदारवर्ग आणि व्यापारीवर्ग म्हणजेच भांडवलवालावर्ग यांच्याशीं या पक्षाचे निकट संबंध असतात. १९२४ ते १९४५ पर्यंत इंग्लंडांत हा वर्ग अधिकारारूढ होता. आज ब्रिटिश पार्लमेंटांत ६४० जागांपैकीं १९० जागा काय त्या या पक्षाकडे आहेत.

**केंद्राभिगामी व केंद्रोत्सारक प्रेरणा**— (सेंट्रिपीटल ॲड सेंट्रिफ्यूगल फोर्सेस). सरळ रेषेंत सारख्या वेगानें पदार्थ जात असेल तर त्या पदार्थावर कोणतीहि शक्ति नाहीं असा शक्तिशास्त्राचा मूल सिद्धान्त आहे. गोफणींतील दगड वर्तुळांत सारख्या वेगानें फिरतो, परंतु सरळ रेषेंत फिरत नाहीं; यावरून त्या दगडावर दोरीवरील ताणाच्या योगानें वर्तुलमध्या (केन्द्रा)-कडे केंद्रगामी शक्ति आहे असें अनुमान काढतां येतें. त्याप्रमाणेंच विरुद्ध दिशेनें दगड दोरीवर व त्यायोगें हातावर ओढ (केंद्रापासून दूर) केन्द्रोत्सारी शक्ति (सेंट्रिफ्यूगल) उत्पन्न करतो.

दोरी सुटली तर दगड केंद्रापासून दूर त्रिज्येच्या दिशेनें जात नाहीं तर वर्तुलाला स्पर्श करणारी रेषा हा दगडाचा तात्कालिक मार्ग म्हणून या स्पर्शरेषेच्या दिशेनें तो निघतो; कारण त्यावरील केन्द्रगामी शक्ति नाहींशी झाली असते.

पदार्थांतील द्रव्य म, त्याची गति व व वर्तुळाची त्रिज्या र धरल्यास ही शक्ति $\frac{मव^2}{र}$ परमएकांक (अॅब्सोल्युट युनिट) इतकी होते.

सायकल वळविते वेळीं वक्राच्या मध्याकडे कल करून जावें लागतें. त्याचप्रमाणें आगगाडी वळणावरून जात असल्यास एक रूळ उंच करावा लागतो. वळणाच्या मध्याकडून केंद्रोत्सारी शक्ति व आगगाडीचें वजन ह्या दोन शक्तींचा परिणाम उंच-सखल रुळांतून जाणाऱ्या समपृष्ठाला लंब असावा लागतो.

पृथ्वीच्या आपल्या आंसाभोंवतींच्या गतीमुळें पदार्थाच्या वजनांत घट येते. भूमध्यरेषेवर स्थिर असलेल्या पदार्थावर जमिनीची आधारशक्ति, तसेंच पृथ्वीच्या गतीमुळें येणारी केंद्रोत्सारी शक्ति ह्या दोन शक्तींचा परिणाम पृथ्वीच्या आकर्षणाएवढा असतो. पदार्थाचें वजन आकर्षणाएवढें दिसेल, पण खरें वजन आधारशक्तीएवढेंच असणार. दृश्य वजनांतून केंद्रोत्सारी शक्ति वजा केली असतां खरें वजन मिळतें. खऱ्या वजनाचा सुमारें $\frac{1}{२८९}$ एवढी वजनांत घट भूमध्य रेषेवरील पदार्थामध्यें होते.

**केन**—ही बुंदेलखंडांतील एक नदी आहे. ही कैमूरच्या डोंगराच्या वायव्य भागांतील उतरणीवर उगम पावते व बांदा-फत्तेपूर या रस्त्यावरील चिल्ला नामक गांवाशेजारीं यमुनेला मिळते. या नदीचें पात्र फार खोल असून हिच्यामधून लहान लहान नावा सहज जाऊं शकतात. अजयगड संस्थानांतील चरियापूर शहराजवळ या नदीस एक कालवा काढण्यांत आला आहे.

**केन, सर थॉमस हेन्री हॉल** (१८५३-१९३१)— हा एक ब्रिटिश कादंबरीकार असून त्यानें इतर अनेक विषयांवर लेखहि लिहिले आहेत. त्याच्या आरंभींच्या कादंबऱ्या 'दि शॅडो ऑफ ए क्राइम' (१८८५) आणि 'ए सन् ऑफ हॅगर' (१८८६) या असून त्याच्या विशेष प्रसिद्ध कादंबऱ्या आहेत त्या–दि बॉंडस्मन्; दि स्केपगोट; दि प्रॉफेट्; दि मॅंक्समन्; दि ख्रिश्चियन; दि इटर्नल सिटी; दि प्रॉडीगल सन्; दि मास्टर ऑफ् मॅन्; दि वुमन् ऑफ् नॉकालो, वगैरे होत.

**केनिया**—पूर्व आफ्रिकेंतील एक ब्रिटिश वसाहत व आश्रित राज्य (प्रोटेक्टोरेट). क्षेत्रफळ २,२४,९६० चौरस मैल. लो. सं. ३९,४०,४६९. यांपैकीं एशियाटिक लोक ६१,१२७ आहेत. याला हिंदी महासागरावर सुमारें ६०० मैलांचा समुद्रकिनारा आहे. सर्व प्रदेश टेंकड्या व डोंगर यांनीं व्यापलेला आहे. ताना, जुबा व उंबा या नद्या आहेत. बरींच तळीं व सरोवरें आहेत. नैरोबी हें राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण व मोंबासा एक मोठें शहर आहे. मूळचे रहिवासी वनचुष लोक आहेत. परंतु इंग्रज वसाहतवाल्यांची सर्वत्र सत्ता व कारभार आहे. कांहीं हिंदी (हिंदुस्थानचे रहिवासी) व अरब यांनींहि येथें वसाहत केली आहे. १९२० सालीं ही 'क्राउन कॉलनी' म्हणजे राजवसाहत झाली. झांझीबारच्या सुलतानाकडून भाड्यानें घेतलेला किनाऱ्यावरील मुलूख केनिया प्रोटेक्टोरेट म्हणजे आश्रित राज्य गणलें गेलें.

**केनोपनिषद्**—सामवेदाच्या पांचव्या ब्राह्मणास म्हणतात. याचें तलवकार असेंहि नांव आहे. या उपनिषदाचे एक पद्यमय व एक कथानकी असे दोन भाग आहेत. पद्यमय भागांत परब्रह्माचें वर्णन आहे. दुसऱ्या भागांत पार्वतीनें सर्व देवांसाठीं ब्रह्मयाजवळ मध्यस्थी केल्याची कथा आहे. या उपनिषदावर शंकराचार्यांची एक टीका आहे.

**केन्सिग्टन वस्तुसंग्रहालय**—व्हिक्टोरिया अॅंड आल्बर्ट म्यूझियम. ही संस्था लंडनशहरीं प्रिन्स आल्बर्ट यांनीं १८५७ मध्यें सुरू केली. येथें युरोपांतील अत्यंत सुंदर व चित्ताकर्षक वस्तूंचा संग्रह असून त्यांत कलाकुसरीचे पदार्थ, प्राचीन शिल्प व खोदकामाचे नमुने, आधुनिक जलरंगाचीं चित्रें व तैलचित्रें, व ब्रिटिश कलावंतांचे खोदकामाचे व नकशी कामाचे नमुने ठेवलेले आहेत.

**केप ऑफ गुड होप**—आफ्रिकेच्या दक्षिण किनाऱ्याचें प्रसिद्ध भूशिर. १४८७ मध्यें बार्थोलेम्यू डिएझ यानें ह्याचा प्रथम शोध लावला, व १४९७ त वास्को द गामा या भुशिराला प्रथम वळसा घालून गेला. प्रथम याला 'केप ऑफ स्टॉर्म्स' (वादळी भूशिर) असें नांव होतें, पण नंतर पोर्तुगॉलच्या २ऱ्या जॉननें याचें सांप्रतचें नांव या भूशिरास दिलें. याच्यानजीक सायमन आखात व सायमन शहर व बंदर आहे. तेथें जहाजांना थांबण्यास सुरक्षित ठिकाण आहे व ब्रिटिश आरमाराचें ठाणें येथें आहे.

*केप ऑफ गुड होप वसाहत १६५२ त डचांनीं स्थापिली व १८१४ पासून ती ब्रिटिशांकडे कायमची आली व १९१० मध्यें दक्षिण आफ्रिका संघांत तिचा समावेश झाला.*

**केपकोस्ट**—पश्चिम आफ्रिकेच्या गोल्ड कोस्टवरील एक बंदर. लो. सं. १९,४१२. पैकीं बहुतेक फ्रॅंटिस लोक असून थोडी युरोपियन व फ्रमेन लोकांची वस्ती आहे. येथें १६५२ सालीं स्वीड लोकांनीं बांधलेला भव्य व मोठा किल्ला आहे. शिवाय या शहराच्या पश्चिमेस व्हिक्टोरिया किल्ला व पूर्वेस फोर्ट विल्यम हे आहेत. १८७६ पर्यंत येथें ब्रिटिश वसाहतवाल्यांची राजधानी होती. नंतर राज्यकारभार आक्राला नेला. १९०५ सालीं याला स्थानिक राज्यकारभाराचा हक्क देण्यांत आला. येथें धर्ममंदिरें, सरकारी शाळा, इस्पितळ, वगैरे इमारती आहेत. शहराच्या

पूर्वेकडील जमीन सोन्याच्या खाणीवाल्यांनीं टाकून दिलेल्या खाचांनीं भरलेली आहे.

**केपटाउन**—दक्षिण आफ्रिकेंतील केप ऑफ गुड होप प्रांताचें राजधानीचें शहर. लंडनहून ६,१८१ मैल जलमार्गानें आहे. क्षे. फ. ५९ चौ. मैल. लो. सं. (१९४१) १,८७,९४६ गोरे लोक. येथें १६६६ सालीं बांधलेला किल्ला व घडयाळाचा मनोरा ही जुनी इमारत आहे. अलीकडे यहुदी व अँग्लिकन प्रार्थनामंदिरें, पार्लमेंट कचेऱ्या, सार्वजनिक वाचनालय, वानस्पतिक उद्यान, पदार्थसंग्रहालय, विद्यापीठाची इमारत, वगैरे अनेक इमारती आहेत. येथें साम्राज्याचें लष्कर व स्थानिक लष्कर आहे. येथें दोन मोठया गोद्या असून त्यांत पुष्कळ जहाजांचा समावेश होतो.

**केप्लर, योहान** (१५७१–१६३०)—एक जर्मन ज्योतिषशास्त्रज्ञ. देवीच्या दुखण्यामुळें त्याच्या हाताची पूर्ण वाढ खुंटून दृष्टिहि मंद झाली. भविष्य वर्तवणारीं पंचांगें रचणें हा धंदा जर्मनींत त्या काळीं लोकप्रिय होता; व केप्लर अशीं भविष्यें वर्तवूं लागला. टायकोब्राहेच्या मृत्यूनंतर दुसऱ्या रुडॉल्फ बादशहानें केप्लरला सरकारी गणिती नेमलें. बादशहा व इतर लोक यांच्या कुंडल्या मांडून तो भविष्यें वर्तवूं लागला. तथापि दृक्शास्त्राचा अभ्यास चालू ठेवून वक्रीभवन वगैरे दृक्शास्त्रांतील शोध यांसंबंधीं 'अँस्ट्रॉनेमिया पार्स ऑप्टिका' हें पुस्तक त्यानें १६०४ सालीं प्रसिद्ध केलें. 'धूमकेतू' संबंधीं 'डी कॉमेटीस' हें पुस्तक (१६१८), 'डी एपिटामी अस्ट्रानमी कोपर्निकन', 'रूडोल्फाइन टेबल्स' (१६२७), वगैरे पुस्तकें त्यानें लिहिलीं. सर्व ग्रहमालेची शक्ति सूर्यापासून आहे, मध्यबिंदु सूर्य आहे, ग्रहांच्या परिभ्रमणाचें कारण सूर्याचें स्वतः आंसाभोंवतीं फिरणें हें आहे, सर्व विश्व ईथर नामक वस्तूनें व्यात आहे, इत्यादि सिद्धान्तांमुळें केप्लरनें भौतिकशास्त्राचा संस्थापक असें सार्थ नांव जगांत मिळविलें. त्याचे समग्र ग्रंथ आठ विभागांत फ्रँकफोर्ट येथें १८५८–१८७१ पर्यंत छापून प्रसिद्ध झाले.

**केप व्हर्डे बेटें**—हीं ज्वालामुखीपासून झालेलीं १४ बेटें अटलांटिक महासागरांत पश्चिम आफ्रिकेकडील केप व्हर्डे भुशिरापासून ३२० मैल अंतरावर आहेत व तीं पोर्तुगाल देशाच्या मालकीचीं आहेत. क्षे. फ. १,५५७ चौ. मै.. हीं बेटें बहुतेक टेकडयांनीं भरलेलीं असून तेथें भात, मका, कॉफी, तमाखू, ऊंस, जायफळ, वगैरे औषधी फळें व खाण्याचीं अनेक प्रकारचीं फळें होतात. कॉफी, औषधी फळें, कातडीं, आर्शिल रंग, वगैरे माल परदेशीं जातो. येथील बहुतेक वस्ती नीग्रो किंवा मिश्र जातीच्या लोकांची आहे. मुख्य शहर प्रैआ हें बंदर सँन्तशिआगो बेटांत आहे. पोर्टो ग्रँडी हें बोटींना कोळसा घेण्याचें ठिकाण आहे. येथील लो. सं. १,८१,२८६ आहे.

**कँथरें**—या माशा फार लहान व पांढऱ्या रंगाच्या असतात. यांचे पंख अंगावर छपराप्रमाणें असतात. या फार बारीक असल्यामुळें मच्छरदाणींत शिरूं शकतात. यांच्या चावण्यानें आग फार होते. या माशा दलदलीच्या जागेंत, घाणींत, तसेंच पाणी थेंबथेंब ठिबकतें अशा जागीं असतात. यांची वाढ कुजलेल्या घाणींत होते. यांचीं अंडीं ओल्या मातींत घातलेलीं असतात. व यांची पूर्ण वाढ सुमारें १-१॥ महिन्यात होते. या माशा सिंध प्रांतांत फार आढळतात.

**कँबल, चार्लस** (१७७५–१८५४)—हा इंग्रज नट १७९४ सालीं ड्रुअरीलेन नाट्यगृहांत प्रथम रंगभूमीवर आला. त्यानें केलेल्या पुढील भूमिकांमुळें त्याची फार वाहवा झाली. त्या भूमिका–एडगर, रोमिओ, चार्लस् सरफेस, अन्टोनी, मर्क्यूशिओ, मॅकडफ, इत्यादि. त्याचा सुरेख आवाज आणि सुंदर चेहरा व शरीर यांमुळें तो यशस्वी नट झाला. त्याला १८४० मध्यें नाटकांचा सेन्सॉर नेमण्यांत आलें होतें.

**कँबल, जॉन फिलीप** (१७५७–१८२३)—हा इंग्रज नट ड्रुअरीलेन नाट्यगृहांत १७८३ सालीं प्रथम स्टेजवर आला. तो या गृहाचा व्यवस्थापक १७८८ पासून १८०२ पर्यंत होता. त्याच्या उत्कृष्ट भूमिका ज्यूलिअस सीझर, हॅम्लेट, मॅकबेथ व कोरिओलेनस ह्या होत.

**कँबल, फ्रान्सेस ॲन** (१८०९–१८९३)—ही इंग्रज नटी व लेखिका प्रथम १८२९ मध्यें कॉव्हेंट गार्डन नाट्यगृहांत प्रसिद्धीस आली. पोर्शिआ, बिॲट्रीस, लेडी मॅकबेथ, लेडी टीझल, वगैरे भूमिका ती फार उत्तम वठवीत असे. तिनें 'पहिला फ्रॅन्सीस' हें शोकान्त नाटक, 'रेकॉर्ड्स ऑफ ए गर्लहुड' आणि 'नोट्स ऑन सम् ऑफ शेक्सपिअर्स प्लेज' हीं पुस्तकें लिहिलीं आहेत.

**कँब्रिज**—१. अमेरिका, सं. संस्थानें, मॅसॅच्युसेट्समधील एक शहर. हें बोस्टनजवळ आहे. हें हार्वर्ड विद्यापीठाचें ठिकाण असून त्याच्या इमारती व संस्था या ठिकाणीं आहेत. कांहीं उद्योगधंदे व मुद्रण-प्रकाशन यांचें प्रमुख केंद्र आहे. लो. सं. १,१०,८७९. इन्स्टिटयूट ऑफ टेक्नालॉजी ही शिक्षण–संस्था महत्त्वाची आहे.

२. इंग्लंड, कँब्रिजशायर परगण्याचें मुख्य ठिकाण. क्षे. फ. ५,४५७ एकर व लो. सं. ७४,२६० (१९४५). लंडनपासून ५६ मैलांवर कॅम नदीच्या कांठीं आहे. विद्यापीठ–केंद्राखेरीज याला शेतकीच्या दृष्टीनेंहि महत्त्व आहे. येथें प्रार्थना–मंदिरें पुष्कळ आहेत.

**केंब्रिज विद्यापीठ**—दोन मोठ्या इंग्लिश विद्यापीठांपैकीं हें एक असून हें १३ व्या शतकांत स्थापन झालेलें आहे. या विद्यापीठांत १७ कॉलेजें आहेत तीं–सेंट पीटर्स कॉलेज (१२४८), क्लेअर कॉलेज (१३२६), पेंब्रोक कॉलेज (१३४७), गॉन व्हिल अँन्ड कायस कॉलेज (१३४८), ट्रिनिटी हॉल (१३५०), कॉर्पस ख्रिस्ती कॉलेज (१३५२), किंग्ज कॉलेज (१४४१), क्वीन्स् कॉलेज (१४४८), सेंट कॅथराइन कॉलेज (१४७३), जीझस कॉलेज (१४९६), ख्राइस्ट कॉलेज (१५०५), सेंट जॉन्स कॉलेज (१५११), मॅग्डलेन् कॉलेज (१५१९), ट्रिनिटी कॉलेज (१५४६), इमॅन्युअल कॉलेज (१५८४), सिड्ने–ससेक्स कॉलेज (१५९६), डाउनिंग कॉलेज (१८००)- प्रत्येक कॉलेजचा कारभार स्वतंत्रपणें चालतो. कॉलेजच्या मुख्य अधिकाऱ्याला मास्टर म्हणतात; परंतु किंग्ज कॉलेजच्या मुख्याला प्रोव्होस्ट आणि क्वीन्स कॉलेजच्या मुख्याला प्रेसिडेंट म्हणतात. त्याच्या खालचा दर्जा फेलोंना असतो. युनिव्हर्सिटीचे पदवीधर आणि पूर्वींचे हुशार विद्यार्थी अशा इसमांना फेलो म्हणतात. आणि प्रत्येक फेलोला कॉलेजच्या फंडांतून १५० ते २९० पौंड मिळतात. फेलोची संख्या सुमारें ४०० असते. अंडरग्रॅज्युएट विद्यार्थ्यांचे अनेक प्रकार असतात. त्यांपैकीं कांहीं:— (१) स्कॉलर—हे परीक्षा घेऊन व अन्य रीतींनें निवडलेले असतात आणि त्यांना कॉलेज–फंडांतून वार्षिक भत्ता मिळतो. (२) पेन्शनर–सर्व-साधारण विद्यार्थ्यांना हें नांव आहे व त्यांना कॉलेजची फी भरावी लागते. आणि (३) सायझर–हे गरीब विद्यार्थी असतात आणि त्यांना निरनिराळ्या प्रकारें पैशाची मदत व मोबदला मिळतो. शिवाय कांहीं कॉलेजांत नसणारे (नॉन-कॉले-जिएट) विद्यार्थी असतात.

प्रत्येक कॉलेजचा कारभार त्या कॉलेजचा मुख्य अधिकारी आणि त्या कॉलेजचे फेलो मिळून पाहतात. ही 'युनिव्हर्सिटी सोसायटी' म्हणून नोंदलेली असते. व येथें सर्व प्रकारच्या विद्या व शास्त्रें शिकविण्याची (ऑल लिबरल आर्ट्स अँड सायन्सेस्) व्यवस्था आहे. युनिव्हर्सिटी ही संस्था एक चॅन्सेलर, एक व्हाइस चॅन्सेलर, कॉलेजांचे मुख्य अधिकारी, कॉलेजांचे फेलो, आणि विद्यार्थी यांची बनलेली आहे. या युनिव्हर्सिटीचें कायदेमंडळ सेनेट हें आहे व या सेनेटचे सभासद, डॉक्टर अगर मास्टर ही पदवी ज्यांनीं मिळवलेली असते आणि ज्यांनीं आपलें नांव नोंदवलेलें असतें ते असतात. अमलबजावणीचा सर्व अधिकार चॅन्सेलर आणि व्हाइस चॅन्सेलर यांच्या हातीं असतो. विद्यार्थ्यांवर देखरेख ठेवण्याकरितां २ प्रॉक्टर असतात. कॉलेजच्या एकंदर ३ टर्म असतात त्या म्हणजे मायकेलमस्, लेंट आणि ईस्टर, बी. ए., एल्एल्. बी., एम्. बी. अथवा बी. सीएच्. या डिग्री मिळवण्याकरितां प्रत्येक विद्यार्थ्याला ९ टर्म भराव्या लागतात. बी. ए. झाल्यानंतर ४ वर्षांनीं एम्. ए. ही पदवी मिळते. पण त्याकरितां परीक्षा नसते. इतर पदव्या देण्यांत येतात त्या—डॉक्टर अँन्ड बॅचलर ऑफ डिव्हिनिटी; डॉक्टर्स ऑफ लेटर्स, सायन्स, लॉज आणि मेडिसीन; डॉक्टर अँन्ड बॅचलर ऑफ म्यूझिक; आणि पीएच्. डी., एम्. लिट्. आणि एम्. एस्सी. स्त्रियांना पदव्या मिळतात; पण त्या सिनेटच्या सभासद नसतात गिर्टन आणि न्यूनहॅम हीं दोन स्त्रियांकरितां स्वतंत्र कॉलेजें आहेत. हीं दोन कॉलेजें युनिव्हर्सिटीचा भाग नाहींत; पण युनिव्हर्सिटीचीं व्याख्यानें ऐकण्याची विद्यार्थिनींना परवानगी असते. १९४५ मध्यें येथील अंडर ग्रॅज्युएट विद्यार्थ्यांची संख्या ५९८० होती, आणि ४१३ प्रोफेसर व शिक्षक होते. येथें एक वनस्पतींची बाग (बोटॅनिक गार्डन), एक शारीरशास्त्रीय संस्था, एक वेधशाला आणि एक ग्रंथालय—९,००,००० पुस्तकांचा संग्रह आणि १०,००० हस्तलिखितें असलेलें—हीं या युनिव्हर्सिटीला जोडलेलीं आहेत. येथील नवीन वस्तुसंग्रहालयें आणि नव्या शास्त्रीय प्रयोगशाळा सर्व प्रकारें परिपूर्ण आहेत.

**केमाल पाशा, गाझी मुस्तफा** (१८८०–१९३८)—एक तुर्की वीर पुरुष व मुत्सद्दी. पहिल्या महायुद्धांत हा पुढें आला. गॅलीपोली द्वीपकल्पावरील तुर्की सेनेचें नेतृत्व याच्याकडे होतें. यानंतर यानें एक राष्ट्रीय पक्ष स्थापून अंगोरा येथें तुर्कस्तानची राजधानी नेली. १९२२ सालीं सुलतानाला पदच्युत केलें व १९२३ च्या लॉसेन येथील तहांत तुर्कस्तानचा गमावलेला सर्व मुलूख आपल्या मुत्सद्दीपणानें परत मिळविला. त्याच सालीं त्याला तुर्की लोकशाहीचा अध्यक्ष नेमण्यांत आलें. त्याच्या कारकीर्दींत तुर्कस्तानची पुष्कळच भरभराट झाली.

**केरग्वेलेन बेट**—हें निर्जन बेट हिंदी महासागरांतील अगदीं दक्षिण टोंकाला असून फ्रेंच नाविक केरग्वेलेन यानें १७७२ मध्यें शोधून काढलें व फ्रान्सनें १८९३ मध्यें हें आपल्या राज्याला जोडलें; पण तेथें कायमची वस्ती नाहीं. या बेटाचा आकार वेडावांकडा असून भोंवतालीं लहान लहान बेटें पुष्कळ आहेत. क्षे. फ. १,४०० चौ. मैल आहे. येथील कोबी नाविकांच्या रक्तपित्तरोगावर फार गुणकारी म्हणून प्रसिद्ध असे.

**केरळ**—हिंदुस्थानांतील हा देश प्राचीन आहे. महाभारत, भागवत, बृहत्संहिता या ग्रंथांत त्याचा नामनिर्देश आढळतो. हें राष्ट्र सह्याद्रीच्या दक्षिण टोंकाच्या आसपास मलबार किनाऱ्यावर असून तामीळ भाषा बोलणारें होतें. या देशालाच पुढें चेर देश म्हणूं लागले. चोल, पाण्ड्य, व हे केरळ उर्फ

चेर यांचे नेहमीं आपापसांत झगडे चालत. चोल साम्राज्य मोडण्यास पाण्डय, काकतीय व केरळ हे तिन्ही देश कारणीभूत झाले. त्रावणकोरच्या भागास सध्यां हें नांव लावण्यांत येतें. केरलपुत्र असेंहि एका जुन्या राज्याचें नांव होतें.

**केरसुण्यांचें झाड**— [ वर्ग लेग्युमिनोसी-उपवर्ग-पापिलिओनासी ]. युरोपमध्यें ज्या झाडांच्या केरसुण्या करितात तीं एका प्रकारचीं झुडुपें असून त्यांना सरळ टोंकदार फांद्या असतात. त्यांचा रंग काळसर हिरवा असतो; त्यांचीं पानें दरवर्षी गळून पडतात. व फुलें दाट पिवळ्या रंगाचीं असतात. याच्या हिरांच्या केरसुण्या. करितात. तसेंच घरावरील छपराकरितां किंवा धान्याच्या ठिक्या किंवा कणिंग करण्याकरितां वापरतात. पोर्तुगाल देशांत या झाडास सुंदर पांढरीं फुलें येतात. स्पेनमधील झाडांस सुंदर फुलांचे झुबके येतात.

आपल्याकडील जुन्या केरसुण्या शिंदीच्या झाडाच्या असतात.

**केरेन्स्की, अलेक्झांडर फेओडोरेव्हिट्स** (१८८१– )— एक रशियन राजकारणी पुरुष. रशियांत राज्यक्रान्ति सुरू झाली तेव्हां याला न्यायमंत्री नेमलें होतें व नंतर लवकरच तो राज्याचा मुख्य अधिकारी झाला. त्यानें रशियांत रशियन लोकशाही स्थापिली व स्वतः मुख्य प्रधान झाला ( १९१७ ता. १५ सप्टेंबर ). पुढें ता. ८ नोव्हेंबर १९१७ रोजीं ट्रॉट्स्की-लेनिन ऐक्य झालें, तेव्हां केरेन्स्की पेट्रोग्रॅड सोडून गेला व अज्ञात स्थितींत राहिला. त्यानें १९१९ सालीं 'बोलशेव्हिझमचा प्रस्ताव' लिहिला. पुढें तो लंडनच्या पत्रांतून लेख देई. १९३४ त त्याचा 'स्वातंत्र्याला फांस' या नांवाचा ग्रंथ निघाला.

**केरो**—आधुनिक ईजिप्तची राजधानी. नाईल नदीच्या कांठीं अलेक्झांड्रियापासून १३० मैल अंतरावर आहे. या शहराचें क्षे. फ. ८ चौ. मैल असून येथें एक किल्ला आहे. लो. सं. १३,१२,०९६ ( १९३७ ) असून त्यांपैकीं बहुतेक मुसलमान व बाकीचे ग्रीक, इटालियन, ब्रिटिश, फ्रेंच, ज्यू, वगैरे पुष्कळ जातींचे आहेत. येथें कापसाच्या व कागदाच्या गिरण्या असून रेशमी माल, बंदुकीची दारू व कमावलेलीं कातडीं तयार होतात. येथें एक वस्तुसंग्रहालय असून त्यांत जुन्या वस्तूंचा मौल्यवान् संग्रह आहे. सुलतानिया या ग्रंथसंग्रहालयाची पुनर्घटना करण्यांत आली असून त्यांत एकंदर १,२०,००० पुस्तकांचा संग्रह आणि प्राच्य देशांबद्दल माहिती देणारीं ४०,००० पुस्तकें १९२० सालीं होतीं. केरोनजीक जगांतील सात आश्चर्यांपैकीं एक–पिरामिड–मनोरे–आहेत. इ. स. ९६८ मध्यें ईजिप्त जिंकणारा जोहर–एल्–कैदनें नवीन राजधानी स्थापली, व तिला एल्–काहिरा म्हणजे विजयी असें नांव दिलें, त्याचा अपभ्रंश केरो आहे. येथें एक विद्यापीठ असून त्यांत सुमारें नऊ हजार विद्यार्थी आहेत. एल्–आझार विद्यापीठांत कुराणाचा अभ्यास चालतो.

**केरोपंती पंचांग**—पुण्यास हें पंचांग शके १८८७ पासून छापूं लागले. ह्यांत अक्षांश आणि रेखांश मुंबईचे घेतले आहेत. सुप्रसिद्ध गणितज्ञ केरो लक्ष्मण छत्रे हे याचे कर्ते असून सरदार आबासाहेब पटवर्धन हे प्रवर्तक होते. या पंचांगाचें गणित प्रथम कांहीं वर्षें स्वतः केरोपंतांनीं केलें असावें; परंतु पुढें त्यांच्या देखरेखीखालीं वसई येथील आबा जोशी मोघे हे करीत असत. सांप्रत त्यांचे वंशज यांच्या देखरेखीखालीं होत असतें. पूर्वपद्धतीच्या इतर पंचांगांहून केरोपंती पंचांग दोन प्रकारें भिन्न आहे. पहिला प्रकार असा कीं, यांत रेवतीयोगतारा ( झीटा-पिशियम ) शके ४९६ मध्यें संपातीं होता असें मानलें आहे. म्हणून त्या वर्षी अयनांश शून्य मानून अयनगति वास्तविक म्हणजे सुमारें ५०.२ विकला मानली आहे. वर्षमान अर्थानच वास्तविक नाक्षत्र सौर म्हणजे ३६५ दिवस, १५ घटका २२ पळें व ५३ विपळें मानलें आहे; आणि तदनुसार कोणत्याहि वर्षी रेवती तारेचें संपातापासून जें अंतर तितके अयनांश मानले आहेत. दुसरा मुख्य प्रकार असा कीं, हें पंचांग इंग्लिश नॉटिकल आल्मनॅकवरून तयार होत असल्यामुळें यांतील ग्रहगतिस्थिती शुद्ध असतात; व ह्या पंचांगाप्रमाणें ग्रहणें, ग्रहगती, इत्यादि गोष्टी दृक्प्रत्ययास बरोबर मिळतात. या पंचांगाला पटवर्धनी पंचांग असेंहि नांव असून आबासाहेब पटवर्धन यांच्या घराण्यांत हें अद्यापि पाळलें जातें.

**केर्ड, एडवर्ड** ( १८३५–१९०८ )— हा स्कॉटिश तत्त्ववेत्ता ग्लासगो येथें १८६६–१८९३ पर्यंत नीतिशास्त्राचा प्रोफेसर होता. आणि नंतर ऑक्सफर्ड येथील बेलियल कॉलेजचा मास्टर होता. त्यानें ग्रंथ प्रसिद्ध केले ते.– अकौंट ऑफ दि फिलॉसफी ऑफ कॅन्ट; सोशल फिलॉसफी ॲन्ड रिलिजन ऑफ कोम्ट; एसेज् ऑन् लिटरेचर ॲन्ड फिलॉसफी ( वाङ्मय आणि तत्त्वज्ञान यांवर निबंध ); दि एव्होल्यूशन ऑफ रिलिजन ( धर्मांचा विकास ); दि एव्होल्यूशन ऑफ थिऑलजी इन् दि ग्रीक फिलॉसॉफर्स, इत्यादि.

**केर्मांडेक बेटें**—हा बेटांचा समूह पासिफिक महासागरांत न्यूझीलंड बेटाच्या ईशान्येस असून तीं बेटें न्यूझीलंडच्या ताब्यांत १८८७ मध्यें गेलीं आहेत. सर्व बेटांचें मिळून क्षे. फ. १३ चौ. मेल आहे. या समूहांत प्रमुख बेटें रौल उर्फ सन्डे, मेकॉले, व कर्टिस हीं आहेत. येथें झाडेंझुडपें सुरेख आहेत. मासे व पक्षी पुष्कळ आहेत. पाण्याचा मात्र अभाव आहे, व त्यामुळें बहुतेक बेटें ओसाड आहेत.

**केलॅन्टन**—हें १९४८ पासून फेडरेटेड मलाया स्टेट्स-मध्यें सामील असलेलें एक संस्थान मलाया द्वीपकल्पाच्या पूर्व किनाऱ्यावर आहे. याचें क्षे. फ. ५,७२० चौ. मैल व लो. सं. ३,९०,३३२ आहे. यांपैकीं हिंदी लोक ११,५१३ आहेत. या प्रदेशातून केलॅन्टन नदी वाहते, आणि तिच्या कांठीं कोटाभारू हें राजधानीचें शहर आहे. हा कृषिप्रधान प्रदेश आहे. तांदूळ, नारळ, रबर, सुपारी, खोबरेल, व विविध फळें होतात. ब्रिटिश कंपन्यांनीं येथें चागली इस्टेट केली आहे. सोनें, लोखंड, कथील, मॅगनीज, हीं खनिजें निघतात. मोठीं बंदरें आहेत व आगगाडीनें बँकॉक व पेनांग हीं जोडलीं आहेत. सिंगापूरलाहि कोटाभारूहून आगगाडी जाते. राजा सुलतान महंमद (चौथा) हा आहे.

**केलसो**—मद्रासेंतील एक न्हावी जात. लो. सं. ७,३१३ (१९११). यांच्या अनेक पोटजाती आहेत. नामकरण व और्ध्वदेहिक क्रिया या दोन प्रसंगीं या जातीची जरूरी लागते. यांची कुलदेवता उडुपीचा कृष्ण होय. हे लोक भुताखेतांना फार भितात. या ज्ञातीचा कारभार गांव-पंचायतीच्या नियमानुसार चालतो. काळाच्या ओघाबरोबर ही जातहि सुधारली आहे.

**केला**—अथवा कॅला. हें प्राचीन शहर निनेव्हेच्या दक्षिणेस १९ मैलावर असून असिरियाची राजधानी होतें. हें शहर खि. पू. १३०० च्या सुमारास पहिला शाल्मनेसर यानें वसविलें. ७ व्या शतकांत बाबिलोनियन लोकांनीं केला शहर सर करून त्याचा नाश केला. केला शहराची जागा पहिल्यानें सर ए. एच्. लायडनें १८४५ मध्यें शोधून काढली, व नंतर हार्मझ रझम व जॉर्ज स्मिथ यांनीं हें उत्खननाचें काम पुरें केलें. त्यांत असुर नझिरपालनें बांधलेला राजवाडा, दुसऱ्या शाल्मनेसरनें बांधलेला राजवाडा, असुर नझिरपालचीं दोन लहान मंदिरें, एझिदा नांवाचें देवालय, वगैरे मुख्य सात इमारती सांपडल्या. शिवाय पंचरसधातूचें व हस्तीदंती सामान व ज्योतिष व फलज्योतिष यांस लागणारीं उपयुक्त कोष्टकें सांपडलीं.

**केलिल नत्र**—(ॲमिल नायट्राइट). पिवळ्या रंगाचा, सुवासिक द्रवरूप पदार्थ. रक्ताचा दाब कमी करण्यासाठीं, व प्रसंगविशेषीं हृदयाची क्रिया पूर्ववत् चालू करण्यासाठीं त्याचा वैद्यकशास्त्रांत उपयोग करतात.

**केले, आर्थर** (१८२१–१८९५)—हा इंग्रज गणितशास्त्रज्ञ १८३८ मध्यें केंब्रिज येथील ट्रिनिटी कॉलेजांत गेला. आणि १८४२ मध्यें सीनिअर रँग्लर झाला. आणि पुढील वर्षी त्यानें स्मिथ पारितोषिक मिळवलें. १८६३ मध्यें तो केंब्रिज येथें शुद्ध गणितशास्त्राचा प्रोफेसर नेमला गेला. तो मोठ्या तीव्र बुद्धीचा गणितशास्त्रज्ञ असून त्यानें या शास्त्रांत पुष्कळ नवी भर घातली आहे. त्याचे ९०० हून अधिक संशोधनविषयक निबंध १३ भागांत केंब्रिज विद्यापीठानें प्रसिद्ध केले आहेत.

**केलो, जोसेफ** (१८६३-        )—हा फ्रेंच मुत्सद्दी १९११ मध्यें फ्रान्सचा मुख्य प्रधान झाला. परंतु त्यानें गुप्तपणें मोरोक्कोच्या प्रश्नाबाबत जर्मनीबरोबर वाटाघाटी केल्या, म्हणून त्याच्यावर प्रखर टीका होऊन त्याला १९१२ सालीं राजीनामा द्यावा लागला. १९१३ मध्यें तो अर्थमंत्री झाला. परंतु ता. १६ मार्च १९१४ रोजीं मॅडम् केलो हिनें फिगॅरोचा संपादक याच्यावर त्याच्या ऑफिसांत जाऊन गोळी झाडली, त्यामुळें केलोला लगेच राजीनामा द्यावा लागला. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं केलो हा जर्मन-पक्षपाती आहे, देशद्रोही आहे, वगैरे आरोप जाहीरपणें त्याच्यावर ठेवण्यांत येऊन १९२० सालीं न्यायालयांत त्याचा खटला चालला. त्यांत देशद्रोहाचा आरोप *शाबीत झाला नाहीं.* परंतु शत्रूबरोबर *गुप्त मसलती* करण्याचा गुन्हा शाबीत धरण्यांत आला आणि त्याला ३ वर्षें कैदेची शिक्षा देऊन पुढें २० वर्षें त्याचे सर्व मुलकी हक्क काढून घेण्यांत आले. १९२५ *सालीं ते हक्क त्याला परत देण्यांत* आले व पुन्हां अर्थमंत्री नेमण्यांत आलें.

**केल्ट**—एक विशिष्ट मानववंश व भाषावर्ग. प्राचीन कालापासून ग्रीक लोक यांचा उल्लेख करीत आले आहेत. हे लोक बहुधा डॅन्यूब खोऱ्यांत राहत असावेत व पुढें खि. पू. ५ व्या शतकांत पश्चिमेकडे स्पेनपर्यंत पोंचले असावेत. यांनीं ग्रीसवर स्वारी केली, पण तींत पराभव पावून ते आशियामायनरच्या किनाऱ्यावर नावांतून गेले व त्यांनीं गॅलेशिया प्रदेश व्यापिला. गॉलमधील केल्ट लोकांचा उल्लेख जुने लेखक नेहमीं करतात. मात्र रोमन लोकांनीं केल्टसंघ मोडून टाकले. ते ब्रिटनकडे केव्हां गेले हें नक्की नाहीं. त्यांच्या भाषेचे दोन वर्ग पडतात. पी केल्टिक व क्यू केल्टिक. पहिल्यांत वेल्श-कॉर्निश (मृत भाषा) व ब्रेटन येतात तर दुसऱ्यांत आयर्लंड, स्कॉटलंड व आइल ऑफ मॅन यांमधील गॅलिक भाषा येते. आज सामान्यपणें आयर्लंड, स्कॉटलंड आणि वेल्स यांमधील इंग्रजेतरांना केल्ट म्हणण्याचा प्रघात आहे.

**केल्व्हिन, विल्यम थॉमसन लॉर्ड** (१८२४–१९०७)—एक इंग्रज पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. याचा बाप गणिताचा प्रोफेसर होता. थॉमसननें केंब्रिज विश्वविद्यालयांतून १८४५ सालीं 'दुसरा रँग्लर' ही पदवी मिळविली. १८४६ सालीं तो ग्लासगो विद्यापीठांत सृष्टिशास्त्राचा प्रोफेसर झाला व पुढें ५३ वर्षें त्यानें याच जागीं प्रोफेसरचें काम केलें. पृथ्वीचें कठिण कवच १० कोटी वर्षांपूर्वी तयार झालें असावें, हा सिद्धान्त थॉमसननें मांडला. शक्तिनित्यत्वाचा सिद्धान्त व उष्णतेचा गतिविशिष्टत्वाचा

सिद्धान्त हे त्यानें इतक्या उत्तम प्रकारें मांडले कीं, त्यांना सर्व विद्वानांकडून मान्यता मिळाली. तथापि सामुद्रिकतारायंत्राच्या शोधामुळें तो सर्व देशांत प्रसिद्ध झाला. या कामास सुरुवात केल्यावर त्यानें विद्युल्लतेंतील प्रत्येक जातीची विद्युत्संख्या मापण्याचीं यंत्रें भराभर तयार केलीं. विद्युद्दीपांचा सार्वत्रिक उपयोग होऊं लागल्यावर दीपांत खर्च होणारी विद्युच्छक्ति मापण्याचीं यंत्रें त्यानें शोधून काढलीं. बिनतारी संदेशयंत्र, जहाजावरील होकायंत्र, समुद्राच्या भरतीचें मापन करणारें यंत्र, समुद्राचा ठाव काढणारें यंत्र, वगैरे अनेक शोध त्यानें लावले. त्यानें नवीन कल्पनांनीं भरलेलें सुमारें तीनशें पदार्थविज्ञानशास्त्रीय निबंध लिहिले, त्यामुळें १९ व्या शतकांतील या शास्त्रांतील प्रगतीचें बरेंच श्रेय याला आहे. १८९२ सालीं तो लॉर्ड झाला. १८९६ सालीं 'ग्रँड क्रॉस ऑफ दि रॉयल व्हिक्टोरियन ऑर्डर' ही पदवी, आणि १९०२ सालीं 'ऑर्डर ऑफ मेरिट' ही पदवी त्याला देण्यांत आली. १९०६ सालीं त्याच्या प्रोफेसरपदाचा रौप्य-महोत्सवसमारंभ ग्लासगो येथें मोठ्या थाटानें करण्यांत आला.

**केवट**— ही शेतीवर उपजीविका करणारी कोळी जात संयुक्त प्रांतांत व बिहार-ओरिसांत आहे. लो. सं. १२,१५,६१६ (१९११). कैवर्तांचे हे आधुनिक वंशज असेंहि मानण्यांत येतें. क म्हणजे पापी वृत्ति म्हणजे धंदा करणारे ते कव्रृत्तियावरून कैवर्त अथवा केवँट, अशी या शब्दाची व्युत्पत्ति सांगण्यांत येतें. यांच्या अनेक पोटजाती आहेत. हे लोक हिंदु देवांचीच पूजा करतात. ढीमर लोकांशीं यांचा निकट संबंध आहे. भगतखेरीज सर्व लोक मासे, कासव, वगैरे खातात व दारू पितात. सगाई पद्धतीनें विधवाविवाह होतो.

**केवडा**—हें झाड दोन पुरुष वाढतें, व कित्येक ठिकाणीं याचीं दाट बेटें आढळून येतात. केवडा फार सुवासिक असल्यामुळें केवड्याच्या वनांत सर्प राहतात. याच्या पांढरा व पिवळा अशा दोन जाती आहेत. या झाडाला कणीस येतें. त्याला केवड्याचें फूल म्हणतात. या कर्नाटकांत झाडाच्या पातीच्या छत्र्या व चटया करतात. केवड्याचें तेल व अत्तर काढतात. या पातीचें तंतू काढून त्यांपासून जाळीं, कुंचल्या, लहान लहान पिशव्या, वगैरे जिन्नस करतात. याच्या अंगीं उत्तेजक व आंचके दूर करण्याचा धर्म आहे. याच्या तेलाचा उपयोग कानांतील ठणका, डोकें दुखणें, संधिवात यांवर होतो.

**केवलेश्वरवाद**— (डीइझम्). हा तत्त्वज्ञानपंथ निरीश्वरवादाच्या विरुद्ध असून हा पंथ ईश्वर या जगाचें एक महत् आद्य कारण आहे, असें मानतो; पण या पंथाचा एकेश्वरवाद (थेइझम्) आणि सर्वेश्वरवाद (पॅन्थेइझम्) या दोन्ही पंथांना विरोध आहे. कारण या पंथानें मानलेला परमेश्वर या जगाच्या व्यवहारापासून अगदीं अलिप्त असतो, असें या पंथाचें मत आहे. अर्थात् ईश्वरी अवतार आणि दैवी चमत्कार असल्या गोष्टींवर या पंथाचा विश्वास नाहीं. तत्त्वज्ञान व व्यवहार या दोन्ही बाबतींत सृष्टिज्ञान व मानवी बुद्धि हे दोन आपले मार्गदर्शक आहेत, असें या पंथाचें मत आहे. १८ व्या शतकांत केवलेश्वरवादी इंग्रज तत्त्ववेत्ते ग्रंथकार बरेच होऊन गेले. त्यापैकीं जॉन टोलंड, अँथनी कॉलिन्स, व मॅथ्यू टिंडाल हे प्रमुख होत.

**केश**— कैंस पाहा.

**केशकृमी**— (नेमाटेलमिथा). हा एक अपृष्ठवंश प्राण्याचा वर्ग असून त्यामध्यें वाटोळ्या अथवा लांबट शरीराचे परोपजीवी कृमी व कांहीं इतर लहान कृमी येतात. यांतील विशेष परिचित म्हणजे केशकृमी होत. यांचें शरीर कैंसासारखें बारीक असून शेणकिडे किंवा इतर कीटकांच्या शरीरांत त्यांच्या वाढीच्या आद्यावस्थेमध्यें परोपजीवी म्हणून वस्ती करून राहतात. याखेरीज या जातीच्या किड्यांचा सूत्रकृमी (नेमॅटोडा) या नांवाचा एक वर्ग आहे. त्यामध्यें गोलकृमी, अश्वकृमी व आसनकृमी इत्यादि येतात.

**केशर**—[वर्ग क्रॉकस साटिव्हस. इं. सॅफ्रन] केशरांचीं झाडें युरोप आणि आशिया खंडांत होतात. काश्मीरचें केशर प्रसिद्ध आहे. झाड लहान असून पानें गवतासारखीं असतात. फुलें जांभळीं असतात. फुलांचे स्त्री केशराग्र वाळवून केशर तयार करतात. केशराचा उपयोग सुवास आणि रंग यांसाठीं खाद्य पदार्थांत करतात. तसेंच तें औषधहि आहे. केशरी रंग हा वीरवृत्तीचा द्योतक मानला आहे. रजपूत लोक केशरी रंगाचे कपडे करून युद्धास निघत.

**केशरवर्ग**—[वर्ग इरिडासिई]. हा एक वनस्पतींचा वर्ग आहे. यांचें पुनर्जनन कुलांतच होतें. त्यांस बाहेरून पुंबीजाचा पुरवठा करावा लागत नाहीं. या वर्गांत बहुतेक वृक्ष नसून वनस्पती येतात. यांचीं पानें समांतर असून एकमेकांवर पडणारीं असतात. या वर्गांत इरिस, क्रॉकस, इक्सिया, वगैरे वनस्पती येतात.

**केशव**—१. एक ज्योतिषी व ग्रंथकार. ग्रहलाघवकार गणेशदैवज्ञ यानें विवाहवृंदावन नामक ज्या ग्रंथावर टीका केली आहे तो ग्रंथ केशवाचा आहे. याच केशवाचा दुसरा ग्रंथ करणकंठीरव नामक आहे, असें गणेशदैवज्ञ म्हणतो. अर्थात् हा करणग्रंथ असला पाहिजे. या केशवाचा काल शके १४०० हून अर्वाचीन नसावा.

२. प्रख्यात ग्रहलाघवकार गणेशदैवज्ञ याचा हा पिता. हा स्वतः मोठा विद्वान् होता. ग्रहकौतुक म्हणून त्याचा एक करण-ग्रंथ आहे. केशवाचे 'जातक पद्धति' व 'ताजक पद्धति' हे ग्रंथ सांप्रत प्रसिद्ध आहेत. ते केशवी या नांवाखालीं मोडत असून त्यांचा उपयोग पुष्कळ ज्योतिषी करतात. मुहूर्ततत्त्व हाहि ग्रंथ केशवाचा असून हे सगळे ग्रंथ छापले गेले आहेत. वेधाविषयीं केशवाची योग्यता फार मोठी होती. ग्रहकौतुक व जातक पद्धति यांवर केशवाची टीका आहे.

**केशवचंद्र सेन** ( १८३८–१८८४ )—ब्राह्मो समाजाचे एक पुढारी. कलकत्त्यांत ब्राह्मणेतर वैद्य जातींत जन्मले. केशवच्या १० व्या वर्षीं त्यांचे वडील वारले. मेट्रॉपॉलिटन कॉलेजांत १८५८ पर्यंत त्यानें अभ्यास केला. त्याच्या शेजारी राहणाऱ्या पंडित राजवल्लभ नांवाच्या पंतोजीनें केशवाला ब्राह्मधर्मासंबंधीं एक पुस्तक दिलें, तें वाचल्यावर १८५० सालीं त्यानें ब्राह्म-समाजाची दीक्षा घेतली, पुढें ब्राह्मसमाजाचे प्रमुख देवेंद्रनाथ टागोर यांच्याबरोबर केशवाचा विशेष सहवास झाला, व १८६२ सालीं देवेंद्रनाथांनीं केशवाला ब्राह्मसमाजाचा आचार्य नेमलें. पण देवेंद्रनाथ जुन्या आचारविचारांचे, जातिभेद, जानवें, वगैरे पाळणारे असल्यामुळें केशवचंद्र सेनांचा त्यांच्याशीं मतभेद होऊन त्यांनीं भारतवर्षीय नवब्राह्मसमाज स्थापन केला, व त्याचा प्रचार १८६८ सालीं हिंदुस्थानांतील मुख्य मुख्य शहरीं जाऊन केला. १८७० सालीं केशवचंद्र सेन इंग्लंडांत जाऊन आले, व नंतर समाजसुधारणेकरितां अनेक शाळा, कॉलेजें, पुस्तकालयें, सभा, मंडळ्या स्थापन केल्या. १८७६ सालीं कलकत्त्यानजीक 'साधनकानन' नांवाची बाग तयार करून तेथें आपल्या निकट शिष्यवर्गासह भजन, भक्ति, ध्यान, उपासना यांत दररोज बराच काल ते घालवीत. १८७८ सालीं त्यांनीं आपल्या १३ वर्षांच्या मुलीचा सुमारें १६ वर्षांच्या कुचबिहारच्या महा-राजाशीं विवाह केला. त्यामुळें त्यांची लोकप्रियता कमी झाली. १८८१ सालीं त्यांनीं ख्रिस्ती, मुसलमान, पारशी व हिंदू या सर्वांना एकत्र आणणारा 'नवविधानध्वजारोपण' नांवाचा संस्कार सुरू केला. त्यांत त्यांनीं बरेच ख्रिस्ती संस्कार घातले. पण त्यामुळें केशवचंद्र सेनांविरुद्ध निंदात्मक लेखांचें काहूर उसळलें. त्यानंतर लवकरच त्यांनीं देह ठेवला. सामान्य सांसारिक लोभामुळें त्यांचें चरित्र कोणास फारसें स्फूर्तिदायक झालें नाहीं.

**केशव चैतन्य** ( १५२४–७२ )—एक मराठी संतकवि. केशव चैतन्य याचा जन्म पुणें येथें झाला. याचें मूळ नांव विश्वनाथ बाबा. याच्या आयुष्याचा बराचसा भाग लढायांत गेला. पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. याचा धाकटा भाऊ उद्धव हा यान्या आज्ञेंत असे, परंतु थोरला भाऊ त्रिंबक यानें यवनांच्या सेवेंत राहून याच्यावर बऱ्याच आपत्ती आणल्या. तेव्हां या त्रासाला कंटाळून हा कुटुंबासह त्रिंबकास जाण्यास निघाला. वाटेंत ओतूर मुक्कामीं यानें राघवचैतन्य स्वामीस आपणांस संन्यास-दीक्षा देण्याची विनंति केली. परंतु तुम्हांस पुत्र झाल्याशिवाय संन्यास घेतां येणार नाहीं असें राघवचैतन्य स्वामींनीं त्यास सांगितलें. सन १५५१ मध्यें याला मुलगा झाला. त्याचें नांव नरसिंह असें ठेवण्यांत आलें. नरसिंहाच्या तेराव्या वर्षीच यानें संन्यास घेतला व तीर्थयात्रेस गेला. भक्तिप्रकाश, गीताभागवत-सार, परमार्थविचार, वैकुंठपद, वासनामय देह हे ग्रंथ यानें लिहिले. याचा काल ओतूर येथें शके १४९३ वैशाख वद्य १२ रोजीं झाला. शके १५६१ माघ वद्य नवमीस ओतुरास जानू तेल्याच्या घरीं यानें तुकाराम महाराजांना स्वप्नांत उपदेश दिला असें सांगतात.

**केशव दामोदर पुरोहित**—( केशवपंडित ). एक संस्कृत पंडित. शिवाजी, संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दीत हा दानाध्यक्षाचे काम करीत असे. १६९० मध्यें यानें 'राजाराम-चरित' नांवाचें एक संस्कृत ऐतिहासिक काव्य लिहिलें. तसेंच यानें लिहिलेल्या 'धर्मकल्पलता' नांवाच्या संस्कृत ग्रंथांतील दंडनीतिप्रकरण संभाजीनें लिहिलेल्या 'बुधभूषण' नामक संस्कृत काव्यांत सन १६८२–८३ मध्यें सामील करण्यांत आलें. संभाजीस यानें स्वतः रामायण ऐकवलें म्हणून यास संगमेश्वर तालुक्यांत जमीन बक्षीस मिळाली. याचा मृत्युकाल सन १६९० हा असावा. 'राजारामचरित' व 'दण्डनीति' हे याचे दोन्ही ग्रंथ संशोधक श्री. वा. सी. बेंद्रे यांनीं संपादून प्रसिद्ध केले आहेत.

**केशवदास** ( १५५४–१६१६ )—एक हिंदी कवि व संस्कृत ग्रंथकार. ओर्च्छाच्या रामसिंह राजाचा भाऊ इंद्रजितसिंह याच्या पदरीं होता. कविप्रिया व रसिकप्रिया हे याचे दोन प्रसिद्ध ग्रंथ होत. यानें आपलें 'रामचंद्र' हें महाकाव्य साधु तुलसीदासाच्या सांगण्यावरून लिहिलें असें म्हणतात. जहांगीरचंद्रिका, विज्ञान-गीता, वीरसिंहदेव चरित्र, रत्नबावनी, नखशिख यांहि ग्रंथांचा कर्ता हाच होय. याच्या कवितेवर खुष होऊन बिरबलनें यास सहा लाख रुपये दिले व इंद्रजितसिंहाला अकबराचें एक लाख रुपये देणें होतें तें बिरबिलाकरवीं यानें माफ करविलें, अशी आख्यायिका आहे.

**केशव मिश्र** ( सु. १२७५ )— हा मिथिलेचा रहिवासी असून गोवर्धन मिश्राचा गुरु होता. यानें लिहिलेल्या 'तर्कभाषा' या ग्रंथावर गोवर्धन मिश्रानें 'तर्कभाषा-प्रकाश' नांवाची टीका लिहिली आहे. केशव मिश्र, गोवर्धन

मिश्र व 'किरणावलीभास्कर' व 'कणादरहस्यमुक्ताहार' या ग्रंथांचा कर्ता पद्मनाथ मिश्र हे तिघेहि समकालीन होत. पद्मनाथ हा गोवर्धन मिश्राचा थोरला भाऊ होता.

**केशवराज सूरि**—एक महानुभावी ग्रंथकार. नागदेवाचार्यांचा हा शिष्य. महींद्रव्यासाच्या लीळा-चरित्र ग्रंथांतील चक्रधरांचीं वचनें संग्रहित करून 'सिद्धान्तसूत्रपाठ' नांवाचा १६०९ सूत्रें असलेला ग्रंथ यानें लिहिला. या सूत्रांचा महानुभावांना नित्यपाठ करावा लागतो. रामेश्वर नांवाच्या ग्रंथकारानें सिद्धान्तसूत्रपाठाचे अकरा भाग पाडले. हा चक्रधराच्या प्रत्यक्ष सहवासांत असल्यानें आपल्या 'मूर्तिप्रकाश' नांवाच्या ग्रंथांत यानें चक्रधराच्या रूपगुणाचें वर्णन केलें आहे. संस्कृत व मराठी मिळून यानें पंधरा-सोळा ग्रंथ लिहिले. याचा लेखनकाल शके १२०६ ( सन १२८४ ) हा आहे.

**केशवसुत** ( १८६६–१९०५ )— एक महाराष्ट्रीय कवि व आधुनिक मराठी काव्याचा जनक. यांच्या कविता इंग्रजी धर्तीवर असत व त्यांत नवविचार व भावना चांगल्या प्रतीत होत. पण केशवसुतांची प्रसिद्धि त्यांच्या मृत्यूनंतर झाली व गडकरी-बालकवि-टिळक यांसारख्या कवींनीं त्यांचा संप्रदाय म्हणून पुढें आणला. प्रथम 'केशवसुतांची कविता' या नांवानें हरि नारायण आपटे यांनीं त्यांच्या कवितांचा संग्रह प्रसिद्ध केला. केशवसुतांच्या कविता सुमारें १३२ आहेत. 'तुतारी' ही कविता सुधारणेचें शिंग फुंकीत असल्यानें पुष्कळांना क्रांतिकारक वाटते. आधुनिक कवी केशसुतांना गुरुस्थानीं मानतात. प्रा. रा. श्री. जोग यांनीं त्यांचें एक विस्तृत वाङ्मयं विवेचनपर चरित्र लिहिलें आहे.

**केशवस्वामी**—रामदास-पंचायतनांतील एक. यांना भागानगरकर असें म्हणत. केशवस्वामी हे पूर्ववयांत भागानगरच्या तानशा कुत्बशहा याच्या पदरीं एक अधिकारी होते. यांचे गुरु काशीराजस्वामी होत. केशवांनीं एकादशीचरित्र व इतर अभंग, पदें, वगैरे काव्य केलें आहे. यांची शिष्यशाखा बरीच मोठी होती. तिनें मराठी भाषेची पुष्कळ सेवा केली आहे. शिष्यांतील प्रमुख शिवराम व संतराज हे असून त्यांचे ग्रंथहि प्रसिद्ध आहेत. केशवस्वामींचा समाधिकाल शके १६०४ पौष शु. १३ असून समाधिस्थळ हैद्राबादेस सुलेमान बागेपलीकडील रंगरेजगुढ्याच्या पुढें मुसा नदीच्या कांठीं एका शेतांत आहे.

**केशाकर्षण**—( कॅपिलॅरिटी ). द्रव पदार्थांच्या पृष्ठभागाच्या एका विशिष्ट गुणधर्मास केशाकर्षण असें नांव देण्यांत येतें. या द्रव पदार्थांच्या गुणधर्मामुळें आपणांस अरुंद किंवा केशाकृति नलिकांमध्यें द्रव पदार्थ वर चढतांना आढळून येतात. द्रव पदार्थांचा पृष्ठभाग अथवा अगदीं वरचा थर सर्व दिशांस सारखा ओढल्यासारखा वाटतो. उदाहरणार्थ, साबणाच्या फुग्यामध्यें हवा फुंकली असतां तो सर्व बाजूंनीं सारखा वाढत जातो. तसेंच पाऱ्याचा एक बिंदु टेबलावर पडला असतां तो वाटोळा बनतो. तसेंच पाण्याचा एक थेंब एखाद्या धूळ असलेल्या कोरड्या रस्त्यावर पडला असतां त्याचाहि वाटोळा गोळा बनतो. घन पदार्थांशीं संसर्ग येणाऱ्या द्रव पदार्थांची स्थिति त्या घन पदार्थास ते आर्द्र करूं शकत असतांना व आर्द्र करूं शकत नसतांना निरनिराळ्या प्रकारची दृष्टीस पडते. जर आपण एखादी लहान छिद्राचीं दोन्ही तोंडें उघडीं असलेली नळी पाण्यामध्यें बुडविली तर पाणी त्या नळीमध्यें वर चढल्यासारखें दृष्टीस पडतें. परंतु तीच नळी जर आपण पाऱ्यामध्यें बुडविली तर पाऱ्यामुळें ती नळी ओली होत नसल्यामुळें आपणास वरील प्रकाराच्या अगदीं उलट प्रकार दृष्टीस पडतो. म्हणजे नळींतील पारा इतर पृष्ठभागापेक्षां खालीं असतो. या केशाकर्षणाच्या गुणधर्मामुळें निसर्गामध्यें अनेक निरनिराळे प्रकार आपल्या दृष्टीस पडतात. यामुळेंच शरीरांतील निरनिराळे रस प्राण्यांच्या शरीरांतील निरनिराळ्या पेशींमध्यें प्रसरण पावतात. तसेंच वनस्पतींतील जीवनरस याच गुणधर्मामुळें वनस्पतींमध्यें वर चढतो व त्यांच्या पानांच्या द्वारें व मुळांच्या द्वारें हवेंतील व जमिनींतील रस त्यांस शोषून घेतां येतात. याच गुणामुळें स्पंज पाणी शोषून घेतो, साखर विरघळते व टिपकागद शाई टिपून घेतो. तसेच दिव्यांतील तेल वातीमध्यें याच गुणधर्मामुळें वर चढतें.

**केशिराज** ( तेरावें शतक )— एक कानडी व्याकरणकार. हा जातीनें जैन असून याच्या बापाचें नांव मल्लिकार्जुन असें होतें. 'शब्दमणिदर्पण' नांवाचा एक कानडी श्लोकबद्ध व्याकरणग्रंथ यानें लिहिला. नृपतुंग व नागवर्मा या जुन्या कानडी व्याकरणकारांपेक्षां याचें हें व्याकरण विस्तृत, क्रमबद्ध व शास्त्रशुद्ध आहे. या व्याकरणग्रंथावर यानें स्वतःच वृत्ति लिहिली आहे. केशिराज हा सोमेश्वर होयसळकालीन (सन १२३३–५४ ) किंवा त्यानंतरचा असावा.

**केशोरईपाटणा**—राजपुतान्यांतील बुंदी संस्थानच्या केशोरई तहशिलीचें मुख्य ठिकाण. बुंदीपासून आग्नेयीस २२ मैलांवर, व कोटा शहरापासून १२ मैलांवर चंबल नदीच्या उत्तर तीरावर हें वसलेलें आहे. या गांवाची लोकसंख्या सु. चार हजार. महाभारतकालापासून या शहराची प्रसिद्धि आहे. या ठिकाणीं परशुरामानें जम्बुकेश्वराचें देवालय बांधलें अशी आख्यायिका आहे. पुढें बरींच शतकें लोटल्यावर हें देऊळ अगदीं मोडकळीस आलें. तेव्हां छत्रसाल राजानें ( १६३१–१६५८ ) हें पुन्हां बांधलें. याच राजानें येथें केशोरई नांवाचें एक मोठें देवालय बांधविलें व त्यावरूनच त्याला केशोरई हें नांव पडलें आहे.

**केंस**—सस्तन प्राण्याच्या शरीरावर जो एक बारीक सुतासारखा कातडीच्या वरच्या बाजूस लवचिक असा पदार्थ असतो त्यास केंस म्हणतात. पक्षाला जो आपल्या पिसांचा, तसेंच मासे व सरपटणारे प्राणी यांस आपल्या खवल्यांचा उपयोग होतो तोच मनुष्यास आपल्या केंसांचा उपयोग असतो. कोणताहि सस्तन प्राणी आपल्या प्रौढवयामध्यें केशविरहित असत नाहीं. मनुष्याच्या शरीरामध्यें कांहीं भागावर पुष्कळ लांब केंस असतात व कांहीं भागावर आंखूड असतात. परंतु त्याचे तळहात व तळपाय पूर्णपणें केशविरहित असतात. प्रत्येक केंसाला अंग व मूळ असतें. अंग कातडीच्या बाहेर असतें व तें वाढत नाहीं. परंतु त्याचें मूळ जें शरीरांत असतें तें त्याच्या खालच्या भागीं वाढून फुगीर होतें; आणि त्यांत असलेल्या पेशींची वाढ होऊन नवीन नवीन पेशी बनत जातात व जुन्या पेशी बाहेर पडून त्यांचें अंग बनतें. केंसास असणारा रंग या पेशींमध्यें असणाऱ्या रंजक कणांपासून उत्पन्न होतो. मनुष्याच्या केंसामध्यें वय, लिंग, वंश आणि परिस्थिति याप्रमाणें भेद असतो. पुरुषाचे केंस मजबूत व राठ असतात. स्त्रियांचे केंस लांब असून अधिक दाट असतात आणि ते लवकर गळून पडत नाहींत. केंसाशीं संलग्न अशा कांहीं लहान ग्रंथी असून त्यांमधून एक तेलासारखा पदार्थ बाहेर पडत असतो. त्याच्या योगानें शरीराची चामडी व केंस तुळतुळीत राहतात. प्रत्येक केंस कांहीं ठराविक कालानंतर गळून पडतो व त्याच्या जागीं दुसरा येतो. केंसांच्या मुळांतील पेशींमधील रंजक द्रव्य कमी झालें म्हणजे केंस पांढरे होऊं लागतात. डोक्यास रक्ताचा पुरवठा कमी होऊं लागला म्हणजे टक्कल पडूं लागतें. केंस ही वस्तु कधीं कुजत नाहीं, आणि ते मृत्यूनंतरहि वाढत असतात व शेंकडों वर्षें टिकतात.

वेदकालीन आर्य लोक आपल्या केंसांची विशेष काळजी घेत असत असें दिसतें. अथर्ववेदांतील बराचशा ऋचा केंसांची पूर्ण वाढ कोणत्या तऱ्हेनें होईल ह्या विषयाचें प्रतिपादन करितात. कापणें किंवा श्मश्रु करणें ( वप् ) ह्याचाहि उल्लेख बऱ्याच वेळा आलेला आहे. मनुष्याला लांब केंस असणें हें दुर्बलतेचें द्योतक आहे असें समजलें जातें.

निरनिराळ्या कामाकरितां लागणारे केंस सामान्यतः घोडा, बैल, डुक्कर, अंगोरा बकरा, उंट, अल्पाका, इत्यादि प्राण्यांचे घेतात. पहिल्या तीन प्राण्यांचे केंस गाद्या, उशा, वगैरे भरण्याकरितां वापरतात. पांढऱ्या केंसांस अधिक किंमत येते. विणण्याकरितां वापरण्यांत येणारे घोड्याचे केंस रशिया, जर्मनी, बेल्जम, दक्षिण अमेरिका व ऑस्ट्रेलिया यांमधून येतात. रंगकामाच्या कुंचल्या करण्याकरिता सेबल बॅजर वगैरे प्राण्यांचे केंस वापरतात. उंट, बकरा, अल्पाका, वगैरेंचे केंस लोकरीचें कापड विणण्याच्या कामीं उपयोगांत आणतात. मनुष्याचे केंस दाढी, मिशा, वगैरे करण्याच्या कामीं उपयोगांत आणतात. केंसांचा मुख्य पुरवठा फ्रान्स, जर्मनी, इटली या देशांतून होतो. जिवंत प्राण्यांचे केंस मृत प्राण्यांच्या केंसापेक्षां अधिक चांगले व टिकाऊ असतात.

**केंसाचा टोप**—डोक्यावर घालण्यासाठीं कृत्रिम केंसांची रचना केलेली असते तीस टोप म्हणतात. इंग्लंडमध्यें चार्लस दुसरा याच्या पुनरागमनापासून टोप वापरण्याची पद्धति आढळते. तिचा अवशेष अद्यापिहि न्यायाधिशाच्या डोक्यावर दिसतो. बॅरिस्टर हे आतां फक्त फीत वापरतात. त्या वेळीं डॉक्टर वगैरे निरनिराळे लोक निरनिराळ्या प्रकारचे विशिष्ट टोप वापरीत असत. सध्यां जज्ज, वगैरे लोकांनीं घालावयाचे टोप घोड्यांच्या केंसांचे व कुरळे असतात. हे रेशमी कापडावर बसविलेले असतात. टक्कल पडलेले लोक मनुष्याच्या केंसांचेच टोप वापरतात. नाटकांत स्त्रियांची भूमिका करणाऱ्या पुरुषांस टोप वापरावे लागतात; परंतु अलीकडे अशीं कामें करणारे लोक आपले केंस वाढवितात. हे टोप बहुतेक मनुष्याच्याच केंसांचे केलेले असतात. हिंदुस्थानांतहि विधिमंडळांतील अध्यक्ष, न्यायाधीश वगैरेंनीं टोप वापरण्याचा प्रघात होता, पण तो आतां मागें पडत चालला आहे.

**केसरी**—एक पौराणिक वानर व अंजनीचा पति. हा गोकर्ण पर्वतावर राहत असे. यास मारुति हा पुत्र झाला.

**केसरीनाथ**—एक मराठी संतकवि. हे राशीन येथील नाथसंप्रदायांतील मठाचे मठपति होत. ज्ञानेश्वर परंपरेंतील हे नाथ होते. यांची काव्यरचना फार आहे. त्यांत सिद्धान्तसार म्हणून मुख्य ग्रंथ आहे. यांनीं श. १६४६ मार्ग. शु. २ रोजीं आळंदीस समाधि घेतली. प्रख्यात कवि शिवदीन ( केसरी ) यांचा शिष्य होय.

**केसो भिकाजी दातार**—सवाई माधवराव पेशव्याच्या कारकीर्दीत होळकर दरबारांतील पेशव्यांचा वकील. यानें लिहिलेलीं २७६ पत्रें इतिहाससंग्रहामध्यें ( महेश्वर दरबारचीं पत्रें, भाग २ ) प्रसिद्ध झालीं असून त्यांत तत्कालीन होळकरशाहीचा इतिहास पाहावयास सांपडतो.

**केळ**—[ वर्ग मुसासी. इं. बनाना ]. केळीचें झाड सर्वपरिचित आहे. याचें आपणांस दिसणारें खोड सोपटांचें म्हणजे पानांच्या आवरणांचें बनलेलें असतें. केळीची उंची तीस फुटांपर्यंतहि आढळते. पानांची लांबी ६ ते १० फुटांपर्यंत व रुंदी २ फुटांहूनहि अधिक असते. पानाच्या मध्यभागीं दांडोळा असतो व त्यापासून आडव्या शिरा

फुटलेल्या असतात. पानांचा उपयोग घरें शाकारणें, वगैरेकरितां करतात. याच्या सोपटांपासून दोर निघतो. केळीच्या लोंगरास ४ पासून १० ते १२ इंचांपर्यंत आडवे केळ्यांचे फणे फुटतात. प्रथम दांत्यांवर जांभळट रंगाच्या पात्यांचें आवरण असतें. केळ्याची जाडी १ इंचापेक्षांहि अधिक असते. एका केळवंडीचें किंवा लोंगराचें वजन ४० पासून ८० पौंडांपर्यंत भरतें. केळ्याचा गर मऊ व रसदार असतो. केळें पिकलें म्हणजे तसेंच किंवा त्याचे कांहीं पदार्थ करून खातात. केळीं उष्ण प्रदेशांत व समशीतोष्ण प्रदेशांत होतात व त्यांच्यावर अनेक लोकांचा निर्वाह चालतो.

मंगलप्रसंगीं केळीचें तोरण दारापुढें बांधण्याची वहिवाट फार प्राचीन असून आपल्या पुराणांत व काव्यनाट्यग्रंथांत कदली वृक्षाचीं वर्णनें आलीं आहेत. प्राचीन ईजिप्तमध्यें केळें माहीत नव्हतें. हिंदुस्थानांत सर्वत्र याची लागवड केली जाते. त्याच्या ४० जाती आहेत. त्या म्हणजे चम्पा, सिक्किमन्सिस, कुंतेल, कच–केळ, मुसारुग्र किंवा रामकेळें किंवा लाल केळें, तांबोळी, मुठेली, राजेळी, गोवेगिरी, वेलची, काळी अथवा जुन्नरी, सोनकेळ, म्हशेळी, इत्यादि. पिकलेलीं केळीं खातात व कच्च्या केळ्यांची भाजी करतात. केळीं वाळवून त्यांचें बारीक पीठ करून खाण्याचे पदार्थ करतात. या झाडाचीं फुलें, गाभा, व कोंवळे अंकुर यांची भाजी करतात. झाडाचे कांदे जनावरांना खाऊं घातल्यास दूध वाढतें. धुपणी, मूत्रविकार, इ. वर यांचा उपयोग होतो. कोणत्याहि जातीचीं केळीं उन्हांत वाळवून त्यांचीं सुकेळीं करतां येतात. पण उंची व रंगदार सुकेळीं मुंबईनजीक आगाशीकडील राजेळी केळ्यांचीच होऊं शकतात.

**केळकर, नरसिंह चिंतामण** ( १८७२–१९४७ )—एक प्रमुख महाराष्ट्रीय राजकारणी पुरुष व लेखक. यांचा जन्म मिरज संस्थानांतील मोडनिंब येथें २६ ऑगस्ट १८७२ रोजीं झाला. यांचें शिक्षण मिरज, पुणें व मुंबई येथें झालें. १८९५ मध्यें यांनीं सातारा येथें वकिली सुरू केली. १८९६ मध्यें हे 'मराठा' पत्राचे संपादक म्हणून पुण्यास आले. १८९७ ते १८९९ पर्यंत हे 'केसरी'चेहि संपादक होते. यांस १९०८ मध्यें हायकोर्टाची बेअदबी केल्याबद्दल शिक्षा झाली. १९०८ मध्यें संपादकत्व सोडलें. १९०९ मध्यें हे कॉंग्रेसनें नेमलेल्या कॉन्स्टिट्यूशन कमिटीचे सेक्रेटरी होते. १९१० मध्यें हे पुन्हां 'केसरी'चे व 'मराठा' पत्रांचे संपादक झाले. १८९८ ते १९२४ पर्यंत हे पुणें म्युनिसिपालिटीचे सभासद होते. त्यांपैकीं १९१८ व १९२२ ते २४ मध्यें अध्यक्ष होते. १९१६ मध्यें हे होमरूल लीगचे सेक्रेटरी झाले. १९१८ मध्यें यांनीं मुंबई येथें भरलेल्या युद्धपरिषदेमध्यें सभात्याग केला. १९१८ मध्यें 'केसरी-मराठा' पत्रांचें संपादकत्व सोडून हे होमरूल लीग शिष्टमंडळामध्यें इंग्लंडला गेले. १९१९ मध्यें इंग्लंडमध्यें 'इंडिया' या पत्राचें यांनीं कांहीं काळ संपादन केलें. १९२० मध्यें हे महाराष्ट्र प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष होते. १९२० मध्यें पुन्हां 'केसरी'चे संपादक झाले. १९२१ मध्यें बडोदें येथें भरलेल्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष होते. त्याच वर्षी अकोला येथें भरलेल्या अखिल महाराष्ट्र राजकीय परिषदेचे अध्यक्ष होते. १९२२ मध्यें हे भोर संस्थान प्रजापरिषदेचे अध्यक्ष होते व त्याच वर्षी यांच्यावर कायदेभंगाबद्दल खटला झाला. १९२२ च्या जुलैमध्यें यांची कायदेभंग कमिटीपुढें साक्ष झाली. हे अ. भा. संस्थानी प्रजापरिषदेचे याच वर्षी अध्यक्ष होते. १९२३ मध्यें हे मध्यभागातर्फे मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून गेले.

१९२४ मध्यें यांच्यावर हायकोर्टाच्या बेअदबीचा दुसरा खटला झाला व दंड झाला. यानंतर यांनीं प्रतिसहकारपक्षाची स्थापना केली व असेंब्लीच्या सभासदत्वाचा राजीनामा दिला. १९२५ मध्यें हे कानपूर येथें भरलेल्या हिंदुमहासभेच्या जादा अधिवेशनाचे अध्यक्ष होते. १९२६ मध्यें हे प्रतिसहकारपक्षातर्फे मध्यवर्ती असेंब्लींत पुन्हां निवडून गेले. १९२८ मध्यें हे दिल्ली येथें दलितोद्धार-परिषदेचे अध्यक्ष होते. यांनीं पुन्हां असेंब्लीचा राजीनामा दिला. पेण येथें कॉंग्रेस शिबिरांत झेंडावंदन केलें व जाहीर रीतीनें कायदेभंग केला (१९३०). १९३२ मध्यें यांच्या षष्ठ्यब्दपूर्तीकरितां महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं सन्मान करण्यांत आला. १९३२ मध्यें हे तिसऱ्या गोलमेज परिषदेला गेले होते. पुढें कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाची स्थापना करून त्याचे अध्यक्ष झाले. केसरी संस्थेंतून निवृत्त होऊन व 'केसरी'च्या ट्रस्टी पदाचाहि राजीनामा देऊन त्यांनीं मरेपर्यंत अव्याहत लेखन-वाचन केलें. ते अनेक संस्थांना विविध प्रकारें मदत करीत. महाराष्ट्रांतील कोठल्याहि क्षेत्रांत ते अग्रस्थानीं दिसत. त्यांना लोकांनीं दिलेली 'साहित्यसम्राट्' ही पदवी खरोखरीच सार्थ होती. त्यांचें लिखाण अनेक विषयांवर हजारों पृष्ठांचें भरेल इतकें आहे, 'सह्याद्रि' मासिकाचे ते शेवटपर्यंत संचालक होते,

त्यांना मृत्युहि सुखानें आला. एका रात्रींत थोडा आजार येऊन ते कालवश झाले. लो. टिळकांनंतर महाराष्ट्रांत यांच्याइतका मोठा माणूस नव्हता.

**केळवें-माहीम**—मुंबई, ठाणें जिल्ह्यामधील तालुक्याचें मुख्य ठिकाण. बी. बी. सी. आय्. रेल्वेच्या फांट्यावर पालघर म्हणून जें स्टेशन लागतें, त्याच्या पश्चिमेस सुमारें ५॥ मैलांवर हें ठिकाण आहे. येथील लोकवस्ती सात-आठ हजार आहे. केळवें-माहीम यांपैकीं केळवें या बंदराजवळ एक किल्ला आहे. केळवें-माहीम या ठिकाणीं मोठमोठ्या बागा असून येथें केळीं, ऊंस, सुंठ व सुपारी यांचा मोठा व्यापार आहे.

**कैओमूर्स**—हा इराणी राष्ट्राचा आद्य संस्थापक होय. याला गिल शहा ऊर्फ जगाचा राजा अशी पदवी होती. त्यानें आपली राजधानी बल्ख येथें स्थापली. त्यानें आसपासच्या रानटी जातींना सुधारण्याचा फार प्रयत्न केला. त्यांत दीवे नामक रानटी लोकांनीं त्याला विरोध केला व उभय पक्षांत झालेल्या लढाईंत कैओमूर्सचा मुलगा सायमेक मारला गेला. तथापि सायमेकचा मुलगा हौषेंग यानें अखेर दीवेचा पराभव केला. नंतर लवकरच कैओमूर्स मरण पावून त्याचा नातू हौषेंग राजा झाला. याच्याच कारकीर्दींत इराणी लोकांनीं अग्निपूजा स्वीकारली. हौषेंगनंतर थमौरस राजा झाला, पण त्याबद्दल विशेष माहिती नाहीं.

**कैकऊस**—इराणचा एक पौराणिक राजा. त्यानें पुष्कळ वर्षे राज्य केलें. तो दुर्बल व लहरी असल्यामुळें राज्याचें रक्षण करण्यास रुस्तुम व इतर प्रमुख सरदार नसते तर इराणच्या साम्राज्यावर कांहीं तरी संकट खास ओढवलें असतें. कैकऊसच्या साम्राज्यांतील सीरिया या भूमध्य समुद्राकांठच्या प्रांतांतील लोकांनीं बंड करून स्वातंत्र्य पुकारलें. कैकऊसनें लागलीच मोठ्या सैन्यानिशीं या लोकांवर स्वारी करून त्यांचें बंड मोडलें, व सीरियाच्या राजाची मुलगी सौदाबेह हिच्याशीं तिच्या बापाच्या मर्जीविरुद्ध विवाह केला. त्याचा सूड म्हणून एका मेजवानीच्या प्रसंगीं सीरियाच्या राजानें कैकऊसला कैद करून एका मजबूत किल्ल्यांत अंधाऱ्या भुयारांत टाकलें व शिवाय इकडे सैन्यानिशीं इराणवर स्वारी केली. याच वेळीं दुसऱ्या बाजूनें इराणचा दुसरा शत्रु तुराणचा राजा आफ्रासिआब यानें इराणवर स्वारी केली व सीरियाच्या सैन्याचा पराभव करून इराण जिंकून घेतला. अशा भयंकर संकटांतून राष्ट्राला व राजाला सोडविण्याची अत्यंत अवघड कामगिरी सिस्तानच्या शूर व थोर घराण्यांतील सुप्रसिद्ध पुरुष झाला व रुस्तुम यांनींच केली.

**कैकयी**—अयोध्येच्या दशरथ राजाच्या तीन महाराण्यांतील एक. ही केकय देशाच्या अश्वपति राजाची कन्या असून आपल्या पतीस अतिशय प्रिय असे. एकदां लढाईंत ही दशरथ राजास फार उपयोगी पडली होती. दाशरथी रामास अरण्यवास आणि दशरथास मृत्यु, असे प्राप्त होण्यास हीच कारण झाली होती. हिचा पुत्र भरत. दुष्ट, कजाग स्त्रीस कैकयीची उपमा देतात.

**कैकाडी**—या जातीची वस्ती कर्नाटक व दक्षिण महाराष्ट्र यांत विशेषतः आहे. लो. सं. सु. दहा हजार. यांची भाषा तेलगू-कानडी मिश्रित आहे. दरवडेखोरी व मुशाफरी यांचा पिढीजात व्यवसाय अद्यापहि चालू असून भामटे व लमाण वगैरे गुन्हेगार या जातींत शिरले आहेत. यांच्यांत धनताळे, कामाठी, लमाण, उरूकैकाडी, भामटे, माकडवाले, वगैरे नऊ पोटजाती आहेत. यांचा धंदा माकडें घेऊन फेरी करणें, टोपल्या करणें, जादुगिरी करणें, खिसे कातरणें, किंवा अशाच स्वरूपाचा असतो. शिवाय पक्षी व हरीण पकडण्याचीं जाळीं, पक्ष्यांचे पिंजरे, मुलांचीं खेळणीं तयार करणें, वगैरे धंदेहि कैकाडी लोक करतात. टोपल्यांत साप दाखवून कांहीं लोक भिक्षा मागतात. वाळू, माती, कोळे, विटा, वगैरे गाढवांवर लादून ने-आणीचें काम कांहीं लोक करतात; व कांहीं शेती व मजुरी करतात. हे लोक हिंदु देवता—बहिरोबा, भवानी, तुकाई, यमाई, वगैरे—ची उपासना करतात; व सोनेरीचा बहिरोबा, जेजुरीचा खंडोबा, तुळजापूरची भवानी व मारुति यांना कुलदेवता मानतात. हिंदूंचा वारसा कायदा पाळतात. गोसावी यांचे धर्मगुरु असून शकुन, जादूगिरी, चेटूक, कौल इत्यादिकांवर याची श्रद्धा असते. बकरें, हरिण, ससे, डुक्कर, वगैरे मारून खातात व दारू पितात. विधवाविवाह व काडीमोड या जातींत आहे. वऱ्हाड-मध्यप्रांतांतहि यांची वस्ती आहे.

**कैकुबाद** (१२८६-८८)—दिल्लीच्या गुलाम (मुसलमान) घराण्यांतील एक सुलतान. दारू व बायका यांच्या विलासांत हा फार दंग असे. तेव्हां जलालुद्दीन खिलजी नांवाच्या सरदारानें आपला पक्ष प्रबळ करून एके दिवशीं कैकुबाद विलासांत दंग असतां त्यास ठार मारून त्याचें प्रेत खालीं यमुनेंत फेंकून दिलें व आपण तक्त बळकावलें व गुलाम घराण्याचा शेवट केला.

**कैकोलन**—ही कोष्टी जात बहुतेक मद्रास इलाख्यांत असून लो. सं. ३,७३,२९७ (,१९११.) आहे. ते तेलगू भाषा बोलतात. संस्कृत वीरबाहु शब्दाचा समानार्थी तामीळ शब्द कैकोलन असा आहे, व हे वीरबाहु हाच आपला मूळ पुरुष मानतात. कै म्हणजे हात व कोल म्हणजे धोटा अशी कैकोलनची व्युत्पत्ति आहे. ताणा म्हणजे नारद, फलक म्हणजे ब्रह्म, पावटी हा वेदमुनि, इत्यादि प्रकारें हातमागाच्या विविध भागांना हे लोक देवता व ऋषी मानतात. यांच्या कित्येक पोटजाती असून बहुतेक

कैकोलन शैव असून कांहीं लिंग धारण करतात व कांहीं वैष्णव आहेत. कैकोलन जातीचे नाडू अथवा देश ७२ असून सर्व नाडूंचे वरिष्ठ ४ थिसाईनाडू असतात, व सर्वांत वरिष्ठ कांजीवरम्चा नाडू असतो. आपला पूर्वापार कोष्टयाचा धंदा सोडून सध्यां शेती, व्यापार, गाडी हांकणें, हमाली करणें वगैरे धंदे यांनीं स्वीकारले आहेत. प्रत्येक कुटुंबांतील एक मुलगी देवास वाहण्याची चाल यांच्यांत रूढ असून अशा दासी केलेल्या व देवास वाहिलेल्या मुलींना नृत्य-गीत शिकवतात. पुनर्विवाहाची चाल यांच्यांत आहे. गंगम्मा देवीप्रीत्यर्थ तिरुपति येथें मोठा वार्षिकोत्सव हे लोक करतात.

**कैटभ**—कैटभ आणि मधु या नांवाचे दोन क्रूर दानव होते. विष्णु निद्रित असतां त्याच्या कानापासून हे दानव निर्माण झाले. विष्णूनें दोघांनाहि ठार केल्यामुळें त्यास कैटभजित् व मधुसूदन अशीं अभिधानें मिळालीं. या दानवांच्या मेदानें भरलेली म्हणून पृथ्वीस मेदिनी असें नांव आहे.

**कैद**—अटक. एखाद्यावरच्या आरोपाची चौकशी न्यायालयांत होईल, तेव्हां तो उपस्थित असावा म्हणून त्याच्या स्वातंत्र्यावर जें नियंत्रण घालण्यांत येतें त्यास इंग्रजींत ॲरेस्ट म्हणतात. इंग्लंडांत हल्लीं असा कायदा आहे कीं, दिवाणी दाव्यांत सामान्यतः रिणकोला कैद करतां येत नाहीं. मात्र 'ऋणको कायद्या' प्रमाणें, किंवा 'कोर्टाचा अपमान' या गुन्ह्याबद्दल कैद करतां येतें, आणि त्याकरितां न्यायाधिशानें लेखी हुकूम द्यावा लागतो. फौजदारी कायद्याप्रमाणें पोलिसांना वॉरंट काढून आरोपींना पकडतां येतें. शिवाय मोठ्या स्वरूपाचा गुन्हा घडत असतांना जे सामान्य नागरिक येथें हजर असतील अशा कोणाहि खासगी गुन्हेगार इसमाला कैद करून पोलिसाच्या ताब्यांत देण्याची मोकळीक असते. इतकेंच नव्हे तर तसें करणें त्याचें कर्तव्य असतें. सामान्यतः अशा वेळीं पोलिसची मदत मिळविण्याचा प्रयत्न प्रथम करावा. कोणा इसमाला अयोग्य अटक झाली आहे, असें वाटत असेल तर त्यांतून सुटका करण्याकरितां 'मॅग्ना चार्टा' आणि 'हेबियस कॉर्पस ॲक्ट' या कायद्यानें अर्ज करून दाद मागण्याचा हक्क प्रत्येक प्रजाजनाला दिलेला आहे. हिंदुस्थानांत पन्नास रुपयांपेक्षां जास्त रकमेच्या वसुलीकरितां हुकूमनामा असेल तर जजमेंट–डेटरला सहा महिनेपर्यंत दिवाणी तुरुंगांत ठेवतां येईल. त्याहून कमी रकमेकरितां किंवा दुसऱ्या कोणत्या प्रकारच्या हुकूमनाम्यांत फक्त सहा आठवडेपर्यंत दिवाणी तुरुंगांत अडकवतां येईल. (सि. प्रो. कोड कलम ५८). फौजदारी गुन्ह्यांत कैद करण्याचा पोलिसांना रीतसर अधिकार असतोच.

**कैफियत**— कायदे कोर्टांत प्रतिवादी किंवा आरोपी आपल्यावर दावा किंवा खटला शाबीत होऊं नये, म्हणून कोर्टाला आपलें म्हणणें लेखी कळवितो, त्याला कायद्यांत सामान्यतः डिफेन्स किंवा कैफियत असें म्हणतात. दिवाणी कायद्यांत यालाच प्रतिवादीची कैफियत (रिटन स्टेटमेंट), आणि फौजदारी कायद्यांत आरोपीचा जबाब (स्टेटमेंट ऑफ दि ॲक्युज्ड) असें म्हणतात. अशा लेखांत वादीच्या किंवा फिर्यादीच्या प्रत्येक म्हणण्याचा स्पष्ट इन्कार करावा लागतो, व स्वतःची बाजू किंवा म्हणणें स्पष्टपणें कोर्टाला कळवावें लागतें.

**कैफंग**—चीन देशांतील होनान प्रांताची राजधानी. लो. सं. सुमारें दोन लाख. बहुतेक मुसलमान धर्माचे आहेत. एक लहान चिनी ज्यूवसाहत येथें आहे.

कैफंग शहर होअंगहो नदीच्या दक्षिणेस कांहीं मैलांवर असून त्याला पुरानें वाहून जाण्याची बरीच भीति आहे. १६४२ त महापुरानें या शहराचा फार नाश झाला. हें शहर मोठें आहे. रस्ते रुंद असून बऱ्याच प्रेक्षणीय इमारती आहेत. येथील मोठी प्रसिद्ध इमारत म्हणजे बारा मजली मंदिर ही होय. याची उंची ६०० फूट आहे. तसेंच एक २०० फूट उंचीचा पहाऱ्याचा बुरुज आहे. तसेंच या शहराच्या आसमंतांतील प्रदेशांत चिनी लोकांनीं अति प्राचीन काळीं केलेल्या वसाहतींपैकीं एक वसाहत होती. यामुळें कैफंगला एका तऱ्हेचें महत्त्व आलें आहे. चीन देशांत आलेले यहुदी लोक १६६३ सालीं याच शहरीं प्रथम येऊन राहिले.

**कैय्यट** (११ वें शतक)—एक काश्मिरी पंडित व पतंजलीच्या महाभाष्याची टीका असलेल्या 'महाभाष्यप्रदीप' या ग्रंथाचा कर्ता. कैय्यट काश्मीरच्या अजितापीड राजाचा समकालीन होता. काव्यप्रकाशकार मम्मट हा याचा भाऊ होय.

**कैलास**—तिबेटांत मानस सरोवराच्या उत्तरेस २१,८३० फूट उंचीचा हा पर्वत आहे. हिंदू याला मेरु पर्वत समजतात.

शिव–पार्वतीचें निवासस्थान म्हणून कैलासपर्वत हिंदूंना पूज्य वाटतो. वस्तुतः हा पर्वत शिखरविरहित हिंदु देवळांप्रमाणेंच किंचहुना लिंगाच्या आकाराचा दिसत असल्यानें त्याचा शिवाशीं संबंध जोडून दिला असावा. कैलासावर कुबेरहि राहतो असा पुराणांत उल्लेख आहे. याला गणपर्वत व रजतगिरि अशीं नांवें आहेत.

**कैवर्त जात**— ('केवट' पहा). यांची वस्ती बंगाल, बिहार, ओरिसा व आसाम प्रांतांत आहे. कैवर्त हे फार प्राचीन काळचे अनार्य लोक आहेत. कैवर्त लोकांच्या धंद्यावरून चासी कैवर्त–शेतकी करणारे, आणि जालिया कैवर्त–मासे धरण्या–विकण्याचा धंदा करणारे अशा दोन पोटजाती आहेत. सुशिक्षित

व सुधारक चासी कैवर्त यांना माहिष्य हें नांव आहे, व ते इतर कैवर्तांना हलक्या जातीचे मानून त्यांच्याशीं लग्नसंबंध करीत नाहींत. लो. सं. (१९११) ३,७५,९३६ जलिया कैवर्त, २२,३१,२१८ चासी कैवर्त व १,०४,८०६ इतर कैवर्त आहेत.

**कैशोरकगुग्गुळ**—एक आयुर्वेदीय औषध. यांत त्रिफळा, गुळवेल, गुग्गुळ, त्रिकटु, वावडिंग, हीं मुख्य औषधें आहेत. वातरक्त, अंगावर फोड येणें, प्रमेहपीटिका, उदर-रोग, भूक न लागणें, तोंडाला अरुचि असणें, खोकला, रक्तहीनता, सर्वांगावर सूज असणें, इत्यादि विकारांवर हा गुग्गुळ उपयोगी आहे. सर्व लक्षणांमध्यें वाताचा जोर जास्त असावा लागतो. १ ते २ गोळ्या, गरम पाणी, दूध किंवा मंजिष्टादि काढ्याबरोबर घेतात.

**कैसर**—बादशहा या अर्थाचा हा जर्मन भाषेंतला सीझर संज्ञेचा रूपांतरित शब्द आहे. कैसर ही पदवी प्रथम ९६२ ते १८०६ पर्यंतच्या जर्मन आणि ऑस्ट्रियन बादशहांनीं आपल्याला लावली होती. फ्रँको-प्रशियन युद्धानंतर १८७१ मध्यें प्रशियाचा राजा १ ला विल्यम यानें जर्मन बादशहा म्हणून कैसर ही पदवी धारण केली आणि ही पदवी जर्मन बादशहाच्या होहेनझोलर्न राजघराण्यांत १९१८ सालांतील राज्यक्रान्तीपर्यंत चालू होती.

**कोइनिग, कार्ल रुडॉल्फ** (१८३२-१९११)—एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. कोइनिग्जबर्ग विद्यापीठांत पी.एच्. डी. होऊन १८६२ सालीं पॅरिस येथें प्रसिद्ध सारंगीकार जे. बी. व्हुइलाम याच्या हाताखालीं त्यानें कांहीं काल काम केलें. नंतर सहा वर्षांनीं स्वतःचा धंदा सुरू करून संगीत चिमटे (ट्यूनिंग फोर्क) तयार केले व त्यामुळें त्याची जगभर प्रसिद्धि झाली. त्याच्या वस्तू अगदीं शास्त्रशुद्ध असत. ध्वनिशास्त्रांतील शोध लावणें हा त्याचा आवडता विषय असून त्यानें ध्वनिशास्त्रांतर्गत कित्येक उपयुक्त यंत्रें तयार केलीं. १७६२ सालीं लंडन येथील प्रदर्शनांत त्याला सुवर्णपदक मिळालें; १८७६ सालीं फिलाडेल्फियाच्या प्रदर्शनात त्यानें आपलें स्वरमापक यंत्र ठेवलें, त्यांत त्यानें ६७० संगीत चिमटे वापरले होते. या यंत्रांत १२८ ते ४०९६ प्रकंपनें (दर सेकंदास) मापलीं जात असत. नंतर त्यानें तें सुधारून नवें यंत्र केलें, त्यांत १६ प्रकंपनांपासून ऐकूं न येतील इतकीं प्रकंपनें मापलीं जाण्याची योजना केली.

**कोइंबतूर**—मद्रास, दक्षिणेकडील एक जिल्हा. क्षे. फ. ७,१२१ चौ. मैल व लो. सं. २८,०९,७४८. यांत वेल्लाळ (शेतकरी), किलियान (चांभार), शानान (ताडी काढणारे), ओड्ड (माती काम करणारे) व ब्राह्मण असे वर्ग आहेत. शिवाय डोंगराळ प्रदेशांत शोळग व मळसर या रानटी जाती आहेत. या जिल्ह्यांत खरीप व रब्बी दोन्ही पिकें, चोलम, कंबू, तांदूळ, कापूस, तमाखू, ऊंस, कॉफी, वगैरे होतात. येथे मेंढ्या, बकऱ्या, घोडे, अलंबडी, बरगूर, कोंगयम वगैरे गुरेंढोरें आहेत. जंगलांत साग, शिसू, व मध, मेण, चामडीं कमावण्यास लागणाऱ्या सालीचीं झाडें आहेत. लोखंडाच्या रेतीपासून लोखंड व सोनें या धातू आणि सोरा व पन्ना नांवाचा मौल्यवान् दगड सांपडतो. यांत १० तालुके आहेत.

कोइंबतूर तालुक्याचें क्षे. फ. ५२० चौ. मैल व लो. सं. सु. तीन लाख. कोईमतूर शहर या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. १,३०,३४८ आहे. हें १३०० फूट उंचीवर फार हवेशीर ठिकाण आहे. येथें कापसाच्या गिरण्या, कातडीं कमावण्याचे कारखाने, खत तयार करण्याचे व सोरा शुद्ध करण्याचे वगैरे अनेक कारखाने आहेत. तलम सुताच्या व जरीच्या कापडाची पैदास येथें पुष्कळ होते.

**कोइरी**—एक शेतकरी जात. बिहार, ओरिसा, संयुक्तप्रांत, बंगाल, व आसाम यांमध्यें असून लो. सं. (१९११) १७,६६,७९६ आहे. कोइरी, कोरी हा शब्द कृषिकारी यावरून झाला असावा. कूर्मी जातीशीं यांचें बरेंच साम्य असून त्यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो. यांच्या कनौजिया, इलाहाबादी, ब्रिजवासी, पुरभैया, बनारसीया, कच्छवाह, भक्तिया, साक्रिया, वगैरे १४० पोटजाती आहेत. यांचा लग्नविधि ब्राह्मण चालवितात. हे लोक वैष्णव संप्रदायांचे आहेत. भक्त नांवाच्या पोटजातीचे लोक शाकाहारी आहेत. हे लोक शेती उत्तम करतात. व सर्व प्रकारचीं धान्यें, भाजीपाला, तमाखू, वगैरे पिकें काढतात. ही जात मोठी उपयोगी, सुशील व स्वावलंबी आहे. भक्त नांवाच्या पोटजातीखेरीज इतर जाती मांसाहारी आहेत, पण प्रयागा या पोटजातीखेरीज इतर जाती दारू पीत नाहींत. त्यांच्या सामाजिक चारित्र्यांत बरीच शुद्धता आढळून येते.

**कोक**—दगडी कोळशाचें बऱ्याच उष्णतेच्या प्रमाणांत ऊर्ध्वपातन केल्यानंतर हा पदार्थ मिळतो. झांकलेल्या भट्टींत ऊर्ध्वपातन करतात. कोकमध्यें मुख्यतः कर्ब व राख यांशिवाय इतर द्रव्येंहि थोड्या प्रमाणांत असतात. कोकचा उपयोग मोठ्या भट्टींतील जळणासाठीं करतात. कधीं घरच्या स्वयंपाकासाठीं वापरतात. पण याची उष्णता फार असते.

**कोक**—हा एक काश्मिरचा दिवाण होता. यानें संभोगशास्त्रावर 'कोकशास्त्र' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे.

**कोकटनूर, डॉ. वामन रामचंद्र** (१८८६— )—एक महाराष्ट्रीय रसायनशास्त्रज्ञ. १९११ सालीं मुंबई

विद्यापीठाची बी. एस्सी. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर रसायनशास्त्रज्ञ म्हणून यांनीं कांहीं दिवस पुण्याच्या 'रानडे इन्डस्ट्रिअल इन्स्टिटयूट' मध्यें काम केलें व नंतर हे कॅलिफोर्निया विद्यापीठांत पुढील शिक्षणासाठीं दाखल झाले. मिनेसोटो विद्यापीठांत एम्. एस्. व पीएच्. डी. घेतल्यावर यांनीं तेथेंच कांहीं वर्षें शेवलीन फेलो व संशोधक मदतनीस म्हणून काम केलें. कांहीं काल हे मॅथिलिन अल्कली वर्क्सचे संशोधक रसायनज्ञ व नायगरा अल्कली कंपनीच्या संशोधन-खात्याचे प्रमुख होते.

१९२८ सालीं व १९३८ सालीं रशियाच्या पुनर्रचनेच्या वेळच्या पंचवार्षिक योजनेंत यांना सोव्हिएट अधिकाऱ्यांनीं रसायन-सल्लागार म्हणून नेमलें होतें. तसेंच सन १९३०-३१ मध्यें धांगध्रा येथील 'श्रीशक्ति अल्कली वर्क्स' चे शिल्पविद्यामंत्री म्हणूनहि यांनीं काम केलें. 'एरोप्लेन डोप सॉल्व्हंट' व 'व्हॅट डाइज' तयार करणारे हेच होत. युद्धोपयोगी वायूंची निर्मिति हेंहि यांच्या श्रमाचेंच फळ होय.

लेस्टर ऑफ हैम या धनिक गृहस्थांच्या साहाय्यानें न्यूयार्कमध्यें यांनीं आपली प्रयोग-शाळा स्थापन केली. अमेरिकेच्या केमिकल वॉरफेअर सार्व्हिसमध्यें हे कॅप्टनच्या हुद्यावर होते. सन १९२८-३२ या कालांत हिंदुस्थानांतील अमेरिकन व्यापारी व वकील यांचे हे सल्लागार होते. यांचे कांहीं इंग्रजी ग्रंथहि आहेत.

(१) हिंदुस्थानांतील रासायनिक युद्धाची प्राचीनता, (२) प्राचीन हिंदुस्थानांतील अग्न्यस्त्रें आणि बंदुकीची दारू यांचा शोध, (३) विश्वोत्पत्तीची प्राचीन हिंदूंची कल्पना, (४) रसायनशास्त्राच्या उत्पत्तीचा चित्रलिपीय शोध, हे या विषयांचे यांचे सुप्रसिद्ध ग्रंथ होत.

**कोंकण**— सामान्यतः दमणगंगा नदीच्या दक्षिणेकडील व सह्याद्रीच्या पश्चिमेकडील प्रदेश कोंकण होय. कोंकणांत हल्लीं मुंबई शहर, ठाणें, कुलाबा व रत्नागिरी हे तीन जिल्हे; उत्तर कानड्याची पट्टी; जंजिरा व सावंतवाडी हीं संस्थानें; व गोवें प्रांत; इतक्यांचा समावेश होतो. या प्रदेशाची रुंदी २५।३० मैल व लांबी सुमारें ३२० मैल असून लो. सं. सुमारें ५८ लाख आहे. कोंकण, सप्तकोंकण, अपरान्त व शूर्पारक (हल्लींचें सोपारा, वसईनजीक बी. बी. सी. आय्. रेल्वेचें स्टेशन) यांचा उल्लेख प्राचीन संस्कृत ग्रंथांत अनेक ठिकाणीं आला आहे. 'अपरान्त' यांची व्युत्पत्ति, अपरा म्हणजे पश्चिम दिशा, तिचा अंत जेथें होतो (पुढें समुद्र लागतो म्हणून) तो प्रदेश, अशी आहे. पण 'कोंकण' याची समाधानकारक व्युत्पत्ति नाहीं. एक व्युत्पत्ति अशी कीं, चेर देशास कांग किंवा कोंग असें जुनें नांव असून या नांवाचें राजघराणेंहि होतें, त्यावरून 'कोंगवत' हा शब्द बनला व त्यापासून 'कोंकण' शब्द झाला. महाभारतांत अपरांत व कोंकण (भी. प., अ. ९) आणि शूर्पारक (शां. प., अ. ४९.), हरिवंश व विष्णुपुराण यांत कोंकण, बौद्ध वाङ्मयांत शूर्पारक, बृहत्संहितेंत (१४·१२) सप्तकोंकण, दशकुमारचरितांत कोंकण, रघुवंशांत अपरांत, राजतरंगिणींत व चालुक्यांच्या शिलाशासनांत सप्तकोंकण, इत्यादि उल्लेख प्राचीन वाङ्मयांत असून परदेशीय प्रवासी व ग्रंथकार पेरिप्लस, टॉलेमी, प्लिनी, स्ट्रॅबो, अल्बेरुणी, यांनीं कोंकण व तेथील बरुगझ (भरुकच्छ=भडोच), कालिएन (कल्याण), ओपार (सोपारा), सेमुल्ल (चेऊल), झिझेरस (जंजिरा), इत्यादि नांवांचा उल्लेख केला आहे. या उल्लेखांवरून कोंकण हा प्रदेश प्राचीन काळापासून उत्तर हिंदुस्थानांत व ग्रीस-ईजिप्तपासून चीनपर्यंत सर्वत्र माहीत होता, असें दिसतें.

भूप्रदेश—कोंकणांतील समुद्रानजीकचा प्रदेश सुपीक व दाट वस्तीचा, आणि सह्याद्रीच्या पायथ्याचा प्रदेश डोंगराळ, खडकाळ व विरळ वस्तीचा आहे. सर्वत्र पाऊस सरासरी १०० इंच व सह्याद्रीच्या पायथ्याशीं त्याहून अधिक पडतो; त्यामुळें अवर्षण व दुष्काळ यांची भीति कधीं नसते. मुंबईच्या उत्तरेकडील प्रदेश सखल व वालुकामय असून नद्या उथळ व बंदरें कमीं महत्त्वाचीं आहेत. मुंबईच्या दक्षिणेकडील किनारा चांगला, नद्या व खाड्या पुष्कळ व बंदरें मोठीं आहेत. किनाऱ्यानजीक पाव मैलाच्या आंत समुद्रांत अर्नाळा, कुलाबा, दंडाराजापूर, सुवर्णदुर्ग, जंजिरा, खांदेरीउंदेरी वगैरे लहान लहान खडकाळ बेटें असल्यानें त्यांवर मराठी साम्राज्यांत मजबूत किल्ले बांधले गेले व त्यांना महत्त्व आलें. येथें भात हें मुख्य पीक असून नारळ, सुपारी, कलमी आंबे, काजू, फणस, कोकंब, शाकभाज्या, केळीं, ताडमाड, नागली, वरी, वाल हीं पिकें होतात. वाघ, चित्ते, सर्प हे प्राणी फार आहेत. पर्वताच्या पायथ्याशीं हिंवतापाचा रोग विशेष होतो.

लोक—येथें मुख्यतः वस्ती महाराष्ट्रीय ब्राह्मण व कुणबी यांची असून ते बहुतेक शेतकी करीत. पेशवाईंत कांहीं लोक लष्करी पेशांत शिरले. अलीकडे ब्रिटिश सरकारी नोकरींत सुशिक्षित वर्ग शिरला, व अशिक्षित कोंकणी मुंबईंत गिरणी मजूर झाले. कोंकणांतील गांवें फार लहान ५०० ते १००० वस्तीचींच पुष्कळ आणि १५ हजारावर वस्तीचीं मोठीं गांवें क्वचित्. दक्षिण कोंकणांत बंदरें सोयीचीं असल्यामुळें प्रथम अरबांचा, नंतर पोर्तुगीजांचा उपसर्ग कोंकणाला फार झाला व अनेक लोक अतिशय जुलमानें बाटवून मुसलमान व खिस्ती करण्यांत आले. पारशी व बेनेइस्रायल यांचें आगमन फार महत्त्वाचें गणलें जातें. बेनेइस्रायल व पारशी बहुतेक उत्तर कोंकण व मुंबईंत राहतात. पारशांनीं व्यापारांत पुढाकार मिळवून त्यांपैकीं बहुतेक फार श्रीमंत बनले. प्राचीन ईजिप्शियन लोकांचा, अरबांचा व प्राचीन रोमन

लोकांचा व्यापार हिंदुस्थानशीं असे, व येथून तांदूळ व इतर धान्यें, तिळाचें तेल, जाड व बारीक कपडा, साखर, पितळ, लांकूड, वगैरे माल परदेशीं जात असे.

इतिहास—बौद्ध किंवा ब्राह्मणी लेणीं व खोदकामें ठाणें जिल्ह्यांत कान्हेरी, कोंदिवटें, जोगेश्वरी, मंडपेश्वर, मागाठण, घारापुरी, करंज, जंबुग, कोंडाणें व चंदनसार येथें; कुलाबा जिल्ह्यांत पाल व कुडा येथें; आणि रत्नागिरी जिल्ह्यांत चिपळूण, खेड, दाभोळ, संगमेश्वर, गव्हाणें, वेळगांव, वाडेपाडेल येथे असून त्यांतील शिलालेखांवरून पुष्कळ लेणीं बौद्ध धर्मीयांचीं आहेतसें दिसतें; व त्यांतील राजांचीं नांवें व इतर मजकूर यांवरून बरीच माहिती मिळते. कोंकणांत खि. पू. ३ ऱ्या शतकांत मौर्यांचा अमल, इ. सनाच्या पहिल्या शतकांत शातवाहनांचें राज्य, ४ थ्या शतकांत कलचुरी घराण्याचा अमल, ६ व्या ते ९ व्या शतकापर्यंत चालुक्यांचें राज्य व नंतर शिलाहारांचा अमल इ. स. १२६० पर्यंत होता, असें शिलालेखांवरून दिसतें. अशोकाची या भागाची राजधानी सोपारें, मौर्यांची व शिलाहारांची राजधानी पुरी (हल्लींचें घारापुरी किंवा त्याच्या शेजारचें मोरें बंदर असावें) होती, व संजाण, ठाणें, चौल, लेनाड, चमुली, उरण, वगैरे प्रमुख ठिकाणें होत. १३४७ पर्यंत देवगिरीच्या यादवांचा अमल कोंकणावर होता. नंतर मुसलमानांच्या ताब्यांत हा प्रदेश गेला; १६ व्या शतकांत पोर्तुगीजांनी सुरत ते गोंव्यापर्यंत अनेक बंदरें व आसपासचा प्रदेश आदिलशाहीच्या मुसलमान राजांकडून व दिल्लीच्या मोंगल बादशहांकडून कांहीं वेळां लढून व बहुतेक तडजोडीनें नजराणे देऊन व फिरंगी नाटकशाळांमार्फत तह घडवून मिळवला. पोर्तुगीजांचा अंमल १५०२ ते १६६३ पर्यंत बराच होता. त्यांचा मोड शिवाजी व संभाजी, बाजीराव व चिमणाजीआप्पा यांनी केल्यामुळें १७४० सालीं त्यांची सत्ता मावळली.

कोंकणांतील मुसलमानी व पोर्तुगीज सत्तेला प्रतिकार करण्याचें कार्य शिवाजीनें १६५१ पासून सुरू करून प्रतापगड, रायगड, विजयदुर्ग वगैरे ८-१० किल्ले बांधले. संभाजी व शाहू यांनीं १७४० पर्यंत पोर्तुगीजांची सत्ता नाममात्र केली, व कोंकणावर मराठी राज्याचा अमल कान्होजी आंग्रे याच्यामार्फत उत्तम बसवला व तो नाना फडणीसांनी कायम ठेवला. पण रघुनाथराव व दुसरा बाजीराव यांच्या कारस्थानामुळें इंग्रजांचें वर्चस्व वाढत जाऊन १८१८ सालीं कोंकण इंग्रजांनीं घेतले व आंग्रे व सावंतवाडीकर त्यांचे मांडलिक झाले. १८४० सालीं आंग्रे निपुत्रिक वारल्यामुळें त्यांचें संस्थान खालसा झालें.

**'कोंकणस्थ वैश्य**— हा समाज वैदिक त्रैवर्णिकांपैकीं असून त्यांची मूळ वस्ती गोदावरीतीरीं मुंगीपैठण येथें होती. दुर्गादेवीच्या दुष्काळांत यांची पांगापांग होऊन कांहीं वैश्य कोंकणांत गेले, व त्यांना हें नांव पडलें. दापोली, खेड, चिपळूण, संगमेश्वर, राजापूर, कोल्हापूर, मलकापूर, महाड, माणगांव, रोहें, अलीबाग येथें यांची वस्ती असून अलीकडे मुंबईंतहि आहे; तेथें १० हजारांवर वस्ती असून त्यांची एकंदर लो. सं. एक लक्षावर आहे. या समाजाचा साद्यन्त इतिहास पूर्ण उपलब्ध नाहीं; कारण या व्यापारी वर्गानें मराठेशाहींत व पेशवाईंत राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेतला नाहीं. तथापि मुसलमानी, मराठे व पेशवाई अमदानींतील सरकारी कागदोपत्री उल्लेखांवरून या समाजानें त्या काळांत वरील प्रमुख गांवीं आपला जम चांगला बसवला होता, व प्रमुख व्यापारी वैश्यच होते, असें दिसतें. अलीकडे मुंबईंत हे लोक छापखाना व तमाखू या धंद्यांत शिरून चांगले नांवारूपास आले आहेत, व जुने संस्कृत ग्रंथ छापून त्यांनीं वाङ्मयसेवा केली आहे. त्यांनीं मुंबईंत आपल्या समाजाच्या उन्नतीकरितां 'वैश्य विद्यावर्धक समाज', 'वैश्य विद्यार्थीसंघ' वगैरे संस्था व वैश्यज्ञातिफंड व सासवनें येथें वैश्य विद्याश्रम स्थापला आहे.

**कोंकणी**—हें प्रादेशिक नांव असून त्यांत गुरव, न्हावी, शिंपी, गवळी, कुंभार, सुतार, लोहार, चांभार, वगैरे अनेक जाती येतात. यांची वस्ती कानडापासून गुजराथेपर्यंत आहे, व त्यांच्या भाषेंत मराठी व गुजराथी यांचें मिश्रण आहे. लो. सं. सुमारें पाऊण लाख. यांच्यांत बहुपत्नीत्वाची व विधवाविवाहाची चाल आहे. ब्रह्मा व वाग्देव यांची पूजा हे लोक करतात. त्यांना ब्राह्मण उपाध्याय लागत नाहीं. गुजराथ ते कानडापर्यंत यांचा मुख्य धंदा शेती हा आहे. त्रावणकोर येथें यांचा सर्वसाधारण धंदा व्यापार आहे, व यांचे वैवाहिक विधी ब्राह्मणांसारखे आहेत. इतर कोंकणी लोकांचे आचारविचार मराठ्यांप्रमाणें आहेत.

**कोंकणी भाषा**—कोंकणांतील भाषा ती कोंकणी हा अर्थ बरोबर असला तरी आज गोंव्यांतील भाषेला 'कोंकणी' असें विशेषत्वानें नांव आहे. सर्व कोंकण कोंकणी भाषेचें नव्हे. सह्याद्रीमुळें देश आणि कोंकण हे भौगोलिक भाग जसे पडले, तसेच भाषेचेहि पडले (देशी व कोंकणी); तथापि कोंकणांत उत्तरेस दमणपासून दक्षिणेस राजापुरापर्यंत जो प्रदेश आहे त्यांतील भाषा बहुतेक देशावरल्याप्रमाणेंच आहे; म्हणजे तिचें स्वरूप देशी आहे. हिला संगमेश्वरी किंवा उत्तर कोंकणी म्हणतात. हिच्यांत उत्तरेकडे गुजराथी व दक्षिणेकडे कुडाळी–गोमंतकी भाषांचें मिश्रण झालेलें दिसेल. राजापूर ते कारवार-

पर्यंतचा जो प्रदेश आहे त्यांत बोलल्या जाणाऱ्या पोटभापांनाच 'कोंकणी' असें नांव दिलें जातें. ही कोंकणी भापा मलबार किनाऱ्यावर खालपर्यंत पोंचली आहे. दक्षिणेकडे हिच्यावर कानडी भापेचा परिणाम झालेला आहे. अस्सल कोंकणी गोंव्यांतील साष्टी प्रांतांत तिसवाडीच्या आसपास बोलली जाते. गोमंतकी कोंकणींत बारदेसकरी, कुडाळी व मालवणी असे तीन प्रांतपरत्वें पोटभेद पडतात. गोंव्यांतलि कोंकणींत पोर्तुगीज शब्दांचा भरणा आहे तर कारवारकडे कानडी शब्दांचा आहे. कोंकणी भापा मराठीची पोटभापा नाहीं तर अगदीं स्वतंत्र आहे असें कांहीं स्वप्रांताभिमानी प्रचारक विद्वान् मानतात. पण त्याला फारसा आधार नाहीं. कोंकणी मराठीचीच एक उपभाषा किंवा बोली आहे. फादर स्टीफन्सनें या कोंकणी भाषेचें व्याकरण लिहिलें आहे. त्यानेंच बायबलमधील कथानक या भापेंत ओंवीबद्ध रचलें आहे (१५८०). कांहीं गोष्टी व गाणीं कोंकणींत आहेत. कोंकणी भापेंत पूर्वीं कांहीं कथा व नायकस्वामी, सांतबानायक, सोहिरोबा आंबिये, इत्यादि कवींनीं काव्यरचना केली आहे. गोमंतकी भापेचा नमुना पुढील थोड्या उताऱ्यावरून दिसून येईल.

इंदिरेच्यो शिरवळ्यो—( सौ. शांताबाय वर्दे ·हिणें सांगिल्ली काणी )–एक असलो म्हळपै. ताची असली एक बायल. तिचें नांव इंदिरी. ती मोटी करनखरी, पाडी, उत्रालल्लेली आसली. घोवान एक सांगल्यावर ती दुसरेंच करताली. एक फावट म्हाळपैक शिरवळ्यो खायनशो दिसल्यो. ताका सामकी गांठ लागली. सुकून सुकून ताचो सामको भातकुटो जालो. तो मरचे तडीक पावलो. शेजाऱ्यीन ताका एक दिवस विचालें, 'आरे म्हाकू, हाली तुझी सामकीच अवस्ता जाली ती कितें?' ताणें म्हळें, 'कितें सांगू? व्हडले वा, म्हाका पिडा–रोग बी कायचना. म्हाका शिरवळ्या खायनशो दिसल्यात. पणून करून घालता कोण? आम गेले करनखरक तूं वळखना?'...... इत्यादि.

**कोकनाडा**—( मूळ देशी उच्चार **काकीनाडा** असा आहे). हा तालुका मद्रासेंतील गोदावरी जिल्ह्यांत असून क्षे. फ. २९७ चौ. मैल व लो. सं. सुमारें अडीच लाख आहे. यांत काकीनाडा व सामलकोट हीं दोन शहरें व ९९ खेडीं आहेत. मुख्य पीक तांदूळ असून त्याला गोदावरीच्या कालव्याचें पाणी देतात. किनाऱ्यावर कोरिंग व इंजरम हीं बंदरें असून कोरिंगजवळ तल्लारेवू येथें जहाजें बांधण्याचें काम होतें. काकीनाडा हें जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण व बंदर फार स्वच्छ असून लो. सं. पाऊण लाख आहे. येथें सहकारी मिठागरें व इतर गिरण्या व कारखाने आहेत. वाङ्मयीन कॉलेजें व ट्रेनिंग कॉलेज, हायस्कुलें, वगैरे शिक्षणसंस्था आहेत. येथून कापूस, भुइमूग, एरंडी निर्यात होतात व रॉकेल, साखर व धातू यांची आयात होते. १८६८ सालीं स्थापन झालेला व्यापारी संघ (चेंबर ऑफ कॉमर्स) आहे.

**कोकंब**—या झाडाच्या फळांपासून कोकमसालें (आमसुलें) तयार करतात. फळें पिकल्यावर तीं फोडून बिया वेगळ्या काढतात. सालें व रस एका भांड्यांत ठेवून त्यावर बियांचा रस पिळतात. नंतर तीं सालें उन्हांत वाळवतात, व वाळल्यावर पुन्हां रसांत बुडवून पुन्हां वाळवतात. याप्रमाणें चारपांच पुटें दिल्यावर आमसुलें तयार होतात. तीं चिंचेऐवजीं भाजींत घालतात. आमसुलाचें सार व चटणी करतात. तीं पित्तशामक असल्यामुळें आजारी माणसाच्या खाण्यांत वापरतात. कोकंबाच्या बियांपासून तेल काढतात. बियांवरचीं टरफलें काढून बिया उखळात कुटतात व पाण्यांत उकळतात. तें पाणी गार झाल्यावर तेल लोण्याप्रमाणें पाण्यावर येतें. त्याच्या वड्या किंवा लहान गोळे करतात. त्याचा उपयोग आमांशावर व थंडीनें अंग फुटतें त्यावर चांगला होतो. याची तुपांत भेसळ करतात. यापासून केसांना लावण्याचें तेलहि आस्वलाची चरबी मिसळून तयार करतात.

**कोका**—(इरिथ्रॉक्सिलॉन). ह्या वर्गांतील झाडांच्या एकंदर पन्नास जाती आहेत. हीं झाडें उष्ण प्रदेशांत होतात. हिंदुस्थानांत या वर्गाच्या सहा जाती आहेत.

इ-कोका या जातीचीं झाडें दक्षिण अमेरिकेच्या निरनिराळ्या भागांत आढळतात.

इ. स. १८७० त सिलोनमध्यें कोका जातीच्या झाडांची लागवड करण्यांत आली. कांहीं जातींच्या झाडांपासून निघणाऱ्या कोकेनचें स्फटिकीभवन होत नाहीं; याकरितां झाडाची जात नीट निवडून घ्यावी लागते.

याच्या पानांतील उपक्षार (आल्कलॉइड) व क्षार हीं दोन्हीं मादक असून तीं शरीराच्या कोणत्याहि भागास लाविलीं असतां तो भाग बधिर होतो. कोकेन पहा.

**कोकिळा**—हा एक पक्ष्यांचा वर्ग असून यांच्या पायांचीं बोटें पोपटासारखीं–मधलीं दोन पुढें व बाजूचीं दोन मागें वळलेलीं असतात. या पक्ष्याचा आवाज प्रसिद्ध आहे. तो आवाज हे पक्षी परस्परांस प्रेमाची साद घालताना काढतात. यांचा आकार कावळ्याहून लहान असून रंग काळा असतो. हे वसंत ऋतूंत ओरडतांना ऐकूं येतात. कोकिळा आपलीं अंडीं कावळ्याच्या घरट्यांत घालून त्याच्या मादीकडून उबवितें. यावरूनच कोकिळेला संस्कृतमध्यें परभृत असें एक नांव आहे. कोकिळ पक्षी व कावळे यांचें कधींच जमत नाहीं. कावळे त्यांना

मारण्यास टपलेले असतात. इंग्लंडमधील कोकिळांचा रंग राखी भुरका असून छातीवर पांढरीं पिसें असतात व मधून मधून काळसर करडे पट्टे असतात. शेपटीवर ठिपके व पांढरे पट्टे असतात. चोंच काळी असून टोंकाशीं पिवळी असते. डोळे व पाय पिवळे असतात. हे एप्रिलमध्यें दिसावयास लागतात व मेमध्यें अंडीं घालतात. एका वेळीं सहा अंडीं घालून तीं एक एक निरनिराळ्या पक्ष्यांच्या घरट्यांत नेऊन ठेवतात. अंड्यांतून कोकिळेचीं पिलें बाहेर पडल्यावर तीं मूळ पिलांना हांकून देतात व त्यांचें पांच आठवडे पोषण झाल्यावर बाहेर पडतात. जुलै-ऑगस्टमध्यें हे पक्षी उष्ण हवामानांत निघून जातात.

हे पक्षी किड्यांवर वगैरे उपजीविका करतात. कविजनांना हा पक्षी प्रिय असला तरी शेतकऱ्यांना तो उपद्रवी वाटतो.

**कोकिळाव्रत**— सौभाग्यवृद्धीसाठीं हिंदु सुवासिनी हें व्रत करतात. आषाढ पौर्णिमेपासून महिनाभर संध्याकाळीं फक्त कोकिळेचा शब्द ऐकल्यावर भोजन करावयाचें असतें. पार्वतीनें दक्षयज्ञाचा विध्वंस करविल्यामुळें 'तूं कोकिळा होशील' असा शंकरानें तिला शाप दिला. पण 'सौभाग्यप्राप्तीसाठीं स्त्रिया तुझी त्या स्वरूपांत पूजा करतील' असा उःशाप दिला (वराह पुराण). त्यावरून हें व्रत पडलें.

**कोकेन**—हा एक पांढरा स्फटिकमय पदार्थ असून थोडा कडवट असतो. हा इरिथ्रॉक्सिलान कोका या जातीच्या झाडाच्या पानांपासून काढलेला एक क्षार असतो. हा स्थानिक बधिरता आणण्याकरितां शस्त्रक्रियेमध्ये वापरण्यांत येतो. तसेंच डोळ्यांतील बुबुळ मोठा करण्याकरितां डोळे-तपासणीच्या वेळीं वापरण्यांत येतो. याचा मज्जातंतूंवर परिणाम होऊन एक प्रकारची अस्थिरता व चंचलता उत्पन्न होते. हा वापरतांना फार काळजी घेतली पाहिजे, कारण यापासून कधीं कधीं लहान प्रमाणांत घेतला असतांहि भयंकर अपाय झाल्याचीं उदाहरणें आहेत.

हिंदुस्थानांत वापरलें जाणारें कोकेन हें कोकेन हायड्रोक्लोराइड असतें. बोलिव्हिया, पेरू, जाव्हा, ब्राझील व दक्षिण अमेरिकेंतील इतर प्रदेश या ठिकाणीं कोकेनचीं झाडें होतात. कोकेन घेण्याचें व्यसन हिंदुस्थानांत फार मोठ्या प्रमाणांत आढळतें. म्हणून १९०३ सालापासून सरकारनें त्याच्या विक्रीवर बंधनें घातलीं आहेत. वेश्या आणि विषयी पुरुष कामोद्दीपक म्हणून कोकेन फार वापरतात. मद्यादि निषिद्ध मादक पदार्थांच्याऐवजी अनेक धार्मिक लोक याचा सर्रहा उपयोग करतात. तेव्हां याचा फार मोठ्या प्रमाणांत चोरून व्यापार होतो यांत शंका नाहीं.

**कोको**—या झाडाची उंची १६ ते २० फूट असते. हें अमेरिकेंतील उष्ण प्रदेशांत प्रथम आढळलें. याची लागवड अलीकडे सर्व उष्ण प्रदेशांत होते. याचीं पानें ४ इंच लांब असून तीं गुळगुळीत असतात, पण त्यावर तकाकी नसते. त्यांचा रंग मळकट हिरवा असतो. याचीं फुलें केशरी रंगाचीं असून फार सुंदर असतात.

याचें फळ ६ ते १० इंच लांबीचें शेंगेसारखें असतें. लागवड केलेल्या झाडांस बाराहि महिने फळें येतात, परंतु मुख्यतः त्यांचा हंगाम जून व डिसेंबर हा असतो. प्रत्येक शेंगेंत पांढरा गुळचट गर असून तीत ५० च्या वर बिया असतात. या बिया फार पौष्टिक असतात. यांमध्यें ५० टक्के स्नेह (तेल-चरबी) व २२ टक्के पिष्टसत्त्व, गोंद, वगैरे आणि १७ टक्के बलक व चिकट पदार्थ असतात. या बियांस चांगला स्वाद असतो व त्या ओल्या किंवा वाळवून खातात. या बियांपासून कोको व चॉकोलेट तयार करतात. तें तयार करण्याकरितां त्या ओल्याच थोड्या कुसत घालून दळण्यांत येतात. या बिया भाजून त्यांचीं टरफलें काढून दळल्या म्हणजे त्यांस कोको निब असें म्हणतात. या बियांपासून कोकोबटर (कोको लोणी) नांवाचा एक स्नेहल (चरबीयुक्त) पदार्थ निघतो. याचा पोमेटम्, मेणबत्त्या, साबण, वगैरे करण्याकरितां उपयोग करतात. गोल्डकोस्ट या वसाहतींत कोकोची लागवड फार असून जगांतील अर्धा पुरवठा येथून होतो. तसेंच नायजेरिया, पश्चिम हिंदी द्वीपसमूह, इक्वाडोर, ब्राझील, वगैरे देशांतहि याची लागवड होते.

**कोका लांकूड**—[अपोरोसा अथवा लेपिडॉस्टाचिस रॉक्सबर्घी]. हें हिंदुस्थानांत आढळणाऱ्या एका जातीच्या झाडाचें लांकूड असून त्याचीं बांसरी व इतर वाद्यें तयार करतात.

**कोच जात**—यांची वस्ती आसाम, बंगाल, बिहार व ओरिसा यांतून आहे. आसाममधील या जातीची लोकसंख्या सु. अडीच लाख आहे. या जातीचे निरनिराळे पोटभाग आहेत व त्या प्रत्येकांतून धर्मान्तर केलेल्या घराण्याला जावें लागतें.

बंगाल्यांत कोचांचे निरनिराळे वर्ग असून प्रत्येक वर्गावर एक पुढारी ( महंत ) नेमिलेला असतो. महंताची जागा वंशपरंपरा चालते.

**कोचिनील किडे**—या किड्यांपासून किरमिजी, शेंदरी व नारिंगी रंग तयार होतात. यांना किरमदाणा, किरमझ, किरंदा किंवा क्रिर्मि हीं नावें आहेत. हे किडे मूळचे दक्षिण व मध्य अमेरिकेंतील असून इ. स. १६५० नंतर युरोपांत व १७९५ नंतर हिंदुस्थानांत त्यांचा प्रसार झाला. या किड्याच्या–एक रुपेरी, दुसरी पिवळसर-तांबूस-काळी अशा–दोन मुख्य जाती असून ग्रॅनिला नांवाची तिसरी एक हलकी जात आहे. यांची उपजीविका मुख्यतः फड्या निवडुंगावर होते. या किड्यापासून मेणहि तयार करतां येतें. कोचिनीलचा उपयोग पूर्वी लोंकर, रेशीम व कापूस रंगवण्यास फार होई; परंतु अलीकडे अनिलीन ( डामरा ) पासून रंग होऊं लागल्यामुळें यांचा खप कमी होऊं लागला. शिवाय फार वेळ उन्हांत राहिल्यास हे रंग फिके पडतात. एक पौंड कोचिनील रंग तयार करण्यास असले सत्तर हजार किडे लागतात.

**कोचीन**—हिंदुस्थान, दक्षिणेंतील एक संस्थान. उत्तरेस मलबार, दक्षिणेस त्रावणकोर संस्थान, पूर्वेस मलयपर्वत व पश्चिमेस अरबी समुद्र याप्रमाणें याच्या मर्यादा आहेत. क्षे. फ. १४८० चौ. मैल व लो. सं. १४,२३,००० ( १९४१ ). संस्थानच्या सुमारें ⅔ भागांत जंगलें व खाड्या आहेत. उरलेल्या भागांत लोकवस्ती अतिशय दाट आहे. लोकसंख्येपैकीं सुमारें शें. ६४ हिंदू आहेत. मुख्य पीक म्हणजे तांदूळ होय. नारळ पुष्कळच असून त्याचा निर्गत व्यापार मोठा आहे. सरकारच्या मालकीची आगगाडी व ट्राम्वे आहे. शिक्षणप्रसार संस्थानांत चांगला आहे. कॉलेजें ६ व हायस्कुलें ५० च्या वर आहेत. संस्थानांत ५७ इस्पितळें व दवाखाने आहेत. ६ नगरपालिका व ८७ ग्रामपंचायती स्थापन झालेल्या आहेत. एर्नाकुलम ही संस्थानची राजधानी आहे. कोचीनचें बंदर मोठें व व्यापारास चांगलें आहे. संस्थानिकाच्या हाताखालीं एक दिवाण व कांहीं मंत्री आहेत. एक कायदेमंडळ आहे व वरिष्ठ न्यायालयहि आहे. त्यानंतर नुकतीच लोकसत्ताक राज्याच्या धर्तीवर राज्यशासनांत बरीच सुधारणा केली आहे.

संस्थानचें उत्पन्न ३७५ लाख असून ( १९४५–४६ ) खर्च ३७२ लाख आहे.

चोल राजांचा प्रतिनिधि चेरमान पेरुमान हा इ. स. ९ व्या शतकाच्या आरंभीं स्वतंत्र राजा बनून केरळवर स्वामित्व गाजवीत होता. त्याचे वंशज हे आजचे कोचीनचे राजे होत. १५०२ मध्यें पोर्तुगीज व्यापाऱ्यांनीं कोचीनला येऊन आपलें बस्तान बसविलें. कालिकतच्या झामोरिनशीं झालेल्या कोचीन संस्थानच्या लढायांतून हे संस्थानला मदत करीत. पुढें पोर्तुगीजांची चलती बंद होऊन डच व्यापारी आले. नंतर डचांची सत्ताहि कमी होऊन १७७६ त हैदरनें संस्थान आपल्याकडे घेतलें. १७९१ सालीं टिपूचा पाडाव होऊन संस्थान ब्रिटिशांचें मांडलिक बनलें. १९४३ सालीं श्रीकेरळवर्मा महाराज मृत्यु पावले व श्रीरविवर्मा गादीवर बसले. तेहि १९४६ सालीं मृत्यु पावल्यावर एलेया राजा केरळवर्मा तख्तनशीन झाले. तेहि १९४८ च्या जुलैंत मरण पावल्यावर त्यांचे बंधु श्रीरामवर्मा गादीवर आले. कोचीन येथें ज्यू लोकांचें प्राचीन देवालय आहे. तिरु विलवामल व त्रिचूर येथें लेणीं आहेत. त्रिचुरास किल्लाहि आहे.

कोचीन बंदर फार महत्त्वाचें असून १९३६ पासून हिंदुस्थान सरकारच्या व्यवस्थेखालीं आहे. कोचीन आणि त्रावणकोर यांचें संयुक्त राज्य करण्याची किंवा हिंद सरकारांत विलीन करण्याची वाटाघाट चालू आहे.

**कोचीन चीन** - फ्रेंच इंडो–चीनच्या दक्षिण टोकाला ही फ्रेंचांची वसाहत आहे. क्षे. फ. २६,४७६ चौ. मैल व लो. सं. ४६,१५,९६८ असून त्यांपैकीं १५,४४९ फ्रेंच, १,७०,६९८ चिनी, व बाकीचे आनामी लोक आहेत. येथें मुख्य पीक भात व शिवाय ऊंस, तमाखू, कॉफी, रबर, नारळ, सुपारी, मिरीं, कापूस, केळीं, बटाटे, वगैरे पिकें होतात. हा देश सुपीक मैदान असून यांतून मेकांग, डोनाय, सायगांव, व वैको या मुख्य नद्या वाहतात. मासेमारीचा धंदा फार मोठा चालतो. रेडे व घोडे यांचा शेतीकडे उपयोग करतात. पाऊस फार पडतो. लोक डुकरें, बकरीं, मेंढ्या, गाई व म्हशी पाळतात. येथें ३० भाताच्या गिरण्या व ८ लांकूड कापण्याच्या गिरण्या असून साबण, व्हार्निश, रबर, सिगारेट, यांचे अनेक कारखाने आहेत. सायगांव, चोलोन, कँथो, वगैरे मोठीं शहरें आहेत. या प्रदेशांत वाघ, चित्ता, हत्ती, गेंडा, डुक्कर, वानर, बदकें, सर्प, वगैरे प्राणी आहेत.

९ व्या ते १२ व्या शतकापर्यंत कोचीन चीन हा ख्मेर राष्ट्राचा भाग होता, नंतर १५ व्या शतकापर्यंत चंपा राज्याच्या सत्तेखालीं आला. १७ व्या व १८ व्या शतकांत हा प्रदेश आनामी लोकांनीं काबीज केला; १८६७ सालीं आनामी लोकांपासून फ्रेंचांनीं घेतला, व १८८७ सालीं त्याचा इंडो–

चायनांत समावेश करण्यांत आला. १९४५ सालीं आनामी लोकांनीं आपलें स्वतंत्र लोकराज्य बनवले, व १९४६ सालीं फ्रेंचांनीं स्वायत्त वसाहतीचा दर्जा कोचीन चीनला दिला. २४ सभासदांचें कौन्सिल येथील राज्यकारभार चालवतें. फ्रान्स-मध्यें या वसाहतीतर्फे एक प्रतिनिधि असतो.

**कोंजचा किल्ला**—मुंबई, ठाणें जिल्हा, वाडें तालुका. वाड्याच्या पश्चिमेस १० मैलांवर एका उंच टेकडीवर हा आहे. वर जाण्यास रस्ता एका दरींतून आहे. हा किल्ला १६९२ त मराठ्यांनीं बांधला असें म्हणतात. या टेकडीच्या सभोंवार तुटलेले कडे आहेत. तेव्हां फक्त दक्षिण आणि पश्चिम बाजूस तटबंदी आहे. किल्ल्यांत ९ टांकीं दिसतात.

**कोटकामतें किल्ला**—मुंबई, रत्नागिरि जिल्हा, देवगड तालुका, कामतें गांवचा किल्ला. किल्ला भुईकोट असून भोंवतीं खंदक आहे; पण तो हल्लीं भरून गेला आहे. भगवतीचें देऊळ आहे.

**कोटगिरि**—मद्रास, नीलगिरि जिल्ह्याच्या कुन्नूर तालुक्यां-तील एक हवा खाण्याचें ठिकाण. हें नीलगिरीच्या पठाराच्या ईशान्येस उटकमंडपासून १८ मैलांवर व कुन्नूरपासून १२ मैलांवर आहे.

**कोटझेब्यू, ऑगस्ट फ्रेडरिश फर्डिनंड** (१७६१–१८१९)—हा जर्मन नाटककार असून त्यानें दोनशेंहून अधिक नाटकें लिहिलीं; त्यापैकीं 'दि स्ट्रेंजर', 'डाय स्पॅनिअर इन् पेरु' या दोन नाटकांचे प्रयोग ब्रिटिश रंगभूमीवरहि विशेष प्रसिद्धि पावले.

**कोटद्वार**—संयुक्त प्रांत, गढवाल जिल्ह्यांतील 'खो' नदीच्या काठीं असलेली मोठी व्यापार-पेठ. या जिल्ह्यांतील दक्षिण भागांत मैदानांतील प्रदेशांतून सुती कापड, साखर, मीठ, भांडीं वगैरे माल या गांवांतून पुरविला जातो. तसेंच तिबेटां-तील मालाच्या देवघेवीचें हें मध्यवर्ती गांव असून येथून मैदानी मुलुखांत मोहरी, शिरसीचें बीं, हळद, मिरच्या वगैरे जिन्नस जातात.

**कोटमन, जॉन सेल** (१७८२–१८४२)—एक इंग्रज चित्रकार. त्याचीं सुमारें ३०० जलरंगी चित्रें ब्रिटिश म्यूझियम मध्यें असून त्यांत 'ब्रेकिंग दि कोल्ड' आणि 'ग्रेटा ब्रिज' हीं चित्रें नांवाजलेलीं आहेत. याचीं चित्रें सृष्टिसौंदर्यविषयक देखाव्यांचीं आहेत.

**कोटळीगड**—मुंबई, कुलाबा जिल्ह्यांत कर्जतच्या ईशान्येस १४ मैलांवर एका सुळक्यावर हा किल्ला आहे. खालीं पेठ नांवाचें खेडें आहे. या किल्ल्याचा चढाव फार बिकट आहे. आंत दोन टाकीं असून याला साधारण तटबंदी आहे. शिखराजवळ एक गुहा आहे.

**कोटा संस्थान**—हें राजपुतान्याच्या आग्नेय भागांत असून क्षे. फ. ५,६८४ व लो. सं. ७,७७ ३९८ आहे. संस्थानची लांबी ११५ मैल व रुंदी ११० मैल आहे. या संस्थानच्या दक्षिण भागांत मुकुंदवार नांवाची टेकड्यांची रांग सुमारें १६,००० फूट उंचीची आहे व हा भाग जंगलमय व हिंस्र जनावरें असलेला व शिकारीला योग्य असा आहे. संस्थानच्या उत्तर भागांत उत्तम मळीची जमीन फार सुपीक आहे. चंबळा, काळी सिंद, व पार्वती या तीन मुख्य नद्या, व परवान, उजर, सुकी, बाणगंगा, कूल, कुनू व अंधेरी या दुय्यम नद्या या प्रदेशांतून वाहतात. शिवाय एकंदर ३५० तळीं व अक्लोरा सागर हा सर्वांत मोठा तलाव (३॥ चौरस मैल क्षेत्रफळ) आहे, आणि पार्वती नदीला मोठें धरण बांधून कालवे काढल्यामुळें सर्वत्र पाण्याची विपुलता आहे. पाऊस सुमारें ३७ इंच पडतो. मुख्य पिकें गहूं, हरभरा व कापूस हीं होतात.

यांत कोटा, बारण, मांग्रोल व संगोड हीं शहरें व २,५५४ खेडीं आहेत. लोकवस्ती चामर (चामडी काम व शेती धंदा), मीना जात (धिप्पाड, साहसी व धंदा शेती), धाकर जात (धंदा शेती), ब्राह्मण जात (धंदा भिक्षुकी व नोकरी), माळी जात (धंदा बागायती व शेती), गुजर जात (धंदा गुरांढोरांचा व्यापार), महाजन जात (धंदा व्यापार व सावकारी), रजपूत (धंदा लष्करी नोकरी), इत्यादि जाती आहेत.

कापड विणणें हा धंदा फार मोठा असून येथील मलमल फार प्रसिद्ध आहे. मलमल पांढरी, रंगीत व जरीची सुद्धां तयार करण्यांत येते. चिटेंहि उत्तम होतात. शिवाय खेळणीं, कागद, कलाबतूचें कापड, हस्तीदंती काम, भांडीं वगैरे जिन्नस येथें तयार होतात. संस्थानांत शिक्षण मोफत असून शिवाय कागद, शाई, पुस्तकें इत्यादि मोफत पुरवण्यांत येतात. तथापि साक्षरतेचें प्रमाण शेंकडा ४ आहे. सध्याचे महाराज भीमसिंह हे १९४० सालीं गादीवर आले.

कोटा हें राजधानीचें शहर चंबळा नदीच्या कांठीं आहे. शहराभोंवतीं तटबंदी असून सहा मोठे बुरुजी दरवाजे आहेत. शहरांत पुष्कळ देवालयें आहेत. त्यांत मथुराजीचें देवालय फार प्रसिद्ध आहे. या संस्थानचें राजघराणें चव्हाण रजपूत जातीच्या हाडा नामक शाखेचें आहे. १३४२ सालीं बुंदीच्या राजानें कोटे नांवाच्या भिल्ल जातीपासून हा प्रदेश जिंकून घेतला व नंतर बुंदीच्या राजाचा अमल येथें होता. १७ व्या शतकांत हें संस्थान स्वतंत्र तोडून याच राजघराण्याच्या एका शाखेकडे देण्यांत आलें.

त्याचा माधवसिंग हा पहिला राजा होय. दिल्लीचे मोंगल व दक्षिणेकडून मराठे यांनीं यावर स्वाऱ्या केल्या तथापि हें संस्थान स्वतंत्र राहून अखेर १८१७ सालीं ब्रिटिशांचें मांडलिक बनलें. वार्षिक उत्पन्न ५२ लाख आहे. हें संस्थान १९४८ सालीं राजस्थान संघांत सामील झालें.

**कोट्टायन**—मद्रास, मलबार जिल्ह्याचा उत्तरेकडील तालुका. क्षेत्रफळ ४८१ चौ. मैल. यांत २८ अमसन किंवा विभाग आहेत. लोकसंख्या सुमारें अडीच लाख.

गांवाची लो. सं. सुमारें आठ हजार. लोकसंख्येंत हिंदू व खिस्ती यांचें प्रमाण जास्त आहे. हें सीरियन खिस्ती समाजाचें मध्यवर्ती ठिकाण असून येथील चर्च फार प्राचीन आहे. इ. स. १८१६ पासून येथील चर्चची मिशनरी संस्था काम करीत असून तिच्या ताब्यांत दोन महाविद्यालयें व कांहीं हायस्कुलें आहेत. येथें बरींच नियतकालिकें प्रसिद्ध होतात.

**कोट्टूरू**— मद्रास, बल्लारी जिल्ह्याच्या कुडिलगी तालुक्यांतील एक गांव. हें लिंगायत समाजाचें केंद्रस्थान असून येथील लोकवस्तींत लिंगायतांचें प्रमाण बरेंच आहे. लिंगायतांचा धर्मगुरु बसाप्पा लिंगस्वामी यानें येथें केलेल्या महत्कृत्यामुळें हें गांव पवित्र झालें आहे असें ते समजतात. येथें सुती कापड विणण्याचा धंदा चालत असून हें व्यापाराचें महत्त्वाचें ठिकाण आहे.

**कोट्स, डॉ.**—पेशवाईअखेरचा पुण्यांतील एक इंग्रज वैद्य. सन १७९७ मध्यें पुण्याच्या रेसिडेन्सींतील डॉक्टर जेम्स फिडले हा गेल्यावर त्याच्या जागीं डॉक्टर कोट्सची नेमणूक झाली. डॉ. जेन्नर यानें शोधून काढलेला गोस्तन देवीचा प्रसार कोट्स यानें पुण्यांत केला. प्रथम देवी काढून घेण्यास लोक धजावत नसत. बाजीरावानें आपली पत्नी वाराणशीबाई हिला यांजकडून देवी काढवल्या व लोकांना उदाहरण घालून दिलें. पेशवाईअखेर डॉ. कोट्स हा पुण्यासच होता.

**कोठी**—मराठ्यांच्या अठरा कारखान्यांत कोठी हा एक कारखाना असे. कोठींत धान्यसंग्रह विशेषेंकरून करीत. परंतु जुन्या कागदपत्रांत खजिना, वखार, किंवा कापडचोपड अथवा इतर सरकारी सामान सांठवण्याची जागा या अर्थींहि हा शब्द येतो. लष्कराची रसद पुरविणारें खातें यासहि कोठी म्हणत. या कोठीवरील अधिकारी तो कोठावळा. पेशवाईअखेर इंग्रजांच्या रेसिडेन्सीलाहि कोठी म्हणूं लागले होते.

**कोठूर**—मुंबई, नाशिक जिल्हा. निफाडच्या दक्षिणेस तीन मैलांवरचें एक गांव. येथें एक मल्हारेश्वराचें देऊळ आहे. यामध्यें दोन ( इसवी १७१७ व १७२७ ) शिलालेख आहेत. बाळाजी विश्वनाथ पेशवे याचा मेव्हणा ( पत्नी राधाबाई हिचा भाऊ ) मल्हारराव बरवे यानें दोन वाडे, दोन घाट, दोन धर्मशाळा व वारणेश्वराचें देवालय येथें बांधिलें आहे. या मल्हारराव बरव्याचे वंशज येथें राहतात.

**कोंडवाड्याचा कायदा**—गांवांत अगर शेतामळ्यांत शिरून नुकसान करणाऱ्या गुरांना कोंडून ठेवण्याच्या सरकारी जागेला कोंडवाडा म्हणतात. हिंदुस्थानांत यासंबंधीं कायदा १८७१ सालीं होऊन पुढें १८९१, १९१४, १९२१ व १९३० सालच्या कायद्यांनीं त्यांत दुरुस्त्या करण्यांत आल्या. दुसऱ्याच्या मालकीच्या जागेंत शिरून त्याची नुकसानी करणारीं गुरें किंवा जनावरें कोंडवाड्यांत घालण्याबद्दलचा हा कायदा आहे. हा कायदा हत्ती, उंट, घोडे, खेचर, तट्टू, गाढव, डुक्कर, बकऱ्या मेंढ्या, गाई, बैल, म्हशी, रेडे यांनाहि लागू आहे. गांवोगांव कोंडवाडे स्थापणें व त्यावर जबाबदार नोकर नेमणें हा अधिकार डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटला म्हणजे कलेक्टरला आहे ( कलमें ४ व ५ ). कोंडवाड्यांत घालण्याकरितां जनावरें आणण्यात येतील तीं नांवनिशीवार वर्णन करून नोंदणें, व त्यांना कोंडवाड्यांत कोंडून खाणें घालणें व पाणी पाजणें, आणि गुरें सोडवण्यास येईल त्याजजवळून दंड व जनावरांच्या खाण्या-पिण्याचा खर्च सरकारनें ठरवलेल्या दराप्रमाणें घेऊन गुरें कोंडवाड्यांतून सोडणें, हीं कामें कोंडवाडा-नोकर करतो ( कलमें ८।९।१२ ). सात दिवसांच्या आंत गुरें सोडवून नेलीं नाहींत, तर तीं गुरें पोलिसच्या ताब्यांत देऊन व आगाऊ दवंडी पिटून नंतर सात दिवसांनीं त्या गुरांची जाहीर लिलांवानें विक्री होते. कोणी गैरकायदा लबाडीनें जनावरें कोंडवाड्यांत घातल्यास त्यावर फौजदारी खटला जनावरांच्या मालकाला करतां येतो ( कलम २० ). तसेंच कोंडवाड्यांत गुरें घालणाराला हरकत केल्यास व बळजबरीनें गुरें सोडवून नेल्यास त्याबद्दल फौजदारी खटला करतां येतो ( कलम २४ ). कलम २० खालच्या खटल्यांत नुकसानभरपाई १०० रुपयांपर्यंत, आणि कलम २४ खालच्या खटल्यांत ६ महिनेपर्यंत कैद किंवा ५०० रुपयांपर्यंत दंड किंवा दोन्ही शिक्षा आहेत. सार्वजनिक रस्ते व बागबगीचे, कालवे, पाटबंधारे, सांडपाण्याचे नाले अशा ठिकाणीं नुकसान किंवा नासाडी करणारीं गुरें कोंडवाड्यांत घालण्याचा सदर ठिकाणच्या ताबेनोकरांना व पोलिसाला अधिकार आहे.

**कोंडापल्ली**—मद्रास, कृष्णा जिल्ह्याच्या बेझवाडा तालुक्यांतील एक गांव. याच्याजवळच एक डोंगरी किल्ला असून त्याला कोंडापल्लीचा किल्ला असें म्हणतात. १९०१ मध्यें येथील किल्ल्यामुळें व उत्तर सरकारच्या राजधानीचें हें एक शहर असल्यामुळें, पूर्वी या गांवाला विशेष महत्त्व प्राप्त झालें होतें. १३६० मध्यें कोंडविडूच्या रेड्डी राजांनीं हा किल्ला

बांधला. किल्ला अद्यापि प्रेक्षणीय आहे. या ठिकाणीं डोंगरावर एक प्रकारचें हलकें लांकूड मिळतें व त्या लांकडापासून येथील लोक खेळणी तयार करतात. या भागांत पुराणवस्तुखात्यानें उत्खनन केलें असून त्यांत बरेच प्राचीन अवशेष मिळाले आहेत.

**कोंडी**—( लॉक ). उघडतां व बंद करतां येणारें धरण. हें विशेषतः कालवे किंवा गोद्या यांमध्यें करतात. गोद्यांमध्यें भरती-ओहोटीमुळें गोदींतील पाणी व बाहेरील समुद्राचें पाणी यांच्या पातळीमध्यें फरक असतो. जेव्हां भरतीमुळें पाणी वर येतें त्याच वेळेस बोटी गोदींत घेतां येतात. यासाठीं गोदीचें तोंड एका मोठ्या रुंद दरवाजानें बंद केलेलें असतें. गोदींत पाणी भरतीनें भरलेल्या पाण्यापेक्षां कमी पातळीवर असेल तेव्हां गोदीमध्यें पाणी पंपानें भरतात व पातळी सारखी झाल्यावर दार उघडून बोट आंत घेतात व लगेच तें दार बंद करतात. बोट बाहेर जावयाची असेल तरीहि हीच व्यवस्था करावी लागते. या योजनेला कोंडी असे म्हणतात. हीच व्यवस्था बोटी जाण्यायेण्याचे जे कालवे असतात त्यांमध्यें जेव्हां जेव्हां बोट निरनिराळ्या पातळीच्या पाण्यांतून जावयाची असते त्या वेळीं केलेली असते.

**कोडीन**—हा एक अफूपासून निघणारा स्फटिकमय क्षार आहे. याचें अफूमध्यें प्रमाण शंभर पौंडास ६ ते ८ अंश इतकें असतें. याचा उपयोग खोकल्यावर व किंचित् गुंगी आणण्याकरितां करण्यांत येतो. मधुमेहावरहि याचा उपयोग करतात.

**कोंडू (कुंडलीश)**—एक संतकवि. हा साताऱ्यास राहणारा असून यानें शके १७१३ त 'आत्मबोध' नांवाचा एक ग्रंथ अठरा प्रकरणांत लिहिला. त्यांत ६१२ ओंव्या आहेत. याचा दुसरा ग्रंथ 'आत्मसुख' या नांवाचा असून त्यांत पांच प्रकरणें २०० ओंव्यांत लिहिलेली आहेत.

**कोडैकनाल**—मद्रास, मदुरा जिल्ह्याच्या डिंडिगळ नांवाच्या पोटजिल्ह्यांतील एक छोटासा तालुका. या तालुक्याचें मुख्य ठिकाण कोडैकनाल हे पळणी टेकडीवर असून या तालुक्याची वस्ती सु. अडीच लाख आहे. गहूं, लसूण, कॉफी, दालचिनी हे या तालुक्यांतील मुख्य उत्पन्न आहे. या भागांत गुरांची निपज फार मोठ्या प्रमाणावर होते. शिक्षणाच्या बाबतीत हा भाग फार मागासलेला आहे. व जे कांहीं थोडें शिक्षण मिळतें तें जेसूइट व अमेरिकन मिशनकडून दिले जातें.

कोडैकनाल तालुक्याचें मुख्य ठिकाण असून पूर्वीं हें अगदीं लहानसें खेडें होतें. पण हल्लीं मद्रास इलाख्यांतील आरोग्यस्थान म्हणून याची फार ख्याति आहे. या गांवची लोकवस्ती सात-आठ हजार आहे.

येथील आरोग्यभुवन ( सॅनिटोरियम ) समुद्रसपाटीपासून ७,००० फूट उंचीवर आहे. हें ज्या टेंकडीवर वसलेलें आहे त्या टेंकडीच्या पायथ्याशीं एक सुंदर कृत्रिम तलाव आहे. या आरोग्यभुवनाच्या अगदी जवळच थोड्याच्या उंचीवर एक वेधशाळा आहे. १८९९ सालीं उटकमंड येथील वेधशाळा काढून या ठिकाणीं तिची स्थापना झाली. या आरोग्यभुवनापासून १०० फूट खालीं डोंबगनूर येथें एक जेसूइट लोकांचें कॉलेज आहे. या ठिकाणी धबधबे, देखाव्याचीं ठिकाणें, बोटक्लब, गोल्फ क्लब, विश्रांतिगृहें इ. असून महाबळेश्वराप्रमाणें येथें श्रीमंत लोक येऊन राहतात.

**कोणमापक**—( गोनिओमीटर ). घन पदार्थांचे विशेषतः स्फटिकांचे कोन मोजण्याकरितां हें यंत्र वापरण्यांत येतें. या यंत्राचा एक प्रकार परावर्तन कोणमापक म्हणून आहे. त्यामध्यें *एक प्रकाशाचा किरण दिलेल्या स्फटिकाच्या एका पृष्ठभागा*पासून परावर्तित केला असतां तो जो कोन करतो तो दुसऱ्या पृष्ठभागांतून परावर्तित होऊन तोच कोन करण्याकरितां किती कोनांतून ( अंशांतून ) फिरवावा लागतो, यावरून त्या स्फटिकाचा कोन मोजण्यांत येतो. हा फिरविलेला कोन १८०° अंशांतून वजा केला म्हणजे त्या स्फटिकाचा कोन येतो.

**कोतवाल**—मराठी साम्राज्यांत कोतवाल म्हणजे सर्व पोलिसखात्यावरील मुख्य अमलदार असे. परंतु हल्लींच्या इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस याच्या कामापेक्षां कोतवालाच्या तत्कालीन कामांत बराच फरक होता. राज्यांतील मोठमोठ्या शहरीं असे कोतवाल असत. त्यांच्या हाताखालीं कोतवालींत शिपाई असत. राज्यांतील या निरनिराळ्या कोतवालीवर मुख्य अधिकारी ( पुण्याच्या राजधानीचा कोतवाल नसून ) तत्तत्प्रांतीय सुभेदार असे.

एखादे वेळीं कोतवालावर सदर अमीन ( मुख्य न्यायाधीश ) ची हुकमत असे. साधे अमीन कोतवालाच्या हाताखालीं असत. पुण्याच्या सबंध कोतवालीची सालीना नेमणूक तीन ते साडेतीन हजारांपर्यंत असे. एखादा कायद्याचा नियम अगर सरकारी हुकूम अन्यायाचा असल्यास तो बदलणें झाल्यास अगर प्रजेच्या फायद्याचें नवीन नियम, वगैरे करणें झाल्यास ते कोतवालाने प्रथम सरकारांत समजवावे लागत; म्हणजे सरकार योग्य ती तजवीज करीत असे. कब्जे तोडणें, बाजारांतील वस्तूंचे भाव ठरवणें, खरेदी-विक्रीचे दस्तऐवज नोंदणें, इ. कामें कोतवालाला गांवाच्या संरक्षणाखेरीज करावी लागत. पुण्याचा घाशीराम कोतवाल हा कुप्रसिद्ध आहे. पण त्याची जरब मोठी असून शहराचा बंदोबस्त तो चांगला ठेवीत असे. पुनर्विवाहाची नोंद

कोतवालींत असे व गरती बायका बिघडूं नयेत म्हणून कोतवाली खातें दक्ष असे.

**कोथिंबीर**—याची लागवड हिंदुस्थानांत सर्वत्र होत असून प्राचीन काळापासून धने ईजिप्तमध्यें व तेथून यूरोपांत जात असत. १९ व्या शतकांत रशिया, हंगेरी, हॉलंड वगैरे देशांत कोथिंबिरीची लागवड होऊं लागली. कोथिंबिरीच्या पानांचा उपयोग भाजींत, आमटी–कढींत स्वाद येण्याकरितां करतात आणि धन्यांचा उपयोग मसाल्यांत करतात. धन्यांच्या हळवे (गांवरानी) व गरवे (बदामी) अशा दोन जाती आहेत. धने तयार होण्यास ५।६ महिने लागतात. बदामीदाणा गांवरानीपेक्षां दुप्पट मोठा व पिंवळा असून त्याचा स्वाद जास्त दिवस टिकतो. धने थंड, पित्तकफनाशक, वातघ्न, अग्निदीपक असल्यामुळें शरीरांतील उष्णता काढण्यास, ताप, खोकला, तहान, ओकारी, वगैरे विकारांवर त्याचा उपयोग होतो. नेपाळाच्या विषावर धन्याचें चूर्ण, साखर व दहीं एकत्र करून द्यावें. तृषा कमी होण्यास धने पाण्यांत भिजत घालून त्या पाण्यांत मध व पिठीसाखर घालून तें पाणी वारंवार द्यावें. शरीरांत उष्णतादाह झाल्यास धने रात्रभर पाण्यांत भिजत घालून तें पाणी खडीसाखर घालून प्यावें.

**कोंदिवटें लेणीं**—हीं लेणीं बी. बी. सी. आय्. रेल्वेच्या अंधेरी स्टेशनपासून दोन कोसांवर (ठाणे जिल्ह्यांत) सह्याद्रीच्या एका ठेंगण्या रांगेंतील टेकडीमध्यें आहेत. यांना महाकाळाचीं लेणीं असेंहि म्हणतात. हीं लेणीं एकंदर १९ असून तीं २ ऱ्या ते ६ व्या शतकाच्या दरम्यान बौद्धांनीं कोरलेलीं व साधारणतः लहान, पडकीं व भूयारवजा आहेत. मरोळ अगर मुळगांव या पायथ्याच्या गांवांतून पहाडावर जाण्यास चांगली वाट आहे. पहिल्या समूहांत चार लेणीं ४ थ्या–५ व्या शतकांतील आहेत. पहिल्या व चौथ्या लेण्यांत अंगण, पाण्याचें टांकें, पडवी, दगडी ओटा, दिवाणखाणा, निजण्याच्या खोल्या, वगैरे भाग आहेत. दुसरें लेणें जेवण्याचें माजघर असावेसें दिसतें. या लेण्यांच्या उत्तरेस वरीचशीं पाण्याचीं टांकीं आहेत. जवळच एक स्तूप असून त्याच्या पश्चिमेस असलेल्या ८१९ पायऱ्या चढून गेलें कीं, लेण्यांचा दुसरा समूह १५ लेण्यांचा आहे. हीं लहान व पडकीं असून त्यांपैकीं ९ वें लेणें सर्वांत जुनें व पाहण्यासारखें आहे. त्यांत पडवी, नंतर भव्य सभामंडप व त्याच्या उजव्या भिंतींत कोरलेल्या मूर्ती, व मागल्या भिंतींत दोन जाळीच्या खिडक्या असून एका खिडकीवर दोन ओळींचा पाली शिलालेख आहेत. यांत बुद्धाच्या मूर्ती व विद्याधर, सेवक, नागकन्या इ. आहेत. टेकडीच्या पायथ्याशीं एक देऊळ, तलाव व चर्च आहे.

**कोद्रू**—एक हलकें धान्य. संयुक्त प्रांत, मुंबई, व मध्यप्रांत यांत या धान्याची लागवड करतात. याला अगदीं निकस जमीनहि चालते. याच्या रामेश्वरी, शिवेश्वरी, हरकिणी व माजरा अशा चार जाती असून माजरा जात फार अपायकारक म्हणजे वांति, जुलाब, घेरी वगैरे विकार करणारी आहे. पुष्कळ लोक या धान्याचा खाण्याकडे उपयोग करतात, पण अन्न या दृष्टीनें तें हितकारक नसून कांहीं ऋतूंत तर तें अपायकारक होतें. सर्द दिवसांत हें धान्य विषारी बनतें. या धान्याची भात, पेज, वगैरे करतात. माजरा कोद्रू एक दिवस शेणपाण्यांत भिजत घालून नंतर एकदोन दिवस उन्हांत वाळवला तर त्याचा दोष कमी होऊन तो खाण्यास योग्य होतो.

**कोणशंकू**—(पिरॅमिड). भूमितींत कोणशंकू ही घन आकृति बहुकोण सपाट पृष्ठ पाया व या बहुकोणाचे कोणबिंदु, एखाद्या पृष्ठबाह्य बिंदूला जोडून होणारे त्रिकोण यांनीं मर्यादित असते. ह्या बाह्य बिंदूस कोणशंकूचा शिरोबिंदु म्हणतात. कोणशंकूचा पाया त्रिकोण किंवा बहुकोण असतो. ईजिप्तमधील सुप्रसिद्ध कोणशंकूचे पाये काटकोन चौकोन आहे. पिरॅमिड पहा. कोणशंकूचें घनफळ पायाच्या क्षेत्राला उंचीनें गुणून व ३ नें भागून येतें.

**कोन** (१५८७– )—डच लोकांची सत्ता इकडे बळकट व्हावी या हेतूनें डच कंपनीमार्फत आलेला हा एक डच गव्हर्नर होता. हा सन १५८७ मध्यें जन्मला. रोममध्यें याचें शिक्षण झाल्यावर हा सन १६०७ मध्यें पूर्वेकडील डच वसाहतींत आला. सन १६१३ त हा बॅंटमचा अध्यक्ष व सन १६१७ त गव्हर्नर जनरल झाला.

**कोनरॅड, जोसेफ** (१८५६–१९२४)—हा इंग्रज कादंबरीकार एका पोलिश राज्यक्रांतिकारकाचा मुलगा असून त्याचें बालपण पोलंड व यूक्रेन येथें गेलें. १८७८ सालीं त्यानें एका इंग्लिश जहाजावर नोकरी धरली व पुढें त्या जहाजाचा मास्टर झाला. वयाच्या वीस वर्षांनंतर त्यानें इंग्रजी भाषेचा अभ्यास सुरू केला, तरीहि त्याची इंग्रजी भाषा जोरदार व प्रौढ आहे. जलपर्यटनमय जीवनाचीं दृश्यें व अतिपूर्वेकडील प्रदेशाचे देखावे त्यानें फार हुबेहुब वर्णिले आहेत. याचे प्रख्यात ग्रंथ आहेत ते—आलमेयर्स फॉली; ॲन् औटकास्ट ऑफ दि आयलंड्स; दि निगर ऑफ दि नार्किसस; टेल्स ऑफ अन्रेस्ट; लॉर्ड जिम्; दि इन्हेरिटर्स; रोमान्स; टायफून; दि शॅडो लाइन; यूथ; दि मिरर ऑफ दि सी; चान्स; दि ॲरो ऑफ गोल्ड; ए पर्सनल रेकार्ड; दि रेस्क्यू; दि रोव्हर; आणि टेल्स ऑफ हिअरसे; इ.

**कोनाइन**—हें एक वायुपरिणामी (चंचल) अल्कलिकल्प असून हेमलॉक वनस्पतीमधील मुख्य विषतत्त्व आहे. हेमलॉकच्या

सर्व भागांत विशेषतः अर्धवट पक्क्या वियांत हे असतें. हा पायरोडाइन या पूतिनाशक अल्कलीकल्पापासून संयोगी क्रियेनें तयार करतात. कोनाइन जाज्वल्य विषारी द्रव्य आहे.

**कोनारक**—हें देवालय ओरिसातील पुरी जिल्ह्यांत पुरी शहरापासून पूर्वेस २१ मैलांवर आहे. हें सूर्यदेवतेचें देवालय गंग घराण्यांतील पहिल्या नरसिंह देवानें बांधलें. याचा कळस १८० फूट उंच असून समोर १४० फूट उंचीचा एक सभामंडप आहे. याचें महाद्वार पूर्वाभिमुख आहे; द्वाराजवळ हत्तीवर बसलेल्या दोन सिंहाच्या मूर्ती आहेत; उत्तर व दक्षिण द्वारापाशीं दोन हत्तीच्या मूर्ती असून त्यांनीं आपल्या सोंडेंत एका मनुष्याला वर उचललेला आहे. शिवाय याच द्वारापाशीं उत्तम सजवलेले दोन घोडे व पुष्कळ योद्धे उभे आहेत, असा देखावा आहे. पूर्व दरवाजावर एक शिला व तीवर नवग्रहांचें चित्र खोदलेलें, व या शिलेच्या मध्यभागी पडलेल्या कोनाड्यांत आसनमांडी घालून वसलेली सूर्यदेवतेची मूर्ति आहे. सर्व देवालयास रथाचा आकार व तो रथ सात घोडे ओढीत आहेत, अशी देवालयाची रचना आहे. देवळाच्या भोंवतीं पटांगण व पटांगणाला भिंती असून त्यांत पुष्कळ लहान मूर्ती व ओऱ्या आहेत. हें देवालय अगदीं जीर्ण झालेलें असले तरी हिंदु मूर्तिकलेचा व वास्तुशिल्पाचा तो एक उत्तम नमुना आहे.

**कोनिआ**—हें शहर स्मर्नाच्या पूर्वेस ३०० मैलांवर अनाटोलिया प्रांतांत याच नांवाच्या प्रांताची राजधानी आहे. येथे गालिचे आणि रेशमी कापड यांचे कारखाने आहेत. येथून बगदाद रेल्वेचा फाटा सुरू होतो. लोकसंख्या ५८,८३४ आहे.

**कोनिंग्जबर्ग**— सोव्हिएट रशिया, पूर्व प्रशियाची राजधानी व पहिल्या प्रतीचें तटबंदी शहर. हे प्रेजेल नदीच्या कांठीं बर्लिनपासून ३९७ मैलांवर आहे. शहराचा घेर ९॥ मैल व लो. सं. अडीच लक्ष आहे. शहरांत १२ एकर क्षेत्रफळाचा एक तलाव आहे. येथील विद्यापीठ गणित व तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासाबद्दल प्रसिद्ध असून कँट, बेसेल, न्यूमन, जे. एफ्. हर्बर्ट, वगैरे सुप्रसिद्ध विद्वान् येथें अध्यापक होते. युनिव्हर्सिटी इमारतींनजीक वेधशाळा, ग्रंथसंग्रहालय ( अडीच लाखांवर पुस्तकें ), प्राणिसंग्रहालय, वनस्पतिबाग, प्रयोगशाळा, पुराणवस्तुसंग्रहाचा अजबखाना, व्यापारी शाळा, चित्रशाळा, संगीतशाळा, व्यायामशाळा, वगैरे अनेक संस्था आहेत. हें लष्करी व आरमारी तटबंदीचें प्रहिल्या प्रतीचें शहर आहे. पिलाडे नांवाच्या बंदरापासून २९ मैल कालवा शहरास जोडल्यामुळें मोठाल्या बोटी येथें येतात. येथील किल्ला प्रथम १२५५ सालीं बांधला. सांप्रतचें तटबंदीचे काम १८४३ सालीं सुरू झालें तें १९०५ सालीं पुरें झाले. येथें मोठमोठी मुद्रणालयें. यंत्रांचे कारखाने, आगगाडीचे डबे व इंजिनें करण्यांचे कारखाने, रासायनिक द्रव्यें, साखर, मद्य, तंबाखू, खेळणीं वगैरेंचे कारखाने आहेत. १९४५ सालीं जर्मनीच्या पराभवानंतर पूर्व प्रशियाचा बराचसा भाग रशियाकडे आला. त्यांत हें शहर पूर्वी जर्मनींत असलेलें आतां रशियन झालें आहे.

**कोनिग्झट**—हें शहर सायलेशियामध्यें असून येथें मोठाले लोखंडाचे व इतर खनिज द्रव्याचे कारखाने व तत्संबंधीं इतर कारखाने आहेत. लो. सं. ( १९३१ ) ७४,८११ आहे.

**कोनोली, जॉन** ( १७९४–१८८६ )—एक इंग्रज वैद्य. याने वेडयांच्याबाबत जे उपचार करावयाचे त्यांत पुष्कळ सौम्यपणा आणून वेड्यांच्या दवाखान्यांतून बरंचि सुधारणा घडवून आणली. या मानसिक रोगासंबंधीं व रुग्णालयांच्या रचनेसंबंधीं यानें ग्रंथ लिहिले आहेत.

**कोन्नूर**—मुंबई, वेळगांव जिल्ह्यांत गोकाकच्या धबधब्यानजीक हा गांव आहे. या गांवांत कित्येक पडकीं देवळें व दक्षिणेकडील टेंकडीच्या पायथ्याशीं क्रिस्त्वएन हीं फार प्राचीन थडगीं आहेत. क्रिस्त्वएन अथवा प्रत्येक खोली सहा शिलांची असून त्यापैकी पांच शिला उभ्या असून त्यांवर एक सुमारें आठ इंच जाडीची आडवी शिला असते. अशा क्रिस्त्वएन सुमारें ५० आहेत. येथें खणल्यावर दांत, कांहीं हाडांचे तुकडे, मडक्यांचा चुरा सांपडला. ज्या स्थितींत दांत सांपडला त्यावरून प्रेत बसविलेल्या स्थितींत दक्षिणाभिमुख पुरलें असावें, असें दिसतें.

**कोन्हेर त्रिंबक एकबोटे** ( मृत्यु १७५६ )—पेशवाईंतील एक सरदार. सन १७५१–५२ मध्ये मराठ्यांच्या मोंगलांशीं झालेल्या युद्धांत याचें अलौकिक शौर्य दिसून आलें. यानें इतरांच्या साहाय्यानें मोगलांची सोन्याची अंबारी लुटली. मराठ्यांच्या बुसीशीं झालेल्या युद्धांत व होळीहुन्नरच्या लढाईंत यानें चांगला पराक्रम गाजवला. याची स्वामिभक्ति व पराक्रम ओळखून बाळाजी बाजीरावानें यास शिलेदारीचें पथक दिलें. बुसीनें पुण्यावर चाल करून पेशव्यांचे देव व उपकरणीं पळविलीं असतां ज्या सरदारांनी हिरीरीनें बुसीवर चाल केली त्यांतील हा एक होय. याच्या कुशल युद्धनैपुण्यामुळें यास 'फाकडे' असें बहुमानार्थी म्हणत. सन १७५६ मध्यें सावनूरच्या स्वारींत हा बुसीच्या तोफखान्यास बळी पडला. बाळाजीनें याच्या वंशजांस इनाम करून दिलें आहे. या एकबोट्यांचा जुना वाडा पुण्यास कसबा पेठेंत केदारेश्वराच्या बोळांत आहे.

**कोन्हेर त्रिंबक पटवर्धन** ( मृ. १७७७ )—पेशवाईंतील एक सरदार. हा पटवर्धनांच्या कुरुंदवाड शाखेपैकीं असून अत्यंत धाडसी होता. यास सुभेदार म्हणत. परशुरामभाऊ

पटवर्धनानें कोल्हापूर घेऊन तें लुटलें त्या वेळीं हा त्याजबरोबर होता. याच्या धाकानें तेथील लोक आश्रयार्थ शंकराचार्यांच्या मठांत शिरले. निदान हा तेथें येण्यास धजणार नाहीं अशी लोकांची कल्पना होती. यानें शंकराचार्यांच्या मठावरहि हल्ला करून मठास आग लावून दिली. हैदराचा सरदार कुमदान याच्याशीं सावशी येथें झालेल्या लढाईंत हा ठार झाला.

**कोन्हेर राम कोल्हटकर**—कोल्हटकर घराणें मूळ रत्नागिरीजवळ नेवरें गांवीं राहणारें असून तेथून नजीक भैरवगडच्या पायथ्याशीं बापूजी, साबाजी व परसोजी हे भोसलेबंधू राहत असत. भैरवगडावर हबशानें स्वारी करून या भोसले कुटुंबास कैद करून जंजिऱ्यास ठेवलें; त्या वेळीं रामजीपंत कोल्हटकर यानें ३ हजार रु. दंड भरून भोसले कुटुंबाची सुटका केली. तेव्हां भोसल्यांनीं आपलें उपाध्येपण रामजीपंतास वंशपरंपरा करून दिलें. व सातारच्या शाहूमहाराजाकडून रामजीपंताचे दोन मुलगे कोन्हेरपंत व भास्करपंत यांना नागपूरकर भोसल्यांच्या पदरीं नोकरी देवविली. या दोघा बंधूंच्या मदतीनें रघूजी भोसल्यानें बंगालपावेतों प्रदेश काबीज करून अनेक पराक्रम गाजविले. त्यामुळें नागपूरकर भोसले व कोल्हटकर कुटुंब यांचा घरोबा जमला. मराठेशाहीची प्रबळ सत्ता ईशान्य हिंदुस्थानांत उभारण्याचें या दोन कुटुंबांकडे मोठें श्रेय आहे. रघूजीनें २५ हजारांची जहागीर कोन्हेरपंतास दिली. या कोल्हटकर घराण्यांतील अनेक पुरुष पराक्रमी निघाले.

**कोपनहेगन**—युरोप, डेन्मार्कची राजधानी व उत्तम बंदर. लो. सं. ८,९०,१३० आहे. येथें अनेक राजवाडे व सुप्रसिद्ध इमारती आहेत. १३ व्या शतकापर्यंत हें एक लहान मच्छीमारी खेडें होतें. या शतकांत येथें एक किल्ला बांधण्यांत आला. व पुढें शहराची वाढ होऊं लागली. १४४३ मध्यें हें राजधानीचें ठिकाण बनलें. १७२८, १७९५ व १८८४ या सालीं या शहराला आगी लागून पुष्कळ घरें व प्रार्थना-मंदिरें जळालीं. शिवाय १८०१ व १८०७ सालीं ब्रिटिश आरमारानें केलेल्या तोफांच्या माऱ्यामुळें अनेक इमारतींचा नाश झाला. येथें विद्यापीठ, वेधशाळा, रसायनशास्त्रप्रयोगशाळा, पुस्तकालय (दोन लाख ग्रंथ व चार हजार हस्तलिखितें), शिल्पकलासंग्रहालय, वनस्पतिसंवर्धक उद्यान व खनिजपदार्थसंग्रहालय असून साहित्य व शास्त्रीय संस्था व संगीतविषयक संस्था फार नांवाजलेल्या आहेत. तसेंच पशुवैद्यक व शेतकी यांचीं विद्यालयें, लष्करी शाळा व आरमारी शाळा, धंदेशिक्षणाच्या व विशिष्ट कलाशिक्षणाच्या अनेक शाळा येथें आहेत.

**कोपरगांव**—मुंबई, अहमदनगर जिल्ह्यांतील एक तालुका. या तालुक्यांत पुणतांबें शहर व १२५ खेडीं आहेत. या तालुक्याचें प्रमुख ठिकाण कोपरगांव हें आहे. १९४१ मध्यें या तालुक्याची लोकसंख्या १,३९,८८५ इतकी भरली. कोपरगांवांत पेशव्यांचा वाडा असून राघोबादादा १७८४ त येथें मरण पावला. हें बागाइती गांव असून ऊंस फार पिकतो. लो. सं. ८,७९३.

**कोपर्निकस, निकोलस** (१४७३-१५४३)—एक पोलिश ज्योतिषी. हा रोम येथें गणित व ज्योतिष या विषयांचा शिक्षक होता. टॉलेमीच्या ज्योतिषसिद्धान्ताची सत्यता न पटून यानें सूर्यकेंद्रक सिद्धान्ताची उपपत्ति बसविली. सूर्याभोंवतीं पृथ्वी व इतर ग्रह फिरतात या त्याच्या शोधामुळें ऋतूंतील बदल, अयन-चलन यांसारख्या घटनांची संगति लावतां येऊं लागली. त्याचा ज्योतिषविषयक विख्यात ग्रंथ १५४० त प्रसिद्ध झाला.

**कोप्प**—म्हैसूर संस्थान, कडूर जिल्ह्याचा पश्चिमेकडील तालुका. या तालुक्यांत शृंगेरी जहागिरीचा समावेश होतो. या तालुक्याचें क्षेत्रफळ ६५७ चौरस मैल व लोकसंख्या सुमारें आठ हजार. या तालुक्यांत येडहळ्ळी व कोप्प हीं दोन गांवें असून १६६ खेडीं आहेत. कोप्प हें या तालुक्याचें मुख्य ठिकाण होय. या तालुक्यांतील मुख्य उत्पन्न तांदूळ व ऊंस यांचें होय. येथील टेंकड्यांमध्यें सर्वांत उंच शिखर मर्तीचें असून त्याची उंची ५,४५१ फूट आहे. या तालुक्याच्या पश्चिम भागांत आद्य शंकराचार्यांनीं स्थापलेला शृंगेरी मठ असून पूर्वेकडील भागांत लिंगायतांचा एक प्रमुख मठ आहे.

**कोप्पळ**—हैद्राबाद संस्थानांतील रायचूर जिल्ह्यांतील एक गांव. या ठिकाणीं एक प्राचीन डोंगरी किल्ला आहे. याची लोकसंख्या सु. आठ हजार आहे. सर सालरजंगच्या घराण्याकडे जी जहागिरी आहे त्या जहागिरीचें हें मुख्य ठिकाण आहे.

हा मूळचा आदिलशाहीचा कर्नाटकांतील एक प्रांत होता. शिवाजी तंजावरकडे गेला असतां जिंजी, वगैरे प्रांत त्यानें त्या वेळीं जिंकले. त्याच वेळीं हाहि प्रांत त्यानें काबीज केला. हैदरच्या लढायांत या 'स्वराज्या'चा उल्लेख वारंवार येतो. १७८६ सालीं टिपूनें हा गांव जिंकून घेऊन एक नवा किल्ला बांधला.

**कोंबडझुंज**—प्राण्यांची झुंज लावण्याची करमणूक माणूस फार प्राचीन कालापासून करून घेत असावा. कोंबडझुंज ही ग्रीक-रोमन लोकांत होती व ती इराणांतून आली असावी. याचें वेड मध्ययुगीन कालांत युरोपांत फार पसरलें होतें. तिसरा एडवर्ड व आठवा हेन्री या राजांनीं इंग्लंडांत याला बंदी केली तरी, दुसऱ्या चार्लसच्या रंगेल अमदानींत लंडनच्या व्हाइट

हॉलमध्यें कोंबडे झुंजविण्यासाठीं आखाडा केलेला आढळतो. पुढें १८४९ सालीं या खेळावर बंदी घातली ती कायम आहे.

**कोंबडा**—हा अतिशय माणसाळलेला पक्षी सर्वांच्या परिचयाचा आहे. कोंबडा पहांटेस आरवतो, यावरून त्याला अरुणदूत म्हणतात. याच्या डोक्यावर तुरा व गळ्याला दोन गलुली असतात. यामुळे तो सुरेख दिसतो. नर जास्त देखणा असतो व त्याची शेपटी झुपकेदार असते. कोंबड्याला पंख लहान असल्यानें फार उडतां येत नाहीं. पण तो जलद धावत जातो. हा कीड-मुंगी खाऊन राहतो. ती पुरेशी मिळत नसल्यानें दाणे वेंचून खातो. कोंबडी ही अंडीं घालीत असल्यानें माणसाचें अन्न तयार करते, असें म्हणावें लागतें. वर्षांतून १५०।२०० अंडी एक कोंबडी विते व एकवीस दिवस ती अंडीं उबवीत बसते. कोंबड्याच्या निरनिराळ्या जाती आहेत. त्यांचें संवर्धन करण्याचें एक शास्त्रच आहे. 'कुक्कुटसंवर्धन' पाहा.

**कोंबडा**—एक मुलींचा खेळ. यांत मुली पायावर पाय टाकून उकीडव्या बसतात व कोंबड्याप्रमाणें उड्या मारीत जातात. या वेळीं 'सईबाईचा कोंबडा आला माझे दारीं।' किंवा 'माझा कोंबडा। उडतो कसा।' इत्यादि गाणें म्हणतात. पंखाचा कोंबडा व उडत कोंबडा असे याचे आणखी प्रकार आहेत.

**कोबर्ग**—जर्मनी, बव्हेरिया, सॅक्सोबर्ग-गोथा या संस्थानची एक राजधानी. लो. सं. २५,८०० आहे. हें शहर पुरातन असून ११ व्या शतकांत बांधलेला किल्ला, व १६०४ सालीं स्थापलेली व्यायामशाळा, व एक लाख पुस्तकें असलेले जुनें ग्रंथसंग्रहालय येथें आहे. सदर किल्ल्यांत १४३० सालीं प्रॉटेस्टंट या एका खिस्ती धर्मपंथाचा संस्थापक मार्टिन ल्यूथर राहत असे. येथें रंगाचे, यंत्रें करण्याचे, दारू गाळण्याचे, लोखंडाचे ओतीव कामाचे, चिनीमातीचीं भांडीं करण्याचे, लाकडाचे-चिरकामाचे, वगैरे अनेक कारखाने आहेत.

**कोबाल्ट**—एक धातु. निकल, तांबें व सोमल यांशीं मिसळलेला असा हा कानडा, ऑस्ट्रेलिया, दक्षिण आफ्रिका, इ. निरनिराळ्या प्रदेशांत सांपडतो. याचा रंग रखी पांढरा असून हा धातु कठिण, चिवट व प्रसरणशील असतो. कांच आणि कांचमिन्याचे रंग याना टिकाऊ निळा रंग देण्याच्या कामीं कोबाल्टचा मुख्यतः उपयोग होतो.' कोल्बाट पोलादाचे मॅग्नेटा व अंतर्ज्वलन इंजिनाचे पडदे करतात.

**कोबी**—[ जात-ब्रासिका ]. या वनस्पतीची लागवड भाजीकरितां बागेमध्यें करण्यांत येते. कोबीच्या गड्ड्याला पानांचे थर एकावर एक असे असतात. आंतील पानें रंगानें पांढरीं शुभ्र असतात. कोबीच्या पांढरी, तांबडी, जांभळी अशा जाती आहेत. एका जातीची कोबी गुरांना खाऊं घालतात; तिला गायकोबी म्हणतात. पोर्तुगालमध्यें होणारी कोबी फार नाजुक असते.

गड्डाकोबी ही भाजी इंग्लंडांतून हिंदुस्थानांत आली. कोबीचें बी कालीफ्लॉवरच्या बियासारखेंच असतें. तें मोहरीपेक्षां मोठे व काळसर असतें. कोबी थंड हवेंत चांगली होते; तिला जमीन उत्तम, पाणी मुबलक, व खत लागतें.

**कोबे**—हें जपानांतलें तिसरें मोठें शहर होनश्यू बेटावर आहे. जहाजें बांधणें, कापूर तयार करणें, कापसाचें व रेशमी कापड तयार करणें हे मुख्य धंदे आहेत. हें बंदरहि चांगलें असून सर्व लहान-मोठ्या आकाराचीं जहाजें व बोटी येथें राहूं शकतात. लोकसंख्या ९,१२,१८९ आहे.

**कोमटी**—ही व्यापारी जात मुंबई, मद्रास, मध्यप्रांत, संयुक्त प्रांत, म्हैसूर, इत्यादि प्रदेशांत आढळते. एकंदर लो. सं. (१९११) ७,६५,५३५. पैकीं सर्वांत जास्त वस्ती मद्रास इलाख्यांत आहे. हे तेलगू भाषा बोलतात. त्यांच्या गवर (गौर) व कलिंग अशा दोन पोटजाती आहेत. गौर जात मद्यमांस खात नाहींत, कलिंग खातात. त्यांची आपसांत लग्नें होत नाहींत. कोमटी हे आपणाला वैश्य समजतात, व आपलीं गोत्रें व प्रवर सांगतात. त्यांचे उपाध्याय उडिया ब्राह्मण आहेत. यांच्यांत विधवाविवाह रूढ नाहीं. शैव, वैष्णव व माध्वपंथी असे तीन पंथांचे कोमटी आहेत. त्यांचीं निरनिराळीं गुरुपीठें असून त्यांचा अधिकार धार्मिक बाबतींत मानला जातो. मोठे व्यापारी, वाणी व सावकार म्हणून कोमटी प्रसिद्ध आहेत. बहुतेक कोमटी विद्यासंपन्न असतात. सर्व हुषार, मेहनती, मितव्ययी व गबर असतात. जातीची सर्वांगीण उन्नति करण्याकरितां १९०५ सालीं 'दक्षिण हिंदुस्थान वैश्य संघ' संस्था स्थापली आहे.

**कोमिल्ला**—हें बंगाल इलाख्यांतील टिप्पेरा जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून गोमती नदीवर वसलें आहे. डाक्क्यापासून चितागाँगला जाणारा रस्ता याच शहरावरून जातो. या शहराची लोकसंख्या सुमारें पंचवीस हजार आहे. या शहरीं १८६४ सालीं म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. येथें टिप्पेराच्या राजानें १५ व्या शतकांत बांधलेला धर्मसागर

नांवाचा एक तलाव असून त्याचा घेर १ मैल आहे. येथें कोमिल्ला व्हिक्टोरिया कॉलेज व वरीचशीं हायस्कुलें आहेत.

**कोमो सरोवर**—इटलींत आल्प्स पर्वताच्या पायथ्याशीं हें सरोवर ३० मैल लांबीचें आहे व याच सरोवराची शाखा लेको सरोवर सुमारें १३ मैल लांबीचें आहे. रुंदी अडीच मैल व खोली १३२९ फूट आहे. अत्यंत सुंदर देखाव्याबद्दल या सरोवराभोंवतालचा प्रदेश प्रसिद्ध असून कांहीं खेडीं, फुलबागा व द्राक्षांचे मळे प्रेक्षणीय आहेत. ट्राउट व इतर जातीचे मासे या सरोवरांत विपुल आहेत.

**कोम्ट, ऑगस्ट** (१७९८–१८५७)—हा प्रत्यक्ष-ज्ञानवादी फ्रेंच तत्त्ववेत्ता मॉंटपेलियर येथें जन्मला. इकोल पॉलिटेक्निक या विद्यालयांत उच्च शिक्षण घेऊन व १८१६ पासून पॅरिसमध्यें गणित विषय शिकवून तो आपली उपजीविका करूं लागला. १८१८ सालीं त्याचा सेंट सायमन या विद्वानाशीं परिचय होऊन, राजकीय गोष्टींनाहि नियमबद्ध शास्त्र असूं शकतें, आणि तत्त्वज्ञानाचें अंतिम ध्येय मानवसमाजाचें कल्याण होय, या दोन मूलभूत कल्पना कोम्टनें सेंट सायमनपासून घेतल्या. १८२६ सालीं 'प्रत्यक्षज्ञानवादी तत्त्वज्ञान' (पॉझिटिव्ह फिलॉसफी) या विषयावर एक व्याख्यानमाला पॅरिस येथें सुरू करून ती १८२८ सालीं संपवली, आणि १८३० ते १८४२ पर्यंत त्यानें या विषयावरचा ग्रंथ सहा भागांत प्रसिद्ध केला. १८५१ ते १८५४ पर्यंत त्यानें आपला 'सिस्टिम ऑफ पॉझिटिव्ह पॉलिटी' (प्रत्यक्षज्ञानवादी राजनीतिशास्त्र) हा ग्रंथ प्रसिद्ध केला. १८५२ सालीं त्यानें आपलें 'कॅटेसिझम ऑफ पॉझिटिव्हिझम' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. कोम्टची बुद्धिमत्ता विलक्षण व चिकाटी जबरदस्त होती. त्याची भाषा अवजड, कृत्रिम व कंटाळवाणी असली तरी त्याच्या ग्रंथांचे विषय व विचार फार व्यापक व महत्त्वाचे असल्यामुळें कोम्ट हा अव्वल दर्जाचा तत्त्ववेत्ता मानला जातो. तो देव वगैरे कांहीं मानीत नाहीं.

**कोम्ब, अँन्ड्र्यू** (१७९७–१८४७)—एक स्कॉटिश इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञ. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—१ 'ऑब्झर्व्हेशन्स ऑफ मेंटल डिरेंजमेंट' (मानसिक रोगांचें निरीक्षण); २ 'प्रिन्सिपल्स ऑफ फिजिऑलजी' (इंद्रियविज्ञानाचीं तत्त्वें); ३ 'फिजिऑलजी ऑफ डायजेशन', आणि ४ 'ए ट्रिटाइज् ऑन् दि फिजिऑलॉजिकल अँड मॉरल मॅनेजमेंट ऑफ इन्फन्सी' (बाल्यत्वाच्या नैतिक आणि प्राकृतिक व्यवस्थेवर प्रबंध). हा आपल्या भावाप्रमाणें मस्तक सामुद्रिक विद्येचाहि पुरस्कर्ता होता.

**कोम्ब, जॉर्ज** (१७८८–१८५८)—हा स्कॉटिश मस्तक सामुद्रिकवेत्ता असून ग्रेट-ब्रिटनमध्यें यानेंच प्रथम या सामुद्रिक विद्येची सुरवात केली. त्यानें ग्रंथ लिहिले ते—१ 'दि कॉन्स्टिट्यूशन ऑफ मॅन' (मनुष्याचा पिंड); २ 'ए सिस्टिम ऑफ फ्रेनॉलजी' (मस्तिष्कविज्ञान); ३ 'दि रिलेशन ऑफ सायन्स अँड रिलिजन' (धर्म आणि विज्ञान यांचा संबंध).

**कोयाजी, सर जहांगीर कुंवरजी** (१८७५– )—एक हिंदी अर्थशास्त्रज्ञ. मुंबई विद्यापीठांतून बी. ए. झाल्यावर हे उच्च शिक्षणासाठीं केंब्रिजला गेले व तेथें अर्थशास्त्र हा विषय घेऊन यांनीं तेथील परीक्षेंत यश मिळवलें (१९१०). यानंतर सन १९११ ते १९३० या कालांत कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्रोफेसर म्हणून यांनीं काम केलें व याच वेळीं यांना 'इंडियन फिस्कल कमिशन्' व 'रॉयल कमिशन ऑन् इंडियन करन्सी ॲण्ड एक्सचेंज' चे सभासद निवडण्यांत आलें. लीग ऑफ नेशन्समधील हिंदी प्रतिनिधीचा मान यांनीं मिळवला व या वेळीं आर्थिक घसरगुंडीच्या अध्ययनाचा पुरस्कार करणारा ठराव यांनीं मंजूर करून घेतला. लाहोरच्या इंडियन इकॉनॉमिक कॉन्फरन्सच्या सहाव्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदाचा मान यांना मिळाला होता. या वेळीं 'डिस्क्रिमिनेटिंग प्रोटेक्शन फॉर इंडिया' (हिंदुस्थानचें पक्षपाती संरक्षण) या विषयावर यांनीं केलेलें अध्यक्षीय भाषण मननीय असेंच झालें. यांचे अर्थशास्त्रीय विषयावर पांच-सहा महत्त्वाचे ग्रंथ आहेत.

**कोयी**—ही एक डोंगरी जात मद्रास इलाखा व हैद्राबाद संस्थान यांत आहे. लो. सं. दोन लाखांवर आहे. हे गोंड लोकांचे वंशज असावे. कोयी भाषा ही गोंड भाषेची पोटभाषा आहे. पांडवांपैकीं भीम व अर्जुन यांच्यावर त्यांची फार भक्ति असते. भीम व हिडिंबा यांजपासून आपली मूळ उत्पत्ति असावी, असें कोयी लोक मानतात, व भीमाचा उत्सव पांच दिवस करतात. हे लोक गरीब व दीन दिसतात, व त्यांच्या आचरणांत प्रामाणिकपणा व शुद्धता दिसून येते. शेती हा यांचा धंदा आहे. ते आपल्या देवतांना बकरें व कोंबडीं बळी देतात. नाचणें व गाणें हा त्यांचा आवडता विषय आहे.

**कोरकई**—हें पांड्य राजघराण्याच्या अमदानींतील त्यांच्याच राज्यांतील एक मोठें बंदर असून त्यांच्या एका मोठ्या प्रांताचा सुभेदार येथें राहत असे. कारोमांडल किनाऱ्यावर हें बंदर फार प्राचीन काळापासून समुद्रावरच्या व्यापाराकरितां प्रख्यात आहे. मॅक्रिंडल व टॉलेमीहि याचा नामनिर्देश करतात. हें बंदर हल्लीं तिनेवल्ली जिल्ह्यांत ताम्रपर्णीच्या कांठीं आहे. खिस्ती शकाच्या पूर्वी ही पांड्यांची राजधानी होती.

**कोरफड**— [वर्ग– लिलिआसी, जात—अलो]. या रोपाच्या अनेक जाती आहेत. यांतील कांहीं केवळ कांहीं इंचां-

इतक्या वाढतात, तर कांहीं ३० फुटांपेक्षांहि उंच वाढतात. यांचें मूलस्थान दक्षिण आफ्रिका व सोकोत्रा बेट हें होय. यांतील मोठ्या जाती फार उपयुक्त असतात. त्यांच्या पात्यांपासून निघणाऱ्या धाखाच्या दोऱ्या, दोरखंडें, जाळीं व कापडसुद्धां तयार होतें. याच्या कांहीं जातींच्या झाडांचा रस घट्ट करून औषधीच्या कामीं वापरतात. हा रेचक आहे. सोकोत्रा बेटांतील झाडांपासून औषधी बनविण्यांत येतात. याच झाडांपासून एक सुंदर निळसर ( व्हायोलेट ) रंग तयार होतो.

हिचें जन्मस्थान उत्तर आफ्रिका असावें. हिंदुस्थानांत सर्वत्र कोरफड होते. तिच्या दोन जाती आहेत. कोरफडींचीं पानें १॥ ते २॥ फूट लांब व दळदार असतात. कोरफडीला मार्गशीर्षांत फुलांचा दांडा येऊन पौषअखेर तो झडून जातो. कोरफडीपात्यांतील गीर पारदर्शक व कडू असतो. त्याचें गुजराथेंत लोणचें करतात. कोरफड आढ्यास टांगून ठेवली तरी न सुकतां जशीच्या तशीच राहते. वरील पात्या सुकल्यास नवीन पात्या फुटून ही वनस्पती सदासर्वकाळ ताजी राहते, म्हणून हिला 'कुमारी' हें अन्वर्थक नांव आहे. कोरफडीच्या रसापासून येळ्याबोळ म्हणजे काळाबोळ तयार करतात. खोकल्यावर कोरफड फुफाट्यांत भाजून तिचा रस मध, पिंपळी व लवंगाची पूड घालून घेतात, किंवा कोरफडीच्या रसांत मध, सैंधव व हळद घालून घेतात. डोळे दुखूं लागल्यास कोरफडीच्या कापा पाण्यांत धुऊन त्या पाण्यांत तुरटीची लाही व अफू मिसळून तें पाणी गाळून पोथंडीनें डोळ्यावर फिरवीत जावें.

**कोरलई किल्ला**—हा डोंगरी किल्ला कुलाबा जिल्ह्यांत रेवदंड्याच्या दक्षिणेस १० मैलांवर आहे. पायथ्याशीं कोरलई गांव आहे. वरपासून खालपर्यंत एक तट आहे. या टेंकडीला 'चौलचा खडक' म्हणत. या ठिकाणी पोर्तुगीज व मुसलमान यांत अनेक लढाया झाल्या. नंतर १५९४ सालीं बुऱ्हाण निजामशहा यानें हा किल्ला बांधला. हा नंतर पोर्तुगीजांनीं पाडून टाकला, पण पुढें दुरुस्त केला. या किल्लयाची लांबी २,८२८ फूट व रुंदी ९८ फूट आहे. किल्लयाला ११ दरवाजे आहेत. १७३९ त मराठ्यांनीं हा घेतला व बुरुजांचीं नावें पोर्तुगीज होतीं तीं बदलून देवादिकांची दिलीं. किल्लयांत बरींच देवळें आहेत.

**कोरिएट, थॉमस** (१५७७-१६१७)—हा इंग्रज जगप्रवासी असून त्यानें बराच प्रवास पायीं केला. युरोप, आशियामायनर, इराण व हिंदुस्थान येथें तो फिरला; व त्यानें आपलीं प्रवासवृत्तें चमत्कारिक नांवें देऊन प्रसिद्ध केलीं आहेत.

**कोरिया**—आशिया खंडांतील पूर्वेकडचा एक देश. हें एक द्वीपकल्प आहे. याचें क्षेत्रफळ ८५,२४६ चौरस मैल. लो. सं. (१९३८) २,२८,००,६४७. हें मांचुकोच्या दक्षिणेस आहे व पीत समुद्र व जपानचा समुद्र यांच्या मध्यें आहे. जपानच्या दक्षिण भागापासून तें कोरियाच्या सामुद्रधुनीनें विभक्त झालें आहे. कोरियामध्येंच लगतचीं लहान लहान सुमारें १,००० बेटें येतात. कोरियाचा मुलूख डोंगराळ आहे. नद्या लहान आहेत. तांदूळ, बार्ली, गहूं, कापूस, वगैरे पिकें निघतात. सोनें, लोखंड, कोळसा वगैरेंच्या खाणी आहेत. मासेमारीचाहि धंदा चालतो. कापडाचा धंदा जपानी भांडवलदारांनीं मोठ्या प्रमाणांत सुरू केला आहे.

कोरियन लोक शरीरसौष्ठवानें युक्त असे आहेत. त्यांना स्वतःची संस्कृति आहे. मोंगल, तार्तार व जपानी भाषांचें मिश्रण त्यांच्या भाषेंत फार आहे. जपानी भाषेचा फार मोठा पगडा बसलेला आहे. पूर्वीं चिनी अभिजात वाङ्मयाचेंच शिक्षण लोकांना दिलें जाई. पण जपानी सरकारनें तें व्यावहारिक केलें. जपाननें शिंतो धर्म सुरू केला. १० व्या शतकांत कोरिया स्वतंत्र होता. तेथील राजे आपणास सम्राट् म्हणवीत. १६ व्या शतकाच्या अखेरीस जपाननें कोरियावर स्वाऱ्या केल्या त्या वेळेपासून १९ व्या शतकाच्या अखेरीस जपानी युद्धाच्या वेळेपावेतों कोरिया चीनच्या नाममात्र आधिपत्याखालीं होता.

या वेळीं कोरियाशीं जपानचे महत्त्वाचे व्यापारी संबंध जडलेले होते. १९०४-५ च्या रशिया-जपान लढाईपासून कोरियावर जपानची हुकमत होती व १९१० सालीं तें जपानला जोडण्यांतच आलें व एक जपानी गव्हर्नर जनरल नेमण्यांत आला. दुसऱ्या महायुद्धांत जपानचा पराभव झाल्यानंतर दोस्तांनीं कोरियाला स्वातंत्र्य प्राप्त करून दिलें, पण तें टिकवणें आतां जड जाऊं लागलें आहे. जपान व्यापणाऱ्या अमेरिकेनें कोरियांत आपले हात पोंचविले आहेत, पण कम्युनिस्ट लोकांची चळवळ इकडे फार जोरांत आहे, व चीनप्रमाणें कोरियाचें भवितव्य फार अनिश्चित आहे.

**कोरिया संस्थान**—मध्यप्रांतांतील एक मांडलिक संस्थान. हें १९४८ त प्रांतांत विलीन झालें. क्षे. फ. १,६४७ व लो. सं. १,२६,८७४ आहे. ३०१ खेडीं व सोनहाट हें मोठें गांव असून संस्थानिक या गांवीं राहतो. हें संस्थान १८०० ते ३६०० फूट उंचीच्या पठारावर वसलेलें आहे, व उत्तर भागांतले पठार सर्वांत अधिक उंच आहे. या पठारांतून गोपथ नदी, शोण नदी व हसडो नदी या नद्या निघाल्या असून शिवाय लहान लहान पाण्याचे प्रवाह पुष्कळ आहेत. हसडो नदीला किरवट्टी येथें एक धबधबा आहे. येथील रानांत हत्ती, वाघ, गवे, सांबर, नीलगाई, रानम्हशी, हरणें, आस्वलें हे प्राणी आहेत. बहुतेक सर्व लोक शेतकीवरच राहतात. येथें सडकांचा अभाव असल्यामुळें मालाची ने-आण बैलांवरून

करतात. संस्थानचें उत्पन्न बावीस लाख रुपये आहे. पूर्वी कोरिया हें सुरगुजा संस्थानचें मांडलिक म्हणून नांदत होतें. येथील संस्थानिक आपणास चव्हाण रजपुतांचे वंशज मानतात. १८१८ सालीं हें संस्थान ब्रिटिश अमलाखालीं गेलें. येथील मुख्य पीक तांदूळ आहे. लोखंड सर्वत्र आढळतें, पण खाणींवर ताबा ब्रिटिश सरकारचा आहे. सध्यांचे राजे रामानुज प्रतापसिंग देव १९०९ सालीं वयाच्या आठव्या वर्षी गादीवर बसले. हे अलाहाबाद विद्यापीठाचे पदवीधर आहेत.

**कोरी**—एक कोळी जात. ही संयुक्त प्रांत व वऱ्हाड-मध्यप्रांत यांत आहे. लो. सं. (१९११) ९,१८,८२० आहे. कोळी शब्दापासून हा बनला असावा. त्यांचीं जातिनामें १०४० आहेत. चालीरीती व वागणूक चमार (चांभार) लोकांसारखी आहे. सर्व कोरी समाज हिंदु आहे. रामदासी, शिवनारायणी व कबीरपंथी असे तीन पंथांचे कोरी आहेत. त्यांचा धंदा मुख्यतः विणकामाचा असून कांहीं लोक नोकऱ्या करतात व कांहीं जमीनदार आहेत. यांच्यांत विधवाविवाहाची चाल आहे.

**कोरूना**—स्पेन, कोरूना प्रांताची राजधानी. लो. सं. १,१२,०९६ आहे. शहराच्या पूर्व भागांत बंदर असून तें अनेक किल्ल्यांमुळें सुरक्षित आहे. उत्तरेस हरक्यूलस टॉवर ४०० फूट उंचीचा असून त्यावर फिरता दिवा आहे. १५८८ सालीं 'स्पॅनिश अजिंक्य आरमाराला' (इन्व्हिन्सिबल स्पॅनिश आरमाडा) या बंदरानें आश्रय दिला. १७४७ व १८०५ या सालीं ब्रिटिश आरमारानें फ्रेंच आरमारावर या ठिकाणीं जय मिळवला. हेरिंग व सार्डाईन मासे धरणें हा येथील मोठा धंदा असून दारूचे व तंबाखूचे कारखाने येथें आहेत.

**कोरेगांव**—१. मुंबई, सातारा जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षे. फ. ३४५ चौ. मैल व लो. सं. ९१,७७६. या तालुक्यांत एक गांव व ७३ खेडीं आहेत. रहिमतपूर हेंच मोठें गांव आहे. कोरेगांव हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. ५,७१७. इमारती लांकडाचा व्यापार चालतो. केदारेश्वराचें देवालय जुनें आहे. येथें एक हायस्कूल आहे.

२. मुंबई, पुणें जिल्ह्याच्या शिरूर तालुक्यांतील एक खेडें. हें पुण्याच्या ईशान्येस १६ मैलांवर भीमा नदीच्या कांठीं वसलेलें आहे. या ठिकाणीं १८१८ जानेवारी ता. १ ला इंग्रज व पेशवे यांच्यामध्यें युद्ध होऊन तींत मेलेले जे इंग्रज शिपाई त्यांचें स्मारक म्हणून इंग्रजांनीं तेथें एक जयस्तंभ उभारला आहे.

**कोरो, जीन बाप्तिस्त-कामीय** (१७९६-१८७५)—हा फ्रेंच चित्रकार असून त्याचे सृष्टिविषयक देखावे फार सुंदर आणि वैशिष्ट्यपूर्ण आहेत. 'दि फ्लाइट इन्टु ईजिप्त', 'मॅकबेथ', वगैरे त्याचीं चित्रें प्रसिद्ध आहेत.

**कोर्कू जात**—मूळ संयुक्त प्रांतांतील असून आतां मध्यप्रांत, वऱ्हाड व इतरत्र छोटा नागपूर, वगैरे भागांत आहे. लोकसंख्या सुमारें दोन लक्ष आहे. हे आपणांस रजपुतांचे वंशज मानतात. मवासी, बावरिया, रूम व बोंडोय अशा चार पोटजाती आहेत. पहिल्या दोन जातींना राजकोर्कू म्हणतात. हे मुख्यतः जमीनदार असून त्यांची उच्च वर्गांत गणना होते. सातपुड्याच्या पश्चिम भागांत राहणारे कोर्कू फार साहसी व लुटारूपणांत तरबेज होते, म्हणून यांच्या मुलखाला मराठ्यांनीं 'मवास' म्हणजे त्रासदायक मुलूख हें नांव दिलें. कोर्कू लोक आपणाला हिंदुधर्मीय म्हणवितात. त्यांचें उपास्य दैवत महादेव असून पंचमढीच्या डोंगरांत महादेवाचें देवालय आहे, त्याची व्यवस्था या जातींतील दोन जमीनदारांकडे वंशपरंपरा आहे. हे लोक फार दरिद्री आहेत व त्यांची राहणी गलिच्छ आहे. कोर्कू नांवाची एक स्वतंत्र बोली आहे. हे लोक प्रामाणिक व सचोटीचे असल्यामुळें यांना शेतावर कामास ठेवतात.

**कोर्डोफान**—आफ्रिका, अँग्लो-ईजिप्शियन सूदान राज्यांतील एक प्रांत. क्षे. फ. १,१९,०००. हा प्रदेश सपाट व सुपीक असला तरी शेती बहुतेक नाहीं. 'डुचु' नांवाची बाजरी पिकते. गुरें, सोनें, हस्तिदंत, इ. चा व्यापार चालतो. प्रांताचें मुख्य ठिकाण ओबीद आहे. लोकसंख्या सुमारें पांच लाख आहे.

**कोर्नेर, कार्ल थिओडोर** (१७९१-१८१३)—हा एक जर्मन कवि असून त्यानें 'रोझामुनेड' आणि 'झ्रिनी' हीं दुःखान्त नाटकें व इतर नाटकें व्हिएन्ना येथील थिएटर रॉयलकरितां लिहिलीं. परंतु त्याची मुख्य प्रसिद्धि देशभक्तिप्रेरित भावगीतांबद्दल आहे. या गीतांचा संग्रह 'वीणा आणि तलवार' या नांवाचा हा फ्रान्सबरोबरच्या लढाईंत मारला गेल्यानंतर लवकरच प्रसिद्ध झाला. त्यांत कांहीं सर्वोत्कृष्ट रणगीतेंहि आहेत.

**कोल**—ही एक द्राविड जात विंध्या कैमूर पठारानजीक व छोटानागपूर या प्रदेशांत आहे. त्यांच्या चेहऱ्यावरून पाहतां आर्यांच्या रक्ताची बरीच भेसळ यांच्यांत असावीसें दिसतें. कोल स्त्रीपुरुषांची चालण्याची ढब मोठी ऐटदार असते. हरिवंशावरून असें दिसतें कीं, ययातिपुत्र तुर्वसु हा दक्षिणेंत राहात असून त्याच्या राजवंशांत पांड्य, कोरल, चोल व कोल असे पुरुष निर्माण झाले. त्या कोलांचे वंशज बहुधा सदरहू कोल होत. परंतु द्राविड वंशाशीं ह्यांचा संबंध जोडणाऱ्या दंतकथाच जास्त विश्वसनीय वाटतात. या जातीची पंचायत असून पंचायतीच्या मुख्यास चौधरी म्हणतात. विवाहाचे व कांहीं नैतिक आचरणाचे निवाडे ही पंचायत देते, व जातिबहिष्कार व दंड या शिक्षा सांगितल्या जातात. विधवाविवाह व काडीमोड व दत्तक या चाली या जातींत रूढ आहेत. लाखनदेव व बिरमादेवी हीं

यांचीं उपास्यदैवतें असून चुनारनजीक पिप्री, येथें यांचें एक देवस्थान आहे.

**कोलन वॉटर**—'ओ द कोलोन' (कोलोन गांवचें पाणी) असें मूळ नांव. जर्मनींत कोलोन हें यासाठीं प्रसिद्ध आहे. हें औषधी व सुगंधी पाणी कृत्रिम रीतीनें तयार करतात.

| | | |
|---|---|---|
| विशुद्ध मद्यसार (रेक्टिफाइड आल्कोहोल) | १ १/२ | पिंट |
| लिंबाचा अर्क | १ १/२ | ड्राम |
| बर्गामोट ,, | १ १/२ | ,, |
| सेड्राट ,, | १ १/२ | ,, |
| लव्हेंडर ,, | १ १/२ | ,, |
| रोझमेरी ,, | १/२ | ,, |
| थाइम ,, | १/४ | ,, |

हीं द्रव्यें कांचेच्या बाटलींत घालून चांगलीं ढवळतात. नंतर हें पाणी गाळून चांगल्या बुचाच्या बाटलींत भरतात.

याचे बरेच उपयोग आहेत. उन्हाळ्यांत हातांना घाम येऊं नये म्हणून हें लावतात. याच्या अंगीं स्तंभकगुण आहे. डोकें दुखत असल्यास याची पट्टी डोक्यावर ठेवतात.

**कोलंब, चार्लस ऑगस्टिन** (१७३६-१८०६)—एक फ्रेंच शास्त्रज्ञ. त्यानें प्रथम लष्करी इंजिनियरचा पेशा पत्करून नोकरी केली. १७८९ सालच्या क्रांतिकारक फ्रेंच सरकारनें त्याला नवीन वजनेंमापें करण्याचें काम दिलें; व १८०२ सालीं त्याला सार्वजनिक शिक्षणखात्यावर इन्स्पेक्टर नेमलें. यंत्रशास्त्र, विद्युत् व चुंबकत्व या शास्त्रांत त्यानें संशोधन करून विद्युत् व चुंबकत्व यांच्यासंबधी गणितविषयक सिद्धान्त प्रस्थापित केले; व त्यांसंबंधीं एक महत्त्वाचें पुस्तक १७८५ सालीं प्रसिद्ध केलें. विद्युल्लतेच्या व्यावहारिक एकम् परिमाणास कोलंब हें नांव दिलें गेलें आहे.

**कोलंबस**—अमेरिकेंतील सं. संस्थानांतील ओहिओ संस्थानची ही राजधानी स्किओटो व आलेंटांगी नद्यांच्या संगमावर वसली आहे. लो. सं. ३,२३,००० असून शहराचें क्षे. फ. १७ चौ. मैल आहे. १०० फूट व १२० फूट रुंदीचे दोन मोठे रस्ते आहेत. येथलें ओहिओ विद्यापीठ सरकारी खर्चानें चालतें, व कॉलेज-शिक्षण मोफत दिलें जातें. येथें लोखंड व कोळसा यांच्या खाणी जवळ असल्यामुळें येथें लोखंडी वस्तूंचे मोठे कारखाने आहेत. १७९७ सालीं येथें प्रथम वस्ती होऊन १८१६ सालीं राजधानीचें शहर झालें.

**कोलंबस, ख्रिस्तोफर डोमेनिको** (१४५१-१५०६)—हा सुप्रसिद्ध स्पॅनिश भूप्रदेश-संशोधक जिनेव्हा येथे जन्मला. त्यानें पाविया येथील विश्वविद्यालयांत भूमिति, भूसृष्टिविद्या, ज्योतिष व नकाशे काढण्याची कला यांचा अभ्यास केला. वयाच्या १४ व्या वर्षी नाविकाचा धंदा पत्करून, निरनिराळ्या देशांच्या सफरी करून १४७७ सालीं उत्तर समुद्रांतील आइसलंड बेटापर्यंत तो गेला. नंतर

पोर्तुगाल देशांत तो राहण्यास आला व पेरेस्त्रेलो नांवाच्या दर्यावर्दी सरदाराच्या मुलीशीं त्यानें लग्न केलें; व पेरेस्त्रेलोनें शोधून काढलेल्या नव्या स्थळांचीं वर्णनें व त्या देशांचे नकाशे यांचा त्यानें सूक्ष्म अभ्यास केला. पश्चिमेच्या मार्गानें आशिया खंडांत जाण्याचा मार्ग शोधून काढण्याचें त्यानें ठरविलें; पण पोर्तुगालच्या राजानें त्याला मदत देण्याचें नाकारलें, म्हणून स्पेनच्या राजाराणीकडून मदत मिळवून १४९२ त तो जलपर्यटनास निघाला; दोन महिने जलप्रवास झाला तरी जमीन दिसेना. त्यामुळें त्याच्या गलबतावरील लोक घाबरून कोलंबसला दोष देऊं लागले; पण परमेश्वरावर विश्वास ठेवून तो तसाच पुढें चालला व शेवटीं त्यांना जमीन दिसली. ज्या बेटावर तो उतरला त्या बेटाला सॅन साल्व्हाडोर हें नांव दिलें; आणि तेथील लोकांशीं मैत्री करून त्यांच्या मदतीनें त्यानें सँटा मेरिया, फर्नांडिना, क्यूबा, हिस्पॅनियोला, वगैरे बेटें शोधून काढलीं, व हिस्पॅनियोला येथें वसाहत स्थापली. नंतर तो युरोपला परत आल्यावर स्पेनच्या राजाराणीनें त्याचा फार चांगला सत्कार केला; व त्याची कीर्ति युरोपभर पसरली. त्यानें १४९३ त दुसरी सफर सुरू करून डोमिनिका, ग्वाडालूप, मॉन्टसेराट, ॲंटिग्वा, सॅन मार्टिन सँटाक्रूझ, व्हर्जी, जमेका, वगैरे बेटें शोधून काढून हिस्पॅनियोला या वसाहतींत सोन्याच्या खाणी खोदण्याचें काम सुरू करून १४९६ च्या जून महिन्यांत स्पेनला परत आला. नंतर तिसऱ्या सफरींत त्यानें दक्षिण अमेरिकेचा शोध लावला, व हिस्पॅनियोला वसाहतींत आला. दरम्यान कोलंबसविरुद्ध स्पेनच्या राजाराणीचें मन कलुषित केल्यामुळें राजानें दुसरा सरदार तिकडे पाठवून कोलंबसला कैद करून स्पेनला आणलें. पुढें खरी हकीगत कळल्यावर राजानें कोलंबसला बंधमुक्त करून त्याचा योग्य बहुमान केला. पुन्हां चौथी सफर काढून बेथलेहेम बेल शोधून काढलें व तेथें सोनें विपुल सांपडतें म्हणून वसाहत स्थापली, आणि स्पेनला परत आला. त्या वेळीं पुन्हां त्याला पुष्कळ मानमरातब मिळाला. पुढें त्याची प्रकृति अगदीं अशक्त होऊन तो मरण पावला. त्याच्या मुलीनें त्याचें चरित्र लिहिलेलें आहे.

**कोलंबा (सेंट)** (५२१-५९७)— हा एक आयरिश संत असून त्यानें अॅनॅग्रे, लक्झील (५९०) आणि फॉन्टेन (बर्गंडी) येथें ख्रिस्ती धर्ममठ स्थापले. व स्कॉटलंड आणि इंग्लंडचा उत्तर भाग ख्रिस्ती करण्यासाठीं त्यानें आपले प्रचारक तेथें धाडले. त्याचा अमल बेनेडिक्टाइन अमलापेक्षां फार कडक असे, आणि मठवासीयांचे लहान अपराध असले तरी तो त्यांना फटके मारण्याची शिक्षा देत असे. तो लक्झील येथें सुमारें २० वर्षें राहिला. आणि नंतर स्वित्झर्लंडमध्यें त्यानें ख्रिस्ती धर्माचा प्रचार केला. ६१२ मध्यें तो लोंबार्डी प्रांतांत गेला व बोबिओ येथें त्यानें एक मठ स्थापला व तेथेंच तो मरण पावला. जून ९ तारखेस त्याचा दिवस पाळतात.

**कोलंबिया**—हें एक दक्षिण अमेरिकेंतील लोकसत्ताक राज्य आहे. दक्षिण अमेरिकेच्या वायव्य टोकाला पासिफिक महासागर, पनामचा उपसागर व कॅरिबिअन समुद्र यांच्या कांठीं आहे. क्षेत्रफळ ४,४८,७९४ चौ. मैल. लो. सं. ९,५२,२३,०००. बोगोटा हें मुख्य ठिकाण आहे. पश्चिम भाग अँडीज पर्वताच्या ३ रांगांनीं व्यापला आहे. सर्वोच्च शिखर १९,००० फूट उंच आहे. वस्ती बहुशः किनाऱ्याच्या बाजूनें आहे. अंतर्भाग मोठमोठ्या अरण्यांनीं व्याप्त आहे. त्यांत अद्याप कोणींहि प्रवेश केलेला नाहीं व अर्थातच शेती वगैरे कांहीं नाहीं. मॅगडलेन ही मुख्य नदी आहे. कॉफी व केळीं यांची लागवड व निर्यात होते. सोनें काढतात. इतरहि कांहीं धातू निघतात.

मूळच्या चिबच्या इंडियन लोकांना १५३८ सालीं स्पॅनिअर्ड लोकांनीं जिंकलें. १८१९ पर्यंत कोलंबिया स्पेनकडे होता. त्या वर्षी कोलंबिया, इक्वेडोर व व्हेनिझुएला मिळून एक लोकसत्ताक राज्य स्थापन करण्यांत आलें. पुढें न्यूग्रेनडा म्हणून एकटेंच स्वतंत्र राहिलें. १८६३ मध्यें कोलंबिया हें नांव घेण्यांत आलें. १९०३ पर्यंत पनामा प्रांत यांतच होता. तो त्या वर्षी वेगळा करण्यांत आला.

**कोलबेर** (१६१९-१६८३)—हा फ्रेंच मुत्सद्दी न्हीम्स शहरीं जन्मला. तो लहान हुद्यावरून चढत चढत अखेर फ्रान्समधील अतिशय थोर मंत्र्यांपैकीं एक मंत्री झाला. संपत्तीवरलि कर कमी करणें, उद्योगधंदे वाढवणें, सरकारी वसूल गोळा करण्यांतील लबाड्या बंद करणें, वगैरे अनेक सुधारणा त्यानें केल्या, व त्या निष्ठुरपणानें अमलांत आणल्या. कला व शास्त्रें हे त्याच्या आवडीचे विषय असल्यामुळें कारागिरांना उदार देणग्या देऊन त्यानें कलेस उत्तेजन दिलें. १६६३ सालीं खोदीव लेखांचें विद्यामंदिर (अॅकेडमी ऑफ इन्स्क्रिप्शन्स) व १६६८ सालीं शास्त्राचें विद्यामंदिर (अॅकेडमी ऑफ सायन्सेस) यांची त्यानें स्थापना केली.

**कोलंबो**—सीलोनची राजधानी व मुख्य बंदर. लो. सं. २,८४,१५५ (१९३१). १५१७ सालीं पोर्तुगीजांनीं येथें वसाहत केली. १६५६ सालीं हें डच लोकांनीं काबीज केलें, व १७९६ सालीं हें ब्रिटिशांना मिळालें. चहाच्या व कॉफीच्या लागवडीमुळें या बंदराला फार महत्त्व आलें. हल्लीं जगांतील उत्तम बंदरांपैकीं हें एक आहे. येथें पूर्वीं ९०० सरदार घराणीं व १५०० व्यापारी घराणीं होतीं. येथें रॉयल कॉलेज, धंदेशिक्षणाचें विद्यालय व सेंट जोसेफ रोमन कॅथॉलिक विद्यालय आहे. कोळसा आणि तेल यांच्या मोठ्या वखारी आहेत.

**कोलब्रुक, हेन्री थॉमस** (१७६५-१८३७)— एक प्राच्यभाषाकोविद इंग्रज पंडित. १५ व्या वर्षींच त्यानें ग्रीक व लॅटिन भाषा व गणित या विषयांत बरेंच प्रावीण्य मिळवलें. १७८२ सालीं त्यानें हिंदुस्थानांत कारकुनाची जागा पत्करली; नंतर अकरा वर्षांनीं संस्कृत भाषेचा अभ्यास करून तो संस्कृत पंडित बनला. १८०५ सालीं त्याला फोर्ट विल्यम येथील विद्यालयात हिंदु कायदा व संस्कृत यांचा अध्यापक नेमलें. त्यानें संस्कृत व्याकरण, हिंदु धर्म-संस्कारांची माहिती व वेदांवर निबंध लिहिले. १८१४ सालीं तो इंग्लंडला परत गेला.

**कोलमन, जॉर्ज (थोरला)** (१७३२-१७९४)— एक इंग्लिश नाटककार. त्याचें 'दि जेलस वाइफ' (परस्त्रीशंकिनी) हें सुखान्त नाटक ड्रुअरीलेन नाट्यगृहांत १७६१ सालीं रंगभूमीवर आलें व तें अतिशय यशस्वी झालें. नंतर त्यानें सुप्रसिद्ध नट गॅरिक याच्या सहकार्यानें 'दि क्लँन्डेस्टाइन मॅरेज' (चोरटें लग्न) हें नाटक १७६६ मध्यें लिहिलें व त्यानंतर अनेक नाटकें लिहिलीं, व कांहीं अनुवादित केलीं. तो १७६४ ते १७७४ पर्यंत कॉव्हेंट गार्डन नाटकगृहाचा आणि १७७६ पासून १७८९ पर्यंत हे मार्केट नाटकगृहाचा व्यवस्थापक होता.

**कोलमन, जॉर्ज (धाकटा)** (१७६२-१८३६)— हा इंग्रज नाटककार वरील नाटककाराचा मुलगा असून त्याचीं नाटकें अतिशय यशस्वी झालीं. त्यांपैकीं कांहीं नाटकें 'दि एअर-अॅट् लॉ,' 'द पुअर जन्टलमन', 'जॉन बुल.ऑर अॅन इंग्लिशमन्स फायरसाइड' आणि 'लव्ह लाफ्स अॅट लॉकस्मिथ' हीं होत.

**कोलार**— हा जिल्हा म्हैसूर संस्थानच्या पूर्व भागांत आहे. लो. सं. सुमारें सव्वातीन लाख आहे. या जिल्ह्यांतून अर्कावती, चित्रावती, पेन्नेर, पालार, पापघ्नी व पोनोर या नद्या वाहतात, व तलाव बरेच आहेत. हवा निरोगी व जमीन सुपीक आहे. रागी, तांदूळ, इतर धान्यें, ऊंस व बटाटे हीं मुख्य पिकें असून बागायती जमीन पुष्कळ आहे. नंदिदुर्ग टेकड्यावर

उंच झाडांचें जंगल व वनस्पतींची समृद्धि आहे. पाऊस सरासरी २९ इंच पडतो. जम्भूर व अभ्रक जातीचे दगड येथें सांपडतात. या जिल्ह्यांत लोखंडी जिन्नस, तांब्यांपितळेचीं भांडीं, लांकूडकाम, साखर, ब्लँकेटें, रेशीम, वगैरे अनेक प्रकारचे कारखाने आहेत.

रेशमी किड्यांच्या संवर्धनाचा धंदा पुष्कळ खेड्यांत आहे. कोलार शहराची लो. सं. दहा हजार आहे. याचें प्राचीन नांव कुवलालपूर आहे. येथें ११ व्या शतकांत राजेंद्रकोल नांवाच्या राजानें बांधलेलें कोलारम्माचें देवालय आहे. येथे विंचू फार आहेत. रेशमांच्या किड्यांसाठीं मलबेरी–तुती झाडांची लागवड फार करतात.

कोलार शहरानजीक गोल्ड फील्ड हें निराळें शहर आहे. त्याची लो. सं. १,३३,८५९ आहे. या शहरानजीक बऱ्याच टेकड्या असून तेथील सोन्याच्या खाणी प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहेत. १८८३ सालीं कॅप्टन प्लूमर यानें लंडन येथील मेसर्स टेलर अँड को.च्या मदतीनें येथें सोन्याच्या खाणी खणण्याचें काम सुरू केलें. म्हैसूर सरकारकडून मालकी हक्क मिळवून हें काम चाललें होतें. त्यांत म्हैसूर सरकारने हिस्सा ठेवला होता. १९४३ सालीं सु. आठ हजार किलोग्राम सोनें निघालें. येथें निरनिराळ्या ११ कंपन्या काम करीत असल्यामुळें वसाहत वाढून या शहराला रॉबर्टसन पेठ हें नांव देण्यांत आलें.

**कोलिकेर, रुडॉल्फ आलबर्ट फॉन** (१८१७–१९०५)– एक स्विस शारीर व इंद्रियविज्ञान शास्त्रवेत्ता. त्याचें शिक्षण झूरिच, बॉन, व बर्लिन या विद्यापीठांत झालें, आणि तत्त्वज्ञान व वैद्यक शास्त्र या दोन विषयांचा तो पदवीधर झाला. झूरिच व व्हूर्जबर्ग येथें त्यानें शारीर व इंद्रियविज्ञान शास्त्राच्या अध्यापकाचें काम केले. या कालांत त्यानें सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें अपृष्ठवंशी प्राणी, सपृष्ठवंशी प्राणी व सस्तन प्राणी या सर्व प्रकारच्या प्राण्यांतील स्नायू, त्वचा, अस्थी, दांत, रक्तवाहिन्या व आंतडीं, तसेंच मेंदू व पृष्ठरज्जु या सर्वांचें सूक्ष्म संशोधन करून १८६१ सालीं 'लेक्चर्स ऑन डेव्हलपमेंट' हा या विषयावरील प्रमाणभूत ग्रंथ प्रसिद्ध केला. पिंडशास्त्रांतील विलक्षण प्रगतीचें बरेंच श्रेय कोलिकेरला आहे. १८६० सालीं त्याला रॉयल सोसायटीचा फेलो करण्यांत आलें आणि १८९७ सालीं बहुमोल 'कॉपले' पदक देऊन त्याचा मोठा सन्मान करण्यांत आला.

**कोलेरिज, सॅम्युअल टेलर** ( १७७२–१८३४ )— एक इंग्रज कवि, तत्त्वज्ञ व टीकाकार. याचा बाप उपाध्याय होता. त्याचें शिक्षण केंब्रिजच्या जीझस कॉलेजांत व ऑक्सफोर्ड येथें झालें. प्रथम त्यानें सैन्यांत नांव दाखल केलें, पण तें काम झेपेना म्हणून सोडलें. त्याचा साउदे व वर्डस्वर्थ या कवींशीं परिचय झाला. १७९७ सालीं त्यानें 'दि एन्शंट मॅरिनर', 'ख्रिस्तावेल' व 'कुबलाखान' हीं काव्यें लिहिलीं. त्यानें १७९८ सालीं जर्मनींत राहून जर्मन भाषेचा उत्तम अभ्यास केला. कोलेरिजला अफूचा नाद अतिशय होता; त्यामुळें त्याची प्रकृति फार वरचेवर बिघडत असे. १८०८ सालीं व १८१२ सालीं त्यानें शेक्सपिअरवर व्याख्यानें दिलीं. त्यानें 'रिमोर्स' नाटक, 'एड्स टु रिफ्लेक्शन' हें काव्य, 'दि कॉन्स्टिटयूशन ऑफ चर्च अँड स्टेट', 'कन्फेशन्स', स्वतःचें आत्मवृत्त, वगैरे पुस्तकें लिहिली. त्याची बुद्धिमत्ता असाधारण, प्रतिभा उच्च दर्जाची, व कल्पनाशक्ति दांडगी होती. तत्त्वज्ञानाचा व धर्माचा अभ्यास त्यानें खोल रीतीनें केला होता. शेक्सपिअर व वर्डस्वर्थ यांच्यावरील त्याचे लेख वाचले म्हणजे तो उत्तम टीकाकार होता, हें दिसतें. इंग्लिश वाङ्मयांत त्याचें स्थान फार उच्च दर्जाचें आहे.

**कोलेरून**—हा कावेरी नदीचा एक फांटा १७ मैल तिला समांतर वाहत जाऊन नंतर हळूहळू जवळ जाऊन ९४ मैल लांबीवर पुन्हां त्याच नदीला मिळतो. त्यामुळें झालेल्या बेटाला श्रीरंगम् म्हणतात. हें बेट त्रिचनापल्ली जिल्ह्यांत आहे. या फाट्याचा कालव्यासाठीं चांगला उपयोग होतो व त्याकरितां या फांट्याला ठिकठिकाणीं बांध घातले आहेत. या कालव्यामुळें दीड-दोन हजार चौ. मैल जमिनीला पाणी मिळतें.

**कोलोन**—जर्मनी, प्रशिया संस्थानांतील एक शहर. हें ऱ्हाइन नदीच्या कांठीं वसलें आहे. येथें एक पहिल्या प्रतीचा किल्ला व युरोपांतील एक अत्युत्कृष्ट असें देऊळ आहे. देवळाची इमारत १२४८ सालापासून गेल्या शतकापर्यंत बांधली जात होती. साखर, तंबाखू, सतरंज्या, कातडीं, यंत्रें, रसायनें, वाद्यें व प्रसिद्ध कोलन वॉटर हीं या ठिकाणीं तयार होतात. मालवाहतूक नदी व आगगाडी यांच्याद्वारें होते. पूर्वी हें शहर फार सधन व समृद्ध गणलें जाई. येथील विद्यापीठ सन १३८८ इतकें जुनें आहे. लो. सं. ७,६८,४२६.

**कोलोरॅडो**— अमेरिकन संयुक्त संस्थानांतलें पश्चिम भागाचें एक संस्थान. याचें क्षेत्रफळ १,०४,२४७ चौरस मैल. लोकसंख्या ११,२३,२९६. बहुतेक सर्व संस्थान रॉकी पर्वताच्या रांगांनीं व्यापलें आहे. अनेक शिखरें आहेत. त्यांत पाईक शिखर १४,१०८ फूट उंच आहे. जेम्स नांवाच्या शिखराखालून ३२,१५० फूट लांबीचा बोगदा काढून मोफॅट रेल्वे फांटा नेला आहे. तो ९,१०० फूट उंच आहे. हवा थंड असली तरी अत्यंत शुष्क असल्यामुळें शेतीकरितां कालव्यानें पाणीपुरवठा करणें जरूर होतें; त्यामुळें कालव्याचें जाळें बरेंच मोठ्या प्रमाणावर झालें आहे. सोनें, रुपें, जस्त, शिसें, कोळसा, तांबें, ग्राफाइट, वगैरे

अनेक प्रकारचें खनिज उत्पादन निघतें. जगांतील सर्वांत उंच तरता पूल या संस्थानांत अर्कनसास नदीवर आहे. विद्यापीठ बूल्डर येथें आहे. डेनव्हर हें राजधानीचें ठिकाण आहे. या विभागांत पूर्वी डोंगरी लोक राहत असत. लुइझिआना पर्चेज प्रकरणांत यांतील कांहीं भाग होता व कांहीं टेक्सस आणि मेक्सिकोमध्यें होता. १५४१ मध्यें डि सोटो, १८०६ मध्यें पाइक व फ्रेमंट यांनीं या भागाचें संशोधन केलें. १८५८ मध्यें सोन्याचा शोध लावल्यावर यांतील वस्ती वाढली. १८७६ मध्यें स्वातंत्र्यप्राप्तीच्या शताब्दांत हें संस्थान संयुक्त संस्थानांत दाखल झालें म्हणून याला शताब्दी (सेंटेनिअल) संस्थान म्हणतात.

**कोलोसिअम**—प्राचीन रोम शहरांतील फ्लेव्हियन ॲंफिथिअेटरला हें नांव दिलेलें आहे. ही इमारत फार मोठी असून येथें ग्लॅडिओटिअर मल्लांच्या कुस्त्या, हिंस्र पशूंचे सामने आणि इतर शारीरिक खेळांचे सामने होत असत. ही इमारत बांधण्यास व्हेस्पाशियननें इ. स. ७२ मध्यें आरंभ केला व टायसनें इ. स. ८० मध्यें ती पुरी केली. या कोलोसिअमचा आकार अंड्यासारखा असून त्याची लांबी ६२० फूट, रुंदी ५२५ फूट आणि उंची १५७ फूट आहे. कोलोसिअममध्यें ४५,००० लोकसमुदाय मावत असे, पण काहींच्या मतें ८७,००० लोक बसत असत.

**कोल्चीसिन**— कोल्चीशियम नांवाच्या झाडापासून हा क्षार काढण्यात येतो. याचा उपयोग संधिवात व गुडघी रोग यांमध्यें करण्यांत येतो. हा घेतला असतां ओकाऱ्या होतात, घाम येतो व रेच होतात. अधिक प्रमाणांत घेतल्यास त्याचा विषासारखा परिणाम होतो.

**कोल्टचाक, व्हल्डीमीर व्हासिलीव्हिश** (१८७५–१९२०)—हा एक रशियन ॲडमिरल आणि ॲडमिनिस्ट्रेटर होता. १८९१ मध्यें तो रशियन आरमारांत शिरला व (१९०४–५) पोर्ट आर्थरच्या लढाईंत होता. १९१३ मध्यें तो काळ्या समुद्राच्या आरमाराचा व्हाइस-ॲडमिरल झाला. १९१७ मध्यें त्यानें लष्कराची पुनरंचना केली, व १९१८ मध्यें ओम्सक येथें त्यानें एक बोल्शेव्हिस्ट प्रतिपक्षी सरकार स्थापलें आणि लाल सैन्यावर कित्येक लढायांत जय मिळवले; पण अखेर लाल सैन्यानें त्याला कैद करून गोळी घालून ठार मारलें.

**कोल्लम किंवा कोलंब शक**—ह्या शकास संस्कृत लेखांत कोलंभ वर्ष व तामिळमध्यें कोल्लम आंडु म्हणजे पश्चिमेकडील वर्ष असें म्हटलेलें आढळून येतें. हा शक कोणीं व कशाकरितां सुरू केला याविषयीं काहींच निश्चयात्मक माहिती मिळत नाहीं. परंतु त्यास कोल्लम वर्षाप्रमाणेंच कोठें कोठें कोल्लमच्या उत्पत्तीपासूनचें वर्ष असेंहि म्हटलेलें सांपडत असल्यावरून, मलबार प्रांतांत पश्चिम किनाऱ्यावर कोल्लम अथवा कोलंमपत्तन नांवाचें जें प्राचीन नगर आहे त्याचा ह्या शकाशीं कांहीं तरी संबंध असावा असें वाटतें. कोल्लम शक यास मलबारांतील लोक 'परशुरामाचा संवत्' असें म्हणतात व तो एक हजार वर्षांचें एक चक्र असून सांप्रत त्याचें चौथें चक्र चालू आहे अशी त्यांची समजूत आहे. त्रिवेंद्रम् येथें मिळालेल्या एका शिलालेखांत (वर्तमान) कलियुग संवत् ४७०२ बरोबर कोल्लम शक यांच्यामधील अंतर (४७०१ – ७७६ =) ३९२५ वर्षे निघतें. दिवाणबहादूर एल्. डी. स्वामिकन्नु पिल्ले हे इसवी सनांतून ८२५ वजा केले असतां कोल्लम शक निघतो असें धरून चालतात. हा शक मलबारपासून कन्याकुमारीपर्यंत व तिनेवल्ली जिल्ह्यांत अद्यापहि चालू आहे. याचें वर्ष सौर असतें व महिन्याचा आरंभ संक्रांतीपासून होतो. ह्या शकाचा सर्वांत जुना लेख १४९ सालचा मिळाला आहे.

**कोल्लिमलई**—मद्रासमधील सालेम जिल्ह्यांतील नामक्कल व अट्टूर तालुक्यांतील पर्वताची ओळ. ही ओळ उत्तर अक्षांश ११° १० ते ११° २७' व पूर्व रेखांश ७८° १८' ते ७८° ३०' यांमध्यें आहे.

**कोल्हटकर, अच्युत बळवंत** (१८७९–१९३१)—अर्वाचीन मराठींतील ललित, सुलभ व विविध प्रकारच्या लेखनशैलीचे आद्य प्रवर्तक व एक लोकप्रिय वृत्तपत्रकार. बळवंतराव नामक त्यांच्या चुलत्यांनीं यांचें पालनपोषण केल्यामुळें हे आपणांस अच्युत बळवंत असें म्हणवीत. यांच्या वडिलांचें नांव वामनराव असें होतें. बी. ए., एल्एल्. बी. झाल्यावर अच्युतरावांनीं नागपूरला वकिली सुरू केली व ते साताऱ्याच्या 'शुभसूचक' साताहिकांत लिखाण करूं लागले. यानंतर आपल्या चुलतभावाच्या साहाय्यानें यांनीं नागपूरला 'देशसेवक' पत्र सुरू केलें. नागपूरला बोलावलेल्या कॉंग्रेसचा अध्यक्ष कोण असावा याबाबतचीं यांचीं जहाल मतें सरकारला न पटल्यानें यांना राजद्रोहाच्या आरोपावरून पकडण्यांत आलें व अडीच वर्षांची शिक्षा झाली. तुरुंगांतून सुटल्यावर कांहीं दिवस यांनीं नोकरी केली व त्यानंतर मुंबईस 'श्रुतिबोध' हें मासिक सुरू करून त्यांतून ऋग्वेदाचें भाषांतर प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. परंतु हें काम पुरें होण्यापूर्वींच हे वृत्तव्यवसायाच्या धंद्यांत शिरले व आपल्या कल्पनारम्य व भावपूर्ण लिखाणानें यांनीं जनतेस भारून टाकलें.

हे लोकमान्य टिळकांच्या जहाल पंथाचे असून आपलीं मतें आपल्या आकर्षक व सुलभ लिखाणानें बहुजनसमाजाच्या

अगदीं खालच्या थरापर्यंत नेऊन भिडवीत. लालित्यपूर्ण लिखाण असलें तरी त्यांत उपरोध, उपहास व विरोध यांचा आकर्षक रीतीनें समन्वय करणें हें यांचें एक लेखनवैशिष्टय होतें. सन १९१५–३१ या कालांत यांनीं अनेक वृत्तपत्रें काढलीं व आपले विचार लोकांपुढें मांडले. यांनीं अनेक नाटकें, कादंबऱ्या लिहिल्या, नाटकमंडळ्या स्थापल्या व स्वतः नाटकांत कामेंहि केलीं. परंतु दुःखाची गोष्ट अशी कीं, अशा कर्तृत्ववान् व साहसी मनुष्याला लक्ष्मीच्या साहाय्याभावीं जीवनांत अपयशाचेच प्रसंग अधिक आले. 'संदेश', 'स्वातंत्र्य', 'राष्ट्रमत' यांसारखीं अनेक दैनिकें; 'युगान्तर', 'चाबूक', 'रणसंग्राम' यांसारखीं साप्ताहिकें; व 'श्रुतिबोध', 'उषा', यांसारखीं मासिकें यांनीं चालवलीं. 'विवेकानंद', 'ताई तेलीण', यांसारखीं नाटकें यांनीं लिहिलीं. 'लोकमान्यांच्या समाधीपुढें', 'इंग्रजांचा पराभव', 'चोरून चुंबन' या यांच्या कादंबऱ्या होत. कादंबरी, नाटकें, गोष्टी हीं व यासारखीं वाङ्मयाचीं सर्व अंगें यांनीं हाताळलीं होतीं.

**कोल्हटकर, भाऊराव**—एक महाराष्ट्रीय नट. भाऊराव १८८२ सालीं किर्लोस्कर कंपनींत शिरल्या वेळेस त्यांचें वय सुमारें १९ वर्षांचें होतें. यांनीं चांगलेच पैसे मिळविले, व धर्मादाय आणि सार्वजनिक कामें यांसहि त्यांनीं चांगली मदत केली. भाऊराव यांची उत्तम गवयांत जरी गणना होणार नाहीं तरी आपल्या मधुर कंठरवानेंच त्यांनीं सर्व लोकांस वश करून घेतलें होतें.

भाऊराव दिसण्यांत सुरेख होते. यांचें सुभद्रेचें व मंथरेचें काम फार अप्रतिम वठे. ते 'भावड्या' या टोपण नांवानें सर्वांना परिचित असत.

**कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण** (१८७१–१९३४)—मराठी वाङ्मयांतील एक सुप्रसिद्ध लेखक, टीकाकार व नाटककार. अगदीं लहान वयांतच, इंग्रजी पांचव्या इयत्तेंत असतांना यांनीं 'सुख–मालिका' नांवाचें नाटक लिहिलें. पुढें अरेबियन नाइट्स् व निबंधमाला यांच्या वाचनानें यांची लिखाणाची हौस वाढत गेली. सन १८९१–९७ या कालांत यांनीं 'विक्रम-शशिकला' व 'शापसंभ्रम' या नाटकांवर लिहिलेल्या टीकांमुळें यांचे टीकाकाराचे गुण लोकांच्या नजरेस आले. 'वीरतनय' हें यांचें किर्लोस्कर नाटकमंडळीनें रंगभूमीवर आणलेलें सुप्रसिद्ध नाटक होय. यांखेरीज मूकनायक, मतिविकार, वधूपरीक्षा, प्रेमशोधन, वगैरे नाटकें यांनीं लिहिलीं. किर्लोस्कर–देवलांनंतर व गडकरी–खाडिलकरें यांचा उदय होण्यापूर्वीच्या कालांत एक मराठी नाटककार म्हणून हे अग्रभागीं होते.

हे सुधारणेचे भोक्ते होते. तीस अनुसरून यांनीं स्त्रीशिक्षण, विधवावपन, पुनर्विवाह, अस्पृश्यता–निवारण यांसारख्या विषयांवर आपल्या विनोदी भाषेंतून लिखाण करून सामाजिक नवविचारांचा ओघ समाजाच्या अगदी खालच्या थरापर्यंत नेऊन भिडवला. 'सुदाम्याचे पोहे' या यांच्या विनोदी लेख-संग्रहांत यांनीं केलेला टीकागर्भ विनोद किती मार्मिक आहे हें दिसून येतें. (१) पति हाच स्त्रीचा अलंकार, (२) संपादिका, (३) गरीब विचारें पाडस, यांसारख्या लघुकथा यांनीं लिहिल्या. यांखेरीज अनेक टीकालेख, कादंबऱ्या, कविताहि यांनीं लिहिल्या. ज्योतिषविषयाचाहि यांना छंद होता. ज्योतिषावर यांनीं एक ग्रंथ लिहिला आहे. १९१८ सालीं सांगली येथें भरलेल्या ज्योतिष–संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान यांना लाभला. तसेंच १२ व्या साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

मराठी वाङ्मयांत चमत्कृतिजन्य व कोटिक्रमयुक्त विनोदाचा प्रकार सुरू करण्याचें श्रेय यांनाच आहे.

**कोल्हा**—हा कुत्र्याच्या वर्गांतील प्राणी असून आशिया व आफ्रिका खंडांत आढळतो. याचा रंग मळकट पिवळा असतो. कोल्हे हे कळप करून राहतात. हे बहुधा मृत प्राण्यांच्या मासावर उपजीविका करतात व सामान्यतः रात्रीचा संचार करतात. यांची एक जात हिंदुस्थानांत आढळते व आफ्रिकेंत आढळणाऱ्या चार जातींपैकीं एका जातीच्या कोल्ह्यांची पाठ काळी

असते व दुसऱ्या एका जातीच्या कोल्ह्यांच्या बरगडीवर एक काळा पट्टा असतो व त्यांचा आवाज दूरवर ऐकूं जातो. खोकड ही एक कोल्ह्याची जात आहे. यांची वीण उन्हाळ्यांत होते व दरखेपेस चारपर्यंत पिलें होतात. कोल्ह्याच्या धूर्तपणाच्या गोष्टी अनेक आहेत व त्या सर्व राष्ट्रांतील लोककथांतून आढळतात.

**कोल्हाटी**—ही जात महाराष्ट्र, कर्नाटक, कानडा, वऱ्हाड या भागांत आहे. यांच्या जातींत बायकांची संख्या अधिक आहे. कर्नाटकांत यांना डोंबारी, व नगर जिल्ह्यांत खेळकरी म्हणतात. ही भ्रमणवृत्ति जात आहे. बारशी तालुक्यांत माणकेश्वर हें यांचें मूळ वसतिस्थान होय. यांचीं अंधारे, जाधव, पवार व सांकेश्वर हीं उपनांवें आहेत. ही फिरती जात आहे. दोरावरून चालणें, नाचणें, कोलांट्या उड्या मारणें, वगैरे कसरतींचे खेळ करून भिक्षा मागून या जातीचे स्त्री-पुरुष निर्वाह करतात. शिंगाच्या फण्या, चाकें, फडक्याच्या बाहुल्या करणें, हे धंदेहि हे लोक

करतात. परंतु पुष्कळ स्त्रियांचा पूर्वापार धंदा गाणें, नाचणें व वेश्यावृत्ति हा असून जातपंचायतीच्या संमतीनें तरुण मुली या धंद्यांत शिरतात. व नृत्यगायनांत वाद्यवादनाची साथ या स्त्रियांचे नातलग पुरुष करतात. कांहीं कोल्हाट्यांना पेशवाईत इनामें मिळालीं आहेत. उच्च जातींतील मुली चोरून पळवून त्यांना हे लोक वेश्या बनवतात. महादेव व मारुति, तसेंच खंडोबा, बहिरोबा, मरीआई, जानाई, जोखाई, म्हसोबा वगैरे या जातीचीं दैवतें आहेत.

**कोल्हाण**—ही ओरिसांतील सिंगभूम जिल्ह्यांतील सरकारी इस्टेट आहे. क्षेत्रफळ १,९५५ चौरस मैल. याचा पश्चिम व दक्षिण भाग सुमारें १,००० फूट उंचीचें डोंगरपठार असून उत्तर व पूर्व भाग सपाट व सुपीक असल्यामुळें त्यांत पुष्कळ संपन्न खेडीं आहेत. तेथें तांदूळ, खाद्य धान्यें, वगैरे पिकें होतात. डोंगराळ भागांत पुष्कळ जगलें आहेत. येथें हो जातीचे लोक राहतात. ते शेजारच्या छोट्या संस्थानांत लुटालूट करून फार उपद्रव देत, त्यामुळें १८०० पासून ब्रिटिशांनीं या संस्थानिकांच्या विनंतीवरून या प्रदेशाच्या बंदोबस्ताचें काम स्वीकारलें. येथील खेड्यांचे संघ आहेत. प्रत्येक संघावर एक माणकी अगर तालुकापाटील व प्रत्येक खेड्यावर मुंडा अगर पाटील असे अधिकारी नेमलेले असतात. त्यांच्याकडे वसूल गोळा करणें, गुन्हेगारांवर पाळत राखून त्यांना पकडणें हीं कामें आहेत; त्यांबद्दल मुंड्यांना वसुलापैकीं १६ टक्के व माणक्यांना १० टक्के दलाली मिळते.

**कोल्हापूर**—मुंबई, दक्षिण महाराष्ट्रांतील एक मोठें मराठी संस्थान. क्षेत्रफळ ३,२२९ चौरस मैल, व लोकसंख्या १०,९२,०४६ आहे. उत्पन्न १०४ लक्ष रु. आहे. हा प्रदेश सह्याद्रीच्या माथ्यावर पूर्वपश्चिम सुमारें ५० मैल रुंद व दक्षिणोत्तर १०० मैल लांब पसरलेला आहे. या संस्थानांत सह्याद्रीच्या शिखरांवर व आसपास प्रचीतगड, बहिरवगड, महिपतगड, विशाळगड, शिवगड, भैरवगड, रांगणा उर्फ प्रसिद्धगड, सामानगड, व बावडा असे ९ पहाडी किल्ले आहेत. या संस्थानच्या हद्दींतून सह्य पर्वतांतून कोंकणांत उतरण्याचे आंबाघाट, फोंडाघाट, व आंबोलीघाट हे तीन चांगले बांधलेले गाड्या जाण्याजोगे घाट, ओझ्याचीं जनावरें जाण्याजोगे १४ घाट व चाकीचे दुर्घट पायवाटांचे घाट मिळून सुमारें ९० घाट आहेत. या संस्थानांतून वाहणाऱ्या कृष्णा, वारणा, पंचगंगा, दूधगंगा, वेदगंगा, हिरण्यकेशी, घटप्रभा व मलप्रभा या पूर्ववाहिनी नद्या आहेत. कासारी, कुंभी, तुळशी, भोगवती व सरस्वती (ही गुप्त आहे) या पांच नद्या एकत्र मिळून पंचगंगा नदी झाली आहे. शिवाय १०-१२ हजार विहिरी आहेत, व सुमारें १२५ तळीं असून त्यांत रंकाळें, पद्माळें, अतिग्रे, व रायबाग हे मोठाले तलाव आहेत. भोगवती नदीला राधानगरी येथें धरण बांधण्याचें मोठें काम चालू आहे. त्या धरणानें वीज व पाणी यांचा मोठा पुरवठा होईल. रंकाळें तलाव कोल्हापूर शहरांत ३ मैल परिघ व ३३ फूट खोली असा आहे.

येथील डोंगराळ भागांत लोखंडाचे दगड, इमारतीला लागणारा दगड, चुन्याचे दगड यांची समृद्धि आहे, व नद्या-ओढ्यांत वाळू विपूल आहे. १८०० फूट उंचीवर हा प्रदेश असल्यामुळें येथील हवा समशीतोष्ण आहे. घाटमाथ्यापासून पूर्वेकडे पावसाचें मान २०० इंच ते २० इंचांपर्यंत उतरतें आहे. बावडा येथें सर्वांत अधिक व शिराळें येथें सर्वांत कमी पावसाचें प्रमाण आहे. येथें काळी, तांबडी, मळी व पांढरी अशी चार प्रकारची जमीन आहे. त्यांपैकीं काळी व तांबडी जमीन उत्तम सुपीक असून त्यांत खरीप व रब्बी दोन्ही पिकें होतात. बागायती जमीनहि पुष्कळ आहे. सह्याद्रीच्या माथ्यावर जंगलांत साग, शिसव, ऐन, खैर, किंजळ, हिरडा, जांभूळ, वगैरे जातीचीं झाडें असून इमारती लांकूड पुष्कळ आहे. या जंगलांत वाघ, चित्ते, डुकरें, अस्वलें, वगैरे हिंस्र प्राणी व इतर जातीचे सर्प आहेत. पाळीव जनावरें, गायी, म्हशी, बैल, रेडे, घोडे, गाढवें, बकऱ्या, मेंढ्या, उंट इत्यादि आहेत. गाय-बैलांच्या हणम, सुरती व देशी अशा तीन जाती आहेत.

मुख्य धंदा शेती असून येथें तांदूळ व खाद्य धान्यें, कापूस, ऊंस, आणि तेल काढण्याचीं धान्यें-करडी, तीळ, भुईमूग, व आंबाडी हीं पिकें होतात. त्यामुळें तेलाचा, विणकामाचा, व गूळ करण्याचा, असे तीन मोठे धंदे येथें चालतात. शिवाय सोन्याचांदीचे दागिने, तांबेपितळेचीं भांडीं, बांगड्या, सुगंधी पदार्थ, इत्यादिकांचे धंदे येथें आहेत.

कोल्हापूरच्या इतिहासाचे प्राचीन हिंदु कारकीर्द (१३४७ पर्यंत), मुसलमानी कारकीर्द (१७०० पर्यंत), व मराठे कारकीर्द असे तीन कालविभाग आहेत. कोल्हापुरास १८७७ सालीं एका मोठ्या बौद्ध देवळाचे अवशेष सांपडले, तेथील एका दगडी पेटीच्या चौकोनी झांकणाच्या आंतल्या बाजूस ख्रि. पू. ३ ऱ्या शतकांतील लिपींत धम्मगुत्तानें ब्रह्म यास दिलेल्या देणगीचा लेख सांपडला. शिवाय इ. स. पहिल्या शतकांतील आंध्रभृत्य राजांचीं तांब्याचीं व शिशाचीं नाणीं सांपडलीं. याप्रमाणें आंध्रभृत्य, नंतर कदंब, चालुक्य, राष्ट्रकूट, शिलाहार व अखेर देवगिरीचे यादव या घराण्यांचा येथें अमल होता. १३४७ सालीं बहामनी राज्याचा अमल सुरू झाला व १४९८ पासून विजापूरच्या सुलतानांच्या ताब्यांत हा प्रदेश गेला. कोल्हापूर शहराजवळ ब्रह्मपुरी येथें नुकतेंच जें उत्खनन

फारशी खपली नाहीं. शब्दरत्नाकराची दुसरी आवृत्ति १९३२ सालीं कै. लेलेशास्त्री यांच्या नजरेखालीं निघाली, पण अधिक शब्दांची भर न पडतां उलट तींतून पहिल्या आवृत्तींत दिलेले वऱ्हाडी–नागपुरीसारखे प्रांतिक शब्द गळले!

सरस्वतीकोश—शब्दरत्नाकराप्रमाणेंच हा सरस्वतीकोशहि एकाच माणसाच्या मगदुरानें तयार झाला असल्यानें साहजिकच एकांगी व अपुरा आहे. जुन्या गद्यपद्यांतील अवतरणें, प्रांतिक बोलींतील व धंद्यांतील परिभाषा, व्युत्पत्तीची चिकित्सा, अर्थांच्या एकूणएक छटा इत्यादि गोष्टी या कोशांत नाममात्रच आहेत. मोलस्वर्थकोश ओरबाडून काढावा अशाप्रमाणें याचें काम झालेलें आहे. नुसता तो मराठी–इंग्रजी कोश वरील नामजोशी-कोशाप्रमाणें भाषांतर करून दिला असता तरी चाललें असतें. याचे संपादक कै. विद्याधर वामन भिडे हे जुन्या पंडिती वळणाचे असल्यानें संस्कृत शब्दार्थांवरच त्यांचा फार भर दिसतो. ऐतिहासिक कागदपत्रांतील शब्दांना तर थाराच नाहीं. बरें, या वेळीं प्रो. पटवर्धनांचा फारसी–मराठी कोश आयता तयार होताहि; यामुळें हजार पानांचा मराठी–मराठी कोश निघूनहि बृहत्कोशाची जरूरी नाहींशी झाली असें दुर्दैवानें घडूं शकलें नाहीं.

बृहत्कोशासाठीं तळमळ रावसाहेब मंडलीक, श्रीमंत सयाजीराव गायकवाड, लो. टिळक, नामजोशी, महाराष्ट्र-साहित्य परिषद, भारत–इतिहास–संशोधक–मंडळ, वगैरे थोर व्यक्ती व संस्था यांना फार दिवसांपासून लागून राहिली होती. मंडलीक आणि नामजोशी यांचे प्रयत्न वर उल्लेखिलेलेच आहेत. श्रीमंत सयाजीराव महाराजांनीं विविध स्वरूपांचे कोश तयार करण्यासाठीं आपल्या राज्यांत सरकारी व निम–सरकारी रीतीनें मोठी खटपट सुरू केलीच होती. त्यांच्या सांगण्यावरून एकीकडे प्रो. गज्जर हे एक बहुभाषाकोश ( Polyglot Dictionary ) तयार करण्याचें साहित्य जुळवीत होते, तर दुसरीकडे बडोदें राज्यांतील वेगवेगळ्या खात्यांतील प्रचलित इंग्रजी शब्दांऐवजीं सर्वमान्य होतील अशा देशी संज्ञा बनविण्यासाठीं सरकार-नियुक्त मंडळें वारंवार बसतच होतीं. पुण्यास १९०६ सालीं महाराष्ट्र साहित्य संमेलन भरल्या वेळीं एक मराठी भाषेचा कोश व विश्वकोश ( सायक्लोपीडिया ) रचण्यासंबंधीं चर्चा होऊन ठराव झाले. नंतर १९१२ मध्यें अकोला–संमेलनाच्या वेळीं साहित्य-परिषदेची जी नवीन घटना करण्यांत आली; तिच्या उद्देश–साधनांत मराठी भाषेचा कोश तयार करण्यासंबंधीं एक कलम घालण्यांत आलें. १९२७ त पुण्यास भरलेल्या संमेलनांत 'मराठी भाषेचा एक सर्वांगीण बृहत्कोश व्हावा व हें काम ज्ञानकोशांतील मंडळीनें हातीं घ्यावें व महाराष्ट्र साहित्य-परिषदेनें ह्या कार्यास सर्व प्रकारें साहाय्य द्यावें' असा एक ठरावहि करण्यांत आला. त्याच सालीं भा. इ. सं. मंडळांतील कांहीं प्रमुख विद्वानांनीं ज्ञानकोशाचें काम आटोपत आल्याचें पाहून मराठी बृहत्कोशाचें काम याच संपादकमंडळानें अगत्य सुरू करावें, अशी 'केसरी'तून जाहीर शिफारस केली. या सर्वांचा परिणाम होऊन १९२८ च्या एप्रिलमध्यें ज्ञानकोशांतील श्री. दाते, कर्वे, चांदोरकर व दातार ही प्रमुख संपादकमंडळी ज्ञानकोश पुरा करून बाहेर पडली व या शब्दकोशाच्या कामास एक लिमिटेड कंपनी स्थापून नेटानें लागली. सर्व महाराष्ट्र-बृहन्महाराष्ट्रांतील विद्वानांचा त्यांना पाठिंबा होताच. या कोशाचें नवीन ऑक्सफोर्ड कोशाच्या धर्तीवर व्यापक स्वरूप आंखलेलें होतें.

महाराष्ट्र शब्दकोश—या महाराष्ट्र शब्दकोशार्थ शब्दसंशोधना-करितां संपादकांनीं मराठी वाङ्मयाचे पुढील विभाग पाडले होतेः—१ शिलालेख–ताम्रपट, २ महानुभावी, ३ मुकुंदज्ञानेश्वर, ४ एकनाथ–मुक्तेश्वर, ५ रामदासी, ६ अभंग व स्फुटकाव्य, ७ आर्या-गीति, ८ जुनें शाहिरी, ९ ऐतिहासिक, १० निबंध-मालाकालीन गद्य, ११ आधुनिक काव्य, १२ नाट्य-नृत्य, १३ साहित्य ( अलंकार ), १४ शास्त्रीय, १५ परीक्षणात्मक, १६ निबंधात्मक, १७ वृत्तपत्रीय, १८ प्रांतिक भाषिक, १९ कारागिरी व २० स्त्री-वाङ्मय. या विभागांतील वाङ्मय आणि इतर साहित्य जमा करण्यासाठीं प्रथम त्यांनीं बृहन्महा-राष्ट्रांत हिंडून ठिकठिकाणीं पूर्वी असलेल्या वाङ्मयसंस्थांचें व विद्वानांचें या शब्दसंकलनाच्या कामीं साहाय्य मिळविलें. ज्या ज्या ठिकाणीं अशा संस्था नव्हत्या तेथें त्या स्थापन करविल्या. या प्रचारांत शब्दसंकलन करणें व ग्राहक मिळविणें हीं दोन्ही कामें होत असत. वर वाङ्मयाचे जे विभाग पाडलेले आहेत, त्या प्रत्येक विभागांतील कालखंडनिदर्शक असे महत्त्वाचे ग्रंथ निवडून ते संपादकमंडळीनें वाचले व वाचविले आणि त्यांतील विशिष्ट शब्दांचें उद्धरण निरनिराळ्या लेखकांकडून करवून घेऊन तें स्वतः तपासलें. तसेंच त्यांनीं एकंदर ५० निरनिराळ्या धंद्यांतील सुमारें २,००० संज्ञा-शब्दांची छाननी केली. त्याचप्रमाणें प्रांतिक भाषांतील ५,००० शब्दांची निवड केली. पूर्वी प्रसिद्ध झालेले सर्व कोश उतरून घेतले, कचेरींत व बाहेरच्या ठिकाणीं जें शब्दसंकलन होई तें सर्व पत्रिकांवर लिहिलें जाई. अशा कच्च्या शब्दपत्रिका ( कार्डें ) सुमारें १० लाख तयार झाल्या होत्या. या जमलेल्या शब्दांपैकीं ज्या शब्दांची व्युत्पत्ति बिकट वाटत असे त्यांची निरुक्ति-चर्चा करण्यासाठीं मंडळानें एक व्युत्पत्तिचर्चा-मंडळ स्थापन केलें. अशा विविध प्रयत्नानें आणि परिश्रमानें संपादिलेला हा कोश १९३८ सालीं पुरा बाहेर पडला.

या कोशाचे सात विभाग आहेत. व यांत एक लाखावर शब्द विवेचिले आहेत. याचा एक पुरवणी विभाग आतां निघावयाचा आहे.

द्वैभाषिक कोश— आतां द्वैभाषिक (म्हणजे मराठींतील शब्दांचे अर्थ अन्य भाषेंत, किंवा अन्य भाषेंतील शब्दांचे अर्थ मराठींत देणाऱ्या) कोशांकडे वळूं. इंग्रजी, फारसी, बंगाली, हिंदी या भाषांचे कांहीं कोश मराठींत आहेत. प्रो. एन्. बी. रानडे यांनीं इंग्रजी-मराठी कोश रचण्यासंबंधीं फारच मेहनत घेतली. यांत पारिभाषिक, कारागिरी व वाङ्मयीन शब्दांचा संग्रह करून त्यांची फोड जुने नवे मराठी प्रतिशब्द योजून सुरेख रीतीनें केली आहे. १८४७ त मेजर कँडीनें केलेला इंग्रजी-मराठी कोश यांत समाविष्ट केला असल्यानें मराठी ग्रामीण शब्द यांत संख्याबाहुल्यानें आढळतात. तसेंच रसायन, गणित, ज्योतिष इ. शास्त्रांतील इंग्रजी संज्ञांना मराठी प्रतिशब्द संस्कृतला धरून दिले आहेत व ते रूढ होण्याजोगे आहेत. १९०३–१६ इतकीं वर्षें एकट्या विद्वानानें सारा खटाटोप करून याचा आटोप केला हें पाहून रानड्यांच्या कर्तबगारीची धन्यता वाटेल. प्रो. वा. शि. आपटे यांच्या संस्कृत–इंग्रजी कोशाप्रमाणेंच हा संपादकाची गाढ विद्वत्ता आणि परिश्रम दर्शवितो. हा आतां दुर्मिळ झाल्यानें याची दुसरी आवृत्ति निघणें जरूर झालें आहे. याखेरीज दुसरे अनेक इंग्रजी–मराठी कोश निघालेले आहेत, पण ते केवळ शालोपयोगी असल्यानें येथें उल्लेखिले नाहींत.

फारसी–मराठी कोश—मराठी भाषेंत ज्ञानेश्वरोत्तरकालीं फारसी शब्द शिरण्यास सुरुवात झाली व तिचा कडेलोट पेशवाईत झाला. जुन्या कागदपत्रांतून शेंकडा ५० वर शब्द फारसी असून व आंज ते ज्ञानेश्वरींतील शब्दांप्रमाणेंच दुर्बोध झालेले. तेव्हां प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं १९२५ सालीं फारसी–मराठी कोश एकट्यानेंच रचून भारत इतिहास संशोधक मंडळाकडून प्रसिद्ध करविला; त्यामुळें फारसी भाषेचें सामान्य ज्ञान सुलभ होऊन जुनें लिखाण अभ्यासूंना कळूं लागलें. माधवरावांनीं ऐतिहासिक ग्रंथांतील उतारे शब्दार्थ समजण्यासाठीं जे भरपूर दिले आहेत ते नुसतेसुद्धां वाचण्यास उद्बोधक व मनोरंजक आहेत. यांतील शब्दव्युत्पत्ति देण्याची पद्धत नवी व अनुकरणीय आहे.

बंगाली–हिंदी–मराठी कोश—श्री. वासुदेवराव आपटे यांचा 'बंगाली–मराठी कोश' फार लहान आहे. वरील फारसी कोशाच्या सालींच हा प्रसिद्ध झाला. यापूर्वी बंगाली कादंबऱ्यांचीं भाषांतरें-रूपांतरें करण्याची लाट महाराष्ट्रांत उसळली होती व 'मासिक मनोरंजन'कर्त्यांनीं तींत बराच भाग घेतला होता. बंगाली भाषा महाराष्ट्रीयांनीं जरूर शिकावी अशी आहे व त्या हेतूस अनुसरून हा कोश रचला आहे. पण तो फार लहान व अपुरा वाटेल. मिरजेच्या कातगड्यांनींहि एक लहान 'हिंदी-मराठी कोश' १९२८ त प्रसिद्ध केला. तोहि उपयुक्त आहे. यानंतर राष्ट्रभाषा समिति, वैशंपायन व य. रा. दाते यांचे हिंदी-मराठी कोश निघाले. तरी पण या राष्ट्रभाषेचे मोठाले कोश (उलट-सुलट) झाले पाहिजेत; कारण हिंदीचा प्रसार आज फार झपाट्यानें सुरू आहे व ती राजभाषा होऊं पाहत आहे. तेव्हां अर्ध्या शतकाच्या आंत ती सर्व हिंदुस्थानवासियांची मातृभाषा नाहीं तरी उप-मातृभाषा बनेल असा संभव वाटतो आहे.

कोंकणी-मराठी कोश—मराठी (कोंकणी) भाषा गोंव्यांत राज्यव्यवहारांत सुद्धां आहे. तेव्हां राजभाषा जी पोर्तुगीज तींत मराठी शब्दांचे अर्थ देणारा कोश, मोलस्वर्थसारखा अवश्य होता. तो गोवें सरकारनें करवून घेण्याचा जो अर्धवट प्रयत्न केला, त्याचें फळ म्हणजेच 'महाराष्ट्र-पोर्तुगीझ कोश,' (१८७९ भाग १ ला). याचे संपादक सूर्याजी आनंदराव राजाध्यक्ष दळवी असून याचें काम १५ वर्षें त्यांना पुरलें. हा पहिला भाग थ अक्षरापर्यंत आहे. तथापि यावरून संपादकाची दक्षता चांगली दिसून येते. हा कोश पुरा होता तर मराठी भाषेच्या दृष्टीनें तें फार फायद्याचें झालें असतें. गोंव्यांतील प्रमुख जी कोंकणी भाषा तिचे कोश पोर्तुगीज भाषेंत आहेतच; पण ते फार लहान आहेत. इंग्रजी आणि कानडी या भाषांतूनहि कोंकणीचे शब्दार्थ देणारे कोश मिशनऱ्यांनीं छापले आहेत.

संस्कृत–मराठी कोश—कै. ओक यांनीं जो 'गीर्वाणलघुकोश' नांवानें या प्रकारचा १९१५ त प्रसिद्ध केला. तो मोठा नसला तरी फार महत्त्वाचा वाटेल. माधवचंद्रोबाच्या १८७० सालच्या 'शब्दरत्नाकरा' नंतरचा उल्लेखण्याजोगा कोश हाच आहे.

व्युत्पत्ति कोश—येथवर फक्त शब्दकोशांचीच पाहणी केली. शब्दाचे अर्थ सांगणारे जसे कोश तसेच शब्दांची व्युत्पत्ति, व्यक्तींचे इतिहास व ज्या विषयांचा बोध त्या त्या शब्दांनीं होतो, ते ते विषय सांगणारे इत्यादि प्रकारचेहि कोश आहेत. 'विग्रहकोशा' नंतर मोठा व्युत्पत्तिकोश प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनीं नुकता रचला. कै. वि. का. राजवाडे यांचा कच्च्या स्वरूपांत रचलेला एक धातुकोश धुळ्याच्या राजवाडे संशोधन मंडळानें प्रसिद्ध केला आहे. या कोशावरून राजवाड्यांच्या अचाट कल्पनेच्या भराऱ्या व शब्दव्युत्पत्तिसंशोधनाचे नवीन मार्ग दिसून येतात, यांत शंका नाहीं. आठल्ये-आगाशे यांचा 'शब्दसिद्धिनिबंध' (१८७५), प्र. रा. पंडितकृत 'अपभ्रष्टचंद्रिका' (१८७८) व अनेक आवृत्त्यांचा लाभ मिळालेला गोविंद शंकर बापट यांचा 'व्युत्पत्तिप्रदीप' हीं जरी व्युत्पत्तीसंबंधीं पुस्तकें आहेत तरी त्यांचा अभ्यास आज कोणी

करतांना आढळत मात्र नाहीं. व प्रा. कुळकर्णी यांचा मोठा व्युत्पत्तिकोश प्रसिद्ध झाल्यामुळें तशी गरजहि उरलेली नाहीं.

चरित्रकोश—चरित्रकोशाचा प्रकारहि फार महत्त्वाचा आहे. वाङ्मय, इतिहास, इत्यादींतून माहिती हुडकून एखाद्याचें चरित्र उभें करण्याची यातायात या कोशानें थांबते व थोर व्यक्तींची ओळख सुलभपणें करून घेतां येते. आपल्याकडे चरित्र-कोश रचण्याची प्रथा कै. रघुनाथ भास्कर गोडबोले यांनीं पाडली. त्यांचे पौराणिक आणि ऐतिहासिक कोश भरतखंडाचा प्राचीन आणि अर्वाचीन इतिहास अभ्यासून मोठ्या परिश्रमानें रचिले आहेत, यांत शंकाच नाहीं. मागील शतकांत या गोडबोले यांच्याइतका मोठा मराठी कोशकार कोणी झाला नाहीं. त्यांनीं दोन शब्दकोश व दोन चरित्रकोश रचिले. 'भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश' मुंबईंत सन १८७६ त प्रसिद्ध झाला. याचीं ७०० वर पृष्ठें आहेत. पौराणिक व्यक्तींची सविस्तर माहिती ग्रंथाधारांसह दिलेली असल्यानें याचें फार महत्त्व आहे. याची दुसरी आवृत्ति थोड्या वर्षांपूर्वी चित्रशाळेनें काढिली. 'भरतखंडाचा अर्वाचीन कोश' तितका शुद्ध नाहीं. तुलनात्मक अभ्यास आणि व्यापक निर्विकार दृष्टि त्या वेळीं नसल्यानें हे कोश आज मागें पडले. तथापि वेदशास्त्रसंपन्न चित्रावशास्त्री यांनीं जे 'प्राचीन', 'मध्ययुगीन' व 'अर्वाचीन' चरित्रकोश प्रसिद्ध केले त्या चरित्रकोशांचें काम महाराष्ट्राला निःसंशय भूषणावह आहे. वाङ्मयसेवकांचीं चरित्रें देण्याचें कार्य असेंच आवश्यक असून मुंबईचे श्री. गं. दे. खानोलकर यांचें 'अर्वाचीन वाङ्मयसेवका'चें अपुरें राहिलेलें काम पुरें होणें आवश्यक आहे.

ज्ञानकोश—'ज्ञानकोश' पाहा. डॉ. केतकर यांच्या महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या धर्तीवर कोल्हापुरास एक लहान 'व्यावहारिक ज्ञानकोश' निघाला. नित्यनैमित्तिक व्यवहारांत ज्या ज्या गोष्टींचा संबंध येतो त्या सर्व गोष्टींची माहिती या कोशांत देण्याचा संपादकांचा विचार होता. हा कोश संकल्पिल्याप्रमाणें निघता तर प्रत्येक कुटुंबास फारच उपयुक्त होता, हें निःसंशय. पण कोल्हापूरच्या दरबारी वातावरणांत संपादकांना पाहिजे तें स्वातंत्र्य मिळालें नाहीं व कोश फारच लहान व अपुरा झाला आहे. आतां 'सुलभ विश्वकोश' नव्याच धर्तीवर तयार होत आहे. पण त्यामुळें बृहत्कोशाची जास्तच गरज भासूं लागेल.

सूचिकोश—भाषेंत वाङ्मय वाढून त्याचा व्याप दृष्टींत ठरेनासा झाला म्हणजे त्यांतील विशिष्ट ग्रंथ, विषय, व्यक्ति, स्थळें, इत्यादि चटदिशीं समजून घेण्यास ग्रंथसूचींची फार जरूरी भासते. एखाद्या मोठ्या ग्रंथाला शेवटीं जोडलेली सूची जशी बहुमोल वाटते त्याप्रमाणें साहित्य, इतिहास, भूगोल, इत्यादि क्षेत्रांतील ग्रंथ-ग्रंथकारांची सूची असेल तर लेखकांची फार सोय होते. या दृष्टीनें १८१०–१९१६ या कालांतील ग्रंथ, मासिकें, नियतकालिकें, त्यांतील लेख व कविता या सर्वांची नोंद विषयवारी करणारी 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूची' ज्ञानकोशमंडळानें १९१८ त प्रसिद्ध केली.

त्यानंतर १८१० पासून १९३७ अखेर एक मोठी सूची पुण्यास श्री. शं. ग. दाते यांनीं प्रसिद्ध केली. ही सूची चांगल्या प्रकारें संगादिली असून मराठी भाषेला फार महत्त्वाची आहे. धुळ्याचे कै. गो. का. चांदोरकर यांनीं 'संतकवि-काव्यसूची' प्रसिद्ध करून जुन्या मराठी काव्यावर फार उपकार केले आहेत. या सूचींत मुद्रित काव्यांबरोबर प्राचीन काळापासून उपलब्ध झालेल्या अमुद्रित काव्यांचाहि जो निर्देश केला आहे तो संशोधकांना तरी चांगला मार्गदर्शक होईल. याच चांदोरकरांनीं कांहीं राजवाडे खंडांतील स्थलांची एक सूची रचिली आहे. १८९६ तील करकरे-वैद्य यांचा 'स्थलनामकोश' छोटा असूनहि ग्रंथरचनेची नवीन दिशा दाखवितो.

वाक्संप्रदायकोश—भाषेंतील वाक्प्रचार, संप्रदाय, लकबा, म्हणी, उखाणे, इत्यादि देणारे कोश कांहीं शालोपयोगी तर कांहीं स्त्रियांसाठीं केलेले आहेत. या क्षेत्रांत पहिला मोठा उल्लेखिण्यासारखा ग्रंथ म्हणजे कॅ. मॅनवेरिंग यांनीं इंग्रजींत केलेला (१८९९) होय. यांत मराठी म्हणींचें विषयवार वर्गीकरण केलें असून, आपटे आणि भिडे यांनीं आपलीं पुस्तकें याच धर्तीवर रचलीं आहेत. मोठा सर्वसंग्राहक, (निरनिराळ्या मराठी बोलींतील म्हणीहि घेऊन) वाक्प्रचार-म्हणींचा कोश महाराष्ट्र कोशमंडळानें दोन विभागांत प्रसिद्ध केला आहे. त्यांत सुमारें चाळीस हजार वाक्प्रचार व म्हणी आल्या आहेत. एवढा मोठा म्हणींचा कोश दुसऱ्या देशी भाषांत नसेल.

इंदूरचे कै. काळेले यांनीं रॉजेटच्या थेसॉरसच्या धर्तीवर 'राजकोश' रचण्यास आरंभ केला होता. यांत समानार्थक शब्दांची एकत्र गुंफणी असून तो पुरा होता तर लेखक, कवी व यथार्थ शब्दचिकित्सक यांना त्याची फार मदत झाली असती. पण दोन भाग निघून संपादकांच्या मृत्यूमुळें तो बंद पडला.

परिभाषाकोश—बडोद्यास विविध कोशरचना श्रीमंत सयाजीरावांनीं राजधुरा वाहण्यास घेतल्यापासून चालू केली. डॉ. गज्जरांच्या बहुभाषाकोशाच्या प्रयत्नानंतर खुद्द दरबारकडूनच राजशासनोपयोगी शब्दनिर्मिति व आधुनिक राजव्यवहारकोशार्थ योजना होऊन 'श्रीसयाजीशासनशब्दकल्पतरु' निघाला. प्रस्तुत कोशांत एका इंग्रजी शब्दाला गुजराथी, मराठी, संस्कृत, उर्दू, पर्शियन, हिंदी व बंगाली अशा सात भाषांतील एकापुढें एक प्रतिशब्द देऊन त्यापुढें गुजराथेंतील प्रचलित शब्द ठेविला

आहे व शेवटीं सर्वमान्य होईल असा नवा शब्द सुचविला आहे. या कोशाचा मूळ हेतु अखिल भारतांत एक परिभाषा व्हावी हा आहे. या कोशापूर्वी महाराजांनीं एक वैज्ञानिक शब्दकोश तयार करविला व शास्त्रीय परिभाषा एक व्हावी, या सर्वमान्य मताला प्रत्यक्ष चालना दिली. शास्त्रीय परिभाषा सर्व प्रांतांतून एक असावी, यासंबंधीं फुटकळ प्रयत्न चालले आहेत. पण त्याबरोबरच प्रत्येक प्रांतांतून निरनिराळीं परिभाषामंडळें निघून स्वतंत्रपणें परिभाषा-टंकशाळा जोरानें सुरू आहेत! हिंदी व बंगाली परिभाषांचे लहान लहान कोश प्रसिद्ध झालेच आहेत. पुण्याच्या परिभाषामंडळानें भूपृष्ठ व भूगर्भ, रसायन, गणित, वैद्यक, इ. शास्त्रांतील संज्ञा बनवून प्रसिद्ध केल्या आहेत. महाराष्ट्र कोशमंडळानें देशांतील सर्व जुन्या-नव्या शास्त्रीय संज्ञा जमवून त्यांचा एक मोठा कोश-'शास्त्रीय परिभाषाकोश' नांवाचा नुकताच प्रसिद्ध केला. या प्रकारचा परिभाषाकोश अद्यापि निघाला नव्हता. तेव्हां या कोशाचें महत्त्व सहज समजण्यासारखें आहे.

महाराष्ट्र सांवत्सरिकें— दरसाल घडणाऱ्या विविध गोष्टींचा परामर्ष एकत्र ज्यांत घेतला आहे असे सांवत्सरिक कोश पाश्चात्य देशांत व आपल्याकडेहि इंग्रजींत किती तरी निघतात; व त्याचा सर्वांना फार उपयोग होतो. मतप्रदर्शन न करतां नुसती जगांतील किंवा विशिष्ट राष्ट्रांतील सर्व व्यवहारक्षेत्रांतील माहिती साधार देणें हें अशा वार्षिकांचें उद्दिष्ट असतें. पक्षोपपक्षांचीं व विशिष्ट व्यवसायांचीं सांवत्सरिकेंहि निघतात. हिंदुस्थानांत 'टाइम्स ऑफ इंडिया' कचेरी 'इंडियन इअर बुक' नांवाचें एक जाडें व खच्चून माहितीनें भरलेलें सांवत्सरिक काढते. मराठींतहि असें निघावें, या स्तुत्य हेतूनें श्री. श्रीपाद महादेव माटे यांच्याच बहुंशीं चिकाटीनें महाराष्ट्र सांवत्सरिक मंडळ निघून १९३३ सालीं सुमारें १००० पृष्ठांचा पहिला ग्रंथ बाहेर पडला; व १९३४ आणि १९३५ सालीं त्या त्या वर्षांचे पुरवणी-अंक निघाले. पुढें हा प्रयत्न बंद पडला.

व्यायाम ज्ञानकोश— आज विविध प्रकारचे संदर्भग्रंथ काढण्याकडे अनेकांचें लक्ष जात आहे, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. बडोद्यास सरदार मुजुमदार यांनीं दहा भागांचा व्यायाम ज्ञानकोश पुरा केला. हाहि ज्ञानकोश अपूर्व असा असून तो शारीरिक शिक्षणाच्या कामीं चांगला उपयोगी पडणार आहे.

आयातनिर्गतमाल-कारखानदार-दुकानदार यांची माहिती पुरविणारीं 'गाइड' सारखीं पुस्तकें तयार होत आहेत. तसेंच परभाषांचीं व्याकरणें आणि शब्दकोश मराठींत निघत आहेत.

तथापि, अद्यापि बरेच कोश तयार व्हावयास पाहिजेत. लहान ज्ञानकोश होणें जरूर होतें. प्रत्येकाला आपल्या घरीं मोठा ज्ञानकोश ठेवतां येत नाहीं व त्या मोठ्या कोशांत त्याला अभ्यासाच्या



कामीं चांगली उपयोगी पडणारी विविध विषयांवरची माहिती नसते. आतां प्रसाद-प्रकाशन संस्थेनें प्रस्तुत 'सुलभ-विश्वकोश' प्रसिद्ध केला आहे. त्याची विशिष्ट व्यापक रचना व आटोपशीरपणा डोळ्यांत भरण्याजोगा आहे. प्रवाशांना उपयोगी पडेल असा स्थलकोश आज नाहीं. प्रसिद्ध प्रेक्षणीय स्थलांची वाटाड्या- ('गाइड') प्रमाणें सचित्र माहिती देणारा कोश व्यापारी आणि प्रवासी यांना तर मोठा उपयुक्त वाटेलच, पण भूगोल शिकण्यालाहि त्याची मदत होईल. 'पीयर्स सायक्लोपीडिया'-प्रमाणें कुटुंबकोश किंवा 'संसारचोपडी' विशेषतः स्त्रियांना व्यवहाराच्या दृष्टीनें फार उपयुक्त वाटेल. 'घरचा कायदा' या पुस्तकाप्रमाणें कोर्टकचेऱ्यांची पद्धति व त्यांचे कायदेकानू सुबोध रीतीनें समजावून देणारा एक चांगला न्यायव्यवहारकोश पाहिजे. सुवचनांचा कोश, ललितकला शिकणाऱ्यांस आज कलाविषयांची आणि कलावंतांची माहिती देणारा कलाकोश, प्राचीन कालापासून आजवर झालेल्या संस्मरणीय गोष्टी व त्यांचे काल देणारा, थोर व्यक्तींचीं चरित्रें आणि त्यांच्या कृती सांगणारा, व शास्त्रीय शोधांची माहिती आणि शोधकांची ओळख करून देणारा असे किती तरी कोश जरूरीचे वाटतात. कवींना उपयोगी असे यमककोश, वृत्तकोश, काव्यगुणकोश, अलंकारकोश, कविकोश, इ. ग्रंथ अद्याप तयार व्हावयाचे आहेत. सर्व धर्मांतील संस्कार, संत, विधी, मंत्र, क्षेत्रें, आचारविचार, वगैरेंची माहिती करून देणारा एखादा धार्मिक कोश असेल तर पाहिजे आहे. याप्रमाणें पाश्चात्य राष्ट्रांत प्रसिद्ध असलेल्या अनेक कोशांच्या आपल्याकडे भासणाऱ्या उणीवा सांगतां येतील. आजचें युग कोशयुग आहे, असें वारंवार म्हणण्यांत येतें. तेव्हां या युगांत अशा प्रकारचे विविध कोश लवकर तयार होणें अवश्य आहे.

कोशकिडा— कीटकांचें रुपांतर होत असतांना अगदीं प्राथमिक अवस्थेमध्यें जी अळीसारखी अवस्था असते तीस ही संज्ञा देण्यांत येते. कोणत्याहि प्राण्याच्या असंवर्धित अवस्थेला आतां ही संज्ञा वापरतात. कारण बेडूक व इतर अनेक प्राणी प्रारंभीं कोशावस्थेंतच असतात.

कोशिंब— हें लाखेचें झाड आहे. हिंदुस्थानांत, विशेषतः बंगाल व छोटानागपूर, ब्रह्मदेश, सीलोन येथें हीं झाडें पुष्कळ होतात. या झाडाच्या बियांचें तेल खाण्याच्या कामीं, दिव्याकरितां व केसांना लावण्याकडे उपयोगी असून दुष्काळांत जंगली लोक या झाडांचीं फळें खाण्याकरितां गोळा करतात. या झाडाच्या कोंवळ्या फांद्यांवर लाखेच्या किड्यांपासून पुष्कळ लाख उत्पन्न होते.

कोशी— ही नदी नेपाळ व उत्तर बंगाल यांमधून वाहत जाऊन शेवटीं पूर्णिया जिल्ह्यांत गंगा नदीला मिळते. तिला

अरन, तांवर, गोश्रा या नद्या मिळतात. चत्रा पर्वतांतून वाहत असतां तिचे अनेक धबधबे झाले आहेत. गाधी देशाच्या कुशिक राजाला जी कौशिक नांवाची मुलगी होती, तिला नदीचें स्वरूप प्राप्त झालें, अशी दंतकथा आहे. या नदीचा प्रवाह फार वेगाचा व वेळोवेळीं बदलणारा असल्यामुळें ही नदी फार घातकी आहे. हिला पूर आला म्हणजे आसपासचा प्रदेश उध्वस्त होतो. हल्लीं काथंहारजवळ हिला एक मोठा पूल बांधला आहे.

**कोषपुष्पवर्ग**—(कॉमेलिनासिई). हा एक एकदल (एक-गर्भपर्णी) वनस्पतींचा वर्ग असून या वर्गाच्या वनस्पती उष्णकटिबंधांत व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत आढळतात. या वर्गातील विशेष परिचित जात म्हटली म्हणजे लीलीसदृश 'ट्रेड्सकँटिया' ही जाति होय.

**कोष्टी**—ही जात महाराष्ट्र, कर्नाटक व मध्यप्रांत येथें आहे. मध्यप्रांतांत मराठी कोष्टी व तेलगू कोष्टी अशा पोटजाती आहेत. तेलगू कोष्ट्यांना सालेवार म्हणतात. हे मार्कंडेय ऋषीस आपल्या धंद्याचे ऋषि समजतात. कोष्टी लोकांची वाघावर फार भक्ति आहे. आजपर्यंत वाघानें एकहि कोष्टी मारला नाहीं असें सांगतात. लग्नप्रसंगीं वाघाची मूर्ति जवळ ठेवतात.

मध्यप्रांतांतील कोष्ट्यांत हिंदू (पूर्वीचे जैन), लिंगायत, कबीरपंथी व गुरुमुखी असे चार पंथ आहेत. तेलगू उर्फ सालेवार कोष्ट्यांत सूतसाळी व पद्मसाळी असे पोटभेद आहेत. घटस्फोट व विधवाविवाह या चाली या जातींत आहेत. नागपूरकडील कोष्टी धोतरें व लुगडीं फार चांगलीं विणतात; याविषयीं त्यांची सर्वत्र प्रसिद्धि आहे.

महाराष्ट्रांत यांची देवता चावंडेश्वरी आहे. हे कांहीं मराठ्यांप्रमाणें, तर कांहीं ब्राह्मणांप्रमाणें पोषाख करतात. यांची लहान मुलें व बायका यांना विणकामांत मदत करतात.

**कोस**—हिंदुस्थानांत रस्तामोजणीचें माप. हेंच फार प्राचीन काळापासून प्रचारांत आहे. चंद्रगुप्त मौर्याच्या काळींहि कोस उपयोगांत होता. हल्लींप्रमाणें रस्त्याच्या कडेला हे कोसांचे दगड पुरलेले असत. साधारणतः आज दोन मैलांचा कोस धरतात. याचे ४५५८ यार्ड होतात.

**कोसॅक**—ही जमात रशियाच्या दक्षिण व पूर्व भागांत राहते. झार बादशहांच्या कारकीर्दींत यांच्यावर कर मुळींच नसत; परंतु त्याऐवजीं सैनिक म्हणून त्यांना नोकरी करावी लागे. या लोकांची राहणी व वंश लक्षांत घेतां त्यांचे मुख्य २ वर्ग पडतात ते—लिटल् रशियांतले कोसॅक आणि डॉन नदी कांठचे कोसॅक. कोसॅक ही कॉकेशियन व तार्तार यांच्यापासून झालेली मिश्र जात आहे. आणि ते दिसावयाला शुद्ध रशियन लोकांसारखे बहुतेक दिसतात. आरंभीं या लोकांचें एक लोकसत्ताक राज्य होतें. व ते आपला मुख्य अधिकारी उर्फ हेटमन नेमीत असत. पुढें झार बादशहांच्या अमलाखालीं त्यांची पूर्वीची लोकशाही राज्यपद्धति हळूहळू नष्ट झाली. आणि ते आपली चीफ हेटमन ही पदवी रशियाच्या युवराजाला देऊं लागले. प्रत्येक कोसॅक इसमाला वयाच्या १८ ते ३८ वयापर्यंत लष्करांत नोकरी करावी लागे. आणि प्रत्येकाला आपल्या स्वतःच्या मालकीचा घोडा आणावा लागे. रशियन बादशाही अमलामध्यें राष्ट्रीय सैन्याचा हा एक अत्यंत महत्त्वाचा विभाग असे. ते अगदीं पहिल्या दर्जाचे लढवय्ये असत.

**कोसंबी, धर्मानंद** (१८७६–१९४७)—एक महाराष्ट्रीय बौद्ध पंडित. यांचें कांहीं शिक्षण प्रथम बनारस येथें व नंतर सीलोन व ब्रह्मदेशांत झालें. यांनीं पाली भाषेचा व बौद्ध धर्माचा विशेष अभ्यास केला होता. १९०६ मध्यें हे कलकत्ता येथील राष्ट्रीय कॉलेजमध्यें पाली भाषेचे प्राध्यापक होते. १९०७–८ सालीं कलकत्ता विद्यापीठांत पदवी–उत्तर अभ्यासाचे प्राध्यापक होते. १९०८–९ मध्यें यांस गायकवाड सरकारकडून विद्यावृत्ति मिळत होती. १९१०–११ मध्यें ह्यांना अमेरिकेंतील हॉर्वर्ड युनिव्हर्सिटीनें भारतीय व्युत्पत्तिशास्त्राचे साहाय्यक प्राध्यापक नेमलें होतें. १९१२ ते १९१८ पर्यंत हे फर्ग्युसन कॉलेजमध्यें पालीचे प्राध्यापक व मुंबई विद्यापीठांत परीक्षक होते. १९३४ मध्यें हे मुंबई विद्यापीठांत फॅकल्टी ऑफ आर्ट्सचे स्वीकृत समासद होते. १९१८ ते १९२२ मध्यें हे हॉर्वर्ड विद्यापीठांत तत्त्वज्ञानशाखेंत साहाय्यक प्राध्यापक होते. १९२२ ते १९२५ मध्यें हे महात्मा गांधी यांनीं स्थापन केलेल्या गुजरात विद्यापीठामध्यें होते. १९२६–२७ मध्यें त्यांस हॉर्वर्ड विद्यापीठांत संशोधनवृत्ति मिळत होती. १९२८–२९ मध्यें त्यांनीं पुन्हां गुजरात विद्यापीठांत निर्वेतन काम केलें. १९२९ मध्यें हे रशियांतील लेनिनग्राड विद्यापीठांत शास्त्रीय शाखेंत संशोधक व भारतीय प्राचीन इतिहास व वाङ्मय या शाखांत प्राध्यापक होते. नंतर यांनीं सत्याग्रह चळवळींत भाग घेतला व त्यांस शिक्षा झाली. १९३० मध्यें यांनीं विशेषतः शिरोडा येथें मिठाचा सत्याग्रह केला. यांनीं बौद्ध धर्मासंबंधीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत. विशेषतः 'मज्झिमनिकाय' वरील टीका, 'पपंचसूदनी' व बुद्धघोषाचा 'विसुद्धिमग्ग' या ग्रंथांचें संपादन केलें आहे.

**कोसम**—संयुक्त प्रांत, अलाहाबाद जिल्ह्याच्या मंझनपूर तहशिलींतील एक खेडेगांव. हें गांव यमुना नदीच्या कांठीं वसलेलें आहे. प्राचीन हिंदुस्थानांत प्रसिद्धीस आलेलें कौशाम्बी नगर हें या खेडेगांवाच्या खालीं पुरलें गेलें असावें असें तज्ज्ञांचें मत होतें. या खेड्याच्या आसपास दगडी मूर्ती, नाणीं, इत्यादि

सांपडलेलीं आहेत, व अद्यापि सांपडतात. किल्लयाच्या वायव्येस तीन मैलांवर पभोसा नांवाची एक टेंकडी असून तेथें लेणीं आहेत; या लेण्यांमध्यें पुष्कळ शिलालेख आहेत. कौशांची पहा.

**कोसल**—उत्तर कोसल व दक्षिण कोसल असे दोन फार प्राचीन देश असून त्यांचा उल्लेख वैदिक वाङ्मय, रामायण, महाभारत, वायुपुराण, बौद्धवाङ्मय, वगैरे पुष्कळ ठिकाणीं आलेला आहे. उत्तर कोसल म्हणजे घोगरा नदीच्या उत्तरेकडील अयोध्या प्रांत होय. ऋग्मंत्ररचनेपूर्वी हा देश वसला गेला असावा; तथापि वेदोत्पादकांना त्याचा परिचय उशिरां झालेला असावा. रामाची आई कौसल्या ही कोसल राजाची कन्या होय. रामाचा पुत्र लव यानें या प्रदेशावर राज्य केलें, असें वायुपुराणावरून दिसतें. त्या प्रदेशांतच गौतम बुद्धाचें पूर्वचरित्र झालें व तेथेंच त्यानें आपल्या धर्माची ध्वजा प्रथम फडकावली. या कोसलाची राजधानी श्रावस्ती ही नेपाळांत हिमालयाच्या पायथ्याशीं होती. महाभारतकाळीं येथें सूर्यवंशी राजे होते. बौद्धधर्मप्रसारामुळें या राज्यास उतरती कळा लागली, व चंद्रगुप्त मौर्यानें हा देश जिंकला.

दक्षिण कोसल म्हणजे महानदीच्या खोऱ्यांतील (हल्लींचा छोटानागपूर) प्रांत होय. रामानें आपला पुत्र कुश याला हें राज्य दिलें. त्याची राजधानी कुशावती होती. महाभारतकालांत या देशावर हैहय या सोमवंशी क्षत्रिय घराण्यानें सत्ता स्थापली. हैहय राजांची राजधानी रतनपूर होती. ८ व्या शतकांत सूरदेव व ब्रह्मदेव यांनीं हें राज्य वांटून रतनपूरची थोरली पाती व रायपूरची छोटी पाती अशीं राज्यें केलीं. हीं राज्यें पर्वतांनीं वेष्टित असल्यामुळें १८ व्या शतकांत मराठ्यांच्या मुलूखगिरीपर्यंत बिनधोक टिकलीं.

**कोसीडको, ताद्यूझ** (१७४६–१८१७)— हा पोलिश देशभक्त १७७७ मध्यें अमेरिकेंत गेला व तेथें तो वॉशिंग्टनच्या नजरेंत भरला आणि त्याला कर्नल ही पदवी देऊन इंजिनिअर नेमण्यांत आलें. व नंतर ब्रिगेडियर जनरल करण्यांत आलें. पोलंडमध्यें परत आल्यावर तो कांहीं वर्षे निवृत्त स्थितींत राहिला. पण नंतर त्याला १७९४ मध्यें बंडवाल्या सैन्याचा जनरल नेमण्यांत आलें. त्यानें क्रॅकाऊनजीक रशियन सैन्याचा पराभव केला, पण पुढील लढाईत त्याच्या सैन्याचा पराभव होऊन तो जखमी होऊन कैदी झाला. २ वर्षे कैद भोगल्यावर रशियांत पहिला पॉल राजा राज्यावर आल्यावर १७९६ मध्यें त्याची मुक्तता झाली. नंतर इंग्लंड, अमेरिका व फ्रान्स या देशांत जाऊन परत स्वित्झर्लंडमध्यें येऊन राहिला.

**कोसुथ** (१८०२–१८९४)—हा हंगेरियन देशभक्त १८४७ साली डायेट (कायदेमंडळ)-मध्यें नॅशनल पार्टीनें सभासद निवडून दिला व पुढें तो हंगेरियन मंत्रिमंडळांत अर्थमंत्री झाला. पुढें हंगेरीनें स्वातंत्र्ययुद्ध पुकारलें तेव्हां त्याची गव्हर्नर उर्फ डिक्टेटर–पदावर निवड झाली. पण रशियाच्या मध्यस्थीमुळें हंगेरीचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले, व कोसुथला तुर्कस्तानांत बंदीवासांत ठेवण्यांत आलें (१८४९). अखेर ब्रिटन व सं. संस्थानें यांच्या मध्यस्थीनें त्याची सुटका झाली.

**कोस्टारिका**—मध्य अमेरिकेंतील एक लोकसत्ताक राज्य. पश्चिमेस पासिफिक महासागर व पूर्वेस कॅरिबिअन समुद्र. क्षे. फ. २३,००० चौरस मैल. सानजोसे हें मुख्य ठिकाण. कॉफी, केळीं, सोनें, रुपें यांचें उत्पन्न मोठें आहे. भाषा स्पॅनिश. कोस्टारिका हें पूर्वी स्पॅनिश अमेरिकेचा एक भाग होतें. १८२१ मध्यें हें स्वतंत्र झालें. राजधानी (सानजोसे)–पासून पासिफिक महासागराकडे पंटा अरिनाश बेदरापावेतों व कॅरिबिअन समुद्राकडे पोर्ट लिमॉनपावेतों रेल्वे गेली आहे. हीं दोन प्रमुख बंदरें आहेत. संस्थानची लोकसंख्या ७,०५,३०५ आहे.

**कोस्ट्रोमा**—हें रशियांतलें शहर मास्कोच्या ईशान्येस २०० मैलांवर आहे. येथें एक कॅथेड्रल (ख्रिस्ती मंदिर) व विद्यापीठ (स्थापना १९१९) असून विणकामाचे व यंत्रसामग्री-माशिनरीचे कारखाने आहेत. लो. सं. १,२१,२०५.

**कोहइबाव**—ही एक लांबच्या लांब पर्वताची ओळ आहे. ही अफगाणिस्तानच्या मध्यभागांतून गेलेली असून अफगाणिस्तानच्या संरक्षणाचें मुख्य साधन झालेली आहे. ही हिंदुकुश पर्वताची एक रांग आहे, असें म्हणतात. या पर्वतांतील, इराक (१३,००० फूट); हजीगव (१२,००० फूट.), व झर्दसंग (१३,००० फूट) हे मोठे घाट आहेत.

**कोहली**— वऱ्हाड–मध्यप्रांतांतील एक शेतकरी जात. लो. सं. २६,००० आहे. वैनगंगेच्या खोऱ्यांत त्यांनीं मोठालीं तळीं बांधलीं आहेत, त्या पाण्याचा पुरवठा शेतीला होतो. ते मुख्यतः उंसाची लागवड करतात. शेती कुदळीनें खोदून करतात. घटस्फोट व विधवाविवाह या चाली आहेत. हे लोक मांस खातात, पण दारू पीत नाहींत. यांचा दर्जा कुणब्यांपेक्षां हलका मानतात. हे फार मोठे मालगुजार आहेत.

**कोहळा**— हिंदुस्थानांत बहुतेक भागांत, युरोप व अमेरिका खंडांत हें पीक होतें. याची लागवड पावसाळ्याच्या आरंभीं करतात, व वेल वाढण्याकरितां झुडुपांचा किंवा मांडवाचा आधार देतात. वेलांना पाणी भरपूर लागतें. हें फळ काळ्या भोपळ्याएवढें व लांबट असून त्यावर पक्व होण्याच्या सुमारास पिठासारखी पांढरी पूड येते. या फळाची भाजी व फोडी वाळवून सांडगे करतात. उडदाचे पापड कोहळ्याच्या पाण्यांत पीठ भिजवून करतात, तेव्हां ते हलके होतात. कोहळा किसून

किंवा फोडी करून साखरेच्या पाकांत मोरंबा करतात. बियापासून खाण्याचें तेल काढतात. एका एकरांत १५ ते २० टन वजनाचीं फळें निघतात. हें फळ औषधी आहे.

**कोहाट**—पाकिस्तान; हा जिल्हा वायव्य सरहद्द प्रांतांत आहे. लो. सं. २,८९,४०४ आहे. लांबी १०४ मैल व रुंदी ५० मैल आहे. येथें चपट्या खड्यांच्या दगडांचे थर विपुल असून त्यांच्या-खालीं शेंदेलोण मुबलक सांपडतें. बहादुर खेल येथें शेंदेलोणाचे थर १,००० फूट जाडीचे व तांबूस रंगाचे व फार शुद्ध आहेत. सैंधवाच्या खाणी पुष्कळ असून त्यांनीं ४० मैल लांब व २० मैल रुंदीचा टापू व्यापला आहे. येथें पेट्रोलियमचे तीन लहानसे झरे आहेत. विणकामाचा धंदा सर्वत्र चालतो. रेशमी व सुती पागोटीं फार उत्तम तयार होतात. कातडी वाहणा व जोडे उत्तम होतात. येथील जंगलांत देवदारू झाडें विपुल असून शिसव, बकैन, पलोसी, इत्यादि झाडें आहेत. देवदारूच्या दोऱ्या, चटया, टोपल्या, वगैरे जिन्नस करतात. या जिल्ह्यांत कोहट, टेरी व हंगू हे तीन तहशील (तालुके) असून कोहट हा मोठा गांव आणि २९० खेडीं आहेत. कोहट गांवची लो. सं. सुमारें पंचवीस हजार आहे. येथें लष्करी व पोलिस–ठाणें आहे.

**कोहीम**—आसामांत नागा टेंकड्या जिल्ह्याच्या कोहीम पोटविभागाचें मुख्य ठिकाण. हें समुद्रसपाटीपासून ५,००० फूट उंचीवर आहे. ब्रह्मपुत्रा दरींतील दिमापूर गांवापासून मणिपूर-कडे जाणारा रस्ता या गांवावरून जातो. या गांवाची लोक-संख्या तीन-चार हजार आहे.

**कोळसा, कोतवाल**—या पांखराचा रंग खरोखरीच कोळशासारखा काळा कुळकुळीत असतो. तसेंच याची वागण्याची पद्धत व दुष्ट पांखरास आपल्या प्रांतांत फिरकूं न देणें, कोणी येत आहे कीं काय म्हणून पहारा करणें, व आल्यास त्यास पकडण्यास धांवत सुटणें या त्याच्या संवयीवरून त्यास 'कोतवाल' हेंहि योग्य नांव पडलें आहे.

हे पक्षी नेहमीं झाडाच्या वाळलेल्या फांदीवर किंवा कुंपणाच्या किंवा विजेच्या तारेवर आपलें माशासारखें शेपूट वर-खालीं करीत बसलेले असतात. पुष्कळ वेळां जनावरांच्या अंगावर बसतात व त्यांच्या अंगावरचे गोचीड, वगैरे काढून खातात. तसेंच जनावर चरत असतांना त्याच्या पाठीवर बसतात व जनावराच्या चालण्यामुळें गवतांतून उडणारे सर्व किडे अनायासें यांना खाण्यास मिळतात. कोळशांत निर-निराळ्या लहान-मोठ्या जाती आहेत. त्यांचे आवाज निर-निराळे असतात. कोळशास पहांटेस ओरडण्याची फार संवय असते. यांचें घरटें लहान पेल्यासारखें चांगलें घट्ट असें झाडा-वर फांद्यांच्या दुबेळक्यांत असतें.

**कोळसा**— दगडी कोळसा. पृथ्वीच्या पोटांत प्राचीन काळीं वनस्पतींपासून तयार झालेला जळणाचा पदार्थ. हा घट्ट, अपारदर्शक असून यांत बराचसा कर्बच असतो. पृथ्वीच्या पोटांत वेगवेगळ्या काळांत तयार झालेले कोळशाचे थर आढ-ळतात. कोळशाचे पुष्कळ प्रकार असतात. अंगारप्रस्तर (अँन्थ्रा-साइट) कोळसा शुद्ध कर्बयुक्त असून त्याचा जाळ कमी होतो. हा भट्ट्यांसाठीं वापरतात. ज्वालाग्राही (बिट्युमिनस) हा घरगुती कामाला व दीप्त्यंगार (कॅनेल) हा वायु तयार करण्या-साठीं वापरतात. सर्व प्रकारांत शेंकडा ६० ते ९० पर्यंत कर्ब असतो; त्याखेरीज प्राणवायु, उज्ज व थोडा नत्र वायु असतो.

कोळशाच्या खाणी पुष्कळ देशांतून आहेत. ब्रिटनमध्यें लॅंकेशायर, नार्दंबरलंड, डरहॅम, यॉर्कशायर, नाटिंगहॅमशायर, डर्बीशायर, वारविकशायर, इ. पुष्कळ खाणी असून सर्व खनि-नांत हें एक खनिज ग्रेट–ब्रिटनला फार समृद्ध करणारें आहे. त्यामुळें सरकारचें या धंद्यावर फार नियंत्रण आहे.

दगडी कोळशावर हैड्रोजन वायूची क्रिया घडवून पेट्रोल-सारखें तेल तयार होऊं शकतें, हा शोध जर्मन शास्त्रज्ञांनीं लावला. एक टन कोळशापासून पंचवीस-तीस गॅलनपर्यंतहि पेट्रोल मिळूं शकतें. यासंबंधांत दोन पद्धती प्रसिद्ध आहेत. एकीस बर्गिनची रीत व दुसरीस फिशर ट्रॉप्स पद्धति म्हणतात. दुसऱ्या पद्धतींत कोकवर वाफ सोडून रासायनिक क्रिया करतात. यामुळें पेट्रोल स्वस्त पडतें.

एकंदर जगांत कोळशाचें एक वर्षांत उत्पादन एक अब्ज टनांवर आहे. यांपैकीं अमेरिकन संयुक्त संस्थानांत सुमारें ४० कोटी, ग्रेट–ब्रिटनमध्यें २२ कोटी व जर्मनींत सुमारें १२ कोटी टन कोळसा निघतो. बाकीचा फ्रान्स, पोलंड, रशिया, जपान, बेल्जम व हिंदुस्थान यांत निघतो. कानडा, चीन, दक्षिण आफ्रिका व आणखी कांहीं देश यांत जमिनींत कोळसा आहे असें म्हणतात.

हिंदुस्थानांत बंगाल, बिहार आणि ओरिसा या प्रांतांत कोळसा फार निघतो. हैद्राबाद संस्थानांत सिंगरेणी व मध्य-प्रांत यांतहि कांहीं खाणी आहेत. झरिया आणि राणीगंज या दोन खाणींतूनच एकंदर कोळशापैकीं शेंकडा ७२ इतका कोळसा निघतो. हा सर्व कोळसा बहुतेक आपल्या देशांतच खपतो. १९३९ सालीं सुमारें दहा कोटी रुपयांचा २ कोटी ७७ लक्ष टन कोळसा निघाला.

**कोळसा घेण्याचीं बंदरें**—जहाजाच्या लांबच्या प्रवासांत त्यांना जळण घेण्यासाठीं सोयीस्कर बंदरांतून व्यवस्था केलेली असते. या जागीं जहाज–दुरुस्तीचे कारखाने, आवश्यक वस्तूंचीं दुकानें, इस्पितळें वगैरे सर्व सोयीहि असतात. हल्लीं कोळशाऐवजीं

जळण तेल जें वापरण्यांत येत असतें त्याचेहि सांठे अशा बंदरांत असतात. अशीं बंदरें गेल्या महायुद्धापूर्वीं बहुतेक सर्व ब्रिटिश सरकारच्या मालकीचीं असत; तेव्हां शत्रुराष्ट्रांची कुचंबणा करण्यास सोपें झालें होतें व तटस्थ राष्ट्रांनीं जर मागितलेल्या गोष्टी पुरविल्या नाहींत तर त्यांना या बंदरांचा फायदा न देण्याचा धाक दाखविण्यांत येई. जगांतील प्रमुख कोळसा घेण्याचीं बंदरें पुढील होत :—जिब्राल्टर, माल्टा, पोर्ट सय्यद, पेरिम, एडन, कोलंबो, सिंगापूर, हाँगकाँग, न्यू कॅसल ( न्यू साउथ वेल्स ), होबार्ट, वेलिंग्टन, केप, मॉरिशस, फाकलंड्स, फ्री टाऊन ( सिरालेऑन ) व हॅलिफाक्स.

**कोळसुंदा**— १. ( लिंक्स ). हा मांजरासारखा दिसणारा एक प्राणी आहे. हा मांसाहारी आहे. याच्या कांहीं जाती युरोपमध्यें व कांहीं अमेरिका व कानडामध्येंहि आढळतात. यांचें कातडें त्यावरील मऊ केसांमुळें मौल्यवान् असतें.

२. एक वनस्पति. ही शेताच्या बाजूस व ओहोळाच्या कांठीं होते. कोंवळ्या पाल्याची भाजी करतात. याच्या बियास तालीमखाना म्हणतात. तें पुष्टिदायक औषधांत वापरतात.

**कोळसूण**—( वाइल्ड डॉग ). हा प्राणी साधारणतः देशी कुत्र्यासारखाच दिसत असून रंगहि बहुतेक सारखाच, क्वचित् काळाहि असतो. याचे कान उभे अगर आडवे व ताठ असतात, खालच्या जबड्यांत दाढा तीनच्याऐवजीं दोनच असतात. त्याच्या शरीरावरील केंस जरा लांब असतात. कोळसूण हा प्राणी दिसण्यांत अगदीं गरीब, दुर्बळ व भित्रा दिसतो. तो स्वजातीयांचा चाहता असून, ते सर्व अरण्यांत टोळीनें राहतात. कोळसूणला भुंकतां येत नाहीं. तो संघशक्तीच्या जोरावर भक्ष्य मिळवतो. कोळसूण शत्रु समोर येतांच त्याच्याकडे पाठ करीत शेपटीवर लघुशंका करून ती शत्रूच्या तोंडावर झाडतो. त्यामुळें मूत शत्रूच्या डोळ्यांत जाऊन त्याचे डोळे चुरचुरतात; अर्थातच डोळे बंद होतात, आणि कोळसूण त्याचे लचके तोडूं लागतो.

प्राणिशास्त्रज्ञांच्या मतें ही जात लांडगे, कोल्हे अगर त्याच वर्गांतील इतर नरमाद्यांच्या संयोगापासून उत्पन्न झाली असावी व पुढें त्यांची जात वाढून नेहमीं भर पडत गेली असावी. त्यांच्या माद्यांचा ऋतुकाल नेहमीं कार्तिकापासून माघापर्यंत असतो. एका खेपेस सर्वसाधारण एकपासून पांचपर्यंत पिलें जन्मतात. मादीस दोन्ही बाजूंस सारखे नसले तरी चौदापासून सोळापर्यंत स्तन असतात. माद्या नितान्त शांत व एकान्त जागा निवडून त्या ठिकाणीं खाडे खोदून अगर दगडाचे कपारींत योग्य वेळीं वितात.

हा प्राणी हिंदुस्थानांत सर्वत्र आढळतो. मध्य हिंदुस्थान, दक्षिण गुजराथचा पूर्व जंगल भाग, तसेंच नीलगिरि व म्हैसूरचा जंगल भाग ह्यांत ह्यांची दाट वस्ती आढळते.

**कोळिंजन**—एक वनस्पति. हें हिमालयाच्या पायथ्यापासून सिलोनपर्यंत सर्व हिंदुस्थानांत व ब्रह्मदेशांत आढळतें. याचे गड्डे व फळ बाजारांत विकलें जातें. संयुक्तप्रांतांत चीट छापण्याच्या कामीं याच्या कांबींचा उपयोग करतात व हा औषधीहि आहे. कोळिंजन हें मज्जातंतुपौष्टिक व कामोद्दीपक आहे असें म्हणतात.

अथर्ववेदांत याचा उल्लेख आहे. पर्वतावर, सोमवल्लीबरोबर जेथें गरुड पक्षी आपलीं घरटीं करून राहतात अशा हिमालयाच्या उंच शिखरांवर ह्या वनस्पतीची वाढ होत असे आणि तेथून ती पूर्वेकडे मनुष्यांच्या उपयोगाकरितां आणली जात असे. असें म्हणतात कीं, ही वनस्पति प्रथम द्युलोकांत प्रसिद्ध अश्वत्थ वृक्षाच्याखालीं, जेथें देव जमत असत तेथें उगवली आणि तेथून ती सुवर्णनौकेंतून आणली. ह्या वनस्पतीच्या नद्य-मार आणि नद्य-रिप ह्या शुभ नांवांवरून ही वनस्पतींमध्यें अतिशय उपयोगी वनस्पति होती असें वाटतें. ही वनस्पति डोकें दुखणें ( शीर्षामय ), नेत्ररोग, शारीरिक दुःख व मुख्यत्वेंकरून ताप ( म्हणून तक्मनाशन म्हणतात ) आणि यक्ष्मा ( क्षयरोग ) या रोगांवर उपाय आहे. ह्या वनस्पतीच्या सामान्य गुणधर्मावरून हिला विश्व-भेषज असें नांव दिलें आहे. अंजन आणि जटामांसी ( नलद ) या वर्गांत हिला घालतात. यावरून हिचे सौगंधिक गुण माहीत असावेत असें दिसतें.

**कोळी**—अष्टपाद प्राण्यांतील संधिपाद प्राण्यांच्या वर्गाला हें सामान्य नांव आहे. यांचें डोकें व वक्षाचा भाग एकत्र जोडलेला असून त्याला शिरोवक्ष असें म्हणतात. यांस पंख नसतात. या पुढील भागांतच फुप्फुसें असून त्यांच्या व वायुनलिकांच्या साहाय्यानें हे प्राणी श्वासोच्छ्वास करतात. हे अंडीं घालतात. यांच्या उदरांत चारपासून सहापर्यंत लांबट वाटोळे किंवा निमूळते स्तनासारखे नलिकाकार अवयव असतात. यांना आठ डोळे, व आठ पाय असून स्पर्शशृंगांऐवजीं दोन स्पर्शपाद किंवा चिमटा असतो. कोळी हा आपल्या भक्ष्याच्या शरीरांत आपल्या शरीराच्या ग्रंथींत असलेलें विष टोंचून त्यास ठार मारतो; नंतर त्याच्या शरीरांतून अवश्य तो रस शोषून घेतो. याच्या अनेक जाती आहेत. एक जात आपलें घरटें जमिनीवर तयार करते. त्या घरास झांकण असतें. एका जातीच्या कोळ्याचा दंश झाला असतां नाचावयाचें वेड लागतें. या कोळ्यास इंग्रजींत टारांटुला म्हणतात. कांहीं

कोळयांच्या पाण्यांत राहणाऱ्याहि जाती असून ते आपलीं घरटीं फार चमत्कारिक तऱ्हेनें बांधतात.

[ हा घरकोळी आहे. चित्रांत वर डाव्या हातास पहिल्यानें एक वातकोष्ठ, नंतर डोक्याचा पुढचा भाग व शेवटीं डोक्याचा खालचा भाग आहे. उजव्या बाजूस तंतुकी ( स्पिनरेट्स ) असून त्याखालीं जाळयाचे सूक्ष्म धागे चिकटलेले दिसतात ; व टोंकाला जाळयाची पकड आहे ].

कोळयाच्या पोटाच्या खालच्या बाजूस रेशमी गांठी असतात. त्यांतून चिकट द्रव बाहेर पडून धागे बनतात व जाळें होतें. हें जाळें कोळयाचें घरटें होय. यांतच तो लहान प्राणी पकडून ठेवतो.

**कोळी जात**—यांची लो. सं. ३१॥ लाख आहे, पैकीं २२ लाख महाराष्ट्रांत आहेत. संस्कृतांतील कोल शब्दापासून मराठी कोळी शब्द झाला असावा. कोळी हे बारा बलुतेदारांपैकीं हक्कदार आहेत. मच्छीमारी हा यांचा मुख्य धंदा असून शिवाय हे शेती करतात. भोई ही अशीच जात आहे, पण त्यांचा कोळी जातीशीं कांहीं संबंध नाहीं. समुद्रांत जहाजें व नद्यांत नावा चालवणें, हाहि या जातीचा धंदा आहे. कोळयांत कदम, पोवार, दळवी, गायकवाड, शिर्के, जाधव, शेलार, भोईटे, वगैरे आडनांवें मराठ्यांप्रमाणेंच आहेत. कोळयांमध्यें अनेक जाती आहेत. सोनकोळी ( उत्तर व दक्षिण कोंकणांत मासे मारणारे व जहाजें चालवणारे ), आगरी कोळी ( कोंकणांत शेती करणारे ), माळी कोळी ( कोकणांत मळे करणारे ), डोंगर कोळी ( सह्याद्रीवरील मावळांत शेती व शिकार करणारे ), मारवी कोळी ( पूर्वी पालख्या व मेणे वाहणारे ), ढोर कोळी ( मेलेल्या जनावरांचें मांस खाणारे ), वगैरे जाती आहेत. ढोर कोळी जात्या चपल व धाडसी व पक्के दरोडेखोर आहेत. त्यांच्यापैकीं राघोजी भांगऱ्या यानें १८४५ च्या सुमारास ठाणें जिल्ह्यांत मारवाड्यांना लुटण्याचा व त्यांची नाकें कापण्याचा सपाटा उडवून धुमाकूळ माजवला. शेवटीं त्याला पंढरपुरास पकडून फांशीं दिलें. मल्हारी कोळी हे फार उच्च व निर्मळ समजले जातात. महादेव कोळी यांचें मूलस्थान निजामच्या राज्यांतील बालाघाट असून १४ व्या शतकांत ते कोंकणांत गेले असावेत. पायेरा नांवाचा त्यांचा एक नाईक एका सिद्धाच्या आज्ञेनें जव्हारास येऊन व तेथील वारली राजावर स्वामित्व मिळवून जव्हार संस्थानचा मूळपुरुष झाला. कोळयांचीं दैवतें देवी, महादेव व मल्हारीमार्तंड हीं आहेत. सोनकोळयांचीं कुलदैवतें जेजुरीचा खंडोबा व कार्ले लेण्यांतील एकवीरा देवी हीं होत. त्यांचा मूळ धर्मगुरु वरसोली गांवीं ( जिल्हा कुलाबा ) कान्हो नांवाचा भगत होता. या धर्मगुरूची गादी वरसोलीस आहे.

गुजराथेंत व दमण ते कच्छपर्यंत समुद्रकिनारीं मच्छी कोळयांची वस्ती आहे. भिल्ल व रजपूत यांच्या मिश्रणानें ही जात बनली आहे. हे लोक 'लुटारू म्हणून पेशवाईपासून प्रसिद्ध आहेत. ते घोडे बाळगून बंदुका, तरवारी, भाले, इ. शस्त्रांनिशीं दरोडे घालीत. मराठी राज्यांत त्यांची आरमारी सैन्यांत भरती करण्यांत आली. पेशवाई नष्ट झाल्यावर या जातीनें दरोडेखोरी व लुटालूट करून फार धुमाकूळ घातला. १८५७ नंतर शस्त्रबंदीच्या कायद्यानें यांना निःशस्त्र केल्यामुळें यांची दंगेखोरी कमी झाली. कोळयांच्या सर्व जातींत काडीमोड व विधवाविवाह रूढ आहे. सर्व पोटजातींच्या जातपंचायती व ग्रामपंचायती आहेत.

**कोळयाचें जाळें**—( इं. गोसॅमेर–म्हातारीचे केंस ) कोळयाच्या जाळयाप्रमाणें एक सूक्ष्म पातळ पडद्यासारखा पदार्थ. हा वर्षाऋतूंत आकाश स्वच्छ असतांना हवेंत उडतांना आढळतो. वसंत ऋतूंत त्या मानानें कमी आढळतो. हा विशेषतः धान्याचे खुंट असलेल्या शेतांत किंवा झुडपें असलेल्या जमिनींच्यावर दृष्टीस पडतो. हें जाळें कोळयांच्या अनेक जातींच्या पिल्लांनीं दूर जाण्याकरितां तयार केलें असतें.

**कौटिल्य**—याचें मूळ नांव विष्णुगुप्त. आर्य चाणक्य असेंहि नांव आहे. यानें नंदराजांचा, त्यांनीं याचा अपमान केल्यामुळें आमूलाग्र उत्खात करून धनानंदाचा दासी ( मुरा )-पुत्र चंद्रगुप्त मौर्य याला मगधाच्या राज्यावर बसविलें. हा अत्यंत निस्पृह पण तापट ब्राह्मण होता. यानें लिहिलेला अर्थ-

शास्त्रावरील ग्रंथ ( कौटिलीय अर्थशास्त्र ) फार महत्त्वाचा आहे. याचा काल ख्रि. पू. ३२० ते ३०० असा आहे.

**कौंडिण्य**—बुद्धाच्या पंचवर्गीय भिक्षूंपैकीं हा एक असून गौतमानें गृहत्याग केला त्या वेळीं गौतम पुढें बुद्ध होईल असें भविष्य यानें वर्तवलें. उरुवेला प्रदेशांत बोधिसत्त्वानें घोर तपस्या आरंभिली असतां या पंचवर्गी भिक्षूंनीं त्याची सेवा केली. पुढें हे भिक्षू काशीस गेले. बोधिसत्त्वास ज्ञानमार्ग सांपडल्यावर तो या भिक्षूंच्याकडे आला त्या वेळीं यांनीं त्याचें यथोचित स्वागत केलें. बुद्धानें या भिक्षूंना उपदेश दिला त्यांत कौंडिण्य हा पहिला होता.

**कौंडिण्यपुर**—वऱ्हाड, जिल्हा उमरावती, तालुका चांदूर, वर्धा नदीच्या तीरीं हें गांव आहे. दर कार्तिक पौर्णिमेस विठ्ठल-रुक्मयाची एक मोठी जत्रा येथें भरते. रुक्मिणीच्या बापाचें येथें राज्य असून त्याची राजधानी हें शहर होतें त्या वेळीं येथें देवलवाडा नांवाचें शहर होतें; परंतु हल्लींच्या गांवाखालीं तें पुरलें आहे असें म्हणतात.

**कौपर, विल्यम** ( १७३१–१८०० )— एक इंग्रज कवि. हा बॅरिस्टर झाला, पण दोन वर्षें वेड लागल्यामुळें याला एकान्त-वासांत राहावें लागलें. तेथें उनविन कुटुंबानें त्याची चांगली काळजी घेतली. श्रीमती उनविन आणि लेडी ऑस्टेन यांच्या प्रोत्साहनानें कौपरनें बरीच काव्यरचना केली. ' दि हिस्टरी ऑफ जॉन गिल्पिन ' व ' टास्क ' हीं त्याचीं काव्यें प्रसिद्ध आहेत. त्यानें होमरच्या काव्याचें इंग्रजी भाषांतरहि केलें आहे. वर्णनात्मक काव्यरचना व सृष्टीशीं परिचय या गोष्टींत त्याचा हातखंडा असे. त्याचीं पत्रेंहि फार सुंदर आहेत.

**कौल**—भक्ताच्या प्रश्नाला देवाकडून उत्तर मिळविण्याची रीत. ही फार प्राचीन काळापासून आहे. ग्रीक लोकांत डोडोना येथें झ्यूसला आणि डेल्फी येथें अपोलो देवतेला कौल लावीत. बहुधा उपाध्यायांकडून देवाचें उत्तर कळे. ईजिप्तमध्येंहि हा प्रकार होता. आपल्याकडे देवाला कळे (फुलें), तांदूळ, सुपाऱ्या, इ. लावून निर्णय घेतात. अंगांत येणाऱ्या माणसालाहि प्रश्न विचारतात.

**कौल व कौलमक्ता**—जमिनीच्या मालकानें आपली जमीन कुळाला लागवडीस तहहयातीपर्यंत किंवा कांहीं ठराविक वर्षें मुदतीनें देण्याचा करार करतात, त्याला कौल, खंडचिठ्ठी किंवा कबुलायत म्हणतात. हा करार तीन वर्षें मुदतीचा असल्यास तो इंग्लंडांत तोंडी करार असला तरी चालतो, पण तीन वर्षांहून अधिक मुदत असल्यास सदर कराराचा रजिस्टर दस्त करावा लागतो. या करारांतील कांहीं शर्ती मोडल्यास करार रद्द करून जमीन ताब्यांत घेण्याचा हक्क जमीनदाराला पूर्वीं असे. परंतु हल्लीं तसा हक्क नाहीं. शर्त मोडल्यास जमीन-दारानें कुळाला कायदेशीर सूचना ( नोटीस ) देऊन त्यांत ( १ ) कोणती शर्त मोडली तिचें वर्णन, ( २ ) ती मोडलेली शर्त दुरुस्त करण्याचा उपाय, ( ३ ) शर्त मोडल्यामुळें झालेल्या नुकसानभरपाईची रक्कम मागणें, या गोष्टी लिहिल्या पाहिजेत. नोटीस दिल्यानंतर योग्य मुदत भरल्यावर सदर करार मालकाला रद्द करतां येतो. हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रांतांत यासंबंधीं निरनिराळे कायदे आहेत. ' जमीनदार व कुळें ' पहा.

**कौले, आब्राहाम** ( १६१८–१६६७ )— हा इंग्रज कवि असून त्यानें आपल्या वयाच्या १५ व्या वर्षी ' पोएटिकल ब्लॉसम्स ' हा काव्यसंग्रह प्रसिद्ध केला. त्याची कविता हल्लीं लोकप्रिय नाहीं. परंतु गद्यलेखक व निबंधकार म्हणून त्याला अद्यापहि मान आहे. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—लव्हज् रिड्ल् ( खेडेगांवी जीवनाचें सुखान्त नाटक ); डेव्हिडिज, ( धार्मिक महाकाव्य ); दि मिस्ट्रेस ( प्रेमगीतांचा संग्रह ); इत्यादि.

**कौवाली**—गाण्याचा एक प्रकार. कौवाली याचा मूळ अर्थ मुसलमानी भजन. अमीर खुश्रूनें हिंदु भजनाच्या धर्तीवर हें मुसलमानी भजन सुरू केलें. यांत तानांना पुष्कळ वाव असतो. कौवाली गाण्यांवर उपजीविका करणारे गवयी पुष्कळ होऊन गेले; त्यांना कौवाल म्हणत. कौवाल गायकीला ' कौवाल बाणी ' असें नांव आहे. या कौवाली बाणीचे ख्याल मध्य किंवा द्रुत लयींत असतात.

**कौशांबी**— प्राचीन वत्स देशाची राजधानी. येथें अशो-काचा शिलालेखस्तंभ आहे. उज्जनीच्या उत्तरेस हें प्राचीन शहर आहे. अलाहाबादेच्या उत्तरेस यमुना नदीच्या कांठीं कोसम खेडें आहे, तें प्राचीन कौशांबी होय व तेथील लोक आपल्या खेड्याला कौशांबीच म्हणतात. पुरुरव्याचा दहावा वंशज कुशांब यानें हें स्थापलें. अर्जुनाचा आठवा वंशज निमिचक्र ( हस्तिनापूर वाहून गेल्यामुळें ) येथें राहूं लागला. पांडववंशीय उदयन राजा याचेंच दुसरें नांव वत्सराज, यावरून याला वत्सपत्तनहि म्हणत. बौद्धग्रंथ महावंसो, ललितविस्तर, व इतर तिबेटी व सिंहली बौद्धग्रंथांत उदयनराजाचा उल्लेख आहे. उदयनानें केलेली बुद्धाची चंदनी मूर्ति येथील राजवाड्यांत ह्युएनत्संगाच्या वेळीं होती. येथें अकबराच्या वेळचा एक शिलालेख असून त्यांत यास कोशांबीनगर असें म्हटलेलें आहे.

**कौशीकानडा**— हा राग आसावरी थाटांतून निघतो. याचा आरोहावरोह सात स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण होय. वादी मध्यम व संवादी षड्ज आहे. गान-समय रात्रीचा तिसरा प्रहर मानितात. या रागांत मालकंस व कानडा हे राग मिसळलेले दिसतात. यांतील मध्यम आणि

धैवत या स्वरांची संगति फार मनोहर आहे. पंचम स्वरामुळें धनाश्री रागाचें अंग दिसतें; परंतु उत्तरांगांत मालकंस रूप स्पष्ट पुढें आल्यानें धनाश्रीचें अंग दूर होतें. हा एक कानड्याचा प्रकार आहे.

**कौशेयपट**—लेखनसाहित्यांत सुती कापडाप्रमाणेंच रेशमी कापड वापरण्यांत येई. अल्बेरुणीनें असें ऐकलें होतें कीं, काबूलच्या हिंदु राजांची वंशावली एका कौशेयपटावर शाईनें लिहिलेली नगरकोटच्या किल्लयांत आहे (अल्बेरुणीज इंडिया २·११). डॉ. बुल्हरनें जेसलमीरच्या ग्रंथसंग्रहालयांत जैनसूत्रांची सूचि एका रेशमाच्या पटावर लिहिलेली पाहिली होती. भारत इतिहास संशोधक मंडळांत रेशमी कापडावर (मुद्दाम विणलेल्या) लिहिलेल्या कांहीं पोथ्या आहेत. सोंवळ्यासाठीं अशा पोथ्या मोठ्या खर्चानें तयार करवून घेत.

**कौषीतकी ब्राह्मण**—ऋग्वेदाचें एक ब्राह्मण. याला शांखायन ब्राह्मण असें दुसरें नांव आहे. याचे तीस अध्याय आहेत. पहिल्या तीन अध्यायांत आग्नयाधान, अग्निहोत्र, दर्शपूर्णमास याग, असून चौथ्या अध्यायांत दाक्षायणयज्ञ, इळादधयज्ञ, सार्वसेनियज्ञ; शौनकयज्ञ, वसिष्ठयज्ञ, साकंप्रस्थयाग, तुरायणयज्ञ, इत्यादि काम्ययाग दिले असून नंतर आग्रयणयाग दिला आहे. पांचव्या अध्यायांत चातुर्मास्यें सांगितलीं असून सहाव्या अध्यायांत ब्रह्मा नामक ऋत्विजानें यागांत करावयाचें सर्व साधारण कर्म दिलें आहे. सातव्या अध्यायापासून पुढें सोमयागासंबंधीं वर्णन आहे. याची भाषा ऐतरेय ब्राह्मणाप्रमाणेंच बोजड, तुटक व संक्षित आहे. ऐतरेय ब्राह्मणाचा काल खि. पू. ६०० च्या पूर्वीचा ठरला आहे; व तोच या ब्राह्मणाचा असावा. ऐतरेयांत कांहीं पद्यमय गाथा आहेत, तशा यांत नाहींत. यांत कोणत्याहि महत्त्वाच्या प्रश्नाचें चांगलें समाधानकारक विवरण नाहीं, म्हणून तें मागें पडलें.

आरण्यक—कौषीतकी ब्राह्मणाला जोडलेलें हें आरण्यक. यांत १५ अध्याय आहेत. त्यांपैकीं तीन ते सहा असे चार अध्याय मिळून कौषीतकी उपनिषद् झालें आहे. तें बरेंच मोठें असून त्यांत अध्यात्म विषय आहे.

**कौसल्या**—या नांवाच्या अनेक पौराणिक स्त्रिया होऊन गेल्या. उदा., पुरूची बायको व जनमेजयाची आई, दशरथ राजाची बायको (व रामचंद्राची आई). धृतराष्ट्र व पंडु यांच्या आया ज्या काशी राजाच्या कन्या, त्यांनाहि हेंच नांव आहे.

**क्यांडी, मेजर टॉमस** (१८०२–१८७७)—मराठी लेखक-ग्रंथकार इंग्रज. हा इ. स. १८२२ त हिंदुस्थानांत आला व ईस्ट इंडिया कंपनींत अमलदार झाला. कॅप्टन मोलस्वर्थनें जो मराठी–इंग्रजी कोश तयार करण्यास घेतला होता त्या कामीं त्याला साहाय्य करूं लागला. पुढें मोलस्वर्थ विलायतेंत गेल्यामुळें इंग्रजी–मराठी कोश अपूर्ण राहिला होता, तो ह्यानें इ. स. १८४७ त हातीं घेऊन सात वर्षांत पूर्ण केला. इ. स. १८७३ त त्याची सुधारून वाढवलेली दुसरी आवृत्ति काढली. इ. स. १८५१–५७ मध्यें हा पूना कॉलेज (जें पुढें इ. स. १८६८ त डेक्कन कॉलेज झालें)चा प्रिन्सिपॉल होता. जुनीं मराठी क्रमिक पुस्तकें याच्याच हातचीं होत. इंडियन पिनलकोड आणि सिव्हिल प्रोसिजर कोड यांचें मराठी पहिलें भाषांतर यानेंच केलें. हा इ. स. १८७६ पर्यंत मराठी ट्रान्स्लेटर होता.

**क्युप, आल्बर्ट** (१६०५–१६९१)— हा डच चित्रकार असून त्यानें सृष्टीचे, गुरांचे, नद्यांचे देखावे रंगविण्यांत फार यश मिळवलें. मनुष्यांचींहि चित्रें तो उत्तम काढीत असे. *त्याचीं अत्यंत महत्त्वाचीं चित्रें इंग्लंडांत आहेत,* व तीं नॅशनल गॅलरी आणि वालेस कलेक्शन या संग्रहांत ठेवलेलीं आहेत.

**क्युबा**— वेस्ट इंडीज् बेटांतलें एक लोकसत्ताक राज्य. याचें क्षेत्रफळ ४१,६३४ चौ. मैल. हॅवाना हें मोठें शहर आणि मुख्य ठिकाण. या बेटाच्या अधिकारक्षेत्रांतच पाइन वगैरे जवळ जवळचीं लहान लहान बेटें येतात. त्यांचें निराळें क्षेत्रफळ २,५३० चौ. मैल आहे. याच्या पूर्वेस अटलांटिक व पश्चिमेस कॅरिबिअन समुद्र. अंतर्भाग बहुतेक डोंगराळ आहे. कांहीं बंदरें अतिशय चांगलीं आहेत. साखर, तंबाखू, फळें, यांची पैदास मोठी आहे. इमारती लांकूडहि पुष्कळ निघतें. लोखंडाची निपज होते व निर्यातहि होते. हॅवाना येथें १७२१ त स्थापन झालेलें विद्यापीठ आहे. १३८ रात्रीच्या शाळा आहेत व ६७ फिरते शिक्षक १४५ जमातींना शिकविण्यास आहेत. लो. सं. ४२,२७,५८७. यांपैकीं ३०,८३,८०५ गोरे लोक आहेत. १८९८ पर्यंत क्युबावर स्पेनची सत्ता होती; त्या सालीं तें स्वतंत्र झालें. परंतु १९०१ पावेतों बहुधा तें अमेरिकेच्या नजरेखालीं होतें. १९०१ सालीं नवीन घटना तयार होऊन लोकसत्ताक सरकार अस्तित्वांत आलें. १९०६ मध्यें कांहीं काळ बंडावा वगैरे झाल्यामुळें अमेरिकेला पुन्हां क्युबाच्या कारभारांत हात घालावा लागला होता. परंतु १९०९ मध्यें स्थिरस्थावर झाल्यावर क्युबा पूर्ववत् स्वतंत्र झाला.

**क्युरी, पेरी व मॅडम**— पेरी क्युरी हा फ्रेंच पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता (१८५९–१९०६) होता. याचें शिक्षण पॅरिस येथें झालें, व तेथेंच तो प्रोफेसर झाला. त्याची पत्नी मेरी स्कोडोस्का (१८६७–१९३४) वार्सा येथें जन्मली. ती उत्तम विदुषी होती, व दोघांनीं मिळून 'रेडियम' नांवाच्या

मूलद्रव्याचा शोध लावला. हेन्री बेक्केरल या शास्त्रज्ञानें १८९६ सालीं असें सिद्ध केलें कीं, 'युरेनियम' धातूपासून जे किरण विसर्जित होतात, त्यांपेक्षां जास्त तीव्र प्रतीचे किरण या धातूच्या अशोधित मृत्तिकेपासून विसर्जित होतात. यावरून क्यूरी पतिपत्नींनीं असें अनुमान बसविलें कीं, या अशोधित मृत्तिकेंत युरेनियम धातूपेक्षां एखादें जास्त तीव्रतर किरणविसर्जक द्रव्य असलें पाहिजे. म्हणून त्यांनीं पिचब्लेन्ड नांवाची कित्येक खंडी अशोधित मृत्तिका घेऊन तिचें परिश्रमपूर्वक युक्तीनें पृथक्करण करून त्यांतून पोलोनियम व रेडियम नांवाचीं दोन द्रव्यें १८९८ सालीं निराळीं काढलीं, व आणखी प्रयोग करून सिद्ध केलें कीं, रेडियमपासून पोलोनिअम तयार होतें. या शोधाबद्दल रॉयल सोसायटीनें क्यूरी पतिपत्नींना डेव्ही पदक १९०३ सालीं दिलें, व त्याच सालीं हेन्री बेक्केरल व क्यूरी पतिपत्नी यांना नोबेल पारितोषिक निम्मेनिम वांटून देण्यांत आलें.

**क्युरेषी**—ही एक पंजाबांतील जात आहे. लो. सं. सुमारें ७०,०००. महंमद पैगंबर हा क्युरेषी वंशांतील होता, म्हणून त्या वंशास मोठा मान दिला जातो. हिंदमध्यें ते मुख्यतः जालंदर, लाहोर रावळपिंडी, मुलतान व भावलपूर संस्थान यांत आढळतात. शेतकी हा त्याचा मुख्य धंदा आहे.

**क्युशु**—हें बेट जपानांत अगदीं दक्षिणेस आहे. क्षे. फ. १३,८७० चौ. मैल. याच्या शेजारीं १५० बेटें असून त्यांचें क्षेत्रफळ १८३३ चौ. मैल आहे. क्युशु बेट डोंगराळ असून त्यांत ज्वालामुखी आहे. येथें भात, गहूं व चहा होतो व तांबें, जस्त व दगडी कोळसा विपुल आहे. कुंभारकामाकरितांहि हें प्रसिद्ध आहे. येथें मुख्य बंदर नागासाकी हें आहे. क्युशु बादशाही विद्यापीठ फुकुओका येथें आहे.

**क्यैंगटन (संस्थान)**—ब्रह्मदेशांतील दक्षिण शान संस्थानांपैकीं हें सर्वांत मोठें संस्थान आहे. क्षे. फ. १२,४०० चौ. मैल व लो. सं. सु. अडीच लाख आहे. येथें शान, काव, अरब, मुहसो, इत्यादि डोंगराळ जाती राहतात. शान, कुन, अरब व लू या मुख्य चार भाषा आहेत. २३३८ खेडीं असून संस्थानचें सालीना उत्पन्न दोन लाख आहे. पूर्वी ३०,००० रु. ब्रिटिश सरकारला खंडणीबाबत द्यावे लागत. क्यैंगटन शहर संस्थानची राजधानी आहे. लो. सं. सुमारें दहा हजार आहे. संस्थानिकाला साबवा म्हणतात. तो येथें राहतो. येथें तांदूळ हें मुख्य पीक असून कापूस, चहा, तीळ, वगैरे पिकें होतात. बागा पुष्कळ असून निरनिराळ्या प्रकारचीं फळें होतात. या संस्थानचा बराचसा भाग डोंगराळ आहे व तेथें मोठालीं जंगलें आहेत.

**क्यौकपू**—दक्षिण ब्रह्मदेशांत हा जिल्हा आहे. क्षे. फ. ४,३८७ चौ. मैल. आराकानयोमा हा मुख्य पर्वत असून येथें महत्त्वाची नदी एकहि नाहीं. समुद्रकिनारा जंगल व झाडें यांनीं अतिशय सुंदर दिसतो. या जंगलांत वाघ, रानडुकरें, अस्वलें व हरणें विपुल आहेत. व पर्वतावर जंगली हत्ती पुष्कळ आहेत. किनाऱ्यानजीक चेदूब नांवाच्या बेटावर राखेचे ज्वालामुखी आहेत. १९०४ सालीं ज्वालामुखीचा एक मोठा स्फोट झाला; तो २५ मैल अंतरावर दिसत होता. येथें पेट्रोलियम, लोखंड व दगडी कोळसा हीं खनिज द्रव्यें सांपडतात. समुद्रापासून मीठ तयार करतात. मातीचीं भांडीं व चटया येथें तयार होतात. तांदूळ, इमारती साग, मीठ, मच्छी, चामडीं व शिंगें यांचे जिन्नस, वगैरे माल परदेशीं जातो. मुख्य गांव क्यौकपू. त्यांत ब्रह्मी, आराकानी, हिंदू, चिनी व मुसलमान आहेत.

**क्यौक्से**—उत्तर ब्रह्मदेशांतील एक जिल्हा. क्षे. फ. १२७४ चौ. मैल. व लो. सं. सुमारें दीड लाख. पैकीं शें. ९८ बौद्ध व बाकीचे मुसलमान, खिस्ती व हिंदू आहेत. येथील जमीन फार सुपीक व पाण्याचा पुरवठा भरपूर आहे. इरावती, म्यितंगे व पनलौंग या नद्या व शिवाय कालवे असल्यामुळें भाताचें पीक २-३ वेळां निघतें. डोंगराळ भागांत ओक व पाइन झाडें पुष्कळ आहेत. येथें जुनीं प्रसिद्ध देवालयें बरींच असून त्यांपैकीं क्यौक्से टेंकडीच्या पायथ्याशीं अशोक राजानें बांधलेलें देवालय आहे.

जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण क्यौक्से झावगी नदीच्या तीरावर मंडालेपासून २७ मैल आहे. लो. सं. ७,३००.

**क्रॅकौ**—पोलंड, जुन्या गॅलिशिया प्रांतांतील एक शहर. याची लो. सं. ३,५०,०००. या शहरांत पुष्कळ जुन्या व ऐतिहासिक इमारती नजरेस येतात. या शहरीं १३६४ सालीं स्थापलेलें एक मोठें विद्यापीठ आहे. या शहरीं शेतकीचीं आउतें, रासायनिक द्रव्यें, साबण, तंबाखू, वगैरे जिन्नस तयार होतात. येथें मुख्यत्वेंकरून इमारती लांकूड, मीठ, कापड, दारू व सर्व प्रकारचें शेतकी उत्पन्न यांचा बराच व्यापार चालतो.

**क्रुप**—हें जर्मन कुटुंब जर्मनींतील एसेन शहरांतील क्रुप कारखान्याचें संस्थापक व चालक म्हणून प्रसिद्ध आहे. या कुटुंबांतील प्रसिद्ध पुरुष फ्रेडरिक (१७८७–१८२६), आल्फ्रेड (१८१२–१८८७) व फ्रेडरिक आल्फ्रेड (१८५४–१९०२) हे आहेत. यांपैकीं फ्रेडरिक आल्फ्रेड याच्या मुलीनें डॉ. गुस्टाव्ह बरोबर १९०६ मध्यें विवाह केला. आणि डॉ. गुस्टॉव्ह या कारखान्यांचा मुख्य अधिकारी झाला. १९१२ मध्यें या कारखान्याला एक शतक पुरें झालें, त्या वेळीं क्रुप कारखान्याच्या वर्चस्वाखालीं पांचशें धातूच्या व दगडाच्या खाणी होत्या. आणि

एसेन येथील प्रचंड कारखान्याखेरीज इतर ठिकाणींहि बरेच कारखाने होते. एसेन येथील कारखान्यांत सत्तर हजार स्त्री-पुरुष कामावर होते. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं जर्मन सैन्याच्या दृष्टीनें या कारखान्याला मर्मस्थानासारखें महत्त्व आलें. कारण प्रशियन सैन्याला लागणारी युद्धाची यंत्रसामुग्री मिळण्याकरितां बहुतेक सर्वस्वीं या कारखान्यांत काम करणाऱ्या एक लक्ष वीस हजार कामकऱ्यांवर अवलंबून राहावें लागलें. १९१८ मध्यें जर्मनीचा पाडाव झाल्यानंतर या कारखान्यांची पुनर्रचना करण्यांत आली. आणि तेथें यंत्रसामुग्री, मोटारी आणि एंजिनें तयार होऊं लागलीं. गेल्या महायुद्धांतहि या कारखान्यांचा जर्मनीला अतिशय उपयोग झाला. पण आतां दोस्त राष्ट्रांनीं हे कारखाने उध्वस्त करून टाकले आहेत.

**क्रमपाठ**—वेदसंहिता पाठ करण्याचा हा एक प्रकार आहे. जटा, शिखा, घन, इ. आणखी प्रकार आहेत. या सर्वांचा हेतु वेदांतील एकहि अक्षर कमीजास्त होऊं नये व वेदांचें रक्षण जसेंच्या तसें व्हावें हा होता. क्रमपाठाचें उदाहरण असें:—

मूळ ऋचा—

पवस्व वाजसातये विप्रस्य गृणतो वृधे। सोम रास्व सुवीर्यम्।

क्रमपाठ—

पवस्व वाजसातये। वाजसातये विप्रस्य। वाजसातय इति वाजसातये। विप्रस्य गृणतः। गृणतो वृधे। वृध इति वृधे। सोम रास्व। रास्व सुवीर्यम्। सुवीर्यमिति सुवीर्यम्।

**क्रमवंत**—एक ब्राह्मणजात. या नांवाचें किरवंत असें अपभ्रष्ट रूप आहे. या ब्राह्मणांची वस्ती कुलाबा, रत्नागिरि व सावंतवाडी संस्थान यांतून आहे. यांच्यामध्यें उपाध्येपण, सावकारी व शेतकी असे तिन्ही धंदे करणारे आहेत. महाराष्ट्र भाषेचा कोश या नांवाचा पहिला मराठी-मराठी कोश रचणाऱ्यांमध्यें या जातीचे वे. शा. सं. जगन्नाथशास्त्री क्रमवंत होते ( १८२९ ).

**क्रॅस्नोयार्क**—हें सायबेरियांत शहर असून लो. सं. १,८९,९९९ आहे. येथें चामड्याचे कारखाने असून शेतीच्या क्षेत्रांतलें तें एक केंद्र आहे. याच्या आसपास सोनें गाळण्याचें काम केलें जातें.

**क्रॉन्जी, पिएट आर्नोल्ड्स्** ( १८३५-१९११ )—हा एक बोअर सेनाध्यक्ष असून त्यानें बोअर युद्धामध्यें बोअर लोकांनीं क्रूगर्स डॉर्प येथें जेव्हां मर्दुमकी गाजविली त्या वेळीं तो बोअर लोकांचा पुढारी होता. मेगर्सफॉन्टिन येथें त्यानें मेथूनचें सैन्य मागें हटवलें, परंतु पाडेंबर्ग येथें तो वेढला गेला आणि त्याला ४३०० लोकांसह शरण जावें लागलें ( १९०० ). पुढें त्याला कैदी म्हणून सेंट हेलेना येथें पाठविण्यांत आलें.

**क्रांतिवृत्त**—पृथ्वी सूर्याभोंवतीं १ वर्षांत प्रदक्षिणा करते. खगोलावर ज्या महावृत्तावरून ही फेरी होते त्यास क्रांतिवृत्त म्हणतात. सूर्य ह्या क्रांतिवृत्तावरून पश्चिमेकडून पूर्वेकडे जात आहे असा भासतो. चंद्रग्रहणें व सूर्यग्रहणें ( एक्लिप्सेस ) ह्या वृत्ताजवळ घडतात, म्हणून ग्रीक लोक ह्या वृत्तास 'एक्लिप्टिक' म्हणूं लागले. ह्याचे बरोबर १२ भाग करून प्रत्येक भागास राशि म्हणतात. मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या तूळ, वृश्चिक, धनु, मकर, कुंभ व मीन, ह्या आकृतींनीं ह्या राशी ओळखतात.

**क्रॉम्पटन, सॅम्युएल** ( १७५३-१८२७ )— हा इंग्रज 'म्यूलजेनी'चा आद्य निर्माता. तो २१ वर्षांचा असतांनाच त्यानें कापूस पिंजण्याचें जें यंत्र शोधून काढलें, त्याला म्यूल ( खेचर ) म्हणतात; कारण त्यांत हारग्रीव्हच्या स्पिनिंग-जेनीचें तत्त्व व आर्कराइटच्या रोलर फ्रेमचें तत्त्व हीं दोन्ही एकत्र उपयोगांत आणलीं होतीं. त्याच्या म्यूल-जेनीच्या शोधाबद्दल त्याला पार्लमेंटनें १८१२ मध्यें ५,००० पौंड देणगी मंजूर केली. ब्रिटिश कापड-गिरणीच्या धंद्यांतला येवढा महत्त्वाचा आवश्यक शोध लावल्याबद्दल क्रॉम्पटनला येवढाच मोबदला मिळाला.

**क्रॉम्वेल, ऑलिव्हर** ( १५९९-१६५८ )— एक इंग्रज सेनापति व राजकारणी पुरुष. याचें शिक्षण केंब्रिज येथें झालें; व इ. स. १६२८ त हंटिंग्टन या त्याच्या गांवाकडून पार्लमेंटांत निवडून आला. पुढें तो केंब्रिजतर्फे निवडून येत असे. त्यानें आपल्या भागांतील सैनिकांची एक खंबीर

( आयर्न साइड ) तुकडी तयार करून तिचा तो नेता बनला व पार्लमेंटच्या बाजूनें सरकारी सैन्याशीं त्यानें लढाया दिल्या व बरेच विजय मिळविले. त्यानेंच पहिल्या चार्लस राजाच्या फांशीच्या हुकुमावर सही केली.

नंतर त्याला आयर्लंडमधील बंड मोडावें लागलें. दुसऱ्या चार्लसला पराभूत करून त्यानें 'लॉंग पार्लमेंट' बरखास्त करून टाकलें. याप्रमाणें त्याचा पराक्रम पाहून लोकांनीं १६५३ त त्याला 'लॉर्ड प्रोटेक्टर' म्हणजे देशोद्धारक बनविलें व सर्व सत्ता त्याच्या हातीं दिली. तो हयात होता तोंपर्यंत इंग्लंडच्या शत्रूंना मोठा वचक असे. त्याला प्रजेनें राजमुकुट अर्पण केलेला त्यानें स्वीकारला नाहीं. तो जसा पराक्रमी तसाच राजकारणीहि होता. तो अगदीं साधा राहत असे. त्याची धडाडी विलक्षण असे. त्यानें आपल्या मागें आपल्या मुलाला ( रिचर्डला ) गादी

दिली, पण ती त्याला टिकवितां आली नाहीं. तेव्हां पुन्हां राजसत्ता देशांत सुरू झाली.

**क्रासुलासी**—ही बहुपर्णपुष्पी द्विदल वनस्पतींची एक जाति आहे. हीं झाडें गरदार असून समशीतोष्ण प्रदेशांत, उष्ण, कोरड्या व उघड्या जागेंत उगवतात. पण बहुधा दक्षिण आफ्रिकेंत हीं फार आढळतात. यांच्या बऱ्याच जाती बागेमध्यें वनस्पति-गृहांत लावतात. इंग्लंडमध्यें याच्या बारा जाती आढळतात.

**क्रॉन्स्टाट**—रशियांतील एक उत्तम तटबंदीचें बंदर व शहर. हें उत्तर समुद्रांतील आरमाराचें मुख्य ठिकाण असून रशियाच्या आरमारखात्याचेंहि मुख्य ठिकाण आहे. येथील लो. सं. सुमारें ६० हजार आहे. क्रॉन्स्टाट हें १७१० मध्यें पीटर दि ग्रेटनें वसविलें. त्यानें कोटलिन बेट स्वीडनपासून १७०३ मध्यें घेतलें.

**क्रिकेट**—हा विदेशी खेळ जगांत सर्वत्र फार मान्यता पावला आहे. इंग्लंडांत हा उन्हाळी खेळ म्हणून प्रिय आहे, तर आपल्याकडे पावसाळ्याअखेर याला सुरुवात होते! अकरा गड्यांच्या दोन पक्षांत सामना होतो. प्रत्येक पक्ष दोनदां खेळतो व त्यांतील एकवट गुणांवरून जयापजय ठरवितात. समोरासमोर २२ यार्ड अंतरावर तीन तीन काठ्यांची वेसकट (विकेट) ठोकतात. या वेसकटाच्या काठ्या (स्टंप) २७ इंच उंच व ८ इंच रुंद असतात. प्रत्येक वेसकटाचें रक्षण एकेक फळीधर (बॅट्समन) करतो. या फळीधरांना बाद करण्याचें काम दुसऱ्या पक्षांतील अकरा जण करतात. त्यांतील एक। वेसकटाकडे चेंडू टाकतो. हा चेंडू तिला लागू नये म्हणून आपल्या फळीनें फळीधर मारतो. व तो लांब गेल्यास दुसऱ्या वेसकटाकडे धांवतो. शिवाय एका वेसकटाकडून दुसरीकडे फळीधर पोंचला म्हणजे एक धांव धरतात. मैदानाच्या मर्यादेपलीकडे गेल्यास न पळतां ठराविक धांवा त्याला मिळतात. चेंडू वेसकटला लागला, झेलला गेला किंवा गडी वेसकटाजवळ पोंचण्यापूर्वी कोणीं चेंडू तीवर मारला तर फळीधर बाद होतो. त्याच्या पायाला फेंकलेला चेंडू लागला तरी तो मरतो. प्रत्येक चेंडूवाला सहा वेळां चेंडू फेंकतो. व नंतर समोरच्या वेसकटाजवळील आपल्या एका गड्याला तो देतो. याप्रमाणें सहा चेंडू टाकून झाले म्हणजे एक फेरी (ओव्हर) होते.

क्रिकेटची फळी (बॅट) विलो वृक्षाची असते. चेंडूचा घेर सुमारें नऊ इंच असतो व वजन ५॥ औंस असतें. तो बूच आणि दोरा घालून चामड्यानें मढविलेला असतो.

जगांतील मध्यवर्ती क्रिकेट संस्था म्हणजे लंडन येथील मेलबोर्न क्रिकेट क्लब (एम्. सी. सी.) होय. इंग्लंड आणि ऑस्ट्रेलिया यांमध्यें दर दोन-तीन वर्षांनीं कसोटीचे सामने होतात. हिंदुस्थानांत क्रिकेट खेळाची व्यवस्था पाहणारी 'बोर्ड ऑफ कन्ट्रोल' नांवाची संस्था आहे. मुंबईस हिंदु, पारशी, मुसलमान, युरोपियन व इतर अशा पांच धर्मसंघांमध्यें सामने होत असत. प्रसिद्ध क्रिकेटपटु रणजितसिंह यांच्या स्मरणार्थ एक 'रणजित ट्रॉफी' म्हणून बक्षीस ठेवलें आहे. त्यासाठींहि सामने होतात. देवधर, विजय मर्चंट, हजारे, इ. आजचे हिंदी क्रिकेटपटू सर्वश्रुतच आहेत.

**क्रिप्स, सर स्टॅफोर्ड** (१८८९— )—ब्रिटिश समाजसत्तावादी पक्षाचा राजकारणी पुरुष व मंत्री. हा लॉर्ड पारमूर याचा सर्वांत धाकटा मुलगा. याचें शिक्षण विंचेस्टर आणि लंडन येथील युनिव्हर्सिटी कॉलेजमध्यें झालें. त्यानें कायद्याचा अभ्यास करून १९१३ सालीं वकिलीची सनद घेतली. पहिल्या महायुद्धामध्यें (१९१४–१९१८) त्यानें प्रथम फ्रान्समध्यें ब्रिटिश रेड क्रॉस संस्थेंत काम केलें. आणि नंतर एका स्फोटक शस्त्रांच्या कारखान्यांत काम केलें. सदर महायुद्धानंतर त्यानें वकिली सुरू केली आणि १९२७ सालीं त्याला किंग्ज कौन्सल (सरकारी वकील) नेमण्यांत आलें. १९२० सालानंतर तो मजूर पक्षांत सामील झाला. आणि १९३१ सालीं तो पार्लमेंटमध्यें मजूर पक्षातर्फे समासद निवडून आला. मॅक्डोनल्डच्या प्रधानमंडळानें त्याला सॉलिसिटर जनरल नेमलें. मजूर पक्षांतील डाव्या अंगच्या गटांतील तो एक प्रमुख पुढारी असून त्यानें कम्यूनिस्ट पक्षाबरोबर सहकार्य करण्याच्या धोरणाचा पुरस्कार केला, परंतु १९३७ सालच्या हिंवाळ्यांत भरलेल्या मजूर पक्षाच्य

परिषदेनें क्रिप्सची ही सूचना मान्य केली नाहीं. म्हणून सर स्टॅफोर्ड यानें आपल्या या धोरणाचा पुरस्कार करण्याचें राहित केलें आणि त्याला मजूर पक्षाच्या कार्यकारी मंडळाचा समासद नेमण्यांत आलें. १९३७ सालींच त्यानें मजूर पक्ष, लिबरल पक्ष, कम्युनिस्ट पक्ष आणि कॉन्झरव्हेटिव्ह पक्ष यांतील जे फुटीर वृत्तीचे सभासद, त्या सर्वांचा एक संयुक्त पक्ष बनवावा, असा प्रचार सुरू केला; पण मजूर पक्षानें ही त्याची सूचनाहि फेंटाळून लावली, आणि १९३९ च्या एप्रिल महिन्यांत साउथ पोर्ट येथें भरलेल्या मजूर पक्षाच्या परिषदेनें सर स्टॅफोर्डला व त्याच्या कांहीं अनुयायांना या पक्षांतून काढून टाकलें; त्यामुळें सर स्टॅफोर्ड यानें वरील योजनेचा प्रचार करण्याचें राहित केलें आणि स्वतःला आपल्या अनुयायांसह पुन्हां मजूर पक्षांत सामील करण्यांत यावें, अशी विनंति केली. १९४० च्या जून महिन्यांत मॉस्को येथील ब्रिटिश वकील म्हणून सर स्टॅफोर्डची नेमणूक करण्यांत आली. यानें १९४२ सालीं हिंदुस्थानांत येऊन भावी राज्यघटनेच्या योजनेबद्दल हिंदी पुढाऱ्यांशीं विचारविनिमय केला. पुढें मजूर पक्षांत यांना घेऊन मंत्रिपद देण्यांत आलें. सध्यां ते फडणीस खात्याचे प्रमुख आहेत.

**क्रीट**—हें बेट भूमध्य समुद्रांत ग्रीस देशानजीक आहे. क्षे. फ. ३,३३० चौ. मैल व लो. सं. ३,४१,६८७; पैकीं बहुतेक खिस्ती व थोडे मुसलमान आहेत. हे सर्व लोक मूळचे ग्रीक असून ग्रीक भाषा बोलतात. येथें संत्रीं व लिंबें हीं फळें व तंबाखू, कापूस, वगैरे पिकें होतात. लोखंड, शिसें, मँगॅनीझ व गंधक हीं खनिज द्रव्यें सांपडतात. येथें साबणाचे कारखाने बरेच आहेत. हें बेट प्राचीन काळापासून महत्त्वाचें असून बरींच शतकें रोमन साम्राज्यांत होतें. ९ व्या शतकानंतर ग्रीसच्या ताब्यांत व १७१८ सालीं तुर्कांच्या ताब्यांत गेलें. तुर्क सरकारनें खिस्ती प्रजेवर जुलूम केल्यामुळें येथें खिस्ती लोकांचीं बंडें होऊं लागलीं. तीं अनेक वर्षे चालून १८९७ च्या सुमारास ग्रीसनें खिस्ती बंडवाल्यांना लष्करी मदत केली. अखेर ग्रीस व तुर्कस्तान यांच्यांत समेट झाला व १९१३ सालीं क्रीट बेट कायमचें ग्रीसच्या ताब्यांत गेलें.

**क्रूकशँक, जॉर्ज** (१७९२–१८७८)—हा होगार्थनंतर व्यंगचित्रें काढणारा सर्वोत्कृष्ट इंग्रज होता. त्यानें 'दि स्कर्ज' मध्यें १८११ पासून नियमितपणें राजकीय व्यंगचित्रें देण्यास सुरुवात केली. १८२१ पासून पुढें त्यानें लोकप्रिय पुस्तकां-करितां चित्रें काढून दिलीं. १८३७ पासून त्यानें बेंटलेच्या 'मिसेलेनी'मध्यें डिकन्सचें ऑलिव्हर ट्विस्ट; एन्स्वर्थचें 'जॅक शेपर्ड'; आणि 'विंडसर कॅसल' व 'दि टॉवर ऑफ लंडन' यांसंबंधीं धातूंच्या पत्र्यावर कोरलेलीं चित्रें काढून दिलीं. पुढें त्यानें मितमद्यपान (टेंपरन्स) चळवळीच्या पुरस्कारार्थ 'दि बॉटल' हा अत्यंत परिणामकारक व लोकप्रिय चित्रसंग्रह तयार केला. पण पुढें या टेंपरन्स चळवळीशीं संबंध ठेवल्यामुळें आणि ऑलिव्हर ट्विस्ट या कादंबरीची मूळ कल्पना आपली स्वतःची आहे, असें मूर्खपणें प्रतिपादन केल्यामुळें क्रूकशँकची लोकप्रियता कमी झाली.

**क्रूक्स, सर विल्यम** (१८३२–१९१९)—एक इंग्रज रसायनशास्त्रज्ञ व पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. प्रथम कांहीं काळ रसायनशास्त्राचा प्रोफेसर म्हणून काम केल्यानंतर १८५९ मध्यें 'केमिकल न्यूज' हें नियतकालिक त्यानें सुरू केलें. त्याला १८६३ मध्यें रॉयल सोसायटीचा फेलो निवडण्यांत आलें, १८९७ मध्यें त्याला नाइट ही सरदारी पदवी मिळाली, व पुढील वर्षी तो ब्रिटिश असोसिएशनचा अध्यक्ष झाला. त्यानें पदार्थविज्ञानशास्त्रांत अणुविषयक (Molecular) फार महत्त्वाचें संशोधन केलें असून कॅथोड किरणाचा शोध लाव-णाऱ्यांपैकीं तो एक आद्य संशोधक होय. तो अध्यात्मवादी (सिरिच्युॲलिस्ट) होता. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते म्हणजे 'दि हँडबुक ऑफ डायिंग अँड कॅलिको प्रिंटिंग'; 'रीसर्चेस इन् मॉडर्न सिरिच्युॲलिझम'; आणि 'सायकिक् फोर्स अँड मॉडर्न सिरिच्युॲलिझम' हे होत.

**क्रूगर, स्टेफॅनस जोहॅनस पॉल** (१८२५–१९०४)—ट्रान्सव्हाल लोकराज्याचा एक अध्यक्ष. क्रूगर घराणें मूळ जर्मन असून डच ईस्ट इंडिया कंपनीच्या मदतीनें १७१३ सालीं तें केप कॉलनींत राहण्यास गेलें, व १८४० च्या सुमारास ऑरेंजच्या उत्तरेकडील प्रदेशांत राहूं लागलें. क्रूगरला शिक्षणापेक्षां शिकारी व लढाया यांची आवड जास्त असल्यामुळें १४ व्या वर्षीच तो सैन्यांत शिरला व २७ व्या वर्षी कमांडर झाला. ट्रान्सव्हाल हा बोअर लोकांचा प्रांत स्वतंत्र करण्याकरितां बोअर लोकांनीं क्रूगरला बोअर सैन्याचा कमांडर जनरल नेमलें. बोअर लोक व ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें १८४० पासून १८८३ पर्यंत लढा चालू होता आणि या सालीं ट्रान्सव्हालचा राज्यकारभार पूर्णपणें बोअर लोकांच्या हातीं आला. या प्रांताचा अध्यक्ष म्हणून क्रूगर १८८३, १८८८, १८९३ व १८९८ या सालीं म्हणजे एकंदर ४ वेळां निवडून आला. क्रूगरनें ट्रान्सव्हालची सरहद्द वाढवण्याचा व ब्रिटिश मुलूख आपल्या राज्यांत सामील करण्याचा सतत क्रम चालवला त्याबद्दल ब्रिटिश सरकारनें तक्रारी केल्या व अखेर १८९९ सालीं त्यांच्यामध्यें युद्ध सुरू झालें. पण क्रूगर वृद्धपणामुळें रणांगणांत जाण्यास असमर्थ असल्यामुळें तो युरोपांत इतर राष्ट्रांची मदत मागण्यास गेला, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. म्हणून तो

युरोपांतच यूट्रेच येथें मरेपर्यंत राहिला. त्याचें शव प्रिटोरियांतच पुरण्यांत आलें व त्या शहरांत त्याचा पुतळा आहे.

**क्रूस**— एका उभ्या सरळ लांकडाच्या तुकड्यावर आडवा तुकडा ठेवला म्हणजे होणारें चिन्ह. स्वस्तिक हें चिन्हहि याचाच एक प्रकार समजतात. मनुष्याच्या प्राथमिक अवस्थेंत अशीं चिन्हें नक्षीसाठीं किंवा धार्मिक किंवा मांत्रिक कर्मांत वापरीत. अशा तऱ्हेची झाडावर किंवा खांबावर रचना करून गुन्हेगाराला पूर्वी फांशीं देत. येशू ख्रिस्ताला अशा क्रूसवर फांशीं दिल्यामुळें क्रूसला एवढें महत्त्व आलें. क्रूसच्या आडव्या–उभ्या पट्ट्यांच्या लांबीवरून आणि बसविण्याच्या स्थानांवरून ग्रीक, लॅटिन, सेंट अँड्र्यूज, केल्टिक, इ. निराळीं नांवें पडलीं आहेत. युद्धांत ' रेड क्रॉस ' चें विशिष्ट महत्त्व आहे. विजयी वीरांना द्यावयाचीं पदकें व्हिक्टोरिया क्रॉस, जॉर्ज क्रास, इ. क्रूस आकाराचीं करतात.

**क्रूस धर्मयुद्धें**—येशू ख्रिस्ताची जन्मभूमि जी पॅलेस्टाइन ती ख्रिस्ती धर्माच्या लोकांचें पवित्र क्षेत्र म्हणून प्राचीन काळापासून मानली जाते. मुसलमानी धर्माच्या त्याच प्रदेशांतील प्रादुर्भावानंतर पॅलेस्टाइनवर मुसलमानी राजांचें वर्चस्व झालें व ख्रिस्ती लोकांचा फार छळ होऊं लागला ; तेव्हां पश्चिम युरोपांतील ख्रिस्ती राष्ट्रांनीं पॅलेस्टाइन आपल्या ताब्यांत घेण्यासाठीं ज्या सातआठ स्वाऱ्या अकराव्या शतकाच्या अखेरीपासून पुढें सुमारें दोनशें वर्षें अधून मधून केल्या त्यांना ' क्रूसेड्स ' किंवा क्रूस धर्मयुद्धें म्हणतात. पहिल्या युद्धांत ( इ. स. १०९६–९९ ) येरुशलेम येथें ख्रिस्ती राज्य स्थापण्यांत आलें. तिसऱ्या युद्धांत इंग्लंडच्या पहिल्या रिचर्ड राजानें पराक्रम गाजवून एकर किल्ला घेतला, पण क्रूसेडर मंडळींतच यादवी उत्पन्न होऊन रिचर्डला सलादीन या तुर्की राजाबरोबर तह करावा लागला. ख्रिस्ती यात्रेकरूंना येशू ख्रिस्ताच्या मंदिराचें दर्शन घेण्यास अडचण होऊं नये व टायर ते जाफापर्यंतचा समुद्रकिनारा क्रूसेडरांकडे राहावा असें ठरलें. चौथ्या युद्धांत कॉन्स्टंटिनोपलमध्यें लॅटिन साम्राज्य झालें ( १२०४ ). सहाव्यांत जर्मनीच्या दुसऱ्या फ्रेडरिकनें स्वतःस येरुशलेम येथें राज्याभिषेक करून घेतला ; पण पुढें फ्रान्सच्या नवव्या लुई राजाच्या दोन मोहिमा अजीबात फसून क्रूसेडरनीं घेतलेले इतक्या काळांतील सर्व परिश्रम फुकट गेले.

**क्रेक, जॉर्ज लिली** ( १७९८–१८६६ )—हा मोठा इंग्रज पंडित असून त्याचे पुढील ग्रंथ आहेत :– ( १ ) ' परसूट ऑफ नॉलेज अंडर डिफिकल्टीज ' ( अडचणींतील विद्याव्यासंग ), ( २ ) ' स्पेन्सर अँन्ड हिज पोएट्री ' ( स्पेन्सर आणि त्याचें काव्य ), ( ३ ) ' हिस्टरी ऑफ इंग्लिश लिटरेचर अँन्ड दि इंग्लिश लँग्वेज ' ( इंग्रजी भाषा आणि वाङ्मय यांचा इतिहास ), ( ४ ) इंग्लिश ऑफ शेक्सपिअर ' ( शेक्सपिअरचें इंग्रजी ), ( ५ ) ' बेकन, हिज राइटिंग्ज अँन्ड फिलासॉफी ' ( बेकन, त्याचे लेख आणि तत्त्वज्ञान ).

श्रीमती क्रेक ही कादंबरी-लेखिका असून आरंभीं ती लहान मुलांसाठीं गोष्टी लिहीत असे. तिची पहिली कादंबरी ' आजिल्व्हीज ' १८४५ मध्यें सालीं प्रसिद्ध झाली. तिचे इतर निबंध व लेखहि प्रसिद्ध झाले आहेत. ती १८८७ सालीं वारली.

**क्रेग, सर जेम्स** ( १८७१– )—हा एक आयरिश मुत्सद्दी असून यानें साउथ आफ्रिकन युद्धामध्यें भाग घेतला होता. तो १९०६ मध्यें पार्लमेंटमध्यें शिरला. त्यानें पार्लमेंटरी सेक्रेटरी म्हणून २३ वर्षें काम केलें आणि तारीख ७ जून १९२१ रोजीं तो उत्तर आयर्लंडचा पहिला पंतप्रधान झाला.

**क्रेन, वॉल्टर** ( १८४५—१९१५ )—एक इंग्रज चित्रकार व लेखक. त्याचीं मुख्य चित्रें :—( १ ) रेनॅसन्स ऑफ व्हीनस, ( २ ) फेट ऑफ परसीफोनी, ( ३ ) युरोप, ( ४ ) दि ब्रिज ऑफ लाइफ, ( ५ ) इंग्लंड्स एम्ब्लेम, ( ६ ) दि रेनबो अँन्ड दि वेव्ह, ( ७ ) ब्रिटानियाज व्हिजन, ( ८ ) दि वर्ल्ड्स कॉंकरर्स ( जगज्जेते ) हीं आहेत. ' दि सायरेन थ्री ' हें त्यानें लिहिलेलें काव्य व त्यांत त्यानें स्वतः काढलेलीं चित्रें प्रसिद्ध आहेत. त्यानें समाजवादी चळवळीला लेखक आणि व्याख्याता अशा दोन्ही रीतींनीं मदत केली.

**क्रेप**—या कापडामध्यें कुरळेपणा व चुणीदार पृष्ठभाग विशेषत्वानें असतो. अशा कापडांत आधीं सूत इतकें पिळलेलें असतें कीं, विणल्यावरहि तें कधीं सरळ राहत नाहीं. कापूस, रेशीम व लोंकर यांचेंहि क्रेप कापड करतात. काळें रेशमी क्रेप ख्रिस्ती लोक सुतकांत वापरतात. कापसाच्या क्रेप कपड्याला इस्तरी करीत नाहींत.

**क्रेसी, सर एडवर्ड शेपर्ड** ( १८१२–१८७८ )— हा इंग्रज इतिहासकार १८४० मध्यें लंडन विद्यापीठांत इतिहासाचा प्रोफेसर नेमला गेला. आणि १८६० मध्यें सीलोनमध्यें मुख्य न्यायाधीश झाला. याचे मुख्य ग्रंथ—( १ ) ' दि राइझ अँन्ड प्रोग्रेस ऑफ दि ब्रिटिश कॉन्स्टिटयूशन ' ( ब्रिटिश राज्यपद्धतीचा उदय आणि वाढ ), ( २ ) ' दि फिफ्टीन डिसीसिव्ह बॅटल्स ऑफ दि वर्ल्ड ' (जगांतील पंधरा परिणामकारक लढाया) हे आहेत.

**क्रोचे, बेनेडेट्टो** ( १८६६– )—हा इटालिअन तत्त्ववेत्ता आणि टीकाकार असून त्याचे मुख्य ग्रंथ—( १ ) ' ॲस्थेटिक ॲज सायन्स ऑफ एक्सप्रेशन अँन्ड जनरल लिंग्विस्टिक' ( आविष्काराचें शास्त्र म्हणजे सौंदर्यशास्त्र व सामान्य भाषाशास्त्र ),

(२) 'व्हॉट् इज् लिव्हिंग अॅन्ड व्हॉट इज डेड ऑफ दि फिलॉसॉफी ऑफ हेगेल' (हेगेलच्या तत्त्वज्ञानाचें काय मृत व काय उरलें आहे), (३) 'हिस्टॉरिकल मटेरिअॅलिझम अॅन्ड दि एकॉनॉमिक्स ऑफ कार्ल मार्क्स' (ऐतिहासिक भौतिकवाद व कार्ल मार्क्सचें अर्थशास्त्र).

**क्रोपाटकिन** (१८४२–१९२१)—हा रशियन भूगोल-शास्त्रवेत्ता, ग्रंथकार व क्रांतिकारक पुढारी मॉस्को येथें सरदार घराण्यांत जन्मला. त्यानें लष्करी शिक्षण घेतलें व फ्रेंच वाङ्मयाचा विशेष अभ्यास केला. रशियाच्या गरीब शेतकरी-वर्गाबद्दल त्याला वाईट वाटे, म्हणून त्यानें शेतकऱ्यांच्या हिता-कडे शेवटपर्यंत लक्ष दिलें. १८६९ सालीं त्यानें कोसाक स्वारांच्या तुकडींत आपलें नांव दाखल केलें. पण १८६७ सालीं राजीनामा देऊन सेंट पीटर्सबर्ग येथील विद्यापीठांत काम करूं लागला. त्यानें फिन्लंड, स्वीडन व मांचूरिया येथें पुष्कळ संशोधनकार्य केलें व विद्वत्तापूर्ण निबंध लिहिले. १८७२ पासून त्यानें रशियन शेतकरी–मजूर–वर्गांतर्फे जहाल मतांचा प्रसार सुरू केला. त्यामुळें रशियन सरकारनें त्याला तुरुंगांत टाकलें. १८७६ सालीं तेथून सुटून तो स्वित्झर्लंड, फ्रान्स व अखेर इंग्लंडमध्यें आश्रयार्थ जाऊन राहिला. त्यानें ब्रिटिश एन्-सायक्लोपिडियामध्यें रशियासंबंधीं बरेच लेख लिहिले. शिवाय 'फील्ड्स, फॅक्टरीज अॅन्ड वर्कशॉप्स' (शेतें, गिरण्या व कारखाने), 'मॉडर्न सायन्स अॅन्ड अनार्किझम' (अर्वाचीन शास्त्र आणि अराजकता), 'रशियन लिटरेचर' (रशियन वाङ्मय), इत्यादि पुष्कळ ग्रंथ लिहिले. १९१७ सालीं रशियन राज्यक्रांति झाल्यावर तो रशियांत परत येऊन राहिला. बोल्शेव्हिक अमलाविरुद्ध तो टीका करी त्यामुळें त्याचे अखेरचे दिवस वाईट स्थितींत गेले.

**क्रोल, जेम्स** (१८२१–१८९०)—एक स्कॉटिश भूगर्भ-शास्त्रज्ञ. यानें पुढील ग्रंथ लिहिले आहेत। (१) 'दि फिलॉसफी ऑफ थिइझम' (ईश्वरवादाचें तत्त्वज्ञान), (२) 'क्लायमेट अॅन्ड टाइम इन् देअर जिऑलॉजिकल रिलेशन्स' (भूशास्त्राच्या भाषेंत काल आणि हवामान), (३) 'डिस्कशन्स ऑन क्लायमेट अॅन्ड कॉसमॉलजी' (हवामान आणि विश्वोत्पत्ति यांसंबंधीं चर्चा), (४) 'स्टेलर एव्होल्युशन' (तारकाविकास), (५) 'दि फिलॉसफिकल बेसिस ऑफ एव्होल्युशन' (विकासा-ची तत्त्वज्ञानी भूमिका).

**क्रौंच**— १. (इं. हेरॉन). याची चोंच लांब असून तीस डोळयांच्या खालच्या बाजूस भेग असते. याचें शरीर घट्ट असतें. पाय बारीक व लांब असतात आणि पंख वेताचे असतात. याची लांबी सामान्यतः तीन फूट असते. हे पक्षी उंच झाडांवर घरटें करून राहतात. हे फार खादाड असतात. हे पाणथळ जागा, ओढे, डबकीं, तळीं, वगैरे ठिकाणीं व समुद्रकिनाऱ्यावर आढ-ळतात. लोक ससाण्यांकडून शिकार करीत तेव्हां ते बहुधा या क्रौंच पक्षांस फार पकडीत. अमेरिकेमध्यें यांची एक निळी व युरोपांत पांढरी जात आढळते.

२. ज्याला इंग्रजींत 'अॅड्ज्यूटंट बर्ड' म्हणतात तो बगळ्याच्या जातीचा प्राणी हिंदुस्थानांत आढळतो. हा पांच फूट उंच असून याची चोंच बरीच लांब असते व मानेच्या खालीं एक पिशवी लोंबत असते. हा फार अधाशी व मांसाहारी पक्षी आहे. इंग्लंडांत याची शिकार करण्यास मनाई आहे.

**क्रौंच द्वीप**—हिंदी पुराणांप्रमाणें पृथ्वीच्या सप्तमहाद्वीपांतील पांचवें. हें घृतोदाच्यापलीकडे असून याचा विस्तार अथवा रुंदी सोळा लक्ष योजनें आहे, व यास तितक्याच रुंदीच्या क्षीर समुद्राचें वेष्टण आहे.

**क्लॅपरॉथ, हीनरिश ज्यूलिअस** (१७८३–१८३५)—एक जर्मन प्राच्यविद्यापंडित व प्रवासी. यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले, त्यांत—'डिस्क्रिप्शन ऑफ दि ईस्टर्न कॅकेशस' (पूर्व कॅकेशसचें वर्णन), 'आशिया पॉलिग्लोटा', आणि 'कलेक्शन्स ऑफ ईजिप्शियन ॲटिक्विटीज' (ईजिप्तमधील पुराणवस्तूंचा संग्रह), हे महत्त्वाचे आहेत.

**क्लब**—(क्रीडामंडळ). खेळण्यासाठीं, गप्पा मारण्यासाठीं किंवा कांहीं अन्य कारणांसाठीं मंडळी जेथें एकत्र जमतात त्या मंडळाला क्लब असें पाश्चात्य नांव आहे. क्लबची पद्धतिहि पाश्चात्यच आहे. प्राचीन काळीं ग्रीस–रोममध्यें अशीं मंडळें असत. इंग्लंडांत १८ व्या शतकाच्या उत्तरार्धांत 'लिटररी क्लब' नांवाचा प्रख्यात साहित्यिकांचा मेळावा भरे. त्यांत डॉ. जॉन्सन, बर्क, गोल्डस्मिथ, गिबन, इ. मोठमोठे विद्वान् असत. आजहि लंडनमध्यें या तऱ्हेचे सुमारें दोनशें क्लब आहेत. कॉर्लटन आणि रिफॉर्म क्लब हे राजकीय व ब्रूक्स आणि व्हाइट्स सारखे सामाजिक आहेत. अथेनियम क्लबांत विद्यापीठांतली मंडळी जमतात. बायकांचेहि क्लब आहेतच. कांहीं क्लबांतून सभासदांना सवलतीनें तेथल्या जिनसा मिळतात. आपल्याकडे नुसते खेळण्यासाठींच क्लब आहेत. तसे तिकडे पण आहेत. हिंदुस्थानांत युरोपियन आणि अँग्लो-इंडियन लोकांनीं काढलेले सुमारें ५० क्लब आहेत. फक्त संध्याकाळीं खेळण्यासाठीं सभासद जमतात असे हिंदी लोकांचे क्लब बहुतेक शहरांतून आहेत.

**क्लाइव्ह, रॉबर्ट** (१७२५–१७७४)—एक इंग्रज सेनापति व ब्रिटिश हिंदुस्थानांतील बंगाल प्रांताचा पहिला गव्हर्नर. तो लहानपणापासून धाडसी व हूड असल्यामुळें शिक्षण फारसें झालें नाहीं. १७४३ सालीं ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनींत कारकुनाची नोकरी पत्करून तो मद्रासेस आला. त्या वेळीं फ्रेंच व इंग्रज यांच्यांत मद्रास प्रांत काबीज करण्याबाबत लढाया चालू होत्या. त्यांत पांदेचरीचा वेढा, त्रिचनापल्लीचा वेढा, (१७५१), वगैरे लढायांत सैन्यांत शिरून क्लाइव्हनें पराक्रमानें व युक्तीनें विजय मिळविले. १७५३ सालीं तो इंग्लंडांत दोन लाखांचा मालक होऊन परत आला. १७५६ सालीं बंगालच्या नवाबाशीं इंग्रजांचा तंटा सुरू होऊन क्लाइव्ह बंगाल्यांत आला, व अनेक कारस्थानें करून त्यानें १७५७ सालीं प्लासीची लढाई जिंकली, व सर्व बंगाल प्रांतावर कंपनीचा अमल बसविला, आणि सव्वादोन कोटी रुपये नबाब मीर जाफरकडून नजराणा घेतला, त्यांपैकीं खुद्द क्लाइव्हला तेवीस लाख चाळीस हजार रुपये मिळाले. १७६० सालीं तो इंग्लंडांत परत आला, त्या वेळीं त्याला प्लासीचा लॉर्ड करण्यांत आलें. १७६५ सालीं त्याला बंगालचा गव्हर्नर नेमून हिंदुस्थानांत पाठवलें. त्या वेळीं त्यानें लष्करांत व कंपनीच्या कारभारांत बऱ्याच सुधारणा केल्या. पण क्लाइव्हनें फार पैसे खाल्ल्याबद्दल इंग्लंडमध्यें खटला सुरू झाल्यामुळें तो इंग्लंडला परत गेला. त्या खटल्यांत अखेर त्याच्यावर २३ लक्ष ४० हजार रक्कम घेतल्याचा आरोप शाबीत झाला, तथापि 'त्यानें स्वदेशाची मोठी स्पृहणीय कामगिरी केली' म्हणून त्याला निर्दोषी ठरवण्यांत आलें. त्याला अफूचें व्यसन फार होतें, व १७७४ सालीं त्यानें आत्महत्या केली.

**क्लॉड, एडवर्ड** (१८४०–१९३०)—हा ब्रिटिश मानवशास्त्रवेत्ता असून त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते— 'दि चाइल्डहूड ऑफ दि वर्ल्ड' (जगाची बाल्यावस्था); 'दि चाइल्डहूड ऑफ रिलिजन्स (धर्मांची बाल्यावस्था); 'दि स्टोरी ऑफ प्रिमिटिव्ह मॅन' (प्राचीन मानवाची कथा); आणि 'मॅजिक इन् नेम्स' (नांवांतील जादू). यानें १९१६ सालीं आपलें आत्मचरित्र प्रसिद्ध केलें. हा मोठा सावकारहि होता.

**क्लॉड, लोरेन** (१६००–१६८२)—हा फ्रेंच चित्रकार असून त्यानें सुमारें ४०० चित्रें काढलीं. हीं चित्रें फ्रान्समधील सृष्टिसौंदर्यविषयक देखाव्यांचीं असून या प्रकारच्या चित्रांच्या बाबतींत हा अत्युत्तम चित्रकार आहे. त्यानें आपल्या मोठाल्या चित्रांचीं लहान चित्रें काढून तीं सहा भागांत प्रसिद्ध केलीं आहेत. तीं विद्यार्थ्यांना फार उपयोगी पडतात.

**क्लॉडियस** (खि. पू. १० ते इ. स. ५४)—हा रोमन बादशहा असून *कॅलिगुला* याचा खून झाल्यानंतर इ. स. ४१ मध्यें याला बादशहा म्हणून जाहीर करण्यांत आलें. त्यानें आपल्या कारकीर्दीचीं आरंभींचीं वर्षें रोम शहर सुशोभित करण्याकडे लावलीं. नंतर त्यानें मॉरिटॅनिआ रोमन प्रांतांत सामील केला आणि जर्मनी व ब्रिटन यांमधील लढ्यांत जय मिळविले. त्याला त्याची ४ थी बायको ॲग्रीपिना हिनें विषप्रयोग केला.

**क्लॉपस्टॉक, फ्रीडरिश गोटलिएब** (१७२४–१८०३)—एक जर्मन कवि. त्याचा मुख्य ग्रंथ म्हणजे 'दि मेसाया' हें धार्मिक महाकाव्य. त्याच्या लिखाणानें जर्मन भाषेला फ्रेंच भाषेच्या वर्चस्वांतून मुक्त करण्याचें पुष्कळ कार्य केलें.

**क्लारेती, ज्यूलस अरिसेनी आर्नोद** (१८४०–१९१९)—हा फ्रेंच ग्रंथकार असून त्यानें फ्रेंच वाङ्मयाचा इतिहास, १८७०–७१ मधील क्रांतीचा इतिहास (५ विभाग), अर्वाचीन रंगभूमि इ. विषयांवर ग्रंथ लिहिले.

**क्लार्क, एडवर्ड डॅनिएल** (१७६९–१८२२)—हा इंग्रज प्रवासी आणि खनिजशास्त्रज्ञ असून त्यानें १७९९ मध्यें आरंभ करून पुढील देशांत प्रवास केला: युरोपीय देश, आशिया मायनर, सीरिया; आणि या देशांतून फार मौल्यवान् जिनसा इंग्लंडांत आणल्या. त्यांमध्यें प्लेटोच्या ग्रंथांच्या हस्तलिखित प्रती, आणखी इतर १०० ग्रंथांच्या हस्तलिखित प्रती, ग्रीक देवता डिमिटर हिचा मोठा पुतळा, आणि अलेक्झांडर दि ग्रेटच्या प्रेताची सुप्रसिद्ध दगडी पेटी, ह्या जिनसा महत्त्वाच्या आहेत.

**क्लार्क, लॅटिमर** (१८२२–१८९८)—हा इंग्रज इंजिनिअर त्याच्या काळांतला एक फार मोठा विद्युच्छास्त्रज्ञ होता. त्याचे महत्त्वाचे शोध: (१) डबल-कॅप इन्व्हर्ट इन्स्युलेटर, व (२) दि क्लार्क सेल, हे आहेत.

**क्लॉसिअस, रुडॉल्फ ज्यूलिअस एमॅन्युएल** (१८४२–१८८८)—एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. उष्णता-गतिशास्त्राचा हा एक संशोधक असून यानें पदार्थविज्ञानांतील विषयांवर बरेच ग्रंथ लिहिले आहेत. याला १८७९ सालीं कोप्ले पारितोषिक मिळालें.

**क्लिओपाट्रा** (खि. पू. ६९–३०)—ही ईजिप्त देशाची राणी टॉलेमी ऑलेटीजची मुलगी. ती खि. पू. ५१ मध्यें गादीवर बसली होती; पण खि. पू. ४९ मध्यें तिचा अधिकार काढून

घेण्यांत आला, म्हणून तिनें सीझरला आपल्या बाजूला वश करून घेतलें आणि सीझरच्या वजनानें तिला पुन्हां ईजिप्तचें राज्ञीपद प्राप्त झालें. सीझर स्वतः कांहीं काळ क्लिओपाट्राच्या दरबारीं राहिला आणि तिच्यापासून सीझरला सीझेरिअन या नांवाचा मुलगा झाला. पुढें क्लिओपाट्रानें रोम शहराला भेट दिली. त्या वेळीं सीझरनें तिचें मोठ्या थाटामाटानें स्वागत केलें. फिलीपीच्या लढाईनंतर ती ॲंटनीच्या पक्षाला मिळण्याकरितां टार्सस येथें गेली. तेथून ती ॲंटनीबरोबर टायर येथें गेली. तेथून ईजिप्तला क्लिओपाट्रा परत आल्यावर ॲंटनी तिच्या दरबारीं येऊन राहिला. दरम्यान ऑगस्टस आणि ॲंटनी यांच्यामध्यें युद्ध सुरू झालें. परंतु या युद्धकालांत ॲंटनी क्लिओपाट्राबरोबर ऐषआरामांत १ वर्ष राहिला. आणि जेव्हां ॲक्टीअम येथें आरमारी युद्ध सुरू झालें, त्या वेळीं क्लिओपाट्रानें आपलीं सर्व लढाऊ जहाजें घेऊन युद्धांतून पलायन केलें आणि तिच्या पाठोपाठ ॲंटनीहि गेला. तीं दोघें ईजिप्तमध्यें पळून गेलीं. क्लिओपाट्रा ईजिप्शिअन राजांच्या कबरस्थानांत जाऊन राहिली होती. पण तिनें आत्महत्या केली आहे असें ॲंटनीला वाटल्यामुळें त्यानें आपल्या स्वतःच्या तरवारीनेंच स्वतःला ठार मारून घेतलें. ॲंटनी मेल्याचें कळल्यावर लवकरच क्लिओपाट्रानेंहि आत्महत्या केली. मादक सौंदर्याबद्दल क्लिओपाट्रांची फार ख्याति होती.

**क्लिफोर्ड, विल्यम** ( १८४५–१८७९ )—हा इंग्रज गणितशास्त्रज्ञ १८७१ मध्यें लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजांत व्यवहार गणित ( अप्लाइड मॅथेमॅटिक्स ) या विषयाचा प्रोफेसर नेमला गेला. गणितशास्त्रांतील त्याची अध्यापनपद्धति व लेख यायोगें त्यानें ब्रिटनमध्यें त्या शास्त्राच्या इतिहासांत एक नवें युग सुरू केलें असें मानतात. नॉन्–यूक्लिडियन जॉमेट्री ( यूक्लिडेतर भूमिति ) आणि दि थिअरी ऑफ फंक्शन्स ( फलित सिद्धान्त ) यांविषयींच्या नव्या उपयुक्त कल्पना त्यानें ब्रिटनमध्यें लोकप्रिय करण्याच्या कामीं इतर सर्वांहून अधिक मदत केली. त्याचा 'दि कॉमनसेन्स ऑफ दि एक्झॅक्ट सायन्सेस' हा ग्रंथ कार्ल पिअर्सननें १८८५ मध्यें पुरा करून प्रसिद्ध केला. त्याचें 'मॅथेमॅटिकल पेपर्स', आणि 'लेक्चर्स् ॲंड एसेज' हींहि वाचनीय आहेत.

**क्लीव्हलॅंड**— हें शहर अमेरिकन सं. संस्थानांपैकीं ओहिओ संस्थानांत एरी सरोवराच्या दक्षिण कांठावर आहे. लो. सं. ८,६७,२९० आहे. हें रेल्वेकेंद्र असून उत्तम बंदरहि आहे. मोठाले लोखंडाचे व पोलादाचे कारखाने व इतर कारखाने येथें आहेत. पेट्रोलियम शुद्ध करणें व डुकराचें मांस डब्यांत भरणें ( पोर्क-पॅकिंग ) हेहि महत्त्वाचे धंदे येथें आहेत.

**क्लेअर, जॉन** ( १७९३–१८६४ )—हा एक इंग्रज कवि असून १८२० मध्यें त्यानें 'पोएम्स डिस्क्रिप्टिव्ह ऑफ रूरल लाइफ ॲंड सीनरी' ( ग्रामीण जीवन आणि दृश्यें यांच्या वर्णनपर कविता ) हा काव्यसंग्रह प्रसिद्ध केला व तो बराच लोकप्रिय झाला. नंतर त्यानें १८२१ मध्यें 'व्हिलेज मिन्स्ट्रल' हें काव्य प्रसिद्ध केलें, व त्यामुळें त्याला पुष्कळ मित्र मिळाले. १८३५ मध्यें त्यानें 'रूरल न्यूज' हा काव्यसंग्रह प्रसिद्ध केला. परंतु नंतर त्याला लवकरच वेड लागलें, त्यामुळें मरेपर्यंत तो नॉर्दम्पटन येथें वेड्याच्या इस्पितळामध्यें होता.

**क्लेमेंको, जॉर्जेस बेंजामिन युजीन** (१८४१–१९२९)—हा फ्रेंच मुत्सद्दी आणि वृत्तपत्रकार १८७६ मध्यें चेंबर ऑफ डेप्युटीज या फ्रेंच कायदेमंडळांत निवडून आला आणि १८९३ पर्यंत त्याचा सभासद होता. त्यानें आपला स्वतंत्र बाणा आणि उत्कृष्ट वक्तृत्व यांमुळें लोकांचें लक्ष वेधून घेतलें. १८८० मध्यें त्यानें 'ला ज्युस्तीस' या नांवाचें दैनिक सुरू केलें व तो त्याचा मुख्य संपादक झाला. १९०३ मध्यें तो सेनेटमध्यें सभासद निवडून आला. १९०६ मध्यें फ्रेंच प्रधानमंडळांत गृहमंत्री झाला आणि लवकरच सॅरेननंतर मुख्य प्रधान झाला. १९०९ पर्यंत तो त्या जागीं होता. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं त्यानें तत्कालीन सरकारवर सतत जोराचे हल्ले चढविले. १९१७ च्या नोव्हेंबरमध्यें क्लेमेंको मुख्य प्रधान झाला. आणि आपल्या नेहमींच्या जोमदार वृत्तीनें त्यानें त्या महायुद्धांत दोस्त राष्ट्रांना यश मिळवून दिलें. महायुद्ध थांबल्यावर पॅरिस येथें भरलेल्या शांतता परिषदेचा तो अध्यक्ष होता व तेथेंच व्हर्सायचा तह कायम झाला. १९२० च्या जानेवारीमध्यें त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. नंतर फ्रेंच लोकराज्याच्या अध्यक्षाच्या जागेकरितां उमेदवार म्हणून त्याचें नांव सुचवण्यांत आलें. परंतु त्या सूचनेला त्यानें मान्यता दिली नाहीं. पुढें मरेपर्यंत तो निवृत्त स्थितींत राहिला.

**क्लेरो, ॲलेक्सिस क्लॉड** ( १७१३–१७६५ )—हा फ्रेंच गणितशास्त्रज्ञ असून त्यानें लॅपलॅन्डकडे प्रवास केला आणि तेथें महत्त्वाची माहिती मिळवून एक ग्रंथ लिहिला. १७५२ मध्यें त्यानें चंद्रासंबंधीं एक ग्रंथ प्रसिद्ध केला. १७५९ मध्यें त्यानें हॅलेच्या धूमकेतूच्या कक्षेचा सूर्यापासूनचा समीपतमबिंदु ( रविनीच बिंदु ) गणितानें निश्चित केला.

**क्लोज, डॉ. एस.** ( १८६०– )—एक होमीओपाथी वैद्य व ग्रंथकार. हा अमेरिकेंतील ओकफील्डचा राहणारा. अमेरिकेंत हानेमानच्या पद्धतीप्रमाणें होमिओपाथिक व्यवसाय करणारांमध्यें अग्रगण्य म्हणून ह्याचा लौकिक होता. अशांना तिकडे हानेमानिअन किंवा रेग्युलर

असें संचोधतात. हा तत्त्वज्ञ व मानसशास्त्रज्ञहि असून चित्रकलेची व गायनाची त्याला आवड असे. 'होमिओपाथी तत्त्वज्ञानावर व्याख्यानें' हा त्याचा महत्त्वाचा ग्रंथ होय. 'दि आर्टिस्टिक स्पिरिट इन् मेडिसिन' (औषधांतील कलात्मकता) हा त्याचा एक उद्बोधक व सुंदर निबंधहि प्रसिद्ध आहे. न्यू यॉर्क होमिओपाथिक मेडिकल कॉलेजांत हा समचिकित्सेचें तत्त्वज्ञान शिकवीत असे. प्रसिद्ध 'होमिओपाथिक रेकॉर्डर' ह्या मासिकाच्या संपादकांपैकीं तो एक होता.

**क्लोज, कर्नल** (मृ. १८१३)— पुणें दरबारांतील एक इंग्रज वकील. प्रथम म्हैसूरकराशीं झालेल्या लढायांत व बाजीरावाशीं वसई येथें झालेल्या तहांत याची महनीय कामगिरी दिसून आली. याच्या कामगिरीवर खुप होऊन इंग्रज सरकारनें तीनशें गिनी मोलाची एक तलवार बक्षीस देऊन याचा गौरव केला. टिपूच्या पश्चात् हा म्हैसूरचा रेसिडेंट झाला असतांना म्हैसूरची राज्यव्यवस्था यानें उत्तम राखिली. वेलस्लीनें याची हुशारी जाणून यास सन १८०१ मध्यें पुण्याच्या वकिलातीवर नेमलें. दिसण्यांत जरी हा साधा बावळा असला तरी आणीबाणीच्या वेळीं याचे गुण दृष्टोत्पत्तीस येत. इंग्रज मुत्सद्यांचा हा आदर्श समजला जातो. सन १८१० मध्यें हा इंग्लंडला परत गेला.

**क्लोरोफॉर्म**—($CHCl_3$) हें द्रवरूप औषध मधुर वास व रुचकर चव असलेलें, रंगहीन व झोंप आणणारें आहे. हें शुभ्रक पूड (ब्लीचिंग पावडर) व मद्यार्क यांपासून तयार करतात. याचा शोध १८३२ त प्रथम लागला. पण गुंगीसाठीं उपयोग १८४७ त प्रथम केला गेला. शस्त्रक्रिया करण्यासाठीं रोग्याला तास अर्धा तास बेशुद्धावस्थेंत ठेवण्याकरितां क्लोरोफॉर्मची भूल देतात. भूल देण्याच्या आधीं रोग्याचें हृदय तपासावें आणि हृदय विकृत असल्यास किंवा रोगी फार वृद्ध व अशक्त असल्यास ही भूल फारच जपून द्यावी लागते. कारण या भुलीमुळें हृदयक्रिया बंद पडून रोगी दगावतो. त्यामुळें भूल दिल्यावर नाडी व श्वसनक्रिया नीट चालत आहेत कीं नाहींत याकडे नीट लक्ष ठेवावें लागतें; तसेंच गुंगी आल्यावर कांहीं रोग्यांची जीभ घशाशीं गोळा होऊन रोग्याचा जीव गुदमरतो; म्हणून गुंगी आल्यावर एका विशिष्ट चिमट्यानें जीभ पकडून तो चिमटा तोंडाबाहेर खेंचत ठेवतात. याप्रमाणें या गुंगींत अनेक प्रकारचे धोके असल्यामुळें चांगल्या अनुभवी डॉक्टराकडून ही भूल व शस्त्रक्रिया करावी लागते.

**क्लोव्हर वेल**—[वर्ग-लेग्युमिनोसी-जाति ट्रिफोलियम]. याच्या सुमारें तीनशें जाती आहेत. ट्रिफोलियम रेपेन्स ही जात सर्व युरोप, आशिया व अमेरिका यामध्यें चाऱ्याकरितां लागवडीस आणतात. या दृष्टीनें ही फार महत्त्वाची आहे. ही पांढरी असते. मेडिक आणि मेलिअर या नांवाच्या रोपांसहि क्लोव्हर हें नांव लावण्यांत येतें; परंतु त्यांची जात निराळी आहे.

**क्वांतुंग**—चीनमधील अगदीं दक्षिणेकडचा समुद्रकिनाऱ्यावरील प्रांत. याचा उत्तर भाग डोंगराळ असून दक्षिण भाग फार सुपीक आणि खनिज द्रव्यांनींहि संपन्न आहे. हायाना बेट व इतर बरींच लहान लहान बेटें यांचा या प्रांतांत अन्तर्भाव होतो. हॉगकॉग (ब्रिटिश), वॉगचौ (फ्रेंच) व मकाव (पोर्तुगीज) हीं बेटें किनाऱ्यानजीक आहेत. राजधानी कांगचौ आहे. याची लो. सं. ३,२२,८९,८०५ व क्षे. फ. ८३,९१८ चौ. मै. आहे.

**क्विटो**—हें शहर दक्षिण अमेरिकेंतील इक्वेडोर देशाची राजधानी आहे. लो. सं. १,५०,३७४ आहे. १५४१ सालीं स्पॅनिश लोकांच्या ताब्यांत हें शहर गेलें. येथें भूकंप वारंवार होतात. आणि १७९७ व १८५९ सालच्या धक्क्यांमुळें या शहराचें अतिशय नुकसान झालें. येथें जेसुइट लोकांचें देवालय प्रेक्षणीय आहे. शिवाय विद्यापीठ, वेधशाळा, ११ मोठाले मठ, इत्यादि सार्वजनिक संस्था आहेत. येथें खोगीर, जोडे, लोंकरीचें व कापसाचें कापड, पोतीं, चटया, जाड्या लोंकरीच्या घोंगड्या, गालिचे, लांकडी नक्षीचे जिन्नस व सोन्यारुप्याचे जिन्नस, कशिदाचें व फितीचें काम, वगैरे अनेक धंदे चालतात.

**क्विनाइन**—हा एक अम्लविरहित असा अत्यंत कडू पदार्थ असून तो क्विनोलिन नांवाच्या द्रव्यापासून काढतात. याची प्रतिक्रिया तीव्र क्षाराप्रमाणें असते. सिंकोना नांवाच्या अनेक जातींच्या झाडांच्या सालीपासून हा पदार्थ काढण्यांत येतो. ही साल प्रथम दक्षिण अमेरिकेमध्यें आढळून आली व तिचा औषधामध्यें उपयोग प्रथम स्पॅनिश लोकांनीं केला (१६३५). परंतु याचा विशेष प्रसार १९ व्या शतकांत होऊन सिंकोनाच्याऐवजीं सर्वत्र हें वापरण्यांत येऊं लागलें. हिंवतापामध्यें याचा उपयोग परिणामकारक रीतीनें करण्यांत येतो व विशिष्ट रोगावर लागू पडणारें हमखास औषध म्हणून वैद्यकशास्त्रामध्यें हें एक उत्कृष्ट उदाहरण समजण्यांत येतें. हें नियतकालभंजक (ॲन्टी पीरिऑडिक), ज्वरांतक व स्नायुशूलहारक आहे. पूर्वीं ज्वरघ्न म्हणून याचा उपयोग फार करण्यांत येत असे. परंतु अलीकडे याच्याऐवजीं फेनॅसेटीन, ॲसेटॅनिलाइड, अथवा फेनॅझोन वगैरेंचा उपयोग करण्यांत येतो.

**क्विनोलाइन**— दगडी कोळशाच्या डांबरांत हें आणि तज्जन्य पदार्थ सांपडतात. अनीलीनपासूनहि हें तयार करतां येतें. हा वर्णहीन द्रवरूप पदार्थ असून त्याला एक प्रकारचा वास येतो. क्षांत किरणांचें वक्रीभवन पुष्कळ होतें. हें जंतुविरोधी (ॲंटिसेप्टिक) आणि ज्वरघ्न (ॲंटिपायरेटिक) आहे.

घेण्यांत आला, म्हणून तिनें सीझरला आपल्या बाजूला वश करून घेतलें आणि सीझरच्या वजनानें तिला पुन्हां ईजिप्तचें राज्ञीपद प्राप्त झालें. सीझर स्वतः कांहीं काळ क्लिओपाट्राच्या दरबारीं राहिला आणि तिच्यापासून सीझरला सीझेरिअन या नांवाचा मुलगा झाला. पुढें क्लिओपाट्रानें रोम शहराला भेट दिली. त्या वेळीं सीझरनें तिचें मोठ्या थाटामाटानें स्वागत केलें. फिलीपीच्या लढाईनंतर ती अँटनीच्या पक्षाला मिळण्याकरितां टार्सस येथें गेली. तेथून ती अँटनीबरोबर टायर येथें गेली. तेथून ईजिप्तला क्लिओपाट्रा परत आल्यावर अँटनी तिच्या दरबारीं येऊन राहिला. दरम्यान ऑगस्टस आणि अँटनी यांच्यामध्यें युद्ध सुरू झालें. परंतु या युद्धकालांत अँटनी क्लिओपाट्राबरोबर ऐषआरामांत १ वर्ष राहिला. आणि जेव्हां अॅक्टीअम येथें आरमारी युद्ध सुरू झालें, त्या वेळीं क्लिओपाट्रानें आपलीं सर्व लढाऊ जहाजें घेऊन युद्धांतून पलायन केलें आणि तिच्या पाठोपाठ अँटनीहि गेला. तीं दोघें ईजिप्तमध्यें पळून गेलीं. क्लिओपाट्रा ईजिप्शिअन राजांच्या कबरस्थानांत जाऊन राहिली होती. पण तिनें आत्महत्या केली आहे असें अँटनीला वाटल्यामुळें त्यानें आपल्या स्वतःच्या तरवारीनेंच स्वतःला ठार मारून घेतलें. अँटनी मेल्याचें कळल्यावर लवकरच क्लिओपाट्रानेंहि आत्महत्या केली. मादक सौंदर्याबद्दल क्लिओपाट्राची फार ख्याति होती.

**क्लिफोर्ड, विल्यम** ( १८४५–१८७९ )—हा इंग्रज गणितशास्त्रज्ञ १८७१ मध्यें लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजांत व्यवहार गणित ( अप्लाइड मॅथेमॅटिक्स ) या विषयाचा प्रोफेसर नेमला गेला. गणितशास्त्रांतील त्याची अध्यापनपद्धति व लेख यायोगें त्यानें ब्रिटनमध्यें त्या शास्त्राच्या इतिहासांत एक नवें युग सुरू केलें असें मानतात. नॉन्–यूक्लिडियन जॉमेट्री ( यूक्लिडेतर भूमिति ) आणि दि थिअरी ऑफ फंक्शन्स ( फलित सिद्धान्त ) यांविषयींच्या नव्या उपयुक्त कल्पना त्यानें ब्रिटनमध्यें लोकप्रिय करण्याच्या कामीं इतर सर्वांहून अधिक मदत केली. त्याचा 'दि कॉमनसेन्स ऑफ दि एक्झॅक्ट सायन्सेस' हा ग्रंथ कार्ल पिअर्सननें १८८५ मध्यें पुरा करून प्रसिद्ध केला. त्याचें ' मॅथेमॅटिकल पेपर्स ', आणि ' लेक्चर्स अँड एसेज ' हींहि वाचनीय आहेत.

**क्लीव्हलँड**— हें शहर अमेरिकन सं. संस्थानांपैकीं ओहिओ संस्थानांत एरी सरोवराच्या दक्षिण कांठावर आहे. लो. सं. ८,६७,२९० आहे. हें रेल्वेकेंद्र असून उत्तम बंदरहि आहे. मोठाले लोखंडाचे व पोलादाचे कारखाने व इतर कारखाने येथें आहेत. पेट्रोलियम शुद्ध करणें व डुकराचें मांस डब्यांत भरणें ( पोर्क–पॅकिंग ) हेंहि महत्त्वाचे धंदे येथें आहेत.

**क्लेअर, जॉन** ( १७९३–१८६४ )—हा एक इंग्रज कवि असून १८२० मध्यें त्यानें ' पोएम्स डिस्क्रिप्टिव्ह ऑफ रूरल लाइफ अँड सीनरी ' ( ग्रामीण जीवन आणि दृश्यें यांच्या वर्णनपर कविता ) हा काव्यसंग्रह प्रसिद्ध केला व तो बराच लोकप्रिय झाला. नंतर त्यानें १८२१ मध्यें ' व्हिलेज मिन्स्ट्रल ' हें काव्य प्रसिद्ध केलें, व त्यामुळें त्याला पुष्कळ मित्र मिळाले. १८३५ मध्यें त्यानें ' रूरल म्यूज ' हा काव्यसंग्रह प्रसिद्ध केला. परंतु नंतर त्याला लवकरच वेड लागलें, त्यामुळें मरेपर्यंत तो नॉर्दम्पटन येथें वेड्याच्या इस्पितळामध्यें होता.

**क्लेमेंको, जॉर्जेस बेंजामिन युजीन** ( १८४१–१९२९)—हा फ्रेंच मुत्सद्दी आणि वृत्तपत्रकार १८७६ मध्यें चेंबर ऑफ डेप्युटीज या फ्रेंच कायदेमंडळांत निवडून आला आणि १८९३ पर्यंत त्याचा सभासद होता. त्यानें आपला स्वतंत्र बाणा आणि उत्कृष्ट वक्तृत्व यांमुळें लोकांचें लक्ष वेधून घेतलें. १८८० मध्यें त्यानें ' ला ज्युस्तीस ' या नांवाचें दैनिक सुरू केलें व तो त्याचा मुख्य संपादक झाला. १९०३ मध्यें तो सेनेटमध्यें सभासद निवडून आला. १९०६ मध्यें फ्रेंच प्रधानमंडळांत गृहमंत्री झाला आणि लवकरच सॅरेननंतर मुख्य प्रधान झाला. १९०९ पर्यंत तो त्या जागीं होता. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं त्यानें तत्कालीन सरकारवर सतत जोराचे हल्ले चढविले. १९१७ च्या नोव्हेंबरमध्यें क्लेमेंको मुख्य प्रधान झाला. आणि आपल्या नेहमींच्या जोमदार वृत्तीनें त्यानें त्या महायुद्धांत दोस्त राष्ट्रांना यश मिळवून दिलें. महायुद्ध थांबल्यावर पॅरिस येथें भरलेल्या शांतता परिषदेचा तो अध्यक्ष होता व तेथेंच व्हर्सायचा तह कायम झाला. १९२० च्या जानेवारीमध्यें त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. नंतर फ्रेंच लोकराज्याच्या अध्यक्षाच्या जागेकरितां उमेदवार म्हणून त्याचें नांव सुचवण्यांत आलें. परंतु त्या सूचनेला त्यानें मान्यता दिली नाहीं. पुढें मरेपर्यंत तो निवृत्त स्थितींत राहिला.

**क्लेरो, ॲलिक्सिस क्लॉड** ( १७१३–१७६५ )—हा फ्रेंच गणितशास्त्रज्ञ असून त्यानें लॅपलॅन्डकडे प्रवास केला आणि तेथें महत्त्वाची माहिती मिळवून एक ग्रंथ लिहिला. १७५२ मध्यें त्यानें चंद्रासंबंधीं एक ग्रंथ प्रसिद्ध केला. १७५९ मध्यें त्यानें हॅलेच्या धूमकेतूच्या कक्षेचा सूर्यापासूनचा समीपतमबिंदु ( रविनीच बिंदु ) गणितानें निश्चित केला.

**क्लोज, डॉ. एस.** ( १८६०– )—एक होमीओपाथी वैद्य व ग्रंथकार. हा अमेरिकेंतील ओकफील्डचा राहणारा. अमेरिकेंत हानेमानच्या पद्धतीप्रमाणें होमिओपाथिक व्यवसाय करणारांमध्यें अग्रगण्य म्हणून ह्याचा लौकिक होता. अशांना तिकडे हानेमानिअन किंवा रेग्युलर

**क्विबेक**— उत्तर अमेरिकेंतील कानडा देशांतील हा प्रांत आहे व याचें मुख्य शहर क्विबेक, हें सेंट लॅरेन्स व सेंट चार्लस या दोन नद्यांच्या संगमावर आहे. लो. सं. १,५०,७५७ आहे. येथून नजीक आब्राहाम रणभूमि आहे. जेथें जनरल वुल्फ मरण पावला त्या ठिकाणी ४० फूट उंच स्तंभ आहे व पंचलोहाचा पुतळा स्टेफॉय रस्त्यावर बसवलेला आहे. येथें एक मोठें रोमन कॅथॉलिक चर्च व लाव्हाल विद्यापीठ आहे. येथें जोडे, कागद, रबर, तंबाखू, दोरखंडें, वाद्यें, चाकू, काच्या, इत्यादि माल तयार होतो. १५३५ पासून हें शहर फ्रेंचांच्या ताब्यांत होतें तें १७५९ सालीं ब्रिटिशांच्या ताब्यांत कायमचें आलें. सेंट लॅरेन्स नदीवरचें क्विबेक मोठें उन्हाळी बंदर आहे.

**क्विलान (कोल्लम)**—मद्रास, त्रावणकोर संस्थानांतील क्विलान तालुक्याचें मुख्य शहर, व बंदर. साउथ इंडियन रेल्वेच्या शेणकोट्टा–क्विलान–त्रिवेंद्रम् या फांट्यावर क्विलान आहे. लोकसंख्या सुमारें चौतीस हजार. हें पूर्वी पश्चिम किनाऱ्यावरील एक उत्तम जुनें बंदर होतें. सुताच्या कापडांचे व विटांचे मोठे कारखाने येथें आहेत. बाहेरगांवीं जाणारा माल कॉफी, चहा, मासे, लांकूड, मिरीं आणि काथ्या हा असून बाहेरून येणारा माल मीठ, तंबाखू, वगैरे होय. ह्या शहरांत इ. स. ७५१ या वर्षी चीनहून जहाजें येत असत. ह्या ठिकाणीं पोर्तुगीज लोकांची वखार होती, ती १६६२ मध्यें डच लोकांनीं घेतली. पुढें ती डच लोकांकडून ईस्ट इंडिया कंपनीच्या ताब्यांत गेली. हल्लीं ब्रिटिश सरकारच्या अमलाखालीं असलेल्या भागाला तंगासेरी असें नांव आहे.

**क्वीन बी ट्रॅक्टर**— रेडियोनें चालणारा एक छोटा ट्रॅक्टर (यांत्रिक औत). इंग्लंडमधील हर्टफर्डशायरच्या लिप्टन नांवाच्या माणसानें हा शोधून काढला. हा औत माणसाशिवायच चालतो. मालकाला आपल्या कार्यालयांत बसून या यंत्राकडून शेतीचें काम परस्पर करून घेतां येतें.

**क्वीन्सलंड**—ऑस्ट्रेलियामधील एक संस्थान. याचें क्षेत्रफळ ६,७०,६०० चौ. मैल. लो. सं. ९,४७,६३४. पूर्वी हें न्यू साउथ वेल्सचा भाग होतें. १८५९ मध्यें तें स्वतंत्र बनविण्यांत आलें. उत्तरेकडचा भाग उष्णकटिबंधांत असून दक्षिण भाग जरा थंड आहे. दक्षिण भागांत शेतकीची वाढ चांगलीच झाली असून आर्टेझियन वेल्स (पाहा) या प्रकारच्या विहिरींचा कृषिसंवर्धनाकडे पुष्कळच उपयोग करण्यांत आला आहे. मुख्य व्यवसाय शेतकी, जनावरांची पैदास व जोपासना हा आहे. लोंकर, साखर व दुधेऱ्या (डेअरी) मध्यें झालेले पदार्थ यांचा निर्यात व्यापार बराच आहे. खाणी व जंगल यांच्यापासूनचें उत्पादन व उद्योगधंदे महत्त्वाचे आहेत. ब्रिस्बेन मुख्य ठिकाण असून रेल्वेनें सर्वत्र जोडलेलें आहे.

**क्वेकर पंथ**—सोसायटी ऑफ फ्रेण्ड्स या नांवाच्या ख्रिस्ती धर्मपंथाच्या अनुयायांना क्वेकर म्हणतात. बाप्तिस्मा, प्रभुभोजन (लॉर्ड्स सपर), वगैरे बाह्यसंस्कार क्वेकर लोक पाळीत नाहींत व ईश्वरप्रार्थना मुकाट्यानें करतात. धंदेवाईक उपाध्याय-वर्ग, शपथविधि, युद्धें या गोष्टींना क्वेकर लोकांचा विरोध असून अंतःस्फूर्तीला हे लोक फार महत्त्व देतात. युद्धामुळें महत्त्वाकांक्षा, अभिमान, लोभ, शत्रुत्व, वगैरे दुष्ट मनोविकार चळावतात; या गोष्टी ख्रिस्ताच्या उपदेशाच्या विरुद्ध म्हणून युद्ध करणें हें क्वेकर लोक अत्यंत निंद्य मानतात. कोणतीहि शपथ घेणें या पंथाला मान्य नसल्यामुळें राजनिष्ठेची शपथसुद्धां घेण्याचें हे नाकारतात. १६४७ सालीं जॉर्ज फॉक्स यानें या पंथाची मूळ स्थापना इंग्लंडांत केली आणि राजनिष्ठेची शपथ घेण्याचें नाकारल्यामुळें या लोकांना फार छळ सोसावा लागला. त्यामुळें नवीन शोध लागलेल्या अमेरिका खंडांत जाऊन तेथें यांनीं वसाहती केल्या. परोपकार हें या पंथाचें ब्रीद असल्यामुळें गुलामांचा व्यापार बंद पाडण्याची यांनीं अतोनात खटपट केली. विल्यम पेन या सुप्रसिद्ध क्वेकरनें पेनसिल्व्हानिया ही वसाहत स्थापिली व तेथें क्वेकर पंथाच्या तत्त्वाप्रमाणे राज्यकारभार चालू केला.

**क्वेटा**—हा बलुचिस्तानांत एक तालुका आहे. यांत क्वेटा शहर व ५४ खेडीं आहेत. क्वेटा शहर हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आणि बलुचिस्तानची राजधानी आहे. लो. सं. ६४,४७६ आहे. या शहरांत पाकिस्तान होण्यापूर्वी शीख लोक फार होते; आतां बहुतेक मुसलमान आहेत व थोडे युरोपियन आहेत. येथें दोन मिशन हॉस्पिटलें, एक बायकांचा दवाखाना, तीन हायस्कुलें, मुलींची शाळा, लायब्ररी, वगैरे संस्था आहेत. १९३५ सालीं येथें मोठा धरणीकंप झाला व सबंध शहर उध्वस्त होऊन गेलें. ४०,००० वर लोक मृत्युमुखीं पडले. त्यापूर्वी क्वेटा हें चांगलें मजबूत लष्करी ठाणें होतें. १९०७ सालीं येथें हिंदी लष्करी कॉलेज उघडण्यांत आलें. शहराची रचना फार सुरेख करण्यांत आली होती.

**क्वेटापिशिन**— बलुचिस्तानांत क्वेटा व पिशिन या दोन तहशिली (तालुके) आहेत व या जोड नांवाचा जिल्हा आहे. त्याचें क्षे. फ. ५,३१० चौ. मैल व लो. सं. १,५६,२८९ (१९४१) आहे. यांत आतां बहुतेक मुसलमान आहेत. मुख्य भाषा पुश्तु आहे. येथें भूकंप फार होतात. १८९२ व १९०२ मध्यें फार मोठे भूकंप झाले. येथें डाळिंब, अक्रोड, बदाम, वगैरे फळें फार होतात. मेंढ्या, घोडे व उंट पाळण्याचा मोठा

धंदा आहे. गहूं, भात, बार्ली, मका, बटाटे व इतर धान्यें आणि भाजीपाला फार चांगला होतो. नांगराला उंट जुंपतात. फेल्टच्या कापडाचा व चटयांचा व सत्रंज्यांचा मोठा धंदा येथें चालतो. येथील जंगलांत चित्ते, लांडगे, कोल्हे व ससे नेहमीं सांपडतात. येथील कंदाहारी लोक तांब्याची भांडीं उत्तम करतात.

---

# ख

**ख**—व्यंजनांतील दुसरें अक्षर. 'क' चा महाप्राणोच्चार. संस्कृत अर्थ अनेक आहेत. उदा., आकाश, सूर्य, अनुस्वार, इ..

अक्षरविकास–पहिल्या अवस्थेंत हा वर्ण खालसी येथील इ. स. पू. ३ ऱ्या शतकांतील शिलालेखांत आढळतो. अर्वाचीन अवस्थेच्या मागील अवस्था हैहयवंशी राजा जाजल्लदेव याच्या वेळची (इ. स. ११९४) आहे. सातव्या शतकापासून या वर्णचिन्हाचे दोन अवयव (र व) दिसूं लागले.

**खंगर**—खाणींतून एखादी धातु काढून ती शुद्ध करीत असतां ज्या अशोधित धातू वितळवाव्या लागतात, त्यांपासून मिळणारीं उपद्रव्यें खंगररूपानें मिळतात. हे खंगर भट्टीमध्यें वितळलेल्या स्वरूपांत असतात. त्यांस भट्टीबाहेर काढून थंड केले म्हणजे ते घट्ट बनतात. यांचे चौरस तुकडे करून ते सडकेवर बसविण्याच्या कामीं किंवा इमारतीमध्यें उपयोगांत आणतात. कांहीं खंगराची भुकटी करून तिचा सीमेंट करण्यामध्यें उपयोग करतात. यांचें एक प्रकारचें खतहि करण्यांत येतें.

**खंगार**—कंगार, खांगार. उत्तर हिंदुस्थानांत यांची विशेष वस्ती आहे. ही एक चोरटयांची जात असून या जातीच्या लोकांचें विशेष वास्तव्य बुंदेलखंडांत असतें. हे लोक खेडेगांवांतील पहारेकऱ्याचें काम करतात. या लोकांचा रजपूत वंशाशीं निकट संबंध असल्यामुळे त्यांस रावत अथवा रावखंगार असेंहि म्हणतात. खेडेगांवांत त्यांना कोतवाल अथवा कोतवार म्हणून ओळखतात. खंगार हे पूर्वी एका काळीं राज्यकर्ते होते व त्यांचा रजपुतांशीं निकट संबंध होता हें निश्चित आहे. परंतु त्यांच्या गोत्रपद्धतीकडे पाहिलें तर ते द्राविडी वंशाचे असावे असा तर्क होतो. खंगार लोक देवाची उपासना करितात व नागबाबा आणि कानेरियाबाबा या संतांना भजतात. कुरार येथें यात्रेस जाऊन तेथील गिडवाणसा माता नांवाच्या देवीचें ते दर्शन घेतात. वृक्षपूजेचें माहात्म्य यांच्यांत बरेंच आहे. गुंज, नंदी, बेल, वड, वगैरे वृक्षांची पूजा करण्यांत येते.

खंगार लोक इतर लोकांस जातींत घेत नाहींत. पण खंगार बाप व उच्च जातीची स्त्री यांची संतति मात्र जातींत घेतात. हे आपल्या नांवामागें सिंग शब्द लावतात, व जातीनियम जरी फार कडक रीतीनें पाळतात तरी ब्राह्मण लोक यांच्या हातचें पाणी घेत नाहींत. आपले पूर्वज पूर्वी चांगले शिपाई असत असें हे म्हणतात. पण आजकाल तर हे शेती व मजुरीहि करतात. चोरी करण्यांत यांची पूर्वी फार ख्याति असे.

**खंजरीट**—किंवा परटीण. ही एक झाडावर राहणाऱ्या पक्ष्यांची जात आहे. हे पक्षी झाडावर बसतांना किंवा पळतांना आपली लांबट शेपटी एकसारखी वरखालीं हालवीत असतात. हे बहुधा सर्वत्र आढळतात. यांच्या डोळ्यांची स्त्रियांच्या नेत्रास उपमा दिलेली संस्कृत काव्यांत आढळते. रंग राखी व खालच्या बाजूस पांढरा असा असून शेंपूट अर्धें काळें व अर्धें पांढरें असतें. हा पक्षी गातोहि.

**खंजिरी**—एक वाद्य. सुमारें सहा इंच रुंदीची व अर्धा इंच जाडीची एक फळी घेऊन तिचें टीचभर व्यासाचें एक लांकडी कडें बनवितात. त्याचें तोंड कातड्यानें मढविलेलें असतें. जंगम, वाघे, गोसावी इत्यादि लोक तोंडानें पदें, गाणीं, वगैरे म्हणून खंजिरीनें तालाची साथ करतात.

**खजुराहो**—मध्य हिंदुस्थान, छत्तरपूर संस्थानांतील एक गांव. या ठिकाणीं बरींच मध्ययुगीन देवळें आहेत. हें छत्तरपूर शहरापासून २५ मैल दूर आहे.

खजुराहोचें महत्त्व त्यांतील देवळांकरितांच आहे. दोन सोडून बाकीचीं सर्व देवालयें इ. स. ९५०–१०५० या काळांत बांधलेलीं दिसतात. यांवरचे शिलालेख ऐतिहासिक महत्त्वाचे आहेत. खजुराहो गांवापासून जवळच कुरार नाल्यावर कुंवरनाथाचें भव्य देवस्थान आहे.

**खजुवा**—हा एक वेल आहे. खजुवा वेल दरवर्षी नवीन लावला जातो. हा मूळचा चीन, कोचीन चीन, जपान व जावा या ठिकाणचा असून अलीकडे हिंदुस्थानांत याची लागवड करण्यास सुरवात झाली आहे.

याची डाळ करून अथवा पीठ करून खातात. ज्यांच्या शेंगा झाल्या आहेत असे वेल व दाण्याची पेंड गुरांना चांगली मानवते. या झाडाचें बीं करडईच्या बियांप्रमाणें दिसण्यांत असून त्याचें तेलहि तळण्याकडे करडईच्या तेलाप्रमाणें उपयोगांत आणतात. चीनमध्यें व जपानांत याची मोठ्या प्रमाणांत लागवड होते.

**खजूर**—[ वर्ग-फिनिक्स डॅक्टिलीफेरा ]. खजुरीच्या झाडास व फळास खजूर म्हणतात. हीं झाडें शिंदीसारखीं ५० ते ६० फूट उंच वाढतात. याला शाखा फुटत नाहींत. याच्या खोडाची जाडी खालपासून वरपर्यंत सारखीच असते. याच्या शेवटीं पिसासारखीं मोठमोठीं पानें असतात व फळांचे लांब घोंस येतात. या झाडांत नर-मादी असा फरक आहे. दुसऱ्या जातीच्या झाडास प्रत्येकीं १८० ते २०० फळें असलेले घोंस येतात व ते प्रत्येकीं २० ते २५ पौंड वजनांत भरतात. तुर्कस्तान, पश्चिम आशिया, उत्तर आफ्रिका व अरबस्तान यांतील लोकांचें हें महत्त्वाचें अन्न आहे. याच्या पानांचा उपयोग घरें शाकारण्याच्या कामीं करण्यांत येतो व दोरांचा दोऱ्या करण्याकडे उपयोग होतो. इराण, पॅलेस्टाइन, अरबस्तान आणि उत्तर आफ्रिका या प्रदेशांत हीं झाडें चांगलीं वाढतात.

खजूर वाळवून खारका करतात. खारीक खाद्य व औषधी म्हणूनहि उपयोगी आहे. अशक्तता, पित्त, ज्वर, दाह, इ. वर खारीक देतात.

**खजूरी बोरें**—[ वर्ग-डायोस्पायरॉस ]. एबनीच्या जातीच्या कांहीं झाडांस खजूरी बोरें असें म्हणण्यांत येतें. हें झाड युरोप खंडांतील समशीतोष्ण प्रदेशांत होतें. अमेरिकेंतील खजूरी बोरीचीं झाडें [ डी. व्हर्जिनियाना ] ५० ते ६० फूट उंच वाढतात. फळ सामान्यतः वाटोळें असतें व हिरवें खाल्लें असतां तुरट लागतें ; पण बर्फात ठेवून थंड केल्यास बरें लागतें. चीनमध्यें खजूरी बोरींची [ डी. काकी ] त्यांच्या फळांकरितां बरीच लागवड करण्यांत येते.

**खझर**—एक प्राचीन राष्ट्र. त्याच्या उत्कर्षाचा काल इ. स. ६०० पासून ९५० पर्यंतचा होय. कॅस्पियन समुद्राचा किनारा व कॉकेशस पर्वताचीं शिखरें हें खझरांचें वसतिस्थान असून त्यांच्यावरून कॅस्पियन समुद्राला मुसलमान भूगोलज्ञ बहर-अल्-खझर (खझरांचा समुद्र) असें म्हणत. व्होल्गा नदीच्या मुखप्रदेशावरील इटिल सेमेंडर, खाम्लिडजे, बेलेंड्श्वर (आर्मेनिया) आणि डॉनवरील सर्केल हीं त्यांचीं शहरें चांगल्या भरभराटीचीं व्यापारी केंद्रें होतीं. कॅस्पियन व युक्झाइन यांवर त्यांचें साम्राज्य होतें, व पूर्व आणि पश्चिम खंडांतील सर्व वाहतूक त्यांच्याकडे असे.

**खट**—(कॅल्शिअम्). चिन्ह Ca ; परमाणुभार ४०.०७. रुप्यासारखा चकाकणारा पांढरा शुभ्र धातु. सिंधु (सोडियम) आणि पालाश (पोटॅशियम) प्रमाणें ह्याची तार किंवा पान तयार करतां येत नाहीं. हा ठिसूळ असून स्फटिकासारखे ह्याचे तुकडे होतात. हा शिशापेक्षां कठिण असला तरी चाकूच्या पातीनें त्याचे तुकडे करतां येतात. नेहमींच्या परिचयाचा चुना किंवा चुनखडी हीं याचींच संयुक्तें होत.

**खट**—हा राग आसावरी थाटांतील रागांपैकीं एक आहे. याचा आरोहावरोह सर्व स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. याचा वादी धैवत व संवादी गांधार आहे. याचा गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर हा आहे. ह्या रागाच्या पूर्वांगांत भैरव व उत्तरांगांत आसावरी हे राग दृष्टीस पडतात. या रागांत सहा रागांचें मिश्रण आहे, म्हणून त्याला षड्राग असें सार्थ नांव पडलें आहे. या रागांत दोन ऋषभ, दोन गांधार, दोन धैवत व दोन निषाद हे स्वर लागतात. या रागाची प्रकृति चपल आहे.

**खटाव**—मुंबई, सातारा जिल्ह्यांतील एक तालुका व तालुक्याचें मुख्य ठिकाण. तालुक्याची लो. सं. १,०३,५७७. या तालुक्यांत भूषणगड व वर्धनगड हे किल्ले आहेत. मराठी रियासतींत खटाव हा एक परगणा होता. प्रसिद्ध कृष्णराव खटावकर हा येथील राहणारा होता. ( कृष्णराव खटावकर पाहा. )

**खट्वांग**—१. एक इक्ष्वाकुकुलोत्पन्न राजा. यास दिलीप असें नामांतर असून क्वचित् ऐलबिल म्हटलें आहे. हा मोठा यज्ञ करणारा होता.

२. शंकराच्या एका गदेसारख्या आयुधाला खट्वांग असें नांव आहे. याच्या टोंकाला कवटी बसविलेली असते व योगी लोक अशी काठी वापरतात.

**खंड**—महाद्वीपाच्या लहान भागास जशी वर्ष म्हणून संज्ञा आहे, तशी वर्षांतील लहान भागास खंड संज्ञा आहे. आपण राहतों या भारतवर्षात कुशावर्त, इलावर्त, ब्रह्मावर्त, मलय, केतु, भद्रसेन, इंद्रस्पृक्, विदर्भ आणि कीटक असे नऊ खंड आहेत. हींच नांवें मत्स्यपुराणांत इंद्रद्वीप, कसेर, ताम्रवर्ण, गभस्तिमान्, नाग, सौम्य, गंधर्व, वारुण आणि भरत अशीं आहेत. आज पृथ्वीवरील जमिनीच्या मोठ्या भागास खंड (कॉंटिनेंट) म्हणतात. पृथ्वीचे याप्रमाणें पांच मोठे खंड आफ्रिका, आशिया, अमेरिका, युरोप, आणि ओशियानिया हे आहेत.

**खडकवासलें तलाव**—खडकवासलें नांवाचें पुण्याच्या नैर्ऋत्येस सुमारें ११ मैलांवर एक खेडें आहे. तेथें मुठा नदीस

बांधलेला एक तलाव आहे. सन १८७९ त या तलावाचें काम पुरें झालें. या तळ्याची लांबी ११ मैल आहे व रुंदी पाऊण मैलापेक्षां जास्त नाहीं. पुणें शहराला या तळ्यांतूनच मुख्यतः पाणीपुरवठा होतो. याचे दोन कालवे काढले असून पहिला हडपसरवरून पाटसपर्यंत गेला आहे व दुसरा कोथरूडवरून खडकीपर्यंत गेला आहे.

जलगति-प्रवाहमार्ग, यांचें संशोधन करण्यासाठीं येथें हिंदुस्थान सरकारनें एक केंद्र उघडलें आहे. तसेंच येथून जवळच एक मोठें लष्करी शिक्षणाचें महाविद्यालय स्थापन केलें आहे.

**खडकी**—मुंबई इलाख्यांतील पुणें जिल्ह्याच्या हवेली तालुक्यांतील (पुण्याजवळील) एक गांव. पुण्याच्या वायव्येस ४ मैलांवर आहे. याची लोकसंख्या १९४१ सालीं २६,२८५ इतकी भरली. या ठिकाणीं १८१७ च्या नोव्हेंबरच्या ५ व्या तारखेस इंग्रज व पेशवे यांच्यामध्यें लढाई झाली. मुंबई इलाख्यांतील हें प्रमुख लष्करी ठिकाण असून या ठिकाणीं तोफखाना व पलटणी आहेत. हत्यारें व दारूगोळा तयार करण्याचा येथें एक कारखानाहि आहे. खडकी एज्युकेशन सोसायटीनें खडकी व आजूबाजूचीं गांवें यांत प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण्याकरितां कांहीं शाळा काढल्या आहेत.

**खंडकाव्य**—कांहीं कथानक असलेलें दीर्घ काव्य. ऐतिहासिक, पौराणिक, सामाजिक यांसारखे याचे प्रकार पडतात. पावनखिंड, झांशीची राणी (तिवारी), महाराणा प्रतापसिंह, इ. ऐतिहासिक; विरहिणी राधा (रेंदाळकर), प्रसन्न राधा (तिवारी), गृहविहार (साधुदास) इ. पौराणिक; तर अभागी कमल (गिरीश), बन्दीशाळा (यशवंत), जानकी (मनाठकर), इ. सामाजिक खंडकाव्यें म्हणतां येतील. आधुनिक कवी कच्च्या दमाचे म्हणून त्यांच्याकडून खंडकाव्यें होत नाहींत, असा एक आरोप आहे. तो खराखोटा ठरविणें कठिण असलें तरी आज महाकाव्य होत नाहीं, हें सिद्धच आहे. या खंडकाव्याची रचना विविध प्रकारची असते. राजकवि यशवंत यांच्या 'काव्यकिरीटां'त अनेक वृत्तें पाहावयास मिळतील तर 'कलें'त एकच वृत्त आहे. माधवजूलियनचीं 'सुधारक' आणि 'नकुलालंकार' हीं खंडकाव्यें प्रदीर्घ व उपहासात्मक आहेत.

**खडखड्या नाग**—(रॅटल स्नेक). हा एक सर्पवर्गीतील प्राणी असून बहुधा अमेरिकेमध्यें आढळतो. याच्या शेपटीच्या शेवटीं एकमेकांस जोडलेले कांहीं मणके असतात. ते शेपटी हालविली असतां खडखड असा आवाज करतात व त्यामुळें याची भीति वाटते. हा भयंकर विषारी आहे. याच्या एका जातीच्या अंगावर पट्टे असतात. हा स्वभावतः आळशी असून बहुधा मनुष्यावर हल्ला करीत नाहीं. याची लांबी सरासरी ५ फूट असते. हा उंदीर, खारी, वगैरे प्राण्यांवर उपजीविका करतो.

**खंडगिरि**—ओरिसा, पुरी जिल्ह्याच्या खुर्दा पोटविभागांतील एक डोंगर. हा भुवनेश्वराच्या पश्चिमेस ४ मैलांवर आहे. याला दोन वेगळीं शिखरें असून उत्तरेकडील शिखराला उदयगिरि व दक्षिणेकडील शिखराला खंडगिरि म्हणतात. तथापि खंडगिरि हें नांव सबंध डोंगरालाहि लावितात. यावरील लेणीं जैन आहेत. सर्वांत जुनें लेणें खारवेल राजाच्या वेळचें आहे. पृथ्वीगुंफा लेण्यांतील या राजाचा मोठा लेख खि. पू. १५५ तील आहे.

**खंडाळा**—पुण्याच्या वायव्येस ४२ मैलांवर सह्याद्रीच्या पहाडांत हा गांव आहे. ठिकठिकाणीं पहाडांत झोंपड्या व बंगले दृष्टीस पडतात. नवीन वसलेल्या गांवाच्या व पश्चिमेकडील डोंगराच्या मध्यें एक मोठा तलाव आहे. अगदीं नैर्ऋत्यभागीं उंबरीच्याहि पलीकडे 'ड्यूक्स नोझ' (ड्यूक ऑफ वेलिंग्टनचें नाक) किंवा नागफणी किंवा विंचवाची नांगी अशा आकारावरून निरनिराळ्या नांवांनीं संबोधिलें जाणारें शिखर आहे. हवा खाण्याचें ठिकाण म्हणून खंडाळा प्रसिद्ध आहे.

**खडीचा दगड**—हा एक मऊ अभ्रकाच्या जातीचा खनिज पदार्थ आहे. हा हातास मऊ व गुळगुळीत लागतो, त्यावरून याला इंग्रजींत 'सोप स्टोन' असें म्हणतात. याची एक हलकी जात आहे. तिचा भांडीं, वगैरे करण्याकडे उपयोग होतो म्हणून तिला 'पॉट स्टोन' असें म्हणतात. हिंदुस्थानांत दरसाल सुमारें ३५,००० टन दगड निघत असावा असा एक अंदाज आहे. यांपैकीं चांगल्या प्रकाराचा अभ्रक मद्रास, मध्यप्रांत, राजपुताना, व ब्रह्मदेश यांमध्यें निघतो.

पेले, बशा, नक्षीच्या पेट्या, टांकांचे दांडे, कागदावर ठेवण्याचीं वजनें, वगैरे करण्याकरितां या दगडाचा पुष्कळ उपयोग होतो. या दगडाच्या मूर्तीहि करतात.

**खडीचें काम**—हिंदुस्थानांत, विशेषेंकरून महाराष्ट्र व गुजरात प्रांतामध्यें बायकांच्या साड्या, चोळ्या, पातळें यांवर ठशानें खडी काढण्याचा पुष्कळ प्रघात आहे. कारण खडीच्या योगानें कापड जास्त शोभिवंत दिसतें. खडी करण्याकरितां लागणारें सामान फार खर्चाचें नसून हा धंदा पुष्कळ लोकांना करतां येतो. पुणें, मुंबई, पंढरपूर, नाशिक, सातारा, सोलापूर, वगैरे ठिकाणीं खडीचें काम फार उत्तम होतें. पण छापील काम (पांढऱ्या पातळावरचें) निघाल्यापासून या कामाला मागणी फार कमी आहे.

जवसाचें तेल व राळ एकत्र करून तें मिश्रण शिजवून, या रोगणांत सफेता कालवून व तो पांच दिवस झांकून ठेवून नंतर

सहाव्या दिवशीं खडीच्या कामास घेतात. कुरड्या घालण्याचा जसा शेवगा ( सोऱ्या ) असतो त्याप्रमाणेंच पितळ्याच्या निरनिराळ्या आकृतींचे व नक्षीचे छाप किंवा आंत पोकळ असलेले ठसे असतात. ते घेऊन त्यांच्या आंत वर सांगितलेले सफेत्याचे मिश्रण घालून त्या ठशांत दांडा बसवून कापडावर खडीचा छाप उठवितात. याप्रमाणें खडीची नक्षी काढल्यावर त्याजवर कोणी कोणी ती ओली आहे तोंच अभ्रकाची वस्त्रगाळ पूड टाकून वस्त्र झाडून नक्षी वाळवितात. हा धंदा सोपा व फायदेशीर आहे. कोणी सोनेरी वस्त्रगाळ पूड वर टाकतात. कोणी खडीचे ठिपके उठवून त्यावर भिंगाच्या टिकल्या बसवितात. कोणी सरस व साखर यांच्या बलकांत सफेता कालवून त्याची खडी तयार करून छाप उठवितात.

**खडू**— हा चुनखडीचा एक प्रकार आहे. समुद्रांतील लहान प्राण्यांच्या कवचांपासून बहुधा हा तयार होतो. युरोपांत अशा खडूचे डोंगरच्या डोंगर आहेत. इंग्लंडमध्यें सुमारें १२०० फूट जाडीचे डोंगर असून दरसाल सुमारें ६८,७०,००० टन इतका खडू औद्योगिक कामासाठीं काढण्यांत येत असतो. पोर्टलंड सीमेंटसाठीं हा जाळून वापरतात. खनिज पाणी आणि मेणकापड तयार करण्यासाठीं खडू उपयोगी पडतो. कृत्रिम खडू रेखाकले( ड्रॉइंग )साठीं तयार करतात.

**खडूचे खडक**—(क्रिटासिऑन्स सिस्टिम). भूस्तरशास्त्रामध्यें ज्युरासिक आणि एओसिन प्रस्तरांच्यामध्यें स्तराच्या मेसेझोइक संघांतील सर्वांत वरची ही प्रस्तररचना होय. या प्रस्तररचनेमध्यें मऊ पांढऱ्या खडूचे थर फार आढळतात म्हणून या रचनेस हें नांव पडलें आहे. इंग्लंडमध्यें व वायव्य फ्रान्समध्यें वरचे या जातीचे थर बहुतेक खडूचे असून त्याखालीं मातीचे व वाळूचे थर आढळतात. या थरांच्या वाळूमध्यें हिरवी वाळू बरीच आढळते. यांची रचना सामान्यतः आग्नेय इंग्लंडमध्यें पुढें दिल्याप्रमाणें आढळून येते: विल्डन थर, नंतर खालचा हिरव्या वाळूचा थर, गॉल्ट माती, वरच्या हिरव्या वाळूचा थर, नंतर खालचा, मधला आणि वरचा खडूचा थर. युरोपमध्यें खालच्या खडूच्या थरांमध्ये गॉल्टपर्यंतच्या थराचा अंतर्भाव करतात.

**खंडेपारा**—ओरिसांतील एक जुनें मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ २२९ चौ. मैल. मूळचें हें संस्थान नयागडचा एक भाग होता. पण २०० वर्षांपूर्वीं नयागडच्या राजाच्या एका भावानें हें आपल्यासाठीं विभक्त करून घेतलें. संस्थानचें उत्पन्न सुमारें एक लाख रुपये असून ब्रिटिशांना ४,२१२ रुपये खंडणी जात असे. लोकसंख्या ( १९४१ ) ८७,३४१. संस्थानांत एकंदर गावें ३२५ असून सर्वांत महत्त्वाचें गांव कतिलो आहे. तीस-चाळीस प्राथमिक शाळा असून एक दुय्यम शाळा संस्थानचें खर्चानें चालते. आतां हें संस्थान ओरिसा प्रांतांत विलीन झालें आहे.

**खंडेराव गायकवाड** ( मृ. १८७० )—हे गायकवाड दुसरे खंडेराव महाराज होत. इ. स. १८५६ त हे गादीवर आले. इंग्रजांशीं फार राजनिष्ठ होते. ते इतके कीं, हिंदुस्थान सरकारनें स्वतंत्र ठराव करून म्हटलें आहे कीं, "१८५७ च्या बंडांत खंडेराव महाराजांनीं जी अपूर्व राजनिष्ठा व तात्कालिक साहाय्य दिलें तें जर दिलें नसतें तर इंग्रजांचा अमल पश्चिम हिंदुस्थानावर क्वचितच राहिला असता."

यांच्या वेळीं बडोद्यास बंदुका-तोफा ओतण्याचा व दारूगोळा करण्याचा कारखाना होता. खंडेराव महाराजांनीं सैन्य, जमाबंदी व न्यायखातें यांत बऱ्याच सुधारणा केल्या व लोकोपयोगी कामें सुरू केलीं. हे स्वतः फार मोठे पैलवानहि होते. सयाजीराव गायकवाड हे यांचे दत्तक पुत्र होत.

**खंडेराव गुजर**—शिवाजीचा एक सेनापति. प्रतापराव गुजर याचा हा खंडेराव पुत्र होय. झुल्फिकारखानानें फितुरीनें रायगड घेतला तेव्हां त्यांत येसूबाई व शाहू व कांहीं मानकरी मंडळी जी पकडली गेली त्यांत हा होता. औरंगजेबाच्या कैदेंत हे सर्व होते. औरंगजेबाची इच्छा शाहूस बाटविण्याची होती; परंतु तो हट्ट त्याच्या कन्येनें मोडला. परंतु शाहूच्याऐवजीं कोणी तरी मोठा सरदार बाटविण्याचा त्यानें हट्ट धरला, तेव्हां खंडोजी स्वतः आपखुषीनें मुसलमान होण्यास तयार झाला. पुढें हीं सर्व कैदेंतून सुटल्यावर व शाहू गादीवर आल्यावर खंडोजीच्यामुळें आपल्यावरील धर्मांतराचें संकट टळलें हें ओळखून शाहूनें खंडोजीस परळ खोऱ्यांतील साठ गांवांचें देशमुखी वतन इनाम दिलें. या खंडोजीचा मुसलमानी वंश हल्लीं परळीनजीक कामढी येथें राहत आहे. त्यांचीं नांवें मुसलमानी नसून हिंदूंचींच असतात. ते हिंदूंचे सणहि पाळतात.

**खंडेराव दाभाडे** ( मृ. १७२९ )— मराठ्यांचा एक सेनापति. येसाजी दाभाडे हा दाभाडे ( तालुके मावळ, जि. पुणें ) येथील मुकादम होता. येसाजी पुढें शिवाजीजवळ हुजऱ्या म्हणून राहिला. महाराज आग्र्यास गेल्यावर राजकुटुंबाची सेवा येसाजीनें चांगली केली. छत्रपति राजाराम जिंजीस गेल्यावर येसाजी त्याच्याबरोबर गेला. राजारामाला जिंजी सोडणें भाग पडल्यावर राजकुटुंबांतील मंडळींना पन्हाळ्यावर सुरक्षित पोंचविण्याची कामगिरी येसाजीवर होती. ती त्यानें चांगल्या बंदोबस्तानें पार पाडली. येसाजी मात्र पन्हाळ्यावर आल्यावर मेला. इकडे राजाराम येसाजीच्या दोन मुलांसह ( खंडेराव व शिवाजी ) जिंजीहून पन्हाळा गांठण्याच्या मार्गांत होता. मागें मोंगल लागले होते. या वेळीं खंडेराव व

शिवाजी यांनीं राजारामास पन्हाळ्यावर पोंचविण्याची शिकस्त केली. शेवटीं शिवाजीनें दौड करून राजारामास पाठीवर घेऊन पन्हाळ्यावर पोंचविलें, परंतु त्या श्रमांत शिवाजी छाती फुटून रक्ताच्या गुळण्या होऊन मरण पावला. राजारामानें खंडेरावास सेनाधुरंधर-पद दिलें. पुढें शाहू सुटून आल्यावर खंडेराव शाहूकडे गेला. शाहूनें त्याला सेनापतिपद दिलें. खंडेरावानें पुष्कळ लढायांत पराक्रम केला. बाळाजी विश्वनाथ याच्याबरोबरहि तो कर्नाटक व गुजरात प्रांतांत लष्करी व्यवस्थेला होता. तो वृद्ध झाल्यावर त्याचा मोठा मुलगा त्रिंबकराव हाहि मोहिमेवर निघूं लागला. इतिहासप्रसिद्ध वीररमणी उमाबाई ही याची पत्नी होय.

**खंडेराव पवार** (मृ. १७८३)— धारच्या यशवंतराव पवाराचा हा मुलगा. नारायणरावाच्या वधानंतर यानें राघोबादादांचा पक्ष स्वीकारला व यानें आनंदीबाईस धारेस आणून तेथील किल्ल्यांत तिच्या बाळंतपणाची सोय केली. ओढेकरांनीं बारभाईंच्या सांगण्यावरून धारेस वेढा दिला व त्यानंतर पुरंदरचा तह झाला. त्या वेळीं खंडेराव बारभाईंना मिळाला. याचे जप्त केलेले महाल याच वेळीं परत करण्यांत आले. महादजी शिंद्याबरोबर हा स्वारीवर जात असे.

**खंडेराव राजे शिर्के** (१७७५-१८४८)— भवानजी राजे शिर्के याचा हा मुलगा बुद्धिमान, शूर व कर्तृत्ववान् असून याच्यावर साताऱ्याच्या प्रतापसिंह उर्फ बुवामहाराज व शहाजी उर्फ आप्पासाहेब महाराज या दोघां छत्रपतींची विशेष मर्जी होती. वरील दोघां छत्रपतींचा हा मामा. याचे वडील कोंकणांतील डेरवण गांवचे इनामदार असल्यानें हें घराणें डेरवणकर शिर्के या नांवानें प्रसिद्ध आहे. साताऱ्याचा छत्रपति प्रतापसिंह व शहाजी यांच्या कारकीर्दींत याला सरलष्कर व सेनापति नेमण्यांत येऊन सातारा जिल्ह्यांतील कामठी व ल्हासुर्णे हीं दोन गांवें व कांहीं बागा त्यास इनाम देण्यांत आल्या. हा एक वजनदार सरदार असून मराठ्यांच्या गादीची उन्नति करण्याचे प्रयत्न यानें केले. तथापि इंग्रज सरकारशीं हा राजनिष्ठ होता.

**खंडेराव हरि** (मृ. १७९७)— हा महादजी शिंद्यांच्या प्रमुख सरदारांपैकीं एक होता. याचें आडनांव भालेराव असून हा खंडेराव आप्पा या नांवानें ओळखला जात असे. याचा उल्लेख १७८० पासून आढळतो. गोहदकर राण्याशीं जें युद्ध झालें त्यांत याचा विशेष पराक्रम दिसून आला. आग्र्याचा किल्ला घेण्याच्या कामीं खंडेरावाची कामगिरी पाहून त्याला भेलसे प्रांताचा सुभेदार नेमलें. खंडेरावाचे बहुतेक पराक्रम व राजकारण हीं दिल्ली प्रांतांत घडून आलीं. त्याला शिंद्यानें बादशहाकडून दिल्लीच्या किल्लेदारीचीं वस्त्रें देवविलीं. वृद्धावस्थेंत प्रकृतिअस्वास्थ्यामुळें कंटाळून यानें यमुनेंत जलसमाधि घेतली.

**खंडेराव होळकर** (१७२३-१७५४)—मल्हारराव होळकर याचा मुलगा व प्रसिद्ध साध्वी अहल्याबाई हिचा पति. १७५४ त राघोबादादा यांनीं अजमेरकडे मोहीम केली त्यांत खंडेराव हजर होता. सुरजमल जाट खंडणी देईना म्हणून त्याच्या कुंभेरीस मराठ्यांनीं वेढा दिला (१७५४ च्या जानेवारींत) असतां, किल्ल्यांतून जाटाकडील जेजालाची गोळी एकाएकीं हाताला लागून खंडेराव ठार झाला.

**खंडेलवाल**— एक ब्राह्मण जात. यांची वस्ती राजपुतान्यांत सर्वांत जास्त आहे. शेखावतीच्या सीमेवर असलेल्या जयपूर प्रांतांतील खंडेला शहरावरून यांचें नांव पडलें. आदिगौड अथवा उच्च वर्गाचे गौड ब्राह्मण यांची आपण एक शाखा आहों, असें ते प्रतिपादितात. याशिवाय खंडेलवाल म्हणून बनियांची एक पोटजात असून तिच्या हिंदु व जैन अशा दोन शाखा आहेत. १९११ सालीं खंडेलवालांची संख्या एकंदर ८२,४१४ होती. पैकीं ७१,८७० हिंदू व १०,५४४ जैन होते.

**खंडोजी खोपडे**—तर्फ उंत्रोळीचा हा देशमुख असून याच्या बापाचें नांव धर्मोजी होतें. खोपडे व जेधे घराण्यांत फार वर्षांपासून देशमुखीच्या वतनांबद्दल वारंवार तंटे होत. या तंट्यांत दोन्ही बाजूंचीं बरींच माणसें दगावलीं होतीं. शेवटीं या दोघांनाहि या तंट्यांचा तिटकारा निर्माण होऊन शिरवळचा हवालदार व इतर गांवांतील प्रमुख जमात यांच्यापुढें यांनीं आपला दावा मांडला. जमातीच्या निकालानुसार मोर तर्फेची देशमुखी जेधे यांना व उंत्रोळी तर्फेची देशमुखी खोपड्यांस मिळाली. खंडोजी खोपडे विजापूरचा मनसबदार म्हणून विजापूरचा नोकर होता. यानें शिवाजीची सत्ता वरपांगी कबूल केली; पण अफझुलखानाची स्वारी शिवाजीवर येतांच तो त्यास मिळाला व त्याच्या बायकामुलांस यानें साहाय्य दिलें. ही बातमी शिवाजीस कळतांच त्यानें याचा हातपाय तोडून वध केला.

**खंडोजी भोसले (नागपूरकर)** (मृ. १७८९)— यास चिमणाबापू असेंहि नांव आहे. हा नागपूरकर मुधोजी भोसल्याचा मुलगा अत्यंत धाडसी व शूर होता. सन १७८६ मध्यें बदामी येथें झालेल्या लढाईंत पेशव्यांच्या बाजूनें यानें बरेंच शौर्य गाजविलें. मुधोजीनें नाना फडणिसाच्या समजुतीखातर यास बंगालवर स्वारीस पाठविलें. पहिल्या मराठे-इंग्रज युद्धांत मुधोजी हा पेशवे, निजाम व हैदर यांना मिळाला. मुधोजीचें सांगण्यावरून खंडोजीहि या युद्धांत सामील झाला. पण मुधोजीच्या कानमंत्रानुसार दोस्तांचा विश्वासघात करून यानें हेस्टिंग्जला मदत केली. मुधोजीचा भाऊ बिंबाजी यास पुत्र

नसल्यानें त्यानें आपल्या पश्चात् आपलें ठाणें रतनपूर येथील राज्यकारभार पाहण्याचें काम खंडोजीवर सोंपवलें. त्याप्रमाणें बिंबाजी व त्याची पत्नी आनंदीबाई यांच्या पश्चात् रतनपूरचा कारभार यानें केला.

**खंडोजी माणकर**—एक मराठा वीर. हा खरवलीचा राहणारा होता. फिरंग्यांशीं १७३४ ते १७४० पर्यंत मराठ्यांच्या ज्या लढाया झाल्या त्यांत हा एक प्रमुख लढवय्या होता. ठाण्याचा किल्ला, वसईचा किल्ला, वगैरे काबीज करण्यांत खंडोजीचाच पराक्रम विशेष होता. याचे वंशज कुलाबा जिल्ह्यांत माणगांव तालुक्यांत खरवलीत राहतात. त्यांना खरवली, वगैरे गांवें इनाम आहेत.

**खंडो बल्लाळ** ( सु. १६६६–१७२६ )—हा शिवाजीचा आवडता व विश्वासू चिटणीस बाळाजी आवजी याचा दुसरा मुलगा. खंडो बल्लाळ शूर शिपाईहि होता. शिवाजीच्या मृत्यूनंतर संभाजीवर कलुशाची छाप पडल्यावर कलुशानें आपल्या आड येणाऱ्या बाळाजी आवजीस १६८१ त ऑगस्ट महिन्यांत परळीखालीं उरमोडीकांठीं मारलें व त्याचा मुलगा खंडो बल्लाळ यास साताऱ्याजवळ अजिमतारा गडावर नेऊन वाघाकडून खावविण्याची मसलत योजिली; परंतु येसूबाईस हें कळतांच तिनें त्याची सुटका केली. येसूबाईच्या आश्रयानें खंडो बल्लाळ हा संभाजीजवळ काम करी. परंतु तें त्याला धोक्याचेंच वाटे. फिरंग्यांच्याबरोबर संभाजीची लढाई झाली असतांना खंडो बल्लाळाच्याच शौर्यानें संभाजी दोनतीन वेळां वांचला. हें पाहून संभाजीनें १६८३च्या डिसेंबर महिन्याच्या अखेरीस त्याला चिटणिसाचीं वस्त्रे दिलीं व त्याचा मानसन्मान केला. १६८८ त संगमेश्वरीं संभाजी पकडला गेला हें कळतांच खंडो बल्लाळ यानें येसूबाईस मोठ्या युक्तीनें रायगडीं पोहोंचविलें. येसूबाईच्या मेण्यांत आपली मावसबहीण संतुबाई ठेवली. तिला येसूबाई म्हणून पकडल्यावर तिनें खंडोबानें दिलेली हिरकणी खाऊन प्राण दिला. शाहू सुटून आल्यावर खंडो बल्लाळ त्याच्याकडे गेला. पुढें बाळाजी विश्वनाथावर त्याचा विशेष लोभ होता. ते दोघे मिळून लढाईवर जात.

**खंडोबा**—एक अर्वाचीन हिंदु देवता. खंडोबा उर्फ मल्हारीमार्तंड किंवा मार्तंडभैरव हा बहुधा सर्व देशस्थ ब्राह्मणांचा कुलस्वामी असतो. जेजुरीस याचें एक प्रसिद्ध स्थान आहे. त्याची कथा जयाद्रिमाहात्म्यांत वर्णिली आहे. देशस्थांप्रमाणें रामोशी, धनगर हे खंडोबाचे उपासक असतात. खंडोबाला दोन बायका–( म्हाळसा व बाणाई ) एक वाणी व दुसरी धनगर जातीची—असून ह्यांसमवेत तो घोड्यावर बसलेला असतो. हातांत तलवार असते. वनस्पतिवर्गांत भंडारांत खंडोबाचें अस्तित्व आहे असें समजून भंडार पवित्र मानण्यांत येतो; रामोशी तर भंडाराची शपथ वाहतात. प्राणिवर्गांत कुत्र्याच्या रूपांत खंडोबा वास करतो असें मानतात. घरांतून पूजेंत खंडोबाच्या मूर्ती असतात. मूलबाळ होण्याकरितां खंडोबाला भक्त नवस करितात व मुलगा झाल्यास वाघ्या व मुलगी झाल्यास मुरळी करतात. अशा जुन्या वाघ्या-मुरळ्या महाराष्ट्रांत पुष्कळ ठिकाणीं आढळतात. पण आतां ही चाल बंद पडली आहे. खंडोबा हा महाराष्ट्रांतील प्राचीन वीर पुरुष असावा. पुढें त्याला कोणी स्कंधाचा किंवा शिवाचा अवतार समजूं लागले.

**खंडोबाचा घोडा**— याला 'उंट' असेंहि म्हणतात. हा नागतोड्याच्या जातीचा एक किडा आहे. याचे पुढचे दोन पाय प्रार्थनेच्या पवित्र्यांत असल्याप्रमाणें दिसतात. हा सरलपक्ष ( ऑर्थोप्टेरा ) वर्गांतील कीटक आहे.

**खड्गमत्स्य**— हा एक कंटकयुक्त कल्ले असलेल्या माशांचा वर्ग आहे. सामान्यतः हे भूमध्यसमुद्रांत व अटलांटिक महासागरांत आढळतात. यांची लांबी १२ ते १५ फूट व कधीं कधीं वीस फूटपर्यंतहि आढळते. याच्या शरीराचा तीनचतुर्थांश भाग म्हणजे पुढें आलेल्या वरच्या जबड्याचा तरवारीसारखा भाग होय.

**खंड्या**— चिमणीएवढा एक पक्षी. हा बहुरंगी असतो. याची चोंच लांब असून हा पाण्यांतील किडे खातो. रंगावरून याच्या दोन-चार जाती दिसतात.

**खतें**—शेतीला जमीन कसदार बनविण्यासाठीं नैसर्गिक किंवा कृत्रिम खतें घालावीं लागतात. झाडांना वाढीसाठीं जें अन्न लागतें तें नसलें किंवा कमी पडूं लागलें म्हणजे बाहेरून खतांच्या मार्गानें पुरवावें लागतें. उकीरड्याचें खत किंवा शेणखत हें फार महत्त्वाचें आहे. कृत्रिम रासायनिक खतांमध्यें नत्रयुक्त खतें ('नायट्रोजेनस), स्फुरयुक्त खतें ( फॉस्फेटिक), पालाशयुक्त खतें ( पोटॅसिक ), चुनखडी खतें ( कॅल्कॅरियस ) हीं येतात. निरनिराळ्या पिकांना निरनिराळीं खतें लागतात. पिकांचे बदल करूनहि जमीन कसदार करतां येते. हिंदुस्थानांत पूर्वी शेणखताचा जमिनीला चांगला पुरवठा होत असे; पण शेणाच्या गोवऱ्या करून त्या जाळण्याकडे लावल्या जात असल्यामुळें व उकीरड्यांची व्यवस्था नीट नसल्यामुळें जमिनीला पाहिजे तें अन्न मिळत नाहीं. आतां हिंदुस्थान सरकारचें याकडे लक्ष जात आहे. खतांच्या पुरवठ्यासाठीं नवीन कारखाने निघत आहेत.

आपल्याकडे जुन्या पद्धतीचीं खतें सोळा प्रकारचीं आहेत : ( १ ) सोनखत म्हणजे माणसाचें मलमूत्र, ( २ ) गुरांचें शेण व

मूत्र यांपासून तयार केलेलें खत, (३) गुरांच्या हाडांचें पीठ, (४) शेळ्या व मेंढरें यांच्या लेंड्या व मूत यांचें खत, (५) रक्ताची बुकणी, वाळलेलें व ताजें रक्त, (६) ढेपीची बुकणी, (७) कुजकें पाणी, (८) ज्यांना शेंगा येतात अशा झाडांच्या पानांचें खत, (९) झाडांचीं हिरवीं व वाळलेलीं पानें, (१०) सोन्याची बुकणी, (११) चुन्याची बुकणी, (१२) ताग म्हणजे सण बोरूचें खत, (१३) निळीच्या झाडांचें खत, (१४) तळ्याची कुजलेली माती अथवा नदीनाल्याचा गाळ, (१५) मेलेल्या गुरांच्या पोटांतला चावड, व (१६) रावड–हरएक प्रकारची जमीन भाजून होणारा क्षार.

**खत्री**— एक कोष्टी जात. या नांवाखालीं हिंदू, शीख, मुसलमान व जैन, इतक्या जाती येतात. त्यांची मुख्य वस्ती बंगाल, बिहार, ओरिसा, पंजाब, संयुक्त प्रांत, काश्मीर, मुंबई इलाखा इकडे आहे. *महाराष्ट्रांत यांची संख्या बरीच असून* यांचा इकडील मुख्य व्यवसाय जर व कलाबतू काढणें व पितांबर वगैरे रेशमी वस्त्रें तयार करणें हा होता. परंतु हल्लीं परदेशातून जर-कलाबतू येऊं लागल्यानें त्यांचा हा धंदा बसला आहे. त्यामुळें हे हल्लीं सावकारी करतात. यांच्यांत मौंजीबंधन करतात. विधवाविवाह यांच्यांत निषिद्ध आहे. खालीं मद्रासकडे यांच्या चालीरीती तिकडील पटवेगार जातीप्रमाणें असून त्यांच्यांत रोटीव्यवहार चालू आहे. हे खत्री आपणांस रेणुकापुराणाच्या आधारानें क्षत्रिय म्हणवितात. परशुरामाच्या भयानें क्षत्रियांच्या गर्भवती स्त्रिया कालीमातेच्या आश्रयास गेल्या. त्याना संतति झाल्यावर कालीनें तिच्या हातीं चरखे दिले. तेव्हांपासून ही जात विणकामाचा धंदा करूं लागली, अशी दंतकथा सांगतात. तिकडे हिला पटनुलकर व भुजराज क्षत्रिय अशींहि दुसरीं नांवें आहेत. यांची कुलदेवता रेणुका आहे. यांच्यांत गोत्रेंहि आहेत. यांच्यांत लग्नविधि सात दिवस चालतो व त्या वेळीं ब्राह्मण अवश्य लागतो. लग्नसमाप्तीनंतर हे गोंधळ घालतात. आणि या सात दिवसांत मांसाहार वर्ज्य करितात. यांच्या पंचायतींतील पुढाऱ्यास ग्रामणी व दुय्यमास वंजा म्हणतात. हे शैवपंथी आहेत.

**खत्री, बाबू कार्तिकप्रसाद** (१८५२–१९०४)— एक हिंदी पंडित व ग्रंथकार. यांचे आजे बाबू गोविंदप्रसाद फार नांवाजलेले वैद्य होते. वडील बलदेवप्रसाद हेहि वैद्य असून 'शब्दकल्पद्रुम' नांवाचा वैद्यकावरील संस्कृत कोश त्यांनीं तयार केला. कार्तिकप्रसादजींनीं लहानपणीं वैद्यकग्रंथ मुखोद्गत केले. यांना हिंदी भाषेची फार आवड होती. 'प्रेमविलासिनी' व 'हिंदीप्रकाश' हीं दोन हिंदी पत्रें कांहीं दिवस यांनीं चालविलीं होतीं. हिंदी नंदकोश व केशवसेनकृत वैद्यकनिघंटु अकारादि वर्णानुक्रमें त्यांनीं तयार केला व 'सारस्वतदीपिका' प्रसिद्ध केली. ते 'भारतजीवन' पत्राचे कांहीं दिवस संपादक होते. १९०० सालीं इंडियन प्रेस (प्रयाग) मधून 'सरस्वती' पत्रिका निघूं लागली. तिच्या संपादक-समितींत बाबू महाशय होते. काशी येथील नागरी प्रचारिणी सभेचे ते एक सभासदहि होते. उपाहरण, जया, प्रमिला, दीनानाथ, मधुमालती, कुलटा, शिवाजी, पाकराज, विक्रमादित्य, अहल्याबाई, मीराबाई, इत्यादि स्वतंत्र पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. याप्रमाणें हिंदी भाषेची त्यांनीं अखंड सेवा केली.

**खंदक**—(एन्ट्रेन्चमेंट). युद्धामध्यें शत्रु समोर असतांना त्याच्या माऱ्यापुढें उघड्या जमिनीवर बसणें किंवा आसरा घेणें अशक्य होतें. अशा वेळीं खंदक खणून त्यात आश्रय घेण्याची पद्धति अस्तित्वांत आली. अशा तऱ्हेच्या खंदकामध्यें मुख्यतः *पुढील गोष्टी लक्षांत घेण्यांत येतात*: (१) *खंदकापुढील भिंत* सुमार दीड फूट उंच असून ५ फूट जाडीची असते. (२) या खंदाकाचे मधून मधून आडवे तुकडे पाडण्यांत येतात व त्यां प्रत्येक तुकड्याच्या शेवटीं एखादा बुरूज बांधण्यांत येतो किंवा वळण घेण्यांत येतें. याप्रमाणें प्रत्येक सरळ तुकडा ३० फुटांपेक्षां मोठा असतां कामा नये. यामुळें तोफेचा गोळा येऊन फुटला तरी त्याचा परिणाम फार दूरवर होत नाहीं. (३) खंदकाच्या मागील बाजूस जे गोळे येऊन फुटतात त्यांचा परिणाम होऊं नये म्हणून खंदकाच्या मागील बाजूस एक भिंत बांधण्यांत येते. (४) शत्रूच्या तोफांच्या माऱ्यामुळें खंदकाच्या बाजूची माती पडून खंदक होरला जाऊन सैनिक त्याखालीं पुरले जाऊं नयेत म्हणून खंदकाची तोंडाची रुंदी अधिक ६ फुटांपर्यंत असावी. (५) खंदकाला लागून खड्डे खोदलेले असून त्यांत कांहीं सैनिक बसण्याची व्यवस्था असली पाहिजे.

अलीकडील खंदक खोल असतात. वेलिंग्टनच्या काळांत खंदकांची एकेरी रांग असे. आतां खंदकांच्या परस्परांस जोडलेल्या रांगांच्या रांगा असतात. अशा रांगांचे पुन्हां तीन पट्टे असतात व हे पट्टे सुमारें प्रत्येकीं एक मैलपर्यंत रुंद पसरलेले असून परस्परांस जोडलेले असतात. अगदीं पुढचा पट्टा प्रत्यक्ष शत्रूला भिडलेला असतो. यावर पहिला भार पडतो, नंतर दुसरा युद्धाचा व तिसऱ्यांत राखीव सैन्य असतें.

या खंदकाखेरीज पूर्वी किल्ला किंवा गांव याभोंवतीं मोठाले चर खणीत व त्यांत पाणी सोडीत; यामुळें शत्रूला एकदम आंत येतां येत नसे.

**खंदक गरनाळे**—(ट्रेंच मॉर्टर्स). हा तोफांचा प्रकार सर विल्फ्रेड स्टोक्स यानें १९१५ मध्यें शोधून काढला. यामध्यें भारी, मध्यम व हलक्या असे तीन प्रकार असतात. त्यांच्या मानानें

कमी-अधिक जाडीच्या पोलादाच्या नळ्या असून त्यांचें एक टोंक भक्कम केलेलें असतें. व त्यापासून एक पोलादाचा सुळका बाहेर निघालेला असतो. या सुळक्याच्या साहाय्यानें बार उडतो. या तोफेच्या टोंकाखालीं एक पोलादाचा तक्ता बसविलेला असतो. त्यामुळें ही तोफ जमिनींत रुतत नाहीं. पुढील तोंड एका तिपायीवर ठेवलेलें असतें. तें वाटेल तसें व वाटेल त्या ८५ अंशांपर्यंतच्या कोनापर्यंत फिरवितां येतें. याचे गोळे निमुळते असून मोठे चमत्कारिक असतात. याच्यामागें काडतूस असतें. हा गोळा अधिक लांब अंतरावर टाकावयाचा असल्यास त्यावर कॉर्डाइटच्या वाटोळीं कडीं अधिक बसविण्यांत येतात म्हणजे त्याची शक्ति वाढते. ही तोफ उडविण्याकरितां तींत तोंडाकडून गोळा टाकण्यांत येतो व त्या गोळ्याच्या मागील काडतुसास आंतील सुळक्याचें टोंक लागून त्याच्या वजनामुळेंच तो उडतो. याप्रमाणें जितक्या जलद गोळे टाकतां येतील तितक्या जलद ही चालवितां येते. एका मिनिटास तीसपर्यंत गोळे या तोफेंतून उडवितां येतात.

**खदिरादिगुटी**—एक आयुर्वेदीय औषध. यांतील मुख्य औषधें खैराचा कात, पोखरमूळ, काकडाशिंगी, कायफळ, भारंगमूळ, हिरडा, त्रिकटु, लवंग, अतिविष, चडीशेप, धमासा, गूळवेल, रिंगणमूळ, डोरलीमूळ, बेहडा हीं होत. आल्याचा रस, बाभळीच्या सालीचा काढा व अडुळशाचा रस यांच्या भावना देतात.

घसा दुखणें, आवाज बसणें, खोकला येणें, छातींत दुखणें, बेडका न सुटणें, खोकतांना जीव कासावीस होणें, इत्यादि लक्षणें असतांना या औषधाचा चांगला उपयोग होतो. खोकल्यामुळें बारीक ताप येत असेल तर तोहि बरा होतो. दम्यावर याचा साधारण बरा उपयोग होतो. याच्या १ ते २ गोळ्या खडीसाखरेबरोबर तोंडांत धरतात.

**खनिखोदन**—पृथ्वीच्या पोटांतून खनिज द्रव्यें काढण्याच्या सर्व पद्धतींचा खनिखोदन या विषयांत अंतर्भाव होतो. याच्या साध्या दोन पद्धती आहेत: एक, उघडया खाणींत खणून पदार्थ बाहेर काढणें; व दुसरी, पृथ्वीच्या पोटांत पृष्ठभागाखालीं खोल जाऊन तेथून खनिज द्रव्यें काढणें. अशा रीतीनें खाणींतून दगडी कोळसा, अशुद्ध धातू (यांपासून लोखंड, शिसें, वगैरे धातू काढण्यांत येतात), इमारतीचा दगड, मीठ, रत्नें, वगैरे पदार्थ काढण्यांत येतात. प्रत्यक्ष खाण खोदून तींतून खनिज पदार्थ काढण्यापूर्वी कांहीं गोष्टी कराव्या लागतात. प्रथम विशिष्ट खनिज पदार्थ एखाद्या ठिकाणीं आहे किंवा नाहीं हें पाहण्याकरितां जमिनींत एक खोल छिद्र घ्यावें लागतें व त्यांतून निघणाऱ्या द्रव्यांची परीक्षा करावी लागते. प्रत्यक्ष खाण खोदण्याचें काम हातांनीं किंवा यंत्राच्या साहाय्यानें करण्यांत येतें. यंत्रें चालविण्याकरितां वाफ, पाणी, दाबलेली हवा किंवा वीज यांचा उपयोग करण्यांत येतो. तसेंच स्फोटक द्रव्याचे सुरुंग लावण्यांत येतात. खाण खडकामध्यें असेल तर खोदलेल्या भागास दुसरा आधार देण्याची आवश्यकता नसते; तथापि बहुधा खाण खोदणाऱ्यास छप्पर, खाणीच्या बाजू, आणि काम करण्याच्या जागा, वगैरेकरितां कांहीं तरी आधार द्यावा लागतो.

जेव्हां खनिज पदार्थ पृष्ठभागापासून बऱ्याच खोलीवर असेल तेव्हां जमिनींत खोल सरळ उभे किंवा एक बाजू तिरपी उतरती ठेवून खड्डे घ्यावे लागतात व उतरत्या अथवा बोगद्यासारख्या मार्गांनीं वगैरे खाणींत जाऊन पदार्थ वर आणावे लागतात. खाण खोदण्याच्या कामांत अनेक प्रकारच्या योजना करण्यांत येतात. व निरनिराळ्या पद्धतीनें आंतील द्रव्य वर आणण्याची तजवीज करण्यांत येते. उदाहरणार्थ: (१) एका पद्धतींत खनिज पदार्थ सर्व खोदून न काढतां त्यांचा कांहीं भाग खांबासारखा आधाराकरितां राखून ठेवण्यांत येतो (चेंबर्स पद्धति). (२) दुसरी पद्धति दगडी कोळसा व लोहधातु काढण्याच्या कामीं वापरतात. या पद्धतींत जेथपासून खनिज द्रव्याचा थर सुरू होतो त्या मर्यादेपर्यंत जमिनीच्या पोटांत मार्ग खोदण्यांत येतात. परंतु बराचसा भाग खांबासारखा राखून ठेवण्यांत येतो. नंतर या खांबाचा थोडा थोडा भाग खोदून काढण्यांत येतो. मात्र बाहेरून त्यांत इतर घाण पडणार नाहीं व वरचें छप्पर खालीं येणार नाहीं एवढ्याकरितां थोडा भाग आधार म्हणून राखून ठेवण्यांत येतो (पिलर अँड स्टॉल पद्धति). (३) तिसऱ्या पद्धतीमध्यें जसजसा खनिज पदार्थाचा पट्टा गेला असेल तसा तो त्या पट्ट्याप्रमाणें खोदून काढण्यांत येतो. जेथें काम करावयाचें असेल त्या ठिकाणीं वरच्या बाजूस लांकडें देऊन छप्पर तयार करण्यांत येतें व जसजसें काम पुढें जाईल तसें मागील छप्पर पाडण्यांत येतें (लॉग वॉल पद्धति).

खोल खाणीमध्यें सांचणारें पाणी काढून टाकणें व आंत हवा खेळती ठेवणें या दोन महत्त्वाच्या गोष्टी असतात. आणि या गोष्टींकडे शिल्पशास्त्रज्ञाचें (इंजिनिअरचें) सारखें लक्ष असावें लागतें. सांचणारें पाणी थोडें असल्यास बादल्यांच्या रहाटानें किंवा बहुतेक पंपाच्या साहाय्यानें काढून टाकण्यांत येतें. खाणींतून निरनिराळे वायू बाहेर पडत असतात. उदा.: १ मेथेन किंवा कर्बोज्ज अथवा फायरडँप—आगसरदी. २ कर्बाम्ल अथवा कॅरबॉनिक ॲसिड गॅस किंवा कृष्णसरदी. खाणींत हवा खेळविण्याकरितां दोन पद्धती उपयोगांत आणण्यांत येतात। एक स्वाभाविक व दुसरी कृत्रिम. स्वाभाविक पद्धतीमध्यें दोन भागांतील उष्णमान निरनिराळें राखण्यांत आलें

कीं स्वाभाविकपणेंच हवा खेळती राहते. दुसऱ्या कृत्रिम पद्धतीमध्यें हवा खेळण्याकरितां हवेच्या प्रवाहास साहाय्य करण्यांत येतें तें कृत्रिम उष्णता उत्पन्न करून किंवा कांहीं यांत्रिक साधनांच्या साहाय्यानें. अर्वाचीन काळीं उष्णता पुरविण्याऐवजीं पंखे फिरते ठेवून हवा खेळविण्याची पद्धति विशेष अवलंबिली जाते.

खाणींत उजेडाकरितां चरबीच्या मेणबत्त्या सामान्यतः वापरण्यांत येतात. तेलाचे दिवेहि कांहीं ठिकाणीं वापरण्यांत येतात, पण इंग्लंड व वेल्समध्यें उघडे तेलाचे दिवे बहुधा वापरण्यांत येत नाहींत. डेव्हींचे संरक्षक दिवे अनेक खाणींतून वापरण्यांत येतात. अलीकडे बहुतेक खाणींतून विजेचे दिवे वापरण्यांत येतात.

**खनिजशास्त्र**— खनिज द्रव्यांचें वर्णन व अभ्यास करण्याच्या शास्त्रास खनिजशास्त्र म्हणतात. खनिज पदार्थांची शास्त्रीय व्याख्या अशी आहे कीं, जो नैसर्गिक निरिंद्रिय पदार्थ विशिष्ट रासायनिक घटनेचा असून विशिष्ट अनुकूल परिस्थितींत विशिष्ट स्फटिकरूप धारण करूं शकतो त्यास खनिज पदार्थ म्हणतात. या व्याख्येमध्यें ज्यांना आपण लौकिक भाषेंत खनिज म्हणतों असे दगडी कोळशासारखे बरेच पदार्थ अन्तर्भूत होत नाहींत. कांहीं संकीर्ण किंवा क्लिष्ट खनिज द्रव्यांची रासायनिक घटना ठरविणें बरेंच कठिण असतें. या शास्त्रामध्यें पृथक्करणापेक्षां संकलन अधिक महत्त्वाचें आहे व अनेक खनिज पदार्थ शुद्ध रासायनिक द्रव्यांपासून योग्य परिस्थितींत कृत्रिम पद्धतीनें तयार करण्यांत येतात. खनिज द्रव्याची जात ठरविण्याचें काम त्याच्या स्फटिकांचें कोणमापकानें (गोनिओमीटर) मापन करून त्याचें विशिष्ट स्फटिक-पद्धतीमध्यें वर्गीकरण केल्यानें बरेंच सुलभ होतें. तसेंच खनिज द्रव्याच्या स्फटिकांचें विशिष्टगुरुत्व व काठिण्य यांचें ज्ञान बरेंच उपयुक्त असतें. अशुद्ध धातूंच्या बाबतींत त्याचा रंग हाहि एक निर्णायक गमक असतो. उदाहरणार्थ, सुवर्ण माक्षिक, अथवा लोहद्विगंधकिदाचे (आयर्न डाय सल्फाइड) घनाकृति स्फटिक नेहमीं पितळासारखे पिंवळे दिसतात, आणि निकलित अथवा निकलतालिद (निकल आर्सेनाइड) हें नेहमीं तांब्यासारखें तांबडें दिसतें; माणिक आणि नीलमणि हे दोन्हीहि कुरुंदापासूनच म्हणजे स्फटप्राणिदा (अल्युमिनम ऑक्साइड) पासून स्फटिकरूपानें निरनिराळ्या अवस्थेंत बनतात; तसेंच चित्रखनिज (फ्लुओरस्पार) हा खटस्फुरिद (कॅल्शियम फ्लुओराइड) असून त्याचा रंग जांभळा, हिरवा, पिंवळा किंवा तांबडसरहि असतो. साध्या रासायनिक परीक्षेनें विशेषतः फुंकनळीच्या साहाय्यानें खनिज पदार्थांची जात ठरविणेंहि उपयुक्त असतें. मात्र हें करीत असतां रासायनिक क्रियेखेरीज इतर बाबींपासून विशिष्ट द्रव्यावर होणाऱ्या परिणामांकडे चांगलें लक्ष दिलें पाहिजे. गेल्या शंभर वर्षांत खनिज द्रव्याची दृक्शास्त्रदृष्ट्या बरीच तपासणी करण्यांत आली आहे. आणि आतां अगदीं सूक्ष्म स्फटिकांचीहि त्यांचे अगदीं पातळ पापुद्रे ध्रुवीकरण करणाऱ्या सूक्ष्मदर्शकाखालीं ठेवले असतां निश्चित परीक्षा करतां येऊं लागली आहे.

**खनिजोदकें**— (मिनरल वॉटर्स). ज्या झऱ्यांच्या पाण्यांत खनिज विरून पाणी औषधाच्या उपयोगी झालेलें असतें त्यांना म्हणतात. सिंधु (सोडियम्), मग्न (मॅग्नेसियम्), लोह, कर्बिकाम्ल (कॉर्बॉनिक ॲसिड) व गंधक हीं द्रव्यें या पाण्यांत मोठ्या प्रमाणावर असतात. युरोपांत एक्सलाशापेल, वेडनवेडन, बुडापेस्ट, बाथ, व्हिशी, इ. ठिकाणें खनिजोदकांविषयीं प्रसिद्ध आहेत. आपल्याकडेहि सिंहगडावरचें देवटाकें, कांहीं विहिरी वगैरेंतील पाणी औषधि म्हणून वापरतात.

**खनियाधान**— मध्यहिंदुस्थान एजन्सींतील एक सनदी संस्थान. क्षे. फ. ६८ चौ. मै.. याच्या पूर्वेस झांशी जिल्हा व बाकीच्या बाजूंस ग्वाल्हेर संस्थानचा प्रदेश येतो. ग्वाल्हेरचा रेसिडेंट ब्रि. सरकारतर्फे यावर देखरेख ठेवीत असे. प्रथम खनियाधान ओर्च्छांचा एक भाग म्हणून असे. पण १७२४ त ओर्च्छांचा महाराजा उदोतसिंग यानें आपला मुलगा अमरसिंग याला हें जहागीर म्हणून देऊन टाकिलें. इ. स. १७४५ त पेशव्यांनीं अमरसिंहाला सनद देऊन जहागीरीवर कायम केलें. १८५४ त झांशी खालसा झाल्यावर त्या वेळच्या खनियाधानच्या संस्थानिकानें निर्भेळ स्वातंत्र्याची मागणी केली. पण पेशव्यांचे राजकीय वारसदार म्हणून ब्रिटिशांनीं आपलें स्वामित्व प्रस्थापित करून १८६२ त एक सनद करून दिली. दत्तक घेण्याचा हक्कहि या वेळीं देण्यांत आला. संस्थानिक बुंदेला रजपूत असून ह्यांना जहागीरदार म्हणतात. हें संस्थान आतां मध्यभारत संस्थान संघांत सामील झालें आहे.

संस्थानची लोकसंख्या सुमारें वीस हजार. मुख्य भाषा बुंदेलखंडी आहे. शिक्षणाचें प्रमाण अत्यल्प आहे. मुख्य जाती ठाकुरी रजपुती असून या सर्व शेतकीवर उपजीविका करतात. संस्थानांत ४९ खेडीं आहेत. संस्थानचें उत्पन्न सुमारें अर्धा लाख रुपये आहे. संस्थानिक स्वतः सर्व राज्यकारभार पाहतात. खनियाधान हें मुख्य ठिकाण असून येथें एक किल्ला आहे.

**खन्सा**— ही कवयित्री अरब लोकांतील सुलैम जातीची असून सहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत जन्मली. ती वयांत येतांच मीरदास नांवाच्या एका गृहस्थाशीं तिनें लग्न केलें. मीरदासापासून तिला तीन मुलगे झाले. मीरदासाच्या निधना॰

नंतर तिनें पुनः दुसरें लग्न केलें. इस्लामी धर्माच्या प्रसारापूर्वी सत्त्र व मोआविय असे तिचे दोघे भाऊ मरण पावले. त्यांच्या व आपल्या बापाच्या निधनाविषयीं तिनें फारच सुंदर अशीं शोकगीतें लिहिलीं व त्यांमुळें तिचा चोहोंकडे बोलबाला झाला. युफाझ नावाच्या जत्रेप्रसंगी धुनियानीनें अश या कवीला कवींमध्यें पहिला मान देऊन त्याच्याखालोखाल हिला दुसरा मान दिला. आपल्या जातीबरोबरच हिनेंहि इस्लामी धर्म स्वीकारला. इस्लामी धर्माच्या प्रसारार्थ झालेल्या लढायांत तिचे चारहि मुलगे कामास आले. तिच्या मुलांनीं गाजविलेल्या शौर्याबद्दल अभिनंदनपर पत्र ओमरनें तिला लिहिलें व तिला तनखा तोडून दिला. ती ६४५ त मरण पावली. तिची मुलगी अमरा हीहि कवयित्री होती.

**खप**—अर्थशास्त्रांत मालाचें उत्पादन करतांना त्याच्या खपाचा विचार करणें अवश्य मानतात. गरजा आणि त्या भागविण्याचीं साधनें व गरजा भागविण्यापासून उत्पादनावर होणारा परिणाम या गोष्टी खपाचा प्रश्न पुढें येतो तेव्हां पाहाव्या लागतात. मालाचा माणसाला ज्या प्रमाणांत उपयोग होतो त्या प्रमाणांत त्याचा खप होत असतो. खपाचे दोन प्रकार पडतात: उत्पादक आणि अनुत्पादक. उत्पादकाची कार्यक्षमता वाढविणें व उत्पादनाला मदत करणें यांवर आधारलेले हे प्रकार आहेत. कला, उंची कपडे, उच्च शिक्षण यांवर झालेला खर्च कोणी अनुत्पादक समजतात, तर कोणी समजत नाहींत. याचप्रमाणें युद्धाच्या खर्चाची गोष्ट आहे. उपयोगी व निरुपयोगी असेहि दोन खपाचे प्रकार पाडतात. भट्टीला कोळसे पुरविणें उपयोगी, तर दारू अतोनात पिणें निरुपयोगी ठरेल. आज कारखानदार खपाकडे लक्ष न देतां मालाचें उत्पादन करतात व मग तो खपविण्यासाठीं सूक्तासूक्त प्रयत्न करतात. युद्धानंतरहि उत्पादनाला ऊत येऊन खपाचा मोठा विचार पडतो.

**खंबायत**—मुंबई, खेडा एजन्सींतील एक संस्थान. हें खंबायतच्या आखाताला लागून आहे. क्षे. फ. ३९२ चौ. मै., लो. सं. (१९४१) ९६,५०१. हवा समशीतोष्ण असून पाऊस सरासरी ३१ इंच पडतो. संस्थानांत ८७ गांवें आहेत. महत्त्वाचें गांव खंबायत आहे. शें. ८० लोक हिंदू आहेत. लोकांचा मुख्य व्यवसाय शेतकी आहे. तांदूळ, गहूं, कापूस, तंबाखू, नीळ हीं पिकें निघतात. माही व साबरमती नद्यांच्या कांठीं मोठ्या खारी जमिनी आहेत. येथें कलाबतूचें व कोरींव काम चांगलें होतें. १५व्या शतकापर्यंत खंबायतचा परदेशी व्यापार मोठा होता. तो पुढें सुरतेनें घेतला. संस्थानच्या मालकीची आगगाडी (तारापूर कँम्बे रेल्वे) बंदराच्या टोंकापर्यंत जाते. बंदर सुधारलें तर दर्यावर्दी व्यापाराला मोठा वाव आहे.

अकराव्या शतकांत खंबायत अनहिलवाड राज्यांतील मुख्य बंदर होतें. तें १२९८ त मुसलमानांनीं घेतलें. पुढें युरोपियन व्यापाऱ्यांचे हल्ले सुरू झाले. त्यांच्या वसाहती या ठिकाणीं होत्या. १७३० त खंबायत मोंगल साम्राज्यांतून निघून स्वतंत्र झालें. सध्यांचा राजवंश गुजराथच्या मोमिनखान सुलतानाचा वंश आहे. वसईच्या तहापासून संस्थान इंग्रजांचें मांडलिक बनलें व खंडणी देऊं लागलें. सध्यांचे गादीवर असलेले नबाब नजमउद्दिला मोमिनखान बहादूर मिर्झा हुसेन यावरखान १९१५ सालीं गादीवर बसले त्या वेळीं ४ वर्षांचे होते. त्यांना १९३० सालीं राज्याधिकार मिळाले. संस्थानचें उत्पन्न ९,६७,००० रुपये आहे. आतां संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

खंबायत शहर अहमदाबादपासून ५० मैलांवर आहे. लो. सं. सुमारें तीस हजार. शहराभोंवतीं ३ मैल घेराचा तट आहे. १३२५ सालांतील जामा मशीद आहे. बंदर वाळूनें भरल्यानें त्याचें महत्त्व कमी झालें. दगडावरचें सुंदर काम येथें होतें.

**खंबायतचें आखात**—मुंबईच्या उत्तरेचा किनारा आणि काठेवाड यांमधील समुद्राचा आंत गेलेला भाग. हा त्रिकोणाकृति आहे. आखाताच्या मुखाच्या पूर्वेस सुरत व पश्चिमेस पोर्तुगीजांचें दीव बंदर आहे. खंबायत शहर उत्तरेस वसलें आहे. या आखातांत पूर्वेकडून नर्मदा आणि तापी, उत्तरेकडून मही आणि साबरमती व पश्चिमेकडून काठेवाडांतील बऱ्याच लहान नद्या येऊन मिळतात. पूर्वी अरबस्तानाशीं या आखातांतून मोठा व्यापार चाले.

**खंबावती**—हा राग खमाज थाटांतून निघतो. याचा आरोह सात स्वरांचा व अवरोहांत ऋषभ वर्ज्य असल्यानें याची जाति संपूर्ण षाडव आहे. याचा वादी स्वर गांधार व संवादी धैवत आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर आहे. याच्या अवरोहांत पंचम स्वर वक्र होतो. या रागांत मध्यम सुटा सोडल्यानें हा अधिक खुलतो. हा क्षुद्रगीतार्ह आहे. या रागांत दोनहि निषादांचा प्रयोग झालेला दृष्टीस पडतो.

**खबूतर**— कबूतर पहा.

**खमटी डोंगर**— आसामच्या सरहद्दीवरील एक डोंगराळ प्रदेश. हा ब्रह्मपुत्रा खोऱ्याच्या पूर्व टोंकाशीं पसरला आहे. यांत शानवंशांतील खमटी जात राहते. ८ व्या शतकाच्या मध्यकाळांत जेव्हां ब्रह्मो राजानें मोगौंग जिंकून घेतलें तेव्हां खमटी लोक उत्तरेकडे सरकले. यांच्यापैकीं कांहीं आसामांत गेले व सदियाजवळ वसाहत करून राहिले. तेथें त्यांच्या पुढाऱ्यानें भोंवतालच्या प्रदेशावर आपली सत्ता स्थापून ब्रिटिशांनीं अहोम

राजाचा मुलूख घेतल्या वेळीं त्याकडून आपल्या राज्याला मान्यता मिळविली. पण त्याच्या मुलाला गादीवरून काढल्या वेळीं खमटी लोकांनीं इंग्रजांविरुद्ध बंड केलें ( १८३९ ). पण तें लवकरच मोडलें गेलें.

खमटी लोकांचें मुख्य ठिकाण चोरखमटी आहे. पुढें हेंच मोठें चोरखमटी गांव असून सदियापासून १९७ मैल दूर आहे. याच्या शेजारीं एकवीराचें देऊळ आहे. त्यांतील कांहीं बुद्धमूर्ती सुरेख घडविलेल्या आहेत.

**खमाज**—हा राग खमाज थाटाचा आश्रयराग आहे. या रागाच्या आरोहांत ऋषभ वर्ज्य, व अवरोह सातहि स्वरांनीं होतो, म्हणून त्याची जाति षाडव-संपूर्ण आहे. याचा वादी स्वर गांधार, संवादी निषाद आहे. या रागाचा गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात, कोणी याला सार्वकालिकहि मानितात. आरोहांत तीव्र निषाद घेण्यांत येतो. याच्या आरोहांत धैवतास व अवरोहांत पंचमास महत्त्व देऊं नये. यांत धैवत व मध्यम यांची संगति रक्तिदायक आहे. हा राग क्षुद्रगीतार्ह आहे.

**खरकसिंग**—पेशवाईतील एक गारदी सरदार. हा नारायणरावाच्या खुनांत सुमेरसिंगाचा मदतनीस होता. त्यासाठीं राघोबानें याला सरंजाम दिला. राघोबाच्या बाजूनें इंग्रज-मराठ्यांशीं युद्ध करीत असल्या वेळीं तळेगांवीं इंग्रजांचा पराभव होऊन खरकसिंग पेशवे सैन्याच्या हातीं लागला. त्याची चौकशी होऊन त्याला देहान्तशिक्षा मिळाली.

**खरगपूर**—( खड्गपुर ). बिहार, मोंघीर जिल्ह्यांतील एक गांव. खरगपूर परगणा दरभंगा संस्थानांत मोडतो. पाटबंधाऱ्याच्या कामासाठीं हें गांव प्रसिद्ध आहे. या ठिकाणीं मान नदीला बंधारा घातला आहे.

**खरगा**—ईजिप्त, वालुकामय प्रदेशांतील सर्वांत मोठी ओलवणीची जागा. ही जागा लिबियाच्या वालुकामय प्रदेशांत आहे. नाइल नदीच्या खोऱ्यांतील खरगा जंक्शनपासून या ओलवणीच्या स्थानाकडे छोट्याशा रेल्वे लाइननें जातां येतें. या स्थानाची दक्षिणोत्तर लांबी १०० मैल व पूर्व-पश्चिम १२ पासून ५० मैल आहे. पूर्वी या स्थानाच्या मोठ्या भागांत सरोवर होतें. हल्लीं या ठिकाणीं पाऊस पडत नाहीं किंवा एकहि सरोवर नाहीं, पण विहिरी मात्र पुष्कळ आहेत. खजुरीच्या बऱ्याच बागा या ओलवणींत आहेत. तांदूळ, गहूं, बार्ली हीं मुख्य पिकें होत. प्राचीन काळीं फारोहांच्या अमदानींत या ठिकाणीं बरीच वस्ती होती. आज त्या काळचे कांहीं अवशेष सांपडतात. त्यांपैकीं अॅमोनचें देऊळ मुख्य असून त्याची लांबी १४२ फूट, रुंदी ६३ फूट व उंची ३० फूट आहे. येथें एका रोमन किल्ल्याचा कांहीं भाग दिसतो व इतर रोमन व ख्रिस्ती अवशेषहि आढळतात. खरगा शहर ताडीच्या बनामध्यें वसलें असून फार टुमदार दिसतें.

**खरगोण**—इंदूर संस्थान, नेमाड जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. नर्मदेला मिळणाऱ्या कुंडी नदीवर हें वसलें आहे. मोंगलांच्या अमदानींत हें गांव प्रसिद्धीस आलें असावें. प्रथम माळवा सुभ्यांतील बिजागड सरकारच्या एका महालाचें हें मुख्य ठिकाण होतें. नंतर बिजागड सरकारचें मुख्य ठिकाण बनलें, त्या वेळचीं कांहीं घरें व कचरी अद्याप दिसतात. जिल्हा व परगणा यांच्या कचेऱ्यांखेरीज शाळा, तुरुंग, दवाखाना, ग्रंथालय वगैरे या गांवांत आहेत.

**खरबूज**—[ वर्ग–कुकुर्बिटासी–क्युक्युमिस मेलो ]. काकडीच्या जातीचे हे वेल व त्यांचीं फळें सर्व पूर्वेकडील देशांत आढळतात. यांच्या अनेक जाती आहेत व त्यांची लागवड सर्वत्र उष्ण प्रदेशांत मोठ्या प्रमाणांत करण्यांत येते. कलिंगडाप्रमाणेंच याचा वेल वाढतो. उन्हाळ्याची झळ लागल्यास याच्या बिया वांटून डोक्यास लेप देतात व रस अंगास चोळतात.

**खरसावान**—ओरिसा, छोटा नागपूर संस्थानांपैकीं एक. याचें क्षेत्रफळ १५३ चौ. मैल आहे. उत्तरेस रांची व मानभूम जिल्हे, पूर्वेस सरईकेला संस्थान व दक्षिण आणि पश्चिम या बाजूंस सिंघभूम जिल्हा आहे. मुख्य पीक तांदुळाचें आहे. बहुतेक डोंगरांतून लोखंड सांपडतें. सोनई नदींतील वाळूंत थोडेंसें सोनें सांपडतें. मागें तांबें सांपडत असावेंसें दिसतें. संस्थानचा सुमारें ४० चौ. मैलांचा प्रदेश जंगलानें व्याप्त आहे; त्यांत साल, आसन, गम्हार, कुसुम, बिआसाल, जामुन, व बांबू हीं मुख्य झाडें आहेत.

खरसावानचा संस्थानिक पोराहाट राजघराण्याच्या धाकट्या पातींतील आहे. मूळ पुरुष विक्रमसिंग व त्याचा वडील मुलगा सरईकेलाच्या गादीवर व धाकटा खरसावानच्या गादीवर बसला. १७९७ त ब्रिटिशांशीं संस्थानचा संबंध आला. १९१७ त संस्थानिकाला ब्रिटिश सरकारनें नवी सनद दिली. संस्थानांत एकंदर १८६ गांवें आहेत, सर्वांत खरसावान मोठें आहे. शेतकी हा लोकांचा प्रमुख धंदा आहे. तांदूळ, मका, कडधान्यें, ऊंस व तंबाखू हीं मुख्य पिकें होत. संस्थानच्या हद्दींत १२ मैल लांबीची बंगाल–नागपुर रेल्वे आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें ४५ हजार आहे. एक दुय्यम शाळा, कांहीं प्राथमिक शाळा, दवाखाना हीं संस्थानच्या खर्चानें चालतात. आतां संस्थान ओरिसा प्रांतांत विलीन झालें आहे.

**खरूज**— हा एक त्वग्रोग आहे. हा एका लहान अकॅरस जंतूमुळें होतो. यामुळें खाज सुटते व विशेषतः रात्रीं ती जास्त असते. तसेंच कातडीवर पुटकुळ्या उठून त्यांतून पू वाहूं लागतो व त्यांचे मोठाले फोड तयार होतात. मनगटें, हातापायांचीं बोटें, मांड्या, कांखा व पोटाच्या खालचा भाग या खरजेच्या मुख्य जागा होत. यावर उपचार करावयाचा म्हणजे फोडांतील सर्व जंतूंचा नाश करणें हा होय. याकरितां तीन दिवस चांगलें स्नान घालून व जोरानें चोळून फोडावर गंधकाचें मलम लावावें व प्रत्येक वेळीं कपडे बदलण्यांत यावे.

**खरे, नारायण भास्कर** (१८८४– )—एक महाराष्ट्रीय राजकीय पुढारी. यांचे वडील भिवंडी येथें वकील होते. यांचें शिक्षण प्रथम जबलपूर येथें झालें. नंतर सरकारी शिष्यवृत्ति मिळवून लाहोर येथील मेडिकल कॉलेजांत गेले. तेथून एम्. बी. मध्यें पहिले आल्यावर मध्यप्रांतांत असिस्टंट सर्जन म्हणून नोकरी करूं लागले व पुढें १९१३ मध्यें एम्. डी. झाले. त्यानंतर पुन्हां नोकरीवर रुजू झाले; पण १९१६ मध्यें ते लोकमान्य टिळक यांच्या व्याख्यानाला हजर राहिल्यामुळें अधिकाऱ्यांशीं मतभेद होऊन त्यांनीं राजीनामा दिला. १९१९ पासून हे काँग्रेसच्या कार्यांत प्रत्यक्ष पुढाकार घेऊन काम करूं लागले. १९२३ मध्यें गणेशपेठेंत हिंदूंची सवाद्य मिरवणूक मशिदीवरून नेण्याच्या बाबतींत यांनीं सत्याग्रह केला. १९२३ ते १९३० मध्यें हे मध्यप्रांत कायदेमंडळाचे सभासद होते. १९३० मध्यें यांनीं काँग्रेसच्या ठरावाप्रमाणें राजीनामा दिला. १९३१ सालच्या सत्याग्रहांत यांनीं भाग घेतला व त्यांस तुरुंगवासाची शिक्षा झाली. बॅरिस्टर मोरोपंत अभ्यंकर यांस पकडल्यानंतर हे मध्यप्रांताचे पुढारी होते व यांनींच जंगल-सत्याग्रहाची तयारी केली. १९२५ ते १९३१ पर्यंत यांनीं 'तरुण भारत' या नांवाचें मराठी साप्ताहिक चालविलें. पण तें भारी जामिनकी मागितल्यामुळें बंद करावें लागलें. १९२३ मध्यें यांनीं नागपूर अनाथ विद्यार्थी-गृहाची स्थापना केली. हरिजन सेवा संघाचे हे अध्यक्ष होते. बॅरिस्टर मोरोपंत अभ्यंकरांच्या मृत्यूनंतर मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून गेले. तेथें आर्यविवाह कायदा मंजूर करून घेतला. अ. भा. काँग्रेस कमिटीचे हे बराच काळ सभासद असून मध्यप्रांत मराठी काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. १९३७ मध्यें हे मध्यप्रांत असेंब्लीमध्यें निवडून येऊन प्रधान मंत्री झाले. पुढें यांचें इतर सहकारी मंत्र्यांशीं न पटल्यामुळें प्रसिद्ध खरे-प्रकरण उपस्थित झालें व त्यांत यांस मंत्रिपदाचा राजीनामा द्यावा लागला. नंतर ते हिंदुस्थान सरकारचे परराष्ट्र-मंत्री झाले. १९४७ सालीं स्वतंत्र हिंदी संघराज्य आल्यावर ते अलवारचे दिवाण झाले. पण गांधीखुनानंतर त्यांना ती दिवाणगिरी सोडावी लागली.

**खरे, वासुदेव वामन, शास्त्री** (१८५८–१९२४)—एक महाराष्ट्रीय ग्रंथकार व इतिहाससंशोधक. हे कोंकणांतील गुहागरचे रहिवासी असून घाटावर आल्यानंतर यांनीं साताऱ्यास अनंताचार्य गजेंद्रगडकर यांच्याजवळ संस्कृत विद्येचा अभ्यास केला. नंतर ते पुण्यास येऊन न्यू इंग्लिश स्कूलमध्यें संस्कृतचे शिक्षक म्हणून राहिले. मिरजेस नवीन हायस्कूल निघाल्यामुळें लो. टिळकांच्या सांगण्यावरून शास्त्रीबुवांना तेथें संस्कृत शिक्षक नेमण्यांत आलें. तेथेंच शास्त्रीबुवांनीं ३० वर्षें नोकरी करून विश्रांति घेतली. मिरजेस गेल्यावर त्यांनीं इंग्रजी भाषेचा अभ्यास स्वतः मेहनत करून केला. तेथें असतांना यांनीं इतिहाससंशोधनाचा उद्योग हातीं घेतला आणि सतत २७ वर्षें खपून मळेकर पटवर्धनी दप्तरांतील अमूल्य इतिहास-सामुग्री बाहेर काढून ती 'ऐतिहासिक लेखसंग्रह' नांवाच्या ग्रंथमालेच्याद्वारां महाराष्ट्राच्या हातीं दिली. त्यांना लहानपणापासून कविता करण्याचाहि नाद होता. त्यांची फुटकळ कविता बरीच असून 'यशवंतराव' नांवाचें एक खंडकाव्यहि प्रसिद्ध आहे. आतांपर्यंत त्यांच्या ऐ. ले. संग्रहाचे १५ भाग प्रसिद्ध झाले आहेत. (शेवटचे तीन भाग त्यांच्या चिरंजीवानें संपादून प्रसिद्ध केले). त्यांत १७६१–१८१० पर्यंतचा मराठ्यांचा इतिहास आलेला आहे. त्यांनीं कांहीं नाटकेंहि लिहिलीं आहेत (उदा., गुणोत्कर्ष, शिवसंभव, तारामंडळ, उग्रमङ्गल, इ.). यांशिवाय नाना फडणीस यांचा अधिकारयोग, हरिवंशाची बखर, इचलकरंजीचा इतिहास, वगैरे पुस्तकेंहि त्यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत.

त्यांना बहुतेक आयुष्य गरिबींत काढावें लागलें. त्यांनीं दोन तपें जें इतिहाससंशोधनाचें भरीव, सुव्यवस्थित आणि सूत्रबद्ध काम केलें तें कोणत्याहि उच्च प्रतीच्या विद्वानाला शोभण्यासारखें होतें. दीर्घ परिश्रमामुळें त्यांची प्रकृति ढांसळून त्यांना क्षयाची व्यथा जडली आणि शेवटीं ता. ११ जून १९२४ रोजीं मिरज येथें त्यांना देवाज्ञा झाली.

**खरोष्ट्र**—हें प्राचीन राष्ट्र हिंदुस्थानच्या वायव्येस सरहद्दीपलीकडे काशगर, खोतान, इ. प्रदेशांचा अंतर्भाव करणारें असावें. या राष्ट्राची जी लिपि ती खरोष्ट्री (खरोष्ठी) लिपि होय. बौद्ध-प्रदेशाचे हिंदुस्थान, खरोष्ट्र व चीन हे तीन भाग केलेले असत व त्यांतून तीन लिप्या प्रचारांत होत्या (ब्राह्मी, खरोष्ट्री आणि चिनी). खरोष्ट्री लिपि उजवीकडून डावीकडे लिहिली जात असे. खरोष्ठी पहा.

**खरोष्ठ ऋषि**—या ऋषीबद्दल सूर्यगर्भसूत्रामध्यें असा उल्लेख आहे कीं, "भद्रकल्पाच्या प्रारंभीं कंपा नामक नगरांत एक 'त-सन्. मो. भो. तो.' (महासम्मत) नांवाचा देवपुत्र राहात असे.

त्याच्या स्त्रीनें विलक्षण कामेच्छेनें एका गर्दभाशीं संभोग केल्यामुळें तीस गर्दभाचें शिर व मनुष्याचें शरीर असलेला एक विचित्र मुलगा झाला. त्याचा तिनें त्याग केल्यावर एका खरी राक्षसीनें त्याला नेऊन अमृत, वगैरे दैवी खाद्य पदार्थ दिले. देवांनीं त्यास खरोष्ठमहर्षि असें नांव दिलें. त्यानें दैवी आहार व वनस्पती खाल्ल्यामुळें व तपश्चर्या केल्यामुळें त्याचें मुख सुंदर झालें. मात्र ओठ तेवढे गर्दभासारखे राहिले. याला ग्रह, तारे, नक्षत्रें वगैरे ज्योतिषाचें फार ज्ञान असून तें त्यानें सर्व देव, यक्ष, उरग, नाग, असुर वगैरेंना दिलें.''

झोरोॲस्टर ( जरतुष्ट्र ) यालाहि फलज्योतिषाचें ज्ञान होतें, असें म्हणतात. त्याच्या ग्रीक नांवामध्येंहि हाच अर्थ निघतो. तेव्हां खरोष्ठ हें झरथुष्ट्र यासच दिलेलें दुसरें एखादें नांव तर नसेल ना अशी ति. लेव्ही हे शंका प्रदर्शित करतात. आपणांस हिंदु, सिथियन वगैरे नाण्यांवर व अन्यत्र अवेस्ता भाषेंतील अक्षरें आढळतात; व झरथुष्ट्र यास हे लोक पूज्य मानीत असत. यावरून कदाचित्–खरोष्ठ व झरोथुष्ट्र यांचा संबंध जोडणें शक्य आहे, व त्यामुळें झरथुष्ट्राच्या लिपी व खरोष्ट्री लिपि यांचाहि संबंध जोडणें शक्य आहे, असेंहि ते म्हणतात [ इं. अँ. १९०६ ].

**खरोष्ट्री लिपि**— भरतखंडांत ब्राह्मी आणि खरोष्टी या दोन लिप्या अस्तित्वांत असल्याबद्दल अशोककालीन शिलालेख व नाणीं आणि चिनी व बौद्ध ग्रंथ यांतून उल्लेख आहेत. ब्राह्मीसंबंधीं माहिती पुढें येईलच. अशोकोत्तरकालीं ग्रीक, शक, क्षत्रप, पार्थियन व कुशान या राजांचे लेख खरोष्ट्रींत लिहिलेले सांपडतात या लेखांच्या अभ्यासावरून असें दिसतें कीं, ही हिंदुस्थानांतील सार्वत्रिक लिपि नसून तिचा प्रचार फक्त वायव्येकडील कांहीं भागांतच होता. हिची उत्पत्ति अरमाइक लिपीपासून झाली असावी ( सु. खि. पू. ५ वें शतक ). या लिपींत ऱ्हस्व-दीर्घ हा स्वरभेद नव्हता. सर्व स्वर ' अ ' या स्वरास निरनिराळीं चिन्हें जोडून तयार केलेले होते. ' न ' व ' ण ' यांतहि भेद नाहीं. लिपींत जोडाक्षरें फार नाहींत. ही उजवीकडून डावीकडे लिहिली जाई. बौद्धांचे कांहीं प्राकृत धर्मग्रंथ या लिपींत आहेत. इ. स. च्या तिसऱ्या शतकापर्यंत ही लिपि हिंदुस्थानांत टिकून असावी व नंतर कित्येक शतकें चिनी-तुर्कस्तान व हिंदुकुशाच्या उत्तरेकडील प्रदेश यांत ही लिपि जीव धरून होती असें दिसतें. डॉ. सर आरेल स्टाइन याला खरोष्ठी लिपींतील ग्रंथ तिकडे सांपडले.

**खर्च ( खटल्याचा )**—' कॉस्ट्स ' या इंग्रजी संज्ञेचा अर्थ कायदेशुकांत असा आहे कीं, कोर्टांत चालणाऱ्या दाव्याकरितां जो कायदेशीर खर्च पक्षकाराला करावा लागतो तो. हा खर्च दोन प्रकारचा असतो: (१) दाव्याकरितां प्रत्यक्ष कोर्टांत करावा लागणारा खर्च, म्हणजे कोर्ट फी ॲक्टाप्रमाणें दावा-अर्जाला लावावा लागणारा कोर्ट फी स्टँप; तसेंच वकीलपत्र, अर्ज, वगैरे कोर्टांत दाखल करावयाच्या कागदांना लागणारा कोर्ट फी स्टँप; शिवाय पक्षकार व साक्षीदार यांना समन्स, भत्ते, वगैरेंचा खर्च, यांचा समावेश होतो. व (२) सॉलिसिटर किंवा वकील यांना दाव्याचें काम करण्याबद्दल द्यावयाची फी व इतर कायदेशीर खर्च. वरील सर्व प्रकारचा खर्च कायद्यानें निश्चित ठरलेला असतो. वकील फीचें कायदेशीर प्रमाणहि ठरलेलें असतें. तथापि वकीलफी कमजास्त ठरवण्याची मोकळीक पक्षकारांना कायद्यानें दिलेली आहे.; म्हणजे वकील फीबद्दलचे हे करार कायदेशीर मानले जातात. ( कोर्ट फी ॲक्ट, लीगल प्रॅक्टिशनर्स ॲक्ट पाहा ).

**खर्ज स्वर**—स्वरसप्तकांतील अगदीं खालचा स्वर यास खर्ज स्वर असें म्हणतात, किंवा खालचा सा म्हणतात. मन्द्र सप्तकासहि खर्ज म्हणतात; संगीत स्वरलेखनपद्धतीमध्यें मन्द्र सप्तकांतील स्वरांसहि ही संज्ञा देण्यांत येते.

**खर्डे**—मुंबई, अहमदनगर जिल्हा, जामखेड तालुक्यांतील एक गांव. लो. सं. ६,७१६. गांव श्रीमंत आहे. सरदार निंबाळकर यांकडे हा गांव होता. त्यांचा वाडा अद्यापि पडक्या स्थितींत दिसत आहे. गांवाजवळ एक किल्लाहि आहे. गांवाला म्युनिसिपालिटी आहे. १७९५ सालीं पेशवे आणि निजाम यांमध्यें लढाई होऊन निजामाचा पुरा मोड झाला होता. मराठ्यांच्या इतिहासांत व शाहिरांच्या पोवाड्यांत या लढाईचें सुंदर वर्णन केलें आहे. या गांवीं घोंगड्या तयार करतात.

**खलनायक कादंबऱ्या**— अशा कादंबऱ्यांतून लबाड, लुच्चे लोकांचे पराक्रम रंगविलेले असतात. पाश्चात्य वाङ्मयांत अगदीं पहिला अशा प्रकारची कादंबरी लिहिणारा इटलींतील पेट्रोनिअस ( सुमारें इ. स. पहिलें शतक ) होय. त्याच्या ' सॅटिरिकॉन ' या गद्यपद्यात्मक औपरोधिक ग्रंथांत दोघे ग्रीक लुच्चे व त्यांचा गडी यांच्या करामती वर्णिल्या आहेत. हा लॅटिन ग्रंथ सोडल्यास अशा वाङ्मयाचें खरें माहेरघर स्पेन हेंच म्हणतां येईल. ' गुझमन द अलाफराशे ' ( १५९९ ), ' ला पिकारा जुस्तिना ' ( १६०५ ), ' मार्कोस द ओब्रेगॉन (१६१८) यांसारख्या स्पॅनिश कादंबऱ्या फार प्रसिद्धि पावल्या. इंग्लंडमध्यें या प्रकारचें वाङ्मय १६ व्या शतकापासून आढळतें. थॉमस नॅश हा या प्रकारचा पहिला लेखक म्हणतां येईल. ' दि अन्फॉर्च्युनेट ट्रॅव्हेलर ' ही त्याची १५९४ सालांतील कादंबरी नांवाजलेली आहे. ' मोल फ्लन्डर्स ', ' कर्नल जॅक ' यांसारख्या डेफोच्या कादंबऱ्या या सदरांत पडतील. तथापि खलनायक कादंबऱ्यांत श्रेष्ठपणाचा उच्चांक गाठला तो फ्रान्सनें. ल साज्

याची 'गिलब्लास द सांतिलान' (१७१५) हिच्या तोडीची दुसरी कादंबरी सांपडणार नाहीं. या वाङ्मयप्रकारांतील सर्व गुणांचा अर्कच जणूं ल साजच्या लेखनांत उतरलेला दिसेल. यानंतरचे खलनायक कादंबऱ्यांचे लेखक म्हणजे फील्डिंग, स्मोलेट, थॅकरे, वगैरे होत.

मराठींत 'ठकसेन राजपुत्राच्या गोष्टी' यासारख्या कथा आहेत, पण त्या स्वतंत्र दिसत नाहींत.

**खलाशी काम**—खलाशी काम म्हणजे सामान्यतः गलबताची व्यवस्था पाहणें व तें चालविण्याचें काम होय. यामध्यें यांत्रिक ज्ञानाचा अन्तर्भाव होत नाहीं. नौकानयन व खलाशी काम हीं दोन भिन्न आहेत. नौकानयन हें एक गणित, ज्योतिपशास्त्र यांसारखें शास्त्र आहे. याचें अध्ययन पुस्तकांच्या साहाय्यानें प्रत्यक्ष समुद्रावर न जातांहि करतां येतें. खलाशी काम मात्र प्रत्यक्ष गलबतावर व समुद्रावर जाऊनच शिकतां येतें. यामध्यें प्रत्यक्ष गलबत चालविण्याची माहिती मिळते. गलबत विशिष्ट दिशेनेंच कसें हांकावें, विशिष्ट तऱ्हेची हवा पडली असता तें कसें चालवावें, समुद्र खवळला असतां किंवा एखाद्या आणीबाणीच्या वेळीं तें कसें ताब्यांत ठेवावें, हें ज्ञान प्रत्यक्ष अनुभवानेंच मिळवावें लागतें. जेव्हां शिडाच्या साहाय्यानेंच गलबतें चालवावीं लागत तेव्हां खलाशी विद्येस फार महत्त्व होतें. कारण त्या वेळीं गलबतें भरती-ओहटी व वाऱ्याची गति आणि दिशा यांवर अवलंबून असत आणि तीं इष्ट दिशेनें नेणें केवळ शिडांच्या व सुकाणूच्या कुशल हाताळण्यामुळेंच शक्य असे. अशा वेळीं शिडाची दिशा बदलून वाऱ्याचा आपल्याला अनुकूल असा उपयोग करून घेण्याच्या पद्धतीस फार महत्त्व होतें (टॅकिंग). अर्वाचीन काळीं यंत्रांच्या साहाय्यानें वारा व समुद्राच्या प्रवाहाची गति, वगैरे गोष्टींचें महत्त्व, त्यांतील धोका, वगैरे बरींच कमी करण्यांत आलीं आहेत. त्यामुळे ठराविक वेळांत ठराविक दिशेनें व गतीनें बहुतेक गलबत नेतां येतें; तथापि खलाशी कामाचें कांहीं ज्ञान अवश्य असतेंच व विशेषतः आणीबाणीच्या प्रसंगीं त्याचा फार उपयोग होतो.

**खलीफ**—या अरबी शब्दाचा अर्थ धर्मगुरु किंवा 'मागून येणारा' असा होतो. धार्मिक, व्यावहारिक व राजकीय बाबतींत मुसलमान लोक ज्याची आज्ञा मानितात त्या पुरुषास खलीफ असें नांव आहे. महंमद पैगंबरानंतर चार पुरुषांनाच केवळ नव्हे तर उमईद व आब्बासी वंशांतील राज्यकर्त्यांनाहि खलीफ म्हणत.

**खलील इब्न अहमद** (७१८-७९१)—हा अरबी भाषाशास्त्रज्ञ ओमानचा रहिवासी होता. अरबी भाषेचा कोश ह्यानेंच प्रथम तयार केला. तसेंच अरबी काव्यांतील वृत्तांचें यानेंच प्रथमतः शास्त्रीय पद्धतीनें वर्गीकरण करून छंदःशास्त्राचे नियम तयार केले, यामुळें तो प्रसिद्धीस आला. हा स्वतः कविहि होता. व्याकरणशास्त्रासंबंधीं ह्यानें मार्मिक अभ्यास केला होता. 'किताब अल् ऐन' हा कोश करण्याला यानेंच सुरवात केली. पुढें हा कोश ह्याच्या एका शिष्यानें पूर्ण केला. या कोशांतील शब्द अकारविल्हेनें दिले नसून इंद्रियविज्ञानशास्त्रविषयक तत्त्वांच्या आधारें दिलेले आहेत. या कोशाला 'ऐन' या शब्दानें प्रारंभ झाला असून 'य' शब्दानें त्याची समाप्ति झाली आहे. हा ग्रंथ १४ व्या शतकापर्यंत उपलब्ध होता.

**खवडे**—हा एक त्वग्रोग आहे. हा केंसामध्यें उत्पन्न होतो. याचा प्रसार मांजरें आणि उंदीर यांपासून होतो. याच्या योगानें वाटोळे कपासारखे खवले येतात. कधीं यांचें जाळेंच बनतें. हा रोग मोठा चिकट आहे. लवकर बरा होत नाहीं. पोटिसें बांधून खपल्या काढून टाकाव्यात. यावर क्ष-किरणाचा उपाय हटकून लागू पडतो.

**खवले**—मासे, सर्प, मुंगीभक्षक, वगैरे प्राण्यांच्या शरीरावर जो एक प्रकारचा कवचासारखा भाग असतो त्यास खवले म्हणतात. माशाचे खवले त्याच्या कातडीच्या आंत असतात व त्यांत एकाआड एक मृदु त्वचा, शिंगासारखा पदार्थ व मधून मधून चुन्याचें फॉस्फेट यांचे थर असतात. खवले असणाऱ्या प्राण्यांच्या अनेक जाती आहेत. माशांच्या अंगावरील खवल्याचे दोन प्रकार असतात: एक प्रकार ताटल्यासारखे हडकाचे खवले असून त्यांत बारीक कांटे असतात व दुसऱ्या प्रकारांत ताटलीच्या आंतील अंगास हाड व त्यावर वरील बाजूस दंतवेष्ट (इनॅमेल) असतें. या खवल्यांची मांडणी घरावरील कौलाप्रमाणें असते. सापाच्या अंगावरील खवले पाठीकडील बाजूस तिकोनी किंवा चौकोनी असून पोटाकडील बाजूस लांबोडे असतात. मुंगीभक्षक प्राण्यांच्या अंगावरील केंसांचें खवल्यांत रूपांतर झालेलें असतें.

**खवले किडे**—[ लेपिडोप्टेरा-वल्कपक्ष कीटक ]. हा एक कीटकांचा वर्ग असून त्यामध्यें फुलपांखरें व पतंग, वगैरे जाती येतात. यांस हें नांव मिळण्याचें कारण त्यांच्या पंखास हात लावला असतां बारीक धुळीच्या कणासारखे अंतस्त्वचामय खवले खालीं पडतात हें होय. यांतील फुलपांखरास दिवाचर आणि पतंगास रात्रिंचर असें म्हणतात.

**खवाटा**—बहुतेक सस्तन प्राण्यांमध्यें खांद्याच्या पट्ट्यामध्यें हा मुख्य अस्थि असतो, व याच्यावर धडाचा अथवा सांगाड्याचा मुख्य आधार असतो. मनुष्याच्या शरीरांत हा अस्थि त्रिकोणाकृति सपाट आकाराचा असून पाठीच्या दोन्ही बाजूंस असतो.

याच्या बाहेरील बाजूच्या वरील टोंकाला एक खांच असते; तींत बाहु-अस्थीचें वरचें टोंक सांधलेलें असतें.

**खवास**— हा अरबी शब्द असून त्याचा अर्थ चाकर किंवा अंगरक्षक असा आहे. या जातीस खवाज, हजुरी, वजीर, गोळ, लुंद अशींहि नांवें असून त्यांची वस्ती बहुतेक काठेवाडाकडे आहे. त्यांची लोकसंख्या २७,००० वर आहे. त्यांचा धंदा सेवेकऱ्याचा. हे रजपुत राजे व जहागीरदार यांच्या घरीं नोकर असतात. या खवासांत कोळी, मुसलमान, वगैरे सर्व जातींचे लोक असतात. यांना पूर्वीच्या गुलामाप्रमाणें विकतां अगर बदलतां येतें. थोडें मण धान्य देऊन हे लोक पूर्वी विकत घेतां येत असत. खवास व गोळ हे पूर्वी एकाच दर्जाचे असत. हल्लीं गोळापेक्षां खवास हे उच्च दर्जाचे मानले जातात. खवासांनीं आपल्या बुद्धीमुळें व धाडसामुळें आपली स्थिति इतकी सुधारून घेतली आहे कीं, अलीकडे त्यांच्या मुली रजपूत सरदार करूं लागले आहेत. कच्छ प्रांतांत असलेल्या रजपूत खवासांचे वंशज आहेत. खवास पुरुषाप्रमाणें बायकाहि सेवावृत्ति करतात. त्यांना खवासान अथवा गोळी म्हणतात. यांच्या मुलींना छोकरी किंवा ढारन हें नांव असून त्याहि नोकरीच करतात. मात्र त्यांच्यावर आई-बापांचा ताबा असतो. खवास स्त्री-पुरुष हे दिसण्यांत रजपूत व गिरासिया यांसारखे असून कांहीं स्त्रिया तर रजपूत स्त्रियांइतपत सुरेख असतात. यांची भाषा गुजराथी व कच्छी आहे. हल्लीं कांहीं शेती व मजुरीहि हे करूं लागले आहेत. यांना धन्याच्या घरीं अन्नवस्त्र, दागदागिने, वगैरे सर्व मिळत असल्यानें त्यांची स्थिति चांगली असते. स. १८१४ च्या सुमारास नवानगरचा जामसाहेब मेल्यावर त्याच्या खवासांनीं बंड केलें होतें. खवासांत मेरु, मावजी, राघो, लद्धो, वगैरे नामांकित पुरुष होऊन गेले.

**खवासखान**— १. विजापूरच्या महंमद आदिलशहाचा एक प्रधान. याचें मूळ नांव दौलतखान असून खवासखान हा किताब होता. हा फार गर्विष्ठ व दुर्वर्तनी झाल्यावर बादशहानें याला मारविलें.

२. आदिलशाही घराण्यांतील दुसऱ्या अलीचा एक सरदार. अफजलखानाच्या वधानंतर बादशहानें याला शिवाजीवर पाठविलें. यानें त्या वेळीं शिवाजीचा पराभव केला (१६६४). पण पुढें शिवाजीनें बाजी घोरपड्याला मारल्यावर याचा पराभव केला. पुढें अली आदिलशहा वारल्यावर हा विजापूरचा कारभारी झाला (१६७४); पण बहलोलखानानें याला दगलबाज म्हणून पकडून ठार केलें (१६७६).

**खसखस**— [वर्ग-पापाव्हेरासी, पापाव्हेर]. या जाती वानस्पतिक आहेत. त्यांस मोठीं, शोभिवंत फुलें येतात. यांतील पांढऱ्या जातीच्या झाडांपासून अफू मिळते. या झाडाच्या बोंडांतून याचें बीं म्हणजेच खसखस निघते. खसखशीचें तेल काढतात व तें खाण्याकरितां वापरतात. पेंड गुरांना घालतात. पक्वान्नांत व मिठाईत खसखस वापरतात. यामुळें एक प्रकारची चव येते. हिंदुस्थानांत खसखस इराणांतून येते.

**खळ**—कागद चिकटविण्यासाठीं, कापडास ताठपणा येण्यासाठीं व विणकामांत जरूर तो ताण सहन करतां येईल इतकी बळकटी सुतास यावी म्हणून खळीचा उपयोग करतात. बटाट्याचें सत्त्व, गव्हाचें पीठ, तांदुळाचें पीठ, उडदाचें पीठ, साबूदाण्याचें पीठ, मक्यासारख्या धान्याचें सत्त्व, वगैरे अनेक पदार्थांपासून खळ तयार करतां येते. खळीस पेज, गप, कोळ, गोंद, चिकी अशींहि दुसरीं नांवें आहेत.

कापडाच्या गिरण्या निघाल्यापासून तर खळीला अधिक महत्त्व प्राप्त होऊन आज त्याचें एक शास्त्रच होऊन बसलें आहे. खळीचा मुख्य उद्देश जो—कापड विणतां यावें इतकें बळकट सूत व्हावें—तो दुय्यम ठरून कापड गिऱ्हाइकाला जाड, तकतकीत व आकर्षक कसें दिसेल हा मुख्य उद्देश होत चालला आहे. अशा खळींत कापडांत मऊपणा आणण्यासाठीं एरंडेल तेल, सॉफ्ट-सोप, पामीन, चरबी, मॅग्नेशिअम् क्लोराइड, मेण, पॅरॅफिन, वगैरे पदार्थ घालतात. कापडाचें वजन वाढविण्यासाठीं चिनी मातीचा उपयोग करतात.

**खळें**—चंद्राभोंवतीं प्रकाशाचें एक वर्तुळ कधीं कधीं दिसतें. हवेंतील लहान बर्फाच्या तुकड्यांतून प्रकाश जातांना होणाऱ्या वक्रीभवनामुळें असें दृश्य तयार होतें. या वर्तुळाचे आकार वेगवेगळे असून कधीं रंगहि बाहेर तांबडा व आंत जांभळा असे दिसतात. थंड प्रदेशांत सूर्याभोंवतींहि खळें दिसतें. नेहमींच्या खळ्याची त्रिज्या साधारणपणें २२० ची असते.

**खाकी**— हा उत्तर हिंदुस्थानांतील एक वैष्णव पंथ आहे. रामानंदाचा शिष्य अनंतानंद, ह्याचा शिष्य कृष्णदास पय अहारी, त्याचा शिष्य कील्ह, यानें या पंथाची १६ व्या शतकांत स्थापना केली असे म्हणतात. खाकी हें नांव फारशी 'हाक' (खाक) = राख या शब्दापासून बनलें आहे. रामचंद्र वनाला जाण्याच्या वेळीं लक्ष्मणानें दुःखी होऊन अंगाला राख फांसली म्हणून त्याला 'खाकी' हें नांव पडलें; त्याच्या अनुयायांनीं हेंच नांव धारण केलें व तेव्हांपासून हा पंथ अस्तित्वांत आहे, असें कोणी म्हणतात. या लोकांचें आदिपीठ अयोध्येला असून नबाब सुजाउद्दौल्याच्या कारकीर्दींत येथें चित्रकूट (बुंदेलखंड) च्या कोणीं दयाराम नांवाच्या पुरुषानें यांचा एक आखाडा स्थापिला. १९०५ सालीं या आखाड्यांत १८० लोक असून त्यांपैकीं ५० स्थानिक होते. या वेळचा महंत संस्थापकापासून

अकरावा गुरु होता. दुसरा एक आखाडा रेवाकांठा संस्थानांत लुनावाडा येथें आहे. त्याचें नांव 'नाथ बावानो अखाडो' असें असून त्याची त्या ठिकाणीं बरीच प्रसिद्धि आहे. खाकी हे मुख्यतः रामभक्त असतात. तथापि भस्म लावणें, जटा राखणें, दिगंबर राहणें, आपल्या संस्थापकाच्या गादीला 'समाध' म्हणणें, यांसारख्या बाबतींत शैवाचार पाळीत असल्याचें दिसून येतें. जे एका जागींच राहतात ते बहुधा इतर वैष्णवाप्रमाणें पोषाख करतात; पण सदोदित भटकणारे खाकी नग्न, पुष्कळ मेळां कमरेभोंवतीं जाड काळा दोरा बांधून व अंगाला राख, माती फांसून फिरतात.

**खाकी**—हा शब्द मूळ हिंदी असून त्याचा अर्थ धुळी रंगाचा असा आहे. शिपायांच्या निरनिराळ्या कापडांनाहि खाकीच म्हणतात. १८४८ त प्रथम हिंदुस्थानांतील शिपायांना खाकी कपडे दिले व पुढें १८५७ च्या शिपायांच्या बंडांत त्यांचा सर्रास उपयोग झाला. १८९९–१९०२ च्या बोअर युद्धांत ब्रिटिश सैनिकांना असे खाकी कपडे देण्यांत आले व पुढील सर्व युद्धांतून रणांगणावरील कपड्यांना खाकी रंग देण्यांत येऊं लागला व शिपायांचा खाकी गणवेष रूढ झाला. विशिष्ट कापडाच्या प्रकाराला खाकी हें नांव यावरूनच पडलें आहे.

**खाजा हिस्साम्-उद्दिन जुनैदी** (मु. १३४७)—फिरोजशहा तुघ्लक दिल्लीचा सुलतान झाला, त्या वेळीं लोकांवर जमिनीच्या कराचें ओझें इतकें वाढलें होतें कीं त्यामुळें लोक आपलीं शेतें टाकून लूटमारीचा धंदा करूं लागले; जिकडेतिकडे बंडें वाढूं लागलीं. अशा वेळीं वसुली खात्याची ही बिघडलेली घडी नीट पूर्ववत् बसवण्यासाठीं फिरोजशहानें हिसामुद्दिनची नेमणूक केली. हिसामुद्दिननें स्वतः राज्यांत हिंडून व पाहणी करून जमिनीची प्रतवारी ठरविली व जमिनीच्या उत्पन्नानुसार कर ठरविले. नेमणुकीच्या वेळीं व दरसाल सुभेदारांनीं सुलतानांस नजराणे देण्याची पद्धति असे ती यानें बंद केली. अशा रीतीनें वसुली खात्याची बिघडलेली घडी यानें पूर्ववत् सुस्थितींत आणली.

**खाटिक**—यांची वस्ती संयुक्तप्रांतात सुमारें दोन लक्ष आहे. खट्टिक या संस्कृत शब्दावरून खाटिक हा शब्द झालेला असून त्याचा अर्थ कसाई अथवा व्याध असा आहे. शेती करणारी, मजुरी करणारी व भाज्या विकणारी ही एक जात आहे. हिचा पासी नावाच्या जातीशीं निकट संबंध असून ही तिची एक पोटजात आहे असेंहि म्हणतात. अयोध्यावासी, संखर, बकरकसाब, चलनमहाराव व घोडचराव अशा यांच्या मुख्य पोटजाती आहेत. यांपैकीं बकरकसाब अथवा कसाई हे मांस विकण्याचें काम करतात. चलनमहाराव हे कातड्याचें काम करतात; व घोडचराव हे मोतद्दार असतात.

खानेसुमारीवरून पाहतां ८१६ हिंदूंच्या व ७ मुसलमानांच्या इतक्या यांच्या पोटजाती आहेत. त्यांची एक पंचायत असून तिचा मुख्य असा एक चौधरी असतो. करारबीर ही मुख्य देवता असून जोनपुरा हें तिचें स्थान आहे. हा करारबीर अहीर जातीचा होता. व मुसलमानी धर्मांत जाण्यापेक्षां त्यानें प्राणत्याग पत्करला असें सांगतात. चामट, बाभण अथवा ब्राह्मण नांवाच्या देवाचीहि पूजा ते करितात. गंगा, देवी व अमरोहाचा मिरानसाहेब यांना खाटिक लोक अत्यंत पूज्य मानतात. त्यांचा मुख्य धंदा म्हणजे डुकराची खरेदी-विक्री करणें. काश्मीरांत हिंदू खाटिक डुकरें पाळतात व मुसलमान कातडीं कमावतात. कसाई पाहा.

**खांडववन**—हें अरण्य अर्जुनानें अग्नीस भक्षणार्थ दिलें होतें. हें जळत असतां तक्षकाचा पुत्र अश्वसेन त्यांतून कसा तरी वांचला; मयासुर शरण येऊन वांचला; व शार्ङ्ग पक्ष्याचीं चार बालकें अग्नीनें वांचविलीं. हें वन यमुनेच्या तीरावर असून पुढें पांडवांनीं या जागेवर इंद्रप्रस्थ नगर वसविलें.

सध्यां हिंदुस्थानच्या पूर्वेकडील देशांत खांड म्हणून लोक आहेत. त्यांचें पूर्वीचें म्हणजे भारतकालीं तरी खांडव असें नांव असावें. ह्या खांडववनांत सध्यांचें खांडवा शहर आहे. भीमाशंकराच्या पायथ्याशीं तळकोंकणांत कर्जतपासून सहा कोसांवर खांड म्हणून गांव आहे. तेथें सध्यां कोळी उर्फ कोळ लोक राहतात. ह्या कोळ लोकांच्या प्रदेशाला 'कोळवन' म्हणतात. कोळवन, गोंडवन व खांडवन अशीं वनशब्दान्त नामें ह्या कोळ, गोंड व खांड लोकांच्या प्रदेशाला फार पुरातन कालापासून असलेलीं दिसतात.

**खांडवा**—मध्यप्रांत, नेमाड जिल्ह्यांतील एक तहशील व शहर. तहशिलीचें क्षे. फ. १८७१ चौ. मैल व लो. सं. सु. दोन लाख आहे. हींत ४७३ खेडीं आहेत. अब्ना व सुक्ता या दोन नद्या वाहतात. खांडवा शहर राजपुताना-माळवा रेल्वे जंक्शन व रेल्वे स्टेशन आहे. समुद्रसपाटीपासून उंची १,००७ फूट. लो. सं. सु. तीस हजार. १८६७ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. शहराला पाणी मोहघाटाच्या तलावापासून मिळतें. कापसाची मोठी पेठ आहे. जिन व प्रेस बरेच आहेत. खांडवा हें जुन्या काळापासून महत्त्वाचें ठिकाण आहे. टॉलेमी व अल्बेरुणी यांनीं याचा उल्लेख केला आहे. तसेंच जैन धर्माचें केंद्रस्थान असल्यानें जैन शिल्प बरेंच दृष्टीस पडतें. हें माळव्याच्या सुभेदारीचें मुख्य ठिकाण असे. १८०२ सालीं यशवंतराव होळकरानें व १८५८ त तात्या टोपे यानें शहराची बरीच जाळपोळ केली.

**खाडिलकर, कृष्णाजी प्रभाकर** ( १८७२-१९४८ )— एक मराठी लेखक व संपादक. यांचा जन्म सांगली येथें १८७२ मध्यें झाला. हे फर्ग्युसन कॉलेजमधून बी. ए. झाले. १८९२ ते १८९४ पर्यंत यांनीं सांगली हायस्कूलमध्यें शिक्षकाचें काम केलें. १८९७ मध्यें केसरी संस्थेंत आले. १९०२ मध्यें नेपाळांत जाऊन तेथें स्वदेशी कौलांचा कारखाना काढून तेथील नवीन राजवाड्याकरितां कौलें तयार करून दिलीं. हें आहे तरी नेपाळांत जाण्याचा त्यांचा हेतु निराळाच होता. १९०३ मध्यें यांनीं प्रथम नाट्यलेखनास सुरुवात केली. १९०८ ते १९१० मध्यें हे 'केसरी'चे संपादक होते. १९१० ते १९१८ मध्यें हे लोकमान्य टिळक यांच्याबरोबर राजकीय कार्य करण्यांत गुंतले होते. १९१८ पासून दीड वर्ष पुन्हां 'केसरी'चे संपादक होते. १९२० मध्यें यांनीं केसरी संस्था कायमची सोडली. नंतर दीडवर्ष मुंबईस नवीन निघालेल्या 'लोकमान्य' दैनिकाचे संपादक होते. ती जागा सोडून देऊन त्यांनीं 'नवाकाळ' नांवाचें नवीन दैनिक स्वतः सुरू केलें व तें पुष्कळच भरमराटीस आणलें. पुढें त्यांतून निवृत्त होऊन सांगलीस जाऊन विरक्त स्थितींत राहिले. यांनीं अनेक गद्य व पद्य नाटकें लिहिलीं आहेत. यांचीं पहिलीं नाटकें ऐतिहासिक व पौराणिक विषयांवर गद्य स्वरूपांत होतीं. यांचें कीचकवध हें नाटक प्रसिद्ध असून तें जत झालें होतें पण पुन्हां सुटलें. नंतर यांनीं संगीत नाटकें पौराणिक व इतर विषयांवर पण उपरोधिकपणें राजकीय विषयावर लिहिलीं. यांचें स्वयंवर नाटक अतिशय लोकप्रिय झालें. अखेरच्या दिवसात ते उपनिषदांचीं भाषांतरें व त्यांवर प्रवचनें करीत.

**खांडेकर, विष्णु सखाराम** ( १८९८- )—मराठी वाङ्मयांतील एक कथालेखक, कादंबरीकार व टीकाकार. शाळेंत असल्यापासूनच आगरकरांच्या त्यागी जीवनाची छाप त्यांच्या मनावर बसली असल्यानें १९२० सालीं यांनीं शिरोडें या कोंकणांतील एका गांवीं 'ट्यूटोरियल इंग्लिश स्कूल' नांवाची एक शाळा काढली व आपल्या जिवापाड मेहनतीनें तिला ऊर्जितावस्था प्राप्त करून दिली.

'जीवनासाठीं कला' ही विचारप्रणाली मराठी वाङ्मयांत यांनींच मांडली. तदनुसार वेळप्रसंगीं स्वभावचित्रण, सुसंगती यांसारख्या लेखनाच्या बाह्य अंगांना बगल देऊनहि वाचकाला जीवनांत उपयोगी पडणारें व पटणारें असें वाङ्मय लिहिण्याचें कार्य यांनीं सुरू केलें.

'उल्का', 'क्रौंचवध' यांसारख्या कादंबऱ्या यांनीं लिहिल्या असून 'नवमालिका', 'पहिली लाट', 'घरट्याबाहेर' वगैरे यांचे लघुकथासंग्रहि आहेत. उत्कृष्ट लघुकथा-लेखक म्हणून त्यांना मान आहे.

'छाया', 'देवता', 'ज्वाला', 'संगम' यांसारख्या एकापेक्षां एक सरस अशा बोलपटकथा यांनीं लिहिल्या आहेत.

उत्कृष्ट कल्पनासौंदर्य हें यांचें एक लेखनवैशिष्ट्य म्हणतां येईल. त्यांच्या लेखनांत व्यक्ति आणि समाज यांचे निकट संबंध चांगले व्यक्त केलेले आढळतात.

**खादाड प्राणिवर्ग**—( ग्लटन ). उत्तर युरोप व अमेरिका यांमध्यें आढळणारा हा एक मांसाहारी वीझल कुलांतील चतुष्पाद प्राणि-वर्ग आहे. यास वुल्व्हराइन म्हणतात. हा अस्वलासारखा दिसतो. याची गति मंद असून हा फार हिंस्र, लबाड व बळकट प्राणी आहे. याची लोंकर मौल्यवान् असते. तिचे थंडीसाठीं कपडे करतात.

**खांदा-जोड**—स्कंधसंधीमुळें भुजास्थि व स्कंधास्थि जोडले जातात. स्कंधसंधि हें उखळीच्या सांध्याचें ( बॉल अँड सॉकेट ) उत्तम उदाहरण आहे. भुजास्थीचें वाटोळें टोंक स्कंधास्थीच्या पोकळींत फिरत असतें. या सांध्यावर मजबूत स्नायुरज्जू असल्यामुळें हा सांधा निखळत नाहीं. या स्कंधासथोमध्ये पुढील मुख्य स्नायू असतात. सुप्रास्पिनेट्स अथवा उपरिस्नायु, सब कॅप्युलॅरिस अथवा अधःस्नायु, इन्फ्रास्पिनेट्स आणि टेरेसमाय-

[ चित्रांत वर डाव्या हाताकडे खादा-जोड आणि खवाटा दाखविला आहे. उजव्या हातास डाव्या बाजूचा खवाटा आहे. खालीं खांदे-जोडाचा परिच्छेद दिसेल. ]

अकरावा गुरु होता. दुसरा एक आखाडा रेवाकांठा संस्थानांत लुनावाडा येथें आहे. त्याचें नांव 'नाथ बावानो अखाडो' असें असून त्याची त्या ठिकाणीं बरीच प्रसिद्धि आहे. खाकी हे मुख्यतः रामभक्त असतात. तथापि भस्म लावणें, जटा राखणें, दिगंबर राहणें, आपल्या संस्थापकाच्या गादीला 'समाध' म्हणणें, यांसारख्या बाबतींत शैवाचार पाळीत असल्याचें दिसून येतें. जे एका जागींच राहतात ते बहुधा इतर वैष्णवाप्रमाणें पोषाख करतात; पण सदोदित भटकणारे खाकी नग्न, पुष्कळ मेळां कमरेभोंवतीं जाड काळा दोरा बांधून व अंगाला राख, माती फांसून फिरतात.

**खाकी**—हा शब्द मूळ हिंदी असून त्याचा अर्थ धुळी रंगाचा असा आहे. शिपायांच्या निरनिराळ्या कापडांनाहि खाकीच म्हणतात. १८४८ त प्रथम हिंदुस्थानांतील शिपायांना खाकी कपडे दिले व पुढें १८५७ च्या शिपायांच्या बंडांत त्यांचा सर्रास उपयोग झाला. १८९९–१९०२ च्या बोअर युद्धांत ब्रिटिश सैनिकांना असे खाकी कपडे देण्यांत आले व पुढील सर्व युद्धांतून रणांगणावरील कपड्यांना खाकी रंग देण्यांत येऊं लागला व शिपायांचा खाकी गणवेष रूढ झाला. विशिष्ट कापडाच्या प्रकाराला खाकी हें नांव यावरूनच पडलें आहे.

**खाजा हिसाम्-उद्दिन जुनैदी** (सु. १३४७)—फिरोजशहा तुघ्लक दिल्लीचा सुलतान झाला, त्या वेळीं लोकांवर जमिनीच्या कराचें ओझें इतकें वाढलें होतें कीं त्यामुळें लोक आपलीं शेतें टाकून लूटमारीचा धंदा करूं लागले; जिकडेतिकडे बंडें वाढूं लागलीं. अशा वेळीं वसुली खात्याची ही बिघडलेली घडी नीट पूर्ववत् बसवण्यासाठीं फिरोजशहानें हिसामुद्दिनची नेमणूक केली. हिसामुद्दिननें स्वतः राज्यांत हिंडून व पाहणी करून जमिनीची प्रतवारी ठरविली व जमिनीच्या उत्पन्नानुसार कर ठरविले. नेमणुकीच्या वेळीं व दरसाल सुभेदारांनीं सुलतानांस नजराणे देण्याची पद्धति असे ती यानें बंद केली. अशा रीतीनें वसुली खात्याची बिघडलेली घडी यानें पूर्ववत् सुस्थितींत आणली.

**खाटिक**—यांची वस्ती संयुक्तप्रांतांत सुमारें दोन लक्ष आहे. खट्टिक या संस्कृत शब्दावरून खाटिक हा शब्द झालेला असून त्याचा अर्थ कसाई अथवा व्याध असा आहे. शेती करणारी, मजुरी करणारी व भाज्या विकणारी ही एक जात आहे. हिचा पासी नावाच्या जातीशीं निकट संबंध असून ही तिची एक पोटजात आहे असेंहि म्हणतात. अयोध्यावासी, संखर, बकरकसाब, चलनमहाराव व घोडचराव अशा यांच्या मुख्य पोटजाती आहेत. यांपैकीं बकरकसाब अथवा कसाई हे मांस विकण्याचें काम करतात. चलनमहाराव हे कातड्याचें काम करतात; व घोडचराव हे मोतद्दार असतात.

खानेसुमारीवरून पाहतां ८१६ हिंदूंच्या व ७ मुसलमानांच्या इतक्या यांच्या पोटजाती आहेत. त्यांची एक पंचायत असून तिचा मुख्य असा एक चौधरी असतो. करारबीर ही मुख्य देवता असून जोनपुरा हें तिचें स्थान आहे. हा करारबीर अहीर जातीचा होता. व मुसलमानी धर्मांत जाण्यापेक्षां त्यानें प्राणत्याग पत्करला असें सांगतात. बामट, बामण अथवा ब्राह्मण नांवाच्या देवाचीहि पूजा ते करितात. गंगा, देवी व अमरोहाचा मिरानसाहेब यांस खाटिक लोक अत्यंत पूज्य मानतात. त्यांचा मुख्य धंदा म्हणजे डुकराची खरेदी–विक्री करणें. काश्मीरांत हिंदू खाटिक डुकरे पाळतात व मुसलमान कातडीं कमावतात. कसाई पाहा.

**खांडववन**—हें अरण्य अर्जुनानें अग्नीस भक्षणार्थ दिलें होतें. हें जळत असतां तक्षकाचा पुत्र अश्वसेन त्यांतून कसा तरी वांचला; मयासुर शरण येऊन वांचला; व शार्ङ्ग पक्ष्याचीं चार बालकें अग्नीनें वांचविलीं. हें वन यमुनेच्या तीरावर असून पुढें पांडवांनीं या जागेवर इंद्रप्रस्थ नगर वसविलें.

सध्यां हिंदुस्थानच्या पूर्वेकडील देशांत खांड म्हणून लोक आहेत. त्यांचें पूर्वीचें म्हणजे भारतकालीं तरी खांडव असें नांव असावें. ह्या खांडववनांत सध्यांचें खांडवा शहर आहे. भीमाशंकराच्या पायथ्याशीं तळकोंकणांत कर्जतपासून सहा कोसांवर खांड म्हणून गांव आहे. तेथें सध्यां कोळी उर्फ कोळ लोक राहतात. ह्या कोळ लोकांच्या प्रदेशाला 'कोळवन' म्हणतात. कोळवन, गोंडवन व खांडवन अशीं वनशब्दान्त नाभें ह्या कोळ, गोंड व खांड लोकांच्या प्रदेशाला फार पुरातन कालापासून असलेलीं दिसतात.

**खांडवा**— मध्यप्रांत, नेमाड जिल्ह्यांतील एक तहशील व शहर. तहशिलीचें क्षे. फ. १८७१ चौ. मैल व लो. सं. सु. दोन लाख आहे. हींत ४७३ खेडीं आहेत. अब्ना व सुका या दोन नद्या वाहतात. खांडवा शहर राजपुताना-माळवा रेल्वे जंक्शन व रेल्वे स्टेशन आहे. समुद्रसपाटीपासून उंची १,००७ फूट. लो. सं. सु. तीस हजार. १८६७ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. शहराला पाणी मोहघाटाच्या तलावापासून मिळतें. कापसाची मोठी पेठ आहे. जिन व प्रेस बरेच आहेत. खांडवा हें जुन्या काळापासून महत्त्वाचें ठिकाण आहे. टॉलेमी व अल्बेरुणी यांनीं याचा उल्लेख केला आहे. तसेंच जैन धर्माचें केंद्रस्थान असल्यानें जैन शिल्प बरेंच दृष्टीस पडतें. हें माळव्याच्या सुभेदारीचें मुख्य ठिकाण असे. १८०२ सालीं यशवंतराव होळकरानें व १८५८ त तात्या टोपे यानें शहराची बरीच जाळपोळ केली.

विसाव्या वर्षी शेतकीच्या उच्च शिक्षणासाठीं हे अमेरिकेस गेले व सन १९११ मध्यें ऑरेगॉन ॲग्रिकल्चर कॉलेजमधून बी. एस्सी. झाले. पुढें दोन वर्षांतच वॉशिंग्टन विद्यापीठांतून एम्. एस्सी. ची पदवीहि यांनीं मिळवली.

सन १९१३ मध्यें हिंदुस्थानांत औद्योगिक शिक्षणाचा प्रसार करण्याच्या दृष्टीनें यांनीं अमेरिकेंत एक योजना तयार केली व या योजनेच्या प्रसारासाठीं अनेक दौरेहि काढले. कांहीं वर्षे इराणांतील घशघई संस्थानचे शिक्षणमंत्री व व्यापार आणि कृषिविभागाचे संचालक होते.

अमेरिकेंत न्यूयॉर्क शहरीं, 'दि हिंदुस्थान असोसिएशन ऑफ अमेरिका' या नांवाची भारतीय विद्यार्थ्यांची जी संस्था आहे, तिच्या आद्य संस्थापकांपैकीं हे एक होत.

सन १९२१ मध्यें इराण सोडून हे बर्लिनला गेले. यानंतर सन १९२४ मध्यें हे मेक्सिकोंत नॅशनल ॲग्रिकल्चर कॉलेजांत प्रोफेसर म्हणून राहिले.

गव्हासंबंधींचे अनेक शोध व गवतापासून अन्न तयार करण्याचा शोध यांनीं लावला. जुन्या 'लोकशिक्षण' मासिकांत यांचे लेख असत. सन १९१३-१४-१५ या तीन वर्षांत यांची कृषिविषयक 'डुर्जेल कृषि' ही लेखमाला क्रमशः 'चित्रमय जगत्' या मासिकांतून प्रसिद्ध झाली आहे. यांना हिंदुस्थानांत येण्याची ब्रिटिश सरकारनें बंदी केली होती ती आतां काढून टाकण्यांत आली आहे.

**खानगी**— राजाच्या स्वतःच्या खाजगी कामासाठीं जें खातें असतें त्याला खानगी (खाजगी) खातें म्हणतात. या खात्याकडे मुख्यतः राजाच्या वार्षिक नेमणुकीची व्यवस्था असते. राजाच्या वस्त्रशाला, पाकशाला, आप्तवर्गाचें पालनपोषण, देवघर, वगैरे निरनिराळ्या कामकाजांचा कारभार हेंच खातें पाहतें. अष्टप्रधानांत या खात्याचें काम सचिवाकडे असे. तो आपल्या हाताखालीं खानगी कारभारी नेमी. रामायणकाळींहि सुमंत नांवाच्या प्रधानाकडे हें काम होतें.

खानगी खात्याच्या नांवाखालीं संस्थानी राज्यांतील उत्पन्नापैकीं बरेंच उत्पन्न खर्च होतें. हीच रीत एकमुखी राजसत्तेंत सर्वत्र प्रचारांत आहे. प्रजासत्ताक राज्यांत अध्यक्षाची अगर प्रतिनिधींची खानगीची नेमणूक लोकसभा ठरवीत असते.

**खानजहान** (१३७३-८७)— १. एक मुसलमान वजीर. फिरोझशहा तुघ्लकाचा वजीर जो मलिक मकबुल खानजहान याचा हा मुलगा. मलिक मकबुलच्या पश्चात् फिरोझशहानें यासच आपला मुख्य वजीर नेमलें. फिरोझशहाचा मुलगा फत्तेखान याच्या मरणानें आलेल्या फिरोझशहाच्या अस्वस्थपणाचा फायदा घेऊन खानजहाननें बादशहाचा दुसरा मुलगा महम्मदखान हा तख्त बळकावतो आहे असें फिरोझशहास भासवलें. युवराज महम्मदखानानें गुप्तपणें आपल्या बापाची भेट घेऊन सत्य परिस्थिति त्यास निवेदन करतांच खानजहानचा डाव हुकला. महम्मदखानानें त्याजवर चाल केली असतां तो जखमी स्थितींत मेवाडच्या कोक राजाकडे आश्रयास गेला. महम्मदखानानें घोडदळावरील सेनापति सिकंदरखान याजकरवीं कोक राजाकडून खानजहान यास पकडून ठार केलें व त्याचें शीर दिल्लीस आणविलें.

२. (मृ. १५७८). एक मोंगल सरदार. हा अकबराच्या वेळीं पंचहजारी असून याला १५७६ मध्यें बंगालचा सुभेदार नेमला होता. याचें मूळ नांव हुसेनकुली बेग असून खानजहान ही त्याची पदवी होती. बंगालचा नबाब दाऊदखान यानें अकबराविरुद्ध बंड केल्यामुळें यानें त्याचा पराभव करून व त्याला ठार मारून त्याचें डोकें आग्र्यास अकबराकडे पाठविलें.

**खानजहान कोकलताश** (मृ. १६९७)—एक मोंगल सरदार. याचें खरें नांव मीर मलिक हुसेन असें असून हा औरंगजेबाचा दूधभाऊ होता. त्यानें याला प्रथम बहादुरशहा पदवी दिली होती. तो प्रथम ७०० घोडेस्वारांचा सरदार होता तो बढती होत होत १६७४ त सातहजारी सरदार बनला. याला प्रथम दक्षिणची सुभेदारी १६७० त मिळाली. तेव्हांपासून याचा मराठ्यांशीं संबंध आला, व पुष्कळदां पराभव पदरांत घेऊनहि तो मराठ्यांशीं दहा वर्षे झुंजत राहिला. शेवटीं त्यानें मराठ्यांचा नाद अजीबात सोडला आणि भीमाकांठीं पांडेपेडगांव येथें एक भुईकोट किल्ला बांधून त्याचें नांव बहादुरगड ठेवलें व तेथेंच त्यानें आपली कायमची छावणी केली. पुढें सन १६८५ त यानें हैद्राबादेवर हल्ला करून तें लुटलें. १६९० त जंजिऱ्याचा किल्ला तेथील फत्तेखान सिद्दी आपण होऊन मराठ्यांना देत होता. पण यानें जंजिरेकरास मदत करून जंजिरा राखला.

**खानजहान लोदी** (मृ. १६३१)—एक मोंगल सरदार. अफगाण सरदार दौलतखान याचा हा मुलगा भव्य व दिसावयाला देखणा होता. याचा स्वभाव उद्दाम व चैनी असून हिंदूंचा हा अत्यंत द्वेष करी. जहांगीरच्या कारकीर्दीत हा उदयास येऊन ५,००० च्या मनसबदारीपर्यंत चढला. शहाजहानशीं याचें वैर असून यानें बालेघाट प्रांत निजामशहाला तीन लाखांना परत दिला. तो परत घेण्याचा शहाजहाननें केलेला हुकूम यानें धाब्यावर बसविला. याबद्दल शहाजहान यास सजा देणार तेवढ्यांत हा पळाला. कालिंजरपाशीं १०-६-१६३१ रोजीं झालेल्या लढाईंत मधुसिंगाच्या हस्तें हा मारला गेला.

नर हे बाह्य स्नायू आणि बायसेप्टस् हे स्नायुरज्जू असतात. डेल्टॉइड नांवाचा स्नायु या सांध्याच्या बाहेरील बाजूस असून त्याच्या बाहेरील अंगाचा पुढील भाग व मागील भागहि झांकून टाकतो. त्यामुळें हा सर्वांत महत्त्वाचा स्नायु होय. बायसेप्स नांवाच्या मज्जारज्जूचा संबंध कोपर आणि खांदा या दोन्ही सांध्यांशीं असल्यामुळें त्या दोहोंच्या हालचालींतील एकसूत्रता राखण्यास त्याची मदत होते. या सांध्यास अनेक निरनिराळ्या प्रकारचे रोग होण्याचा संभव असतो.

**खादिजा**—महंमद पैगंबरांच्या पहिल्या बायकोचें नांव. ती विधवा असून व्यापार करी. आपले उंट हांकण्याकरितां म्हणून कांहीं काळ तिनें महंमदांस आपल्या नोकरीस ठेवलें व नंतर त्यांच्याशीं लग्न लावलें. तिच्यापासून महंमदांस पुष्कळ मुलें झालीं. परंतु तीन कन्यांशिवाय सर्व मुलें अल्पवयांत मरण पावलीं. महंमदांशीं लग्न झाल्यानंतर खादिजा बावीस वर्षें जगली. हिजरी शकाच्या आरंभापूर्वी तीन वर्षें म्हणजे इ. स. ६१९ ऑगस्टमध्यें ६२ वर्षांची होऊन ती मक्का येथें मरण पावली. खादिजाचें थडगें अजून कायम असून यात्रेकरू त्या ठिकाणीं दर्शनास जातात.

**खांदेरी**—मुंबई, कुलाबा जिल्ह्यांत, अलीबाग तालुक्यांतील एक लहानसें बेट. कुलाब्यापासून हें बेट अडीच मैल दूर असून उंदेरी बेटापासून सव्वा मैलाच्या अंतरावर आहे. खांदेरी बेटाची लांबी सरासरी दीड मैल व रुंदी अर्धा मैल आहे. १८६७ सालीं बांधलेलें एक दीपगृह बेटाच्या अत्युच्च भागीं आहे. १८ मैलांइतक्या अंतरावरून हें दीपगृह दृष्टीस पडतें. शिवाजीनें १६७९ सालीं याची तटबंदी करण्यास सुरुवात केली असें पोर्तुगीज व इंग्लिश लोकांस जेव्हां समजलें तेव्हां दोघेहि खांदेरी बेटावर आपला हक्क सांगूं लागले. पण कोणाचें कांहीं चाललें नाहीं. इ. स. १७२३ त हा किल्ला शाहूनें कान्होजी आंग्रे यास दिला. इ. स. १७४० त इंग्लिश व शिद्दी यांच्यांत तह होऊन त्यांत असें ठरलें कीं, दोघांनीं मिळून खांदेरी किल्ला घ्यावा व शिद्दीनें पुढें तो इंग्लिशांस द्यावा. इ. स. १७७५ त राघोबादादा व इंग्लिश यांच्यामध्यें सुरतेचा तह झाला, तेव्हां खांदेरी इंग्लिशांस मिळाली. परंतु पुरंदरच्या तहान्वयें तो किल्ला मराठ्यांनीं परत घेतला. इ. स. १८१८ त पेशव्यांचें राज्य इंग्लिशांनीं खालसा केलें तेव्हां तो इंग्लिशांच्या हातीं आला.

**खान**—मुसलमानांमधील ही एक बहुमानाची पदवी आहे. मोंगलांमध्यें तुर्कस्थानमधील रानटी जातींत 'खाखान' हा शब्द 'बादशहा' या शब्दाचा वाचक आहे; या खाखानचें खान संक्षित रूप आहे. मोंगलांचा मुख्य जो चेंगिझखान हा खान ही पदवी आपल्याला लावून घेत असे. खान ही पदवी इराण व अफगाणिस्तान यांतील कोणत्याहि सभ्य मुसलमान गृहस्थाला लावण्यांत येते. ब्रिटिश सरकाराकडून पारशी अगर मुसलमान लोकांतील सरकारच्या हितकर्त्या अशा मोठ्या माणसांना खानसाहेब, खानबहादूर अशा पदव्या देण्यांत येत.

**खान, अब्दुल गफार** (१८९१– )— लाल डगलेवाले संघाचे पुढारी व एक देशभक्त राजकारणी पुरुष. यांना सरहद्द गांधी म्हणतात. यांचें शिक्षण प्रवेशपरीक्षेपर्यंत झालें आहे. ब्रिटिश सरकारनें सैन्यामध्यें कमिशन देऊं केलें असतां त्याचा स्वीकार न करतां यांनीं आपल्या गांवामध्यें एक राष्ट्रीय शाळा काढली. परंतु ती १९१५ मध्यें बंद करण्यांत आली. रौलॅट कायद्याविरुद्ध झालेल्या चळवळींत यांनीं महत्त्वाचा भाग घेतला होता. व पुढें हे असहकारितेच्या चळवळीस मिळाले. त्यांत त्यांस तीन वर्षांची सश्रम कारावासाची शिक्षा झाली. १९२९ मध्यें यांनीं एक अफगाणजिरगा भरविला; आणि *खुदाई खिदमतगार नांवाच्या लाल डगलेवाल्या स्वयंसेवक दलाची* स्थापना केली. लवकरच यांस हजारीबाग तुरुंगांत राजकीय कैदी म्हणून ठेवण्यांत आलें (१९३२–३४). तेथून त्यांची १९३४ मध्यें सुटका करण्यांत आली परंतु त्यांस व त्यांचे बंधु डॉ. खानसाहेब यांस पंजाब व वायव्य सरहद्दप्रांत यांतून हद्दपार करण्यांत आलें. मुंबई येथें १९३५ ऑक्टोबरमध्यें भरलेल्या कॉंग्रेसमध्यें एक भाषण केल्याबद्दल यांच्यावर खटला होऊन १२४ अ कलमाखालीं राजद्रोहाबद्दल २ वर्षांची शिक्षा झाली. हे महात्मा गांधींचे कट्टे अनुयायी असून पूर्ण अहिंसावादी आहेत; यामुळें युद्धविषयक धोरणामध्यें त्यांचा इतर पुढाऱ्यांशीं बऱ्याच बाबतींत मतभेद होई. हे कॉंग्रेसचे पुढारी असल्यानें १९४२ पासून सरकारच्या अटकेंत होते. १९४७ सालीं पाकिस्तान झाल्यानंतर यांच्यावर पाकिस्तान सरकारचाहि देशद्रोही म्हणून रोष आहे.

**खानखानान, मिर्झा अब्दुर्रहीम** (मृ. १६२७)— एक मोंगल सरदार. हा बहरामखानाचा मुलगा व एक बादशाही दिवाण होता. अहमदनगरावर स्वारी केल्यानंतर अकबरानें याची दक्षिणच्या सुभ्यावर नेमणूक केली होती. तो तीस वर्षें दक्षिणेंत होता. मलिकंबरानें याचा पाडाव करून अहमदनगर घेतलें तेव्हां हा बऱ्हाणपुरास परत आला. दक्षिणचा कारभार याच्या हातून नीट होत नाहीं, हा शत्रूस सामील होतो, अशा प्रकारचे संशय जहांगिरास येऊन त्यानें खानखानानला दक्षिणेंतून परत बोलाविलें. १६२७ त हा लाहोर येथें मरण पावला. खानखानान फार विद्वान् असून संस्कृत उत्तम जाणीत असे.

**खानखोजे, पांडुरंग सदाशिव** (१८८५– )—अमेरिकेंतील एक हिंदी कृषितज्ज्ञ व देशभक्त पुरुष. मूळचे हे वर्धा येथील राहणारे होत. सन १९०६ मध्यें वयाच्या एक-

विसाव्या वर्षी शेतकीच्या उच्च शिक्षणासाठीं हे अमेरिकेस गेले व सन १९११ मध्यें ऑरेगॉन ॲग्रिकल्चर कॉलेजमधून बी. एस्सी. झाले. पुढें दोन वर्षांतच वॉशिंग्टन विद्यापीठांतून एम्. एस्सी. ची पदवीहि यांनीं मिळवली.

सन १९१३ मध्यें हिंदुस्थानांत औद्योगिक शिक्षणाचा प्रसार करण्याच्या दृष्टीनें यांनीं अमेरिकेंत एक योजना तयार केली व या योजनेच्या प्रसारासाठीं अनेक दौरेहि काढले. कांहीं वर्षे इराणांतील घशघई संस्थानचे शिक्षणमंत्री व व्यापार आणि कृषिविभागाचे संचालक होते.

अमेरिकेंत न्यूयॉर्क शहरीं, 'दि हिंदुस्थान असोसिएशन ऑफ अमेरिका' या नांवाची भारतीय विद्यार्थ्यांची जी संस्था आहे, तिच्या आद्य संस्थापकांपैकीं हे एक होत.

सन १९२१ मध्यें इराण सोडून हे बर्लिनला गेले. यानंतर सन १९२४ मध्यें हे मेक्सिकोंत नॅशनल ॲग्रिकल्चर कॉलेजांत प्रोफेसर म्हणून राहिले.

गव्हासंबंधींचे अनेक शोध व गवतापासून अन्न तयार करण्याचा शोध यांनीं लावला. जुन्या 'लोकशिक्षण' मासिकांत यांचे लेख असत. सन १९१३-१४-१५ या तीन वर्षांत यांची कृपिविपयक 'दुर्जेल कृषि' ही लेखमाला क्रमशः 'चित्रमय जगत्' या मासिकांतून प्रसिद्ध झाली आहे. यांना हिंदुस्थानांत येण्याची ब्रिटिश सरकारने बंदी केली होती ती आतां काढून टाकण्यांत आली आहे.

**खानगी**— राजाच्या स्वतःच्या खाजगी कामासाठीं जें खातें असतें त्याला खानगी (खाजगी) खातें म्हणतात. या खात्याकडे मुख्यतः राजाच्या वार्षिक नेमणुकीची व्यवस्था असते. राजाच्या वस्त्रशाला, पाकशाला, आसवर्गाचें पालनपोषण, देवघर, वगैरे निरनिराळ्या कामकाजांचा कारभार हेंच खातें पाहतें. अष्टप्रधानांत या खात्याचें काम सचिवाकडे असे. तो आपल्या हाताखालीं खानगी कारभारी नेमी. रामायणकाळींहि सुमंत नांवाच्या प्रधानाकडे हें काम होतें.

खानगी खात्याच्या नांवाखालीं संस्थानी राज्यांतील उत्पन्नापैकीं बरेंच उत्पन्न खर्च होतें. हीच रीत एकमुखी राजसत्तेंत सर्वत्र प्रचारांत आहे. प्रजासत्ताक राज्यांत अध्यक्षाची अगर प्रतिनिधींची खानगीची नेमणूक लोकसभा ठरवीत असते.

**खानजहान** (१३७३-८७)— १. एक मुसलमान वजीर. फिरोझशहा तुघ्लकाचा वजीर जो मलिक मकबुल खानजहान याचा हा मुलगा. मलिक मकबुलच्या पश्चात् फिरोझशहानें यासच आपला मुख्य वजीर नेमलें. फिरोझशहाचा मुलगा फत्तेखान याच्या मरणानें आलेल्या फिरोझशहाच्या अस्वस्थपणाचा फायदा घेऊन खानजहाननें बादशहाचा दुसरा मुलगा महम्मदखान हा तख्त बळकावतो आहे असें फिरोझशहास भासवलें. युवराज महम्मदखानानें गुप्तपणें आपल्या बापाची भेट घेऊन सत्य परिस्थिति त्यास निवेदन करतांच खानजहानचा डाव हुकला. महम्मदखानानें त्याजवर चाल केली असतां तो जखमी स्थितींत मेवाडच्या कोक राजाकडे आश्रयास गेला. महम्मदखानानें घोडदळावरील सेनापति सिकंदरखान याजकरवीं कोक राजाकडून खानजहान यास पकडून ठार केलें व त्याचें शीर दिल्लीस आणविलें.

२. (मृ. १५७८). एक मोंगल सरदार. हा अकबराच्या वेळीं पंचहजारी असून याला १५७६ मध्यें बंगालचा सुभेदार नेमला होता. याचें मूळ नांव हुसेनकुली बेग असून खानजहान ही त्याची पदवी होती. बंगालचा नबाब दाऊदखान यानें अकबराविरुद्ध बंड केल्यामुळें यानें त्याचा पराभव करून व त्याला ठार मारून त्याचें डोकें आग्र्यास अकबराकडे पाठविलें.

**खानजहान कोकलताश** (मृ. १६९७)—एक मोंगल सरदार. याचें खरें नांव मीर मलिक हुसेन असें असून हा औरंगजेबाचा दूधभाऊ होता. त्यानें याला प्रथम बहादुरशहा पदवी दिली होती. तो प्रथम ७०० घोडेस्वारांचा सरदार होता तो चढती होत होत १६७४ त सातहजारी सरदार बनला. याला प्रथम दक्षिणची सुभेदारी १६७० त मिळाली. तेव्हांपासून याचा मराठ्यांशीं संबंध आला, व पुष्कळदां पराभव पदरांत घेऊनहि तो मराठ्यांशीं दहा वर्षे झुंजत राहिला. शेवटीं त्यानें मराठ्यांचा नाद अजीबात सोडला आणि भीमाकांठीं पांडेपेडगांव येथें एक भुईकोट किल्ला बांधून त्याचें नांव बहादुरगड ठेवलें व तेथेंच त्यानें आपली कायमची छावणी केली. पुढें सन १६८५ त यानें हैद्राबादेवर हल्ला करून तें लुटलें. १६९० त जंजिऱ्याचा किल्ला तेथील फत्तेखान सिद्दी आपण होऊन मराठ्यांना देत होता. पण यानें जंजिरेकरास मदत करून जंजिरा राखला.

**खानजहान लोदी** (मृ. १६३१)—एक मोंगल सरदार. अफगाण सरदार दौलतखान याचा हा मुलगा भव्य व दिसावयाला देखणा होता. याचा स्वभाव उद्दाम व चैनी असून हिंदूंचा हा अत्यंत द्वेष करी. जहांगीरच्या कारकीर्दींत हा उदयास येऊन ५,००० च्या मनसबदारीपर्यंत चढला. शहाजहानशीं याचें वैर असून यानें बालेघाट प्रांत निजामशहाला तीन लाखांना परत दिला. तो परत घेण्याचा शहाजहाननें केलेला हुकूम यानें धाब्यावर बसविला. याबद्दल शहाजहान यास सजा देणार तेवढ्यांत हा पळाला. कालिंजरपाशीं १०-६-१६३१ रोजी झालेल्या लढाईंत मधुसिंगाच्या हस्तें हा मारला गेला.

**खानझादा**—मुख्यतः यांची वस्ती संयुक्तप्रांतांत आढळते. खानांचे वंशज व गुलामांचे वंशज अशा दोन्ही नांवांनीं हे लोक ओळखले जातात. ते मूळचे जादोन रजपूत असून, भरतपुरांतील तहानगड येथील लखनपाल व सुमित्रपाल हे त्यांचे पूर्वज फिरोझशहाच्या कारकीर्दींत इस्लाम धर्मानुयायी झाले होते. फिरोझशहानें त्यांचें उच्च कुल लक्षांत घेऊन त्यांना मेवाडचे अधिपति केलें, व त्यांस खानझादा म्हणून पदवी दिली. अकबराच्या वेळेपर्यंत ते मेवाडचे अधिपति होते. मेओ लोकांशीं त्यांचा निकट संबंध असल्याबद्दल संशयास जागा आहे. कित्येक खेड्यांतील मेओ लोक आपण पूर्वी खानझादे होतो पण प्रत्युद्वाहामुळें पुनः मेओ झालों असें सांगतात. प्रतापगड येथील खानझाद्यांमध्यें कित्येक रजपूत पंथांचाहि समावेश होतो. शेख व खानझादा यांच्यांत बरेच मुसलमानी रिवाज रूढ झाले आहेत. चिलखीरया व भालेसुलतान खानझादा हे आपल्या ज्ञातींतच लग्नें लावणारे असून इतर पंथ भिन्नगोत्रविवाह लावणारे आहेत. बहुतेक लोक स्वतःस 'शेख' म्हणवितात. ते सुनी पंथाचे आहेत तरी त्यांच्या कित्येक स्त्रिया देवींची उपासना करतात. यांची पंजाबांतहि थोडी वस्ती आहे.

**खानदेश जिल्हे**—मुंबई इलाखा, मध्यभागांतील दोन (पूर्व व पश्चिम खानदेश) जिल्हे. उत्तरेस सातपुडा पर्वत व नर्मदा नदी, पूर्वेस वऱ्हाड व नेमाड, दक्षिणेस सातमाळ चांदोल व अजंठा डोंगर, व पश्चिमेस बडोदें संस्थान आहे. नाशिक जिल्हा नैर्ऋत्येस आहे. खानदेश हा दख्खनच्या पठाराचा उत्तरभाग आहे. यांतून तापी ही मोठी नदी वाहते. जमीन चांगली मळीची व सुपीक आहे. उत्तर व पश्चिम भाग डोंगराळ व जंगलमय आहे. त्यांत भिल्लांची वस्ती आहे. जंगलांतून हिंस्र पशूहि आहेत. पूर्वी हत्ती फार सांपडत. हवामान वेगवेगळ्या प्रकारचें आहे. पाऊस सरासरी २० ते ४५ इंच पडतो. १९०६ सालापासून खानदेशचे दोन भाग करण्यांत आले. पूर्व खानदेशची लो. सं. १३,२७,७२२ व क्षेत्रफळ ४,५२५ चौ. मै. आहे, तर पश्चिम खानदेशची ९,१२,२१४ व क्षे. फ. ५,५२५ चौ. मै. आहे. पू. खा. त १० तालुके व ३ पेटे आणि प. खा. त ७ तालुके व १ पेटा आहे. जळगांव हें पूर्व खा. चें व धुळें हें पश्चिम खा.चें मुख्य ठिकाण आहे. अमळनेर, भुसावळ, चाळिसगांव, एरंडोल, नंदुरबार हीं मोठालीं शहरें खानदेशांत आहेत.

शेंकडा ९० लोक हिंदू आहेत. १९४१ सालीं मुसलमानांची वस्ती सु. दोन लाख होती. ब्राह्मण, कुणबी, मराठे, भिल्ल, माळी, वाणी, तेली, सोनार, रजपूत, धनगर, वंजारी, शिंपी, इ. जाती आहेत. व्यापारी मारवाडी व गुजराथी आहेत. रानवट लोकहि डोंगराळ मुलखांत पुष्कळ आहेत. ख्रिस्ती बहुतेक मिशनरी आहेत. तापीच्या उत्तरेस व्यापारी व शेतकरी भाषा गुजराथी आहे. पश्चिम व दक्षिण या भागांत मराठी रूढ आहे. खानदेशी किंवा अहिराणी म्हणून एक वेगळीच मराठीची बोली इकडे प्रचारांत आहे. मुंबई इलाख्यांत साक्षरतेच्या दृष्टीनें खानदेशचा क्रम १२ वा लागेल. कॉलेजें, हायस्कुलें, प्रा. शाळा ठिकठिकाणीं आहेत. ज्वारी, बाजरी, व कापूस हीं खानदेशचीं मुख्य पिकें होत. कापूस मोठ्या प्रमाणांत बाहेर जातो. जिन व प्रेस अनेक ठिकाणीं आहेत. जंगलाचें उत्पन्न बरेंच येतें. कानडा जिल्ह्याच्या खालोखाल खानदेशचें जंगल मुंबई इलाख्यांत मोठें आहे.

खानदेशाला पूर्वी कन्ह(कृष्ण)देश म्हणत. पुराणांत अश्मक नांवाचा जो देश येतो तो खानदेशच असावा, असें कांहीं संशोधक समजतात. खानदेशांतील तोरणमाळ व अशीरगड हीं अश्वत्थाम्याचीं ठिकाणें होत. ख्रि. पू. १५० च्या सुमारास खानदेशवर रजपूत राजघराणें होतें. दोनतीन शतकांनंतर हा प्रदेश आंध्रांकडे आला. त्यानंतर क्षत्रप, व चालुक्य राजे आले. १२९५ त अल्लाउद्दीन खिलजीनें खानदेशावर स्वारी केल्यापासून १७६० मध्यें मराठ्यांनीं अशीरगड जिंकीपर्यंत खानदेश मुसलमानांच्या ताब्यांत होता. १५९९ त अकबरानें खानदेश आपल्या साम्राज्याला जोडला. पुढें १७२० त निजामानें तो आपला केला. १७६० ते १८१८ पर्यंत तो मराठ्यांकडे होता व त्यांतील कांहीं भाग शिंदे-होळकर यांना जहागीर म्हणून दिला होता.

खानदेशांत अहिराणी ऊर्फ गवळी राजांच्या जुन्या वास्तू पुष्कळ आढळतात. त्यांना हेमाडपंती असेंहि म्हणतात. पितळ खोऱ्यांत बौद्धकालीन चैत्य व विहार आढळले आहेत. पाटण गांव प्राचीन आहे.

**खानापूर**—१. मुंबई, सातारा जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ५०२ चौ. मैल. तालुक्यांत एकंदर ९० खेडीं असून त्यांतच खानापूर आणि विटें यांचा समावेश होतो. १९४१ सालीं तालुक्याची लो. सं. ९९,९९७ होती. पश्चिमेकडील कऱ्हाड खोऱ्याच्या सपाटीपासून खानापूर तालुका २०० फुटांपेक्षां अधिक उंच आहे. हवा समशीतोष्ण आहे. वार्षिक पर्जन्यमान फक्त २४ इंच असून पर्जन्य अनियमित असतो. त्यामुळें उन्हाळ्यांत अनेक वेळां पाण्याची फार तूट पडते. जमीन काळी व मुरमाडहि आहे. दुसऱ्या कांहीं प्रकारच्याहि जमिनी आहेत. खानापूर गांवची लो. सं. ६,३७२ आहे. येथील मशिदींवर अरबी भाषेंत शिलालेख आहेत.

२. मुंबई, बेळगांव जिल्हा, दक्षिणेकडील एक तालुका. क्षे. फ. ६३३ चौ. मै. व लो. सं. ७९,९४०. दक्षिण व नैर्ऋत्य

भाग अतिशय जंगली आहे. पाऊस सरासरी ७० इंच पडतो. मुख्य ठिकाण खानापूर. हें बेळगांवपासून १६ मैलांवर घटप्रभेच्या कांठीं आहे. याच्याजवळच भोपालगड आहे. पूर्वी गोंव्याशीं मोठा व्यापार चाले. आजहि जिल्ह्यांतील एक मोठें उद्योगधंद्याचें ठिकाण म्हणून गणलें जातें. येथें कागद तयार होतो व तांदूळ सडण्याच्या व पिठाच्या गिरण्या आहेत. लो. सं. ५४०९.

**खानापूरकर, विनायक पांडुरंग** ( १८५८–१९१९ )— एक महाराष्ट्रीय ज्योतिष-गणित ग्रंथकार. हे सातारा जिल्ह्यांतील खानापूर येथील राहणारे. यांचें संस्कृत भाषा, ज्योतिष, इत्यादिकांचें अध्ययन जुन्या पद्धतीनें झालेलें असून शिवाय युरोपियन गणित आणि ज्योतिष यांचेंहि अध्ययन केरोपंत छत्रे व रावजी मोरेश्वर देवकुळे यांजपाशीं त्यांनीं केलेलें होतें.

'वैनायकीय द्वादशाध्यायी' नांवाचा ताजक ग्रंथ वर्षफल करण्यास फार सोयीचा असा त्यांनीं केला आहे. तसेंच कुंडसार, अर्थकांड, युक्लिडच्या दोन भागांतील सिद्धान्ताच्या प्रतिज्ञांचा वृत्तबद्ध संस्कृत अनुवाद, सिद्धांतसार हे संस्कृत ग्रंथ त्यांनीं केले आहेत. भास्करीय लीलावती, बीजगोलाध्याय, गणिताध्याय यांचें मराठींत भाषांतर यांनीं सोपपत्तिक केलें आहे. ज्ञानकोशांत त्यांनीं आर्य ज्योतिषांतील अनेक अंगांवर लेख लिहिले आहेत.

**खानेसुमारी**— देशांतील सर्व रहिवाशांची संख्या मोजणें व प्रत्येक रहिवाशाबद्दल आणखी कांहीं उपयुक्त माहिती मिळविणें या कामाला खानेसुमारी म्हणतात. ग्रेट-ब्रिटनमध्यें पहिली खानेसुमारी १८०१ सालीं करण्यांत आली व पुढें दर दहा वर्षांनीं खानेसुमारी करण्याचा क्रम चालू असून १९२१ सालीं जुन्या नियमांप्रमाणें झालेली शेवटची खानेसुमारी होय. १९२० सालीं सेन्सस बिल पार्लमेंटांत मंजूर होऊन दर पांच वर्षांनीं खानेसुमारी करावी असें ठरलें. फ्रान्समध्यें पहिली खानेसुमारी १७०० सालीं झाली व १८२२ पर्यंत तेथें दर पांच वर्षांनीं खानेसुमारी करण्यांत आली. जर्मन साम्राज्यांत १८७१ सालीं पहिली खानेसुमारी होऊन आतांपर्यंत दर पांच वर्षांनीं खानेसुमारी करण्यांत आली आहे. अमेरिकन संयुक्त संस्थानें, स्वित्झर्लंड, नॉर्वे, हॉलंड, बेल्जम व पोर्तुगाल या देशांत दर १० वर्षांनीं खानेसुमारी करण्यांत येते.

हिंदुस्थान—इंग्रजी अमल सुरू झाल्यावर एकदां जुजबी खानेसुमारी—सर्व गोष्टींची—हिंदुस्थानांत करण्यांत आली. पुण्यासारख्या शहरांत प्रत्येक पेठेंतील घरेंहि मोजण्यांत आलीं होतीं. पुढें १८५३ आणि १८८१ या दरम्यानच्या काळांत हिंदुस्थानांतील प्रांतांची खानेसुमारी त्या त्या प्रांतांतर्फे करण्यांत येत असे. पुढें हिंदुस्थान सरकारनें सर्व खानेसुमारी आपणाकडेच घेतली. हा देश फार अफाट व विविध आणि विचित्र लोकसमुदायांनीं भरला असल्यानें याची समाजशास्त्र–अर्थशास्त्र पद्धतींनीं व्यवस्थित खानेसुमारी करणें अवघड आहे. खानेसुमारीच्या तक्त्यांत लिंग, वय, शिक्षण, विवाह, सांपत्तिक स्थिति, जन्मठिकाण, धंदा, धर्म, जात, भाषा, शरीरव्यंग, इ. अनेक सदरें असून हे तक्ते निरनिराळ्या भाषांत छापावे लागतात. १९०१ च्या खानेसुमारींत धर्म आणि मानववंशशास्त्र यांना धरून फार बारकाईनें माहिती दिली आहे. जातीसंबंधीं सामाजिक माहिती सविस्तर आली आहे. १९३१ सालीं कॉंग्रेसनें खानेसुमारीवर बहिष्कार घातल्यानें त्या वेळीं नीट गणना झाली नाहीं. १९४१ सालीं तशी स्थिति नव्हती. तथापि तीवर धर्म आणि भाषा यांबाबतींत राजकीय प्रचारामुळें खोटे तक्ते भरल्याचे साधार आरोप करण्यांत येतात. या खानेसुमारीला सारा ५० लाख रुपये खर्च आला. पाश्चात्य देशांत हा खर्च फार मोठा असतो. पण हिंदुस्थानांत पुष्कळशीं यासंबंधीं कामें विनावेतन करून घेण्यांत येत असतात. आतां १९५१ सालीं खानेसुमारी करण्याची सरकारची तयारी चालली आहे.

**खापर्डे, गणेश श्रीकृष्ण** ( १८५४–१९३८ )— एक महाराष्ट्रीय राजकारणी पुरुष. यांचें शिक्षण वऱ्हाड व मुंबई-मध्यें झालें. १८८५ ते १८८९ मध्यें हे वऱ्हाडांत सरकारी नोकरींत एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर होते. नंतर त्यांनीं वकिली करण्यास प्रारंभ केला. लोकमान्य टिळक यांचे हे सर्व तऱ्हेच्या राष्ट्रीय कार्यांत सहकारी होते. होमरूल लीगचे हे कार्यकर्ते व वजनदार सभासद होते. १९१९ मध्यें इंग्लंडमध्यें गेलेल्या होमरूल लीगतर्फेच्या शिष्ट-मंडळाचे हे सभासद होते. हे अमरावती म्युनिसिपालिटीचे उपाध्यक्ष व जिल्हाबोर्डाचे १७ वर्षें अध्यक्ष होते. हे हिंदुस्थान सरकारच्या कायदेमंडळाचे सभासद होते, व पुढें कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद बरींच वर्षें होते. यांची राहणी खानदानी श्रीमंतीची असे. यांना वऱ्हाडचे नबाब असें संबोधण्यांत येई. हे विनोदी वक्ते व मार्मिक टीकाकार होते.

**खाफीखान**—ख्वाजा मीर या इतिहासकाराचा हा मुलगा असून याचें खरें नांव मुहम्मद हशिमखान असें होतें. ख्वाजा मीर हा औरंगजेबाच्या पदरीं असतां खाफीखान हा लहानाचा मोठा होऊन त्यानें सैन्यांत व राज्यकारभारांत चांगली कामगिरी बजावली. औरंगजेबानंतर सव्वीस वर्षांनीं यानें 'मुतखबुल्लुबाब' या नांवानें फार्सी भाषेत शियापंथीय इतिहास लिहिला. या इतिहासाचा सन १६७८–१७३१ पर्यंतचा भाग यानें लिहिला आहे. यांतील माहिती जुने ग्रंथ व वडील मंडळीची ऐकीव माहिती यांवरून लिहिली असून ती साहाजिकच एकांगी अशी आढळून येते.

**खांब**—इमारतीमध्यें वरील बांधकामाचा भार सहन करण्याकरितां जी एखादी बहुधा वाटोळी व उंच रचना करण्यांत येते तीस खांब ( सं. स्तंभ ) असें म्हणतात. खांबाचा मुख्य भाग म्हणजे मधील सरळ उभा सुळका ( शॅफ्ट ) हा होय. याला खालीं आधाराकरितां एक दगडाचें उथळें ( स्टाचलोबेट ) देण्यांत येतें किंवा कांहीं रचना करण्यांत येते ( बेस ). तसेंच माथ्यावर मथळा अथवा शीर्षक ठेवण्यांत येतें ( कॅपिटल ). या मथळ्यावर पुन्हां आणखी कांहीं रचना करण्यांत येते ( एंटाब्लेचर ). त्या रचनेचे पुन्हां तीन भाग असतातः १ कमानपट्टी ( आर्चिट्रेव्ह ), २ नक्षीपट्टी ( फ्रीज ), व ३ गलथा ( कॉर्निस ). यांवर कलाकुसरीचें काम केलेलें असतें. निरनिराळ्या पद्धतींच्या शिल्पामधील खांबांच्या रचनेंत फरक असतो व त्या पद्धतींवरून त्यांना नांवे देण्यांत येतात. उदा., हिंदु, मिसरी, ग्रीक, रोमन व गॉथिक. त्याप्रमाणेंच एका पद्धतींतहि ज्या क्रमानें हे खांब आढळतात त्या क्रमानें त्यांना पुन्हां निरनिराळीं नावें मिळतात. उदा., डोरिक, आयोनिक, कॉरिंथिअन, कांपोझिट किंवा टस्कन, इ.

**खांब-खांबोळ्या**—लहान मुलींचा एक खेळ. जेथें दालनांत किंवा सभामंडपांत बरेच खांब असतात तेथें हा खेळ खेळतां येतो. एका खांबाला सोडून दुसऱ्या खांबाशीं जातांना शिवणाऱ्या मुलीनें इतर कोणा खेळणाऱ्या मुलीस धरावें; म्हणजे तिच्यावर शिवण्याची पाळी येते.

**खामगांव**—वऱ्हाड, बुलढाणा जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. ४४२ चौ. मै.. लो. सं. एक लाखावर आहे. या तालुक्यांत १४३ खालसा आणि ५ जहागिरीचीं गांवें आहेत. बरेच लोक व्यापारानिमित्त या तालुक्यांत असल्यामुळें लोकसंख्येची वाढ झाली आहे. जमीन खरीप आणि रब्बी पिकांस योग्य आहे. महत्त्वाचीं पिकें कापूस, ज्वारी, इ.. या तालुक्यांत जलंबपासून खामगांवपर्यंत रेल्वेचा फांटा आहे.

खामगाव हें तालुक्याचें मुख्य ठिकाण वाघा नदीच्या कांठीं आहे. जी. आय्. पी. रेल्वेच्या जलंब स्टेशनापासून खामगांवपर्यंत ८ मैल रेल्वेचा फांटा आहे. इ. स. १८७० त येथील कापसाचा बाजार हिंदुस्थानांत सर्वांत मोठा होता. येथें बरेच सरकी काढण्याचे व रुई दाबण्याचे कारखाने आहेत. गांवाच्या आसपास बरीच झाडी असून गांव बराच चांगला दिसतो. सिव्हिल कोर्ट, दवाखाना, पोस्ट-ऑफिस, इंग्रजी शाळा, वगैरे येथें आहेत. इ. स. १८६७ सालीं येथें म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. गांवाच्या दक्षिणेस सुमारें २॥ मैलांवर एक तलाव आहे. त्याचें पाणी गांवांत आणलें आहे.

**खायबर घाट**—हिंदुस्थान ( पाकिस्तान ) आणि अफगाणिस्तान यांमधील एक अतिशय प्रसिद्ध व महत्त्वाचा मार्ग. हा वायव्य सरहद्द प्रांतांतल्या पेशावर जिल्ह्यांतून पेशावरच्या पश्चिमेस १०½ मैलांवर सुरू होतो. हा मार्ग ज्या पर्वताच्या रांगांतून जातो त्यांनाहि हेंच नांव लावितात. वाटेंत अली मस्जीद, लंडीकोटल व तोरखमल हीं मुख्य स्थळें लागतात. ही वाट ३५ मैलांची असून फार चढउताराची व बिकट आहे. पुरातन काळापासून हें हिंदुस्थानचें महाद्वार म्हणून प्रसिद्ध आहे. मागें इराणी आणि ग्रीक सेल्युक, तार्तर, मोंगल, आणि दुराणी याच द्वारांतून हिंदुस्थानांत शिरले. अलेक्झांडर, गझनीचा महमद, बाबर, नादिरशहा आणि अहमदशहा अब्दाली याच मार्गानें इकडे आले. अद्यापि दर मंगळवारीं आणि शुक्रवारीं उंट आणि व्यापारी यांचे मोठाले तांडे या घाटांतून जातांना दिसतात. हा ऐतिहासिक मार्ग आतांप्रमाणें मागेंहि आफ्रिडी पठाणांच्या ताब्यांत असे. मोंगल बादशहांनीं आपल्या ताब्यांत हा मार्ग ठेवण्याचा फार प्रयत्न केला होता; पण त्यांना फारसे यश आलें नाहीं. १८७९ त ब्रिटिश सरकार व अमीर याकुबखान यामध्यें जो तह ( गंडमक ) झाला त्याअन्वयें खायबर मार्गाचा ताबा ब्रिटिशांकडे गेला व त्यांनीं आफ्रिडी लोकांना याची व्यवस्था ठेवण्यासाठीं दरसाल द्यावयाची रक्कम ( रु. ८८,५४० ) ठरविली. १८९७ सालीं आफ्रीडींनीं बंड केल्यावरून त्याचा सैन्य पाठवून मोड करण्यांत आला व पुनः नवा करार करून घेतला. आतां याची जबाबदारी पाकिस्तान सरकारकडे आहे.

**खार**— हा मूषकदंती वर्गातील लहान सस्तन प्राणी आहे.

यांचे मुख्य तीन वर्ग आहेत : एक सामान्य खार, दुसरी जमिनींत राहणारी, व तिसरी उडती खार. सामान्य खारींचे खाल्चे

खायबरघाट—आफ्रिडी खेडें व तटबंदी (पृ. ६०८)

गोवें—सेंट झेविअरचें देऊळ (पृ. ७११)

गोवें—सेंट झेविअरची समाधि (पृ. ७११)

बिहारओरिसांत यांच्यांत दोन पोटजाती आहेत: गोमांस खाणारे ( चोट गोहंडी ), व न खाणारे ( बार गोहंडी ).

**खारी माती**—मुलतानी माती ( फुलर्स अर्थ ). हा एक मातीचा प्रकार असून जिन्नस घासण्याच्या आणि उजळण्याच्या कामीं याचा उपयोग करतात. हींत वाळू, स्फटमृत्तिका ( अॅल्युमिना ) आणि पाणी व मातींतील इतर अशुद्ध द्रव्यें असतात. अंगाच्या कातडीची आग शमविण्यासाठीं या मातीचा औषधी उपयोग करतात. इंग्लंडच्या दक्षिण भागांत या मातीच्या मोठमोठ्या जमिनी आहेत.

**खार्टुम**—अॅंग्लो-ईजिप्शियन सुदानची राजधानी. हें शहर नील नाइल व श्वेत नाइल यांच्या संगमावर आहे. याची लो. सं. ३४,९५०. खार्टुममधील लोकसंख्या संमिश्र प्रकारची आहे.

या शहराची मांडणी फार सुंदर आहे. बगिच्यांनीं व ताल वृक्षांनीं वेष्टिलेल्या दगडी व विटांच्या इमारतींनीं शहराला फार शोभा आणली आहे. किल्ल्यापुढील मैदानाच्या मध्यभागीं ग. जनरलचा राजवाडा आहे. इमारतीच्या पूर्व बाजूस सुदान क्लब, लष्करी दवाखाना, गॉर्डन मेमोरियल कॉलेज, किचनेरचें स्मारक, वैद्यकी शाळा, इ. इमारती आहेत. या ठिकाणीं अॅंग्लिकन चर्च, ग्रीक चर्च व ऑस्ट्रियन रोमन कॅथोलिक मिशन, इ. धर्मसंस्था आहेत.

ईजिप्तनें सुदान काबीज केलें त्या वेळीं खार्टुम हें एक लहानसें खेडें होतें. १८२२ त ईजिप्शियनांनीं तेथें कायमची छावणी बांधली. या छावणीचें पुढें खार्टुम शहर होऊन १८३० त तें सुदानच्या राजधानीचें शहर करण्यांत आलें. १८८५ सालीं जनरल गॉर्डननें दाखविलेल्या शौर्याबद्दल हें प्रसिद्ध आहे.

**खालसा-दिवाण**—नवीन मुलूख जिंकून घेतला म्हणजे तेथील वसूल गोळा करण्यास मोंगल बादशहा ज्या अधिकाऱ्याची योजना करीत त्याला खालसा-दिवाण म्हणत. फौजदाराकडे लष्करी बंदोबस्ताचें व पोलिसाचें काम; व दिवाणाकडे फक्त मुलकी कारभार, अशी कामाची विभागणी केलेली असे. एका सुभ्यांत कित्येक फौजदार असत व त्या प्रत्येकाच्या मदतीस एक एक दिवाण असे. दक्षिण हिंदुस्थानांत औरंगझेबानें जे दिवाण नेमले होते ते फौजदारांच्या मदतीनें तालुक्यांच्या निरनिराळ्या देशमुखांना किंवा देसायांना जमिनी इजाऱ्यानें देऊन मग त्यांच्यापासून वसूल गोळा करीत असत.

**खाल्डिया**—खाल्डिया व खाल्डियन हीं नांवें बायबलांतील जुन्या करारांत बाबिलोनिया व बाबिलोनियन लोक यांच्याऐवजीं वारंवार योजिलेलीं आढळतात. बाबिलोनियाच्या एका अगदीं दक्षिणेकडील प्रदेशाला हें नांव लावीत. याची राजधानी बितयकीन असून तें प्रसिद्ध खाल्डियन बंडखोर मेरोडक बलादन याचें मुख्य निवासस्थान होतें. पूर्वी निरनिराळ्या वाहत असलेल्या तैग्रीस व युफ्रेटिस नद्यांच्या मुखाजवळच कोठें तरी खाल्डियनांचा प्रदेश असावा. आरेमाईक भाषेला कधीं कधीं खाल्डियन भाषा म्हणतात. जुन्या करारांतील कांहीं भाग या भाषेंत आहे.

खाल्डियन शब्दाची उपपत्ति अनिश्चित आहे. झेनोफोन ज्या काळ्या समुद्रावरील लोकांना खाल्डियन म्हणतो ते व बाबिलोनियांतील खाल्डियन एक नाहींत. डॅनियलमध्यें व त्याचप्रमाणें हिरोडोटस, स्ट्रॅबो यांच्या ग्रंथांत खाल्डियन शब्द 'ज्योतिषी' या अर्थानें योजला आहे. दक्षिण बाबिलोनियांतील उपाध्याय 'खाल्डियन' या नांवानें प्रसिद्ध असून त्यांना सर्व मोठमोठ्या शहरीं जावें लागे. पुढें बाबिलोनियांतील भिक्षुकवर्गाला हें नांव सामान्यतः लावूं लागले.

**खाल्दून** ( १३३२-१४०६ )—एक अरब इतिहासकार. याचें सबंध नांव अबुझइद इब्न महंमद खाल्दून होतें. हा ट्यूनिस येथें जन्मला. त्यानें अनेक विषयांचें ज्ञान मिळविलें. वयाच्या विसाव्या वर्षी मारिनिड सुलतान अबु इनान याच्या हाताखालीं त्याला फेज येथें नोकरी मिळाली. पण लौकरच त्याच्यावर कटाचा आरोप येऊन त्याला कैदेंत ठेवण्यांत आलें. सुलतान मरण पावल्यावर त्याची सुटका झाली व त्यानें सुलतान अबुसालेम याची चांगल्या प्रकारें नोकरी केली. पण मुख्य प्रधानाचा त्याजवर रोष झाल्यामुळें त्यानें स्पेन देशांत जाण्याची परवानगी मिळविली. स्पेनमध्यें असतांना राजाची अत्यंत कृपा संपादन केल्यामुळें वजिराच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला व त्यास आफ्रिकेंत जावें लागलें. तेथें बोगीचा सुलतान अबु अब्दल्ला यानें त्याचें प्रेमानें स्वागत केलें. इ. स. १३७८ त तो ट्यूनिसच्या सुलतानाजवळ नोकर राहिला. तेथें त्यानें आपला अभ्यासक्रम चालू ठेवून बर्बर देशाचा इतिहास लिहिण्यास प्रारंभ केला. पुढें लवकरच त्यानें तेथून मक्केस जाण्याची परवानगी मिळविली व वाटेंत त्याला कायरो येथें मलकाइट पंथाचा कादी करण्यांत आलें. याच वेळीं त्याची बायको व कुटुंब त्यास भेटण्यास येत असतां जहाज फुटून सर्व माणसें बुडून मेलीं. कादीचा अधिकार निघाल्यामुळें व या दुःखामुळें त्यानें आपलें लक्ष इतिहास लिहिण्याकडे अधिक दिलें. यानंतर तीन वर्षांनीं तो मक्केस गेला व पुनः त्यास कादी नेमण्यांत आलें. 'जगाचा इतिहास लिहिणारा' म्हणून तो प्रसिद्ध आहे.

**खाजगीवाले**—मराठेशाहींतील एक ब्राह्मण सरदार-घराणें. याच्याकडे पेशव्यांच्या खाजगीकडील काम असे. आडनांव लिमये व कोंकणांतील करले गांवचे. मूळ पुरुष शिवरामपंत

यानें पंढरपुरास पांडुरंगाचें एक देवस्थान स्थापिलें; तें अद्यापि चाललें आहे. शिवरामपंतानंतर त्याचा भाऊ जिवाजी आण्णा खाजगीचा कारभार पाहत असे. आण्णा फार ताम्दवान् होता. खासगीवाले पेशव्यांचरोबर मोहिमांवरहि जात. शिवरामपंताचा एक मुलगा गोविंदराव यानें बराच लौकिक मिळविला. यानेंच पुण्यांतील रामेश्वराचें देऊळ बांधलें. पुण्यास फुले मार्केट-जवळच्या वाड्यांत यांचे वंशज असतात.

**खासी आणि जेंटिया डोंगर** (हिंदी)—आसाम, सुरमादरी व डोंगरी विभाग यांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,३५३ चौ. मै., लोकसंख्या (१९४१) १,१८,६६५ आहे. या जिल्ह्यांत एकसारख्या पूर्वपश्चिम डोंगरांच्या रांगा असून मधूनमधून उंच पठारें आहेत. प्राचीन काळापासून तळबंगालला चुन्याचा पुरवठा खासी डोंगरांतून होई. या ठिकाणीं कोळसाहि निघतो. ब्रिटिशांनीं १८३३ त खासी डोंगर जिंकून घेतले. यांतून खासी लोक राहतात. खासी लोकांनीं निवडलेले राजे ब्रिटिश सरकारचे मांडलिक म्हणून वागत. असे २५ राजे (सीम) असून ते स्वतंत्रपणें कारभार चालवितात. जेंटिया डोंगर १८३५ त एका छोट्या हिंदु संस्थानाकडून ब्रिटिशांनीं घेतले. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण पूर्वी चेरापुंजी होतें तें शिलांग करण्यांत आलें. चेरापुंजीपासून गौहत्तीपर्यंत चांगला रस्ता आहे. १८९७ त या जिल्ह्यांत मोठा धरणीकंप होऊन बरींच घरें व रस्ते पडून गेले व पुष्कळ प्राणहानि झाली.

**खिजरखान खिल्जी** (मृ. १३१८)— अल्लाउद्दिन खिल्जीचा हा वडील मुलगा असून यास सन १३१२ मध्यें राज्यछत्र वापरण्याचा मान मिळाला. गुजराथच्या कर्णाची मुलगी देवलदेवी हिच्याशीं यानें सन १३०७ मध्यें लग्न लावलें. हा अशिक्षित होता. हा चितोडचा राजा होतांच चितोडचें नांव खिजराबाद असें ठेवण्यांत आलें. रजपुतांच्या विरोधामुळें व याच्या बापाचा हस्तक कापूर याच्या कारवायांमुळें यास दिल्लीस परत जावें लागलें. दिल्लीस याजवर क्रांतीच्या कटाचा आरोप येऊन हा कैद झाला व त्याचे डोळे काढण्यांत आले. कापूरचा खून करून गादीवर आलेल्या मुबारकनें यांस ठार मारलें.

**खिरणी-रायणी**—खिरणीचीं अथवा रायणीचीं झाडें बकुळीसारखींच असून तीं मुंबई इलाख्यांत बहुतेक सर्व ठिकाणीं होतात. विशेषतः गुजराथेंत रस्त्याच्या कडेला खिरणीचीं झाडें पुष्कळ दृष्टीस पडतात. यांना उष्ण व कोरडी हवा चांगली मानवते. खिरणीचीं झाडें रस्त्याच्या बाजूला लावण्याला फार चांगल्यांपैकीं आहेत. कारण एकदां लावल्यावर त्यांची पुनः काळजी घ्यावी लागत नाहीं. झाडाची पालवी झडत नाहीं. लांकूड उत्तम व कणखर असतें. फळहि रुचकर असतें; यामुळें उन्हाळ्यांत व दुष्काळाच्या दिवसांत गरीब लोकांचा या फळांवर बराच गुजारा होतो.

**खिरा**—खिरा, कांकडी, वाळूक हीं नांवें कांकडीच्या जातीच्या फळांस देतात. परंतु या नांवांमध्यें बराच घोंटाळा आहे. खिरा हें फळ पांढरें अगर हिरवट पांढरें असतें. तीन ते नऊ इंच लांब असून पिकल्यावर तें पिवळें होतें. यास उंसाच्या शेतांत अगर निराळें लावतात. याचे वेल ६ फूट वाढतात व ते जमिनीवर पसरतात. ही जात पुणें प्रांतीं व उत्तर हिंदुस्थानांत पिकवितात. पुण्यास वाळुकासहि खिरा हेंच नांव प्रचलित आहे. खिरे टिकाऊ नसतात. ते तोडल्यावर लवकर कापुसतात व नंतर सडतात.

**खिलचीपूर संस्थान**—मध्यहिंदुस्थान, भोपाळ एजन्सींतील एक मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ २७३ चौ. मैल. लो. सं. ४८,६४२. याच्या उत्तरेस कोल संस्थान, पूर्वेस राजगड, पश्चिमेस इंदूर व दक्षिणेस नरसिंगगड आहे. हवा समशीतोष्ण असून पाऊस सरासरी ३२ इंच पडतो. संस्थानिक प्रसिद्ध चौहान वंशांतील खोची रजपूत आहेत. १५४४ त उग्रसेनानें गागरोणच्या खोची राजधानींतून इकडे येऊन हें संस्थान स्थापिलें. झिरापूर व माचलपूर परगणे यांची जहागिरी दिल्लीच्या बादशहानें त्याला दिली. १७७० त या संस्थानचा कांहीं मुलूख कमी झाला. संस्थानिकांना रावबहादुर अशी पदवी आहे.

या संस्थानांत खिलचीपूर हें एकच शहर असून बाकी २८३ गांवें आहेत. संस्थानच्या नैर्ऋत्येकडील प्रदेश चांगला सुपीक आहे. मुख्य पीक ज्वारीचें आहे.

संस्थानांत एकंदर तीन तहशिली आहेत. मुलकी व जमाबंदीच्या बाबतींत संस्थानिकाला पूर्ण अधिकार आहेत. आतां हें संस्थान मध्यभारत संघांत समाविष्ट आहे. संस्थानी उत्पन्न चार लाखांवर आहे.

खिलचीपूर शहर विंध्याद्रीच्या एका शाखेच्या पायथ्याशीं डोंगराळ प्रदेशांत वसलें आहे. यांचें मूळ नांव खीचीपूर. पोस्ट, कचेरी, शाळा, तुरुंग व दवाखाना या गांवांत आहेत.

**खिलजी घराणें** (१२९०–१३२१)—दिल्लीचें एक पठाण राजघराणें. या घराण्याचा संस्थापक जलालुद्दीन नांवाचा मुसलमान सरदार होता. अफगाणिस्तानांतील खलज नांवाच्या प्रांतांतील रहिवाशांना खिलजी असें म्हणतात. त्या जातीचा हा जलालुद्दिन होता. गुलाम घराण्याच्या वेळीं राज्यांतील मोठमोठ्या जागा तुर्कांना मिळत. त्यामुळें तुर्कांचा व खिलजी लोकांचा बेबनाव असे. बंगाल जिंकण्यांत या लोकांनीं बरेंच शौर्य दाखविलें होतें. गुलाम वंशाच्या अखेरीस हे लोक बरेच शिरजोर झाले होते. कैकोबाद हा गुलाम घराण्याचा शेवटचा राजा होता.

बिहारओरिसांत यांच्यांत दोन पोटजाती आहेत: गोमांस खाणारे ( चोट गोहंडी ), व न खाणारे ( बार गोहंडी ).

**खारी माती**—मुलतानी माती ( फुल्लर्स अर्थ ). हा एक मातीचा प्रकार असून जिन्नस घासण्याच्या आणि उजळण्याच्या कामीं याचा उपयोग करतात. हींत वाळू, स्फटमृत्तिका ( ॲल्युमिना ) आणि पाणी व मातींतील इतर अशुद्ध द्रव्यें असतात. अंगाच्या कातडीची आग शमविण्यासाठीं या मातीचा औषधी उपयोग करतात. इंग्लंडच्या दक्षिण भागांत या मातीच्या मोठमोठ्या जमिनी आहेत.

**खार्टुम**— ॲंग्लो-ईजिप्शियन सुदानची राजधानी. हें शहर नील नाइल व श्वेत नाइल यांच्या संगमावर आहे. याची लो. सं. ३४,९५०. खार्टुममधील लोकसंख्या संमिश्र प्रकारची आहे.

या शहराची मांडणी फार सुंदर आहे. बगिच्यांनीं व ताल वृक्षांनीं वेष्टिलेल्या दगडी व विटांच्या इमारतींनीं शहराला फार शोभा आणली आहे. किल्ल्यापुढील मैदानाच्या मध्यभागीं ग. जनरलचा राजवाडा आहे. इमारतींच्या पूर्व बाजूस सुदान क्लब, लष्करी दवाखाना, गॉर्डन मेमोरियल कॉलेज, किचनेरचें स्मारक, वैद्यकी शाळा, इ. इमारती आहेत. या ठिकाणीं ॲंग्लिकन चर्च, ग्रीक चर्च व ऑस्ट्रियन रोमन कॅथोलिक मिशन, इ. धर्मसंस्था आहेत.

ईजिप्तनें सुदान काबीज केलें त्या वेळीं खार्टुम हें एक लहानसें खेडें होतें. १८२२ त ईजिप्शियनांनीं तेथें कायमची छावणी बांधली. या छावणीचें पुढें खार्टुम शहर होऊन १८३० त तें सुदानच्या राजधानीचें शहर करण्यांत आलें. १८८५ सालीं जनरल गॉर्डननें दाखविलेल्या शौर्याबद्दल हें प्रसिद्ध आहे.

**खालसा-दिवाण**—नवीन मुलूख जिंकून घेतला म्हणजे तेथील वसूल गोळा करण्यास मोंगल बादशहा ज्या अधिकाऱ्याची योजना करीत त्याला खालसा-दिवाण म्हणत. फौजदाराकडे लष्करी बंदोबस्ताचें व पोलिसाचें काम, व दिवाणाकडे फक्त मुलकी कारभार, अशी कामाची विभागणी केलेली असे. एका सुभ्यांत कित्येक फौजदार असत व त्या प्रत्येकाच्या मदतीस एक एक दिवाण असे. दक्षिण हिंदुस्थानांत औरंगझेबानें जे दिवाण नेमले होते ते फौजदारांच्या मदतीनें तालुक्यांच्या निरनिराळ्या देशमुखांना किंवा देसायांना जमिनी इजाऱ्यानें देऊन मग त्यांच्यापासून वसूल गोळा करीत असत.

**खाल्डिया**—खाल्डिया व खाल्डियन हीं नांवें बायबलांतील जुन्या करारांत बाबिलोनिया व बाबिलोनियन लोक यांच्याऐवजीं वारंवार योजिलेलीं आढळतात. बाबिलोनियाच्या एका अगदीं दक्षिणेकडील प्रदेशाला हें नांव लावीत. याची राजधानी बितयकीन असून तें प्रसिद्ध खाल्डियन बंडखोर मेरोडक बलादन याचें मुख्य निवासस्थान होतें. पूर्वी निरनिराळ्या वाहत असलेल्या तैग्रीस व युफ्रेटिस नद्यांच्या मुखाजवळच कोठें तरी खाल्डियनांचा प्रदेश असावा. आरेमाईक भाषेला कधीं कधीं खाल्डियन भाषा म्हणतात. जुन्या करारांतील कांहीं भाग या भाषेंत आहे.

खाल्डियन शब्दाची उपपत्ति अनिश्चित आहे. झेनोफोन ज्या काळ्या समुद्रावरील लोकांना खाल्डियन म्हणतो ते व बाबिलोनियांतील खाल्डियन एक नाहींत. डॅनियलमध्यें व त्याचप्रमाणें हिरोडोटस, स्ट्रॅबो यांच्या ग्रंथांत खाल्डियन शब्द 'ज्योतिषी' या अर्थानें योजला आहे. दक्षिण बाबिलोनियांतील उपाध्याय 'खाल्डियन' या नांवानें प्रसिद्ध असून त्यांना सर्व मोठमोठ्या शहरीं जावें लागे. पुढें बाबिलोनियांतील भिक्षुकवर्गाला हें नांव सामान्यतः लावूं लागले.

**खाल्दून** ( १३३२–१४०६ )—एक अरब इतिहासकार. याचें सबंध नांव अबुझइद इब्न महंमद खाल्दून होतें. हा ट्यूनिस येथें जन्मला. त्यानें अनेक विषयांचें ज्ञान मिळविलें. वयाच्या विसाव्या वर्षी मारिनिड सुलतान अबु इनान याच्या हाताखालीं त्याला फेज येथें नोकरी मिळाली. पण लौकरच त्याच्यावर कटाचा आरोप येऊन त्याला कैदेंत ठेवण्यांत आलें. सुलतान मरण पावल्यावर त्याची सुटका झाली व त्यानें सुलतान अबुसालेम याची चांगल्या प्रकारें नोकरी केली. पण मुख्य प्रधानाचा त्याजवर रोष झाल्यामुळें त्यानें स्पेन देशांत जाण्याची परवानगी मिळविली. स्पेनमध्यें असतांना राजाची अत्यंत कृपा संपादन केल्यामुळें वजिराच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला व त्यास आफ्रिकेंत जावें लागलें. तेथें बोगीचा सुलतान अबु अब्दल्ला यानें त्याचें प्रेमानें स्वागत केलें. इ.स. १३७८ त तो ट्यूनिसच्या सुलतानाजवळ नोकर राहिला. तेथें त्यानें आपला अभ्यासक्रम चालू ठेवून बर्बर देशाचा इतिहास लिहिण्यास प्रारंभ केला. पुढें लवकरच त्यानें तेथून मक्केस जाण्याची परवानगी मिळविली व वाटेंत त्याला कायरो येथें मलकाइट पंथाचा कादी करण्यांत आलें. याच वेळीं त्याची बायको व कुटुंब त्यास भेटण्यास येत असतां जहाज फुटून सर्व माणसें बुडून मेलीं. कादीचा अधिकार निघाल्यामुळें व या दुःखामुळें त्यानें आपलें लक्ष इतिहास लिहिण्याकडे अधिक दिलें. यानंतर तीन वर्षांनीं तो मक्केस गेला व पुनः त्यास कादी नेमण्यांत आलें. 'जगाचा इतिहास लिहिणारा' म्हणून तो प्रसिद्ध आहे.

**खाजगीवाले**—मराठेशाहींतील एक ब्राह्मण सरदार-घराणें. याच्याकडे पेशव्यांच्या खाजगीकडील काम असे. आडनांव लिमये व कोंकणांतील करले गांवचे. मूळ पुरुष शिवरामपंत

यानें पंढरपुरास पांडुरंगाचें एक देवस्थान स्थापिलें; तें अद्यापि चाललें आहे. शिवरामपंतानंतर त्याचा भाऊ जिवाजी आणा खाजगीचा कारभार पाहत असे. आणा फार तान्दवान् होता. खासगीवाले पेशव्यांबरोबर मोहिमवराहि जात. शिवरामपंताचा एक मुलगा गोविंदराव यानें बराच लौकिक मिळविला. यानेंच पुण्यांतील रामेश्वराचें देऊळ बांधलें. पुण्यास फुले मार्केट-जवळच्या वाड्यांत यांचे वंशज असतात.

**खासी आणि जेंटिया डोंगर** (हिंदी)—आसाम, सुरमादरी व डोंगरी विभाग यांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,३५३ चौ. मै., लोकसंख्या (१९४१) १,१८,६६५ आहे. या जिल्ह्यांत एकसारख्या पूर्वपश्चिम डोंगरांच्या रांगा असून मधूनमधून उंच पठारें आहेत. प्राचीन काळापासून तळबंगालला चुन्याचा पुरवठा खासी डोंगरांतून होई. या ठिकाणीं कोळसाहि निघतो. ब्रिटिशांनीं १८३३ त खासी डोंगर जिंकून घेतले. यांतून खासी लोक राहतात. खासी लोकांनीं निवडलेले राजे ब्रिटिश सरकारचे मांडलिक म्हणून वागत. असे २५ राजे (सीम) असून ते स्वतंत्रपणें कारभार चालवितात. जेंटिया डोंगर १८३५ त एका छोट्या हिंदु संस्थानाकडून ब्रिटिशांनीं घेतले. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण पूर्वी चेरापुंजी होतें तें शिलांग करण्यांत आलें. चेरापुंजीपासून गोहत्तीपर्यंत चांगला रस्ता आहे. १८९७ त या जिल्ह्यांत मोठा धरणीकंप होऊन बरींच घरें व रस्ते पडून गेले व पुष्कळ प्राणहानि झाली.

**खिजरखान खिल्जी** (मृ. १३१८)— अल्लाउद्दिन खिल्जीचा हा वडील मुलगा असून यास सन १३१२ मध्यें राज्यछत्र वारण्याचा मान मिळाला. गुजराथच्या कर्णाची मुलगी देवलदेवी हिच्याशीं यानें सन १३०७ मध्यें लग्न लावलें. हा अशिक्षित होता. हा चितोडचा राजा होतांच चितोडचें नांव खिजराबाद असें ठेवण्यांत आलें. रजपुतांच्या विरोधामुळें व याच्या बापाचा हस्तक कापूर याच्या कारवायांमुळें यास दिल्लीस परत जावें लागलें. दिल्लीस याजवर क्रांतीच्या कटाचा आरोप येऊन हा कैद झाला व त्याचे डोळे काढण्यांत आले. काफूरचा खून करून गादीवर आलेल्या मुबारकनें यांस ठार मारलें.

**खिरणी-रायणी**—खिरणीचीं अथवा रायणीचीं झाडें बकुळीसारखींच असून तीं मुंबई इलाख्यांत बहुतेक सर्व ठिकाणीं होतात. विशेषतः गुजराथेंत रस्त्याच्यां कडेला खिरणीचीं झाडें पुष्कळ दृष्टीस पडतात. यांना उष्ण व कोरडी हवा चांगली मानवते. खिरणीचीं झाडें रस्त्याच्या बाजूला लावण्याला फार चांगल्यापैकीं आहेत. कारण एकदां लावल्यावर त्यांची पुनः काळजी घ्यावी लागत नाहीं. झाडाची पालवी झडत नाहीं. लांकूड उत्तम व कणखर असतें. फळहि रुचकर असतें, यामुळें उन्हाळ्यांत व दुष्काळाच्या दिवसांत गरीब लोकांचा या फळांवर बराच गुजारा होतो.

**खिरा**—खिरा, कांकडी, वाळूक हीं नांवें कांकडीच्या जातीच्या फळांस देतात. परंतु या नांवांमध्यें बराच घोंटाळा आहे. खिरा हें फळ पांढरें अगर हिरवट पांढरें असतें. तीन ते नऊ इंच लांब असून पिकल्यावर तें पिवळें होतें. यास उंसाच्या शेतांत अगर निराळें लावतात. याचे वेल ६ फूट वाढतात व ते जमिनीवर पसरतात. ही जात पुणें प्रांतीं व उत्तर हिंदुस्थानांत पिकवितात. पुण्यास वाळुकासहि खिरा हेंच नांव प्रचलित आहे. खिरे टिकाऊ नसतात. ते तोडल्यावर लवकर कापुसतात व नंतर सडतात.

**खिलचीपूर संस्थान**—मध्यहिंदुस्थान, भोपाळ एजन्सींतील एक मांडलिक संस्थान. क्षेत्रफळ २७३ चौ. मैल. लो. सं. ४८,६४२. याच्या उत्तरेस कोल संस्थान, पूर्वेस राजगड, पश्चिमेस इंदूर व दक्षिणेस नरसिंगगड आहे. हवा समशीतोष्ण असून पाऊस सरासरी ३२ इंच पडतो. संस्थानिक प्रसिद्ध चौहान वंशांतील खीची रजपूत आहेत. १५४४ त उग्रसेनानें गाग्रौणच्या खीची राजधानींतून इकडे येऊन हें संस्थान स्थापिलें. झिरापूर व माचलपूर परगणे यांची जहागिरी दिल्लीच्या बादशहानें त्याला दिली. १७७० त या संस्थानचा कांहीं मुलूख कमी झाला. संस्थानिकांना रावबहादुर अशी पदवी आहे.

या संस्थानांत खिलचीपूर हें एकच शहर असून बाकी २८३ गांवें आहेत. संस्थानच्या नैर्ऋत्येकडील प्रदेश चांगला सुपीक आहे. मुख्य पीक ज्वारीचें आहे.

संस्थानांत एकंदर तीन तहशिली आहेत. मुलकी व जमाबंदीच्या बाबतींत संस्थानिकाला पूर्ण अधिकार आहेत. आतां हें संस्थान मध्यभारत संघांत समाविष्ट आहे. संस्थानी उत्पन्न चार लाखांवर आहे.

खिलचीपूर शहर विंध्याद्रीच्या एका शाखेच्या पायथ्याशीं डोंगराळ प्रदेशांत वसलें आहे. यांचें मूळ नांव खीचीपूर. पोस्ट, कचेरी, शाळा, तुरुंग व दवाखाना या गांवांत आहेत.

**खिलजी घराणें** (१२९०–१३२१)—दिल्लीचें एक पठाण राजघराणें. या घराण्याचा संस्थापक जलालुद्दीन नांवाचा मुसलमान सरदार होता. अफगाणिस्तानांतील खलज नांवाच्या प्रांतांतील रहिवाशांना खिलजी असें म्हणतात. त्या जातीचा हा जलालुद्दिन होता. गुलाम घराण्याच्या वेळीं राज्यांतील मोठमोठ्या जागा तुर्कांना मिळत. त्यामुळें तुर्कांचा व खिलजी लोकांचा बेबनाव असे. बंगाल जिंकण्यांत या लोकांनीं बरेंच शौर्य दाखविलें होतें. गुलाम वंशाच्या अखेरीस हे लोक बरेच शिरजोर झाले होते. कैकोबाद हा गुलाम घराण्याचा शेवटचा राजा होता.

तो जुलमी असल्यानें व वजिराचा शिरच्छेद झाल्यामुळें बंडखोर खिलज लोकांनीं त्यांचा पुढारी जलालुद्दीन याच्या चिथावणीवरून कैकोबादचा निर्दयपणें खून केला. पुढें लोकांच्या डोळ्यांवर येऊं नये म्हणून कैकोबादच्या अल्पवयी शम्सुद्दीन नांवाच्या मुलास जलाल यानें गादीवर बसविलें; परंतु थोड्याच दिवसांनीं त्याचाहि खून करून जलालनें तख्त बळकावून स्वतःस फिरोझशहा नांव घेतलें ( फेब्रु. १२९० ). या वेळीं त्याचें वय ७० होतें. या घराण्यांत सहा राजे होऊन त्यांनीं एकंदर तीस वर्षें राज्य केलें; त्यांत फक्त अल्लाउद्दीन हा प्रख्यात झाला.

**खिलात**—याचा मूळ अर्थ बहुमानाचा झगा किंवा पोशाख असून तो बादशहाकडून सरदारास बक्षीस म्हणून मिळत असे. शिवाय त्याबरोबरच देणारा व घेणारा यांच्या दर्जाप्रमाणें घोडा, हत्ती, तलवार, वगैरे युद्धोपयोगी वस्तू, आणि पागोटें, पायजमा, अंगरखा, शेला, वगैरे वस्त्रें; व शिरपेंच, कंठा, इ. दागिनेंहि देत. दिल्लीच्या बादशहानें १७९२ त सवाई माधवरावाला वकील-इ-मुतालक या हुद्याची सनद पाठविली. त्या वेळीं पुढीलप्रमाणें खिलात पाठविली होती: बहुमानाच्या पोशाखाचीं नऊ वस्त्रें; पांच बहुमोल जडावाचे अलंकार; ढाल व तलवार; कलमदान, शिक्का, दऊत; दोन मोर्चेले; नालखी व पालखी; व एक हत्ती आणि बादशाही निशाणाचे सहा हत्ती.

**खिसमिस**— ( मूळ फारसी शब्द किश्मिश असा आहे ) द्राक्षाच्या जातीच्या सुकलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या फळांस खिसमिस म्हणतात. हीं फार गोड असतात. हीं उन्हामध्यें किंवा कृत्रिम रीतीनें वाळवितात. उन्हांत वाळविलेल्यांस इंग्रजींत सनरेझिन, मस्काटेल किंवा ब्लूम म्हणतात. कृत्रिम रीतीनें वाळविलेल्यांस लेक्सिअस म्हणतात. हा मेवा दक्षिण युरोप, ईजिप्त, आशिया मायनर, कॅलिफोर्निया यांमध्यें पुष्कळ प्रमाणांत होतो. तुर्की खिसमिसांत बिया नसून त्यास सुलताना ( बेदाणा ) म्हणतात.

**खिळे**—दोन तुकडे एकमेकांशीं जोडण्यासाठीं यांचा उपयोग करतात. खिळ्यांचे अनेक प्रकार आहेत व ते सर्व आतां यंत्रानें बनविले जातात. पत्र्याचे खिळे लोखंडाच्या चपट्या कांब्या ठोकून करतात व तारेचे खिळे पोलादी तारेपासून करतात. एका यंत्रानें एका मिनिटांत १५० ते ५०० पर्यंत हे लहान-मोठ्या लांबीचे खिळे होतात. खिळे करण्याचा धंदा फार महत्त्वाचा आहे. संयुक्त संस्थानांत ( अमेरिका ) साधारणपणें दरसाल ८८,३०,०० टन तारेचे खिळे व ४१,००० टन पत्र्याचे खिळे तयार होतात.

**खिळे ( टंक )**—छापखान्याच्या कामीं उपयोगांत आणावयाच्या एका चौकोनी धातूच्या किंवा लांकडाच्या खिळ्यास टंक किंवा मुद्रण-खिळा म्हणतात. याच्या एका टोंकावर एखादें अक्षर किंवा चिन्ह कोरलेलें असतें. हे खिळे करण्याकरितां जी धातु वापरण्यांत येते तींत शिसें, कथील, अँटीमनी आणि कधीं कधीं तांबें यांचें मिश्रण असतें. या खिळ्यास त्याच्या आकाराप्रमाणें निरनिराळीं नांवें असतात. अलीकडे यांचे प्रकार अंशात्मक पद्धतीवर बसविलेले असतात. एक अंश म्हणजे सुमारें एका इंचाचा ७२ वा भाग असतो. अलीकडे हे खिळे पाडणारीं व आपोआप जोडणारीं निरनिराळ्या प्रकारचीं यंत्रें निघालीं आहेत.

पहिले हालवितां येणारे खिळे चीनमध्यें ११ व्या शतकांत तयार झाले. १५ व्या शतकांत कोरियांत धातूंचे खिळे उपयोगांत येऊं लागले. छापण्याची कला प्रथम युरोपांत गटनबर्ग आणि कॉस्टर यांनीं शोधून काढली म्हणतात.

**खिवा**—मध्य आशियांतील एक जुनें संस्थान. एके काळीं हें आशियांतील महत्त्वाचें राज्य होतें, पण सध्यां हें व बोखारा संस्थान मिळून उझबेक लोकराज्य बनलें आहे. याची दक्षिणोत्तर लांबी २०० मैल असून पूर्वपश्चिम रुंदी ३०० मैल आहे. क्षेत्रफळ २४,००० चौ. मै. व लो. सं. सुमारें सात लाख आहे. उझबेक लोकांची संख्या सर्वांत जास्त आहे. ज्वारी, गहूं, तांदूळ, कापूस, द्राक्षें, वगैरे जिन्नस येथें होतात. येथील रानटी लोक उंट, मेंढ्या, घोडे, गुरें, इ. प्राण्यांची पैदास करतात. कापड, रेशीम व कातडें यांवर कशिदा काढणें हा येथील महत्त्वाचा घरगुती धंदा होय. खिवा शहर सहासात हजार वस्तीचें असून तेथें गालिचे व रेशीम यांचे कारखाने आहेत. १८७३ त रशियन सैन्यानें खिवावर चाल केली व तें कांहीं एक प्रयास न पडतां काबीज करण्यांत आलें. अखेरीस ऑक्ससच्या दक्षिण तीरावरील सर्व प्रदेश रशियास जोडण्यांत आला व खिवा ही खानेत किंवा खानराज्य म्हणून राहिलें.

**खुइखदान संस्थान**—मध्यप्रांत. क्षेत्रफळ १५४ चौ. मैल. खुई म्हणजे पांढरी माती व खदान म्हणजे खाण या दोन शब्दांवरून संस्थानचें नांव पडलें आहे. या लहानशा संस्थानचे चार तुकडे असून ते सर्व रायपूर जिल्ह्याच्या पश्चिमेस आहेत. त्या चार तुकड्यांचीं नांवें: खुइखदान, बोरतारा, चिदोरा, व सिमई. या संस्थानांत नद्या नाहींत. पावसाची सरासरी सुमारें ४० इंच असून हवा साधारण बरी आहे. हिंवाळ्यांत हिंवतापाची साथ उद्भवते. येथें प्राचीन अवशेष फारसे नाहींत. लो. सं. ३२,७३१. येथील भाषा छत्तिसगडी हिंदी आहे. शेंकडा पंचाहत्तर लोकांचा धंदा शेतकी आहे. यांचा धर्म शाक्त आणि वैष्णव आहे. येथें राहणाऱ्या जाती गोंड, लोधी, तेली, अहीर या होत. संस्थानांत उद्योगधंदे मुळींच नाहींत असें म्हटलें तरी चालेल. इमारती दगड व पांढरी माती संस्थानांत पुष्कळ सांपडते, संस्था-

नांत जमीनमहसूल, अबकारी, शिक्षण, तुरुंग, वगैरे नेहमींचीं खातीं आहेत. संस्थानचा संस्थापक तुळशीदास आहे. नागपूरकर भोंसल्यांच्या मदतीनें त्यानें स्वतंत्र जमीनदारी केली. उत्पन्न सुमारें दीड लाख आहे. हें संस्थान १९४७ सालीं मध्यप्रांतांत विलीन झालें.

**खुतबा**—मशिदींत नमाज पढल्यानंतर दर शुक्रवारीं हा खुतबा मुसलमान लोक पढत असतात. महम्मद पैगंबर व त्यांच्यामागून त्यांच्या गादीवर बसलेले चार पुरुष ( खलीफ ) यांची स्तुति या खुतब्यांत गाइलेली असते. त्याचप्रमाणें त्या वेळीं देशावर जो मुसलमान राजा राज्य करीत असतो त्याचेंहि नांव वरील पांच नांवांमध्यें दाखल करण्याची चाल आहे. मुसलमान पातशहा तक्तारूढ झाला कीं त्याच दिवशीं व त्याच वेळेस वरीलप्रमाणें खुतबा पढतात. आपलें नांव खुतब्यांत दाखल करावें यासाठीं बऱ्याच मुसलमान राजांनीं मुसलमानी प्रजेस छळलें आहे, असें मुसलमानी इतिहासावरून दिसून येतें.

**खुरासणी**—कारळा तीळ. खुरासान प्रांतावरून हें नांव पडलें. मुंबई इलाख्यांतील पंचमहाल जिल्ह्यांत थोडथोडा कारळा होतो. देशावर व कर्नाटकांत सर्वत्र होतो. परंतु हें पीक नाशिक व विजापूर जिल्ह्यांत महत्त्वाचें आहे. कोंकणांत व मावळांत वरकस जमिनींत आणि मध्यप्रांत व तेलंगण यांतील डोंगराळ भागांत याचा पेरा जास्त असतो. याचें तेल स्वयंपाकांत उपयोगी पडतें. पेंड गुरांना खाण्यास व खताकरितां उपयोगी आहे.

**खुरासान**—हा इराणांत अफगणिस्तानच्या सरहद्दीवर प्रांत असून याचें क्षेत्रफळ १,५०,००० चौ. मैल व लोकसंख्या १०,००,००० आहे. मुख्य कारखाने रेशमी कापड, गालिचे आणि तरवारीच्या पाती तयार करण्याचे आहेत. याची राजधानी मेशेद ही आहे.

**खुरिया**—मध्यप्रांत, जशपूर संस्थानचा वायव्य भाग व्यापणारें पठार व इलाखदारी. या पठारावर मोठमोठीं कुरणें असल्यामुळें मिर्झापूरचे व इतर ठिकाणचे बरेच गोपाळ व अहीर ढोरांचे कळपच्या कळप येथें चारावयास आणतात. अशा कांहीं अहिरांनीं येथें कायमची वस्ती केली आहे. येथील मुख्य वस्ती 'पहाडी कोरवा' लोकांची असून जमीनदार त्याच जातीचा आहे. कांहीं काळापूर्वीं त्यास कोरवांचा 'माझी' असें म्हणत असत. त्यास 'दिवाण' ही स्थानिक पदवी आहे. परंतु तो वाघेला रजपूत व खुरिया राणीचा वंशज. आणि रतनपूरच्या हैहयवंशी राजाचा संबंधी असून रतनपूरहून येथें आला असल्याचें सांगतो. या जमीनदारींत ७९ गांवें असून ५६२ रुपये टाकोळी आहे.

**खुर्जा**—संयुक्त प्रांतांतील बुलंदशहर जिल्ह्यांतील दक्षिण तहशील. हिचें क्षे. फ. ४६० चौ. मैल आहे. तहशिलींत ७ शहरें व ३४८ खेडीं आहेत. तहशिलीच्या मध्यभागातील प्रदेश फार सुपीक आहे. या भागांत कापूस फार पिकतो.

खुर्जा शहर तहशिलीचें मुख्य ठिकाण असून ईस्ट इंडियन रेल्वेच्या फांट्यावर हें वसलेलें आहे. या शहराचें नांव 'खारोज' (इनाम) या शब्दावरून पडलें. फिरोझशाह तुघ्लखनें भाले सुलतान रजपुतांना हा प्रदेश इनाम दिल्यानंतर त्यांनीं हें शहर वसविलें असें म्हणतात. या शहरांत ४०० वर्षांच्या पूर्वीचें जुनें असें मखदुमसाहेबाचें थडगें आहे.

**खुर्दादभाई** ( मृ. ९१२ )—ह्याचे संपूर्ण नांव अबुल कासीम उबयदुल्ला बिन अहंमद असें आहे. ह्या ग्रंथकारासंबंधीं युरोपीय पंडितांमध्यें फार वाद आहे. त्याने पुष्कळ पुस्तकें लिहिलीं आहेत. पण ह्या ग्रंथकाराचें फक्त एक पुस्तक आपणांस उपलब्ध होतें, असें इलियटनें म्हटलें आहे. तें इब्नखुरदाझिबचा भूगोल हें होय. ह्याची फक्त एक प्रत युरोपांत आहे. त्याचें हस्तलिखित प्राचीन असून त्याच्यावर १२३२ हा सन आहे.

**खुलदाबाद**—हैद्राबाद संस्थानातील औरंगाबाद जिल्ह्याच्या वायव्य भागांतील हा तालुका आहे. क्षेत्रफळ १२९ चौ. मैल. या तालुक्यांत ३८ खेडीं आहेत. पैकीं ९ खेडीं जहागीर आहेत. या तालुक्याचा पूर्वेकडील व उत्तरेकडील भाग डोंगराळ आहे.

खुलदाबाद हें तालुक्याचें मुख्य ठिकाण औरंगाबाद शहरापासून १४ मैलांवर आहे. येथें औरंगझेब, अझमशहा, हैद्राबाद संस्थानचा मूळ संस्थापक असफजाह, अहमदनगरचा निजामशहा नासीरजंग, मलिक अंबर, तानाशहा, इत्यादि प्रसिद्ध पुरुषांचीं व पुष्कळ साधूंचीं थडगीं आहेत. या खेड्याचें पूर्वीचें नांव रौझा होतें. पण औरंगझेबाच्या मरणानंतर औरंगझेबाला खुलदमकान हा किताब देण्यांत आला; त्यावरून खुलदाबाद हें नांव प्रचारांत आलें. या खेड्याच्या नजीकच्या पठारावर भद्रवंती या इतिहासप्रसिद्ध हिंदु शहराचे जीर्ण अवशेष अद्यापि पाहावयास मिळतात.

**खुलना**—बंगाल, एक जिल्हा. क्षे. फ. ४८०५ चौ. मैल. हुगळी आणि मेघना नद्यांमधील दक्षिणेकडचा भाग यांत येतो; व यांतून वाहणाऱ्या नद्या पुष्कळच आहेत. त्यामुळें बराच प्रदेश दलदलीचा व त्यामुळें लोकवस्ती आणि शेती यांना अयोग्य असा झाला आहे. सुंदरबनाच्या भागांत इमारतीचीं झाडें होतात, पण त्यांत हिंस्र पशू बरेच वावरतात. प्राचीन वंगराज्यांत हा जिल्हा मोडत असे. नंतर बल्लाळ सेनाच्या बागरी विभागांत हा पडला. चौदाव्या शतकांत हा एका मुसलमान सरदाराच्या जहागिरींत जमा होऊं लागला. सुंदरबनची

जहागीर नंतर एका हिंदु घराण्यांत अकबराचा सेनापति मानसिंग ती जिंकीपर्यंत होती. १८८२ त खुलना जिल्हा पाडल्यापासून वस्ती वाढूं लागली. लो. सं. (१९४१) १९,४३,२१८. हिंदू व मुसलमान संख्येनें सारखे आहेत. तांदुळाचें उत्पन्न मोठें आहे. खजूरहि पुष्कळ होतो. खुलना शहर चांगलें व्यापारी आहे. ईस्ट इंडिया कंपनीचें मिठाचें मोठें कोठार येथें होतें. जलमार्गानेंहि व्यापार चालतो.

**खुला व्यापार**—अर्थशास्त्रांतील या पद्धतीचा अर्थ आंतरदेशीय व्यापारावर कोणतेंहि नियंत्रण नसणें असा आहे. खुल्या व्यापाराचें हें तत्त्व १७ व्या व १८ व्या शतकांत उदारमतवादी लोकांनीं प्रस्थापित केलें. तत्पूर्वी परदेशाशीं व्यापार करणाऱ्या कंपन्यांना मक्ता (मोनापोली) देण्याची पद्धत असे. खुला व्यापार या पद्धतीचा प्रथम अंगीकार ब्रिटननें केला. आणि तदनुसार धान्य कायदे (कॉर्न लॉज) रद्द करण्यात आले. १८८० पर्यंत जगांत खुला व्यापारपद्धति चालू होती. त्यानंतर जर्मनी व अमेरिका (सं. संस्थानें) या प्रमुख राष्ट्रांनीं संरक्षक व्यापारपद्धति सुरू केली. ब्रिटनमध्येंहि संरक्षक व्यापार-पद्धति असावी असें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें. परंतु १९०६ सालीं झालेल्या पार्लमेंटच्या निवडणुकींत खुला व्यापारपद्धतीचा पुरस्कार करणारा प्रागतिक पक्ष निवडून आल्यामुळें संरक्षक व्यापारपद्धतीच्या पक्षाचा पराभव झाला. पहिलें महायुद्ध (१९१४ ते १९१८) संपल्यानंतर जगांतील बहुतेक देशांनीं संरक्षक व्यापारपद्धति स्वीकारली आणि आयात-निर्गत मालावर जबर जकाती बसवल्या; त्यामुळें ब्रिटन देशालाहि हें तत्त्व स्वीकारावें लागलें. तथापि ब्रिटननें बसवलेल्या व्यापारी जकातीचे दर मध्यम प्रतीचे होते. महायुद्धापूर्वी खुला व्यापार ही पद्धति असलेलें हॉलंड, बेल्जम, स्वीडन व नॉर्वे या देशांनींहि संरक्षक जकाती बसविल्या. खुला व्यापारपद्धति असावी याचें कारण निरनिराळ्या देशांत एकमेकांचा माल जकातीशिवाय जाऊं येऊं लागला, म्हणजे आंतरराष्ट्रीय सहकार्य वाढतें आणि सर्व देश परस्परांशीं शांततेनें आणि सौजन्यानें वागतात. उलट पक्षीं असें प्रतिपादतां येतें कीं, मागासलेल्या देशांत नवे नवे निघणारे धंदे आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या चढाओढींत नष्ट होऊं नयेत म्हणून मागासलेल्या देशांना आयात-निर्गत मालावर संरक्षक जकाती बसवणें भाग पडतें.

**खुलें बंदर**—खुलें बंदर म्हणजे ज्या बंदरांत जकात किंवा इतर कोणत्याहि प्रकारचा कर आयात मालावर बसविण्यांत येत नाहीं त्याला खुलें बंदर म्हणतात. सिंगापूर आणि हाँगकाँग हीं अशा प्रकारचीं बंदरें आहेत. अद्यापि चीनमधील खुलीं बंदरें सर्व राष्ट्रांतील व्यापाऱ्यांना आणि मालाच्या बोटींना खुलीं असतात. युरोपांत कोपनहेगन व इतर कित्येक खुलीं बंदरें आहेत तेथें दुसऱ्या एखाद्या देशांत किंवा बंदरांत जाणारा माल उतरण्यांत येतो.

**खुशालगड**—ही राजपुतान्यांत बांसवाडा संस्थानच्या आग्नेयीस एक लहानशी जहागीर आहे. हिचें क्षे. फ. ३४० चौ. मैल असून लो. सं. ४१,१५३ आहे. खुशालगडची लो. सं. तीन हजार आहे. हा जहागिरदार राठोड रजपूत असून जोधसिंग हा यांचा मूळ पुरुष होय. येथील मूळचे रहिवासी भिल्ल असून त्यांच्यापासून खुशालसिंग नांवाच्या मनुष्यानें सदरहू प्रदेश घेतल्यामुळें याला खुशालगड हें नांव पडलें. ही जहागीर बांसवाडापासून स्वतंत्र आहे. सरकारला वार्षिक खंडणी द्यावी लागते.

**खुश्रू (१ ला)**—इराणच्या ससानिद राजघराण्यापैकीं सर्वश्रेष्ठ राजा. यानें इ. स. ५३१-५७९ पर्यंत राज्य केलें. त्याचें रोमन बादशाहा जस्टिनियनबरोबर युद्ध २० वर्षें चालू होतें, व अखेर ३०,००० सोन्याचीं नाणीं दरसाल खंडणी देण्याचें कबूल करून रोमन बादशाहानें तह केला. हा तह दहा वर्षें टिकला. नंतर जस्टिनियननंतरचा रोमन बादशाहा जस्टिन यानें पुन्हां युद्ध सुरू केलें, व त्या वेळींहि खुश्रूचाच विजय झाला. त्यानंतर रोमन बादशाहा टायबेरियस यानें मात्र शेवटीं इराणी सैन्याचा पूर्ण पराजय सन ५७८ मध्यें केला.

**खुश्रू अमीर** (१२५३—१३२५)—हा एक फार्सी कवि असून याचा जन्म पतियाळा येथें झाला. याचें पूर्ण नांव यमीन उद्दीन मुहम्मद हसन उर्फ अमीर खुश्रू असें आहे. याची अलौकिक काव्यदेणगी पाहून अल्लाउद्दिनानें यास आपल्या दरबारीं राजकवि नेमलें. उतारवयांत यानें शेख निजामुद्दिन अवलियाचें शिष्यत्व पत्करलें व कडक धर्माचरण आचरिलें. कविश्रेष्ठ सादी यास हा फार मान देत असे. हा एक संगीतज्ञ असून यास हिंदी व मुसलमानी दोन्ही राग येत असत. ख्यालाची गायकी यानेंच सुरु केली. यानें काव्य, इतिहास व संगीतविषयक असे बहात्तर ग्रंथ लिहिले. या ग्रंथांपैकीं 'आशिकी' अथवा 'दवलरानी व खिज्रखाँ', 'किरनुस्सादैन', 'खजायनुल फुतूह' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याची कबर जुन्या दिल्लींत आहे.

**खुश्रूशेट मोदी** (१७५५-१८१४)—पेशव्यांच्या दरबारीं इंग्रज रेसिडेंटचा कारकून. मूळचा हा खंबायतचा पारशी असून याचें नांव खुसरवानजी जमशेटजी मोदी असें होतें. मॅलेटनें यास इकडे आणलें. हा पेशव्यांच्या दरबारीं रेसिडेंट कर्नल क्लोज याचा एजंट म्हणून होता. पेशव्यांनीं यास कर्नाटकांत नेमलें होतें. हा हुशार व लटपट्या असून दोघांनाहि खुप ठेवून आपला स्वार्थ साधीत असे. एल्फिन्स्टन व गंगाधरशास्त्री

पटवर्धन यांना याचा स्वभाव आवडत नसे. त्यांनीं याचें एजंटाचें काम काढून घेतलें. कारण मोदी पेशव्यांच्या ऊर्जितावस्थेसाठीं प्रयत्न करी. यावर पेशव्यानें यास गुजराथेंतील रालेज वगैरेंची पांच हजारांची जहागीर बहाल केली. तेव्हां गुजराथेंत जावयास निघणार इतक्यांत एका रात्रीं हा आकस्मिक रीतीनें मरण पावला. कोणी म्हणतात, एल्फिन्स्टननेंच याला विष देवविलें. पुण्यांत नारायण पेठेंत ज्या एका गणपतीच्या देवळाजवळ तो राहत असे, त्या देवळाला अद्यापि मोदीचा गणपति म्हणतात व जवळच्या बागेला मोदीबाग म्हणतात.

**खून**— खून याची कायद्यांत व्याख्या अशी आहे कीं, एखाद्या इसमाला द्वेषबुद्धीनें बेकायदेशीर रीतीनें ठार मारणें. इंग्लंडांत ठार मारण्याचें कृत्य केल्यानंतर एक वर्ष व एक दिवस इतक्या मुदतींत मृत्यु आला तरी त्याला खुनाचा गुन्हाच म्हणतात. इंग्लंडांत या गुन्ह्याला फांशीची शिक्षा आहे. मात्र विशिष्ट परिस्थितींत फांशी ऐवजीं हयातीपर्यंत सक्तमजुरीची शिक्षा गुन्हेगाराला देतात. फ्रान्स व इतर कित्येक पाश्चात्य देशांत आणि हिंदुस्थानांत अशाच स्वरूपाचा कायदा आहे. (इं. पि. कोड, २९९।३०२ पाहा.)

**खूळ**—एखाद्या मनुष्याच्या बुद्धीची वाढ बरोबर झाली नाहीं किंवा त्याच्या मेंदूची वाढ मध्यंतरींच खंडित झाली तर त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या अवस्थेस खूळ म्हणतात. एखाद्या मनुष्याची आई किंवा बाप जर मद्यासक्त असतील किंवा गुप्तरोगापासून पीडित असतील किंवा मातेस वरच्यावर होणाऱ्या प्रसूतीमुळें अशक्तता आलेली असेल किंवा कोणत्याहि कारणामुळें मुलाचें योग्य पोषण होत नसेल तर हा रोग होण्याचा संभव असतो. तसेंच एखादें मूल जन्मल्यानंतर त्याच्या मेंदूस इजा झाली किंवा रक्तस्राव झाला अथवा क्षयजन्य मज्जातंतुरोग अथवा अपस्मार झाला किंवा पृष्ठवंशांतील द्रव पदार्थाचें वाहन बरोबर झालें नाहीं तर मुलाची मानसिक वाढ बरोबर न झाल्यामुळें त्यास हा रोग होतो. कंठग्रंथीस इजा झाल्यास याच रोगाच्या एका निराळ्या प्रकाराचा प्रादुर्भाव होतो. अशा रोग्याचा स्वतःवर मुळींच ताबा नसल्यामुळें समाजासहि त्याच्यापासून त्रास होण्याचा संभव असतो. याकरितां अशा रोग्यास एखाद्या स्वतंत्र ठिकाणीं ठेवणें योग्य असतें.

**खेकडा**—हें सामान्यतः दहा पाय असलेल्या, आखूड शेंपूट व कवच असलेल्या प्राण्यास सर्वसाधारणपणें नांव दिलें जातें. याच्या अनेक जाती आहेत. याचें डोकें व वक्ष हीं जोडलेलीं असतात व त्यांवर एक बळकट कवच असतें. याच्या तोंडामध्यें अनेक मजबूत जबड्यांच्या जोड्या असतात. हे प्राणी आपलें कवच कांहीं काळानें टाकून देतात. हे आपल्या पहिल्या दोन पायाचा चालण्याच्या कामीं उपयोग करीत नाहींत तर त्यांस मजबूत असे चिमटे असतात. हा चालतांना तिरका किंवा

हरमिट (मुनि) खेकडा

आडवा चालतो. हे कांहीं प्रसंगीं आंकडे टाकून देतात, पण ते त्यांना पुन्हां फुटतात. ते बहुधा कुजलेल्या मांसादिकावर निर्वाह करतात. परंतु कांहीं जाती वनस्पतींवरहि राहतात. हे बहुधा समुद्रांत राहतात. हे सर्वत्र खाण्यांत येतात. कोंकणांत पावसाळ्यांत पाणी मुबलक असेल अशा जमिनींत खेकडे पुष्कळ दिसतील. उन्हाळ्यांत जमिनींत खोल चिळें करून राहतात. हे खेकडे पिकांना फार उपद्रव करतात.

**खेचर**— हा शब्द सामान्यतः कोणत्याहि दोन प्राण्यांच्या संकरानें उत्पन्न झालेल्या प्राण्यास लावण्यांत येतो, पण विशेषेंकरून घोडी व गाढव यांच्या संकरापासून होणाऱ्या प्राण्यास लावतात. याचें डोकें लांबट असून निमुळतें असतें. शेंपटी झुबकेदार असते आणि आयाळ आखूड असते. झिब्रा व घोडा यांच्या संयोगापासून झिब्राइट नांवाचीं खेचरें तयार होतात. खेचरापासून प्रजोत्पत्ति होत नाहीं. खेचरें घोड्याप्रमाणें चपळ व गाढवाप्रमाणें ओझ्याला चळकट असल्यानें सैन्यांत वाहतुकीस यांचा फार उपयोग होतो.

**खेड**—रत्नागिरि जिल्ह्यांतील एक तालुका व गांव.

**खेड**— मुंबई इलाखा, पुणें जिल्ह्यांतील एक तालुका. या तालुक्याचें क्षेत्रफळ ८७६ चौ. मैल व लोकसंख्या १,२३,१९२ आहे. या तालुक्यांत आंबेगांव पेट्याचाहि समावेश होतो. तालुक्यांत एकंदर २ शहरें व २४३ खेडीं आहेत. याच्या उत्तरेस व दक्षिणेस दोन डोंगराच्या रांगा गेल्या आहेत. या तालुक्यांतील जमीन तांबडी अगर भुरी आहे. पुणें जिल्ह्यांतील सर्व तालुक्यांपेक्षां या तालुक्यांत जंगल पुष्कळ आहे. हवा सर्वसाधारण चरी असते. वार्षिक पर्जन्यमान अदमासें २६ इंच आहे.

गांव पुण्याच्या उत्तरेस २५ मैलांवर भीमातटाकीं खेड

जहागीर नंतर एका हिंदु:घराण्यांत अकबराचा सेनापति मानसिंग ती जिंकीपर्यंत होती. १८८२ त खुल्ना जिल्हा पाडल्यापासून वस्ती वाढूं लागली. लो. सं. (१९४१) १९,४३,२१८. हिंदू व मुसलमान संख्येनें सारखे आहेत. तांदुळाचें उत्पन्न मोठें आहे. खजूरहि पुष्कळ होतो. खुल्ना शहर चांगलें व्यापारी आहे. ईस्ट इंडिया कंपनीचें मिठाचें मोठें कोठार येथें होतें. जलमार्गानेंहि व्यापार चालतो.

**खुला व्यापार**—अर्थशास्त्रांतील या पद्धतीचा अर्थ आंतरदेशीय व्यापारावर कोणतेंहि नियंत्रण नसणें असा आहे. खुल्या व्यापाराचें हें तत्त्व १७ व्या व १८ व्या शतकांत उदारमतवादी लोकांनीं प्रस्थापित केलें. तत्पूर्वी परदेशाशीं व्यापार करणाऱ्या कंपन्यांना मक्ता (मोनापोली) देण्याची पद्धत असे. खुला व्यापार या पद्धतीचा प्रथम अंगीकार ब्रिटननें केला. आणि तदनुसार धान्य कायदे (कॉर्न लॉज) रद्द करण्यात आले. १८८० पर्यंत जगांत खुला व्यापारपद्धति चालू होती. त्यानंतर जर्मनी व अमेरिका (सं. संस्थानें) या प्रमुख राष्ट्रांनीं संरक्षक व्यापारपद्धति सुरू केली. ब्रिटनमध्येंहि संरक्षक व्यापार-पद्धति असावी असें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें. परंतु १९०६ सालीं झालेल्या पार्लमेंटच्या निवडणुकींत खुला व्यापारपद्धतीचा पुरस्कार करणारा प्रागतिक पक्ष निवडून आल्यामुळें संरक्षक व्यापारपद्धतीच्या पक्षाचा पराभव झाला. पहिलें महायुद्ध (१९१४ ते १९१८) संपल्यानंतर जगांतील बहुतेक देशांनीं संरक्षक व्यापारपद्धति स्वीकारली आणि आयात-निर्गत मालावर जबर जकाती बसवल्या; त्यामुळें ब्रिटन देशालाहि हें तत्त्व स्वीकारावें लागलें. तथापि ब्रिटननें बसवलेल्या व्यापारी जकातींचे दर मध्यम प्रतीचे होते. महायुद्धापूर्वी खुला व्यापार ही पद्धति असलेलें हॉलंड, बेल्जम, स्वीडन व नॉर्वे या देशांनींहि संरक्षक जकाती बसविल्या. खुला व्यापारपद्धति असावी याचें कारण निरनिराळ्या देशांत एकमेकांचा माल जकातीशिवाय जाऊं येऊं लागला, म्हणजे आंतरराष्ट्रीय सहकार्य वाढतें आणि सर्व देश परस्परांशीं शांततेनें आणि सौजन्यानें वागतात. उलट पक्षीं असें प्रतिपादतां येतें कीं, मागासलेल्या देशांत नवे नवे निघणारे धंदे आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या चढाओढींत नष्ट होऊं नयेत म्हणून मागासलेल्या देशांना आयात-निर्गत मालावर संरक्षक जकाती बसवणें भाग पडतें.

**खुलें बंदर**—खुलें बंदर म्हणजे ज्या बंदरांत जकात किंवा इतर कोणत्याहि प्रकारचा कर आयात मालावर बसविण्यांत येत नाहीं त्याला खुलें बंदर म्हणतात. सिंगापूर आणि हॉगकॉंग हीं अशा प्रकारचीं बंदरें आहेत. अद्यापि चीनमधील खुलीं बंदरें सर्व राष्ट्रांतील व्यापाऱ्यांना आणि मालाच्या बोटींना खुलीं असतात. युरोपांत कोपनहेगन व इतर कित्येक खुलीं बंदरें आहेत तेथें दुसऱ्या एखाद्या देशांत किंवा बंदरांत जाणारा माल उतरण्यांत येतो.

**खुशालगड**—ही राजपुतान्यांत बांसवाडा संस्थानच्या आग्नेयीस एक लहानशी जहागीर आहे. हिचें क्षे. फ. ३४० चौ. मैल असून लो. सं. ४१,१५२ आहे. खुशालगडची लो. सं. तीन हजार आहे. हा जहागिरदार राठोड रजपूत असून जोधसिंग हा यांचा मूळ पुरुष होय. येथील मूळचे रहिवासी भिल्ल असून त्यांच्यापासून खुशालसिंग नांवाच्या मनुष्यानें सदरहू प्रदेश घेतल्यामुळें याला खुशालगड हें नांव पडलें. ही जहागीर बांसवाडापासून स्वतंत्र आहे. सरकारला वार्षिक खंडणी द्यावी लागते.

**खुश्रू (१ ला)**—इराणच्या ससानिद राजघराण्यापैकीं सर्वश्रेष्ठ राजा. यानें इ. स. ५३१–५७९ पर्यंत राज्य केलें. त्याचें रोमन बादशाहा जस्टिनियनबरोबर युद्ध २० वर्षे चालू होतें, व अखेर ३०,००० सोन्याचीं नाणीं दरसाल खंडणी देण्याचें कबूल करून रोमन बादशाहानें तह केला. हा तह दहा वर्षे टिकला. नंतर जस्टिनियननंतरचा रोमन बादशाहा जस्टिन यानें पुन्हां युद्ध सुरू केलें, व त्या वेळींहि खुश्रूचाच विजय झाला. त्यानंतर रोमन बादशाहा टायबेरियस यानें मात्र शेवटीं इराणी सैन्याचा पूर्ण पराजय सन ५७८ मध्यें केला.

**खुश्रू अमीर (१२५३—१३२५)**—हा एक फार्सी कवि असून याचा जन्म पतियाळा येथें झाला. याचें पूर्ण नांव यमीन उद्दीन मुहम्मद हसन उर्फ अमीर खुश्रू असें आहे. याची अलौकिक काव्यदेणगी पाहून अल्लाउद्दिनानें यास आपल्या दरबारीं राजकवि नेमलें. उतारवयांत यानें शेख निजामुद्दिन अवलियाचें शिष्यत्व पत्करलें व कडक धर्माचरण आचरिलें. कविश्रेष्ठ सादी यास हा फार मान देत असे. हा एक संगीतज्ञ असून यास हिंदी व मुसलमानी दोन्ही राग येत असत. ख्यालाची गायकी यानेंच सुरू केली. यानें काव्य, इतिहास व संगीतविषयक असे बहात्तर ग्रंथ लिहिले. या ग्रंथांपैकीं 'आशिकी' अथवा 'दवलरानी व खिज्रखाँ', 'किरनुस्सादैन', 'खजायनुल फुनूह' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याची कबर जुन्या दिल्लींत आहे.

**खुश्रूशेट मोदी (१७५५–१८१४)**—पेशव्यांच्या दरबारीं इंग्रज रेसिडेंटचा कारकून. मूळचा हा खंबायतचा पारशी असून याचें नांव खुसरवानजी जमशेटजी मोदी असें होतें. मॅलेटनें यास इकडे आणलें. हा पेशव्यांच्या दरबारीं रेसिडेंट कर्नल क्लोज याचा एजंट म्हणून होता. पेशव्यांनीं यास कर्नाटकांत नेमलें होतें. हा हुशार व लटपट्या असून दोघांनाहि खुष ठेवून आपला स्वार्थ साधीत असे. एल्फिन्स्टन व गंगाधरशास्त्री

पटवर्धन याना याचा स्वभाव आवडत नसे. त्यांनीं याचें एजंटाचें काम काढून घेतलें. कारण मोदी पेशव्यांच्या ऊर्जितावस्थेसाठीं प्रयत्न करी. यावर पेशव्यानें यास गुजराथेंतील रालेज वगैरेंची पांच हजारांची जहागीर बहाल केली. तेव्हां गुजराथेंत जावयास निघणार इतक्यांत एका रात्रीं हा आकस्मिक रीतीनें मरण पावला. कोणी म्हणतात, एल्फिन्स्टननेंच याला विष देवविलें. पुण्यांत नारायण पेठेंत ज्या एका गणपतीच्या देवळाजवळ तो राहत असे, त्या देवळाला अद्यापि मोदीचा गणपति म्हणतात व जवळच्या बागेला मोदीबाग म्हणतात.

**खून**—खून याची कायद्यांत व्याख्या अशी आहे कीं, एखाद्या इसमाला द्वेषबुद्धीनें बेकायदेशीर रीतीनें ठार मारणें. इंग्लंडांत ठार मारण्याचें कृत्य केल्यानंतर एक वर्ष व एक दिवस इतक्या मुदतींत मृत्यु आला तरी त्याला खुनाचा गुन्हाच म्हणतात. इंग्लंडांत या गुन्ह्याला फांशीची शिक्षा आहे. मात्र विशिष्ट परिस्थितींत फांशी ऐवजीं हयातीपर्यंत सक्तमजुरीची शिक्षा गुन्हेगाराला देतात. फ्रान्स व इतर कित्येक पाश्चात्य देशांत आणि हिंदुस्थानांत अशाच स्वरूपाचा कायदा आहे. (इं. पि. कोड, २९९।३०२ पाहा.)

**खूळ**—एखाद्या मनुष्याच्या बुद्धीची वाढ बरोबर झाली नाहीं किंवा त्याच्या मेंदूची वाढ मध्यंतरींच खंडित झाली तर त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या अवस्थेस खूळ म्हणतात. एखाद्या मनुष्याची आई किंवा बाप जर मद्यासक्त असतील किंवा गुतरोगापासून पीडित असतील किंवा मातेस वरचेवर होणाऱ्या प्रसूतीमुळें अशक्तता आलेली असेल किंवा कोणत्याहि कारणामुळें मुलाचें योग्य पोषण होत नसेल तर हा रोग होण्याचा संभव असतो. तसेंच एखादें मूल जन्मल्यानंतर त्याच्या मेंदूस इजा झाली किंवा रक्तस्राव झाला अथवा क्षयजन्य मज्जातंतुरोग अथवा अपस्मार झाला किंवा पृष्ठवंशांतील द्रव पदार्थाचें वाहन बरोबर झालें नाहीं तर मुलाची मानसिक वाढ बरोबर न झाल्यामुळें त्यास हा रोग होतो. कंठग्रंथीस इजा झाल्यास याच रोगाच्या एका निराळ्या प्रकाराचा प्रादुर्भाव होतो. अशा रोग्याचा स्वतःवर मुळींच ताबा नसल्यामुळें समाजासहि त्याच्यापासून त्रास होण्याचा संभव असतो. याकरितां अशा रोग्यास एखाद्या स्वतंत्र ठिकाणीं ठेवणें योग्य असतें.

**खेकडा**—हें सामान्यतः दहा पाय असलेल्या, आखूड शेंपूट व कवच असलेल्या प्राण्यास सर्वसाधारणपणें नांव दिलें जातें. याच्या अनेक जाती आहेत. याचें डोकें व वक्ष हीं जोडलेलीं असतात व त्यांवर एक बळकट कवच असतें. याच्या तोंडामध्यें अनेक मजबूत जबड्यांच्या जोड्या असतात. हे प्राणी आपलें कवच कांहीं काळानें टाकून देतात. हे आपल्या पहिल्या दोन पायाचा चालण्याच्या कामीं उपयोग करीत नाहींत तर त्यांस मजबूत असे चिमटे असतात. हा चालतांना तिरका किंवा

हरमिट (मुनि) खेकडा

आडवा चालतो. हे कांहीं प्रसंगीं आंकडे टाकून देतात, पण ते त्यांना पुन्हां फुटतात. ते बहुधा कुजलेल्या मांसादिकावर निर्वाह करतात. परंतु कांहीं जाती वनस्पतींवरहि राहतात. हे बहुधा समुद्रांत राहतात. हे सर्वत्र खाण्यांत येतात. कोंकणांत पावसाळ्यांत पाणी मुबलक असेल अशा जमिनींत खेकडे पुष्कळ दिसतील. उन्हाळ्यांत जमिनींत खोल चिळें करून राहतात. हे खेकडे पिकांना फार उपद्रव करतात.

**खेचर**—हा शब्द सामान्यतः कोणत्याहि दोन प्राण्यांच्या संकरानें उत्पन्न झालेल्या प्राण्यास लावण्यांत येतो, पण विशेषेंकरून घोडी व गद्धा यांच्या संकरापासून होणाऱ्या प्राण्यास लावतात. याचें डोकें लांबट असून निमुळतें असतें. शेंपटी झुबकेदार असते आणि आयाळ आखूड असते. झिब्रा व घोडा यांच्या संयोगापासून झिब्राइट नांवाचीं खेचरें तयार होतात. खेचरापासून प्रजोत्पत्ति होत नाहीं. खेचरें घोड्याप्रमाणें चपळ व गाढवाप्रमाणें ओझ्याला बळकट असल्यानें सैन्यांत वाहतुकीस यांचा फार उपयोग होतो.

**खेड**—रत्नागिरि जिल्ह्यांतील एक तालुका व गांव.

**खेड**—मुंबई इलाखा, पुणें जिल्ह्यांतील एक तालुका. या तालुक्याचें क्षेत्रफळ ८७६ चौ. मैल व लोकसंख्या १,२३,१९२ आहे. या तालुक्यांत आंबेगांव पेट्याचाहि समावेश होतो. तालुक्यांत एकंदर २ शहरें व २४३ खेडीं आहेत. याच्या उत्तरेस व दक्षिणेस दोन डोंगराच्या रांगा गेल्या आहेत. या तालुक्यांतील जमीन तांबडी अगर भुरी आहे. पुणें [illegible] सर्व तालुक्यांपेक्षां या तालुक्यांत जंगल पुष्कळ आहे. साधारण बरी असते. वार्षिक पर्जन्यमान अदमासें [illegible]

गांव पुण्याच्या उत्तरेस २५ मैलांवर [illegible]

जहागीर नंतर एका हिंदु:घराण्यांत अकबराचा सेनापति मानसिंग ती जिंकीपर्यंत होती. १८८२ त खुलना जिल्हा पाडल्यापासून वस्ती वाढूं लागली. लो. सं. (१९४१) १९,४३,२१८. हिंदू व मुसलमान संख्येनें सारखे आहेत. तांदुळाचें उत्पन्न मोठें आहे. खजूरहि पुष्कळ होतो. खुलना शहर चांगलें व्यापारी आहे. ईस्ट इंडिया कंपनीचें मिठाचें मोठें कोठार येथें होतें. जलमार्गानेंहि व्यापार चालतो.

**खुला व्यापार**—अर्थशास्त्रांतील या पद्धतीचा अर्थ आंतरदेशीय व्यापारावर कोणतेंहि नियंत्रण नसणें असा आहे. खुल्या व्यापाराचें हें तत्त्व १७ व्या व १८ व्या शतकांत उदारमतवादी लोकांनीं प्रस्थापित केलें. तत्पूर्वी परदेशाशीं व्यापार करणाऱ्या कंपन्यांना मक्ता (मोनापोली) देण्याची पद्धत असे. खुला व्यापार या पद्धतीचा प्रथम अंगीकार ब्रिटननें केला. आणि तदनुसार धान्य कायदे (कॉर्न लॉज) रद्द करण्यात आले. १८८० पर्यंत जगांत खुला व्यापारपद्धति चालू होती. त्यानंतर जर्मनी व अमेरिका (सं. संस्थानें) या प्रमुख राष्ट्रांनीं संरक्षक व्यापारपद्धति सुरू केली. ब्रिटनमध्येंहि संरक्षक व्यापार-पद्धति असावी असें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें. परंतु १९०६ सालीं झालेल्या पार्लमेंटच्या निवडणुकीत खुला व्यापारपद्धतीचा पुरस्कार करणारा प्रागतिक पक्ष निवडून आल्यामुळें संरक्षक व्यापारपद्धतीच्या पक्षाचा पराभव झाला. पहिलें महायुद्ध (१९१४ ते १९१८) संपल्यानंतर जगांतील बहुतेक देशांनीं संरक्षक व्यापारपद्धति स्वीकारली आणि आयात-निर्गत मालावर जबर जकाती बसवल्या; त्यामुळें ब्रिटन देशालाहि हें तत्त्व स्वीकारावें लागलें. तथापि ब्रिटननें बसवलेल्या व्यापारी जकातींचे दर मध्यम प्रतीचे होते. महायुद्धापूर्वी खुला व्यापार ही पद्धति असलेलें हॉलंड, बेल्जम, स्वीडन व नॉर्वे या देशांनींहि संरक्षक जकाती बसविल्या. खुला व्यापारपद्धति असावी याचें कारण निरनिराळ्या देशांत एकमेकांचा माल जकातीशिवाय जाऊं येऊं लागला, म्हणजे आंतरराष्ट्रीय सहकार्य वाढतें आणि सर्व देश परस्परांशीं शांततेनें आणि सौजन्यानें वागतात. उलट पक्षीं असें प्रतिपादतां येतें कीं, मागासलेल्या देशांत नवे नवे निघणारे धंदे आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या चढाओढींत नष्ट होऊं नयेत म्हणून मागासलेल्या देशांना आयात-निर्गत मालावर संरक्षक जकाती बसवणें भाग पडलें.

**खुलें बंदर**—खुलें बंदर म्हणजे ज्या बंदरांत जकात किंवा इतर कोणत्याहि प्रकारचा कर आयात मालावर बसविण्यांत येत नाहीं त्याला खुलें बंदर म्हणतात. सिंगापूर आणि हॉंगकॉंग हीं अशा प्रकारचीं बंदरें आहेत. अद्यापि चीनमधील खुलीं बंदरें सर्व राष्ट्रांतील व्यापाऱ्यांना आणि मालाच्या बोटींना खुलीं असतात. युरोपांत कोपनहेगन व इतर कित्येक खुलीं बंदरें आहेत तेथें दुसऱ्या एखाद्या देशांत किंवा बंदरांत जाणारा माल उतरण्यांत येतो.

**खुशालगड**—ही राजपुतान्यांत बांसवाडा संस्थानच्या आग्नेयीस एक लहानशी जहागीर आहे. हिचें क्षे. फ. ३४० चौ. मैल असून लो. सं. ४१,१९३ आहे. खुशालगडची लो. सं. तीन हजार आहे. हा जहागिरदार राठोड रजपूत असून जोधसिंग हा यांचा मूळ पुरुष होय. येथील मूळचे रहिवासी भिल्ल असून त्यांच्यापासून खुशालसिंग नांवाच्या मनुष्यानें सदरहू प्रदेश घेतल्यामुळें याला खुशालगड हें नांव पडलें. ही जहागीर बांसवाडापासून स्वतंत्र आहे. सरकारला वार्षिक खंडणी द्यावी लागते.

**खुश्रू (१ ला)**—इराणच्या ससानिद राजघराण्यापैकीं सर्वश्रेष्ठ राजा. यानें इ. स. ५३१-५७९ पर्यंत राज्य केलें. त्याचें रोमन बादशाहा जस्टिनियनबरोबर युद्ध २० वर्षे चालू होतें, व अखेर ३०,००० सोन्याचीं नाणीं दरसाल खंडणी देण्याचें कबूल करून रोमन बादशाहानें तह केला. हा तह दहा वर्षे टिकला. नंतर जस्टिनियननंतरचा रोमन बादशाहा जस्टिन यानें पुन्हां युद्ध सुरू केलें, व त्या वेळींहि खुश्रूचाच विजय झाला. त्यानंतर रोमन बादशाहा टायबेरियस यानें मात्र शेवटीं इराणी सैन्याचा पूर्ण पराजय सन ५७८ मध्यें केला.

**खुश्रू अमीर (१२५३—१३२५)**—हा एक फार्सी कवि असून याचा जन्म पतियाळा येथें झाला. याचें पूर्ण नांव यमीन उद्दीन मुहम्मद हसन उर्फ अमीर खुश्रू असें आहे. याची अलौकिक काव्यदेणगी पाहून अल्लाउद्दिनानें यास आपल्या दरबारीं राजकवि नेमलें. उतारवयांत यानें शेख निजामुद्दिन अवलियाचें शिष्यत्व पत्करलें व कडक धर्माचरण आचरिलें. कविश्रेष्ठ सादी यास हा फार मान देत असे. हा एक संगीतज्ञ असून यास हिंदी व मुसलमानी दोन्ही राग येत असत. ख्यालाची गायकी यानेंच सुरू केली. यानें काव्य, इतिहास व संगीतविषयक असे बहात्तर ग्रंथ लिहिले. या ग्रंथांपैकीं 'आशिकी' अथवा 'दवलरानी व खिज्रखॉं', 'किरनुससादैन', 'खजायनुल फुतूह' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याची कबर जुन्या दिल्लींत आहे.

**खुश्रूशेट मोदी (१७५५-१८१४)**—पेशव्यांच्या दरबारीं इंग्रज रेसिडेंटचा कारकून. मूळचा हा खंबायतचा पारशी असून याचें नांव खुसरवानजी जमशेटजी मोदी असें होतें. मॅलेटनें यास इकडे आणलें. हा पेशव्यांच्या दरबारीं रेसिडेंट कर्नल क्लोज याचा एजंट म्हणून होता. पेशव्यांनीं यास कर्नाटकांत नेमलें होतें. हा हुशार व लटपट्या असून दोघांनाहि खुष ठेवून आपला स्वार्थ साधीत असे. एल्फिन्स्टन व गंगाधरशास्त्री

जिल्ह्यांत ४ शहरें व १,६७७ खेडीं आहेत. लो. सं. ( १९४१ ) १०,२४,०२५. शें. ८५ हिंदू व मुख्य भाषा हिंदी आहे. नद्यांच्या कांठची जमीन फार सुपीक आहे. लक्ष्मीपूर, महमदी व गोळा हीं व्यापारी ठिकाणें आहेत. जिल्ह्यांत साखर तयार होते. नेपाळशीं व्यापार चालतो. शिक्षणाच्या बाबतींत जिल्हा मागासलेला आहे.

प्राचीन काळांत हस्तिनापूरच्या राजांकडे हा प्रदेश होता असें म्हणतात. १० व्या शतकापासून उत्तर भाग रजपुतांच्या ताब्यांत असे. अकबराच्या कारकीर्दींत हा खैराबाद परगण्यांत मोडूं लागला. १८०१ सालीं रोहिलखंडाबरोबर हा ब्रिटिशांकडे आला. पण पुन्हां अयोध्या प्रांत खालसा होईपर्यंत नबाबाकडेच राहिला. लक्ष्मीपूर हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे.

खेरी शहराची लो. सं. सु. आठ हजार आहे. येथें सय्यद खुर्द याची मशीद आहे. एक मिशनरी शिक्षण-संस्था आहे.

**खेळ**—खेळांत शारीरिक शक्तीचे, बुद्धिबलाचे, करमणुकीचे, इ. प्रकार पडतात. धांवणें, उड्या मारणें, कुस्त्या, वजन उचलणें, वजनी गोळे फेंकणें, इ. शारीरिक श्रमाचे आणि कौशल्याचे खेळ आहेत. क्रिकेट, फुटबॉल यांसारखे मैदानी खेळहि यांत धरतात. पत्ते, गंजिफा, कॅरम, बिलियर्ड, वगैरे घरांतील बैठे खेळ होत. हातचलाखीचे खेळ, नकला, नाटकें, नाचणें, इ. वरीलप्रमाणेंच पण सामाजिक करमणुकीचे खेळ म्हणतां येतील. या खेळांचे विशेष नियम केलेले असून त्यांचे सामने होतात. आट्यापाट्या, खोखो, लंगडी, हुतुतु, इ. आपल्याकडील जुने खेळ आहेत. मुलींचे खेळ वेगळेच असतात. प्रत्येक देशाचेहि खेळ निराळे आढळतात. कांहीं खेळांचे आंतरराष्ट्रीय सामने होतात. या सर्व खेळांची थोडथोडी माहिती स्वतंत्रपणें दिलेली आहे.

**खेळोजी भोसले** ( मृ. १६३९ )— शहाजीचा हा चुलत भाऊ व विठोजीचा पुत्र. हा वेरूळकडे आपल्या जहागिरीच्या प्रांतीं राहत असे. त्याला निजामशाहींतून मनसब होती. शहाजहान जेव्हां निजामशाही बुडविण्याच्या नादीं लागला तेव्हां निरुपायानें जसा शहाजी हा शहाजहानला मिळाला तसाच खेळोजीहि आपले भाऊ मालोजी व परसोजी यांच्यासह शहाजहानला मिळाला ( १६२९ ). शहाजहाननें त्याला पंचहजारी मनसब दिली. पुढें ( १६३३ ) मोंगल हे जेव्हां दौलताबाद काबीज करूं लागले, तेव्हां खेळोजीनें त्यांची नोकरी सोडून आदिलशाहींत नौकरी धरली व मोंगलांशीं लढूं लागला. शहाजहानचा व आदिलशहाचा तह झाल्यावर आदिलशहानें खेळोजीस नोकरीवरून दूर केलें तेव्हां तो पुनः आपल्या जहागिरींत राहून मोंगलांच्या मुलखांत धुमाकूळ घालूं लागला. तेव्हां दख्खनचा सुभेदार औरंगजेब यानें मोठ्या मुष्किलीनें खेळोजीचें गुप्त ठिकाण शोधून काढून युक्तीनें त्याला पकडून १६३९ च्या ऑक्टोबरांत ठार मारलें. खेळोजीचा वंश वेरूळ प्रांतीं अद्यापि आहे.

**खैर**— एक जंगली झाड. यापासून पांढरा कात निघतो. बंगाल, आसाम व ब्रह्मदेश या देशांत हीं झाडें पुष्कळ आहेत. त्यापासून तयार होणाऱ्या काताला पेगूचा कात म्हणतात. दक्षिण आणि पश्चिम हिंदुस्थानांत होणाऱ्या काताला मद्रासी किंवा मुंबईचा कात म्हणतात. हा खैर लाल असतो. अरबी डिंक याच झाडापासून निघतो. लांकूड चांगलें टिकाऊ असून त्यावर झिलई चांगली बसते. इमारती लांकूड वजनदार असतें. याचे कोळसेहि पाडतात.

ऋग्वेदांत व तदुत्तर ग्रंथांत एका कठिण लांकडाच्या झाडाचें नांव म्हणून खदिर शब्द आला आहे. अश्वत्थ वृक्षाचें रोप या झाडावर आपोआप उगवत असे आणि त्याच्यापासून अरुन्धती नांवाची लता उत्पन्न होत असे, असें अथर्ववेदांत वर्णन आहे. या लांकडाच्या कठिणपणामुळें स्रुवा अथवा दर्वी इत्यादि यज्ञीय पात्रें याचींच करीत असत. त्याच ठिकाणीं दर्वी गायत्रीच्या रसापासून तयार करीत असत, असें म्हटलें आहे. त्याच्या गाभ्यापासून कात तयार करीत असल्याबद्दल वैदिक वाङ्मयांत आधार सांपडत नाहीं. या गाभ्याचा ( सार ) ताईत करण्याकडे उपयोग करीत.

**खैरपुर**—पाकिस्तान, उत्तर सिंधमधील एक संस्थान. क्षे. फ. ६,०५० चौरस मैल व लो. सं. ३,०५,७८७. पूर्वेस जोधपूर आणि जेसलमीर संस्थानें व बाकीच्या बाजूंस सिंधमधील प्रदेश येतात. हवापाणी सर्व सिंधप्रमाणेंच आहे. शेंकडा ८३ लोक मुसलमान असून बहुतेक शेतकरी आहेत. हे मुसलमान सुन्नी पंथाचे आहेत. पण संस्थानिक शिआ पंथाचे आहेत. भाषा सिंधी आहे. मुख्य पीक धान्यें आणि कापूस असून कालव्याच्या पाण्यावर बहुतेक शेती होते. मुख्य धंदे-तूप, कातडी, तंबाखू, खारीमाती, सोडा, लोंकर, ताग, रेशीम, गालिचे, मातीचीं भांडीं, इ. या वस्तूंच्या उत्पादनाचे आहेत.

१७८३ सालीं सिंधचें कल्होरा घराणें जाऊन तलपूर बलोची घराणें सत्ताधारी झालें. या घराण्यांतील मीर सोहराबखान तलपूर यानें खैरपुर संस्थान निराळें करून घेतलें. १८८२ मध्यें ब्रिटिश सरकारनें या संस्थानला मान्यता दिली. सध्यांचे संस्थानिक मीर फैज महंमदखान तलपूर १९३५ सालीं गादीवर आले.

**खैरवार-खरवार**—बिहार-ओरिसांत यांची वस्ती सर्वांत जास्त-सुमारें ७७ हजार-आहे व छत्तिसगडांत ४०,००० वर

तालुक्याचें मुख्य ठिकाण असून लो. सं. ९,५४८ आहे. भीमामाहात्म्यांत या खेटक क्षेत्राचें वर्णन आहे. येथें १६१३ सालीं बांधलेलें मोंगल सेनापति दिलावरखान ह्याचें थडगें आहे. तुकाईदेवीचें, सिद्धेश्वराचें व विष्णूचें अशीं तीन देवालयें येथें आहेत. सिद्धेश्वराचें देऊळ प्राचीन व ऐतिहासिक महत्त्वाचें आहे. येथें साधु चंडीरामबोवाची समाधि आहे.

१७०८ मध्यें खेड येथें ताराबाई व शाहू ह्यांच्या पक्षांमध्यें लढाई झाली त्या वेळीं धनाजीनें पंतप्रतिनिधीस मदत करण्याचें नाकारलें होतें. येथें एक हायस्कूल आहे.

**खेडब्रह्म**—( किंवा ब्रह्मखेड ). मुंबई, महीकांठा, ईडरच्या उत्तरेस ३० मैलांवर हरनाय नदीच्या तीरावरील ठिकाण. हें बरेंच मोठें असून प्राचीन काळापासून यात्रेचें ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे. शहराच्या उत्तरेकडील जंगलांत फार उत्तम नक्षीचें काम केलेलें एक देऊळ आहे. या देवळांतील एका खांबांतून बाहेर निघत आहे अशी एका स्त्रीची खोदीव मूर्ति काढली आहे. येथें दरवर्षी माघांत जत्रा भरते.

**खेडा**—मुंबई, उत्तर भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १५९५ चौ. मै. लो. सं. ९,१४,९५७. उत्तरेकडील कोपरा सोडल्यास बाकीचा भाग सपाट आहे. पुष्कळ भातजमीन आहे. मही ही मोठी नदी जिल्ह्यांतून वाहते. कपडवंजापासून १० मैलांवर लसुंद्रा येथें दहावारा उन्हाळीं आहेत. पाऊस सरासरी ३८ इंच पडतो. जिल्ह्यांत पुष्कळ मशिदी व देवळें आहेत. सजोळ येथील मुबारक सय्यद ( मृ. ९६६ ) याचा रोझा प्रेक्षणीय आहे. कपडवंज हेंहि ऐतिहासिक स्थळ पाहण्याजोगें आहे. मुख्य पिकें बाजरी, कोद्रा, भात, ज्वारी व गहूं. तंबाखूसाठीं जिल्हा प्रसिद्ध आहे. साबण व बांगड्या यांचे कारखाने जिल्ह्यांत आहेत. इ. स. ७४६ ते १२९० पर्यंत यावर रजपुतांचें राज्य होतें. पुढें हा जिल्हा अहमदाबादच्या सुलतानाकडे आला. १७५३ सालीं पेशवे आणि गायकवाड यांच्यामध्यें याची वांटणी झाली. १८०२ च्या वसईच्या तहानें कांहीं भाग ब्रिटिशांकडे गेला. नंतर उरलेला गायकवाडांपासून घेऊन याचा जिल्हा बनविण्यांत आला.

खेडा गांव पुरातन आहे. १७५३ त हा दमाजी गायकवाडानें जिंकून घेतला व १८०३ सालीं आनंदरावानें ब्रिटिशांना दिला. गांवांत एक कांचेचा कारखाना आहे. लो. सं. सुमारें पंधरा हजार.

**खेदीव**—पूर्वी ईजिप्त तुर्कस्तानच्या ताब्यांत होतें तेव्हां ईजिप्तच्या सुभेदारांना सुलतानानें दिलेली राजा या अर्थाची पदवी. ही पदवी १८६७ पासून १९१४ पर्यंत चालू होती. त्या सालीं तुर्कस्तानची सत्ता संपली व शेवटचा खेदीव पदभ्रष्ट झाला. नंतर आबास हिल्मी राज्यावर आला व त्यानें सुलतान ही पदवी धारण केली.

**खेम सावंत** ( राज्य. १६७५–१७०९ )—सांवतवाडीचा दुसरा खेम सावंत. हा पराक्रमी होता. याच्या बापाचें नांव फोंड सावंत होतें. हा इ. स. १६७५ च्या सुमारास गादीवर आला. यानें फौजफांटा वाढविला; मात्र त्याचा उपयोग शिवाजी-विरुद्ध औरंगझेबाला मिळण्याच्या कामीं केला. यानें गोंवेकर फिरंग्यांच्या मुलुखावर स्वाऱ्या करून आपलें राज्य वाढविलें. शाहू गादीवर येईपर्यंत सातारकर छत्रपतींना सावंताकडे लक्ष देण्यास सवड झाली नाहीं, त्यामुळें खेम यानें त्यांचा बराच मुलूख काबीज केला. पुढें ताराबाई व शाहू यांच्या भांडणांत यानें शाहूचा पक्ष घेतला होता.

**खेर, बाळ गंगाधर** (१८८८– )—मुंबई इलाख्याचे पहिले पंतप्रधान. यांचें शिक्षण मुंबईंत झालें. १९१२ मध्यें हे वकिली करूं लागले व १९१८ मध्यें सॉलिसिटर झाले. हे ‘ मणिलाल, खेर व अंबालाल ’ या सॉलिसिटर मंडळींचे भागीदार होते. हे राजकारणांत व सामाजिक चळवळींत प्रथमपासून भाग घेत आले आहेत. राष्ट्रीय सभेच्या चळवळींत हे प्रामुख्यानें भाग घेत असत. १९३७ सालीं हे मुंबईच्या असेंब्लीमध्यें कॉंग्रेसचे उमेदवार म्हणून निवडून आले व कॉंग्रेस मंत्रिमंडळाचे पंतप्रधान होते. पुढें कॉंग्रेस मंत्रिमंडळानें राजीनामा दिल्यावर हे पुन्हां कॉंग्रेसचें कार्य करूं लागले. अस्पृश्यतानिवारणाच्या कामांत हे विशेष लक्ष घालतात. यांनीं खारजवळ एका अस्पृश्य वसाहतीची सुधारणा चालविली होती. १९४२ सालीं यांना इतर कॉंग्रेस पुढाऱ्यांबरोबर अटक झाली. १९४५ सालीं पुन्हां कॉंग्रेसनें राज्यकारभार हातीं घेतल्यावर हे मुंबई इलाख्याचे दुसऱ्यांदां पंतप्रधान झाले. शिक्षणखातें यांच्याकडेच आहे. यांना संस्कृत भाषा आणि हिंदी संस्कृति यांबद्दल फार अभिमान आहे. यांचा स्वभाव अतिशय गरीब, सौजन्यशील व पापभीरु आहे.

**खेरसॉन**—हें शहर रशियांतील युक्रेन प्रांतांत आहे. पूर्वी खेरसॉन हें रशियांतील एक स्वतंत्र राज्य होतें. त्याचें क्षेत्रफळ २७,३३७ चौ. मै. असून आतां हा प्रदेश युक्रेनिअन लोक-राज्यामध्यें समाविष्ट केलेला आहे. हें शहर नीपर नदीच्या उजव्या कांठावर असून याची लोकसंख्या ९७,१८६ आहे. दोरखंड तयार करणें, लोंकर धुऊन साफ करणें व चरबी वितळवणें हे धंदे मोठ्या प्रमाणावर चालतात.

**खेरी**—संयुक्त प्रांत, लखनौ विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,९७२ चौ. मैल. उल नदी जिल्ह्याच्या मधून जाते. इतर नद्या व सरोवरें पुष्कळ आहेत. झाडें व भाजीपाला पुष्कळ आहे. जंगलामुळें बरेच हिंस्र पशूहि आढळतात. पाऊसमान ४६ इंच

त्यामध्यें घशाला विकार होतो. हा फार भयंकर असून त्यामध्यें शस्त्रक्रिया करणें आवश्यक होण्याचा संभव असतो. यावर प्रतिबंधक लस टोंचण्यांत यावी. दुसरा प्रकार २ ते ५ वर्षांच्या मुलांत सामान्यतः आढळतो. यामध्यें श्वासोच्छ्वास करण्यास जड वाटूं लागतें, खोकल्याची उचल येते आणि अस्वस्थता येते. हा विकार झाला असतां मुलास गरम पाण्यांत कांहीं वेळ ठेवून त्यास ओकारीचें औषध देण्यांत यावें. वरील दोन प्रकारांतील फरक समजून घ्यावा.

**खोखार**—पंजाबांतील एक जात. हे मुख्यतः मुसलमान आहेत. ते चांगले शेतकरी असून जाट, रजपूत लोक व आपण जवळजवळ एकाच वंशाचे आहोंत असें त्यांचें म्हणणें आहे.

ग्रंथांमधून खोखार व गखार यांविषयीं जे उल्लेख येतात ते दोन्ही एका जातीविषयीं नसून निरनिराळ्या जातींविषयीं आहेत असें मत प्रचलित आहे. गुरुदासपूर येथील काटील रजपुतांपैकीं जे प्रथम मुसलमान झाले ते खोखार होत. काटील जातीच्या रजपुतांनीं जम्मू राज्यांत मंगलदेवीच्या किल्ल्यांत वसाहत केली आणि पुढें खैरपुर जिंकलें. त्या खैरपुरावरून पुढें महमद गझनवीच्या काळांत ते मुसलमान झाल्यानंतर खोखार हें नांव त्यांना मिळालें. महमद गझनवीच्या सहाव्या स्वारीच्या वेळेस ते हिंदूच होते आणि त्यांनीं महमदास आनंदपाळ याच्या नेतृत्वाखालीं अडथळा केला.

अकबराच्या वेळीं लाहोर प्रांताच्या ५२ महालांपैकीं पांच महाल खोखारांच्या ताब्यांत होते.

**खोखो**—मुलांचा एक मैदानी खेळ. हा आट्यापाट्यांप्रमाणें फार चांगला, महत्त्वाचा व आवडता असल्यामुळें या खेळाचे आता नियम बसविले आहेत व याचे सामनेहि होतात. दोन संघांपैकीं एका संघांतील गडी उलटसुलट तोंडें करून बसतात व दुसऱ्या संघांतील गडी खेळतात. मारणाऱ्या संघापैकीं एक खुंटाकडे उभा राहतो व सूचना झाल्यावर खेळणाऱ्या गड्यांस धरण्याचा प्रयत्न करतो. तो दमला किंवा खेळणारा हातीं लागत नाहीं असें त्याला दिसल्यास तो बसलेल्या गड्यास खो देऊन आपण त्याच्या जागीं बसतो. याप्रमाणें खो देत देत खेळणारे गडी मारतात. या खेळांत दौडीचा व बैठकीचा चांगला व्यायाम होतो.

**खो जात**—पाकिस्तानच्या वायव्य सरहद्दीवर चित्रळ खोऱ्यांत आणि पामिरच्या दक्षिणेस असलेल्या त्यालगतच्या प्रदेशांत राहणारी एक जात. या प्रदेशांत शिन भाषा चालते. पश्चिमेस काफिरीस्तान असून त्यांत निरनिराळ्या हिंदू काफिरी पोटभाषा बोलतात. 'खो' (वास्तविक 'ह्वो') व गिलजिटचे शिन आणि काफिरीस्तानचे काफीर या सर्वांना दरद असें नांव देण्यांत येतें, पण वास्तविक हें नाव फक्त शिन लोकांस लावतात. या तिन्ही जाती प्राचीन पैशाची जाती असाव्यात. हो भाषेचा उल्लेख चिनी बौद्ध वाङ्मयांत येतो. हे लोक त्या वेळीं डोंगरी मुलुखांत राहणारे म्हणून प्रसिद्ध होते. खो लोकांचे पेहेराव व चालीरीति दरदांप्रमाणेंच आहेत.

खो लोकांना दरदांप्रमाणेंच उच्चदर्जाचे आर्य म्हणतां येईल. ते दरदांपेक्षां जास्त सुंदर, उभट चेहेऱ्याचे, चांगल्या ठेवणीचे आणि मोठाले सुरेख डोळे असलेले असे दिसतात. युरोपांत सुद्धां सौंदर्यामध्यें त्यांचा उच्च दर्जा लागेल. प्राचीन काळीं काबूल, पेशावर आणि बदकशान येथील गुलामांच्या बाजारांत खो स्त्रियांच्या सौंदर्यामुळें त्यांना अतोनात मागणी असे.

पूर्वीच्या काळीं या देशाचा धर्म बौद्ध असे. हल्लीं खो लोक सुन्नी पंथाचे मुसलमान आहेत. पण उत्तर खोऱ्यांतील लोक उत्तर गिलजितांतल्याप्रमाणें मौलवी पंथाचे आहेत. इस्लामी धर्माचा प्रवेश येथें चौदाव्या शतकाच्या सुमारास झाला. व हल्लींचा मुसलमान वंश १६ व्या शतकांत खोरासानाकडून इकडे आला.

**खोजा**—एक मुसलमान जात. हिंदुस्थानांत यांची विशेष वस्ती पंजाब व मुंबई इलाखा यांतून आहे. हे मुसलमान व्यापारी असून यांच्यांत बऱ्याच हिंदू चाली अद्याप शिल्लक आहेत. हे शिया पंथाचे मुसलमान आहेत. हे पूर्वी सिंधमधील लोहाणा जातीचे हिंदू (बहुधा खत्री) असावेत. खोजा शब्द ख्वाजा म्हणजे ठाकूर शब्दाचा समानार्थक शब्द आहे. हे ईजिप्तच्या इस्माइल पंथाचे आहेत. ११ व्या शतकांत हसन सबाह नांवाच्या एका इराणी माणसानें फिदवी पंथ स्थापिला. यानें ईजिप्तच्या खलिफाची सत्ता झुगारून दिली व स्वतःला 'शेखुल जबल' म्हणवूं लागला. याचा तिसरा वंशज हसन नांवाचा होता (स. ११६३). याच्याच पंथापैकीं पीर सदरुद्दीन यानें लोहाणा हिंदूंना हसन हाच विष्णूचा १० वा अवतार निष्कलंकी (कलंकी) आहे व आदाम हा विष्णु, महंमद हा शिव, पांच इमाम हे पांडव असा फेरबदल सांगून नवीन धर्म घेण्यास लाविला. इ. स. १८४५ सालीं आग्न शाह हसन अली यानें हिंदुस्थानांत येऊन वस्ती केली. सध्यांचे आगाखान (पाहा) हे यांचेच वंशज आहेत.

खोजे लोक मोठे व्यापारी आहेत. सिलोन, ब्रह्मदेश, सिंगापूर, चीन, जपान, इराणी आखातातील बंदरें, अरबस्तान व पूर्व आफ्रिका या देशांशीं हे व्यापार करतात. यांचीं मुलें दूरदूर देशीं उमेदवार म्हणून २०० पासून २,००० रुपये दरसाल वेतनावर जातात. हिंदुस्थानाबाहेर अरबस्तान व झांझिबार या प्रदेशांत खोजांची वस्ती आहे.

आहे. यांचा व चेरो लोकांचा फार निकट संबंध असावा. यांच्यांत परस्पर विवाह होऊं लागला आहे. पलामऊ व रायगड यांचे राजे या प्रकारचे मिश्र लग्नसंबंध जोडतात व अलीकडे मोठा खर्च करून रजपूत मुली देखील करतात. यामुळें यांतील बरेच तुराणी अवशेष नाहींसे होत आहेत. ही जात एकंदर सुधारणेच्या मार्गावर आहे.

**खैरागड संस्थान**— मध्यप्रांत. क्षे. फ. ९३१ व लो. सं. १,७३,७१३. संस्थानचे खैरागड–डोंगरगड,खमारिया व खोलवा असे तीन भाग आहेत. जंगलांत हिंस्र पशू आहेत. पावसाची सरासरी ४४ इंच आहे. खैरागड आणि डोंगरगड येथें प्राचीन देवळें आहेत. डोंगरगड हें इतिहासदृष्ट्या महत्त्वाचें ठिकाण आहे. संस्थानची भाषा हिंदीची एक उपभाषा आहे. मराठी बोलणारेहि चारपांच हजार लोक आहेत. संस्थानात ५२१ खेडीं व दोन शहरें आहेत.

संस्थानिक छोटानागपूरचे नागवंशीय आहेत. मूळपुरुष सभासिंग नांवाचा होता. पुढें राजे भोंसल्यांचे मांडलिक बनले व खंडणी देऊं लागले. ही खंडणी एकसारखी वाढतच गेली. १८६५ सालीं संस्थान ब्रिटिशांचें रीतसर मांडलिक बनलें व त्यांना वाढीची खंडणी देऊं लागलें. सध्यांचे संस्थानिक राजा विरेंद्र बहादूरसिंघ १९१८ त लहानपणींच गादीवर आले. १९३५ सालीं यांना राज्याधिकार मिळाले. त्यांनीं संस्थानांत पुष्कळ सुधारणा केल्या. संस्थानचें उत्पन्न ११ लाख तीस हजार रुपये आहे. १९४७ सालीं हें मध्यप्रांतांत इतर संस्थानांबरोबर विलीन झालें.

खैरागड हें राजधानीचें शहर लहान आहे. राजवाडा, हायस्कूल, दवाखाना, तुरुंग, कचेऱ्या, वगैरे इमारती आहेत. पितळेची भांडी व लांकडी सामान गांवांत तयार होतें. रूखरस्वामीचें देऊळ प्रसिद्ध आहे.

**खैराम्ल**— ( टॅनिक ॲसिड ). हिरड्यांत सांपडणारें अम्ल. हें तिखट लागतें. रंगासाठीं आणि कातडें कमावण्यासाठीं ह्याचा उपयोग होतो.

**खैरी**—मध्यप्रांत, भंडारा जिल्हा, साकोलीच्या उत्तरेस कांहीं मैलांवर ही लहानशी जमीनदारी आहे. हींत एकंदर ४ खेडीं असून क्षेत्रफळ १४ चौ. मैल आहे. ह्यापैकीं ¾ भाग जंगल आहे. रानटी पशूंचा नाश केल्याबद्दल हल्लींच्या मान घराण्याच्या पूर्वजास ही जमीनदारी मिळाली असें म्हणतात. इ. स. १७७५ सालीं नागपूरच्या राजांनीं ही जमीनदारी याच घराण्याकडे कायम केल्याची सनद दिली आहे. जमीनदार अनंतराम यास कर्ज फार झाल्यानें त्यानें आपलें कर्ज फेडण्याकरितां गोदलपार नांवाचें खेडें विकून टाकलें. उत्पन्न तीन-चार हजार रु. आहे.

**खैरुद्दिन** ( मृ. १८९० )—हा तुर्कस्तानचा एक प्रसिद्ध मुत्सद्दी होऊन गेला. हा सरकॅशियन वंशाचा होता. तुनीशियांतील गुलामांचा व्यापार करणाऱ्या एकाकडे गुलाम होता. पुढें हा स्वतंत्र झाला व फ्रान्सला शिक्षणासाठीं सहा वर्षें होता. त्या अवधींत फ्रेंचांच्या शासनपद्धतीचें व त्यांच्या राजकारणविषयक कल्पनांचें त्याला चांगलें ज्ञान झालें. १८३७ मध्यें परत आला व तुनीशियामध्यें चांगलाच मान्यतेस चढला. यानें तुनीशियांत पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या. १८००.मध्यें तो तुर्कस्तानांत गेला. १८७९ मध्यें तो सुलतानाचा वझीर झाला. तुर्कस्तानामध्यें सनदशीर राज्यपद्धति अमलांत यावी यासाठीं त्यानें एक योजना तयार केली, पण त्या योजनेला संमति देण्याचें सुलतानानें साफ नाकारलें, त्यामुळें लगेच त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. सुलतानानें अनेकदां त्याला मुख्य वजिराची जागा देऊं केली, पण त्यानें ती नाकारली.

**खोकंद**—आशिया, रशियन तुर्कस्तान, फरघणा प्रांताची राजधानी. हें समरकंदपासून अँडिजानला जाणाऱ्या आगगाडीच्या रस्त्यावर सरदारीया नदीच्या तीरीं आहे. प्रतिवार्षिक पाऊस ३·६ इंच असतो. शहरांत मोठाले रस्ते, विस्तृत व सुंदर बाजार आहेत. चाकूकात्र्या, रेशीम, कापड तयार होत असून हें व्यापाराचें महत्त्वाचें केंद्र आहे. वस्ती लाखावर आहे. पूर्वी खोकंद हें स्वतंत्र राज्य ( खानेत ) होतें, पण १८७६ सालीं याचा फरघणा प्रांत बनविण्यांत आला.

**खोकला**—फुप्फुसांतून एकदम व आवाज करून जी हवा बाहेर येते तीस म्हणतात. खोकला हा रोग नव्हे तर एखाद्या रोगाचें लक्षण आहे. क्षुल्लक कारणानें ( उदा., डोक्यांतील थंडीमुळें ) किंवा कफ-क्षयासारख्या एखाद्या विकारामुळें खोकला येतो. यावर औषध उपयोगी पडतेंच असें नाहीं. बेडका बाहेर येण्यास त्यानें मदत झाली तर पाहिजे असते. फुप्फुसांत सांठलेला कफ बाहेर पडला पाहिजे व त्यासाठीं खोकला थांबवून उपयोगी नाहीं. आंत रोग असतांना खोकला बळेनें थांबविला तर तो रोग नाहीं असें समजून रोगी निष्काळजी राहतो व दुखणें बळावतें. क्षयाच्या बाबतींत हीच गोष्ट बहुधा घडते. एकसारखा थंडीचा खोकला, उन्हाळ्यांतहि कफ न सुटणारा खोकला किंवा रक्तमिश्रित कफ असलेला खोकला हे रोगाचा धोका सुचविणारे असतात. या वेळीं तावडतोब इलाज केला पाहिजे. खोकल्याबरोबर रक्त येणें हें लक्षण बहुधा कफक्षयाचें असतें. कफ व कफक्षय पहा.

**खोकला ( काळा )**—हा रोग मुलांस होतो,व त्याचे दोन प्रकार आहेत : १ ला अंतस्त्वचेचा असून २ रा आंचक्यांचा असतो. पहिला प्रकार हा एक घटसर्पाचाच प्रकार असून

त्यामध्यें घशाला विकार होतो. हा फार भयंकर असून त्यामध्यें शस्त्रक्रिया करणें आवश्यक होण्याचा संभव असतो. यावर प्रतिबंधक लस टोंचण्यांत यावी. दुसरा प्रकार २ ते ५ वर्षांच्या मुलांत सामान्यतः आढळतो. यामध्यें श्वासोच्छ्वास करण्यास जड वाटूं लागतें, खोकल्याची उबळ येते आणि अस्वस्थता येते. हा विकार झाला असतां मुलास गरम पाण्यांत कांहीं वेळ ठेवून त्यास ओकारीचें औषध देण्यांत यावें. वरील दोन प्रकारांतील फरक समजून घ्यावा.

**खोखार**— पंजाबांतील एक जात. हे मुख्यतः मुसलमान आहेत. ते चांगले शेतकरी असून जाट, रजपूत लोक व आपण जवळजवळ एकाच वंशाचे आहोंत असें त्यांचें म्हणणें आहे.

ग्रंथांमधून खोखार व गखार यांविषयीं जे उल्लेख येतात ते दोन्ही एका जातीविषयीं नसून निरनिराळ्या जातींविषयीं आहेत असें मत प्रचलित आहे. गुरुदासपूर येथील काटील रजपुतांपैकीं जे प्रथम मुसलमान झाले ते खोखार होत. काटील जातीच्या रजपुतांनीं जम्मू राज्यांत मंगलदेवीच्या किल्ल्यांत वसाहत केली आणि पुढें खैरपुर जिंकलें. त्या खैरपुरावरून पुढें महमद गझनवीच्या काळांत ते मुसलमान झाल्यानंतर खोखार हें नांव त्यांना मिळालें. महमद गझनवीच्या सहाव्या स्वारीच्या वेळेस ते हिंदूच होते आणि त्यांनीं महमदास आनंदपाळ याच्या नेतृत्वाखालीं अडथळा केला.

अकबराच्या वेळीं लाहोर प्रांताच्या ५२ महालांपैकीं पांच महाल खोखारांच्या ताब्यांत होते.

**खोखो**—मुलांचा एक मैदानी खेळ. हा आट्यापाट्यांप्रमाणें फार चांगला, महत्त्वाचा व आवडता असल्यामुळें या खेळाचे आता नियम बसविले आहेत व याचे सामनेहि होतात. दोन संघांपैकीं एका संघांतील गडी उलटसुलट तोंडें करून बसतात व दुसऱ्या संघांतील गडी खेळतात. मारणाऱ्या संघापैकीं एक खुंटाकडे उभा राहतो व सूचना झाल्यावर खेळणाऱ्या गड्यांस धरण्याचा प्रयत्न करतो. तो दमला किंवा खेळणारा हातीं लागत नाहीं असें त्याला दिसल्यास तो बसलेल्या गड्यास खो देऊन आपण त्याच्या जागीं बसतो. याप्रमाणें खो देत देत खेळणारे गडी मारतात. या खेळांत दौडीचा व बैठकीचा चांगला व्यायाम होतो.

**खो जात**—पाकिस्तानच्या वायव्य सरहद्दीवर चित्रळ खोऱ्यांत आणि पामिरच्या दक्षिणेस असलेल्या त्यालगतच्या प्रदेशांत राहणारी एक जात. या प्रदेशांत शिन भाषा चालते. पश्चिमेस काफिरीस्तान असून त्यांत निरनिराळ्या हिंदू काफिरी पोटभाषा चोलतात. 'खो' ( वास्तविक 'हो' ) व गिलजिटचे शिन आणि काफिरीस्तानचे काफीर या सर्वांना दरद असें नांव देण्यांत येतें, पण वास्तविक हें नाव फक्त शिन लोकांस लावतात. या तिन्ही जाती प्राचीन पैशाची जाती असाव्यात. हो भाषेचा उल्लेख चिनी बौद्ध वाङ्मयांत येतो. हे लोक त्या वेळीं डोंगरी मुलुखांत राहणारे म्हणून प्रसिद्ध होते. खो लोकांचे पेहेराव व चालीरीति दरदांप्रमाणेंच आहेत.

खो लोकांना दरदांप्रमाणेंच उच्चदर्जाचे आर्य म्हणतां येईल. ते दरदांपेक्षां जास्त सुंदर, उमट चेहेऱ्याचे, चांगल्या ठेवणीचे आणि मोठाले सुरेख डोळे असलेले असे दिसतात. युरोपांत सुद्धां सौंदर्यामध्यें त्यांचा उच्च दर्जा लागेल. प्राचीन काळीं काबूल, पेशावर आणि बदकशान येथील गुलामांच्या बाजारांत खो स्त्रियांच्या सौंदर्यामुळें त्यांना अतोनात मागणी असे.

पूर्वीच्या काळीं या देशाचा धर्म बौद्ध असे. हल्लीं खो लोक सुनी पंथाचे मुसलमान आहेत. पण उत्तर खोऱ्यांतील लोक उत्तर गिलजितांतल्याप्रमाणें मौलवी पंथाचे आहेत. इस्लामी धर्माचा प्रवेश येथें चौदाव्या शतकाच्या सुमारास झाला. व हल्लींचा मुसलमान वंश १६ व्या शतकांत खोरासानाकडून इकडे आला.

**खोजा**—एक मुसलमान जात. हिंदुस्थानांत यांची विशेष वस्ती पंजाब व मुंबई इलाखा यांतून आहे. हे मुसलमान व्यापारी असून यांच्यांत बऱ्याच हिंदू चाली अद्याप शिल्लक आहेत. हे शिया पंथाचे मुसलमान आहेत. हे पूर्वी सिंधमधील लोहाणा जातीचे हिंदू ( बहुधा खत्री ) असावेत. खोजा शब्द ख्वाजा म्हणजे ठाकूर शब्दाचा समानार्थक शब्द आहे. हे ईजिप्तच्या इस्माइल पंथाचे आहेत. ११ व्या शतकांत हसन सबाह नांवाच्या एका इराणी माणसानें फिदवी पंथ स्थापिला. यानें ईजिप्तच्या खलिफाची सत्ता झुगारून दिली व स्वतःला 'शेखुल जवल' म्हणवूं लागला. याचा तिसरा वंशज हसन नांवाचा होता ( स. ११६३ ). याच्याच पंथापैकीं पीर सदरुद्दीन यानें लोहाणा हिंदूंना हसन हाच विष्णूचा १० वा अवतार निष्कलंकी ( कलंकी ) आहे व आदाम हा विष्णु, महंमद हा शिव, पांच इमाम हे पांडव असा फेरबदल सांगून नवीन धर्म घेण्यास लाविला. इ. स. १८४५ सालीं आग्न शाह हसन अली यानें हिंदुस्थानांत येऊन वस्ती केली. सध्यांचे आगाखान ( पाहा ) हे याचेच वंशज आहेत.

खोजे लोक मोठे व्यापारी आहेत. सिलोन, ब्रह्मदेश, सिंगापूर, चीन, जपान, इराणी आखातातील बंदरें, अरबस्तान व पूर्व आफ्रिका या देशांशीं हे व्यापार करतात. यांचीं मुलें दूरदूर देशीं उमेदवार म्हणून २०० पासून २,००० रुपये दरसाल वेतनावर जातात. हिंदुस्थानाबाहेर अरबस्तान व झांझिबार या प्रदेशांत खोजांची वस्ती आहे.

**खोटा दस्तऐवज**—इंग्लंडांत पूर्वीच्या कॉमन लॉ कायद्यांत खोटा दस्तऐवज करणें या गुन्ह्यामध्यें दुसऱ्या माणसाच्या हक्काला बाध येईल अशा तऱ्हेचा दस्तऐवज त्या माणसाला फसवून कपट लबाडीनें करणें; किंवा मूळच्या दस्तऐवजांतील मजकुरांत तशा प्रकारचा मजकूर मागाहून दुरुस्ती करून लिहणें, या गोष्टींचा समावेश होतो. मूळच्या दस्तऐवजांत दुरुस्ती करून कांहीं मजकूर खोडून दुसरा लिहिणें किंवा अजीबात जादा मजकूर लिहिणें या दोन्ही प्रकारांचा समावेश सदर गुन्ह्यांच्या व्याख्येंत होतो. शिवाय अशा दस्तऐवजावर खोट्या स्टँपाचा शिक्का वठविणें या कृत्याचाहि या गुन्ह्यांत अंतर्भाव होतो. या गुन्ह्याला पूर्वी इंग्लंडच्या कॉमन लॉ कायद्यांत देहान्त शासनाची शिक्षा होती. कलकत्त्यांत नंदकुमाराला यामुळेंच फांशीं जावें लागलें; परंतु १८३२ च्या व नंतर १८६१ च्या कायद्यानें ती शिक्षा रद्द करण्यांत आली. हल्लीं या गुन्ह्याला कमाल शिक्षा हयातीपर्यंत सक्तमजुरी सांगितलेली आहे. १९१३ सालीं या गुन्ह्याबद्दलच्या फोर्जरी ॲक्ट या कायद्यांत मागील यासंबंधींचे सर्व कायदे एकत्र करण्यांत आले. हिंदुस्थानांत पिनल कोडांत या गुन्ह्याबद्दलचीं कलमें आहेत (इंडियन पिनल कोड, कलमें ४६३ ते ४७१).

**खोटी साक्ष**—कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखाद्या न्यायकोर्टांत चौकशीचें काम चालू असतांना त्या विषयासंबंधीं शपथेवर जबानी देत असतांना जाणून बुजून खोटा मजकूर सांगणें. या गुन्ह्याला दंड, साधी कैद, किंवा सक्तमजुरीची कैद अशी शिक्षा आहे. अशी खोटी साक्ष देण्यास जो इसम उत्तेजन देतो, त्यालाहि वरीलप्रमाणें शिक्षा होते (इंडियन पिनल कोड, कलमें १८१।१०९ पाहा).

**खोंड**— किंवा कंध. मुख्यतः ओरिसा व मद्रास इलाख्यांत ही जात आहे. पूर्वी बरेचसे खोंड मध्यप्रांतांत दिसत असत. पण उडिया भाषा चालू असलेला संबळपूर जिल्हा, पाटणा व कलहंडी संस्थान मध्यप्रांतांतून ओरिसा हद्दींत गेल्यावर ओरिसामधील खोंडांची संख्या वाढली. १९४१ च्या खानेसुमारींत यांची संख्या ७,४४,९०४ भरली. यांच्या नरमेधाच्या चालीमुळें पुष्कळ संशोधकांचें यांकडे लक्ष वेधिलें आहे. हे स्वतः आपल्यास कुइ लोक किंवा कुइंजू म्हणवितात. यांची व्युत्पत्ति तेलगू को किंवा कु शब्दाशीं जोडतात. कु शब्द डोंगर शब्दाचा वाचक आहे. कोणी खांड (खड्ग) शब्दाशीं याचा संबंध जोडतात. तेथील राज्यकर्त्यांच्या दंतकथांवरून पूर्वी हे या प्रदेशांतील सत्ताधारी होते, असें दिसते. परवांपर्यंत कलहंडीच्या राजांचा अभिषेक खोंडाच्या मांडीवर बसून होत असे. खोंड जातीच्या वृद्ध माणसाकडे राजास मांडीवर घेऊन राज्यारोहण करण्याचा अधिकार असे, व केसरीसिंह देव राजापर्यंत हा अधिकार चालू होता. खोंडांत दोन मुख्य वर्ग आहेतः (१) कुरिया खोंड, हे डोंगरांतले लोक आहेत व यांच्यांत पुष्कळ जुन्या चाली शिल्लक आहेत. (२) मैदानांत राहणाऱ्या खोंडांत पोटवर्ग आहेत.

शेतकी, शिकार व युद्ध यांखेरीज इतर धंद्यांची खोंड लोकांस आवड नाहीं. हे इतर रानटी लोकांप्रमाणें मद्याचे फार शोकी असून नेहमीं कफल्लक असतात. यांचीं शस्त्रें धनुष्यबाण, लांब पात्याची तरवार व कुऱ्हाड हीं असतात. यांच्यांत देव अनेक आहेत व त्यांना बळी लागतो.

**खोत**—सरकाराकरितां गांवचा वसूल जमा करून देणारा एक पिढीजाद कामदार. कोंकणांत खोतीचा हक्क वंशपरंपरा चालत आलेला आहे. त्यामुळें कांहीं खोत जमीनदार किंवा मालगुजार बनले आहेत व ते कुळांकडून लागेल तसा वसूल घेतात व खोतवेठींचे हक्क बजावतात, अशा तक्रारी ब्रिटिश सरकारकडे आल्या, तेव्हां सरकारनें १८८० त खोती सेटलमेंट कायदा करून खोतांचे सरकारशीं आणि कुळांशीं असणारे संबंध निश्चित व मर्यादित केले. १९१३ सालीं या कायद्यांत दुरुस्त्या झाल्या. त्यामुळें आतां खोतांचे हक्क फारसे राहिलेले नाहींत. पूर्वी कांहीं वरंडी गवत, पानपेंढा, शाकारणी माणूस, खळी, पाटी, सूप, शिंपली, हवसा, वाढवण, हातरी, तव्या, हातर, नागर जोत, कांहीं भाऱ्या लांकडें, मानसंबंधे नारळसुपारी, बाचभाडें, अर्धेली तिर्धेली या प्रकारचे खोतवेठीचे हक्क असत.

**खोतान**—चीन, सिंकिअँगच्या नैर्ऋत्येकडील एक शहर. हें खोतान नदीवर वसलेलें असून यार्कंदच्या आग्नेयीस १८० मैलांवर आहे. हा प्रदेश खनिज संपत्तीनें भरला असून, मर्गज (जेड) रत्नांचा खोतानला मोठा व्यापार आहे. प्राचीन संस्कृतीचे पुष्कळ अवशेष येथें सांपडतात. लो. सं. २६,०००.

**खोबरेल**—हें एक घट्ट वनस्पतिज तेल आहे. याचा उपयोग साबण, मेणबत्त्या, मार्गारीन नांवाचा लोण्यासारखा पदार्थ व पोमेटम नांवाचें केसांस लावावयाचें मलम, वगैरे करण्याच्या कामीं करण्यांत येतो. हें तेल खोबरें दाबून पिळून त्यापासून काढण्यांत येतें. ते पांढरें व दाट असते. थंडीनें तें थिजून घट्ट होतें. याचा हिंदुस्थानांत केसांना लावण्याकरितां मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यांत येतो व त्यांत सुगंध घालूनहि निरनिराळीं सुवासिक तेलें बनविण्यांत येतात. याचा तुपासारखा खाण्याच्या कामींहि पुष्कळ उपयोग करण्यांत येतो. हें तेल मॅनीला, सिलोन व स्ट्रेट्स सेटलमेंट्स या देशांतून मोठ्या प्रमाणावर बाहेर रवाना होतें. तसेंच डचांच्या पूर्वेकडील बेटांतहि हें बरेंच होतें.

**खोम्माण**—चितोडच्या गुहिलोत राजघराण्यांत तीन खोम्माण राजे होऊन गेले. तिसरा खोम्माण हा महायकानंतर गादीवर बसला होता. प्राचीन शिलालेखांत खोम्माण याच्या पराक्रमाचीं वर्णनें आढळतात. आटपुरालेखांत आणखी दोन खोम्माणांचा उल्लेख येतो. यांतील कालभोजपुत्र खोम्माणानें फार पराक्रम केला. त्यानें इ. स. ८२५ च्या सुमारास अरबांशीं घनघोर संग्राम करून त्यांना हांकलून लाविलें. या कृत्यावर खोम्माणरासा नांवाचें एक काव्य प्रसिद्ध आहे. त्याच्या आधारानें टॉडनें या युद्धांत चितोडच्या बाजूनें कोणकोणत्या देशाचे राजे लढले त्याची यादी दिली आहे. असल्या प्रकारची सर्व रजपुतांची एकी पुढें पृथ्वीराजाच्या वेळीं झाली होती.

**खोरदादसाल**—हा एक पारशी सण असून फर्वरदिनच्या ६ व्या तिथीला ( १० सप्टेंबर ) येतो. या दिवशीं पारशी धर्माचा संस्थापक जो झरथुष्ट्र याचा जन्म झाला. म्हणजे झरथुष्ट्रजयंतीचा हा सण आहे.

**खोरेमाबाद**— हें इराणांत लुरिस्तान प्रांताचें राजधानीचें शहर आहे. हें शहर खोरेमाबाद नदीच्या उजव्या तीरावर आहे. लोकसंख्या सुमारें ६,००० आहे. शहर व नदी यांच्या दरम्यान एका अलग असलेल्या टेंकडीवर दिझइ-सिया नांवाचा एक पडका किल्ला आहे. किल्ल्याच्या पायथ्याशीं सुभेदाराचें निवासस्थान विस्तृत सभामंदिरें व बगीचे आहेत. नदीच्या डाव्या किनाऱ्यावर शहराच्या समोर जुन्या साम्हा शहराचे पडके भाग आहेत. येथें ६० फूट उंचीचा एक मनोरा, एका मशिदीचे भाग, पाण्याचा नळ, इतर इमारतींच्या भिंती व एक चौकोनी एकाच दगडाचा खांब आहे.

**खोलेश्वर**—यादवकालीन एक ब्राह्मणवीर. हा सिंघण यादवाचा सेनापति असून मुद्गलगोत्री ब्राह्मण होता. यानें गुजराथेवर पुष्कळदां स्वाऱ्या करून तेथील वाघेल राजसत्ताधाऱ्यांचा पराभव केला व बराचसा प्रांत सिंघणाच्या ताब्यांत आणला. याचा काल १२००–१२५० येतो. यानें सेंघकदेश ( हल्लींच्या पूर्व खानदेशच्या अजिंठ्याच्या डोंगरालगतचा भाग ) जिंकून तेथें आपली वस्ती केली होती. पू. खानदेशांतील शेंदुर्णी या गांवीं या खोलेश्वरानें एक महादेवाचें देऊळ बांधिलें आहे व या देवाचें नांवहि खोलेश्वर असून तेथें खोलेश्वराच्या नांवाचा एक शिलालेख आहे. याचीं मुलेंहि पराक्रमी निघालीं.

**खोह्मेन**—कांबोजमधील जी 'ख्मेर' भाषा तिचेंच हें सयामी नांव आहे. या भाषेचा फ्रेंच लोकांनीं बराच अभ्यास केला आहे. ही भाषा मेकॉं अथवा कंबुचतची कांबोज नदी हिच्या तीरावर राहणारें याच नांवाचें एक राष्ट्र वापरतें. लेडेन याच्या काळीं या भाषेचा फारसा अभ्यास झाला नव्हता. ही भाषा थइ अथवा कोचीनचीनमधील भाषा जुआन यांच्याहून भिन्न आहे. हें राष्ट्र प्राचीन काळीं फारसें सुसंस्कृत नव्हतें. याना पोर्तुगीज इतिहासकारांनीं 'ग्वो' असें उल्लेखिलें आहे. हे नरमांस भक्षक असून आपलीं शरीरें गोंदवीत असत असें सांगतात. डी बॅरॉस यानें कोमो व कांबोज अशीं या ठिकाणीं समुद्रकिनाऱ्यावर दोन राष्ट्रें होतीं, असा उल्लेख केला आहे.

**ख्याल**—गीतांचा एक प्रकार. तानसेनाच्या वंशांतले नियामतखां व नौबादखां ( टोपणनांवें सदारंग व अदारंग ) या १८ व्या शतकांतील तिसऱ्या महंमदशहा बादशहाच्या आश्रित गवयांनीं ध्रुवपद रागदारीच्या धर्तीवर हा प्रकार काढला. विलंबित व मध्य किंवा द्रुतलयीचे असे ख्यालाचे दोन प्रकार आहेत. हें ख्यालगायन लवकरच फार लोकप्रिय झालें व यांत बरेच गायक प्रसिद्धि पावले. ग्वाल्हेर संस्थानांत या गायकीचा मोठा उत्कर्ष झाला व दक्षिणी ब्राह्मणांतहि चांगले गवयी निघाले. कै. शंकररावजी पंडित यांचें नांव सर्व जण मोठ्या आदरानें घेतात व त्यांची परंपरा चालू आहे.

**ख्रिसिपस** ( ख्रि. पू. २८०–२०६ )—एक ग्रीक तत्त्ववेत्ता. स्टोइक पंथाचा हा एक संस्थापक असून त्यानें ७०० हून अधिक निरनिराळे ग्रंथ लिहिले, असें म्हणतात. ते बहुतेक ग्रंथ प्रश्नोत्तरपद्धतीनें लिहिलेले आहेत; पण त्या ग्रंथांचे कांहीं अधलेमधले भाग फक्त हल्लीं उपलब्ध आहेत.

**ख्रिस्त, येशू**—जीझस ख्राइस्ट. ख्रिस्ती धर्मसंस्थापक. याचा जन्म सुमारें ख्रि. पू. ६ या वर्षी बेथलेहेम या गांवीं झाला. याचें बालपण व तारुण्य नाझारेथ या गांवीं गेलें. यानें आपल्या सार्वजनिक आयुष्यास ख्रि. स. ३० या वर्षाच्या सुमारास सुरुवात केली. त्याचें जीवितकार्य सुमारें एक ते तीन वर्षेंच काय तें झालें असे दिसतें. त्याच्या व्यक्तिमत्त्वामध्यें, स्वर्गामध्यें पित्याची सेवा एकत्व्यानेंच करण्याची अदम्य वृत्ति दिसून येते व त्याकरितां सर्वस्वाचा त्याग करण्याची त्याची तयारी दृष्टीस पडते. तसेंच मानवजातीसंबंधीं त्याच्या ठिकाणीं अत्यंत कोमलवृत्ति व प्रेम आणि तिच्या कल्याणाकरितां स्वतःचा आत्मयज्ञ करण्याची त्याची तयारी दिसते. त्यानें आपल्या सार्वजनिक जीवनामध्यें जनतेस उपदेश केला आणि आपणासभोंवतीं कांहीं शिष्यवर्ग निर्माण केला व त्यांपैकीं कांहींस त्यानें प्रेपित ( प्रवक्ते ) म्हणून आपल्या संप्रदायाचें कार्य चालविण्याकरितां निवडिलें. केवळ आचारनियमांचें पालन करण्याऐवजीं मनुष्याच्या अन्तर्वृत्तीचा पालट घडवून आणणें ही गोष्ट अधिक महत्त्वाची मानणें, राज्यकर्त्यांच्या धार्मिक वृत्तीच्या फारिसी लोकांच्या व साडुसी या भौतिकवादी लोकांच्या

**खोटा दस्तऐवज**—इंग्लंडांत पूर्वीच्या कॉमन लॉ कायद्यांत खोटा दस्तऐवज करणें या गुन्ह्यामध्यें दुसऱ्या माणसाच्या हक्काला बाध येईल अशा तऱ्हेचा दस्तऐवज त्या माणसाला फसवून कपट लबाडीनें करणें; किंवा मूळच्या दस्तऐवजांतील मजकुरांत तशा प्रकारचा मजकूर मागाहून दुरुस्ती करून लिहिणें, या गोष्टींचा समावेश होतो. मूळच्या दस्तऐवजांत दुरुस्ती करून कांहीं मजकूर खोडून दुसरा लिहिणें किंवा अजीबात जादा मजकूर लिहिणें या दोन्ही प्रकारांचा समावेश सदर गुन्ह्याच्या व्याख्येंत होतो. शिवाय अशा दस्तऐवजावर खोट्या स्टॅपाचा शिक्का वठविणें या कृत्याचाहि या गुन्ह्यांत अंतर्भाव होतो. या गुन्ह्याला पूर्वी इंग्लंडच्या कॉमन लॉ कायद्यांत देहान्त शासनाची शिक्षा होती. कलकत्त्यांत नंदकुमाराला यामुळेंच फांशीं जावें लागलें; परंतु १८३२ च्या व नंतर १८६१ च्या कायद्यानें ती शिक्षा रद्द करण्यांत आली. हल्लीं या गुन्ह्याला कमाल शिक्षा हयातीपर्यंत सक्तमजुरी सांगितलेली आहे. १९१३ सालीं या गुन्ह्याबद्दलच्या फोर्जरी ॲक्ट या कायद्यांत मागील यासंबंधींचे सर्व कायदे एकत्र करण्यांत आले. हिंदुस्थानांत पिनल कोडांत या गुन्ह्याबद्दलचीं कलमें आहेत (इंडियन पिनल कोड, कलमें ४६३ ते ४७१).

**खोटी साक्ष**—कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखाद्या न्यायकोर्टांत चौकशीचें काम चालू असतांना त्या विषयासंबंधीं शपथेवर जबानी देत असतांना जाणून बुजून खोटा मजकूर सांगणें. या गुन्ह्याला दंड, साधी कैद, किंवा सक्तमजुरीची कैद अशी शिक्षा आहे. अशी खोटी साक्ष देण्यास जो इसम उत्तेजन देतो, त्यालाहि वरीलप्रमाणें शिक्षा होते (इंडियन पिनल कोड, कलमें १८१।१०९ पाहा).

**खोंड**— किंवा कंध. मुख्यतः ओरिसा व मद्रास इलाख्यांत ही जात आहे. पूर्वी बरेचसे खोंड मध्यप्रांतांत दिसत असत. पण उडिया भाषा चालू असलेला संबळपूर जिल्हा, पाटणा व कलहंडी संस्थान मध्यप्रांतांतून ओरिसा हद्दींत गेल्यावर ओरिसामधील खोंडांची संख्या वाढली. १९४१ च्या खानेसुमारींत यांची संख्या ७,४४,९०४ भरली. यांच्या नरमेधाच्या चालीमुळें पुष्कळ संशोधकांचें यांकडे लक्ष वेधिलें आहे. हे स्वतः आपल्यास कुइ लोक किंवा कुइंजू म्हणवितात. यांची व्युत्पत्ति तेलगू को किंवा कु शब्दाशीं जोडतात. कु शब्द डोंगर शब्दाचा वाचक आहे. कोणी खांड (खड्ग) शब्दाशीं याचा संबंध जोडतात. तेथील राज्यकर्त्यांच्या दंतकथांवरून पूर्वी हे या प्रदेशांतील सत्ताधारी होते, असें दिसतें. परवांपर्यंत कलहंडीच्या राजांचा अभिषेक खोंडाच्या मांडीवर बसून होत असे. खोंड जातीच्या वृद्ध माणसाकडे राजास मांडीवर घेऊन राज्यारोहण करण्याचा अधिकार असे, व केसरीसिंह देव राजापर्यंत हा अधिकार चालू होता. खोंडांत दोन मुख्य वर्ग आहेत: (१) कुरिया खोंड, हे डोंगरांतले लोक आहेत व यांच्यांत पुष्कळ जुन्या चाली शिल्लक आहेत. (२) मैदानांत राहणाऱ्या खोंडांत पोटवर्ग आहेत.

शेतकी, शिकार व युद्ध यांखेरीज इतर धंद्यांची खोंड लोकांस आवड नाहीं. हे इतर रानटी लोकांप्रमाणें मद्याचे फार शोकी असून नेहमीं कफल्लक असतात. यांचीं शस्त्रें धनुष्यबाण, लांब पात्याची तरवार व कुऱ्हाड हीं असतात. यांच्यांत देव अनेक आहेत व त्यांना बळी लागतो.

**खोत**— सरकाराकरितां गांवचा वसूल जमा करून देणारा एक पिढीजाद कामदार. कोंकणांत खोतीचा हक्क वंशपरंपरा चालत आलेला आहे. त्यामुळें कांहीं खोत जमीनदार किंवा मालगुजार बनले आहेत व ते कुळांकडून लागेल तसा वसूल घेतात व खोतवेठीचे हक्क बजावतात, अशा तक्रारी ब्रिटिश सरकारकडे आल्या, तेव्हां सरकारनें १८८० त खोती सेटलमेंट कायदा करून खोतांचे सरकारशीं आणि कुळांशीं असणारे संबंध निश्चित व मर्यादित केले. १९१३ सालीं या कायद्यांत दुरुस्त्या झाल्या. त्यामुळें आतां खोतांचे हक्क फारसे राहिलेले नाहींत. पूर्वी कांहीं वरंडी गवत, पानपेंढा, शाकारणी माणूस, खळी, पाटी, सूप, शिंपली, हवसा, वाढवण, हातरी, तव्या, हातर, नागर जोत, कांहीं भाज्या लांकडें, मानसंबंधे नारळसुपारी, वावमाडें, अर्धेली तिर्धेली या प्रकारचे खोतवेठीचे हक्क असत.

**खोतान**—चीन, सिंकिॲंगच्या नैर्ऋत्येकडील एक शहर. हें खोतान नदीवर वसलेलें असून यार्कंदच्या आग्नेयीस १८० मैलांवर आहे. हा प्रदेश खनिज संपत्तीनें भरला असून, मर्गज (जेड) रत्नांचा खोतानला मोठा व्यापार आहे. प्राचीन संस्कृतीचे पुष्कळ अवशेष येथें सांपडतात. लो. सं. २६,०००.

**खोबरेल**—हें एक घट्ट वनस्पतिज तेल आहे. याचा उपयोग साबण, मेणबत्त्या, मार्गारीन नांवाचा लोण्यासारखा पदार्थ व पोमेटम नांवाचें केसांस लावावयाचें मलम, वगैरे करण्याच्या कामीं करण्यांत येतो. हें तेल खोबरें दाबून पिळून त्यापासून काढण्यांत येतें. तें पांढरें व दाट असतें. थंडीनें तें थिजून घट्ट होतें. याचा हिंदुस्थानांत केसांना लावण्याकरितां मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यांत येतो व त्यांत सुगंध घालूनहि निरनिराळीं सुवासिक तेलें बनविण्यांत येतात. याचा तुपासारखा खाण्याच्या कामींहि पुष्कळ उपयोग करण्यांत येतो. हें तेल मॅनीला, सिलोन व स्ट्रेट्स सेटलमेंट्स या देशांतून मोठ्या प्रमाणावर बाहेर रवाना होतें. तसेंच डचांच्या पूर्वेकडील बेटांतहि हें बरेंच होतें.

**खोम्माण**—चितोडच्या गुहिलोत राजघराण्यांत तीन खोम्माण राजे होऊन गेले. तिसरा खोम्माण हा महायकानंतर गादीवर बसला होता. प्राचीन शिलालेखांत खोम्माण याच्या पराक्रमाचीं वर्णनें आढळतात. आटपुरालेखांत आणखी दोन खोम्माणांचा उल्लेख येतो. यांतील कालभोजपुत्र खोम्माणानें फार पराक्रम केला. त्यानें इ. स. ८२५ च्या सुमारास अरबांशीं घनघोर संग्राम करून त्यांना हांकलून लाविलें. या कृत्यावर खोम्माणरासा नांवाचें एक काव्य प्रसिद्ध आहे. त्याच्या आधारानें टॉडनें या युद्धांत चितोडच्या बाजूनें कोणकोणत्या देशाचे राजे लढले त्याची यादी दिली आहे. असल्या प्रकारची सर्व रजपुतांची एकी पुढें पृथ्वीराजाच्या वेळीं झाली होती.

**खोरदादसाल**—हा एक पारशी सण असून फर्वरदिनच्या ६ व्या तिथीला ( १० सप्टेंबर ) येतो. या दिवशीं पारशी धर्माचा संस्थापक जो झरथुष्ट्र याचा जन्म झाला. म्हणजे झरथुष्ट्रजयंतीचा हा सण आहे.

**खोरेमाबाद**—हें इराणांत लुरिस्तान प्रांताचें राजधानीचें शहर आहे. हें शहर खोरेमाबाद नदीच्या उजव्या तीरावर आहे. लोकसंख्या सुमारें ६,००० आहे. शहर व नदी यांच्या दरम्यान एका अलग असलेल्या टेंकडीवर दिझ्इ-सिया नांवाचा एक पडका किल्ला आहे. किल्ल्याच्या पायथ्याशीं सुभेदाराचें निवासस्थान विस्तृत सभामंदिरें व बगीचे आहेत. नदीच्या डाव्या किनाऱ्यावर शहराच्या समोर जुन्या साम्हा शहराचे पडके भाग आहेत. येथें ६० फूट उंचीचा एक मनोरा, एका मशिदीचे भाग, पाण्याचा नळ, इतर इमारतींच्या भिंती व एक चौकोनी एकाच दगडाचा खांब आहे.

**खोलेश्वर**—यादवकालीन एक ब्राह्मणवीर. हा सिंघण यादवाचा सेनापति असून मुद्गलगोत्री ब्राह्मण होता. यानें गुजराथेवर पुष्कळदां स्वाऱ्या करून तेथील वाघेल राजसत्ताधाऱ्यांचा पराभव केला व बराचसा प्रांत सिंघणाच्या ताब्यांत आणला. याचा काल १२००-१२५० येतो. यानें सेंघकदेश ( हल्लींच्या पूर्व खानदेशच्या अजिंठ्याच्या डोंगरालगतचा भाग ) जिंकून तेथें आपली वस्ती केली होती. पू. खानदेशांतील शेंदुर्णी या गांवीं या खोलेश्वरानें एक महादेवाचें देऊळ बांधिलें आहे व या देवाचें नांवहि खोलेश्वर असून तेथें खोलेश्वराच्या नांवाचा एक शिलालेख आहे. याचीं मुलेंहि पराक्रमी निघालीं.

**खोहमेन**—कांबोजमधील जी 'ख्मेर' भाषा तिचेंच हें सयामी नांव आहे. या भाषेचा फ्रेंच लोकांनीं बराच अभ्यास केला आहे. ही भाषा मेकाँ अथवा कंबुचतची कांबोज नदी हिच्या तीरावर राहणारें याच नांवाचें एक राष्ट्र वापरतें. लेडेन याच्या काळीं या भाषेचा फारसा अभ्यास झाला नव्हता. ही भाषा थइ अथवा कोचीनचीनमधील भाषा ञुआन यांच्याहून भिन्न आहे. हें राष्ट्र प्राचीन काळीं फारसें सुसंस्कृत नव्हतें. याना पोर्तुगीज इतिहासकारांनीं 'ग्वो' असें उल्लेखिलें आहे. हे नरमांस भक्षक असून आपलीं शरीरें गोंदवीत असत असें सांगतात. डी बॅरॉस यानें कोमो व कांबोज अशीं या ठिकाणीं समुद्रकिनाऱ्यावर दोन राष्ट्रें होतीं, असा उल्लेख केला आहे.

**ख्याल**—गीतांचा एक प्रकार. तानसेनाच्या वंशांतले नियामतखां व नौबादखां ( टोपणनांवें सदारंग व अदारंग ) या १८ व्या शतकांतील तिसऱ्या महंमदशहा बादशहाच्या आश्रित गवयांनीं ध्रुवपद रागदारीच्या धर्तीवर हा प्रकार काढला. विलंबित व मध्य किंवा द्रुतलयीचे असे ख्यालाचे दोन प्रकार आहेत. हें ख्यालगायन लवकरच फार लोकप्रिय झालें व यांत बरेच गायक प्रसिद्धि पावले. ग्वाल्हेर संस्थानांत या गायकीचा मोठा उत्कर्ष झाला व दक्षिणी ब्राह्मणांतहि चांगले गवयी निघाले. कै. शंकररावजी पंडित यांचें नांव सर्व जण मोठ्या आदरानें घेतात व त्यांची परंपरा चालू आहे.

**ख्रिसिपस** ( ख्रि. पू. २८०-२०६ )—एक ग्रीक तत्त्ववेत्ता. स्टोइक पंथाचा हा एक संस्थापक असून त्यानें ७०० हून अधिक निरनिराळे ग्रंथ लिहिले, असें म्हणतात. ते बहुतेक ग्रंथ प्रश्नोत्तरपद्धतीनें लिहिलेले आहेत; पण त्या ग्रंथांचे कांहीं अधलेमधले भाग फक्त हल्लीं उपलब्ध आहेत.

**ख्रिस्त, येशू**—जीझस ख्राइस्ट. ख्रिस्ती धर्मसंस्थापक. याचा जन्म सुमारें ख्रि. पू. ६ या वर्षी बेथलेहेम या गांवीं झाला. याचें बालपण व तारुण्य नाझारेथ या गांवीं गेलें. यानें आपल्या सार्वजनिक आयुष्यास ख्रि. स. ३० या वर्षाच्या सुमारास सुरुवात केली. त्याचें जीवितकार्य सुमारें एक ते तीन वर्षेच काय तें झालें असें दिसतें. त्याच्या व्यक्तिमत्त्वामध्यें, स्वर्गामध्ये पित्याची सेवा एकत्व्यानेंच करण्याची अदम्य वृत्ति दिसून येते व त्याकरितां सर्वस्वाचा त्याग करण्याची त्याची तयारी दृष्टीस पडते. तसेंच मानवजातीसंबंधीं त्याच्या ठिकाणीं अत्यंत कोमलवृत्ति व प्रेम आणि तिच्या कल्याणाकरितां स्वतःचा आत्मयज्ञ करण्याची त्याची तयारी दिसते. त्यानें आपल्या सार्वजनिक जीवनामध्यें जनतेस उपदेश केला आणि आपणासभोंवतीं कांहीं शिष्यवर्ग निर्माण केला व त्यांपैकीं कांहींस त्यानें प्रेषित ( प्रवक्ते ) म्हणून आपल्या संप्रदायाचें कार्य चालविण्याकरितां निवडिलें. केवळ आचारनियमांचें पालन करण्याऐवजीं मनुष्याच्या अन्तर्वृत्तीचा पालट घडवून आणणें ही गोष्ट अधिक महत्त्वाची मानणें, राज्यकर्त्यांच्या धार्मिक वृत्तीच्या फारिसी लोकांच्या व साडुसी या भौतिकवादी लोकांच्या

ढोंगी वृत्तीवर हल्ला करणें, टीका करणें, व लोकांच्या राजकीय आकांक्षांस अनुसरून रोमविरुद्ध उचल करण्यास व आपला देश स्वतंत्र करण्याच्या कामीं त्यानें वरचेवर दिलेला नकार यांमुळें त्याला त्याच्या कार्यांत बाह्यतः अपयश आलें. यहुदी लोकांच्या वल्हांडणा(पास ओव्हर)च्या सणाच्या-प्रसंगीं त्याला रोमन गव्हर्नर पाँटिअस पायलेट याच्या स्वाधीन करण्यांत आलें. व त्यानें यहुदी लोकांच्या आग्रहा-मुळें येशू निर्दोषी असतांहि त्यास क्रूसावर चढविलें. रोमन गव्हर्नरला ही जीझसची फांशी इष्ट वाटली; कारण जीझस हा मोठा घातक राजकीय चळवळ्या आहे, अशी गव्हर्नराची समजूत झाली होती. जीझसला शुक्रवारीं त्याच्या आणखी दोन शिष्यांसमवेत फांशीं देण्यांत आलें, व त्याच्या अनुयायांनीं सरकारी परवानगीनें जीझसचा मृतदेह एका थडग्यांत पुरला. लगेच त्यानंतर रविवारीं त्या थडग्यांतून जीझसचें प्रेत नाहींसें झाल्याचें दिसून आलें. ज्यू लोकांनीं असा संशय घेतला कीं, जीझसच्या अनुयायांनींच तें प्रेत पळविलें; उलटपक्षीं हे अनुयायी म्हणूं लागले कीं, जीझस हा पुन्हां जिवंत झाला असून तो आपल्या अतिमानव स्वरूपांत कित्येक अनुयायांच्या दृष्टीस पडत असतो.

याप्रमाणें जीझसचें ऐतिहासिक जीवनचरित्र आहे. त्यानें स्वतः एकहि धर्मग्रंथ लिहिला नाहीं. जीझसचें जीवन स्वतः पाहिलेल्या व त्याचा धर्मोपदेश स्वतः ऐकलेल्या अशा त्याच्या तीव्र स्मरणशक्तीच्या कांहीं अनुयायांनीं जीझसच्या मरणोत्तर त्याच्या आयुष्यांतील हकीगती व त्याचा उपदेश चार 'गॉस्पेल्स' नामक पुस्तकांत लिहून काढला. या 'गॉस्पेल्स' मधील सर्व हकीगत ऐतिहासिक सत्याच्या कसोटीला टिकणारी नाहीं. तरी पण इतक्या बाबी सत्य मानतात कीं, (१) जीझस नांवाचा संतपुरुष होऊन गेला; (२) एका विशिष्ट धार्मिक कार्याकरितां पृथ्वीवर पाठवलेला परमेश्वराचा प्रेषित मी आहें, असा त्याचा दृढविश्वास होता; (३) तो स्वतःला ईश्वराचा पुत्र मानीत असे; (४) मृत्यूनंतर तो कांहीं अनुयायांना दृष्टीस पडत असे; आणि (५) जुन्या ज्यू धर्मापेक्षां जीझसचीं धर्मतत्त्वें निराळीं व उच्च स्वरूपाचीं आहेत.

ख्रिस्ताचा उपदेश—ख्रिस्ताच्या उपदेशामध्यें प्रामुख्यानें पुढील गोष्टी आढळतात :—

१. मनुष्याचें ध्येय एकच असतें व यावरून मूळ आधारभूत नियमहि एकच असतो. मनुष्यानें परमेश्वरावर पूर्ण अंतःकरण-पूर्वक प्रेम करावें. हें प्रेम अविभाज्य असावें. मनुष्य हा दोन स्वामींचा सेवक एकाच वेळीं असूं शकणार नाहीं (मत्तय २२·३७, मत्तय ६·२४).

२. मनुष्य जें प्रेम परमेश्वरावर करतो त्याचाच विस्तार त्यानें मानवजातीवर करावा. त्यामध्यें त्यानें शत्रूंचाहि अन्तर्भाव करावा. 'आपल्या शत्रूंवर प्रेम कर, जे तुझा द्वेष करतात त्यांचें भलें कर, जे तुझा छळ करतात व जे तुझा अपमान करतात त्यांच्याकरितां प्रार्थना कर, म्हणजे तुम्ही आपल्या स्वर्गीय पित्याचे खरे पुत्र शोभाल.' (मत्तय ५·४४).

३. परमेश्वरावर प्रेम करण्याच्या कामीं मोठी अडचण मनुष्य जगांतील वस्तूंवर विशेषतः संपत्तीवर प्रेम करतो ही असते. 'तूं आपल्याकरितां या पृथ्वीवर संपत्ति राखून ठेवूं नको. ती कृमी व गंज यांमुळें नाश पावेल. आपल्याकरितां स्वर्गामध्यें संपत्ति राखून ठेव. कारण जेथें तुझें संपत्तीचें भांडार असेल तेथेंच तुझें हृदय वास्तव्य करतें' (पर्व ६, १९·२१).

४. अहंकार आणि ढोंग हें धार्मिक जीवनांतील विष आहे. जेव्हां तूं प्रार्थना करीत असशील तेव्हां तूं देवळामध्यें किंवा रस्त्यामध्यें लोकांच्या नजरेंत मरावें या हेतूनें प्रार्थना करीत उभे राहणाऱ्या लोकांप्रमाणें उभा राहूं नको. जे वरपांगी प्रार्थना करतात त्यांस त्या प्रार्थनेचे फल मिळालेलेंच असतें या माझ्या वचनावर विश्वास ठेव' (मत्तय ६-५).

५. ख्रिस्ताचें स्वर्गीय पित्याशीं ऐक्य हें लोकोत्तर आहे. तो खरोखरच परमेश्वराचा पुत्र आहे.

६. त्याचा या जगांत येण्यामध्यें हेतु मानवजातीचें परमेश्वराशीं ऐक्य व्हावें हा आहे. माझ्या पित्यानें सर्व कांहीं माझ्या हातांत सोंपविलें आहे. पित्याइतका पुत्राला कोणी ओळखीत नाहीं आणि पुत्राइतका पित्याला कोणी जाणीत नाहीं. तसेंच पुत्राच्या मनांत ज्यांना त्याचें दर्शन द्यावयाचें असेल तेच त्यास जाणतील (मत्तय ११. २७). मी तो मार्ग आहें. मी सत्य आहें व मी जीवित आहे. माझ्या मध्यस्थी-शिवाय कोणीहि पित्याकडे येऊं शकणार नाहीं (यो. १४·६).

७. हें परमेश्वराशीं ऐक्य घडवून आणण्याकरितां केवळ उपदेश करणें पुरेसें नाहीं. आपलें जीवितं अर्पण केलें पाहिजे. 'मानवाच्या पुत्रानें स्वतःची सेवा करून घेण्याकरितां आगमन केलें नाहीं. त्यानें दुसऱ्याची सेवा करण्याकरितां आगमन केलें आणि अनेकांच्या जीविताच्या सुटकेकरितां आत्मार्पण केलें.' (मत्तय २०·२८).

८. तथापि पुनरुत्थानाशिवाय जगाची मुक्तता पूर्णपणें होऊं शकत नाहीं; कारण तेंच परमेश्वर व मानव यांच्या ऐक्याचें निदर्शक आहे. प्रथम तें मुख्यतः येशू ख्रिस्ताच्या बाबतींत दिसून येतें व नंतर जे त्याच्याशीं ऐक्य पावतात त्यांच्या बाबतींत नंतर त्याच्या मार्फत घडून येतें.

येशू खिस्तानें केलेले चमत्कार—निसर्गाच्या नियमांप्रमाणें ज्यांचें स्पष्टीकरण करतां येत नाहीं परंतु ज्यांमध्यें दैविक शक्ति व प्रज्ञा याचा साक्षात् प्रत्यय मिळतो अशा ऐतिहासिक घटना म्हणजेच चमत्कार होत. येशू खिस्ताचें चरित्र चमत्काराच्या वातावरणामध्यें पूर्णपणें आवृत झालेलें आहे. पवित्र आत्म्याच्या शक्तीमुळें त्याचा कुमारी मेरीच्या ठिकाणीं गर्भस्थापना होणें येथपासून तो त्याचें मृत देहापासून पुनरुत्थान होणें या सर्व घटना चमत्कारमय आहेत. या घटनाच त्याच्या देवत्वाबद्दल व त्यानें प्रस्थापित केलेल्या देवराज्याच्या आस्तित्वाबद्दल दृश्य पुरावा होत. त्यानें या जगांतील पातकांवर विजय मिळविला आहे व अखेरीस या जगांतील सर्व पातक, मृत्यु व दुःख यांचा अंत होणार आहे. यावरून चमत्कार म्हणजे केवळ निसर्गनियमांचा भंग नव्हे तर ते परमेश्वराच्या, मानवाकरितां केलेल्या उच्च योजनेचें प्रतीक रूप असून नैसर्गिक नियमाच्या कक्षेबाहेरचे आहेत. तसेंच चमत्कार हे केवळ कांहीं नैतिक तत्त्वें शिकविण्याकरितां रचलेल्या उपदेशपर कथा नव्हेत. त्या ऐतिहासिक घटना असून त्यांवरून या जगामध्यें परमेश्वराचें समर्थ राज्य प्रत्यक्ष सुरू झालें आहे याच्या द्योतक आहेत.

**खिस्ती धर्म**— हा धर्म जीझस ख्राइस्ट किंवा येशू खिस्त यानें स्थापिला. पापनिष्कृति केल्याखेरीज माणसाला मुक्ति नाहीं व परमेश्वरावर आणि त्याच्या वचनांवर श्रद्धा ठेविली पाहिजे, अशी शिकवण या धर्माची आहे. या धर्मात थोर नीतितत्त्वें जीं मुळांत सांगितलीं आहेत तीं निरनिराळ्या काळांत व निरनिराळ्या राष्ट्रांत कमजास्त बदलत गेलीं यांत शंका नाहीं. खिस्ताच्या मृत्यूनंतर लवकरच जेरुशलेम येथें खिस्तानुयायांचा एक संघ तयार झाला व दुसरा इ. स. ६५ च्या सुमारास सीरियामधील ॲन्टिओक येथें निघाला. या वेळेस प्रथम खिस्ताच्या अनुयायांना ख्रिश्चन असें नांव पडलें. खिस्ती धर्मप्रचारकांनीं रोमन साम्राज्य, पॅलेस्टाईन, सीरिया, आशिया मायनर, ग्रीस, भूमध्य समुद्रांतील बेटें, इटली व आफ्रिकेचा उत्तरकिनारा या भागांत इ. स. पहिल्या शतकांतच या धर्माचा प्रसार केला व पुढल्या दोन शतकांत रोमन साम्राज्यांतील व जवळच्या राष्ट्रांतील अर्धी प्रजा खिस्ती बनली व पुढें आजतागायत मिशनऱ्यांच्या उद्योगामुळें धर्मानुयायांची संख्या वाढतच आहे. पुन्हां या पंथांतून बरींच पाखंडें निघून अनेक शाखा–उपशाखा झाल्या. आठव्या शतकांत पूर्व आणि पश्चिम चर्चें वेगळीं झालीं. ल्यूथरसारखा सुधारक निघून प्रॉटेस्टंट ही मोठी फूट पडली. प्रेसबिटेरियन, प्यूरिटन, वेस्लेयन वगैरे आणखी पोटपंथ आहेतच. आज जगांत सुमारें ५६ कोटी खिस्ती लोक आहेत. म्हणजे जगांतील एक–तृतीयांश लोकसंख्या खिस्ती आहे.

खाल्डिअन खिस्ती—हे सेल्युशिया क्टेसिफॉन येथील पंथाचे अनुयायी असून यांस बाबिलोन संप्रदायी असेंहि म्हणण्यांत येतें. ते पूर्वेकडील सीरियन पंथाचे संस्कार पाळतात व या संस्कारांस खाल्डियन संस्कार असेंहि म्हणतात. हे आपल्या पंथाची स्थापना अडाई आणि मेरी व सेंट टॉमस या प्रेषितानें केली असें म्हणतात. सातव्या शतकाच्या सुमारास यांच्यामध्यें नेस्टोरियन पंथाचा प्रवेश झाला. जे पोपची सत्ता मान्य करतात त्यांस खाल्डिअन असें म्हणतात व त्यांचा बाबिलोन येथें स्वतंत्र पॅट्रिआर्क आहे. जे कॅथॉलिक सांप्रदायिक नाहींत त्यांस नेस्टोरियन असें म्हणतात.

इ. स. १५९९ पावेतों मलबारमधील सेंट थॉमस या प्रेषितानें स्थापन केलेल्या संप्रदायावर खाल्डियन संप्रदायांतील प्रिलेटची (धर्मोपदेशकाची) सत्ता चालत असे. मलबारमधील खिस्ती लोकांचे संस्कारहि खाल्डिअन पद्धतीचे असत. सन १५९९ नंतर मलबारमधील सेंट थॉमस पंथी खाल्डियन या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या खिस्ती लोकांस लॅटिन प्रिलेटच्या सत्तेखालीं देण्यांत आलें. त्यांच्या संस्कारांचेंहि स्वरूप हळूहळू पालटत जाऊन लॅटिन संस्कारांसारखेंच बनलें व व त्या संस्कारांस सिरोमलबार संस्कार असें नांव मिळालें. सन १६५३ मध्यें यांच्यापैकीं कांहीं लोक पुन्हां या पंथापासून वेगळे होऊन जॅकोबाइट पॅट्रिआर्कच्या सत्तेखालीं गेले व हळूहळू त्यांनीं ॲंटिऑक येथील पश्चिम सीरियन संस्कारांचा स्वीकार केला. बाकी राहिलेले सीरोमलबारी खिस्ती लॅटिन खाल्डियन संस्कारासच चिकटून राहिले. त्यांस परंपराप्राप्त कॅथॉलिक लोकांत स्थान मिळालें व त्यांचा प्रमुख अर्नाकुलम येथील ऑर्च बिशप हा मानण्यांत येऊं लागला.

ग्रीक खिस्ती—ग्रीक खिस्त्यांमध्यें कॅथॉलिक व इतर अनेक पंथांच्या खिस्ती लोकांचा समावेश होतो व त्यांच्या संस्कार करावयाच्या भाषाहि अनेक आहेत. त्यांचे संस्कार ग्रीक बायझंटाइन पद्धतीचे असून त्यांच्या स्थानिक भाषांमध्यें मूळ संस्कारांचीं भाषांतरें बहुधा झालेलीं आहेत.

बायझांटिअम अथवा कॉन्स्टॉंटिनोपल येथील संप्रदायावर प्रथम ॲंटिऑक या शहराची सत्ता असे. त्यांचे संस्कार ग्रीक भाषेमध्यें होत असत. हळूहळू कॉन्स्टॉन्टिनोपल येथील प्रिलेटची सत्ता वाढत गेली आणि त्यांनीं इतर सर्व ग्रीक भाषेंतील संस्कारांच्या जागीं आपले ग्रीक बायझंटाइन संस्कार सुरू केले. ग्रीक संप्रदाय हा रोमन संप्रदायापासून नवव्या ते अकराव्या शतकांत पृथक् झाला. परंतु त्यांपैकीं कांहीं वेळोवेळीं पुन्हां रोमन संप्रदायांत येऊन मिळाले. त्यामुळें अनेक भाषांमध्यें ग्रीक बायझंटाइन संस्कार करणारे ग्रीक पंथी अनेक निरनिराळे

कालवा. बुलंद शहर जिल्ह्यामध्यें नरौरा येथें हा गंगा नदीपासून घेतलेला आहे. ह्याच्या शाखा—( १ ) फत्तेगड, ( २ ) बिवर, ( ३ ) कानपूर अशा आहेत. ह्या कालव्यांत १८७८ मध्यें पाणी येण्यास सुरुवात झाली.

**गंगाजी नाईक अणजूरकर**—हा जातीनें पाठारे प्रभु असून साष्टीचा पाटील होता. वसईच्या संग्रामांत याचा पराक्रम दिसून आला. पेशव्यांना यानें साष्टींतील लोकांची मदत मिळवून दिल्याने पेशव्यांनीं मनोर येथें पोर्तुगीजांचा पराभव केला. याच्या अनेक यशस्वी कामगिरीबद्दल बाळाजी बाजीरावानें यास पालखी दिली.

**गंगाधर यशवंत ( उर्फ गंगोबातात्या ) चंद्रचूड** ( मृ. १७७४ )—पेशवाईंतील एक मुत्सद्दी व सरदार. हा गंगाधर यशवंत मूळचा निंबगांवचा. बाजीरावानें यास पेशव्यांतर्फे मल्हारराव होळकराच्या पदरीं फडणीस नेमलें असतां दोघांची मर्जी संभाळून यानें तें काम यशस्वी रीतीनें करून दाखविलें. सुरजमल जाटास यानें अबदालीवरील स्वारीचे समयीं दीड हजार फौजेनिशीं मदत केली. सन १७६४ मध्यें चौथाईची प्रकरणें मिटवण्याच्या कामीं व राक्षसभुवनाच्या लढाईनंतर झालेल्या तहाच्या प्रकरणीं यानें भाग घेतला होता. सन १७६६ त घोडपच्या स्वारीनंतर सखारामबापूच्या मसलतीनें हा राघोबादादास मिळाला असल्यानें यास याच्या बायकामुलांसह कैद करण्यांत आलें व नंतर तीस लक्ष रुपये दंड भरण्याची शिक्षा होऊन यास बंधमुक्त करण्यांत आलें. ता. १४-२-१७७४ रोजीं निंबगांवीं हा ज्वरानें मृत्यु पावला. निंबगांव ( जि. पुणें ) येथील याचा वाडा फार सुरेख व मोठा बांधलेला आहे; पण तो आतां विकला गेल्याचें समजतें.

**गंगाधरशास्त्री पटवर्धन** ( मृ. १८१५ )—गायकवाडांचा एक वकील. मूळचा हा मेणवलीचा असून वयाच्या ८ व्या वर्षी यानें पुण्यास पेशव्यांच्या वाड्यांत कारकुनाची नोकरी धरली. पटवर्धन हे हरिपंत फडक्यांचे उपाध्याय, तेव्हां गंगाधरशास्त्री हा पेशव्यांकडे कारकुनी करतो असें कळतांच फडक्यांनीं पटवर्धनांचें उपाध्येपण काढून घेतलें. यानंतर गंगाधरशास्त्री यानें वांईस कृष्णातीरीं जाऊन वयाच्या वीस वर्षेपर्यंत शास्त्राध्ययन केलें. नानाशीं याचें वांकडें आल्यानें हा सर्व कुटुंब घेऊन बडोद्यास गेला. तेथें गंगाधरशास्त्री हा रेसिडेंट वॉकर याच्या आग्रहाखातर गायकवाडांच्या दरबारीं इंग्रजांतर्फें म्हणून राहिला. सन १८१४ मध्यें पेशवे व गायकवाड यांच्यामधील देण्याघेण्याच्या वगैरे कामासाठीं यास पुण्यास पाठवण्यांत आलें. याच वेळीं बडोद्याचा दिवाण सीताराम रावजी यास याचा मत्सर वाटूं लागल्यानें त्यानें याच्याविरुद्ध बाजीरावाचे कान फुंकले. आणि ज्या कामासाठीं गंगाधरशास्त्री पुण्यास आला होता, तें काम तसेंच रेंगाळत पडलें. कांहीं दिवसांनीं बाजीरावाबरोबर हा पंढरपुरास गेला. तेथें देवदर्शनाहून हा परत येत असतां अचानक कोणीं मारेकऱ्यांनीं याजवर हल्ला करून याचे तुकडे तुकडे केले. या खुनामुळें बाजीराव आणि इंग्रज यांमध्यें अधिक वांकडें येऊन पेशवाई लवकर जाण्यास तें एक कारण घडलें. शास्त्री हा मोठा धूर्त व बुद्धिमान् असून यानें बाळाजीपंत नातूप्रमाणें साहेबी वळण उचललें होतें. याचे वंशज बडोद्यास व पुण्यास असतात.

**गंगाधरशास्त्री फडके**—आद्य मराठी व्याकरणकार. यानें १८२२ सालीं एक मराठी व्याकरण लिहिलें. गुजराथेंत एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या जागीं काम करीत असतांना यानें गुजराथी भाषेचींहि एक बाल व दुसरें प्रौढ, अशीं दोन व्याकरणें लिहिलीं.

**गंगाधरसरस्वती**—१५ व्या शतकाच्या अखेरीस होऊन गेलेले प्रख्यात साधु जे नृसिंहसरस्वती त्यांचा हा शिष्य. गुरुचरित्र ( पाहा ) म्हणून जो ओवीबद्ध ग्रंथ मराठींत प्रसिद्ध आहे तो यानेंच केलेला आहे. याचें आडनांव साखरे. गुरुचरित्राचीं दत्तोपासक मंडळी पारायणें करतात. वासुदेवानंदसरस्वती उर्फ टेंबे स्वामी यांनीं गुरुचरित्राचें संस्कृत भाषांतर केलें आहे.

**गंगाबाई पेशवे** ( मृ. १७७७ )—नारायणराव पेशव्याची स्त्री व सवाई माधवरावाची आई. ही साठ्यांच्या घराण्यांतील असून हिचें लग्न त्रिंबकराव मामानें सिंहगडास नारायणराव पेशव्यांबरोबर लावलें ( १७६३ ). नारायणरावाच्या वधानंतर ही गर्भार असल्याचें आढळून आल्यानें दादाच्या पक्षाकडून हिला ठार करण्याचे प्रयत्न सुरू झाले. तेव्हां हिला वांचविण्यासाठीं सखारामबापूनें हिला शनवारवाड्यांतून माहेरीं साठ्यांच्या घरीं पाठवण्याचें निमित्त करून पुरंदर किल्ल्यावर सुरक्षित स्थळीं नेऊन ठेवलें. ता. १८ एप्रिल १७७४ रोजीं गंगाबाई प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. तोच सवाई माधवराव. गंगाबाई ता. १२-७-१७७७ रोजीं मरण पावली.

**गंगाराम**—' महाराष्ट्र-पुराण ' कर्ता. बंगालमधील मैमनसिंग येथें राहणाऱ्या या बंगाली गृहस्थानें मराठ्यांच्या बंगालवरील स्वाऱ्यांचें वर्णन बंगाली भाषेंत ' महाराष्ट्र-पुराणां 'त केलें आहे. नागपूरकर भोसल्यांनीं बंगालवर केलेल्या मोहिमांचें तत्कालीन वर्णन विशेष उपलब्ध नाहीं. पण महाराष्ट्र-पुराणाच्या पहिल्या उपलब्ध असलेल्या अध्यायांत सन १७४३ मध्यें भास्करपंतानें बंगालवर केलेल्या स्वारीचें वर्णन असून त्याच्या खुनापर्यंतची हकीकत त्यांत आहे. गंगारामनें वर्णन केलेल्या

गोष्टी त्यानें बहुतेक स्वतः पाहिलेल्या असल्यानें त्यांस विशेष महत्त्व आलें आहे.

**गंगावन**—स्त्रियांचे केंस हें एक महत्त्वाचें शिरोभूषण आहे. शोभा आणण्यासाठीं त्यांत जे कृत्रिम केंस घालतात त्यांस गंगावन म्हणतात. हे केंस वनगाईंच्या शेपटीचे असतात. या गाई नेपाळांत आढळतात. तेथून त्यांच्या शेपट्यांचे कांदे इकडे येतात, व त्यांचे केंस काढून त्यांचीं तिपदरी गंगावनें विकावयास ठेवतात.

**गंगैकोन्डपुरम्**—मद्रास, त्रिचनापल्ली जिल्ह्याच्या उदययार पालेयम् तालुक्यांतील खेडें. जयम कोन्ड चोलपुरम्च्या पूर्वेस ६ मैलांवर हें आहे. इतिहासदृष्ट्या व प्राचीनवस्तुदृष्ट्या हें गांव फार महत्त्वाचें आहे. याच्या नांवाचा अर्थ 'गंगेच्या थडीवरील शहर' असा आहे. बाणासुराच्या भक्तीकरितां शंकरानें येथें गंगा आणली अशी कथा आहे. परंतु ह्या गांवाचें वास्तविक नांव 'गंगैकोन्डचोलपुरम्' हेंच असावें; कारण हें गांव चोलवंशीय राजेंद्रनृपानें स्थापिलें. शहराचा अवशेष अजूनहि दृष्टीस पडतो. येथें एक जुनाट पण मोठें देवालय आहे, तें राजेन्द्र चोलाचा पिता राजराज ह्यानें बांधिलें असें म्हणतात.

**गंगोत्री**—संयुक्तप्रांतांतील गढवाल संस्थानच्या टिहरी जिल्ह्यांतील एक पहाडावरील स्थान. हें हिंदूंचें प्रसिद्ध तीर्थस्थान आहे. उंची १०,३१९ फूट. भागीरथी नदीच्या सव्यतीरावर हें आहे. येथून जवळ असणाऱ्या गौरीकुंडांत केदारगंगा व भागीरथी यांचा संगम होतो. देवालयांत गंगा, यमुना व सरस्वती यांच्या मूर्ती असून एकीकडे भागीरथी व दुसरीकडे शंकराचार्य यांच्या मूर्ती आहेत. गंगोत्री क्षेत्र हें गंगेचें उगमस्थान मानितात; पण खरें उगमस्थान गोमुख असून तें येथून ८।१२ मैलांवर आहे. गढवालमधील गुरखा सेनापति अमरसिंग थप्पा यानें १८ व्या शतकांत हें मंदिर बांधलें. उन्हाळ्यांत यात्रेकरूंचे थवेच्या थवे दर्शनार्थ लोटतात. पवित्र गंगाजलानें गंगोत्री येथें भरलेलीं व बंद केलेलीं भांडीं येथून भाविक लोक घेऊन जातात. हिंवाळ्यांत मंदिर बर्फाच्छादित असतें व पुजारी लोक मखव्यास जातात.

**गज**—व्हायोलिनची काठी. सारंगी, फिड्ल, व्हायोलिन, वगैरे तंतुवाद्यें वाजविण्याकरितां उपयोगांत आणावयाचा गज. हा एखाद्या लवचिक लांकडाचा केलेला असून तो एका बाजूस निमुळता होत गेलेला असतो. व एका टोंकास ८० ते १०० घोड्याचे केंस बसविलेले असतात. दुसऱ्या टोंकास एक नक्षीदार लांकडाचा किंवा हस्तिदंताचा तुकडा बसविलेला असून त्यास एक स्क्रू असतो; त्याच्या साहाय्यानें ते केंस घट्ट किंवा सैल करतां येतात.

**गंज**—हवेनें आणि पावसानें धातूंच्या पदार्थांवर चढणारें कीट. लोखंडावर हा तांबूस रंगाचा असतो; व तो सारखा वाढत जातो. तांबें आणि जस्त ह्यांच्या बाबतींत मात्र हा गंज पुढें वाढत नाहीं. गंज चढूं नये म्हणून रंग देतात किंवा कथिल आणि जस्त ह्यांचा लेप (विशेषतः लोखंडी पत्र्यांना) देतात.

**गजकर्ण**—हा रोग, कातडी, केस, नखें, वगैरे ठिकाणीं होतो व याचें कारण त्वचेवर वाढणारी एक परोपजीवी सूक्ष्म वनस्पति होय. याचें विशेष स्वरूप डोक्यावरील खवड्यामध्यें दिसतें व हे लहान मुलांस पांच ते पंधरा या वयांत होतें. प्रथम याचा एक लहानसा ठिपका उठतो व पुढें वाढत जातो. यावर क्ष-किरणांचा उपचार उपयुक्त असतो. याचा दुसरा प्रकार म्हणजे शरीरांतील कोणत्याहि ठिकाणच्या त्वचेला बारीक फोड येणें व ते वाढत जाणें. या जागीं कंड फार सुटते. रोग-वनस्पति नाहींशी करण्यास जहाल अम्लें वापरतात. हा रोग संसर्गजन्य आहे.

**गजबाहु** (इ. स. २ रें शतक)—हा सिलोनचा एक राजा असून पहिला पांड्य राजा जो नेदुम-चेलियन त्याचा समकालीन होता. चेरराजा शेनगुत्तुनवन यानें बोलाविल्यावरून गजबाहु हा वनजी येथील पट्टिणीदेवीच्या स्थापनेच्या वेळीं हजर होता. याच्या कारकीर्दीतच शिलप्पदिकारम् हें तामीळ महाकाव्य निर्माण झालें, याच गजबाहूनें बहुधा तामीळ राज्या-(चोलांच्या) वर स्वारी केली असावी, कारण त्याच्या बापाच्या कारकीर्दीत चोल राजानें सीलोनवर स्वारी करून व तेथील बारा हजार लोकांना कैद करून कावेरी नांवाची राजधानी वसविण्याच्या कामीं त्यांना मजूर म्हणून नेण्यांत आलें होतें. गजबाहूनें चोलांवर चढाई करून हे कैदी सोडविले व त्याबरोबरच पट्टिणी देवीच्या पायांतील एक नूपुर व बुद्धाचें भिक्षापात्र आणि इतर संस्मरणीय वस्तू तिकडून पुनरपि सिलोनमध्यें आणल्या. याच्याबद्दल महावंश या बौद्ध ग्रंथांत पुष्कळ माहिती मिळते.

**गंजम**—ओरिसा, एक जिल्हा. बंगाल उपसागराच्या किनाऱ्यानें हा वसला आहे. क्षे. फ. ७,६८८ चौ. मै.. बहुतेक भाग डोंगराळ आहे. जिल्ह्यांतून पूर्वघाट गेलेला आहे. तळीं थोडीं आहेत. उत्तरेकडचें चिल्का सरोवर मोठें आहे. जिल्ह्यांतील तीन नद्यांपासून कालवे काढलेले आहेत. पावसाचें मान ४५ इंच आहे. लो. सं. १८,५५,२६४. जिल्ह्यांत ९ शहरें व ६,१४५ खेडीं आहेत. बहुतेक लोक हिंदु आहेत. उत्तरेस उडिया व दक्षिणेकडे तेलगू भाषा बोलतात. एजन्सी भागांत खोंड भाषा चालते. शें. ६६ लोक शेतकरी आहेत. तांदूळ व

कालवा. बुलंद शहर जिल्ह्यामध्यें नरौरा येथें हा गंगा नदीपासून घेतलेला आहे. ह्याच्या शाखा—( १ ) फत्तेगड, ( २ ) बिवर, ( ३ ) कानपूर अशा आहेत. ह्या कालव्यांत १८७८ मध्यें पाणी येण्यास सुरुवात झाली.

**गंगाजी नाईक अणजूरकर**—हा जातीनें पाठारे प्रभु असून साष्टीचा पाटील होता. वसईच्या संग्रामांत याचा पराक्रम दिसून आला. पेशव्यांना यानें साष्टींतील लोकांची मदत मिळवून दिल्यानें पेशव्यांनीं मनोर येथें पोर्तुगीजांचा पराभव केला. याच्या अनेक यशस्वी कामगिरीबद्दल बाळाजी बाजीरावानें यास पालखी दिली.

**गंगाधर यशवंत ( उर्फ गंगोबातात्या ) चंद्रचूड** ( मृ. १७७४ )—पेशवाईंतील एक मुत्सद्दी व सरदार. हा गंगाधर यशवंत मूळचा निंबगांवचा. बाजीरावानें यास पेशव्यांतर्फे मल्हारराव होळकराच्या पदरीं फडणीस नेमलें असतां दोघांची मर्जी संभाळून यानें तें काम यशस्वी रीतीनें करून दाखविलें. सुरजमल जाटास यानें अबदालीवरील स्वारीचे समयीं दीड हजार फौजेनिशीं मदत केली. सन १७६४ मध्यें चौथाईच्या प्रकरणें मिटवण्याच्या कामीं व राक्षसभुवनाच्या लढाईनंतर झालेल्या तहाच्या प्रकरणीं यानें भाग घेतला होता. सन १७६६ त धोडपच्या स्वारीनंतर सखारामबापूच्या मसलतीनें हा राघोबादादास मिळाला असल्यानें यास याच्या बायकामुलांसह कैद करण्यांत आलें व नंतर तीस लक्ष रुपये दंड भरण्याची शिक्षा होऊन यास बंधमुक्त करण्यांत आलें. ता. १४-२-१७७४ रोजीं निंबगांवीं हा ज्वरानें मृत्यु पावला. निंबगांव ( जि. पुणें ) येथील याचा वाडा फार सुरेख व मोठा बांधलेला आहे; पण तो आतां विकला गेल्याचें समजतें.

**गंगाधरशास्त्री पटवर्धन** ( मृ. १८१५ )—गायकवाडांचा एक वकील. मूळचा हा मेणवलीचा असून वयाच्या ८ व्या वर्षी यानें पुण्यास पेशव्यांच्या वाड्यांत कारकुनाची नोकरी धरली. पटवर्धन हे हरिपंत फडक्यांचे उपाध्याय, तेव्हां गंगाधरशास्त्री हा पेशव्यांकडे कारकुनी करतो असें कळतांच फडक्यांनीं पटवर्धनांचें उपाध्येपण काढून घेतलें, यानंतर गंगाधरशास्त्री यानें वांईस कृष्णातीरीं जाऊन वयाच्या वीस वर्षेपर्यंत शास्त्राध्ययन केलें. नानाशीं याचें वांकडें आल्यानें हा सर्व कुटुंब घेऊन बडोद्यास गेला. तेथें गंगाधरशास्त्री हा रेसिडेंट वॉकर याच्या आग्रहाखातर गायकवाडांच्या दरबारीं इंग्रजांतर्फे म्हणून राहिला. सन १८१४ मध्यें पेशवे व गायकवाड यांच्यामधील देण्याघेण्याच्या वगैरे कामासाठीं यास पुण्यास पाठवण्यांत आलें. याच वेळीं बडोद्याचा दिवाण सीताराम रावजी यास याचा मत्सर वाटूं लागल्यानें त्यानें याच्याविरुद्ध बाजीरावाचे कान फुंकले. आणि ज्या कामासाठीं गंगाधरशास्त्री पुण्यास आला होता, तें काम तसेंच रेंगाळत पडलें. कांहीं दिवसांनीं बाजीरावाबरोबर हा पंढरपुरास गेला. तेथें देवदर्शनाहून हा परत येत असतां अचानक कोणीं मारेकऱ्यांनीं याजवर हल्ला करून याचे तुकडे तुकडे केले. या खुनामुळें बाजीराव आणि इंग्रज यांमध्यें अधिक वांकडें येऊन पेशवाई लवकर जाण्यास तें एक कारण घडलें. शास्त्री हा मोठा धूर्त व बुद्धिमान् असून यानें बाळाजीपंत नातूप्रमाणें साहेबी वळण उचललें होतें. याचे वंशज बडोद्यास व पुण्यास असतात.

**गंगाधरशास्त्री फडके**—आद्य मराठी व्याकरणकार. यानें १८२२ साली एक मराठी व्याकरण लिहिलें. गुजराथेंत एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या जागीं काम करीत असतांना यानें गुजराथी भाषेचींहि एक बाल व दुसरें प्रौढ, अशीं दोन व्याकरणें लिहिलीं.

**गंगाधरसरस्वती**—१५ व्या शतकाच्या अखेरीस होऊन गेलेले प्रख्यात साधु जे नृसिंहसरस्वती त्यांचा हा शिष्य. गुरुचरित्र ( पाहा ) म्हणून जो ओवीबद्ध ग्रंथ मराठींत प्रसिद्ध आहे तो यानेंच केलेला आहे. याचें आडनांव साखरे. गुरुचरित्राचीं दत्तोपासक मंडळी पारायणें करतात. वासुदेवानंदसरस्वती उर्फ टेंबे स्वामी यांनीं गुरुचरित्राचें संस्कृत भाषांतर केलें आहे.

**गंगाबाई पेशवे** ( मृ. १७७७ )—नारायणराव पेशव्याची स्त्री व सवाई माधवरावाची आई. ही साठ्यांच्या घराण्यांतील असून हिचें लग्न त्रिंबकराव मामानें सिंहगडास नारायणराव पेशव्यांबरोबर लावलें ( १७५३ ). नारायणरावाच्या वधानंतर ही गर्भार असल्याचें आढळून आल्यानें दादाच्या पक्षाकडून हिला ठार करण्याचे प्रयत्न सुरू झाले. तेव्हां हिला वांचविण्यासाठीं सखारामबापूनें हिला शनवारवाड्यांतून माहेरीं साठ्यांच्या घरीं पाठवण्याचें निमित्त करून पुरंदर किल्ल्यावर सुरक्षित स्थळीं नेऊन ठेवलें. ता. १८ एप्रिल १७७४ रोजीं गंगाबाई प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. तोच सवाई माधवराव. गंगाबाई ता. १२-७-१७७७ रोजीं मरण पावली.

**गंगाराम**—' महाराष्ट्र-पुराण ' कर्ता. बंगालमधील मैमनसिंग येथें राहणाऱ्या या बंगाली गृहस्थानें मराठ्यांच्या बंगालवरील स्वाऱ्यांचें वर्णन बंगाली भाषेंत ' महाराष्ट्र-पुराणां 'त केलें आहे. नागपूरकर भोसल्यांनीं बंगालवर केलेल्या मोहिमांचें तत्कालीन वर्णन विशेष उपलब्ध नाहीं. पण महाराष्ट्र-पुराणाच्या पहिल्या उपलब्ध असलेल्या अध्यायांत सन १७४३ मध्यें भास्करपंतानें बंगालवर केलेल्या स्वारीचें वर्णन असून त्याच्या खुनापर्यंतची हकीकत त्यांत आहे. गंगारामनें वर्णन केलेल्या

गोष्टी त्यानें बहुतेक स्वतः पाहिलेल्या असल्यानें त्यांस विशेष महत्त्व आलें आहे.

**गंगावन**—स्त्रियांचे केंस हें एक महत्त्वाचें शिरोभूषण आहे. शोभा आणण्यासाठीं त्यांत जे कृत्रिम केंस घालतात त्यांस गंगावन म्हणतात. हे केंस वनगाईंच्या शेपटीचे असतात. या गाई नेपाळांत आढळतात. तेथून त्यांच्या शेपट्यांचे कांदे इकडे येतात, व त्यांचे केंस काढून त्यांचीं तिपदरी गंगावनें विकावयास ठेवतात.

**गंगैकोन्डपुरम्**—मद्रास, त्रिचनापल्ली जिल्ह्याच्या उदययार पालेयम् तालुक्यांतील खेडें. जयम कोन्ड चोलपुरम्च्या पूर्वेस ६ मैलांवर हें आहे. इतिहासदृष्ट्या व प्राचीनवस्तुदृष्ट्या हें गांव फार महत्त्वाचें आहे. याच्या नांवाचा अर्थ 'गंगेच्या थडीवरील शहर' असा आहे. बाणासुराच्या भक्तीकरितां शंकरानें येथें गंगा आणली अशी कथा आहे. परंतु ह्या गांवाचें वास्तविक नांव 'गंगैकोन्डचोलपुरम्' हेंच असावें; कारण हें गांव चोलवंशीय राजेंद्रनृपानें स्थापिलें. शहराचा अवशेष अजूनहि दृष्टीस पडतो. येथें एक जुनाट पण मोठें देवालय आहे, तें राजेन्द्र चोलाचा पिता राजराज ह्यानें बांधिलें असें म्हणतात.

**गंगोत्री**—संयुक्तप्रांतांतील गढवाल संस्थानच्या टिहरी जिल्ह्यांतील एक पहाडावरील स्थान. हें हिंदूंचें प्रसिद्ध तीर्थस्थान आहे. उंची १०,३१९ फूट. भागीरथी नदीच्या सव्यतीरावर हें आहे. येथून जवळ असणाऱ्या गौरीकुंडांत केदारगंगा व भागीरथी यांचा संगम होतो. देवालयांत गंगा, यमुना व सरस्वती यांच्या मूर्ती असून एकीकडे भागीरथी व दुसरीकडे शंकराचार्य यांच्या मूर्ती आहेत. गंगोत्री क्षेत्र हें गंगेचें उगमस्थान मानितात; पण खरें उगमस्थान गोमुख असून तें येथून ८।१२ मैलांवर आहे. गढवालमधील गुरखा सेनापति अमरसिंग थप्पा यानें १८ व्या शतकांत हें मंदिर बांधलें. उन्हाळ्यांत यात्रेकरूंचे थवेच्या थवे दर्शनार्थ लोटतात. पवित्र गंगाजलानें गंगोत्री येथें भरलेलीं व बंद केलेलीं भांडीं येथून भाविक लोक घेऊन जातात. हिंवाळ्यांत मंदिर बर्फाच्छादित असतें व पुजारी लोक मखव्यास जातात.

**गज**—व्हायोलिनची काठी. सारंगी, फिड्ल, व्हायोलिन, वगैरे तंतुवाद्यें वाजविण्याकरितां उपयोगांत आणावयाचा गज. हा एखाद्या लवचिक लांकडाचा केलेला असून तो एका बाजूस निमुळता होत गेलेला असतो. व एका टोंकास ८० ते १०० घोड्याचे केंस बसविलेले असतात. दुसऱ्या टोंकास एक नक्षीदार लांकडाचा किंवा हस्तिदंताचा तुकडा बसविलेला असून त्यास एक स्क्रू असतो; त्याच्या साहाय्यानें ते केंस घट्ट किंवा सैल करतां येतात.

**गंज**—हवेनें आणि पावसानें धातूंच्या पदार्थांवर चढणारें कीट. लोखंडावर हा तांबूस रंगाचा असतो; व तो सारखा वाढत जातो. तांबें आणि जस्त ह्यांच्या बाबतींत मात्र हा गंज पुढें वाढत नाहीं. गंज चढूं नये म्हणून रंग देतात किंवा कथिल आणि जस्त ह्यांचा लेप (विशेषतः लोखंडी पत्र्यांना) देतात.

**गजकर्ण**—हा रोग, कातडी, केस, नखें, वगैरे ठिकाणीं होतो व याचें कारण त्वचेवर वाढणारी एक परोपजीवी सूक्ष्म वनस्पति होय. याचें विशेष स्वरूप डोक्यावरील खवड्यामध्यें दिसतें व हे लहान मुलांस पांच ते पंधरा या वयांत होतें. प्रथम याचा एक लहानसा ठिपका उठतो व पुढें वाढत जातो. यावर क्ष-किरणांचा उपचार उपयुक्त असतो. याचा दुसरा प्रकार म्हणजे शरीरांतील कोणत्याहि ठिकाणच्या त्वचेला बारीक फोड येणें व ते वाढत जाणें. या जागीं कंड फार सुटते. रोगवनस्पति नाहींशी करण्यास जहाल अम्लें वापरतात. हा रोग संसर्गजन्य आहे.

**गजबाहु** (इ. स. २ रें शतक)—हा सिलोनचा एक राजा असून पहिल्या पांड्य राजा जो नेडूम-चेलियन त्याचा समकालीन होता. चेरराजा शेनगुत्तुनवन यानें बोलाविल्यावरून गजबाहु हा वनजी येथील पट्टिणीदेवीच्या स्थापनेच्या वेळीं हजर होता. याच्या कारकीर्दीतच शिलप्पदिकारम् हें तामीळ महाकाव्य निर्माण झालें, याच गजबाहूनें बहुधा तामीळ राज्या- (चोलांच्या) वर स्वारी केली असावी, कारण त्याच्या बापाच्या कारकीर्दींत चोल राजानें सीलोनवर स्वारी करून व तेथील बारा हजार लोकांना कैद करून कावेरी नांवाची राजधानी वसविण्याच्या कामीं त्यांना मजूर म्हणून नेण्यांत आलें होतें. गजबाहूनें चोलांवर चढाई करून हे कैदी सोडविले व त्याबरोबरच पट्टिणी देवीच्या पायांतील एक नूपुर व बुद्धाचें भिक्षापात्र आणि इतर संस्मरणीय वस्तू तिकडून पुनरपि सिलोनमध्यें आणल्या. याच्याबद्दल महावंश या बौद्ध ग्रंथांत पुष्कळ माहिती मिळते.

**गंजम**—ओरिसा, एक जिल्हा. बंगाल उपसागराच्या किनाऱ्यानें हा वसला आहे. क्षे. फ. ७,६८८ चौ. मै.. बहुतेक भाग डोंगराळ आहे. जिल्ह्यांतून पूर्वघाट गेलेला आहे. तळीं थोडीं आहेत. उत्तरेकडचें चिल्का सरोवर मोठें आहे. जिल्ह्यांतील तीन नद्यांपासून कालवे काढलेले आहेत. पावसाचें मान ४५ इंच आहे. लो. सं. १८,५५,२६४. जिल्ह्यांत ९ शहरें व ६,१४५ खेडीं आहेत. बहुतेक लोक हिंदू आहेत. उत्तरेस उडिया व दक्षिणेकडे तेलगू भाषा बोलतात. एजन्सी भागांत खोंड भाषा चालते. शें. ६६ लोक शेतकरी आहेत. तांदूळ व

रागी हीं मुख्य धान्यें होत. शेतीखेरीज दुसरा धंदा म्हणजे विणकामाचा.

पूर्वी हा जिल्हा कलिंग राज्याचा एक भाग असे. अशोकानें हा जिंकून घेतला ( खि. पू. २६० ). नंतर आंध्र राजे, गंग राज, चालुक्य व चोल राजे आले. १५ व्या शतकांत गणपति घराणें मुसलमानी अमल होईपर्यंत होतें. कुतुबशाहीकडून दख्खनच्या सुभेदाराकडे हा मुलूख आला व शेवटीं १७६६ मध्यें उत्तर सरकार प्रांत इंग्रजांच्या राज्यांत सामील झाला. ओरिसा प्रांत पडल्यानंतर मद्रास प्रांतांतून त्यांत हा सामील करण्यांत आला.

गंजम किंवा छत्रपूर शहर ऋषिकुल्या नदीवर आहे. १८१५ पर्यंत हें जिल्ह्याचें ठिकाण होतें. पूर्वी हें बंदर होतें, पण होरल्याकारणानें १८८७ पासून बंद पडलें. येथून तांदूळ बाहेर फार जातो.

**गजराबाई बांडे**—थो. शाहूछत्रपतीची मुलगी. ही रघूजी बांड्याच्या मल्हारराव नांवाच्या मुलास दिली होती. हिला शाहूनें खानदेशांत कांहीं गांवें इनाम दिलीं होतीं.

**गंजीफा**—एक बैठा खेळ. याचे अनेक प्रकार आहेत. आपल्याकडे बहुधा दशावतारी गंजीफाच खेळतात. बाबरनाम्यांत गंजीफांचा उल्लेख आहे. कानूने-इस्लाम, ऐने-अकबरी, गिरिधरकृत 'गंजिफालेखन' हा संस्कृत ग्रंथ, श्रीतत्त्वनिधि, इ. जुन्या पुस्तकांतून या खेळाचें वर्णन आहे. पण तें एकमेकांशीं जमत नाहीं. कांहीं डावांत आठ गटांत विभागलेले ९६ पत्ते असतात. चंग, बरात, किमाश समशेर, इ. हे आठ गट आहेत. तत्त्वनिधींत १३ प्रकार दिले आहेत. गंजिफाला 'छद' असें म्हटलें आहे. त्यांतील नवग्रह छद म्हणजे नऊ ग्रहांच्या राशींच्या गंजीफा होत. यांचें वर्णन ना. गो. चापेकरकृत 'पेशवाईच्या सांवलींत' यांत सांपडेल. गंजिफांत चंगकांचनी हा आठ रंगांचा एक प्रकार आहे.

**गजेंद्रगड**—मुंबई, धारवाड जिल्हा. हें बदामीच्या पश्चिमेस २९ मैलांवर एक खेडें आहे. हें पूर्वी मुधोळच्या घोरपड्यांकडे होतें. येथें शिवाजीनें बांधलेला एक किल्ला आहे. येथील उंचगिरि नांवाचा दुसरा किल्ला १६८८ त दौलतराव घोरपड्यानें बांधला. लो. सं. ११,१४५. येथें हातमागांवर विणकाम चालतें.

येथील घोरपड्यांना हिंदुराव ही पदवी आहे. बहिरजी घोरपड्यानें शिवाजी महाराजांच्या कारकीर्दींत गजेंद्रगड व गुत्ती मिळविली. संताजी हा प्रख्यात सेनापति या बहिरजीचा भाऊ होय. संताजीला पुढें कापशी गांव इनाम मिळाल्यानें त्याच्या वंशजास कापशीकर नांव पडलें व बहिरजी हा गजेंद्रगडास राहिल्यानें त्याच्या वंशजास गजेंद्रगडकर म्हणूं लागले.

**गजेंद्रगडकर, राघवेन्द्राचार्य वेंकटाचार्य** (१७९२-१८५२)—एक विद्वान् व संस्कृत पंडित. धारवाड जिल्ह्यांतील गजेंद्रगड या किल्ल्यावर यांचा जन्म झाला. वडील लहानपणींच वारल्यामुळें यांचें प्राथमिक शिक्षण यांचे चुलते व्यासाचार्य यांच्याकडे सांगलीजवळील हरिपूर गांवीं झालें. यानंतर उच्च शिक्षणासाठीं म्हणून हे कांहीं दिवस पंढरपुरास धर्मसिंधुकार काशिनाथोपाध्याय यांचे बंधु विठ्ठलोपाध्याय यांच्याकडे राहिले व तेथून पुढें पुण्यास नीलकंठशास्त्री थत्ते यांच्याकडे गेले. नीलकंठशास्त्री यांच्या सहवासांत अमूल्य असा संस्कृत ज्ञानभांडाराचा संचय करून हे गजेंद्रगडास परत येण्यास निघाले असतां साताऱ्याच्या छत्रपतींनीं यांच्या विद्वत्तेचा गौरव करून यांना आपल्याकडे आश्रय दिला. यानंतर सतत वीस वर्षें साताऱ्यास यांनीं अध्यापन-कार्य केलें. या वेळीं सुमारें दोनशें विद्यार्थी यांच्याकडे शिकत असत. साताऱ्यास वीस वर्षें राहिल्यावर प्रधान न्यायाधीश म्हणून कांहीं दिवस हे ग्वाल्हेरला होते. येथें असतांना यांचा कनिष्ठ पुत्र वामनाचार्य हा काशीस महामारीनें मरण पावल्याची बातमी यांना कळली व त्याबरोबर ग्वाल्हेरची न्यायाधिशाची जागा सोडून हे ब्रह्मावर्तास जाऊन राहिले.

( १ ) विषमी, ( २ ) चंद्रिका, ( ३ ) प्रभा, ( ४ ) त्रिपथगा, ( ५ ) श्वेताश्वतर टीका, वगैरे व्याकरण-ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**गज्जर, त्रिभुवनदास कल्याणदास** (१८६३-१९२०)—एक हिंदी रसायनशास्त्रज्ञ. सुरत येथील एका सुतार कुटुंबांत यांचा जन्म झाला. मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांतून पहिल्या वर्गांत बी. एस्सी. उत्तीर्ण होऊन यांनीं एम्. ए. ची पदवीहि मिळवली. यानंतर कराचीच्या सिंध कॉलेजमध्यें कांहीं दिवस हे प्राध्यापक होते. प्रथमपासूनच विज्ञान व रसायन यांसंबंधीं लोकहितार्थ कांहीं तरी कार्य करावें अशी इच्छा यांच्या मनांत होती आणि म्हणून रासायनिक व्यवसायाच्या दृष्टीनें हे बडोद्यास गेले व बडोदा कॉलेजमध्यें रसायनशास्त्राच्या प्राध्यापकाची जागा यांनीं स्वीकारली. बडोद्यास यांनीं रंगकामाच्या व्यवसायासंबंधीं अहवाल तयार करून त्याच्या अमलबजावणीसाठीं छापकामाची व रंगकामाची प्रयोगशाळा काढली. यास अनुसरूनच सन १८९० मध्यें बडोदा सरकारनें 'कलाभवना'ची स्थापना करून त्या संस्थेचें काम यांच्यावर सोंपवलें. सन १८९६ पर्यंत 'कलाभवनाच्या' उन्नतीप्रीत्यर्थ यांनीं आपले परिश्रम खर्ची घातले. यानंतर या खात्यांतून आपली बदली दुसरीकडे होत आहे असें दिसतांच यांनीं 'कलाभवन' सोडलें व मुंबईच्या विल्सन कॉलेजमध्यें रसायनशास्त्राचे प्राध्यापक म्हणून राहिले. विद्यापीठाकडून रसायनशास्त्राच्या अभ्यासक्रमांत

सुधारणा करण्याची चळवळ यांनीं हातीं घेतली व रसायनशास्त्रांत हुशार असलेल्या विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणासाठीं पाठविण्याची व्यवस्था यांनीं केली. मुंबईत प्लेग सुरू झाला असतां प्लेगवर यांनीं 'ओपोडिन टरक्लोराइड' नांवाचें औषध शोधून काढलें.

हिंदुस्थानांत नवे नवे शास्त्रज्ञ निर्माण व्हावेत या हेतूनें सन १८९९ मध्यें मुंबईस 'टेक्नोकेमिकल लॅबोरेटरी' नांवाची प्रयोगशाळा यांनीं स्थापन केली.

खऱ्या मोत्याचें कमी होणारें तेज त्यास प्राप्त करून देण्याची रासायनिक क्रिया शोधून काढून यांनीं लाखों रुपये कमावले. ही सर्व कमाई यांनीं रसायनशास्त्राच्या प्रचाराकरितां खर्च केली. यांच्या शोधामुळें जगांतील सुविख्यात रसायनशास्त्रज्ञांत यांची गणना होऊं लागली.

सन १९०२ मध्यें बडोदा येथें स्थापन झालेली 'अलेंबिक केमिकल वर्क्स' ही औषधि रसायननिर्मिति करणारी संस्था यांच्याच अविश्रान्त श्रमांचें फळ होय. याच वर्षी यांनीं वैज्ञानिक संशोधन, त्याचा व्यवहारांत उपयोग करणारे कारखाने व त्यांत काम करणारे लोक यांनीं युक्त अशी 'कल्याणग्राम' नांवाची वसाहत–योजना आंखली. परंतु यांच्या बदलत्या आर्थिक परिस्थितीमुळें तिला मूर्त स्वरूप आलें नाहीं. शेवटीं आर्थिक अडचणच यांच्या शेवटास कारण झाली.

**गझनवी वंश** (९७६–११८६)— बलखच्या सामान राजघराण्यांतून अलप्तगीन नांवाचा गुलाम उदयास आला व त्यानें गझनीस स्वतंत्र राज्य स्थापिलें. त्याचा जांवई सबक्तगीन हाच गझनीच्या यामिनी वंशाचा मूळ पुरुष मानला जातो. सबक्तगिनानें काबूल–खुरासान प्रांत मिळवून राज्यविस्तार केला. महमूद गझनी यानें हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून आशियांत दरारा बसविला. त्यानंतर पहिला महमूद यानें राज्यरक्षण केलें, पण पुढें गादीबद्दल तंटे सारखे उत्पन्न होत जाऊन राज्य दुर्बल झालें. खुस्रव मलिकचे कारकीर्दींत तर हा वंश नामशेष झाला. या वंशांत एकंदर १७ राजे झाले व २०० वर्षे राज्य टिकलें.

**गझनी**–अफगाणिस्तानांतील गझनी जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें समुद्रसपाटीपासून ७,२७९ फूट उंचीवर वसलें आहे. गझनी हें गझनी राजघराण्याची राजधानी होय. महमद गझनवीनें हिंदुस्थानावर बऱ्याच स्वाऱ्या केल्या. त्यानें समरकंद इस्पाहानापासून लाहोरपर्यंत राज्याचा विस्तार केला, पण त्याच्या मागून या शहरास उतरती कळा लागली. महमदाच्या वेळीं गझनी येथें भव्य इमारती होत्या व तें एक विद्येचें मुख्य पीठ होतें. ११५३ मध्यें अल्लाउद्दीन घोरीनें त्याचा विध्वंस केला. यामुळें गझनीला मूळचें स्वातंत्र्य व महत्त्व केव्हांहि प्राप्त झालें नाहीं व तें काबूलच्या कायमचें अंकित बनलें.

महमद गझनी याची कबर

पहिल्या अफगाण युद्धामध्यें (१८३९) इंग्रजांनीं गझनी सर केलें व १८४१ पर्यंत तें तसेंच होतें. १८४१ मध्यें येथील इंग्रज सैन्यास अफगाणांना शरण जावें लागलें. गझनी हें आतां लष्करीदृष्ट्या मुळींच महत्त्वाचें नाहीं. येथें फक्त १,००० घरें आहेत. जुनाट तट, वगैरे किल्ल्याचा पडीत भाग आहे. येथें वस्ती अफगाण हझारा व हिंदू व्यापारी यांची आहे. येथें हिंवाळ्यांत बर्फ फार पडतें. मुख्य व्यापार धान्य, फळें, लोंकर, वगैरेंचा आहे. तीन मैलांवर जुन्या शहराचे कांहीं अवशेष व दोन १०० फूट उंचीचे मनोरे आहेत.

**गटापर्चा**—मलायांतील कांहीं विशिष्ट झाडापासून निघणारा चीक. हा बोर्निओ, मलाक्का व इतर पूर्वेकडील बेटांतून येतो. शुद्ध स्वरूपांत याचा रंग पिंगट तांबडा असतो. हा पाण्यांत विरघळत नाहीं. तसेंच ईथरमध्येंहि मोठ्या मुष्किलीनें विरघळतो; परंतु टर्पेंटाइन व नाफ्था यांमध्यें तावडतोब

विरघळतो. हा रबरापेक्षां जास्त टिकाऊ आहे. याचा उपयोग चामड्याच्या ऐवजीं करण्यांत येतो. तारायंत्राच्या समुद्रांतल्या तारांस हा विद्युद्रोधक म्हणून बाहेरून लावण्यांत येतो. तसेंच रोगणांत व सीमेंटमध्येंहि हा वापरतात. तसेंच पाण्याच्या लवचिक नळ्या व बाटल्या करण्याकरितांहि याचा उपयोग करतात.

**गटारपाण्याची शुद्धि**—गांवांतील गटारांतून वाहणारें पाणी शुद्ध करण्याची अगदीं साधी पद्धति म्हटली म्हणजे त्याचा प्रमाणशीर असा प्रवाह एखाद्या मोठ्या मोकळ्या जागेवर सोडून देणें ही होय. ह्या ठिकाणीं नैसर्गिकरीत्याच तें पाणी शुद्ध होतें. परंतु असें करणें सर्वच ठिकाणीं शक्य नसतें, व याकरितां जागाहि विस्तृत लागते. परंतु कृत्रिम रीतीनें थोड्या जागेंत हें शुद्धीकरणाचें कार्य करतां येतें. नवीन पद्धतीमध्यें बहुतेक असें सर्व गटारांतील पाणी एखाद्या तळ्यांत प्रथम सोडून देण्यांत येतें, व तेथून तें विशिष्ट तऱ्हेनें बांधलेल्या व जीवशास्त्रावर आधारलेल्या झिरप्यांतून झिरपून बाहेर सोडण्यांत येतें. रासायनिक आणि कृत्रिम झिरप्यांच्या पद्धतीमध्यें प्रथम हें पाणी एका मोठ्या टाक्यांत सोडण्यांत येतें. तेथें त्यांतील सर्व गाळ व घनपदार्थ खालीं बसतात. तसेंच हें पाणी या टाक्यांत जात असतांना मध्यें बसविलेल्या जाळीशीं त्या पाण्यांत तरंगणारे पदार्थ अडकून राहतात. या मोठ्या टाक्यांतून हें पाणी पुन्हां पाटांतून मोठाल्या टाक्यांत सोडण्यांत येतें व तें जात असतांना त्यांत कांहीं रासायनिक पदार्थ (चुन्याचें पाणी, लोहगंधाकित) मिसळण्यांत येतात. यामुळें या टाक्यांत त्यांतील सर्व गाळ तळाशीं बसून राहतो. या टाक्यांतून हें पाणी निरनिराळ्या मार्गानें वर झिरप्यांतून जाऊं देण्यांत येतें, व अखेरीस तें कोठें तरी एखाद्या प्रवाहांत सोडून देण्यांत येतें. जंतुरहित टाकी व कृत्रिम झिरप्यांच्या पद्धतीमध्यें हें सर्व पाणी एका विशिष्ट रीतीनें बांधलेल्या टाक्यांत प्रथम सोडण्यांत येतें. तेथें त्यांतील सर्व सेंद्रिय घन पदार्थ द्रवरूप होतात. जंतुरहित टाकी आणि संलग्न थरांच्या पद्धतीमध्यें हें पाणी झिरप्यांतून जाऊं देण्याच्या ऐवजीं संलग्न थरावर पसरण्यांत येतें, व तेथें तें सुमारें दोन तास ठेवण्यांत येऊन त्यांत कांहीं पदार्थ मिसळण्यांत येतात. दुसऱ्या एका पद्धतींत एका टाक्यामध्यें हे पाणी सोडून त्यांतील खनिज व घन पदार्थ गाळून वेगळे करण्यांत येतात. या टाक्यांतून बाहेर पडल्यावर तें पाणी पुष्कळ दूर अंतरावर पाटांतून नेण्यांत येतें, व तें या पाटांत वाहत असतां त्यांत बसविलेल्या वल्हीं वगैरे साधनांनीं सारखें घुसळण्यांत येतें, किंवा दाबलेल्या हवेनें ढवळण्यांत येतें. या पाटांतून हें पाणी खोल अशा टाक्यांत नेऊन सोडण्यांत येतें.

**गटेनबर्ग, जोहान** (१३९८-१४६८)— मुद्रणकलेचा आद्यजनक. हा जर्मन होता. यानें १४४८ मध्यें मेंझ येथें जोहन फुस्ट याच्या भागीदारीनें एक छापखाना काढला, व त्यांत मॅझेरिन बायबल, दि लेटर्स ऑफ इन्डलजन्स, आणि अगेन्स्ट दि टर्क्स हें लिखाण छापलें. १४५० मध्यें गटेनबर्गनें फुस्टजवळून कांहीं रक्कम घेऊन छापखाना गहाण ठेवला. पुन्हां १४५२ मध्यें आणखी रक्कम घेतली; पण त्यास छापखाना सोडवून घेतां न आल्यामुळें तो छापखाना फुस्ट याच्या मालकीचा झाला. तेव्हां १४५४ नंतर गटेनबर्गनें अमुक एक पुस्तक छापलें, असें निश्चित सांगतां येत नाहीं.

**गडकरी, राम गणेश** (१८८५-१९१९)— मराठी वाङ्मयांतील एक प्रतिभावान् नाटककार, कवि व विनोदी लेखक. यांचा जन्म गुजरातेंत झाला. वयाच्या एकोणिसाव्या वर्षी प्रवेश परीक्षा उत्तीर्ण होऊन यांनीं कॉलेजमध्यें प्रवेश केला. परंतु कॉलेजच्या पहिल्याच वर्षांत अपयश आल्यानें यांनीं किर्लोस्कर नाटकमंडळींत लहान मुलांची शिकवणी पत्करली.

काव्य, स्फुट लेख व नाटकें असे यांच्या वाङ्मयाचे तीन भाग पडतात. यांच्या अत्युत्तम कविता सन १९११-१६ या पांच वर्षांत लिहिल्या गेल्या. 'वाग्वैजयंती' या पुस्तकांत यांच्या सर्व कवितांचा संग्रह करण्यांत आलेला आहे. 'गोविंदाग्रज' या नांवानें हे आपलें काव्य लिहीत. केशवसुत या आधुनिक कवींचे हे आपणांस शिष्य म्हणवीत.

'बाळकराम' या नांवानें हे आपलें गद्य-लेखन करीत. 'संपूर्ण बाळकराम' हा यांच्या विनोदी लेखांचा संग्रह असून याखेरीज मूकनायक, सकाळचा अभ्यास, दीडपानी नाटक यांसारखीं प्रहसनेंहि यांनीं लिहिलीं आहेत. कल्पकता, व्यंगोक्ति व कोटिबाजपणा यांमुळें यांचें विनोदी लिखाण चुरचुरीत व मनोरंजक झालेलें आहे.

'प्रेमसंन्यास', 'पुण्यप्रभाव', 'एकच प्याला', 'भावबंधन', 'राजसंन्यास' (अपूर्ण) व 'वेड्यांचा बाजार' (अपूर्ण) या त्यांच्या नाटकांनीं सर्वांचें लक्ष वेधून घेतलें. सरस प्रेमगीतें, कोटिबाजपणा, रहस्यपूर्ण कथानकांची निवड, करुण व हास्य यांचा परमोत्कर्ष साधणारे व हृदयास जाऊन भिडणारे नाट्यप्रसंग व अलंकारिक भाषा यांमुळें यांचीं नाटकें लहानापासून थोरापर्यंत सर्वांना प्रिय झालीं आहेत.

**गंडकी**— १. मोठी— उत्तर हिंदुस्थानांतील एक नदी. नेपाळच्या मध्यभागीं असलेल्या पहाडाच्या खोऱ्यांत हिचा उगम होतो. हिच्या वेगवेगळ्या उगमांस सप्त गंडकी हें नांव आहे. या नदीस नेपाळांत शाळिग्रामी ही संज्ञा असून संयुक्त प्रांतांत हीस नारायणी म्हणतात. महाभारतांत उल्लेखिलेली

सदानीरा ती हीच असें लासेन म्हणतो. त्रिवेणी मुक्कामीं ही ब्रिटिश सरहद्द ओलांडते. बंगालच्या चंपारण्य जिल्ह्याच्या व संयुक्त प्रांताच्या गोरखपूर जिल्ह्याच्या सरहद्दीवरून वाहते; तदनंतर ही पाटण्यास गंगेस जाऊन मिळते. ही नदी १९२ मैल लांब असून १२ महिने नावा नेण्याजोगी असते. इमारती लांकूड, धान्य, साखर, वगैरे माल जलमार्गानें या नदींतून पाठविला जातो. या नदीपासून त्रिवेणी व सारण हे दोन कालवे काढले आहेत. कांठावरील महत्त्वाचीं गांवें हाजीपूर व शोणपूर हीं आहेत.

२. लहान— नेपाळच्या पहाडांतून उगम पावणारी एक लहान नदी. ही गोरखपूर जिल्ह्यांतून वाहत जाऊन बंगालच्या सारणा जिल्ह्यामध्यें घोग्रेस जाऊन मिळते.

**गडगडी-वावटळ**— ( इं. टोर्न्यांडो ). सर्व वादळामध्यें हें वादळ फार भयंकर असतें. ढगांपासून जमिनीपर्यंत उंच अशी नसराळ्याच्या आकाराची ही वावटळ फार मोठी गर्जना करीत व तासीं ४० मैलांच्या वेगानें पुढें धांवत असते. हिचा व्यास सरासरीनें १,००० फूट असतो. पाण्यावरून जातांना ही पाणी ओढून घेते ( जलस्तंभ पहा ). अशा वावटळी फक्त अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांत, मिसोरी-मिसिसिपी नद्यांच्या खोऱ्यांत बहुधा उन्हाळ्यांत उठतात.

**गंडमाळा**—या रोगाच्या गांठी आंवळा किंवा बोर या आकाराच्या असून सावकाश पिकतात. एकामागून एक माळेप्रमाणें गांठी उठतात. म्हणून गंडमाळा हें नांव आहे. हा रोग शरीरांतील लसिका ग्रंथींत होणारा क्षयाचा विकार असून पूर्वीं यास राजरोग म्हणत असत. हा क्षयापेक्षां कमी तीव्र स्वरूपाचा असून त्याचा उद्भव सामान्यतः लहान वयांत होत नाहीं. लहानपणीं शरीर क्षीण होण्यासारखे रोग झाले असतां त्यांच्यामागून मान, छाती किंवा जठर यांच्या ग्रंथींत क्षय उत्पन्न होण्याचा संभव असतो. हा रोग बहुधा एकाच प्रकारच्या ग्रंथींत उत्पन्न होतो. आणि त्या म्हणजे मानेच्या ग्रंथी होत. जेव्हां जठर ग्रंथींस हा रोग होतो तेव्हां त्यास 'टेबिस मेसेंटेरिका' असें म्हणतात. हा विकार झाला असतां तो क्षयावर जाणार नाहीं याबद्दल फार काळजी घेणें अवश्य असतें.

**गंडरादित्य चोल** (सन ९६५)— राजादित्याचा हा धाकटा भाऊ त्याच्या पश्चात् गादीवर आला. भावाचा कारभार हा जरी पुष्कळ वर्षें पाहत असला, तरी यानें एक वर्षच राज्य केलें. यानें 'गांधारादित्यचतुर्वेदीमंगलम्' नांवाचें शहर (हल्लींचें त्रिचनापल्ली प्रांतांतील कंडरादित्यम् शहर) वसवलें. हा श्रद्धावान् असून यास राजकेसरीवर्मन् अशी पदवी होती. "तिरू विशैप्या" नांवाचें एक काव्यहि यानें लिहिलें. मान्यखेटच्या तिसऱ्या कृष्ण राष्ट्रकूटानें याचे कांहीं प्रांत व कांची शहर काबीज करून तंजावरला वेढा दिला. परंतु यानें त्यास माघार घ्यावयास लावली.

**गडवाल**—हा बदकाच्या जातींतला पक्षी गोड्या पाण्यांतील असून उत्तर अमेरिकेंत केन्टकीच्या वरच्या भागांत आढळतो. याचा रंग काळा व पांढरा असून त्यांत पिंगटपणाहि भरलेला असतो. याची फार शिकार करतात. बदक पहा.

**गडवाल संस्थान**—अथवा केशवनगर. हैद्राबाद संस्थानांतील रायचूर जिल्ह्याच्या पूर्वेकडील एक संस्थान किंवा मांडलिक जमीनदारी. हींत गडवाल हा एकच गांव व ११८ खेडीं आहेत. क्षेत्रफळ ८१३ चौ. मैल. लो. सं. सुमारें दीड लाख. एकंदर उत्पन्न चार लाख. निझामास खंडणीदाखल ८६,८४० रु. द्यावे लागतात. हैद्राबाद संस्थान अस्तित्वांत येण्याच्या पूर्वीपासून गडवाल संस्थान आहे. उत्तर व दक्षिण भागांतून अनुक्रमें कृष्णा व तुंगभद्रा या नद्या असल्यामुळें येथील प्रदेश फार सुपीक आहे. येथें रेशमी साड्या, पागोटीं, उपरणीं व धोत्रें वगैरे तयार होतात.

गांव—गडवाल संस्थानचें मुख्य ठिकाण. हें रायचूर गांवाच्या पूर्वेस ३५ मैलांवर आहे. लो. सं. सुमारें १५,००० येथील किल्ल्यांत सध्यांचा राजा राहतो. हा किल्ला १७०३-१७१० च्या दरम्यान राजा सोमतादरीनें बांधिला.

**गडहिंग्लज**— मुंबई, कोल्हापूर संस्थानच्या गडहिंग्लज तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें हिरण्यकेशी नदीच्या डाव्या तीरावर असून संकेश्वर-पारोळी खिंडीच्या रस्त्यापासून अगदीं नजीक आहे. लो. सं. सुमारें आठ हजार. अंदाजें तीनशें वर्षांपूर्वी पाण्याच्या दुर्भिक्षतेमुळें लोकांस येथून गांव हालवावा लागला होता असें म्हणतात. गांवाच्या मध्यभागीं कलेश्वराचें देवालय

आहे. गांवाच्या उत्तरेस तीन मैलांवर बहिरी देवालय आहे. तेथें दरवर्षी मार्च महिन्यांत मोठी यात्रा भरते.

**गंडा**—कोष्टी मजूर जात. हिची वस्ती बिहार-ओरिसा व मध्यप्रांत यांतून आहे. एकंदर लो. सं. (१९११) ३,६४,८२६. ही एक कोष्ट्यांची अत्यंत हलकी जात असून या लोकांचा 'पाण' जातीशीं संबंध असावा असें दिसतें. परंतु वस्तुस्थिति उलट आहे. कापड विणण्याच्या धंद्याशिवाय गांव-रखवाली व ढोलकी, वाजंत्री. वगैरे वाद्यें वाजविण्याचें कामहि ते करतात. ओरिसा, लारिया, कंधारिया व कबारिया असे त्यांचे चार पोटभेद आहेत. यांपैकीं पहिल्या तीन विभागांचीं नांवें केवळ त्या त्या देशांवरून पडलीं आहेत. गंडा लोक परजातीच्या मनुष्यास स्वजातींत घेतात, परंतु चांभार, घासी, हरि, मनगन व मेहतर या जातींचा प्रवेश होऊं देत नाहींत.

हे लोक पूर्वीं मुलें चोरून नेत व कधीं कधीं तर स्वतःचीं मुलें सुद्धां बळी देण्याकरितां विकीत. छोटानागपूरच्या रानटी भागांत मजूर मिळणें कठिण म्हणून येथें स्वतःस विकून घेणें किंवा दुसरीं माणसें विकत घेणें ही चाल होती.

यांच्यांत इतर असंस्कृत जातींप्रमाणें झाडें, पशू व पक्षी यांच्या नांवांवरून कुलांचीं नांवें पडलीं आहेत.

हे दुल्हा देवाची पूजा करतात. त्याला बकरीं बळी देतात. दसऱ्यास आपल्या वाद्यांची व हातमागांची पूजा करतात. तुळशी व वडाची पूजा हे लोक स्वतः अस्पृश्य असल्यामुळें करीत नाहींत.

**गॅडो चित्रकार घराणें**—१. गॅडो (१२६०-१३१०)—हा इटालींतील फ्लॉरेन्स शहराचा चित्रकार व मोझेइक काम म्हणजे जमिनींत किंवा भिंतींत संगमरवरी दगडांचे किंवा कांचेचे तुकडे बसवून जडावाचे काम करणारा होता. फ्लॉरेन्स येथील कॅथेड्रलमधलें आणि रोम येथील एस्. मारिआ मॅगिऑर-मधील जडावाचें काम गॅडोनें केलेलें आहे असें मानतात.

२. टाड्डेवो (१३००-१३६६)—हा वरील चित्रकाराचा मुलगा चित्रकार, जडावाचें काम करणारा व शिल्पकारहि होता. गिओटो या सुप्रसिद्ध चित्रकारापासून शिक्षण घेऊन व २४ वर्षें त्याचा मदतनीस म्हणून काम करून तो आपल्या गुरूच्या शिष्यपरंपरेंतला महान् थोर चित्रकार झाला.

३. अग्नोलो (१३३३-१३९६)—हा टाड्डेवोचा मुलगा. त्याच्याच परंपरेंतील चित्रकार झाला. त्याला व्हेनेशियन चित्रपद्धतीचा संस्थापक असें मानतात.

**गढमुक्तेश्वर**—संयुक्त प्रांत, मीरत जिल्हा. हापुर तालुक्यांतलें एक शहर. प्राचीन हस्तिनापूरचा हा एक भाग होता असें म्हणतात. पण हस्तिनापूर म्हणून जो भाग दाखविण्यांत येतो तो तेथून २५ मैल दूर आहे. येथें एक जुना किल्ला आहे. गांवांत ८० च्यावर सतीचे दगड दाखविण्यांत येतात. मुक्तेश्वर महादेवाचें एक मंदिर आहे. मंदिराजवळच एक पापविमोचनी कुंड आहे. कार्तिकी पौर्णिमेस येथें फार मोठी यात्रा (सुमारें वीस लाख) भरते व सहा, बारा व चाळीस वर्षांनीं येणाऱ्या यात्रेला भयंकर गर्दी होते. पूर्वीं येथें उमदे घोडे फार येत असत. आतां त्यांची संख्या कमी होऊन खेंचरें फार येतात. येथें १८२३ मध्यें गियासुद्दीन बलबननें बांधलेली एक मशीद आहे. दून आणि गढवाल येथून नदीनें नांवांतून येणाऱ्या इमारती लांकडाचा व बांबूचा बराच मोठा व्यापार येथें चालतो.

**गढवाल**—संयुक्त प्रांतांत कुमाऊन विभागामध्यें हा जिल्हा आहे. याचें क्षे. फ. ५,६२९ चौ. मै. आहे. लो. सं. ६,०२,११५. धवलगंगा, विष्णुगंगा, अलकनंदा व मंदाकिनी या मुख्य नद्या आहेत. हिमालयाची मध्यशाखा व दोन मोठाले फांटे मिळून कामेंत (२५,४१३), त्रिशूळ (२३,३८२,) बद्रीनाथ (२३,२१०), दुनगिरि (२३,१८१), आणि केदारनाथ (२२,८५३) हीं मुख्य शिखरें आहेत.

हवामानामध्यें स्थल व काल यांच्या मानानें फारच फरक पडतो. नद्यांजवळच्या दऱ्याखोऱ्यांतून उन्हाळ्यांत अत्यंत कडक उन्हाळा व हिंवाळ्यांत अत्यंत थंडी असते. पावसाचें मान बरेंच असून तें उंच डोंगर ज्या भागांत आहेत तेथें १०० इंचां-पर्यंत जातें. उन्हाळ्यांत १८,००० फुटांपर्यंत बर्फ पडतें.

गढवालच्या राजांचा इ. स. १५८१ च्या सुमारास प्रथमच अलमोराच्या चंदराजाशीं कलह झाला. शहाजहाननें १६५४ त या राज्यांतील डेहराडून प्रांत घेतला. पुढें नजीबखानानें तेथें आपला अमल बसवला. पुढें गुरख्यांचा त्रास सुरू झाला व १८०४-१८१५ पर्यंत तेथें गुरख्यांचा अमल होता. स. १८१५ मध्यें इंग्रज आले व तो प्रांत एका कमिशनरच्या हाताखालीं दिला. या जिल्ह्यांत अनेक देवळें व क्षेत्रें आहेत. बद्रीनाथ, केदारनाथ, पांडुकेश्वर व जोशीमठ हीं ह्यांत मुख्य होत. येथें नेपाळच्या राजाचें विजयचिन्ह म्हणून एक १० फूट उंचीचा त्रिशूळ आहे व ताम्रपट, वगैरे ऐतिहासिक महत्त्वाच्या बऱ्याच वस्तू येथें मंदिरांतून ठेवलेल्या आहेत.

आयात माल मीठ, लोंकर, मेव्या, तट्टे व टांकणखार हा असून, धान्य व कपडा बाहेर जातात. सर्व व्यापार भूटिया लोकांच्या हातांत असून फक्त त्यांनाच हद्दीवरून जाण्या-येण्या-ची परवानगी आहे.

पावरी हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. हें साधारण खेडेंच आहे. लंड्सडौन, श्रीनगर, कोटद्वार येथें लष्करी छावण्या आहेत. शेती हाच मुख्य धंदा असून शें. ८९ लोकांचा

निर्वाह शेतीवर होतो. हिंदी सैन्यांतील दोन तुकड्या सर्वस्वी गढवाली लोकांच्या आहेत.

**गढेमंडळ**—एक जुन्या काळचें संस्थान. ह्या संस्थानापैकीं रेवा ( नर्मदा ) दक्षिण तीराचे सोळा महाल नानासाहेब पेशवे यानें नागपूरकर रघूजी भोसल्यास सरंजामासाठीं दिले होते. रघूजी हा पेशव्याच्या मर्जीप्रमाणें त्या वेळीं वागत होता. म्हणून वरील महालांशिवाय चौरागड हा महालहि त्याला दिला होता. या एकंदर महालांचा वसूल चार लक्षांचा होता. हा प्रांत पूर्वी गढामंडला नांवाच्या संस्थानांत मोडत असे. हें संस्थान पुढें पेशव्यांनीं ( सागरवाले बुंदेल्याकडून ) काबीज केलें होतें.

**गणदेवी**—बडोदें संस्थानांतील नवसरी भागांतील गणदेवी तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या सु. आठ हजार. येथें हायस्कूल, दवाखाना, वगैरे आहे. गांवांतील व्यापार बहुतेक जैनांकडे असून बाहेरगांवचा व्यापार पारशांमार्फत चालतो. सर्व तऱ्हेचीं धान्यें, गळिताचीं धान्यें, गूळ व तूप हे व्यापाराचे मुख्य पदार्थ आहेत. हातमागावरील कापड व थोडी साखर येथें तयार होते.

**गणपत कृष्णाजी** ( मृ. १८६० )—आद्य महाराष्ट्रीय छापखानदार. हे भंडारी जातीचे होते. प्रारंभीं एका मिशनरी छापखान्यांत दोन रुपये दरमहावर टाइप घासण्याच्या कामावर ते नोकर होते. अमेरिकन मिशनरींनीं स. १८१३ त छापखाना घालून खिस्तीधर्म-प्रकरणीं मराठी भाषेंत शिळा छापावर पुस्तकें छापण्याचा कारखाना सुरू केला. हीं त्यांचीं पुस्तकें पाहून गणपत कृष्णाजी यांच्या मनांत ( १८२५-३० ) आलें कीं, आपणहि असाच कारखाना काढून हिंदुधर्मप्रकरणीं व दुसरीं पुस्तकें छापावीं. परंतु छापावयाचीं साधनें त्यांच्यापाशीं कांहीं नव्हतीं व तीं त्या वेळीं मुंबईत उपलब्ध नसत. मग त्यांनीं अमेरिकन मिशनरींची कृति पाहून स्वतः प्रेस तयार करण्याचे उद्योग मांडले. प्रथम त्यांनीं लांकडी यंत्र आपल्या हातानें तयार केलें, आणि लहान शिळांचे तुकडे जमवून त्यांवर अक्षरें कशीं उठतात ही कृति पाहिली. नंतर त्यांनीं तर्कानें २१४ प्रकारची शाई करून पाहिली. मग त्यांनीं एक लोखंडी प्रेस करवून मोठ्या शिळा विकत घेऊन लहान लहान ग्रंथ छापण्याचें काम सुरू केलें. इ. स. १८३१ त यांनीं त्या वर्षाचें मराठी पंचांग छापलें. रा. ब. दादोबा पांडुरंग तर्खडकर यांच्या मराठी व्याकरणाची पहिली आवृत्ति इ. स. १८३६ त गणपत कृष्णाजीच्या शिळाछापखान्यांत छापली. या वेळचीं इतर शालोपयोगी बरींच पुस्तकें इ. स. १८४० पर्यंत याच छापखान्यांत निघत असत.

इ. स. १८४३ मध्यें त्यांनीं टाइप करण्याचा उद्योग सुरू केला. मोठ्या प्रयत्नानें अक्षरांचे सांचे तयार करून ते ओतविण्याचा कारखाना घातला आणि सर्व प्रकारचीं अक्षरें तयार करून टाइपांचा छापखाना चालू केला. ह्याप्रमाणें त्यांनीं दोनहि छापखान्यांत कित्येक गुजराती व मराठी ग्रंथ छापले.

**गणपति**—शिवाचे सेवक जे गण, त्यांचा आधिपति असा या देवता नामाचा अर्थ आहे. हा शंकरास पार्वतीपासून झालेला पुत्र होय. पार्वतीच्या मळापासून हा निर्माण झाला अशी एक दंतकथा आहे. गणेश ही विद्येची देवता व संकटांचें निवारण करणारी देवता म्हणून प्रसिद्ध आहे. एखाद्या महत्कार्याच्या आरंभीं ' श्रीगणेशाय नमः ' म्हणून गणेशाची स्तुति व आराधना करण्याचा प्रघात आहे; त्याचप्रमाणें अध्ययनारंभीं गणेशाचा नामोच्चार करतात. व्यास यांनीं सांगितलेलें महाभारत गणपतीनें लिहिलें अशी समजूत आहे. अंगानें स्थूल, किंचित् पिवळट रंगाचा, मोठ्या पोटाचा, चार हात असलेला व एकच दन्तयुक्त असें हत्तीचें डोकें असलेला असें गणेशाचें रूप पुराणांतरीं वर्णिलें आहे. दक्षिण हिंदुस्थानांत गणपतीचीं असंख्य देवळें आढळतात.

गजानन, गजवदन, करीमुख, हेरंब, लंबोदर, द्विदेह, विघ्नेश इत्यादि नांवांनींहि गणपतीस संबोधतात. गणपतीचें स्वरूप चतुर्भुज म्हणून महाराष्ट्रांत एकसारखें प्रचलित नाहीं. शिवराम दशभुज गणपतीचें नमन करतो.

ही देवता वेदकालापूर्वीची दिसते. ' गणानां त्वां गणपतिं ' हा वैदिक मंत्र ( ऋ. १, २३, १ ) गणपतीला उद्देशून नाहीं. तरी मैत्रायणी संहितेंत ( २·९·१ ) स्पष्टपणें हस्तिमुख, एकदन्त या स्वरूपाचा उल्लेख केला आहे. रामायण व इतर कांहीं प्राक्कालीन पुराणें यांतून गणपतीचा नामनिर्देश नाहीं. याज्ञवल्क्यांत ( १· २७०, २८९, २९३ ) उल्लेख आला आहे. तेथें मनुष्यांना झपाटणारा व त्यांच्या कार्यांत विघ्नें आणणारा राक्षस असें त्याचें वर्णन केलें आहे. याला गणांचा ईश किंवा अधिपति म्हणतात. वास्तविक हा मान नंदीकडे जातो. पण विनायक म्हणून एक राक्षसवर्ग होता व याचा प्रतिनिधि ही नवीन गणेश देवता असेल. बौद्धांनीं या हिंदु देवतेला प्रतिस्पर्धी अशी दुसरी देवता ( महाकाल ) निर्माण केली तरी गजवदन देवता बौद्धांमध्यें आहे. चीन, जपान या ठिकाणीं दोन गणपती एकमेकांना आलिंगन देत आहेत अशा मूर्ती आहेत. जावादि बेटांतहि गणपतीच्या मूर्ती आढळतात. या देवतेइतकी सर्वमान्य देवता हिंदूंमध्यें दुसरी नाहीं.

**गणपति काकतीय** ( ११९९-१२६० )—पहिल्या प्रतापरुद्र काकतीयानंतर चायमांबिकेचा हा मुलगा गादीवर आला.

छलमत्तीगंड अशी यास पदवी होती. सेनापति जयाच्या बहिणी नरसा व परमा यांच्याशीं यानें विवाह केले. कांहीं अटीवर जैतुगी यादवानें यास आंध्राचा राजा केलें होतें. राजराज चोल, कलिंग, सेऊण, कर्नाटक, वेलनाडु, लाट येथील राजांशीं याच्या लढाया झाल्या. सन १२३५ मध्यें देवगिरीच्या यादवांबरोबरहि याची लढाई झाली असावी. समुद्रावरील व्यापारास कर माफ करून यानें उत्तेजन दिलें. शैवांना देणग्या दिल्या, देवळें बांधलीं. एकंदरींत याची कारकीर्द भरभराटीची गेली.

**गणसंख्या**—( इं. कोरम ). या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, कोणत्याहि सभेंत सभासदांची अमुक एक ठराविक संख्या हजर असल्याशिवाय हजर असलेल्या सभासदांना त्या सभेचें काम कायदेशीररीत्या करतां येत नाहीं. इंग्लंडांत लॉर्डांच्या सभेंत गणसंख्या भरण्याला ३० सभासद आणि कॉमन्स सभेमध्यें ४० सभासद हजर असावे लागतात. प्रत्येक घटनाबद्ध संस्थेच्या नियमांत गणसंख्या ठरवून दिलेली असते. तेवढी गणसंख्या सभेच्या सुरुवातीस नसेल तर सभा बरखास्त किंवा तहकूब करतात. गणसंख्येच्या अभावीं तहकूब ठेवलेल्या सभेस गणसंख्या लागत नाहीं. पण पूर्वीच्या कार्यक्रमाखेरीज नवीन काम सभेंत घेतां येत नाहीं.

**गणसत्ताक राज्य**—राज्याचा अधिपति जेव्हां लोकांनीं निवडून दिलेला असतो तेव्हां तें राज्य गणसत्ताक म्हणतां येईल. वैदिक काळीं अशी शासनपद्धति होती. महाभारतकाळीं कांहीं भागांत व पुढेंहि कोठें कोठें ती असल्याचें पुराणवस्तुसंशोधनाच्याद्वारें आढळून येतें. इ. स. चौथ्या शतकांत पंजाब, पूर्व राजपुताना आणि माळवा या प्रदेशांत गणसत्ताक शासनपद्धति होती यांत संशय नाहीं.

खि. पू. चौथ्या ते सहाव्या शतकांत भरतखंडांत वैराज्यें अस्तित्वांत होतीं. यांत महत्त्वाचीं म्हणजे शाक्य, विदेह व लिच्छवी राष्ट्रें होत. वज्जिराष्ट्र आठ जातींच्या लोकांचें होतें. प्रत्येक जात एक नायक निवडून देई. त्या नायकांचें राजमंडळ तयार होई. तेव्हां प्राचीन हिंदुस्थानांत राजसत्ताक व प्रजासत्ताक अशा दोन प्रकारच्या शासनपद्धती होत्या.

**गणसत्ताक समाजपद्धति**— गिल्ड सोशॅलिझम् किंवा सिन्डीकॅलिझम् या पद्धतीचा ब्रिटनमध्यें जो प्रकार चालू आहे त्याला हें नांव आहे. ही चळवळ १९०६ सालीं पेन्टी व हॉबसन या पुढाऱ्यांनीं सुरू केली. कामगारसंघ (ट्रेड युनियन्स) यांनाच श्रेणी ( गिल्ड ) संस्थांचें स्वरूप द्यावयाचें आणि जे उद्योगधंदे राष्ट्राच्या मालकीचे करण्यांत येतील ते या श्रेणींं( गिल्ड )नींच चालवावयाचे. राष्ट्रीय समाजवादाला ( स्टेट सोशॅलिझमला ) प्रतिस्पर्धी अशी ही पद्धति आहे. १९१५ सालीं नॅशनल गिल्ड्स लीग ही संस्था स्थापन करण्यांत आली आणि बऱ्याच कामगारसंघांनीं या लीगशीं संबंध जोडला. १९२० सालीं नॅशनल गिल्ड कौन्सिल नेमण्यांत आलें आणि ही पद्धत यशस्वी होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. सर्व देशांत घरें बांधण्याकरितां एक गृहश्रेणी ( बिल्डिंग गिल्ड ) संस्था स्थापन झाली. परंतु लवकरच ही संस्था बंद पडली आणि त्यामुळें ही सर्व चळवळ अयशस्वी होऊन नॅशनल गिल्डस्‌लीग ही संस्था १९२५ सालीं बंद करण्यांत आली. त्यानंतर गिल्ड्स सोशॅलिझम् या पद्धतीचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न कोणींहि केला नाहीं. परंतु ब्रिटिश सोशॅलिस्ट पक्षावर गिल्ड सोशॅलिझम या विचारप्रणालीचा कायमचा परिणाम झालेला आहे. आणि ट्रेड युनिअन्सच्या नियंत्रणाखालीं सर्व उद्योगधंदे चालवावे हाच राष्ट्रीयीकरणाचा उत्तम मार्ग होय, हें मत ब्रिटनमध्यें सर्वमान्य होऊं लागलें आहे.

**गणितशास्त्र**—संख्या आणि परिमाण यांशीं संबद्ध असलेलें ज्ञानाचें एक अंग. याचे शुद्ध आणि नियोज्य ( अप्लाइड ) किंवा व्यवहार असे दोन प्रकार आहेत. पहिल्यांत अंकगणित, बीजगणित, भूमिति व संख्या सिद्धान्त व दुसऱ्यांत यंत्रशास्त्र, भूपदार्थविज्ञान आणि खपदार्थविज्ञान, भूमापन इ. येतात.

हें शास्त्र फार प्राचीन काळापासून हिंदुस्थान, ईजिप्त, बाबिलोनिया व फोनीशिया या राष्ट्रांत सुपरिचित होतें. भरतखंडांत वेदकालांतहि यज्ञसंस्थेच्या अनुषंगानें या शास्त्रांत प्रगति झालेली दिसते. पुढें ज्योतिषशास्त्राच्या आधारानें गणिती ज्ञान वाढलें. ईजिप्तमध्यें खि. पू. ३,००० या कालांतहि बीजगणितांतील सिद्धान्त लोकांना अवगत होते असें पुराव्यानें सांगतां येतें. ग्रीक लोकांनी हें शास्त्र बरेंच पुढें नेलें यांत शंका नाहीं. पायथॅगोरस, प्लेटो, यूक्लिड, आर्किमेडीज यांसारख्यांचीं नांवें अद्यापि तोंडांत आहेत. आपले आर्यभट्ट आणि ब्रह्मगुप्त यांनीं संख्यालेखनांत जी प्रगति केली ती आजच्या गणितपद्धतीचा मोठा पायाच म्हणतां येईल. अरबांनीं भारतीयांकडून हें ज्ञान मिळविलें हें आतां निर्विवाद ठरलें आहे. सोळाव्या शतकांत मात्र युरोपांत इटली आणि फ्रान्स या देशांत या शास्त्राची मध्यंतरीं खुंटलेली वाढ चालू झाली. डेकार्टे, कप्लर व पास्कल यांनीं बीजगणित आणि भूमिति यांत तड गांठली. लिबनित्झ आणि न्यूटन यांनीं कलनशास्त्र विवेचिलें व इतर शास्त्रांना आधार मिळवून दिले. अर्वाचीन काळांत शुद्ध गणितशास्त्रांत भर पडत नसली तरी नियोज्यशास्त्रांत कितीतरी प्रकार निघत आहेत.

**गणित श्रेणी**—सारख्या अंतरानें वाढणाऱ्या अथवा कमी होणाऱ्या संख्येची माला. जसें १, २, ३, ४, ५, ६, ७, ८,

९, १० अथवा उलट्या क्रमानें १०, ९, ८, ७, ६, ५, ४, ३, २, १. ह्या दहा पदांची बेरजेची दुप्पट = ११ × १०.

बे. = १ + २ + ३ + ४ + ५ ........ + १०

बे. = १० + ९ + ८ + ७ + ६ ........ + १

बे. = ५५. आपण वापरतों ते पाढे अथवा पटी गणित श्रेणींत आहेत. ही माला सामान्यपणें अशी– प, प+अ, प+२ अ, प+३ अ, प + (न–१) अ. प प्रथम संख्या व अ अंतर व न ही आंकड्यांची संख्या धरून ही लिहितात.

**गणेश चतुर्थी**—हिंदूंचा एक सण. भाद्रपद शुद्ध चतुर्थी हा दिवस गणेशजयंतीचा मानून त्या दिवशीं गणपतीची पार्थिव पूजा करण्यांत येते. पेशवाईंत व हल्लीं सुद्धां जुन्या घराण्यांतून भाद्रपद शुद्ध प्रतिपदेपासून या पूजन उत्सवाला सुरवात होते व पंचमीला समाप्ति होते. गणपति साधारणपणें पंचमीस उठत. पण जास्त दिवस ठेवण्याचा रिवाज पडून अनंत चतुर्दशीपर्यंत गणपति ठेवण्यांत येऊं लागला. लो. टिळकांना मोहरमला तोड म्हणून एखादा राष्ट्रीय उत्सव तरुणांच्या उत्साहाला वाव देण्यासाठीं पाहिजे होता म्हणून त्यांनीं १८९७ सालीं सार्वजनिक गणपति उत्सव महाराष्ट्रांत सुरू केला व तो अद्याप चालत आहे.

**गणेश दैवज्ञ** (जन्म शके १४२०)—हा मोठा नामांकित ज्योतिषी होऊन गेला. सांप्रत सर्व भरतखंडांत याचे ग्रहगणित-ग्रंथ जितक्या प्रदेशांत पसरले आहेत तितके दुसरे कोणाचे नाहींत. बृहच्चिंतामणि व लघुचिंतामणि हे दोन ग्रंथ गणेश दैवज्ञकृत होत. वेधांच्या कामांत तर गणेश दैवज्ञ भास्कराचार्यापेक्षां श्रेष्ठ होता. या दैवज्ञानें केलेले ग्रंथ ग्रहलाघव, लघुतिथिचिंतामणि, बृहत्तिथिचिंतामणि, सिद्धान्तशिरोमणिटीका, लीलावतीटीका, विवाहवृंदावनटीका, मुहूर्ततत्त्वटीका, श्राद्धनिर्णय, छंदोर्णवटीका, तर्जनीयंत्र, कृष्णाष्टमीनिर्णय, होलिका-निर्णय, इत्यादि.

**गणेशपुराण**— अष्टादश उपपुराणांतील एक पुराण. या पुराणाचे मुख्य दोन खंड आहेत: पहिला उपासना खंड व दुसरा क्रीडा खंड. उपासना खंडांत गणेश-उपासनेचे विविध प्रकार सांगितले असून, क्रीडाखंडांत गजाननानीं वेळोवेळीं अवतार घेऊन कसकशा क्रीडा केल्या त्यांचें वर्णन दिलें आहे.

**गणेश योगी**— एक मराठी ग्रंथकार. हा १७८७ च्या सुमारास होता. यानें गणेशविजय, गणेशगुह्यस्तोत्र, मयूरेश-चरित्र व अनेक पदें आणि अभंग-श्लोक केले. याची गणेश गीतेवर संस्कृतांत टीका आहे.

**गणेश विश्वनाथ बेहेरे**--एक मराठेशाहींतील ब्राह्मण सरदार. हा इंग्रज-मराठे युद्धांत गुजरातेंत मराठ्यांच्या बाजूनें लढत होता. फत्तेसिंग गायकवाडाचा कारभार पाहण्यास पेशव्यानें याला व अंताजी नागेश याला नेमिलें होतें (१७७७). यानें सुरत अठ्ठाविशीचे महाल लुटून सोनगडाकडील इंग्रज पलटणीला चांगला शह दिला होता. १७८५ सालीं टिपूवरील मोहिमेंत पटवर्धनांच्या मदतीला याला पाठविण्यांत आलें होतें.

**गणेश वेदांती**—हा महाराष्ट्रीय ब्राह्मण असून मराठ्यांच्या तर्फे अयोध्येचा नबाब सुजाउद्दौला याच्या दरबारीं वकील होता. पानपत झाल्यानंतर रणांगणावरील मराठ्यांच्या बाजूल्या शवांचा और्ध्वदेहिक संस्कार यानें व काशीराज पंडित यानें फार परिश्रम घेऊन केला. हा दयार्द्र व परोपकारी असल्यानें याला वेदांती हें टोपण नांव पडलें असावें.

**गणेश संभाजी खांडेकर** (मृ. १७८०)—एक पेशवाईतील सरदार. संगमेश्वर तालुक्यांतील धुरंवाड येथील संभाजी तुकदेव खांडेकरांचा हा मुलगा नानासाहेब पेशव्यांच्या वेळीं उदयास आला. पानपतच्या पराभवानें मराठ्यांचें उत्तर हिंदुस्थानांतील वर्चस्व कमी होऊं लागलें असतां तें सांवरून धरण्याच्या कामीं हा व याचा बंधू गोपाळ संभाजी यांचे प्रयत्न खर्ची पडले. पुढें हा जानोजी भोसल्यांचा कारभारी झाला. भाऊसाहेबांच्या तोतयास यानें साहाय्य केल्यानें माधवराव पेशव्यांची याजवर गैरमर्जी झाली. माधवरावांच्या विरुद्ध इंग्रजांकडे चस्तान बसविण्याच्या कामीं याचा उपयोग होईल अशी जानोजीस असलेली अपेक्षा फोल ठरली. माळव्यांत नरसिंगगडाजवळ सन १७७९–८० त बाळाजी खेर यानें घातलेल्या छाप्यांत हा ठार झाला.

**गणोजी शिर्के**—हा शिवाजीचा जांवई होय. महाराजांच्या मुलीचें नांव राजकुंवर असून ती याला दिली होती. याची आत्या सोयराबाई ही शिवाजीची दुसरी बायको होय. तसेंच याची सख्खी बहीण जिऊबाई ही संभाजीला (येसूबाई) दिली होती. संभाजीनें शिरक्यांची कत्तल केली. त्या वेळीं गणोजी मराठ्यांना सोडून उघडपणें मोंगलांस मिळाला. पुढें राजाराम जिंजीस वेढ्यांत सांपडला असतां वेढा घालणाऱ्या औरंगझेबाच्या सैन्यांतच गणोजी होता. किल्ल्याच्या नैर्ऋत्येस याचें पथक व मोर्चा होता. त्याला आपल्याकडे वळविण्यासाठीं किल्ल्यांतून खंडोबल्लाळ त्याच्याकडे गेला. प्रथम गणोजीनें त्याचें म्हणणें कबूल केलें नाहीं. शिर्क्यांचें दाभोळचें वंशपरंपरागत वतन चिटणिसांकडे होतें; तें गणोजीनें मागितल्यावरून खंडोजीनें तें त्याच्या स्वाधीन केलें. त्या शिर्क्यांना मोर प्रांतांत तीन व रत्नागिरी परगण्यांत पांच गांवें इनाम मिळालीं. तेव्हां आपल्या आतांचा कबिला या मिषानें गणोजीनें राजारामाला किल्ल्यावरून खालीं उतरवून आपल्या गोटांत घेतलें व दुसरे दिवशीं शिकारीच्या निमित्तानें त्याला कांहीं कोसांवर असलेल्या धनाजीच्या

सैन्यांत नेऊन सोडलें (१६९७ डिसेंबर). पुढें गणोजी हा मराठ्यांकडे येऊन मिळाला. याचा मुलगा पिलाजी हाहि इतिहासांत प्रसिद्ध आहे.

**गतिगणित**—(इं. कायनेमॅटिक्स). गतीची कल्पना रेषांनीं दाखवावयाची व त्यांत कालाचा संबंध दर्शवावयाचा हें गतिगणिताचें सार आहे. साध्या युक्लिडच्या भूमितींत काळाचा संबंध येत नाहीं. त्यांत फक्त अवकाश (स्पेस) चा विचार येतो. वेग (व्हेलॉसिटी) व प्रवेग (ॲक्सेलेरेशन) यांचे एखादे दिशेस येणारे भाग काढणें असे प्रश्न या शाखेंत येतात.

**गतिचक्रमाला**—(इं. गीयरिंग). एका गतिमान वस्तूपासून ज्या योगानें दुसऱ्या वस्तूस गति घेतां किंवा देतां येते त्याचें नांव गतिमाला; पुली किंवा पट्टा या दोघांच्याहि साहाय्यानें गतिमालाच होत असते. परंतु त्याला तसें म्हणत नाहींत. साधारणपणें स्क्रू (वर्म) व सर्पिल नळी (वर्म व्हील) किंवा मोटारमध्यें मागील दोनहि चाकांना जोडणारी जी द्विगतिमाला (डिफरेन्शिअल गीयर) यांनाच गीयर किंवा गतिमाला म्हणण्याचा प्रघात आहे. साधारणपणें ज्या ज्या ठिकाणीं दांत्यांमध्यें दांते अडकून किंवा अशाच तऱ्हेनें गति दिली जाते तिला गतिमाला असें म्हणतात.

**गतिदंड**—(क्रँक). सर्व जातींची गति दोन तऱ्हांनीं उत्पन्न होत असते. (१) वर्तुळाकार व (२) मागेंपुढें होणारी (रेसिप्रोकेटिव्ह). यांपैकीं कोणत्याहि गतीचें एकीमधून दुसरींत रूपांतर करावयाचें असल्यास जी योजना करावी लागते तिला क्रँक असें म्हणतात. ही क्रँक म्हणजे एका दंडावर (शाफ्टवर) काटकोनांत बसविलेला धातूचा तुकडा असतो. त्या योगानें एका गतीचें दुसरींत रूपांतर होतें. तें कसें होतें हें कोणतेंहि तैलएंजिन पाहिल्यास सहज ध्यानांत येईल. ज्या दंडावर अशा तऱ्हेचा गतिदंड बसवलेला असतो त्याला अक्षगतिदंड (क्रँकशाफ्ट) असें म्हणतात.

**गतिदायक दंड**—(फ्रिक्शन क्लच). एका गतिमान दंडा-(शाफ्ट)पासून त्याच रेषेंतील दुसऱ्या दंडाला हवी तेव्हां गति येऊं देण्याची जी व्यवस्था केलेली असते तिला गतिदायक दंड असें म्हणतात. किंवा दंडावर बसवलेली कप्पी (पुली) दंडाची गति चालू असतांना बंद करतां किंवा चालू ठेवतां यावी अशी जी व्यवस्था करतात तिलाहि गतिदायक दंड असेंच म्हणतात. यामध्यें साधारणपणें कप्पी (पुली)मध्यें किंवा त्याच रेषेंतील दंड चालवावयाचा असतो त्याच्यावर बसविलेल्या कप्पी (पुली)-मध्यें आंतील बाजूनें तिरका भाग असतो. गतिमान दंडावर जो भाग असतो त्याला बाहेरील बाजूस याच्या योग्य असा तिरपा कोन भाग असतो. जेव्हां गति असलेल्या दंडापासून दुसरी गति चालू करावयाची असते तेव्हां या दंडावरील कोन दुसऱ्या दंडावरील कोनामध्यें हळूहळू जाऊन बसतो. हे एकमेकांना घर्षणानें धरीत असल्यामुळें त्यांना घर्षणपकड किंवा गतिदायक दंड असें म्हणतात. हें घर्षण चांगलें व्हावें म्हणून एका किंवा दोनहि पृष्ठभागांवर ॲस्बेस्टॉस किंवा इतर कापड बसविलेलें असतें. प्रत्येक मोटरगाडी किंवा मोटर बोट यामधून हे पकड (क्लच) असतात. इतरहि अनेक ठिकाणीं म्हणजे जेथें विनासायास गति जोडणेची अगर सोडणेची जरूरी असतें तेथेंहि हे पकड बसविलेले असतात.

**गतिपरिवर्तक**—(रॅक). वर्तुलाकार गतीचें परिवर्तन सरळ रेषाकृति गतमिध्यें करण्याकरितां ज्या यांत्रिक रचनेची योजना करतात तीस हें नांव देण्यांत येतें. या रचनेमध्यें दोन भाग असतात. एका धातूच्या आडव्या दांड्यावर एका बाजूस दांते पाडलेले असतात व त्या दांत्यांत दांते बसतील असें एक लहान वाटोळें दंतुर चक्र असतें.

**गतिमापक**—(स्पीडोमीटर). मोटारगाडीमध्यें गाडीचा वेग व प्रवास किती झाला हें मोजण्याकरितां हें उपयोगी पडतें. पुढील चाकांपैकीं एका चाकाला पक्के बसविलेल्या गतिमालाचक्रानें मापक यंत्राला प्रेरणा मिळते. गतिदर्शक भाग विजेच्या साहाय्यानें अथवा यांत्रिक योजनेनें चालतो.

**गतियंत्रें**—(लोकोमोटिव्ह). रुळांवर चालणाऱ्या गाड्या ओढून नेण्यासाठीं जीं एंजिनें असतात त्यांना गतियंत्रें म्हणतात. हीं एंजिनें प्रथम वाफेचीं असत. अद्यापहि शेंकडा नव्वद किंवा त्यांहून अधिक एंजिनें वाफेचींच आहेत. या एंजिनमध्यें गाडीवरच एक आडवा बाष्पक (बॉयलर) बसाविलेला असतो. बॉयलरच्या खालीं त्या गाडीवरच एंजिन बसविलेलें असतें व त्या एंजिनचा जोडदांडा गाडी ओढणाऱ्या चाकांना जोडलेला असतो.

**गतिशास्त्र**—किंवा शक्तिशास्त्र (डायनॅमिक्स). गतिमान किंवा स्थिर द्रव्याला अनुलक्षून केलेल्या शक्तीच्या नियमांचें हें शास्त्र आहे. गतीचें गणित (कायनेमॅटिक्स) गति उत्पन्न करणाऱ्या शक्तींच्या नियमांकडे लक्ष देत नाहीं. शक्तिशास्त्राचे दोन मुख्य भाग: एक स्थिर घन पदार्थांवरील शक्तीचें शास्त्र (स्टॅटिक्स) व दुसरें घन पदार्थांना गति उत्पन्न झाली असतां शक्ति कसें कार्य करतात तें शास्त्र (कायनेटिक्स).

न्यूटननें प्रथम गतीचे नियम व्यवस्थित रीतीनें मांडले. या नियमांवर शक्तिशास्त्र बसविलें आहे.

नियम १ ला:—प्रत्येक पदार्थ स्थिर असेल व त्यावर शक्तिप्रेरणा नसेल तर तो स्थिरच राहील. तसेंच सरळ रेषेंत सारख्या

वेगानें पदार्थ फिरत असेल तर तो तसाच फिरत राहील. फक्त बाह्य शक्ति त्याची स्थिति बदलूं शकेल.

नियम २ रा :— पदार्थांतील द्रव्य व त्यानी गति यांच्या गुणाकारांतील फरक पदार्थांवरील प्रेरक शक्तीच्या प्रमाणांत असेल व शक्तीच्या दिशेंतच तो फरक होईल.

नियम ३ रा :— कोणत्याहि क्रियेला तेवढीच पण विरुद्ध दिशेनें प्रतिक्रिया होते.

शास्त्राची सुरुवात स्थळ, काळ, द्रव्य यांचीं मानें म्हणजे मापें ठरविण्यापासून होते. ब्रिटिश पद्धतींत फूट हें लांबीचें व सेकंद हें कालाचें अशीं मूलमानें (युनिट) आहेत. फ्रेंच पद्धतींत सेंटिमीटर हें लांबीचें व सेकंद हें कालाचें मूलमान आहे. पौंड (एक ब्रिटिश एक्सचेकरच्या लंडन कचेरींत टेवलेला प्लॅटिनमचा गोळा) हें द्रव्याचें मूलमान व फ्रेंच-पद्धतींत ग्रॅम हें द्रव्याचें मूलमान मानतात. पौंडाचें वजन सर्व स्थळीं सारखें होत नाहीं म्हणून त्यावरून निघालेल्या शक्तीचें मूलमान स्थलनिरपेक्ष होणार नाहीं अशीं दोन स्थलनिरपेक्ष मूलमानें आहेत. एक पौंडल व दुसरें डाईन (चलांक). एक पौंड द्रव्यावर एका सेकंदांत दर सेकंदाला एक फूट गति उत्पन्न करील एवढी शक्ति म्हणजे एक पौंडल. वजन व द्रव्य ह्यांमध्यें फरक आहे. द्रव्य शक्तिनिरपेक्ष आहे. पदार्थ कोठेंहि नेला तरी त्यांतील द्रव्य तितकेंच राहील. पण वजन हें पृथ्वीच्या आकर्षणावर अवलंबून आहे. पृथ्वीचें आकर्षण त्या जागेच्या पृथ्वीमध्यापासूनच्या अंतरावर अवलंबून आहे.

**गत्यंतरचक्र**— (गीयर). यामुळें कोणदंडाला (शाफ्ट) जरूरीप्रमाणें निरनिराळ्या गति देतां येतात. हेडच्यापुढें मागेंपुढें होईल त्याचप्रमाणें आडवी उभी अशी योजना असलेली सरकपट्टी (स्लाइट) बसविलेली असते. या सरकपट्टीवर कातकाम करण्याचें हत्यार बसविण्याची व्यवस्था असते. जरूर पडल्यास त्यावर डाग बांधण्याची व्यवस्था असते. हेडच्या दांड्यावर निरनिराळ्या तऱ्हेचे 'डाग पकडणारे' (चक्) बसवितात; तसेंच हेडच्या दांड्यामध्यें नाभि (सेंटर) बसविण्याचीहि व्यवस्था केलेली असते. हुषार माणूस लेथवर बहुतेक सर्व कामें करूं शकतो.

**गदग**—मुंबई, धारवाड जिल्ह्याचा एक पूर्वेकडील तालुका. क्षेत्रफळ ६९९ चौ. मैल. लो. सं. १,२७,३७५. त्यांत मुन्दरगी परगण्याचा समावेश होतो. यांत गदग व गुलगुंड हीं दोन गांवें व १,०२२ खेडीं असून हवा समशीतोष्ण व आरोग्यदायक आहे. वार्षिक पाऊस सरासरी २५ इंच पडतो.

गदग हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून येथें कापसाचा व्यापार मोठा असून येथील लुगडीं प्रसिद्ध आहेत. गदग येथें एक किल्ला आहे. त्याच्याभोंवतीं सुमारें १८ फूट तट असून कोठें खंदकहि आहे. गदग येथील मामलेदाराच्या कचेरींत कांहीं ताम्रपट असून येथील देवळांत किंवा त्यांच्या जवळपास पुष्कळ शिलालेख आहेत.

याचें प्राचीन नांव क्रतूक असें असावें. त्रिकूटेश्वर व वीरनारायण हीं देवळें दहाव्या अगर अकराव्या शतकांतील असावींत. गदग ही कापूस व सूत यांची मोठी पेठ आहे. येथें कापडाच्या, सरकी काढण्याच्या व कापूस दाबण्याच्या, तेलाच्या, वगैरे गिरण्या आहेत. लो. सं. ५६,२८३.

**गदरिया**— गदेरी. यांची वस्ती संयुक्तप्रांत, मध्यहिंदुस्थान, वगैरे भागांतून आहे. ही एक धनगरांची व घोंगडी विणणाऱ्या लोकांची जात आहे. गुआल अथवा अहीर जातीशीं त्यांचा निकट संबंध असावा. कारण गुआल जातीच्या हातची कची व पक्की रसोई ते खाऊं शकतात. संयुक्तप्रांतांत वाघेल, ब्राह्मणिया, चंडेल, धिनगर, हरणवाल, कच्छवाह, निखर, फुलसिधिय, राठोर, रौटेल, सागर, व सुरखार अशा यांच्या बारा पोटजाती आहेत. यांपैकीं निम्मीं नांवें रजपुतांतलीं आहेत. पश्चिमेकडील गदरिया ग्वाल्हेरहून आल्यामुळें स्वतःस मराठे म्हणवितात.

गदरिया हे जुन्या चालीचे हिंदू असून या जातीची मुसलमान शाखेंत फारच थोडी संख्या आढळते. त्यांची काली ही मुख्य देवता होय. त्याशिवाय चमार व चोखाई या विशिष्ट देवता आहेत.

**गदा**— गदा हें एक देशी व्यायामाचें साधन आहे. जुन्या काळीं भीम, दुर्योधन, वगैरे वीर गदायुद्धांत प्रवीण असल्याचीं वर्णनें आहेत. गदा हें एक त्या वेळीं युद्धाच्या उपयोगी पडणारें हत्यार होतें. हल्लीं गदा हें एक व्यायामाचें साधन आहे. हल्लींची गदा ही एका जाड व मजबूत वांबूच्या काठीच्या टोंकास लोखंडी अथवा दगडी गोळा बसवून तयार करतात. तसेंच कमीजास्त शक्तीच्या व वयाच्या माणसास वापरतां याव्या म्हणून या गदा कमीजास्त वजनाच्या व उंचीच्या तयार करण्यांत येतात. लोखंडी गोळा लावल्यास तो त्याच वजनाच्या दगडी गोळ्यापेक्षां लहान दिसतो. शोभेसाठीं दगडी गोळ्यास करवे पाडतात. गदेच्या मेहनतीनें खांद्याचे स्नायु चांगले तयार होतात, तसेंच मनगटें व हातांचीं बोटेंहि मजबूत होतात. महाराष्ट्रांत गदेचा फारसा प्रचार नाहीं. पण उत्तर हिंदुस्थानांतील आखाड्यांतून गदा फिरविण्याचा फार रिवाज आहे.

**गदाधर प्रल्हाद प्रतिनिधि**—शाहू दक्षिणेंत यावयास निघाला असतां गदाधर प्रल्हाद नाशिककर हा ब्राह्मण गृहस्थ त्याला येऊन मिळाला. पुढें राज्याभिषेक झाल्यानंतर

परशुरामपंत किन्हईकर हे ताराबाईच्या पक्षाकडे राहिल्यानें महाराजांनीं प्रतिनिधिपद गदाधरभट्टास दिलें (१७०८). परंतु हें पद पंतांकडे फार दिवस राहिलें नाहीं. इ. स. १७११ त तें त्याचा भाऊ नारो प्रल्हाद यास दिलें.

**गदी**— संयुक्त प्रांतांत या जातीची वस्ती सर्वांत मोठी (५५,०२२) आहे. हे सर्व मुसलमान आहेत. पंजाबांत हे करनाळ व दिल्ली प्रांतांत आढळतात. येथें ते शेतकऱ्याचा धंदा करतात. कधीं कधीं यांना गद्दी असें म्हणतात. परंतु यांचा डोंगरी गद्दी जातीशीं कांहीं एक संबंध नाहीं.

**गंधक**— अधातु मूलद्रव्य. ज्वालामुखीच्या प्रदेशात हें स्वतंत्रपणानें सांपडतें. त्याशिवाय गंधकेत (सल्फेट) आणि गंधकिद (सल्फाइड) म्हणून निसर्गांत पुष्कळ ठिकाणीं पसरलें आहे. १९०३ पर्यंत व ब्लॉक पद्धतींत तयार होणाऱ्या खट गंधकिद (कॅल्शियम सल्फाइड) मधून शें. ९५ गंधक परत मिळवीत होते. सध्यां गंधक मुख्यत्वें सिसिली आणि लुझियानामधून येतें.

चतुःपार्श्व (ऱ्हॉम्बिक), एकनत (मोनोक्लिनिक), चिवट (प्लॅस्टिक), आणि अस्फटिक (अमोरफाऊस) अशा चार स्वरूपांत गंधक राहूं शकतें. गंधक कोणत्याहि रूपांत असलें तरी तापवलें म्हणजे वितळतें आणि तपकिरी (ॲंबर) रंगाचा द्रव तयार होतो. उष्णमान वाढवीत गेलें म्हणजे द्रवरूप गंधकाचा रंग जास्त तांबडा होत जातो आणि द्रवरूप कमी कमी होऊन घट्टपणा येऊं लागतो. शेवटीं २३० सें. ला तें जवळजवळ काळें होतें आणि अगदीं घट्ट झाल्यामुळें भांड्यांतून ओतता येईनासें होतें. त्यापुढें आणखी उष्णमान वाढविलें तर तें पुन्हां पातळ होऊं लागतें आणि ४४० सें. वर उकळूं लागतें. गंधकाच्या वाफा पिंगट तांबड्या रंगाच्या असतात. उष्णमान कमी कमी होऊं लागलें म्हणजे पूर्वीच्या सर्व गोष्टी पुन्हां उलट्या क्रमानें घडून येतात. गंधक हवेंत जळतें आणि त्यामुळें गंधद्विप्राणिद (सल्फर डाय ऑक्साइड) तयार होतो. पुष्कळशा धातूंबरोबर (उदा., लोखंड, तांबें, पारा, इत्यादि) त्याचप्रमाणें अधातूंबरोबर (उदा., आयोडीन, कर्ब) गंधकाचा संयोग होऊन तीं तीं गंधकिदें (सल्फाइड्स) तयार होतात. गंधकाम्ल आणि गंधकित (सल्फाइट) तयार करण्यासाठीं गंधकाचा उपयोग होतो. घरें साफ करण्यासाठीं गंधकाची धुरी देतात. रबराच्या कारखान्यांतहि गंधकाचा उपयोग होतो. बंदुकीच्या दारूंत आणि शोभेच्या दारूंत गंधक असतें. औषधी द्रव्यांतहि गंधक वापरतात.

**गंधकद्विप्राणिद**—(सल्फर डाय ऑक्साइड). गंधक जाळलें म्हणजे हा वायुरूप पदार्थ तयार होतो. हा घशांत गेला म्हणजे गुदमरल्यासारखें होतें. हा पाण्यांत सहज विरघळतो आणि त्यामुळें गंधकसाम्ल (सल्फरस ॲसिड) तयार होतें. पाण्याच्या सहवासांत गंधकद्विप्राणिद (सल्फर डाय आक्साइड) रंगहारक आहे; ह्यासाठीं लोंकर, गवत आणि रेशीम पांढरें शुभ्र करण्यासाठीं त्याचा उपयोग करतात. घरें किंवा कपडे शुद्ध करण्यासाठीं ह्याचा उपयोग होतो. गंधकाम्ल तयार करण्यासाठीं लागणारे गंधकद्विप्राणिद (सल्फर डाय ऑक्साइड) पायराइट जाळून तयार करतात.

**गंधक फूल**—याची पिवळी ठिसूळ पूड असते. वद्धकोष्ठ, मूळव्याध व जीर्ण संधिवात या रोगांमध्यें याचा सारक म्हणून उपयोग करण्यांत येतो. याची मात्रा २० ते ६० ग्रेन असून तें दूध, मध किंवा साखरेच्या पाकांत घ्यावें. बाहेरून लावावयाच्या मलमामध्येंहि याचा उपयोग करण्यांत येतो व खरूज, फोड किंवा इतर त्वग्रोगामध्यें त्याचा उपयोग होतो. संधिवातामध्यें दुखऱ्या जागेवर याची पूड उडवून वर गरम कापड बांधण्यांत यावें.

**गंधकरसायन**— शुद्ध गंधकाला गाईचें दूध, चतुर्जात (दालचिनी, तमालपत्र, वेलदोडे व नागकेशर) गुळवेल, त्रिफळा, सुंठ व मका, इत्यादि औषधांच्या भावना देतात.

दूषित रक्तामुळें होणाऱ्या सर्व तऱ्हेच्या त्वचारोगांवर हें अतिशय प्रभावशाली औषध आहे. या औषधाच्या सेवनानें दूषित रक्त शुद्ध होतें. अंगावर बारीक बारीक पुरळ, खाज सुटणें, कोरडी खरूज, खाजवल्यानंतर आग होणें व थोडेंसें रक्त येणें, पुष्कळ वर्षे कोरडी खरूज असणें, इत्यादि विकारांत हें औषध अप्रतिम आहे. डोक्याला होणारे खवडे व इतर विकार या औषधानें बरे होतात. कुष्ट रोगांत हें औषध दिल्यानें फायदा होतो. जुने नाडीव्रण, अस्थिव्रण, इत्यादि विकारांवर हें दिलें असतां चांगला उपयोग होतो.

·।।· ते २ गुंजा दूधखडीसाखर अगर तूपखडीसाखर यांत हें देतात.

**गंधकाम्ल**—देशातील उद्योगधंद्यास लागणारें अतिशय महत्त्वाचें अम्ल. 'चेंबर प्रोसेस' किंवा 'कान्टॅक्ट प्रोसेस' ह्या दोन पद्धतींनीं हें तयार करतात. दोहोंतहि प्रथम गंधक किंवा पायराइट्स जाळून गंधद्विप्राणिद (सल्फर डाय ऑक्साइड) तयार करून मध्यस्था (कॅटॅलिस्ट)च्या साहाय्यानें त्याचें गंधत्रिप्राणिद (सल्फर ट्राय ऑक्साइड) करावें लागतें. चेंबर प्रोसेसमध्यें हें ट्राय ऑक्साइड नत्रपरप्राणिद (नायट्रोजन परऑक्साइड) आणि पाणी ह्यांच्या साहाय्यानें होतें, आणि

कॉन्टॅक्ट प्रोसेसमध्यें हें प्लॅटिनमच्या साहाय्यानें होतें. गंधत्रिप्राणिद पाण्यांत मिसळलें म्हणजे गंधकाम्ल तयार होतें. शुद्ध गंधकाम्ल लांकडावर किंवा साखरेवर टाकलें तर त्याचा जळून कोळसा होतो. गंधकाम्ल पातळ करावयाचें असल्यास पाण्यांत तें थोडें थोडें टाकावें. उलट केलें तर स्फोट होण्याचा संभव असतो. ह्या अम्लाचा अनेक धंद्यांत उपयोग होत असल्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें हें अतिशय महत्त्वाचें द्रव्य आहे.

**गंधकिसल**—(सल्फोनल). हा दारन (ॲसिटोन) द्विइथिल (डायएथिल) गंधकन (सल्फोन) आहे. हा अतिशय उपयुक्त, गुंगी आणणारा पदार्थ आहे. दारन (ॲसिटोन) चें घनीकरण (कंडेन्सेशन) इथिल रसबंधकाशीं (एथिल मरक्याप्टन) उज्जहराम्लाच्या (हायड्रोक्लोरिक ॲसिड) सान्निध्यांत केलें म्हणजे रसबंधक (मरकॅप्टोल) तयार होतो. नंतर त्याचे पालाश परिमंगलितानें (पोट्याशिअम परम्यांगनेट) प्राणिदीकरण करावें.

यास अम्लऔषधीशास्त्रांत "सल्फोनॅलम" व अमेरिकेंत "सल्फो मेथानुम" असें म्हणतात. निद्रानाशाच्या रोगांत या औषधानें चांगली निद्रा येते. त्याचप्रमाणें वेडांत हें अत्युपयोगी आहे. चाभळीच्या डिकाबरोबर किंवा ऊन पाण्यांत हें औषध देतात. याच्या योगानें हृदयाची क्रिया मंद पडत नाहीं व श्वासोच्छ्वासक्रियेसहि अवरोध होत नाहीं. परंतु याची क्रिया फार सावकाश होते. हें झोपेच्या वेळीं घेतल्यानें तावडतोब झोंप येत नाहीं. कधीं कधीं दुसऱ्या दिवशींहि झोंप येते. हें लागोपाठ सतत घेणें हितकारक नाहीं.

**गंधकोज्ज**—(सल्फ्युरेटेड हायड्रोजन). उज्जा (हायड्रोन) मध्यें गंधक जाळलें म्हणजे हा वायु तयार होतो. पण नेहमीं लोहगंधकिद (फेरस सल्फाइड) आणि सजल (डायल्यूट) उज्जहरिकाम्ल (हायड्रोक्लोरिक ॲसिड) ह्यापासून हा तयार करतात. हा वर्णहीन विषारी वायु असून त्याला नासलेल्या अंड्यासारखा वास येतो. कांहीं खनिज झऱ्यांत हा असतो. हा मंद (वीक) अम्लधर्मी असून तीव्र (स्ट्रॉंग) हारकगण (रिड्यूसिंग एजंट) आहे. ह्याच्या साहाय्यानें पाण्यांत न विरघळणारीं आणि निरनिराळ्या रंगांचीं गंधकिदें तयार करतां येतात. त्यासाठीं रासायनिक परीक्षणांत ह्याचा नेहमीं उपयोग करतात.

**गंधमादन**— १. मेरुपर्वताच्या पश्चिमेकडील पर्वत. हा दक्षिणोत्तर असून नील आणि निषध या दोन पर्वतांस क्रमानें स्पर्शून आहे. याच्या आणि पश्चिम समुद्राच्या मधील प्रदेशास भद्राश्ववर्ष असें नांव आहे.

२. हिमालयाच्या एका शिखराचें नांव. युधिष्ठिर वनवासांत असतां येथें कांहीं काळ राहत असे. इंद्रलोकीं अर्जुन गेलेला परत आला असतां येथेंच युधिष्ठिरास येऊन भेटला होता.

**गंधर्व**— देवांचे गवयी व स्वर्गांतील कलावंत वर्ग. गंधर्वांबद्दलची कल्पना वैदिक काळांतील आहे, इतकेंच नव्हे तर ती पर्शुभारतीय (इंडोइराणी) काळाइतकी प्राचीन आहे. अवेस्तांत गंदरेव राक्षसाचा उल्लेख येतो. पुराणांतून गंधर्व-अप्सरांच्या अनेक कथा आहेत. महाभारतांतील चित्ररथ, चित्रसेन, इत्यादि गंधर्व प्रसिद्धच आहेत. गंधर्व शरीरानें सुंदर असून गायन-वादनकलेंत निपुण असतात. ते विमानांतून अप्सरांसहित संचार करतात. गांधर्ववेद म्हणजे गायनकलाच होय.

या नांवाची संयुक्त प्रांतांत एक लहानशी जात आहे. ही गायन आणि शरीरविक्रय यांवर पोट भरते. दक्षिण गुजरातेंत गंधर्व नांवाची गवयांची एक जात आहे.

**गंधर्वगड किल्ला**—मुंबई, बेळगांव जिल्हा. बेळगांवच्या पश्चिमेस सुमारें २१ मैलांवर पायथ्यापासून ४०० फूट उंचीवर हा किल्ला आहे. किल्ल्याचें क्षेत्रफळ सुमारें १,००० फूट चौरस मैल असून किल्ला इ. स. १७२४ मध्यें सांवतवाडीच्या फोंड सांवताचा मुलगा नाग सांवत यानें बांधला. १७७८ सालीं कोल्हापूर सरकारनें हा किल्ला सर केला होता. परंतु १७९३ सालीं शिंद्यांचें वजन पडल्यामुळें तो परत सांवतवाडीकरांस देणें भाग पडलें. हल्लीं हा किल्ला पडक्या स्थितींत आहे.

**गंधाचे रवे**—हळकुंडें सोलून तुकडे करतात. नंतर कागदी लिंबाच्या रसांत तुरटी व टाकणखार मिसळून तो रस या हळकुंडाच्या तुकड्यांस पुटें देऊन भिजवितात व वाळवितात. म्हणजे रवे झाले.

**गंधाविरजा**—छत्राकार पानें असलेल्या दोन जातींच्या झाडांपासून निघणारा एक तीव्र गंध असलेला राळेसारखा चिकट निर्यास. हीं झाडें बहुतेक फेरुला गॅल्बानिफ्लुआ व फेरुला रुब्रिकौलिस हीं असावीं. हा पदार्थ इराण, भूमध्यसमुद्र पूर्वभाग व हिंदुस्थान या देशांत मिळतो. याचा उपयोग औषधीकरतां, चिलकलेमध्यें व रोगण तयार करण्याकरितां करतात.

**गंधावळ**—ग्वाल्हेर सं., उज्जनी प्रांत, सोनकच्छ परगण्यांतील एक प्राचीन स्थळ. गंधर्वसेनाची ही गंधर्वनगरी होती. या गांवीं जैन शिल्पाचे पुष्कळ अवशेष सांपडतात व गंधर्वसेनाचें —गाढवाचें तोंड असलेलें—देऊळहि आहे. विक्रमादित्याचा पिता गंधर्वसेन (कदाचित् गर्दभिल) याची मिथिला नगरी हीच असावी असें कांहीं संशोधक मानतात. (विक्रमस्मृति—कवचाळे यांचा लेख पाहा).

दोन्ही जिंकलीं, तेव्हां त्याला दोन 'सिसिलींचा सर्वाधिकारी नेमण्यांत आलें. दोन सिसली इटलीला जोडण्यास मान्यता देऊन व मोठा सन्मान घेण्याचें नाकारून तो आपल्या कॅप्रेरा येथील घरीं जाऊन राहिला. १८७० त त्यानें फ्रेंच लोकशाहीस जर्मनांविरुद्ध मदत दिली होती; पण त्यानें आपले अखेरचे दिवस कॅप्रेरा येथें घालविले.

**गॅरिसन, विल्यम लॉइड** (१८०५–१८७९)—हा अमेरिकन वृत्तपत्रकार आणि सं. संस्थानांतील गुलामपद्धति-विरोधी चळवळीचा आद्यजनक. त्यानें बेंजॅमिन लंडी या क्वेकर पंथीय इसमाच्या मदतीनें 'जीनस ऑफ युनिव्हर्सल इमॅन्सिपेशन' या नांवाचें वृत्तपत्र सुरू केलें आणि गुलामांचा व्यापार करणाऱ्या इसमांविरुद्ध निषेधपर लेख लिहिले; त्यामुळें बेअब्रूच्या गुन्ह्याबद्दल त्याला कैदेची शिक्षा भोगावी लागली. तेथून सुटल्यावर त्यानें बोस्टन येथें व्याख्यानमाला सुरू केली आणि 'लिबरेटर' या नांवाचें वृत्तपत्र सुरू केले (१८३१). १८३२ मध्यें त्यानें आपलें 'थॉट्स ऑन आफ्रिकन कॉलनायझेशन' हें पुस्तक प्रसिद्ध केले. आणि त्याच वर्षी 'अमेरिकन अँन्टी स्लेव्हरी सोसायटी' ही संस्था स्थापन केली. त्याच्या चळवळींची हळूहळू चांगली वाढ झाली आणि १८६५ मध्यें गुलामपद्धति कायद्यानें नष्ट झाल्यावर सदरहू संस्थाहि बंद करण्यांत आली.

**गरुड**—ससाणा, वगैरे पक्ष्यांच्या वर्गांतील एक पक्ष्यांची ही जात आहे. याची चोंच लांब व बळकट असते. तिला आरंभापासूनच बांक असतो. याचे पंख शेपटीच्या टोंकापर्यंत लांब असतात व याचे पाय बोटांपर्यंत पिसांनी भरलेले असतात. इंग्लंडमधील गरुड सोनेरी असतो. ही जात सर्व उत्तर गोलार्धांत आढळते. हे पक्षी सर्व पदार्थ खातात.

हिंदु पुराणांतून विष्णुवाहन गरुडाचें बरेंच वर्णन आढळतें. विष्णूच्या देवळांतून गरुडाच्या मूर्तीहि दिसतात. पुराणांत गरुडाचें वर्णन खालीलप्रमाणें आहे : अर्धे मानव शरीर व अर्धे पक्ष्याचें शरीर असलेला गरुड हा सर्व पक्षांचा राजा होता. दक्षाची कन्या विनता, ही गरुडाची माता होय. गरुडाच्या मातेचें तिच्या कद्रुनामक ज्येष्ठ सवतीशीं भांडण होऊन सर्पांच्या कपटामुळें तिला दास्यत्व पत्करावें लागल्यामुळें तिला सर्पांबद्दल अतिशय द्वेष वाटे; तोच द्वेष गरुडाच्या मनांत वास करीत असल्यामुळें गरुड सर्पांचा कट्टा शत्रु झाला. गरुड इतका तेजस्वी होता कीं, तो जन्मताक्षणींच अग्नीसारखा भासल्यामुळें देवांनीं त्याची पूजा केली. गरुडानें देवांपासून अमृत चोरून नेलें. अमृत परत मिळविण्याकरितां इंद्रानें गरुडाबरोबर घोर युद्ध केलें व त्यानें नेलेलें अमृत परत मिळविलें.

**गरुडपुराण**—अठरा महापुराणांतील एक. हें पुराण वैष्णव पंथाचें आहे; यामध्यें गरुड पक्ष्यानें विष्णूच्या आज्ञेवरून विष्णूच्या माहिम्याचें वर्णन केलें आहे. जगदुत्पत्ति, आदित्यरूपी विष्णूची भक्ति, विष्णूची अमूर्त पूजा, शिव व इतर देवतांची पूजा व इतर समारंभ, वगैरे गोष्टी यांत आल्या आहेत. यांत सूर्यवंशी व सोमवंशी राजांच्या वंशावळी दिल्या आहेत. रामायण, महाभारत व हरिवंश यांतील माहिती यांत दिली आहे. तसेंच वैद्यक, साहित्यशास्त्र, व्याकरण यांचीहि माहिती दिली आहे. शिवाय सर्व प्रकारचीं माहात्म्यें–गयामहात्म्य (गयातीर्थाचें श्राद्धपक्षासंबंधीं महत्त्व) आणि प्रेतकल्प (मृतांच्या आत्म्याविषयींचे विधी) अशांसारखीं–या पुराणांपैकी होत असें मानतात.

**गरुडस्तंभ**—हा ओरिसा प्रांतांत आहे. ओढ्या प्रांतावर पूर्वी केसरी घराणें राज्य करीत असतां, तें घराणें ब्राह्मणी धर्माचें असल्यानें त्यानें आपल्या राज्यांत व राजधानीच्या जयपूर या गांवीं अनेक देवळे, इमारती वगैरे बांधल्या. त्यांतच हा प्रचंड व कलाकुसरीचा खांब आहे. हा हल्लीं अरण्यांत आहे. केसरी घराण्याचें राज्य गेल्यानंतर मुसलमानांनीं हा पाडण्याचा प्रयत्न केला. परंतु तो पडला नाहीं. मात्र त्याच्या माथ्यावर बसविलेल्या गरुडाला त्यांनीं फोडून नाहींसा केला. हा खांब इ. स. दहाव्या शतकांत उभारला गेला आहे.

**गॅरेट, अलमायडा** (१७९८–१८५४)— एक पोर्तुगीज महाकवि, ग्रंथकार व मुत्सद्दी. हा प्रथम वक्ता म्हणून प्रसिद्धीस आला, नंतर त्यानें नाटकें लिहिलीं. तो राज्यक्रांतिकारकांशीं संबंध ठेवीत असल्यानें त्याला हद्दपार व्हावें लागलें; पण त्यामुळें त्याचा वाङ्मयदृष्ट्या फायदाच त्याला. त्यानें 'कॅमोइज' नांवाचें राष्ट्रीय काव्य रचिलें. उदार मताबद्दल त्याला कैदहि भोगावी लागली. पोर्तुगालच्या स्वातंत्र्यासाठीं तो सैनिक बनला, त्यानें नवे कायदेहि तयार केले. पुढें तो पोर्तुगालचा परराष्ट्रीय वकील म्हणून कांहीं काळ काम करूं लागला. त्यानें पोर्तुगीज नाट्यसंस्था सुधारण्याची खटपट केली. पार्लमेंटांत कॉपीराइट बिल आणून मान्य करून घेतलें. हें बिल इतर राष्ट्रांनींहि नंतर उचललें. पुढें तो परराष्ट्रीय मंत्री झाला. त्याच्या ठिकाणीं अनेक गुण होते. 'फोलहास कॉहिडास' व 'फ्रेल्युइझ डी सूझा' यांसारखे त्याचे ग्रंथ याची साक्ष देतात.

**गरोडा**—एक अस्पृश्य जात. या लोकांची वस्ती राजपुताना व वडोदें ( वडोदें संस्थानांत लो. सं. सुमारें आठ हजार ) संस्थान यांतून आहे. हे दक्षिण गुजरात प्रांतातील भंगी लोकांखेरीज करून इतर सर्व अस्पृश्य जातींचे उपाध्याय आहेत. ते आपल्याला ब्राह्मण म्हणवितात. आपल्या कुलपुरुषानें गुरुभगिनीशीं विवाह केल्यामुळें आपला ऱ्हास झाला असें सांगतात. त्यांच्यांत असलेल्या दवे, जोशी, नागर, वगैरे नांवांवरुन ते मूळचे ब्राह्मण असावेत. हे धेडांच्या पंक्तीला जेवतात, व वाटेल तें खातात. ब्राह्मणांप्रमाणें ते रोज जेवणापूर्वी स्नान करतात. ते राम, देवी व तुळस, वगैरे देवतांना भजतात. व ब्राह्मणाप्रमाणें व्रतोपवासहि करतात. कित्येक गरोडा लोक रामानंदी व परिणामी पंथाचे आहेत. यांच्यांत मृतांना जाळतात व श्राद्धविधि करितात. जातींतील भांडणें तोडण्यासाठीं पंचायती असतात.

**गरौली**—बुंदेलखंडांतील एक लहानशी सनदी जहागीर. क्षे. फ. ३९ चौ. मै.. १८१२ मध्यें दिवाण गोपाळासन बुंदेला याला दिलेल्या सनदेनें ब्रिटिश सरकारनें या संस्थानला मान्यता दिली. जहागिरींत १७ खेडीं आहेत. ११ चौ. मैल जमीन लागवडींत आहे व सु. ५०,००० रु. वसूल आहे. मुख्य ठिकाण गरौली हें धसाण नदीच्या कांठीं आहे.

**गर्ग**—१. वैदिक कालामध्यें गर्ग कुलाची स्थापना झाली व त्याचें श्रौत धर्मात थोडेंसें वैशिष्ट्य स्थापन झालें. गर्गत्रिरात्र नांवाची एक सोमसंस्था वेदग्रंथांत वर्णिली आहे. पुराणांत गर्गाचें स्वरूप निराळें दिसतें. कालयवन नांवाच्या एका परक्या जातीच्या शिष्याचा हा पुरस्कर्ता होता आणि त्यामार्फत कांहीं सामाजिक क्रांति घडवून आणणारा एक गर्ग दृष्टीस पडतो. याज्ञवल्क्याबरोबर वादविवाद करणारी प्रसिद्ध विदुषी गार्गी ही कोणत्या गर्गाची मुलगी असावी हें निश्चित होत नाहीं.

२. एक प्राचीन ज्योतिषी. यादवांचा उपाध्याय गर्ग व हा एकच कीं काय हें सांगतां येणार नाहीं. वराहमिहिरानें आपल्या ग्रंथांतून जागोजाग सर्व प्राचीन ग्रंथकारांच्या आधीं गर्गाचा उल्लेख केला आहे. यावरून गर्गसंहिता अत्यंत प्राचीन दिसते. गर्गाला ज्योतिषी मुहूर्ताच्या बाबतींत प्रमाण मानितात. वृद्ध गर्ग नांवाचा ज्योतिषी वेगळा दिसतो. याचाहि वराहमिहरानें अनेकदां उल्लेख केला आहे. तो वराहापूर्वी दोन-तीनशें वर्षे होऊन गेलेला दिसतो.

**गर्गे, शंकर काशीनाथ** ( १८८९–१९३१ )— नाट्यछटा हा नवीन लेखनप्रकार मराठी वाङ्मयांत सुरू करण्याचें श्रेय यांनाच आहे. ‘ दिवाकर ’ या नांवानें हे लिखाण लिहीत असत. १९०८ सालीं हे स्कूल फायनलची परीक्षा पास झाले व यांनीं पुण्यास फौजदार कचेरींत कारकुनाची नोकरी धरली. परंतु डोळ्यांच्या अंधपणामुळें यांना ती नोकरी सोडावी लागली. यानंतर नूतन मराठी विद्यालयांत हे शिक्षक झाले. यांच्या नाट्यछटा स्वतंत्र छापलेल्या आहेत.

**गर्दी**—( रायट ). इंग्लिश कॉमन लॉ कायद्यांत या शब्दाची व्याख्या अशी आहे कीं, तीन किंवा अधिक इसमांनीं विशिष्ट गुन्हा करावयाच्या इराद्यानें कांहीं विशिष्ट गुन्ह्याचें कृत्य केलें तर त्या गुन्ह्याला गर्दी ( Riot ) असें म्हणतात. ‘ रायट ’ हा सार्वजनिक स्वरूपाचा गुन्हा असून त्यामुळें सार्वजनिक शांततेचा भंग आणि सामान्य जनतेच्या मनांत भीति उत्पन्न करणें, या कृत्यांचा या गुन्ह्यांत अंतर्भाव होतो. पहिला जॉर्ज राजा याच्या कारकीर्दीत केलेल्या ‘ रायट ॲक्ट ’ या कायद्यांत अशी तरतूद आहे कीं, जेव्हां बारा किंवा अधिक इसम गैरकायदा एकत्र जमून सार्वजनिक शांततेचा भंग करतात, त्या वेळीं जस्टिस ऑफ पीस आणि त्या परगण्याचा शेरीफ, किंवा त्या शहराचा मेजर किंवा अधिकारी यांनीं त्या गर्दी करणाऱ्या लोकांना ‘ तुम्ही निघून जा ’ असा जाहीर हुकूम करावा. याप्रमाणें जाहीर हुकूम केल्यानंतर एक तासानंतरहि जे इसम तो हुकूम मोडून त्याच ठिकाणीं असतील त्यांनीं गर्दीचा गुन्हा केला आहे व त्याबद्दल त्यांच्यावर फौजदारी खटला चालवावा, असा कायदा आहे.

हिंदुस्थान—इंडियन पिनल कोडांत या गुन्ह्याची व्याख्या आहे ती: जर एखाद्या गैरकायदा जमावानें म्हणजे पांच किंवा अधिक इसमांनीं गुन्ह्याचें कृत्य करण्याच्या हेतूनें अत्याचाराचें कृत्य केलें, तर तो ‘ गर्दी ’ हा गुन्हा होय ( कलमें १४१, १४६ ). असा गैरकायदा जमाव जमून सार्वजनिक शांततेचा भंग होईल, असा संभव असेल तर क्रिमिनल प्रोसीजर कोडमध्यें मॅजिस्ट्रेटला किंवा पोलिसठाण्याच्या अधिकाऱ्याला विशेष कर्तव्य सांगितलें आहे. अशा जमावाला गर्दी मोडून निघून जा असा हुकूम या अधिकाऱ्यानें द्यावा, व तो हुकूम मानला नाहीं तर त्या अधिकाऱ्यानें पोलिसांकडून योग्य तो प्रतिकार करून गर्दी मोडावी आणि जरूर तर कांहीं इसमांना पकडून कैदेंत ठेवावें. या उपायांनींहि गर्दी मोडली नाहीं तर गर्दी मोडण्याकरितां लष्कराचा उपयोग करावा. मॅजिस्ट्रेटनें लष्करी अधिकाऱ्याला गर्दी मोडण्यास सांगितल्यावर, लष्करी अधिकाऱ्यानें शस्त्रांचा उपयोग करून गर्दी मोडावी व जरूर त्या इसमांना अटक करावी. हुकूम देण्यास मॅजिस्ट्रेट नजीक नसेल तर लष्करी अधिकाऱ्यानें अशा हुकूमावांचूनहि वरील उपायांनीं गर्दी मोडावी ( क्रिमिनल प्रोसीजर कोड, कलमें १२७ ते १३१ ).

दोन्ही जिंकलीं, तेव्हां त्याला दोन 'सिसिलींचा सर्वाधिकारी नेमण्यांत आलें. दोन सिसली इटलीला जोडण्यास मान्यता देऊन व मोठा सन्मान घेण्याचें नाकारून तो आपल्या कॅप्रेरा येथील घरीं जाऊन राहिला. १८७० त त्यानें फ्रेंच लोकशाहीस जर्मनांविरुद्ध मदत दिली होती; पण त्यानें आपले अखेरचे दिवस कॅप्रेरा येथें घालविले.

**गॅरिसन, विल्यम लॉइड** (१८०५-१८७९)—हा अमेरिकन वृत्तपत्रकार आणि सं. संस्थानांतील गुलामपद्धति-विरोधी चळवळीचा आद्यजनक. त्यानें बेंजॅमिन लंडी या क्वेकर पंथीय इसमाच्या मदतीनें 'जीनस ऑफ युनिव्हर्सल इमॅन्सिपेशन' या नांवाचें वृत्तपत्र सुरू केलें आणि गुलामांचा व्यापार करणाऱ्या इसमांविरुद्ध निषेधपर लेख लिहिले; त्यामुळें बेअब्रूच्या गुन्ह्याबद्दल त्याला कैदेची शिक्षा भोगावी लागली. *तेथून सुटल्यावर त्यानें बोस्टन येथें व्याख्यानमाला सुरू केली* आणि 'लिबरेटर' या नांवाचें वृत्तपत्र सुरू केलें (१८३१). १८३२ मध्यें त्यानें आपलें 'थॉट्स ऑन आफ्रिकन कॉलनायझेशन' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. आणि त्याच वर्षीं 'अमेरिकन अॅन्टी स्लेव्हरी सोसायटी' ही संस्था स्थापन केली. त्याच्या चळवळींची हळूहळू चांगली वाढ झाली आणि १८६५ मध्यें गुलामपद्धति कायद्यानें नष्ट झाल्यावर सदरहू संस्थाहि बंद करण्यांत आली.

**गरुड**—ससाणा, वगैरे पक्ष्यांच्या वर्गांतील एक पक्ष्यांची ही जात आहे. याची चोंच लांब व बळकट असते. तिला आरंभापासूनच बांक असतो. याचे पंख शेपटीच्या टोंकापर्यंत लांब असतात व याचे पाय बोटांपर्यंत पिसांनीं भरलेले असतात. इंग्लंडमधील गरुड सोनेरी असतो. ही जात सर्व उत्तर गोलार्धांत आढळते. हे पक्षी सर्व पदार्थ खातात.

हिंदु पुराणांतून विष्णुवाहन गरुडाचें बरेंच वर्णन आढळतें. विष्णूच्या देवळांतून गरुडाच्या मूर्तीहि दिसतात. पुराणांत गरुडाचें वर्णन खालीलप्रमाणें आहे : अर्धे मानव शरीर व अर्धे पक्ष्याचें शरीर असलेला गरुड हा सर्व पक्षांचा राजा होता. दक्षाची कन्या विनता, ही गरुडाची माता होय. गरुडाच्या मातेचें तिच्या कद्रुनामक ज्येष्ठ सवतीशीं भांडण होऊन सर्पांच्या कपटामुळें तिला दास्यत्व पत्करावें लागल्यामुळें तिला सर्पांबद्दल अतिशय द्वेष वाटे; तोच द्वेष गरुडाच्या मनांत वास करीत असल्यामुळें गरुड सर्पांचा कट्टा शत्रु झाला. गरुड इतका तेजस्वी होता कीं, तो जन्मताक्षणींच अग्नीसारखा भासल्यामुळें देवांनीं त्याची पूजा केली. गरुडानें देवांपासून अमृत चोरून नेलें. अमृत परत मिळविण्याकरितां इंद्रानें गरुडाबरोबर घोर युद्ध केलें व त्यानें नेलेलें अमृत परत मिळविलें.

**गरुडपुराण**—अठरा महापुराणांतील एक. हें पुराण वैष्णव पंथाचें आहे; यामध्यें गरुड पक्ष्यानें विष्णूच्या आज्ञेवरून विष्णूच्या माहिम्याचे वर्णन केलें आहे. जगदुत्पत्ति, आदित्यरूपी विष्णूची भक्ति, विष्णूची अमूर्त पूजा, शिव व इतर देवतांची पूजा व इतर समारंभ, वगैरे गोष्टी यांत आल्या आहेत. यांत सूर्यवंशी व सोमवंशी राजांच्या वंशावळी दिल्या आहेत. रामायण, महाभारत व हरिवंश यांतील माहिती यांत दिली आहे. तसेंच वैद्यक, साहित्यशास्त्र, व्याकरण यांचीहि माहिती दिली आहे. शिवाय सर्व प्रकारचीं माहात्म्यें–गयामहात्म्य (गयातीर्थाचें श्राद्धपक्षासंबंधीं महत्त्व) आणि प्रेतकल्प (मृतांच्या आत्म्याविषयींचे विधी) अशांसारखीं–या पुराणांपैकीं होत असें मानतात.

**गरुडस्तंभ**—हा ओरिसा प्रांतांत आहे. ओढ्या प्रांतावर पूर्वी केसरी घराणें राज्य करीत असतां, तें घराणें ब्राह्मणी धर्माचें असल्यानें त्यानें आपल्या राज्यांत व राजधानीच्या जयपूर या गांवीं अनेक देवळें, इमारती वगैरे बांधल्या. त्यांतच हा प्रचंड व कलाकुसरीचा खांब आहे. हा हल्लीं अरण्यांत आहे. केसरी घराण्याचें राज्य गेल्यानंतर मुसलमानांनीं हा पाडण्याचा प्रयत्न केला. परंतु तो पडला नाहीं. मात्र त्याच्या माथ्यावर बसविलेल्या गरुडाला त्यांनीं फोडून नाहींसा केला. हा खांब इ. स. दहाव्या शतकांत उभारला गेला आहे.

**गॅरेट, अलमायडा** (१७९८-१८५४)— एक पोर्तुगीज महाकवि, ग्रंथकार व मुत्सद्दी. हा प्रथम वक्ता म्हणून प्रसिद्धीस आला, नंतर त्याने नाटकें लिहिलीं. तो राज्यक्रांतिकारकांशीं संबंध ठेवीत असल्यानें त्याला हद्दपार व्हावें लागलें; पण त्यामुळें त्याचा वाङ्मयदृष्ट्या फायदाच त्याला. त्यानें 'कॅमोइज' नांवाचें राष्ट्रीय काव्य रचिलें. उदार मताबद्दल त्याला कैदहि भोगावी लागली. पोर्तुगालच्या स्वातंत्र्यासाठीं तो सैनिक बनला, त्यानें नवे कायदेहि तयार केले. पुढें तो पोर्तुगालचा परराष्ट्रीय वकील म्हणून कांहीं काळ काम करूं लागला. त्यानें पोर्तुगीज नाट्यसंस्था सुधारण्याची खटपट केली. पार्लमेंटांत कॉपीराइट बिल आणून मान्य करून घेतलें. हें बिल इतर राष्ट्रांनींहि नंतर उचललें. पुढे तो परराष्ट्रीय मंत्री झाला. त्याच्या ठिकाणीं अनेक गुण होते. 'फोलहास कॉहिडास' व 'फ्रेल्युइझ डी सूझा' यांसारखे त्याचे ग्रंथ याची साक्ष देतात.

**गरोडा**—एक अस्पृश्य जात. या लोकांची वस्ती राजपुताना व बडोदें ( बडोदें संस्थानांत लो. सं. सुमारें आठ हजार ) संस्थान यांतून आहे. हे दक्षिण गुजरात प्रांतातील भंगी लोकांखेरीज करून इतर सर्व अस्पृश्य जातींचे उपाध्याय आहेत. ते आपल्याला ब्राह्मण म्हणवितात. आपल्या कुलपुरुषानें गुरुभगिनीशीं विवाह केल्यामुळें आपला ऱ्हास झाला असें सांगतात. त्यांच्यांत असलेल्या दवे, जोशी, नागर, वगैरे नांवांवरून ते मूळचे ब्राह्मण असावेत. हे धेडांच्या पंक्तीला जेवतात, व वाटेल तें खातात. ब्राह्मणांप्रमाणें ते रोज जेवणापूर्वी स्नान करतात. ते राम, देवी व तुळस, वगैरे देवतांना भजतात. व ब्राह्मणाप्रमाणें व्रतोपवासहि करतात. कित्येक गरोडा लोक रामानंदी व परिणामी पंथाचे आहेत. यांच्यांत मृतांना जाळतात व श्राद्धविधि करितात. जातींतील भांडणें तोडण्यासाठीं पंचायती असतात.

**गरौली**—बुंदेलखंडांतील एक लहानशी सनदी जहागीर. क्षे. फ. ३९ चौ. मै.. १८१२ मध्यें दिवाण गोपाळासन बुंदेला याला दिलेल्या सनदेनें ब्रिटिश सरकारनें या संस्थानला मान्यता दिली. जहागिरींत १७ खेडीं आहेत. ११ चौ. मैल जमीन लागवडींत आहे व सु. ५०,००० रु. वसूल आहे. मुख्य ठिकाण गरौली हें धसाण नदीच्या कांठीं आहे.

**गर्ग**—१. वैदिक कालामध्यें गर्ग कुलाची स्थापना झाली व त्याचें श्रौत धर्मात थोडेंसें वैशिष्ट्य स्थापन झालें. गर्गत्रिरात्र नांवाची एक सोमसंस्था वेदग्रंथांत वर्णिली आहे. पुराणांत गर्गाचें स्वरूप निराळें दिसतें. कालयवन नांवाच्या एका परक्या जातीच्या शिष्याचा हा पुरस्कर्ता होता आणि त्यामार्फत कांहीं सामाजिक क्रांति घडवून आणणारा एक गर्ग दृष्टीस पडतो. याज्ञवल्क्याबरोबर वादविवाद करणारी प्रसिद्ध विदुषी गार्गी ही कोणत्या गर्गाची मुलगी असावी हें निश्चित होत नाहीं.

२. एक प्राचीन ज्योतिषी. यादवांचा उपाध्याय गर्ग व हा एकच कीं काय हें सांगतां येणार नाहीं. वराहमिहिरानें आपल्या ग्रंथांतून जागोजाग सर्व प्राचीन ग्रंथकारांच्या आधीं गर्गाचा उल्लेख केला आहे. यावरून गर्गसंहिता अत्यंत प्राचीन दिसते. गर्गाला ज्योतिषी मुहूर्तांच्या बाबतींत प्रमाण मानितात. वृद्ध गर्ग नांवाचा ज्योतिषी वेगळा दिसतो. याचाहि वराहमिहरानें अनेकदां उल्लेख केला आहे. तो वराहापूर्वी दोन-तीनशें वर्षें होऊन गेलेला दिसतो.

**गर्गे, शंकर काशीनाथ** ( १८८९–१९३१ )— नाट्यछटा हा नवीन लेखनप्रकार मराठी वाङ्मयांत सुरू करण्याचे श्रेय यांनाच आहे. 'दिवाकर' या नांवानें हे लिखाण लिहीत असत. १९०८ सालीं हे स्कूल फायनलची परीक्षा पास झाले व यांनीं पुण्यास फौजदार कचेरींत कारकुनाची नोकरी धरली. परंतु डोळ्यांच्या अंधपणामुळें यांना ती नोकरी सोडावी लागली. यानंतर नूतन मराठी विद्यालयांत हे शिक्षक झाले. यांच्या नाट्यछटा स्वतंत्र छापलेल्या आहेत.

**गर्दी**—( रायट ). इंग्लिश कॉमन लॉ कायद्यांत या शब्दाची व्याख्या अशी आहे कीं, तीन किंवा अधिक इसमांनीं विशिष्ट गुन्हा करावयाच्या इराद्यानें कांहीं विशिष्ट गुन्ह्याचें कृत्य केलें तर त्या गुन्ह्याला गर्दी ( Riot ) असें म्हणतात. 'रायट' हा सार्वजनिक स्वरूपाचा गुन्हा असून त्यामुळें सार्वजनिक शांततेचा भंग आणि सामान्य जनतेच्या मनांत भीति उत्पन्न करणें, या कृत्यांचा या गुन्ह्यांत अंतर्भाव होतो. पहिला जॉर्ज राजा याच्या कारकीर्दींत केलेल्या 'रायट ॲक्ट' या कायद्यांत अशी तरतूद आहे कीं, जेव्हां बारा किंवा अधिक इसम गैरकायदा एकत्र जमून सार्वजनिक शांततेचा भंग करतात, त्या वेळीं जस्टिस ऑफ पीस आणि त्या परगण्याचा शेरीफ, किंवा त्या शहराचा मेजर किंवा अधिकारी यांनीं त्या गर्दी करणाऱ्या लोकांना 'तुम्ही निघून जा' असा जाहीर हुकूम करावा. याप्रमाणें जाहीर हुकूम केल्यानंतर एक तासानंतरहि जे इसम तो हुकूम मोडून त्याच ठिकाणीं असतील त्यांनीं गर्दीचा गुन्हा केला आहे व त्याबद्दल त्यांच्यावर फौजदारी खटला चालवावा, असा कायदा आहे.

हिंदुस्थान—इंडियन पिनल कोडांत या गुन्ह्याची व्याख्या आहे ती: जर एखाद्या गैरकायदा जमावानें म्हणजे पांच किंवा अधिक इसमांनीं गुन्ह्याचें कृत्य करण्याच्या हेतूनें अत्याचाराचें कृत्य केलें, तर तो 'गर्दी' हा गुन्हा होय ( कलमें १४१, १४६ ). असा गैरकायदा जमाव जमून सार्वजनिक शांततेचा भंग होईल, असा संभव असेल तर क्रिमिनल प्रोसीजर कोडमध्यें मॅजिस्ट्रेटला किंवा पोलिसठाण्याच्या अधिकाऱ्याला विशेष कर्तव्य सांगितलें आहे. अशा जमावाला गर्दी मोडून निघून जा असा हुकूम या अधिकाऱ्यानें द्यावा, व तो हुकूम मानला नाहीं तर त्या अधिकाऱ्यानें पोलिसांकडून योग्य तो प्रतिकार करून गर्दी मोडावी आणि जरूर तर कांहीं इसमांना पकडून कैदेंत ठेवावें. या उपायांनींहि गर्दी मोडली नाहीं तर गर्दी मोडण्याकरितां लष्कराचा उपयोग करावा. मॅजिस्ट्रेटनें लष्करी अधिकाऱ्याला गर्दी मोडण्यास सांगितल्यावर, लष्करी अधिकाऱ्यानें शस्त्रांचा उपयोग करून गर्दी मोडावी व जरूर त्या इसमांना अटक करावी. हुकूम देण्यास मॅजिस्ट्रेट नजीक नसेल तर लष्करी अधिकाऱ्यानें अशा हुकुमावांचूनहि वरील उपायांनीं गर्दी मोडावी ( क्रिमिनल प्रोसीजर कोड, कलमें १२७ ते १३१ ).

**गर्नसी**—ब्रिटनच्या ताब्यांत असलेल्या 'चॅनेल बेटां' पैकीं एक बेट. त्याचा आकार त्रिकोणासारखा आहे. याचें क्षे. फ. १६,०१८ एकर आहे. पूर्व किनाऱ्यालगत, सेंटपीटर पोर्ट नांवाचें एक प्रसिद्ध शहर आहे. दक्षिण किनाऱ्याकडील वनश्री फार प्रेक्षणीय आहे म्हणून उन्हाळ्यांत बरेच लोक या ठिकाणीं जातात. भाजीपाला, बटाटे, द्राक्षें व फुलें, इ. वस्तू येथून बाहेर पाठविण्यांत येतात. राज्यव्यवस्थेच्या सोयीसाठीं हें बेट, ॲल्डर्नी, सार्क व हर्म या बेटांशीं जोडण्यांत आलें आहे. या बेटाचे १० भाग पाडण्यांत आले असून प्रत्येक ठिकाणीं एक धर्मगुरु असतो. गर्नसीमध्यें बऱ्याच पुराणवस्तू असून सेंट मिचेल व्हेल व पीटरपोर्ट येथील चर्चच्या जुन्या इमारती प्रेक्षणीय आहेत. १९४० सालीं जर्मन सैन्यानें हीं बेटें काबीज केलीं होतीं. पुढें १९४५ सालीं पुन्हां ब्रिटनकडे आलीं.

**गर्भपत्र**—( कार्पेल ). वनस्पतिशास्त्रांत एकपेशीमय गर्भकोश अथवा बीजकोश किंवा गर्भकोशाची अथवा बीजकोशाची एक पेशी व तिला संलग्न असलेला भाग. उदाहरणार्थ, कांहीं बाबतींत गर्भकोशास जोडून एक अरुंद पुढें आलेला भाग असतो तो गर्भधारणेच्यासमयीं रेत पिंड धारण करतो तो भाग. या सर्वांस गर्भपत्र असें म्हणतात. कांहीं वनस्पतींत गर्भाशय अथवा फल हें एक गर्भपत्रमय किंवा फलपर्णाचेंच असतें. अशा वेळीं त्यास साधें गर्भपत्र म्हणतात. जेव्हां त्यांत एकापेक्षां अधिक गर्भपत्रें असतात तेव्हां त्यांस संयुक्त गर्भपत्र म्हणतात. याला पानाचाच एक प्रकार मानतात.

**गर्भपात**—प्रसूतिशास्त्रामध्यें गर्भाची पूर्ण वाढ होऊन तो स्वतंत्रपणें अस्तित्वांत येण्यापूर्वीच गर्भाशयाच्या बाहेर पडल्यास त्या क्रियेस गर्भपात असें म्हणतात. ही क्रिया गर्भधारणेपासून २८ आठवड्यांच्या आंत केव्हांहि घडून येणें शक्य असतें. २८ आठवडे पूर्ण झाल्यानंतर मूल जन्मल्यास त्यास अपूर्ण वाढीचें म्हणतात. गर्भपात घडवून आणणें हा सर्व देशांत गुन्हा समजला जातो, व अशा क्रियेंत स्त्रीचा मृत्यु झाल्यास त्यास खून समजण्यांत येतो. मातेचा जीव वांचविण्यासाठीं किंवा तिची प्रकृति बरी राहावी म्हणून जो गर्भपात करण्यांत येतो तो गुन्ह्याच्या सदरांत पडत नाहीं.

**गर्भपाल रस**—हिंगूळ, नाग, वंग, तमालपत्र, वेलदोडे, त्रिकटु, शहाजिरे, देवदार, लोहभस्म हीं घेऊन विष्णुक्रांताच्या रसांत खलणें.

गर्भवती स्त्रियांना हें औषध अतिशय उपयोगी आहे. गर्भवात होण्याची संवय असणें, गर्भस्राव होणें, उपदंशाचें विष अंगांत असणें, गर्भाशय व बीजाशय यांची वाढ पूर्ण नसणें, इ. विकारांवर या औषधाचा चांगला उपयोग होतो. गर्भारपणांतील ओकाऱ्या, चक्कर, घबराट, डोकें दुखणें, कंबर दुखणें, गळून गेल्यासारखें वाटणें, हुषारी न वाटणें, इत्यादि विकारांत हें औषध दिल्यानें अतिशय फायदा होतो. हें १ ते ३ गुंजा लोणी अगर दूध व खडीसाखर यांतून देतात.

**गर्भाधान**—हिंदुधर्मशास्त्रांतील सोळा संस्कारांपैकीं एक. हा ऋतुदर्शनानंतर प्रथम पत्नीगमनापूर्वी करावयाचा असतो. हा संस्कार सर्व सूत्रकार सांगत नाहींत. गर्भाधानविधींत 'धातागर्भं दधातु ते' हा मन्त्र म्हणतात. त्यावरून ह्या संस्काराला गर्भाधान हें नांव पडलें असावें. पूर्वीचें नांव चतुर्थकर्म होतें. व तें विवाहाच्या चौथ्या दिवशी करीत असत. अर्थात् तेव्हां कन्या लग्नाच्या वेळीं उपवर असत. उपनिषदांत ह्या कर्माला पुत्रमंथ म्हटलें असून मनूनें निषेक ही संज्ञा वापरली आहे. स्त्रीक्षेत्राचें शुद्धीकरण व सुप्रजानिर्मिति हा दुहेरी उद्देश ह्या संस्काराचा आहे. पहिल्या सोळा दिवसांना ऋतुकाल म्हणतात. पहिले चार दिवस व पुढें अकरावा आणि तेरावा ह्या दिवशीं गमन वर्ज्य मानलें आहे. पुत्रेच्छूनें सम दिवशीं व कन्यार्थीनें विषम दिवशी गमन करावें, असें सांगितलें आहे.

**गर्भारपण**—याचा काल २७३ पासून २८० दिवसांचा असतो. या अवस्थेचा प्रारंभ रजःस्राव बंद होण्यापासून होतो. व आरंभीं किंचित् आजारी पडल्यासारखें वाटतें. हा आजारीपणा कांहीं आठवडे किंवा कांहीं महिनेहि असूं शकतो. दुसऱ्या व तिसऱ्या महिन्यामध्यें स्तनांमध्यें फरक पडलेला दिसूं लागतो व चवथ्या महिन्यांत पोट मोठें होऊं लागतें. व तें सारखें वाढत राहतें. १६ व्या किंवा १७ व्या आठवड्यामध्यें मातेस मुलाची हालचाल होत असल्याचें कळूं लागतें. १८ व्या आठवड्यापासून मुलाच्या हृदयाचे ठोके स्टेथॉस्कोपनें ऐकूं येऊं लागतात गर्भावस्थेमध्यें स्त्रियांनीं अन्नपचनाकडे विशेष लक्ष देणें अवश्य असतें. तसेंच नियमितपणें व्यायामहि घेत जावा. परंतु इतर बाबतींत सर्व व्यवहार शक्य तितके नेहमींप्रमाणें करीत जावे.

**गर्भाशय**—स्त्रियांच्या शरीरांत आढळणारें हें एक इंद्रिय असून तें मूत्राशय व गुदद्वार यांच्या मध्यभागीं असतें. या इंद्रियामध्यें गर्भ पूर्ण वाढ होईपर्यंत आणि बाहेर येईपर्यंत राहतो. कुमारी स्त्रीमध्ये याचा आकार पेरू किंवा नासपातीसारखा असतो, व त्याची लांबी सुमारें तीन इंच, रुंदी दोन इंच आणि जाडी एक इंच असून वजन दीड औंस असतें. याचें एक तिरपें द्वार योनीमध्यें असतें. रेतवाहक नालिकांतून गर्भांड गर्भाशयामध्यें प्रवेश करते. गर्भाशयावर एक रक्तजलमय आवरण असून मध्यभागीं स्नायुमय आवरण व त्याच्या आंतील बाजूस श्लेष्मल आस्तरण असतें.

**गर्भाशय भ्रंश**—हा रोग ज्या स्त्रियांस बरींच मुलें झालेलीं असतात अशांसच सामान्यतः होतो. परंतु कांहीं कुमारिकांच्या बाबतींत हा रोग क्वचित् झालेला आढळतो. याकरितां निजून विश्रांति घेणें अवश्य असतें. व संकोचक व थंड औषधें वैद्याच्या सल्ल्यानें टोंचून घेणें परिणामकारक होतें. तसेंच निरनिराळ्या गर्भाशयधारक पिशव्याहि वापरण्यांत येतात.

**गल**—हे एका जातीचे पक्षी असून यांची चोंच टोंकाशीं वांकलेली असते. यांचे पंख मोठे असतात; पाय बारीक असतात; तळवे सपाट असतात व मागील बोटें लहान असतात. समुद्रकांठीं असलेले हे पक्षी आकारानें मोठे असतात. व लहान आकाराचे जमिनीवर येतात. हे अट्टल पोहणारे व उडणारे असतात व बहुधा कळप करून राहतात. हे बहुधा मासे खाऊन राहतात व वाटेल तें प्राणिज अन्न खातात. हे फार अधाशी आहेत. हे वर्षांतून एकदां दोन ते चार अंडीं घालतात.

**गलगंड, गलग्रंथिवृद्धि**—(गोइट्र). हा रोग कांहीं डोंगराळ मुलुखांत सततचा असतो. उदाहरणार्थ, स्वित्झर्लंड, डर्बीशायर, वगैरे. या रोगामध्यें कंठग्रंथीची वाढ होऊन मानेच्या पुढील बाजूस एक मोठा गोळा उत्पन्न होतो. कंठग्रंथिस्राव हा प्रकृति नीट ठेवण्याला जरूर असतो. पण तो जास्त असल्यास असा रोग होतो व त्यामुळें नाडी जलद चालणें, घाम येणें, कांपरें भरणें, घाबरटपणा येणें, इ. लक्षणें होतात. हा रोग होण्याचें मुख्य कारण आयोडिनची कमतरता असून आयोडिन घातलें असतां हा रोग बरा होतो. याचा पुढला उपाय म्हणजे शस्त्रक्रियेनें ग्रंथी काढून टाकतात.

**गॅलवे**—आयरिश फ्री स्टेटमधलि एक बंदर. हें कॉनॉट परगण्यांत असून त्याची राजधानी आहे. कॅारिब नदीच्या मुखाशीं गॅल्वेच्या उपसागरांत हें बंदर आहे. या ठिकाणीं पुष्कळ देवळें व मठ आहेत. संगमरवरी दगडाला झिलई देण्याचे व दारूचे कारखाने आहेत. संगमरवरी दगड व धान्य बंदरांतून बाहेर जातें. बंदर चांगलें मोठें आहे. लो. सं. १३,२५५.

**गॅलॉट्झ, गॅलाटी**—रुमानिया, मोल्डेव्हियांतील एक बंदर. हें डान्युब नदीच्या कांठीं आहे. हें आरमाराचें व फौजेचें मुख्य ठिकाण आहे. शिवाय शहर व्यापाराकरितां विशेष महत्त्वाचें आहे. हें मोल्डेव्हियांत प्रवेश करण्याकरितां मुख्य बंदर आहे. येथें पुष्कळ सूत कातण्याच्या व कणिकेच्या गिरण्या आहेत. येथील बोटींचा व्यापार बहुतेक परकीयांच्या ताब्यांत आहे व त्यांत ब्रिटिश हे मुख्य आहेत. लो. सं. ९३,२२९.

**गॅलिक अम्ल**—(गॅलिक ॲसिड). मायाम्ल. मायफळांत, आंब्याच्या कोयींत आणि इतर कांहीं झाडांच्या चियांत हें अम्ल सांपडतें. टॅनिक अम्लांच्या विघटनानें हें तयार होतें. रंगासाठीं आणि शाई तयार करण्यासाठीं ह्याचा पुष्कळ उपयोग होतो. २१५° सें. ला ह्या अम्लापासून पायरोगॅलॉल तयार होतें.

**गॅलिपोली**—हें युरोपखंडांतील तुर्कस्तान, आड्रियानोपल विलायत (जिल्हा) मधील बंदर व मुख्य शहर. याच्या अगदीं समोर आशिया खंडांत लॅपसकी आहे. येथें रोमन व बायझन्टाइन काळांतील कांहीं अवशेष मात्र महत्त्वाचे आहेत. दीपगृह फार मजेदार दिसतें. गॅलिपोली द्वीपकल्प असून त्याला दोन बंदरें आहेत. दार्दानेलीसचें नाकें म्हणून १८५४ त फ्रेंच व ब्रिटिश फौजेनें घेतलें होतें. दार्दानेलीसची सामुद्रधुनी मार्मोराच्या समुद्रास जेथें मिळते तितका भाग गॅलिपोली येथील तोफांच्या टप्प्यांत येतो. पहिल्या जागतिक महायुद्धांत १९१५–१६ सालीं ब्रिटिश सैन्याला हें ताब्यांत ठेवतां आलें नाहीं. येथें कापूर, रेशीम, मोरोक्को कातडें, लोखंड व पेट्रोलियम यांचे कारखाने आहेत. शहराची वस्ती सुमारें २५,०००.

**गॅलिली**—हा रोमन प्रांत पॅलेस्टाईनमध्यें असून सुमेरियाच्या उत्तरेस आहे. येथील हेरॉड घराण्यांतील सत्ताधीश रोमचे मांडलिक होते. ख्रिस्ताचें बालपण, उपदेश व चमत्कार गॅलिलींतील होत. यरुशलेमचा नाश झाल्यावर राबी लोक गॅलिलीत येऊन राहिले. येथील जमीन सुपीक आहे. या देशांत धान्य, दारू, तेल, साबू, इत्यादि पदार्थ उत्पन्न होतात.

**गॅलिलीओ गॅलिली** (१५६४–१६४२)—एक सुप्रसिद्ध इटालियन ज्योतिषी. यानें दुर्बिणीच्या शोधानें ज्योतिषशास्त्रांत महत्त्वाची भर घातली. त्यानें १६१० त गुरुग्रहाचे चंद्र शोधून काढले; तसेंच सूर्यावरचे डाग दाखवून देऊन त्याची आपल्या सभोंवतीं फिरण्याची गति सिद्ध केली. त्याच्या ज्योतिषविषयक

शोधामुळें ख्रिस्ती धर्मगुरु व धार्मिक त्याचे शत्रू बनले. आपलें चुकलें असें त्याला न्यायालयांत सांगणें भाग पडलें. तो रोमहून निघून गेला. शेवटच्या आयुष्यांत त्यानें गतिशास्त्रांतील सिद्धान्त बसविले. त्याच्या सर्व ग्रंथांची २० भागांत एक आवृत्ति निघाली आहे (१८९०–१९०९). याचे सर्व लेख प्रथम (१८४२–१८५६) फ्लॉरेन्स येथें १६ विभागांत प्रसिद्ध झाले. मिसेस ओलनेचें 'दि प्रायव्हेट लाइफ ऑफ गॅलिलीओ' (१८७०) हें त्याच्या खासगी आयुष्यक्रमावर प्रकाश पाडणारें पुस्तक आहे.

**गॅले**—सिलोनच्या नैर्ऋत्य किनाऱ्यावरील एक बंदर व शहर. येथें झाडें अतिशय आहेत. १८६९ मध्यें सुएझचा कालवा सुरू झाला व कोलंबो येथे व्यापारी व टपाल जहाजें व डाकेचें जहाज हीं येऊं लागलीं. त्यामुळें या बंदराचें महत्त्व कमी झालें. लो. सं. ३८,४२४.

१४ व्या शतकाच्या मध्यांत हें शहर लहान होतें. पोर्तुगीज लोक येथें आल्यापासून या बंदराला महत्त्व आलें. पोर्तुगीज लोकांनंतर डच लोकांच्या ताब्यांत जेव्हां हें गेलें तेव्हा त्यांनी येथें तटबंदी केली. इंग्रजांनी डच लोकांपासून सीलोन १७९६ मध्यें जिंकलें. त्याच वेळीं गॅले हें इंग्रजांना मिळालें.

**गॅलेन** (१३०–२०१)—एक ग्रीक वैद्यकशास्त्रज्ञ. हा रोम येथें राजवैद्य होता. त्यानें शारीरशास्त्र आणि इंद्रियविज्ञान-शास्त्र या दोन विषयांवर अत्यंत उपयुक्त ग्रंथ लिहिले आहेत.

**गॅलेशिया**—आशिया मायनरमधील एका मोठ्या प्रदेशाचें हें जुनें नांव आहे. यांत गॉलिक लोक रहात असत. ख्रि. पू. ३ ऱ्या शतकांत ब्रेनसच्या नेतृत्वाखालीं गॉल लोकांच्या मोहिमांत हे सामील होते. पुढें हे लोक ग्रीकांच्या वर्चस्वाखालीं येऊन कांहीं ख्रिस्ती बनले. ऑगस्टसच्या कारकीर्दीत गॅलेशिया हा रोमन साम्राज्यांत समाविष्ट झाला.

**गल्फस्ट्रीम**—हा उपसागर-प्रवाह अटलांटिक महासागरांतला असून फार प्रसिद्ध आहे. मेक्सिकोच्या आखातांतून तो निघतो म्हणून त्याला सदरहू नांव देण्यांत आलें आहे. हा जलप्रवाह अस्तित्वांत येण्याचें कारण असें कीं, अटलांटिक महासागरांतील भूमध्यप्रदेशांतून पश्चिमेकडे जो जलप्रवाह वाहतो तो द. अमेरिकेच्या पूर्वेकडील भूशिराजवळ आल्यानंतर त्याचे दोन विभाग होतात. व त्यापैकीं एक जलप्रवाह दक्षिणेकडे ब्राझील देशाच्या किनाऱ्याच्या बाजूनें जातो; आणि दुसरा जलप्रवाह उत्तरेकडे कॅरेबियन समुद्राला मिळतो. नंतर तो मेक्सिकोच्या आखातांत शिरतो आणि पुढें फ्लोरिडाच्या खाडीमधून बाहेर पडतो आणि उत्तरेकडे वाहूं लागतो. अशा रीतीनें हा प्रवाह सं. संस्थानच्या किनाऱ्याला समांतर रेषेनें न्यू फौंडलंड बेटाच्या दक्षिण किनाऱ्यापर्यंत जाऊन नंतर लुप्त होतो. या जलप्रवाहाचें उष्णमान बरेंच असून पाण्याचा रंग निळीसारखा गर्द निळा असतो.

**गल्ल**—पूर्व आफ्रिकेंतील बलवान् हॅमिटिक लोकांना गल्ल म्हणतात. त्यांची लोकसंख्या ३० लाखांपेक्षां जास्त आहे. ते ॲबिसिनियाच्या मध्य भागापासून ब्रिटिश पूर्व आफ्रिकेंतील सॅवस्की नदीपर्यंतच्या मुलखांत राहातात. हल्लीं ॲबिसिनिअन साम्राज्याच्या मध्यभागाच्या दक्षिण प्रदेशाला गल्ल लोकांचा प्रदेश असें नांव आहे. कारण त्या भागांत गल्ल लोकांची वस्ती फार आहे. गल्ल लोकांचें कपाळ उंच, रंग पिंगट व केंस मऊ असतात. साधारणपणें त्यांचे चेहरे युरोपांतील लोकांप्रमाणें आहेत.

गल्ल लोक पशुपालवृत्तीचे असून त्यांची संपत्ति म्हणजे गुरें-ढोरें होत. मांस, दूध, दहीं व मध हे त्यांच्या आहाराचे पदार्थ आहेत. लढाईच्या वेळीं ते फार क्रूरपणाने वागतात. तरी ते आपलें वचन मोडीत नाहीत. त्यांच्यांत मुसलमानी व ख्रिस्ती धर्म प्रचलित असून शिवाय कांहीं मूर्तिपूजकहि आहेत. मनुष्याची उत्पत्ति सूर्यापासून झाली अशी त्यांची समजूत असून उत्तरेकडील गल्ल लोक सापांची पूजा करतात.

**गवंडी**—गवंडीकाम करणाऱ्या लोकांची या नांवानें ओळखिली जाणारी जात फक्त मुंबई इलाख्यांतच आहे. सागर व जिरे गवंडी मातीच्या देवाच्या मूर्ती करून विकतात. विजापूर-मधील गवंडी पूर्वीं मीठ तयार करीत असत. यांमध्यें (१) मराठे, (२) जिरे, (३) सागर अथवा कामाटी, (४) कानडी, व (५) चुनर, कडिया, संगर, किंवा गुजराती, अशा पांच पोटजाती असून एका पोटजातीचे लोक दुसऱ्या पोटजातीच्या लोकांशी विवाहसंबंध करीत नाहींत.

पुणें जिल्ह्यांत गुजराती, जाट, कामाटी, लिंगायत व परदेशी असे पांच पोटवर्ग आहेत. यांत बेटीव्यवहार होत नाहीं.

**गवत**—जेथे म्हणून जमीन आहे तेथें गवत हें असावयाचेंच. गवताची लागवड करावी लागत नसून तें आपोआप उगवत असल्यामुळें पृथ्वीवरील बराच मोठा भाग त्यानें व्यापलेला आहे. जनावरांना मुख्य आणि मुबलक चारा गवताशिवाय दुसरा नाहीं. कोंकणांत बरावर पांजरण घालण्याच्या कामीं त्याचा उपयोग करतात. पावसाळा सुरू झाला म्हणजे तें उगवतें व सुमारें सहा-सात महिन्यांनीं जून झाल्यावर कापलें जातें. कापून पडलेलें गवत वाळल्यानंतर त्याच्या मोठमोठ्या गंज्या रचून नंतर जरूरीप्रमाणे त्यांतून गवत काढून घेतात. हिंदुस्थानांत पुतनी, पवन्या, भातेण, उंडेण, घोडशाडा, शेंडे, मार्वेल, काळे, मळीचें, कुसळी, हिरा, कंदूर, रोशे, इ. गवताच्या मुख्य जाती आहेत. महाराष्ट्रांत काळें व मार्वेल हीं गवते उत्तम समजतात. आसाम व बंगाल इलाख्यांत हिरा गवताला फार महत्त्व आहे. कांहीं लोक हिऱ्याची धान्याप्रमाणें मशागत करतात. हिऱ्यापासून वाक निघून त्याचीं दोरखंडे व मासे धरण्याचीं जाळीं बनवितात.

गवत जाती—[ वर्ग-ग्रामिनासी ] तृणवर्ग. हा एकदल वनस्पतींचा फार मोठा वर्ग आहे. यांत २५० आणि ४५०० उपजाती येतात. यांपैकीं कांहीं गुरांस चारण्याच्या दृष्टीनें फार महत्त्वाच्या आहेत. या वर्गांतच सर्व धान्याची रोपें येतात. त्याप्रमाणेंच ऊंस, बांबू वगैरेहि या वर्गांतच मोडतात.

या वर्गांतील महत्त्वाच्या जाती म्हटल्या म्हणजे : १ पनीसी (ज्वारी, गिनीग्रास, इ.); २ अँड्रोपोगोनी (ऊंस, लेमन ग्रास, इ.); ३ फालारिडि (कॅनेरी ग्रास, व्हर्नल ग्रास, इ.); ४ ऑरिझी (भात); ५ स्टिपी (फेदर ग्रास, एस्पार्टो); ६ अॅग्रोस्टिडी (फॉक्सटेल ग्रास, बेंटग्रास, इ.); ७ मेडी (मका, जॉन्स टिअर्स, इ.); ८ अव्हेनी (ओट वगैरे); ९ फेस्टुसी (फेस्कु, कुरणांतील गवत, मान्नागवत, श्वपुच्छगवत, इ.); १० बांबूसी (बांबू); ११ होर्डी (गहूं, जव, राय, इ.).

सामान्यतः लोकभाषेंत गवत किंवा तृण हा शब्द गुरांच्या चाऱ्याला लावतात. तथापि तो तृणवर्गांत नसलेल्याहि कांहीं वनस्पतींना लावण्यांत येतो. उदा., रिबग्रास, स्कर्व्ही, आणि व्हिटलोग्रास. तसेंच कांहीं त्रिदळी वेलांचा उपयोग गुरांना चारा म्हणून करण्यांत येतो त्यांसहि गवत म्हणण्यांत येतें. उदा., क्लव्हर, साइन फॉइन.

**गवती चहा**--गवती चहास कोठें कोठें हिरवा किंवा ओला चहा म्हणतात. गवती चहा एक जातीचें गवत आहे. हें गवत हिरवेंगार असून खरवरीत असतें. पूर्वेकडील द्वीपसमूहांतील पुष्कळ बेटांत, सिलोनांत व हिंदुस्थानांत गवती चहा मुद्दाम बागांत लावितात. सिंगापूर व सिलोन येथें सुवासिक तेल काढण्याकरितां गवती चहा पुष्कळ लावितात. या गवताचा सुवासिक तेल काढण्याकडेच विशेष उपयोग होतो. 'कोलन वॉटर' तयार करण्यांत या तेलाचा फार खप होतो. तापांत घाम येण्यासाठीं गवती चहाचा काढा करून पाजतात.

**गवळी**—दूधदुभत्याच्या धंद्यावरून 'गवळी' हें नांव पडलेली जात फक्त मुंबई इलाख्यांतच आहे. अहिरांची माहिती स्वतंत्र दिली आहेच. दक्षिण हिंदुस्थान, कोंकण व कर्नाटक या भागांत हा धंदा करणारे स्वतंत्र जातीचे लोक आहेत. धनगर, कुरुबा, मराठी कुणबी, इत्यादि लोकांचा भरणा या जातींत बराच असून त्यांच्या धंद्यावरून ही एक स्वतंत्र जात झालेली आहे. यांमध्यें आठ पोटभेद असून त्या पोटभेदांतील लोक एकमेकांशीं रोटीबेटीव्यवहार करीत नाहींत. यांखेरीज कानडी 'गोपाल' किंवा 'गोला' हाहि गवळ्यांचाच एक पोटभाग आहे असें म्हणतात. या लोकांच्या पुष्कळ चालीरीती लिंगायतांप्रमाणें असून कांहीं खास लिंगायत झालेले आहेत. पुनर्विवाह व घटस्फोट या दोन्ही चाली यांमध्यें रूढ आहेत. हे लोक मांसाहारी असून त्यांचा सामाजिक दर्जा कुणब्यांहून वरचा आहे असें समजतात. यांची देवता कृष्ण ही होय. यांच्या कुलदेवता महादेव, खंडोबा, विठोबा इत्यादि आहेत. जंगम व ब्राह्मण त्यांचे उपाध्ये असतात. परंतु लग्नाच्या वेळीं ब्राह्मण असावाच लागतो. पुणें जिल्ह्यांत अहीर, कोंकणी, मराठा, नगरकर आणि वजरकर अशा पोटजाती आहेत. आसामांत गवळ्यांची संख्या चाळीस हजारांवर आहे. बिहारमध्यें ब्राह्मण गवळ्याच्या हातचें पाणी घेतात.

**गवा**—(बायझन). रानबैल. यांच्या दोन जाती आहेत.

(१) युरोपीय गवा—हा सध्यां लियुआनियामध्यें आढळतो. तो पूर्वी कॉकेशस पर्वतांत आढळत असे. पण अलीकडे तेथून नष्ट झाला आहे. (२) अमेरिकन गवा—हा आतां रानटी अवस्थेंत सांपडत नाहीं. पूर्वी हा पश्चिम कानडामध्यें पश्चिमेकडील संस्थानांत आढळत असे. त्याला चुकीनें रेडा म्हणत असत. या दोन्ही जाती बहुतेक सारख्याच असत. अमेरिकेंतील गवा सामान्य गोवंशांत प्रजोत्पत्ति करूं शकतो व अशी झालेली प्रजा वांझ न होतां पुन्हां प्रजोत्पत्ति करूं शकते.

**गवार**—एक फळभाजी. गवारीच्या चार जाती आहेत. शेतगवार ही जात कोरडवाहू शेतांत पावसाळ्यांत तुरीप्रमाणें पेरतात व तुरीसारखींच शेतगवारीचीं झाडें होतात. पावसाळ्याच्या शेवटीं शेंगा पिकून वाळल्या म्हणजे सबंध झाडें कापून खळ्यांत आणतात व दाणे तयार करतात. दाण्यांचा उपयोग भरडून, भिजवून जनावरांस घालण्याकडे करतात. कोंवळेपणीं शेंगांची भाजी करतात. बागाईत गवारीच्या १ माखाणिया, २ सडी अगर सोटि, व ३ लेंकुरवाळी अशा तीन जाती आहेत. २ री व ३ री या जाती मुंबईच्या उत्तरभागांत व गुजरातेंत करतात. महाराष्ट्रांतील लोकांस तिसरी जात माहीत आहे.

**गव्हला**—हें झाड फार मोठें होत नाहीं. याची उत्पत्ति उत्तर हिंदुस्थानांत होते. यांत एक सुगंधी जात आहे. तिचा सुवासिक तेलें, उदबत्या, अगरबत्या वगैरे करण्याकडे उपयोग होतो. गव्हला शीतल, व केशांना हितावह असून वांति, दाह, पित्त, ज्वर, वगैरे व्याधी दूर करणारा आहे. अम्लपितावर गव्हल्याचें चूर्ण साखरेबरोबर देतात.

**गॅसेंडी, पिएर** ( १५९२–१६५५ )—एक फ्रेंच तत्त्ववेत्ता आणि गणितशास्त्रज्ञ. त्यानें परमाणु ( अॅटॉमिक ) सिद्धान्ताचे व रिक्तावकाश सिद्धांताचें जोरदार प्रतिपादन केलें. त्यानें बरेच ग्रंथ लिहिले. यांशिवाय त्यानें विद्वानांचीं चरित्रेंहि लिहिलीं आहेत.

**गॅस्केल, एलिझाबेथ क्लेगहॉर्न** ( १८१०–१८६५ )—ही एक इंग्रज कादंबरीकार आहे. तिचें बालपण चेशायर परगण्यांत गेलें आणि तिचा विवाह १८३२ मध्यें झाला. तिनें महत्त्वाचे कथासंग्रह प्रसिद्ध केले ते मेरी बार्टन ( १८४८ ); लिझीलि; क्रॅन्फर्ड; हाउसहोल्ड वर्ल्ड; सिलिव्हियाज लव्हर्स आणि वाइव्हज् अॅन्ड डॉटर्स ( १८६६ ). शिवाय 'दि लाइफ ऑफ चार्लोटी ब्रॉन्टी' हें सुंदर चरित्र लिहिलें आहे ( १८५७ ).

**गहमबार**—पारशी लोकांचे सण. वर्षांतील सहा ऋतूंत हे सहा सण असतात. पहिला आर्दिबेनेश्ताच्या ११ व्या तिथीला ( १५ ऑक्टोबर ); दुसरा तीरच्या ११ व्या तिथीला ( १४ डिसेंबर ); तिसरा शेहनेवेरच्या २६ व्या तिथीला ( २७ फेब्रुवारी ); चवथा मेहेरच्या २६ तिथीला ( २९ मार्च ); पांचवा दयच्या १६ व्या तिथीला ( १७ जून ); व सहावा गाथाच्या १ ल्या तिथीला ( ३१ ऑगस्ट ).

**गहरवार घराणें**— कनोजचें गहरवार किंवा गहडवाल हें घराणें गौतम बुद्धाच्या वंशाची एक शाखा आहे असें दंतकथेवरून मानतात. पहिल्यानें गहरवार राजघराणें अस्तित्वांत असून याच घराण्यापासून राठोड घराणें उत्पन्न झाले असें कांहीं मानतात. गहरवार घराण्याची वंशावळ खालीलप्रमाणें आहे: ( १ ) महेन्द्रपाल ( इ. स. ९२१ ), ( २ ) दुसरा भोजदेव ( ९२५–५० ), ( ३ ) विनायकपालदेव ( ९५०-७५ ), ( ४ ) जयपाल, ( ५ ) यशोविग्रह ( विग्रहपाल ) ( सुमारें ९९१–१०५८ ), ( ६ ) महीचंद्र ( महीपाल ), ( ७ ) चंद्रदेव, ( ८ ) मदनपाल, ( ९ ) गोविंदचंद्र, ( १० ) पुत्र ( गोविंदचंद्राचा ), ( ११ ) जयचंद ( ११७०–११९३ ). या जयचंदाचे दिल्लीचा राजा पृथ्वीराज याशीं वांकडें आलें व त्याचा शेवट महंमद घोरीच्या हिंदुस्थानावरील स्वारींत झाला. ही कथा प्रसिद्धच आहे. जयचंदाच्या मृत्यूनंतर गहरवार घराणें रजपुतान्याच्या वाळवंटांत जाऊन राहिलें व पुढे त्याचा जोधपूर मारवाड वंश उदयास आला.

**गहाण**—सावकाराच्या कर्जफेडीकरितां जमीन किंवा इतर स्थावर मिळकत तारण लावून देतात, त्याला गहाण म्हणतात. सामान्यतः गहाणाचा व्यवहार दोन प्रकारचा असतो:— ( १ ) तारणगहाण म्हणजे तारण दिलेल्या स्थावर मिळकतीचा म्हणजे जमिनीचा किंवा इमारतीचा कबजा सावकाराला मिळत नाहीं, मात्र ठरलेल्या मुदतींत कर्जफेड न झाल्यास सदर मिळकत कोर्टांत दावा लावून विकून कर्जाऊ रक्कम व्याजासह व दाव्याच्या कोर्टखर्चासह वसूल करून घेतां येते; आणि ( २ ) दुसरा प्रकार कबजे-गहाण. म्हणजे गहाण मिळकत सावकाराच्या कबजांत देऊन त्याचें उत्पन्न खंड किंवा भाडें सावकारानें वसूल करून तें व्याज व मुद्दल यांच्या फेडीकरितां घ्यावें, आणि व्याजमुद्दलासुद्धां सर्व फेड झाल्यावर ती मिळकत मूळ मालकाच्या ताब्यांत परत द्यावी.

हिंदुकायदा— मनुस्मृतींत व कौटिल्य अर्थशास्त्रांत गहाणासंबंधीं फारसा उल्लेख नाहीं. पण याज्ञवल्क्य स्मृतींत व नारदस्मृतींत बरेंच विवेचन असून गहाण म्हणजे 'आधि' याचे याज्ञवल्क्यानें 'कालकृत आधि' व नारदानें 'गोप्य आधि' म्हणजे नुसतें तारण गहाण, आणि 'फलभोग्य आधि' किंवा 'भोग्य आधि' म्हणजे कबजे गहाण असे दोन प्रकार वर्णिले आहेत ( या. स्मृ. व्यवहाराध्याय, प्रकरण ३, श्लोक ६० ). ब्रिटिश अमदानींत 'गहाणाचा कायदा' ( ट्रान्सफर ऑफ प्रॉपर्टी अॅक्ट, कलमें ५८–५९ पाहा ) हा हिंदु व इंग्लिश कायद्याची भेसळ आहे. हल्लींच्या कायद्यानें गहाणाचे पुढील प्रकार आहेत: ( १ ) तारण गहाण ( सिंपल मॉर्टगेज ); ( २ ) गहाण खरेदी ( मॉर्टगेज बाय कंडिशनल सेल ); ( ३ ) कबजे गहाण ( युसुफ्रक्युअरी ऑर पझेसरी मॉर्टगेज ); आणि ( ४ ) इंग्लिश पद्धतीचें गहाण ( इंग्लिश मॉर्टगेज ). दुसरा प्रकार 'गहाण खरेदी' यांत गहाणदार सावकाराला गहाणवट मिळकत तात्पुरती विकतो, पण ठराविक मुदतींत कर्ज फेडल्यास ती मिळकत गहाणदाराला परत मिळते. चौथा प्रकार 'इंग्लिश मॉर्टगेज' या व्यवहारांत गहाण व्यवहाराचें लेखी खत न करतां मालकीहक्काचे कागदपत्र सावकाराच्या ताब्यांत दिले व कर्ज काढलें तर त्याला 'इक्विटेबल मॉर्टगेज' म्हणतात; व सदर व्यवहार तारणगहाणाप्रमाणें होतो.

**गहूं**—हें एक प्रकारचें पौष्टिक धान्य असून तें वैदिक काळापासून आजतागायत चालत आलेलें आहे. याला संस्कृत मध्यें गोधूम म्हणत असून त्याचा नामनिर्देश यजुर्वेद संहितेत आलेला आहे. जगांतील ऑस्ट्रेलिया खंड सोडून बाकीच्या चारहि खंडांत गव्हाची लागवड पुरातन काळापासून होत आली आहे. मिसर देशांतील नाईल नदीच्या कांठीं गव्हाचे विलक्षण पीक होतें. हिंदुस्थानांत याची लागण निरनिराळ्या काळीं होते. पांढरा व तांबडा अशा त्याच्या मुख्य दोन जाती असून शिवाय मऊपणा व कठिणपणा यांमुळें आणखी पोट जाती झाल्या आहेत. सिंधु व गंगा या नद्यांच्या कांठीं पिशी ( मऊ ) गव्हांचें मनस्वी पीक येतें. त्याशिवाय संयुक्त प्रांत व बिहार इकडे देखील पिशी गहूंच होतो. महाराष्ट्र व वऱ्हाड प्रांत

यामध्यें कठीण गहूं होत असून मुंबई इलाख्यांतील कांहीं भागांत आणि म्हैसूरपासून मद्रासपर्यंतच्या प्रदेशांत तो अतिकठिण असा निर्माण होतो; त्यास खपली गहूं म्हणतात. याशिवाय त्याचे दौंडी, जलालिया, काठिया, बक्षी, बनसी, पोपटिया, दाऊदखानी, ग्यामी, इत्यादि प्रकार आहेत.

गव्हाचें रोपटें अडीचपासून चार फुटांपर्यंत वाढतें. त्याला लांब व अरुंद पानें असतात. रोपट्याच्या शेंड्याला जी एक लोंबी पडते त्यांतच गहूं असतात व ते मळणीच्या द्वारें बाहेर काढून घेतात.

एका जातीच्या सूक्ष्म कृमींपासून (टायलेंकस ट्रिटिसि) 'जांभा' (पर्पेल्स) हा रोग गव्हांच्या कणसांवर उत्पन्न होतो. या रोगावर शंभर भाग पाण्यांत एक भाग गंधकाचा तेजाब (सल्फ्युरिक ॲसिड) तयार केलेलें मिश्रण पिकावर शिंपडलें असतां रोगाचा नायनाट होतो.

१९४०-४१ सालीं जगांत १०८ कोटी क्विंटल इतका गहूं तयार झाला. पहिला रशिया, दुसरा अमेरिका व तिसरा हिंदुस्थान असा क्रम गव्हाच्या उत्पादनाबाबत लागेल. १९४३-४४ सालीं ११ कोटी २१ लक्ष क्विंटल गहूं हिंदुस्थानांत पिकला.

**गळसुटें**—(क्विन्सी). गलग्रंथिदाह रोग होऊन गेल्यानंतर गलग्रंथींच्याभोंवतीं असणाऱ्या पेशींवर गळूं झालें असतां त्यास हें नांव देण्यांत येतें. यास घशांतील गांठींचा तीव्र दाह म्हणतां येईल. यामध्यें गळा बराच सुजतो व त्याबरोबर टाळू व पडजीभहि सुजते. घशांत दुखूं लागतें. आणि तोंड नीट उघडतां येत नाहीं आणि कांहीं गिळतां येत नाहीं. आवाज बदलतो, ताप चढतो आणि अस्वस्थता वाटूं लागते. जेव्हां गळूं तयार होतें तेव्हां तें फोडून बरें करणें हाच त्यावर उपाय असतो. प्रत्येक वेळीं पू काढून टाकून गुळण्या करून तोंड स्वच्छ धुणें अवश्य असतें व रोग्यास शक्ति राहण्याकरितां पौष्टिक औषधें देणें आवश्यक असतें.

**गळानें मासे धरणें**—गळाला एखादा किडा, लहान मासा, वगैरेसारखें आमिष लावून मासे धरण्याची पद्धति फार प्राचीन कालापासून प्रचलित आहे. प्राचीन ईजिप्तमध्यें ती प्रचलित होती. जुन्या करारांत व ग्रीक, लॅटिन अभिजात वाङ्मयांत या गोष्टीचे उल्लेख आढळतात. याकरितां एक लांब काठी, दोरी, आंकडा व आमिष इतक्या वस्तू लागतात. काठ्या निरनिराळ्या लांकडाच्या व निरनिराळ्या आकाराच्या असतात. दोरी बहुधा घोड्यांच्या केसांची व रेशमाची केलेली असते. ती गुंडाळण्याकरितां एक रीळ मुठीजवळ बसविलेलें असतें. ही दोरी काठीच्या टोंकाजवळील डोळ्यांतून गेलेली असते व तिच्या शेवटीं बारीक आंतड्याची दोरी असून तिला कृत्रिम किंवा खरें आमिष अडकविलेलें असतें. या आमिषाचा रंग व प्रकार हे स्थलकालमानानुसार निरनिराळे असतात.

**गळिताचीं धान्यें**—हिंदुस्थानांत गळिताचीं धान्यें अजमासें अकरा आहेत. त्यांपैकीं जवस, सरसव, मोहरी, तीळ, भुईमूग, करडई, एरंड, हीं मुख्य होत. यांशिवाय मोहा, करंज, निंब, बिब्बा, काजू, वगैरे झाडाच्या बीजांपासून तेल काढतात. खोबरें व सरकीचें तेल हीं स्वच्छ करून त्यांचा अमेरिकेंत लोण्याप्रमाणें उपयोग करतात. हिंदुस्थानांत दरवर्षी वीस कोटी पंचाहत्तर लक्ष किंमतीचीं गळिताचीं धान्यें व तेलें काढतात. यांपैकीं अदमासें एकतृतीयांश माल परदेशीं रवाना होतो, व बाकीचा माल या देशांत खपतो. अलीकडे परदेशी भुईमुगाचा बराच फैलाव झाला आहे. याचें मुख्य कारण जास्त उत्पन्न व या जातींना रोगांची फारशी बाधा होत नाहीं हें होय. हें पीक मद्रास व मुंबई इलाखा, ब्रह्मदेश या ठिकाणीं फार महत्त्वाचें आहे व इतर प्रांतांत याचा पेरा तुजबी आहे. सुमारें दीड-दोन कोटी एकर जमीन या गळिताच्या धान्यांनीं व्यापली आहे.

**गळूं**—शरीरावर एखाद्या ठिकाणीं सूज येऊन त्यांत अशुद्ध रक्तमिश्रित पू होणें यास गळूं म्हणतात. पूवोत्पादक जंतूंचा रक्तविकारामुळें शरीरांत उद्भव होणें किंवा अन्यमार्गानें त्या जंतूंचा शरीरांत प्रवेश होणें हीं गळूं होण्याचीं मुख्य कारणें होत. गळूं सुरुवातीस लहान असून तें पुढें वाढत जातें व शेवटीं बिलबिलीत आणि पिवळसर होऊन फुटतें. फुटल्यानंतर पू बाहेर निघून जखम बरी होऊं लागते. पुवाचा निचरा बरोबर न झाल्यास त्याच्यावर तूपसाखर अगर गुलमुस्ताचें पान एरंडेल तेल लावून ऊन करून बांधतात. गळूं पिकून आपोआप न फुटलें व जास्त त्रास देऊं लागलें तर त्याच्या खालच्या बाजूस एक चीर पाडावी म्हणजे जास्त रक्तवाहिन्या न तुटतां सर्व पू निघून जाईल.

गळूंवर घरगुती उपाय बरेच आहेत. तें लवकरच पिकून फुटून जाण्यासाठीं त्याला कोरड्या फडक्याच्या बोळ्यानें शेकतात; किंवा गळशी, गव्हाचें पीठ, कांदा, कडुलिंबाचीं पानें, वगैरे पदार्थांपैकीं कोणत्याहि एकाचें पोटिस करून तें गरम आहे तोंपर्यंतच गळवावर ठेवून फडक्यानें बांधतात. या उपायानें तें दोन-तीन दिवसांतच पिकतें.

शरीरावर वरीच गळवें होत असल्यास सर्व रक्त नासलें आहे असें समजून औषध टोंचून घालावें. अतिनीललोहित किरणांचा उपचारहि उपयोगी पडतो.

**गॉंकूर, एदमॉंद** (१८२२-१८९६) व **ज्यूल्स द** (१८३०-१८७०)—हे फ्रेंच कादंबरीकार असून त्यांनीं ऐतिहासिक आणि चरित्रपर व इतर विषयांचींहि पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांत १८ व्या शतकाची आणि विशेषतः राज्यक्रांतीच्या काळाची हकीगत आणि चरित्रें आहेत.

**गागाभट्ट**—एक संस्कृत पंडित व ग्रंथकार. याचें घराणें मूळचें पैठणचें. पण दुर्गादेवीच्या दुष्काळांत काशीस जाऊन राहिलें. गागाभट्टाचा बाप दिनकरभट्ट याचे बारा ग्रंथ 'दिनकरोद्योत' नांवाचे प्रसिद्ध आहेत. गागाभट्टाचें खरें नांव विश्वेश्वरभट्ट होतें. यानेंहि चांगली विद्या करून घराण्याचें नांव राखलें. १६७३ त गागा दक्षिणेंत आला व पुढील सालीं त्यानें शिवाजीला अनेक विद्वान् शास्त्रीपंडितांच्या अनुमतीनें शास्त्रोक्त राज्याभिषेक केला. याचा चुलता कमलाकरभट्ट यानें रचलेला 'निर्णयसिंधु' अद्यापि प्रमाणग्रंथ मानला जातो.

**गांगेय शक**—कलिंगनगर (म्हणजे मद्रास इलाख्याच्या गंजम जिल्ह्यांतील पर्लाकिमेडीपासून २० मैलांवर असलेलें मुखलिंग) येथें राज्य करणाऱ्या गंगावंशी राजांच्या कित्येक दानपत्रांत हा शक दिलेला आढळून येतो. उदा., सत्यवर्मदेवाचें ३५१ सालचें व अनंतवर्मदेवाचें ३०४ सालचें दानपत्र. यावरून ह्या शकाचा प्रवर्तक कोणी तरी गंगावंशी राजा असला पाहिजे असें अनुमान निघतें. गांगेश शक ८७ हा इ. स. ६३३ नंतर थोड्याच वर्षांनीं आला असावा व म्हणून त्या शकाचा आरंभ इसवी सन (६३३-८७=) ५७६ नंतर लवकरच पुढें केव्हां तरी झाला असावा असें अनुमान निघतें.

**गाग्रौन**— राजपुताना, कोटा संस्थानच्या कनवास जिल्ह्यांतील एक किल्ला व खेडें. अहू व कालीसिंध नद्यांच्या संगमावर हें वसलेलें आहे. हा किल्ला राजपुतान्यांत सर्वांत भक्कम असून दोड रजपुतांनीं बांधिला आहे. १२ व्या शतकाच्या अखेरीस यांच्याच ताब्यांत होता.

गांवाभोंवतीं व किल्ल्याभोंवतीं एक उंच भिंत असून शिवाय खंदक आहे. हा गांव प्राचीन आहे. ह्यास गर्गाशास्तर म्हणत असत. कारण श्रीकृष्णाचा पुरोहित गर्गाचार्य येथें राहत असे अशी समजूत होती. कोणी म्हणतात ह्या गांवास गर्गरातपुर म्हणत असत. गर्ग नामक हिंदु ज्योतिषानें येथूनच रेखांश मोजण्यास सुरुवात केली. कोटा दरबारची पूर्वी येथें टांकसाळ होती. येथून आग्नेयीस ११ मैलांवर मऊ नांवाचें खेडें आहे. हें सुरुवातीस खींची रजपुतांच्या राजधानीचें शहर होतें. पश्चिमेस एक मोठा पडका वाडा आहे. तो पृथ्वीराज चव्हाणाचा आहे असें म्हणतात.

**गाजर**—या रोपाचें मूलस्थान काश्मीर आहे. पश्चिम हिमालयावरहि ५,००० फुटापासून ९,००० फूट उंचीवर हें रोप वाढतें. युरोप, ॲबिसीनिया, उत्तर आफ्रिका, मदिरा, अझोर्स बेटें व उत्तर आशिया हीं देखील या रोपाचीं मूलस्थानें आहेत, असें मानण्यांत येतें.

सबंध हिंदुस्थानभर या रोपाची लागवड होते. याचें रोप जमिनीवर दोन किंवा तीन इंच वाढतें. गाजर कंदासारखें जमिनींत होतें. झाड हात सवा हात वाढतें. ह्यांचें उत्पन्न बाराहि महिने होतें.

हिरवीं गाजरें भाकरीबरोबर खातात व त्यांची भाजीहि होते. गरीब लोक दुष्काळांत गाजरांवरच दिवस काढतात. गाई-म्हशी वगैरे जनावरांस गाजरें चारलीं असतां तीं पुष्ट होऊन दूध बरेंच देतात. गाजरांमध्यें साखरेचा अंश बराच असल्यानें त्यांपासून साखर काढण्याचे प्रयत्न झालेले आहेत.

**गांजा**—गांजाचें झाड चार-पांच हात वाढतें. त्यास जे तुरे येतात त्यांस गांजा म्हणतात; गांजा वाळल्यावर जो चुरा राहतो तो भांग या नांवानें ओळखला जातो. गांजाचे मुख्य प्रकार म्हणजे—गोल गांजा, चापट गांजा व रोटा गांजा. हा चिलमींत घालून ओढल्यानें एकप्रकारची तंद्री लागते. गांजाचा उपयोग योग्य प्रमाणांत केल्यास एकाग्रतेस याची मदतच होते. यासाठींच बैरागी, हटयोगी, वगैरे परमार्थी लोक गांजा ओढतात; मात्र प्रमाणाबाहेर तो ओढल्यास जिवास धोकाहि पोंचण्याचा फार संभव असतो.

गांजाचीं झाडें खानदेश, मध्यप्रांत, अहमदनगर, सातारा, वगैरे भागांत सांपडतात.

अतिसार व श्वास या रोगांवर गांजा गुणकारी आहे. अतिसारावर गांजाची पूड साखरेंतून द्यावी व श्वासावर गांजाची राख मधांतून द्यावी.

**गाजीउद्दीनखान**—१. एक मुसलमान सरदार. याला अलमगीर बादशहानें फीरोजजंग हा किताब देऊन अमीर पदावर चढविलें (इ. स. १६८७). याचाच मुलगा हैद्राबादच्या गादीचा संस्थापक प्रख्यात निझाम-उल्-मुल्क होय. बहादूर-

शहाच्या कारकीर्दींत गाजीउद्दीन गुजराथचा सुभेदार झाला व पुढें अहमदाबाद येथें १७१० त मरण पावला.

२. (मृ. १७५२). हा प्रख्यात निजाम-उल्-मुल्क याचा वडील मुलगा असून याला महंमदशहानें नादिरशहाच्या स्वारीनंतर अमीर-उल्-उमरा करून फिरोजजंग हा किताब दिला होता. निझामानें याला दिल्लीस ठेविलें होतें. व आपण दक्षिणेंत आला होता त्या वेळीं त्यानें बादशहाकडून याला मीर बक्षीगिरी देवविली. इ. स. १७४८ त निझाम-उल्-मुल्क मरण पावल्यानंतर दक्षिणेंत जाऊन हैद्राबादचा नबाब होण्याची याची फार इच्छा होती. परंतु इ. स. १७५२ पर्यंत महंमदशहानें त्याला परवानगीच दिली नाहीं. याचें व मराठ्यांचें चांगलें सख्य होतें. हा दिल्लीस वजीर असल्यानें मराठ्यांच्या विरुद्ध इतर मुसलमान कांहीं करूं शकले नाहींत. पुढें नासिरजंग मरण पावल्यावर गाजीउद्दीन हा मराठ्यांच्या हिंमतीवर निघाला; तो औरंगाबादेस आला. त्याच्याबरोबर मोंगली सैन्य व मराठ्यांच्या मदतीस आलेलें सैन्य मिळून दीड लाख फौज होती. निजाम-उल्-मुल्कचा हा वडील मुलगा असल्याकारणानें त्याच्या हक्काबद्दल कोणी शंका घेत नव्हते. परंतु गाजीउद्दीनचें नशीब निरालेंच होतें. त्याचा सावत्र भाऊ निजामअल्ली याच्या आईनें त्याला मेजवानीस बोलविलें असतां हा तेथें गेला; व त्या वेळीं त्याला विषप्रयोग करण्यांत आला.

३. दुसऱ्या गाजीउद्दीनखानाचा मुलगा बापाच्या मृत्यूनंतर (१७५२) दिल्लीच्या अहमदशहा बादशहानें याला अमीर-उल्-उमरा नेमून इमाद-उल्-मुल्क गाजी-उद्दीनखान अशी पदवी दिली. यानेंच पुढें दिल्लीचा वझीर होऊन अहमदशहास कैद केलें व त्याचे डोळे काढले. दुसऱ्या अलमगीरचा खून करविणारा हाच गाजीउद्दीन होय. 'मासिर-उल्-उमरा' ग्रंथावरून पहातां तो १७७३ त दक्षिणेंत जाऊन माळव्यांत एक जहागीरदार बनला; नंतर सुरतेस जाऊन कांहीं दिवस इंग्रजांसमवेत राहिला व शेवटीं मक्केच्या यात्रेस गेला, असें आढळतें. कोणी म्हणतात तो १८०० त कराची येथें मरण पावला. गाजीउद्दीन हा प्रख्यात फारशी कवि व ग्रंथकार होता.

**गाझीपूर**—संयुक्त प्रांत, बनारस विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १३०६ चा. मैल. यांतून गंगा नदी वाहते, व तिच्या दोन्ही किनाऱ्यांवरील जमीन सपाट व सुपीक आहे. लोकवस्ती फार दाट आहे; ती १९४१ सालीं ९,८५,३८० होती. शें. ७१ लोक शेतकरी आहेत. भाषा बिहारीची एक पोटभाषा भोजपुरी म्हणून आहे. पाऊस ४० इंच. साखरेचे कांहीं कारखाने आहेत. मुख्य पीक तांदुळाचें. ओसाड जमिनींत सज्जीखार सापडतो. हा जिल्हा पूर्वी मगध साम्राज्यांत मोडत असे. ११९४ त गुलाम घराण्याचा पहिला राजा कुतुबुद्दीन यानें बिहाराबरोबर हा प्रदेश जिंकून घेतला. १३३० सालीं मसाऊद गाझीनें गाझीपूर हें नांव शहराला दिलें. मोंगलाईंत अलाहाबाद सुभ्यांत हा जिल्हा मोडत असे. नंतर अयोध्येच्या सुभेदाराकडून बनारसच्या राजानें हा बळकावला व १७७५ त बनारसबरोबर हा इंग्रजांकडे आला. यांत ऐतिहासिक वास्तू अनेक आहेत.

शहर फार जुनाट असून पडका तट, मशिदी व इमारती दृष्टीस पडतात. लॉर्ड कॉर्नवॉलिस याचें थडगें येथें आहे. येथें अफूचा मोठा व्यापार चालतो.

**गॉटशेड, जोहान ख्रिस्तोफ** (१७००-१७६६)—हा जर्मन लेखक पुष्कळ वर्षे जर्मनींत वाङ्मयक्षेत्रांत रसिकांचा मार्गदर्शक झाला होता. १७२८ मध्यें त्यानें आपला 'भाषालंकारशास्त्र' हा निबंध प्रसिद्ध केला, आणि १७२९ मध्यें 'काव्याची चिकित्सात्मक कला' हा निबंध प्रसिद्ध केला. १७३० मध्यें त्याचा प्रसिद्ध ग्रंथ 'जर्मन भाषा, काव्य व वक्तृत्व यांच्या चिकित्सात्मक इतिहासासंबंधीं साधनें' असा होता. आणि नंतर 'तत्त्वज्ञानातील मूळ सिद्धान्त' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला.

**गॉटिन्जेन**—युरोप, प्रशियांतील एक शहर. हें हॅनोव्हर प्रांतांत लीन नदीवर वसलें आहे. येथें दुसऱ्या जॉर्ज राजानें १७३४ सालीं स्थापिलेलें विद्यापीठ आहे. लोंकरी कापड, रसायनें, शास्त्रीय उपकरणें व यंत्रें येथें तयार होतात. हें एक मोठें प्रकाशन-केंद्रहि आहे. लो. सं. ३७,५९४.

**गांठी**—एक किंवा अनेक दोऱ्या किंवा दोरखंड वगैरे घेऊन त्या एकत्र बांधण्याकरितां जी त्यांची रचना केली जाते तिला ग्रंथि किंवा गांठ म्हणतात. याचे अनेक प्रकार निरनिराळ्या कार्यांप्रमाणें करावे लागतात. कांहीं प्रकार असे:—निर्गांठ, सुरगांठ, फास, कोळयांची गांठ, ओंडका किंवा लाटगांठ

( टिंचर हिच ), नालगांठ ( शूबेंड ), एकेरी भिंतगांठ ( सिंगल वॉल नॉट ), दुहेरी भिंतगांठ ( डबल वॉल नॉट ), वगैरे प्रसिद्ध आहेत.

[ १ अश्ववळसा गांठ. २ चाडे गांठ. ३ वर गाठ. ४ आठ गांठ ( पवित्रक गांठ ). ५ लवंग गांठ. ६ ओंडका ( लाट ) गांठ. ७ कोळ्याची गांठ. ८ वळण गांठ. ९ दुमड गांठ. १० आसूड गांठ ( ताईत गांठ ). ११ नावाडी गांठ. १२ एकेरी भिंत गांठ. ]

**गांठी**—( ग्लॅन्ड्स ). प्राण्याच्या शरीरांतील हे एक प्रकारचे घटक आहेत. यांपैकीं कांहीं रक्तांतील कांहीं द्रव्य घेऊन वाढतात, व त्यांचीं विशिष्ट गात्रें बनतात. हें रक्तांतील द्रव्य द्रव स्वरूपाचें असून तें कांहीं वाहिन्यांतून मुख, जठर, आंत्र वगैरेंसारख्या पोकळ गात्रांमध्यें जमत जातें किंवा अवाहिनीयुक्त ग्रंथीमध्यें तें पुन्हां रक्तांत मिसळून शरीरामध्यें पसरतें. शरीरांतील निरनिराळ्या द्रव्यांचें पोषण व शरीराची वाढ होणाऱ्या क्रियेचें नियमन करणारीं जीं रासायनिक हर्मोनसारखीं द्रव्यें असतात तीं या रक्तजन्य द्रव्यांचीं उदाहरणें होत. मनुष्याच्या शरीरामध्यें दोन अश्रुजनक ग्रंथी असतात. त्या वरच्या पापणीच्या खालीं डोळ्याच्या अगदीं बाहेरच्या कोनांत असतात. सहा लालाग्रंथी असतात. यांचें कार्य तोंडामध्यें द्रव उत्पन्न करण्याचें असतें. या तोंडाच्या दोन्ही बाजूंस तीन तीनप्रमाणें खालच्या जबड्याच्या मागें व खालच्या बाजूस असतात. दोन कर्णमूलग्रंथी असतात. दोन जबड्याखालील किंवा अनुलाला ग्रंथी असतात. दोन अधोजिव्हाग्रंथी असतात, व दोन स्तनग्रंथी अथवा दुग्धग्रंथी असतात. या स्त्रियांच्या स्तनांत असतात. यांखेरीज यकृत्, पित्ताशय, दोन मूत्राशय आणि अनेक लहान लहान चर्मग्रंथी शरीरामध्यें जठरांतील अंतस्त्वचेमध्यें, आंतड्यामध्यें आणि बहुतेक पोकळ इंद्रियांमध्यें असतात. वाहिनीविरहित ग्रंथींमध्यें मुख्य म्हटल्या म्हणजे कंठग्रंथी, गलग्रंथी, मूत्राशयोर्ध्वग्रंथी, श्लेष्मग्रंथी या असून यांशिवाय अनेक लहान लहान ग्रंथी असतात. या ग्रंथींपेक्षां लसिकाग्रंथी या निराळ्या प्रकारच्या असतात. याखेरीज प्लीहा, वगैरे रक्तग्रंथी वेगळ्याच असतात. वनस्पतीमध्येंहि त्यांच्या पृष्ठभागावर कांहीं निरनिराळ्या ग्रंथी असतात व त्यांतून द्रव बाहेर पडत असतो.

**गाडगीळ,' धनंजय रामचंद्र** ( १९०१- )— एक हिंदी अर्थशास्त्रज्ञ. यांचें शिक्षण नागपूर येथें पटवर्धन हायस्कूल व क्वीन्स कॉलेज ( केंब्रिज ) मध्यें झालें. १९२४–२५ मध्यें हे मुंबई सरकारच्या फायनान्स खात्यांत असिस्टंट सेक्रेटरी होते. १९२५ ते १९३० मध्यें हे सुरत येथील कॉलेजचे प्रिन्सिपाल होते. हे मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो आहेत. तसेच भारत महिला विद्यापीठ व पुणें-मुंबई विद्यापीठ यांचे फेलो व सिंडिक आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे बरींच वर्षें खजिनदार होते. यांचे श्वशुर रा. ब. रावजी रामचंद्र काळे यांच्या देणगींतून स्थापन झालेल्या 'गोखले स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स अॅन्ड पॉलिटिक्स' संस्थेचे हे डायरेक्टर आहेत. या संस्थेमार्फत हे आर्थिक व राजकीय विषयांचे संशोधक निबंध व ग्रंथ प्रसिद्ध करतात. यांनीं हिंदुस्थानचा औद्योगिक विकास, मुंबईची जमीनमहसूल-

पद्धति, हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांचे पगार, साम्राज्य पक्षपात व हिंदुस्थान, फळांची विक्री, वगैरे ग्रंथ इंग्रजींत लिहिले आहेत. मुंबई सरकारनें पुरस्कारलेल्या महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालयाचे ते अध्यक्ष असून रिझर्व बँकेचे एक सल्लागार आहेत. अनेक सरकारी समित्यांत त्यांची नेमणूक झाली आहे. हिंदुस्थानांतील पहिल्या श्रेणींतील अर्थशास्त्रज्ञ म्हणून यांचा लौकिक आहे.

**गाडगीळ, नरहर विष्णु** (१८९६- )—एक हिंदी पुढारी व मंत्री. जन्म राजपुतान्यामध्यें मल्हारगड येथें झाला. यांचें शिक्षण नीमच, मुंबई, बडोदें, पुणें (फर्ग्युसन कॉलेज) या ठिकाणीं झालें. यांचे पूर्वज अक्कलकोटमध्यें दिवाणगिरीवर होते व त्यांनीं पेशव्यांच्या दरबारीं अनेक कामें केलीं. १९२० मध्यें यांनीं पुण्यास वकिली सुरू केली. १९२१ ते १९२४ पर्यंत हे पुणें जिल्हा काँग्रेस कमिटीचे कार्यवाह होते. १९२१ ते १९३२ पर्यंत हे जुन्या प्रांतिक काँग्रेस कमिटीचे सभासद होते व १९३१ मध्यें महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. सत्याग्रहाच्या चळवळींत यांस प्रथम एक दिवस, नंतर दोनदां सहा महिने व एकदां वीस महिन्यांची अशा शिक्षा झाल्या व दंडहि झाले. मुंबई इलाख्यांत त्यांनीं तरुणांची संघटना चळवळ सुरू केली. १९२८ ते १९३२ मध्यें हे मुंबई इलाखा युवक संघ (यूथ लीग) चे उपाध्यक्ष होते व त्याच काळांत पुणें येथील संघाचे अध्यक्ष होते. खार व नाशिक येथें भरलेल्या युवक परिषदांचे ते अध्यक्ष होते. जी. आय्. पी. रेल्वे कामगार संघाचे पुणें शाखेचे १९३० पासून बरींच वर्षे अध्यक्ष होते. १९२८-३२ पर्यंत ते पुणें म्युनिसिपालिटीचे सभासद होते. १९३५ मध्यें ते मध्यवर्ती विधिमंडळामध्यें निवडून गेले. १९४२ मध्यें यांना अटक झाली. नंतर १९४५ त सुटका होऊन ते पुन्हां मध्यवर्ती विधिमंडळांत निवडून आले. १९४७ सालीं हिंदुस्थानाला स्वराज्यदान झाल्यावर पहिलें मंत्रिमंडळ जें स्थापन झालें त्यांत गाडगीळ यांना घेण्यांत आलें. सध्यां ते पाटबंधारे, वीज व खाणी या खात्यांचे मंत्री आहेत.

**गॉडर्ड** (मृ. १७८३)—एक इंग्रज सेनापति. मराठे-इंग्रज युद्धांत गुजरातेंत मोहीम नेऊन यानें मराठ्यांच्यापासून भडोच जिंकलें. वडगांवच्या तहांत झालेला अपमान व नुकसान इंग्रजांस सहन न होऊन त्यांनीं हा तह रद्द करण्याचें ठरवलें व इंग्रजांकडे आश्रयार्थ गेलेल्या राघोबादादास गॉडर्डनें आश्रय दिला. तेव्हां इंग्रजांशीं नवीन तह करण्याचें पुणें दरबारनें ठरवलें. या तहांतील बारभाईंची पहिली अट अशी होती कीं, इंग्रजांनीं साष्टी व दादा हे आपल्या हातीं द्यावे. ही अट गॉडर्डनें नाकारल्यानें पुन्हां युद्धास सुरवात झाली. तहाच्या वाटाघाटींसाठीं गॉडर्ड यासच पाठवावयाचें होतें; पण उत्तर हिंदुस्थानांत महादजी शिंद्यांशीं अंडरसननें तहाचें बोलणें केल्यानें तसें कारण पडलें नाहीं.

**गाडाबाऊट**—ही एक नवी मोटार-सायकल असून हिला पुढें एक व मागें दोन चाकें असतात. हिच्या बैठकीवर घोड्याप्रमाणें बसावें लागत नाहीं. खुर्चीत ऐटीनें बसावें तसें बसतां येतें. बैठकीखालीं सामान वगैरे ठेवण्यासाठीं प्रशस्त पेटी असते. ताशीं पस्तीस मैलांच्या वेगानें ही एक गॅलन पेट्रोलवर एकशें पंचवीस मैलहि जाऊं शकते.

**गांडूळ**—हे संधियुक्त शरीर असलेले कृमी असून जमिनींत बिळें करून राहतात. यांचें शरीर वाटोळें व लांब असून त्याचे अनेक वलयांकित भाग असतात. हा प्राणी अर्धे नारी व अर्ध नर असतो; तरी पण संततीसाठीं नरमादी संयोग व्हावा लागतोच. यांचें शरीर तुटलें तरी तुटलेला भाग पुनः येतो. हे माती व निरनिराळ्या वनस्पती किंवा प्राणी खाऊन राहातत. हे जमीन पोकळ करतात या कारणानें शेतीस फार उपयुक्त आहेत.

**गॉड्विन-ऑस्टेन**—हें शिखर हिमालय पर्वतांत २८,२७८ फूट उंचीचें म्हणजे एव्हरेस्ट शिखराच्या खालोखाल दुसऱ्या क्रमाचें आहे. लेफ्टनंट कर्नल एच्. एच्. गॉडविन-ऑस्टेन (१८३४-१९२३) या संशोधकाच्या नांवावरून १८८८ मध्यें या शिखराला हें नांव देण्यांत आलें.

**गॉड्विन, मेरी** (१७५९-१७९७)—हिनें विविध विषयांवर पुढील कांहीं लेख लिहिले आहेत—१ 'थॉट्स ऑन् दि एज्युकेशन ऑफ डॉटर्स' (मुलींच्या शिक्षणासंबंधीं विचार), २ 'व्हिंडीकेशन ऑफ दि राइट्स ऑफ वूमन' (स्त्री हक्कांचें समर्थन), ३ 'मॉरल ॲन्ड हिस्टॉरिकल व्ह्यू ऑफ दि फ्रेंच रेव्होल्यूशन' (फ्रेंच राज्यक्रान्तीचें ऐतिहासिक आणि नैतिक दर्शन) आणि 'लेटर्स फ्रॉम स्वीडन, नॉर्वे ॲन्ड डेन्मार्क' (स्वीडन, नॉर्वे व डेन्मार्क येथून पत्रें).

**गॉड्विन, विल्यम** (१७५६-१८३६)—एक इंग्रज कादंबरीकार आणि राजकारणी लेखक. त्याचे 'इन्क्वायरी कन्सर्निंग पोलिटिकल जस्टिस' (राजकीय न्यायासंबंधीं चौकशी) हें पुस्तक १७९३ मध्यें प्रसिद्ध झालें. पुढील वर्षी त्याची कादंबरी 'कॅलेब विल्यम्स' उर्फ 'थिंग्ज ॲज दे आर' (आहे तसेंच) प्रसिद्ध झाली व ती लवकरच फार लोकप्रिय झाली. याशिवाय त्यानें ग्रंथ लिहिले ते म्हणजे कादंबरी-सेंट लियॉन; दुःखान्त नाटक-फॉकनेर (१८०७); कादंबरी-मॅंडेव्हिल (१८१७); कादंबरी-क्लोडस्ले (१८३०); निबंध-'ए ट्रीटाईज ऑफ पॉप्युलेशन' (लोकसंख्येवर एक निबंध)

( टिंबर हिच ), नालगांठ ( शूबेंड ), एकेरी भिंतगांठ ( सिंगल वॉल नॉट ), दुहेरी भिंतगांठ ( डबल वॉल नॉट ), वगैरे प्रसिद्ध आहेत.

[ १ अधवळसा गांठ. २ चाडे गांठ. ३ वर गाठ. ४ आठ गांठ ( पवित्रक गांठ ). ५ लवंग गांठ. ६ ओंडका ( लाट ) गांठ. ७ कोळ्याची गांठ. ८ वळण गांठ. ९ दुमड गांठ. १० आसूड गांठ ( ताईत गांठ ). ११ नावाडी गांठ. १२ एकेरी भिंत गांठ. ]

**गांठी**—( ग्लॅन्ड्स ). प्राण्याच्या शरीरांतील हे एक प्रकारचे घटक आहेत. यांपैकीं कांहीं रक्तांतील कांहीं द्रव्य घेऊन वाढतात, व त्यांचीं विशिष्ट गात्रें बनतात. हें रक्तांतील द्रव्य द्रव स्वरूपाचें असून तें कांहीं वाहिन्यांतून मुख, जठर, आंत्र वगैरेंसारख्या पोकळ गात्रांमध्यें जमत जातें किंवा अवाहिनीयुक्त ग्रंथीमध्यें तें पुन्हां रक्तांत मिसळून शरीरामध्यें पसरतें. शरीरांतील निरनिराळ्या द्रव्यांचें पोषण व शरीराची वाढ होणाऱ्या क्रियेचें नियमन करणारीं जीं रासायनिक हर्मोनसारखीं द्रव्यें असतात तीं या रक्तजन्य द्रव्यांचीं उदाहरणें होत. मनुष्याच्या शरीरामध्ये दोन अश्रुजनक ग्रंथी असतात. त्या वरच्या पापणीच्या खालीं डोळ्याच्या अगदीं बाहेरच्या कोनांत असतात. सहा लालाग्रंथी असतात. यांचें कार्य तोंडामध्यें द्रव उत्पन्न करण्याचें असतें. या तोंडाच्या दोन्ही बाजूंस तीन तीनप्रमाणें खालच्या जबड्याच्या मागें व खालच्या बाजूस असतात. दोन कर्णमूलग्रंथी असतात. दोन जबड्याखालील किंवा अनुलाला ग्रंथी असतात. दोन अधो-जिव्हाग्रंथी असतात, व दोन स्तनग्रंथी अथवा दुग्धग्रंथी असतात. या स्त्रियांच्या स्तनांत असतात. यांखेरीज यकृत्, पित्ताशय, दोन मूत्राशय आणि अनेक लहान लहान चर्मग्रंथी शरीरामध्यें जठरांतील अंतस्त्वचेमध्यें, आंतड्यामध्यें आणि बहुतेक पोकळ इंद्रियांमध्यें असतात. वाहिनीविरहित ग्रंथींमध्यें मुख्य म्हटल्या म्हणजे कंठग्रंथी, गलग्रंथी, मूत्राशयोर्ध्वग्रंथी, श्लेष्म-ग्रंथी या असून यांशिवाय अनेक लहान लहान ग्रंथी असतात. या ग्रंथींपेक्षां लसिकाग्रंथी या निराळ्या प्रकारच्या असतात. याखेरीज प्लीहा, वगैरे रक्तग्रंथी वेगळ्याच असतात. वनस्पती-मध्येंहि त्यांच्या पृष्ठभागावर कांहीं निरनिराळ्या ग्रंथी असतात व त्यांतून द्रव बाहेर पडत असतो.

**गाडगीळ,' धनंजय रामचंद्र** ( १९०१- )— एक हिंदी अर्थशास्त्रज्ञ. यांचें शिक्षण नागपूर येथें पटवर्धन हायस्कूल व क्वीन्स कॉलेज ( केंब्रिज ) मध्यें झालें. १९२४–२५ मध्यें हे मुंबई सरकारच्या फायनान्स खात्यांत असिस्टंट सेक्रेटरी होते. १९२५ ते १९३० मध्यें हे सुरत येथील कॉलेजचे प्रिन्सिपाल होते. हे मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो आहेत. तसेच भारत महिला विद्यापीठ व पुणें-मुंबई विद्यापीठ यांचे फेलो व सिंडिक आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे बरींच वर्षें खजिनदार होते. यांचे श्वशुर रा. ब. रावजी रामचंद्र काळे यांच्या देणगींतून स्थापन झालेल्या 'गोखले स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स ॲन्ड पॉलि-टिक्स' संस्थेचे हे डायरेक्टर आहेत. या संस्थेमार्फत हे आर्थिक व राजकीय विषयांचे संशोधक निबंध व ग्रंथ प्रसिद्ध करतात. यांनीं हिंदुस्थानचा औद्योगिक विकास, मुंबईची जमीनमहसूल-

पद्धति, हिंदुस्थानांतील अधिकाऱ्यांचे पगार, साम्राज्य पक्षपात व हिंदुस्थान, फळांची विक्री, वगैरे ग्रंथ इंग्रजींत लिहिले आहेत. मुंबई सरकारनें पुरस्कारलेल्या महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालयाचे ते अध्यक्ष असून रिझर्व बँकेचे एक सल्लागार आहेत. अनेक सरकारी समित्यांत त्यांची नेमणूक झाली आहे. हिंदुस्थानांतील पहिल्या श्रेणींतील अर्थशास्त्रज्ञ म्हणून यांचा लौकिक आहे.

**गाडगीळ, नरहर विष्णु** (१८९६- )—एक हिंदी पुढारी व मंत्री. जन्म राजपुतान्यामध्यें मल्हारगड येथें झाला. यांचें शिक्षण नीमच, मुंबई, बडोदें, पुणें (फर्ग्युसन कॉलेज) या ठिकाणीं झालें. यांचे पूर्वज अक्कलकोटमध्यें दिवाणगिरीवर होते व त्यांनीं पेशव्यांच्या दरबारीं अनेक कामें केलीं. १९२० मध्यें यांनीं पुण्यास वकिली सुरू केली. १९२१ ते १९२४ पर्यंत हे पुणें जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे कार्यवाह होते. १९२१ ते १९३२ पर्यंत हे जुन्या प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे सभासद होते व १९३१ मध्यें महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. सत्याग्रहाच्या चळवळींत यांस प्रथम एक दिवस, नंतर दोनदां सहा महिने व एकदां वीस महिन्यांची अशा शिक्षा झाल्या व दंडहि झाले. मुंबई इलाख्यांत त्यांनीं तरुणांची संघटना चळवळ सुरू केली. १९२८ ते १९३२ मध्यें हे मुंबई इलाखा युवक संघ (यूथ लीग) चे उपाध्यक्ष होते व त्याच काळांत पुणें येथील संघाचे अध्यक्ष होते. खार व नाशिक येथें भरलेल्या युवक परिषदांचे ते अध्यक्ष होते. जी. आय्. पी. रेल्वे कामगार संघाचे पुणें शाखेचे १९३० पासून बरींच वर्षे अध्यक्ष होते. १९२८-३२ पर्यंत ते पुणें म्युनिसिपालिटीचे सभासद होते. १९३५ मध्यें ते मध्यवर्ती विधिमंडळामध्यें निवडून गेले. १९४२ मध्यें यांना अटक झाली. नंतर १९४५ त सुटका होऊन ते पुन्हां मध्यवर्ती विधिमंडळांत निवडून आले. १९४७ सालीं हिंदुस्थानाला स्वराज्यदान झाल्यावर पहिलें मंत्रिमंडळ जें स्थापन झालें त्यांत गाडगीळ यांना घेण्यांत आलें. सध्यां ते पाटबंधारे, वीज व खाणी या खात्यांचे मंत्री आहेत.

**गॉडर्ड** (मृ. १७८३)—एक इंग्रज सेनापति. मराठे-इंग्रज युद्धांत गुजरातेंत मोहीम नेऊन यानें मराठ्यांच्यापासून भडोच जिंकलें. वडगांवच्या तहांत झालेला अपमान व नुकसान इंग्रजांस सहन न होऊन त्यांनीं हा तह रद्द करण्याचें ठरवलें व इंग्रजांकडे आश्रयार्थ गेलेल्या राघोबादादास गॉडर्डनें आश्रय दिला. तेव्हां इंग्रजांशीं नवीन तह करण्याचें पुणें दरबारनें ठरवलें. या तहांतील बारभाईंची पहिली अट अशी होती कीं, इंग्रजांनीं साष्टी व दादा हे आपल्या हातीं द्यावे. ही अट गॉडर्डनें नाकारल्यानें पुन्हां युद्धास सुरुवात झाली. तहाच्या वाटाघाटींसाठीं गॉडर्ड यासच पाठवावयाचें होतें; पण उत्तर हिंदुस्थानांत महादजी शिंद्यांशीं अंडरसननें तहाचें बोलणें केल्यानें तसें कारण पडलें नाहीं.

**गाडावाऊट**—ही एक नवी मोटार-सायकल असून हिला पुढें एक व मागें दोन चाकें असतात. हिच्या बैठकीवर घोड्याप्रमाणें बसावें लागत नाहीं. खुर्चीत ऐटीनें बसावें तसें बसतां येतें. बैठकीखालीं सामान वगैरे ठेवण्यासाठीं प्रशस्त पेटी असते. ताशीं पस्तीस मैलांच्या वेगानें ही एक गॅलन पेट्रोलवर एकशें पंचवीस मैलहि जाऊं शकते.

**गांडूळ**—हे संधियुक्त शरीर असलेले कृमी असून जमिनींत बिळें करून राहतात. यांचें शरीर वाटोळें व लांब असून त्याचे अनेक वलयांकित भाग असतात. हा प्राणी अर्धे नारी व अर्धे नर असतो; तरी पण संततीसाठीं नरमादी संयोग व्हावा लागतोच. यांचें शरीर तुटलें तरी तुटलेला भाग पुनः येतो. हे माती व निरनिराळ्या वनस्पती किंवा प्राणी खाऊन राहातत. हे जमीन पोकळ करतात या कारणानें शेतीस फार उपयुक्त आहेत.

**गॉड्विन-ऑस्टेन**—हें शिखर हिमालय पर्वतांत २८,२७८ फूट उंचीचें म्हणजे एव्हरेस्ट शिखराच्या खालोखाल दुसऱ्या क्रमाचें आहे. लेफ्टनंट कर्नल एच्. एच्. गॉडविन-ऑस्टेन (१८३४-१९२३) या संशोधकाच्या नांवावरून १८८८ मध्यें या शिखराला हें नांव देण्यांत आलें.

**गॉड्विन, मेरी** (१७५९-१७९७)— हिनें विविध विषयांवर पुढील कांहीं लेख लिहिले आहेत— १ 'थॉट्स ऑन् दि एज्युकेशन ऑफ डॉटर्स' (मुलींच्या शिक्षणासंबंधीं विचार), २ 'व्हिंडीकेशन ऑफ दि राइट्स ऑफ वूमन' (स्त्री हक्काचें समर्थन), ३ 'मॉरल ॲन्ड हिस्टॉरिकल व्ह्यू ऑफ दि फ्रेंच रेव्होल्यूशन' (फ्रेंच राज्यक्रान्तीचें ऐतिहासिक आणि नैतिक दर्शन) आणि 'लेटर्स फ्रॉम स्वीडन, नॉर्वे ॲन्ड डेन्मार्क' (स्वीडन, नॉर्वे व डेन्मार्क येथून पत्रें).

**गॉड्विन, विल्यम** (१७५६-१८३६)— एक इंग्रज कादंबरीकार आणि राजकारणी लेखक. त्याचे 'इन्क्वायरी कन्सर्निंग पोलिटिकल जस्टिस' (राजकीय न्यायासंबंधीं चौकशी) हें पुस्तक १७९३ मध्यें प्रसिद्ध झालें. पुढील वर्षी त्याची कादंबरी 'कॅलेब विल्यम्स' उर्फ 'थिंग्ज ॲज दे आर' (आहे तसेंच) प्रसिद्ध झाली व ती लवकरच फार लोकप्रिय झाली. याशिवाय त्यानें ग्रंथ लिहिले ते म्हणजे कादंबरी-सेंट लियॉन; दुःखान्त नाटक-फॉकनेर (१८०७); कादंबरी-मॅंडेव्हिल (१८१७); कादंबरी-क्लौडस्ले (१८३०); निबंध-'ए ट्रीटाईज ऑफ पॉप्युलेशन' (लोकसंख्येवर एक निबंध)

(१८२०); आणि निबंध-'थॉटस ऑन मॅन' (१८३१) (मानव विचार).

**गाढव**—घोड्याच्या जातीचा एक प्राणी. हा घोड्यापेक्षां

कमी दर्जाचा असतो असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. तैत्तिरीय संहितेंत देखील तो घोड्याच्या खालच्या दर्जाचा प्राणी आहे, परंतु तो सर्व प्राण्यांत भार वाहण्यांत श्रेष्ठ आहे असें म्हटलें आहे. त्याच ग्रंथांत गर्दभाचा घोडीबरोबर व तसेंच गाढवीबरोबर संयोग होतो म्हणून, त्याला द्विरेतस् 'दुप्पट बीज असणारा' असें म्हटलें आहे. गाढवीच्या पिलाचा ढेंगणेपणा आणि गाढवाची बहुभक्षणशक्ति, या दोहोंचाहि (तै. सं. ५·१·५,५) उल्लेख केला आहे. त्याच्या अप्रिय ओरडण्याचा उल्लेख अथर्ववेदांत (८, ६, १०) केला आहे. आणि गाढवाच्या याच गुणामुळें ऋग्वेदांत हें नांव निंदापूर्वक एका गवयाला लाविलें आहे. एका गवयाला शंभर गर्दभ देणगी दिल्याबद्दल वालखिल्य सूक्तांत उल्लेख आहे.

गाढवाच्या कांहीं जाती आहेत. आफ्रिका आणि तिबेट इकडचीं गाढवें निराळीं दिसतात. हा प्राणी दिसण्यांत आपल्याकडे ओंगळ दिसतो. पण अरबस्तान, ईजिप्त, इ. देशांत याला घोड्याप्रमाणें मानतात. तिकडे पांढरीं स्वच्छ गाढवेंहि असतात. हें फार काटक जनावर आहे. आपल्याकडे कुंभार, वडार, परीट, वगैरे याचा फार उपयोग करून घेतात. दरवर्षी गाढवीण विते व तिला एक पोर होतें. गाढवीचें दूध औषधी मानतात.

**गाणपत्य**—हिंदुसमाजांत जे अनेक उपासनापंथ निर्माण झाले त्यांमध्यें 'गाणपत्य' हा एक पंथ आहे. गाणपत्यांचें दैवत गणपति होय. या पंथाचे लोक पुष्कळ आहेत. गणपति हाच परमात्मा असून त्यानेंच हें सर्व ब्रह्मांड निर्माण केलें, असें या पंथाचे अनुयायी मानतात. या गणपतिस्वरूपी परब्रह्मापासूनच सर्व किरकोळ देव उत्पन्न झाले. गणपति हा मात्र अनाद्यनंत, अजर, अमर, निर्गुण व निराकार असा देव आहे, असें या संप्रदायाचें तत्त्व आहे. हें तत्त्व प्रचलित करण्यासाठीं या पंथाच्या आचार्यांनीं निरनिराळे ग्रंथ लिहिले व हे सर्व ग्रंथ त्या पंथाच्या अनुयायांनीं प्रमाण मानले आहेत.

या संप्रदायाचे प्रमुख ग्रंथ म्हटले म्हणजे, वरदतापनीय अगर गणपतितापनीय उपनिषद्, गणपत्युपनिषद्, गणेशसंहिता, गणेशपुराण, मुद्गलपुराण, व ब्रह्मवैवर्तपुराणाचा गणेशखंड हे होत.

या पंथाचा उदय होण्यापूर्वींहि 'गणेश' देवतेला बरेंच प्राधान्य होतें. तथापि गाणपत्यपंथाचा उगम पांचव्या शतकानंतर ते नवव्या शतकाच्या पूर्वीं केव्हां तरी झाला असला पाहिजे, असें डॉ. भांडारकर यांचें म्हणणें आहे. गणपति पहा.

**गाणाऱ्या ज्वाला**—जेव्हां एखादी लांब दोन्ही तोंडें उघडी असलेली कांचेची नळी एखाद्या गॅसच्या ज्योतीभोंवतीं धरून खालीं आणली जाते तेव्हां त्या नळींतील हवा कंप पावूं लागते आणि तींतून एक सतत चालणारा आवाज उत्पन्न होतो. ही नळी जशी कमी जास्त आकाराची किंवा उंचीची असेल त्याप्रमाणें हा स्वर कमीअधिक उंचीचा असतो. जेव्हां एखाद्या चिंचोळ्या तोंडांतून पाण्याची धार बाहेर एखाद्या पडद्यावर पाडण्यांत येते तेव्हां ती धार ज्या मानानें उंच अंतरावरून पाडण्यांत येत असेल त्या मानानें त्या पडद्यापासून कमीअधिक उंचीचा स्वर निघूं लागतो.

**गाणिगा**—एक जात. म्हैसूर संस्थान, मद्रास व मुंबई इलाखा यांतून यांची वस्ती आहे. यांचे हिंदु व लिंगायत असे दोन पोटभेद आहेत. बहुतेक लोक तेली आहेत; कांहीं शेतकरी व लहान व्यापारीहि आहेत. हिंदु गाणिगांच्यामध्ये आठ पोटजाती असून एका पोटजातींतील लोक दुसऱ्या पोटभागांतील लोकांशीं विवाहसंबंध करीत नाहींत. हे लोक आपल्याला उच्च वैश्य समजतात. व हविक ब्राह्मणांखेरीज इतरांचें अन्न घेत नाहींत. घाण्याला बांधलेल्या बैलाचे डोळे बांधणें हें पाप आहे, असा यांचा समज आहे.

**गॉथ लोक**—प्राचीन जर्मनांची ही एक जात असून दक्षिण डॅन्यूब नदीच्या उत्तरेस काळ्या समुद्राजवळ यांची मूळची वस्ती होती. पुढें इ. स. ३ ऱ्या शतकांत या लोकांनीं रोमन साम्राज्याचे लचके तोडण्यास सुरुवात केली. पुढच्या

शतकांत यांचें राज्य एकीकडे डॉन नदीपासून थेइस नदीपर्यंत व दुसरीकडे काळ्या समुद्रापासून व्हिश्चुला नदी आणि बाल्टिक समुद्र यांपर्यंत वाढलें. इ. स. ३६९ च्या सुमारास या राज्याचे पूर्व आणि पश्चिम असे दोन भाग यादवीमुळें पडले. अलॅरिक या पश्चिम गॉथच्या राजानें इटलीवर स्वाऱ्या नेल्या होत्या व त्याच्या मृत्यूनंतर या गॉथ लोकांनीं गॉल आणि स्पेन यांच्या दक्षिण प्रदेशांत आपलें एक राज्य स्थापिलें. ७११ मध्यें आफ्रिकेंतून मूर लोक येऊन त्यांनीं हें राज्य जिंकून घेतलें. इकडे पूर्व गॉथचा राजा थेओडोरिक यानें ४९३ मध्यें इटली जिंकून आपलें राज्य स्थापलें व तें ५५४ सालीं संपुष्टांत आलें. यापुढें सर्वकडचे गॉथ लोक इतर खिस्ती लोकांत मिसळून गेले. गॉथिक चालीरीती रानवट म्हणून प्रसिद्ध असल्या तरी त्यांची भाषा अभ्यसनीय वाटते. इ. स. ४ थ्या शतकांत बिशप उल्फिलासनें या भाषेंत बायबलचें कांहीं भाषांतर केलें आहे.

**गॉथिक वाङ्मय**—गॉथ लोकांमधील वाङ्मयाचा विचार केल्यास गॉथिक भाषेंत उल्फिलासनें जें बायबलचें भाषांतर केलें आहे, त्याचा प्रामुख्यानें निर्देश करणें जरूर आहे. याशिवाय गॉथिक भाषेंत लिहिलेले धार्मिक ग्रंथ संपूर्ण नाहींत. तुटक तुटक असे उपलब्ध झालेले आहेत. इ. स. ५०० च्या सुमारास थिओडोरिकनें काढलेलें आज्ञापत्र लॅटिन भाषेंत उपलब्ध आहे. त्यावरून व थिओडोरिकच्या व त्याच्यामागून होणाऱ्या राजाच्या राजकीय पत्रव्यवहारावरून गॉथ लोकांचे कायदेकानू काय होते त्याचेंहि ज्ञान होतें. इ. स. ६५४ मध्यें रेसेसविंथ राजानें आपल्या पूर्वीच्या गॉथ राजांचे कायदेकानू एकत्र करून एक कायदेसंग्रह ( कोड ) तयार करविला. गॉथ लोकांच्या इतिहासावर जोर्डेन्स यानें ग्रंथ लिहिला आहे. त्याशिवाय इसिडोरनेंहि सातव्या शतकापर्यंतचा पश्चिम गॉथ लोकांचा इतिहास लिहिलेला आढळतो. पांचव्या शतकांत होऊन गेलेल्या सॅल्व्हियन नांवाच्या ग्रंथकारानें, ' डेगुबर नॅशने डी ' नांवाचा ग्रंथ लिहिला असून त्यांत गॉथ लोकांची सांगोपांग माहिती दिली आहे. या ग्रंथांत रोमन लोकांच्या दुर्गुणांची निंदा व गॉथ लोकांच्या नीतिमत्तेची फार स्तुति केली आहे.

**गॉथिक शिल्प**—पश्चिम युरोपमध्यें बाराव्या शतकाच्या मध्यापासून सोळाव्या शतकापर्यंत प्रचलित असलेली एक शिल्पपद्धति. या पद्धतींत सूच्यग्र किंवा टोंकदार कमानी हा विशेष असे आणि बाकीच्या सर्व गोष्टींस गौणस्थान देण्यांत येत असे. या पद्धतीचा उगम फ्रान्समध्यें झाला व तेथून ती त्वरित इंग्लंड, जर्मनी, इटली, स्पेन, वगैरे, देशांत प्रसार पावली. इंग्लंडमध्यें ही पद्धति प्रथम सेन्स येथील विल्यम यानें ११७४ मध्यें कँटरबरी येथील खिस्ती मंदिर बांधलें त्या वेळीं उपयोगांत आणली. सोळाव्या शतकामध्यें अभिजातपद्धति पुन्हां प्रचारांत आली व ही मागें पडली. पण पुन्हां १८२५ मध्यें प्रचारांत आली.

**गांधर्ववेद्**—एक उपवेद. प्रथम भरतमुनीनें हें शास्त्र प्रसिद्धीस आणलें. यांत गीत, वाद्य, नृत्य, इ. करमणुकीचे विविध प्रकार येतात.

**गाधा मासा**— (पॉरपॉइज). हा एक सस्तन डॉल्फिन मत्स्य जातीचा प्राणी आहे. याची लांबी सामान्यतः ५ फूट असून याचे डोळे व कान लहान असतात व मान आखूड असते. याच्या पुढील शरीराचे भाग मुख्य शरीरापासून पुढें आलेले असतात व मागच्या भागांची वाढ अर्धवट झालेली असते. हा सामान्यतः हेरिंग मासे खाऊन राहतो. व्हेल हा एक याच्यासारखाच मासा आहे.

**गांधार देश**—सांप्रतचा कंदाहार प्रांत. महाभारतांत या देशाचा उल्लेख अनेकदां येतो. धृतराष्ट्राची बायको गांधारी या देशची राजकन्या होती. गांधार देशांत पुढें बौद्धधर्म बराच प्रचलित होता. कनिष्काचें घराणें गांधारचेंच व त्याची राजधानी पुरुषपुर ( पेशावर ) होती. हूणांचेंहि हें मुख्य ठाणें असे. या प्रांतांत बरींच कलाकुसरीचीं शिल्पकामें सांपडतात. त्यांत ग्रीक आणि रोमन शिल्पाची छाप स्पष्ट दिसते. हूणांनंतर काबूलच्या सरकारचें या प्रदेशावर राज्य झालें.

**गांधारी**—गंधाराधिपति सुबल याची कन्या व धृतराष्ट्राची पत्नी. तिला धृतराष्ट्रापासून शंभर पुत्र झाले. ही महापतिव्रता होती. पति अंध असल्यामुळें गांधारीहि समदुःख भोगण्याकरितां म्हणून डोळ्यांभोंवतीं पट्टी बांधीत असे. हिनें दुर्योधनाची पांडवांचा विनाकारण छळ करण्याबद्दल पुष्कळच कानउघाडणी केली होती. युद्धानंतर आपल्या मुलांच्या नाशास श्रीकृष्णच कारण आहे असें समजून हिनें त्यास यादव कुलाचा नाश लवकरच होवो असा शाप दिला होता. धर्मराज गादीवर बसल्यानंतर धृतराष्ट्र व ही कांहीं काळ पांडवांच्याजवळ होती. पुढें वानप्रस्थाश्रम स्वीकारून हीं दोघें विदुरासहित अरण्यांत निघून गेलीं. त्यांच्याबरोबर कुंतीहि गेली. पुढें कांहीं कालानें अरण्यास वणवा लागून त्यांत धृतराष्ट्रासह गांधारीचा नाश झाला.

**गाधि**—हा कान्यकुब्ज देशाचा राजा असून यास प्रथमतः एकच सत्यवती नांवाची कन्या होती. तिला यानें ऋचीक ऋषीस अर्पण केली. पुढें यास विश्वामित्र नांवाचा पुत्र झाला.

**गांधी, महात्मा मोहनदास करमचंद** (१८६९–१९४८)—हिंदुस्थानचा सर्वश्रेष्ठ व अद्वितीय पुढारी. यांचें घराणें श्रीमान् व धार्मिक वृत्तीचें होतें. यांचे वडील पोरबंदर संस्थानचे

२५ वर्षेंपर्यंत दिवाण होते. मुंबई युनिव्हर्सिटीची मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर ते इंग्लंडमध्यें बॅरिस्टर होण्याकरितां गेले; व बॅरिस्टर झाल्यावर हिंदुस्थानांत परत येऊन मुंबई हायकोर्टांत वकिली करूं लागले. त्या वेळीं एका महत्त्वाच्या खटल्यामध्यें त्यांस दक्षिण आफ्रिकेंत जाण्याचा प्रसंग आला.

त्या वसाहतीमध्यें हिंदी लोकांस फार वाईट तऱ्हेनें वागविण्यांत येतें असें त्यांस आढळून आलें. त्यांस जमिनी विकत घेण्याचा हक्क नसे व त्यांची वस्ती स्वतंत्र ठेवण्यांत येत असे. आणि इतरहि अनेक मानहानिकारक निर्बंध त्यांच्यावर लादण्यांत आले होते. गांधींनीं त्यांचा पक्ष घेऊन त्यांस अगदीं प्राथमिक हक्क तरी प्राप्त व्हावेत म्हणून बरेच दिवस झगडा चालविला. हे त्यांचे पुढारी झाले आणि त्यांस बरोबर घेऊन गांधींनीं सत्याग्रह सुरू केला. परंतु मध्येंच बोअर युद्ध सुरू झालें. त्या वेळीं त्यांनीं सत्याग्रह थांबवून ब्रिटिश सरकारास मदत केली व ती सरकारनेंहि मान्य केली. तें युद्ध थांबतांच पुन्हां त्यांनीं सत्याग्रहाची मोहीम सुरू केली, तेव्हां त्यांस, त्यांची पत्नी व पुत्र यांसह तुरुंगांत टाकण्यांत आलें. पुढें स्मट्स व गांधी यांमधील करारानें हा लढा थांबविण्यांत आला.

पहिलें महायुद्ध सुरू झालें त्या वेळीं हे लंडनमध्यें होते. तात्काळ त्यांनीं तेथील युनिव्हर्सिटींतून असलेल्या विद्यार्थ्यांपैकीं २५० विद्यार्थ्यांची एक स्वयंसेवकांची तुकडी तयार केली. पुढें त्यांस प्रकृति बिघडल्यामुळे हिंदुस्थानांत यावें लागलें. १९१७ मध्यें त्यांनीं चंपारण्यामध्यें सत्याग्रह करून तेथील निळीच्या मळ्यांतील मजुरांची स्थिति सुधारण्याची खटपट केली. १९१८ मध्यें त्यांनीं गुजरातमध्यें खेडा जिल्ह्यांत यशस्वीपणे सत्याग्रहाची करबंदीची चळवळ केली. याच वर्षीं महायुद्धाच्या अगदी ऐन आणिबाणीच्या प्रसंगीं त्यांनीं लष्करभरतीसाठीं खटपट करून नऊ महिन्यांत पुरी करावयाची भरती सात महिन्यांतच पूर्ण केली. परंतु युद्धानंतर शांतता झाल्याबरोबर हिंदुस्थानांत रौलट कायदा जारी करण्यांत आला.

महायुद्धानंतरहि दोन वर्षेंपर्यंत महात्मा गांधी हे इंग्रज सरकारशीं अगदीं पूर्णपणें राजनिष्ठेनें वागत होते व त्यांच्या न्यायीपणावर त्यांचा पूर्ण विश्वास होता. परंतु रौलट कायदा जारी झाल्यामुळें सर्वत्र खळबळ उडाली. सर्व हिंदुस्थानभर असहकारितेची व सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली व पंजाबमधील दंगा व जालियनवाला बागेंतील कत्तल घडून आली. याच वेळीं जणुं आगींत तेल ओतण्याकरितांच की काय खिलाफत प्रकरण उपस्थित झालें. यामुळें महात्मा गांधींचा ब्रिटिश राज्यपद्धतीवरचा विश्वास पूर्णपणें उडून गेला, व त्यांनीं अहिंसात्मक असहकारितेची चळवळ सुरू केली. तींत त्यांस सहा वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा १९२२ मार्चमध्यें देण्यात आली. परंतु १९२४ मध्यें त्यांची प्रकृति बिघडल्यामुळें त्यांस सोडून देण्यांत आलें. १९२४ मध्यें त्यांनीं हिंदु-मुसलमान ऐक्याकरितां प्रसिद्ध असें पहिलें २१ दिवसांचें उपोषण दिल्ली येथें डॉ. अन्सारी यांच्या बंगल्यांत सुरू करून तडीस नेलें. १९२५ मध्यें त्यांस राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष निवडण्यांत आलें. हें अधिवेशन बेळगांव येथें भरलें होतें.

लाहोर येथील काँग्रेसमध्यें संपूर्ण स्वातंत्र्याचा प्रस्ताव मान्य करण्यांत आल्यावर त्यांनीं एप्रिल १९३० मध्यें सत्याग्रह सुरू केला व त्यांस मे महिन्यांत अटकेंत ठेवण्यांत आलें. १९३१ मध्यें जानेवारींत तेव्हांचे गव्हर्नर जनरल लॉर्ड इर्विन यांच्याशीं प्रसिद्ध गांधी–इर्विन करार झाल्यामुळें त्यांनीं सत्याग्रहाची मोहीम स्थगित केली. नंतर महात्मा गांधी हे गोलमेजपरिषदेकरितां राष्ट्रीय सभेचे एकमेव प्रतिनिधि म्हणून इंग्लंडमध्यें गेले व १९३२ मध्यें हिंदुस्थानांत परत आले. येथे येतांच पुन्हां त्यांस अटकेंत ठेवण्यांत आलें. १९३२ मध्यें त्यांनीं हरिजन समाजाकरितां स्वतंत्र मतदार संघ निर्माण करण्यांत आले होते म्हणून अशा जातीय निवाड्याच्या निषेधार्थ येरवडा येथें मरणान्त उपोषण सुरू केलें. त्या वेळीं सर्व देशांतील हिंदु जनतेंत खळबळ उडून जातीय निवाडा बदलून घेण्याची खटपट केली गेली व हरिजन पुढारी डॉ. अंबेडकर वगैरेबरोबर चर्चा होऊन प्रसिद्ध येरवडा करार मान्य झाला व जातीय निवाड्यांत बदल करण्यांत आला; हा करार ब्रिटिश सरकारनेंहि मान्य केला. यानंतर महात्मा गांधी यांनीं उपवास सोडला. यानंतर हरिजनांचा उद्धार करण्याच्या कार्यांत हिंदू लोकांत दिसणारी उदासीनता घालवावी व सर्व जनतेस हरिजन-उद्धारास प्रवृत्त करावें म्हणून त्यांनीं पुन्हां एकदां उपवास केला. १९३३ मध्यें त्यांनीं वैयक्तिक सत्याग्रहाचीच चळवळ सुरू करून प्रथम स्वतः सत्याग्रह केला व साबरमती येथील आश्रम मोडून तो अस्पृश्योद्धार कार्यास अर्पण केला व स्वतः सर्व आश्रमवासीयांसह तुरुंगांत गेले. १९३४ मध्यें त्यांनी हरिजनकार्याकरितां सर्व हिंदुस्थानांत एक दौरा काढला. ऑगस्ट १९३४ मध्यें एका अस्पृश्योद्धारक स्वयंसेवकानें अजमेर येथें एका सनातनी गृहस्थावर हल्ला केला. याकरितां आत्मशुद्धीसाठीं त्यांनीं एक आठवडा उपोषण केलें.

१९३५ मध्यें ते राष्ट्रीय सभेपासून निवृत्त झाले. १९३५ मध्यें ते हिंदी साहित्य-संमेलनाच्या इंदूर येथील अधिवेशनाचे अध्यक्ष होते. त्यांनीं पुन्हां १९४० सालीं वैयक्तिक सत्याग्रह सुरू केला. दुसऱ्या महायुद्धांत कॉंग्रेसनें सरकारला मदत केली नाहीं म्हणून सरकारचा रोष होता. त्यांत स्वराज्याच्या वाटाघाटी ब्रिटिश शिष्टमंडळाशीं फिसकटून कॉंग्रेसजनांवर सरकारनें बंधनें घातलीं. १९४२ च्या कॉंग्रेसच्या अधिवेशनानंतर सर्व कॉंग्रेस-प्रमुखांना सरकारनें तुरुंग दाखविला. तेव्हां 'क्विट इंडिया' (छोडो हिंद) चा अंतःस्थ लढा सुरू होऊन लोकांनीं क्रान्ति करून सोडली. तेव्हां म. गांधींसकट सर्वांना मोकळे करून स्वराज्या-संबंधीं नवीन राज्यघटना बनविण्यासाठीं हिंदुस्थान सरकारनें हंगामी कॉंग्रेस मंत्रिमंडळ नेमलें. १९४६ सालीं बंगाल–बिहारमध्यें मोठी हिंदु-मुसलमान दंगल उडाली, तेव्हां गांधींनीं तिकडे जाऊन शांततेसाठीं फार कष्ट घेतले. १९४७ च्या ऑगस्टमध्यें स्वातंत्र्य मिळाल्यावर पुन्हां सिंध–पंजाबमध्यें हिंदूंची कत्तल सुरू झाली व निर्वासितांचे लोंढे दिल्लीला आले. तेव्हां तेथें जातिसलोख्याचें कार्य करण्यासाठीं ते दिल्लीस राहिले. पुढेंहि पंजाब–सिंध इकडे जाणार होते. त्यांची अत्यंत सहिष्णुवृत्ति हिंदुत्वनिष्ठांना मुळींच आवडत नव्हती. गांधी नाहींसे होतील तर देशाचें राज्ययंत्र हिंदूंना सुखकर होईल अशा वेड्या समजुतीनें एका माथेफिरू हिंदु तरुणानें त्यांचा ३० जानेवारी १९४८ रोजीं बिर्ला भुवनाच्या पटांगणांत गोळ्या घालून खून केला.

म. गांधी यांची नैतिक श्रेष्ठता सर्व जगांत मानली जाई. त्यांचें एक विशिष्ट तत्त्वज्ञान असे. त्यांचा अहिंसावाद शांतते-साठीं फार उपयुक्त होता. हिंदुस्थानला स्वराज्य मिळण्यास त्यांची चळवळ व राजकीय साधनें यशस्वी ठरलीं. जगांतील पहिल्या श्रेणीच्या थोर विभूतींत त्यांची गणना होते.

**गांधील माशी**—हें नांव अनेक जातींच्या माशांना सामान्यपणें लावलें जातें. यांचे थवे असतात व त्यांत स्त्री, पुरुष व खोजे अथवा कामकरी अशा तिन्ही लिंगी माशांचा समावेश असतो. यांपैकीं माद्या व खोजे अथवा कामकरी माशा यांना भयंकर व विषारी नांग्या असतात. या फार खादाड असतात व इतर किडे, साखर, मांस, फळें, मद्य वगैरेंवर उपजीविका करतात.

**गॉंपर्झ, थिओडोर** (१८३२–१९१२)—एक ऑस्ट्रियन भाषाशास्त्रज्ञ आणि पंडित. त्यानें हर्क्युलेनिअम येथील संशोधलेल्या पापिरी कागदावरील लिखितांतील सांकेतिक गूढ लिपीचा अर्थ लावण्याचें काम केलें, याबद्दल त्याची प्रसिद्धि आहे. व्हेसुव्हिअसच्या ज्वालामुखीनें पॉंपीप्रमाणें हें गांव गाडून टाकलें होतें. उत्खनन करतांना येथें पापिरीवरचीं लिखितें सांपडलीं.

**गॉंपर्झ, सॅम्युएल** (१८५०–१९२५)— एक अमेरिकन मजूर पुढारी. हा अमेरिकन फेडरेशन ऑफ लेबर या संस्थेचा एक संस्थापक होता. आणि १८८१ मध्यें त्या संस्थेचा अध्यक्ष झाला. अमेरिकेनें पहिल्या महायुद्धांत जेव्हां भाग घेतला तेव्हां गॉंपर्झनें दोस्त राष्ट्रांना साहाय्य करण्यामध्यें आपलें वजन खर्च केलें; आणि रशियांतील कम्यूनिस्ट मतांना आणि समाजसत्ता-वादालाहि विरोध केला. गॉंपर्झ हा मजूर वर्गाचा पुढारी होता तरीहि त्यानें भांडवलवाल्यांच्या कारभाराचा पुरस्कार नेहमीं चालू ठेवला होता. १९१९ मध्यें वॉशिंग्टन येथें जी आंतरराष्ट्रीय मजूरपरिषद भरली तिचा तो अध्यक्ष होता. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—'दि अमेरिकन लेबर मूव्हमेंट' (अमेरिकन मजूर चळवळ) आणि 'अमेरिकन लेबर अ‍ॅन्ड दि वॉर' (अमेरिकन मजूर आणि युद्ध).

**गावती**— एक कोंकणी जात. रत्नागिरी, कानडा जिल्हा व सांवतवाडी संस्थान यांत यांची वस्ती आहे. लो. सं. (१९११) २४,८१८. ग्राव (गुराव) यावर काम करणारे म्हणून ग्रावती–गावती–गावीत असें नांव पडलें. हे लोक पूर्वीं शिवाजीच्या आरमारांत होते व पुढें मराठ्यांचें आरमार बुडाल्यावर कोळ्याचा धंदा करूं लागले. यामुळें जातीला हलकेपणा आला. यांच्या सर्व चालीरीती मराठ्यांप्रमाणेंच आहेत.

**गॉबेलिनचा कारखाना**— हा आजचा बुट्टीदार कापडाचा सरकारी कारखाना पॅरिस शहरांत १६६७ मध्यें स्थापन करण्यांत आला. याचें वैशिष्ट्य म्हणजे तो जेहन गॉबेलिन (मृ. १४७६) या पहिल्या फ्रान्सिसच्या कारकीर्दींतील सुप्रसिद्ध रंगारी कारा-गिराचा अशा कापडाचा कारखाना ज्या जागीं होता त्याच जागेवर उभारण्यांत आला. राज्यक्रान्तीच्या काळांत गॉबेलिन कारखाना बंद पडला होता; पण पुन्हा बोर्बोन राजांची अम-दानी सुरू झाल्यावर तो सुरू करण्यांत आला. ह्या प्रकारच्या कापडाचा जगांतला पहिला कारखाना हाच होय. गॉबेलिन ही उच्च दर्जाच्या बुट्टीदार कापडासाठीं आज व्यापारी संज्ञा बनून गेली आहे.

**गामा, वास्को द** (१४६०–१५२४)—हा पोर्तुगीज जलपर्यटनकार लिस्बन येथून ता. ८ जुलै १४९७ रोजीं जहाजें घेऊन निघाला आणि केप ऑफ गुडहोपला वळसा घालून मोझँबिक, मोंबासा, मेलिन्डा आणि कालिकत इतक्या ठिकाणीं गेला आणि १४९९ मध्यें लिस्बनला परत आला. १५०२ मध्यें त्याला एका सामर्थ्यवान् आरमाराचा मुख्य अधिकारी नेमण्यांत आलें आणि त्या लढाऊ जहाजांच्या साहाय्यानें मोझँबिक

आणि सोफाला येथें जाणाऱ्या प्रवाशांना संरक्षण देण्याची त्यानें तजवीज केली. कालिकत येथें राहिलेल्या पोर्तुगीज लोकांची कत्तल करण्यांत आली म्हणून त्यानें कालिकत शहरावर आपल्या लढाऊ जहाजाकडून भडिमार केला. यानेंच प्राच्य देशांत ( इंडीज ) पहिली पोर्तुगीज वखार स्थापन केली. १५२४ मध्यें पोर्तुगालचा तिसरा जॉन यानें त्याला हिंदुस्थानचा व्हाइसरॉय नेमलें. पण हा अधिकार त्यानें फक्त तीनच महिने चालवला. कारण लगेंच तो कोचीन येथें वारला.

**गाय**— एक गोवंशांतील स्त्रीजातीचा प्राणी. गाय व बैल यांची माहिती बहुधा एकत्र देण्यांत येत असते. कारण त्यांच्यांत फक्त स्त्री-पुरुष इतकाच भेद आहे. शरीररचना सारखीच आहे. रंग तांबडा, पांढरा, पिवळा, कबरा किंवा काळा असून कधीं कधीं काळे-तांबडे ठिपके असतात. तोंड लांबट व त्रिकोणाकृति असतें. मानेखालीं पातळ मांसाचा पडदा ( पोळी ) असतो; व खांद्यावर एक मांसाचा गोळा ( वशिंड ) असतो. पाश्चात्य देशांत गाई-बैलांना वशिंड नसतें. गाईबैलांना दोन शिंगें असतात. डोळे फार पाणीदार असून त्यांस लांबचें दिसतें. शेंपूट लांब व झुपकेदार असतें. गायीच्या मागील दोन पायांमध्यें मांसाळ पिशवी ( कांस ) असते; हिला चार स्तन असून त्यांतून दूध निघतें. गाय नऊ-दहा महिने दूध देते व सोळा ते अठरा महिन्यांनीं विते. आयुष्यमान सरासरी वीस ते पंचवीस वर्षें असतें.

हिंदु लोकांत गाय ही परमपूज्य व देवतासमान मानिलेली आहे. गाईचे पांच पदार्थ ( पंचगव्य ) फार पवित्र, पौष्टिक व औषधी मानतात. गाईचें दूध तर अमृताप्रमाणें सर्वगुणसंपन्न असल्यानें त्याच्या लाभासाठीं सर्व प्रयत्न करीत असतात.

गोसंवर्धन हें एक व्रत समजून कांहीं गोसेवा करतात. गोसंवर्धनाचे फायदे पुष्कळच आहेत. ' गाय जगाची माय ' असें हिंदुधर्म सांगतो. गोदान हें फार पुण्यप्रद मानलें आहे व सर्व संस्कारांत गायीचें दर्शन, पूजा, वगैरे असतें. गुरें पाहा.

संस्कृत भाषेंत गो याचा अर्थ बैल अथवा ' गाय ' असा आहे. हे प्राणी वैदिक आर्यांच्या संपत्तीचे घटक असून ऋग्वेदानंतर यांचा उल्लेख बराच वेळ आला आहे. दूध ( क्षीर ) ताजें पीत असत, अथवा त्यांत तांदूळ शिजवीत असत ( क्षीरौदन ). सकाळीं ( प्रातर्-दोह ), दुपारीं ( संगव ), आणि संध्याकाळीं ( सायं-दोह ), अशा तीन वेळां ( प्रातः, संगव, सायम् ), गायी चरावयास सोडीत असत, असें तैत्तिरीय ब्राह्मणांत म्हटलें आहे. पहिल्या दोहनाच्या वेळीं पुष्कळ दूध मिळे आणि दुसऱ्या दोन वेळेला थोडें मिळे. गाई चरावयास गेल्या म्हणजे त्यांची काळजी घेण्याकरितां एक गोप ( गोपाल ) हातांत पराणी घेऊन त्यांच्याबरोबर हिंडत असे; परंतु त्यांचें हरवणें, खड्डयांत पडणें, हातपाय मोडणें, चोरीला जाणें यांसारखे सर्व त्रास त्याच्यामागें असत ( ऋ १. १२ ). मालकी दर्शविण्याकरितां गाईच्या

कानांवर खुणा करीत असत ( ऋ ६. २८, ३ ). दानस्तुतींतील अतिशयोक्तीचा भाग जरी वगळला तरी त्यांवरून गुरांचे मोठमोठे कळप असत असें दिसतें. गाईंची भरभराट व्हावी म्हणून ( ऋ १. ८, ३ ) ईश्वरापाशीं जें वारंवार मागणें केलें आहे आणि गोरूपसंपत्ति व ाढावी म्हणून ज्या प्रार्थना केलेल्या आहेत त्यांवरून गाईचें महत्त्व किती आहे हें दिसून येईल. म्हणूनच गाईकरितां स्वाऱ्या ( गविष्टि ) झालेल्या प्रसिद्धच आहेत. ऋग्वेदांत भरतांच्या मुख्याला ' गव्यन् ग्रामः ' असें म्हटलें आहे; आणि गो-पाय ( गायी राखणें ) यापासूनच ऋग्वेदकाळांत गुप्-राखणें हा धातु निघाला आहे. वैदिक काळांतील कवी गाईंच्या हंबरण्याशीं आपल्या कवनांची तुलना करीत व अप्सरांचें गायीशीं साम्य कल्पीत. वैदिक काळांतील गुरें निरनिराळ्या रंगांचीं ( रोहित, शुक्ल, पृश्नि, कृष्ण ) असत. गाड्या ओढणें आणि नांगराला जुंपणें हीं साधारण दोन कामें बैलांची असत. हे बैल बहुधा बडविलेले असत. गाईंना गाडी ओढण्याचें काम नेहमीं करावें लागत नसे, पण कधीं कधीं त्यांना गाडीला जुंपीतहि असत. गाईचें आणि बैलांचें मांस कधीं कधीं खाल्लें जाई. गुरें ही प्रत्येकाच्या मालकीची वस्तु असे; आणि तें एक चलनी नाण्याचें प्रमाण मानून सर्व वस्तूंची किंमत त्याच्यावरून ठरविली जात असे. साधारणपणें ' गो ' हा शब्द गाईपासून मिळणारे पदार्थ दर्शविण्याकरितांहि उपयोगांत आणीत असत. हा शब्द नेहमीं दूध व क्वचित् प्रसंगीं गोमांस असाहि अर्थ दर्शवितो. पुष्कळ ठिकाणीं या शब्दाचा उपयोग ' निरनिराळ्या कारणांकरितां उपयोगांत आणिलेलें कमावलेलें कातडें ' अशा अर्थानें करितात. उदाहरणार्थ, धनुर्ज्या, गोफण, रथाचा भाग

बांधण्याकरितां वादी, लगाम, चाबकाची पट्टी या ठिकाणीं गो शब्दाचा अर्थहि तोच आहे. गुरें, दूध पाहा.

**गायकवाड**— या घराण्याचें मूळ गांव पुणें जिल्ह्यांतील दावडी होय. मूळ पुरुष दमाजी हा खंडेराव दाभाड्यांच्या पदरीं होता; व १७२० मध्यें बाळापूरच्या लढाईंत शौर्य दाखविल्यामुळें शाहूनें समशेरबहादुर हा किताब व सेनापतीची मुतालकी देऊन गौरव केला. दमाजीनंतर त्याचा पुतण्या पिलाजी हा सोनगडला राहूं लागला व गुजरातेंत त्यानें चौथाईचे हक्क मिळविले. डभईच्या लढाईत तो दाभाड्यांच्या बाजूनें लढत होता. पिलाजीनंतर बडोदें ही गायकवाडांची राजधानी झाली. त्याचा मुलगा दमाजी हाहि बापाप्रमाणें शूर होता. तो गुजरात आणि काठेवाड यांत चौथाई वसूल करी; तो ताराबाईच्या पक्षाकडचा असे व पेशव्यांशीं फटकून वागे. त्याला नानासाहेब पेशव्यानें पुण्यास नजरकैदेंत ठेवला होता (१७५१). पण खंडणी घेऊन दोन वर्षांनीं सोडून दिला. त्याच्या मिळकतींत पेशव्यांनीं आपला निम्मा वांटा ठेवला व त्याप्रमाणें पुढें अहमदाबाद दोघांच्या हिस्स्यांत राहिलें. पानपताहून होळकराप्रमाणें दमाजीनें पळ काढला व पुढें गायकवाड राघोबाच्या पक्षास मिळाला. दमाजी १७६८ त वारल्यानंतर त्याच्या मुलांत भांडणें लागलीं. गोविंदराव राघोबाकडे व फत्तेसिंग बारभाईकडे असे. पुढें इंग्रजांनीं या दोघांत समेट करून दिला. त्यामुळें फत्तेसिंगाचेंहि पेशव्यांशीं वितुष्ट आलें व तो इंग्रजांचा हस्तक बनला.

फत्तेसिंगाच्या मृत्यूनंतर (१७८९) पुन्हां गादीविषयीं भांडणें लागलीं. गोविंदरावाची अद्यापि खटपट चाललीच होती. शिंदे त्याच्या बाजूस होते. या प्रकरणांत पुन्हां इंग्रजांनीं साधून घेतलें व गायकवाडांच्या खासगी गोष्टींतहि ते पडूं लागले. गोविंदरावांच्या मृत्यूनंतरहि यादवी चालू होती ती गंगाधरशास्त्र्याच्या खुनापर्यंत. पेशवे गेल्यानंतर इंग्रजांवर दाब राहिला नाहीं व ते गायकवाडांना चेपतच चालले. गोविंदरावाचा मुलगा सयाजीराव याच्याशीं १८२१ सालीं एल्फिन्स्टननें तह करून त्याला मांडलिक बनविलें. दौलतीला फार कर्ज झालें होतें तें हळूहळू फेडविलें. सयाजीराव व इंग्रज अधिकारी यांचे नेहमीं या बाबतींत खटके उडत. त्याला पदच्युत करण्याचाहि घाट घातला होता. सयाजीराव प्रजेचा फार आवडता राजा होता. त्यानें जप्त झालेला बराच मुलूख सोडवून घेतला. त्याच्या मृत्यूनंतर (१८४७) वडील मुलगा गणपतराव गादीवर बसला. तो नऊ वर्षांनीं वारल्यानंतर त्याचा भाऊ खंडेराव आला. त्यानंतर मल्हारराव हा अगदीं नालायक राजा आपल्या दुर्गुणांनीं पदच्युत झाल्यानंतर सयाजीराव (तिसरे) दत्तक घेतले जाऊन लहानपणींच गादीवर बसले; त्यांच्या कारकीर्दींत बडोदें राज्य फार भरभराटलें. त्यांच्याइतका कर्तबगार राजा अखिल हिंदुस्थानांत त्या वेळीं नव्हता. ते १९३९ सालीं वारल्यानंतर त्यांचे नातू विद्यमान प्रतापसिंह गादीवर आले. आतां बडोदें संस्थान विलीन झाल्याकारणानें या घराण्यांत यापुढें राजपद राहणार नाहीं.

**गायकवाड, सयाजीराव खंडेराव** (१८६३–१९३९)— बडोदें संस्थानचे एक अधिपति. कवळण्याच्या काशीराव गायकवाडांचे हे द्वितीय चिरंजीव होत. खंडेराव गायकवाडांच्या पत्नी जमनाबाईसाहेब यांनीं यांना ता. २७ मे १८७५ रोजीं दत्तक घेतलें. यांचें पहिलें नांव गोपाळराव असें होतें, ते नंतर बदलून 'सयाजीराव' असें ठेवण्यांत आलें. मातोश्री जमनाबाईसाहेब, दिवाण सर टी. माधवराव व शिक्षक मि. इलियट यांच्या देखरेखीखालीं राज्यकारभारास जरूर असणारें सर्व प्रकारचें शिक्षण यांना देण्यांत आलें. त्यानंतर सन १८८१ च्या डिसेंबरमध्यें बडोदा राज्याची धुरा यांच्यावर सोंपवण्यांत आली व हे स्वतःच्या जबाबदारीवर राज्यसूत्रें हालवूं लागले. राज्यावर येतांच यांनीं राज्यकारभाराच्या कामीं लायक व जबाबदार अधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या व त्यांच्याकरवीं राज्यकारभारांत सुधारणा घडवून आणल्या. न्याय–अमलबजावणी, आरोग्य, पोलिस यांसारख्या खात्यांतील अनागोंदी कारभाराचें यांनीं पूर्ण उच्चाटन केलें व प्रजेकडून वाहवा मिळविली.

वरिष्ठ इंग्रज सत्तेशींहि यांना झगडा द्यावा लागला. संस्थानिकांच्या वागणुकीवर निर्बंध घालणारें कर्झन सर्क्युलर व सन १९०३ मध्यें बादशहा सातवे एडवर्ड यांच्या राज्यारोहणप्रसंगीं दिल्लीस संस्थानिकांनीं मिरवणुकींत सामील होण्याचा ब्रिटिश हुकूम यांबद्दल यांनीं आपली पूर्ण नापसंती व्यक्त केली. ब्रिटिश सत्तेपुढें हांजीखोरपणाची वृत्ति यांनीं कधींच दाखवली नाहीं.

राज्यावर येतांच यांनीं आपल्या राज्यांत सर्वत्र सक्तीचें प्राथमिक शिक्षण सुरू केलें. औद्योगिक शिक्षणसाठीं 'कलाभुवना'सारख्या संस्था उघडण्यांत आल्या. अनेक शिष्यवृत्त्या निर्माण करून यांनीं निरनिराळ्या विषयांतील अभ्यासकांना उत्तेजन दिलें. शाळांप्रमाणेंच प्रत्येक गांवीं वाचनालयें उघडून यांनीं लोकांत ज्ञानार्जनाची आवड निर्माण केली,

ज्ञानप्रसाराप्रमाणेंच समाजसुधारणेच्या बाबतींतहि यांनीं आघाडी मारली. ( १ ) पडदापद्धतिबंदी, ( २ ) बालविवाहबंदी, ( ३ ) मिश्रविवाह, ( ४ ) विवाह-विच्छेद, ( ५ ) स्त्रियांचा वारसा, ( ६ ) कन्याविक्रयबंदी, यांसारखे कायदे करून यांनीं सामाजिक सुधारणांना मूर्त स्वरूप दिलें. विद्या आणि वाङ्मय यांना सयाजीरावांनीं जितकें प्रोत्साहन दिलें व विद्वानांना आश्रय दिला तितका कोणींच दिला नाहीं.

हिंदुस्थान, चीन, जपान, अमेरिका व युरोप यांसारख्या अनेक देशांत हिंडून यांनीं तिकडील अनेक सुधारणांचा फायदा आपल्या प्रजेला करून दिला.

सर टी. माधवराव, सर रमेशचंद्र दत्त, व्ही. पी. माधवराव, सर मनुभाई मेथा यांच्यासारखीं अनुभवी व कर्तबगार माणसें आपल्या संस्थानच्या मंत्रिपदांवर घेऊन यांनीं संस्थानच्या हिताचे सर्व प्रयत्न केले व जगांतील एक यशस्वी व कर्तबगार राजा म्हणून कीर्ति मिळविली. हिंदुस्थानांतील युगप्रवर्तक थोर व्यक्तींत त्यांची गणना होते.

**गायकवाड, सयाजीराव गोविंदराव** ( १८२०-४७ )— वडोदें संस्थानचे एक अधिपति. आनंदरावांच्या मृत्यूनंतर वडोदें संस्थानच्या गादीवर आलेले हे हुषार व प्रजाहितदक्ष अधिपति होत. यांच्या कारकीर्दीत आनंदरावांच्या राणीनें व यांच्या दोन सावत्र आयांनीं आपल्या मुलांना बडोद्याच्या गादीचे वारस ठरवण्याचे प्रयत्न केले; परंतु ते निष्फळ ठरले. इंग्रजांनीं यांच्यापूर्वी अनेक मार्गांनीं लुबाडलेला संस्थानचा मुलूख यांनीं परत मिळवला व संस्थानांतील इंग्रजी वर्चस्वास व कारवायांस आळा घातला. यांना गणपतराव, खंडेराव व मल्हारराव असे तीन मुलगे होते.

**गायगहूं**—[ वर्ग-स्क्रोफुलारिआसी, जाति-मेलामपिरम ]. हें एकवर्षायु रोप असून त्याचीं पानें अरुंद व एकासमोर एक येतात. याचें फूल पिंवळें किंवा किंचित् गुलाबी रंगाचें असतें. याला दोन फुलें असलेलीं बोंडें येतात व त्यांत कांहीं बिया असतात. हीं रानामध्यें, धान्याच्या शेतांत किंवा कुरणांत वाढतात व तीं दुसऱ्या झाडांच्या मुळांपासून आपलें पोषण करतात. हीं गुरांना चारा म्हणून घालतात.

**गायत्री**— ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलांतील ६२ व्या सूक्ताच्या, विश्वामित्रानें दृष्ट अशा, १० व्या ऋचेला गायत्री म्हणतात. गायत्री हें वेदांतील अष्टाक्षरी वृत्ताचें नांव आहे. ऐतरेय ब्राह्मणाच्या तिसऱ्या पंचिकेंत याच अर्थी गायत्रीची कथा आली आहे. संध्याकर्मीतील जो गायत्री मंत्र गायत्री छंदांत आहे त्या गायत्री मंत्रास ब्राह्मणग्रंथांपर्यंत वैशिष्ट्य आलेलें आढळत नाहीं. उपनयन संस्कारांत या गायत्री मंत्राचा उपदेश होत असतो. सत्याषाढसूत्रांत उपदेशप्रसंगीं या मंत्राचा विनियोगदृष्ट्या प्रत्यक्ष पाठ प्रथमच केलेला आढळतो. त्यावरून गायत्री मंत्र हाच होय हें सिद्ध होतें. सर्व स्मार्त सूत्रकारांनीं या मंत्रास गायत्री असें नांव न देतां सावित्री असें नांव दिलें आहे. आश्वलायन गृह्यपरिशिष्टांत संध्याकर्मांत गायत्री जपाच्या आरंभीं गायत्री ही देवता कल्पून तिचें प्रातःकाल, माध्यान्हकाल व सायंकाल या तीनहि कालीं संध्येंत करावयाचें एकत्व ध्यान प्रथम देऊन त्यापुढें तीन वेळचीं निरनिराळीं ध्यानें दिलीं आहेत. त्यामध्यें वरील तिन्ही कालांच्या अनुक्रमें ऋक्, यजुस् व सामरूपी गायत्रीचें वर्णन असून कालपरत्वें गायत्रीचे वर्ण, वाहन, देवता, वसन इत्यादिकांचे निरनिराळे प्रकार दिले आहेत. वरील विवेचनावरून गायत्रीमंत्राचा जप करण्याची चाल सूत्रकालांत सुरू झाली असावी व त्या मंत्राचें सावित्री हें नांव त्या वेळी रुढ असून सूत्रकालानंतर गायत्री हें नांव रुढ झालें असावें. त्रैवर्णिकांत या मंत्राचें महत्त्व अतिशय मानिलें जातें. 'तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचोदयात्॥' हा गायत्री मंत्र बुद्धि देण्याविषयीं सूर्यस्तुतिवाचक आहे.

गाय आणि गायत्री यांची एकरूपता पुढील काळांत गोसंवर्धनासाठीं प्रतिपादण्यांत आली असली पाहिजे.

**गार, चकमक**—( फ्लिंट ). हा एक सिकतित प्रस्तर असून याचा रंग निळसर करडा किंवा काळसर करडा असतो व तो हळूहळू पांढरा किंवा पिवळट बनतो. याचे बहुधा वाटोळसर खडे आढळतात; व ते चुनखडीवरील रासायनिक क्रियेनें बनत असावे. हे फार कठिण असून पोलादाचा यांवर आघात केला असतां यांतून ठिणगी पडते. यांचा उपयोग कांच व कांचेचीं भांडीं तयार करण्याकरितां करतात.

**गारगोटी, कांचमणी**—( क्वार्ट्झ ). सिकता ( सिलिका )-च्या स्फटिकांना ही सामान्य संज्ञा आहे. याचे मुख्य प्रकार पुढें दिल्याप्रमाणें आहेत :—१. स्फटिक प्रस्तर ( रॉकक्रिस्टल )- हा बर्फाच्या स्फटिकासारखा असतो. २. धुरकट गारगोटी ( स्मोकी कार्ट्झ ). ३. पीत गारगोटी (सायिट्रॉइन), ४. राजावर्त (ॲमेथिस्ट). ५. गुलाबी गारगोटी ( रोझक्वार्ट्झ ). ६. दुधी गारगोटी ( मिल्की क्वार्ट्झ ). ७. गोमेद ( कार्नेलियन ). ८. हरित गारगोटी ( क्रिसोप्रेझ ). ही अर्धपारदर्शक आणि जांभळसर पिंगट रंगाची स्फटिकमय असते. बोहेमियन किंवा स्कॉटिश, टोपॅझ हे पिवळ्या पारदर्शक गारेचे नमुने आहेत. राजावर्त हा निळा व पारदर्शक असतो. दूध गारगोटी ही दुधासारखी पांढरी असते. गोमेद ( कुरुंद ) हा रक्तासारखा लाल असतो. क्रिसोप्रेझ हा सफरचंदासारखा हिरवा असतो.

कॅल्सीडोनी गार आणि गॅस्पर हे सिकता स्फटिक असून बारीक तंतुमय असतात (अगेट पाहा). गारांच्या कांहीं जाती कलांच्या आणि उद्योगधंद्यांच्या कामांत महत्त्वाच्या आहेत. सध्यां गारांचा उपयोग पेले व भांडीं तयार करण्याकरितां तसेंच मुद्रा, चष्मे, व दुर्बिणीच्या कांचा व इतर दृग्यंत्रें बनविण्याकरितां करण्यांत येतो. कांच व निरनिराळ्या प्रकारचीं भांडीं बनविण्या-करितांहि गारेचा उपयोग होतो. तांबें वगैरे धातू गाळण्याच्या कामीं वितळण्याकरितां व इतर धातुकामांत गारेचा उपयोग करतात. गार वितळून व तिची सिकता कांच बनवून तिचा उपयोग सूक्ष्मदर्शक यंत्रें, ताणकाटे व प्रयोगशालांतील भांडीं बनविण्याकरितां करण्यांत येतो.

**गारगोटी खडक**—(क्वार्टझाइट). हा बहुतेक पूर्णपणें गारेचा बनलेला स्फटिकमय रवेदार स्तरयुक्त पाषाण आहे. हा वालुकाजन्य खडक असून सिकता (सिलिका)नें सांधलेला असतो. याचा रंग करडा असून त्यामध्यें लोहाचा अंश असल्यास त्यास गुलाबी छटा येते.

**गारपगारी**—मध्यप्रांतांत आढळणारी एक जात. लोकवस्ती सुमारें ९ हजार. हे शेतावर पडणाऱ्या गारांचें निवारण करतात अशी समजूत आहे; व तारा, ओतारी, धानकर, हरण्या, वाघ, दंवडे अशीं यांचीं नावें आहेत. यांचीं लग्नें कुणब्यांप्रमाणें होतात. विधवाविवाह सुद्धां होतात पण कोणी कोणी बायका 'भगत' बनतात. त्या पुरुषाचा पोषाख घालून यात्रा करतात. गारांचें भविष्य वर्तविण्यास व त्यांचें निवारण करण्यास हे अनेक प्रकारचे मंत्रतंत्र व जादूटोणे करतात व प्रसंगीं आपल्या मुलांचा वधहि करून त्रागा करतात. गारपगारी गांवांत नसला तर त्याची बायको गारांचें निवारण व्हावें म्हणून मारुतीपुढें लुगडें सोडून उभी राहते व त्या ब्रह्मचारी देवाला आपल्या दिगंबर स्वरूपानें भेडसावते, असें रसेल व हिरालाल 'मध्य-प्रांतांतील जाती' या ग्रंथांत वर्णन करतात.

**गारफील्ड, जेम्स अब्रॅम्** (१८३१–१८८१)—अमेरिकें-तील संयुक्त संस्थानांचा विसावा अध्यक्ष. त्याचें प्राथमिक शिक्षण सामान्य शेतकऱ्याप्रमाणें लहान शाळेंत झालें. शिक्षक, सुतार व शेतकरी या नात्यानें कामें करून विल्यम्स कॉलेजांत शिकून व प्रतिकूल परिस्थितीशीं झगडून त्यानें १८५६ सालीं हिरॅम येथील इक्लेक्टिक इन्स्टिटयूटमध्यें प्रथम विद्यार्थी या नात्यानें, नंतर प्राचीन भाषा व वाङ्मय यांचा प्रोफेसर म्हणून व पुढें त्याच संस्थेचा प्रिन्सिपाल म्हणून चांगलें नांव मिळविलें.

त्यानंतर लौकरच तो राजकीय चळवळींत पडला. प्रजा-सत्ताक पक्षाच्या आरंभकालीं व १८५७ आणि १८५८ च्या मोहिमांच्या वेळीं उत्कृष्ट वक्ता व गुलामगिरीचा निषेधक म्हणून तो पुढें आला. १८५९ सालीं आपल्या कर्तृत्वाच्या बळावर तो ओहिओ सिनेटमध्यें निवडून आला. १८६२ त तो स्वयं-सेवकांचा ब्रिगेडियर जनरल झाला. त्याच सालीं तो कॉंग्रेसचा सभासदहि झाला. पुढें १८६३ मध्यें आपलें लष्करी कमिशन सोडून देऊन त्यानें हाउस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हमध्यें आपला प्रवेश करून घेतला. १८६३ ते ७३ च्या दरम्यान गुलामगिरी-विरुद्ध त्यानें अनेक व्याख्यानें दिलीं. १८७७ त तो हाउस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हचा पुढारी झाला. परंतु डेमोक्रॅट लोकांचें संख्याबल जास्त असल्यानें त्याचा पराभव झाला. १८८० सालीं रिपब्लिक पक्षाला एक उमेदवार अध्यक्ष म्हणून नेमावयाचा होता. तेव्हां साहजिकच योग्य मनुष्य म्हणून जनतेनें त्याला अध्यक्ष म्हणून निवडलें. त्या वेळीं पक्षद्वेष इतका माजला होता कीं, एका विरुद्ध बाजूच्या मनुष्यानें *वॉशिंग्टन रेल्वे स्टेशनवर त्यास गोळी घातली.*

**गारस्फटिक**—(चर्ट). हा एक वाळू (सिलिका)चा मोठा स्फटिक असून बहुतेक गारेसारखा दिसतो. प्रत्यक्ष खऱ्या गारेशिवाय बाकीच्या सर्व गारांना चर्ट म्हणतात. ही गार वाळूच्या दगडांत आढळते व केव्हां केव्हां तिच्या शेजारीं वालुकामय स्पंजहि आढळतो.

**गारा**—ढगांतून खालीं गोठलेला पाऊस किंवा बर्फाचे खडे जोरानें पडतात त्याला म्हणतात. या गारांचे पुष्कळ प्रकार असतात. कांहीं कठिण तर कांहीं मऊ असतात. विलाय-तेंत हिंवाळ्यांत बर्फ पडण्यापूर्वी गारांचे बारीक कण पडतात. व उन्हाळ्यांत मोठ्या गारा पडतात. उष्ण प्रदेशांत गारांचा वर्षाव कधीं कधीं फार भयंकर असतो.

**गारा**—हा राग खमाज थाटांतून निघतो. याचा आरोहाव-रोह सात स्वरांचा, म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. याचा वादी षड्ज व संवादी पंचम आहे. हा राग सार्वकालिक आहे. या रागाच्या आरोहांत तीव्र गांधार व तीव्र निषाद व अवरोहांत कोमल निषाद व कोमल गांधार असे स्वर लागतात. हा क्षुद्रगीतांतील राग आहे. मंद्र सप्तकांतील मध्यमास षड्ज कल्पून मध्य सप्तकांतील मध्यमापर्यंतच्या क्षेत्रांत गायक जेव्हां हा राग गातो तेव्हां तो फार गोड लागतो. झिंझटी व पिलु हे राग या रागांत मिसळलेले दिसतात.

**गारुआ**—हें शहर व बंदर पश्चिम आफ्रिकेंत कामेरून या पूर्वीच्या जर्मन प्रदेशांत आहे, व त्यावर हल्लीं फ्रान्सचा ताबा आहे. हें शहर, बेन्यू नदीकांठीं असून बेन्यूपासून नायगरकडे जाणाऱ्या रस्त्यावरील महत्त्वाचें स्टेशन आहे. लोकसंख्या ५,००,००० आहे.

**गालगुंडें**—कानाजवळच्या (उपकर्ण) ग्रंथी सुजल्यामुळें हा रोग होतो. हा एक सांसर्गिक तीव्र प्रकारचा रोग आहे. हा प्रत्यक्ष संसर्गानें पसरतो. याची गर्भावस्था १८ ते २१ दिवसांची असते. बहुधा दोन्ही कानांच्या मागील ग्रंथी सुजतात, आणि वेदना होतात. या रोगामध्यें वृषणास सूज येऊन वेदना होऊं लागतात. स्त्रियांच्याहि जननेंद्रियास यासारखाच विकार होण्याचा पण कमी संभव असतो. सुजलेला भाग कापूस लावून गरम कपड्यानें बांधावा. शेकण्यानें ठणका कमी होतो. गांठींत पू असल्यास शस्त्रक्रिया करावी लागते. रोग बरा झाल्यानंतरहि कांहीं दिवस अशक्तता राहते.

**गालचा लोक**—हे मध्य आशियांत ऑक्झस नदीकांठच्या प्रदेशांत राहणारे लोक असून त्यांच्या अनेक जमाती आहेत. भाषाशास्त्रदृष्ट्या हे लोक आर्यन वंशांतले असून शारीरशास्त्रदृष्ट्या केल्टिक-युरोपिअन वंशांतले आहेत. त्यांच्यापैकीं बहुतेक लोक सुनी पंथाचे मुसलमान आहेत.

**गालव**—१. एक ब्रह्मर्षि; व्यासशिष्य; सावर्णि मन्वंतरांतील एक सप्तर्षि.

२. विश्वामित्राचा एक पुत्र. दुष्काळांत दर्भरज्जू बांधून त्याला विकावयास काढल्यामुळें हें नांव त्यास मिळालें होतें.

३. हा विश्वामित्राचा शिष्य होता. विश्वामित्रानें गुरुदक्षिणा म्हणून याच्याजवळ ८०० श्यामकर्ण घोडे मागितले असतां हा ययातीकडे गेला. त्याच्याजवळ घोडे नसल्यानें त्याच्या माधवी नांवाच्या मुलीला घेऊन सूर्यवंशीय हर्यश्व राजाकडे तिला एक पुत्र होईपर्यंत ठेवून त्याच्यापासून त्यानें दोनशें घोडे घेतले. पुढें सोमवंशी दिवोदास व भोजराज उशीनर या प्रत्येकाजवळ एक एक मुलगा होईपर्यंत माधवीस ठेवून त्यांच्याकडूनहि त्यानें दोनदोनशें घोडे आणले. नंतर सहाशें घोडे व माधवी यांना घेऊन तो विश्वामित्राकडे गेला व घोडे त्यास दिले. विश्वामित्रानेंहि दोनशें घोड्यांऐवजी एक पुत्र होईपर्यंत माधवी ठेवून घेऊन तिला गालवाकडे परत केली. त्यानें तिला ययातीकडे नेऊन स्वतः तपाचरणास निघून गेला. याप्रमाणें त्यानें गुरुदक्षिणेची फेड केली. ही कथा तत्कालीन समाजपद्धतीवर बराच प्रकाश पाडणारी आहे.

**गालापागास बेटें**—पॅसिफिक महासागरांतील हा द्वीपसमूह विषुववृत्ताच्या खालीं आहे. सोळाव्या शतकांत स्पॅनिश लोकांनीं या बेटांचा शोध लावला. त्या वेळीं येथें मनुष्यांची वस्ती नव्हती. कित्येक बेटांची इंग्रजी नांवें चांचे लोकांनीं दिलेलीं असावीं. अलबेमारले अथवा इसाबेला, नारवरो, सँटाक्रूझ, चॅथम, जेम्स, चार्लस, इत्यादि या द्वीपसमूहांचीं कांहीं नांवें आहेत. या बेटांचें एकंदर क्षेत्रफळ २,८६८ मैल असून लो. सं. १,००० आहे. येथें कित्येक ज्वालामुखी आहेत. १८३२ सालीं हा द्वीपसमूह इक्वेडोर देशाला जोडला गेला. पनामा कालव्यामुळें या बेटास महत्त्व आलें. येथील द्वीपसमूहामध्यें घोडे, माकडें, डुकरें, बकरीं, कुत्रें, वगैरे बरेच प्राणी आहेत. येथें उंच वृक्ष, हिरवीगार झुडुपें व बहुविध वनस्पतीहि बऱ्याच आहेत. गालापागास बेटें इक्वेडोर देशास व्यापाराच्या दृष्टीनें महत्त्वाचीं वाटतात. कारण त्या बेटांवर सांपडणारा ग्वानो व अर्चिला नांवाचें शेवाळ युरोपांत पाठविलें जातें. डार्विननें या द्वीपसमूहास भेट दिल्यापासून त्यांचें महत्त्व वाढलें आहे.

**गालिचे**—घरामध्यें दिवाणखाना, जिना, व्हरांडा, वगैरे जागीं घालण्याकरितां लोंकरीचें किंवा सुती जाड विणून केलेलें कापड. हे पौरस्त्य देशांतच प्रथम बैठकीकरितां वापरण्यांत येत असत. इराण, तुर्कस्तान व हिंदुस्थान यांमध्यें गालिचे हातानें विणण्यांत येतात आणि त्यांमध्यें योग्य तऱ्हेच्या रंगांचे लोंकरीचे तुकडे बाण्यामध्यें भरून निरनिराळ्या प्रकारची नक्षी विणण्यांत येते. ब्रुसेल्स येथें तयार होणाऱ्या गालिच्यांत तागाच्या वळीव दोऱ्यांनीं नक्षी भरण्यांत येते. या गालिच्याच्या विणीत असलेले आडवे उभे धागे वर दृष्टीस पडत नाहींत. स्कॉटलंडमध्यें तयार होणाऱ्या गालिच्यांत दोन वेगवेगळ्या विणी एकत्र गुंफण्यांत येतात. यामुळें एकाच प्रकारची नक्षी दोही बाजूंस दृष्टीस पडते. पण त्यांतील रंग मात्र निराळे असतात. लोंकर दाबून व त्यांवर नक्षीचे, रंगाचे ठसे उठवूनहि बुरणुसासारखे गालिचे तयार करण्यांत येतात व हे स्वस्त असतात. तसेंच तागाच्या कापडावर रंगीत ठसे उठवूनहि आणखी स्वस्त गालिचे तयार करण्यांत येतात.

उत्कृष्ट भारी किंमतीचे गालिचे इराणांतून आलेले असतात. पाश्चात्य देशांत विल्टन, ब्रुसेल्स व एक्समिन्स्टर येथील गालिचे फुलाचे (पाइल) असून फार प्रसिद्ध आहेत. चिनफुलाचे गालिचे वोर्सेस्टरशायरमधील किडरमिन्स्टर येथें होतात. ते उलटेहि सारखेच दिसतात.

गालिचे खाणारे एक प्रकारचे किडे असतात. ते नाहींसे करणें जरूर असतें. पायरेथ्रमची पूड व डामरी गोळ्या या कामीं उपयुक्त असतात. गालिच्यावरें धूळ फार बसते व ती सहज निघत नाहीं. तेव्हां ती काढण्यासाठीं एक रुळाचा ब्रश मिळतो. हा धूळपेटींत बसविलेला असतो. ज्या ठिकाणीं वीज उपलब्ध असते त्या ठिकाणीं निर्वातमार्जनी (व्हॅक्युम क्लीनर) गालिचे झाडण्यास वापरणें सोयीचें असतें.

**गालिब** (१७९५-१८३८)—फार्सी भाषेंतील एक महाकवि. उर्दूमध्येंहि हा कविता करीत असे. याचे पूर्वज इराणांतून दिल्लीस आले. गालिब हें याचें उपनांव आहे. कवितेंत हा

आपलें नांव 'असद' असें वापरतो. हा गुणी, उदार, स्वाभिमानी, विनोदप्रिय व व्यवस्थितपणाच्या बाबतींत अत्यंत दक्ष असे. सन १८२९ त हा कलकत्त्यास गेला. नंतर त्यानें आपला शिष्य रामपूरचा नवाब याच्या पदरीं दरमहा २०० रुपये पगारावर नोकरी केली. पुढें यास दिल्लीशिवाय करमेनासें झाल्यानें यानें दिल्ली गांठली. याचें लिखाण सर्वसाधारण जनतेला आकलन होईल असेंच असून तें स्वतंत्रपणे लिहिलेलें दिसून येतें. काव्यलेखनाप्रमाणें गद्यलेखनांतहि याची लेखणी सफाईदार रीतीनें चाले. 'उर्दू-ए-मुअल्ला', 'औद-ए-हिंदी' हे याचे उर्दूतील प्रसिद्ध गद्यग्रंथ होत.

**गाल्टन, सर फ्रॅन्सिस** (१८२२-१९११)— हा इंग्रज प्रवासी व मानववंशशास्त्रवेत्ता एरॅस्मस् डार्विनचा नातू होय. याचें शिक्षण केंब्रिज येथें ट्रिनिटी कॉलेजांत झाल्यावर त्यानें ईजिप्तमध्यें व्हाइट नाइल नदीच्या प्रदेशांत प्रवास केला. आणि नंतर डमारा आणि ओव्हाम्बो या अज्ञात देशांचें संशोधन केलें. या प्रवासाचें वृत्त त्यानें एका पुस्तकांत प्रसिद्ध केलें आहे. त्याच्या 'मीटिओरो ग्राफिका' (१८६३) या ग्रंथांत त्यानें या शास्त्राबद्दल अगदीं नवी अशी पुष्कळ माहिती दिली आहे. पुढें त्यानें आनुवंशशास्त्र या विषयाचा अभ्यास केला, आणि महत्त्वाचे जे ग्रंथ प्रसिद्ध केले ते म्हणजे 'हेरेडिटरी जीनस, इट्स लॉज अँन्ड कॉन्सिक्वेन्सेस' (आनुवंशिक प्रतिभा, तिचे नियम आणि परिणाम); 'इन्कायरीज इन्टु ह्यूमन फॅकल्टी अँन्ड इट्स डेव्हलपमेंट' (मानवी शक्ति व तिची वाढ यासंबंधीं शोध); 'नॅचरल इन्हेरिटन्स' (स्वाभाविक वंशार्जितता); 'फिंगर प्रिन्टस्' (बोटांचे ठसे); आणि 'फिंगर प्रिन्ट डिरेक्टरी' (१८९५). शिवाय त्यानें 'एसेज् इन् यूजेनिक्स' (सुप्रजाजननावर निबंध, आणि 'मेमरीज ऑफ माय लाइफ' (माझ्या आयुष्यांतील आठवणी), हे ग्रंथ लिहिले आहेत.

**गाल्सवर्दी, जॉन** (१८६७-१९३३)—हा ब्रिटिश कादंबरीकार आणि नाटककार असून त्यानें १९०० मध्यें 'दि व्हिला रुबेन' या नांवाचा लघुकथासंग्रह प्रसिद्ध केला. त्याच्या कादंबऱ्या आणि गोष्टी ज्या सुप्रसिद्ध आहेत त्या म्हणजे दि आयलंड फॅरीसीज (१९०४); दि कंट्री हाउस (१९०७); दि डार्क फ्लॉवर (१९१५); बियाँड (१९१७); फाइव्ह टेल्स (१९१८); सेंट्स प्रोग्रेस (१९१९); अवेकनिंग (१९२०); टु लेट (१९२१); दि व्हाइट मंकी (१९२४); ओव्हर दि रिव्हर (१९३६). त्याच्या नाटकांपैकीं कांहीं नाटकें—सिल्व्हर बॉक्स (१९०६); जॉय (१९०७); स्ट्राइफ (१९०९); जस्टिस (१९१०); दि पीजन (१९१२); दि स्किन गेम (१९२०); ए फॅमिली मॅन (१९२१) लॉयल्टीज (१९२२); आणि विंडोज (१९२२). यांशिवाय त्याचें २ निबंधसंग्रह प्रसिद्ध आहेत ते—'ए शीफ' (१९१६); आणि 'अनदर शीफ' (१९१९). हे निबंध प्रचलित प्रश्नांवर लिहिलेले आहेत. त्याच्या कादंबऱ्यांतून व्हिक्टोरिया राणीच्या काळांतील जीवन बहुधा रंगविलेलें असतें. त्याचीं नाटके सामाजिक विषयांवरचीं आहेत. सभ्यता, दया, सहनशीलता, प्रामाणिकपणा हे सद्गृहस्थाचे गुण असलेच पाहिजेत असा त्याचा कटाक्ष दिसतो. वास्तववादी तत्त्वज्ञानाचा तो उपासक होता.



**गावड**—एक शेतकरी जात. रत्नागिरी जिल्हा व सांवतवाडी संस्थान यांत हे लोक आहेत. गावड शब्द गांव या शब्दापासून झाला असें कांहीं भाषाशास्त्रज्ञ मानतात. हे लोक मराठी बोलतात. यांमध्यें पूर्वी देवकें होतीं व पुढें कुळें होऊन ब्राह्मणाप्रमाणें गोत्रेंहि झालीं आहेत. यांचा मूळ धंदा मीठ करण्याचा होता. परंतु आतां पुष्कळसे लोक शेतकरी व मजूर आहेत. धर्म व संस्कार यांसंबंधीं चाली भंडाऱ्यांप्रमाणेंच आहेत. आतेबहीण व मामेबहीण यांच्याशीं विवाह करतां येतो. मावस-बहिणीशीं मात्र विवाह होत नाहीं.

**गाविलगड**—वऱ्हाड, उमरावती जिल्हा, मेळघाट तालुक्यांतील किल्ला. हा अहमदशहा बहामनीनें बांधला असावा (१४२५). वऱ्हाडच्या सुभेदाराचें येथें ठाणें असे. अकबराच्या अमदानींत अबुल फजलनें हा जिंकून घेतला (१५९८). मूळची अहीर गवळ्यांची येथें गढी असावी व त्यावरुन गवळीगड—गाविलगड असें नांव पडलेलें दिसतें. मोंगलांपासून भोंसल्यांनीं हा किल्ला घेतला व तेव्हांपासून हा विशेष प्रसिद्धीस आला. भोंसल्यांचें राज्य गेल्यानंतर हा इंग्रजांकडे आला. हा किल्ला सातपुड्याच्या एका टोंकावर असून त्याची उंची चार हजार फूट आहे. किल्ल्यावर एक मशीद पाहण्यासारखी आहे. कांहीं शिलालेखहि आहेत.

**गॉस, एडमंड** (१८४९-१९२८)— हा इंग्रज ग्रंथकार फिलीप हेन्री गॉसचा मुलगा. तो १८७५ पासून १९०४ पर्यंत बोर्ड ऑफ ट्रेडच्या कचेरींत भाषांतरकार होता, आणि १९०४ ते १९१४ पर्यंत हाउस ऑफ लॉर्ड्सचा ग्रंथपाल होता. याचें वाचन दांडगें असून त्यानें इंग्रजी लेखन-शैलींत विशेष भर घातली आहे. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—'हिस्टरी ऑफ एटीन्थ सेंचरी लिटरेचर' (अठराव्या शतकांतील वाङ्मयाचा इतिहास); 'हिस्टरी ऑफ मॉडर्न इंग्लिश लिटरेचर' (आधुनिक इंग्रजी वाङ्मयाचा इतिहास); 'कलेक्टेड एसेज्' (संग्रहित निबंध); 'दि लाइफ ऑफ स्विनबर्न' (स्विनबर्नचें चरित्र); 'इंटर आर्मा'; 'दि फ्रेंच मोरॅलिस्टस्' (फ्रेंच नीतिवेत्ते); 'डायव्हरशन्स ऑफ ए मॅन ऑफ लेटर्स' एका

**गालगुंडें**—कानाजवळच्या (उपकर्ण) ग्रंथी सुजल्यामुळें हा रोग होतो. हा एक सांसर्गिक तीव्र प्रकारचा रोग आहे. हा प्रत्यक्ष संसर्गानें पसरतो. याची गर्भावस्था १८ ते २१ दिवसांची असते. बहुधा दोन्ही कानांच्या मागील ग्रंथी सुजतात, आणि वेदना होतात. या रोगामध्यें वृषणास सूज येऊन वेदना होऊं लागतात. स्त्रियांच्याहि जननेंद्रियास यासारखाच विकार होण्याचा पण कमी संभव असतो. सुजलेला भाग कापूस लावून गरम कपड्यानें बांधावा. शेकण्यानें ठणका कमी होतो. गांठींत पू असल्यास शस्त्रक्रिया करावी लागते. रोग बरा झाल्यानंतरहि कांहीं दिवस अशक्तता राहते.

**गालचा लोक**—हे मध्य आशियांत ऑक्सस नदीकांठच्या प्रदेशांत राहणारे लोक असून त्यांच्या अनेक जमाती आहेत. भाषाशास्त्रदृष्ट्या हे लोक आर्यन वंशांतले असून शारीरशास्त्रदृष्ट्या केल्टिक-युरोपिअन वंशांतले आहेत. त्यांच्यापैकीं बहुतेक लोक सुनी पंथाचे मुसलमान आहेत.

**गालव**—१. एक ब्रह्मर्षि; व्यासशिष्य: सावर्णि मन्वंतरांतील एक सप्तर्षि.

२. विश्वामित्राचा एक पुत्र. दुष्काळांत दर्भरज्जू बांधून त्याला विकावयास काढल्यामुळें हें नांव त्यास मिळालें होतें.

३. हा विश्वामित्राचा शिष्य होता. विश्वामित्रानें गुरुदक्षिणा म्हणून याच्याजवळ ८०० श्यामकर्ण घोडे मागितले असतां हा ययातीकडे गेला. त्याच्याजवळ घोडे नसल्यानें त्याच्या माधवी नांवाच्या मुलीला घेऊन सूर्यवंशीय हर्यश्व राजाकडे तिला एक पुत्र होईपर्यंत ठेवून त्याच्यापासून त्यानें दोनशें घोडे घेतले. पुढें सोमवंशी दिवोदास व भोजराज उशीनर या प्रत्येकाजवळ एक एक मुलगा होईपर्यंत माधवीस ठेवून त्यांच्याकडूनहि त्यानें दोनदोनशें घोडे आणले. नंतर सहाशें घोडे व माधवी यांना घेऊन तो विश्वामित्राकडे गेला व घोडे त्यास दिले. विश्वामित्रानेंहि दोनशें घोड्यांऐवजीं एक पुत्र होईपर्यंत माधवी ठेवून घेऊन तिला गालवाकडे परत केली. त्यानें तिला ययातीकडे नेऊन स्वतः तपाचरणास निघून गेला. याप्रमाणें त्यानें गुरुदक्षिणेची फेड केली. ही कथा तत्कालीन समाजपद्धतीवर बराच प्रकाश पाडणारी आहे.

**गालापागास बेटें**—पॅसिफिक महासागरांतील हा द्वीपसमूह विषुववृत्ताच्या खालीं आहे. सोळाव्या शतकांत स्पॅनिश लोकांनीं या बेटांचा शोध लावला. त्या वेळीं येथें मनुष्यांची वस्ती नव्हती. कित्येक बेटांचीं इंग्रजी नांवें चांचे लोकांनीं दिलेलीं असावीं. अलबेमारले अथवा इसाबेला, नारबरो, सँटाक्रूझ, चॅथम, जेम्स, चार्लस, इत्यादि या द्वीपसमूहांचीं कांहीं नांवें आहेत. या बेटांचें एकंदर क्षेत्रफळ २,८६८ मैल असून लो. सं. १,००० आहे. येथें कित्येक ज्वालामुखी आहेत. १८३२ सालीं हा द्वीपसमूह इक्वेडोर देशाला जोडला गेला. पनामा कालव्यामुळें या बेटास महत्त्व आलें. येथील द्वीपसमूहामध्यें घोडे, माकडें, डुकरें, बकरीं, कुत्रें, वगैरे बरेच प्राणी आहेत. येथें उंच वृक्ष, हिरवीगार झुडुपें व बहुविध वनस्पतीहि बऱ्याच आहेत. गालापागास बेटें इक्वेडोर देशास व्यापाराच्या दृष्टीनें महत्त्वाचीं वाटतात. कारण त्या बेटांवर सांपडणारा ग्वानो व आर्चिला नांवाचें शेवाळ युरोपांत पाठविलें जातें. डार्विननें या द्वीपसमूहास भेट दिल्यापासून त्यांचें महत्त्व वाढलें आहे.

**गालिचे**—घरामध्यें दिवाणखाना, जिना, व्हरांडा, वगैरे जागीं घालण्याकरितां लोंकरीचें किंवा सुती जाड विणून केलेलें कापड. हे पौरस्त्य देशांतच प्रथम बैठकीकरितां वापरण्यांत येत असत. इराण, तुर्कस्तान व हिंदुस्थान यांमध्यें गालिचे हातानें विणण्यांत येतात आणि त्यांमध्यें योग्य तऱ्हेच्या रंगांचे लोंकरीचे तुकडे बाण्यामध्यें भरून निरनिराळ्या प्रकारची नक्षी विणण्यांत येते. ब्रुसेल्स येथें तयार होणाऱ्या गालिच्यांत तागाच्या वळीव दोऱ्यांनीं नक्षी भरण्यांत येते. या गालिच्याच्या विणींत असलेले आडवे उभे धागे वर दृष्टीस पडत नाहींत. स्कॉटलंडमध्यें तयार होणाऱ्या गालिच्यांत दोन वेगवेगळ्या विणी एकत्र गुंफण्यांत येतात. यामुळें एकाच प्रकारची नक्षी दोही बाजूंस दृष्टीस पडते. पण त्यांतील रंग मात्र निराळे असतात. लोंकर दाबून व त्यांवर नक्षीचे, रंगाचे ठसे उठवूनहि ब्रुसेल्ससारखे गालिचे तयार करण्यांत येतात व हे स्वस्त असतात. तसेंच तागाच्या कापडावर रंगीत ठसे उठवूनहि आणखी स्वस्त गालिचे तयार करण्यांत येतात.

उत्कृष्ट भारी किंमतीचे गालिचे इराणांतून आलेले असतात. पाश्चात्य देशांत विल्टन, ब्रुसेल्स व एक्समिन्स्टर येथील गालिचे फुलाचे (पाइल) असून फार प्रसिद्ध आहेत. बिनफुलाचे गालिचे वॉर्सेस्टरशायरमधील किडरमिन्स्टर येथें होतात. ते उलटेहि सारखेच दिसतात.

गालिचे खाणारे एक प्रकारचे किडे असतात. ते नाहींसे करणें जरूर असतें. पायरेथ्रमची पूड व डांबरी गोळ्या या कामीं उपयुक्त असतात. गालिच्यावरें धूळ फार बसते व ती सहज निघत नाहीं. तेव्हां ती काढण्यासाठीं एक रुळाचा ब्रश मिळतो. हा धूळपेटींत बसविलेला असतो. ज्या ठिकाणीं वीज उपलब्ध असते त्या ठिकाणीं निर्वातमार्जनी (व्हॅक्युम क्लीनर) गालिचे झाडण्यास वापरणें सोयीचें असतें.

**गालिब** (१७९६–१८३८)—फार्सी भाषेंतील एक महाकवि. उर्दूमध्येंहि हा कविता करीत असे. याचे पूर्वज इराणांतून दिल्लीस आले. गालिब हें याचें उपनांव आहे. कवितेंत हा

आपलें नांव 'असद' असें वापरतो. हा गुणी, उदार, स्वाभिमानी, विनोदप्रिय व व्यवस्थितपणाच्या बाबतींत अत्यंत दक्ष असे. सन १८२९ त हा कलकत्त्यास गेला. नंतर त्यानें आपला शिष्य रामपूरचा नवाब याच्या पदरीं दरमहा २०० रुपये पगारावर नोकरी केली. पुढें यास दिल्लीशिवाय करमेनासें झाल्यानें यानें दिल्ली गांठली. याचें लिखाण सर्वसाधारण जनतेला आकलन होईल असेंच असून तें स्वतंत्रपणे लिहिलेलें दिसून येतें. काव्यलेखनाप्रमाणें गद्यलेखनांतहि याची लेखणी सफाईदार रीतीनें चाले. 'उर्दू-ए-मुअल्ला', 'औद-ए-हिंदी' हे याचे उर्दूतील प्रसिद्ध गद्यग्रंथ होत.

**गाल्टन, सर फ्रॅन्सिस** (१८२२-१९११)— हा इंग्रज प्रवासी व मानववंशशास्त्रवेत्ता एरॅस्मस् डार्विनचा नातू होय. याचें शिक्षण केंब्रिज येथें ट्रिनिटी कॉलेजांत झाल्यावर त्यानें ईजिप्तमध्यें व्हाइट नाइल नदीच्या प्रदेशांत प्रवास केला. आणि नंतर डमारा आणि ओव्हाम्पो या अज्ञात देशांचें संशोधन केलें. या प्रवासाचें वृत्त त्यानें एका पुस्तकांत प्रसिद्ध केलें आहे. त्याच्या 'मीटिओरो ग्राफिका' (१८६३) या ग्रंथांत त्यानें या शास्त्राबद्दल अगदीं नवी अशी पुष्कळ माहिती दिली आहे. पुढें त्यानें आनुवंशशास्त्र या विषयाचा अभ्यास केला, आणि महत्त्वाचे जे ग्रंथ प्रसिद्ध केले ते म्हणजे 'हेरेडिटरी जीनस, इट्स लॉज ॲन्ड कॉन्सिक्वेन्सेस' (आनुवंशिक प्रतिभा, तिचे नियम आणि परिणाम); 'इन्क्वायरीज इन्टु ह्यूमन फॅकल्टी ॲन्ड इट्स डेव्हलपमेंट' (मानवी शक्ति व तिची वाढ यासंबंधीं शोध); 'नॅचरल इन्हेरिटन्स' (स्वाभाविक वंशार्जितता); 'फिंगर प्रिन्टस्' (बोटांचे ठसे); आणि 'फिंगर प्रिन्ट डिरेक्टरी' (१८९५). शिवाय त्यानें 'एसेज् इन् यूजेनिक्स' (सुप्रजाजननावर निबंध, आणि 'मेमरीज ऑफ माय लाइफ' (माझ्या आयुष्यांतील आठवणी), हे ग्रंथ लिहिले आहेत.

**गाल्सवर्दी, जॉन** (१८६७-१९३३)—हा ब्रिटिश कादंबरीकार आणि नाटककार असून त्यानें १९०० मध्यें 'दि व्हिला रुबेन' या नांवाचा लघुकथासंग्रह प्रसिद्ध केला. त्याच्या कादंबऱ्या आणि गोष्टी ज्या सुप्रसिद्ध आहेत त्या म्हणजे दि आयलंड फॅरीसीज (१९०४); दि कंट्री हाउस (१९०७); दि डार्क फ्लॉवर (१९१५); बियॉंड (१९१७); फाइव्ह टेल्स (१९१८); सेंट्स प्रोग्रेस (१९१९); अवेकनिंग (१९२०); टु लेट (१९२१); दि व्हाइट मंकी (१९२४); ओव्हर दि रिव्हर (१९३३). त्याच्या नाटकांपैकीं कांहीं नाटकें—सिल्व्हर बॉक्स (१९०६); जॉय (१९०७); स्ट्राइफ (१९०९); जस्टिस (१९१०); दि पीजन (१९१२); दि स्किन गेम (१९२०); ए फॅमिली मॅन (१९२१) लॉयल्टीज (१९२२); आणि विंडोज (१९२२). यांशिवाय त्याचें २ निबंधसंग्रह प्रसिद्ध आहेत ते—'ए शीफ' (१९१६); आणि 'अनदर शीफ' (१९१९). हे निबंध प्रचलित प्रश्नांवर लिहिलेले आहेत. त्याच्या कादंबऱ्यांतून व्हिक्टोरिया राणीच्या काळांतील जीवन बहुधा रंगविलेलें असतें. त्याचीं नाटकें सामाजिक विषयांवरचीं आहेत. सभ्यता, दया, सहनशीलता, प्रामाणिकपणा हे सद्गृहस्थाचे गुण असलेच पाहिजेत असा त्याचा कटाक्ष दिसतो. वास्तववादी तत्त्वज्ञानाचा तो उपासक होता.



**गावड**—एक शेतकरी जात. रत्नागिरी जिल्हा व सांवतवाडी संस्थान यांत हे लोक आहेत. गावड शब्द गांव या शब्दापासून झाला असें कांहीं भाषाशास्त्रज्ञ मानतात. हे लोक मराठी बोलतात. यांमध्यें पूर्वी देवकें होतीं व पुढें कुळें होऊन ब्राह्मणाप्रमाणें गोत्रेंहि झालीं आहेत. यांचा मूळ धंदा मीठ करण्याचा होता. परंतु आतां पुष्कळसे लोक शेतकरी व मजूर आहेत. धर्म व संस्कार यांसंबंधीं चाली भंडाऱ्यांप्रमाणेंच आहेत. आतेचहीण व मामेबहीण यांच्याशीं विवाह करतां येतो. मावस-बहिणीशीं मात्र विवाह होत नाहीं.

**गाविलगड**—वऱ्हाड, उमरावती जिल्हा, मेळघाट तालुक्यांतील किल्ला. हा अहमदशहा बहामनीनें बांधला असावा (१४२५). वऱ्हाडच्या सुभेदारचें येथें ठाणें असे. अकबराच्या अमदानींत अबुल फजलनें हा जिंकून घेतला (१५९८). मूळची अहीर गवळ्यांची येथें गढी असावी व त्यावरून गवळीगड—गाविलगड असें नांव पडलेलें दिसतें. मोंगलांपासून भोंसल्यांनीं हा किल्ला घेतला व तेव्हांपासून हा विशेष प्रसिद्धीस आला. भोंसल्यांचें राज्य गेल्यानंतर हा इंग्रजांकडे आला. हा किल्ला सातपुड्याच्या एका टोंकावर असून त्याची उंची चार हजार फूट आहे. किल्ल्यावर एक मशीद पाहण्यासारखी आहे. कांहीं शिलालेखहि आहेत.

**गॉस, एडमंड** (१८४९-१९२८)— हा इंग्रज ग्रंथकार फिलीप हेन्री गॉसचा मुलगा. तो १८७५ पासून १९०४ पर्यंत बोर्ड ऑफ ट्रेडच्या कचेरींत भाषांतरकार होता, आणि १९०४ ते १९१४ पर्यंत हाउस ऑफ लॉर्ड्सचा ग्रंथपाल होता. याचें वाचन दांडगें असून त्यानें इंग्रजी लेखन-शैलींत विशेष भर घातली आहे. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—'हिस्टरी ऑफ एटीन्थ सेंचरी लिटरेचर' (अठराव्या शतकांतील वाङ्मयाचा इतिहास); 'हिस्टरी ऑफ मॉडर्न इंग्लिश लिटरेचर' (आधुनिक इंग्रजी वाङ्मयाचा इतिहास); 'कलेक्टेड एसेज्' (संग्रहित निबंध); 'दि लाइफ ऑफ स्विनबर्न' (स्विनबर्नचें चरित्र); 'इंटर आर्मा'; 'दि फ्रेंच मोरॅलिस्टस्' (फ्रेंच नीतिवेत्ते); 'डायव्हरशन्स ऑफ ए मॅन ऑफ लेटर्स' एका

पंडिताचें विनोदन ) वगैरे. १९२५ सालीं याला ' सर ' करण्यांत आलें.

**गॉस, फिलिप हेन्री** ( १८१०-१८८० )—एक इंग्रज सृष्टिशास्त्रज्ञ. त्यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले आणि विद्वानांच्या संस्थांमार्फत चाललेल्या नियतकालिकांत पुष्कळ लेख लिहिलेले आहेत. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—' दि कॅनेडिअन नॅचरॅलिस्ट '; ( कानडांतील सृष्टिवेत्ता ); ' दि बर्ड्स् ऑफ जमेका '; ( जमेकांतील पक्षी ); ' ए नॅचरॅलिस्ट सोजर्न इन् जमेका ' ( एका सृष्टिवेत्त्याचा जमेकांतील प्रवास ); आणि 'रोमान्स ऑफ नॅचरल हिस्टरी ' ( सृष्टिविज्ञानाची रम्यकथा ).

**गाळ काढणें**—बंदरें, कालवे, नद्या, गोद्या, वगैरेंच्या तळाशीं सांचलेला गाळ मधून मधून काढून टाकावा लागतो. गाळ काढण्याचें अगदीं साधें साधन म्हणजे एक लोखंडाची कडी किंवा पट्टी एका कातडी पिशवीच्या तोंडास बसविलेली असते. त्या पट्टीनें गाळ खरवडला जाऊन त्या कातडी पिशवींत जमतो; तिला खालीं भोंकें असतात त्यांतून पाणी गळून जातें. वाफेनें चालणाऱ्या गाळ काढण्याच्या यंत्रामध्यें लोखंडी बादल्यांची एक वाटोळी सांखळी किंवा माळ असते; ती एका सांगाडीवर फिरत राहते. या सांगाडीची खालची बाजू कमी-जास्त खालीं करतां येते व त्यामुळें निरनिराळ्या खोलीवर काम करण्यांत येतें. बादल्या तळाशीं जाऊन गाळ खरवडून वर घेऊन येतात व तो गाळ एका भांड्यांत ओततात. ज्या नद्यांच्या गाळांत सोनें सांपडतें त्या नद्यांत असलीं अनेक यंत्रें काम करीत असतात.

**गाळणा**—( केळणा ). मुंबई, नाशिक जिल्हा; मालेगांव तालुक्यांतील एक किल्ला. समुद्रसपाटीपासून उंची २,३१६ फूट. किल्ल्यावर गाळणेश्वर महादेवाचें देऊळ व कांहीं फारसी शिलालेख १६ व्या शतकांतील आहेत. १५ व्या शतकांत या किल्ल्याला बरेंच महत्त्व होतें. १६७९ त शिवाजीनें हा घेतला. शेवटच्या बाजीरावाच्या कारकीर्दींत खानदेश सुभ्यांत गाळणा प्रांत ( सरकार ) मोडत असे. त्याचा वसूल दोन लाखांवर होता. इंग्रजांनीं १८०४ मध्यें घेतल्यानंतर उत्तम हवेचें ठिकाण म्हणून उपयोग होई.

**गाळणें ( सोनें-चांदी )**—सोनें किंवा चांदी यांसारख्या उंची धातूंचा शिसें वगैरेसारख्या हलक्या धातूंशीं संयोग झाला असतां त्या संयुक्तांतून उच्च धातु काढून घेण्याकरितां त्या गाळाव्या लागतात. अशा धातू शुद्ध करण्याकरितां ती संयुक्त धातु मुशींत घालतात व त्यास आंच देतात व त्याच वेळीं तींतून हवा जोरानें फुंकतात. अशी हवा फुंकली म्हणजे त्या हवेंतील प्राणवायूशीं त्या हलक्या धातूचा संयोग होऊन त्या धातूचें प्राणिद बनतें व तें मुशीच्या तळाशीं राहतें व वरतीं शुद्ध धातूचा गोळा तयार होतो.

**गाळण्याची क्रिया**— एखाद्या सच्छिद्र पदार्थांतून किंवा ज्या पदार्थांत घन पदार्थ अडकून राहतील अशा पदार्थांतून एखादा द्रव पदार्थ घालविण्यांत येऊन त्यांतून त्यांत असलेले घन पदार्थ अलग करण्याची ही क्रिया असते. सामान्यतः घरा-मधून जी गाळण्याचीं पात्रें ठेवण्यांत येतात त्यांमध्यें पाणी गुरुत्वाकर्षणाच्या नियमाप्रमाणें एखाद्या गाळणाऱ्या माध्यमांतून खालीं असणाऱ्या टांक्यांत जमा होतें. गाळण्याची क्रिया शोषणामुळें किंवा दाबण्यामुळें अधिक जलद करतां येते. मोठ-मोठ्या पाण्याच्या संचयामध्यें जी पाणी गाळण्याची रचना केलेली असते तीस सामान्यतः मोठमोठालीं टांकीं असून त्यां-मध्यें कांहीं गोटे, जाडी वाळू व बारीक वाळू असे निरनिराळ्या प्रमाणाच्या वाळूचे थर एकावर एक दिलेले असतात. यांतील सर्वांत बारीक वाळू वरच्या थरांत व मोठे गोटे खालच्या थरांत असतात. प्रथम गढूळ पाणी एखाद्या टांक्यांत संथ होऊं देण्यांत येतें व नंतर तें गाळण्याच्या टांक्यांत सोडण्यांत येतें. पहिल्या टांक्यांत त्यांतील तरंगत असलेले कांहीं पदार्थ सडून जातात व गाळण्याच्या टांक्यामध्यें पाणी हळूहळू झिरपून त्यांतील खनिज द्रव्यें वेगळीं होतात. मोठमोठ्या सच्छिद्र पत्र्यावर गाळण्याचें माध्यम पसरून त्यावर विशिष्ट दाबानें पाणी सोडून अलीकडे मोठ्या प्रमाणावर पाणी गाळण्यांत येतें.

**गिओटो** ( १२६६-१३३७ )—हा फ्लॉरेंटाइन चित्रकार असून त्याचा भर निसर्गपद्धतीवर ( नॅचरॅलिझम् ) असल्याळे चित्रकारांच्या तत्कालीन पद्धतीमध्यें त्यानें अगदीं क्रान्ति केली आणि युरोपिअन चित्रकलेंत नवी पद्धति सुरू केली. त्याचीं मुख्य प्रमुख चित्रें रोम, ॲसिसी, पॅडुआ आणि फ्लॉरेन्स येथें आहेत. तो कुशल शिल्पकारहि होता, आणि फ्लॉरेन्स येथील देवळाचा घुमट त्यानें तयार केलेला आहे.

**गिटार**—हें एक तंतुवाद्य आहे. हें पोकळ असून याची मान व्हायोलिनसारखी असते. हें गायनाच्या साथीकरितां वाजविण्यांत येतें. स्पेनमध्यें हें विशेष प्रचारांत आहे. हें प्रथम मूर लोकांनीं पूर्वेकडील देशांतून आणलें व त्यांच्या कालापासून स्पेनमध्यें प्रचारांत आलें.

**गिधाड**— हा एक भक्ष्यशोधार्थ भटकत फिरणाऱ्या पक्ष्यांचा वर्ग आहे. यांच्या डोक्यावर व मानेच्या कांहीं भागावर पिसें नसतात. यांची चोंच लांब असून वरील भाग टोंकाशीं वांक-दार असतो. हे सामान्यतः उष्ण देशांत राहतात व त्या प्रदेशां-तील घाण साफ करण्याचें काम करतात. यांच्या जुन्या भूखंडांतील व नवीन भूखंडांतील अशा दोन मुख्य जाती आहेत व इतर

अनेक पोटजाती आहेत. सर्वांत मोठ्या जातीच गिधाड तीन साडेतीन फूट लांब असतें. याला कोंचडयाप्रमाणें मानेखालीं

कल्ले असतात. मेलेल्या जनावरांचें मांस गिधाडें खाऊन टाकीत असल्यानें गांवांतील घाण नाहींशी करतात, हा त्यांच्यापासून मोठा फायदा आहे.

**गिनी**—पश्चिम आफ्रिकेचा भाग. सिनेगाल नदी व केपनिरो यांच्यामधील सर्व किनारा यांतच येतो. पोर्तुगीज, फ्रेंच व स्पॅनिश गिनी असे याचे तीन भाग आहेत.

पोर्तुगीज गिनी—फ्रेंच गिनी व सिनेगाल यांच्यामध्यें आहे. बोलामा हें मुख्य ठिकाण. बिसान हें मुख्य बंदर. क्षेत्रफळ १३,९४४ चौरस मैल.

फ्रेंच गिनी—पोर्तुगीज गिनीच्या खालीं लागूनच आहे. कोनक्री हें मुख्य ठिकाण आहे. व तें एक महत्त्वाचें बंदर आहे. क्षेत्रफळ ९६,८६६ चौ. मैल. लो. सं. २०,६५५२७. रबर, पामआइल, कॉफी, कापूस, तांदूळ, वगैरेचा व्यापार चालतो.

स्पॅनिश गिनी—याला टायोमुनी असेंहि म्हणतात. याचें क्षेत्रफळ १०,०३६ चौ. मै. व. लो. सं. १,४०,०००. पो हें मुख्य ठिकाण आहे.

**गिनी डुक्कर**—एक तीक्ष्ण दांतांचा सस्तन प्राणी. हे दक्षिण अमेरिकेमध्यें आढळतात. हे फार भित्रे असतात. यांची उत्पत्ति फार होते, पण हे निर्बुद्ध असतात.

**गिफेन, सर रॉबर्ट** (१८३७-१९१०)— एक ब्रिटिश आंकडेशास्त्रज्ञ व अर्थशास्त्रज्ञ. १८७६ मध्यें ट्रेड बोर्डाच्या आंकडेविषयक खात्यांत मुख्य अधिकारी नेमला गेला. आणि नंतर व्यापार खातें व मजूर खातें व आंकडे खातें यांचा कंट्रोलर जनरल झाला. व १८७९ मध्यें सेवानिवृत्त झाला. त्याच्या प्रसिद्ध ग्रंथांपैकीं कांहीं ग्रंथांचीं नांवें:—'स्टॉक एक्स्चेंज सिक्युरिटीज' (१८७८) (दलाली रोखे); 'एसेज् ऑन फायनान्स' (१८७९ व १८८६) (राजस्वनिबंध); 'ट्रेड डिप्रेशन ॲन्ड लो प्राइसेस' (१८८५) (व्यापार मंदी व उतरते दर); 'दि ग्रोथ ऑफ कॅपिटल' (१८९०) (भांडवलाची वाढ); "दि केस अगेन्स्ट बायमेटॅलिझम' (१८९२) (द्विचलनवादाची विरुद्ध बाजू); आणि 'एकॉनॉमिक इन्क्वायरीज् ॲन्ड स्टडीज्' (अर्थशास्त्रीय शोध आणि अभ्यास).

**गिबन, एडवर्ड** (१७३७-१७९४)—या आंग्ल इतिहासकाराचा जन्म पुटने (सरे) येथें झाला. तो नेहमीं आजारी पडत असल्यामुळें त्याचें लहानपणाचें शिक्षण चांगलें सुरळीत झालें नाहीं तरी पण त्या वयांतच इतिहासाची त्याला गोडी लागली. वयाच्या १६ व्या वर्षापासून त्याची प्रकृति सुधारत चालल्यामुळें त्याला शिक्षणाकरितां स्वित्झर्लंड येथें पाठविलें. तेथील शिक्षण पांच वर्षांत संपल्यावर १७५८ त तो इंग्लंडला परत आला. स्वदेशीं परत आल्यावर १७५९ सालीं त्यानें हॅम्पशायरच्या फौजेंत कॅप्टनचें काम पत्करिलें. हें काम करीत असतांना सुद्धां त्यानें आपला अभ्यास सोडून दिला नाहीं. पण या नोकरीमुळें त्याची प्रकृति सुधारली. तीन वर्षांनीं लष्करी नोकरींतून सुटल्यावर १७६३ च्या जानेवारींत तो देशपर्यटण करण्याकरितां निघाला. त्याच्या इटलीमधील प्रवासांतच त्याला 'रोमच्या साम्राज्याचा ऱ्हास व नाश' असें एक ऐतिहासिक पुस्तक लिहिण्याची इच्छा झाली. १७७६ त त्यानें त्या पुस्तकाचा पहिला भाग लिहिला व पुढें अकरा वर्षांत तें पुस्तक त्यानें संपविलें. या इतिहासाचीं पंधरावें व सोळावें हीं प्रकरणें फार प्रसिद्ध आहेत. या प्रकरणांतून गिबननें ख्रिस्ती धर्माचा उत्कर्ष व रोमन साम्राज्याचें तत्संबंधीं धोरण यांचा सविस्तर इतिहास दिला आहे.

**गिब्ज** (१८२२-१९०८)—हा अमेरिकन रसायनज्ञ न्यूयॉर्कमध्यें जन्मला. त्याच्या शिक्षणास १८३७ त कोलंबिया विद्यालयांत सुरवात झाली व पुढें तो जर्मनींत लीबिग, रोज, वगैरे शास्त्रज्ञांजवळ व पॅरिसमध्यें ड्यूमा, रेग्नॉल्ट, वगैरे शास्त्रज्ञांजवळ शिकण्यास गेला. परत आल्यावर त्याला हार्वर्ड विश्वविद्यालयांत अध्यापकाची जागा मिळाली. निरिंद्रिय रसायनशास्त्रांत कोबाल्ट अमाइनें, प्लाटिनम धातु, इत्यादींवर प्रयोग करून यानें कांहीं शोध लावले आहेत. हा अति उत्तम शिक्षकहि होता.

**गिब्ज, जोसिआ विलिअर्ड** (१८३९-१९०३)—हा एक अमेरिकन गणिती आणि पदार्थविज्ञानशास्त्रवेत्ता होऊन

गेला. याचा जन्म अमेरिकेंतील न्यू हेव्हन शहरीं झाला. इ. स. १८५४ मध्यें याचा युलेकॉलेजांत प्रवेश झाला व सन १८५८ मध्यें तेथील पदवी घेऊन त्यानें आपलें शिक्षण तसेंच चालू ठेवलें. इ. स. १८५३ मध्यें त्याला ह्याच कॉलेजांत शिक्षक नेमण्यांत आलें. पुढें १८६६ ते ६९ पर्यंतचा काल ह्यानें युरोप खंडांत घालविला. नंतर ह्याला युले कॉलेजांत गणितात्मक पदार्थ-विज्ञानशास्त्राचा प्रोफेसर नेमण्यांत आलें. या ठिकाणीं त्यानें मरेपर्यंत अध्यापकाचें काम केलें. इ. स. १८७३ मध्यें त्यानें 'प्रवाही द्रव्यांच्या गत्युष्णतेविषयीं रेखागणितात्मक पद्धति' या नांवाचा लेख लिहिला. पुढें १८७६-७७ सालीं त्यानें 'विभिन्न द्रव्यांचा समतोलपणा' या नांवाचा लेख लिहून रसायनशास्त्रांत एक उपशास्त्र उत्पन्न केलें. १९०१ सालीं त्याला रॉयल सोसायटीनें कोपले पदक नांवाचें पारितोषिक दिलें.

**गिरनार**—काठेवाडांतील या प्रसिद्ध टेंकडीला पांच मुख्य शिखरें आहेत. त्यांपैकीं सर्वांत उंच जें गोरखनाथ त्याची उंची ३,६६६ फूट आहे. येथें अंबामातेचें मंदिर व जैन मंदिरें पुष्कळ आहेत. भैरवजप नांवाच्या खडकावरून चांगला जन्म यावा म्हणून तपस्वी लोक मुद्दाम खालीं उडी घेत असत. या टेंकडीच्या पायथ्याशीं अशोकाचीं दगडावर खोदलेलीं शासनें व सुदर्शन तळें बांधल्याबद्दलचा रुद्रदामन् ( सुमारें इ. स. १५० ) चा एक लेख असून, दुसरा एक लेख या तळ्याचा नाश व दुरुस्ती ( इ. स. ४५८ ) याबद्दलचा आहे. वाघेश्वरी दरवाजांतून गिरनाराला रस्ता जातो. वाघेश्वरी टेंकडीवर एक देवीचें देऊळ असून जवळच दामोदर कुंडाकडे जाण्याचा रस्ता आहे. येथील पाण्यांत हाडें विरघळतात, म्हणून हिंदू लोक यांत अस्थि-विसर्जन करतात.

या क्षेत्राचें माहात्म्य प्रभासखंडांत वर्णिलें आहे.

**गिरसप्पा**—मुंबई, कानडा जिल्हा, होनावर तालुक्यांत होनावर व गिरसप्पा धबधबा यांच्या मध्यावर शरावतीच्या कांठीं सुंदर जाग्यावर वसलेला गांव. हें नारळाचें आगर आहे. येथून जवळच नगरबस्तिकेरे शहराचे अवशेष आहेत. एका काळीं येथें १ लाख घरें व ८८ देवळें होतीं असें सांगतात. येथें जैनांची एक 'वस्ती' ( देऊळ ) पाहण्यासारखी आहे. १४०९ मध्यें गिरसप्पाच्या वडेरू इच्छाप्पानें मंकीजवळील गुणवतीच्या देवळाला देणगी दिल्याचा उल्लेख आहे. येथें मिरीं इतकीं होत कीं, पोर्तुगीज लोक गिरसप्पाच्या राणीला मिऱ्यांची राणी म्हणत.

**गिरसप्पा धबधबा**—मुंबई प्रांत आणि म्हैसूर संस्थान यांच्या हद्दीवर हा प्रचंड धबधबा आहे. हुबळीहून मोटारीनें जातात. याच्याजवळच्या जोग नांवाच्या खेड्यावरून तेथले लोक त्याला 'जोगचा धबधबा' असेंहि म्हणतात. हा धबधबा ज्या नदीच्या प्रवाहानें झाला आहे त्या शरावती नदीचें पात्र या धबधब्याच्या तोंडाशीं २३० फूट रुंद आहे व तें ४ धारांनीं ८३० फुटांवरून खालीं उडी घेतें.

एवढ्या उंचीचा मोठा, गंभीर व सुंदर धबधबा हिंदुस्थानांत तर नाहींच पण जगांतहि क्वचितच सांपडेल. हा पाहण्याची उत्तम वेळ म्हणजे डिसेंबर महिना होय. सूर्यप्रकाशांत येथें नेहमीं इंद्रधनुष्याची शोभा दिसते व चंद्राच्या प्रकाशांत रुपेरी झकाकीनें पाण्याच्या धारा चकाकतात. रात्रीच्या वेळीं पेटत्या चुडी वगैरे दरींत सोडल्या असतांना दिसणारी शोभा कांहीं विशेष प्रकारची व कांहींशी भयंकर दिसते. म्हैसूरच्या बाजूनें सर्वोत्कृष्ट देखावा दिसतो. म्हैसूर सरकारनें याजवळ एक मोठें धरण बांधलें आहे.

**गिरिधर कविराय** ( ज. १७१२ )—अयोध्या प्रांतांतील एक हिंदी कवि. कुंडलिया छंदांतील 'गिरधरका कुंडलिया' या नांवाचा याचा एक काव्यसंग्रह प्रसिद्ध आहे. सुलभ-रचना व तत्त्वप्रतिपादन यांमुळें याच्या कवितांचा प्रसार समाजांतील खालच्या थरापर्यंतहि जाऊन पोहोंचला.

**गिरिधर बहादुर** ( मृत्यु १७२८ )—माळव्यांतील एक ब्राह्मण सरदार. उत्तर मोंगलाईत जे थोडे हिंदू अधिकारी स्वपराक्रमानें प्रसिद्धीस आले त्यांत याच्या कुटुंबाची गणना आहे. हें नागर ब्राह्मण घराणें अलाहाबादेकडे राहत होतें. गिरिधराचे वडील दयाराम व चुलता छबिलाराम, हे दोघे शूर व मुत्सद्दी असून ते बहादुरशहाचा दुसरा मुलगा अजीमुश्शान याच्या पदरीं होते. दयाराम स. १७१३ च्या सुमाराम लढाईत पडला. पुढें अजीमुश्शान मारला गेल्यामुळें छबिलाराम जहांदरशहाच्या पक्षास मिळाला. त्यानें यास व गिरिधरास कारामाणिकपूरचा फौजदार नेमलें. येथें त्यांनीं द्रव्यसंचय करून फौज वाढविली. नंतर हे दोघे फरुखसियरला मिळाले. परंतु सय्यदांनीं गिरिधरास दिल्लीस बोलाविलें. स. १७१९ मध्यें छबिलाराम अर्धांगवायूनें मरण पावला. त्या वेळीं चुलत्याच्या उत्तरक्रियेची सबब सांगून हा प्रयागास एक वर्ष राहिला. हा पराक्रमी, अनुभवी व शूर सरदार होता. पुढें याला आणण्याकरितां सय्यदांनीं आग्र्याहून रतनचंद नांवाच्या एका सरदारास पाठविलें. त्याची व याची खाजगी भेट झाली, तींत गिरिधरानें तीस लाख रुपये व अयोध्येचा सुभा घ्यावा व अलाहाबादचें ठाणें सोडून द्यावें असा तह ठरला.

पुढें याची बदली माळव्यावर स. १७२१ च्या सुमारास झाली. स. १७२४ त माळव्याचा विभाग करण्यांत आला. मंडलोईच्या मार्फत मराठ्यांची फौज माळव्यांत येऊं लागली. तेव्हां त्यांचा सामना झुंपला; त्यांत चिमाजी आप्पा व मल्हारराव होळकर होते. देवासच्या ईशान्येस सुमारें पन्नास मैलांवर सारंगपूर येथें याचें वास्तव्य होतें. चिमाजी अप्पानें याजवर अचानक हल्ला करून यास आमझरा येथें ठार मारलें. उज्जनला एक तट आहे, त्यास याचें नांव आहे.

**गिरिधर रामदासी** ( मृ. शके १५६१ )— हा एक संतकवि असून यांचें मूळचें नांव गिरमाजी. समर्थ रामदास यांची शिष्यीण जी वेणाबाई, तिच्या बायजाबाई नांवाच्या शिष्यिणीचा शिष्य हा होय. त्यानें समर्थांना प्रत्यक्ष पाहिलें होतें. व त्यांचा सहवास याला कांहीं काल घडला होता. याचा मठ मोगलाईत बीड येथें आहे. याचा मुख्य ग्रंथ 'समर्थप्रताप' नांवाचा असून त्यांत समर्थांचें बरेंचसें चरित्र आलेलें आहे. याशिवाय याचे चाळीस ग्रंथ व हजार-पंधराशें इतर कविता उपलब्ध आहेत. रामायणावर याचे पांच-सहा ग्रंथ आहेत. याचा 'निवृत्तिराम' हा ग्रंथ फार सुंदर आहे.

**गिरिव्रज**—ही मगधदेशाची प्राचीन राजधानी होय. हिची स्थापना उपरिचरवसु यानें केल्यावरून हिला वसुमती असेंहि एक नांव होतें. पांडवांच्या वेळीं येथें जरासंध राहत असे. पुढें या शहरास राजगृह असें म्हणूं लागले. पाटलीपुत्राच्या दक्षिणेस हें ठिकाण होतें. बृहत्संहितेंत हें नांव येतें. विष्णुपुराणांतहि याचा उल्लेख येतो.

फाहियान म्हणतो कीं, राजगृहाच्या दक्षिणेस पाऊण मैलावर पांच टेकड्यांमध्यें हें आहे. ह्युएनत्संगहि तेंच सांगतो. रामायणांतहि असेंच वर्णन आहे. यास हल्लीं पुराना राजगिर म्हणतात. महाभारतांत या पांच टेकड्यांचीं नांवें वैहार ( वैभार ), वराह ( विपुलगिरी ), वृषभ ( रान ), ऋषि ( उदय ) व चैत्यक ( सोनागिरी ) अशीं आहेत. वैभार टेकडीवर जैन शिलालेख आहेत. बौद्धांची पहिली समिति येथेंच भरली ( खि. पू. ५४३ ). या ठिकाणीं उन्हाळीं व कुंडें आहेत.

**गिरीअम्मा** ( स. १७५० )— एक कानडी ब्राह्मण कवियत्री. हरिहराजवळील कोमारनहळ्ळीं येथील राहणारी. हेळवनकट्टे गांवच्या रंगनाथाची ही भक्त असल्यानें हिच्या नांवामागें या गांवाचें नांव जोडलेलें असतें. हिनें सीताकल्याण, उद्दालककथा व चंद्रहासकथा हे ग्रंथ व पुष्कळ पद्यें लिहिलीं आहेत.

**गिर्टिन, थॉमस** ( १७७५-१८०२ )— हा एक इंग्रज जलरंगी चित्रकार होता. त्यानें मुख्यतः वास्तुकलाविषयक चित्रें काढलीं आहेत. आणि पूर्वींच्या स्थलवर्णनात्मक चित्रकारांच्या नमुन्यामध्यें त्यानें फार महत्त्वाच्या व अद्भुत सुधारणा केलेल्या आहेत. तैलचित्रांसारखीं अगदीं उत्तम जलरंगी चित्रें काढणारा गिर्टिन हा पहिला चित्रकार होय. तो अल्पवयी झाला पण त्यानें या चित्रकलेंत महत्त्वाचें स्थान मिळविलें.

**गिल, सर डेव्हिड** ( १८४३-१९१४ )—एक ब्रिटिश खगोलशास्त्रज्ञ. याचें शिक्षण आबर्डीन विद्यापीठांत झालें, आणि त्याला १८७९ मध्यें केप ऑफ गुडहोप येथें ॲस्ट्रॉनमर रॉयल या हुद्याच्या जागीं नेमण्यांत आलें व त्या जागेवर तो १९०७ पर्यंत होता. त्याला १९०० मध्यें के. सी. बी. ही पदवी देण्यांत आली. त्यानें पुष्कळ पुस्तकें लिहिलीं. त्यांपैकीं मुख्य 'हेलिओमीटर डिटर्‌मिनेशन्स ऑफ सोलर ॲन्ड स्टेलर पॅरेलॅक्स' ( सूर्य आणि नक्षत्र लंबनाची सूर्यमापक निर्णयनें ), 'दि केप फोटोग्रॅफिक डुर्चमुस्टरुंग' आणि 'हिस्टरी ॲन्ड डिस्क्रिप्शन् ऑफ दि रॉयल ऑब्झर्व्हेटरी, केप ऑफ गुडहोप' ( केप येथील वेधशाळेचें वर्णन व इतिहास ) हीं होत.

**गिलजित**— हिंदुस्थान, काश्मीर संस्थानांतील एक खोरें व जिल्हा. हा हिंदुकुश पर्वताच्या दक्षिणेकडच्या उतरंडीवर असून सिंधूला मिळणारी गिलजित नदी या प्रदेशांत वाहते. जिल्ह्याचें क्षे. फ. १२,३५५ असून लो. सं. ( १९४१ ) ७६,५२६ आहे.

हा प्रदेश फार जुना आहे. येथें दरद लोकांची वस्ती असे. हल्लीं मुसलमान वस्ती बरीच आहे. पैशाची भाषा चालते.

**गिलरे, जेम्स** ( १७५७–१८१५ )—हा इंग्रज व्यंगचित्रकार असून याच्या चित्रांमुळें याची प्रसिद्धि सर्व युरोपभर पसरली. त्यानें लागोपाठ सुमारें १२०० व्यंगचित्रें काढलीं. तो आपल्या कलेंत अत्यंत निपुण असून त्यानें इंग्लंडचा राजा ३ रा जॉर्ज आणि त्या वेळचे हाउस ऑफ लॉर्ड्सचे सभासद यांच्याविषयीं आणि तत्कालीन फ्रेंच लोक आणि प्रतिष्ठित व्यक्ती यांच्याविषयीं उपहासात्मक चित्रें काढलीं आहेत.

**गिलावा करणें**—घराला गिलावा करण्याकरितां पहिला थर बहुतेक वाळूमिश्रित चुन्याचा देण्यांत येतो. त्यांत थोडा तागहि मिसळण्यांत येतो. या थरावर किंचित् खोल अशा रेषा काढण्यांत येतात व हा थर पूर्ण वाळला म्हणजे मग त्यावर अधिक सफाईदार असा दुसरा थर देण्यांत येतो व तो थर पूर्णपणें वाळण्यापूर्वी अखेरचा हात देण्यांत येतो.

**गिलावा-चित्रें**—( फ्रेस्को पेंटिंग ). चुन्याचा ओला गिलावा केलेल्या भिंतीवर पाणरंगांत चित्रें काढण्याची कला. या कामाकरितां खनिज किंवा मातीचे रंग वापरण्यांत येतात. या रंगावर चुन्याची रासायनिक क्रिया घडत नाहीं. हें रंग वाळतांना हवेंतलि कर्बाम्ल गिलाव्याकडून शोषलें जातें व गिलावा घट्ट होत जातो. त्यामुळें चित्रांतील रंग गिलाव्यात भिनून एकजीव होतात आणि त्यामुळें ते कायमचे राहतात. ही चित्रकला फार प्राचीन आहे. अशा प्रकारचीं चित्रें क्रीट बेटांत, ईजिप्त, हिंदुस्थान, ग्रीस, मेक्सिको, इ. देशांत आढळतात. तसेंच पांपी वगैरे ठिकाणीं रोमन लोकांनीं काढलेलीं अशा तऱ्हेचीं चित्रें आढळतात. हिंदुस्थानांत अजंठा येथील या प्रकारचीं चित्रें प्रसिद्ध आहेत व तीं पांचव्या–सहाव्या शतकांतील आहेत. पंधराव्या शतकानंतर इटली देशांत या पद्धतीचीं चित्रें मोठमोठ्या चित्रकारांनीं काढलेलीं आहेत. यानंतर तैलचित्रांचा प्रघात पडला. या पद्धतीचीं चित्रें पुन्हां ब्रिटिश पार्लमेंटगृहांत व इतरत्र काढण्यांत आलीं आहेत व ही पद्धति पुन्हां प्रचारांत येत आहे.

**गिलोलो**—हें बेट ईस्ट इंडियन आर्किपेलागोमधील मोल्यूकस द्वीपसमूहापैकीं सर्वांत मोठें बेट आहे. त्याचें क्षे. फ. ६,९५० चौ. मै. व लो. सं. सुमारें १२०,००० आहे. हा प्रदेश खडकाळ व डोंगराळ आहे. व डोंगर ज्वालामुखीमय आहेत. येथील मुख्य पिकें नारळ, मसाल्याचीं झाडें, फळबागा, इमारती लांकूड, साबूदाणा व खाण्यायोग्य पक्षांचीं घरटीं हीं आहेत. येथील मूळचे रहिवासी आल्फूरॉस. या लोकांना मलायी लोकांनीं हळूहळू बेटाच्या अन्तर्भागांत जाण्यास भाग पाडलें. हें बेट नेदरलँड्सच्या मालकीचें आहे.

**गिल्बर्ट, सर जॉन** ( १८१७–१८९७ )—एक इंग्रज चित्रकार. त्याचें पहिलें चित्र प्रदर्शनांत जें आलें ( १८३६ ) तें 'दि ॲरेस्ट ऑफ लॉर्ड हेस्टिंग्ज' ( लॉर्ड हेस्टिंग्जची गिरफदारी ) होय. हें चित्र जलरंगी असून गिल्बर्टनें पुढें आयुष्यभर बहुरंगी चित्रें काढलीं. त्याचीं कांहीं तैलचित्रें आहेत, त्यांपैकीं विशेष प्रसिद्ध चित्रें जीं आहेत तीं— 'डॉन क्विक्झोट गिव्हिंग ॲडव्हाइस टु सँकोपान्झा' ( सँकोपान्झाला उपदेश करीत असलेला डॉन क्विक्झोट ); 'दि एज्युकेशन ऑफ गिल् ब्लास' ( गिल् ब्लासचें शिक्षण ); आणि शेक्सपिअरच्या नाटकांतील प्रमुख पात्रें व प्रसंग हीं होत.

**गिल्बर्ट, सर विल्यम श्वेंक** ( १८३६–१९११ )— एक इंग्रज नाटककार. याचें शिक्षण लंडनच्या किंग्ज कॉलेजमध्यें झालें. ४ वर्षे सिव्हिल सर्व्हिसमध्यें नोकरी केल्यावर त्यानें कायद्याचा अभ्यास केला, आणि १८६३ मध्यें वकिलीची सनद मिळवली. या दरम्यानच्या काळांत तो आपला उदरनिर्वाह वृत्तपत्रीय लिखाण लिहून करीत असे. त्याचे लेख विशेषतः 'फन्' नांवाच्या विनोदी पत्रांत येत असत. या पत्रांत त्यानें 'दि बाब' बॅलड्स या नांवाच्या विनोदी कविता पुष्कळ प्रसिद्ध केल्या व त्यामुळें गिल्बर्टची फार प्रसिद्धि झाली. या त्याच्या विनोदी कवितांना अनुसरून तो विनोदी चित्रेंहि फार मजेदार काढीत असे. १८८६ मध्यें त्यानें नाट्यलेखनास आरंभ केला. त्याचीं प्रमुख नाटकें—'दि लिट्ल् डक् ॲन्ड दि ग्रेट क्वॅक'; 'लाविव्हॅन्डिएर'; 'रॉबर्ट दि डेव्हिल'; 'दि पॅलेस ऑफ ट्रुथ' ( १८७० ); 'दि विकेड् वर्ल्ड' ( १८७३ ); 'पिग्मॅलिअन ॲन्ड गॅलाटिआ' ( १८७१ ); 'चॅरिटी' ( १८७४ ); 'स्वीट हार्ट्स' ( १८७४ ) आणि 'एंगेज्ड्' ( १८७७ ). १८७१ पासून गिल्बर्टनें सुलिव्हान याच्या सहकार्यानें आणखी कांहीं नाटकें लिहिलीं. गिल्बर्टचें शेवटलें नाटक 'दि हूलिगन' ( १९११ ) हें होय.

गिल्बर्टच्या पद्धतीचीं नाटकें लिहिणारा नाटककार पूर्वीं कोणीहि झाला नव्हता. आणि पुढेंहि होणार नाहीं. त्याची प्रतिभा नवनवोन्मेषशालिनी असून त्याची प्रत्येक नाट्यकृति नावीन्ययुक्त आहे. त्याचें रंगभूमिविषयक कौशल्य अप्रतिम आहे. त्याच्या सर्व नाटकांत भाषासौंदर्य आणि एकेक तर्कदुष्ट प्रमेय ( लॉजिक्ल् ॲब्सर्डिटी ) असतें. तो स्वतः स्टेजमॅनेजर असल्यामुळें आपल्या नाटकाचा प्रयोग परिणामकारक होण्याकरितां अतिशय परिश्रम घेत असे.

**गिल्बर्ट, सर हंफ्रे** ( १५३९-१५८३ )—एक इंग्रज जलपर्यटनकार. यानें १५७८ मध्यें एक असा परवाना मिळवला कीं, उत्तर अमेरिकेमध्यें नव्या प्रदेशाचा शोध लावून जेथें वसाहत झाली नसेल अशा ओसाड प्रदेशांत वसाहत स्थापन करण्याचा अधिकार गिल्बर्टला आहे. या सनदेप्रमाणें त्यानें न्यूफाउंडलंडकडे प्रवास केला; पण तो प्रयत्न अयशस्वी झाला. १५८३ मध्यें त्यानें पुन्हां प्रवास करून सेन्ट जोन्स बंदराचा ताबा घेतला. त्यानंतर पुन्हां तो जलपर्यटनास निघाला. पण वादळांत सांपडून मरण पावला.

**गिल्बर्ट बेटें**—हा पॅसिफिक महासागरांत भूमध्यरेषेच्या दोन्ही अंगांस द्वीपसमूह आहे. त्याचें क्षे. फ. १६६ चौ. मै. व लो. सं. २६,१८०. गिल्बर्ट अँन्ड एलिस आयलंड्स कॉलनी या नांवाच्या वसाहतींत गिल्बर्ट बेटें, एलिस बेटें, दि यूनियन (टोकेलो) ग्रुप, आणि फॅनिंग, वॉशिंग्टन, ओशन, व खिसमस बेटें यांचा समावेश होतो. यांपैकीं बहुतेक बेटें ब्रिटिश संरक्षित (प्रोटेक्टरेट) म्हणून १८९२ मध्यें जाहीर करण्यांत आलें, आणि १९१५ मध्यें हीं बेटें ब्रिटिश साम्राज्याची एक वसाहत म्हणून ब्रिटिश साम्राज्याला जोडण्यांत आली. ओशन आयलंड ही या वसाहतीची राजधानी असून येथें रेसिडेंट कमिशनर राहतो. येथील प्रदेश प्रवाळ खडकाचा व नापीक जमिनीचा आहे. येथें फक्त नारळ, भाकरीचीं झाडें, टॅरो व पँढनस हीं झाडें होतात.

**गिसिंग, जॉर्ज रॉबर्ट** ( १८५७-१९०३ )— एक ब्रिटिश कादंबरीकार. याची पहिली अद्‌भुतरसात्मक कादंबरी 'वंडर्स ऑफ दि डॉन' (प्रभातकाळचे चमत्कार) ही १८७८ मध्यें प्रसिद्ध झाली. नंतर त्यानें 'डेमॉस', 'थायर्झा', 'दि अनक्लास्ड्', 'दि नेदर वर्ल्ड', 'न्यू ग्रब स्ट्रीट्' आणि 'दि ऑड वुमन्' या कादंबऱ्या प्रसिद्ध केल्या. त्या सर्व दुःखान्त पण अगदीं वास्तववादी आहेत. यानंतर त्यानें सुखान्त कादंबऱ्या लिहिल्या त्या— 'बाय दि आयोनियन सी', 'प्रायव्हेट पेपर्स ऑफ हेन्री रायक्रॉफ्ट' आणि 'व्हेरॉनिल्डा' या होत.

**गीतविस्तार**— ( काउंटर पॉइंट ). संगीतामध्यें मुख्य गीताचे शब्द दिल्यानंतर त्यांची गायनोपयुक्त स्वरांमध्यें रचना करून पुन्हां त्या गीताचे निरनिराळे आलाप, ताना, वगैरेमध्यें विस्तार करण्यांत येतो. अशा तऱ्हेची कला भरतखंडांत फारच परिणति पावलेली होती व आहे.

साम हा ऋग्वेदांतील ऋचांचा गीतविस्तारच होय. त्याप्रमाणेंच अनेक चिजांचा व गीतांचा संगीतज्ञ विस्तार करीत असतात. युरोपमध्यें हँडेल व बाक यांनीं या कलेची पुष्कळच वाढ केली होती.

**गुइमे** ( १७९५-१८७१ )—एक फ्रेंच औद्योगिक रसायनशास्त्रवेत्ता. याचें शिक्षण पॅरिस येथें झालें. वैडुर्य नांवाच्या रत्नापासून त्यानें 'समुद्रपार' (अल्टामरीन) नीलोपल नांवाचा पदार्थ बनविला व तो मोठ्या प्रमाणावर तयार करण्याकरितां एक कारखानाहि काढला.

**गुग्गुळ**—हा एका कांटेरी झाडाचा सुगंधी निर्यास आहे. सिंगापूरला याचीं पुष्कळ झाडें आहेत. हिंदुस्थानांत काठेवाड, राजपुताना, वऱ्हाड, खानदेश व सिंध या प्रदेशांतहि आहेत. गुग्गुळ चुन्यांत मिसळून उत्तम सिमेंट तयार होतें. महारोग, संधिवात, इत्यादि रोगांवरहि याचा उपयोग करतात. पुष्कळ गुग्गुळ परदेशांतून जो येतो तो आफ्रिका, अरबस्तान व मक्का येथून बहुधा हिंदुस्थानांत येतो. आयुर्वेदग्रंथांत गुग्गुळाचे अनेक प्रकार सांगितले आहेत. योगराज गुग्गुळ प्रसिद्ध आहे.

**गुंज**—ही सुंदर वेल हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांतील सपाटीच्या प्रदेशांत, तसेंच हिमालय व इतर डोंगराळ मुलुखांत ३,००० फूट उंचीपर्यंत आढळते. ह्या वेलीच्या चकाकणाऱ्या लहान लाल बियांचा म्हणजे गुंजांचा उपयोग सोनार लोक चांदी व सोनें तोलण्याकडे वजनासारखा करतात. एका तोळ्यास ९६ गुंजा लागतात. लाल गुंज अतिशय विषारी आहे व तिचा केव्हां केव्हां फार वाईट रीतीनें प्राणघात करण्याकडे उपयोग केला जातो. गुंजा लाल व पांढऱ्या अशा दोन जातीच्या आहेत. पांढरी गुंज औषधी कामाकडे जास्त उपयोगी पडते. पांढऱ्या गुंजेचा पाला आवाज साफ होण्यासाठीं खातात.

**गुजर**—एक जात. यांची वस्ती सिंधूपासून गंगा नदीपर्यंत व हजारा पर्वतापासून गुजरातपर्यंत विशेष आहे. एकूण लो. सं. वीस लाखांवर आहे. गुजरांत हिंदू व मुसलमान अशा दोन्ही धर्मांचे लोक आहेत. यांचें जाटांशीं व अहिरांशीं बरेंच साम्य दिसतें. हे लोक मूळचे स्थानिक कीं हिंदुस्थानाबाहेरचे याविषयीं संशोधकांत एकमत नाहीं. यांच्यांत अनेक कुळ्या (गोत्रें) असतात. शिखांतहि पुष्कळसे गुजर आहेत. राजपुताना-मारवाडांतील भाटी लोक मूळचे गुजरच दिसतात. गुजरातेंत तर यांचा विशेष भरणा आहे. काश्मीर पंजाबांत गुजर शेतकरी आहेत तर गुजरात-खानदेशांत ते व्यापारी आहेत. मध्यप्रांतांत नेमाड-हुशंगाबादकडे यांची वस्ती आहे. तेथें हे शेतीचा धंदा करतात. मुसलमान गुजर बाटलेले हिंदू होत. त्यांच्या पुष्कळ चालीरीती हिंदूसारख्याच आहेत. गुजरांत ब्राह्मण जातहि आहे. हे गुर्जर ब्राह्मण गुजरांची उपाध्येगिरी करतात.

**गुजरांणवाला**— पंजाब, लाहोर विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,३११ चौ. मै.. जिल्हा चांगला निरोगी आहे. पावसाचें मान १८ इंच. जिल्ह्यांत १४३३ खेडीं व ६ शहरें आहेत. लो.

सं. ९,१२,२३४. शें. ६७ मुसलमान आहेत. कालव्यांमुळें पंजाबांतील अत्यंत सुपीक जिल्ह्यांपैकीं एक बनला आहे. मुख्य पीक गहूं आहे. वझिराबाद येथें हिमालयांतील लांकडांचा व्यापार चालतो. येथें बौद्ध कालीन अवशेष पुष्कळ सांपडतात. मुसलमानी अमलांत या जिल्ह्याची भरभराट झाली. शीख अमलांतहि याचें बरेंच महत्त्व वाढलें. १८४९ पासून इंग्रजी राज्य यावर आलें.

गुजराणवाला शहर नॉर्थ वेस्टर्न रेल्वे स्टेशन आहे. लो. सं. ८४,५४५. रणजितसिंगाचा जन्म या शहरांत झाला. येथें १८६७ पासून नगरपालिका संस्था आहे. भांडीं, लोखंडी पेट्या, हस्तीदंती सामान, इ. माल तयार होतो. बऱ्याच लहानमोठ्या शिक्षणसंस्था आहेत.

**गुजरात**—पंजाब, रावळपिंडी विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. २२६६ चौ. मैल. हा चिनाब व झेलम या नद्यांमध्यें वसला आहे; पाऊस २५ इंच. जिल्ह्यांत ४ शहरें व १,३२६ खेडीं आहेत. लो. सं. ११,०४,९५२. जिल्ह्यांत उत्कृष्ट प्रकारचें लांकडी सामान होतें; चांगलें कापड होतें; शिवाय भांडीं, शाली, पादत्राणें, इ. माल तयार होतो.

हा प्रदेश प्रथम पोरस राजाच्या अमलाखालीं असे. नंतर मौर्यांची सत्ता आली. नंतर ग्रीक व त्यानंतर पठाणी अमल बसला. पुढें गुर्जर राज्य आलें. ९ व्या शतकांत काश्मीरकडे हा भाग असावा. १५ व्या शतकांत मुसलमानी अमल चालू झाला. बाहेरून येणाऱ्या टोळ्यांचा या मुलुखाला फार उपद्रव पोंचला आहे. १७६५ त शीख सत्ता आली पण पुढील शतकांत ती गेली.

मुख्य ठिकाण गुजरात शहर. हें रेल्वेस्टेशन आहे. इ. सनापूर्वी ५ व्या शतकांत उदयनगरी नांवानें प्रसिद्ध होतें. इ. स. १२० त गुजराण राणीने शहर सुधारलें. शहाजहानच्या वेळीं येथें जाटांची वस्ती होती व सर्व शिबंदी गुजरांची असे. येथील किल्ल्याला व शहराला गुजराथ अकबराबाद म्हणत. हें मोठें व्यापारी केंद्र आहे. बरींच हायस्कुलें व एक स्थापत्य विद्यालय आहे.

**गुजराथ प्रांत**—(टीप–गुजरात व गुजराथ हीं दोन्ही रूपें प्रचलित आहेत.) मुंबई इलाख्यांतील उत्तरेकडील विभाग. दक्षिणेस तापी नदीपासून उत्तरेस कच्छरण आणि मेवाड, व पश्चिमेस अरबी समुद्रापासून पूर्वेस विन्ध्य–सातपुड्यापर्यंत हा प्रांत पसरला आहे. क्षे. फ. १३,५७९ चौ. मैल व लोकसंख्या ३,७१,८०,००. पण काठेवाड, बडोदें राज्य आणि इतर लहान संस्थानें धरल्यास क्षे. फ. ७०,००० चौ. मैल व लोकसंख्या १,१०,००,००० इतकी भरते. गुजराथचे गुर्जरराष्ट्र व सौराष्ट्र (काठेवाड) असे दोन प्रधान विभाग जुने आहेत. साबरमती, मही, बनास, सरस्वती, नर्मदा आणि तापी या नद्यांमुळें व सपाट प्रदेशामुळें गुजरात फार सुपीक आहे. पण यामुळेंच त्यावर बऱ्याच स्वाऱ्या झाल्या. सुरत, भडोच, अहमदाबाद, खेडा, पंचमहाल हे जिल्हे जुन्या ब्रिटिश गुजरातचे आहेत.

पौराणिक कालांत गुजरातच्या भागांतील आनर्त, सुराष्ट्र, लाट, वगैरे नांवें येतात. गुर्जरराष्ट्र असें नांव नवव्या शतकापासून आढळतें. कृष्णाच्या यादवांचें राज्य गुजरातेवर असावें. पण त्यावद्दल फारशी माहिती नाहीं. मौर्य घराणें (खि. पू. ३१९) राज्य करावयास लागल्यापासून गुजरातचा खरा इतिहास सुरू होतो. मौर्यांनंतर बॅक्ट्रियन ग्रीकांची व नंतर परकीय क्षत्रपांची सत्ता सुरू झाली. गिरनारचे शिलालेख बरीच ऐतिहासिक माहिती देतात. शेवटचा राजा विश्वसेन क्षत्रप याच्यापासून त्रैकूटक राजांनीं कांहीं गुजरात जिकला. पण त्यांना गुप्तराजांनीं शह दिला (पांचवें शतक). गुप्तानंतर वल्लभी राजे आले. ते खरे गुर्जर क्षत्रिय होते. ते धर्मानें शैव होते. त्यांचें राज्य २५० वर्षें इ. स. ७६६ पर्यंत टिकलें. यानंतर राष्ट्रकूट आले. त्यांचा गुजरातशीं संबंध ७४३ ते ९७४ पर्यंत टिकला. या काळांत काठेवाडांत मिहिर किंवा मेर घराणें नांदत होतें. वल्लभीनंतर त्यांनीं काठेवाडांत आपली सत्ता स्थापिली. यांना चूडासमा रजपुतांनीं जिकलें. अनहिलवाडचें चावडा घराणें ७२० ते ९५६ पर्यंत राज्यावर होतें. नंतर सोळंखी चालुक्य राजे राज्य करूं लागले. यांच्याच अमदानींत गझनीच्या महंमदानें सोमनाथवर स्वारी केली. या घराण्यांतील सिद्धराज जयसिंह फार प्रसिद्ध आहे. तो फार शूर व विद्वानांचा पोषिंदा होता. जैनधर्म याच्या व याच्या मुलाच्या (कुमारपाल) कारकीर्दीत गुजरातेंत चांगला रुजला. सोळंखी राजघराणें वाघेलांनीं नष्ट केलें. पण त्यांचें राज्य मुसलमानांनीं फार काळ राहूं दिलें नाहीं. पुढें चार शतकेंपर्यंत (मराठे येईंपर्यंत) गुजरात मुसलमानांच्या सत्तेखालीं होता. अकबरानें गुजरातच्या राज्यव्यवस्थेंत कांहीं चांगले फरक केले. मोंगल राज्य येण्यापूर्वी अहमदाबादचे शहा गुजरातवर अधिकार चालवीत, पण त्यांच्या कारकीर्दीत प्रजेस सुख लागलें नाहीं. औरंगजेबापर्यंत मोंगल बादशहांनीं गुजरातच्या प्रजेस कांहीं त्रास दिला नाहीं. औरंगजेबानें मात्र फार जुलूम केला. धनाजी जाधवानें १७०५–६ सालीं गुजराथवर स्वारी केली ती मराठ्यांची पहिली स्वारी होय. पुढें बाळाजी विश्वनाथ व पिलाजी गायकवाड यांनीं स्वाऱ्या करून मोंगली सत्ता नाहींशी केली. पुढें पेशवे आणि गायकवाड यांच्यापासून इंग्रजांनीं गुजरात बळकावला.

**गुजराथी वाङ्मय**—गुजराती भाषा सुमारें सन १००० च्या पुढें स्वतंत्र भाषा म्हणून उपयोगांत आली. पहिल्या चार

शतकांत नांव घेण्यासारखें वाङ्मय या भाषेंत लिहिलें गेलें नाहीं. गुजराथ, काठेवाड व कच्छ यांत ही भाषा आजपर्यंत बोलली जात आहे. ११ ते १४ शतकांत लोकगीतांशिवाय दुसरें वाङ्मय तयार झाल्याचें दिसत नाहीं. या जुन्या लोकगीतांचा प्रसार अजून खेड्यापाड्यांतून सर्वतोमुखीं झालेला दिसतो. खेड्यांत, जंगलांत, रानटी लोकांत हीं लोकगीतें विशेषतः स्त्रियांमध्यें फार प्रेमानें गाइलीं जातात. राधाकृष्णाचीं प्रेमगीतें, शूरवीरांच्या ऐतिहासिक कथा, राजे लोकांचीं भाटचरणांनीं केलेलीं स्तुतिस्तोत्रें यांचा भरणा या लोकगीतांत फार आहे. हीं लेखनिविष्ट न होतां हजारों वर्षें तोंडानेंच सांगून वंशपरंपरेनें लोक शिकत व शिकवीत आले आहेत. आरंभींच्या कालांतील वाङ्मयांत जैन साधूंचे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. धनपाल नांवाच्या जैन साधूनें १० व्या शतकांत अबूजवळ राहून कांहीं ग्रंथरचना केली आहे. व्याकरणापासून धर्मतत्त्वज्ञानापर्यंत सर्व विषयांवर या जैन साधूंनीं ग्रंथलेखन केलें आहे. परंतु त्यांचा मुख्य भर देवदेवतांच्या कथा व उपदेशपर गोष्टी यांवरच होता. अजूनपर्यंत जैन साधू याच विषयांवर लेखन करीत आहेत.

गुजराथवर सन ७४६ पासून १२९८ पर्यंत रजपुतांची सत्ता चालू होती. पुढें सुमारें १७२० पर्यंत मुस्लिमांचा अमल गाजला. पुढें शंभर वर्षें मराठ्यांनीं राज्य केलें. त्यामुळें गुजराथी लोकांस स्वातंत्र्याचें वातावरण कधींच लाभलें नाहीं. आणि स्वतंत्र लोकांचें वाङ्मयहि तेथें उत्पन्न होऊं शकलें नाहीं. फक्त भक्तिमार्गी काव्यालाच येथें वाव होता. बंगालप्रमाणें गुजराथहि पहिल्यापासून कृष्णोपासक आहे. त्यांतून वल्लभाचार्य (जन्म स. १४८८) यांच्या संप्रदायानें कृष्णोपासनेला परमावधीचें लोकप्रिय केलें. द्वारका, प्रभासपट्टण, वगैरे स्थळें व श्रीकृष्णाचीं निवासस्थानें काठेवाडमध्यें आहेत. तेव्हां हजारों वर्षेपर्यंत श्रीकृष्ण हीच देवता गुजराथच्या लोकांची अत्यंत प्रिय असावी यांत नवल नाहीं. शृंगार, वीर, करुण, वत्सल, शांत, इ. अनेक रस कृष्णचरित्रांत भिन्न भिन्न काळीं प्रगट झाले. ज्याला जो रस आवडला त्या रसांत त्या कवीनें काव्य केलें. भक्तिरस सर्वांस सोपा व प्रिय असतो. त्याचेंच गुजराथेंत महत्त्व वाढलें. अद्वैत वेदांताची तर्ककर्कश विचारसरणी गुजराथच्या मृदु भूमीमध्यें मानवणें व आवडणें शक्यच नव्हतें.

(१) मिराबाई (१४०३ ते १४७०)—ही गुजराथची पहिली प्रसिद्ध कवयित्री. उदेपूरचा राणा कुंभ याच्याशीं तिचा विवाह झाला होता. पण लग्नापूर्वींच तिनें आपल्यास श्रीकृष्ण परमात्म्यास वाहून घेतलें होतें. कुंभाची संगति सोडून ती द्वारकेस जाऊन संतांच्या संगतींत राहिली. तिची मूळची भाषा राजपुतानी. पण द्वारकेंत ती गुजराथी बनली. तिचीं सुमारें २५०–३०० पदें हल्लीं शिल्लक आहेत. त्यांतलीं पुष्कळ शृंगारिक आहेत. पण तो शृंगार कृष्णभक्तीनें पवित्र झाला आहे. तिचें सर्व जीवन अंतर्बाह्य कृष्णमय झालें होतें. तिचीं पदें आज ५०० वर्षें सबंध भारतवर्षांत अत्यंत लोकप्रिय होऊन राहिलीं आहेत, व या नास्तिक युगांतहि तिचीं पदें आबालवृद्धांस अत्यंत प्रिय आहेत.

(२) नरसी मेहता (१४१५–१४८१)— हा मीरापेक्षां श्रेष्ठ दर्जाचा कवि होता. हा बालपणींच कृष्णवेडा झाला. त्याची बायको व मुलगा दारिद्र्यांतच मेलीं. नरसीच्या ग्रंथांचे शृंगारपर व भक्तिपर असे दोन प्रकार आहेत. पण त्याचा शृंगार हा एक भक्तीचाच प्रकार आहे. मिराबाईचीं पदें नरसीच्या पदांपेक्षां जास्त मधुर व अधिक उच्च भावनायुक्त असल्यानें जनमनावर त्यांची पकड जास्त आहे. भक्तिपर काव्यांत नरसी मीरापेक्षां श्रेष्ठ आहे. कृष्णभक्तीचें परमोच्च स्वरूप याच्या काव्यांत दिसून येतें. याची भाषा साधी व सोपी आहे. सर्व बाजूंनीं विचार करतां नरसी हा सर्व जुन्या गुजराती कवींत श्रेष्ठ होता. शृंगार–काव्यांत दयाराम श्रेष्ठ. भावनांचें प्रकटीकरण मिराबाईच्या पदांत जास्त उठावदार. परंतु सर्व काव्यगुणांत मिळून नरसीकडेच श्रेष्ठत्व येतें.

(३) हेमचंद्र (१०८९–११७३)—हा जैन साधु असून याचे ग्रंथ संस्कृतमध्यें सर्व विषयांवर आहेत. गुजरातीमध्येंहि यानें ग्रंथरचना केली आहे.

कवि वल्लभ याचें काव्य भक्तिरसानें परिपूर्ण आहे. त्याची देवी बंगाली कालीमातेसारखी नररुंडमालाधर नसून जगद्रक्षण करणारी प्रेमळ माता आहे.

(४) आखो (१६१५–१६७५)—हा जातीनें सोनार. त्याच्या वेळीं धंद्यांत, राजकारणांत व धर्मांतसुद्धां जो लोभीपणा व ढोंगीपणा माजला होता त्यावर यानें तुकारामासारखे कठोर कोरडे ओढले आहेत. धार्मिक तत्त्वज्ञानावरहि यानें पुष्कळ काव्य केलें आहे.

(५) प्रेमानंद (१६३६–१७३४)— मागासलेली गुजराथी भाषा संस्कृतींत व भारदस्तपणांत संस्कृतच्या जोडीस आणून बसविण्याचा मान प्रेमानंदास देण्यांत येतो. पौराणिक व लोकप्रसिद्ध विषयांवर याची आख्यानक कविता फार लोकप्रिय आहे.

(६) दयाराम (१७६७–१८५२)—हा प्राचीन कवींपैकीं शेवटचा गुजराथी कवि होय. करुणरसपूर्ण अशीं याचीं भावगीतें व मोक्षाकरितां तळमळणाऱ्या जीवांचीं करुणगीतें यांमुळें दयारामास भाषेंत निरंतरचें स्थान प्राप्त झालें आहे.

(७) दलपतराम (१८२०–१८९८)— हे स्वामीनारायणपंथाचे असून यांच्या गद्य व पद्य लेखनावर पाश्चात्य विचारांची छाप स्पष्ट उमटली आहे.

(८) नर्मदा शंकर (१८३३–१८८६)— यांनीं हेमचंद्राच्या मागून ७०० वर्षांनीं एकट्यांनीं गुजराथी कोश तयार केला. यांनीं आखोप्रमाणेंच वैष्णव महाराजांच्या दुष्कृत्यांवर खडसून टीका केली. यांच्या काव्यांत निसर्ग–सौंदर्याचीं वर्णनें फार सुंदर आहेत.

(९) गोवर्धनराम त्रिपाठी (१८५५–१९०७)— यांची सरस्वतीचंद्र नांवाची दीर्घकथा फार प्रसिद्ध आहे. तिच्यांत राजकीय, सामाजिक व तात्त्विक विचारांचें भांडार भरलें आहे. हे गुजरातचे बंकिमचंद्र होत.

(१०) बेहरामजी मलबारी (१८६३–१९१२)— हे समाजसुधारक म्हणून प्रसिद्ध आहेत. यांनीं दलपत व नर्मद यांच्या धर्तीवर पुष्कळ सुंदर काव्यलेखन केलें आहे.

(११) ए. एफ्. खबरदार (ज. १८८१)— हे पारशी असून गद्य व पद्य लिहिण्यांत फार कुशल आहेत. त्यांचें लेखन विद्वत्तापूर्ण व पुष्कळसें उपरोधिक आहे. यांनीं मुक्तधारा छंद नवीनच उपयोगांत आणला.

(१२) कवि नानालाल दलपतराम (१८७७–१९४६)— यांना गुजराथचे राजकवि म्हणतात. त्यांचें गद्य व पद्य विस्तृत, मौलिक व सुंदर आहे. त्यांचे गरबे, गीतें, नाटकें, कादंबऱ्या, निबंध व भाषणें फार लोकप्रिय आहेत.

(१३) प्रो. आनंद शंकर ध्रुव (१८६९–१९४१)—यांनीं हिंदुधर्म व तत्त्वज्ञान यांवर पुष्कळ लेखन गुजराथींत केलें आहे. ते संस्कृतचेहि जाडे पंडित होते.

(१४) दि. ब. केशव हर्षद ध्रुव (१८५९–१९३८)—हेहि संस्कृत पंडित असून त्यांनीं पुष्कळ संस्कृत नाटकांचीं गुजराथींत भाषांतरें केलीं आहेत.

(१५) सर रमणबाई नीलकंठ (१८६८–१९२८)—यांनीं पाश्चात्य विचार, व तत्त्वज्ञान यांचा आपल्या लेखांत प्रचार केला. वाङ्मय–टीकाकार म्हणून यांची विशेष प्रसिद्धि आहे.

(१६) प्रो. बळवंतराव ठाकोर (ज. १८६९)—यांचें ऐतिहासिक लेखन स्पष्ट, निर्भीड आहे. यांनीं काव्याच्या तंत्रांत पुष्कळ नवीन प्रकार सुरू केले आहेत.

(१७) रमणलाल देसाई (ज. १८९२)—यांचीं कांहीं नाटकें व अनेक कादंबऱ्या आहेत. यांनीं सामाजिक व राजकीय विषय सारख्याच कुशलतेनें हाताळले आहेत.

(१८) मणिशंकर रतनजी भट्ट (१८६७–१९२३)—यांचें टोपण नांव 'कांत' आहे. यांचें काव्य उच्च प्रतीचें असून त्यांनीं आपल्या गद्यलेखनानें स्वीडेनबर्गचे विचार गुजराथींत लोकप्रिय केले.

(१९) कलापी (मयूर): (१८७४–१९००)—काठेवाडांत लाठी संस्थानचे राजपुत्र सूरसिंहजी गोहील यांचें कलापी हें काव्यनाम आहे. करुणरसपूर्ण अशा आपल्या काव्यांनीं यांनीं गुजराथी वाङ्मयांत आपलें नांव अमर करून ठेवलें आहे.

(२०) कन्हयालाल मुनशी (ज. १८८७)— अर्वाचीन गुजराती वाङ्मयांत कन्हयालाल मुनशी यांचें एक स्वतंत्र व असाधारण स्थान आहे. त्यांनीं ऐतिहासिक व सामाजिक कादंबऱ्या, पौराणिक व सामाजिक नाटकें, लघुकथा, टीकात्मक लेख, चरित्रें, आत्मचरित्र, वगैरे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. इंग्रजीमध्येंहि गुजराती वाङ्मयाचा इतिहास लिहिला आहे. यांनी ५० हून अधिक पुस्तकें लिहिलीं आहेत. राजकीय विषयांत जसे हे अग्रभागीं लढणारे वीर आहेत तसे वाङ्मय, धर्मशास्त्र व सार्वजनिक चळवळी यांत त्यांचा फार मोठा कार्यभाग आहे. भारतीय विद्याभवन नांवाची एक मोठी संशोधन-संस्था त्यांनी काढली आहे. त्यांच्या नाटकांतील व कादंबऱ्यांतील पात्रांचें स्वभावलेखन फार उच्च प्रतीचें असतें. 'वेरनी वसुलात' ही त्यांची उत्कृष्ट सामाजिक कादंबरी प्रसिद्ध आहे. त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांत त्यांनीं प्राचीन गुजरातचें अतिशय उज्ज्वल स्वरूप चित्रित केलें आहे. आपल्या सामाजिक नाटकांत त्यांनीं समाजांतील दोषांचें फार कठोरपणें आविष्करण केलें आहे.

(२१) महात्मा गांधींनीं गुजराथी वाङ्मय पुष्कळच लिहिलें आहे. त्यांचे अनेक मौलिक विचार अति सोप्या पण परिणामकारक भाषेंत त्यांनीं ५० वर्षे समाजापुढें मांडले आहेत. त्यांचें 'सत्याचे प्रयोग' हें आत्मचरित्र म्हणजे एक अलौकिक ग्रंथ आहे. त्यांनी इंग्रजी, गुजराती व हिंदीमध्ये सारख्याच सफाईनें अमूप वाङ्मय लिहिलें आहे. साधी परंतु हृदयास भिडणारी भाषा, प्रतिक्षणीं नवीन नवीन विचार व प्रत्येक शब्दांत व्यक्त होणारें मतांचें पावित्र्य या गुणांनीं त्यांचें गुजराती वाङ्मय चिरस्थाई होणार यांत शंकाच नाहीं. त्यांच्या पत्रांचा संग्रह फार मोठा आहे. थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ, अलौकिक विचारसरणी व हृदयाची निष्कपट सरलता त्यांच्या प्रत्येक पत्रांत व्यक्त होते.

(२२) काका कालेलकर महाराष्ट्रीय असून त्यांचें गुजराती भाषेवर स्वामित्व फार उच्च दर्जाचें आहे. त्यांची भाषा फार अलंकारिक, सुंदर व कल्पनारम्य असते. भारताच्या प्राचीन संस्कृतीचें व वाङ्मयाचें त्यांचें ज्ञान फार खोल आहे.

(२३) गांधींच्या निकटवर्ती शिष्यांपैकीं दुसरे एक शिष्य किशोरीलाल मश्रूवाला यांच्या गुजराती लेखनांत त्यांचा तत्त्वज्ञानांचा खोल अभ्यास दृग्गोचर होतो. 'जीवनशोधन' व 'गीतामंथन' हे त्यांचे दोन ग्रंथ विचारास चालना देणारे आहेत. यांची भाषा साधी, सोपी पण भारदस्त असून त्यांनीं गांधीजींच्या तत्त्वज्ञानाचा आपल्या लेखनांत विस्तार केला आहे.

(२४) नरसिंहराव दिवेटिया (१८५९–१९३७)—यांनीं आपल्या स्फुट काव्यांचा संग्रह 'कुसुममाला' या नांवानें १८८७ मध्यें प्रसिद्ध केला. त्या वेळेपासून ४० वर्षेंपर्यंत त्यांनीं गुजराती वाङ्मयांत आपलें प्रमुख स्थान कायम ठेविलें होतें. 'हृदयवीणा' आणि 'नूपुरझंकार' या नांवाचे दुसरे दोन काव्यसंग्रह त्यांनीं पुढें प्रसिद्ध केले. त्यांनीं आपल्या पुत्रमरणानंतर 'स्मरणसंहिता' नांवाचें काव्य लिहिलें. धर्मश्रद्धा, करुणरस व अतिलीनता यांच्या प्रकर्षामुळें हें काव्य अप्रतिम वठलें आहे. अतिशय निर्भीड वाङ्मयटीकाकार म्हणूनहि यांची कीर्ति चिरस्थायी आहे. गुजराती भाषाशास्त्रावरील त्यांचीं व्याख्यानें इतकीं विशाल विद्वत्तेचीं द्योतक आहेत कीं, केवळ याच व्याख्यानांच्या योगानें त्यांचें विद्वत्पद अनेक पिढ्या स्थिर राहील.

(२५) मिराबाई, दिवाळीबाई, राधाबाई, कृष्णाबाई, गौरीबाई, वगैरे स्त्रियांनीं गुजराती भाषेंत उच्च प्रतीचें काव्य केलें आहे. सध्यांच्या काळीं सौ. लीलावती मुनशी यांनीं 'रेखाचित्रें', 'कुमारदेवी' नांवाचें नाटक व इतर पुष्कळ लेखन लिहिलें आहे. त्यांची भाषा शुद्ध, रेखीव व संयमयुक्त आहे.

नर्मदाशंकर आणि दलपतराम यांच्यानंतर अलीकडे प्रा. बळवंतराय ठाकोर आणि न्हानालाल या दोन स्वतंत्र संप्रदायांच्या कवींकडे नेतृत्व आलें आहे. ठाकोर यांचें काव्य टीकात्मक असतें, बुद्धिप्रधान असतें व त्यांचे अनुयायी कवीहि थोडे नाहींत. भावनाविष्काराला महत्त्व देणाऱ्या कवींचे अग्रणी न्हानालाल होत. त्यांच्या लहान लहान कविता फार लोकप्रिय झाल्या आहेत. न्हानालाल संप्रदायांतील कवी निसर्गाचे उपासक आहेत.

गुजराथी काव्य प्रामुख्यानें भावात्मक (लिरिकल) आहे व त्यांत विविध विषयहि येतात. वास्तवताप्रधान काव्य फारसें दिसत नाहीं. तथापि मराठीप्रमाणेंच गुजराथी काव्याला ओहोटी लागल्यासारखें वाटतें. सुन्दरम्, उमाशंकर जोशी, मनसुखलाल जव्हेरी, रामप्रसाद शुक्ल, रमणिक अरालवाला, व स्नेहरश्मि हे आजचे प्रख्यात कवी होत.

**गुजरी तोडी**—हा राग तोडी थाटांतून उत्पन्न होतो. यांत पंचम स्वर वर्ज्य आहे म्हणून याची जाति षाडव–षाडव आहे. वादी धैवत व संवादी ऋषभ आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर. हा एक तोडीचा प्रकार आहे.

**गुंजीकर, रामचंद्र भिकाजी** (१८४४–१९०१)—एक महाराष्ट्रीय ग्रंथकार. यांचें मूळ उपनाव केंकरे, परंतु वतन गांवावरून त्यांचें घराणें 'गुंजीकर' या आडनांवानें प्रसिद्धीस आलें. एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें शिक्षक, हुबळी येथील इंग्रजी शाळेचे हेडमास्तर, बेळगांव जिल्ह्याचे असि. डे. ए. इन्स्पेक्टर अशा जागांवर त्यांनीं कामें केलीं व १८९८ मध्यें पेन्शन घेऊन मुंबईस राहिले.

गुंजीकर हे मराठी भाषेंतील एक मार्मिक ग्रंथकार होते. इ. स. १८६७ मध्यें यांनीं कांहीं मित्रांच्या साह्यानें 'विविधज्ञानविस्तार' चालू केला. वि. ज्ञा. विस्ताराची टीकाकार म्हणून जी प्रसिद्धि आहे ती त्यास मूळ रामभाऊमुळेंच प्राप्त झाली. त्यांची 'मोचनगड' ही कादंबरी प्रसिद्ध आहे. शाकुंतल नाटकाचें त्यांनीं केलेलें सुरस भाषांतर आज दुर्मिळ आहे. १८७७ सालीं त्यांनीं काशीनाथ पांडुरंग परब यांस मदतीस घेऊन 'कौमुदी महोत्सव'–भट्टोजी दीक्षित यांच्या सिद्धान्तकौमुदीचें भाषांतररूप त्रैमासिक सुरू केलें. परंतु दोन वर्षें चालवून आश्रयाच्या अभावामुळें तें त्यांस बंद करावें लागलें. 'रामचंद्रिका' म्हणून संस्कृत शब्दरूपावली त्यांनीं लिहून प्रसिद्ध केली. पिटमनच्या लघुलेखनपद्धतीवर मराठींत एक लाघवी लिपि तयार केली होती. यांचे अनेक विषयांवर लेख आहेत.

**गुंटकल**—मद्रास, अनंतपूर जिल्ह्यांतील एक गांव. लो. सं. सु. सात हजार. हें मद्रास सदर्न मराठा रेल्वेवरचें महत्त्वाचें जंक्शन आहे. सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने येथें आहेत. तरी येथें व्यापार फारसा नाहीं. जवळच कांहीं पुराण वास्तूंचे अवशेष सांपडले आहेत.

**गुंटर, एडमंड** (१५८१–१६२६)—एक इंग्रज गणितशास्त्रज्ञ व खगोलशास्त्रज्ञ. तो लंडनमधील ग्रेशॅम कॉलेजमध्यें खगोलशास्त्राचा प्रोफेसर होता. कोसाईन, कोटँजंट वगैरे संज्ञा वापरणारा हा पहिला शास्त्रज्ञ असून गुंटर चेन, गुंटर स्केल, वगैरे क्षेत्रमापक उपकरणांचा पहिला संशोधक आहे.

**गुंटूर**—मद्रास इलाख्यातील एक जिल्हा. क्षेत्रफळ ५,७९५ चौ. मै.. लोकवस्ती २२,७७,२८३. लोकांचा धंदा शेतकी आहे.

शहर— गुंटूर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून १८६६ पासून येथें म्युनीसिपालिटी आहे. वस्ती(१९४१)८३,५९९. येथील हवापाणी अत्यंत आरोग्यदायक आहे. १७७८ मध्यें हा प्रदेश कंपनी सरकारनें बसालतजंग यापासून मक्त्यानें घेतला व तो १८२३

(७) दलपतराम (१८२०–१८९८)— हे स्वामीनारायणपंथाचे असून यांच्या गद्य व पद्य लेखनावर पाश्चात्य विचारांची छाप स्पष्ट उमटली आहे.

(८) नर्मदा शंकर (१८३३–१८८६)— यांनीं हेमचंद्राच्या मागून ७०० वर्षांनीं एकट्यांनीं गुजराथी कोश तयार केला. यांनीं आखोप्रमाणेंच वैष्णव महाराजांच्या दुष्कृत्यांवर खडसून टीका केली. यांच्या काव्यांत निसर्ग–सौंदर्याचीं वर्णनें फार सुंदर आहेत.

(९) गोवर्धनराम त्रिपाठी (१८५५–१९०७)— यांची सरस्वतीचंद्र नांवाची दीर्घकथा फार प्रसिद्ध आहे. तिच्यांत राजकीय, सामाजिक व तात्त्विक विचारांचें भांडार भरलें आहे. हे गुजरातचे बंकिमचंद्र होत.

(१०) बेहरामजी मलबारी (१८६३–१९१२)— हे समाजसुधारक म्हणून प्रसिद्ध आहेत. यांनीं दलपत व नर्मद यांच्या धर्तीवर पुष्कळ सुंदर काव्यलेखन केलें आहे.

(११) ए. एफ्. खबरदार (ज. १८८१)— हे पारशी असून गद्य व पद्य लिहिण्यांत फार कुशल आहेत. त्यांचें लेखन विद्वत्तापूर्ण व पुष्कळसें उपरोधिक आहे. यांनीं मुक्तधारा छंद नवीनच उपयोगांत आणला.

(१२) कवि नानालाल दलपतराम (१८७७–१९४६)— यांना गुजराथचे राजकवि म्हणतात. त्यांचें गद्य व पद्य विस्तृत, मौलिक व सुंदर आहे. त्यांचे गरबे, गीतें, नाटकें, कादंबऱ्या, निबंध व भाषणें फार लोकप्रिय आहेत.

(१३) प्रो. आनंद शंकर ध्रुव (१८६९–१९४१)—यांनीं हिंदुधर्म व तत्त्वज्ञान यांवर पुष्कळ लेखन गुजराथींत केलें आहे. ते संस्कृतचेहि जाडे पंडित होते.

(१४) दि. ब. केशव हर्षद ध्रुव (१८५९–१९३८)— हेहि संस्कृत पंडित असून त्यांनी पुष्कळ संस्कृत नाटकांचीं गुजराथींत भाषांतरें केलीं आहेत.

(१५) सर रमणबाई नीलकंठ (१८६८–१९२८)— यांनीं पाश्चात्य विचार, व तत्त्वज्ञान यांचा आपल्या लेखांत प्रचार केला. वाङ्मय–टीकाकार म्हणून यांची विशेष प्रसिद्धि आहे.

(१६) प्रो. बळवंतराव ठाकोर (ज. १८६९)—यांचें ऐतिहासिक लेखन स्पष्ट, निर्भीड आहे. यांनीं काव्याच्या तंत्रांत पुष्कळ नवीन प्रकार सुरू केले आहेत.

(१७) रमणलाल देसाई (ज. १८९२)—यांचीं कांहीं नाटकें व अनेक कादंबऱ्या आहेत. यांनीं सामाजिक व राजकीय विषय सारख्याच कुशलतेनें हाताळले आहेत.

(१८) मणिशंकर रतनजी भट्ट (१८६७–१९२३)— यांचें टोपण नांव 'कांत' आहे. यांचें काव्य उच्च प्रतीचें असून त्यांनीं आपल्या गद्यलेखनानें स्वीडेनबर्गचे विचार गुजराथींत लोकप्रिय केले.

(१९) कलापी (मयूर): (१८७४–१९००)—काठेवाडांत लाठी संस्थानचे राजपुत्र सूरसिंहजी गोहील यांचें कलापी हें काव्यनाम आहे. करुणरसपूर्ण अशा आपल्या काव्यांनीं यांनीं गुजराथी वाङ्मयांत आपलें नांव अमर करून ठेवलें आहे.

(२०) कन्हयालाल मुनशी (ज. १८८७)— अर्वाचीन गुजराती वाङ्मयांत कन्हयालाल मुनशी यांचें एक स्वतंत्र व असाधारण स्थान आहे. त्यांनीं ऐतिहासिक व सामाजिक कादंबऱ्या, पौराणिक व सामाजिक नाटकें, लघुकथा, टीकात्मक लेख, चरित्रें, आत्मचरित्र, वगैरे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. इंग्रजीमध्येंहि गुजराती वाङ्मयाचा इतिहास लिहिला आहे. यांनीं ५० हून अधिक पुस्तकें लिहिलीं आहेत. राजकीय विषयांत जसे हे अग्रभागीं लढणारे वीर आहेत तसे वाङ्मय, धर्मशास्त्र व सार्वजनिक चळवळी यांत त्यांचा फार मोठा कार्यभाग आहे. भारतीय विद्याभवन नांवाची एक मोठी संशोधन-संस्था त्यांनीं काढली आहे. त्यांच्या नाटकांतील व कादंबऱ्यांतील पात्रांचें स्वभावलेखन फार उच्च प्रतीचें असतें. 'वेरनी वसुलात' ही त्यांची उत्कृष्ट सामाजिक कादंबरी प्रसिद्ध आहे. त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांत त्यांनीं प्राचीन गुजरातचें अतिशय उज्ज्वल स्वरूप चित्रित केलें आहे. आपल्या सामाजिक नाटकांत त्यांनीं समाजांतील दोषांचें फार कठोरपणें आविष्करण केलें आहे.

(२१) महात्मा गांधींनीं गुजराथी वाङ्मय पुष्कळच लिहिलें आहे. त्यांचे अनेक मौलिक विचार अति सोप्या पण परिणामकारक भाषेंत त्यांनीं ५० वर्षे समाजापुढें मांडले आहेत. त्यांचें 'सत्याचे प्रयोग' हें आत्मचरित्र म्हणजे एक अलौकिक ग्रंथ आहे. त्यांनीं इंग्रजी, गुजराती व हिंदींमध्यें सारख्याच सफाईनें अमूप वाङ्मय लिहिलें आहे. साधी परंतु हृदयास भिडणारी भाषा, प्रतिक्षणीं नवीन नवीन विचार व प्रत्येक शब्दांत व्यक्त होणारें मतांचें पावित्र्य या गुणांनीं त्यांचें गुजराती वाङ्मय चिरस्थाई होणार यांत शंकाच नाहीं. त्यांच्या पत्रांचा संग्रह फार मोठा आहे. थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ, अलौकिक विचारसरणी व हृदयाची निष्कपट सरलता त्यांच्या प्रत्येक पत्रांत व्यक्त होते.

(२२) काका कालेलकर महाराष्ट्रीय असून त्यांचें गुजराती भाषेवर स्वामित्व फार उच्च दर्जाचें आहे. त्यांची भाषा फार अलंकारिक, सुंदर व कल्पनारम्य असते. भारताच्या प्राचीन संस्कृतीचें व वाङ्मयाचें त्यांचें ज्ञान फार खोल आहे.

(२३) गांधींच्या निकटवर्ती शिष्यांपैकीं दुसरे एक शिष्य किशोरीलाल मश्रूवाला यांच्या गुजराती लेखनांत त्यांचा तत्त्वज्ञानाचा खोल अभ्यास दृग्गोचर होतो. 'जीवनशोधन' व 'गीतामंथन' हे त्यांचे दोन ग्रंथ विचारास चालना देणारे आहेत. यांची भाषा साधी, सोपी पण भारदस्त असून त्यांनीं गांधीजींच्या तत्त्वज्ञानाचा आपल्या लेखनांत विस्तार केला आहे.

(२४) नरसिंहराव दिवेटिया (१८५९-१९३७)—यांनीं आपल्या स्फुट काव्यांचा संग्रह 'कुसुममाला' या नांवानें १८८७ मध्यें प्रसिद्ध केला. त्या वेळपासून ४० वर्षेपर्यंत त्यांनीं गुजराती वाङ्मयांत आपलें प्रमुख स्थान कायम ठेविलें होतें. 'हृदयवीणा' आणि 'नूपुरझंकार' या नांवाचे दुसरे दोन काव्यसंग्रह त्यांनीं पुढें प्रसिद्ध केले. त्यांनीं आपल्या पुत्रमरणानंतर 'स्मरणसंहिता' नांवाचें काव्य लिहिलें. धर्मश्रद्धा, करुणरस व अतिलीनता यांच्या प्रकर्षामुळें हें काव्य अप्रतिम वठलें आहे. अतिशय निर्भीड वाङ्मयटीकाकार म्हणूनहि यांची कीर्ति चिरस्थायी आहे. गुजराती भाषाशास्त्रावरील त्यांचीं व्याख्यानें इतकीं विशाल विद्वत्तेचीं द्योतक आहेत कीं, केवळ याच व्याख्यानांच्या योगानें त्यांचें विद्वत्पद अनेक पिढ्या स्थिर राहील.

(२५) मिराबाई, दिवाळीबाई, राधाबाई, कृष्णाबाई, गौरीबाई, वगैरे स्त्रियांनीं गुजराती भाषेंत उच्च प्रतीचें काव्य केलें आहे. सध्यांच्या काळीं सौ. लीलावती मुनशी यांनीं 'रेखाचित्रें', 'कुमारदेवी' नांवाचें नाटक व इतर पुष्कळ लेखन लिहिलें आहे. त्यांची भाषा शुद्ध, रेखीव व संयमयुक्त आहे.

नर्मदाशंकर आणि दलपतराम यांच्यानंतर अलीकडे प्रा. बळवंतराय ठाकोर आणि न्हानालाल या दोन स्वतंत्र संप्रदायांच्या कवींकडे नेतृत्व आलें आहे. ठाकोर यांचें काव्य टीकात्मक असतें, बुद्धिप्रधान असतें व त्यांचे अनुयायी कवीहि थोडे नाहींत. भावनाविष्काराला महत्त्व देणाऱ्या कवींचे अग्रणी न्हानालाल होत. त्यांच्या लहान लहान कविता फार लोकप्रिय झाल्या आहेत. न्हानालाल संप्रदायांतील कवी निसर्गाचे उपासक आहेत.

गुजराथी काव्य प्रामुख्यानें भावात्मक (लिरिकल) आहे व त्यांत विविध विषयहि येतात. वास्तवताप्रधान काव्य फारसें दिसत नाहीं. तथापि मराठीप्रमाणेंच गुजराथी काव्याला ओहोटी लागल्यासारखें वाटतें. सुन्दरम्, उमाशंकर जोशी, मनसुखलाल जव्हेरी, रामप्रसाद शुक्ल, रमणिक अरालवाला, व स्नेहरश्मि हे आजचे प्रख्यात कवी होत.

**गुजरी तोडी**—हा राग तोडी थाटांतून उत्पन्न होतो. यांत पंचम स्वर वर्ज्य आहे म्हणून याची जाति षाडव–षाडव आहे. वादी धैवत व संवादी ऋषभ आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर. हा एक तोडीचा प्रकार आहे.

**गुंजीकर, रामचंद्र भिकाजी** (१८४४–१९०१)—एक महाराष्ट्रीय ग्रंथकार. यांचें मूळ उपनाव केंकरे, परंतु वतन गांवावरून त्यांचें घराणें 'गुंजीकर' या आडनांवानें प्रसिद्धीस आलें. एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें शिक्षक, हुबळी येथील इंग्रजी शाळेचे हेडमास्तर, बेळगांव जिल्ह्याचे असि. डे. ए. इन्स्पेक्टर अशा जागांवर त्यांनीं कामें केलीं व १८९८ मध्यें पेन्शन घेऊन मुंबईस राहिले.

गुंजीकर हे मराठी भाषेंतील एक मार्मिक ग्रंथकार होते. इ. स. १८६७ मध्यें यांनीं कांहीं मित्रांच्या साह्यानें 'विविधज्ञानविस्तार' चालू केला. वि. ज्ञा. विस्ताराची टीकाकार म्हणून जी प्रसिद्धि आहे ती त्यास मूळ रामभाऊमुळेंच प्राप्त झाली. त्यांची 'मोचनगड' ही कादंबरी प्रसिद्ध आहे. शाकुंतल नाटकाचें त्यांनीं केलेलें सुरस भाषांतर आज दुर्मिळ आहे. १८७७ सालीं त्यांनीं काशीनाथ पांडुरंग परब यांस मदतीस घेऊन 'कौमुदी महोत्सव'–भट्टोजी दीक्षित यांच्या सिद्धान्तकौमुदीचें भाषांतररूप त्रैमासिक सुरू केलें. परंतु दोन वर्षे चालवून आश्रयाच्या अभावामुळें तें त्यांस बंद करावें लागलें. 'रामचंद्रिका' म्हणून संस्कृत शब्दरूपावली त्यांनीं लिहून प्रसिद्ध केली. पिटमनच्या लघुलेखनपद्धतीवर मराठींत एक लाघवी लिपि तयार केली होती. यांचे अनेक विषयांवर लेख आहेत.

**गुंटकल**—मद्रास, अनंतपूर जिल्ह्यांतील एक गांव. लो. सं. सु. सात हजार. हें मद्रास सदर्न मराठा रेल्वेवरचें महत्त्वाचें जंक्शन आहे. सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने येथें आहेत. तरी येथें व्यापार फारसा नाहीं. जवळच कांहीं पुराण वास्तूंचे अवशेष सांपडले आहेत.

**गुंटर, एडमंड** (१५८१–१६२६)— एक इंग्रज गणितशास्त्रज्ञ व खगोलशास्त्रज्ञ. तो लंडनमधील ग्रेशॅम कॉलेजमध्यें खगोलशास्त्राचा प्रोफेसर होता. कोसाईन, कोटँजंट वगैरे संज्ञा वापरणारा हा पहिला शास्त्रज्ञ असून गुंटर चेन, गुंटर स्केल, वगैरे क्षेत्रमापक उपकरणांचा पहिला संशोधक आहे.

**गुंटूर**—मद्रास इलाख्यातील एक जिल्हा. क्षेत्रफळ ५,७९५ चौ. मै.. लोकवस्ती २२,७७,२८३. लोकांचा धंदा शेतकी आहे.

शहर— गुंटूर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून १८६६ पासून येथें म्युनीसिपालिटी आहे. वस्ती(१९४१)८३,५९९. येथील हवापाणी अत्यंत आरोग्यदायक आहे. १७७८ मध्यें हा प्रदेश कंपनी सरकारनें बसालतजंग यापासून मक्त्यानें घेतला व तो १८२३

पासून त्यांच्याकडे कायमचाच राहिला. येथें मोठाले रस्ते मिळतात. त्यांत बेझवाड्यावरून जाणारा सीतापूर–मद्रास रस्ता मुख्य आहे. येथें एक आर्ट्स कॉलेज आहे. हिंदू व मुसलमान शिक्षक–शिक्षकिणींकरितां अध्यापन शाळा आहेत. शिवाय बरींच हायस्कुलें आहेत. तेलगू व इंग्रजी भाषेंतलीं कांहीं नियतकालिकें येथें प्रसिद्ध होतात. व्यापाराचें हें मोठें ठिकाण आहे. येथें कापसाचा व तांदुळाचा व्यापार चालतो.

**गुड फ्रायडे**— एक ख्रिस्ती सण. ख्रिस्ताला सुळी दिला त्याच्या स्मरणार्थ ईस्टरच्या आधीचा शुक्रवार उपास म्हणून पाळतात. ख्रिस्ती लोक हा दिवस पाळीत असल्याला कित्येक शतके लोटलीं आहेत. रोमन कॅथॉलिक चर्चमधून उपासाखेरीज क्रूसांची पूजा करतात.

**गुडरिच, सॅम्युएल ग्रिस्वोल्ड** (१७९३–१८६०)— एक अमेरिकन ग्रंथकार. त्यानें लहान मुलांकरतां सुमारें १०० पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं. त्याशिवाय त्यानें ग्रंथ लिहिले ते—‘ रिकलेक्शन्स ऑफ ए लाइफटाइम ’ ( एका आयुष्यांतील आठवणी ); ‘ स्केचेस फ्रॉम ए स्टुडन्ट्स विंडो ’ ( एका विद्यार्थ्याच्या खिडकींतून काढलेलीं चित्रें ); ‘ ए हिस्टरी ऑफ ऑल नेशन्स ’ ( सर्व राष्ट्रांचा इतिहास ); ‘ दि औटकास्ट अॅन्ड आदर पोएम्स ’; आणि ‘ अॅन् इलस्ट्रेटेड् हिस्टरी ऑफ दि ॲनिमल किंगडम् ’ ( प्राणिराज्याचा सचित्र इतिहास ).

**गुंडी**—कपड्यांचे भाग एकत्र धरून ठेवण्याकरितां गुंड्या वापरण्यांत येतात. गुंड्यांचे सामान्यतः तीन प्रकार आढळतात: कडीच्या गुंड्या, छिद्राच्या गुंड्या व झांकलेल्या गुंड्या. कडीच्या गुंड्या करतांना कड्या व गुंड्या वेगवेगळ्या तयार करून नंतर त्या जोडण्यांत येतात. कांहीं धातूंच्या गुंड्या सपाट व कांहींच्या पोकळ असतात. पोकळ गुंड्यांमध्यें दोन चकत्या असून त्या द बून एकत्र करण्यांत येतात.

मोठीं हाड व हस्तीदंत ह्यांच्याहि गुंड्या करण्यांत येतात. त्याप्रमाणेंच शिंगाच्याहि गुंड्या तयार करण्यांत येतात. यांच्या बहुतेक वाटोळ्या चकत्या करून व त्या गुळगुळीत करून त्यांस कड्या जोडण्यांत येतात. छिद्रांच्या गुंड्या अनेक पदार्थांच्या तयार करतात. यामध्यें शिंपा, हाडें, हस्तीदंत, कृत्रिम हस्तीदंत, निरनिराळ्या प्रकारचें कठिण लांकूड, रबर, कांच, चिनीमाती, वगैरे अनेक प्रकारचे पदार्थ वापरण्यांत येतात. गुंड्याकरितां लागणारे उत्तम शिंपले मकासर, चिनी समुद्र, तांबडा समुद्र, वेस्ट इंडीज, मध्य आफ्रिका, वगैरे ठिकाणीं सांपडतात. झांकलेल्या गुंड्या बहुधा यंत्राच्या साहाय्यानें करितात. प्रथमतः ग्रा लांकडाच्या करून त्यांवर कापड चढवीत असत. परंतु अलीकडे या लोखंडी सांचांतून वगैरे करूं लागले आहेत. इं. बटण हा शब्द फ्रेंच भाषेंतील कळी या अर्थी आहे.

**गुणकली**—हा राग भैरव थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहांत गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य झाल्याने याची जाति औडुव– औडुव आहे. वादी धैवत व संवादी ऋषभ आहे. गानसमय प्रातःकाल सर्वसंमत आहे. या रागाचें गायन मंद्र व मध्य या सप्तकांत फार मधुर लागतें. हा एक भैरव प्रकार आहे.

**गुणगुणणारे पक्षी**— हे धांवत्या ( ट्रोकिलिडी ) कुलांतील पक्षी होत. हे उडत चालेले म्हणजे त्यांच्या पंखांपासून जो आवाज होतो त्यावरून त्यांस गुणगुणणारे पक्षी म्हणतात. ते उडत असतांनाच किडे वगैरे पकडून त्यांवर उपजीविका करतात. हे पक्षी फक्त अमेरिका खंडांत आढळतात व तेथेंहि उष्ण कटिबंधांतच त्यांची वस्ती असते. यांचा आवाज एकेरी असतो. या पक्ष्यांच्या सुमारे पांचशें पोटजाती आहेत.

**गुणरत्न**—हा जैन ग्रंथकार पंधराव्या शतकांत होऊन गेला. यानें ‘ सद्दर्शन समस्या ’ ग्रंथावर तर्करहस्यदीपिका नांवाची टीका लिहिली आहे. ‘ क्रियारत्न समस्या ’ नांवाचा दुसराहि याचा ग्रंथ आहे. हा देवसुदर्शनाचा शिष्य असून सं. १४२० मध्यें याला सूरिपद मिळालें. हा श्वेतांबरपंथी तपागच्छशाखेचा होता.

**गुणवंत गड**— मुंबई, सातारा जिल्हा, पाटणच्या नैर्ऋत्येस ६ मैलांवर १,००० फूट उंचीच्या टेकडीवर हा गुणवंतगड किंवा मोरगिरी किल्ला आहे. याचा आकार निजलेल्या सिंहासारखा दिसतो म्हणून यास मोरगिरी नांव पडलें. अठराव्या शतकांत या किल्ल्यावर पेशव्यांची फौज होती आणि दातेगडावर पंतप्रतिनिधींचे लोक राहत असत; व जेव्हां विरुद्ध पक्षाकडील हुकूम सुटत तेव्हां त्यांच्या अमलबजावणीस ते बराच अडथळा करीत. सन १८१८ त हा किल्ला चिनलढाईनें ब्रिटिशांच्या ताब्यांत आला.

**गुणवंताबाई**—पहिल्या छत्रपति शिवाजीची आठवी बायको. ही इंगळे घराण्यांतील असून हिचें लग्न शके १५७९

मध्यें झालें. हिचें नांव सगुणाबाई असें असल्याचें कांहीं ठिकाणीं आहे.

**गुणाढ्य**—एक प्राकृत ग्रंथकार. यानें पैशाच भाषेंत बृहत्कथा-नामक एक ग्रंथ लिहिला. प्रतिष्ठान येथें त्याचा जन्म झाला असें मानण्यांत येतें. शातवाहन राजाचा तो प्रधान होता, अशीहि दंतकथा आहे. गुणाढ्याचा काळ ख्रिस्ती शकाच्या चवथ्या शतकांत झाला असावा. फेलिक्स लँकोतेनें गुणाढ्य व बृहत्कथा यांवर फ्रेंच ग्रंथ लिहिला आहे. आणि त्यांत गुणाढ्य-कथापर नेपाळ माहात्म्यांतील चार अध्याय दिले आहेत. (पॅरिस १९०८). गुणाढ्याच्या बृहत्कथेवरून सोमदेवानें 'कथा-सरित्सागर' व क्षेमेंद्रानें 'बृहत्कथा-मंजरी' लिहिली.

**गुणे, डॉ. गो. कृ.** (१८६१–१९३५)—एक होमिओपाथी वैद्य. हे नगर जिल्ह्यांतील अश्वीचे राहणारे होत. यांचें वैद्यकीय शिक्षण पुण्याच्या मेडिकल स्कूलमध्यें झालें. यांनीं कोल्हापुरांत सरकारी डॉक्टर म्हणून नोकरी पत्करली. कांहीं काळ जेलचे ते मेडिकल ऑफिसर होते.

यांचें निरीक्षण सूक्ष्म, तपासणी अचूक व प्रमुख लक्षणांचें ग्रहण जलद असे. महाराष्ट्रांतील होमिओपाथीच्या इतिहासांत डॉ. गुण्यांचें स्थान फार वरच्या दर्जाचें आहे. त्यांच्या होमिओपाथींतील नैपुण्यामुळें कोल्हापूरच्या राजघराण्याची तर त्यांच्यावर अलोट भक्ति होती, परंतु त्यांच्या खाजगी दवाखान्यांतहि स्थानिक व परगांवचे, गरीब व श्रीमंत, अमीर व उमराव या सर्वांची उपचारासाठीं नेहमीं गर्दी असे. त्यांचें सांसारिक चरित्रहि धीरोदात्त होतें. त्यांची बुद्धि सर्वगामी व मर्मग्राही होती. त्यांचा विनोद व कोट्या मार्मिक, सात्त्विक व उद्बोधक असत. त्यांचा वैद्यकीय व इतर ग्रंथांचा संग्रह फार मोठा होता. डॉ. गुण्यांचीं दोन पुस्तकें प्रसिद्ध आहेत: १ ब्युबॉनिक प्लेगची होमिओपाथिक चिकित्सा, व २ कॉलऱ्याची होमिओपाथिक चिकित्सा. त्यांनीं होमिओपाथीची ५० वर्षें अखंड सेवा केली.

**गुणे, पांडुरंग दामोदर** (१८८२–१९२२)— एक महाराष्ट्रीय भाषापंडित. हे अहमदनगरचे रहिवासी असून, एम्. ए. झाल्यावर फर्ग्युसन कॉलेजांत प्रोफेसर झाले. भाषाशास्त्राचें अध्ययन करण्यासाठीं गुणे कांहीं वर्षें जर्मनींत होते. तेथेंच त्यांना भाषाशास्त्रनैपुण्याबद्दल पीएच्. डी. पदवी मिळाली होती. यांनीं भाषाशास्त्रावर 'ॲन् इन्ट्रोडक्शन टु कॉंपॅरेटिव्ह फायलॉलॉजी' (तौलनिक भाषाशास्त्राची प्रस्तावना) हें इंग्रजी पुस्तक लिहिलें आहे. भांडारकर रीसर्च इन्स्टिट्यूटचे ते एक संस्थापक–चालक होते. अनेक भाषाविषयक लेख व ग्रंथपरीक्षणें त्यांनीं लिहिलीं व 'माझा युरोपचा प्रवास' व 'जर्मनींतील लोक-शिक्षण' हे त्यांचे मराठी ग्रंथ आहेत.

**गुत्त**—इ. स. च्या सहाव्या शतकांत कोंकण प्रांतांत सूर्य-वंशांतील हें घराणें राज्य करीत असे. हें घराणें पाटलीपुत्र येथील मौर्यवंशाची शाखा असावी. गुत्त राजे आपणांस बाराव्या व तेराव्या शतकांत महामंडलेश्वर असें म्हणवून घेत असत. हे चालुक्य राजांचे मांडलिक असून धार व म्हैसूर प्रांतांत राहत असत.

गुत्तांची वंशावळ मागुत्त उर्फ महागुत्त–गुत्त १ ला–मल्ल अथवा मल्लिदेव (इ. स. ११७५)–वीर विक्रमादित्य १ ला, अशी देतां येते.

धारवाड जिल्ह्यांत करजगी तालुक्यामध्यें गुत्त वोळल ही गुत्त राजांची राजधानी असून तिच्या आसपासच्या मुलुखावरच ते राज्य करीत असत.

**गुत्ती**—मद्रास, अनंतपूर जिल्ह्याच्या उत्तरेकडील तालुका. क्षे. फ. ८९६ चौ. मैल. शहरें ३ व खेडीं १४२. गुत्ती हें मुख्य ठिकाण तेथील डोंगरी किल्ल्याबद्दल प्रसिद्ध आहे. दक्षिण व पश्चिम भागीं कापसालायक काळी जमीन आहे. उत्तर व पूर्व-भागीं ती तांबडी व रेताड आहे. या तालुक्यांत फक्त पेन्नार ही एक नदी आहे व तिच्या पाण्याचे पाट काढून शेतीकडे उपयोग केला आहे.

गुत्तीची लो. सं. दहा हजारावर आहे. मध्यभागीं जुना डोंगरी किल्ला आहे. पश्चिमेकडील भाग सर्वांपेक्षां उंच असून नुसत्या खडकाचा आहे. त्यावर चालेकिल्ला आहे. किल्ल्याची उंची समुद्र-सपाटीपासून २,१०५ फूट आहे. पाण्याच्या सांठ्याकरितां खडकांत बरींच टांकीं खोदलीं आहेत. एका कड्याच्या टोंका-वर मुराररावाचा सभामंडप आहे.

किल्ल्यावरील शिलालेखांवरून ११ व्या शतकांत हें महत्त्वाचें ठिकाण होतें असें दिसतें, व विजयनगरच्या घराण्याचा शेवट होईपर्यंत तो मुसलमानांना सर करतां आला नाहीं. १७४६ मध्यें मुरारराव घोरपडे यानें तो दुरुस्त केला. १७७५ मध्यें हैदरनें घेतला. १७९९ मध्यें तो निजामाच्या ताब्यांत गेला व १८०० पासून तो इंग्रजांच्या ताब्यांत होता.

**गुन्हेगार जातींचा कायदा**—(क्रिमिनल ट्राइब्स ॲक्ट). १९२४ सालीं याबाबतचे मागील कायदे एकत्र करून हा नवीन कायदा करण्यांत आला. या कायद्याचा उद्देश असा आहे कीं, जी जात–जमात किंवा वर्ग, अथवा अशा जाती–जमातीचा कांहीं भाग बिनजामिनाचे गुन्हे (नॉनबेलेबल ऑफेन्सेस) म्हणजे भयंकर स्वरूपाचे गुन्हे सतत करतात, असें प्रांतिक

सरकारला खात्रीलायक समजून येईल. त्यांना गुन्हेगार जमात किंवा इसम म्हणून जाहीर करणें, व त्यांच्यावर विशेष निर्बंध घालणें. ज्या जिल्ह्यांत असे गुन्हेगार असतील तेथील डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें अशा इसमांची नोंद करावी व त्यांच्या आंगठ्यांचे ठसे घेऊन ठेवावे. अशा इसमांवर व जातींवर निर्बंध घालण्यांत येतात ते— ( १ ) अशा इसमांनीं ठरवलेल्या वेळीं सरकारी अधिकाऱ्यासमोर हजेरी देणें, ( २ ) आपल्या वसतिस्थानाची माहिती सरकारला कळविणें, ( ३ ) अशा इसमांनीं विशिष्ट ठिकाणींच राहावें व अमुक हद्दीबाहेर जाऊं नये असे निर्बंध घालणें, व त्या ठिकाणीं त्यांच्या पोटापाण्याची सोय लावणें ( कलमें १०–११ ). शिवाय अशा जमातींकरितां औद्योगिक, शेतकीच्या, किंवा इतर सुधारणाकारक वसाहती ( कलम १६), आणि त्यांच्या मुलांकरितां अशाच प्रकारच्या शाळा स्थापणें (कलम १७), या योजना प्रांतिक सरकार करतें. या कायद्याप्रमाणें घातलेले निर्बंध मोडण्याच्या निरनिराळ्या गुन्ह्यांना सहा महिने कैद, किंवा २०० रुपये दंड, आणि कमाल शिक्षा जन्मठेप कैद किंवा काळेपाणी अशा शिक्षा आहेत ( कलमें २१।२२। २३ ). अशा गुन्हेगार जातींची किंवा इसमांची माहिती सरकारला देण्याची जबाबदारी गांवचे पाटील व गांव महार आणि जमीनमालक यांच्यावर आहे.

**गुप्त घराणें**—हें हिंदुस्थानांतील जुनें घराणें इ. स. ३०० ते ६५० पर्यंत उत्तर हिंदुस्थानांत राज्य करीत होतें. या घराण्याचा मूळ पुरुष मगधाचा राजा चंद्रगुप्त यानें पाटलीपुत्र ही आपली राजधानी केली. त्याची राणी लिच्छवी राजवंशांतील होती. चंद्रगुप्ताचा मुलगा समुद्रगुप्त हा इ. स. ३३० त गादीवर आला. त्यानें सुमारें ५० वर्षें फार चांगल्या तऱ्हेनें राज्य केलें व राज्य पुष्कळच वाढविलें. हिमालय ते नर्मदा व चंबळा ते कामरूप ( आसाम ) या मर्यादेंत त्याचें साम्राज्य पसरलें होतें. तत्कालीन सर्व राजे त्याच्या अंकित किंवा मित्रत्वानें होते. तो जसा शूर तसा विद्वानांचा पुरस्कर्ता होता. त्याच्या अमदानींत कलाकौशल्य व व्यापार वाढून मगधांतील शहरें भरभराटलीं. हिंदु धर्माला पुनः तेज चढलें; संस्कृत भाषेचें महत्त्व वाढलें; पूर्व आणि पश्चिम खंडांचा संबंध जास्त जवळ आला. त्याचा मुलगा दुसरा चंद्रगुप्त हाहि बापाप्रमाणेंच होता. यानंतर कुमारगुप्त, स्कंधगुप्त, वगैरे राजे होऊन गेले. पण पुढे साम्राज्य कमी होत जाऊन अखेर आठव्या शतकांत बंगालच्या पालराजांनीं मगधाचें राज्य नष्ट केलें. गुप्तकाल हा हिंदुस्थानचें सुवर्णयुग मानतात. या काळांत अनेक पंडित होऊन गेले; उत्कृष्ट शिल्पाच्या इमारती उठल्या; हिंदुस्थानाबाहेर लोक जाऊं लागले; व जगाशीं संबंध वाढला.

**गुप्त, मैथिलीशरण रामचरण** ( १८८६– )— एक पहिल्या दर्जाचे हिंदी कवि. सुप्रसिद्ध हिंदी कवि सियारामशरण यांचे हे बंधु होत. यांची कविता वाल्मीकि व तुलसीदास यांच्या वळणाची असून तींत त्याग, कर्तव्य व नीतिमत्ता यांचा संदेश देण्याची शक्ति आहे. साधी भाषा, हृदयाला पिळवटून टाकणारे विचार व तळमळ यांमुळे यांचें काव्य प्रत्येकाच्या मनाला चटका लावल्याखेरीज राहत नाहीं. स्वतः जरी गायक नसले तरी काव्य म्हणतांना हे काव्याशीं इतके तन्मय होतात कीं, त्यामुळें श्रोत्यांच्या भावनाहि उचंबळून आल्याशिवाय राहत नाहींत. बदलत्या कालाशीं समरस होण्याची वृत्ति असूनहि यांच्या कवितेवर पाश्चात्य काव्याची छाप पडलेली नाहीं. ती पूर्ण भारतीय वळणाचीच आहे. एक थोर विचारांचा कवि असूनहि वृत्ति व वागणूक साधी आहे. 'साकेत', 'यशोधरा', 'भारतभारती', 'जयद्रथवध' व 'पंचवटी', हीं यांचीं सुप्रसिद्ध काव्यें होत. आपल्या काव्यांत राष्ट्रीय भावनांचा आविष्कारहि हे फार सुंदर रीतीनें करतात.

**गुप्तनिधीचा कायदा**—( इंडियन ट्रेझर ट्रोव्ह ॲक्ट ). हा कायदा १८७८ सालीं करण्यांत आला व नंतर १९०८ व १९१४ सालीं दुरुस्त्या झाल्या. गुप्तनिधि ( भूमिगत द्रव्य ) याचा अर्थ, जमिनींत लपवलेली किंवा पुरून ठेवलेली कोणतीहि मूल्यवान् वस्तु, असा आहे. दहा रुपयांपेक्षां जास्त किंमतीचा गुप्तनिधि ज्याच्या नजरेस पडेल त्यानें ताबडतोब कलेक्टरकडे त्यासंबंधीं पुढील माहिती कळविली पाहिजे— ( अ ) निधीचें स्वरूप व त्याची अंदाजी किंमत; ( ब ) निधि सांपडला ती जागा; ( क ) निधि सांपडला ती तारीख व वेळ. इतकी माहिती देऊन तो निधि नजीकच्या सरकारी खजिन्यांत नेऊन पोंचवला पाहिजे, किंवा कलेक्टर सांगेल तसा जामीन दिला पाहिजे ( कलम ४ ). वरील माहिती मिळाल्यावर कलेक्टर सदर निधीची माहिती व सदर निधीवर कोणाचा हक्क असेल त्यानें चार किंवा सहा महिन्यांच्या आंत कलेक्टरपुढें हजर राहण्याची नोटीस प्रसिद्ध करील. जर सदर जमिनीचा मालक किंवा अन्य इसम नोटिशीप्रमाणें हजर झाला नाहीं तर त्या निधीवरील हक्क बुडाला असें मानण्यांत येईल. कलेक्टर सदर गुप्तनिधि कोणीं पुरून ठेवला होता त्याची चौकशी करील, आणि सदर निधि १०० वर्षांच्या आंत पुरला होता असें आढळून आलें तर तो निधि पुरणारा जो कोणी इसम असेल त्यानें दिवाणी कोर्टांत दावा लावून हक्क शाबीत करण्याला कलेक्टर मुदत देईल. जर कोणीं दावा लावला नाहीं किंवा लावलेला दावा नाशाबीत झाला, तर तो निधि बेवारशी आहे, त्यावर कोणाचा हक्क नाहीं, असें कलेक्टर जाहीर करील ( कलमें ५ ते ९ ). नंतर ज्याला गुप्तनिधि

सांपडला त्या माणसाला आणि जमिनीच्या मालकाला कलेक्टर तो निधि वांटून देईल. जर जमिनीचा मालक नसेल तर कलेक्टर ज्याला गुप्तनिधि सांपडला त्याला तो निधि देईल. गुप्तनिधीवर हक्क सांगणारा इसम असेल तर, व त्याचा हक्क निधि सांपडणाऱ्या माणसाला कबूल असेल तर गुप्तनिधीचा तीन-चतुर्थांश निधी सांपडला त्या माणसाला, आणि एक-चतुर्थांश हक्कदाराला द्यावा. कोर्टांत हक्क शाबीत झाला तर त्याला व ज्याला निधि सांपडला त्याला वरील प्रमाणांत कलेक्टर वांटणी देईल (कलमें १० ते १५). गुप्तनिधींतील कांहीं भाग–जुनीं नाणीं वगैरे— सरकारकडे ठेवावा असें वाटल्यास सरकार ठेवील (कलम १४). सदर कायद्यांतील नियमाचा भंग करील व तो माल छपवील किंवा त्यांत फेरबदल करील तर त्या इसमाला एक वर्ष कैद, किंवा दंड, किंवा दोन्ही शिक्षा होतील (कलम २१).

**गुप्तमतदान**—निवडणुकींमध्यें गुप्तपणें मत नोंदण्याची जी पद्धति तिला म्हणतात. ह्या पद्धतीचा स्वीकार हल्लीं बहुतेक देशांतील कायदे मंडळांचे नगरपालिकेचे व इतर जबाबदार संस्थांचे सभासद निवडतांना करण्यांत येतो. प्राचीन ग्रीक व रोमन राज्यांत ही पद्धति चालू होती. ही पद्धति ब्रिटनमध्यें चालू करण्याबद्दल पुष्कळ वर्षं चळवळ चालू होती. पण १८७२ सालीं ब्रिटनमध्यें पार्लमेंटच्या आणि म्युनिसिपालिट्यांच्या निवडणुकींत ही पद्धति प्रथम अमलांत आली. हीच पद्धति पुढें ब्रिटिश साम्राज्यांतील देशांत सुरू झाली.

**गुप्तलिपि**—गुप्तलिपि किंवा सांकेतिक लिपि आपलें लिहिणें विशिष्ट माणसांखेरीज इतरांना कळूं नये म्हणून योजण्यांत येते. एका वर्णाबद्दल दुसरा वर्ण किंवा चिन्ह घालण्यांत येऊन, किंवा जोड शब्द, आंकडे, वगैरे ठरवून अशी लिपि बनविण्यांत येत असते. सरकारी तारा, टेलिफोन, कांहीं महत्त्वाचीं पत्रें व विशेषतः युद्धकाळांतील लष्करी पत्रव्यवहार अशा लिपीद्वारें होतो. ही लिपि उलगण्याची किल्ली ज्यांत आहे असे सरकारी सांकेतिक लिपिग्रंथ (कोड बुक्स, बी. ए. बी. कोड) तयार केलेले असतात.

जुन्या काळापासून अशा गुप्तभाषेची योजना दिसून येते. महानुभावी ग्रंथ अशा सांकेतिक लिप्यांतून आहेत. फ्रान्सिस बेकननें अशी एक लिपि तयार केलेली होती. हातांच्या बोटांवर मूळाक्षरें बसवून तयार केलेली करपल्लवी भाषा याच प्रकारांत मोडेल. न लिहितां फक्त खुणांनीं आपला आशय जवळच्यास समजाविला जातो. याप्रमाणेंच नेत्रपल्लवीहि एक सांकेतिक भाषाच आहे.

**गुप्तशक**—ह्या शकाचे जे लेख सांपडले आहेत त्यांमध्यें गुप्तकाल, गुप्तवर्ष, इत्यादि प्रकारचे शब्दप्रयोग (भांडारकर कॉमेमोरेशन व्हॉल्यूम, पान २०३ पहा) आढळून येत असल्यामुळें त्याचा प्रवर्तक कोणीतरी गुप्तराजा असला पाहिजे हें उघड आहे. गुप्तवंशांत पहिला चंद्रगुप्त हा मोठा प्रतापी राजा होऊन गेला असावा व त्यानें सिंहासनारूढ झाल्यावर हा शक सुरू केला असावा. गुप्ताच्या मागून काठेवाडांत वलभीचें राज्य उदयास आलें होतें. ह्या राज्याचा अस्त झाल्यावर तेथील लोक गुप्त शकास वलभी शक असें नांव देऊन तो वापरूं लागले असतील असें वाटतें. कारण ज्याच्यामध्यें गुप्त शकाच्याऐवजीं वलभी शक हें नांव घातलें आहे असा काठेवाडांतील सर्वांत जुना लेख म्हणजे वलभी शक ५७४ मधील ऊना गांव येथें मिळालेलें दानपत्र (ए. इं. पु. ९, पा. ६) होय.

अल्बेरुणीनें आपल्या ग्रंथांत शालिवाहन शकांतून सहाचा घन व पांचाचा वर्ग, म्हणजे २४१ वजा केले असतां वलभी किंवा गुप्त शक निघतो असें अगोदर सांगून, पुढें विक्रम संवत् १०८८ मध्यें शालिवाहन शक ९५३ व गुप्त किंवा वलभी शक ७१२ पडतो असें लिहून ठेविलें आहे. गुप्त शकाचा आरंभ चैत्रादि विक्रम संवताची ३७६ किंवा शालिवाहन शकाची २४१ वर्षें उलटून गेल्यावर म्हणजे इ. स. ३१९ मध्यें झाला असला पाहिजे असें यावरून निघतें. अर्थात् चैत्रारंभापासून पुढील ९ महिन्यांत (वस्तुतः डिसेंबरअखेरपर्यंत) गुप्त शकाच्या गत वर्षांमध्यें ३१९ व इतर महिन्यांत ३२० मिळविले असतां इसवी सनाचें वर्ष येईल. ह्या शकाचा वर्षारंभ चैत्र शु. प्रतिपदेपासून होत असे व त्याचे महिने पौर्णिमांत असत (भारतीय प्राचीन लिपिमाला पा. १७५). ह्या शकाचीं बहुधा गतवर्षेंच देत असत. तथापि कधीं कधीं वर्तमान वर्ष दिलेलेंहि आढळून येतें. पूर्वी हा शक उत्तरेस नेपाळपासून दक्षिणेस काठेवाडपर्यंत प्रचलित होता. याचा शेवटचा लेख वलभी शक ९४५ म्हणजे इसवी सन १२६४ मधील आहे.

**गुरखा**—नेपाळांतील एक जात. नेपाळचें राजघराणें गुरखा जातीचेंच आहे. हे लोक स्वतःला रजपूतवंशी समजतात. गोरखनाथ हें नेपाळचें राष्ट्रदैवत आहे. त्या गोरखनाथाचे भक्त ते गुरखे असाहि अर्थ लावतां येईल. हे लोक शैवधर्मी हिंदू आहेत. दिसण्यांत नेपाळांतील इतर जातींपेक्षां गुरखे चांगले असून त्यांच्यांत क्षात्रतेज वास करीत आहे. ते निळे कपडे वापरतात. मांसाहार निषिद्ध नाहीं. विधवाविवाह यांना मान्य नाहीं. लष्करांत बहुतेक शिरत असल्याकारणानें इतर व्यवसाय यांना येत नाहीं. हिंदी लष्करांत गुरख्यांच्या स्वतंत्र पलटणी असतात व शौर्याबद्दल त्यांची ख्याति आहे.

**गुरगांव**—पंजाबमधला एक जिल्हा. क्षेत्रफळ. २,२३४ चौ. मैल. लो. सं. ८,५१,४५८. सामान्यतः ऋतुमान कडक नसतें.

तरी तापाची सांथ नेहमीं असते. पावसाचें मान सामान्यतः २५ इंच आहे. पूर्वी हा भाग यादव व शाही रजपुतांकडे होता. ११९६ पासून दोन शतकांपर्यंत त्यांचा मुसलमानांशीं झगडा चालू असे. पुढें मुसलमानी सत्ता आली. नंतर मराठ्यांचा भगवा झेंडा फडकला. १८०३ मध्यें शिंदे सरकारमार्फत हा सर्व भाग इंग्रजांकडे आला. जिल्ह्यांत ५ तालुके आहेत. ७ शहरें व १,१८० खेडीं आहेत. भाषा हिंदुस्थानी, मेवाडी, व्रज या चालतात. यमुनेच्या दोन्ही बाजूंनीं जमीन चांगली आहे. मिठाच्या खाणी बऱ्याच जुन्या आहेत व पुरवठाहि बराच होतो. सुलतानपुरी मीठ प्रसिद्ध आहे. सोरा, अभ्रक, लोखंड, तांबें, वगैरे धातूंच्या खाणी आहेत. डोंगरी प्रवाहाच्या रेतींत सोनें सांपडतें. रेवारी येथें पाटीचे दगड सांपडतात. व्यापाराचें मुख्य ठिकाण रेवारी आहे. राजपुताना व उत्तर हिंदुस्थान यांच्याशीं व्यापार चालतो. शिक्षणाच्या बाबतींत प्रांतांतील जिल्ह्यांत या जिल्ह्याला शेवटचेंच स्थान मिळेल. गुरगांव हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे.

**गुरव**—महाराष्ट्रांतील एक जात. मूळची शंकराची सेवा करणारी ही जात असून पुढें वाजंत्री इ. वाद्यांचें वादन या जातींतील कांहींनीं घेतलें व त्यामुळें जातीला हीन दर्जा प्राप्त झाला. आतां कांहीं गुरव मंडळी आपणास शैवब्राह्मण असें म्हणवून जातीची उन्नति करण्यास झटत आहेत. मुंबई इलाखा (१९११) ६,५,५३८, वऱ्हाड १४,००० व हैद्राबाद संस्थान १७,५२२ याप्रमाणें यांची लोकसंख्या आहे. यांच्यांत अहीर, जैन, लिंगायत व इतर हलक्या वर्गांतील लोक शिरून बऱ्याच पोटजाती बनल्या आहेत. सामान्यतः वऱ्हाडाकडील गुरवसमाज पुढारलेला आहे. शैवब्राह्मणपरिषदा, शैवसमाचार पत्र, इ.च्या द्वारें समाजाला शिक्षित करण्याचा प्रयत्न होत आहे.

**गुरु**—धार्मिक आणि आध्यात्मिक ज्ञान देणारा इतक्याच अर्थानें गुरु संज्ञेचें येथें विवेचन केलें आहे. वेदांच्या संहिता तयार झाल्यावर त्यांचा अभ्यास करवून घेण्यासाठीं आचार्यांची आवश्यकता उत्पन्न झाली. अंगिरस, गर्ग, अत्रि, बृहस्पति, इ. वैदिक कालांतील गुरूंचीं नांवें सांगतां येतील. जनक, याज्ञवल्क्य, जैमिनी यांचीं नांवें अध्यात्मविद्येच्या अध्यापकांत देतां येतील. या वेळेपासून गुरुशिष्यपरंपरा सांगण्याची प्रथा पडली. 'अमक्या गुरूचा मी शिष्य' असें प्रत्येक विद्यार्थी मोठ्या अभिमानानें सांगतांना दिसतो. जेव्हां वेदांगें आणि दर्शनें यांचा अभ्यास सुरू झाला तेव्हां तर गुरुकुलेंच जागजागीं स्थापन झालीं. महाभारतांत गुरुगृहाच्या संघटनेविषयीं बरेंच विवेचन आहे. पारमार्थिक उन्नतीसाठीं जेव्हां संप्रदाय तयार झाले तेव्हां तर गुरुसंस्था अत्यावश्यक बनली. गुरुमुखाशिवाय विद्या नाहीं, गति नाहीं असा समाजाचा दृढ ग्रह होऊन बसला. यामुळें जैनालिंगायतादि संप्रदायांतून गुरूंचें फार स्तोम माजलें. वल्लभादि वैष्णव पंथांतून तर मूळची उच्च भूमिका सुटून अनाचाराला फार वाव मिळाला.

आज उपनयनविधींत गुरूचें महत्त्व मंत्रोपदेशाच्या वेळीं दिसून येतें. पूर्वीची विद्या गुरुगृहीं होत असे ती आतां शाळांतून होते. शिक्षणविषयाप्रमाणेंच गुरुजनामध्येंहि फार फरक पडला आहे.

**गुरु (ग्रह)**—सूर्यमालेंतील हा सर्वांत मोठा ग्रह असून सूर्यापासून अंतरानें पांचवा आहे. हा पृथ्वीपेक्षां १३०० पट मोठा असला तरी वजनांत ३१८ पटच भारी आहे. याच्या कक्षेशीं विषुववृत्त सुमारें ३° अंशांचा कोन करतें. याच्याभोंवतीं नऊ चंद्र फिरतात; पैकीं चार मोठे असून ते गॅलिलिओनें शोधून काढिले. हा सूर्याभोंवतीं १२ वर्षांत फिरतो. याला सूर्यप्रकाश पृथ्वीपेक्षां फार कमी मिळत असूनहि हा फार तेजस्वी दिसतो. यावरून हा थोडा स्वयंप्रकाशी असावा असें मानतात. याच्यावर ढगांचें वातावरण असावें.

फलज्योतिषांत या शुभ ग्रहाला फार महत्त्व आहे. जन्मराशीपासून गुरु दुसरा, पांचवा, सातवा, नववा व अकरावा असेल तर शुभ फल देतो असें मानतात.

**गुरुकुल**—आर्यसमाजपंथी लोकांची गुरुकुल ही एक शिक्षणसंस्था आहे. कनखलपासून ह्या संस्थेचें ठिकाण तीन मैलांवर आहे. लाहोरच्या ॲंग्लोवैदिक दयानंदसरस्वती कॉलेजच्या चालकांत व दुसऱ्या कांहीं समाजपंथी लोकांत मतभेद होऊन ही संस्था अस्तित्वांत आली. त्या संस्थेचे आद्य चालक स्वामी श्रद्धानंद हे होते. ह्यांनीं आपली तीस-पस्तीस हजार रुपयांची मालमत्ता संस्थेप्रीत्यर्थ देऊन या संस्थेचा पाया घातला. हल्लीं ही संस्था पंजाबच्या आर्यप्रतिनिधि सभेच्या ताब्यांत आहे.

गुरुकुल विद्यालय ही शिक्षणसंस्था मुख्यतः वेद व संस्कृत भाषेच्या अध्ययनाकरितां आहे. तरी पण तेथें इंग्रजी वाङ्मय, अर्वाचीन शास्त्रें व तत्त्वज्ञान ह्यांचें शिक्षण दिलें जातें.

**गुरु गोविंदसिंग** (१६६५–१७०७)—शिखांचा दहावा गुरु. तेघबहादूरनंतर त्याचा मुलगा गुरु गोविंद हा गुरुपदावर आरूढ झाला. हा धोरणी व चलाख असून त्याच्या वेळेपासून शिखांच्या पंथांत नवीन मन्वंतर सुरू झालें. गुरु गोविंद हा उत्कृष्ट उपदेशक कवि व शूर योद्धा होता. त्यानें लष्करी पद्धतीवर शिखांचें एक नवीन प्रजासत्ताक मंडळच स्थापिलें असें म्हटलें तरी चालेल. आजतागाईत शिखांची शौर्याबद्दल जी ख्याति आहे, तिचा उत्पादक हा गुरु गोविंद होय. आदिग्रंथाचा 'दसम पादशाही' नांवाचा भाग गुरु गोविंदसिंगाचा असून

जहाल शीख या भागाला विशेष मानतात. 'गुरुमता' नांवाचें एक शीख सरदारांचें मंडळ गुरु गोविंदानें स्थापिलें. औरंगजेबाच्या लष्कराशीं लढतांना गुरु गोविंद अगदीं टेकीस आला. अखेरीस मोंगल फौजेनें गुरु गोविंदाचीं सर्व ठाणीं घेतलीं आणि नानाप्रकारें छळ करून त्याच्या पक्षाची वाताहत करून टाकिली. तेव्हां हा रानोमाळ भटकत फिरूं लागला असतां शेवटीं नांदेड येथें त्याच्या एका शत्रूनें त्याचा खून केला. नांदेड येथें याची समाधि गुरुद्वार नांवानें प्रसिद्ध आहे. व शिखांचें हें एक यात्रेचें ठिकाण आहे.

**गुरुचरित्र**—महाराष्ट्रांत अत्यंत पूज्य मानलेला आणि पाठांतरांत असलेला हा मराठींतला पुराणग्रंथ सरस्वती गंगाधर नांवाच्या कवीनें केलेला आहे. यांत नरसिंह सरस्वती (पाहा) या १४ व्या शतकांत होऊन गेलेल्या एका स्वामींचें चरित्र आहे. या स्वामींचें गाणगापुरीं वास्तव्य असतांना तेथें त्यांनीं केलेले चमत्कार यांत वर्णिले आहेत. स्वामींचा समाधिकाल माघ कृ. १ शके १३८० हा आहे. त्यांचा शिष्य सायंदेव. याच्यापासून सरस्वती गंगाधराची पांचवी पिढी येते. सिद्धमुनीनें नामधारकाला सांगितलेलें गुरुचरित्र सरस्वती गंगाधरानें मराठी भाषेंत विस्तारानें लिहिलें. याची भाषा फार रसाळ व सुबोध आहे. हा ग्रंथ शके १४४० ते १४७० च्या दरम्यान लिहिला गेला असावा. गुरुचरित्रांत तत्कालीन परिस्थितीचें चित्र चांगलें वठलें आहे. यांत मुख्यतः ब्राह्मणांच्या आचारधर्माचें विस्तृत विवेचन आहे. गाणगापूर गांवची माहिती यावरून कळते. त्या वेळीं यवनांचा जुलूम बराच जाणवत होता. दत्तभक्त मंडळी या ग्रंथाचें पाठांतर च सतें करतात.

**गुरुत्वाकर्षण**—(ग्रॅव्हिटेशन). सर्व विश्वांतील वस्तू आणि द्रव्यकण परस्परांस ज्या शक्तीच्या योगानें आकर्षण करीत असतात तीस गुरुत्वाकर्षण असें म्हणतात. गुरुत्वाकर्षणाचा नियम प्रथम न्यूटन यानें शोधून काढला. तो असा कीं, कोणत्याहि दोन वस्तू त्यांच्यामध्यें असलेल्या द्रव्यांच्या गुणाकाराच्या सरल प्रमाणांत आणि त्यांमधील अंतराच्या वर्गाच्या व्यस्त प्रमाणांत परस्परांस आकर्षित असतात. केप्लर यानें आकाशांतील ग्रह सूर्याभोंवतीं ज्या मानानें फिरतात त्यावरून वेध घेऊन हे नियम प्रथम नमूद केले होते. या नियमांवरून न्यूटननें ग्रहांमध्यें असलेल्या शक्तीचे नियम शोधून काढले व त्यावरून ज्या शक्तीमुळें चंद्र आपल्या कक्षेमध्यें पृथ्वीभोंवतीं फिरत राहतो ती शक्ति आणि पृथ्वीच्या पृष्ठभागाजवळ असलेल्या वस्तू पृथ्वीकडे ज्या शक्तीनें आकर्षिल्या जातात ती, या दोन शक्तींतील साम्य दाखवून त्यानें सर्वसाधारण गुरुत्वाकर्षणाचे नियम बसविले.

सु. वि. भा. २–२८

**गुरुदासपूर**—पंजाबांतील एक जिल्हा. क्षे. फ. १८४६ चौ. मै.. जिल्हा बहुतेक ओसाड आहे. जिल्ह्यांत १० शहरें व २२३४ खेडीं आहेत. लो. सं. ११,५३,५११. गहूं, हरभरा, तांदूळ व मका हीं मुख्य पिकें आहेत. जिल्ह्यांतून आगगाडीचा फांटा जातो. रावी व बियास नद्यांतून नावा चालतात. धारिवाल हें लोंकरीच्या कापडासाठीं प्रसिद्ध आहे. सतरंज्या, गालिचे, जिनें, इ. मालहि होतो. बटाला हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. रावीच्या कांठीं जुनीं लेणीं आहेत. पठाणकोट येथें पूर्वी हिंदुराज्य होतें. अकबरानें सूर घराण्यापासून हा भाग घेतला. शिखांच्या मोंगलांशीं कांहीं लढाया याच भागांत झाल्या. अदीनाबेग हा या भागाचा सुभेदार होता. त्याच्या नंतर शीख लोकांचें यावर वर्चस्व झालें. १८४९ मध्यें सर्व जिल्हा इंग्रजांकडे आला.

गुरुदासपूर हें जिल्हा आणि तालुका यांचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. सुमारें आठ हजार. येथील किल्ला बंदा यानें बांधला. बटाला हें व्यापारी केंद्र झाल्यामुळें याचें महत्त्व कमी झालें. या ठिकाणीं सारस्वत ब्राह्मणांचा एक मठ आहे.

**गुरुमुखी**—एक लिपि. पंजाबच्या सामान्य व सुशिक्षित लोकांमध्यें पूर्वीं लंडा नांवाची एक महाजनी लिपि प्रचलित होती. या लिपींत स्वरचिन्हें नव्हतीं. अद्यापहि कोठें कोठें तीं वापरीत नाहींत. असें म्हणतात कीं, शीख लोकांचे धर्मग्रंथ याच लिपींत लिहिले जात असत व म्हणून ते शुद्ध रीतीनें वाचतां येत नसत. ही अडचण दूर करण्याकरितां गुरु अंगद (१५३८–५२) यानें आपले धर्मग्रंथ शुद्ध लिहिले जावे म्हणून नागरीप्रमाणें एक स्वरचिन्हयुक्त लिपि तयार केली. ही लिपि गुरूच्या मुखांतून निघाली म्हणून हिला गुरुमुखी असें नांव पडलें. हिचीं बहुतेक अक्षरें तत्कालीन शारदा लिपींतून घेतलीं होतीं.

**गुरेंढोरें**—गो वर्गांतील रवंथ करणाऱ्या प्राण्यांस सामान्यतः

वशिंड व पोळी असलेला हिंदी बैल

हा शब्द लावण्यांत येतो. या वर्गांत गाई–बैलांप्रमाणें शेळ्या–मेंढ्या, नीलगाय, वगैरेहि येतात. आशियामधील गाई–बैलांस वशिंड असतें. परंतु युरोपांतील अशा प्राण्यांस नसतें. यांच्या देशपरत्वें व प्रांतपरत्वें अनेक जाती आढळतात. हिंदुस्थानांत गुरें पाळण्याचा मोठा धंदा असून गाई–बैलांच्या अनेक जाती प्रसिद्ध आहेत. त्या खालीलप्रमाणें:—

| | जातींचें नांव | स्थान | उपयोग |
|---|---|---|---|
| १ | सिंधी | सिंध | दुभतें–वाहतूक |
| २ | माळवी | मध्य हिंदुस्थान | वाहतूक |
| ३ | गीर | काठेवाड | दुभतें |
| ४ | कांक्रेज | गुजराथ | मुख्यतः वाहतूक |
| ५ | कृष्णा खोरें | दक्षिण महाराष्ट्र | वाहतूक |
| ६ | नेलोर ( अंबोले ) | मद्रास | दुभतें |
| ७ | कैलण | मध्यप्रांत | वाहतूक |
| ८ | दक्षिणी | दख्खन | वाहतूक |
| ९ | मॉंटगॉमेरी | पंजाब | दुभतें |
| १० | शाहीवल | पंजाब | दुभतें |
| ११ | हिसार | हंसी, हिसार, रोहटक | वाहतूक |
| १२ | थरपारकर | सिंध | वाहतूक |
| १३ | नागोर | राजपुताना | वाहतूक |
| १४ | कोसई | मथुरा | दुभतें |
| १५ | अमृतमहाल | म्हैसूर | दुभतें–वाहतूक |
| १६ | धानी | पंजाब ( रावळपिंडी ) | दुभतें–वाहतूक |

१९३० च्या खानेसुमारीच्या आंकड्याप्रमाणें हिंदुस्थानांत

| | | |
|---|---|---|
| ब्रिटिश हिंदुस्थान | ... | १५,४६,२९,०९७ |
| संस्थानी ,, | ... | ४,३२,०७,१३९ |
| | | १९,७८,३६,२३६ |

इतकीं गुरें होतीं. सर्व जगांत एकूण ३७,५५,५५,२३६ गुरें आहेत. म्हणजे हिंदुस्थान हा जगाचा $\frac{1}{6}$ भाग असून त्यांतील गुरें मात्र निम्म्याच्यावर आहेत. तरी पण या कोट्यवधि गुरांपासून उत्पन्न फारच कमी आहे.

ब्रि. हिंदुस्थानांत ४,५७,९३,६२५ मोठे बैल व ३,७८,८५,६८६ मोठ्या गायी होत्या. यांपैकीं शेंकडा ९० बैल शेतीच्या उपयोगी धरले व बैलांचें आयुर्मान ९ वर्षें धरलें तर ब्रि. हिंदुस्थानला आणखी ४५,७९,३६२ बैलांची जरूरी दरसाल शेतीच्या कामासाठीं आहे. या बैलांच्या निपजेसाठीं १४,००,००० गायी पाहिजेत. आज सुमारें अडीच कोटी गायी प्रजोत्पादनाला निकामी आहेत. तेव्हां उरलेल्या गायींची नीट निगा राखिली तर गुरांच्या या मोठ्या संख्येचें कांहीं वाटणार नाहीं.

हिंदुस्थानांतील गुरांना सुमारें शंभर कोटी रुपये खर्च येतो व त्यापैकीं शेंकडा ७० खर्च अनुत्पादक जनावरांवर होतो. एकूण उत्पन्न २३० कोटी रुपये आहे, व त्यांतील ६० कोटी दूध-दुभत्याचें, ९० कोटी वाहातूक आणि इतर कामाच्या जनावरांचें व ८० कोटी शेत-धान्याचें उत्पन्न आहे.

रानटी 'गौर' बैल

आज हिंदुस्थानांत २१ कोटी ५० लक्ष पशुधन आहे. यापैकीं म्हशींची संख्या ५ कोटी आहे. देशांत वर्षाला ७५ कोटी मण दूध लागतें. त्यापैकीं ३$\frac{1}{2}$ कोटी म्हशींचें असतें.

म्हशींची सरासरी दुग्धदायिता सालिना ६३५ शेर, तर गायींची २६२ शेर असते.

हिंदुस्थानांत निम्म्यापेक्षां अधिक दुधाचा उपयोग तूप करण्याकडे होतो. म्हशींचें दूध तुपाला जास्त उपयोगी पडतें. (दूध, गाय, म्हैस, इ. पाहा).

**गुर्जर भक्त**— एक गुजराथी संतकवि. हा नामदेवाचा गुजराथेंतील अनुयायी होता. नामदेवानें या आपल्या शिष्यास भक्तिज्ञानाचें बोधामृत मुक्तहस्तानें दिलें. गुर्जर भक्तानेंहि नामदेवाचीं स्तुतिस्तोत्रें गाऊन स्वतःस कृतार्थ मानून घेतलें.

**गुर्जर, शिवव्यास** ( सु. १४०३ )—एक महानुभावी ग्रंथकार. चक्रधर संप्रदायांतील हा सहावा पुरुष असून कवीश्वर आम्नायांतील अचळ मुरारींचा शिष्य होता. याचें पूर्वाश्रमींचें नांव शिवपाळ असें होतें. गुजराथेंतून हा पैठणास आला. यानें बरीच सांप्रदायिक व धार्मिक रचना केली आहे.

**गुर्नार्ड**—हे एका जातीचे शरीरांत कांटेदार कल्ले असलेले मासे आहेत. हे तांबड्या व पांढर्‍या रंगाचे असतात. भूमध्य समुद्र, अटलांटिक महासागर व हिंदी समुद्र यांतून यांची एक उडणारी जात आढळते.

**गुर्रमकोंडा**—मद्रास, कडाप्पा जिल्ह्यांतला एक जुना किल्ला. हा गोंवळकोंड्याच्या सुलतानांनीं बांधला असावा. हा त्या वेळीं

महत्त्वाचा व मजबूत होता. ५०० फूट उंचीच्या टेंकडीवर हा बांधला आहे. याच्या तीन बाजू सरळ उंच आहेत व चवथ्या बाजूला तट व बुरूज वगैरेंचा बंदोबस्त आहे. खालीं सपाटीवर जुन्या राजाचा वाडा आहे. त्याचा आज सरकारी अधिकाऱ्यांकरितां डाकबंगला म्हणून उपयोग होतो.

हा किल्ला कर्नाटक बालाघाटचें प्रथम मुख्य ठिकाण होतें. १७६६ मध्यें मीरसाहेब याला मराठ्यांकडून जहागीर म्हणून हा मिळाला. हा मीर हैदर अल्लीचा मेव्हणा होता. १७९१ मध्यें हा किल्ला निजामानें घेतला व १८०० मध्यें कडाप्पा जिरप्पाबरोबर इंग्रजांच्या हवालीं केला.

**गुलकंद**—हा लेह गुलाबाच्या पाकळ्या व खडीसाखर यांपासून करतात. कडकी व उष्णता यांवरील हें औषध सुप्रसिद्ध आहे. उन्हामुळें डोकें दुखणें, हातापायांची व डोळ्यांची आग होणें, शौचाला खडा होणें, लघवीची आग होणें, डोळे वारंवार येणें, तोंड येणें इत्यादि उष्णताजन्य विकारांवर याचा विशेष उपयोग होतो. प्रवाळयुक्त गुलकंद जास्त शीतवीर्य आहे व त्याचा गुण जास्त वेळ टिकतो. उन्हाळ्यामध्यें हें औषध नेहमीं वापरण्यासारखें आहे. अनुपान म्हणूनहि गुलकंद वापरतात.

**गुलछबू**—एक फुलझाड. याला निशिगंध असेंहि नांव आहे. या झाडाला पाती येतात व त्यांतून एक दांडा वर निघून त्याला फूल येतें. वळावर याची मुळी दुर्वांच्या रसांत उगाळून लावतात.

**गुलझारखान**—थोरल्या बाजीरावाच्या फौजेंतील मीरखानाचा हा मुलगा राघोबादादाचा साहाय्यक होता. सन १७८२ त दादा कोपरगांवीं येईपर्यंत यानें चोपडयाची गढी येथें व इतर ठिकाणीं पुंडाई माजवली. तेव्हां नानानें आठवले, शिंदे यांच्याकडून यास पळवून लावलें. पुढें याचे एकेक बंडखोर हस्तक कमी झाले तसा यानें पुणेंकर कारभाऱ्यांशीं मिळतें घेऊन आपला बचाव केला. पुढें हा निजामशाहींत गेला. परंतु सन १७८४ त पेशव्यांच्या नोकरींत येण्यासाठीं हा प्रयत्न करीतच होता.

**गुलतुरा**—एक फुलझाड. याचें लांकूड फार बळकट असून त्याचे जात्याकरितां खुंटे तयार करतात. याचीं पानें रानतरवडाच्या पानासारखीं असून यास पिवळ्या किंवा तांबडया रंगाचीं झुबकेदार फुलें येतात. त्यास शंकराचीं फुलें म्हणतात. या झाडास शंकेश्वर, संकासूर, रासतुरा, कुंकुमकेशर, असेंहि म्हणतात.

**गुलबर्गा**— हैद्राबाद संस्थान, एक विभाग. याला दक्षिण विभाग असें नांव आहे. क्षे. फ. २२,११० चौ. मैल. लो. सं. सुमारें चाळीस लाख. शें. ८८ हिंदू आहेत. गुलबर्गा, उस्मानाबाद, रायचूर व बेदर हे चार जिल्हे या विभागांत आहेत. गुलबर्गा जिल्ह्याचें क्षे. फ. ६,७१९ चौ. मैल. लो. सं. सु. बारा लाख. शें. ५८ लोक शेतकीवर राहतात. कानडी भागांत कापूस पिकतो व तैलंगणी भागांत भात पिकतें. तथापि मुख्य पीक ज्वारी आहे. शेंकडा ५२ कानडी, २५ तेलगू, १४ ऊर्दू व ६ मराठी भाषा बोलतात. पूर्वी हा जिल्हा वरंगळच्या काकतीयांच्याकडे होता. तो १४ व्या शतकांत महंमद तुघलक याच्या ताब्यात गेला. नंतर बहामनी, आदिलशाही व मोंगली सत्ता आली. हैद्राबाद संस्थान निराळें झालें तेव्हां त्यांत हा भाग समाविष्ट झाला.

गुलबर्गा ही बहामनी राजांची राजधानी होती. याचें नांव त्यापूर्वी कुलबुर्गा असें असे. फिरोज बहामनीनें बांधलेल्या सुंदर इमारती पुष्कळ दिसतात. एक मशीद तर फारच मोठी आहे. हें व्यापाराचें मोठें ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे. येथें कांहीं गिरण्या, शाळा व एक कॉलेज आहे. येथील किल्ला पूर्वी लष्करीदृष्टया महत्त्वाचा होता. लो. सं. ५२,५५१.

**गुलबाशी**—हें एक लहान फुलझाड आहे. त्याच्या मुळाच्या बाजूस एक कांदा होतो व त्यापासून किंवा बियांपासून झाडाची उत्पत्ति होते. हीस 'सायंकाळी' असेंहि म्हणतात. या झाडाचीं पानें लांबट व मृदु असतात. गुलबाशींत पांढरी, गुलाबी, पिवळी, तांबडी, केशरी, वगैरे अनेक रंगाचीं फुलें येणाऱ्या जाती आहेत. यांचीं पानें तूप लावून शेकून गळवावर बांधल्यानें गळूं फुटून बरें होतें. याचा कांदा धातुक्षयावर देतात.

**गुलाब**—या झाडावरून एका मोठ्या वनस्पतिवर्गास नांव मिळालें आहे. हें उत्तर गोलार्धांतलि सामान्यतः थंड प्रदेशांत होतें. या झाडास कांटे असतात व याच्या पुष्पमुकुटास पांच पांकळ्या असतात. यांत अनेक पुंकेसर असतात. याच्या फळांत अनेक बिया असतात व त्यांभोवतीं एक प्रकारची लव असते आणि त्या पुष्पकोशाच्या नलिकेच्या आंतल्या अंगास चिकटलेल्या असतात. या पुष्पकोशाचें फूल उमलून गेल्यावर एक वाटोळें लांबट बोरासारखें फळ बनतें.

हें सरळ वाढणारें अथवा वेलीप्रमाणें वर वाढणारें झुडुप असून याच्या वेगळ्या तीस जाती आहेत. देशी भाषेंत सर्वांनाच गुलाब म्हणतात. फुलांत अनेक रंग असतात.

बाबरानें गुलाबाची लागवड करून त्यांत सुधारणा करण्याची संधि केव्हांहि दवडली नाहीं. जहांगीर बादशाहाच्या वेळेस हिंदुस्थानांत सर्व तऱ्हेचे गुलाब असून त्यांतल्या त्यांत कस्तुरी व दमास्क गुलाब हे प्रसिद्ध होते. शतपर्ण हा एक कोबीच्या आकाराचें फूल देणारा गुलाब आहे. तो मूळ कॉकेशसमधील व असीरियांतील होय. परंतु बऱ्याच प्राचीन काला-

पासून हा हिंदुस्थानांत लावतात. या गुलाबापासून इराणमध्यें अत्तर व गुलाबपाणी करतात. परंतु हिंदुस्थानांत दमास्क गुलाबाचाच या कामीं जास्त उपयोग होतो.

**गुलाबवर्ग**—( रोझासीई ). हा एक बहुपुष्पपर्णी ( मुक्तदलपुष्पी ) द्विदल वनस्पतींचा मोठा वर्ग आहे. गुलाब हें यांतील एक विशिष्ट झाड होय. यामध्यें स्वतंत्र वेगवेगळ्या कर्णिका किंवा स्त्रीकेसर दलें असतात. तसेंच स्त्रीकेसर परिवेष्ठित असे अनेक पुंकेसर असतात. आणि यांचीं पानें एकाआड एक अशीं असतात. उत्तर गोलार्धांतच बहुधा या गुलाबजाती होतात. सफरचंद, पीअर, प्लम, चेरी, पीच, बदाम, आप्रिकॉट, रासबेरी, स्ट्रॉबेरी, वगैरे फळें या कुलांतीलच होत.

**गुलाबयुद्ध**—( वॉर ऑफ दि रोझेस ). इंग्लंडच्या इतिहासांत गादीसाठीं लँकॅस्टर व यॉर्क या दोन राजघराण्यांत जें युद्ध ( १४५५–१४८५ ) झालें त्यास म्हणतात. लँकॅस्टर घराण्याचें चिन्ह तांबडा गुलाब व यॉर्क घराण्याचें चिन्ह पांढरा गुलाब होतें. त्यावरून गुलाबयुद्ध हें नांव पडलें.

**गुलाबराव महाराज** ( १८८१–१९१५ )—एक सुप्रसिद्ध अंधकवि व साधुपुरुष. यांचें आडनांव मोहोड. वंशपरंपरेनें हे माधान गांवचे पाटील होते. हे नऊ महिन्यांचे असतांनाच डोळे आल्याचें निमित्त होऊन यांची दृष्टि गेली ती कायमचीच. यांच्या वयाच्या चौथ्या वर्षीच यांची आई वारल्यानें यांच्या आजीनें यांना लहानाचें मोठें केलें.

शके १८२४ मध्यें ज्ञानेश्वरमहाराजांनीं स्वप्नांत दर्शन देऊन वैदिक धर्माचा व कृष्णभक्तीचा उपदेश करण्याची यांना अनुज्ञा दिली असें म्हणतात; व तेव्हांपासून 'ज्ञानेश्वर कन्या' व 'श्रीकृष्णपत्नी' अशीं नांवें धारण करून हे मंगळसूत्र, वेणी, कुंकू, वगैरे स्त्री-सौभाग्यचिन्हें धारण करूं लागले.

यांचें आचरण श्रौतपरंपरेस धरून व अत्यंत शुद्ध असे. सांख्य, योग, वेदान्त यांसारख्या गहन विषयांचें ज्ञान यांना ज्ञानेश्वरांचा अनुग्रह झाल्यानंतर झालें व या ज्ञानाचें दान यांनीं लोकांना सढळ हातानें केलें. हे हरिहरोपासक असून मधुराद्वैताचे पुरस्कर्ते व मधुराद्वैतदर्शनाचे आचार्य होत. जगांतील सर्व धर्मशास्त्रविषयक विचार यांना अवगत होते. यांच्या बुद्धीविषयीं लोकांस मोठा चमत्कार वाटे व त्यामुळें लोक त्यांना ईश्वरी अंश मानीत. यांची मोठी शिष्यशाखा आहे.

आपल्या अलौकिक स्फूर्तीनें यांनीं हजारों अभंग, ओंव्या, पदें, लावण्या, श्लोक व ग्रंथ यांसारखें लिखाण केलें. मराठी, संस्कृत व हिंदी या तिन्ही भाषांत यांचें लिखाण आहे. 'संप्रदायसुरतरु' हा ग्रंथ, तसेंच पत्रव्यवहार, व्यवहारधर्मबोध, अभंगगाथा, भागवत-रहस्य, पदांच्या गाथा, वगैरे यांचें लिखाण प्रसिद्ध आहे.

**गुलाबी लांकूड**—हें शिंबीवर्गांतील एका झाडाचें ( डालबर्गिआ निग्रा या किंवा या जातीच्या कांहीं प्रकारच्या झाडांचें ) लांकूड आहे. याला गुलाबी लांकूड हें नांव पडण्याचें कारण असें कीं, हें तोडलें असतां ताजेपणीं त्यास किंचित् गुलाबासारखा वास येतो.

**गुलाम कादर**—एक मोंगल सरदार. हा नजीबउद्दौल्याचा पुत्र झाबिताखान याचा मुलगा. याला बादशहानें कांहीं गुन्ह्यासाठीं नपुंसक बनविलें होतें. शिंद्यांच्या व यांच्यामधील हाडवैर वंशपरंपरेनें चालत आलेलें होतें. सन १७८७ मध्यें जयपुर-प्रकरणांत महादजीचा मोड झालेला पाहतांच यानें दिल्ली येथील मराठ्यांच्या शिबंदीस हांकून लाविलें, व तिच्या जागीं आपले लोक ठेविले. शिंद्यांचा सरदार राणेखान यानें शीख व जाट यांना कादरच्या जहागिरी मुलखांत धुमाकूळ घालण्यास पाठविलें. दिल्लीस दोन महिनेपर्यंत गुलाम कादरानें अनन्वित अत्याचार केले. त्यानें शहालम बादशहाजवळून होता नव्हता तेवढा सर्व पैसा लुबाडून घेतला, त्याची नानाप्रकारें विटंबना केली, त्याला पदच्युत केलें, व शेवटीं त्याचे डोळेहि काढले ( १७८८ ). तसेंच बादशहाच्या बेगमा, मुली व मुलें व त्याचे दुसरे नातेवाईक यांची देखील त्यानें विटंबना केली. सरतेशेवटीं त्यांची सुटका करण्याकरितां मराठ्यांचें सैन्य दिल्लीस आलें. मराठ्यांनीं कादराला पकडून त्याचे हात, पाय, नाक, कान, इत्यादि अवयव छाटून त्याला दिल्लींत बादशहाकडे पाठविला, परंतु तो वाटेंतच मरण पावला. त्याचें थडगें आग्रा जिल्ह्यांतील औल गांवीं आहे.

**गुलामगिरी व गुलामांचा व्यापार**—गुलामगिरीची चाल स्वाभाविकपणें फार प्राचीन काळापासून चालत आली आहे. ग्रीक आणि रोमन साम्राज्यांत गुलाम होते, पण त्यांना पुष्कळ माणुसकीनें वागविलें जाई व स्वतंत्र होण्याचीहि संधि देत. लढायांतील कैदी, ऋणको, अनाथ, इ. ची भरती या गुलामवर्गांत होई. जग जसजसें सुधारत चाललें तसतसें प्रत्यक्ष गुलाम म्हणून वर्ग नाहींसा होत चालला. तथापि वेगवेगळ्या प्रकारची सेवा करणाऱ्या नोकरवर्गांत गुलामांचा अंतर्भाव झालेला दिसतो, व अद्यापि मुसलमानी राज्यांतून गुलाम म्हणून हीन दर्जाचा वर्ग टिकून आहेच. तसेंच इतरत्र कोठें कोठें तो दिसेल.

अमेरिका खंडाचा शोध लागल्यापासून युरोपियन राष्ट्रांनीं आफ्रिकेंतील नीग्रो लोकांना विकत घेऊन किंवा धरून नेऊन अमेरिकेंत आपल्या फायद्यासाठीं त्यांना हवें तसें राबविण्यास

सुरुवात केली. गुलामांचा व्यापार हा दर्यावर्दी व्यापाराचा मुख्य भाग त्या वेळीं होऊन बसला होता. या गुलामांचा छळ अतोनात होई.

हिंदुस्थानांतहि गुलामांचा व्यापार फार पूर्वीपासून चालत होता. गुलाम दुसरीकडून इकडे आणीत व इकडून दुसरीकडे नेत असत. महाराष्ट्रांत गुलामांचा व्यापार किती असे, हें नक्की सांगतां येत नाहीं. मुंबईतील इंग्रजांच्या गुलामांच्या व्यापारासंबंधानें थोडी माहिती येणेंप्रमाणें आढळते।—

इ. स. १६७७—ईस्ट इंडियाचे तीन गुलाम सेंट हेलेना येथें पाठवून द्यावे म्हणून ता. १६ फेब्रुआरी १६७७ च्या पत्रांत उल्लेख आहे.

इ. स. १६८३— इंग्लंडच्या राजाकरितां गुलाम एक पुरुष व दोन बायका जितक्या ठेंगण्या सांपडतील तितक्या राजानें मागविल्या. मुलाचें वय १७ असावें व मुलींचें वय १४ ते १६ असावें.

इ. स. १६८७— सेंट हेलेनाला आणखी कांहीं गुलाम पाठविले.

इ. स. १७३६—ता. २७ ऑगस्ट इ. स. १७३६ चा मुंबई सरकारचा खलिता-यांत १६५ गुलामांचा उल्लेख आहे.

इ. स. १७४१ मध्यें एक गुलामांच्या व्यापारासंबंधीं सरकारी प्रकाशन प्रसिद्ध झालें त्यांत असें आदेशिलें आहे कीं, गुलामांची जी जात असेल तीपेक्षां अन्य जातीच्या मनुष्यास त्या गुलामास विकतां येणार नाहीं; आणि जर अन्य जातीचा मनुष्य विकत घेईल तर त्यास १०० रुपये दंड होईल.

सरकारी गुलामांस वागवावें कसें याबद्दल पुढीलप्रमाणें वारंवार आदेश आढळतो: तुम्ही त्यांस दयाळूपणानें वागवावें. आणि ते जरी आपली मालमत्ता आहेत असें समजण्यांत येतें तरी त्यांनीं आपापलीं कामें आनंदानें करावींत म्हणून त्यांस सर्व प्रकारें उत्तेजन द्यावें. त्यांचें जेवणखाण, राहणें, कपडे यांविषयीं अशी काळजी घ्यावी कीं, त्यामुळें त्यांची गुलामगिरी त्यांस त्रासदायक वाटूं नये. त्यांना निराळे ठेवावे आणि कोणा विश्वासू मनुष्याच्या हातीं द्यावें. त्यांस खाण्यापिण्यास थोडें द्यावें. सोल्जरांना त्यांच्यापासून दूर राखावें, नाहीं तर ते त्यांस बिघडवितील. आणि ते आजारी पडले असतां जितकी आपण सोल्जरांना डॉक्टरांची मदत देतों तितकी त्यांस द्यावी.

गुलामांची किंमत इ. स. १७५३ सालीं दर डोक्यास सरसकट ७१ रुपये दिली गेली.

इ. स. १६६७ मध्यें ३८ काफरी बायकांची किंमत २१५५ रुपये लिहिली आहे.

मुंबईतील खाजगी गुलाम:—इ. स. १७८० सालच्या खानेसुमारीच्या वेळेस मुंबई शहरांत ४७,१७० लोकसंख्येपैकीं ४३१ गुलाम होते.

इ. स. १७६२ च्या एका पत्रांतील सरकारी गुलामाच्या *किंमती*—

| | |
|---|---|
| प्रत्येक मनुष्य ( वय २० ते ४० ) | ११० रुपये. |
| प्रत्येक स्त्री ( वय २० ते ४० ) प्रत्येक स्त्रीमागें पांच पुरुष गुलाम नेमलेले असावे. | ८० रु. |
| प्रत्येक मुलगा ( वय १४ ते २० ) | ७५ रु. |
| प्रत्येक मुलगी ( वय १४ ते २० ) प्रत्येक मुलीमागें पांच मुलें गुलाम नेमलेलीं असावींत. | ५० रु. |

सरकारी गुलामांचें खाणेंपिणें— आठवड्यांतून पांच दिवस चांगली खिचडी व मासे व दोन दिवस मांसाहार आणि मनुष्यास एक रुपया व चाईस आठ आणे पानतंबाखूसाठीं. शिवाय त्यांना भाजीपाला करण्याकरितां जमीन द्यावी, त्यांना दोन तुमानी, दोन शर्ट, व एक टोपी हीं दर सहा महिन्यांनीं द्यावीं, असा इ. स. १७५२ च्या कोर्ट ऑफ डायरेक्टरर्सच्या पत्रांत उल्लेख आहे.

इ. स. १७५७ मध्यें कांहीं गुलामांनीं बंड केलें त्या वेळीं त्यांस हिंदी लास्करांचें ( खलाशांचें ) खाणें द्यावें असा शिक्षा म्हणून ठराव झाला. ही शिक्षा दिल्यानंतर ते वठणीस आले. यावरून लास्करांपेक्षां त्यांचें खाणें उच्च होतें असें दिसतें.

सरकारी गुलामांस दिलेलीं कामें— बरेचसे गुलाम लष्करांत व आरमारखात्यांत होते. कित्येक लहान लहान गुलामांस दुसऱ्यास कामाकरितां देत असत. गुलामांचा खाण्यापिण्याचा खर्च मजुरांस द्यावयाच्या मजुरीपेक्षां अधिक पडत असे.

अर्वाचीन सुधारलेल्या जगाला कालिमा लावण्यासारखा हा गुलामांचा व्यापार व त्यांना मिळणारी अमानुष वागणूक होती. तेव्हां इंग्लंडमध्यें १७८७ मध्यें थॉमस क्लार्कसन आणि विल्यम विल्बरफोर्स यांनीं गुलामांचा व्यापार बंद पाडण्यासाठीं एक संस्था स्थापून अतोनात खटपट केली. तिला यश येऊन १८०७ च्या पार्लमेंटच्या कायद्यानें हा व्यापार बेकायदेशीर ठरविला. अमेरिकन संयुक्त संस्थानें, फ्रान्स व पुढें इतर सुधारलेलीं राष्ट्रें यांनीं पण इंग्लंडचें स्तुत्य अनुकरण केलें. १८३४ सालापासून ब्रिटिश साम्राज्यांत हा व्यापार बंद झाला. इतर युरोपियन साम्राज्यांनीं पण आपल्या वसाहतींतून त्याचें उच्चाटन केलें. ब्राझीलमध्यें १८८८ पर्यंत हा टिकून होता. १९२६ मध्यें नेपाळनें आपल्या

राज्यांतील गुलामगिरी बंद केली. याप्रमाणें आज सुधारलेल्या जगांत 'गुलाम' म्हणून कोणी नाहीं.

**गुलाम घराणें** (१२०६–१२८८)— तेराव्या शतकाच्या सुरुवातीपासून बाबरनें हिंदुस्थानावर स्वारी केली तोंपर्यंतच्या काळामध्यें दिल्लीच्या तक्तावर एकंदर चौतीस मुसलमानी राजे बसले. त्यांपैकीं महंमद घोरीचा वजीर ऐबक हा पहिला होय. यानें गुलाम घराण्याची स्थापना केली. इ. स. १२०६–१२८८ पर्यंत या घराण्यांत एकंदर दहा सुलतान होऊन गेले. त्यांपैकीं कुतुबुद्दीन ऐबक, अल्तमश व बल्बन हे विशेष प्रसिद्ध आहेत. कुतुबुद्दीन हा कलाकौशल्याचा भोक्ता होता. त्याच्यानंतर त्याचा गुलाम शमसुद्दीन यानें कुतुबमिनार बांधविला. त्याचा अमल बहुतेक हिंदुस्थानावर होता. त्याची मुलगी नंतर राज्यावर बसली. पण सर्व सत्ता बल्बन या गुलामाकडे होती. तोहि शूर व कर्तबगार होता. या गुलामवंशांतील राजे पण व्यक्तिशः पूर्वायुष्यांत गुलाम होते हें लक्षांत घेण्याजोगें आहे.

**गुलामपद्धति-प्रतिबंधक कायदा**— हिंदुस्थानांतील १८४३ चा कायदा. कोणत्याहि सरकारी अधिकाऱ्यानें कोर्टाचा हुकूमनामा बजावतांना किंवा जमिनीचा सरकारसारा, खंड किंवा दुसरें कोणतेंहि येणें वसूल करण्याकरितां कोणाहि इसमाची गुलामाप्रमाणें विक्री करूं नये, किंवा त्या मनुष्याकडून सक्तीनें काम करून घेण्याच्या हक्काची विक्री, सदर इसम गुलाम आहे ह्या कारणास्तव, करूं नये (कलम २). कोणी इसम आपला गुलाम आहे म्हणून त्या, गुलाम इसमाच्या मिळकतीसंबंधीं हक्कांची कोणत्याहि दिवाणी, फौजदारी, किंवा मॅजिस्ट्रेट कोर्टानें अमलबजावणी करूं नये (कलम ३). कोणा इसमानें आपल्या स्वतःच्या कष्टानें, कलाकौशल्यानें, किंवा धंदा–उद्योगानें, किंवा वारसा हक्कानें, किंवा देणगी बक्षिसादि हक्कानें जी मिळकत संपादन केली असेल तर सदर इसम गुलाम आहे या सबबीवर त्या इसमाचा त्या मिळकतीवरील ताबा नष्ट केला जाणार नाहीं, किंवा ताबा घेण्यास प्रतिबंध केला जाणार नाहीं (कलम ३). स्वतंत्र इसमाचें एखादा गुन्हा घडला तर त्या गुन्ह्याच्या कृत्याबद्दल जसें पारिपत्य सरकार करतें, त्याचप्रमाणें एखादा इसम गुलाम अशा सबबीवर जर त्याच्याविरुद्ध गुन्ह्याचें कृत्य करील, तर त्याचें पारिपत्य सरकार करील (कलम ४).

**गुलाल**—ही तांबड्या रंगाची पूड हिंदू लोकांच्या संस्कारांत वापरतात. तांदुळादि धान्याच्या पिठास तांबडा रंग देऊन बहुधा हा तयार करतात. कधीं शिरगोळा, शाडूची माती, इ. पिठाऐवजीं वापरतात.

**गुल्म**—एक पोटांतला रोग. न सोसणारा आहार, अपचन, व्यायाम न घेणें, इ.मुळें वातादि दोष कुशी, ऊर, नाभि, व बस्ती यांत शिरून गांठी उत्पन्न होतात. वातगुल्म, पित्तगुल्म, कफगुल्म, इ. याचे प्रकार आहेत. रक्तगुल्माची माहिती खालीलप्रमाणें आर्यवैद्यकांत सांपडते.

रक्तगुल्म—स्त्री नूतन प्रसूत असतां अथवा अपक्व गर्भपात झाला असतां किंवा ऋतुकाळीं अपथ्य पदार्थ भक्षिले असतां, तिच्या गर्भाशयाच्या ठायीं वायु रक्ताला जमवून शूल व दाह यांनीं युक्त अशा गुल्माला उत्पन्न करितो. या गुल्माच्या योगानें ज्वर, तृषा, मुख व शरीर यांच्या ठायीं आरक्तपणा, भक्षिलेल्या अन्नाच्या पाकावस्थेपासून उदरामध्यें महाशूल, घर्म, शरीरास स्पर्श केला असतां व्रणासारखी वेदना, इत्यादि लक्षणें होतात. हा गुल्म बहुत दिवस पिंडीभूत होऊन अवयव नसतां गर्भासारख्या ढुसण्या मारतो, व आर्तवप्रतिबंध (विटाळशी न होणें) आणि स्तनाच्या बोंड्या कृष्णवर्ण, इत्यादि गर्भाच्या लक्षणांनीं युक्त असतो.

**गुस्टाव्हस राजे**—स्वीडन देशांत या नांवाचे पांच राजे झाले.

पहिला (१४९६–१५६०)—गुस्टाव्हस यानें डेन्स लोकांचा पराभव करून राज्य मिळविलें (१५२३). १५२९ सालीं रोमन कॅथॉलिक पंथ सोडून प्रॉटेस्टंट पंथ स्वीकारला. याच्या कारकीर्दींत स्वीडनची व्यापार आणि संस्कृति यांत चांगली प्रगति झाली.

दुसरा (१५९४–१६३२)–लहानपणापासून याला लढाईचें शिक्षण मिळालें होतें. प्रथम डेन्स, नंतर रशियन, नंतर पोलिश या क्रमानें या लोकांशीं युद्ध करून विजय मिळविले. शेवटीं त्यानें जर्मनीचा बराच भाग जिंकला. हा लढाई करतांनाच ठार झाला.

तिसरा (१७४६–१७९२)—यानें सरदार वर्गाचे अधिकार काढून घेऊन राजाकडे बरीच सत्ता घेतली. पण हा एका पदच्युत अधिकाऱ्याकडून मारला गेला.

चौथा (१७७८–१८३७)—हा फ्रेंच राज्यक्रांतीच्या फार विरुद्ध होता. फिन्लंड प्रांत स्वीडनच्या सत्तेखालून गेला व राज्यांत बंड होऊन गुस्टाव्हसला पदच्युत करण्यांत आलें.

पांचवा (१८५८–)—१९०७ सालीं गादीवर बसला. हल्लीं तोच स्वीडनचा राजा आहे.

**गुह**—शृंगवेरपुरीचा किराताधिपति. हा दशरथाचा परम मित्र होता. राम अयोध्येहून निघून दंडकारण्यांत चालला असतां एक रात्र येथेंच राहिला होता व त्या वेळेस यानें रामाचें

आतिथ्य करून त्यास गंगेपार उतरविलें व पुढें भरताबरोबर चित्रकूटास रामाच्या भेटीस गेला.

**गुहा**—ही पृथ्वीच्या पृष्ठभागाखालीं स्वाभाविकपणेंच तयार झालेली राहण्यासारखी पोकळ जागा असते. ज्वालामुखी खडक, वाळूचे खडक किंवा चुन्याचे खडक यांतून अशा गुहा आढळतात, व यांत पूर्वी माणसेंहि राहिलीं असलीं पाहिजेत. केन्टकीमध्यें एक प्रचंड गुहा (मॅमथकेव्ह) अशी आहे कीं, तिच्यांतील खोल वाटा ४० मैलांच्या तरी असाव्यात. कांहीं गुहांतून खालून वर व वरून खालीं गेलेले छिन्नविछिन्न सुळके दिसतात; तर कांहींत पुराणकालच्या प्रचंड प्राण्यांचीं हाडें पसरलेलीं आढळतात. हे प्राणी आतां कोठें दिसणार नाहींत. कांहीं गुहांतून माणसांच्या अस्तित्वाच्या खुणा आढळतात. या गुहावासी माणसांची माहिती पुढें दिलेली आहे. माणसानें बनविलेल्या गुहांना लेणीं म्हणतात. पल्लव राजांच्या गुहा व वेरूळ, अजंठा, वगैरे लेणीं प्रसिद्धच आहेत.

**गुहावासी**—मानवप्राणी जेव्हां अगदीं बाल्यावस्थेंत होता व त्याला घरें बांधणें, शेती करणें, वगैरे गोष्टींचें मुळींच ज्ञान नव्हतें तेव्हां तो अशा गुहांतून राहत असे व दगडांच्या हत्यारांनीं प्राणी मारून खात असे. ही गोष्ट आज कांहीं प्राचीन गुहांतून जीं प्राण्यांचीं हाडें, व वस्तू सांपडतात त्यांवरून कळतें. पाषाणयुगांत व पुढेंहि पुष्कळ काळपर्यंत माणसाचें वसतिस्थान म्हणजे नैसर्गिक गुहाच. अशा गुहा ब्रिटन, फ्रान्स, स्पेन, जर्मनी, इ. देशांतून सांपडल्या आहेत. केन्ट गुहा, व्हिक्टोरिया गुहा (यार्कशायर), डोर्डोग्ने दरींतील गुहा (पिरनीज) यांसारख्या माणसाच्या वस्तीच्या गुहा पाषाणयुगीन माणसाची जीवनकथा समजून देण्यास उपयोगी आहेत.

**गुहिल**—एक रजपूत वीर. आग्रा व नरवर या ठिकाणीं सांपडलेल्या नाण्यांवरून व चाटसू येथील शिलालेखांवरून असें दिसतें कीं, गुहिल हा उदेपूरच्या रजपुत राजवंशांतील एक महापराक्रमी पुरुष असून हा वि. सं. ६२३ (सन ५६६) मध्यें होता. उदेपूरच्या राजांची वंशावळ या गुहिलपासूनच उपलब्ध झाली आहे. चाटसू नगरांत सांपडलेल्या शिलालेखांत याच्यापासून बारा पिढ्यांचा उल्लेख असून चाटसूच्या आसपासच्या प्रदेशांवर विक्रम संवताच्या आठव्यापासून अकराव्या शतकापर्यंत त्यांनीं राज्यें केलीं. याच्या पश्चात् भोज हा उदेपूरचा अधिपति झाला.

**गुहिलोत**—मेवाडचें एक राजघराणें. हे राजे स्वतःला सूर्यवंशीय क्षत्रिय म्हणवीत. सर्व रजपुतांमध्यें या घराण्याला श्रेष्ठ स्थान दिलें जातें. गुहिलपुत्र या शब्दाचा अपभ्रंश गुहिलोत आहे. या घराण्याचा वलभी वंशाशीं संबंध होता. या घराण्यांत बाप्पारावळ हा फार प्रसिद्ध पुरुष होऊन गेला. आठव्या शतकांत हा येतो. या घराण्याची राजधानी चितोड ही होती. ती पुढें उदेपूरला गेली. बाप्पानंतर प्रसिद्ध राजा म्हणजे खोम्माण होय. यांचीं चरित्रें स्वतंत्र दिलीं आहेत. उदेपूर पहा.

**गुळवेल**—ही एक फार उपयुक्त व महत्त्वाची वेल आहे. बहुतेक सर्व रोगांवर उपयोगी पडणारी ही वनस्पति आहे. हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांत ती सांपडते. कडुनिंबावरील गुळवेल सर्वोत्कृष्ट समजली जाते. गुळवेलीचें सत्त्व काढतात. औषधाकरितां गुळवेल घेणें ती विषारी झाडावरील घेऊं नये.

**गुळवेलसत्त्व**—जीर्णज्वरावरील हें औषध अतिशय सुप्रसिद्ध आहे. अंगांत कडकी असणें, हातापायांची व डोळ्यांची आग होणें, बारीक ज्वर येणें, अंग मोडून येणें, लघवीची आग होणें, इत्यादि लक्षणांवर गुळवेलसत्त्वाचा अतिशय चांगला उपयोग होतो. ४ ते ८ गुंजा दूधसाखर, मोरावळा, गुलकंद किंवा तूपसाखर यावरोबर दिवसातून दोनदां घ्यावें.

**गूजबेरी**—[वर्ग-राइब्ज ग्रोस्सुलारिआ]. एक ठेंगणें, अनेक शाखा असलेलें झुडुप. हीं सैबेरिया व उत्तर युरोप यांमध्यें रानांत उगवतात. यांच्या कांहीं जाती उत्तर अमेरिकेंतहि आढळतात. यांचीं फळें बोराएवढीं असून गरदार असतात. हीं फार पथ्यकर व रुचकर असतात. यांचें लोणचें किंवा मुरंबा करतात. यांची लागवड सहज करतां येते. यांच्या बिया रुजतात किंवा यांच्या फांट्यापासूनहि हीं वाढतात. हीं चार वर्षांचीं झालीं म्हणजे सर्वांत मोठीं फळें देतात. यानंतर फळांचा आकार लहान होत जातो पण संख्या वाढत जाते.

गूजबेरी जाति—[वर्ग—ग्रोस्सुलारिई, सॅक्सिफ्रागासी]. गूजबेरीच्या जातीच्या वनस्पतींची ही एकच जाति आहे. तिला राइब्ज म्हणतात. ही वनस्पती आफ्रिकेशिवाय सर्व पृथ्वीवर आढळते.

**गूढगुंजन काव्य**—या काव्यप्रकाराला महाराष्ट्रांत केशवसुत आणि गडकरी यांनीं सुरुवात केली. वेदान्ताच्या आधारानें ते गूढगुंजन करीत. पण अलीकडे रवीन्द्रनाथ ठाकूर यांचा अनुयायीवर्ग वाढत आहे. वऱ्हाडांत देशपांडे मंडळी तर यासाठीं प्रसिद्धच आहेत. विरागी आणि सुमंत कवि यांचें लेखन अशाच पद्धतीचें दिसेल. पण श्री. पु. शि. रेगे (फुलोरा) आणि श्री. बा. शि. मर्ढेकर (शिशिरागम) यांचें गूढगुंजन इंग्रजी वाङ्मयांतूनच मराठींत उतरलेलें आहे, यांत शंका नाहीं. तथापि हा काव्यप्रकार व्यवहारी महाराष्ट्र जनतेला तितकासा आवडत नाहीं असें वाटतें. आतां हा प्रकार पद्यांतून निघून पुन्हां गद्यांत शिरत आहे. शशांकांची 'मरीचिका' यांचें एक उदाहरण म्हणून देतां येईल.

**गूढतनु**— ख्रिस्ती धर्मात, अवताराचें कार्य म्हणजे येशू ख्रिस्तामार्फत परमेश्वराशीं मानवजातीचें ऐक्य घडवून आणणें हें होय, असें समजतात. हें ऐक्य केवळ ज्ञान आणि प्रेम यांच्या प्राप्तीमुळें घडून येत नाहीं, तर येशू ख्रिस्तामार्फत दैवी जीवनाच्या अंशभागी होण्यानें घडून येतें. ही येशूची जीवनदायी शक्ति केवळ त्याच्या या पृथ्वीवरील जीवितापुरतीच मर्यादित नसून ती जगाच्या अंतापर्यंत कायम असते. गूढतनु म्हणजे ज्यांचें येशू ख्रिस्ताशीं ऐक्य झालें आहे व ज्यांस त्यापासून दैवी जीविताची प्राप्ति झाली आहे त्या सर्वांचें ऐक्य होय. हें ऐक्य पुढील गोष्टींनीं घडून येतें.

१. श्रद्धा—"जो माझ्या ठिकाणीं श्रद्धा ठेवतो त्याला अनन्त जीविताची प्राप्ति होते" (जो. ६.४७).

२. बाप्तिस्मा विधि—याची इतर विधी व संस्कारां यांमुळें वृद्धि होते व शक्ति वाढते.

यावरून ख्रिस्ती जीवनाचें सार म्हणजे येशू ख्रिस्ताशीं ऐक्य प्राप्त होणें आणि त्यापासून जीवनशक्तीची प्राप्ति होणें. ही गोष्ट केवळ त्याचें बाह्यतः कृति व गुण यांचें अनुकरण करून प्राप्त होत नाहीं तर त्याच्याप्रमाणें जीवनमरण व पुनरुत्थान या गोष्टींमुळें होते. जर आपण येशू ख्रिस्ताबरोबर मृत्यु पत्करला असेल तर त्याच्या जीविताच्या अंशाची आपणाला प्राप्ति होईल असा विश्वास बाळगण्याइतकी आपणांस श्रद्धा प्राप्त होईल. "तुम्हीहि आपणांस पातकांच्या बाबतींत मृत समजलें पाहिजे आणि आपला प्रभु येशू ख्रिस्त याच्यामार्फत परमेश्वराकडे जिवंत दृष्टीनें पाहिलें पाहिजे" (रोम ६ ७ व ११). येशू ख्रिस्ताशीं अखेरचें तादात्म्य हें स्वर्गातील अखंड जीवनस्वरूपी असतें, असें ख्रिस्ती संप्रदायी मानतात.

**गूढविद्यावाद**—मिस्टिसिझम् किंवा गूढविद्या हा शब्द फार मोघम अर्थानें वापरला जातो. धर्म किंवा ईश्वरविज्ञान या विषयांत 'गूढविद्या' याचा अर्थ असा कीं, ईश्वर आणि मनुष्य यांच्यामध्यें प्रत्यक्ष विचारविनिमय (कॉम्युनिकेशन) मानवाला अन्तर्दृष्टि प्राप्त झाल्यानें होऊं शकतो, आणि अन्तर्दृष्टि उत्पन्न करणे ही एक गूढविद्या आहे. या प्रकारची गूढविद्या हें आशियांतील हिंदु धर्म व बौद्ध धर्म यांचें एक महत्त्वाचें वैशिष्टय आहे. नवप्लेटोमतवादी तत्त्वज्ञानांतहि या गूढविद्येला महत्त्वाचें स्थान असून त्याचा पुरस्कार प्लॉटिनस (इ. स. २०४–२६९) या तत्त्ववेत्त्यानें केला आहे. मध्ययुगांतील अतिशय महत्त्वाचे गूढविद्यावादी जर्मन तत्त्ववेत्ते एकहार्ट (मृ. १३८१) आणि टॉलर हे होत. १५ व्या व १६ व्या शतकांतील तत्त्वज्ञानी पारासेल्सस, ब्रूनो, इत्यादि यांनीं गूढविद्या या विषयाला एक निराळी दिशा लावली, आणि लवकरच गूढविद्यावादी धार्मिक पंथ निर्माण झाले. त्यांचे प्रमुख पुरस्कर्ते जेकब बोहमे आणि स्वीडेनबर्ग हे होत. १८ व्या शतकांतील फ्रान्समधील मॅडम गुयी व तिचे फेनेलाँ वगैरे अनुयायी हे गूढविद्यावादी होते. इंग्रज तत्त्ववेत्त्यांपैकीं जॉर्ज फॉक्स (१६२४–१६९१), केंब्रिज प्लेटोनिस्ट वुड्वर्थ, मूर, व विल्यम लॉ (१६८६–१७७१) हे गूढविद्यावादी तत्त्ववेत्ते होत. या गूढविद्यावादाचा दुसरा एक परिणाम असा झाला कीं, किमयागार आणि रोझिक्रूशियन असले रासायनिक प्रयोग करण्याच्या नादीं लागलेले कित्येक शास्त्रज्ञ त्या काळांत होऊन गेले.

**गूमतरा किल्ला**— मुंबई, ठाणें जिल्हा, भिवंडी तालुका. दुगड गांवाशेजारीं १९४९ फूट उंच टेंकडीवर हा आहे. टेंकडी फार अवघड दिसते. दरवाजा टेंकडीच्या पायथ्यापासून ४०० फूट खालीं आहे. त्याच्याशेजारीं ७ पाण्याचीं टांकीं दिसतात. तटबंदीचा भाग पुष्कळ ठिकाणीं पडला आहे.

**गृहरचना-साहाय्यक संस्था**— जी संस्था आपल्या सभासदांना घरें बांधण्याकरितां जागा मिळविणें आणि घरें बांधणें, या कामांत पैशाची आणि इतर मदत करते, त्या संस्थेला 'बिल्डिंग सोसायटी' म्हणतात. सदर संस्था आपल्या सभासदाची सदर मिळकत तारण गहाण घेऊन त्या तारणावर कर्जाऊ रकमा देते. संस्था आपला निधि नियतकालिक वर्गण्यांनीं जमविते. कर्जाऊ रकमा व्याजासह हप्तेबंदीनें फेडून घेण्यांत येतात. अशा संस्था (१) मालकीच्या व (२) सहकारी, अशा दोन प्रकारच्या असतात. सहकारी संस्थांचे आणखी दोन प्रकार: (१) ठराविक मुदत व ठराविक सभासद यांची सहकारी संस्था, आणि (२) कायमची (पर्मनंट) व सतत नवेनवे सभासद घेणारी सहकारी संस्था, याप्रमाणें प्रकार असतात. इंग्लंडात पहिली 'बिल्डिंग सोसायटी' १७८१ सालीं बर्मिंगहॅम येथे स्थापन झाली. हिंदुस्थानांत अशा प्रकारच्या संस्था पहिल्या महायुद्धानंतर बऱ्याच स्थापन झाल्या.

**गृहस्थाश्रम**—चार आश्रमांत गृहस्थाश्रम दुसरा आहे; आणि हा एकटाच आज टिकून राहिला आहे. बाकीचे सर्व आश्रम गृहस्थाश्रमावर अवलंबून असतात. गृही सर्वांचा पोशिंदा आहे. म्हणून 'तस्मात् श्रेष्ठाश्रमो गृही' असें म्हटलें आहे. विवाहानें गृहस्थाश्रम सिद्ध होतो. गृहस्थाश्रमी पुरुष गुरुभक्त भृत्यपोषी, दयावान्, असूयारहित, नित्यजप व होमहवन करणारा, सत्यवादी, जितेंद्रिय, स्वदाररत व परदारनिवृत्त असा असला पाहिजे. आन्तर्बाह्य शौच म्हणजे स्वच्छता हें गृहस्थाश्रमाचें आदितत्त्व आहे. शौचाविना सर्व कर्में निष्फळ समजावीं. तसेंच अतिथिसत्कार हा गृहस्थाचा प्रमुख धर्म आहे. धर्मनिष्ठ राहून उपभोग घेणें हें या आश्रमाचें सार आहे.

**गृह्यसूत्रें**— कल्प हें एक वेदांग आहे. कोणते मंत्र केव्हां म्हणावे, कोणतें अनुष्ठान करावें, वगैरे माहिती कल्पसूत्रांतून दिलेली असते. गृह्यसूत्रें हा कल्पाचा एक भाग आहे. वेदांप्रमाणें हीं गृह्यसूत्रें निरनिराळीं आहेत. कांहींचीं नांवें अशीं—

ऋग्वेद— शांखायन, आश्वलायन.

कृष्ण यजुर्वेद— बौधायन, भारद्वाज, मानव, वैखानस,

शुक्ल यजुर्वेद— पारस्कर.

सामवेद— गोभिल, खादिर, जैमिनि.

**गे, जॉन** ( १६८५-१७३२ )—एक इंग्रज कवि. यानें १७१३ मध्यें 'रूरल स्पोर्ट्स' हें आपलें पुस्तक प्रसिद्ध केलें. नंतर त्याचे ग्रंथ प्रसिद्ध झाले ते—'दि शेपर्ड्स वीक' काव्यसंग्रह ( १७१४ ), 'दि आर्ट ऑफ वॉकिंग दि स्ट्रीट्स ऑफ लंडन' ( लंडनच्या रस्त्यांवरून चालण्याची कला ) हें विडंबन काव्य ( १७१५ ), 'दि कॅपटिव्हज्' दुःखान्त नाटक ( १७२४ ), व 'फेबल्स्' या कल्पित कथा ( १७२७ ). त्याचें 'बेगर्स् ऑपेरा' ( भिकाऱ्यांचा खेळ ) हें नाटक १७२८ मध्यें रंगभूमीवर आलें व तें इतकें लोकप्रिय झालें कीं, त्या नाटकाचे लागोपाठ ६३ प्रयोग झाले. याच नाटकाचा २ रा भाग 'पॉली' या नांवानें लिहून त्यानें तयार केला. पण हें नाटक रंगभूमीवर करण्यास परवाना देण्याचें लॉर्ड चेंबरलेन यानें नाकारलें. बेगर्स ऑपेरा या नाटकाचे प्रयोग पुन्हां १९२० मध्यें होऊं लागले.

**गेझिरा**— अँग्लो ईजिप्शियन सुदान प्रांतांत हें एक मोठें मैदान खार्टूमच्या दक्षिण बाजूस असून याच्या सरहद्दीवरून श्वेत नाईल व नील नाईल ह्या नद्या वाहतात. या मैदानाचें क्षेत्रफळ सुमारें १,००,००,००० एकर असून त्यापैकीं ३०,००,००० एकर जमिनींत उत्तम जातीचा कापूस पिकतो; म्हणून या मैदानांत मोठा कालवा बांधून सुमारें ३,००,००० एकर जमीन पिकाकरितां तयार करण्याची योजना आंखून १९२० सालीं कामाला सुरवात करण्यांत आली. या योजनेकरितां मॅकवार येथें सेनरचें मोठें धरण बांधून मुख्य कालवा ६२ मैल लांबीचा आणि त्याचे पोटकालवे सुमारें ९०० मैल लांबीचे करण्याचें ठरलें. या धरणाचा तलाव ५८ मैल पसरलेला असून त्यांत २,२८,९६,००० घनफूट पाण्याचा सांठा होणारा आहे. हें धरण ग्रॅनाइट दगडाचें बांधलेलें दोन मैल लांब असून पृथ्वीवरील सर्वांत मोठ्या बांधकामांपैकीं हें एक काम १९२६ मध्यें पुरें झालें. या कालव्याचें पाणी फक्त ३,००,००० एकर जमिनीस प्रथम देण्यांत आलें; कारण त्याहून अधिक क्षेत्राला पाणी दिल्यास, ईजिप्तमधील इतर कालव्यांखालील जमिनींना पुरेसें पाणी मिळणार नाहीं अशी हरकत ईजिप्शिअन लोकांनीं घेतली; परंतु १९२४ मध्यें सुदान-ईजिप्शिअन अधिकाऱ्यांना असें कळविण्यांत आलें कीं, हें कालव्याच्या पाण्याचें क्षेत्र सुदानला जरूर वाटेल तितकें वाढवण्यांत येईल.



**गेंडा**— हा एक सखुर सस्तन जातीचा प्राणी आहे. हा सामान्यतः पूर्व गोलार्धांतील उष्ण प्रदेशांत आढळतो. हा दिसावयास बेढब असून याचे पाय आंखूड असतात. व कातडी

जाड असून तीवर वळ्या पडलेल्या असतात. याला नाकावर एक किंवा दोन शिंगें असतात. हा सामान्यतः दलदलीच्या प्रदेशांत राहतो व गवत आणि झाडांचा पाला खाऊन उपजीविका करतो. हिंदुस्थानांतील गेंड्यास बहुधा एकच शिंग असतें. हा स्वभावानें गरीब असून त्यास उपद्रव न दिल्यास शांत असतो. सामान्यतः आसाम प्रांतांतील मैदानांत गेंडे आढळतात; जावांतील गेंडा हिंदुस्थानांतील गेंड्यापेक्षां लहान असतो. सुमात्रांतील गेंडा त्यापेक्षांहि लहान असून त्यास दोन शिंगें असतात. आफ्रिकेमध्यें मध्यभागांत अद्यापि गेंडे आढळतात पण दक्षिणेंत ते नाहींसे झाले आहेत. हा स्वभावानें उग्र दिसतो. आफ्रिकेंत एक पांढऱ्या जातीचा गेंडा आढळत असे, पण तो आतां बहुतेक नष्ट झाला आहे.

**गेन्सबरो, थॉमस** ( १७२७-१७८८ )— हा ब्रिटिश चित्रकार १७७४ मध्यें बाथ येथून लंडनला राहावयास आला, आणि तेथें रेनॉल्ड्स आणि रोमने या सुप्रसिद्ध चित्रकारांप्रमाणें रसिक लोकांच्या आश्रयाला पात्र झाला. त्याचीं व्यक्तींचीं आणि नैसर्गिक देखाव्यांचीं चित्रें नाजूक छटा आणि रंगभाव यांमुळें विशेष प्रकारचीं ठरून गेन्सबरो पहिल्या दर्जाचा इंग्रज चित्रकार म्हणून मान्यता पावला.

**गेबर**—एक अरबी किमयागार व रासायनिक ग्रंथकार. लॅटिन भाषेंत रसायनशास्त्रावर जीं पुस्तकें आहेत त्यांतील कांहीं या गेबरच्या पुस्तकांचीं भाषांतरें आहेत. गेबर इसवी सनाच्या आठव्या किंवा नवव्या शतकांत होऊन गेला असावा.

धातूंचे गुणधर्म, ते शुद्ध करणें, गंधक, पारा, सोमल, इ. चें कार्य या गोष्टी त्याच्या ग्रंथांत आहेत. रसायनशास्त्राखेरीज भाषा, ज्योतिष, अध्यात्मविद्या यांवर त्यानें अनेक ग्रंथ लिहिले.

**गेलिक**—ही केल्टिक भाषा स्कॉटलंडमधील हायलंड प्रदेशांत आणि आयर्लंडमध्यें आणि ऑइल ऑफ मॅन या बेटामध्यें चालू आहे. ही भाषा बोलणारांना गेल लोक असें म्हणतात. तथापि स्कॉटलंडमधील लोक स्वतःला आल्बिनिक गेल आणि आयर्लंडमधील लोक एरिनिच गेल अशीं निरनिराळीं नांवें वापरतात.

**गे-लुझॅक, लुई जोसेफ** (१७७८–१८५०)— एक फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ आणि पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. त्यानें १८०४ मध्यें शास्त्रीय संशोधनकार्याकरितां विमानांत बसून दोन उड्डाणें केलीं. १८०८ मध्यें त्याला सोर्बोन येथें पदार्थविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर नेमण्यांत आलें, व त्या जागेवर तो २४ वर्षें होता. त्यापैकीं कांहीं काळ तो रसायनशास्त्राचा प्रोफेसर होता. १८३१ मध्यें तो चेंबर ऑफ डेप्युटीज् या फ्रेंच कायदेमंडळाचा सभासद झाला. आणि १८३९ मध्यें त्याला फ्रान्सचा पिअर (लॉर्ड) ही पदवी देण्यांत आली. तथापि त्यानें राजकारणांत प्रत्यक्ष भाग कधींहि घेतला नाहीं. शास्त्रीय संशोधनाबद्दल, विशेषतः वायु आणि वाफ यांच्या रासायनिक आणि पदार्थविज्ञानशास्त्रीय गुणधर्मांबद्दलच्या त्याच्या संशोधनामुळें त्याची फार प्रसिद्धि झालेली आहे.

**गेल्सेनकिरचेन**—जर्मनी, प्रशियामध्यें एसेनच्या ईशान्येस हें शहर आहे. येथें दगडी कोळसा आणि लोखंड यांच्या कारखान्यांची वाढ झाल्यामुळें या शहराला फार लवकर महत्त्व प्राप्त झालें. लोकसंख्या ३,१३,००३ आहे.

**गेस्लर, हेन्रिश** (१८१४–१८७९)—एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. सन १८५४ मध्यें यानें बॉन नांवाच्या शहरीं आपलें कायमचें वास्तव्य केलें. तेथें यानें पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र यांच्या उपयोगी उपकरणें तयार करण्यांत उत्तम नांव कमाविलें. शिरगोळा आणि टोपेझ यांच्या आंत ज्या फटी अगर पोकळ जागा असतात त्यांत कर्बद्विप्राणिद नांवाचा वायु असतो असें त्यानें सिद्ध करून दाखविलें व साध्या स्फुरावर विद्युत्प्रवाहाचें कार्य घडवून विशिष्ट प्रकारचा स्फुर तयार करितां येतो, असेंहि त्यानें दाखवून दिलें. परंतु त्यानें एका विशिष्ट प्रकारच्या कांचनलिका (पुढें पाहा) तयार केल्यामुळें तो जास्त प्रसिद्ध झाला आहे. पारदवाताकर्षक यंत्र, तुला, उष्णतामापक यंत्र, इ. अनेक शास्त्रोपयोगी उपकरणें त्यानें बनविलीं आहेत. सन १८६८ मध्यें त्याला बॉन येथील विश्वविद्यालयांतून डॉक्टर ऑफ् फिलॉसफी ही बहुमानाची पदवी अर्पण करण्यांत आली.

**गेस्लर नलिका**—एक कांचेची निर्वात नळी. बॉनमधील गेस्लर त्यानें ही प्रथम तयार केल्यामुळें त्याचें नांव हिला मिळालें आहे. ही बहुतेक निर्वात केलेली असून आंतील विरळ वायूचा दाब $\frac{1}{2}$ मिलिमीटर पाऱ्याइतका असतो. ह्या नळींतून विजेचा प्रवाह सोडला म्हणजे आंतील वायु प्रकाशित होऊन मनोहर रंग दिसूं लागतात. गेस्लर नळीचा विच्छिन्न किरणपटाच्या परीक्षणासाठीं चांगला उपयोग होतो.

**गैकी, सर आर्चिबाल्ड** (१८३५–१९२४)— एक ब्रिटिश भूगर्भशास्त्रज्ञ. लंडन येथील प्रॅक्टिकल जिऑलजीच्या म्यूझियमचा हा मुख्य अधिकारी १८८२–१९०१ पर्यंत होता. यानें भूगर्भशास्त्रावर बरेच ग्रंथ लिहिले.

**गैकी, जेम्स** (१८३९–१९१५)— एक ब्रिटिश भूगर्भशास्त्रज्ञ. त्यानें ग्रंथ लिहिले ते—'दि ग्रेट आइस एज' (बृहत् हिमयुग); 'प्रीहिस्टॉरिक यूरोप' (इतिहासपूर्वकालीन यूरोप); 'दि अॅन्टीक्विटी ऑफ मॅन इन् यूरोप' (युरोपमधील मानवाची प्राचीनता); इ.

**गैबीनाथ** (१५२०–१५८०)—ज्ञानेश्वर महाराजांच्या परंपरेंतील एक साधु. याची परंपरा ज्ञानेश्वर–सत्यात्मल–गैबी अशी आहे. याचा ग्रंथ पंचीकृतविवेक असून याचे कांहीं अभंग व पदें उपलब्ध आहेत. याला गहिनीनाथ असेंहि नांव आहे. मुसलमान याला गैबीपीर म्हणतात. गर्भागिरीवरील याच्या समाधीला हिंदू व मुसलमान लोक भजतात. कवि सोहिरोबा आंबिये आपल्याला याचा शिष्य म्हणवितो.

**गैरहक्की कबजा**—(डिस्सीझिन). कायद्यांत या शब्दाचा अर्थ स्थावर इस्टेटीच्या मालकाचा कबजा नाहींसा करून ती इस्टेट आपल्या ताब्यांत घेणें. असा कबजा कायदेशीर आहे किंवा गैरकायदेशीर आहे हें ठरवितांना कबजा करणाऱ्याचा हेतु, तसेंच तो बोललेले शब्द किंवा त्यानें प्रत्यक्ष केलेली कृति, वगैरे अनेक प्रकारची परिस्थिति न्यायाधिशाला लक्षांत घ्यावी लागते.

**गोअरिंग, हरमन विल्हेल्म** (१८९३–१९४७)— जर्मन फील्ड मार्शल, एक मंत्री, आणि राष्ट्रीय समाजवादी पक्षांतला हिटलरच्या खालोखाल पुढारी. पहिल्या महायुद्धांत त्यानें जर्मन विमानदलामध्यें नोकरी केली, व कॅप्टनच्या हुद्यापर्यंत चढला; युद्धसमाप्तीनंतर स्वीडनमध्यें विमानवाहतुकीच्या धंद्यांत नोकरी केली. केरिन व्ही फॉक नांवाच्या एका स्वीडिश मुलीशीं त्यानें लग्न केलें. हिटलरनें आपला पक्ष स्थापन केल्यावर आरंभीच गोअरिंग त्या पक्षांत सामील झाला. १९२३ च्या नोव्हेंबरांतील म्यूनिक प्रकरणांत त्यानें भाग घेतला, पण त्यांत अपयश आल्यामुळें तो इटलींत पळून गेला, व तेथून १९२७ सालीं

जर्मनींत परत आला. त्यानें नाझी तुफानी दल (स्टॉर्म-ट्रुप्स) या सैनिक दलाची पुनर्रचना केली. १९२८ सालीं तो रीशस्टॅग या जर्मन पार्लमेंटांत निवडून आला. आणि १९३२ पासून त्याचा अध्यक्ष झाला. १९३३ सालीं हिटलर अधिकारारूढ झाल्यावर त्यानें गोअरिंगला प्रशियाचा मुख्य प्रधान व गृहमंत्री नेमलें. त्यानें पोलीसखात्याला आणि अन्तर्गत राज्यकारभाराला नाझीपक्षाच्या धोरणानुसार वळण लावलें.

पुढें त्याला विमानखात्याचा मंत्री व प्रमुख सेनापति नेमण्यांत आलें, व त्यानें जर्मन वैमानिक दलाची नवी रचना प्रथम गुप्तपणें व नंतर उघडपणें केली. नंतर गोअरिंगनें जर्मनीच्या आर्थिक बाबीकडे लक्ष दिलें. तेव्हां चतुर्वार्षिक आर्थिक योजनेचा त्याला कमिशनर नेमण्यांत आलें. कच्चा माल तयार करण्याच्या कामाचाहि तो कमिशनर झाला, आणि जर्मनीच्या आर्थिक धोरणाचा गोअरिंग लवकरच हुकूमशाहा (डिक्टेटर) बनला. डॉ. शाफ्टला त्यानें अधिकारपदावरून दूर केलें. कारण डॉ. शाफ्ट हा सनातनी आर्थिक धोरणाचा पुरस्कर्ता होता. १९३८ च्या फेब्रुवारींत त्याला फील्ड-मार्शल हा हुद्दा मिळाला, व त्या सालीं ज्यू लोकांची जी हकालपट्टी झाली, त्याला जबाबदार गोअरिंग आहे. गोअरिंग हा हिटलरचा उजवा हात असून हिटलरचा वारस तोच व्हावयाचा, अशी योजना होती. वर सांगितले त्यांशिवाय आणखी पुष्कळसे हुद्दे त्याला मिळाले. डामडौल व चैन याची गोअरिंगला फार आवड असे. नाझीपक्षांतल्या क्रांतिकारकांपैकीं तो एक प्रमुख होता; तथापि कांहीं प्रसंगीं कांहीं औपचारिक (टेक्निकल) कारणाकरितां धीमेपणा स्वीकारण्याची शिफारस त्यानें केलेली आहे. 'लोण्याऐवजीं तोफा' ही घोषणा गोअरिंगनें सुरू केली, आणि जर्मन लष्कराची वाढ करण्याकरितां खाद्यपेयांवर नियंत्रण घालण्याकडे जर्मन लोकांचें मन त्यानें वळविलें. जर्मनीचा पराभव झाल्यानंतर इतर जर्मन पुढाऱ्यांप्रमाणें याचीहि चौकशी होऊन फांशीची शिक्षा सांगण्यांत आली; पण त्यानें आत्महत्या करून फांशी वांचविली.

**गोएटे, जोहान वोल्फगँग** (१७४९-१८३२)— एक विख्यात जर्मन कवि, नाटककार व तत्त्वज्ञानी. याचा बाप वकील होता. याचें शिक्षण लाइपझिग आणि स्ट्रासबुर्ग विद्यापीठांत झालें. गोएटे वकिली करूं लागला पण त्याचें सर्व लक्ष वाङ्मयाकडे असे. तो सॅक्स वीमरच्या ड्यूकचा सल्लागार बनल्यापासून त्याच्याभोंवतीं प्रसिद्ध साहित्यिकांचें कडें जमलें. त्यांत शिलर एक होता. १७९२ सालीं तो ड्यूकबरोबर फ्रान्सच्या बंडखोर सैन्याशीं लढण्यासाठीं गेला होता. त्याचें ज्या अनेक स्त्रियांवर प्रेम होतें त्यांपैकीं शार्लट फॉन् स्टीन ही अग्रणी होती; पण प्रत्यक्ष लग्न झालें तें ख्रिश्चिआना व्हुल्पिअस हिच्याशीं (१८०६). शिलर हा त्याचा जिवलग मित्र असे. गोएटेनें गद्य-पद्यांत अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं कांहीं शास्त्रीयहि आहेत. 'फॉस्ट' हें त्याचें काव्य सुप्रसिद्ध आहे. त्याचें एक आत्मचरित्रहि आहे. 'तरुण वेर्टरचीं दुःखें' हें त्याच्या एका ग्रंथाचें मराठी भाषांतर आहे. तो वीमर येथें वारला. तेथील घर व फ्रँकफोर्ट येथील जन्मघर हीं त्याचीं स्मारकें म्हणून राखून ठेविलीं आहेत. १९३२ सालीं त्याचा शतसांवत्सरिक उत्सव सर्व जगभर झाला.

**गोकर्ण**— मुंबई इलाखा, उत्तर कानडा जिल्हा, कुमठें तालुक्यांतील प्राचीन शहर. हें समुद्रकांठीं असून मोठ्या यात्रेचें ठिकाण आहे. येथें महाबळेश्वराचें मंदिर द्राविड धर्तीचें आहे. हें द्वादश ज्योतिर्लिंगांपैकीं एक आहे. येथें १०० च्यावर अखंड नंदादीप असतात. महाशिवरात्रीला मोठी यात्रा भरते. ब्रह्मा, विष्णु, शिव, अगस्त्य, राम आणि रावण यांचींहि देवळें येथें आहेत. या ठिकाणीं स्नान केलें असतां ब्रह्महत्येचें पातकहि नाहींसें होतें असें स्थानमाहात्म्यांत सांगितलें आहे. कालिदासानें याचा उल्लेख केला आहे. लो. सं. दहा हजार.

**गोकर्णी**—हा एक फुलांचा वेल आहे. याच्या फुलांच्या रंगावरून पांढरी व निळी अशा दोन जाती आहेत. गोकर्णीस लांबट शेंगा येतात. हिचीं फुलें आकारानें गाईच्या कानासारखीं असतात, यामुळें या वेलास गोकर्णी हें नांव प्राप्त झालें आहे. पांढरी गोकर्णी जास्त गुणावह आहे. गोकर्णीस 'सुपली' व 'काजळी' असेंहि म्हणतात. या वेलीचे अनेक औषधी उपयोग आहेत.

**गोकाक**—मुंबई, बेळगांव जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. ६७१ चौ. मैल. लो. सं. १,६४,७२९. गोकाक हें एक शहर व ११३ खेडीं आहेत. घटप्रभेच्या पाण्याचे कालवे काढले आहेत. गोकाक शहर बेळगांवच्या आग्नेयीस सुमारें ३० मैलांवर आहे. लो. सं. १४,२९४. कागद आणि लांकडी सामान याविषयीं शहर प्रसिद्ध आहे. शहराच्या पश्चिमेस आदिलशाहींतील एक किल्ला आहे. जुनीं देवळें पुष्कळ असून कांहींत शिलालेख आहेत. स्टेशन आणि गांव यांमध्यें गोकाकचा धबधबा आहे. घटप्रभा नदी १७० फुटांवरून खालीं उडी घेते. ११ व्या शतकापासून या गांवचा उल्लेख सांपडतो. हा शाहूकडे असे तो सावनूरच्या नबाबाकडे गेला, तेव्हां १७५४ त पेशव्यांनीं जिंकून घेतला. हा नंतर पटवर्धन सरदारांच्या जहागिरींत मोडत असे. १८३६ त तासगांवची जहागीर खालसा केल्यावर ब्रिटिशांकडे गोकाक आलें. गांवांत एक हायस्कूल आहे व धबधब्याजवळ कापडाची गिरणी आहे.

**गोकुळ**—संयुक्त प्रांत, मथुरा जिल्ह्यांतील एक शहर. याच्याजवळून यमुना नदी वाहत जाते. कृष्णाच्या बाळपणीच्या लीलांचें स्थान या नात्यानें गोकुळ हें फार पवित्र स्थान मानलें गेलें आहे. या ठिकाणीं गोकुळाष्टमीच्या दिवशीं मोठी यात्रा जमते. याशिवाय वल्लभाचार्याचें हें राहण्याचें ठिकाण म्हणूनहि प्रसिद्ध आहे. रमणरेती व ब्रह्मांडतीर्थ हीं गोकुळांतील स्थानें फार पवित्र मानिलीं जातात.

**गोकुळ जाट** (मृ. १६८०)—एक शूर जाट सरदार. औरंगजेबानें हिंदु जनतेस छळण्यास सुरवात केली, म्हणून हिंदू चिडले व मथुरा, अयोध्या, व आग्रा इकडील जाट शेतकऱ्यांनीं गोकुळ जाटाच्या नेतृत्वाखालीं बंड केलें. तें मोडेना (१६६९) तेव्हां खास औरंगजेब चालून गेला. प्रथम गोकुळला माफी देण्याची लालूच दाखविली, परंतु तो ऐकेना. तेव्हां लढाई झाली. गोकुळ व त्याचे जाट मोठ्या शौर्यानें लढले; पण सैन्याच्या कमतरतेमुळें त्याचा पराभव झाला. गोकुळला पकडून आणून आग्रा येथें त्याचा एकेक अवयव तोडून काढून मग ठार मारलें. व त्याच्या कुटुंबास बाटविलें.

**गोकुळाष्टमी**— श्रावणांतील वद्य अष्टमीस गोकुळाष्टमी किंवा जन्माष्टमी म्हणतात. या दिवशीं मध्यरात्रीं देवकीच्या पोटीं कृष्ण जन्मास आला. गोकुळाष्टमीचें माहात्म्य वैष्णव संप्रदायांत विशेष आहे. गोकुळाष्टमीचें व्रतहि आहे.

**गोखरू**—(सराटे). गोखरूचें झाड लहान असून जमिनीवर पसरतें. हीं झाडें पावसाळ्यांत उगवतात व त्यांस लहान फळें येतात. त्यांवर चार बाजूंनीं चार कांटे असतात. या झाडाची एक लहान जात आहे तीस सराटे म्हणतात. औषधांत गोखरूच्या अभावीं सराटे घेतात; कारण दोहोंचे गुणधर्म एकच आहेत. गोखरू पौष्टिक असून त्याचा औषधी उपयोग आहे.

**गोखले, गोपाल कृष्ण** (१८६६–१९१५)— एक हिंदी राजकीय पुढारी. यांचा जन्म चिपळूण ताल्लुक्यांत ताम्हणमळा येथें ९ मे १८६६ रोजीं झाला. यांचें शिक्षण राजाराम कॉलेज (कोल्हापूर) व एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें झालें. १८८४ सालीं बी. ए. झाल्याबरोबर हे डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव समासद झाले. १८८४ ते १९०२ पर्यंत फर्ग्युसन कॉलेजमध्यें प्रोफेसर होते. ते गणित, अर्थशास्त्र, इतिहास व इंग्रजी हे विषय शिकवीत. हे न्या. मू. रानडे यांना राजकीय गुरु मानीत. १८८७ सालीं सार्वजनिक सभेचे चिटणीस व सभेच्या त्रैमासिकाचे संपादक झाले. १८८८ पासून 'सुधारक' पत्राचे संपादक झाले. १८९५ सालीं पुण्यास भरलेल्या राष्ट्रीय सभेचे ते चिटणीस होते. १८९७ मध्यें वेल्बी कमिशनपुढें साक्ष देण्यासाठीं हे इंग्लंडमध्यें हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून गेले होते. १९०० मध्यें मुंबई प्रांतिक कायदे कौन्सिलचे समासद झाले. यांनीं जमीनमहसूल–पद्धतीवर टीका करून फेरोजशहा मेथाबरोबर हे कौन्सिलांतून उठून गेले. १९०२ मध्यें हे वरिष्ठ कायदेमंडळाचे सभासद झाले व अखेरपर्यंत ते तेथें होते. १९०३ मध्यें यांचीं अंदाजपत्रकावर उत्कृष्ट भाषणें झालीं. १९०४ मध्यें यांनीं युनिव्हर्सिटी कायद्याविरुद्ध कडक भाषणें केलीं. १९०५ मध्यें बनारस येथील राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. याच वर्षी ते मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो व पुणें म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष झाले व त्यांनीं सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीची स्थापना केली. १९०८ मध्यें यांनीं मोर्ले-मिंटो सुधारणांबाबत विलायतेंत खटपट केली. १९१० सालीं प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करावें म्हणून यांनीं खटपट केली व दक्षिण आफ्रिकेंतील दडपशाही व मुदतबंदी मजूर पद्धति बंद करण्याबद्दल खटपट केली. १९११ मध्यें यांनीं प्राथमिक शिक्षणाचें बिल वरिष्ठ कायदेकौन्सिलांत आणलें. १९१२ मध्यें आफ्रिकेंतील लढ्यासंबंधीं तडजोड करण्याकरितां हे विलायतेस व पुढें आफ्रिकेमध्यें गेले. १९१३ मध्यें पब्लिक सर्व्हिस कमिशनकरितां विलायतेस गेले. १९१४ सालीं पुन्हां विलायतेस गेले. १९ फेब्रुवारी १९१५ रोजीं ते पुण्यास मृत्यु पावले.

सनदशीर मार्गानें सरकारला त्याचे दोष दाखवून देण्याची यांची विशेष हातोटी असे. देशसेवेसाठीं चांगल्या सुशिक्षितांनीं स्वार्थत्याग करून अखंड सेवाव्रत पत्करलें पाहिजे, अशी त्यांची सक्रिय शिकवण असे. म. गांधी यांना आपले राजकीय गुरु मानीत.

**गोखले घराणें**—हें घराणें मूळचें रत्नागिरी जिल्ह्यांतील वेळणेश्वर गांवचें होय. परंतु गोखले–रास्ते घराण्याच्या मूळपुरुषाकडे आदिलशाहींत वेळणेश्वर महालाची रसद पोहोंचविण्याचें काम असल्यानें त्या घराण्यास रसदे नांव मिळालें. याचेंच पुढें रास्ते बनलें. त्या पुरुषाचाच वंश वांई, पुणें व जमखंडी येथील रास्ते घराण्यांत नांदत आहे. शाहूनें ज्याला रास्ते पदवी दिली तो भिकाजीपंत याच घराण्यांतील होता. याचीच मुलगी नानासाहेब पेशवे याची पत्नी गोपिकाबाई होय.

गोखल्यांच्या शाखा पुढील ठिकाणीं आहेत. ताम्हणमळा (रत्नागिरी जि.) येथील चौगुले गोखले या घराण्यास तेथील चौगुलकीचें वतन थोरल्या आनंदराव रास्त्यानें दिलेलें आहे. या घराण्यांतच नामदार गोखले यांचा जन्म झाला. मालवणनजीक कांदळ गांवीं एक घराणें असून तेथील कृष्णभट्ट गोखल्यास शाहूनें इनाम दिलेलें आहे. पुणें येथें नळवाले गोखले घराणें आहे. शेवटच्या बाजीरावाच्या वेळीं नळाच्या कामावर याचा मूळ पुरुष यशवंत आप्पाजी नांवाचा होता

त्यावरून हें नाव या घराण्यास मिळालें. पुण्यांत घरमोडे गोखले म्हणून एक घराणें आहे. या घराण्यांतील विनायक नारायण गोखले ह्यानें व्यापाराच्या जोरावर पुण्यांत जुनीं घरें घेऊन तीं मोडून नवीं बांधण्याचा क्रम सुरू केला होता.

**गोखले, नरहर गणेश, (बापू) (१७७७–१८१८)**— मराठेशाहींतील शेवटचा शूर सेनापति. तो मूळ 'तळेखाजण' या गांवीं राहत असे. याच्या चुलत्यास पटवर्धनांकडून सरंजाम मिळाल्याकारणानें त्यास वारंवार स्वाऱ्यांवर जाण्याचे योग येऊं लागले.

टिपूवरील एका लढाईंत त्यानें तरवार गाजविल्यामुळें, १७९० नंतर पेशव्यांनीं त्यास स्वतंत्र सरदार करून त्याची नेमणूक धारवाडकडे केली. धोंडजी वाघ, कित्तूरकर देसाई, सुरापुरकर नाईक व कोल्हापूरचे रत्नाकरपंत राजाज्ञा यांचा त्यानें बंदोबस्त केला. पुढें वेल्स्लीनें धोंडजी वाघाला तुंगभद्रापार हाकलल्यानें त्यानें मराठ्यांच्या मुलुखाला पुनः त्रास देण्याला आरंभ केला. त्याच्यावर बापू व त्याचा चुलता धोंडोपंत असे उभयतां चालून गेले. या झटापटींत चुलता मरण पावल्यामुळें चुलत्याची सरदारी बापूस मिळाली. १८०६ मध्यें ताई तेलिणीचें बंड मोडून बापू पुण्यास गेला.

१८०७ त प्रतिनिधीनें पुनः बंड केलें; तें मोडून बापू परत जातो न जातो इतक्यांत त्याला पुनः चतुरसिंगाचें बंड मोडण्यासाठीं जावें लागलें. तें बंड १८१२ त त्यानें मोडलेंहि. यानंतर पेशवे व इंग्रज यांच्यामध्यें वांकडें आलें. या वेळीं इंग्रजांनीं बापूस फोडण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण त्या कामीं त्यांस यश आलें नाहीं. गारपिराच्या लढाईंत त्याचे लोक व विंचुरकरासारखे सरदार देखील पळून गेले, तेव्हां श्रीमंतांना सासवडला जाण्यास सांगून स्वतः सैन्यासह तो मागून गेला. जेजुरी, देऊर, पंढरपूर, खेरी, ब्राह्मणवाडी या भागांतून पेशवा जात असतां त्याच्यामागें वीस कोसांवर राहून तो पेशव्याचें रक्षण करीत होता.

कोरेगांवला इंग्रज व पेशवे या उभयतांत घनघोर लढाई झाली. पूर्वेकडून एल्फिन्स्टन व दक्षिणेकडून स्मिथ असे उभयतां पेशव्यावर चालून आले. अशा वेळीं दोघांनाहि थोपवून धरून त्यानें साताऱ्यास पेशव्याला सुखरूप पोहोंचविलें. या पळापळींत एकदां २० फेब्रु. १८१८ ला अष्टे येथें पेशवे जेवणास बसले असतांहि स्मिथच्या आगमनाची वर्दी पुन्हां देऊन बापूनें श्रीमंतांना सावध करण्याचा प्रयत्न केला; पण उलट श्रीमंत त्याच्यावरच गाफिलपणाबद्दल रागावले. तेव्हां पण करून लढाईची तयारी नसतांहि बापू जिद्दीनें शत्रूला तोंड देण्यास निघाला. व घनघोर लढाई होऊन तींत त्याचा अंत झाला. यास दोन पुत्र होते, एक लहानपणीं मारला व दुसरा अष्ट्याच्या लढाईंत कामास आला. याची बायको यमुनाबाई नवरा जिवंत आहे या भोळ्या भावनेनें कित्येक वर्षे सवाष्णपणांत वागत होती. दुसऱ्या नानासाहेब पेशव्याप्रमाणेंच बापू गोखले जिवंत असून अज्ञातवासांत आहे, अशा लोकांच्या परवांपर्यंत भाबड्या समजुती होत्या.

**गोगलगाय**— हा एक चिकट, हळूहळू सरकत जाणारा व हवेंत श्वासोच्छ्वास करणारा कालवासारखा लहानसा प्राणी आहे. याचें कवचासारखें चक्राकार घर असतें. याला चार शिंगें असतात. शिंगाच्या टोकाला एक डोळा असतो. पावसाळ्यांत

गोगलगायी फार दिसतात. त्या बागांत हिंडून वनस्पतींवर राहतात. हे उभयलिंगी प्राणी आहेत. म्हणजे एकाच प्राण्यांत दोन्ही स्त्री–पुरुष जननेंद्रियें असतात. परंतु उत्पत्तीसाठीं स्त्री–पुरुष गोगलगायींचा संयोग व्हावा लागतो.

**गोगलगाय वर्ग**—१. (अॅनेलिडा). ही एक गांडूळ, जळू वगैरे प्राण्यांची जात आहे. यांचीं शरीरें लांब असून त्यांचे कंकणाकृति विभाग असतात. व त्या विभागांमध्यें त्यांचीं चलनशक्ति किंवा गतीचीं इंद्रियें असतात. त्यांचें रक्त लाल असून त्यांचें रुधिराभिसरण रक्तपेशींच्या दुहेरी पद्धतीनें होतें. यांचा पचनव्यूह पूर्णपणें वाढलेला असून त्यामध्यें तोंड शृंगमय जबडे व पुढें येणारे ओंठ, जठर, आंत्र, वगैरे अवयव असतात.

२. (स्लग). हें नांव उदरपाद मृदुकाय प्राण्यांच्या कांहीं जातीस देण्यांत येतें. हे प्राणी जमिनीवरील गोगलगाईप्रमाणेंच दिसतात. परंतु त्यांस घर किंवा कवच नसतें. यांचा रंग करडा असतो. व कांहींची लांबी सहा इंचांपर्यंत आढळते. कांहीं शेतांत आढळतात. यांतील कांहीं मांसाहारी आहेत.

**गोगोल, निकोलाय (१८०९–१८५२)**—एक रशियन ग्रंथकार. याचे जे ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत ते—'ईव्हिनिंग्ज अॅट दि फार्म' (१८३२, शेतावरलि सायंकाळ), 'मिर्गोरॉड' (१८३४), 'डेड सोल्स' कादंबरी (१८४२, मृतात्मे), आणि 'रिव्हायझर' सुखान्त नाटक. 'डेड् सोल्स' ही कादंबरी त्यानें उपहासपर लिहिली असून त्यांत त्या काळच्या रशियन लोकांच्या रानटी चालीरीती आणि सार्वजनिक गैर-

वर्तन यांचें वर्णन केलें आहे. पुढील आयुष्यांत गोगोलची वृत्ति धार्मिक गूढवादी बनली, आणि त्यानें 'कंम्पीशन्स' नामक कांहीं चमत्कारिक कवुली जवाब लिहून ठेवले आहेत. रशियन वाङ्मयांतील वास्तववादाचा गोगोल हा आद्यजनक आहे.

**गोचीड**—हे अष्टपाद वर्गांतील एका जातीचे प्राणी आहेत. हे परोपजीवी असून यांचें शरीर लांबट किंवा गोल आकाराचें असतें व तोंड पोकळ नळीसारखें असून त्यानें ते रक्त शोपून घेतात. हे साधारणतः कुत्रें, मेंढ्या, बैल व इतर प्राण्यांच्या अंगावर वाढतात. रक्त शोपून पुष्ट झाल्यावर मादी जनावरांच्या अंगावरून खालीं पडते व अंडीं घालते. अंड्यांतून बाहेर आलेलीं पिलें देखील जनावरांना चिकटण्याची वाट पाहत गवताच्या टोंकावर जाऊन कित्येक दिवस वसतात.

**गोझो**—हें बेट भूमध्य समुद्रांत ब्रिटिशांच्या मालकीचें आहे. तें माल्टा बेटाच्या वायव्येस ४ मैलांवर असून त्याचें क्षे. फ. २६ चौ. मैल आहे, व लो. सं. २०,००० आहे. येथें धान्य व फळें होतात, पण मुख्य पीक कापूस आहे. मुख्य शहर राबाटो याची लो. सं. ३,००० आहे.

**गोटेबोर्ग**—स्वीडनमधील दुसरें मोठें शहर आणि मुख्य बंदर. हें स्वीडनच्या वायव्य किनाऱ्यावर आहे. स्वीडन देशांतल्या सर्व भागांना जोडणारी रेल्वे व कालवे येथून निघतात. येथें जहाजें बांधण्याचे कारखाने, पिठाच्या गिरण्या, साखर शुद्ध करण्याचे कारखाने व इतर अनेक प्रकारचे कारखाने आहेत. येथून अशुद्ध लोखंड, कागद, धान्यें, आगपेट्या, सावण, लांकडाचा रांधा, वगैरे माल परदेशीं जातो. येथील बंदरांत मोठाल्या गोद्या असून तेथें २९ फूट खोलीचीं जहाजें येऊं शकतात. या शहराची लोकसंख्या २,०९,३४८ आहे. या शहरांत दारूच्या दुकानांना मक्ते देण्याची एक सुधारलेली पद्धत १८६५ पासून चालू आहे. ती अशी कीं, दारूच्या दुकानाचे मक्ते एका कंपनीला देण्यांत येतात, आणि त्या कंपनीनें खर्च भागून व भागांवर ६ टक्के डिव्हिडंड देऊन जो फायदा उरेल ती रक्कम शहराच्या खजिन्यात द्यावी ( नगरपालिकेच्या खर्चाकरितां ). ही पद्धत त्यांत आणखी सुधारणा करून उत्तर युरोपांतील अनेक देशांत अलीकडे अमलांत आणलेली आहे.

**गोट्या**—( लखोट्या ). मुलांचा एक खेळ. गोट्या किंवा लखोट्या कांचेच्या, दगडाच्या किंवा लाखेच्या असतात. गल्लींत किंवा वर्दीत गोटी टाकून किंवा दुसऱ्याच्या गोटीवर आटीनें नेम मारून दहा अंक करावयाचे म्हणजे जिंकली. हे अंक मोजण्याचे वाक्प्रचार गंमतीदार असतात—

१ एकल काजा; २ दुनेबाजा ( डुब्बी राजा ); ३ तिने ताजा ( तिराणी मंजा ); ४ चवलय ( चमूक ) चेंडू; ५ पांची पांडव ( पांच पिंडोली ); ६ सय्या ( छिक्के ) दांडू; ७ सात सूतली; ८ आठ उठली ( आठ घर नळी ); ९ नवमन् किळी ( नाडा ); १० दशे गोखली ( दसमन पाडा ).

कधीं दहाच्या पुढें अंक म्हणतात ते असे—

११ अकरं खेचे; १२ बारंचेटे; १३ तेरा खाडी; १४ चौदा माठी; १५ पंधरा पालवे; १६ सोळे किरंजन; १७ सतारी शिळी; १८ अठारी गुर्गुर; १९ गुणि गुणि चकचक; २० वीसक फकफक. ( या नांवांत पाठभेद पुष्कळ असतात ).

ज्याच्यावर डाव आला असेल त्याला डाव किंवा 'घोडी' द्यावी लागते.

दुसऱ्याच्या गोट्या जिंकण्याच्या खेळास वदीचा खेळ म्हणतात.

**गोट्याळ**—भूस्तरशास्त्रामधील ही कांहीं एका दगडांस देण्यांत आलेली संज्ञा आहे. असे दगड पाण्याच्या प्रवाहांत वाहत असलेले गोटे असून ते सिकतामय, चुनखडीमय किंवा दुसऱ्या एखाद्या संधानकानें घट्ट बसून एकत्र जोडलेले असतात. यांना 'पुडिंग स्टोन'–साटोरी–दगड म्हणतात. जेव्हां यांस जोडणारें संधानक द्रव्य कुजून जातें तेव्हां त्याच्यापासून एक प्रकारची जमीन तयार होते; पण ती रुक्ष व पाषाणमय असते.

**गोठण थंडी**—( फ्रॉस्ट ). जेव्हां जमिनीवरील पदार्थांवर बर्फ पडतें, तेव्हां गोठण थंडी पडली म्हणतात. हवेंतील उष्णतामान या वेळीं ३२° फारेन किंवा त्याहि खालीं असतें व दंव गोठलेलें असतें. अशा हवेमुळें पिकांचें फार नुकसान होतें. पण या गोठण थंडींत खडकांतील अणूंचें विघटन होत जाऊन माती तयार होत असते.

**गोठीव दूध**—डब्यांतून मिळणारें गोठीव दूध वाटेल तितकें दिवस टिकतें व तें पाण्यांत मिसळून साध्या दुधाप्रमाणें कोणत्याहि कामाकरितां वापरण्यांत येतें. साधें ताजें दूध आटवून त्यातील पाण्याचा अंश नाहींसा झाला म्हणजे गोठीव दूध तयार होतें. हें टिकाऊ व्हावें म्हणून त्यांत साखर घालण्यांत येतें; त्यामुळें दुसरें कोणतेंहि रासायनिक द्रव्य टिकाऊपणाकरितां घालावें लागत नाहीं. यामध्यें चौपट किंवा पांचपट पाणी घालून तें वापरण्याकरितां घ्यावें. रासायनिक द्रव्य नसलेलें गोठीव दूध हें लहान मुलांकरितांहि उपयोगांत आणतां येतें. याकरितां दुधांत मिसळावयाचें पाणी उकळून घ्यावें. मुलांस पाजावयाच्या दुधाची उष्णता मनुष्याच्या शरीराच्या उष्णतेइतकी म्हणजे ९८ अंश फा. इतकी असावी.

**गोंड**—मध्यप्रांत आणि मध्य हिंदुस्थान यांतील एक जात. यांच्या प्रदेशाला गोंडवन असें नांव आहे. यांची लोकसंख्या तीन लाखांवर असून तीपैकीं अडीच लाखपर्यंत मध्यप्रांतांतच

आहेत. ही द्राविड वंशीय जात असावी. १३ व्या ते १७ व्या शतकापर्यंत मध्यप्रांतांत यांचीं लहान लहान राज्यें होतीं. अठराव्या शतकांत मराठ्यांचें साम्राज्य वाढल्यावरोबर यांची सत्ता नाहींशी होऊन गोंड लोक वन्यधर्मीयांच्या सदरांत पडूं लागले. शूर गोंड राजांच्या कथा पुष्कळ आहेत.

यांच्यांत बऱ्याच पोटजाती असून त्यांत उच्चनीच भाव बराच आहे. राजगोंड ही वरिष्ठ जात होय. या जातींतून मोठे जमीनदार व राजे निघाले असल्यानें हिला मोठा मान आहे. क्षत्रियांप्रमाणें हे राहतात. गोंडांत गोत्रें आहेत. सगोत्रविवाह वर्ज्य मानतात. राक्षसविवाहपद्धति अस्तित्वांत आहे. नवराबायको एकाच घरीं काम करतात. हे लोक रानडुकरें खात असल्यास हिंदु धर्मांतील चातुर्वर्ण्य जातींत यांचा रोटीबेटीव्यवहार होऊं शकत नाहीं. यांच्यांत शिमगा हा सर्वांत मोठा सण असतो. दूल्हादेव सर्वसामान्य आहे. गारगोट्यांच्या प्रतीकांत पूर्वजांची पूजा करण्याची वहिवाट आहे. राजगोंडांखेरीज इतर गोंड प्रेतें पुरतात. गोंडांचा मुख्य धंदा शेती व मजुरी आहे. गोंडांची बोली द्राविडीची एक पोटभाषा दिसते. कानडी आणि तेलगू यांना ती जवळची आहे. या भाषेत कांहीं गाणीं व म्हणी सांपडतात.

**गोंड गोवारी**—ही मराठी जिल्ह्यांतील गुरें राखणारी जात गोंड व गोवारी यांच्या मिश्रणानें बनली आहे. लो. सं. सुमारें दोन हजार आहे. रानांत फिरणाऱ्या गोंड व गोवारी तरुण-तरुणींचा स्नेह जमून जी स्वैर संतति झाली तीच ही जात आहे. कुलांचीं नांवें गोंडांपासून घेतलेलीं आहेत. गोंडांप्रमाणें यांची उपासनापद्धति आहे. विधवाविवाह दिव्याभोंवतीं साडेतीन प्रदक्षिणा घालून होतो. यांची वैवाहिक नीति फारच हलक्या प्रकारची आहे. बायकोच्या सर्व व्यभिचारांबद्दल नवरा क्षमा करतो. गोंडांप्रमाणें यांच्याहि बायका नितंबापर्यंत गोंदवतात; कारण न गोंदविलेल्या स्त्रियांस देवपूजा करतां येत नाहीं.

**गोडबोले, कृष्णशास्त्री** (१८३१–१८८६)—एक महाराष्ट्रीय ग्रंथकार व ज्योतिषी. यांचा जन्म वांई येथें झाला. विद्याभ्यास पुणें येथें मराठी शाळेंत, नंतर संस्कृत पाठशाळेंत व पूना कॉलेजांत झाला. पाठशाळेंत त्यांनीं ज्योतिषाचें अध्ययन केलें. पुढें १८५५ सालीं नॉर्मल शाळेंत ते शिक्षक झाले. १८६४–६५ सालीं मुंबईच्या कुलाबा वेधशाळेंत त्यांची नेमणूक झाली. सन १८७८ मध्यें हे व वामन कृष्ण जोशी गद्रे या दोघांनीं मिळून ग्रहलाघवीचें मराठी भाषांतर करून छापलें. १८५४ सालीं हडनच्या बीजगणिताचें मराठी भाषांतर त्यांनीं प्रसिद्ध केलें. युक्लिडच्या भूमितीच्या पहिल्या ४ पुस्तकांचें भाषांतर (सन १८७४), वेदांचें प्राचीनत्व (१८८२), लघुचिंतामणीचें मराठी भाषांतर (१८६७) ही त्यांची ग्रंथसंपत्ति होय.

**गोडबोले, डॉ. नरसिंह नारायण** (१८८८– )—एक हिंदी रसायनशास्त्रज्ञ व शास्त्रीय संशोधक. यांनीं एम्. ए. ची पदवी घेतल्यानंतर रसायनशास्त्राचे प्राध्यापक म्हणून कराचीच्या डी. टी. कॉलेजमध्यें कांहीं दिवस काम केलें. नंतर हे शास्त्राचे प्राध्यापक म्हणून लाहोरच्या सरदार दयालसिंग कॉलेजमध्यें गेले. यानंतर पुढें बनारस हिंदु विश्वविद्यालयांत सेवानिवृत्त होईपर्यंत राहिले. १९१७–१८ या सालीं यांनीं जपान, फिलिपाइन बेटें वगैरे ठिकाणीं प्रवास केला व तेथून परत आल्यावर औद्योगिक रसायनशाखेची स्थापना केली. बनारस हिंदु विश्वविद्यालयांतील प्राध्यापकत्वाचें काम संभाळून यांनीं लहान प्रमाणावर कांहीं रासायनिक पदार्थ तयार करण्यास सुरुवात केली. यानंतर हे जर्मनींत गेले व सन १९२३–२५ या कालांत यांनीं बर्लिन विश्वविद्यालयांतून 'शेंगदाण्याचें पृथक्करण' हा विषय घेऊन पीएच्. डी. ही उच्च पदवी मिळविली. जर्मनीहून परत आल्यावर बनारस हिंदु विश्वविद्यालयातर्फे 'कॉलेज ऑफ टेक्नॉलॉजी' ची स्थापना केली.

तेलें, साबण व चरबी यांचें पृथक्करण करण्यांत हे कुशल आहेत. गृहोद्योग, ग्रामोद्योग व लहानसहान धंदे हिंदुस्थानांत कोणत्या पद्धतीवर चालवावेत याबद्दलची पाहणी करण्याकरितां हे जपानला पुन्हां जाऊन आले. रबर, कांच्याच्या पेट्या, शिसपेन्सिली यांसारख्या धंद्याबाबत हे तज्ज्ञ गणले जातात.

**गोडबोले, परशुराम (तात्या) बल्लाळ** (१७९९–१८७४)—एक महाराष्ट्रीय कवि आणि ग्रंथकार. गोडबोले यांचें मूळगांव रत्नागिरी जिल्ह्यांतील पावस गोळप होय. विद्याभ्यास पुरा झाल्यानंतर प्रपंचाच्या निर्वाहाकरितां ते पुण्यास जोगांच्या पेढीवर कारकून राहिले. कारकुनी पेशांतहि तात्यास काव्यें वाचण्याचा फार नाद असे व सवड काढून ते मराठी काव्याचा भाषाशास्त्रदृष्ट्या अभ्यास करीत. त्यावरून मराठी भाषेच्या मार्मिकपणाबद्दल त्यांचा चांगला लौकिक होऊन त्या वेळीं 'बोर्ड ऑफ एज्युकेशन' ह्या मंडळीनें मराठी भाषेचा कोश करण्याकरितां जीं माणसें नेमलीं त्यांत तात्यांची योजना झाली. मेजर कँडी आणि तात्या यांचा प्रथम परिचय याच वेळीं झाला. इ. स. १८५५ मध्यें जेव्हां कँडीची मराठी ट्रान्सलेटरच्या जागीं नेमणूक झाली तेव्हां त्यानें आपल्या खास पंडिताच्या जागीं तात्यांची नेमणूक करून घेतली. ह्या जागेवर ते अखेरपर्यंत होते.

तात्यांनीं मूळ संस्कृतावरून शाकुंतल, वेणीसंहार, उत्तररामचरित, मृच्छकटिक, नागानन्द, आणि पार्वतीपरिणय हीं

नाटकें लिहिलीं. नवनीत भाग पहिला आणि दुसरा हीं त्यांचीं निवडक मराठी कवितांचीं पुस्तकें सर्वत्र प्रसिद्ध आहेत. 'सर्वसंग्रह' चालविण्यास माधव चंद्रोबांना तात्यांची पुष्कळच मदत झाली.

**गोडबोले, रघुनाथ भास्कर** (मृ. १७८७)—गेल्या शतकांतील मराठी भाषेतील पहिले कोशकार. यांचा जन्म वाई येथें झाला. हे परमार्थवृत्तीचे असून निजाम राज्यांतील नांदेडजवळील हंसराज नांवाच्या साधूकडून यांनीं अनुग्रह घेतला होता.

(१) मराठी भाषेचा नवीन कोश, (२) हंसकोश, (३) भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश, (४) मराठी–इंग्रजी कोश, (५) भारतवर्षीय अर्वाचीन चरित्रकोश हे यांचे कोश पाहिले असतां यांच्या अलौकिक ज्ञानदानलालसेची खात्री पटल्या-वांचून राहत नाहीं. हे सनातनी वृत्तीचे असल्यानें वेदशास्त्रा-विरुद्ध असलेल्या मतांचा यांनीं कडक निषेध केलेला दिसून येतो. तसेंच वैदिक ग्रंथांतील माहिती समाजांतील सर्व थरांतील लोकांना देणें शास्त्रसंमत नाहीं म्हणून त्यांनीं ती दिलेली नाहीं. आपला प्राचीन चरित्रकोश शके १२९२–९८ या सात वर्षांत श्री. रामशास्त्री सुरपुरकर यांच्या साहाय्यानें यांनीं पुरा केला.

**गोंडल संस्थान**—मुंबई, काठेवाडांतील एक संस्थान. याचें क्षे. फ. १,०२४ चौ. मै. व लो. सं. (१९४१) २,४४,५१४ आहे. एकंदर ३,५२,०९४ एकर जमीन (एकूण ६,४७,१६९ पैकीं) लागवडीखालीं होती. गोंडल आणि पानेली हीं दोन मोठीं तळीं पाण्यासाठी चांगलीं उपयोगी पडतात. मुख्य पिकें बाजरी, भुईमूग, ऊस, ज्वारी, गहूं व भात हीं होत. संस्थानांत कापसाचें आणि लोंकरीचें कापड, सतरंज्या, जरतार, भांडीं, लांकडी खेळणीं, हस्तीदंती बांगड्या, इ. माल तयार होतो. तेलाच्या, पिठाच्या गिरण्या, कापसांतील सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने, छापखाने, आगकाड्यांचा व साबणाचा कारखाना, कातडीं कमावण्याचे कारखाने, इ. चालू आहेत. संस्थानांत १७२ प्राथमिक शाळा, ३ हायस्कुलें, एक कला-शिक्षण-संस्था आहे. प्राथमिक व उच्च शिक्षण मोफत आहे. मुलींना शिक्षण सक्तीचें केलेलें आहे. संस्थानांत कर मुळींच नाहींत. आगगाडीचा रस्ता २१४ मैल आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें ६० लाख रुपये आहे. ब्रिटिश सरकारला खंडणी १,१०,७२१ रु. द्यावी लागे.

गोंडलचे अधिपति जाडेजा रजपूत वंशांतील आहेत. यांचा मूळपुरुष कुंभाजी १७ व्या शतकांत होता. १८०७ सालीं ब्रिटि-शांशीं तहनामा झाला. मागचे ठाकूर भगवत्सिंहजी चांगले सुशिक्षित व पदवीधर होते. त्याना वैद्यकी चांगली येत असून त्यांनीं आयुर्वेदीय औषधांचा मोठा कारखाना चालविला होता. त्यांच्या कारकीर्दीत संस्थानची विशेष भरभराट झाली. भगवद्-गोमंडल नांवाचा गुजराथी भाषेचा कोश तयार करण्याचें मोठें काम त्यांनीं अंगावर घेतलें होतें. त्यांनीं इंग्रजींत आयुर्वेदाचा इतिहास लिहिला होता. सध्यांचे ठाकूरसाहेब भोजराजजी १९४४ सालीं गादीवर आले. हेहि चांगले शिकलेले आहेत. यांना ११ तोफांच्या सलामीचा मान आहे. आतां हें संस्थान सौराष्ट्र संघांत सामील झालें आहे.

गोंडल हें राजधानीचें शहर राजकोट–जेतलसर रेल्वेवरचें स्टेशन आहे. शहराला तटबंदी आहे. लो. सं. सु. वीस हजार.

**गोंडवन**—गोंडांचा प्रदेश. हा मध्यप्रांत आणि ओरिसा या इलाख्यांत मोडत असे. आज फक्त नांव उरलें आहे. हा प्रदेश बहुतेक डोंगराळ असून यांत विंध्य आणि महादेव पर्वत यांचा पूर्वभाग येत असे. बेटवा, महानदी, नर्मदा व तापी या नद्या यांतून वाहत होत्या. डॉ. केतकर यांनीं 'गोंडवनांतील प्रियंवदा' या आपल्या पहिल्या कादंबरीनें गोंडवनाविषयीं बाहेर उत्सुकता वाढविली आहे. गोंड पाहा.

**गोंडा**—संयुक्त प्रांत, फैजाबाद विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,८२७ चौ. मैल. लो. सं. (१९४१) १,७१,९६४. जिल्ह्यांत ८ शहरें व २,७९४ खेडीं आहेत. भाषा अवधी (हिंदीची शाखा) आहे. बहुतेक लोक शेतकरी आहेत. गोग्रा आणि राप्ती या नद्या जिल्ह्यांतून वाहतात. हवा रोगट; पाऊस-मान ४४ इंच. कापसाचा हलका कपडा कांहीं ठिकाणीं तयार होतो. उत्रौला येथें चांगलें कुंभारकाम होतें. नेपाळशीं थोडा व्यापार चालतो. पूर्वी हा जिल्हा कोसल साम्राज्याचा एक भाग होता. पुढें रजपूत घराणीं नांदत होतीं. १५ व्या शतकात कल्हण घराणें प्रमुख होतें. पुढें हीं घराणीं मुसलमानी अमलाखालीं गेलीं. १८५६ त हा जिल्हा ब्रिटिशांकडे आला. १८५७ च्या क्रांतियुद्धांत गोंडाचा राजा आणि तुळसीपूरची राणी यांनीं ब्रिटिशांविरुद्ध ठाण मांडलें पण उपयोग झाला नाहीं.

गोंडा शहर बंगाल नॉर्थवेस्टर्न रेल्वेचें मोठें जंक्शन आहे. हें गांव मानसिंगानें अकबराच्या वेळीं वसविलें म्हणतात. येथें दोन तलाव आहेत.

**गोणपाट**—तागाचें कापड. गोणपाट तागाच्या वाखापासून करतात. याचा वस्तू बांधण्याकरितां व बारदान म्हणून फार मोठ्या प्रमाणावर उपयोग होतो. तसेंच याचें जाडेंभरडें कापडहि होतें. लिनोलियम, व खुर्च्या, कोचें वगैरेंच्या गाद्या करण्याकरितां हें वापरतात. याच्या अनेक जाती आहेत. हें कलकत्ता व डंडी येथें तयार होतें.

**गोतिए, थिओफाइल** (१८११-१८७२)— हा फ्रेंच कवि आणि टीकाकार असून १८३२ मध्यें 'आल्बेर्टस' ही त्याची कविता प्रसिद्ध झाली. तथापि 'मादम्वांसल द मोपँ' या अद्भुत कल्पित कादंबरीनें त्याला फार मोठें यश मिळालें. प्रवासवर्णनें, कादंबऱ्या व लघुकथा त्यानें बऱ्याच लिहिल्या आहेत.

**गोत्रें**—ऋग्वेदांत गोठा, कळप, दुर्ग ह्या अर्थी गोत्र शब्द वापरलेला आहे. गोत्रऋषि म्हणजे पूर्वज व त्या गोत्रांतील सर्व लोक त्याचे वंशज असा समज सध्यां प्रचलित आहे. अलीकडील संशोधनावरून विद्या देणारा तो गोत्रऋषि असें म्हणूं लागले आहेत. त्याचप्रमाणें अनेक ब्राह्मण कुटुंबांच्या वसाहती स्थापन करणारे त्या ब्राह्मणांचे गोत्रऋषी बनले, असेंहि वेगवेगळ्या ब्राह्मण जातींतील गोत्रसंख्येचा विचार करतां म्हणतां येण्यासारखें आहे. वायुपुराणांत असें म्हटलें आहे कीं, "वायुपुरांत १८,००० द्विज व ३६,००० शूद्र होते. त्यांचा पुढारी मातरिश्वा तो त्यांना म्हणाला, तुमच्यांत अकरा गोत्रें असतील." सारांश, गोत्र शब्दाच्या अर्थाविषयीं अनिश्चितता आहे. अगस्तिसहित सप्तर्षींच्या नातवापासून पुढील पिढीला गोत्र म्हणतात, असें पाणिनी म्हणतो; परंतु पाणिनीच्या पूर्वी अगस्त्यसहित सप्तर्षींना गोत्रकार ही संज्ञा प्राप्त झाली होती. पाणिनीच्या वेळीं गोत्र शब्द रक्तसंबंध सुचवीत असे असें दिसतें. गोत्रें ब्राह्मणांना होतीं. क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांना नव्हतीं. ते पुरोहितांचें गोत्र घेत. गोत्रऋषि ब्राह्मण असतो. हल्लीं क्षत्रिय, वैश्य, गोत्रें सांगतातच. पण पुष्कळ शूद्रांनाहि गोत्रें असल्याचें त्र्यंबकेश्वराच्या उपाध्यायांच्या वह्यांवरून दिसतें. गोत्राचा अपभ्रंश गोत असा झाला आहे. हा शब्द पिण्डसंबंध दर्शवितो. उपनयनानें गोत्र प्राप्त होतें तें निराळें. लग्न जमवितांना गोत्र पाहावें लागतें. सगोत्र विवाह शास्त्रानें निषिद्ध ठरविला आहे. परंतु आतां कायद्यानें ही अडचण दूर झाली आहे. गोत्रऋषी हजारों आहेत.

**गोत्रगमन**—(इन्सेस्ट). या शब्दाचा कायद्यांत अर्थ असा आहे कीं, विवाहासंबंधीं कायद्यांत ज्या नातेवाईक स्त्री-पुरुषांचा विवाह होण्यास कायद्याची मनाई आहे, अशा स्त्री-पुरुषांचा लैंगिक संबंध हें कृत्य इंग्लंडांत गुन्हा असून त्या गुन्ह्याला किमान तीन वर्षें व कमाल सात वर्षें सक्तमजुरीची कैद ही शिक्षा आहे. स्कॉटलंडांत व युनायटेड स्टेट्सच्या कांहीं भागांतहि हें कृत्य कायद्यानें गुन्हा ठरविलेलें आहे. हिंदुशास्त्रांत देखील गोत्रगमन पाप म्हटलें आहे.

**गोत्रांतर विवाह**—आपल्या कुटुंबाबाहेर, गोत्राबाहेर, जमातीबाहेर लग्नें करण्याची प्रथा फार प्राचीन आहे. हिंदूंमध्यें एक गोत्र, एक प्रवर, एक देवक असेल तर दोन पक्षांत लग्नव्यवहार होत नाहीं. सगोत्रविवाहमान्यतेचा कायदा आतां झाला आहे. ऑस्ट्रेलियांतील आदिवासी, मोंगल लोक आणि अमेरिकन इंडियन लोक यांच्यांत आपल्या जमातींत लग्नें करीत नाहींत; विरुद्ध जमाती त्यासाठीं पाहतात. ही चाल कशासाठीं पडली याबद्दल समाजशास्त्रज्ञांत एकमत नाहीं. कोणी आर्थिक परिस्थिति, तर कोणी आनुवंशिक गुणदोष, तर कोणी जीवशास्त्रीय सिद्धान्त पुढें करतात. स्वतःच्या जमातींतील स्त्रीशीं विवाह करणें हें भ्याडपणाचें असून परकीय जमातींतील स्त्री हरण करून आणणें हें शौर्याचें कृत्य होय, अशी समजूत बऱ्याच असंस्कृत समाजांत अद्यापि आढळून येते. तीहि याच्या मुळाशीं असणें संभवनीय आहे. हिंदूंत पुन्हां प्रतिलोम विवाह निषिद्ध मानला आहे.

**गोंदणें**—शरीरावर सुईनें किंवा एखाद्या अणकुचीदार शस्त्रानें टोंचून व त्यांत निरनिराळे रंग भरून कायमच्या आकृती उठविणें या क्रियेस गोंदणें म्हणतात. गोंदण्याचा प्रघात निरनिराळ्या संस्कृतीच्या अवस्थांतील निरनिराळ्या लोकांत सर्वत्र आढळून येतो. उदाहरणार्थ, ऑस्ट्रेलिया व पॉलिनेशिया यांतील लोक, जपानी ऐनु, व प्राचीन मिसरी या सर्व लोकांत गोंदण्याची चाल आढळते. गोंदण्याच्या कलेची परिसीमा न्यूझीलंडमधील माओरी लोक व जपानी यांत गांठली गेली असें म्हणतां येईल. परंतु अलीकडे सुधारलेल्या संस्कृतीच्या प्रसारामुळें या दोन्ही देशांतील लोकांनीं ही चाल आतां बहुतेक सर्वस्वीं टाकून दिलेली आहे. अद्यापि लष्करांतील शिपाई लोक गोंदवून घेतात. आपल्याकडे खालच्या वर्गांतील बायकांतून गोंदवून घेण्याची आवड दिसून येते.

**गोंदवलेकर महाराज** (१८४४-१९१३)—रामदासी परंपरेंतील एक अर्वाचीन सत्पुरुष. यांना कांहीं रामदासांचा दुसरा अवतार समजतात. हे सातारा जिल्ह्यांतील दहिवडीचे शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण असून रावजी व गीताबाई यांचे पुत्र होत. वऱ्हाडांत असतां यांनीं श्रीतुकाराममहाराज येळवीकर यांना आपले गुरु केलें. उज्जयिनीच्याबाहेर वनांत यांनीं बारा वर्षें घोर तपश्चर्या केली. तसेंच काशी, रामेश्वर, अयोध्या या सर्व तीर्थयात्रा यांनीं यथासांग पार पाडल्या. गोंदवलें, पंढरपूर, वऱ्हाड, आटपाडी, इत्यादि ठिकाणीं यांनीं रामदासी पंथाचा व रामनामाचा फार मोठ्या प्रमाणावर प्रसार केला. शिस्त, टापटीप यासारख्या गुणांचा यांना व्यवहारांत चांगला उपयोग होई. श्रीसमर्थांच्या उपदेशानुसार यांचें वर्तन असे. कुलधर्म-कुलाचार पाळण्याकडेहि यांचा विशेष कटाक्ष असे. गाईब्राह्मणांवर यांची श्रद्धा असे. नाम-

स्मरणाचा छंद यांना कायमचा लागलेला होता. महाराष्ट्रांत यांचे शिष्य व भक्त बरेच आहेत.

**गोदावरी जिल्हा**—मद्रास, उत्तरेकडील किनाऱ्यावरील जिल्हा. याचे पूर्व आणि पश्चिम असे दोन विभाग आहेत. पूर्व-भागांत एजन्सी आणि सपाटी प्रदेश आहे. पश्चिम भागाचें क्षे. फ. २,४३४ चौ. मै.. लो. सं. (१९४१) १३,८०,०८८. गोदावरी नदी जिल्ह्याच्या मध्यभागांतून वाहते. समुद्रकिनारा १७२ मैल आहे. कोकोनाड हें व्यापारी बंदर आहे. शें. ९६ लोक तेलगू असून बहुतेक शेतकी करून राहतात. गोदावरीच्या मुखाजवळची लंका बेटाची जमीन फार सुपीक आहे. जिल्ह्यांतील ½ जमीन जंगल आहे. मुख्य पीक तांदूळ व तंबाखू. शें. ६२ जमीन पाण्याखालीं आहे. कालवे व तळीं पुष्कळ आहेत. जिल्ह्यांत कोळशाच्या खाणी आहेत. साखरेचे व तिळाचे कारखाने, मिठागरें, तेलाचे घाणे, इ. उद्योगधंदे आहेत. बाहेर माल पुष्कळ जातो. राजमहेंद्री व अंबाजीपेठ हीं मुख्य व्यापाराचीं केंद्रें आहेत. शिक्षणांत जिल्हा पुढारलेला आहे.

प्राचीन काळीं हा प्रदेश कलिंग आणि वेंगी राज्यांत मोडत असे. आंध्र, पल्लव, चालुक्य व गणपति राजे यांच्या अमलाखालून क्रमानें जात जात गुलबर्ग्याच्या सुलतानाकडे हा आला (१४७०). औरंगजेबानें हा जिंकल्यावर मोंगली सत्ता बळकट राहिली नाहीं व त्यामुळें जमीनदार स्वतंत्र झाले. सतराव्या शतकाच्या मध्यापासून युरोपियन व्यापारी आपलें बस्तान बसवूं लागले होते. १७६५ मध्यें हा मुलूख कायमचा इंग्रजांकडे आला.

**गोदावरी नदी**— दक्षिण हिंदुस्थानांतील मोठी नदी. हिचा उगम नाशिकजवळ त्र्यंबकेश्वरीं होतो. या भागांत गोदातीरीं रामचंद्रांचा वास असल्याकारणानें या स्थानांना क्षेत्राचें माहात्म्य प्राप्त झालें आहे. सिंहस्थांत गोदेच्या स्नानाचें विशेष पुण्य मानतात. हिच्या काठीं पैठण हेंहि एक मोठें क्षेत्र आहे. ही मध्यप्रांत व हैद्राबाद, तसेंच हैद्राबाद आणि मद्रास इलाखा यांच्या कांहीं सरहद्दीवरून वाहत पुढें जाते. हिला प्रवरा, पूर्णा, मांजरा, वर्धा, प्राणहिता, इ. नद्या मिळतात. हिची एकंदर लांबी ९०० मैल आहे. राजमहेंद्री येथें हिच्यावर १॥ मैलाचा रेल्वेचा पूल आहे. ठिकठिकाणीं धरणें बांधलेलीं आहेत. मुखप्रदेश फार सुपीक आहे. धवलेश्वर धरणापासून कालवे काढलेले आहेत. यांतून बोटी जातात. गोदावरीच्या कालव्या-खालीं बरीच जमीन भिजते.

**गोदी**—जहाजामध्यें माल भरणें किंवा उतरणें, अथवा जहाजें दुरुस्त करणें याकरितां बंदरामध्यें भिंती घालून जीं आवारें बांधण्यांत येतात त्यांस गोदी (डॉक) म्हणतात. ज्या गोद्यां-मध्ये केवळ भरतीचें, पाणी भरतें त्यांचीं तोंडें समुद्राच्या बाजूस खुलींच असतात. या गोदींतील पाणी भरती–ओहोटीप्रमाणें कमीजास्त खोल असतें व होतें. बंद गोद्यांचीं दारें झडपांनीं

इंग्लंडमधील सौदॅम्प्टन गोदी

वगैरे बंद केलेलीं असतात, त्यामुळें अशा गोद्यांत पुष्कळ खोल पाणी राखून ठेवतां येतें किंवा पाण्याचा पृष्ठभाग उंच करतां येतो. गलबतांची तपासणी करावयाची असली, त्यांस रंग द्यावयाचा असला, किंवा त्यांची दुरुस्ती करावयाची असली म्हणजे कोरड्या गोदीचा उपयोग करतात. अशी गोदी प्रथम गलबत आंत येतांना पाण्यानें भरलेली असते व दरवाजे उघडून गलबत आंत घेण्यांत येतें. नंतर दरवाजे बंद करण्यांत येतात, आणि आंतील पाणी पंपाच्या साहाय्यानें काढून टाकण्यांत येतें व गलबत हळूहळू गोदीच्या मध्यभागीं असलेल्या ठोकळ्यांच्या रांगेवर कणा टेकून उभें राहतें. गोदीच्या बाजूस पायऱ्या बांध-लेल्या असतात. त्यांच्यावर लांकडाचे तीर देऊन गलबत उभ्या स्थितींत ठेवण्यांत येतें. सुक्या गोदीचेंच काम तरत्या गोदीनें होतें व ती गोदी म्हणजे एक पोकळ बाजू असलेली पोलादी पेटी असते. या पोकळ भिंतींत पंप वगैरेंची योजना असते. पेटींत पाणी सांठवितां येतें. हें पाणी वाटेल तेव्हां भरतां-काढतां येतें व त्याप्रमाणें ही गोदी पाण्यांत बुडते किंवा तरंगते. अशा-गोदींत कांहीं खण केलेले असतात. ते वेगवेगळे करतां किंवा रिकामे करतां येतात. अशा गोदीच्या खालच्या खणांत पाणी भरून ती पाण्यांत खोल नेतां येते व तींत जहाज घेऊन तें किनाऱ्याकडे आणतां येतें. सौदॅम्प्टन येथील तरत्या गोदींत ६०,००० टन वजनाचीं गलबतें घेतां येतात.

**गोंधळ**—देवीप्रीत्यर्थ एक कुलधर्म. उच्च वर्णीयांत लग्नादि समारंभानंतर किंवा कांहीं नवस म्हणून गोंधळ करतात. हा गोंधळी लोक रात्रीं घालतात. लांकडी चौरंगावर चोळखण हातरून त्यावर कलश ठेवतात व त्याची पूजा मुख्य गोंधळी

यजमानासाठीं करतो. नंतर दिवटी पेटवून देवतांचें आव्हान करतो. त्याचे साथीदार वाद्यांवर साथ करतात. नंतर कांहीं कीर्तन, आख्यान केल्यानंतर पोवाडे म्हणतो. हे पोवाडे बहुतेक ऐतिहासिक असतात. गोंधळ म्हणजे मुख्यत्वें देवीसाठीं जागर; अशा अर्थानें हा कुलधर्म असतो.

**गोंधळी**—या जातीची विशेष वस्ती हैद्राबाद संस्थान आणि वऱ्हाड-मध्यप्रांत या भागांतून आहे. मुंबई इलाख्यांत गुजराथखेरीजकरून सर्व इलाखाभर हे लोक पसरलेले आहेत. पण एकंदर लोकसंख्या हजाराच्या आंत आहे. यांचें मूळ वसतिस्थान माहूर व तुळजापूर हें असून आपण २००-३०० वर्षांपूर्वी दक्षिणेंत आलों असें ते सांगतात. हे अंबाबाई भवानीचे सेवेकरी असल्यामुळें खालच्या जातीच्या लोकांत यांना चांगला मान मिळतो. हे लोक 'गोंधळ' करून व भवानीच्या नांवावर भिक्षा मागून आपलें पोट भरतात. संस्कार व रीतिरिवाज याबाबतींत हे कुणब्यांप्रमाणें वागतात. यांचा दर्जा मराठ्यांहून खालीं आहे.

**गोध्रा**—मुंबई, पंचमहाल जिल्ह्यांतील उत्तरेकडचा तालुका. क्षेत्रफळ ५८४ चौ. मैल. यांत एक शहर व २२२ खेडीं आहेत. येथें शेती फार हलक्या दर्जाची आहे. हवा प्रकृतीस अपायकारक अशी आहे. पावसाचें मान सरासरी चाळीस इंच आहे. मही व पानम या दोन नद्या तालुक्यांत आहेत व मका हें मुख्य पीक निघतें. लो. सं. १,९५,३९८.

गोध्रा हें तालुक्याचें मुख्य ठिकाण. पंचमहाल जिल्ह्याचेंहि हेंच मुख्य ठिकाण आहे. गोध्रा-रतलाम रेल्वे येथून जाते. मुसलमानांच्या वेळीं अहमदाबादचा सुभेदार येथें राहत असे. नंतर रेवाकांठा पोलिटिकल एजंट येथें असे. चामडें कमावण्याचे बरेच कारखाने आहेत. एक कापडाची गिरणी आहे. गोध्रा हे जळाऊ व इमारती लांकडांच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. शहराजवळ एक मोठा तलाव आहे. लो. सं. ४१,९८६.

**गोनिआटाईट**—हा एक कवचधारी, शीर्षपाद प्राणिवर्ग असून तो आज नष्ट झालेला आहे. याच्या अनेक जाती पाडण्यांत येतात व याचे अवशेष ऑर्डोव्हिशियन कालापासून अंगारप्रस्तर (कार्बोनीफेरीस) युग कालापर्यंत आढळतात.

**गोप**—गवळी, गुराखी यांचें एक प्राचीन राष्ट्र. राष्ट्र या अर्थी हा शब्द शालिवाहन शकाच्या ६ व्या शतकांत एका ताम्रपटांत येतो. गोप हे स्थायिक नसून 'व्रज' म्हणजे फिरते लोक होते. यांच्यामध्यें वीरपूजा होती. ती कृष्णरूपांत वरच्या जातींनीं उचलली. गोप शब्द ज्यांत आहे अशीं पुष्कळ स्थलवाचक नामें आढळतात. पुराणांतून गोपांचा उल्लेख पुष्कळदां आलेला आहे. (अहीर, आभीर पाहा).

**गोपथब्राह्मण**—हें अथर्ववेदाचें एक ब्राह्मण आहे. अथर्ववेदाच्या अनेक शाखांपैकीं 'शंनोदेवी' या मंत्रानें आरंभ होणाऱ्या संहितेचें हें ब्राह्मण असावें. कारण 'शंनोदेवी' या मंत्रानें अथर्ववेदाचा आरंभ होतो असा या ग्रंथांत उल्लेख आहे (१·२९). या ब्राह्मणग्रंथाचे दोन भाग असून पहिल्या भागांत पांच अध्याय आहेत व दुसऱ्या भागांत सहा आहेत. पहिल्या भागांतील विषय श्रौतविषयास सोडून असून दुसऱ्या भागांत श्रौतविषयाचें विवेचन आहे. परंतु त्यांतील बराच भाग ऐतरेय, शतपथ व पंचविंश या ब्राह्मण ग्रंथांतून घेतलेला आहे. ऐतरेय ब्राह्मणांतील तर सबंध खंडेंच यांत उद्धृत केलीं आहेत. ब्राह्मणग्रंथ हा संहितेंतील मंत्रांचा विनियोग दाखविणारा ग्रंथ असतो. परंतु गोपथब्राह्मणांत तसा प्रकार आढळून येत नाहीं. या ग्रंथांत ब्रह्मा या ऋत्विजाच्या कर्माचें विशेष विवेचन असून त्रैविद्यांनीं वगळलेल्या अथर्ववेदाचें महत्त्व जास्त वर्णिलें आहे. या ग्रंथांत अथर्ववेदाला ब्रह्मवेद असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे. या ग्रंथाचा काल बराच अलीकडील असावा असें यांतील पहिल्या भागांतील उल्लेखांवरून दिसून येतें. अध्याय २, खंड २३ यांत गर्भाधानापासून उपनयनापर्यंतच्या संस्कारांचा उल्लेख आहे. तसेंच पाकयज्ञांचा उल्लेख अनेक स्थळीं आला आहे. तसेंच या ग्रंथाच्या उत्तर भागांतील दुसऱ्या अध्यायांत दशावतारांचा उल्लेख आहे. वरील पुराव्यावरून हें ब्राह्मण वेदोत्तर वाङ्मयाच्या कालांतील असावें असें ठरतें.

**गोपाळ**—एक मराठी संतकवि. हा शके १६९० च्या सुमारास होता. हा नेवासें येथील असून यानें ओवीबद्ध महाभारत लिहिलें. पण त्याचीं सर्व पर्वें आज उपलब्ध नाहींत. याचें शांति पर्व बरेंच विस्तृत दिसतें. महालयामाहात्म्य, मल्हारीमाहात्म्य, व्यंकटेशमाहात्म्य, वगैरे याचे आणखी ग्रंथ आहेत.

**गोपाळ (बोरकर)**—गोपांची एक जात. हे लोक वऱ्हाडांत दिसतात. यांच्यांत पांच पोटजाती आहेत. पैकीं मराठा गोपाळ उच्च दर्जाचे व वीर गोपाळ सर्वांत खालच्या दर्जाचे समजले जातात. दावलमलिक हा यांचा एक देव आहे. बोरकर चटया विणतात; पांगुळ भिक्षा मागतात; तर खाम गोपाळ दोऱ्यांवरची कसरत करतात.

**गोपाळ गणेश बर्वे**—राघोबादादाचा हा मेहुणा. दादाचा आश्रय करून आपल्यास हवी तशी बंडखोरी करणाऱ्या लोकांपैकीं हा एक होता. पानपतच्या युद्धाचा कलंक धुऊन काढण्यासाठीं माधवरावानें सन १७६९ त ज्या कांहीं सरदारांस उत्तरेकडे पाठवलें त्यांपैकीं हा एक असून स्वारीची सबनिशी याजकडे होती.

**गोपाळचंद्र मिश्र** ( जन्म १६३२ )—हैहयवंशी राजा राजसिंह याच्या दरबारीं असलेला एक हिंदी कवि. राजसिंहाचा हा दिवाणहि होता असें म्हणतात. यानें 'रामप्रताप-काव्य' हा ग्रंथ अर्धा लिहिला व राहिलेला याचा मुलगा माखनचंद्र यानें पुरा केला. राजसिंहाच्या इच्छेवरून सन १६८८ त यानें 'खूबतमाशा' हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाखेरीज जैमिनी अश्वमेघ, भक्तिचिंतामणि, रामप्रताप, छंदविलास, छदामाचरित्र वगैरे ग्रंथहि यानें लिहिले.

**गोपाळदास गौर** ( सतरावें शतक )—माहीम तालुक्यांतील अशेरी किल्ल्याचा हा किल्लेदार. सन १६२२ मध्यें शहाजहान आपल्या बापाविरुद्ध बंड करून दक्षिणेंत आला व त्यानें आपला सर्व सरंजाम अशेरीच्या किल्ल्यावर गोपाळदासाच्या हवालीं करून तो पर्वीझबरोबर लढण्यास निघून गेला. शहाजहानचें बंड मोडण्यास जहांगीरनें पर्वीझ यास पाठवलें होतें. पर्वीझनें अशेरीस वेढा दिला असतां गोपाळदासानें दोन वर्षे किल्ला लढविला. या कामगिरीबद्दल यास शहाजहाननें पांच हजारांची मनसब व 'मानधाता' हा किताब दिला.

**गोपाळ नाईक तांबवेकर**—पेशवाईतील एक सावकार. सातारा जिल्ह्यांतील वाळवें तालुक्यांतील कासेगांवाजवळच्या तांबवें येथील हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण असून याच्या बापाचें नांव विश्वनाथ असें होतें. थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दींत यानें सराफीच्या धंद्यावर खूप धनसंचय केला. याला पेशव्यांच्या पोतदारीची हांव असल्यानें राघोबादादाला पुण्याची गादी मिळवून देऊन त्याजकडून पेशव्यांची पोतदारी मिळवावी असा याचा बेत होता व त्याप्रमाणें त्यानें प्रयत्न केले. यानें देवस्थापन व धर्मादाय यांप्रीत्यर्थ लाखों रुपये खर्च केले. याचे वंशज सध्यां डाकोरला असतात.

**गोपाळनाथ** ( समाधि १७६६ )—एक नाथपंथी संतकवि. औरंगाबादनजीकच्या सलाबतपुरचा हा होता. याचें उपनांव घोलप असें असून हा ब्रह्मचारी होता. वऱ्हाडांतील मारकी येथील रंगनाथांचा हा शिष्य. शके १६८८ श्रावण वा। ३० रोजीं यानें त्रिपुटीस समाधि घेतली. यानें 'शिरोमणी' व 'समाधिबोध' हे दोन ग्रंथ व कांहीं पदें व अभंग रचले.

**गोपाळनाथ मळगांवकर** ( सु. सन १७०० )—एक संतकवि. भालवणजवळील परुळें गांवचा हा अद्वैतमतवादी साधु. जातीनें गौडब्राह्मण. पंढरपुरास यानें धामणगांवच्या बोधलेकरांचा अनुग्रह घेऊन त्यांचें शिष्यत्व पत्करलें. यानें लिहिलेलें स्कंदपुराणांतर्गत पांडुरंगमाहात्म्य, प्रकाशबोध, बालक्रीडा, इतर पदें, अभंग व भूपाळ्या हीं प्रसिद्ध आहेत.

**गोपाळ पंडित** ( सु. सन १३०० )—एक महानुभावी ग्रंथकार. हा एक महानुभाव असून देवगिरीचा रामदेवराव जाधव याची धाकटी राणी कामाइसा उर्फ कामाई देवी हिचा खजिनदार व पुराणिक होता. मूळचा हा पैठणजवळील वरखेड वाडेंगांव येथील चक्रपाणीचा मुलगा. यास पारमांडल्य असेंहि म्हणत. यानें मराठींत सहा ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं 'चौपद्या' व 'सुभाषितअंताक्षरी' हे दोन ग्रंथ पद्यात्मक आहेत.

**गोपाल पाल ( पहिला )** ( ७८०–८०० )— बंगालच्या पाल राजघराण्यांतील वप्यटाचा हा मुलगा बौद्धधर्मीय होता. भद्रराजाची मुलगी दद्दादेवी ही याची पत्नी. हा गादीवर येण्यापूर्वी बंगालमध्यें सुयंत्रित राजसंस्थेच्या अभावीं सगळीकडे बजबजपुरी माजली होती. गोपाळ याच्या हातून राज्याची बिघडलेली घडी सुस्थितींत येईल या आशेनें बंगालच्या लोकांनीं यास आपला राजा नेमलें. कनोजच्या वर्म इंद्रायुधाशीं, राष्ट्रकूटाच्या तिसऱ्या गोविंदराजाशीं व पश्चिमेकडील वत्सराजाशीं यानें लढाया दिल्या. मगधपर्यंत याने राज्यविस्तार केला. बिहार प्रांतांतील उदंडपुर ही याची राजधानी.

**गोपाळ रघुनाथ चिटणीस ( निगडीकर कुलकर्णी )**—एक मराठेशाहींतील सरदार. हा दौलतराव शिंद्याचा चिटणीस व बऱ्हाणपुरचा सरदार असून एक बऱ्यांपैकीं सेनानायकहि होता. लाखेरच्या लढाईपासून तीन वर्षे हा नजरबंदींत होता. शिंदे–होळकर युद्धांत व असईच्या लढाईत याची कामगिरी विशेष प्रामुख्यानें दिसून येते.

**गोपाळराव पटवर्धन** ( १७२१–१७७१ )— पेशवाईतील शूर सरदार. सरदार गोविंद हरि याचा हा मुलगा. पेशवाईत जे साडेतीन राव म्हणून प्रसिद्ध आहेत त्यांपैकीं हा पहिला, दुसरा मुरारराव घोरपडे, तिसरा भवानराव प्रतिनिधि व राहिलेला अर्धा माधवराव पेशवा. सन १७४० मध्यें गोपाळरावास शिलेदारी मिळाली. दमाजी गायकवाडाची नाना पुरंदरे याच्याशीं जी लढाई झाली तींत याचें शौर्य दिसून आलें. कर्नाटकांत यानें हैदराशीं दिलेल्या लढाईत शेवटीं तह झाला. नानासाहेबाला या तहांतील अटी पसंत न पडल्यानें त्यानें याजवर ठपका ठेवला. पानपतच्या लढाईच्या वेळीं इकडे दंगा करूं पाहणाऱ्या निजामअल्लीस कार्यूत ठेवण्याची कामगिरी रघुनाथरावाकडे सोंपवली होती; त्यास जाऊन मिळण्याबद्दल पेशव्याची गोपाळरावास आज्ञा असतां ती यानें मानली नाहीं. दादास याची भीति वाटत असून याचा मोड करण्याची कामगिरी त्यानें आबा पुरंदरे याजवर सोंपवली. पुरंदरे यानें जमखंडीजवळ याचें लष्कर लुटल्यानें हा निजामास जाऊन मिळाला.

सन १७६३ मध्यें निजामानें पुण्यावर स्वारी केली असतां त्याच्या हुकुमानें हा सैन्याच्या आघाडीवर होता. पटवर्धनाचा ओढा गोपिकाबाईकडे असून तिच्या प्रोत्साहनानें हा वागे. सनं १७६३ त झालेल्या राक्षसभुवनाच्या लढाईनंतर हा परत पेशव्यांना येऊन मिळाला. तेथून पुढें मात्र जिवापाड राष्ट्रकार्य करून हा माधवरावाचा उजवा हात बनला. यानंतर हैदराशीं झालेल्या लढ्यांत यानें चांगली कामगिरी बजावली. हा शूर, स्पष्टवक्ता, व्यवहार जाणणारा असा असल्यानें लवकरच पेशव्यांच्या विश्वासांतील एक झाला. याचा स्वभाव सदां आनंदी व उत्साही असे. कर्नाटकांतील सर्व संस्थानिकांवर याचा दरारा चाले.

**गोपाळराव घाणवटकर** (सन १८००)— पेशव्यांचा एक सरदार. बापू गोखल्याच्या हाताखालील हा एक सरदार होता. मूळचा सातारा जिल्ह्यांतील खानापूर तालुक्यांतील घाणवड गांवचा कुलकर्णी. हा अतिशय क्रूर व दुष्ट असल्यानें याचें नांव ऐकतांच लोक थरथर कांपत. कोल्हापूरकर व पेशवे यांच्यामधील लढाईच्या वेळीं यास सरहद्दीवरील लोकांच्या बंदोबस्तासाठीं नेमण्यांत आलें. त्या वेळीं यानें मनुष्यवधासारखीं अनन्वित कृत्यें करून लोकांना नकोनकोसें करून टाकलें.

**गोपाळ संभाजी खांडेकर**— पानपतच्या लढाईतील अपयशानें मराठ्यांचा उत्तर हिंदुस्थानांतील अमल ढासळूं लागला असतां तो आपल्या पराक्रमानें सांवरून धरण्याचें काम ज्यांनीं केलें त्यांपैकीं गोपाळराव खांडेकर हा एक आहे. हा कऱ्हाडे ब्राह्मण सन १७५० च्या पुढें नानासाहेब पेशव्यांच्या वेळीं उदयास आला. यानंतर यास बुंदेलखंडांत झांशीची मामलत मिळाली. कांहीं दिवस हा धारचा दिवाण असून माधवरावानें खुष होऊन यास पंथपिंपळोदची जहागीर दिली.

**गोपिकाबाई पेशवे** (१७२५–१७८८)— नानासाहेब पेशव्याची स्त्री व भिकाजी रास्ते याची कन्या. भिकाजी हा मोठा सावकार होता. स. १७३० च्या सुमारास वाईस लग्न झालें. ही नेहमीं नानासाहेबाबरोबर स्वारीशिकारीस जात असे. हिला राजकारण चांगलें कळत असून दरबारांतील कारभारहि ही पाहत असे. नानासाहेबानें प्रयाग सोडविण्यासाठीं उत्तरेंत जी मोठी स्वारी केली तींत ही होती.

हिनें कायद्यानें कन्याविक्रय बंद करावा असें पेशव्याकडून घडवून आणण्याकरितां नाना फडणिसास विनंति केली होती.

हिला ३ मुलें (विश्वासराव, माधवराव व नारायणराव) झालीं होतीं, परंतु तीं सर्व हिच्या अगोदरच मृत्यु पावलीं.

नानासाहेबाच्या मृत्यूनंतर कांहीं दिवस बाईचें, राघोबादादाचें व या दोघां कारभाऱ्यांचें एकचित्त झालें होतें. परंतु पुढें बिघाड होत जाऊन ही गंगापुरास जी जाऊन राहिली ती शेवटपर्यंत तेथेंच होती. पेशवे व कारभारी हिला तेथें जाऊन भेटत. हिचा इतमाम चांगला राखला होता.

हिला लिहितां-वाचतां चांगलें येत असे. सर्व मराठे सरदारहि हिला वचकून असत.

**गोपीचंद**—कांचनरपूचा एक पौराणिक राजा. आपल्या स्त्रीच्या सांगण्यावरून यानें आपल्या आईचा गुरु जालंदरनाथ या सिद्धपुरुषास खळींत लीद भरून तींत पुरून टाकलें होतें. कांहीं काळानंतर जालंदराचा शिष्य कानिफनाथ हा फिरत फिरत आपल्या गुरूस जेथें पुरलें होतें त्या ठिकाणीं आला. तीन वेळां कानिफानें आपल्या गुरूस हांक मारिली तेव्हां जालंदरनाथ खळींतून सजीव व निर्मळ देहानें बाहेर पडला. पुढें गोपीचंदाच्या आईच्या– मैनावतीच्या–विनंतीवरून जालंदरनाथानें गोपीचंदास क्षमा केली. गोपीचंदानें पुढें विरक्त होऊन योगदीक्षा घेतली.

**गोपीनाथ दीक्षित ओक**—एक काशीचे पंडित. यांचें घर पुण्यासहि नेनेघाटावर आहे (साकुर्डीकर दीक्षित वाडा). यांचे वडीलहि फार विद्वान् होते. श्रौती मंडळींत त्यांची कीर्ति बरीच असल्यानें बहुतेक यज्ञकर्मांत त्यांना आध्वर्यवाचा मान मिळे. दीक्षित याज्ञिकींत तरबेज असत. वडिलांच्या मार्गे लहानपणींच त्यांनीं एकदां एक आध्वर्यव यथासांग पार पाडल्यामुळें त्यांचें नांव प्रसिद्ध झालें. यांनीं 'संस्काररत्नमाला' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे (शके १६८७). हे अग्निहोत्री असून गाणपत्य होते.

**गोपीनाथपंत बोकील**—मराठ्यांचा एक वकील. यास पंताजी गोपीनाथ असेंहि म्हणत. हा शहाजीच्या पदरीं होता. हा हिवरें (जि. पुणें) गांवचा कुलकर्णी होता. शिवाजीनें अफझुलखानाकडे याला वकील म्हणून पांठविलें होतें. त्यानेंच अफझलचें मन शिवाजीची भेट फक्त दोन माणसांनिशीं घेण्यासाठीं वळवून त्याला प्रतापगडावरील माचीवर आणलें. अफझलच्या वधानंतर महाराजांनीं याला हिवरें गांव इनाम दिलें. तत्पूर्वीं हा सुभेदारीवर होता. याचाच वंशज प्रख्यात सखारामबापू बोकील होय.

**गोपुर**—द्राविड शिल्पकलेंतील एक प्रकार. दक्षिणेंतील द्राविडी पद्धतीच्या देवळाच्या प्राकाराला प्रवेशद्वारांवर–चारहि बाजूंच्या–शिखराप्रमाणें मजल्यांचें बांधकाम असतें. मुख्य देवळाच्या शिखरापेक्षां हीं गोपुरेंच जास्त उंच, कलाकुसरीचीं व उठावदार दिसतात. उदा.— मदुरा, तंजावर येथील देवालयें. परशुरामभाऊ पटवर्धन यांनीं दक्षिणेंतून जाऊन आल्यावर तासगांवास गणपतीच्या देवळाच्या प्राकारावर असेंच एक गोपुर

बांधलें आहे. पुण्यास संगमावरच्या शंकराच्या देवळाला एक उंच गोपुर आहे.

**गोप्रदान**—द्रव्यदान आणि गोप्रदान एकच. धातूच्या पैशापूर्वी गोदान हें विनिमयाचें साधन होतें. म्हणजे गाईचा पैशासारखा उपयोग करीत असत. एका गोप्रदानास ८० ते १०० रु. खर्च येई. सध्यां चार आण्यांवर भागतें. ब्राह्मण-भोजनांत सहस्रभोजन, लक्षभोजन आहे त्याप्रमाणें गोप्रदानांत गोशतदान, गोसहस्रदान, इ. आहे. गोशतदानांत एक बैल द्यावा लागतो. शृंगारलेल्या शंभर गाई व एक बैल मिळून गोशत होतें.

गोदान हें महादानांपैकीं आहे. रोग्याला औषधांचा जसा उपयोग तसा दानाचा होतो अशी समजूत होती. त्याकारणानें क्लेशपरिहारार्थ, आरोग्याप्रीत्यर्थ, अनिष्टग्रहशांत्यर्थ दानें करण्याची वहिवाट पडली होती. आसन्नमरणाच्या अवस्थेंत गोदान करण्यास धर्मशास्त्र सांगतें.

**गोबदरी**—( कौवेरी ). [ व्हॅक्सिनिअम व्हिटिस आयडिया] हें एक जमिनीवर पसरणारें क्षुद्रुप आहे. हें युरोप, आशिया व उत्तर अमेरिका यांमध्यें उंच जागेवर असलेल्या दलदलीमध्यें होतें. यांचीं पानें नेहमीं हिरवींगार असून पेटीसारखीं असतात. याला तांबडीं आंबट फळें येतात. त्यांचें लोणचें घालतात व व मुरंबा करतात.

**गोबी**—चीनमध्यें ह्या वाळूच्या मैदानाला शामो म्हणजे वाळूचा समुद्र म्हणतात. हें चार हजार फूट उंचीचें पठार फार मोठें असून मोंगोलिया प्रांताचा बराच भाग यानें व्यापलेला आहे. या मैदानाचा जो भाग सुपीक आहे, तेथें अलीकडे चिनी लोकांनीं बरीच वसाहत केली आहे. पूर्व गोबी मैदानांत मोंगोलियन वंशाच्या निरनिराळ्या जाती राहतात, आणि पश्चिम गोबी प्रदेशांत तातार जातीच्या कांहीं फिरत्या टोळ्यांची ( नोमॅडिक ) वस्ती आहे. या मैदानाची लांबी १५०० मैल आणि रुंदी ३५० ते ४०० मैल असून क्षे. फ. ३,००,००० चौ. मैल आहे. स्वेन हेडिन आणि सर ऑरेल स्टीन यांनीं या वाळु-कारण्याचें संशोधन करून याचें महत्त्व सिद्ध केलें आहे.

**गोबेल्स, डॉ. जोसेफ** ( १८९७-१९४६ )— हा हिटलर अमदानींतील जर्मन प्रचारमंत्री, राष्ट्रीय समाजवादी पक्षाचा पहिल्या श्रेणींतील पुढारी होता. १९२० सालीं फेडेलबर्ग येथें पीएच्. डी. पदवी त्यानें मिळवली आणि तो वृत्तपत्रकार झाला. नॅशनल सोशॅलिस्ट पक्षांत सामील होऊन १९२६ सालीं तो बर्लीनचा प्रांतिक पुढारी बनला. सदर पक्षाचा प्रसार उत्तर जर्मनींत करण्याची जबाबदारी गोबेल्सनें पत्करली आणि दक्षिण भागांत हिटलरनें म्यूनिक येथें राहून तेंच प्रचारकार्य सुरू केलें. १९२७ सालीं त्यानें बर्लिन येथें 'डर आंग्रीफ़' या नांवाचें दैनिक पत्र सुरू केलें व १९४० पर्यंत तो त्याचा संपादक होता. १९२८ सालीं तो रीशस्टॅग ( जर्मनीचें कायदेमंडळ ) मध्यें निवडून आला. १९२९ सालीं त्याला त्याच्या पक्षाच्या प्रसार-कार्याचा प्रमुख अधिकारी नेमण्यांत आलें आणि १९३३ सालीं हिटलरनें त्याला आपल्या राज्यकारभारांत प्रचारमंत्री नेमलें. हें कार्य त्यानें अत्यंत नमुनेदारपद्धतीनें केलें. त्यानें छापखाने, वाङ्मय, रेडिओ, नाट्यगृहें, सिनेमा-गायन आणि इतर सर्व प्रकारच्या सांस्कृतिक प्रचार-क्षेत्रांवर आपल्या पक्षातर्फे पूर्ण नियंत्रण बसविलें, आणि पक्षाचें प्रचारकार्य अत्यंत विस्तृतपणें व अत्यंत परिणामकारक रीतीनें चालवलें. नॅशनल सोशॅलिस्ट पक्षाचें धोरण व योजना लोकप्रिय करणें आणि त्या पक्षाच्या राज्य-कारभारांतील उणिवांचें समर्थन करणें ही डॉक्टर गोबेल्सची मुख्य कामगिरी होय. जर्मनीनें साम्राज्यशाही धोरण सुरू केल्यावर डॉ. गोबेल्स याच्या प्रचारतंत्राला पूर्वीपेक्षां अधिक महत्त्व प्राप्त झालें. विरोध हाणून पाडण्याची मोहीम अधिकाधिक जोरानें चालू ठेवावयाची, असें डॉ. गोबेल्सचें प्रचारतंत्र होतें. जर्मनीनें दुसरें महायुद्ध प्रत्यक्ष सुरू होण्यापूर्वी जे राजकीय आक्रमणविषयक विजय मिळविले, त्यांचें श्रेय इतर कारणांप्रमाणें डॉ. गोबेल्सच्या प्रचारतंत्राला आहे. डॉ. गोबेल्स स्वतः लेख लिहीत असे, आणि रेडियोवर भाषणें करी; बरेंचसें प्रचारकार्य तो स्वतः करीत असे. त्याच्या लेखांत आणि भाषणांत भाषेवर नियंत्रण कसलेंहि नसे; त्यांमध्यें वक्रोक्ति व हेटाळणी विशेष असे. त्याची पत्नी मागडा ही फ्रीड लॅंडर नांवाच्या ज्यूची दत्तक मुलगी होय. तथापि त्या विवाहामुळें ज्यू-विरोधी मोहिमेंत डॉ. गोबेल्सेनें यत्किंचितहि कसूर केली नाहीं. हिटलरचा सल्लागार या नात्यानें देशी व परदेशी राजकारणांत क्रांतिवादाचा पुरस्कार तो नेहमीं करीत असे. १९४५ सालीं जर्मनी शरण येण्यापूर्वी हिटलरप्रमाणेंच गोबेल्स हा बेपत्ता झाला.

**गोम**—( सेंटिपेड-शतपाद ). हा एक वलयांकित प्राण्यांचा वर्ग असून तो हवेंत श्वासोच्छ्वास करतो. हा बहुपाद वर्गाचा, म्हणजे यास अनेक पायांच्या जोड्या असून याचें शरीर अनेक वलयांचें बनलेलें असतें. घोण, वाणी, वगैरे प्राणी या वर्गांत मोडतात. गोम अंधाऱ्या ओलसर जागीं राहून किड्यांवर उपजीविका करते. हिच्या तोंडांत विष असतें. तें माणसालाहि बाधतें. कानांत गोम शिरणें फार अपायकारक असतें.

**गोमती**—संयुक्त प्रांतांतली एक नदी. हिचा ऋग्वेदांत व बृहत्संहितेंत उल्लेख आहे. आरंभीं २० मैलपर्यंत हिचें पात्र फार उथळ आहे व तें उन्हाळ्यांत आटतें. पुढें १२ लहान नद्या मिळाल्यावर ३५ व्या मैलापासून तिला नेहमीं पाणी असतें. शहाजहानपूरखेरी रस्त्याच्याजवळ २५० फूट रुंदीचें पात्र झालें

आहे. लखनौ येथें या नदीस ४ पूल आहेत. जोनपूरला ही ६०० फूट रुंद होते. तेथून पुढें साई नदी मिळते तेथपर्यंत ही ३५० मैल वाहत येते. नंतर बनारसमधून जाऊन व एकंदर ५०० मैलांचा प्रवास करून ही नदी गंगेला गाझीपूर येथें मिळते.

**गोमाजी नाईक पानसंबळ**—लखूजी जाधव यानें जिजाबाईस शहाजीकडे सासरीं पाठवतांना आपला विश्वासू मनुष्य म्हणून गोमाजीस बरोबर दिलें. प्रतापराव गुजरापूर्वीं हा शिवाजीचा सेनापति असावा. सन १६४६ मध्यें हा पुण्याचा हवालदार होता. हा मोठा धोरणी व विश्वासू होता.

**गोमाशी**—( बोटफ्लाय ). ही एका जातीची माशी असून ती आपलीं अंडीं ( लार्व्हीं ) सखुर सस्तन प्राण्यांच्या शरीरांत घालते. घोड्याच्या पोटावर, बैलाच्या पाठीवर व मेंढीच्या नाकांत या माशा अंडीं घालतात. ( घोडेमाशी पाहा ).

**गोया, फ्युसिएन्टेस फ्रॅन्सिस्को** ( १७४६–१८२८ )—एक स्पॅनिश चित्रकार आणि प्रतिमाखोदनाचा कारागीर. त्यानें सेव्हिल, टोलेडो व व्हॅलेन्शिया या शहरांतील देवळें सुशोभित करण्याचें काम केलें. स्पॅनिश जीवनासंबंधींचीं चित्रें काढलीं आणि डचेस ऑफ आल्वा आणि चौथा चार्लस आणि त्याचें कुटुंब वगैरे मोठाल्या लोकांचीं चित्रें काढलीं. त्याच्या चित्रांमध्यें उच्च कलाकौशल्य आणि प्रबल कल्पकता, तसेंच उपहासात्मक वृत्ति दिसून येते. युरोपांतील, विशेषतः फ्रान्समधील चित्रकलेवर गोयाच्या चित्रपद्धतीचा फार परिणाम झालेला आहे.

**गोर, कॅथेराइन ग्रेस** ( १७९९–१८६१ )—एक इंग्रज कादंबरीकर्ती. हिनें सुमारें ७० कादंबऱ्या लिहिल्या; आणि त्यांमध्यें इंग्रज लोकांच्या शोकीन ( फॅशनेबल ) जीवनाचें फार कुशलपणानें चित्र रेखाटलें आहे. तिच्या उत्कृष्ट कादंबऱ्या आहेत त्या—‘ सेसिल ऑर दि ॲडव्हेंचर्स ऑफ ए कॉक्सकोंब ’; ‘ दि हॅमिल्टन्स् ’; ‘ दि बँकर्स वाइफ ’; ‘ पिन्मनी ’; ‘ पिअर्स ॲन्ड पारव्हेन्यूज ’; आणि ‘ टेम्प्टेशन ॲन्ड ॲटोनमेंट ’.

**गोरखगड**—मुंबई, ठाणें जिल्हा, मुरबाड तालुका. मुरबाडच्या आग्नेयीस १२ मैलांवर खोपवली घाटाच्या पायथ्याशीं एका खडकावर हा बांधलेला आहे. कांहीं ठिकाणीं रस्त्यांत तुटलेले कडे दिसतील; त्यांच्या कांठानें जावें लागतें. त्या किल्ल्यावरचा व खालचा असे दोन भाग स्पष्ट दिसतात. किल्ल्यांत टांकीं व भुयारें आहेत. हा फार जुन्या म्हणजे जैन कालचा दिसतो. हा जिंकून घेणें फार कठीण आहे, असें १८१८ त कॅ. डिकिनसननेंच म्हटलें आहे.

**गोरखचिंच**—हीं झाडें मोठीं होतात. या झाडावर सुमारें वीतभर लांबीचीं दुध्या भोपळ्याप्रमाणें फळें येतात. या फळाची बाहेरील साल कठिण असते व फळांत गराचे गोळे असतात. हा गीर फार आंबट असतो. ह्यांचा चिंचेसारखा उपयोग करितात. हा पित्तशामक, रुचिकर व पथ्यकारक आहे.

**गोरखनाथ**— कानफाटे योगीपंथाचा हा संस्थापक गणला जातो. याचा काळ निश्चित नाहीं. नेपाळांत इ. स. ७ व्या शतकांत होऊन गेलेल्या नरेंद्रदेव राजाशीं याचा संबंध जोडण्यांत येतो. आणि पश्चिम हिंदुस्थानांतील १४ व्या शतकाच्या शेवटीं कच्छमध्यें कानफाटे पंथ सुरू करणारा जो धर्मनाथ त्याच्या गुरूचा मान गोरखनाथाला दिला जातो.

हा मच्छेंद्रनाथाचा शिष्य होय. हा जातीनें ब्राह्मण होता. गाईच्या शेणाच्या ढिगाऱ्यांत याचा जन्म झाल्यानें याला गोरक्ष नांव मिळालें. यानें मच्छेंद्रनाथास स्त्रीराज्यांतून परत आणल्याची कथा आहे. याचें नेहमींचें ठिकाण गोरखपूर येथें होतें असें म्हणतात. *याचा शिष्य गैनिनाथ व गैनिनाथाचा निवृत्तिनाथ* होय. याचे संस्कृत व प्राकृत असे दोन्ही भाषांतून ग्रंथ आढळतात. व्रजभाषेंतहि याची काव्यरचना थोडीफार आहे. रसायनशास्त्रावर ‘ गोरक्ष किमयागार ’ नांवाचा जो एक ग्रंथ आहे तो याचा समजतात. तसेंच मराठींतहि एक छोटासा ‘ अमरनाथ संवाद ’ नांवाचा ग्रंथ याच्या नांवावर असून शिवाय याची हिंदी स्फुट कविता बरीच आहे. मुहूर्त वगैरेंवर गोरखमत म्हणून एक स्वतंत्र मत आहे. याचीं कांहीं वाक्यें गोरखमत या नांवाखालीं कांहीं चोपड्यांत प्रसिद्ध झालेलीं आहेत. ज्योतिषावरहि याचे कांहीं ग्रंथ असावेत. हा नवनाथांपैकीं एक असून याचें चरित्र नवनाथभक्तिसारांत आलेलें आहे. नेपाळची संरक्षक देवता गोरखनाथ मानली जाते.

**गोरखपूर**—संयुक्त प्रांत, गोरख विभागाचा पूर्व जिल्हा. क्षे. फ. ४६२४ चौ. मै.. लोकसंख्या ( १९४१ ) ३९,६३,५७४. हिंदू शें. ९० आहेत. भाषा बिहारी बोलतात. व्यवसाय शेतकी आहे. मुलूख सपाट असल्यानें पुराची नेहमीं भीति असते. गोग्रा ही मोठी नदी यांतून वाहते. पाऊस सरासरी ४५ इंच पडतो. तांदूळ व कोदन नांवाचें धान्य पिकतें. निळीचे मळे आहेत. शिक्षणांत हा जिल्हा फार मागासलेला आहे.

मगधाच्या गुप्तांच्या साम्राज्यांत याचा दक्षिण भाग समाविष्ट होता. उत्तर सीमेजवळ गौतमाचें जन्मस्थान आहे. यावर पुढें रजपुतांचा अमल होता. १८०१ मध्यें इंग्रजी सत्ता आली. या जिल्ह्यांत बौद्धधर्माचे पुष्कळ अवशेष सांपडतात.

गोरखपूर शहर १४०० मध्यें वसलें. येथील सुतार आणि कातारी लोक कामासाठीं प्रसिद्ध आहेत. कॉलेज, हायस्कुलें व इतर शाळा आहेत. येथें गोरखनाथाची गादी आहे. लो. सं. ८४,६५०.

आहे. शेती हाच मुख्य धंदा असून शेंकडा ८४ लोकें शेतीवर राहतात. लो. सं. १०,१४,२८५.

गोलपाडा शहर पूर्वी ईस्ट इंडिया कंपनीच्या सरहद्दीवर होतें. व येथें वस्ती करून राहिलेल्या इंग्रजांनीं केवळ जबरदस्तीनें बंगालचा व्यापार आपल्या ताब्यांत घेतला. १८७८ त येथें म्यु. कमिटी स्थापन झाली. हें व्यापाराचें ठिकाण आहे. येथें बोटी येतात. ताग, मोहरी, कापूस, साल, इ. चा दांडगा व्यापार चालतो.

**गोला**—मुंबई इलाख्यांत यांची लो. सं. सु. चौदा हजार आहे. राणा नांवाचे गोला लोक सर्व गुजराथ व काठेवाड प्रांतभर आहेत. यांचा परंपरागत धंदा तांदूळ कांडण्याचा असून आपण रजपूत आहों असें ते म्हणतात व आपल्या नांवाला राणा हा शब्द जोडतात. हे काश्यप व वाजसनेयी गोत्रांचे असून यांमध्यें पुष्कळ आडनांवें आहेत. औदिच, रायकवाल, मेवाड अथवा श्रीमाळी हे यांचे उपाध्ये आहेत.

**गोलीय त्रिकोणमिति**—(स्फेरिकल ट्रिग्नॅमेट्री). एका गोलावर काढलेल्या त्रिकाणाचे कोन व बाजू यांचे संबंध प्रस्थापित करणें हें गोलीय त्रिकोणमितीचें मुख्य अंग आहे.

ओ मध्य धरून एक गोल काढा व ओअ, ओब, ओक या सर्वच एका पातळींत नसणाऱ्या व गोलाला अ, ब, क, बिंदूंमध्यें छेदणाऱ्या तीन रेषा काढा. ओअब, ओबक, ओकअ हीं तीन समपृष्ठें गोलाला तीन महावर्तुळांत छेदतील. या समपृष्ठामधील कोन गोलत्रिकोणाचे कोन होत. अ बिंदूशीं होणारा कोन ओअब व ओअक या समपृष्ठामधील कोन होतो. हा कोन अब व अक या महावर्तुळाला अ बिंदूशीं काढलेल्या स्पर्शरेषांमधील कोनाबरोबर होतो. अब हा कंस ओ बिंदूशीं जो कोन करतो तो त्रिकोणाची अब बाजू दर्शवितो. त्याप्रमाणें बक व कअ या बाजू ∠बओक, ∠कओअ दर्शवितात. ज्योतिषाचा अभ्यास या गोलीय त्रिकोणाच्या साहाय्यानें करतात.

**गोल्ट्झ्, बॅरन कोलमर** (१८४३–१९१६)— एक जर्मन सैनिक आणि ग्रंथकार. तो १८८३ मध्यें तुर्कस्तानांत तुर्की फौजेची पुनर्रचना करण्याकरितां गेला आणि १८९५ पर्यंत तेथेंच राहिला. १९०८ मध्यें तो पुन्हां कॉन्स्टॅटिनोपल येथें गेला आणि तेथें तरुण तुर्कांची चळवळ अधिक जोमांत आणण्याला त्याने मदत केली. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर १९१४ मध्यें तो प्रथम ब्रुसेल्सचा गव्हर्नर होता, आणि नंतर बेल्जमचा गव्हर्नर झाला. १९१५ मध्यें गोल्ट्झ् पुन्हां तुर्कस्तानांत गेला आणि तेथें त्यानें डार्डानेल्स सामुद्रधुनीचें संरक्षण करणें, आणि दोस्त राष्ट्रांविरुद्ध तुर्की लोकांच्या हालचाली करणें या लष्करी कामांवर देखरेख करण्याचें काम केलें. त्यानें ग्रंथ लिहिले ते—'गॅंबिटा ॲन्ड हिज आर्मीज्' (१८७७ गॅंबिटा आणि त्याचें सैन्य); 'दि नेशन इन् आर्म्स्' (१८८३ सशस्त्र राष्ट्र); आणि 'दि वॉर हिस्टरी ऑफ जर्मनी इन् दि नाइन्टीन्थ सेंचरी' (१९ व्या शतकांतील जर्मन युद्धेतिहास).

**गोल्ड कोस्ट**—पश्चिम आफ्रिकेंतील एक ब्रिटिश वसाहत. १४ व्या शतकापूर्वी यांतील नदींतून सोनें सांपडत असे यावरून हें नांव पडलें. गिनीच्या आखातावर या वसाहतीचा १३४ मैलांचा किनारा आहे. क्षेत्रफळ २४,००० चौ. मै.. कोको, महागनी लांकूड, ताडाचें तेल व सोनें आणि हिरे ह्यांची निर्यात मोठी आहे. १५ व्या शतकापासून हा प्रदेश पोर्तुगीजांच्या ताब्यांत होता तो १९ व्या शतकांत इंग्रजांकडे आला. ब्रिटिश शासनाखालील टोगोलंड, राज्यकारभारासाठीं गोल्ड कोस्टला जोडला आहे. १९४२ सालीं लो. सं. ३९,६२,९६२ होती.

**गोल्डन होर्ड**—हें नांव चेंगिझखान आणि त्याचा नातू बाटू यांच्या अनुयायांना दिलेलें आहे. त्यांनीं १३ व्या शतकांत युरोपवर स्वारी केली आणि जें साम्राज्य स्थापलें तें नीस्टर नदीकांठापासून यूरलपर्यंत आणि काळ्या समुद्रापासून कामा नदीच्या मुखापर्यंत पसरलेलें होतें. या साम्राज्याला गोल्डनहोर्ड हें नांव आहे. हें साम्राज्य १५ व्या शतकाच्या अखेरपर्यंत टिकलें. नंतर तें ३ रा झार ईव्हॅन यानें नष्ट केलें.

**गोल्डस्टकर**—एक यहुदी धर्माचा संस्कृत पंडित. हा गेल्या शतकांत होऊन गेला. त्याचें उच्च शिक्षण बॉन येथें झालें. त्यानें प्रथम अमरकोशाच्या प्रास्ताविक श्लोकांवर लेख लिहून तो प्रसिद्ध केला.

यानंतर त्यानें 'प्रबोधचंद्रोदय' याचें भाषांतर प्रसिद्ध केलें व 'मानवकल्पसूत्र' या हस्तलिखित पुस्तकास प्रस्तावना लिहिली. डॉ. विल्सन यांच्या संस्कृत कोशाची सुधारलेली आवृत्ति तो तयार करीत होता. पण त्याच्या अनपेक्षित मृत्यूमुळें हें काम अपुरें राहिलें. त्याला हिंदी वैद्यकाचीहि माहिती होती. प्रो. गोल्डस्टकर घरचा श्रीमंत होता. लंडन येथें विद्यालयांत त्यानें संस्कृत भाषेच्या अध्यापकाचें काम केलें होतें.

**गोल्डस्मिथ, ऑलिव्हर** (१७२८–१७७४)—एक आंग्ल कवि व लेखक. याचें बी. ए. पर्यंत शिक्षण झालें होतें. द्रव्यार्जनाकरितां यानें पांचसहा धंदे करून पाहिले, परंतु त्यांत त्याला अपयश आलें. शेवटीं त्यानें परदेशगमन केलें. प्रवासांत त्याच्या उपजीविकेचें साधन बांसरी होतें. १७५६ सालीं तो इंग्लंडला परत आला. तेथें आल्यावर पुस्तकें विकण्याच्या दुकानांतून नोकरी केली व अखेर कंटाळून त्यानें लेखक व्हावयाचें ठरविलें. गोल्डस्मिथचें ज्ञान तुटपुंजें होतें. त्याला एकाहि विषयाची पूर्ण माहिती नव्हती, परंतु स्वतःच्या ज्ञानाचा त्यानें लोकांना

आश्चर्य वाटेल असे लेख लिहिण्यांत उपयोग केला. काव्य, नाटकें, कादंबरी अशा ललित वाङ्मयाचा त्याच्या लिखाणांत समावेश होतो. 'दि ट्रॅव्हलर', 'डेझर्टेड व्हिलेज', 'व्हिकार ऑफ वेकफील्ड', 'शी स्टूप्स टु कॉंकर' हे त्याचे प्रसिद्ध ग्रंथ होत. त्याची लेखनशैली साधी व सुबोध आहे. शेवटपर्यंत त्याची सांपत्तिक स्थिति निकृष्ट होती.

**गोल्डोनी, कार्लो** (१७०७-१७९३)—एक इटालियन नाटककार. व्हेनिसमध्यें राहून त्यानें मोलियरच्या नाटकांचा अभ्यास सुरू केला आणि तशीं नाटकें लिहिण्याची कला उत्तम साध्य केली; नंतर तो पॅरिस येथें राहण्यास गेला. आणि तेथें १५ वा लुई या राजाच्या कन्यांना इटालियन भाषा शिकवणारा शिक्षक झाला. यानें अनेक नाटकें लिहिलीं. त्यांपैकीं परींच अद्यापहि रंगभूमीवर होतात आणि त्याच्या या नाटकांचीं इतर अनेक भाषांत भाषांतरेंहि होऊन त्यांचे प्रयोग अनेक देशांत होत असतात. त्यानें सुखान्त नाटकें सुमारें १५० लिहिलीं.

**गोल्फ**—हा एक मैदानांतील विदेशी खेळ आहे. काठीनें फटकारून चेंडू गलींत घालवयाचा हा उद्देश. खेळाच्या मैदानाचे गली किंवा खळी यावरून अठरा विभाग पाडतात. एक गल दुसरीपासून १०० ते ५०० यार्डांवर असते. गलीभोंवतालची जागा मऊ केलेली असते. मैदानांत जागजागीं उंचवटे किंवा पाणथळे यांचे अडथळे मुद्दाम ठेवलेले असतात. थोड्या फटकाऱ्यांनीं जो एकामागून एक सर्व गलींत चेंडू घालील तो विजयी होतो. खेळाडूजवळ निरनिराळ्या प्रकारच्या काठ्या असतात व जी ज्या परिस्थितींत चेंडू मारण्यास उपयोगी पडेल ती तो वापरतो. हा खेळ दोघांत चालतो.

ग्रेटब्रिटन आणि अमेरिका या देशांत हा खेळ फार लोकप्रिय आहे. बायकाहि यांत भाग घेतात. हिंदुस्थानांत; कलकत्त्यास व मुंबईस गोल्फचीं उत्कृष्ट मैदानें आहेत. नाशकास दरसाल एक आठवडा गोल्फचा सामना होत असतो.

**गोल्ला**—एक गोवारी जात. यांची वस्ती मुख्यतः मद्रास, म्हैसूर व हैद्राबाद या भागांतून आहे. लो. सं. सुमारें १५ लाख. यांच्यांत जांवई हा सासऱ्याचा वारस होतो. विधवाविवाह नाहीं; पण घटस्फोट होतो. मुंबई इलाख्यांतहि सुमारें पांच हजार गोल्ला आहेत. बेळगांव जिल्ह्यांत यांना गोपाल म्हणतात. कळपवाले, फिरते गुराखी व वैदू यांची मिळून ही जात बनलेली दिसते. यांच्यांत औषधें विकणारेहि बरेच आहेत.

**गोंवर**—हा एक तीव्र स्वरूपाचा संसर्गजन्य रोग आहे. हा बहुधा मुलांस होतो. हा होण्याच्या पूर्वी पडसें येतें आणि नंतर अंगावर पुरळ उठतो. याची गर्भावस्था चौदा दिवसांची असते. प्रथम पडसें येऊन हळूहळू ताप चढूं लागतो. आणि तीन-चार दिवसांत पुरळ दिसूं लागतो. तो प्रथम कानाच्या मागें व नंतर चेहऱ्यावर दिसूं लागून शेवटीं शरीराच्या सर्व भागांवर पसरतो. या रोगामध्यें कफजन्य फुप्फुसदाह किंवा आंत्रदाह होण्याचा संभव असतो. या रोगांत डोळ्यांची व कानाची फार काळजी घेतली पाहिजे. या रोगांत अतिसार होण्याचाहि फार संभव असतो.

**गोवर्धन-गंगापूर**—हें ऐतिहासिक ठिकाण नाशिकजवळ आनंदवल्लीच्या पश्चिमेस सुमारें तीन मैलांवर आहे. हें स्थळ फार प्राचीन असून याचा उल्लेख लेण्यांतील शिलालेखांमध्यें आलेला आहे. त्यावरून हें आंध्रभृत्य राजांच्या प्रतिनिधीचें 'आहार' म्हणजे राहण्याचें ठिकाण होतें असें दिसून येतें. तेथें जुन्या इमारतींचे कांहीं शेषभाग अद्यापि आढळतात. तेथील गोवर्धनेश्वर व इतर मंदिरें प्रसिद्ध आहेत. गोवर्धनापासून अगदीं नजीक गंगापूर आहे. येथें गोपिकाबाई पेशवे यांनीं आपलें नानासाहेब पेशवे वारल्यानंतरचें आयुष्य घालविलें. नदीच्या कांठीं त्यांनीं एक सुंदर वाडा बांधून नदीस घाटहि बांधिले. येथें 'दुधस्थळी' नांवाचा एक सुंदर धबधबा आहे. करवीरचे शंकराचार्य (डॉ. कुर्तकोटी) यांनीं कांहीं दिवस आपला मठ येथें केला होता.

**गोवर्धन पर्वत**—वृन्दावनांतील एक पर्वत. इंद्रानें एकदां गोकुळावर अतिशय वृष्टि केली असतां कृष्णानें सर्व गोकुळवासी गोपगोपींना इंद्राच्या पूजेऐवजीं या पर्वताची पूजा करण्यास सांगितलें. यामुळें इंद्रास अनावर क्रोध येऊन त्यानें प्रचंड वृष्टि केली. तेव्हां सर्व गोकुलवासियांचें रक्षण करण्याकरितां कृष्णानें सात दिवसपर्यंत अहोरात्र तो पर्वत आपल्या करंगळीवर उचलून धरिला. तेव्हां पराभूत होऊन इंद्रानें वृष्टि बंद केली व कृष्णाशीं सख्य केलें.

**गोवर्धन प्रांत**—महाराष्ट्रांतील नाशिकबाजूच्या भागास हें जुनें नांव होतें. लेण्यांतील शिलालेखांत याचा उल्लेख येतो. या भागांतील ब्राह्मणांना गोवर्धन ब्राह्मण म्हणत.

**गोवर्धनाचार्य** (१०७५-११२५)—वंग देशाचा राजा लक्ष्मणसेन याच्या पदरीं हा कवि होता. याच्या बापाचें नांव नीलांबर असून याचे शिष्य उदयन व सहोदर बलभद्र होते. जयदेव कवीनें गीतगोविंदांत या गोवर्धनाची स्तुति केली आहे. इ. स. ११ व्या शतकाच्या समाप्तीपर्यंत लक्ष्मणसेन वंग देशांत राज्य करीत होता. यावरून त्याच्या दरबारीं असणारा हा कवि ११ व्या शतकांत असावा. याचा 'आर्यासप्तशति' या नांवाचा एक ग्रंथ आहे. ग्रंथ शृंगाररसात्मक आहे.

**गोवळकोट**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा, चिपळूण तालुका, एक किल्ला. किल्ल्याच्या तिन्ही बाजूंस वासिष्ठी नदी वाहते व चौथ्या

बाजूस एक खंदक आहे. किल्ल्याला उत्तरेस एक व पूर्वेस एक असे दोन दरवाजे आहेत. दक्षिणेकडील भिंतींत रेडजाजी नांवाच्या देवतेची मूर्ति आहे. हा किल्ला १६९० त जंजिऱ्याच्या हबशानें बांधला असें म्हणतात; पण हा त्या पूर्वीचा बांधलेला दिसतो. १७४४ त हा हबशांकडून आंग्र्यांनीं घेतला; व १७५५ त तो पेशव्यांकडे आला. किल्ल्यांत ४८ फूट लांब, ४४ फूट रुंद व २२ फूट खोल एवढा एक तलाव आहे.

**गोवळकोंडा**— हैद्राबादच्या पश्चिमेला पांच मैलांवर वसलेलें एक पडकें व जुनें शहर आणि किल्ला. हा किल्ला वरंगळच्या राजांनीं बांधला. १३६४ मध्यें तो बहामनी घराण्याकडे गेला. तो १५१२ मध्यें कुतुबशाहीनें घेतला व या ठिकाणीं आपली राजधानी केली. १६८७ मध्यें औरंगजेबानें आठ महिनेपर्यंत येथें वेढा दिला. १७२४ पासून हा किल्ला निजामाकडे आला होता. किल्ला वज्रतुंड जातीच्या (ग्रानाइटच्या) खडकावर असून त्याच्याभोंवतीं बरेच तट आहेत. सर्वांबाहेर पक्क्या दगडांचा तीन मैल परिघाचा तट असून त्याला आठ दरवाजे व ८७ बुरूज आहेत. तटाच्या आंत मशिदी, घरें व इतर इमारती वगैरेंचे पडीत भाग सर्वत्र पसरलेले आहेत. फक्त बालाहिसार (बालेकिल्ला) अद्याप टिकला आहे. शहराच्या उत्तरेस बादशाही करबस्तान आहे; पण तेथील सर्व इमारतींना कालगतीनें व विशेषतः औरंगजेबाच्या तोफांनीं फारच हानि पोहोंचली आहे. गोंवळकोंड्याच्या आसपास पूर्वी हिरे सांपडत असत व ते गोवळकोंड्याचे हिरे म्हणून प्रसिद्ध होते. खुद्द गोंवळकोंडा येथें मात्र हिऱ्याच्या खाणी नाहींत.

**गोवा किल्ला**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा, दापोली तालुका. हा लहानशा टेकडीवर असून याच्या उत्तरेस आणि पश्चिमेस समुद्र आहे. १७५५ त इंग्रजांनीं सुवर्णदुर्ग किल्ल्याबरोबरच हाहि काबीज केला, व दोन वर्षांनीं तो पेशव्यांच्या स्वाधीन केला. किल्ल्यांत आज दोन बंगले सरकारी अधिकाऱ्यांसाठीं आहेत. यांत १८६२ सालीं पाहणी झाली तेव्हां ६९ जुन्या तोफा पडलेल्या होत्या.

**गोवारी**— ही एक जात म्हणून फक्त वऱ्हाड मध्यप्रांतांत आहे. लोकसंख्या सुमारें दीड लाख आहे. अहीर आणि गोंड यांच्या मिश्रणानें ही जात बनलेली दिसते. यांची गायगोवारी ही पोटजात श्रेष्ठ आहे. यांच्यांत गोंदण्याची चाल आहे. गुरें चारणें व शेतकी हा यांचा मुख्य धंदा आहे. (गोंडगोवारी पाहा).

**गोविंद** (१८७४-१९२६)— वीररसात्मक काव्याबद्दल सुप्रसिद्ध असा एक महाराष्ट्रीय शाहीर. यांचें पूर्ण नांव गोविंद त्र्यंबक दरेकर असें होतें. यांच्या लहानपणींच तापामुळे यांचे हातपाय लुळे पडल्यानें यांना शिक्षण घेतां आलें नाहीं. बॅ. वि. दा. सावरकरांच्यामुळेंच यांना राष्ट्रीय काव्यें करण्याची स्फूर्ति झाली व यानंतर हे बॅ. सावरकरांच्या 'मित्रमेळा' या संस्थेस जाऊन मिळाले. सन १९०६ मध्यें यांनीं रचलेलीं काव्यें 'लघुअभिनव माला' म्हणून संग्रहित करण्यांत आलीं. जेव्हां १९०८ ते १९०९ या सालांत सरकारची दडपशाही सुरू झाली तेव्हां यांचीं काव्यें जप्त करण्यांत आलीं. यानंतर सन १९१७ पर्यंत यांनीं आपलें काव्यलेखन बंद ठेवलें होतें. तें सन १९१८ मध्यें होमरूलची चळवळ सुरू झाल्यावर पुन्हां सुरू केलें.

आपल्या राष्ट्रीय वृत्तीच्या वीररसात्मक काव्यानें श्रोत्यांच्या अंतःकरणाला देशाभिमानाची भरती आणण्याचें यांचें कसब खरोखर कौतुकास्पद असेंच आहे. 'महाराष्ट्राची भूपाळी', 'सुंदर मी होणार' यांसारख्या कवितांनी यांनीं लोकांना वेड लावून सोडलें होतें.

**गोविंद कवि**—तंजावरच्या तेलगू राजाच्या पदरचा एक कवि. यानें गुजराथची राजकन्या इंदुमती हिच्यावर 'इंदुमती-परिणय' नांवाचें एक काव्य केलें व अनेक देवालयांचा इतिहासहि लिहून ठेविला.

**गोविंदचंद्र गढवाल** (१११४-११५५)—गढवाल राजवंशांतील या महापुरुषानें मोठा पराक्रम गाजवून मुसलमानांना थोपवून धरलें होतें. याची सत्ता उत्तर व दक्षिण हिंदुस्थानावर चालत होती. याला बनारसचा राजा असेंहि म्हणण्यांत येतें. याचे अनेक लेख मिळाले आहेत. हा जसा विजेता तसा विद्वानांचा चाहताहि होता. याची राणी कुमारदेवी हिनें सारानाथचें प्रचंड बुद्धमंदिर बांधिलें.

**गोविंद ठक्कुर**— काव्यप्रकाशाचा प्रसिद्ध टीकाकार. 'काव्यप्रदीप' व 'उदाहरणदीपिका' हे दोन त्याचे टीकाग्रंथ प्रसिद्ध आहेत. याच्या काव्यप्रदीपावर नागेशाची 'उद्योत' नांवाची टीका आहे.

**गोविंददास** (सु. १६००)—एक बंगाली कवि. यानें विद्यासुंदर, प्रेमविलास, भक्तिरत्नाकर, भक्तमाल, इ. ग्रंथ रचले आहेत. या नांवाचा एक मैथिल कविहि आहे.

**गोविंद दीक्षित**—१. एक तंजावरच्या अच्युतप्पा नायक राजाच्या पदरचा कवि. याचा 'हरिवंशसार चरित्रम्' हा संस्कृत पद्यात्मक ग्रंथ तीन विभागांचा आहे. 'संगीत सुधानिधि' हा त्याचा पदसंग्रह आहे.

२. हाहि सोळाव्या शतकांत तंजावरच्या नायक राजाच्या पदरीं होता व पुढें प्रधान झाला. यानें ब्राह्मणांस अनेक अग्रहार दिले. त्यांपैकीं तंजावरमध्यें 'एकादशी अग्रहार' अद्यापि प्रसिद्ध आहे. यानें अनेक यज्ञ केले व वास्तू बांधल्या.

वेदान्त, धर्म, शिल्प व संगीत यांवर याचे ग्रंथ आहेत. पट्टेश्वरसूच्या शानांविकेच्या देवळाजवळ याची व याच्या पत्नीची मूर्ति आहे.

**गोविंदपंत बुंदेले**—मराठेशाहींतील एक सरदार. याचें मूळगांव रत्नागिरी जिल्ह्यांतील नेवरें असून हा तेथील कुलकर्णी होता. याचें संबंध नांव गोविंद बल्लाळ खेर असून हा कऱ्हाडा ब्राह्मण होता. जातीनें हूड असल्यानें भाऊबंदाच्या त्रासाला कंटाळून तो देशावर आला व पुण्यास थोरल्या बाजीरावाजवळ त्यानें शागीर्दाची नौकरी धरली. पुढें त्याच्या अंगचे अनेक गुण दृष्टोत्पत्तीस आल्यानें बाजीरावानें त्याला नवीनच मिळालेल्या बुंदेलखंडाच्या कारभारावर नेमलें (१७३३). तिकडे त्यानें शौर्यानें व धूर्ततेनें वागून रजपुत राजांवर दाब बसवून मराठी राज्याचा दरारा पसरविल्यानें त्याची प्रमुख सरदारांत गणना होऊं लागली. कुरईच्या नबाबाकडून त्यानें जो प्रांत हस्तगत केला त्यांत सागर म्हणून एक प्रचंड तलाव होता. त्याच्या काठीं सागर नांवाचेंच शहर वसवून तें त्यानें आपलें राहण्याचें मुख्य ठिकाण केलें (१७३६-३७). फर्रुकाबादच्या लढाईत रोहिल्यांचा जंगी पराभव करून ज्या मराठे सरदारांनीं दिल्लीच्या बादशहास धाक दाखविला त्यांत गोविंदपंत एक मुख्य सरदार होता (१७५१). पंतानें बकुल्लाखानास बडवून सर्व कुराकडा प्रांत काबीज केला.

पुढें त्यानें अंतर्वेदी जिंकून इटावा येथें जबरदस्त लढाई देऊन अस्करअलीस ठार केलें (१७५६). कुंजपुऱ्याच्या (१७६०) अबदालीशीं झालेल्या लढाईंत पंत हजर होता. पानपतच्या लढाईंत पंतानें बराच मोठा भाग घेतला होता. अब्दालीची रसद मारण्याचें काम पंताकडे होतें. नोव्हेंबरमध्यें पंतानें अब्दालीची रसद बहुतेक बंद पाडली व त्याला शहहि दिला. तो उठविण्यास आताईखान हा शिकारीच्या निमित्तानें गाजिउद्दीन नगराजवळ पंतावर चालून गेला. खानानें त्या वेळीं लबाडीनें होळकरांचें निशाण पुढें धरलें होतें; त्यामुळें पंत फसला. एकाएकीं कापाकापी झाली. पंत आताईखानाच्या हातीं लागला. खानानें त्याचें शिर कापून अब्दालीकडे व त्यानें ते भाऊसाहेबांकडे पाठविलें (२२-१२-१७६०).

**गोविंदपाल** (११६१-१२००)— बंगालच्या पाल घराण्यांतील एक राजा. याच्या कारकीर्दीत 'अष्टसहस्रिकाप्रज्ञापारमिता', 'अमरकोश', 'गुह्यावली', 'पंचकर', 'योगरत्नमाला' हे सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिले गेले. यानें वयाच्या ३८ व्या वर्षी गयेवर आपलें राज्य प्रस्थापित केलें. उद्दान्तपुर येथें झालेल्या घनघोर संग्रामांत हा मारला गेला.

**गोविंद प्रभु** (सु. शके १०८३-१२०८)— महानुभावपंथाचे हे संस्थापक काण्वशाखीय ब्राह्मण असून वऱ्हाडांतील ऋद्धिपूरजवळच्या काटसुरेगव्हाण या खेड्यांत शके ११११० (स. ११८८) मध्यें यांचा जन्म झाला. यांस गुंडप्रभु अगर गुंडोबा असेंहि म्हणत. हे कृष्णभक्त असून आपल्या तपस्येनें सिद्धकोटीस पोहोंचले. महानुभावांच्या पंचकृष्णांत गुंडम राऊळ येतात. हे दीर्घायुषी असून आपला शिष्य चक्रधर याच्या निधनानंतर तेरा वर्षांनीं म्हणजे शके १२०८ मध्यें यांनीं देह ठेवला. 'ऋद्धिपूरचरित' या ग्रंथांत यांची विशेष माहिती आहे. गोविंद प्रभूंच्या वास्तव्यामुळें ऋद्धिपुराला क्षेत्रमाहात्म्य प्राप्त झालें आहे. 'ऋद्धिपूर वर्णन' नांवाचें महानुभावी काव्य प्रसिद्ध आहे.

**गोविंद बाळकृष्ण दीक्षित-गरुड** (१७८६-१८५४)— महाराष्ट्रांतील एक संस्कृत ग्रंथकार. हे कऱ्हाडचे असून रामचंद्र दैवज्ञ यांचे शिष्य. मंजुषा, तरंगिणी, कालप्रबोधोदय, एकादशिका-प्रकाश हे व इतर आणखी लहानसहान ग्रंथ यांनीं लिहिले. एक संस्कृत कवि, ज्योतिषी, व धर्मप्रबंधकार म्हणून हे प्रसिद्ध आहेत.

**गोविंद भगवंत पिंगळे** (मृ. १७९९)—पेशव्यांच्या फडांतील हैद्राबाद वकिलातीचे कारकून. याच्या नांवाचीं पत्रें राजवाडे-खंड ७ यांत दिलीं आहेत. हा इंदापूरचा असून तेथें त्याचा वाडा अद्यापि आहे. याला पेशव्यांकडून सरंजाम व निजामाकडून तीन गांवें इनाम होतीं.

**गोविंदराज** (१०५०-११००)—मनुस्मृतीवरील एक टीकाकार. याच्या ग्रंथावरून असें दिसतें कीं, याच्या बापाचें नांव भट्टमाधव होतें. यानें गंगेच्या तीरावर राहून मनुस्मृतीचें व तीवरील टीकांचें अध्ययन केलें. याचा 'स्मृतिमंजरी' हा ग्रंथ धर्मशास्त्राच्या माहितीचें आगर मानला जातो.

**गोविंदराव काळे** (मृ. १८२३)—निजामाकडील पेशव्यांचा एक वकील. वडील कृष्णराव वारल्यानंतर गोविंदराव यास निजामाकडील वकिलीचें काम मिळालें. खर्ड्यांच्या लढाईस जीं कारणें घडलीं, तीं गोविंदरावाच्या कारकीर्दींत झालेलीं होतीं. गोविंदराव हा प्रथम नाना फडणिसाचा विश्वासू अनुयायी होता. परंतु तोच पुढें बाजीरावाला फितूर होऊन नानाला कैदेंत टाकण्यास कारण झाला. पुढें दौलतराव शिंद्यानें बाजीरावावर जरब बसविण्याकरितां टिपूकडे वकील पाठविला असतां गोविंदरावाच्याच युक्तीनें दौलतरावाची मसलत फिक्की पडली. बाजीरावानें पुनः नानाला कैद करण्याकरितां खटपट चालविली असतां तींत हा मुख्य होता; परंतु शिंद्यानें ही बातमी नानाला दिल्यामुळें त्यानें बाजीरावास खुलासा विचारला असतां बाजीरावानें ही गोष्ट नाकारून उलट गोविंदरावास कैद करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें नानानें त्यास कैदेंत टाकलें

(१७९९). या वेळीं त्याचा सव्वा लक्षाचा सरंजाम होता तो जप्त करण्यांत आला. टिपूवरील दुसऱ्या स्वारींतहि हा हजर होता. त्या वेळीं उत्तम कामगिरी बजावल्याबद्दल इंग्रजांनीं त्यास दोन तोफा बक्षीस दिल्या. बाजीरावाच्या शेवटच्या दिवसांत हा त्याच्याबरोबर अखेरपर्यंत होता. पुढें इंग्रजींत हा बारामतीस येऊन राहिला. त्या वेळीं त्यास पेशवाईतील दोन गांव इनाम व पोलिटिकल पेन्शन तीन हजार इंग्रजांनीं कायम केली. याचे वंशज बारामतीस आहेत.

**गोविंदराव खंडेराव चिटणीस** (१७१६–१७८४)— खंडोबल्लाळ चिटणिसाचा हा धाकटा मुलगा. आपला हा वडील भाऊ शिवाजी याच्यानंतर चिटणिसाचें काम पाहूं लागला. हा शाहूच्या विश्वासांत साताऱ्यास शेवटपर्यंत राहिला. बाळाजी विश्वनाथाचा हा मित्र असून शाहूच्या मृत्यूसमयीं पेशव्यानें केलेल्या मसलतींत याचें अंग होतें.

**गोविंदराव गायकवाड** (१७६८–१८००)— हा दमाजीचा पुत्र. दमाजीच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलांत सरदारीबद्दल तंटे लागले. माधवरावानें हा बखेडा मोडून गोविंदरावास सरदारीचीं वस्त्रें दिलीं. आपला भाऊ फत्तेसिंग याच्याशीं हक्कासंबंधीं असलेल्या याच्या दाव्याचा निकाल रामशास्त्री यांच्यामार्फत पुण्यास होऊन त्यांत तीन लाखांची जहागीर घेऊन गोविंदरावास पुण्याजवळ दावडी येथें राहावें लागलें. नारायणरावाच्या मृत्यूनंतर दादाला पेशवाई मिळाल्यावर याचा भाऊ फत्तेसिंग इंग्रजांस मिळाला होता. त्याचें पारिपत्य करण्याची कामगिरी महादजी शिंद्यानें याजवर सोंपविली होती.

**गोविंद राष्ट्रकूट (दुसरा)** (७७२—८३)—पहिल्या कृष्ण राष्ट्रकूटाचा हा मुलगा असून यानें कांहीं वर्षें मालखेडचें राज्य केलें. हा चैनी व विलासी असल्यानें मालखेडचीं सर्व राज्यसूत्रें याचा धाकटा भाऊ, खानदेश व नाशिकचा सुभेदार जो ध्रुव तोच पाहत असे. याच्या ऐदीपणाचा फायदा घेऊन ध्रुवानें मालखेडचीं राजसूत्रें आपल्या हातीं घेण्यास सुरुवात केली. यास ध्रुवाचा हा कावा समजून येतांच त्यास प्रधानपदावरून यानें दूर केलें. तेव्हां ध्रुवानें याच्याशी लढाई देण्याची तयारी केली. भावाभावांतील अंतस्थ कलहामुळें मांडलिक राजेहि यास विचारीनात. सन ७८० मध्यें गोविंद राष्ट्रकूटानें कांची, माळवा, गंगवाडी व वेंगी येथील राजांच्या मदतीनें ध्रुवास तोंड देण्याचा केलेला प्रयत्न निष्फळ ठरून ध्रुवानें मालखेडचें राज्य जिंकलें.

**गोविंद शिवराम खासगीवाले** (मृत्यु १७७२)— पेशव्यांचा एक सरदार व खासगी कारभारी. हा निःस्वार्थी व हुशार असून यास 'गोविंदराव तात्या' असेंहि म्हणत. याचें मूळ उपनांव लिमये. नानासाहेबानें यास इंग्रज, होळकर व निजाम यांजकडील पेशव्यांचा वकील नेमलें होतें. यास पैठणचें कुलकर्णीपद, स्वारीचा सरंजाम व तैनात व तीन गांवें मिळालीं. माधवरावास राघोबादादाच्या बाबतींत याचा फार उपयोग झाला. सर्व पक्षांशीं मिळूनमिसळून यानें कारभार केला. यानें पुण्यांत रामेश्वरचें देऊळ बांधलें.

**गोविंदानंद स्वामी** (१८८९– )— एक हिंदी समाजकार्यकर्ता. यांचें शिक्षण मुंबई येथें झालें. १९१० मध्यें हे फर्ग्युसन कॉलेजमध्यें इंग्रजी व इतिहास या विषयांचे प्राध्यापक होते. १९११ मध्यें हिस्लॉप कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक होते. तेथून ते मुझफरपूर येथील बी. बी. कॉलेजमध्यें अर्थशास्त्र व राजकारण या विषयांचे प्राध्यापक म्हणून गेले. १९१४ मध्यें यांनीं जपानचा व अमेरिकेचा प्रवास केला व तेथून ते कोमागाटामारू बोटीनें सप्टेंबर १९१४ हिंदुस्थानांत परत आले. परंतु लागलीच त्यांस कोमागाटामारू व बजबज गोळीबार-प्रकरणांत ३० सप्टेंबर १९१४ रोजीं पकडून तुरुंगांत टाकण्यांत आलें. एप्रिल १९१८ मध्यें त्यांची सुटका होऊन त्यांस २७ फेब्रुवारी १९१९ पर्यंत हैद्राबाद सिंधमध्यें स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें. पुन्हां एप्रिल १९१९ मध्यें त्यांस रौलट कायद्याविरुद्ध केलेल्या सत्याग्रहांत पकडण्यांत आलें. १९१९ मध्ये त्यांनीं मुंबई येथें टेक्स्टाइल वर्कर्स युनियनची स्थापना केली. कांहीं दिवस यांनीं गांधीजी काढीत असलेल्या 'यंग इंडिया' पत्राच्या संपादन खात्यांत काम केलें. डिसेंबर १९१९ मध्यें मुंबई येथें रामकृष्ण आश्रम व विवेकानंद सोसायटी यांची स्थापना केली. नंतर हे लो. टिळक यांस येऊन मिळाले आणि त्यांच्याबरोबर त्यांच्या मृत्यूपर्यंत यांनीं कार्य केले. वरील युनियनचे हे अध्यक्ष होते व त्यांनीं पहिला संप घडवून आणला. १९२० मध्यें नॉर्थ वेस्टर्न रेल्वेच्या संपाबद्दल अटक झाली. १९२१ मध्यें असहकारितेच्या चळवळींत ५ वर्षें हद्दपारीची शिक्षा झाली. तेथून सुटल्यावर १९२४ मध्यें त्यांनीं कराची येथें 'दैनिक केसरी' पत्र सुरू केलें. १९२३च्या सत्याग्रहाच्या चळवळींत एक वर्षाची शिक्षा झाली. यांनीं स्वराज्यश्रमाची स्थापना केली. १९२५ मध्यें अखिल भारतीय हुतात्म्यांची परिषद भरविली. जतींद्रनाथ यांच्या उपोषणप्रसंगीं राजकीय कैद्यांस तुरुंगांत चांगलें वागविलें जावें याबद्दल यांनीं फार मोठी चळवळ केली. दुसऱ्या सत्याग्रहाच्या चळवळींत हे सिंधचे सर्वाधिकारी होते त्या वेळीं त्यांस २ वर्षांची शिक्षा झाली. कॉंग्रेसमधील डाव्या पक्षाचे हे पुढारी होते व त्या पक्षाचे चिटणीस होते. कराची येथें 'व्हॉइस ऑफ इंडिया' हें साप्ताहिक सुरू केलें. आतां हें दैनिक आहे. १९२८ मध्यें भरलेल्या सिंध प्रांतिक

गोवें—शांतादुर्गादेवीचें देऊळ (पृ. ७११)

गोवें—मंगेशाचें देऊळ (पृ. ७११)

परिषदेचे स्वागताध्यक्ष होते. १९३१ त सिंधमध्यें भरलेल्या राष्ट्रीय सभेचे हे स्वागताध्यक्ष होते.

**गोवें प्रांत**— हिंदुस्थानांतील पश्चिम किनाऱ्यावरील पोर्तुगीज वसाहत. दक्षिणोत्तर लांबी ६२ मैल व पूर्वपश्चिम कमाल रुंदी ४० मैल आहे. क्षे. फ. १,३०१ चौ. मैल. सह्याद्रि पर्वताच्या रांगा यांतून पसरल्या असून यांत नद्याहि बऱ्याच आहेत. हवामान उष्ण असून पाऊस सरासरी ९० इंच पडतो. १९४० सालीं लो. सं. ६,२७,१७७ होती. जुन्या काबिजातींत शें. ९१ ख्रिस्ती तर नवीन काबिजातींत तितकेच हिंदू आहेत. हिंदू लोक कोंकणी भाषा बोलतात. सरकारी कामकाजाची भाषा पोर्तुगीज आहे. एकंदर जमिनीपैकीं सुमारें ⅓ लागवडीखालीं आहे. मुख्य पीक तांदुळाचें आहे, पण तें लोकवस्तीला सारें आठ महिनेच पुरतें. नारळ, आंबा, फणस, काजू हीं फळें उत्पन्न देणारीं आहेत. सरकारला जंगलाचें उत्पन्न चांगलें येतें. पूर्वी गोव्यास बाहेरचा व्यापार असे; हल्लीं तो फारसा नाहीं. कॅसलरॉकपासून ५१ मैल आगगाडीचा फांटा मार्मागोव्यापर्यंत आहे. नोव्हा गोवा (पणजी) येथें पोर्तुगीज वसाहतीचा गव्हर्नर जनरल राहतो. त्याच्या सर्व खात्यांचे वरिष्ठ अधिकारी तेथेंच असतात. एक कायदेमंडळ आहे. दमण व दीव येथें लेफ्टनंट गव्हर्नर असतात. एक हायकोर्टहि आहे. मराठी प्राथमिक शाळा खाजगी संस्थांनीं ठिकठिकाणीं चालविल्या आहेत. मुंबई विद्यापीठाला जोडलेलीं सहा-सात हायस्कुलें चालतात. सरकारी शाळांतून पोर्तुगीज माध्यम आहे.

या भागाचें प्राचीन नांव गोमांतक आहे. परशुरामानें बाहेरून गौडब्राह्मणांचीं कुटुंबें आणून येथें वस्ती करविली अशाबद्दलच्या पौराणिक कथा सांगण्यांत येतात. शिलालेखांवरून असें दिसतें कीं, १३१२ पर्यंत येथें कदंबांचें राज्य होतें. या सालीं हा प्रदेश मुसलमानांनीं घेतला. १३७० मध्यें विजयानगरच्या साम्राज्यांत हा गेला, पण शंभर वर्षांनीं पुन्हां बहामनी—आदिलशाही या सुलतानांच्या ताब्यांत आला. १५१० मध्यें अल्बुकर्क यानें हा मुलूख जिंकल्यापासून आजपर्यंत तो पोर्तुगीज सत्तेखालीं राहिला आहे. लोकांनीं स्वतंत्र होण्याचा आंतून व बाहेरून पुष्कळ प्रयत्न करून पाहिलेला आहे. हिंदू लोकांना ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं व सरकारनें अतिशय छळलें व पुष्कळ लोक बाटले गेले. १८९६ सालीं राणेमंडळींनीं खूप दंगा माजवून दिला होता, पण कांहीं चाललें नाहीं. दोन वर्षांपूर्वी डॉ. लोहिया यांच्या नेतृत्वाखालीं एक स्वातंत्र्य चळवळ झाली; पण ती अद्यांच अयशस्वी ठरली.

गोव्यामध्यें धर्म आणि भाषा या बाबतींत हिंदूंची गळचेपी चालली असल्यानें स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं गेल्या पंचवीस वर्षांपासून पुष्कळ चळवळी चालू आहेत. ब्रिटिश हिंदुस्थानला १९४७ सालीं स्वातंत्र्य लाभलें तेव्हां तर अशा चळवळींनें जास्तच उचल खाली. तथापि हिंदुस्थान सरकारचा प्रत्यक्ष पाठिंबा नसल्यानें स्थानिक लोकांच्या खटपटींना अद्यापि यश आलेलें नाहीं. (गोंवें प्रांतांतील दीव, दमण व इतर मोठीं गांवें यांवर स्वतंत्र लेख आहेत).

**गोग्वैं, पॉल** (१७४८–१९०३)— एक फ्रेंच चित्रकार. पॉंट–आव्हेन या चित्रकार-संघाचा तो प्रमुख झाला. त्याच्या चित्रांत एक निराळेपणा आहे. नैसर्गिक प्रकारांचें स्पष्ट विशदीकरण, आलंकारिक नमुने आणि कांहीं तरी भडक रंगाचा उपयोग हीं त्याच्या चित्रांतील वैशिष्ट्यें म्हणतां येतील.

**गोशाली मंखलीपुत्त** (ख्रि. पू. पांचवें शतक)—सुप्रसिद्ध जैन साधु महावीर याचा हा एक प्रतिस्पर्धी व आजीविक नांवाच्या पंथाचा संस्थापक. हा मंख नांवाच्या गोसाव्याचा मुलगा. राजगृह येथें हा महावीराचा शिष्य झाला. परंतु परस्परांतील मतभिन्नतेमुळें महावीराशीं याचें वितुष्ट आलें व यानें गोसाव्यांच्याकरितां आजीविक नांवाचा पंथ स्थापला. श्रावस्ती येथें एका कुंभारणीच्या घरीं राहून हा आपणांस जैनांचा प्रमुख समजूं लागला तेव्हां महावीरानें श्रावस्ती येथें याची भेट घेतली. या भेटींत महावीरास गोशालींत पूर्वीपेक्षां कांहींच फरक आढळून आला नाहीं. याच वेळीं गोशालीस आपण केलेल्या गुरूच्या अपमानाबद्दल यास अतिशय पश्चात्ताप झाला.

**गोशेन, जॉर्ज** (१८३१–१९०७)—एक ब्रिटिश राजकारणी व अर्थशास्त्रज्ञ. हा जर्मन कुळांतला होता. १८६८ सालीं 'पुअर लॉ बोर्ड' (गरीब कायदा खात्या) चा अध्यक्ष आणि नंतर नौकाधिपति झाला. १८८५ मध्यें ग्लॅडस्टननें आयर्लंडला होमरूल देण्याची योजना पुढें मांडली तेव्हां गोशेन लिबरल–युनियनिस्ट पक्षाचा पुढारी झाला, व त्याच सालीं चॅन्सेलर ऑफ एक्सचेकर–मुख्य फडणीस झाला. 'थिअरी ऑफ फॉरिन एक्सचेंज' (परराष्ट्रीय चलनसिद्धान्त) हा गोशेनचा सुप्रसिद्ध ग्रंथ आहे.

**गोसावी**—गोसाई, गुसांई, गोस्वामी, वगैरे नांवांनीं हा वर्ग ओळखिला जातो. गोसावी हा एक हिंदु यतींचा वर्ग असून त्यांत शैव व वैष्णव असे दोन पंथ आहेत. वैष्णव गोसावी आसाम-बंगाल्यांत फार आहेत. वऱ्हाड–महाराष्ट्रांत बहुतेक शैवच आहेत. गोसावी वर्गात भटके (भिक्षेकरी) व गृहस्थ (घरभारी) असे दोन भेद करतां येतील. भटके गोसावी देवाच्या नांवाखालीं वाटेल तसा अनाचार करतात. त्यांच्यापासून अनौरस संततिहि उत्पन्न होत असते. चेले करण्याकरितां ते कित्येकदां मुलें चाळगताद्र किंवा विकत घेतात.

गोसावी ही निराळी जात मानली जाते. सबंध हिंदुस्थानांतील एकंदर गोसाव्यांची संख्या अडीच लाखांवर आहे. ही जात शंकराचार्यांच्या अद्वैतमताची अनुयायी आहे. गिरि, पुरी, भारती, इत्यादि दहा कुळीं आहेत. जातींत 'घरभारी', 'मठधारी', 'संन्यासी', वगैरे भेद आहेत. मात्र कोणालाहि 'घरभारी' होतां येतें, किंवा संन्यासी राहतां येतें. गुजराथेंत कांहीं मठधारी घरभारी झाले आहेत. 'मठधारी' गोसाव्यांत 'महंत' व 'परमहंस' आहेत. परंतु बहुतेक व्यवहार घरभाऱ्यांसारखाच आहे. या मठधारींमध्यें बरेच गोसावी 'नवकोट नारायण' आहेत. मस्कामंडी, बुद्धगया, हैद्राबाद, इत्यादि ठिकाणच्या गोसाव्यांत राजे, महाराजे यांसारखे किताब धारण करणारे आहेत.

**गोसावीनंदन**—एक मराठी कवि. याचें नांव वासुदेव असून बापाचें नांव गोस्वामी होतें. हा तंजावरकडील राहणारा. याचे गुरु गोपाळाश्रमगजानन नांवाचे होते. याचा काल इ. स. १६५०–१७०० चा होय. याचा मुख्य ग्रंथ 'ज्ञानमोदक' नांवाचा असून शिवाय सीतास्वयंवर व अभंग, पदें वगैरे स्फुटकाव्य बरेंच आहे. याचीं स्तोत्रें, आरत्या व अष्टकें लहान मुलांना शिकतां येतील अशीं सुबोध व सोपीं आहेत. हा गाणपत्य होता.

**गोहद्**—ग्वाल्हेर संस्थानांतील तोंवरघांट जिल्ह्यांतील एक शहर. अठराव्या शतकापासून याचें नांव ऐकूं येतें. त्या वेळीं हें जाट लोकांनीं घेतलें. मध्यंतरीं ३०।३२ वर्षें हें रजपुतांच्या ताब्यांत होतें; पण पुनः जाटांकडे आलें. १७७९ मध्यें इंग्रजांशीं त्यांनीं तह केला; पण तहाच्या अटी न पाळल्या गेल्याच्या सबबीवर शिंद्यांपासून १७८४ मध्यें इंग्रजांनीं त्याचें रक्षण केलें नाहीं. पुढें तें शिंद्यांच्या हातीं गेलें. हें शहर वैशाली नदीच्या कांठावर आहे. भोंवतीं तट आहेत. आंतील भागांत एक भक्कम किल्ला आहे व त्यांतील जुन्या राजवाड्यांत सरकारी कचेरी भरते. लक्ष्मणताल नांवाचा तलाव व त्यांतील देऊळ हीं पाहण्यासारखीं आहेत.

**गोळी (बंदुकीची)**— बंदुकीची गोळी प्रथम केवळ शिशाची गोटीसारखी वाटोळी केलेली असे. व ती बंदुकींत दारू ठासल्यानंतर भरीत असत. नवीन भोंवऱ्यासारखा अंतर्भाग असलेल्या बंदुकीच्या नळ्या प्रचारांत आल्यापासून या वाटोळ्या गोळ्यास योग्य प्रकारचा आकार देण्याचे पुष्कळ प्रयत्न करण्यांत आले. परंतु मोड-बंदुका (ब्रीच लोडर्स) प्रचारांत येईपर्यंत या प्रयत्नास यश आलें नाहीं. या बंदुकींत लांबट आकाराची व बंदुकीच्या तोंडाच्या आकाराची किंवहुना त्याहूनहि किंचित् मोठ्या आकाराची गोळी वापरतां येणें शक्य झालें. अशी गोळी दारूच्या स्फोटामुळें पुढें ढकलली गेल्यावर बंदुकींतील वाटोळ्या खोबणींतून तीस तोंडांतून बाहेर निघतांना सरळ गतीबरोबरच एक स्वतःभोंवतीं फिरण्याची गति मिळत असते. त्यामुळें तिची गति नेहमीं सरळ राहून तिचे पुढील टोंक नेहमीं समोर राहतें. सध्यां ब्रिटिश बंदुकांत वापरण्यांत येणारी गोळी सव्वा इंच लांबीची असून पुढील टोंकाकडे निमुळती होत गेलेली असते. ती मुख्यतः शिशाची बनविलेली असून तिच्या टोंकाशीं थोडें अल्युमिनम् असतें, व तिच्याभोंवतीं तांबें व निकल यांच्या मिश्र (क्यूप्रोनिकेल) धातूचें आवरण असतें.

**गोळे, महादेव शिवराम** (१८५९–१९०६)—एक महाराष्ट्रीय लेखक-प्राध्यापक. हे पुण्याच्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सेवक असून आगरकरांनंतर फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल झाले. प्रचलित शिक्षणपद्धतीवरचा उडत चाललेला यांचा विश्वास 'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' या ग्रंथांत दृग्गोचर होतो. गोळे मोठे मार्मिक लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत. 'केसरी'तील लेख, 'हिंदुधर्म आणि सुधारणा', शाळेचा अभिमान, इत्यादि पुस्तकांतून त्यांचे लेखनगुण दृष्टीस पडतात.

**गोक्षुरादिगुग्गुळ**—एक आयुर्वेदीय औषध. गुग्गुळ, गोखरू, सुंठ, मिरे, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, नागरमोथा हीं यांत मुख्य औषधें आहेत. मूत्रमार्गाचे विकार, लघवीची जळजळ, लघवी गढूळ असणें, मूतखडा असणें, लघवींतून रक्तस्राव होणें, ओटीपोटांत दुखणें, स्त्रियांना प्रदर असणे, लघवीला साफ न होणें, इत्यादि रोगांवर हें औषध रामबाण आहे. पुरुषांच्या शुक्रविकारांवर या गुग्गुळाचा चांगला उपयोग होतो. १ ते २ गोळ्या पाण्याबरोबर घेतात.

**गौड (गौर)**— बंगाल, माल्डा जिल्ह्यांतलें एक पडकें व जुनाट शहर. या शहराला अंग्रेझाबादच्या पूर्वेस ८ मैलांवर असणाऱ्या लखनौती किंवा लक्ष्मणावती गांवच्या नांवानेंहि संबोधिलें जातें. गौडबंगाल असें या प्रातास पूर्वी या शहरावरून नांव पडलें होतें. प्राचीन हिंदू राजांची येथें राजधानी होती व हें संस्कृतविद्येचें केंद्र होतें. ११९८ मध्यें मुसलमानांनीं बंगाल घेतला तेव्हांपासून ३०० वर्षें तें त्यांचें मुख्य ठिकाण होतें. मध्यंतरीं फिरोझाबाद हें मुख्य ठिकाण करण्यांत आलें होतें. पण जलालुद्दीन महमदशहानें गौड येथें राजधानी आणली. अकबरचा सरदार मुनीम दाऊदखान यानें (१५७५) अकबरची सत्ता यावर स्थापन केली. याच वेळीं एक प्रकारच्या रोगाची भयंकर सांथ येथें पसरली व सर्व शहर बेचिराख झालें. दाऊदखानहि मरण पावला. एकंदर मुसलमानी अमलांत येथें बऱ्याच मशिदी व

इमारती बांधल्या गेल्या. १६५० च्या सुमारास सुलतान सुजाची राजधानी राजमहाल येथें होती, पण तो स्वतः बरेच दिवस येथेंच राहत असे. डाका आणि मुर्शिदाबाद येथे राजधानी गेल्यापासून (१६७३) हें शहर कायमचें मागें पडलें.

**गौड, रामदास ललताप्रसाद** (१८८१- )— एक हिंदी व उर्दू कवि. जौनपूर येथें यांचा जन्म झाला. वयाच्या दहाव्या वर्षीच यांनीं पांच-सहाशें छंदांचें रामायण लिहिलें. सन १९०८ मध्यें यांनीं रसायनशास्त्र घेऊन एम्. ए. ची पदवी मिळवली. यानंतर सन १९१८ मध्यें बनारस हिंदु विश्वविद्यालयामध्यें हे रसायनशास्त्राचे प्रोफेसर म्हणून काम करूं लागले. याच वेळीं या विश्वविद्यालयाच्या शासनसमित्यांतून यांची निवड झाली. सन १९२०-२१ च्या असहयोग चळवळीच्या धामधुमींत प्रांतिक कॉंग्रेस कमेटीच्या सभासदांबरोबर यांनाहि सरकारनें अटक केली व दीड वर्षांची सजा दिली. सन १९२३ मध्यें तुरुंगांतून यांची सुटका झाली व तेव्हांपासून हे काशीसच वास्तव्य करून आहेत.

अठरा ते वीस वयाचे असतांना छत्तीसगडच्या 'मित्र' साप्ताहिकांतून 'रस' या टोपण नांवानें यांनीं आपल्या कविता प्रसिद्ध केल्या. त्यानंतर 'गौड हितकारी' हें पत्र व 'विज्ञान' मासिक चालवून यांनीं आपले विचार लोकांपुढें मांडले. विज्ञान परिषद् स्थापून यांनीं व्याख्यानद्वारें समाजांतील मानसिक व धार्मिक प्रकारच्या संकुचित समजुती नष्ट करण्याचा प्रयत्न केला.

**गौडपादाचार्य** (सु. ८ वें शतक).— शुकाचा शिष्य व शंकराचार्यांचा गुरु जो गोविंदाचार्य त्याचा गुरु. अनुगीताभाष्य, उत्तरगीताभाष्य, चिदानंद केलिविलास, देवीमाहात्म्य-टीका, सांख्यकारिकाभाष्य व मांडूक्योपनिषत्कारिका यांसारखी यांची ग्रंथरचना आहे.

**गौडब्राह्मण**—उत्तरेकडील पंचगौड ब्राह्मणांपैकीं गौर अथवा गौड हा एक विभाग आहे. गौड हा उत्तरकौशिकाचा एक पोटविभाग असून गौंड अथवा गोंड जिल्ह्यांत श्रावस्ति शहराचे अवशेष उपलब्ध झाले आहेत. गौड हे या जिल्ह्याचेच मूळचे रहिवासी असावेत. गौड या नांवाचे ब्राह्मण अयोध्या, जहांगिराबाद, गोंड जिल्हा व गोरखपूर वगैरे ठिकाणीं अद्यापिहि पुष्कळ आहेत.

दधीचीचा मुलगा पिप्पलायन म्हणून होता. त्याच्या बारा मुलांपासून गौड जातीचीं द्वादश गोत्रें प्रचारांत आलीं असेंहि म्हणतात. गुजरगौडांचींहि द्वादश गोत्रें आहेत. कनौजियांपेक्षां गौडब्राह्मण जास्त सुधारलेले असून बिहार येथें सारस्वत ब्राह्मणांशीं ते विवाह करूं लागले आहेत. असगोत्रविवाह त्यांच्यांत सर्वत्र रूढ आहे, व त्यांचे सर्व घरगुती समारंभ जुन्या पद्धतीप्रमाणेंच चालतात.

**गौड मल्लार**— हा राग काफी थाटांतून निघतो. याचे आरोहावरोह सातहि स्वरांनीं होत असल्यानें याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात. याच्या आरोहांत निषाद अल्प आहे. यांत तीव्र गांधार असल्यामुळें मिया मल्लार व मेघ मल्लार यांपासून हा राग निराळा होतो.

**गौडसारंग**—हा राग कल्याण थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोहावरोह सातहि स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी गांधार व संवादी धैवत आहे. गानसमय दिवसाच्या तिसऱ्या प्रहराचा प्रारंभ बहुसंमत आहे. या रागास दोन मध्यम लागतात. तीव्र मध्यम फक्त आरोहांत असून शुद्ध मध्यम आरोहांत व अवरोहांत येतो. दोन मध्यम येणाऱ्या इतर रागांप्रमाणें यांत निषाद स्वराला गौणत्व असून गांधार अवरोहांत वक्र होतो. याचे आरोहावरोह वक्र स्वरूपाचे आहेत.

**गौतम**—१. न्यायशास्त्रकर्ता ऋषि. यास अक्षचरण किंवा अक्षपाद असें नांव आहे.

२. शरद्वत् ऋषीलाच गौतम असें म्हणतात. गौतम हा अहल्येचा पति होय. अहल्येस इंद्रानें फसवून भ्रष्ट केलें अशी कथा आहे. वैवस्वत मन्वंतरांतील सप्तर्षींमध्यें गौतम एक आहे. याच्यावरून गोदावरीला गौतमी असें नांव पडलें.

**गौतमधर्मसूत्र**—ज्या गौतमानें धर्मसूत्रें रचिलीं तो सामवेदी होता. धर्मसूत्रांतील सव्विसावा अध्याय ज्यांत कृच्छ्रादिकांचें वर्णन आहे तो सर्व अध्याय-सामवेदाच्या 'सामविधान' ब्राह्मणांतून जसाच्या तसाच घेतला आहे. इतकेंच नव्हे तर ठिकठिकाणीं (१९-१२) सामवेदांतला भाग बराच आढळून येतो. परंतु अमक्या गौतमाचें हे धर्मसूत्र हें सांगतां येत नाहीं.

गौतम हा बौधायन आणि वसिष्ठ यांच्यापूर्वींचा आहे. कारण दोघांनींहि गौतमाचीं वचनें उद्धृत केलीं आहेत. कित्येक लोक गौतमाचा ऐतिहासिक कालाशीं संबंध जोडतात. कां तर त्यांत एके ठिकाणीं 'यवन' शब्द आला आहे.

**गौतम बुद्ध**—बुद्ध पाहा.

**गौतमीपुत्र शातकर्णी** (सु. सन १२६)—एक आंध्र राजा. याच्या आईचें नांव बालश्री. नहपान क्षत्रप राजास नष्ट करून हा सन १२६च्या सुमारास गादीवर आला. याच्या अमलाखालीं काठेवाड, गुजराथ, विहार, माळवा, गोदावरी व उत्तर कोंकण इतका प्रदेश होता. गादीवर येतांच यानें पूर्वीच्या जुन्या

राजाचीं नाणीं जीं होतीं त्यांवर स्वतःचीं चिन्हें घातलीं. शक व पल्लव, इत्यादि जातिनिष्ठ लोकांच्या रूढी थांबवून यानें चातुर्वर्ण्याची पुन्हां स्थापना केली. हिंदु व बौद्ध धर्मांबद्दल यास प्रेम वाटत असून धर्मकार्यासाठीं दोन्ही धर्मांस यानें देणग्या दिल्या. हिंदु धर्माबद्दल हा अतिशय अभिमान बाळगीत असे. याच्या कारकिर्दींत आंध्र लोकांनीं इंडोपार्थियनांवर स्वारी केली. याच्या मुलाचें नांव पुलोमायि असें होतें.

**गौर, सर हरिसिंग**—एक हिंदी कायदेपंडित व समाजसुधारक. यांचें शिक्षण नागपूर येथें हिस्लॉप कॉलेजमध्यें व नंतर इंग्लंडमध्यें झालें. १९१८ ते १९२२ पर्यंत हे नागपूर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष होते. दिल्ली युनिव्हर्सिटीचे हे पहिले व्हाइस चान्सेलर होते व त्या युनिव्हर्सिटीनें यांस डी. लिट्. ही पदवी दिली. पुन्हां ते या जागेवर (१९२४ ते १९२६) निवडून आले. नंतर ते नागपूर युनिव्हर्सिटीचे व्हाइस चान्सेलर झाले. नागपूर हायकोर्ट बार असोसिएशनचे ते अध्यक्ष होते (१९३६). ते मध्यवर्ती असेंब्लीचे उपाध्यक्ष होते. एंपायर पार्लमेंटरी असोसिएशनच्या हिंदी शाखेचे ते उपाध्यक्ष होते. जॉइंट पार्लमेंटरी कमेटींत ते १९३३ मध्यें प्रतिनिधि होते. सागर विद्यापीठासाठीं यांनीं वीस लाखांची देणगी देऊन तें विद्यापीठ अस्तित्वांत आणलें. यांनीं कायद्यावरील बरेच आधारभूत ग्रंथ लिहिले आहेत.

**गौरी**—प्रकार पहिला—हा राग भैरव थाटांतून उत्पन्न होतो व त्याच्या आरोहांत गांधार व धैवत हे स्वर वर्ज्य व अवरोह सात स्वराचा असल्यामुळें याची जाति औडुव–संपूर्ण आहे. वादी ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय सायंकाळ मानितात. हा राग मंद्र व मध्यम सप्तकांतील स्वरांनीं गाइल्यानें रक्तिदायक होतो. मंद्र स्थानांतील निषाद स्वर ह्या रागांत विशिष्ट प्रकारची आकर्षकता उत्पन्न करतो. कालिंगडा व पूरिया या रागांच्या अंगानें हा गाइला जातो.

प्रकार दुसरा—हा राग पूर्वी थाटांतून निघतो. या प्रकारांतहि गांधार व धैवत हे स्वर आरोहांत वर्ज्य असून अवरोह सर्व स्वरांचा आहे. म्हणून याची जाति औडुव–संपूर्ण आहे. वादी ऋषभ व संवादी पंचम आहे. हा सायंगेय रागांपैकींच एक आहे. या प्रकारांत श्रीरागाचें अंग विशेष दिसतें. मंद्र व मध्यम सप्तकांतील स्वरांत हा राग खुलतो. मंद्र सप्तकांतील निषाद याहि प्रकारांत वैचित्र्य प्रकट करतो, म्हणून समप्रकृतिक इतर रागांपासून हा निराळा असतो.

**गौरीशंकर**—जगांतील सर्वांत उंच पर्वत-शिखर. हें हिमालय पर्वताचें शिखर असून नेपाळांत आहे. त्रिकोणमितीनें अजमावतां याची उंची २९,१४१ फूट असावी असें दिसतें. कॅप्टन वुड, मेजर रायडर, वगैरे शोधकांच्या निरीक्षणावरून हिमालयांतील हेंच सर्वांत उंच शिखर आहे असें निश्चित झालें आहे. त्रिकोणमितीच्या साहाय्यानें सर जॉर्ज एव्हरेस्ट (१७९०–१८६६) नांवाच्या एका भूगोलज्ञानें या पर्वताचें निरीक्षण इ. स. १८४१ मध्यें केलें. या गृहस्थाच्या स्मरणार्थ या शिखराचें नांव एव्हरेस्ट असें ठेविलें गेलें आहे.

इ. स. १९२१ ते १९३८ पर्यंत सहा वेळां गौरीशंकर-संशोधनार्थ मोहिमा युरोपियन शास्त्रज्ञांनीं नेल्या. २७,३०० फुटांपर्यंत लोक गेले, पण अगदीं शिखर गांठतां आलें नाहीं. १९३३ सालीं यावर विमानें उडवून फोटो घेण्यांत आले होते. याच्या संशोधनार्थ पुन्हां लवकरच मोहीम निघावयाची आहे.

हिमालयाच्या तिबेटाकडील बाजूचे लोक या शिखरास 'चोमोलुंगमा' (राष्ट्रदेवी) म्हणतात. आणि हिमालयाच्या हिंदुस्थानाकडील बाजूस एव्हरेस्टला नंदादेवी (देवेश) अशी संज्ञा आहे.

**गौस, कार्ल फ्रेडरिश** (१७७७–१८५५)—हा जर्मन गणितशास्त्रज्ञ १८०७ मध्यें गणितविषयाचा प्रोफेसर आणि गॉटिन्जेन येथील वेधशाळेचा संचालक झाला आणि या जागेवर तो मरेपर्यंत राहिला. तो युरोपांतील सर्वश्रेष्ठ गणितशास्त्रज्ञ होता असें लाप्लासनें जाहीर मत प्रदर्शित केलें आहे. त्याचे बरेच ग्रंथ आहेत.

**गौहत्ती**—आसाम, कामरूप जिल्ह्याचा पोटविभाग. क्षे. फ. २,५८४ चौ. मैल. याच्यामधून ब्रह्मपुत्रा जाते. गौहत्ती हें एकच शहर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. १९५१ खेडीं आहेत. दक्षिण तीराची बाजू डोंगराळ व टेंकड्यांनीं व्यापलेली आहे. सपाट मुलखांत फार दाट वस्ती आहे. पाऊस निरनिराळ्या ठिकाणीं ६५ पासून ८० इंचांपर्यंत पडतो. वस्ती मुख्यतः कलिता, किवट, वगैरे उच्च शूद्रांची आहे. १८९७ मधल्या भूकंपानें जमिनीचें स्वरूप फारच बिघडलें. साळीचें पीक मुख्य आहे. कामाख्य, वसिष्ठ, अश्वक्रांत, उमानय, वगैरे क्षेत्रें आहेत. चित्राचल येथें नवग्रहाचें देऊळ आहे.

गौहत्ती शहर कामरूप जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून ब्रह्मपुत्रेच्या दोन्ही तीरांवर वसलें आहे. स्थानिक रहिवासी फार थोडे असून बहुतेक भरणा परप्रांतीयांचाच आहे. भगदत्ताची राजधानी प्राग्ज्योतिषपुर तें हेंच असावें असें म्हणतात. सर्वत्र सांपडणाऱ्या जुन्या अवशेषांवरून हें पूर्वी फार मोठ्या वस्तीचें विस्तीर्ण शहर असावें असें दिसतें. १६८१ त अहोम राजांनीं आपली राजधानी येथें आणली. १८२६ मध्यें आसाम इंग्रजांकडे

आल्यापासून तें आसाम पोटविभागाचें मुख्य ठिकाण होतें व अद्यापिहि आसाम व्हॅलीचे कमिशनर व जज्ज तेथेंच राहतात. १८९७ च्या भूकंपानें सर्व कचेऱ्या व इमारती पडून गेल्या होत्या. आतां शहर नव्यानें बांधलें गेलें आहे. १८७८ मध्यें गौहत्ती म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें दोन हायस्कुलें व कॉटन कॉलेज आहे.

**ग्यासबेग** (मृ. १६२२)— एक मोगल वजीर. खुरासानच्या सुलतानापाशीं ख्वाजामहंमद शरीफ नांवाचा एक वजीर होता त्याचा हा मुलगा. हा नूरजहानचा बाप असून याचा बाप मरण पावल्यावर त्यास कष्टदशा प्राप्त झाली, तेव्हां तो इराणांतून पळून गेला. कंदाहार येथें त्याला (१५७६) मुलगी झाली तीच नूरजहान. अकबरानें त्यास प्रथम लहानशी मनसब देऊन काबुलांत वसुलीच्या कामावर नेमिलें. जहांगिर तख्तावर आल्यावर त्यानें ग्यासबेग ह्यास इतिमादुद्दौला ही पदवी दिली. नूरजहानच्या लग्नापासून सर्व कुटुंबाचें भाग्य उदयास आलें. ग्यासबेग मुख्य वजीर बनून त्यास सहा हजारांची मनसब मिळाली. तो शांत, उदार, धार्मिक, कवि व उत्तम लेखक होता. तथापि तो लांच मात्र सडकून घेत असे. त्याची कबर आग्ऱ्यानजीक आहे.

**ग्युइझो, फ्रान्का-पिएर-ग्युइलोम** (१७८७-१८७४)- एक फ्रेंच इतिहासकार व मुत्सद्दी. फ्रेंच साम्राज्य नष्ट झाल्यानंतर याला वेगवेगळ्या प्रकारच्या अधिकाराच्या जागा मिळाल्या. १८१६ त यानें फ्रेंच राज्यकारभार आणि शिक्षण यांसंबंधीं दोन ग्रंथ प्रसिद्ध केले. नंतर तो शिक्षणाधिकारीहि झाला. १८४० त ब्रिटिशांच्या दरबारचा फ्रेंच वकील म्हणून राहिला व पुढील सालीं फ्रेंच राज्यसूत्रें त्याच्या हातीं आलीं. लुई फिलिप्पच्या पराभवानंतर तो इंग्लंडला पळाला व त्या वेळेपासून सार्वजनिक कार्यांतून तो निवृत्त झाला. फ्रेंच संस्कृति, युरोपियन संस्कृति, तत्कालीन इतिहास, चरित्रें या विषयांवर त्याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**ग्युयो, यिव्हेझ** (१८४३- )—एक फ्रेंच राजकारणी आणि अर्थशास्त्रज्ञ. त्यानें संरक्षक जकात-पद्धतीला आणि समाजसत्तावादा (सोशॅलिझम) ला 'विरोध केला, आणि 'खुला व्यापार' या पद्धतीचा पुरस्कार केला म्हणून हा प्रसिद्धि पावला, आणि त्याला १९०९ मध्यें 'जर्नल डेस एकॉनमिस्ट' याचा संपादक नेमण्यांत आलें. त्याचे बरेच समाज-अर्थशास्त्रावर ग्रंथ आहेत.

**ग्रॅकस, टायबेरिअस** (खि. पू. १६३-१३३); **ग्रॅकस गायस, सेंप्रानिअस** (खि. पू. १५३-१२१)—हे दोघे रोमन सुधारणावादी बंधू असून यांचा बाप लवकर वारल्यामुळें त्यांची आई कॉर्नेलिया हिच्याकडून त्यांना फार काळजीपूर्वक शिक्षण मिळालें. टायबेरिअस हा त्यानें कॉर्थेजच्या वेढ्याच्या वेळीं आणि न्यूमँटियन युद्धामध्यें केलेल्या लष्करी कामगिरीमुळें लवकरच प्रसिद्धि पावला. खि. पू. १३३ मध्यें तो ट्रायब्यूनच्या जागेकरितां उमेदवार झाला. त्यानें रोमन जमीनदारी पद्धति सुधारण्याचा प्रथम प्रयत्न केला व त्याकरितां जुना लिसिनियन कायदा अमलांत आणण्याचें त्यानें ठरवलें. तो कायदा असा होता कीं, एका पॅट्रीशिअन इसमाची ५०० एकरांहून अधिक जमीन नसावी; आणि जी अधिक जमीन असेल ती ख्रिचियन लोकांमध्यें सारखी वांटून देण्यांत यावी. हा कायदा त्यानें कांहीं अंशीं सौम्य करून अमलांत आणला. तरीहि त्याचें दैव फिरलें. आणि आपल्या अधिकाराचें अतिक्रमण केल्याचा आणि राजा होण्याची महत्त्वाकांक्षा असल्याचा आरोप त्याच्यावर ठेवण्यात आला आणि पुढील निवडणुकीच्या वेळीं त्याला व त्याच्या अनुयायांपैकीं ३०० इसमांना ठार मारण्यांत आलें. थोरल्या भावाचा वध झाल्यानंतर १० वर्षांनीं धाकट्या ग्रॅकसला ट्रायब्यूनची जागा मिळाली. आणि त्यानें आपल्या भावाचा जमीनदारीविषयींचा कायदा अमलांत आणला, आणि त्या कायद्याला विरोध करणाऱ्यांपैकीं कित्येक अत्याचारी इसमांना त्यानें शहराबाहेर हद्दपार केलें. वरील कायद्याशिवाय त्यानें अनेक लोककल्याणकारक सुधारणा केल्या. आणि त्यामुळें तो फार लोकप्रिय झाला. परंतु सरदार लोकांनीं त्याच्याविरुद्ध गुत कट केल्यामुळें तो पदच्युत झाला आणि त्याचा कट्टा शत्रु ऑपिमिअस हा कॉन्सल निवडला गेला. त्या वेळीं कांहीं लोकांनीं दंगल केली म्हणून सेनेटनें दंगेखोरांचें पारिपत्य करण्याकरितां ऑपिमिअसला जादा अधिकार दिले, आणि त्यानें ग्रॅकस आणि त्याचे लष्करी शिपाई यांच्यावरच हल्ला करून ३००० इसम ठार मारले. ग्रॅकस अरण्यांत पळून गेला. आणि तेथें त्यानें एका गुलामाकडून स्वतःला ठार मारून घेतलें; नंतर त्या गुलामानेंहि आत्महत्या केली.

**ग्रॅझ**— ऑस्ट्रियांतील स्टीरिया प्रांताची राजधानी. ही व्हिएन्नाच्या वायव्येस ९० मैलांवर मूर नदीच्या कांठीं आहे. लो. सं. १,५२,८३१ आहे. येथें ज्या मुख्य इमारती व संस्था आहेत त्या म्हणजे बालेकिल्ला, खिस्तालय (१४५६ सालीं बांधलेलें), विश्वविद्यालय (स्थापना १५७३), आणि शेती व शास्त्रें यांच्या संवर्धनाकरितां जोआनियम. यंत्रें, रूळ, आगगाडीचे डबे, साबण, कमावलेलीं कातडीं, आणि लोखंडी जिन्नस, आणि सुती, रेशमी, लोकरीचें व जरीचें कापड यांचे कारखाने येथें आहेत.

**ग्रँट, सर अलेक्झांडर** (१८२६-१८८४)—एक ब्रिटिश पंडित आणि अध्यापनशास्त्रज्ञ. तो १८६३ सालीं मुंबई विद्यापीठाचा कुलगुरु (व्हाइस चॅन्सेलर) झाला आणि १८६५ मध्यें मुंबई इलाख्यांतील शिक्षणखात्याचा डायरेक्टर झाला. नंतर १८६८ मध्यें एडिन्बर्ग विद्यापीठाचा प्रमुख व कुलगुरु झाला. त्याचे प्रसिद्ध ग्रंथ आहेत ते—'ॲरिस्टॉटल्स एथिक्स' (सटीप आवृत्ति १८५७): आणि 'स्टोरी ऑफ दि युनिव्हर्सिटी ऑफ एडिन्बर्ग, ड्यूरिंग इट्स फर्स्ट थ्री हंड्रेड ईअर्स' (१८८४, एडिंबरो विद्यापीठाचा पहिल्या तीन शतकांचा इतिहास).

**ग्रँट डफ, जेम्स फर्ग्युसन**—मराठ्यांचा एक आद्य इतिहासकार. हा इंग्लंडच्या उत्तरेकडील इडेन गांवचा रहिवासी होता. याचें शिक्षण बेताचेंच झालें होतें. प्रथम हा ईस्ट इंडिया कंपनींत नोकरीस राहिल्यानंतर क्रमानें वाढत वाढत पेशवाई-अखेर सातारा येथें रेसिडेंट झाला. छत्रपति प्रतापसिंहाचा व याचा बराच स्नेह होता. साताऱ्यास असतांना यानें आपल्या मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें गोळा केलीं होतीं. प्रतापसिंहानें आपल्या घराण्यांत व दप्तरांत असलेलीं अस्सल पत्रव्यवहारादि साधनेंहि त्याच्या हवालीं केलीं होतीं. पुण्याचा पहिला कलेक्टर रॉबर्टसन यानें एल्फिन्स्टनच्या अनुमतीनें शनवारवाड्यांतील पेशव्यांचें दप्तर डफच्या स्वाधीन केलें होतें; तसेंच सुरतेच्या वखारींतील मुंबई सरकारचीं, गोंवें सरकारचीं, इंडिया हाउसमधील, व इतर पुष्कळ ठिकाणचीं दप्तरें त्याला मिळालीं होतीं; पण त्यांचा त्यानें भरपूर व योग्य तो उपयोग करून घेतला नाहीं. तो विलायतेस १८२५ च्या सुमारास परत गेला व १८२६ च्या सुमारास त्यानें मराठ्यांचा इतिहास हा ग्रंथ लिहिला; पण तो बराच अपुरा व चुकला आहे. त्यानें अखेरचे दिवस शेती करण्यांत घालविले.

**ग्रँट, युलिसेस सिंपसन** (१८२२-१८८५)—एक अमेरिकन जनरल आणि संयुक्त संस्थानांचा १८ वा अध्यक्ष. १८६१ मध्यें यादवी युद्ध सुरू झाल्यावर एका स्वयंसैनिक पथकाचा तो कॅप्टन निवडला गेला, आणि नंतर लवकरच त्याला ब्रिगेडिअर जनरल ही वरची जागा मिळाली. त्यानें एका पाठीमागून एक जय मिळवले, म्हणून त्याला सरकारी लष्करांत मेजर जनरल आणि नंतर १८६४ मध्यें ले. जनरल नेमण्यांत आलें. त्यानें पिटर्सबर्ग, रिचमंड, आणि फाइफफोर्क्स येथील लढाया जिंकल्या. त्यामुळें विरुद्ध पक्ष १८६५ मध्यें ग्रँटला शरण आला. १८६६ मध्यें सं. संस्थानांच्या सैन्याचा ग्रँटला जनरल करण्यांत आलें. १८६८ मध्यें तो अध्यक्षाच्या जागीं निवडून आला. आणि १८७२ मध्यें त्याची त्याच जागेवर पुन्हां निवड झाली.

**ग्रँट, रॉबर्ट** (१८१४-१८९२)—एक ब्रिटिश ज्योतिषशास्त्रज्ञ. यानें 'दि हिस्टरी ऑफ फिजिकल ॲस्ट्रॉनामी फ्रॉम दि अर्लिएस्ट एजेस् टु दि मिडल् ऑफ दि नाइन्टीन्थ सेंचरी' हा भौतिक ज्योतिषशास्त्राचा प्राचीन काळापासून एकोणिसाव्या शतकापर्यंतचा इतिहासपर ग्रंथ खंडशः लिहून १८५२ त पुरा केला. ज्योतिषवाङ्मयांत या ग्रंथाला पहिलें स्थान मिळून कर्त्याला रॉयल ॲस्ट्रॉनॉमिकल सोसायटीचें सुवर्णपदक मिळालें. याखेरीज ग्रँटनें बऱ्याच मासिकांतून शास्त्रीय लेख प्रसिद्ध केले. ग्लासगो विश्वविद्यालयाचा प्रोफेसर असतांना त्यानें बऱ्याच ताऱ्यांचीं स्थानें नक्की केलीं व त्यांचे कॅटलॉग छापले (१८८३-१८९२).

**ग्रँड, कॅनॉल**—हा चीनमधील एक मोठा कालवा हँगचौ आणि टीन्टसीन यांना जोडणारा आहे. चिनकिआंग येथें याचे दोन भाग यांगत्झी किआंग नदीमुळें झाले आहेत. याची लांबी ८५० मैल असून त्यांपैकीं कांहीं भाग खि. पू. ४८० पासून चालू झालेला आहे.

**ग्रँड रॅपिड्स**—हें शहर अमेरिकन-सं. संस्थानांतील मिचिगन संस्थानांत ग्रँड रिव्हर नांवाच्या नदीच्या कांठावर तिच्या मुखापासून ४० मैल आंत वसलेलें आहे. हें शहर रेल्वेनें सं. संस्थानें आणि कॅनडा यांना जोडलेलें आहे. येथून पाइन व इतर कणखर झाडांच्या लांकडांचे मोठाले ओंडे निर्गत केले जातात. येथें लांकडी सामान, शेतीचीं हत्यारें, ब्रश आणि यंत्रें यांचे मोठाले कारखाने आहेत. लोकसंख्या १,६४,२९२ आहे.

**ग्रंथचित्रण**—पुस्तकामध्यें मधून मधून आकृती, चित्रें, वगैरे घालून पुस्तक सजविण्याची कला. ईजिप्तमध्यें आढळणाऱ्या पापीरस कागदावरच्या पुस्तकांतहि रंगीत चित्रें असलेलीं दृष्टीस पडतात. तसेंच पाँपी शहरांतील घरांच्या भिंतींवर ज्या तऱ्हेचीं चित्रें आढळतात तशा प्रकारचीं चित्रें पांचव्या शतकांतील कांहीं पुस्तकांमध्यें दिसून येतात. यावरून ही कला फार प्राचीन असली पाहिजे असें वाटतें. नवव्यापासून बाराव्या शतकापर्यंत बायझंटाइन पुस्तकांतून आढळणारीं चित्रें कांहींशीं अभिजात रोमन कलेसारखीं, परंतु प्राच्य कलेची छाप पडलेलीं व सोनेरी वगैरे रंगांनीं भूषित केलेलीं आढळून येतात. आयर्लंडमध्यें केल्टिक पद्धतीचीं चित्रें स्वतंत्रपणेंच परिणत होत गेलेलीं दिसून येतील. या चित्रांत सोनेरी रंग आढळत नाहीं व भूमितीच्या आकृतींचा उपयोग केलेला आढळतो. अशा तऱ्हेचें एक पुस्तक डब्लिनमध्यें 'बुक

ऑफ केल्स' या नांवाचें आढळतें. तेराव्या शतकानंतर इंग्लंड व फ्रान्स यांमध्यें गॉथिक पद्धति वाढीस लागली. यांतील नक्षीकाम बारीक व नाजुक असे. बहुतेक प्रसंग ऐतिहासिक असत. सभोंवतीं मनोहर चौकटी असत. या कामीं सोन्याच्या वर्खांचा उपयोग करीत. याचें उत्तम उदाहरण म्हणजे चिब्लिओथिक नॅशऑनेलमधील 'साल्टर ऑफ सेंट लुई' हें होय. फ्लांडर्समध्येंहि या कलेची वाढ अशीच पण जरा उशीरां झाली. इटलीमध्यें कॅसिनो येथील बेनिडिक्ट पंथाच्या मठांत केल्टिक कलेची जोपासना केलेली दिसते, पण पुढें ही पौरस्त्य वळणावर गेली. चौदाव्या शतकांत या कलेची वाढ इंग्लंडमध्यें पूर्णावस्थेस गेली; पण मुद्रणकलेच्या वाढीबरोबर या कलेचा लय होत गेला.

हिंदुस्थान व इराण या देशांतहि या कलेची वाढ फार प्राचीन कालापासून होत आलेली आहे व एकोणिसाव्या शतकापर्यंत या कलेची चांगलीच भरभराट होती. फारशी भाषेंत लिहिलेल्या शाहनाम्याच्या अनेक प्रती फार सुंदर चित्रांनीं विभूषित केलेल्या अद्यापहि हिंदुस्थानांतील अनेक किताबखान्यांत आढळतात. तसेंच महाभारत, रामायण व भागवत, व विशेषतः भगवद्गीता यांच्या अनेक पोथ्या दर अध्यायास प्रारंभीं सुंदर चित्रें काढलेल्या अनेक संग्रहांतून दृष्टीस पडतात. या चित्रांचा विशेष हा आहे कीं, त्यांतील रंग अनेक वर्षांनंतरहि अगदीं ताजा असल्यासारखा दिसतो.

**ग्रंथप्रकाशनाचा मालकी हक्क**—(कॉपीराइट). कायदे पुस्तकांत या शब्दाची व्याख्या अशी आहे कीं, कोणत्याहि ग्रंथाच्या किंवा त्यांतील महत्त्वाच्या भागाच्या प्रती काढण्याचा, किंवा ग्रंथ अप्रकाशित असल्यास तो ग्रंथ किंवा त्यांतील महत्त्वाचा भाग प्रसिद्ध करण्याचा ग्रंथकर्त्याचा जो हक्क त्याला ही संज्ञा आहे. इंग्लंडमध्यें १८९२ चा 'फाइन आर्ट्स कॉपीराइट ॲक्ट', १९०२ व १९०६ सालचे 'म्यूझिकल कॉपीराइट ॲक्ट्स' आणि १९११ चा तत्पूर्वीच्या कायद्यांत दुरुस्त्या व सुधारणा करून मंजूर केलेला 'कॉपी राइट ॲक्ट' हे सदर मालकी हक्काबद्दलचे कायदे आहेत. या कायद्यांत कॉपी-राइटची व्याख्या दिली आहे ती: 'कोणतीहि वाङ्मयीन, नाट्यविषयक, संगीतविषयक, किंवा इतर कलाविषयक कृति किंवा तिचा कांहीं भाग प्रसिद्ध करून विकण्याचा मूळ कर्त्याचा मालकी हक्क.' एखाद्या नाट्यकृतीचा जाहीर प्रयोग करणें, किंवा एखादा गद्य लेख किंवा पद्य जाहीरपणें म्हणून दाखविणें, याचाहि कॉपी राइटच्या मालकी हक्कांत समावेश होतो. तसेंच कोणत्याहि गद्य किंवा पद्य कृतींचें भाषांतर करणें, किंवा त्यावरून नाटक तयार करणें, कादंबरी लिहिणें, त्या मजकुराची ध्वनिमुद्रिका (रेकॉर्ड), किंवा चित्रपट (फिल्म) तयार करणें, यांचाहि या हक्कांत समावेश होतो. वाङ्मयीन कृति या शब्दांत नकाशे (मॅप्स), तक्ते (चार्ट्स), आराखडे (प्लॅन्स), कोष्टकें (टेबल्स), आणि संग्रहग्रंथ (कंपायलेशन्स) या कृतींचाहि समावेश होतो. नाट्यकृतीमध्यें तोंडपाठ म्हणण्यासारखा मजकूर (रेसिटेशन्स), नृत्यचिन्हांचा ग्रंथ (कोरिओग्राफिक वर्क्स) आणि मूकनाट्यप्रयोग (प्लेज विदाउट वर्ड्स) यांचा समावेश होतो. कलाकृतीमध्यें रंगीत चित्रें (पेंटिंग्ज), साधीं चित्रें (ड्रॉइंग्ज), शिल्पकलाकृति, खोदकलाकृति, व इतर कोणतीहि कलाकृति यांचा अंतर्भाव होतो.

या ग्रंथस्वामित्वाचीं तीन अंगें आहेत: (१) ग्रंथ म्हणजे केवळ जंगम माल या दृष्टीनें ज्या कागदावर ग्रंथ लिहिला असेल त्या कागदावरील मालकी. (२) ग्रंथाच्या प्रती प्रसिद्ध करण्याची व इतरांस प्रती करण्यास प्रतिबंध करण्याची सत्ता, आणि (३) ग्रंथांतील (शब्दविरहित) केवळ कल्पना, विचार किंवा माहिती यांचा स्वतंत्र ग्रंथरचना करण्यांत उपयोग करण्याचा हक्क. ग्रंथाच्या प्रती करण्यास प्रतिबंध करण्याचा हक्क ग्रंथकर्त्यास असतो. परंतु ग्रंथांतील कल्पना, विचार, किंवा दिलेली माहिती स्वतंत्र ग्रंथरचना करून प्रसिद्ध करण्यास इतरांना प्रतिबंध करण्याची सत्ता ग्रंथकर्त्यास नाहीं.

इंग्लंड— इंग्लंडांत आरंभीं ग्रंथ छापण्यासंबंधीं सरकारी निर्बंध घालण्यांत आले. त्यामुळें छापखानेवाल्यांनीं स्टेशनर्स हॉल या नांवाचा संघ १५५६ च्या सुमारास स्थापन केला, व कांहीं हक्क संपादन केले. १७०९ सालीं या संस्थेनें विनंतीअर्ज केल्यावरून पार्लमेंटनें १७१० सालीं 'कॉपी राइट ॲक्ट' मंजूर करून ग्रंथप्रकाशनाचा मालकी हक्क ग्रंथ छापल्यानंतर १४ वर्षें आणि त्यापुढें ग्रंथकर्ता हयात असल्यास आणखी चवदा वर्षें अशा मुदतीनें दिला. १८११ सालच्या कायद्यानें ही मुदत २८ वर्षें व ग्रंथकार त्यापुढें हयात असल्यास त्याच्या मरणापर्यंत इतकी वाढविण्यांत आली. १८४२ च्या कायद्यानें ही मुदत ४२ वर्षें ठरविली, आणि हल्लीं चालू असलेल्या १९११ च्या 'इंपीरियल कॉपी राइट ॲक्ट'नें ही मुदत ग्रंथकर्ता हयात असेपर्यंत व त्यापुढें ५० वर्षें अशी ठरविली आहे. ग्रंथाच्या प्रकाशकानें ग्रंथप्रकाशनानंतर एक महिन्याच्या आंत प्रत्येक ग्रंथाची एकेक प्रत ब्रिटिश म्यूझियमकडे पाठविली पाहिजे, आणि सरकारनें ग्रंथप्रकाशनापासून एक वर्षाच्या आंत हुकूम केल्यास एकेक प्रत बोड्लियन लायब्ररी (ऑक्सफर्ड), युनिव्हर्सिटी लायब्ररी (केंब्रिज), ॲडव्होकेट्स लायब्ररी (एडिनबर्ग, हल्लीं नॅशनल लायब्ररी ऑफ स्कॉटलंड), आणि ट्रिनिटी कॉलेज (डब्लिन), यांच्याकडे पाठविली पाहिजे.

हिंदुस्थान— हिंदुस्थानांत ग्रंथप्रकाशनाचा पहिला कायदा

ईस्ट इंडिया कंपनीनें १८४७ सालीं मंजूर करून इंग्लंडमधील १८४२ च्या कायद्यांतल्यासारखे हक्क हिंदुस्थानांतील ग्रंथकर्त्यांना दिले. १९१४ सालीं हिंदुस्थान सरकारनें ग्रंथप्रकाशनाचा कायदा केला. तो आतांपर्यंत अमलांत आहे. त्यांत इंग्लंडमधील १९११ च्या कायद्यांतल्याप्रमाणें ग्रंथकर्त्यांस हक्क आहेत. त्याला एक अपवाद असा कीं, (१) शाळेंतील विद्यार्थ्यांकरितां, ग्रंथप्रकाशनाच्या हक्कास बाध येत असला तरी, त्या ग्रंथांतून अवतरणें घेतां येतात; मात्र पांच वर्षांच्या मुदतींत त्याच प्रकाशकानें त्याच ग्रंथकाराचीं दोहोंहून अधिक अवतरणें घेऊं नयेत; आणि अवतरणांबद्दल मूळ ग्रंथाचा स्पष्टपणें निर्देश करावा. दुसरा अपवाद असा कीं, (२) उपजीविकेचें साधन म्हणून लोकांना निरनिराळ्या ग्रंथांतील उतारे, चुटके, वगैरे वाचून किंवा पाठ म्हणून दाखवणें. मात्र असे उतारे एकाच ग्रंथकाराचे बेसुमार नसावे. कॉपीराइटचा हक्क वेचन देण्याचा किंवा मृत्युपत्रानें त्याची विल्हेवाट लावण्याचा हक्क मालकास असतो; व त्याच्या मरणोत्तर वारसामध्यें तो हक्क विभागला जातो. कॉपी राइटसाठीं ग्रंथ रजिस्टर करावा लागत नाहीं. पण ग्रंथांत मालकी हक्काबद्दल स्पष्ट उल्लेख करावा लागतो. ग्रंथस्वामित्वाचा भंग झाल्यानंतर तीन वर्षांच्या आंत त्याबद्दल इलाज करावा लागतो.

**ग्रंथलिपि**—ही लिपि मद्रासच्या उत्तरेस, व दक्षिणेस अर्काट, सालेम, त्रिचनापल्ली, मदुरा व तिनवेल्ली या जिल्ह्यांत चालू आहे. ७ व्या शतकापासून १२ व्या शतकापर्यंत फेरफार होत होत ही लिपि बनली असून तिच्यापासून पुढें मलयाळी आणि तुळु या लिप्या बनल्या. मद्रासेकडील तामिळ लिपींत वर्णसंख्या अपुरी असल्यामुळें संस्कृत ग्रंथ लिहिण्याकरितां ही लिपि योजितात, व म्हणून हिला ग्रंथलिपि हें नांव पडलें असावें, असें अनुमान आहे.

**ग्रंथविक्रय**—ग्रंथ छापणें, तो प्रसिद्ध करणें व विकणें हे निरनिराळे धंदे आहेत; तथापि एकच व्यक्ति किंवा संस्था ते करूं शकते. ग्रंथकर्त्याला जेव्हां स्वतःच ग्रंथ छापून विकणें शक्य नसतें तेव्हां तो एखादा प्रकाशक पाहतो. व त्याच्याकडून पैसे घेऊन ग्रंथाबाबत हक्क विकतो. प्रकाशकहि स्वतः विकण्याचा उद्योग न करतां एखाद्या ग्रंथविक्रेत्याला एकदम विकत देतो. याप्रमाणें हा ग्रंथव्यापार चालू असतो. ग्रंथहक्काबद्दल, कागद, छपाई, इ. बद्दल खर्च सोडल्यास जाहिरातीवर प्रकाशकाला बराच खर्च करावा लागतो. भेटी व अभिप्राय यांसाठीं बरींच पुस्तकें मोफत द्यावीं लागतात. ग्रंथविक्रेत्यांना सूट (कमिशन) देऊन पुस्तकें उठवावीं लागतात. पाश्चात्य देशांत एखाद्या महत्त्वाच्या ग्रंथाच्या जाहिरातीसाठीं प्रकाशक दोन-तीन हजार पौंडहि खर्च करण्याला मागें-पुढें पाहत नाहींत.

ग्रेटब्रिटनमध्यें ग्रंथविक्रीचें सर्वांत मोठें ठिकाण म्हणजे लंडन शहर होय. त्याखालोखाल एडिंबर्ग, डब्लिन, मँन्चेस्टर, ग्लासगो, इ. येतील. फ्रान्स देशांत पॅरिस व जर्मनींत लाइपझीग हीं होत. ईस्टरच्या सणांत लाइपझीग येथें मोठा बाजार भरतो. याच वेळीं पुस्तकांच्या देवघेवींचे हिशेब पुरे करतात. अमेरिकेंत न्यू यॉर्क, फिलाडेल्फिया व बोस्टन या शहरांत पुस्तकांची फार मोठी उलाढाल होते.

गेल्या महायुद्धापूर्वी ब्रिटनमध्यें दरसाल सुमारें १६,००० पुस्तकें प्रसिद्ध होत. युद्धकाळांत कागदाच्या टंचाईमुळें हा आंकडा निम्म्याहून खालीं उतरला. फ्रान्स आणि इटली या देशांत इंग्लंडपेक्षां जास्त पुस्तकें निघतात. अमेरिकन सं. संस्थानांत १९४४ सालीं ६,९७० नवीन पुस्तकें निघालीं. यांपैकीं ६०८ लहान मुलांसाठीं, ९०५ कादंबऱ्या व बाकीचीं विविध विषयांचीं होतीं.

**ग्रंथालयशास्त्र**—ग्रंथालयशास्त्र हें वर्गीकरण, सूचीकरण, संदर्भसेवा, रचनाशास्त्र, कारभार, इ. अनेक उपांगें मिळून झालेलें आहे. कोणत्याहि गोष्टीला एक विशिष्ट पद्धति लागली म्हणजे तें शास्त्र बनतें. वर्गीकरण, ग्रंथनामावली, संदर्भसेवा, कारभार, वगैरे गोष्टी करण्यास विशिष्ट नियम व पद्धत आहे व म्हणूनच त्या सर्वांच्या एकीकरणाला 'ग्रंथालयशास्त्र' असें संबोधितात.

वर्गीकरण, सूचीकरण व संदर्भसेवा हीं सर्व फक्त साधनें आहेत व या साधनांचा उपयोग एक साध्य साधण्यासाठीं केला जातो. हें साध्य कोणतें तें रा. सा. रंगनाथन् यांनीं आपल्या 'फाइव्ह लॉज ऑफ लायब्ररी सायन्स' (ग्रंथालयशास्त्राचे पांच नियम) या पुस्तकांत पुढीलप्रमाणें स्पष्ट केलें आहे—(अ) प्रत्येक वाचकाला आपलें पुस्तक मिळालें पाहिजे; (आ) प्रत्येक पुस्तकाला वाचक मिळाला पाहिजे; व (इ) वाचकांचा वेळ वांचला पाहिजे.

१. वर्गीकरण—सारख्या, एकाच प्रकारच्या वस्तू किंवा कल्पना एकत्र आणण्याची क्रिया म्हणजे वर्गीकरण. वाचकांचा कल विषयवार पुस्तकें मागण्याकडे अधिक असतो व वाचकांची ही गरज भागविण्याचें कार्य वर्गीकरण करीत असतें. एखाद्या संशोधकाला खगोलशास्त्राचा अभ्यास करावयाचा असला आणि तो ज्या ग्रंथालयांत काम करीत आहे अशा ग्रंथालयांत हजारों पुस्तकें असून त्यांचें शास्त्रीय पद्धतीनें वर्गीकरण केलें नसेल तर तीं ज्या ज्या ठिकाणीं विखरून ठेवलीं आहेत त्या ठिकाणांहून हुडकून काढण्यास एक संशोधनच करावें लागेल,

हें सर्व टाळण्यासाठीं व वाचकांचा बहुमोल वेळ वांचविण्यासाठीं व एकाच विशिष्ट विषयावरचीं पुस्तकें एकत्र येण्यासाठीं शास्त्रीय वर्गीकरणपद्धतीचा अवलंब करावा लागतो. पूर्वीच्या काळीं ग्रंथांचें वर्गीकरण त्यांच्या आकारावरून होत असे. या पद्धतीमुळें ग्रंथांतील विषयांचा कांहींच बोध होत नसे व त्यामुळें ती निरुपयोगी ठरली. एकाच लेखकाचे सर्व ग्रंथ एकत्र आणण्याची वर्गीकरणपद्धतीसुद्धां वाचकांच्या दृष्टीनें उपयुक्त ठरत नाहीं. आधुनिक कालांतील सर्व ग्रंथालयांत पुस्तकांचें वर्गीकरण विषयवार केलेलें असतें. कांहीं प्रमुख वर्गीकरण-पद्धती अशा—

| कर्ता | वर्गीकरणपद्धतीचें नांव | साल |
|---|---|---|
| (१) मेल्व्हील ड्यूई | दशांश-वर्गीकरणपद्धति | १८७३ |
| (२) चार्लस ॲमी कटर | विस्तारक (एक्स्पान्सिव्ह) -वर्गीकरण पद्धति | १८९१ |
| (३) जेम्स डफ् ब्राउन | विषय-वर्गीकरणपद्धति | १८९४ |
| (४) रा. सा. एस्. आर. रंगनाथन् | द्विबिंदु-वर्गीकरणपद्धति | १९३३ |

२. ग्रंथनामावली—ग्रंथालयांतील पुस्तकांच्या जंत्रीला 'ग्रंथनामावली' म्हणतात. ग्रंथसूची (बिब्लिऑग्राफी) व ग्रंथनामावली (लायब्ररी कॅटलॉग) या एकच नव्हत. तेव्हां हे दोन्ही शब्द एकाच अर्थानें वापरणें चूक होईल. सबंध जग हें ग्रंथसूचीचें क्षेत्र असतें व एखाद्या विषयावरील एकंदर प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांचीं नांवें देणें एवढेंच त्याचें कार्य असतें. ग्रंथनामावलीमध्यें एखाद्या विशिष्ट ग्रंथालयांतील पुस्तकांचीच तेवढी जंत्री केलेली असते. ग्रंथालयांत विवक्षित पुस्तक आहे किंवा नाहीं हें शोधण्यास ग्रंथनामावलीचा उपयोग होतो. ग्रंथालयांतील पुस्तकें कोठें सांपडतील हें दाखविण्याचें कार्य ग्रंथनामावलीला करावयाचें असल्यामुळें ग्रंथदर्शकसूची अशी ग्रंथनामावलीची व्याख्या होईल. या कार्याव्यतिरिक्त ग्रंथनामावलींत ग्रंथांच्या बारीकसारीक वर्णनांचा अंतर्भाव केलेला असतो. अशा प्रकारच्या ग्रंथनामावलीचा उपयोग मुख्यत्वेंकरून ज्या ग्रंथालयांत दुर्मिळ, जुने व मौल्यवान् ग्रंथ असतात त्या ग्रंथालयांत होतो. याउलट, शाळा-कॉलेजांतील ग्रंथनामावली सूच्यात्मक स्वरूपाची असते व म्हणूनच एका विशिष्ट ग्रंथाशीं परिचय घडवून आणण्याच्या दृष्टीनेंच योग्य तेवढी माहिती त्यांत दिलेली असते. ग्रंथनामावलीची योजना व मांडणी अशा प्रकारची असावी कीं, जीमुळें (अ) प्रत्येक वाचकाला आपला ग्रंथ मिळेल; (आ) प्रत्येक पुस्तकाला वाचक सांपडेल; व (इ) वाचकांचा व सेवकांचा वेळ वांचविला जाईल. ग्रंथनामावलीचे दोन भाग असतात : एक प्रमुख विभाग व दुसरा सूच्यात्मक विभाग. वर्गीकृत विषयवार ग्रंथनामावलीचा अंतर्भाव प्रमुख विभागांत केलेला असतो, तर वर्णानुक्रमानुसार ग्रंथनामावलीचा व वर्गदर्शकपत्रिकांचा (क्लास इंडेक्स एन्ट्रीज) समावेश सूच्यात्मक विभागांत केलेला असतो.

ग्रंथनामावली ठेवण्याचे प्रकार दोन : एक पत्रिकांच्या स्वरूपांत; व दुसरा पुस्तकाच्या स्वरूपांत. या दोन प्रकारांपैकीं कोणतीहि एक पद्धत स्वीकारण्यापूर्वी पुढील गोष्टींचा विचार करणें अवश्य असतें. जसजशीं नवीन पुस्तकें ग्रंथालयांत येतात तसतशीं नवीन नोंदणींची संख्या वाढत जाते. या नवीन (एन्ट्रीज) नोंदणींचा ग्रंथनामावलींत समावेश करतां यावा म्हणून ग्रंथनामावली (१) लवचीक, सोईस्कर, पत्रिका *काढतां–घालतां याव्यात अशा सोयींनीं युक्त, अशी असावी*; (२) आजतागायतची साद्यंत हकीकत पुरवूं शकणारी असावी; व (३) एकाच प्रकारच्या नोंदणी एकाच ठिकाणीं जंत्रींत करूं शकणारी असावी.

ग्रंथनामावली कशी करावी याबद्दल अमेरिकन लायब्ररी असोसिएशनचे व रा. सा. रंगनाथन् यांनीं केलेले नियम प्रसिद्ध आहेत.

३. संदर्भसेवा (रेफरन्स सर्व्हिस)—ग्रंथालयशास्त्रांत संदर्भसेवेला फार महत्त्वाचें स्थान आहे. अपरिचित व विविध प्रकारच्या वाङ्मयाशीं अभ्यासू वाचकांचा अल्प काळांत संबंध जोडण्याचें व सर्व तऱ्हेच्या वाचकांना हरएक विषयावर तावडतोब माहिती पुरविण्याचें महत्त्वाचें कार्य संदर्भसेवेच्या द्वारें होत असतें. सार्वजनिक, शालेय, महाशालेय, विद्यापीठीय, इ. प्रकारच्या ग्रंथालयांतील कांहीं वाचक व पुस्तकें जरी एकाच साचाचीं असलीं तरी त्यांतील संदर्भसेवेची पद्धत वेगवेगळी असते. संदर्भसेवेच्या क्रियेसाठीं संदर्भग्रंथ, वाचक व ग्रंथपाल हे सर्व एकत्र येणें आवश्यक असतें. आपल्या देशांतील बहुजनसमाज निरक्षर असल्यामुळें व जो काय थोडासा सुशिक्षित वर्ग आहे त्याच्या आकांक्षा, गरजा व ज्ञानलालसा मर्यादितच असल्यामुळें केवळ संदर्भ माहिती पुरविण्यासाठीं स्वतंत्र 'संदर्भ-ग्रंथपाला'च्या नेमणुकीची आवश्यकता असते, याची कल्पना आपल्या देशांतील बहुसंख्य ग्रंथालयांना नाहीं. कोणत्याहि वाचकानें कोठल्याहि विषयावर माहिती विचारली तरी ती माहिती देणारे किती ग्रंथ व किती लेख आपल्या ग्रंथालयांत आहेत, याबद्दलची अचूक व पूर्ण माहिती संदर्भ-ग्रंथपालाला असणें आवश्यक असतें. वाचकांना उत्कृष्ट संदर्भसेवा देण्याची मनीषा असल्यास त्यासाठीं

निवडक संदर्भग्रंथ व बहुश्रुत ग्रंथपाल ग्रंथालयांत असावयास पाहिजेत. संदर्भसेवा देण्याचे मार्ग दोन आहेत. त्यांपैकीं पहिला मार्ग म्हणजे संदर्भग्रंथपालानें जातीनें वाचकांच्या सर्व गरजा भागविणें. यासाठीं संदर्भग्रंथपालाला, ग्रंथालयांत येणारा प्रत्येक ग्रंथ, मासिक, पत्रक, इ. नजरेखालून घालणें जरूर असतें. बहुश्रुत व विद्वान् संदर्भ-ग्रंथपालाच्या अभावीं पहिल्या पद्धतीचा अवलंब करणें अशक्य असतें. संदर्भसेवेचा दुसरा मार्ग म्हणजे ग्रंथालयांत असलेल्या पुस्तकांच्या व लेखांच्या साहाय्यानें प्रत्येक विषयाची सूची तयार करून वाचकांना योग्य वेळीं तिचें मार्गदर्शन करणें.

संदर्भग्रंथांत विश्वकोश, शब्दकोश, चरित्रकोश, वार्षिकें, वेगवेगळ्या विषयांवरील सूच्या, पुस्तकांच्या याद्या, इ. ग्रंथांचा समावेश केला जातो.

**ग्रंथालयें**—विसाव्या शतकाच्या प्रारंभापासून ग्रंथालयें व ग्रंथालय-चळवळ यांविषयीं अनेक गोष्टी प्रसिद्ध होऊं लागल्या व त्याबद्दल लोकांच्यामध्यें एकप्रकारचें कुतूहल निर्माण व्हावयास लागलें. पण यावरून जर कोणी असा निष्कर्ष काढूं लागेल कीं, ग्रंथालयांचें अस्तित्व अगदीं अलीकडच्या काळांतलें आहे तर तें चुकीचें ठरेल. ग्रंथालयाच्या कामाला शास्त्रीय पद्धत लावून तें एक शास्त्र बनविण्याची घटना जरी विसाव्या शतकांतील असली तरी ग्रंथालयांचें अस्तित्व हिंदुस्थान, ईजिप्त, ॲसीरिआ, बाबिलोनीआ, ग्रीस, रोम, इ. ठिकाणीं फार प्राचीन काळापासून होतें. अर्वाचीन ग्रंथालयांच्या कार्यपद्धतीशीं व व्यापक स्वरूपाशीं जरी प्राचीन ग्रंथालयांची तुलना करणें योग्य नसलें तरी ग्रंथालयांचें अस्तित्व व त्यांच्याबद्दलची आस्था कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत फार प्राचीन काळापासून होती हें निश्चित.

ज्या वेळीं छापण्याची कला निघाली नव्हती त्या वेळीं स्वाभाविकपणेंच ग्रंथ जतन करण्याकडेच जास्त लक्ष दिलें जात होतें. प्राचीन काळीं छापील ग्रंथ नसत, तर हस्तलिखितें असत; व त्यामुळें तीं हरवणार नाहींत, खराब होणार नाहींत, इ. गोष्टींकडेच सर्व लक्ष केंद्रीभूत केलें जात असे. ग्रंथद्वारां बहुजन-समाजाची सर्वांगीण प्रगति करतां येते, हा दृष्टिकोन त्या काळीं आला नव्हता. छापण्याची कला अवगत झाल्यानंतर सुद्धां ग्रंथाचा उपयोग करण्याचा हक्क कांहीं निवडक लोकांचाच आहे, अशी भ्रामक कल्पना बरीच वर्षे रूढ होती. पण विसाव्या शतकांत वरील समजुतीला मुळींच थारा नाहीं. समाजांतील प्रत्येक घटकाला ग्रंथाचा उपयोग करून घेण्याचा हक्क आहे व ग्रंथ हे केवळ जतन करण्यासाठीं किंवा शोभेसाठीं नसून उपयोगासाठीं आहेत ही गोष्ट आज सर्वमान्य झाली आहे.

ग्रंथसंग्रह करण्याची जागा म्हणजे ग्रंथालय—ही प्राचीन काळची ग्रंथालयाची व्याख्या, व विसाव्या शतकांतील ग्रंथालयाची व्याख्या, यांत जमीनअस्मानाचा फरक आहे. आधुनिक ग्रंथालयाची व्याख्या पुढीलप्रमाणें आहे: "ज्या ठिकाणीं ग्रंथांचा संग्रह, ते जास्तींत जास्त वाचकांनीं वाचावेत ह्या अपेक्षेनें केला जातो, जेथें वाचक आपणांस अधिक ग्रंथ ताबडतोब मिळतील ह्या अपेक्षेनें येतात व ज्या रीतीनें वाचकांची ही इच्छा अति अल्प काळांत पार पाडण्यास ग्रंथपाल जातीनें व इतर साधनांनीं साहाय्य करण्याची कोशीस करीत असतात, त्यास ग्रंथालय समाजावें."

सर्वच ग्रंथालयें एकाच स्वरूपाचीं नसतात. सर्वसाधारणतः लोकांची अशी समजूत आहे कीं, ग्रंथालय म्हटलें कीं तें एकाच साचाचें, एकाच कार्यपद्धतीचें असावयाचें. परंतु त्यांत राष्ट्रीय, सार्वजनिक, शालेय, महाशालेय, संशोधकीय, विद्यापीठीय, वृत्तपत्रीय, औद्योगिक, रुग्णालयीन, स्थापत्यीय, बालकीय, इ. अनेक प्रकार आहेत. सार्वजनिक ग्रंथालयाचा उपयोग समाजांतील प्रत्येक घटकाला करून घेतां येतो व त्यांतील पुस्तकें कोणालाहि घरीं वाचावयास नेतां येतात; तर संशोधकीय ग्रंथालयाचा उपयोग करून घेण्याची सवलत फक्त संशोधकांना असते व त्यांतील कोणताहि ग्रंथ घरीं वाचावयास मिळत नाहीं. रुग्णालय-ग्रंथालयाचा उपयोग रोग्यांचें मनोरंजन करण्याकडे होतो, तर बाल-ग्रंथालयांत बालिश जिज्ञासा पुरविण्याची कोशीस केली जाते. शालेय व महाशालेय ग्रंथालयांत क्रमिक पुस्तकांचा व प्रत्येक विषयांतील संदर्भ व अधिकृत ग्रंथांचा भरणा असतो, तर सार्वजनिक ग्रंथालयांत कादंबऱ्या, लघुकथा, नाटकें, चरित्रें, यांचें प्रामुख्य दृष्टोत्पत्तीस येतें.

ग्रंथसंग्रहाच्या विविध स्वरूपाप्रमाणेंच ग्रंथालयांच्या रचनेंत अनेक तऱ्हा दृष्टोत्पत्तीस येतात. सार्वजनिक ग्रंथालय शहराच्या मध्यवर्ती ठिकाणीं बांधल्यास नागरिकांची फारच सोय होते, तर शैक्षणिक संस्थांचीं ग्रंथालयें ज्या त्या शिक्षण-संस्थेच्या आवारांतच पाहिजेत. वृत्तपत्रीय ग्रंथालयांत वाचनाचें दालन-रीडिंग रूम-फार मोठें नसलें तरी चालेल, परंतु सार्वजनिक ग्रंथालयांत एकाच वेळीं निदान १५० वाचकांची वाचण्याची सोय झाली पाहिजे. ग्रंथालयाची रचना करतांना आजच्याप्रमाणें पुढील पन्नास वर्षांच्या वाढीकडे व गरजांच्याकडे लक्ष देणें इष्ट ठरतें व म्हणूनच भावी काळांतील वाढीसाठीं ग्रंथालयाच्या आजूबाजूस मुबलक जागा मोकळी ठेवणें आवश्यक असतें. वाचकांना भरपूर उजेड, ताजी हवा कशी मिळेल यांजकडे विशेष लक्ष पुरविलें पाहिजे. तसेंच ग्रंथालयाच्या अंतर्गत कारभाराचें काम ग्रंथपालाच्या इच्छेप्रमाणें होणें इष्ट असतें.

## जगांतील मोठीं ग्रंथालयें

| नांव | स्थापना | ग्रंथसंख्या |
|---|---|---|
| १. लेनिन नॅशनल लायब्ररी, मॉस्को | | ९० लक्ष (जगांत सर्वांत मोठें) |
| २. गोसुडर स्टव्हेनाजा पब्लिकान्जा बिब्लिओतेका, लेनिनग्राड | कॅथेराइन दि ग्रेटनें स्थापिलें | ४८,३२,९४८ ग्रंथ<br>३,३१,१०० हस्तलि. |
| ३. डाय ड्युसिस्चे स्टाट बिब्लिओथेक, बर्लिन | १६६१ | २५ लक्ष<br>१९,०००प्राच्य ह. |
| ४. दि लायब्ररी ऑफ काँग्रेस | १८१८ | ५३,४८,२०६ |
| ५. दि ब्रिटिश म्यूझियम, लंडन | ७ व्या हेन्रीच्या कारकीर्दीत | ४० लाख |
| ६. दि व्हॅटिकन लायब्ररी | पोप ऑव्हियॉननें बांधलें | ४,८०,०००<br>५३,५०० हस्त. |
| ७. ला बिब्लिओथेक नाशिऑनॉल, पॅरिस | ११ व्या लुईच्या कारकीर्दीत | ४० लाख<br>१,२५,००० हस्त.<br>५० लाख नियतका. |
| ८. डाय नाझिऑनाल बिब्लिओथेक, व्हिएन्ना | १४०३ | १२,५६,००० |
| ९. ला बिब्लिओतेका नासिऑनाल, मॅड्रिड | १७१२ | १ कोटी ४० लक्ष<br>३०,१७२ हस्त. |
| १०. ला रियाला बिब्लिओटेका नाशनाल सेंट्राल, फ्लॉरेन्स | १७४७ | ८,८८,२५६<br>२२,७१५ हस्त.<br>४४,१८० संगीत<br>११,८४,५१४ पत्रकें |
| ११. बाथेटिश स्टाट बिब्लिओथेक, म्युनिक | बव्हेरियाचा ५ वा अल्बर्ट (१५५०-७९) याच्या कारकीर्दीत | १५,८०,०००<br>५०,००० हस्त. |
| १२. बोडलिन लायब्ररी, ऑक्सफोर्ड | १४ वें शतक | १४ लाख |
| १३. बोस्टन पब्लिक लायब्ररी | १८५२ | १६,८२,८४८ |
| १४. दि इंपीरिअल लायब्ररी, जपान, टोकिओ | १८७२ | ७७,११,४७ |

## हिंदुस्थानांतील कांहीं प्रसिद्ध ग्रंथालयें

### १. सरकारी ग्रंथालयें

| | | | |
|---|---|---|---|
| १. नॅशनल लायब्ररी | कलकत्ता | १९०२ | ७,००,००० |
| २. नॅशनल सेक्रेटरिएटची लायब्ररी | न्यू दिल्ली | १९०५ | १,००,००० |
| ३. नॅशनल ॲग्रिकल्चरल रीसर्च इन्स्टिट्यूटची लायब्ररी | न्यू दिल्ली | १९०५ | ८०,००० |
| ४. सेंट्रल ॲडव्हायसरी बोर्ड ऑफ एज्युकेशनची लायब्ररी | न्यू दिल्ली | १९३६ | १०,००० |
| ५. सेंट्रल आर्किऑलॉजिकल खात्याची लायब्ररी | न्यू दिल्ली | १९०२ | ३५,००० |
| ६. रॉयल एशियाटिक सोसायटी | कलकत्ता | | |
| ७. ,, | मुंबई | | |

### २. विद्यापीठांचीं ग्रंथालयें

| | | |
|---|---|---|
| आग्रा | १९२७ | १४,९५२ |
| अलिगड | १८७५ | ५५,००० |
| अलाहाबाद | १९०६ | १,४०,५९२ |
| आंध्र | १९२७ | ३८,३४३ |
| अन्नमलईनगर | १९२९ | ५९,३३६ |
| मुंबई | १८६४ | ७३,५८२ |
| कलकत्ता | १८७४ | २,३८,५६५ |
| डाका | १९२१ | १,१०,१९१ |
| दिल्ली | १९२३ | ३४,८९८ |
| लखनौ | १९२२ | ६९,२०९ |
| मद्रास | १९०७ | १,१३,९८८ |
| नागपूर | १९२७ | ४२,५५० |
| पाटणा | १९१९ | ३०,००० |
| पंजाब | १८८२ | १,०३,४२९ |
| म्हैसूर | १९१६ | ३७,४९७ |
| उस्मानिआ | १९१९ | ४६,२३८ |

### ३. इतर ग्रंथालयें

| | | |
|---|---|---|
| सेंट्रल लायब्ररी (बडोदें) | १९१० | १,३८,९४४ |
| मद्रास लिटररी सोसायटी लायब्ररी (मद्रास) | १८१२ | १,००,९७४ |
| पंजाब पब्लिक लायब्ररी (लाहोर) | १८८४ | १,०५,६९८ |
| जमशेटजी नसरवानजी पेटिट लायब्ररी (मुंबई) | १८९८ | ६०,००० |
| कॉनेमेरा पब्लिक लायब्ररी (मद्रास) | १८९६ | ६५,००० |
| करवीर नगरवाचन मंदिर (कोल्हापूर) | १८५० | ३०,००० |
| त्रिवेंद्रम् पब्लिक लायब्ररी (त्रावणकोर) | १८४७ | ३३,९८२ |
| असफीया स्टेट लायब्ररी (हैद्राबाद) | १८९१ | ३९,५५८ |
| अलाहाबाद पब्लिक लायब्ररी (अलाहाबाद) | १८६४ | ४६,३४४ |

**ग्रंथिसन्निपात**—( गांठीचा प्लेग ). हा एक सांथीचा अतिशय तीव्र रोग आहे. या रोगामुळे रोग्यास ताप येतो, दम होतो, *आणि गांठी उठतात. अलीकडे हा कांहीं भागांत* सततचा रोग झाला आहे. तथापि याची सांथ मधून मधून कांहीं ठिकाणीं उद्भवते. प्लेगच्या जंतूंचा शोध १८९४ मध्यें लागला. हे जंतू काळ्या ,किंवा करड्या रंगाच्या उंदरावर असणाऱ्या पिसवांमध्यें राहतात. अशा जंतू असलेल्या पिसवा चावल्या म्हणजे रोगाचा प्रादुर्भाव होतो. याची प्रतिबंधक लस आधीं टोचून घेतली असतां सहसा रोग होत नाहीं, व तिचा प्रतिबंधक गुण सहा महिने राहतो.

**ग्रह**—सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या स्वस्थ पदार्थांस ग्रह व एखाद्या ग्रहाभोंवतीं फिरणाऱ्या स्वस्थ पदार्थांस उपग्रह असें म्हणतात. ग्रहांमध्यें पुन्हां वरिष्ठ आणि कनिष्ठ असे दोन प्रकार आहेत. पृथ्वी आणि सूर्य यांमधील बुध आणि शुक्र या ग्रहांस कनिष्ठ; व मंगळ, गुरु, शनि, प्रजापति आणि वरुण यांस वरिष्ठ म्हणण्यांत येतें. बुध, शुक्र, पृथ्वी, मंगळ, गुरु, शनि, प्रजापति आणि वरुण हे आठ मोठाले ग्रह सूर्यापासून अनुक्रमानें आहेत. सूर्यप्रकाशाच्या परिवर्तनामुळें हे प्रकाशित दिसतात. प्रजापति हा १७८१ सालीं हर्शलनें वेध घेऊन शोधून काढला, तर वरुणाचा शोध केवळ ज्योतिर्गणिताच्या ज्ञानानें लेव्हेरिएर आणि ॲडाम्स यांना १८४५ त लागला. बाकीचे ग्रह फार प्राचीन काळापासून माहीत होते.

१९ व्या शतकाच्या आरंभापासून लघुग्रहांचा शोध लागूं लागला. बहुतेक मंगळ आणि गुरु यांच्यामध्यें १००० वर लहान लहान ग्रह माहीत झाले आहेत व आणखीहि होतील. ग्रहांमध्यें बुध, शुक्र, पृथ्वी आणि मंगळ हे बहुतेक सारखें घनत्व व इतर कांहीं सारख्या गोष्टी असलेले आढळतात; तर गुरु, शनि, प्रजापति, आणि वरुण हे पुन्हां एकमेकांसारखे आहेत. त्यांचें घनत्व फार कमी आहे, पण आकार फार मोठे आहेत. गुरु हा सर्वांत मोठा ग्रह आहे.

वर्णलेखावरून असें सिद्ध झालें आहे कीं, सूर्य आणि त्याच्या ग्रहमालिकेंतील ग्रह एकाच तऱ्हेच्या अणूंचे बनले आहेत. हे सर्व ग्रह सूर्यापासून एकाच वेळीं जुळ्या भावंडांप्रमाणें झाले असावेत, असें अनुमान ज्योतिर्विदांनीं केलें आहे.

**ग्रहण**—चंद्र स्वयंप्रकाशित नाहीं. सूर्याचा प्रकाश चंद्रावर पडतो व तो परावर्तनानें आपणास मिळतो. पृथ्वी सूर्य आणि चंद्र यांमध्यें आल्यांकारणानें सूर्याचा प्रकाश चंद्रापर्यंत पोंचत नाहीं, म्हणून चंद्रग्रहण होतें. असा योग अर्थात् पौर्णिमेलाच येणार.

सूर्य विशाल आहे. त्यामुळें छायेचा थोडा भाग पूर्ण काळोखाचा असतो व कांहीं भाग थोडा प्रकाशित असतो. यामुळें चंद्राचा कांहीं भाग ग्रासून ग्रहणास सुरुवात होते. हळूहळू हा भाग वाढतो व त्याच क्रमानें उलट ग्रस्त भाग कमी कमी होऊन ग्रहण सुटतें.

पृथ्वी आणि सूर्य यांमध्यें चंद्र येऊन सूर्याचा प्रकाश पृथ्वीवर येत नाहीं. अमावास्येलाच ही स्थिति असल्यामुळें सूर्यग्रहण या अमावास्येलाच होणार. प्रेक्षक छायेच्या पूर्ण काळोखाच्या भागांत असल्यास त्याला खग्रास सूर्यग्रहण दिसेल. परंतु तो जर अपूर्ण प्रकाशित भागात असेल तर त्याला थोडा ग्रास पावलेलें ग्रहण दिसेल. परंतु छायेच्या बाहेरच्या भागांत असलेल्या लोकांस खग्रास ग्रहण मुळीच दिसणार नाहीं.

खग्रास सूर्यग्रहण ७ मि. ५८ से. पेक्षां जास्त वेळ राहत नाहीं. सूर्यग्रहणाचा जास्तींत जास्त काल ४ तासांपेक्षां थोडा कमी आहे.

पश्चिम भागापासून सूर्य ग्रासला जातो आणि पूर्व भागाकडून मोकळा होतो. चंद्रग्रहण पूर्व भागाला लागतें व पश्चिम भागाला सुटतें. एका वर्षांत फार तर ७ ग्रहणें (५ सूर्याचीं व २ चंद्राचीं ) होऊं शकतील.

चंद्राचे क्रांतिवृत्त पृथ्वीच्या क्रांतिवृत्ताला ३$\frac{१}{२}$° कोन करीत असल्यामुळें सूर्य, चंद्र व पृथ्वी जवळजवळ एका रेषेंत येणें दर पौर्णिमेस अथवा अमावास्येस घडत नाहीं. यामुळें ग्रहणें क्वचित् होतात. खाल्डियन लोकांनीं वेध घेऊन सुमारें १९ वर्षांनंतर तींच तींच ग्रहणें घडतात असें दाखविलें होतें.

वेद, पुराणें आणि इतर प्राचीन ग्रंथ यांतून ग्रहणांचे उल्लेख आहेत. ग्रहणें हीं अनिष्ट मानून त्यांच्या परिहारार्थ शांति वगैरे करतात. आपल्याकडे ग्रहणांत दानें दिल्याबद्दलचे अनेक ताम्रपट आहेत.

**ग्रहपरिवृत्तिसंवत्सर**—ग्रहपरिवृत्तिसंवत्सर हें एक ९० वर्षांचें चक्र आहे. यांत वर्तमान वर्ष चालू ग्रहपरिवृत्तिसंवत्सराच्या चक्रांतील कितवें वर्ष आहे तें दर्शविणारा आंकडाच केवळ लिहिण्याचा प्रघात असून एका चक्राचीं ९० वर्षे पुरीं झाल्यावर पुन्हां पहिल्यापासून संवत्सराची गणना सुरू होते. ह्या संवत्सराचा प्रचार मद्रास इलाख्याच्या मदुरा जिल्ह्यांतच बहुतेक आढळून येतो. त्याची कालगणना वर्तमान कलियुग संवत् ३०७९ ( ख्रि. पू. २४ ) ह्या वर्षापासून सुरू झाली असें म्हणतात. वर्तमान कलियुग संवतांत ७२ किंवा वर्तमान शालिवाहन शकांत ११ मिळवून व आलेल्या बेरजेस नव्वदानें भागून जी बाकी राहते ती ह्या संवत्सराचें वर्तमान वर्ष असतें.

**ग्रॅहॅम, थॉमस** (१८०५-१८६९)—एक ब्रिटिश रसायनशास्त्रज्ञ. त्यानें वायुविकीरण ( डिफ्यूझन ऑफ गॅसेस ) बद्दलचे नियम शोधून काढले आणि स्फटोद ( क्रिस्टालॉइड ) आणि कलोद ( कोलॉइड ) यांमधील फरक निश्चित केला.

**ग्रॅहॅम, स्टीफेन** ( १८८४- )— एक ब्रिटिश लेखक आणि प्रवासी. त्यानें कॉकेशस पर्वतांत आणि मध्य आशियांत प्रवास केला; रशियन यात्रेकरूंबरोबर तो येरुशलेमला गेला; आणि तेथून प्रवासी लोकांबरोबर अमेरिकेंत गेला. त्यानें पुस्तकें लिहिलीं तीं—१ ‘ ए व्हॅगेबॉड इन् दि कॉकेशस ’ ( कॉकेशस-मधील भटक्या ). २ ‘ अन्‌डिस्‌कव्हर्ड रशिया ’ ( असंशोधित रशिया ). ३ ‘ विथ् रशियन पिल्ग्रिम्स टु जेरुशलेम ’ ( जेरुशलेम-च्या रशियन यात्रेकरूंच्या सहवासांत ); आणि ४ ‘ इन् सर्च ऑफ एल्. डोरॅडो ( एल्. डोरॅडोच्या शोधांत ).

**ग्रॅहॅमलँड**—हा प्रदेश अॅन्टार्क्टिक महासागरांत असून तो १८३२ मध्यें बिस्कोनें शोधून काढला व ग्रेट ब्रिटनतर्फे त्या प्रदेशाचा ताबा घेतला. हा प्रदेश दक्षिण अक्षांश ६३° व ६८° यांच्यामध्यें, आणि पश्चिम रेखांश ६१° व ६८° यांच्यामध्यें आहे. याच्या पश्चिम किनाऱ्यावर एक हवामानदर्शक केंद्र आहे. फॉकलंड बेटांवरच्या गव्हर्नरच्या ताब्यांत हा अंकित प्रदेश आहे.

**ग्रॅहॅम-व्हाइट, क्लॉड** ( १८७९- )—एक ब्रिटिश वैमानिक आणि विमानांचा कारागीर. त्यानें १९१० मध्यें अमेरिकेंत झालेली इंटर नॅशनल गॉर्डन-बेनेट ही वैमानिक शर्यत जिंकली. नंतर त्यानें ग्रॅहॅम-व्हाइट एव्हिएशन कंपनी या नांवाची संस्था स्थापली आणि हेंडन् येथें वैमानिक शिक्षणाची शाळा सुरू केली. त्याचीं प्रसिद्ध पुस्तकें आहेत तीं—दि स्टोरी ऑफ दि एअरोप्लेन् ( १९११, विमानाची कथा ), दि एअरोप्लेन, पास्ट, प्रेझेंट, अँड फ्यूचर ( १९११, भूत, वर्तमान व भविष्य काळां-तील विमान ), आणि अवर फर्स्ट एअरवेज् ( १९१८, आमचा पहिला विमानमार्ग ).

**ग्राउझ**—हे कोंबडीच्या आकाराचे एका जातीचे पक्षी

आहेत. यांची शिकार करून खातात. हे वसंत ऋतूंत अंडीं घालतात व तीं एका वेळीं आठपासून दहापर्यंत असतात. हे मोठे झाल्यावरोबर कळपांत राहतात. यांच्या अनेक जाती आहेत. हे ग्रेट-ब्रिटनमध्यें शिकारीसाठीं मुद्दाम गवताळ रानांत संरक्षिले जातात. यांचें मांस खाण्यास फार चवदार लागतें म्हणतात.

**ग्रॉडिन्झ**—पोलंडमधील ग्रॉडेन्झ प्रांताची राजधानी व्हिस्चुला नदीच्या उजव्या तीरावर आहे. येथील लोकसंख्या सुमारें पन्नास हजार आहे. पैकीं एक-तृतीयांश यहुदी आहेत. तंबाखूचे कारखाने व दारूच्या भट्टया हे मुख्य धंदे असून यंत्रें, साबण, मेणबत्त्या, वगैरे येथें होतात. तसेंच गाड्या आणि गालिचे येथें फार होतात.

**ग्रानाडा**—हें शहर स्पेनच्या दक्षिण भागांत ग्रानाडा नांवाच्या प्रांताची राजधानी आहे. या शहरांतील मुख्य प्रसिद्ध स्थळें म्हणजे आल्हांब्रा आणि जेनेरालाइफ या नांवाचे मूर लोकांचे दोन राजवाडे. या शहरांत महत्त्वाचे कारखाने मुळींच नाहींत. येथें एक विद्यापीठ १५३० मध्यें स्थापन झालें असून तेथें हल्लीं सुमारें १,००० विद्यार्थी शिक्षण घेतात. हें शहर इ. स. ८०० पूर्वी मूर लोकांनीं स्थापन केलें आणि १२३५ मध्यें हें शहर मूर राज्याची राजधानी बनलें, आणि त्यामुळें ह्या शहराला अपूर्व सौंदर्य प्राप्त झालें. १४९१ पर्यंत तें मूर लोकां-च्या ताब्यांत होतें, नंतर तें स्पॅनिश लोकांनीं जिंकून घेतलें आणि मूर लोकांना स्पेनबाहेर हांकून लावलें. शहराची लो. सं. १,६१,८८८ आणि प्रांताची लो. सं. ७,७६,४६८.

**ग्रॉनिंजेन**—हें शहर हॉलंडमधील याच नांवाच्या प्रांताची राजधानी आहे. हें हुन्से नदीवर असून या नदीचा येथून कालवा बनवला आहे. या बंदरास फक्त किनाऱ्याची वाहतूक करणाऱ्या बोटी लागतात. येथील मुख्य इमारती, एक देवस्थान व एक विद्यापीठ ( स्थापना १६१४ ) या असून अरकसी-कामा-च्या गिरण्या, व बुरणूस कापडाच्या गिरण्या, तसेंच साबण, तेल, सफेता यांचे कारखाने येथें आहेत. या शहराची लो. सं. सु. एक लाख आहे. प्रांताचें क्षे. फ. ८८१ चौ. मैल व लो. सं. ३,९२,४३६.

**ग्राफाइट**—( पेन्सिल शिसें ). या मऊ, तकाकित काळ्या धातूमध्यें लोहप्राणिद व इतर अशुद्धें असतात. याला प्लंबेगो किंवा काळें शिसें असेंहि म्हणतात. वास्तविक यांत शिसें मुळींच नसून कर्ब असतो. याच्यापासून पेन्सिली बनवितात, त्याचप्रमाणें मुशीहि करतात. तेलाप्रमाणें पदार्थाला गुळगुळीत-पणा, बुळबुळीतपणा आणण्यासाठीं ग्राफाइट वापरतात. कंबर्लंड, सीलोन, मादागास्कर, कानडा, इ. देशांत पाटीच्या

किंवा अग्न्युत्पन्न खडकांतून हा मिळतो. कोळशापासून आतां कृत्रिम ग्राफाइट बनवूं लागले आहेत.

**ग्राम**—गांव. ऋग्वेद व तदुत्तर वाङ्मयांत हा शब्द आला असून ह्याचा मूळ अर्थ 'खेडें' किंवा 'गांव' असा असावा. वैदिक आर्य लोक बहुतेक खेड्यांतच राहत असावेत. हीं खेडीं सर्व देशभर पसरलीं असून कांहीं एकमेकांपासून लांब व कांहीं जवळ असून तीं रस्त्यांनीं जोडलीं होतीं. नेहमीं गांवांत व अरण्यांत, खेड्यांतील झाडांत व प्राण्यांत, आणि अरण्यांतील जंगली झाडांत व जंगली प्राण्यांत (ग्राम व अरण्य) फरक दाखविलेला आढळतो. गांवांत गुरेंढोरें, घोडे आणि दुसरे माणसाळलेले प्राणी, त्याचप्रमाणें मनुष्यें राहत. तेथें धान्यसंचयहि असे. संध्याकाळीं जंगलांतून ढोरें परत गांवांत येत. साधारणपणें गांवें मोकळींच असत, पण कधीं कधीं आंतल्या बाजूला किल्ला (पुर) बांधीत असत. गांवांत पृथक् पृथक् घरें असून प्रत्येक घराला कांहीं तरी आवार असावें असें वाटतें. वैदिक वाङ्मय खेड्यातील सामाजिक अंतर्व्यवस्थेसंबंधानें कांहींच सांगत नाहीं. खेड्यांतील सर्व लोक मिळून समाईक मालकीनें जमिनीची लागवड करीत असतील असें वाटत नाहीं. जो थोडासा पुरावा उपलब्ध आहे त्यावरून प्रत्येक मनुष्य किंवा कुटुंब निराळी शेती करीत असावें. परंतु कायद्यानें नसली तरी त्या वेळीं ही शेती प्रत्यक्ष वैयक्तिक नसून कौटुंबिक असावी. 'ग्रामपाक' हा संहितांमध्यें आढळणारा शब्द राजा आपल्या प्रीतींतील लोकांना खेड्यांतील जमावंदीसंबंधाचे राजकीय हक्क देत असे, असें दर्शवितो. नंतर सर्व जमिनींचा मालक राजा आहे ही कल्पना उदयास आली, आणि याच कल्पनेबरोबर राजा ज्या लोकांना असे हक्क देई त्यांना जमीनदार, जमिनीचा—मालक असें म्हणण्याची चाल पडत गेली. प्राचीन काळीं गांव म्हणजे कायदेशीर किंवा राजकीय बाबतींत एक मूलमान होतें असें म्हणतां येत नाहीं. गांवांत प्रत्यक्ष शेती करणाऱ्यांशिवाय इतर कामें करणारे रथकार, तक्षन् (सुतार), कर्मार (लोहार), वगैरे दुसरे लोक असत. परंतु ते ग्रामसंघाचे घटक असत असें मात्र नाहीं. शिवाय स्वतः लागवड न करणारे परंतु राजाची देणगी म्हणून किंवा परंपरागत वतन म्हणून ह्या खेड्यांत कांहींतरी हितसंबंध असणारे क्षत्रिय आणि ब्राह्मणहि असत. मात्र वरील सर्व लोक राजाच्या ताब्यांत असत, आणि त्यांनीं राजाला खंडणी म्हणून अन्न किंवा नोकरी किंवा अशासारखें कांहीं तरी द्यावें लागत असे. परंतु राजानें जर राजघराण्यांतील कोणाला तरी आपले हक्क दिले असतील तर मात्र राजाला हा कर देण्याची जरूरी नसे. अथर्ववेदामध्यें गांवाच्या उत्पन्नांतील राजाच्या भागाचा उल्लेख आहे. ऋग्वेद व तदुत्तर संहिता आणि ब्राह्मणें ह्यांत गांवांतील मुख्याला किंवा नेत्याला ग्रामणी असें म्हटलें आहे.

त्यानंतर मुसलमानी आणि मराठे अमदानींत गांवचे अधिकारी पाटील-कुलकर्णी असत. ग्रामपंचायत गांवच्या एकंदर व्यवस्थेसाठीं असे. त्यामुळें गांव हें एक स्वतंत्र लघुतम राज्यच म्हणतां येईल. इंग्रजी अमदानींत ग्रामपंचायतीकडे अधिकार राहिला नाहीं. वसुलाची आणि न्यायदानाची व्यवस्था निराळ्या खात्यामार्फत होऊं लागली. आज हिंदुस्थानांत सात लाख खेडीं असून रयतवारी आणि जमीनदारी असे त्याचे दोन भाग पडतात. जमीनदारी पद्धत आतां कायद्यानेंच जात चालली आहे.

**ग्रामपंचायती**—जातपंचायती व ग्रामपंचायती ह्यांत फरक आहे. प्राचीन काळीं गांव एका जातीच्या किंवा कुळीच्या लोकांनीं वसलेले असत; त्यामुळें ग्रामपंचायती तेव्हां होत्या असा भास उत्पन्न होई. वेगवेगळ्या जमातींच्या व धर्मांच्या लोकांनीं वसाहत केलेले असे आज गांव आहेत. आणि अशा गांवांत आपणांस ग्रामपंचायती स्थापन करावयाच्या आहेत. म्हणून आजचा प्रश्न निराळा आहे व तो भानगडीचा आहे. जातपंचायती ग्रामपंचायतींना विघातक होण्याचा संभव असतो. पूर्वी ग्रामपंचायतीसारखी भासणारी अशी ग्रामसंस्था असे. परंतु ती निमसरकारी स्वरूपाची असे. गांव-कामें बलुतेदारांकडे असत. सरकार बलुत्यांचा हक्क मान्य करी. तसेंच दर गांवचे पाटील-कुलकर्णी हीं सरकारनियुक्त माणसें असत. गांव-कामगारांची आसामी पिढीजात असे. सारांश, गांवचा कारभार गांवांत राहणाऱ्या लोकांकडून होई. रामोशी गांवाचे रखवालदार असत. तथापि ह्या सर्वांना सरकारमान्यता होती. जातपंचायत अगदीं स्वतंत्र. आजची ग्रामपंचायत निवडणुकीनें बनते. पूर्वीच्या ग्रामपंचायतीला हल्लींच्या अर्थानें निवडणुकीचें तत्त्व माहीत नव्हतें. सरकारनें नुकताच ग्रामपंचायतीचा कायदा करून ग्रामपंचायतींना दिवाणी, फौजदारी कज्जे चालविण्याचा अधिकार दिला आहे. पूर्वीच्या पद्धतींत सेवेच्या तत्त्वाचा आविष्कार झालेला दिसतो; हल्लींच्या पद्धतींत अधिकारवृत्तीचा आविष्कार आहे. अधिकाराचा दुरुपयोग होण्याचा संभव असतो. गांवच्या वसुलाचा काहीं भाग ग्रामपंचायतींना मिळण्याची तरतूद नवीन कायद्यांत आहे. लोकांत नागरिक वृत्ति निर्माण झाल्यावांचून ग्रामपंचायती सुरळीत चालावयाच्या नाहींत.

ग्रामपंचायती ब्रिटिश अमदानींत बंद पडल्या त्या सुरू करण्याची मोठी चळवळ राष्ट्रीय सभेनें केली व तिला म. गांधींच्या प्रभावानें यश येऊन आतां बहुतेक प्रांतांतून पंचायत कायदा अमलांत आला आहे. नवीन ग्रामोद्धाराच्या हालचाली-

मुळेंहि गांवची परिस्थिति सुधारत आहे. चार-पांच ग्रामपंचायती मिळून एक न्यायपंचायत स्थापन होऊन तिला न्यायदानाचे कांहीं हक्क मिळतील.

**ग्रामलेखक**— ( कुलकर्णी पाहा ). याजकडे गांवचें सर्व लिहिण्याचें काम असतें. त्याला गांवच्या सर्व जमिनींची नोंद ठेवावी लागत असून तींत १ गांवचें एकंदर कमाल; २ चिनआकारी कीर्दसार; ३ लावणीलायक नाहीं अशी जमीन; ४ विशेष कामाकडे ठेवलेली जमीन म्हणजे गांवठण, स्मशानभूमि, लष्कर उतरण्यासाठीं वे तंबू मारण्याकरितां जागा, इत्यादि ; ५ सार्वजनिक कामासाठीं राखलेली जमीन म्हणजे, गुरचरण, सरकारी जंगल, इत्यादि : ६ सरकारी व रयत-उपयोगी गांवनोकर आणि परगण्याचे वतनदार यांच्या वतनाची जमीन; ७ इनामदारांची इनाम जमीन; ८ तत्संबंधीं जुडी; ९ कीर्दसार आकारी पड; १० आकारी लागण जमीन; आणि ११ इतर किरकोळ उत्पन्न, वगैरे सर्व तपशील दाखल करावा लागतो. गांवच्या जमाखर्चाचा हिशेब तोच मांडीत असून, एकंदर ठरलेल्या जमाबंदीपैकीं कोणाकडे किती, आणि कशाबद्दल सरकारचें येणें आहे, ह्याचा नांवनिशी-वार व कुळारग दाखला तो ठेवतो, आणि प्रसंगानुसार लोकांच्या अर्ज्या, व खतें, हीं देखील तोच लिहितो. ह्याला उत्तर हिंदुस्थानांत पटवारी, गुजराथेंत तलाठी, महाराष्ट्रांत कुलकर्णी, आणि दक्षिण हिंदुस्थानांत कर्णम्, असें म्हणतात. महाराष्ट्र देशांत आणि इतर कांहीं भागांत हा वतनदार नसून पगारदार असल्यास, त्याला कुलकर्णीच्याऐवजीं तलाठीच म्हणण्याचा प्रचार आहे.

**ग्रामाधिकारी**—भारतीय साम्राज्यांत गांवचे मुख्य नोकर अथवा ग्रामभृत म्हटले म्हणजे खालीं लिहिल्याप्रमाणें होत :—

१. ग्रामाधिपति-ह्यालाच सांप्रत पाटील, मुकादम, आणि मांदील, अशी संज्ञा अनुक्रमें दक्षिणेंत व बंगाल्यांत आहे. क्वचित् ठिकाणीं विशेष अधिकारानुरूप, त्याला सरपाटील व कारभारी असेंहि म्हणतात.

२. ग्रामलेखक—ह्याला उत्तर हिंदुस्थानांत पटवारी, दक्षिणेंत कुलकर्णी, आणि मद्रासेकडे कर्णम् असें म्हणतात. कमी-जास्त अधिकारानुरूप व कामाच्या योग्यतेप्रमाणें, त्यालाच सरदेशमुख देशधिकारी, देशमुख, देशपांडे, देशलेखक, देसाई, चौधरी, कानोंगो, सरखोत, तलाठी, आणि जमीनदार, अशी हल्लीं संज्ञा आहे.

३. ग्रामयाजक-ह्याला सांप्रत गुरव म्हणतात.

४. ग्रामज्योतिष म्हणजे गांवजोशी.

५. ग्रामकर्मार ( गांवलोहार ). ६ ग्रामतक्षक ( गांवसुतार ). ७ ग्रामकुलाल ( गांवकुंभार ). ८ ग्रामरजक ( गांवधोबी ). ९ ग्रामनापित ( गांवन्हावी ). १० ग्रामपाल ( गांवजागल्या ). ११ ग्रामवैतालिक ( गांवभाट ). १२ ग्रामगोदुह् ( गांवगौळी ). १३ ग्रामघातिन् ( गांवखाटिक ). १४ ग्रामपेष्य ( गांवमहार, धेड व वेठ्या ) हाच गांवचा वाटाड्या, म्हणजे वाट दाखविणारा होय. १५ ग्रामघोषिन् ( दवंडी पिटणारा ), व १६ ग्रामचर्मकार ( गांवचांभार ).

अर्वाचीन काळीं यांशिवायहि आणखी दुसरे गांवकामगार दृष्टीस पडतात, व ते खालीं लिहिल्याप्रमाणें होत :—

१७ पोतदार ( गांवसोनार ). १८ शिंपी ( गांवचें शिवण-काम करणारा). १९ तांबोळी (विड्याचीं पानें, सुपारी, तमाखू, इत्यादि विकणारा ). २० गवंडी ( गांवचीं घरें बांधणारा ). २१ तेली ( तेल विकणारा ). २२ कासार ( कल्हई व डाक लावणारा ). २३ बुरूड ( सुपें टोपल्या, इत्यादि विकणारा ). २४ वाजंत्री (वाद्यें वाजविणारा ). हाच क्वचित् ठिकाणीं पत्रावळी व द्रोणहि लावतो. २५ मशालजी ( मशाल नेणारा, व दिवाबत्ती कर-णारा ). २६ शिंगाड्या ( शिंग फुंकणारा ). २७ मढवी ( झाड-सारवण करून भांडीं घांसणारा ). २८ वेठ्या ( बोजा उचल-णारा ). २९ मुलांना ( कुराण व मुसलमानी धर्म पढवणारा ). ३० बागवान ( गांवमाळी ). ३१ ठाणगा ( हा गांवचें किर-कोळ काम करितो; गांवच्या तिजोरीबरोबर असतो; व वाटहि दाखवितो. हा गांवचा चपराशीच होय ). ३२ मांग ( हा फांशी देणें असल्यास फांस चढवितो, आणि शिंकीं वगैरे करतो ). ( अलुतीं बलुतीं पाहा. )

**ग्रामीण वाङ्मय**—हा साहित्याचा प्रकार खेड्यांतील लोकांच्या जीवनांचीं चित्रें वठवितो. युरोपमध्यें थेओक्रेटस हा पहिला ग्रामीण कवि होऊन गेला. त्यानंतर इटलींत व्हर्जिलनें या विषयावर आपली लेखणी चालविली व त्याला बरेच अनुयायी मिळाले. नंतर ग्रामीण कथानकें लिहिण्याची टूमच पडून गेली. इंग्लंडमध्यें स्पेन्सर हा या बाबतींतला पहिला म्हणतां येईल. नाटकांतून देखील लेखक ग्रामीण प्रसंग घालूं लागले. शेक्स्पिअरचें ' ॲज् यू लाइक इट् ', ' विंटर्स टेल ' यांतून हेंच दिसेल. मध्यंतरीं १७ व्या शतकांत या साहित्याला उतरती कळा लागली पण लवकरच पोप, फिलिप्स्, वगैरेंनीं त्याला उजळा दिला; पण तो फार काळ टिकला नाहीं.

मराठींत ना. ह. आपटे, वि. स. खांडेकर, द. र. कवठेकर, वगैरे कथालेखकांनीं व गिरीश, यशवंत, चौधरी, ठोकळ, वगैरे कवींनीं नावीन्य म्हणून आपली प्रतिभा या बाजूस वळविली. आज नाविक गीतें फार लोकप्रिय होत आहेत. पण ग्रामीण जीवन

किंवा अग्न्युत्पन्न खडकांतून हा मिळतो. कोळशापासून आतां कृत्रिम ग्राफाइट बनवूं लागले आहेत.

**ग्राम**—गांव. ऋग्वेद व तदुत्तर वाङ्मयांत हा शब्द आला असून ह्याचा मूळ अर्थ 'खेडें' किंवा 'गांव' असा असावा. वैदिक आर्य लोक बहुतेक खेड्यांतच राहत असावेत. हीं खेडीं सर्व देशभर पसरलीं असून कांहीं एकमेकांपासून लांब व कांहीं जवळ असून तीं रस्त्यांनीं जोडलीं होतीं. नेहमीं गांवांत व अरण्यांत, खेड्यांतील झाडांत व प्राण्यांत, आणि अरण्यांतील जंगली झाडांत व जंगली प्राण्यांत (ग्राम व अरण्य) फरक दाखविलेला आढळतो. गांवांत गुरेंढोरें, घोडे आणि दुसरे माणसाळलेले प्राणी, त्याचप्रमाणें मनुष्यें राहत. तेथें धान्यसंचयहि असे. संध्याकाळीं जंगलांतून ढोरें परत गांवांत येत. साधारणपणें गांवें मोकळींच असत, पण कधीं कधीं आंतल्या बाजूला किल्ला (पुर) बांधीत असत. गांवांत पृथक् पृथक् घरें असून प्रत्येक घराला कांहीं तरी आवार असावें असें वाटतें. वैदिक वाङ्मय खेड्यातील सामाजिक अंतर्व्यवस्थेसंबंधानें कांहींच सांगत नाहीं. खेड्यांतील सर्व लोक मिळून समाईक मालकीनें जमिनींची लागवड करीत असतील असें वाटत नाहीं. जो थोडासा पुरावा उपलब्ध आहे त्यावरून प्रत्येक मनुष्य किंवा कुटुंब निराळी शेती करीत असावें. परंतु कायद्यानें नसली तरी त्या वेळीं ही शेती प्रत्यक्ष वैयक्तिक नसून कौटुंबिक असावी. 'ग्रामपाक' हा संहितांमध्यें आढळणारा शब्द राजा आपल्या प्रीतींतील लोकांना खेड्यांतील जमाबंदीसंबंधाचे राजकीय हक्क देत असे, असें दर्शवितो. नंतर सर्व जमिनींचा मालक राजा आहे ही कल्पना उदयास आली, आणि याच कल्पनेबरोबर राजा ज्या लोकांना असे हक्क देई त्यांना जमीनदार, जमिनीचा– मालक असें म्हणण्याची चाल पडत गेली. प्राचीन काळीं गांव म्हणजे कायदेशीर किंवा राजकीय बाबतींत एक मूलमान होतें असें म्हणतां येत नाहीं. गांवांत प्रत्यक्ष शेती करणाऱ्यांशिवाय इतर कामें करणारे रथकार, तक्षन् (सुतार), कर्मार (लोहार), वगैरे दुसरे लोक असत. परंतु ते ग्रामसंघाचे घटक असत असें मात्र नाहीं. शिवाय स्वतः लागवड न करणारे परंतु राजाची देणगी म्हणून किंवा परंपरागत वतन म्हणून ह्या खेड्यांत कांहींतरी हितसंबंध असणारे क्षत्रिय आणि ब्राह्मणहि असत. मात्र वरील सर्व लोक राजाच्या ताब्यांत असत, आणि त्यांनीं राजाला खंडणी म्हणून अन्न किंवा नोकरी किंवा अशासारखे कांहीं तरी द्यावें लागत असे. परंतु राजानें जर राजघराण्यांतील कोणाला तरी आपले हक्क दिले असतील तर मात्र राजाला हा कर देण्याची जरूरी नसे. अथर्ववेदामध्यें गांवाच्या उत्पन्नांतील राजाच्या भागाचा उल्लेख आहे. ऋग्वेद व तदुत्तर संहिता आणि ब्राह्मणें ह्यांत गांवांतील मुख्याला किंवा नेत्याला ग्रामणी असें म्हटलें आहे.

त्यानंतर मुसलमानी आणि मराठे अमदानींत गांवचे अधिकारी पाटील–कुलकर्णी असत. ग्रामपंचायत गांवच्या एकंदर व्यवस्थेसाठीं असे. त्यामुळें गांव हें एक स्वतंत्र लघुतम राज्यच म्हणतां येईल. इंग्रजी अमदानींत ग्रामपंचायतीकडे अधिकार राहिला नाहीं. वसुलाची आणि न्यायदानाची व्यवस्था निराळ्या खात्यामार्फत होऊं लागली. आज हिंदुस्थानांत सात लाख खेडीं असून रयतवारी आणि जमीनदारी असे त्याचे दोन भाग पडतात. जमीनदारी-पद्धत आतां कायद्यानेंच जात चालली आहे.

**ग्रामपंचायती**—जातपंचायती व ग्रामपंचायती ह्यांत फरक आहे. प्राचीन काळीं गांव एका जातीच्या किंवा कुळीच्या लोकांनीं वसलेले असत; त्यामुळें ग्रामपंचायती तेव्हां होत्या असा भास उत्पन्न होई. वेगवेगळ्या जमातींच्या व धर्माच्या लोकांनीं वसाहत केलेले असे आज गांव आहेत. आणि अशा गांवांत आपणांस ग्रामपंचायती स्थापन करावयाच्या आहेत. म्हणून आजचा प्रश्न निराळा आहे व तो भानगडीचा आहे. जातपंचायती ग्रामपंचायतींना विघातक होण्याचा संभव असतो. पूर्वी ग्रामपंचायतीसारखी भासणारी अशी ग्रामसंस्था असे. परंतु ती निमसरकारी स्वरूपाची असे. गांव-कामें बलुतेदारांकडे असत. सरकार बलुत्यांचा हक्क मान्य करी. तसेंच दर गांवचे पाटील-कुलकर्णी हीं सरकारनियुक्त माणसें असत. गांव कामगारांची आसामी पिढीजात असे. सारांश, गांवचा कारभार गांवांत राहणाऱ्या लोकांकडून होई. रामोशी गांवाचे रखवालदार असत. तथापि ह्या सर्वांना सरकारमान्यता होती. जातपंचायत अगदीं स्वतंत्र. आजची ग्रामपंचायत निवडणुकीनें बनते. पूर्वीच्या ग्रामपंचायतीला हल्लींच्या अर्थानें निवडणुकीचें तत्त्व माहीत नव्हतें. सरकारनें नुकताच ग्रामपंचायतीचा कायदा करून ग्रामपंचायतींना दिवाणी, फौजदारी कज्जे चालविण्याचा अधिकार दिला आहे. पूर्वीच्या पद्धतींत सेवेच्या तत्त्वाचा आविष्कार झालेला दिसतो; हल्लींच्या पद्धतींत अधिकारवृत्तीचा आविष्कार आहे. अधिकाराचा दुरुपयोग होण्याचा संभव असतो. गांवच्या वसुलाचा काहीं भाग ग्रामपंचायतींना मिळण्याची तरतूद नवीन कायद्यांत आहे. लोकांत नागरिक वृत्ति निर्माण झाल्यावांचून ग्रामपंचायती सुरळीत चालावयाच्या नाहींत.

ग्रामपंचायती ब्रिटिश अमदानींत बंद पडल्या त्या सुरू करण्याची मोठी चळवळ राष्ट्रीय सभेनें केली व तिला म. गांधींच्या प्रभावानें यश येऊन आतां बहुतेक प्रांतांतून पंचायत कायदा अमलांत आला आहे. नवीन ग्रामोद्धाराच्या हालचाली·

मुळेंहि गांवची परिस्थिति सुधारत आहे. चार-पांच ग्रामपंचायती मिळून एक न्यायपंचायत स्थापन होऊन तिला न्यायदानाचे कांहीं हक्क मिळतील.

**ग्रामलेखक**— (कुलकर्णी पाहा). याजकडे गांवचें सर्व लिहिण्याचें काम असतें. त्याला गांवच्या सर्व जमिनींची नोंद ठेवावी लागत असून तींत १ गांवचें एकंदर कमाल; २ चिनआकारी कीर्दसार; ३ लावणीलायक नाहीं अशी जमीन; ४ विशेष कामाकडे ठेवलेली जमीन म्हणजे गांवठण, स्मशानभूमि, लष्कर उतरण्यासाठीं वें तंबू मारण्याकरितां जागा, इत्यादि; ५ सार्वजनिक कामासाठीं राखलेली जमीन म्हणजे, गुरचरण, सरकारी जंगल, इत्यादि: ६ सरकारी व रयत-उपयोगी गांवनोकर आणि परगण्याचे वतनदार यांच्या वतनाची जमीन; ७ इनामदारांची इनाम जमीन; ८ तत्संबंधीं जुडी; ९ कीर्दसार आकारी पड; १० आकारी लागण जमीन; आणि ११ इतर किरकोळ उत्पन्न, वगैरे सर्व तपशील दाखल करावा लागतो. गांवच्या जमाखर्चाचा हिशेब तोच मांडीत असून, एकंदर ठरलेल्या जमाबंदीपैकीं कोणाकडे किती, आणि कशाबद्दल सरकारचें येणें आहे, ह्याचा नांवनिशीवार व कुळारग-दाखला तो ठेवतो, आणि प्रसंगानुसार लोकांच्या अर्ज्या, व खतें, हीं देखील तोच लिहितो. ह्याला उत्तर हिंदुस्थानांत पटवारी, गुजराथेंत तलाठी, महाराष्ट्रांत कुलकर्णी, आणि दाक्षिण हिंदुस्थानांत कर्णम्, असें म्हणतात. महाराष्ट्र देशांत आणि इतर कांहीं भागांत हा वतनदार नसून पगारदार असल्यास, त्याला कुलकर्णीच्याऐवजीं तलाठीच म्हणण्याचा प्रचार आहे.

**ग्रामाधिकारी**—भारतीय साम्राज्यांत गांवचे मुख्य नोकर अथवा ग्रामभृत म्हटले म्हणजे खालीं लिहिल्याप्रमाणें होत:—

१. ग्रामाधिपति–ह्यालाच सांप्रत पाटील, मुकादम, आणि मांदील, अशी संज्ञा अनुक्रमें दक्षिणेंत व बंगाल्यांत आहे. क्वचित् ठिकाणीं विशेष अधिकारानुरूप, त्याला सरपाटील व कारभारी असेंहि म्हणतात.

२. ग्रामलेखक—ह्याला उत्तर हिंदुस्थानांत पटवारी, दक्षिणेंत कुलकर्णी, आणि मद्रासेकडे कर्णम् असें म्हणतात. कमी-जास्त अधिकारानुरूप व कामाच्या योग्यतेप्रमाणें, त्यालाच सरदेशमुख देशधिकारी, देशमुख, देशपांडे, देशलेखक, देसाई, चौधरी, कानोंगो, सरखोत, तलाठी, आणि जमीनदार, अशी हल्लीं संज्ञा आहे.

३. ग्रामयाजक–ह्याला सांप्रत गुरव म्हणतात.

४. ग्रामज्योतिष म्हणजे गांवजोशी.

५. ग्रामकर्मार ( गांवलोहार ). ६ ग्रामतक्षक ( गांवसुतार ). ७ ग्रामकुलाल ( गांवकुंभार ). ८ ग्रामरजक ( गांवधोबी ). ९ ग्रामनापित ( गांवन्हावी ). १० ग्रामपाल ( गांवजागल्या ). ११ ग्रामवैतालिक ( गांवभाट ). १२ ग्रामगोदुह् ( गांवगौळी ). १३ ग्रामघातिन् ( गांवखाटिक ). १४ ग्रामपेष्य ( गांवमहार, धेड व वेठ्या ) हाच गांवचा वाटाड्या, म्हणजे वाट दाखविणारा होय. १५ ग्रामघोषिन् ( दवंडी पिटणारा ), व १६ ग्रामचर्मकार ( गांवचांभार ).

अर्वाचीन काळीं यांशिवायहि आणखी दुसरे गांवकामगार दृष्टीस पडतात, व ते खालीं लिहिल्याप्रमाणें होत:—

१७ पोतदार ( गांवसोनार ). १८ शिंपी ( गांवचें शिवणकाम करणारा). १९ तांबोळी (विड्याचीं पानें, सुपारी, तमाखू, इत्यादि विकणारा ). २० गवंडी ( गांवचीं घरें बांधणारा ). २१ तेली ( तेल विकणारा ). २२ कासार ( कल्हई व डाक लावणारा ). २३ बुरूड ( सुपें टोपल्या, इत्यादि विकणारा ). २४ वाजंत्री (वाद्यें वाजविणारा ). हाच क्वचित् ठिकाणीं पत्रावळी व द्रोणहि लावतो. २५ मशालजी ( मशाल नेणारा, व दिवाबत्ती करणारा ). २६ शिंगाड्या (शिंग फुंकणारा ). २७ मढवी ( झाडसारवण करून भांडीं घांसणारा ). २८ वेठ्या ( बोजा उचलणारा ). २९ मुलांना ( कुराण व मुसलमानी धर्म पढवणारा ). ३० बागवान ( गांवमाळी ). ३१ ठाणगा ( हा गांवचें किरकोळ काम करितो; गांवच्या तिजोरीबरोबर असतो; व वाटहि दाखवितो. हा गांवचा चपराशीच होय ). ३२ मांग ( हा फांशी देणें असल्यास फांस चढवितो, आणि शिंकीं वगैरे करतो ). ( अलुतीं बलुतीं पाहा. )

**ग्रामीण वाङ्मय**—हा साहित्याचा प्रकार खेड्यांतील लोकांच्या जीवनांचीं चित्रें वठवितो. युरोपमध्यें थेऑक्रेटस हा पहिला ग्रामीण कवि होऊन गेला. त्यानंतर इटलींत व्हर्जिलनें या विषयावर आपली लेखणी चालविली व त्याला बरेच अनुयायी मिळाले. नंतर ग्रामीण कथानकें लिहिण्याची टूमच पडून गेली. इंग्लंडमध्यें स्पेन्सर हा या बाबतींतला पहिला म्हणतां येईल. नाटकांतून देखील लेखक ग्रामीण प्रसंग घालूं लागले. शेक्सपिअरचें 'ॲज् यू लाइक इट्', 'विंटर्स टेल' यांतून हेंच दिसेल. मध्यंतरीं १७ व्या शतकांत या साहित्याला उतरती कळा लागली पण लवकरच पोप, फिलिप्स, वगैरेंनीं त्याला उजळा दिला; पण तो फार काळ टिकला नाहीं.

मराठींत ना. ह. आपटे, वि. स. खांडेकर, द. र. कवठेकर, वगैरे कथालेखकांनीं व गिरीश, यशवंत, चौधरी, ठोकळ, वगैरे कवींनीं नावीन्य म्हणून आपली प्रतिभा या बाजूस वळविली. आज नाविक गीतें फार लोकप्रिय होत आहेत. पण ग्रामीण जीवन

जगणाऱ्यांनींच स्वतः लेखन केल्याशिवाय या वाङ्मय-प्रकाराला जिवंतपणा येणार नाहीं.

**ग्रामोद्धार**—ग्राम म्हणजे खेडें. खेड्यांची आर्थिक, सांस्कृतिक व शैक्षणिक अवनति झाली नसती तर ग्रामोद्धाराचा प्रश्न उत्पन्न झाला नसता. म्हणून ग्रामोन्नति अथवा ग्रामोद्धार म्हणजे गांवांतील लोकांचा उद्धार होय; नुसत्या गांवाच्या भागाची सुधारणा नव्हे. हिंदुस्थानांत शहरें थोडीं व खेडीं असंख्य; ह्यास्तव ग्रामोद्धार करणें म्हणजे देशाचा उद्धार करण्यासारखें आहे. खेड्यांतील लोक अज्ञानी, अर्धपोटी, रोगग्रस्त, आणि सावकार व सरकार ह्यांनीं पिळून काढलेले असल्यामुळें त्यांना शिक्षण देऊन सुखी, निरोगी, स्वाभिमानी व खाण्यापिण्याची ददात नसलेले असे कसे करतां येतील ह्याचा विचार सध्यां राष्ट्रीय सरकार व जनता करीत आहे. कोणालाच निश्चित मार्ग सुचत नाहीं. प्रथम आपली स्थिति काय आहे व आपण कसें असावयास पाहिजे, ही जाणीव त्यांच्या सुस्थितीचा पायाच होय. आतां आणखी प्रत्येक सज्ञान स्त्री-पुरुषाला मतदानाचा हक्क पण देण्यांत येणार आहे. हा हक्क लोकांना समंजसपणानें बजावतां आला पाहिजे व तसा बजावण्यास तो पात्र झाला पाहिजे. ह्या कारणास्तव ग्रामोद्धाराचा प्रश्न अतिशय निकडीचा झाला आहे. गांवचा कारभार सरकारच्या मार्गदर्शनाखालीं लोकांवर सोपविणें हाच एक इष्ट हेतु अल्पकाळांत साध्य होण्याचा उपाय आहे. ग्रामोद्धारांत शेतकीसुधारणा, पाणीपुरवठा, पशु-वृक्ष-संवर्धन, शिक्षणपद्धति, इत्यादि अनेक गोष्टींचा विचार करणें भाग पडेल आणि हें काम इतरांनीं न करतां लोकांनींच करणें इष्ट आहे. घरचा कारभार पाहिल्यानें मनुष्य व्यवहारांत तयार होतो, त्याचप्रमाणें गांवाचा कारभार करूं लागल्यानें बहुसंख्याक लोक शहाणे होतील.

ग्रामोद्धाराची मोठी मूलगामी चळवळ म. गांधींनीं सुरू करून, राष्ट्रीय सभा आणि सरकार यांना या बाबतींतील मोठी जबाबदारी पटवून दिली. आतां सर्व प्रांतिक सरकारें समित्या व कार्यकर्ते नियुक्त करून यांकडे विशेष लक्ष पुरवीत आहेत.

**ग्रामोफोन**—गाण्याचें अथवा भाषणाचें ध्वनिलेखन करून त्याचें पुनरुच्चारण किंवा पुनर्वादन करणारें यंत्र. थॉमस ए. एडिसन यानें १८७७ सालीं आपलें पहिलें बोलणारें यंत्र तयार केलें, त्याला फोनोग्राफ असें नांव ठेवलें. त्यानंतर दुसऱ्या शोधकानें ग्रामोफोन हा शब्द रूढ केला. लिऑन स्कॉट यानें १८५६ मध्यें एक फोनोटोग्राफ म्हणून यंत्र शोधून काढलें होतें. त्यापासूनच सुधारून एडिसननें आपला फोनोग्राफ तयार केला असें म्हणण्यास हरकत नाहीं. याच सुमारास ग्राहाम बेल यानें टेलेफोन अथवा दूरध्वनियंत्र शोधून काढलें होतें. तेव्हां एडिसननें स्कॉटच्या फोनोटोग्राफमधील ध्वनिलेखनाची कल्पना व ग्राहाम बेलच्या टेलेफोनमधील ध्वनि-उत्पादनाची कल्पना या दोहोंचा संयोग करून आपला फोनोग्राफ तयार केला. यामध्यें, एका पंचपात्रामध्यें एक कमान (स्प्रिंग) बसविलेली असते. तिच्यामुळें एका चाकापासून दुसऱ्या एका चाकाला गति मिळून, त्यावर एक गति बदलणाऱ्या लहान चाकाच्या साहाय्यानें ती गति वर असणाऱ्या तबकडीच्या खालीं आलेल्या दांड्यास मिळते व वरची तबकडी फिरूं लागते. या दांड्यास एक गतिनियंत्रक (गव्हर्नर) बसविलेला असतो. त्याच्या साहाय्यानें गति एकसारखी ठेवली जाते. वरच्या बाजूस एक ध्वनिपेटिका बसविलेली असते. तिच्यामध्यें एक अभ्रकाचा पडदा असतो. या ध्वनिपेटिकेस एक अणकुचीदार खिळा अगर टांचणी जोडलेली असते. त्या टांचणीनें मेणाच्या तबकडीवर चरे उठतात. या ध्वनिपेटिकेस एक हात जोडलेला असतो व त्याच्या शेवटीं एक कर्णा जोडलेला असून तो ध्वनिवर्धक असतो. याच्या साहाय्यानें आवाज मोठा होऊन ऐकूं येतो.

**ग्रॉस, आन्त्वान जीन** (१७७१-१८६५)— एक ऐतिहासिक चित्रें काढणारा फ्रेंच चित्रकार. त्यानें काढलेल्या 'दि व्हिक्टर ऑफ आर्कोला' या चित्रामुळे नेपोलियनचें लक्ष या चित्रकाराकडे गेलें. त्यानें अनेक युद्धप्रसंगांचीं चित्रें व व्यक्तिचित्रें (पोर्ट्रेट) काढलीं आहेत; पण त्याचें मुख्य चित्रकाम पॅरिस येथील सेंट जेनेव्हीव्हच्या घुमटाचें होय. पुढें रोमँटिक चित्रकलापंथाचा उदय होऊन ग्रॉसच्या चित्रावर फार टीका झाली.; त्यामुळें तो इतका खिन्न झाला कीं, त्यानें सीन नदींत उडी टाकून आत्महत्या केली.

**ग्रिफिथ, राल्फ टॉमस हॉचकिन** (१८२६-१९०६)— एक इंग्रज प्राच्यविद्यापंडित. विल्टर परगण्यांतील कोर्सेली गांवीं यांचा जन्म झाला. ऑक्सफोर्डच्या क्रान्स कॉलेजमध्यें असतांना तेथील सुप्रसिद्ध संस्कृत-विद्याभ्यासी विल्सन यांच्या सहवासामुळें यांना संस्कृत भाषाध्ययनाची गोडी लागली. यानंतर काशीच्या क्वीन्स कॉलेजमध्यें इंग्लिश वाङ्मयाचे प्राध्यापक म्हणून यांना नेमण्यांत आलें. यानंतर हे या कॉलेजचे प्रिन्सिपॉल झाले व शेवटीं 'डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन' च्या जागेपर्यंत चढले. सन १८८५ त सेवानिवृत्ति झाल्यावर यांनीं आपलें राहिलेलें आयुष्य संस्कृत ग्रंथांच्या अध्ययनांत घालवलें.

ऋक्, यजुस्, साम व अथर्व या चारहि वेदांचीं यांनीं छंदोबद्ध भाषांतरें केलीं. यांखेरीज वाल्मीकीचें रामायण, संस्कृतांतील लघुकाव्यें, इ. कांहीं अनुवादित ग्रंथहि यांनीं लिहिले आहेत.

'पंडित' या नांवाचें एक संस्कृत नियतकालिक यांनीं सुरू केलें होतें. वरींच वर्षें या पत्राचे हे संपादक होते.

**ग्रिम, याकोब लुड्विग** (१७८५–१८६३)—एक जर्मन भाषाशास्त्रज्ञ. त्यानें जर्मन पौराणिक कथा, जर्मन कायदेविषयक पुराणवस्तुसंग्रह, जर्मन भाषेचा इतिहास या तीन विषयांवर ग्रंथ लिहिले. आणि जुन्या जर्मन कवितांचा संग्रह त्यानें प्रसिद्ध केला. त्याचे सर्वांत महत्त्वाचे ग्रंथ जर्मन व्याकरण (विभाग १–४) आणि जर्मन कोश हे आहेत; पण ते दोन्हीहि अपूर्ण आहेत. त्यानें आपल्या भावाच्या मदतीनें लहान मुलांकरितां 'फेअरी टेल्स' हा कथासंग्रह प्रसिद्ध केला व तो अतिशय लोकप्रिय झाला आहे.

**ग्रिम, वेल्हेम कार्ल** (१७६९–१८५९)— एक जर्मन भाषाशास्त्रज्ञ. वरील विद्वानाचा भाऊ. त्यानें मध्ययुगीन जर्मन काव्याचा विशेष अभ्यास केला आणि त्यावर एक निबंध लिहून प्रसिद्ध केला.

**ग्रियर्सन, सर जॉर्ज आब्राहम** (१८५१–१९४१)—एक भारतीय भाषाभ्यासक इंग्रज पंडित. वयाच्या तेविसाव्या वर्षी सिव्हिल सर्व्हंट म्हणून हिंदुस्थानांत आल्यापासून या देशांतील भाषा व लिपी यांच्या अभ्यासांत यांनीं लक्ष घातलें. सन १८७७ मध्यें कालिदासावर यांनीं पहिला निबंध लिहिला. हिंदुस्थानांतील सुमारें दोनशेंहून अधिक भाषांवर प्रभुत्व मिळवून यांनीं अनेक ज्ञात व अज्ञात भाषांचीं व्याकरणें लिहिलीं. विशेषतः यांची 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' (हिंदुस्थानांतील भाषाविषयक पाहणी) ही मान्यवर ग्रंथमाला हिंदुस्थानांतील भाषांच्या अभ्यासकांना एक मार्गदर्शक होऊन राहिली आहे. याच अद्वितीय ग्रंथमालेमुळें ग्रियर्सन यांच्यावर जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांनीं पदव्या व मान यांचा वर्षाव झाला. हे बंगालच्या व मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या शाखेचे ऑनररी फेलो, व नागरी प्रचारणी सभा (काशी), बिहार ॲण्ड ओरिसा रीसर्च सोयायटी, दि मॉडर्न लॅग्वेज असोसिएशन, लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडिया, यांसारख्या संस्थांचे सभासद होते. मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचें कँबेल सुवर्णपदक व बंगाल रॉयल एशियाटिक सोसायटीचें सर विल्यम जोन्स सुवर्णपदक यांना देण्यांत आलें होतें.

**ग्रीक भाषा**—ही आर्यन किंवा इंडो–युरोपियन भाषाकुळांतील एक असून हिच्या पोटभाषाहि आहेत. युरोप आणि आशिया मायनर या प्रदेशांत खि. पू. १५०० वर्षांपासून तरी ही बोलली जात असली पाहिजे. या भाषेंत अभिजात, शास्त्रीय आणि धार्मिक वाङ्मय तयार झाल्यानें खिस्तशकाच्या पहिल्या कांहीं शतकांत युरोपांतील विद्वानांना ही अवगत करून घ्यावी लागत होती, यांत शंका नाहीं. पुढें हिची जागा लॅटिन भाषेनें घेतली. कॉन्स्टॅटिनोपल पडून ग्रीक लोकांचें आगमन इटलींत झाल्यावर व विद्यापुनरुज्जीवनाचा काल आल्यानंतर ग्रीक भाषेच्या अभ्यासाला नवीन दिशा लागली; व आपल्याकडील संस्कृत भाषेप्रमाणें तिला विद्यापीठांतून मान मिळत आहे.

या भाषेच्या डोरिक, ईओलिक व आयोनिक अशा तीन पोटभाषा आहेत. ईओलिक उत्तर ग्रीसमध्यें, डोरिक ही क्रीट, पेलोपोनेसस, वगैरे वसाहतींतून, व आयोनिक ही ॲटिका व आशिया मायनर या प्रदेशांत प्रचलित होती. आयोनिक भाषेंतच उत्कृष्ट ग्रीक वाङ्मय आढळतें. अथेन्सची भाषा हीच होती.

पुढील काळांत या भाषेंत पुष्कळ बदल झाला असला तरी अर्वाचीन ग्रीक भाषेनें जुन्या लेखनाच्या भाषेंतील शुद्धता कायम राखिली आहे. वाचण्याला दोन्ही भाषा सारख्याच वाटतील. आजच्या इंग्रजी भाषेंत ग्रीक शब्द अगदीं थोडे म्हणजे $\frac{1}{8}$ पेक्षांहि कमी आहेत. तेव्हां इंग्रजी भाषेवर ग्रीकचा पगडा विशेष नाहीं हें स्पष्टच आहे.

**ग्रीक वाङ्मय**—ग्रीक ग्रंथकारांनीं लिहिलेलें वाङ्मय हें जगांतील ग्रंथकारांस आदर्शवत् असून त्या वाङ्मयापासून प्रत्येक युगांतील व प्रत्येक राष्ट्रांतील अनेक ग्रंथकारांनीं स्फूर्ति घेतलेली आहे. ग्रीक भाषेंतील काव्यें गानसुलभ असून त्यांची रचना उत्कृष्ट प्रतीची असते. ग्रीक भाषेंतील निबंध उच्च दर्जाचे असून ते विचारप्रवर्तक व उत्कृष्ट भाषाशैलींत लिहिलेले आढळतात. तसेंच ग्रीक लोकांची वक्तृत्वकला उदात्त व परिणामकारक असे. ग्रीक भाषेंतील उत्कृष्ट महाकाव्य जें होमरचें इलियड त्याचा प्रत्येक विद्यालयांत अभ्यास होत असतो व जेथें जेथें ग्रीक भाषेचा अद्यापि अभ्यास चालू आहे त्या त्या देशांतील ग्रंथकारांवर या काव्याचा परिणाम झालेला दृग्गोचर होतो. या काव्यांतील अनेक प्रसंगांचा वरचेवर उल्लेख करण्यांत येतो व त्यांतील गोष्टींचा वरचेवर उपमा देण्याच्या कामीं उपयोग करण्यांत येतो; तसेंच त्यांतील अनेक अवतरणेंहि घेतलेलीं आपणांस सर्वत्र दृष्टीस पडतात. अनेक ग्रंथांचें वाचन आपणांस इलियडचें ज्ञान नसेल तर दुर्बोध वाटल्याशिवाय राहत नाहीं.

ग्रीक वीणाकाव्यांचा संगीताशीं विशेष संबंध असे; एवढेंच नव्हे तर बहुतेक ग्रीक वीणाकाव्यें हीं गीतेंच आहेत. ग्रीक काव्यामध्यें अनेक निरनिराळ्या प्रकारचीं वृत्तें वापरण्यांत येत असत व त्यांचें स्वरूपहि विविध प्रकारचें असे. त्यांतील कांहीं प्रकारांचें अद्यापहि अनुकरण केलेलें आपल्या दृष्टीस पडतें. ग्रीक

भाषेंत जे इतिहासग्रंथ लिहिले गेले, विशेषतः हिरोडोटस, थुसिडाइडिस, आणि झेनोफन यांनीं जे इतिहास लिहिले, त्यांच्या योगानेंच आपणांस तत्कालीन लोकांबद्दल माहिती मिळते. तत्त्वज्ञानाच्या बाबतींत ग्रीक ग्रंथांची बरोबरी दुसऱ्या कोणत्याहि पाश्चात्य भाषांतील ग्रंथ करूं शकणार नाहींत. तत्कालीन प्रसिद्ध तत्त्ववेत्त्यांची त्रयी—सॉक्रेटीस, प्लेटो आणि आरिस्टॉटल, यांनीं जे विचार प्रदर्शित केले आहेत त्यांचेंच उपबृंहण म्हणजे आजपर्यंतचा पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा इतिहास होय. ग्रीक लोक वक्तृत्वामध्यें फार प्रवीण असत व त्या कालीं वक्तृत्वाची फार आवश्यकताहि असे. तत्कालीन वक्त्यांच्या वक्तृत्वाचा जनतेवर होणारा परिणाम जर आपण पाहिला तर या वक्त्यांस सर्वोत्कृष्ट असें म्हटल्याशिवाय आपण राहणार नाहीं. ग्रीक वक्त्यांचीं भाषणें आज अनेक भाषांत भाषांतरित झालेलीं आहेत. व तीं अद्यापिहि नवीन नवीन वक्त्यांस आदर्शभूत अशीं वाटतात व डेमॉस्थेनीस यास आजहि जगांतील उत्कृष्ट वक्ता व वक्तृत्वाचा आचार्य म्हणून मान देण्यांत येतो. तथापि ग्रीक वाङ्मयांतील इलियड हें काव्य वगळलें तर ग्रीक वाङ्मयांतील उत्कृष्ट भाग म्हटला म्हणजे त्यांतील नाटकें होत. सुखान्त व दुःखान्त या दोन्ही प्रकारच्या नाटकांचा जन्म ग्रीस देशांत झालेला आहे. त्या वेळीं हे नाट्यप्रयोग कामदेवाच्या उत्सवप्रसंगीं होत असत. त्या वेळीं अथेन्स शहरांत जीं नाटकें होत तीं सौंदर्य, सामर्थ्य आणि भावना या बाबतींत आजहि जगांतील कोणत्याहि नाटकांस हार जाणार नाहींत, इतक्या उच्च दर्जाचीं असत. या वेळच्या नाटककारांमध्यें सुखान्त नाटकांच्या कर्त्यांत आरिस्टोफेनीझ हा प्रसिद्ध होता आणि शोकान्त नाटककारांमध्यें सोफोक्लीज, युरिपिडीस, आणि एश्चिलस हे प्रसिद्ध होते.

**ग्रीन, जॉन रिचर्ड** (१८३७–१८८३)—हा सुप्रसिद्ध इंग्रज इतिहासकार ऑक्सफोर्ड येथील एका व्यापाऱ्याचा मुलगा होता. मॅग्डेलन कॉलेज स्कूल व जीझस कॉलेज यांमध्यें त्याचा अभ्यास झाला. इतिहास हा त्याचा आवडता विषय होता; व त्यानें त्याचा काळजीपूर्वक अभ्यास करण्यास सुरुवात केली होती. १८६८ मध्यें त्यानें लॅंबेथ येथें ग्रंथपालाची जागा पत्करली. १८७४ मध्यें त्यानें 'शॉर्ट हिस्टरी ऑफ दि इंग्लिश पीपल' हें छोटेखानी पुस्तक लिहिलें. हें अतिशय लोकप्रिय झाल्यामुळें ग्रीननें यामध्यें बरीच माहिती घालून त्या पुस्तकाचे चार मोठे ग्रंथ केले. याशिवाय १८८२ मध्यें 'दि मेकिंग ऑफ इंग्लंड' व १८८३ मध्यें 'दि कॉंकेस्ट ऑफ इंग्लंड' हे महत्त्वाचे ग्रंथ त्यानें प्रसिद्ध केले.

**ग्रीन, थॉमस हिल** (१८३६–१८८२)—एक इंग्रज तत्त्वज्ञानी लेखक. याचें एका पुस्तकाशिवाय सर्व लिखाण नियतकालिकांतून प्रसिद्ध झालें आहे. 'प्रोलेगोमेना टु एथिक्स' हें पुस्तक त्याच्या मरणानंतर प्रसिद्ध झालें. तो 'एंपिरिकल' (अनुभवमूलक) संप्रदायाचा कट्टा विरोधी असून त्यानें आत्मतत्त्व हेंच सृष्टीच्या बुडाशीं आहे, असें सिद्ध केलें होतें.

**ग्रीन, रॉबर्ट** (१५६०–१५९२)—एक इंग्रज नाटककार. त्याचें शिक्षण केंब्रिज येथील सेंट जॉन्स कॉलेजमध्यें झालें, व तो एम्. ए. परीक्षा उत्तीर्ण झाला. पण पुढें त्यानें आपलें आयुष्य उनाडपणांत आणि व्यसनांत घालवलें आणि त्यामुळें त्याला अत्यंत गरीब स्थितींत अकालीं मरण आलें. त्यानें नाटकें, कविता, लघुकथा आणि निबंध लिहिले. त्याचीं अद्भुत रसात्मक नाटकें आहेत तीं—'पॅंडोस्टो' (१५८६, या नाटकावरून शेक्सपिअरनें आपल्या 'दि विन्टर्स टेल' या नाटकाचें कथानक रचलें) आणि मेनॅफोन (१५८७). त्याचीं नाटकें सुप्रसिद्ध आहेत तीं :—'*ऑल्फॉन्सस, किंग ऑफ ॲरॅगॉन*'; 'ऑर्लॅंडो फ्युरीओसो'; 'दि ऑनरेबल हिस्टरी ऑफ फ्रायर बेकन ॲन्ड फ्रायर बुंगे'; आणि 'दि स्कॉटिश हिस्टरी ऑफ जेम्स दि फोर्थ.' हें शेवटलें नाटक नाटकाच्या नांवावरून चुकीची समजूत करणारें आहे; कारण हें ऐतिहासिक नाटक नसून एका दंतकथेवरून रचलेलें नाटक आहे. ग्रीन हा उच्च दर्जाचा नाटककार नाहीं, पण त्यानें आपल्या पात्रांचा स्वभावपरिपोष बरा केला आहे. व कथानकेंहि बरीं रचलीं आहेत.

**ग्रीनलँड**—ऑस्ट्रेलियाच्या खालोखाल जगांतलें विस्तारानें दुसरें मोठें बेट हेंच आहे. हें अगदीं दक्षिण बाजूचा केपफेअर वेल पासचा भाग सोडून, आर्क्टिक विभागांत आहे. हें डेन्मार्कच्या मालकीचें आहे. येथील लोक म्हणजे एस्किमो होत. याचें क्षेत्रफळ ७,३६,५१८ चौरस मैल आहे. लो. सं. १८,४३१. वस्ती फक्त पश्चिम व दक्षिण किनाऱ्यावर आहे. अंतर्भाग डोंगराळ असून त्यांतील डोंगर बर्फमय आहेत. व्हेल व कॉड मासे हे येथील व्यापाराचे मुख्य पदार्थ असून तो धंदा सरकारमालकीचा आहे. वर्षांतून कांहीं महिने सोडून हवा अत्यंत थंड असते.

याचा शोध १० व्या शतकांत लागला. १४०० च्या सुमारास त्या वेळपावेतों झालेल्या वसाहती प्रखर थंडी पडून नाहींशा झाल्या. १९ व्या व २० व्या शतकांत मध्यभागाचें संशोधन करण्याचे कांहीं प्रयत्न झाले. १९४१ सालीं या बेटाच्या संरक्षणासाठीं बिनतारी केंद्रें, विमानतळ, इ. साठीं लागेल ती जमीन ताब्यांत ठेवण्याचा हक्क अमेरिकन संयुक्त संस्थानांकडे डेन्मार्कनें दिला.

**ग्रीनलंड गारे**—( क्रायोलाइट ). हें एक करड्या पांढऱ्या रंगाचें किंवा पिवळट पिंगट रंगाचें खनिज असून स्फट ( ॲल्युमिनियम ) आणि सैंधव (सोडियम) यांचें प्लविद ( फ्लुओराइड ) आहे. हें ग्रीनलंड आणि उरल पर्वतांत आढळतें. ॲल्युमिनम धातु काढण्याच्या कामीं आणि अपारदर्शक चिनीमातीसारख्या कांचेच्या वस्तू बनविण्याच्या कामीं या द्रव्याचा उपयोग करण्यांत येतो.

**ग्रीनॉक**—हें शहर व बंदर स्कॉटलंडमध्यें ग्लासगोच्या वायव्येस २० मैलांवर आहे. या शहरात अनेक प्रसिद्ध इमारती आहेत. येथें ऊंस व बीट यांपासून साखर करण्याचे कारखाने, जहाजें बांधण्याचे कारखाने, लोखंडाच्या ओतकामाच्या भट्ट्या, रासायनिक द्रव्यें तयार करण्याचे कारखाने, लोंकरीच्या व कागदाच्या गिरण्या, धान्य दळण्याच्या आणि लांकूड कापण्याच्या गिरण्या, तागाचे गोण व दोरखंडें तयार करण्याचे कारखाने, वगैरे उद्योगधंदे आहेत. येथून ईस्ट ॲन्ड वेस्ट इंडीज, अमेरिका व ऑस्ट्रेलिया यांच्याबरोबर व्यापार चालतो. येथील गोद्या फार मोठाल्या असल्यामुळें अतिशय मोठ्या बोटी येथें येऊं शकतात. लो. सं. सुमारें ८०,०००

**ग्रीनिच**— इंग्लंड देशांतील लंडनच्या आग्नेयीकडील मुख्य बरो. ग्रीनिचच्या फार महत्त्वाच्या इमारती म्हणजे इस्पितळ व वेधशाळा होत. ग्रीनिच इस्पितळ हे नांव अद्यापि कायम असून १८७३ त येथें रॉयल नेव्हल कॉलेज स्थापन झालें. इस्पितळाच्या दक्षिणेस ग्रीनिच पार्क आहे. यांत प्रसिद्ध राजवेधशाळा आहे. हिची स्थापना इ. स. १६६५ त नौकानयन व नाविक ज्योतिष या शास्त्रांची प्रगति व्हावी या हेतूनें केली. देशांतील प्रमुख शहरांत दररोज एक वाजतां येथून विद्युत्-संदेशानें बरोबर वेळ कळविण्यांत येते. ग्रीनिचच्या याम्योत्तर रेषेपासून बहुतेक ठिकाणीं रेखावृत्तें मोजण्याची पद्धत चालू आहे.

**ग्रीले, होरेस** ( १८११–१८७२ )— एक अमेरिकन वृत्तपत्रकार आणि राजकारणी इसम. त्यानें १८३४ मध्यें 'दि वीकली न्यू यॉर्कर' या नांवाचें साप्ताहिक सुरू केलें; तें सात वर्षें चालू होतें. त्याचें दुसरें साप्ताहिक 'लॉग केबिन' १८४० मध्यें निघालें. त्याचा खप ८०,००० होऊं लागला. त्यामुळें त्याची फार प्रसिद्धि झाली. नंतर त्यानें १८४१ मध्यें 'डेली ट्रिब्यून' हें दैनिक सुरू केलें, व त्या दैनिकाचा तो मरेपर्यंत संपादक होता. १८७२ मध्यें संस्थानच्या अध्यक्षाच्या जागेकरितां जनरल ग्रँटला विरोधी उमेदवार म्हणून ग्रीले निवडणुकींत उभा होता. परंतु निवडून आला नाहीं. त्यानें कांहीं ग्रंथहि केले आहेत.

सु. वि. भा. २–३४

**ग्रीस**—युरोप खंडांतील बाल्कन समुद्रांतील अगदीं दक्षिणेकडील देश. अल्बेनिया, युगोस्लाव्हिया, बल्गेरिया, व तुर्कस्तान यांच्या सरहद्दी याच्या उत्तर सरहद्दीशीं भिडल्या असून बाकी सर्व बाजूंनीं याला समुद्रकिनारा आहे. मुख्य भाग व बरींचशीं बेटें मिळून हा देश झाला असून याचें क्षेत्रफळ ५०,२५० चौ. मै.

ग्रीक लोक ( राष्ट्रीय पोषाखांत )

आहे. लो. सं. ( १९३९ ) ७१,०८,८१४. राजधानी अथेन्स आहे. ऐतिहासिक कालीन ग्रीसचा भाग मध्य व दक्षिण भागीं आहे व बाकीचा विस्तार नवीन आहे; किनारा दंतुर असून त्यावर बरींच बंदरें आहेत. सर्व देश डोंगराळ आहे. तथापि दऱ्याखोऱ्यांतून अत्यंत सुपीक जमीनहि बरीच आहे. मका, गहूं, ऑलीव्ह, वगैरेचें चांगलें पीक होतें. व खनिज संपत्तिहि बरीच आहे. अथेन्समध्यें दोन विद्यापीठें आहेत. सनातनी धर्माचे वीस मठ ॲथॉस पर्वतावर आहेत.

पूर्वकालीन अनेक सुधारणांचें ग्रीस हें माहेरघर म्हणून प्रसिद्ध आहे. त्या वेळचे लोक बुद्धिमान् व कलानिपुण होते. स्वतंत्र शहरांशहरांचीं अनेक राज्यें होतीं. इ. स. पूर्वी २-२॥ हजार वर्षांहून अधिक काळापासून या देशानें अनेक राज्यें-साम्राज्ये व युद्धें पाहिलीं असून अनेक स्थित्यंतरें भोगलीं आहेत. इ. स. च्या १५ व्या शतकांत तुर्कस्ताननें हा देश आपल्या वर्चस्वाखालीं आणला. तो १९ व्या शतकापर्यंत तसाच होता. १८२१ मध्यें तुर्कांविरुद्ध बंड सुरू झालें. इंग्रजांच्या व फ्रेंचांच्या साह्यानें १८३० मध्यें स्वतंत्र संस्थान झालें. पहिल्या महायुद्धानंतर याला बराच नवा मुलूख मिळाला. दुसऱ्या महायुद्धांत १९४१ सालीं जर्मन सैन्यानें ग्रीस जिंकून घेतला; तो १९४४ सालीं दोस्तांनीं जिंकून परत मिळविला. ग्रीसचें राजघराणें १९२४–१९३५ या काळांत अधिकारावर नसून लोकशाहीचा कारभार सुरू झाला होता. पण पुन्हां बहुमतानें राजसत्ता लोकांनीं स्वीकारली. १९४४ नंतर पुन्हां लोकशाहीकडे मत झुकलें.

**ग्रंडी, सिडने** (१८४८–१९१४)—हा एक इंग्रज नाटककार असून त्याच्या पुष्कळ नाटकांपैकीं विशेष प्रसिद्ध आहेत तीं—'ए फूल्स पॅरडाइज्' ( १८९० ), 'सोईंग दि विंड' ( १८९३ ),

'दि डीजनरेट्स' (१८९९), 'बिझिनेस इज बिझिनेस' (१९०५), 'ए फिअरफुल जॉय' (१९०८), इत्यादि. त्याचीं वरींच नाटकें मूळ फ्रेंच नाटकांचें कुशलपणानें केलेलें रूपांतर, अशा प्रकारचीं आहेत.

**ग्रूव्ह, सर विल्यम् रॉबर्ट** (१८११-१८९६)—एक इंग्रज कायदेपंडित व शास्त्रज्ञ. ऑक्सफोर्ड येथें सन १८३२ मध्यें साधी पदवी घेतली व तीन वर्षांनीं त्यानें आपला वकिलीचा धंदा सुरू केला. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्याला कांहीं काळ स्वस्थ बसावें लागलें. या रिकाम्या काळांत त्यानें भौतिक शास्त्राचा अभ्यास करून त्यांत प्रावीण्य मिळविलें. सन १८३९ च्या सुमारास झिंकप्लाटिनमची विद्युद्धटमाला त्यानें शोधून काढली. हिला 'ग्रूव्हची बॅटरी' असें नांव देण्यांत आलें. याचा असा परिणाम झाला कीं, त्याला प्रायोगिक तत्त्वज्ञानाचा प्रोफेसर नेमण्यांत आलें व त्यानें सुमारें सात वर्षेपर्यंत अध्यापकाचें काम केलें. विद्युद्रसायनशास्त्र आणि विद्युन्मालिका यांवर त्यानें पुष्कळ परिश्रम केले आहेत व त्यांत त्यानें कांहीं शोधहि लावले आहेत. सन १८४६ मध्यें त्यानें शक्तिनित्यत्वाचा सिद्धान्त प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. याच वर्षी त्याला रॉयल सोसायटीकडून 'रॉयल मेडल' नांवाचें पदक बक्षीस मिळालें.

**ग्रे, आसा** (१८१०-१८८८)— एक अमेरिकन वनस्पतिशास्त्रज्ञ. हा एकतीस वर्षें हार्वर्ड विद्यापीठांत सृष्टिविज्ञानाचा प्राध्यापक होता. यानें वनस्पतिशास्त्रावर उत्कृष्ट ग्रंथ लिहिले आहेत. डार्विनच्या विकासवादाचा हा अमेरिकेंतील पहिला पुरस्कर्ता होय.

**ग्रे, एलिशा** (१८३५-१९०१)— एक अमेरिकन विद्युच्छास्त्रज्ञ. बालवयांत यानें सुताराच्या दुकानांत काम करून पदार्थविज्ञानशास्त्राचा अभ्यास केला; १८६७ त तारायंत्रोपयुक्त अशीं दोन उपकरणें तयार करून त्यांचीं पेटंटें घेतलीं. नंतर टेलिफोन यंत्राविषयीं बरेच परिश्रम करून एक यंत्र तयार केलें व त्याचें पेटंट मिळविण्याकरितां कोर्टाकडे योग्य प्रकारें अर्ज केला. पण त्याचा अर्ज नामंजूर झाला. परंतु ग्रे यानें हें यंत्र बसविण्याकरितां जे श्रम केले व जी बुद्धिमत्ता दाखविली ती सारी लक्षांत घेऊन १८७८ सालीं पॅरिसच्या प्रदर्शनांत शास्त्रज्ञांनीं 'लीजन ऑफ ऑनर' ही पदवी त्याला अर्पण केली. पुढें विद्युच्छास्त्रज्ञांची जी एक परिषद भरविण्यांत आली तिच्या अध्यक्षत्वाचा मान याला देण्यात आला. एकाच तारेंतून अनेक संदेश पाठविण्याची युक्ति त्यानेंच शोधून काढली. हस्तलेखवाहक यंत्रहि त्यानेंच शोधून काढलें. याशिवाय समुद्राच्या तळीं तारायंत्रानें घंटा वाजवून संदेश किंवा सांकेतिक माहिती पाठविण्याविषयीं त्यानें प्रयोग केले होते.

**ग्रे, थॉमस** (१७१६-१७७१)—एक इंग्रज कवि. याचें बालपण व शिक्षण याच्या आईच्या देखरेखीखालीं ईटन व केंब्रिज येथें झालें. याचें 'एलेजी' (शोकगीत) हें काव्य प्रसिद्ध आहे. याची कविता फारशी मोठी नाहीं व आहे तीहि स्वयंस्फूर्त नसून दुसऱ्या कवींच्याच काव्यांतील भाषा उचलून एकत्र गोंवून केलेली आहे. तथापि याला राजकवीचा मान देऊं केला होता, पण तो यानें नाकारला. यास अद्भुतरम्य काव्याच्या प्रभातकालचा कवि समजतात.

**ग्रेगरी**—या नांवाचे १३ पोप होऊन गेले. त्यांपैकीं विशेष प्रसिद्ध पोपांची माहिती पुढें दिली आहे :—

१ ला ग्रेगरी दि ग्रेट (५४०-६०४)-५९० मध्यें पेलॅगस पोप मरण पावल्यावर हा पोपच्या गादीसाठीं निवडला गेला. पाखंडी लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्याविषयीं याला फार कळकळ असल्यामुळें सिसिली, सार्डीनिया, लॉंबर्डी, इंग्लंड, वगैरे ठिकाणीं मिशनरी पाठवले. तसेंच ख्रिस्ती पाद्री मंडळींच्या ब्रह्मचर्य-पालनाबद्दल त्यानें फार कडक शिस्त अमलांत आणली. त्यानें पुष्कळ ग्रंथ लिहिले असें म्हणतात.

७ वा ग्रेगरी (१०२०-१०८५)— १०७३ मध्यें २ रा अॅलेक्झांडर पोप मरण पावल्यावर याला पोपची गादी मिळाली. धार्मिक आणि राजकीय अशा संयुक्त अधिकाराचें पोपचें साम्राज्य सर्व युरोपावर स्थापावे असा त्याचा मुख्य हेतु होता. म्हणून त्यानें उपाध्याय वृत्तीची खरेदी-विक्री करणें आणि त्यांनीं विवाह करणें, यांना बंदी करणारें आज्ञापत्र काढलें (१०७४); आणि प्रीस्ट (उपाध्यक्ष) वगैरे अधिकाऱ्यांना दीक्षा धर्माधिकाऱ्यांखेरीज इतरांनीं देण्यास बंदी केली. पोप ग्रेगरीचें 'ल इन्व्हेस्टिचर'बद्दलचें आज्ञापत्र मानण्याचें बादशहा ४ था हेन्री यानें नाकारलें, आणि वर्म्स येथें कौन्सिलची बैठक भरली. तेथें या पोपला पदच्युत करण्याची शिक्षा करण्याचा ठराव मंजूर करून घेतला. उलट पोपनेंहि हेन्रीला ख्रिस्तीसमाजबहिष्कृत केल्याचें जाहीर केलें. हा बहिष्कार हेन्रीला जाणवूं लागून तो अडचणींत सांपडला, तेव्हां हेन्री स्वतः इटलींत गेला, आणि पोपला अगदीं शरण जाऊन प्रायश्चित्त घेतलें. तथापि पोपचा सूड उगविण्यासाठीं त्यानें १०८० मध्यें ब्रिक्सनच्या कौन्सिलकडून पोप ग्रेगरीला पदच्युत करून तुरुंगांत टाकलें. तीन वर्षांनीं त्याची सुटका झाली, तरी बंदिवान् अवस्थेंत उरलेलें आयुष्य कंठावें लागलें.

१३ वा ग्रेगरी (१५०२-१६८५)—हा ५ वा पायस याच्यानंतर १५७२ सालीं पोपच्या गादीसाठीं निवडला गेला. सेंट

बार्थोलोमो येथें झालेल्या कत्तलीबद्दल जाहीर आभारप्रदर्शन करण्याला त्यानें लॉरेनच्या कार्डीनलला परवानगी दिली; एलिझाबेथ राणीविरुद्ध झालेल्या कटांना उत्तेजन दिलें, आणि २ ऱ्या फिलिप राजाला इंग्लंडवर स्वारी करण्यास प्रवृत्त केलें.

**ग्रेगरी, जॉन** ( १७२४–१७७३ )—हा स्कॉटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ एडिन्बर्ग येथें पदार्थविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर होता. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते :–'एलेमेन्ट्स ऑफ दि प्रॅक्टिस ऑफ फिझिक' (पदार्थविज्ञान प्रयोगाचीं मूलतत्त्वें) आणि 'ए फादर्स लेगसी टु हिज डॉटर्स' (एका बापाचा आपल्या मुलींना वारसा.)

**ग्रेगरी, जेम्स** ( १६३८–१६७५ )—एक स्कॉटिश गणितशास्त्रज्ञ, आणि परावर्तक दूरदर्शक यंत्राचा (रिफ्लेक्टिंग टेलेस्कोपचा) आद्यजनक. त्यानें 'ऑप्टीका प्रमोटा' हें पुस्तक १६६३ मध्यें प्रसिद्ध केलें. त्या पुस्तकांत त्यानें टेलेस्कोपची कल्पना सविस्तर समजावून सांगितली आहे. १६६७ मध्यें त्यानें आपला 'क्वाड्रेचर ऑफ दि सर्कल अँन्ड हायपरबोला' (वर्तुलचतुर्थांश आणि अतिपरवलय) या नांवाचा निबंध प्रसिद्ध केला. तो सेंट अँड्रूज येथें १६६८ मध्यें आणि एडिन्बर्ग येथें १६७४ मध्यें गणितशास्त्राचा प्रोफेसर झाला.

**ग्रेटनाग्रीन**—हें खेडें स्कॉटलंड देशांत डंफ्रिसशायर परगण्यांत आहे. ह्या गांवावरून इंग्लंड व स्कॉटलंड देश विभागणारी रेषा जाते. इंग्लंडच्या बाहेर स्कॉटलंडमधील सर्वांत जवळचें हें खेडें असल्यामुळें ज्यांच्या लग्नास आईबापांची अथवा पालकांची संमति मिळाली नसेल अशीं पुष्कळशीं विवाहेच्छू इंग्रज जोडपीं पळून येथें येत. तेथें फार थोड्या खर्चांत बहुधा एखादा लोहार किंवा खानावळवाला त्यांचें लग्न लावीत असे. इ. स. १८५६ पासून इंग्लंडनें लग्न लावण्यास तयार असलेल्या वधूवरांपैकीं कोणीतरी एक लग्नापूर्वी तीन आठवडे स्कॉटलंडांत असल्याचा दाखला पाहिजे, असा कायदा केल्यामुळें अशीं चोरटीं लग्नें कमी होऊं लागलीं.

**ग्रेट–ब्रिटन**—युरोपमधील एक प्रसिद्ध राष्ट्र. इंग्लंड, स्कॉटलंड व वेल्स या तीन देशांचें मिळून ग्रेट-ब्रिटन हें एक मोठें बेट बनलें आहे. ग्रेट–ब्रिटन या नांवाचा उपयोग १६०३ सालीं पहिल्यानें पहिला जेम्स यानें स्वतःला 'ग्रेट-ब्रिटनचा राजा' म्हणवून घेऊन केला. इंग्लंड व स्कॉटलंड हीं पूर्वी अलग अलग होतीं. १६०३ पासून हे दोन्ही देश ग्रेट-ब्रिटन या नांवानें एकत्र करण्यांत आले. वेल्स हें १५३६ पासूनच इंग्लंडला जोडलेलें आहे. ग्रेट-ब्रिटनचें एकंदर क्षेत्रफळ ८८,७४५ चौ. मै. व लो. सं. (१९३१) ४,४९,३७,४४४. पृथ्वीवरील भू-भागाच्या अगदीं मध्यभागीं ग्रेट-ब्रिटन असून लंडन हें पृथ्वीवरच्या सर्वांत मोठ्या साम्राज्याचें भौगोलिक आणि राजकीय केंद्रस्थान आहे. (इंग्लंड, स्कॉटलंड, व वेल्स पाहा.)

**ग्रेट लेक्स**—ही गोड्या पाण्याच्या मोठाल्या सरोवरांची मालिका उत्तर अमेरिकेंत असून या मालिकेंत सुपीरियर, मिचिगन, हूरन, एरी, आणि ऑंटारियो हीं पांच सरोवरें आहेत. यांचा एकंदर जलमय प्रदेश ९४,१०० चौ. मैल आहे; आणि तीं एकमेकांना आणि सेंट लॉरेन्स नदीला कालव्यांनीं जोडलेलीं आहेत.

**ग्रेट लेबानॉन**—हें संस्थान १९२० सालीं स्वतंत्र अस्तित्वांत आलें. याच्या उत्तरेस नहरेल-चेबिन, दक्षिणेस पॅलेस्टाइन, पश्चिमेस भूमध्यसमुद्र आणि पूर्वेस अँटी–लेबानॉनचा उंचवट्याचा प्रदेश आहे. राष्ट्रसंघा( लीग ऑफ नेशन्स)नें याच्यावर वर्चस्व (मँडेट) फ्रान्सचें ठेवलें होतें. पण १९२६ मध्यें या संस्थाननें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर जर्मनांनीं या प्रदेशांत कारवाया सुरू केल्या, म्हणून दोस्तांच्या फौजेनें या प्रदेशावर चाल केली, आणि फ्रेंच व ब्रिटिश वर्चस्व तेथें स्थापन केलें. १९४३ मध्यें उभय पक्षांच्या प्रतिनिधींनीं तह करून सीरिया व लेबानॉन यांना बहुतेक स्वराज्याचे अधिकार देण्यांत आले, व नाममात्र ब्रिटिश सत्ता राहिली आहे. लो. सं. १०,४७,७४५ आहे. पैकीं ४३४,७०५ मुस्लिम आहेत. बेरूट, ट्रिपोली, टायर व सिडॉन हीं बंदरें या प्रदेशांत आहेत. शाळा— १४९ मुस्लिम, ८११ ख्रिस्ती, २७३ फ्रेंच, १४ ब्रिटिश, वगैरे— आहेत. बेरूट येथें एक फ्रेंच युनिव्हर्सिटी (स्थापना १८७५) आणि दुसरी अमेरिकन युनिव्हर्सिटी आहे.

आतां नवीन ज्यू राष्ट्र याजवळ निर्माण झाल्यामुळें वर्चस्वाचे प्रश्न गुंतागुंतीचे होणार आहेत.

**ग्रेनफेल, विल्फ्रिड थॉमसन** ( १८६५–१९४० )—एक ब्रिटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ आणि शस्त्रक्रियाप्रवीण मिशनरी. यानें उत्तर समुद्रांतील मच्छीमारी ( नॉर्थ सी फिशरीज् ) करीत पहिलें हॉस्पिटल् शिप् ( रुग्णनौका ) सज्ज करून दिलें. आणि 'डीप सी फिशरमेन' ( खोल समुद्रांतील कोळी लोक ) यांच्याकडे पाठविण्याच्या मिशनबाबत फार महत्त्वाची कामगिरी केली. नंतर १८९२ मध्यें तो लॅब्राडोर येथें गेला. आणि तेथें मिशनरीचें, औषधोपचाराचें आणि संशोधनाचें कार्य करीत राहिला. त्यानें बरेच ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. १९२७ सालीं याला 'सर' हा किताब मिळाला. लॅब्राडोरमध्यें अनेक वर्षे केलेल्या कामासंबंधीं याचे बरेच ग्रंथ आहेत.

**ग्रेनाडा**—ब्रिटिश वेस्ट इंडीजपैकीं विंडवर्ड बेटांतील अगदीं दक्षिणेकडचें बेट. हें बेट अंडाकृति असून याची लांबी २१ मैल, रुंदी १२ मैल व क्षेत्रफळ १३३ चौरस मैल आहे. लो. सं.

( १९४४ ) ८८,०१६. हें ज्वालामुखी पर्वतापासून बनलेलें बेट आहे. बेटाच्या मध्यभागीं ग्रँड एटँग नांवाचें एक सरोवर ज्वालामुखी पर्वताच्या मुखाशीं आहे. अँटाइन नांवाचें दुसरें सरोवर ईशान्येस आहे. हवा चांगली आहे व पाऊस सुमारें २०० इंच पडतो. जमीन अतिशय सुपीक असून कोको व मसाले मुख्यत्वेंकरून तयार होतात. कोको, मसाले, लोंकर, कापूस, कॉफी, गुरेंढोरें, इमारतीचें लांकूड, वगैरे मालाची परदेशांत, बहुतकरून ग्रेट-ब्रिटनमध्यें निर्यात होते. येथें साखरहि तयार करितात.

कोलंबसानें हें बेट १४९८ त शोधून काढलें. व त्याला कन्सेप्शन हें नांव दिलें. १६५० त फ्रेंचांनीं हें बेट विकत घेतलें व कॅरिब लोकांचा नायनाट केला. १७६२ त ब्रिटिशांनीं हें बेट घेतलें. १७७९ त पुनः फ्रेंचांनीं हें बेट परत घेतलें. परंतु व्हर्सायच्या तहानें ( १७८३ ) तें ब्रिटिशांना पुनः परत मिळालें.

**ग्रेस, विल्यम गिल्बर्ट** ( १८४८-१९१५ )—एक इंग्रज क्रिकेटपटु. यानें १८६४ मध्यें सरे परगण्यांत एका मोठ्या क्रिकेट मॅचमध्यें प्रथम प्रवेश मिळवला, आणि नंतर १८७० ते १९०० पर्यंत तो ग्लुस्टरशायर कौन्टी संघामधून दरसाल खेळत असे. १८९९ पासून तो लंडन कौन्टी क्रिकेट क्लबचा सेक्रेटरी आणि जनरल मॅनेजर झाला. क्रिकेटमध्यें त्यानें धांवा काढण्यांत उच्च नैपुण्य प्रकट केलें असलें, तथापि क्रिकेट खेळांतील सर्व बाजूंत तो प्रवीण होता. त्यानें क्रिकेटविषयक पुस्तकेंहि लिहिलीं आहेत.

**ग्रोट, जॉर्ज** ( १७९४-१८७१ )— एक इंग्रज इतिहासकार. त्याचें लहानपणचें शिक्षण घरीं आईनेंच केलें. १८१० सालीं बापानें त्याला एका पेढीवर नोकर ठेविलें. ही नोकरी करीत असतांनाच त्यानें अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, इतिहास व तसेंच ग्रीक, लॅटिन, फ्रेंच व जर्मन भाषांचें ज्ञान मिळविलें. लंडनचें पहिलें विश्वविद्यालय स्थापन करण्यांत त्यानें बरेच श्रम घेतले.

१८३२ सालीं तो पार्लमेंटचा सभासद झाला. १८४६ पासून १८५६ पर्यंत ग्रीस देशाचा इतिहास त्यानें १२ भागांत लिहून प्रसिद्ध केला. ग्रोट हा प्रामाणिक, आत्मसंयमी, विचारी व सहनशील होता. तत्त्वज्ञानावर कांहीं ग्रंथ लिहीत असतांनाच तो मरण पावला.

**ग्लॅगोलिटिक**—ही स्लाव्ह लोकांची लिपि असून तिचा जन्म इतर बहुतेक युरोपीय लिपींप्रमाणें पश्चिम ग्रीक लिपीपासूनच झाला होता. हिची जागा अंशतः हिच्याहून सर्व प्रकारें श्रेष्ठ असलेल्या सिरिलिक लिपीनें घेतली आहे. ग्लॅगोलिटिक हें नांव 'शब्द' या अर्थाच्या एका बल्गेरियन संज्ञेपासून पडलें आहे; म्हणजे या लिपीचें नांव बल्गेरियन आहे. स्लाव्ह दंतकथेप्रमाणें हिची उत्पत्ति इ. स. च्या ४ थ्या शतकाइतकी जुनी आहे. ही लिपि स्लाव्हेनियन, इलीरियन ( अल्बेनियाच्या उत्तर भागाचें पुरातन नांव ), क्रोएशियन व दुसरे पश्चिम स्लाव्ह लोक यांच्यामध्यें प्रार्थना लिहिण्याकरितां आरंभीं प्रचलित होती. हिचीं अक्षरें पुढें सिरिलिक लिपीमध्यें अंतर्भूत करून घेण्यांत आलीं. इतकेंच नव्हे, तर अक्षरांचीं नांवेंसुद्धां दोन्ही लिपींत एकच आहेत. ग्लॅगोलिटिक लिपीची जागा आतां बहुतेक रोमन लिपीनें घेतली आहे. ही क्रोआशिया व क्वार्नेरो बेटांत १७ व्या शतकापर्यंत प्रचलित होती. हिची उत्पत्ति प्राचीन मोडी ग्रीक लिपीपासून झालेली दिसते. तथापि याबद्दल विद्वानांत अद्यापि बराच मतभेद आहे. कांहीं रशियन अक्षरांची उत्पत्तिहि या लिपींतील अक्षरांपासून दाखवितां येते.

**ग्लटन**—हा एक ऊद किंवा मांजर यांच्या जातीचा मांसाहारी चतुष्पाद प्राणी आहे. हा उत्तर युरोप व अमेरिका यांमध्यें आढळतो. हा हळू चालणारा, भयंकर व धूर्त असून फार बळकट असतो. याची लोंकर व चामडें बहुमोल असतें.

**ग्लॅडस्टन, जॉन हॉल** ( १८२७-१९०२ )— एक इंग्रज रसायनशास्त्रज्ञ. लहानपणापासून त्याला शास्त्रीय विषयांची आवड होती. त्याला १८४७ त पीएच्. डी. ची पदवी मिळाली. १८५० त तो सेंट थॉमसच्या दवाखान्यांत रसायन-शास्त्राचा अध्यापक झाला व वयाच्या २६ व्या वर्षींच रॉयल सोसायटीचा सभासद ( फेलो ) झाला. इ. स. १८६४ ते १८६८ पर्यंत युद्धमंडळांत स्फोटक कापसासंबंधीं ( गनकॉटन ) काम केलें. पुढे याला पदार्थविज्ञानशास्त्र व रसायनशास्त्र या मंडळांचा अध्यक्ष निवडलें. १८९७ त त्याला डेव्ही पदक मिळालें. पदार्थविज्ञानशास्त्र व रसायनशास्त्र यांतील बरेच कठिण शोध त्यानें लाविले. त्यानें कित्येक पदार्थांचे प्रकाशगुणक ठरविले व एकाच पदार्थाला निरनिराळे अणुवक्रीभवन असतें कीं नाहीं हें त्यानें संशोधिलें. तेलांचें वि. गुरुत्व, रासायनिक घटना व प्रकाशासंबंधीं वर्तन यांचे संबंध त्यानें जोडले.

**ग्लॅडस्टन, विल्यम एवर्ट** ( १८०९-१८९८ )—ग्रेटब्रिटनचा एक विख्यात मुत्सद्दी व प्रधान मंत्री. शिक्षण एटन व ऑक्सफोर्ड येथें झालें. १८३२ त तो प्रथम पार्लमेंटचा सभासद झाला. प्रथम तो टोरी पक्षाचा होता, पण पुढें लिबरल पक्षास मिळाला. १८४७ त ऑक्सफोर्ड विद्यापीठातर्फे पार्लमेंटांत निवडला गेला. १८५२ त डिझराएलीच्या अंदाजपत्रकावर टीका करतांना त्यानें जें भाषण केलें तें त्याचें पहिलें संस्मरणीय भाषण म्हणतां येईल. पुढें तो चान्सेलर ऑफ एक्सचेकर ( फडणीस ) झाला. त्यानें तयार केलेलीं अंदाजपत्रकें फार महत्त्वाचीं गणलीं जातात. १८६५ पासून तो कॉमन्स सभेचा नेता बनला.

तीन वर्षांनीं तो प्रधान मंत्री झाल्यावर त्यानें आयर्लंडसंबंधीं सुधारणा कायदे मान्य करून घेतले. पुनः कॉन्झर्वेटिव्ह पक्ष अधिकारारूढ झाला, तेव्हां त्यानें आंग्लो-तुर्की तह, अफगाण-युद्ध, बल्गेरियांतील अमानुष कृत्यें, यांवर झोड उठविली व पुढील निवडणुकींत त्याचा पक्ष बहुसंख्येनें निवडून आला. १८८६ सालीं आयर्लंडला होमरूल देण्याच्या त्याच्या ठरावावर देशाचें विरुद्ध मत पडून त्याला अधिकार सोडावा लागला. १८९२ सालीं तो पुनः सत्तारूढ झाला. व त्यानें पुनः आयरिश होमरूल बिल मांडलें. या वेळीं कॉमन्स सभेनें तें मंजूर केलें, पण उमेरावसभेनें फेटाळून लाविलें. यानंतर ग्लॅडस्टन राजकारणांतून निवृत्तच झाला. व्हिक्टोरिया राणीची कारकीर्द त्याच्या चार वेळेच्या प्रधानगिरीमुळें संस्मरणीय झाली.

**ग्लॅडिएटर**—प्राचीन काळीं रोममध्यें प्रेक्षकांच्या करमणुकीकरितां लढण्याचे जाहीर सामने होत असत. त्यांत भाग घेणाऱ्या इसमाचें हें नांव आहे. अशा तऱ्हेचा पहिला सामना खि. पू. २६४ सालीं मार्कस आणि ब्रूटस यांनीं आपल्या बापाच्या अंत्यविधीच्या वेळीं करविला. ग्लॅडिएटर हे कैदी, गुलाम, किंवा गुन्हेगार कैदी यांपैकीं असत. पण पुढें चांगले स्वतंत्र नागरिकहि यांत भाग घेऊं लागले व त्याबद्दल त्यांना मोबदला मिळत असे. पुढें अखेरीस चांगल्या उच्च दर्जाचे पुरुष आणि स्त्रियाहि अशा सामन्यांत लढूं लागल्या. ग्लॅडिएटर हे अशा सामन्यांत जीं हत्यारें वापरीत आणि ज्या पद्धतीनें लढत त्यावरून त्यांचे ३ वर्ग केले होते ते-रेटिआरी इसम एक त्रिशूळासारखें हत्यार व एक जाळें घेऊन लढत व त्या जाळ्यांत सामनेवाल्याला अडकविण्याचा प्रयत्न करीत. २ थ्रेसिअन हे इसम एक थ्रेशियन ढाल व छोटी तलवार घेऊन लढत असत; आणि ३ सेक्युटोर या इसमांना १ ल्या वर्गांतील इसमांशीं सामना द्यावा लागे.

**ग्लॅनव्हिल** ( मृ. ११९० )—एक इंग्रज कायदेपंडित. दुसऱ्या हेन्री राजाच्या कारकीर्दींत 'ज्युडिशिअरी' (न्यायाधीश) या जागेवर तो होता. त्यानें इंग्लंडचे कायदे व चालीरीती यांवर जो निबंध लिहिला ( ११८१ ), तो पुढें १५५४ मध्यें प्रसिद्ध झाला. इंग्लिश कायद्याबाबतचा हा सर्वांत जुना निबंध होय.

**ग्लाकोनाईट**—एक हिरव्या रंगाचें खनिज. ह्यांत पालाश (पोटॅशियम )चें प्रमाण शेंकडा ३ ते ८ असल्यामुळें ह्या खनिजाच्या ठिकाणाच्या जमिनीचा सुपीकपणा वाढविण्याच्या कामीं ह्याची मदत होते.

**ग्लॉबर, जॉन रुडोल्फ** ( १६०४-१६६८ )—एक जर्मन रसायनशास्त्रज्ञ. यानें ग्लॉबर साल्ट नांवाचा क्षार ( सिंधुगंधकित-सल्फेट ऑफ सोडा ) शोधून काढला. त्या क्षाराचे औषधी गुण पुष्कळ आहेत. ( खालीं पाहा )

**ग्लॉबर मीठ**—जनावरांना रेचक देण्यासाठीं हा क्षार वापरतात. कांचकाम आणि रंगकाम यांत ग्लॉबरच्या उपयोग करतात. पुष्कळ ठिकाणीं याचे मोठमोठे त्रिपार्श्व स्फटिक सांपडतात. उघड्या हवेंत या स्फटिकाची पांढरी पूड बनते. खनिज *पाण्यांत व थोड्या प्रमाणांत आपल्या रक्तांतहि हें मीठ सांपडतें.*

सामान्यतः रेचक म्हणून जीं औषधें देण्यांत येतात, त्यांत सिंधुगंधकित अथवा ग्लॉबर सॉल्ट असतें. विशेषतः यकृत्-विकारामध्यें ग्लॉबर सॉल्ट हें रेचक म्हणून देण्यांत येतें. याचें प्रमाण अर्धा ते दोन ग्रेनएवढें असतें. फेंस येणारें सिंधुगंधकित हे ६० ग्रेनपर्यंत एका वेळीं घेण्यास हरकत नाहीं.

**ग्लासगो**—स्कॉटलंडमधील सर्वांत मोठें शहर. बाराव्या शतकापासून याचा इतिहास मिळतो. वालेसनें १३०० त येथें इंग्लिशांचा पराभव केला. इंग्लंड आणि स्कॉटलंड एका साम्राज्यांत आल्यापासून ग्लासगोची भरभराट झाली व तंबाखूचा व्यापार आणि जहाजें बांधण्याचा धंदा यांना ऊर्जितावस्था आली. येथील विद्यापीठाची स्थापना १४५० त झाली आहे. त्याला पार्लमेंटसाठीं सभासद निवडण्याचा हक्क आहे. धंदेशिक्षणाच्या शाळाहि बऱ्याच आहेत. येथील चित्र-पदार्थ-ग्रंथसंग्रहालयें चांगलीं आहेत. शहराप्रमाणें बंदरहि मोठें आहे. ८१९ मैल धक्के पसरले आहेत. विणकामाबद्दल ग्लासगोची प्रसिद्धि जुनी आहे. जहाजें व रेल्वे-इंजिनें येथें तयार होतात. शहराचा कारभार कार्पोरेशनच्या ताब्यांत आहे. शहराच्या प्रत्येक भागाला पार्लमेंटांत एक प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क आहे. येथील वस्ती दहा लाखांवर आहे.

**ग्लिसरिन**—स्निग्धशर्करा; त्रिउज्जिक मद्यार्क. हें एक रंगहीन पारदर्शक गोड द्रव असून मेणबत्त्या व साबण तयार करण्याच्या कारखान्यांत दुय्यम उत्पादन म्हणून काढण्यांत येतें. किंवा हें प्रत्यक्ष चरबीपासूनहि काढतात. अगदीं कमी उष्णमानांत हें घट्ट बनतें. हें हवा शोषून घेतें व पाणी किंवा मद्यार्क यांत मिसळलें जातें. याचे उपयोग अनेक आहेत. पदार्थ नेहमीं ओलसर ठेवावयाचा असल्यास हें वापरतात. शाई, तेलें, साबणं, तंबाकू, स्फोटक द्रव्यें, इ. बनविण्यांत ग्लिसरिनचा उपयोग करतात; इतकेंच नव्हे तर सूत कांतणें, विणणे, दोर वळणें, कातडीं कमावणें या कामींहि याची जरूरी लागते. मांसासारखे पदार्थ वाईट होऊं नयेत म्हणून ग्लिसरिनमध्यें ठेवतात. औषधांच्या कामीं तर याचा फार मोठा उपयोग आहे. औद्योगिक क्षेत्रांतहि ग्लिसरिनला महत्त्व आहे.

**ग्लूस्टर**—इंग्लंडमधील याच नांवाच्या परगण्याचें मुख्य शहर आणि सेव्हर्न नदीवरील बंदर. लो. सं. ६१,०००. ग्लूस्टर आणि बर्कले कालवा येथें असून त्यांत ८०० टन वजनाचीं जहाजें राहण्यासारख्या गोद्या आहेत. येथील अत्यंत महत्त्वाची सार्वजनिक इमारत देवस्थान ही आहे. ८ व्या हेन्रीच्या कारकीर्दींत स्थापन झालेलीं विद्यालयें आणि एक धर्मशास्त्रीय कॉलेज येथें आहे. रासायनिक द्रव्यें तयार करण्याचे कारखाने, आगपेट्यांचे कारखाने, आणि यंत्रांचे कारखाने येथें आहेत. याच नांवाचा परगणा असून त्याचें क्षेत्रफळ ८,०४,६३८ एकर आणि लोकसंख्या ७,८६,००० आहे. येथील शेती चांगल्या स्थितींत आहे, पण शेतीपेक्षांहि दूधदुभत्याचा धंदा ( डेअरी ) अधिक मोठ्या प्रमाणावर चालतो. दगडी कोळसा आणि लोखंड पुष्कळ सांपडतें. हा परगणा कापडाच्या गिरण्यांकरितां प्रसिद्ध असून येथील कापड भरपूर रुंद आणि तलम असतें.

**ग्लेझब्रुक, सर रिचर्ड टेटले**—( १८५४- ) हा ब्रिटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ, व नॅशनल फिजिकल लॅबोरेटरीचा डायरेक्टर ( १८९९–१९१९ ) असून त्याचें संशोधन मुख्यतः दृक्शास्त्र ( ऑप्टिक्स ) आणि विद्युत्शास्त्र यांबाबतचें आहे; व त्यानें अनेक प्रकारचीं पाठ्य पुस्तकेंहि लिहिलीं आहेत.

**ग्लेनडॉवर, ओवेन** ( १३५९–१४१५ )— हा वेल्श लोकांचा शेवटचा राष्ट्रीय पुढारी होता. त्यानें बरीच फौज जमवून १४०० सालीं स्वतःला ' प्रिन्स ऑफ वेल्स ' ( वेल्सचा राजा) असें जाहीर केलें, आणि इंग्लंडच्या राजाच्या सैन्याचा पराभव केला; नंतर तो डोंगराळ प्रदेशाचा आश्रय घेऊन राहिला. त्यामुळें त्याच्याशीं लढाई करण्याचे शत्रूचे सर्व प्रयत्न विफल झाले. नंतर हेन्री राजाविरुद्ध पर्सी बंडवाल्यांच्या कटांत तो सामील झाला, आणि त्याला त्या वेळीं ' वेल्सचा राजा ' म्हणून राजमुकुटहि अर्पण करण्यांत आला. त्याचा पराभव करणें अशक्य आहे, असें आढळून आल्यावर ५ व्या हेन्रीनें १४१५ सालीं त्याच्याबरोबर तहाचें बोलणें सुरू केलें, पण लवकरच ग्लेनडॉवर मरण पावला.

**ग्लेशेर, जेम्स** ( १८०९–१९०३ )— एक इंग्रज वैमानिक आणि हवामानशास्त्रज्ञ. त्यानें विमानांतून २८ उड्डाणें केलीं व अशा एका उड्डाणांत तो २७,००० फूट उंचीवर गेला होता. याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—' हायग्रोमिट्रिक-टेबल्स ' ( आर्द्रतामापक कोष्टकें ) आणि ' ट्रॅव्हल्स इन दि एअर ' ( हवेंतील प्रवास ), हे होत.

**ग्वाटेमाला**—मध्य अमेरिकेंतील एक प्रजासत्ताक संस्थान. याच्या पूर्व-पश्चिम दोन्ही बाजूंस अनुक्रमें अटलांटिक व पासिफिक महासागर आहेत. बहुतेक मुलुख डोंगराळ असून कांहीं ज्वालामुखी आहेत. क्षेत्रफळ ४५,४५२ चौरस मैल. लो. सं. ३२,८४,२६९. ग्वाटेमाला याच नांवाचें शहर मुख्य ठिकाण असून सानजोस हें मुख्य बंदर आहे. या संस्थानांत मोठमोठीं अरण्यें आहेत. कॉफी, साखर, वगैरेंची निर्यात होते. सोनें, रुपें, लोखंड, शिसें, इ. खनिजें सांपडतात. ग्वाटेमाला शहरीं एक विद्यापीठ आहे. संस्थानांत प्राचीन मय लोकांच्या संस्कृतीचे अवशेष सांपडतात. जंगलांतून महागनी व इतर मौल्यवान् इमारती लांकूड निघतें. १६–१८ या तीन शतकांत संस्थान स्पॅनिश अमलाखालीं होतें. १८२१ पासून स्वतंत्र झालें. दुसऱ्या महायुद्धांत हें संस्थान इटली–जर्मनीच्या विरुद्ध होतें.

**ग्वाडालाजारा**—हें शहर मेक्सिकोंतील जेलिस्को नांवाच्या संस्थानाची राजधानी असून रायो डी सँशिआगो नदीकांठीं आहे. येथें एक देवस्थान, विद्यापीठ आणि एक टांकसाळ आहे. सोन्याचे व रुप्याचे दागदागिने, कागद, टोप्या, मातीचीं भांडीं, कापड, कमावलेलीं कातडीं, इत्यादि अनेक प्रकारचे कारखाने येथें आहेत. लो. सं. १६,५५९ आहे.

**ग्वाडेलूप**— फ्रेंच वेस्ट इंडीजमधील एक वसाहत. यांत बासटेर व ग्रांडटेर अशीं दोन मोठालीं व इतर पांच लहान बेटें येतात. एकंदर क्षे. फ. ५८३ चौ. मै. व लो. सं. ( १९३६ ) ३,०४,२०९. सुफ्री नांवाचें सर्वांत उंच शिखर ( ४९०० फूट ) आहे. ह्या बेटांत भयंकर वादळें होतात. जमीन चांगली असून साखर तयार होते. द्विदलधान्यें, कोको, कापूस, राम, रबर, इ. पदार्थ तयार होतात. यांची बहुतेक निर्गत फ्रान्समध्यें होते. या बेटांत कांहीं गोरे, फ्रेंच हद्दींतील कांहीं हिंदी, व बाकीचे निग्रो व म्युलेटो लोक आहेत. बासटेर येथें राजधानी आहे. पॉइंट–आ पीटर हें सर्वांत मोठें शहर व मुख्य बंदर आहे.

**ग्वाम**—अमेरिका, मरिआना द्वीपसमूहांतील एक बेट. क्षे. फ. सुमारें २०६ चौ. मैल आहे. लोकसंख्या २२,२९०. पैकीं बहुतेक ' नेटिव ' आहेत. स्थानिक भाषा चामोरो आहे. पण इंग्रजी व स्पॅनिश भाषाहि प्रचारांत आहे. शेतकी व बागाईत यांचें उत्पन्न चांगलें आहे.

युनायटेड स्टेट्सच्या आरमारी खात्याकडे याचा कारभार असून हें एक आरमारी ठिकाण म्हणून गणण्यांत येतें. आगना हें राजधानीचें ठिकाण आहे.

मॅगेलननें १५२१ त हें शोधून काढलें व १५८६–१८९८ पर्यंत स्पेनकडे राहिलें. नंतर संयुक्त संस्थानांनीं स्पेनशीं युद्ध करून मिळविलें. १९४१ त जपाननें हें घेतलें होतें.

**ग्वायाना**—दक्षिण अमेरिकेचा उत्तरेकडचा एक प्रदेश. याचे तीन भाग तीन युरोपिअन राष्ट्रांच्या ताब्यांत आहेत. ते

गौहत्ती—ब्रह्मपुत्रा घाट (पृ. ७१४)

ग्वाल्हेर—किल्ला (पृ. ७३१)

घारापुरीचीं लेणीं—त्रिमूर्तिदालन (पृ. ७४६)

अनुक्रमें ब्रिटिश, डच व फ्रेंच ग्वायना म्हणून ओळखले जातात. ब्रिटिश ग्वायनाचें क्षेत्रफळ ८९,४८० चौ. मै. व लो. सं. ३५,४,२१९ आहे. बहुतेक भाग डोंगराळ असून शेतीखालीं जमीन फारच थोडी आहे. साखर, तांदूळ, इमारती लांकूड, वगैरेंचा व्यापार चालतो. जॉर्ज टाऊन हें मुख्य ठिकाण आहे. डच ग्वायना हा सुरिनाम याहि नांवानें ओळखला जातो. याचें क्षेत्रफळ ५५,१४३ चौ. मै. व लो. सं. १,८३,७३० आहे. परामारिबो हें मुख्य ठिकाण आहे. फ्रेंच ग्वायनांत काएन हें मुख्य ठिकाण आहे. मारोनी येथें गुन्हेगारांस ठेवण्यांत येतें. क्षेत्रफळ ३४,७४० चौ. मै. व लो. सं. ३०,८७६.

**ग्वाल** ( सन १७९० )—मथुरेस राहत असलेला हा हिंदी कवि जगदंबेचा भक्त असून शिवाचीहि आराधना करीत असे. दयाळ नांवाच्या याच्या गुरूनें यास हांकलून दिल्यानें यानें यमुनेच्या कांठीं वास्तव्य केलें. तेथें एका तपस्व्याच्या कृपेनें याची प्रतिमा जागृत झाली. यानें रसरंग, भक्तभावन, राधिकाष्टक, हमीरहठ, कविहृदय, विनोद, वगैरे ६०–७० ग्रंथ लिहिले. वि. सं. १८०९ मध्यें मथुरेस यानें एक शिवमंदिर बांधलें.

**ग्वाल्हेर संस्थान**—मध्य हिंदुस्थानांतील एक मोठें संस्थान. १९४८ सालीं हें मध्यभारत संस्थानसंघांत समाविष्ट झालें आहे. व संस्थानिक राजप्रमुख निवडले गेले आहेत. याचा विस्तार चंबळापासून मेलसापर्यंत व बुंदेलखंड–झांशीपासून राजपुताना एजन्सीपर्यंत आहे. क्षे. फ. २६,३६७ चौ. मै. व लो. सं. ( १९४१ ) ३९,९२,००० आहे. शेंकडा ८६ हिंदू आहेत व मुसलमान शें. ४ आहेत. दक्षिण सोडून ग्वाल्हेरच्या सर्व बाजूंनीं मैदान आहे. दक्षिणेकडे जमीन उंच होत गेली आहे. विंध्याचलाच्या दोन रांगा यांतून गेल्या असून चंबळा आणि क्षिप्रा या मुख्य नद्या वाहतात. उत्तरेकडील जंगलांत हिंस्र पशू आहेत. पावसाचें मान ४० इंच आहे. संस्थानांत २३ शहरें व ९,५३८ गांवें आहेत. माळवी, मराठी, बुंदेली, उर्दू, तोवरगडी यांप्रमाणें भाषा चालतात. ३/४ लोक शेती, १/८ गवळ्याचा धंदा व बाकीचे इतर उद्योगधंदे करतात. माळव्याकडची जमीन सुपीक आहे. गहूं व ज्वारी हीं मुख्य पिकें होत. जंगलांत इमारती लांकडें चांगलें उत्पन्न देतात. पूर्वी लोखंड निघत असे. आतां सीमेंट तयार होऊं लागलें आहे. कापडाच्या गिरण्या, कातड्याचे व चिनीमाती भांड्याचे कारखाने, साबण,, लाख, निंबें, इ. चे कारखाने संस्थानांत आहेत. लष्कर, उज्जैन, मंदसोर, निमच हीं व्यापाराचीं ठिकाणें आहेत.

संस्थानची स्वतःची आगगाडी. व चांगले मोटारींचे रस्ते आहेत. पोस्टखातें व लष्करखातें संस्थानच्या मालकीचें आहे. दोन कॉलेजें ( मुलांचीं ), एक मुलींचें कॉलेज, अनेक हायस्कुलें आणि प्रा. शाळा आहेत. सरदारांच्या मुलांसाठीं एक स्वतंत्र शिक्षणसंस्था आहे. कांहीं औद्योगिक शिक्षणाच्या शाळा आहेत. संस्थानचा राज्यकारभार महाराज व आठ मंत्र्यांचें मंडळ यांकडून संघ होण्यापूर्वी चालत असे. सामंतसभा आणि प्रजासभा अशीं दोन कायदेमंडळें लोकनियुक्त होतीं.

शिंदे राजघराण्याचा मूळपुरुष राणोजी शिंदे होय. हा बाजीराव पेशव्याच्या हाताखालीं लष्करांत होता. त्यानें बरीच मर्दुमकी गाजवून उत्तर हिंदुस्थानांत सरंजाम मिळविला. त्याचे मुलगे जयाप्पा, दत्ताजी आणि महादजी यांनीं पेशवाईत तरवार गाजविली. महादजींचें नांव तर हिंदुस्थानच्या इतिहासांत अजरामर राहील. नाना फडणीस व महादजी शिंदे हे मराठी साम्राज्याचे उत्तरकालांत आधारस्तंभ होते. महादजीनंतर दौलतराव गादीवर आला. त्याच्या कारकीर्दींत ग्वाल्हेरचें राज्य इंग्रजांचें मांडलिक बनलें. दौलतरावानंतर जनकोजी थोडेच दिवस गादीवर होता. त्याच्यानंतर ( १८४३ ) जयाजीराव गादीवर बसला. त्याची कारकीर्द फार धामधुमीची गेली, पण संस्थानांत सुधारणाहि पुष्कळ झाली. दिनकरराव राजवाडे त्या वेळीं संस्थानचा दिवाण होता. जयाजीरावानंतर आतांच्या मागचे माधवराव महाराज गादीवर आले. ते फार कर्तबगार होते. तसेंच ते चांगले सेनानी असून इंग्रज सरकारला युद्धाच्या प्रसंगीं प्रत्यक्ष मदत देत. ते १९२५ त वारल्यावर सध्यांचे जिवाजीराव लहानपणींच गादीवर आले. यांना लष्करी व इतर शिक्षण चांगलें मिळालें आहे; हे चांगले खेळाडूहि आहेत. यांना २१ तोफांच्या सलामीचा मान आहे. संस्थानचें उत्पन्न अडीच कोटी रुपयांवर आहे.

संस्थानांत ऐतिहासिक महत्त्वाचीं व शिल्पकामाचीं प्रेक्षणीय स्थळें बरींच आहेत. उज्जनी व ग्वाल्हेर प्रसिद्धच आहेत.

ग्वाल्हेर शहराचे दोन भाग पडतात. जुनें शहर हें आज पडक्या स्थितींत आहे. नवें शहर, ज्याला लष्कर म्हणतात तें होय. जुन्या शहराजवळच पुरातन किल्ला आहे. हा किल्ला फार मजबूत व हिंदुस्थानांत प्रेक्षणीय आहे. ग्वाल्हेरवर पूर्वी ६ व्या शतकांत गुप्तांचें राज्य होतें. दहाव्या शतकांत रजपुतांचा अमल यावर होता. पुढें मुसलमान राजे आले. पानपतनंतर गोहदच्या जाटानें हा जिंकला व लवकरच महादजी शिंद्याकडे आला. १८५७ च्या क्रांतियुद्धांत कांहीं दिवस पेशवे आणि झांशीची राणी यांच्या ताब्यांत ग्वाल्हेर होतें. झांशीची राणी या ठिकाणींच लढाई देत असतांना मरण पावली. आज सर्व संस्था, कचेऱ्या, व्यापार व मोठी वस्ती लष्कर भागांत आहे. लो. सं. ( १९४१ ) १,८२,४९२.

**ग्विडो**--हा प्रसिद्ध संगीतशास्त्रज्ञ ११ व्या शतकांत होऊन गेला. 'आधुनिक संगीताचा आद्यजनक' असें त्यास मानण्यांत येत असून अव्हेलॅनाच्या मठांतील त्याच्या तसबिरीवरहि वरील उल्लेख आढळतो. पांपोसा येथील मठांत तो गायनशिक्षकाचें काम करीत असे व त्याच ठिकाणीं त्यानें संगीतशास्त्रासंबंधीं एका नवीन संगीतलेखनपद्धतीचा शोध लाविला. जें शास्त्र शिकण्यास पूर्वी दहा वर्षे लागत तें शास्त्र ह्या पद्धतीनें पांच महिन्यांत अवगत होईल असें तो म्हणे. १७ मे १०५० रोजीं ग्विडोनें इहलोक सोडला. ग्विडोच्या पद्धतीला आधुनिक गीतलेखनपद्धतीच्या इतिहासांत मोठें महत्त्व प्राप्त झालें आहे. युरोपियन संगीतांतील पहिले सहा स्वर यानें शोधून काढले आहेत. त्यांचीं नांवें सेंट जॉन बॅप्टिस्ट यास उद्देशून केलेल्या एका स्तोत्राच्या ओळींचीं आद्याक्षरें आहेत.

**ग्वीच्चिआर्डीनी, फ्रान्सिस्को** (१४८३–१५४०)—एक प्रसिद्ध इटालियन इतिहासकार व मुत्सद्दी. फ्रान्सिस्कोचें ग्रीक व लॅटिन भाषांचें प्राथमिक शिक्षण झाल्यावर त्यानें फेरारा व पदुआ या दोन युनिव्हर्सिटींत इ. स. १५०५ पर्यंत अभ्यास केला. पुढें त्यानें कायद्याचा अभ्यास करून वकिली सुरू केली व त्यांत फार कीर्ति मिळविली म्हणून त्याला स्पेनचा राजा फर्डिनंड याच्या दरबारी वकील म्हणून पाठविण्यांत आलें व तेव्हांपासून त्याच्या राजकारणी व मुत्सद्दी आयुष्यक्रमास प्रारंभ झाला. फ्रान्सिस्को मूळचा महत्त्वाकांक्षी, लोभी व अधिकारलोलुप होता व स्पेनच्या कामगिरींत त्याच्या अंगचे तत्कालीन राजकारणी पुरुषांत लागणारे सर्व गुण निदर्शनास आले. या गुणांमुळें रोमचा पोप १० वा लिओ व पुढील एकादोघांनीं त्याला पोपच्या राज्यांतील प्रांतावर गव्हर्नर नेमलें. या नोकरीचा राजीनामा त्यानें १५३४ त दिला. त्या नोकरींतील अनुभवानें पोपच्या वर्तनाबद्दल त्याच्या मनांत तिटकारा वाटून पुढे तो लूथरच्या प्रॉटेस्टंट पंथाचा अनुयायी बनला.

---

## घ

**घ**—या वर्णाला आजच्या स्थितीला पोंचण्यास पांच अवस्थांतून जावें लागलें. पहिली अवस्था अशोक. याच्या इ. स. पू. ३ ऱ्या शतकांतील गिरनार लेखांत; दुसरी इ. स. २ ऱ्या शतकांतला क्षत्रप राजा रुद्रदामा याच्या गिरनार येथील लेखांत; तिसरी इ. स. ८३७ तल्या प्रतिहार बाउकच्या जोधपूर लेखांत; चौथी ११ व्या शतकांतील परमार राजा जो उदयादित्य त्याच्या उदेपूर येथील लेखांत; व पांचवी त्याच शतकांतील उज्जनीच्या शिलालेखांत दृष्टीस पडते. आजचा 'घ' इ. स. १२०८ मधील परमार राजा धारावर्ष याच्या वेळच्या ओरिआ लेखांत स्पष्ट ओळखूं येतो.

**घग्गर नदी**—शिरगुर संस्थानांतून निघून अंबाला शहरापासून ३ मैलांवरून पतिआळा संस्थानांत ही नदी जाते व पुढें बिकानेर संस्थानांत हनुमानगडाजवळ जवळजवळ नाहींशी होते. दोन्ही बाजूंचीं वरच्या भागांची खेडीं या नदीच्या पाण्याचा उपयोग शेतीकडे करून घेतात. अंबाला जिल्ह्यांत व बिकानेर संस्थानांत या रीतीनें ३०,००० वर एकर जमीन भिजते. या नदीचे १२५ मैलांवर लांबीचे कालवे काढले आहेत.

**घटकर्पर**—एक संस्कृत कवि. हा विक्रमादित्याच्या सभेंतील नवरत्नांपैकीं समजतात. याचा काळ निश्चित नाहीं; पण इ. स. ६०० च्या मागें नसावा. याच्या नांवावर २२ श्लोक असून त्यांत वर्षाऋतूचें शृंगारिक वर्णन आहे. या काव्यावर बऱ्याच टीकाहि आहेत. 'जो यमकाच्या बाबतींत माझ्यावर ताण करील त्याच्या घरीं मी पाण्याचे घडे वाहीन,' अशी याची प्रतिज्ञा होती म्हणतात.

**घटना**—एखादी संस्था मग ती खासगी असो कीं सरकारी असो तिला सुबद्ध, सुयंत्रित करणारे कांहीं नियम, लेखी किंवा परंपरागत असे असतातच, व असले पाहिजेत. अशा नियमांना घटना म्हणतात. राज्यशासनासाठीं जे नियम ती राज्यघटना किंवा राज्यासंबंधींचा मूलभूत कायदा होय. हा कायदा अमेरिकन सं. संस्थानांच्या राज्यघटनेप्रमाणें लिखित व एका विशिष्ट तारखेपासून अमलांत आलेला असा असतो; किंवा ब्रिटिश घटनेप्रमाणें अनेक शतकें निरनिराळे कायदे व रूढी यांचा समुच्चय मिळून बनलेला असतो. मुख्य राज्यघटनांचे प्रकार:—(१) अनियंत्रित राजानें राज्यघटना आपल्या इच्छेप्रमाणें बनवणें. (२) राजा व प्रजा यांच्यामधील आपसांतल्या करारानें राज्यघटना तयार होणें; उदा०–ब्रिटनची राज्यघटना. (३) निरनिराळ्या स्वतंत्र राज्यकर्त्यांनीं एकत्र होऊन संयुक्त राज्यघटना बनवणें; उदा०, पूर्वीच्या जर्मन साम्राज्याची घटना, हॉलंडमधील संयुक्त प्रांताची घटना, आणि स्विस संयुक्त राज्याची घटना.

**घटनात्मक कायदा**—राज्यकारभार कसा चालतो याबद्दलचे जे नियम त्यांना घटनात्मक कायदा म्हणतात. या कायद्यांत पुढील बाबींचा समावेश होतो: (१) कायदे करणें, कायद्यांची अमलबजावणी करणें, आणि कायद्यांचा अर्थ सांगणें, या तीन कामांकरितां तीन निरनिराळ्या संस्था व त्यांचे अधिकार व त्यांची कामें निश्चित ठरविणें; (२) या तीन कामें करणाऱ्या संस्थांच

परस्परसंबंध कसा असावा याबद्दल नियम करणें; ( ३ ) तसेंच, या तीन मुख्य संस्थांचा संबंध स्थानिक स्वराज्य संस्थांशीं आणि देशांतील सर्वसामान्य प्रजाजनांशीं कसा असावा, त्याबद्दल निश्चित नियम करणें; ( ४ ) राजसिंहासनाबद्दलचा वारसा हक्क, राजाचे विशेष अधिकार; ( ५ ) पार्लमेंटच्या दोन सभागृहांच्या सभासदांची लायकी, त्यांचे विशेष हक्क व अधिकार यांबद्दलचे नियम करणें; ( ६ ) प्रधान मंडळाचीं कामें निश्चित करणें; ( ७ ) सरकारी कायद्यांची अमलबजावणी करणाऱ्या निरनिराळ्या खात्यांची आणि न्यायकोर्टांची रचना ठरविणें; ( ८ ) न्यायकोर्टांपैकीं अव्वल कोर्टें आणि अपील कोर्टें यांचीं अधिकारक्षेत्रें निश्चित करणें; ( ९ ) स्थानिक स्वराज्य संस्थांचे अधिकार निश्चित ठरविणें; ( १० ) मूळ इंग्लंड देश आणि ब्रिटिश साम्राज्यांतील स्वायत्त वसाहती ( डोमिनियन्स ) आणि इतर वसाहती यांचे परस्पर संबंध निश्चित करणें; ( ११ ) प्रजाजनांविरुद्ध असलेले सरकारचे अधिकार निश्चित करणें; आणि ( १२ ) प्रजाजनांचे वैयक्तिक आणि त्यांच्या मिळकतींसंबंधींचे खासगी हक्क उपभोगतां यावे म्हणून प्रजाजनांना सरकारकडून मिळणारें संरक्षण, आणि दाद ( रेमेडीज ) यांसंबंधीं नियम करणें.

याप्रमाणें देशाच्या घटनात्मक कायद्याचे मुख्य दोन भाग असतात.—( १ ) कायदे करणें, कायद्यांची अमलबजावणी करणें, आणि न्याय देणें. प्रत्येक सरकारच्या या मुख्य तीन कामांची अमलबजावणी करणाऱ्या या तीन संस्था; आणि ( २ ) या तीन संस्थांपैकीं प्रत्येक संस्थेनें आपले अधिकार इतर दोन संस्थांशीं येणाऱ्या संबंधाच्या बाबतींत आणि राज्यांतील प्रजाजनांच्या बाबतींत कसे चालवावे त्या संबंधींचे नियम किंवा कायदे. याप्रमाणें या तीन संस्थांचे परस्पर संबंध आणि इतर नियम यांबद्दल निश्चित लिखित कायदा ऊर्फ घटना मंजूर केलेली असते. उदा., संयुक्त संस्थानांनीं आणि फ्रान्सनें आपली राज्यघटना लिखित कायदा अशा स्वरूपांत निश्चित केली आहे. पण ग्रेट-ब्रिटनची राज्यघटना लिखित कायद्याच्या स्वरूपांत मंजूर केलेली नाहीं. ब्रिटिश राज्यघटना गेलीं चारपांच शतकें जसजशी व्यावहारिक अडचण उत्पन्न झाली त्या त्या वेळीं तेवढ्या जरूरीपुरती पृथक्पृथक् कायदे होऊन बनलेली आहे. ब्रिटिश प्रजाजनांचे हक्क स्पष्टपणें नमूद करणारा एक विशिष्ट कायदा नसून हे हक्क १२१५ सालचा मॅग्नाचार्टा, १६८९ सालचें बिल ऑफ राइट्स, आणि न्यायकोर्टानें दिलेले निकाल ( ज्युडीशियल डिसिजन्स ) यांनीं निश्चित केले आहेत. याप्रमाणें इंग्लंडचा घटनात्मक कायदा मिश्र स्वरूपाचा आहे. म्हणजे इंग्लंडची राज्यघटना कांहीं कायद्यांनीं, कांहीं रूढींनीं, आणि कांहीं न्यायकोर्टाच्या निकालानें बनलेली आहे. या घटनात्मक कायद्याशिवाय इंग्लंडचा आणि ब्रिटिश साम्राज्याचा राज्यकारभार चालवितांना कित्येक रिवाज किंवा संकेत (कन्व्हेन्शन्स) अथवा समज ( अंडरस्टॅंडिंग्ज ) ठरले आहेत. पण त्यांना कायद्याप्रमाणें बंधनकारक स्वरूप नाहीं. असे संकेत पुढील बाबींसंबंधीं आहेत–( १ ) मंत्रिमंडळाची ( कॅबिनेटची ) रचना आणि दर्जा, ( २ ) मंत्रिमंडळाचा राजीनामा, व ( ३ ) राजाचीं निश्चित राजकीय कर्तव्यें. राजा, प्रधानमंडळ आणि पार्लमेंट यांच्यामध्यें मतभेदाचे प्रश्न उपस्थित झाल्यास त्यांची परस्परांत तडजोड करण्याच्या कामीं हे संकेत फार उपयोगी पडतात.

हिंदी संघराज्याची घटना आतां स्वातंत्र्य मिळाल्यानंतर अगदीं मुळापासून तयार होत आहे. घटना-परिषद भरवून तिचा खर्डा तयार करण्यांत आला आहे. याला कायद्याचें स्वरूप यावयास थोडा अवकाश आहे.

**घंटय्या कवि**— एक तेलगू कवि. यानें अध्ययन संपल्यानंतर काशीखंडांतून सुराभांडेश्वराची कथा तेलंगी भाषेंत काव्यरूपानें उतरवली. या कवीची स्वतंत्र ग्रंथरचना नाहीं. पण हा बराच लोकप्रिय आहे.

**घटसर्प**— हा एक अत्यंत तीव्र संसर्गजन्य रोग असून याच्या योगानें घसा व श्वासनलिका यांमध्यें एक प्रकारची अंतस्त्वचा उत्पन्न होते. हा रोग विशेषेंकरून मुलांस होतो. याचा संसर्ग दूध, घरांतील पाळीव प्राणी, विशेषतः मांजरें वगैरेंपासून होतो. याचा प्रादुर्भाव प्रथम मंद गतीनें होतो. परंतु पुढें हा फार जलद वाढतो. या रोगांत प्रथम ताप येतो. डोकें दुखूं लागतें, मधूनमधून ओकारी होते, आणि घसा दुखूं लागतो. प्रथम घशास थोडी सूज येते. नंतर त्यावर बारीक पांढरे ठिपके दिसूं लागतात. या ठिपक्यांवर ताबडतोब उपचार केले नाहींत तर ते घसा, पडजीभ, वगैरे सर्व भाग व्यापून टाकतात. याची परीक्षा करण्याकरितां कापसाच्या बोळ्यास थोडी लाळ घेऊन ती सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं त्यांत कांहीं सूक्ष्म जंतू आहेत काय हें पाहण्यासाठीं तपासतात. ह्या रोगांत विशेषतः प्रारंभींच्या अवस्थेंत हृदयक्रिया बंद पडण्याचा संभव असतो. यावर प्रतिबंधक लस टोंचण्यांत येते. व तीच परिणामकारक असून तीच शक्य तितक्या लवकर टोंचण्यांत यावी व तिचें प्रमाण रोगाच्या तीव्रतेवर अवलंबून असावें. हा रोग सावकाश बरा होतो. या रोगाचा अनुगामी रोग म्हणजे कुकसर्प ( लारिंजिअल डिफ्थेरिया ) आहे. यानें बहुधा मुलें दगावतात.

**घटस्फोट**—विवाह झाल्यानंतर तें विवाहाचें नातें किंवा कायदेशीर बंधन तोडून टाकणें, याला कायद्यांत घटस्फोट म्हणतात. विवाहबंधन तोडण्याचे तीन पर्याय कायद्यांत सांगितले

आहेत, ते म्हणजे (१) विवाह मूलतःच रद्द ठरवणें; (२) फक्त पृथक् वास्तव्य पत्करणें; किंवा (३) विवाहबंधन कायमचें तोडणें.

पाश्चात्य देश—प्राचीन ग्रीक लोकांत उभयतांच्या संमतीनें घटस्फोट करतां येत असे, व बायकोचा व्यभिचार हें नवऱ्याला घटस्फोटास मोठें कारण असे. मात्र नवऱ्याविरुद्ध बायकोला हें कारण कायदा मान्य करीत नसे. स्त्रीधन स्वाधीन करून बायकोला तिच्या बापाच्या घरीं पाठवलें की घटस्फोट झाला. रोमन कायद्यांत खि. पू. ५ व्या शतकापासून पूर्वी घटस्फोटाला परवानगी होती. २ ऱ्या शतकाच्या सुमारास घटस्फोटांची संख्या फार वाढूं लागली. प्रसिद्ध रोमन पुढारी पॉंपीनें पांच वेळां, सीझरनें चार वेळां, सिसरोनें तीन वेळां, प्लिनीनें तीन वेळां लग्न केलें. या शिथिलतेमुळें ख्रिस्तीधर्मप्रवर्तकांची प्रवृत्ति घटस्फोटावर कडक निर्बंध घालण्याकडे झालीसे दिसतें. बायबलच्या नव्या करारामध्यें या बाबतींत स्पष्ट उल्लेख नाहींत, त्यामुळे बायबलांत घटस्फोटाला परवानगी नाहीं, असें आरंभीं मत होतें. पण प्रॉटेस्टंट पंथांत, घटस्फोट हा धार्मिक प्रश्न नसून खाजगी सामाजिक प्रश्न आहे, असें ठरवण्यांत आलें. घटस्फोटाचा स्वतंत्र कायदा हॉलंड व अमेरिका या देशांत १७ व्या शतकांत करण्यांत आला. १८०३ सालीं झालेला 'कोड नेपोलियन' हा फ्रेंच कायदा घटस्फोटाच्या प्रश्नाला युरोपांत सर्वत्र निश्चित स्वरूप देण्यास कारण झाला. घटस्फोटाला सामान्यतः पुढील पांच कारणांपैकीं कोणतेंहि एक कारण कायदेशीर मानतात—१ व्यभिचार, २ खुनाचा प्रयत्न, ३ द्वेषमूलक त्याग, ४ वैवाहिक कर्तव्याचें महत्त्वाचें अतिक्रमण किंवा विवाहसंबंधाला अपमानास्पद असें वर्तन, ५ तीन वर्षें टिकलेलें वेड.

हिंदुस्थान— हिंदु कायद्यांत घटस्फोट उच्च हिंदु जातींत मान्य नाहीं. रूढि म्हणून पुष्कळ हलक्या जातींत घटस्फोट होऊं शकतो. आतां सामाजिक सुधारणावादी सुशिक्षित स्त्री-पुरुषांच्या मागणीवरून मुंबई प्रांतांत १९४७ सालीं घटस्फोटाचा कायदा मुंबई प्रांतिक सरकारनें केला आहे.

पारशांचा 'पारशी मॅरेज ॲंड डायव्होर्स ॲक्ट' (१८६५) आणि ख्रिस्ती लोकांचा 'इंडियन डायव्होर्स ॲक्ट' (१८६९) आहे. व तोच कायदा 'स्पेशल मॅरेज ॲक्ट' प्रमाणें नोंदणी विवाह करणारांना लागू आहे (कलम १७). इंडियन डायव्होर्स ॲक्टांत व पारशांच्या कायद्यांत विवाहबंधन दूर करण्याचे तीन प्रकार दिले आहेत—(१) विवाह मूलतः रद्द ठरवणें (नलिटी किंवा ॲब इनिशिओ व्हॉईड). याचीं कारणें येणेंप्रमाणें-(अ) पतीचें किंवा पत्नीचें लग्नापासूनचें व पुढें चालू असलेलें वेड किंवा मानसिक विकृति; आणि (ब) नपुंसकत्व. तसेंच वधूवरांमध्यें कायद्यानें निषिद्ध मानलेला नजीकचा आप्तपणा (सापिंड्य) असेल, किंवा वधू किंवा वर अगोदरच विवाहित असेल तर विवाह रद्द होतो. (२) दुसरा प्रकार घटस्फोट (डायव्होर्स). याचीं कारणें-(अ) व्यभिचार; (ब) द्वितीय विवाह; (क) जीविताला धोका होईल इतका क्रूरपणा; (ड) जबरी संभोग किंवा अनैसर्गिक संभोग; (इ) दोन वर्षे त्याग व व्यभिचार. या कारणांस्तव घटस्फोट मिळतो, व त्यानंतर दुसरा विवाह करतां येतो. (३) तिसरा प्रकार पृथक्निवास 'ज्युडीशिअल सेपेरेशन'. याचीं कारणें-(अ) जीविताला धोका होईल इतकें क्रूर वर्तन; (आ) घरांत रखेली बाळगणें; (इ) निष्कारण दोन वर्षें त्याग. या कारणांस्तव पृथक् निवासाची परवानगी कोर्ट देतें.

**घंटा**—हा कांशाचा ओतीव पेला असून यास वरच्या अंगानें हातांत धरण्यास किंवा टांगण्यास पितळेची अगर लांकडी मूठ किंवा कोयंडा असतो. आंतील पोकळ बाजूस माथ्यावर भोंक पाडून त्यांत दोरीनें अगर तारेनें धातूची अगर शिंगाची लोळी बसवितात. ती लोळी पेल्यावर आपटून ध्वनि निघतो. ह्याचे वाटेल तेवढे लहान-मोठे आकार असतात. ह्याचा उपयोग देवपूजेंत व विशेषतः आरती-धुपारतीच्या वेळीं होत असतो. पुष्कळ देवळांत मोठ्या आकाराच्या घंटा देवासमोर टांगलेल्या असतात.

घंटा सामान्यतः तांबें व कथिल यांच्या मिश्र धातूपासून बनविण्यांत येतात. याचें प्रमाण ४ : १ हें असतें. याला कांठ असून आकार पेल्यासारखा असला म्हणजे आवाज चांगला येतो. घंटेच्या आकाराच्या मानानें तिचा आवाज अधिकाधिक गंभीर होत जातो. चीन व जपान देशांत फार मोठ्या आकाराच्या घंटा फार प्राचीन काळापासून उपयोगांत होत्या. ग्रीक व रोमन लोकहि त्या निरनिराळ्या कामीं वापरीत. ख्रिस्ती देवळांत त्या प्रथम कँपेनियामधील नोला येथील बिशप पॉलिन यानें इ. स. ४०० मध्यें वापरण्यास सुरुवात केली. परंतु फ्रान्समध्यें त्या ५५० मध्यें येईपर्यंत त्या फारशा प्रचारांत नसाव्या. तेराव्या शतकांपर्यंत त्या आकारानें लहान असत. सध्या प्रसिद्ध घंटा म्हटल्या म्हणजे कोलोन (११ टन), रुआँ (१६ टन), पॅरिस (१२$\frac{3}{4}$ टन), व्हिएन्ना (१७$\frac{3}{4}$ टन), व मॉस्को (१९३ टन) येथील होत. पोर्तुगीज लोकांनीं मोठाल्या घंटा प्रथम हिंदुस्थानांत आणल्या व जेव्हां मराठ्यांनीं वसई वगैरे ठिकाणें त्यांच्याकडून जिंकलीं तेव्हां कांहीं घंटा त्यांस मिळाल्या. त्यांपैकीं कांहीं हिंदु देवळांत अद्यापि आहेत व कांहीं गाळून तोफा करण्यांत आल्या. प्रसिद्ध नारोशंकरी घंटा यांपैकीं होय. तीवर १७२१ हा आकडा

रोमन चिन्हांनीं कोरला आहे. नाशकास रामेश्वराच्या देवळांत १७४७ च्या सुमारास ही बांधली असावी.

**घंटाकार पुष्पी**—१. (इं. ॲक्युटिलॉन). [वर्ग-माल्व्हेसी]. हिला हिंदींत मॅलो म्हणतात. ही उष्ण प्रदेशात होते. या झाडापासून अंबाडीसारखे दोर निघतात त्यांस चिनी ताग म्हणतात. याला मुद्रा असेंहि आपल्याकडे नांव आहे. याचीं फुलें घंटेच्या आकाराचीं असून जांभळ्या रंगाचीं असतात व तीं फार सुंदर दिसतात. या पुष्पवर्गाच्या सुमारें सत्तर जाती आहेत.

२. (इं. कॅम्पान्युलासिई). या वर्गांतील वनस्पती सामान्यतः उत्तरेकडील व समशीतोष्ण प्रदेशांत आढळतात. यांमध्यें अनेक अमेरिकन जाती असून त्यांत एक पुष्पपर्णी, द्विगर्भपर्णी, वगैरे प्रकारच्या अनेक वनस्पती येतात. या फुलांचा रंग पांढरा किंवा निळा असतो. 'हेअर बेल' (शशघंटा) ही जात फार नाजूक असून खडकाळ जागेंत उगवते. 'कँटरबरी बेल' जात युरोपियन आहे. फुलें नळ्यांसारखीं असतात.

**घटोत्कच**—पांडवांतील भीमसेनापासून हिडिंबा राक्षसीच्या ठायीं झालेला पुत्र. हा जन्मला त्या वेळीं याचें मस्तक घटाप्रमाणें मोठें असून त्यास केंस अगदीं नव्हते, म्हणून याचें घटोत्कच असें नांव पडलें. यास अंजनपर्वा व मेघवर्ण असे दोन पुत्र होते.

हा भारती युद्धांत पांडवांकडे होता. जयद्रथवधानंतर कौरव खवळले तेव्हां घटोत्कचानें अनेक माया प्रकट करून व राक्षसी पद्धतीनें युद्ध करून कर्णास जर्जर केलें. शेवटीं कर्णानें वासवी शक्ति घटोत्कचावर सोडली. त्यामुळें घटोत्कच मरण पावला.

**घटोत्कच लेणीं**—पूर्व खानदेशच्या दक्षिण सरहद्दीपासून ३ मैलांवर अजंठ्याच्या पश्चिमेस ११ मैलांवर व पाचोऱ्याच्या नैर्ऋत्येस १६ मैलांवर जिंजाळ खेड्याजवळील डोंगरांत हीं लेणीं आहेत. यांत एक मोठा विहार असून तो अजंठा येथील सहाव्या व सोळाव्या लेण्यांप्रमाणें आहे. या विहारास २० खांब आहेत. पाठीमागच्या बाजूस गाभाऱ्यांत शाक्यमुनीची मूर्ति आहे. व तिच्याजवळ विद्याधर, धर्मचक्र, हरण, वगैरे आहेत. विहारांत एकंदर १० खोल्या आहेत. पडवीच्या मागील भिंतीवर उत्तरेस अश्मक राजाच्या वेळचा एक शिलालेख आहे. विहारांतील एका खांबावर बुद्धाची मूर्ति कोरलेली असून त्यावर बौद्ध धर्मतत्त्वें खोदलेला एक शिलालेख आहे.

**घडकाम**—धातूची एखादी वस्तु तयार करावयाची असली म्हणजे ज्या कृती कराव्या लागतात त्यांस घडकाम म्हणतात. या कृती अर्थात् निरनिराळ्या प्रकारच्या निरनिराळ्या साधनांनीं करावयाच्या असतात. पण मुख्यतः एखादा लोखंडाचा किंवा पोलादाचा अथवा इतर धातूचा तुकडा हातोड्यानें ठोकणें ही क्रिया विशेष असते. ही क्रिया जेव्हां हातानें हातोडा मारून किंवा वाफेच्या दाबानें हातोडा चालवून करतात तेव्हां यास हातोड्याचें घडकाम म्हणतात. ठशांच्या घडकामांत ठशाचा एक भाग ऐरणीवर ठेवलेला असतो. त्यावर धातूचा तुकडा ठेवण्यांत येतो व हातोड्यामध्यें ठशाचा दुसरा भाग बसविलेला असतो. हातोडा वरून ठोकून ठशांतून इष्ट ती आकृति तयार करण्यांत येते. घडकामाच्या अनेक तऱ्हा आहेत; उदाहरणार्थ, एखादा मोठा तुकडा बारीक करणें, लहान तुकड्याचा मोठा बनविणें, वांकविणें, सांधणें, जोडणें, इत्यादि.

**घड्याळ**—कालमापनाचें यंत्र. तबकडीवर फिरणाऱ्या कांट्यांच्या साहाय्यानें तास, मिनिटें व बहुतेक सेकंद दाखविण्याची व्यवस्था केलेली असते. सर्वांत जुनीं घड्याळें म्हणजे सूर्याच्या तबकड्या–शंकुयंत्रें (सॅन्डायल) होत. त्यानंतर वाळूचीं घड्याळें निघालीं, त्यानंतर पाण्याचीं, याप्रमाणें निघून शेवटीं चक्रांच्या साहाय्यानें चालणारीं घड्याळें प्रचारांत आलीं.

हिंदुस्थानांत पूर्वी घटिकापात्रें असत. नंतर वाळूचीं घड्याळें आलीं. अद्यापिहि हीं कोठें कोठें दृष्टीस पडतात. युरोपांत बाराव्या शतकांत मठांतील घड्याळांत घंटेवर ठोके वाजत असत. चौदाव्या शतकात सध्यांच्या पद्धतीच्या घड्याळांचा थोडा अधिक मागमूस सांपडतो. डेविक नांवाच्या गृहस्थानें फ्रान्सच्या पांचव्या हेन्रीकरितां पॅरिसमध्यें १३७९ त एक घड्याळ बनविलें. त्या घड्याळाच्या नमुन्याचीं घड्याळें पुढें ३०० वर्षेपर्यंत निघत होतीं. १६५७ मध्यें हायगेन्झ या शास्त्रज्ञानें प्रथम लंबकाची रचना घड्याळामध्यें गतिदायक म्हणून केली. यानंतर लंबकाच्या पकडीमध्यें व इतर भागांत हळूहळू कांहीं सुधारणा होत गेल्या. नंतर दोन धातूंच्या संयोगानें लंबक बनविण्यांत येऊन उष्णमानाप्रमाणें त्याची लांबी कमीअधिक होण्याचें थांबविण्यांत आलें. ही गोष्ट हॅरिसन यानें १७२६ त केली. घड्याळाचे ठोके पडण्याची रचना हा वास्तविक घड्याळाचा भाग नसून ती अगदीं स्वतंत्र रचना आहे.

१८४० ते १८५० मध्यें निरनिराळ्या तऱ्हेचीं विजेनें चालणारीं घड्याळें उपयोगांत आलीं. त्यांमध्यें अलीकडे बरीच प्रगति झाली आहे. यांचेहि निरनिराळे गति मिळण्याचे चार प्रकार आहेत.

मोठें घड्याळ (क्लॉक) बरोबर वागविण्यास, खिशांत ठेवण्यास अगदीं गैरसोयीचें असल्यानें 'वॉच' किंवा खिशांतल्या घड्याळांचा प्रकार निघाला. खिशांतलें घड्याळ म्हणजे वेळ पाहण्याचें खिशांत ठेवण्याचें साधन. याचा शोध १५ व्या शतकाच्या अखेरीस न्यूरेंबर्ग येथें लागला. या घड्याळाचीं चाकें एका वाटोळ्या पंचपात्रांत किंवा पेटींत ठेवलेल्या एका पोलादी वर्तुळाकार कमानीच्या साहाय्यानें चालतात. ही कमान (स्प्रिंग)

गुंडाळून ठेवण्यांत येते. तिची उलगडण्याची गति एका समतोल चक्रानें केंसासारख्या बारीक कमानीनें आणि एका कुत्र्याच्या योगानें नियमित केली जाते. अलीकडे विनचावीच्या घड्याळें पुष्कळ प्रमाणावर तयार होत आहेत.

अणुघटिका—अणुशक्तीचा उपयोग आतां प्रात्यक्षिक व्यवहारांत करण्यांत येत आहे याचें उदाहरण म्हणजे अणुघटिका. साधारणपणें खिशांतल्या घड्याळांत आठवड्यांत अर्धा मिनिट चूक होईल इतकी पूर्णता आलेली आहे. जहाजावरचें कालदर्शक (क्रॉनॉमीटर) यापेक्षां जास्त अचूक असतें. तथापि हवामानामुळें या दर्शकात सुद्धां ज्योतिषीय चुका होत असतात. या दृष्टीनें अणुघटिका अत्यंत पूर्णतेस पोंचल्याचें दिसेल. दोन कोटीमध्यें फक्त एका ठोक्याची चूक होईल इतकी पूर्णता आलेली आहे.

ज्यात सेकंदाचेहि विभाग लागतात, त्या औद्योगिक क्रियांमध्यें या अणुघड्याळाचा फार उपयोग आहे. रेडिओ व टेलेव्हिजन यांच्या केंद्रस्थानीं ईथरचा परिणाम बाजूस सारतां येईल. ज्योतिषांना वेध घेतांना ताऱ्यांचें सूक्ष्म गणित मांडतां येईल.

या अणुघटिकेची रचना पुढील तत्त्वाप्रमाणें आहे. अणुजगतांत प्रत्येक गोष्ट आंदोलन पावत असते; पण आंदोलनाचें प्रमाण बदलत नाहीं. या आंदोलनाचें मापन आतां घेतां येऊं लागलें आहे.

**घन आनंद**—व्रज भाषेंतील हा कवि शृंगारिक काव्याबद्दल विशेष प्रसिद्ध आहे. हा मूळचा दिल्लीचा राहणारा असून जातीनें कायस्थ व निंबार्क संप्रदायी वैष्णव होता. महम्मदशहाचा मुनशी असतांना याचें सुजान नामक एका वेश्येवर प्रेम जडलें. महम्मदशहानें यास एकदां ध्रुपद गावयास सांगितलें असतां यानें त्यास नकार दिला. पण तेंच सुजाननें सांगितलें तेव्हां मात्र यानें सुजानकडे तोंड करून ध्रुपद गायिलें. हा अपमान सहन न होऊन महम्मदशहानें यास दिल्लीबाहेर हांकलून दिलें. जातांना यानें सुजानला आपल्याबरोबर चलण्यास सांगितलें असता तिनें यास नकार देऊन याची निराशा केली. विरहव्याकुल स्थितींत हा वृंदावनास गेला व राधाकृष्णाच्या नामस्मरणामध्यें रममाण झाला. सुजानसागर, रसकेलिवल्ली, विरहलीला, कृपाकांड, कोकसार, वगैरे ग्रंथ यानें लिहिले. प्रेम व विरह यांचेंच वर्णन याच्या काव्यांत विशेष दिसून येतें. नादिरशहानें मथुरा लुटली त्या गडबडींत हा मारला गेला.

**घनगतिशास्त्र**—(रिजिड डायनॅमिक्स). गतिशास्त्रांत बिंदूसारख्या सूक्ष्म पदार्थाचें स्थलांतर एवढाच प्रश्न असतो. सुबद्ध घनपदार्थांच्या गतीसंबंधीं विचार करतांना स्थलांतराबरोबर पदार्थांच्या अक्षाभोंवतींच्या भ्रमणाचा प्रश्न येतो. भोंवरा किंवा गायरोस्टॅटची गति, ग्रहांचें फिरणें, पृथ्वीच्या ध्रुवाचें भ्रमण, अयनचलन, वगैरे गोष्टी घनगतिशास्त्रांत येतात.

**घनता**—(डेन्सिटी). एखाद्या पदार्थाची घनता किंवा दार्ढ्य म्हणजे विशिष्ट घनफळामध्यें त्या पदार्थांत असलेल्या द्रव्याचें प्रमाण होय. याचा निर्देश सामान्यतः दर घनफुटास अमुक पौंड असा करतात. किंवा प्रत्येक घन-सेंटीमीटरला अमुक ग्रॅम असा करतात. याप्रमाणें पाण्याची घनता दर घनफुटास ६२·५ पौंड असते. किंवा दर घन-सेंटीमीटरला एक ग्रॅम असते. पारा पातळ असतो; परंतु त्याची घनता अनेक घनपदार्थांपेक्षां अधिक असते. पाऱ्याची घनता दर घनसेंटीमीटरला १३·६ ग्रॅम असते. पदार्थविज्ञानशास्त्रामध्यें एखाद्या पदार्थाची घनता ४° शतमान पाण्याच्या घनतेच्या ज्या प्रमाणांत असेल तिला तुलनात्मक घनता अथवा विशिष्टगुरुत्व म्हणतात. पाण्याची घनता तें ४° श. किंवा ३९° फा. उष्णतामानांत असतांना सर्वांत अधिक असते.

**घनपाठ**—वेदसंहिता पाठ करण्याचा हा एक प्रकार आहे. क्रम पाहा. मूळपाठ– पवस्व वाजसातये विप्रस्य गृणतो वृधे। सोम रास्व सुवीर्यम्।–ऋ. अ. ६.

पवस्व वाजसातये वाजसातये पवस्व पवस्व वाजसातये विप्रस्य विप्रस्य वाजसातये पवस्व पवस्व वाजसातये विप्रस्य। वाजसातये विप्रस्य गृणतो गृणतो विप्रस्य वाजसातये वाजसातये विप्रस्य गृणतः। वाजसातय इति वाजसातये। विप्रस्य गृणतो गृणतो विप्रस्य विप्रस्य गृणतो वृधे वृधे गृणतो विप्रस्य विप्रस्य गृणतो वृधे वृध इति वृधे। सोम रास्व रास्व सोम सोम रास्व सुवीर्यं सुवीर्यं रास्व सोम सोम रास्व सुवीर्यं। रास्व सुवीर्यं सुवीर्यं रास्व रास्व सुवीर्यं। सुवीर्यमिति सुवीर्यम्। असा घनपाठ म्हणतात.

**घनरसायनशास्त्र**—(स्टेरिओकेमिस्ट्री). संयुक्ताच्या अणूंच्या घनरूप मांडणीचें विवेचन करणारा रसायनशास्त्राचा एक भाग. कित्येक कार्बन संयुक्तें अशीं आहेत कीं, त्यांची अणुरूप सारणी (मोलेक्युलर फॉर्म्युला) असूनहि कांहीं बाबतींत फरक दिसून येतो. उदा.–दुधाचें दहीं करून तयार केलेल्या लॅक्टिक अम्लाचा विभक्त किरणावर (पोलराइझ्ड लाइट) कांहीं परिणाम होत नाहीं. पण तीच अणुरूपसारणी आणि त्याच रासायनिक गुणधर्म असणारें पलदुग्धिकाम्ल (सार्कोलॅक्टिक ॲसिड) विभक्त किरण उजवीकडे वळवतात. ह्या दोन अम्लांतील हा फरक त्यांच्या अणूंच्या घनरूप मांडणींतील फरकावर अवलंबून असतो. अशा प्रकारच्या विवेचनाचा पाया व्हॅनटॉफ, लॅबेल आणि पास्ट्युर यांनीं घातला. अणूंच्या ह्या घनरूप मांडणीमुळेंच चार आम्लिकाम्ल (टार्टारिक ॲसिड) ची किंवा दोन फ्यूमरिय ॲसिडची शक्यता वगैरे गोष्टी स्पष्ट करतां येतात.

**घनश्यामदास (दुसरा)** ( सु. १५५०–१६५० )— एक बंगाली कवि व नरोत्तम–विलास व भक्तिरत्नाकर या सुप्रसिद्ध ग्रंथांचा कर्ता. याचें मूळ नांव नरहर चक्रवर्ती व घनश्यामदास हें उपनांव होतें. विश्वनाथ चक्रवर्ती हे याचे गुरु. ब्राह्मण असूनहि यानें एका शूद्रास आपला गुरु केलें होतें. आपल्या गुरूचें जीवनचरित्रहि यानें लिहिलें. यानें लिहिलेली भगवद्गीतेवरील टीका वैष्णव संप्रदायामध्यें प्रमाण मानली जाते. यानें कांहीं किरकोळ कविताहि लिहिल्या.

**घनाकृति अथवा त्रिपरिमाणात्मक चित्रकला**— ( क्युबिझम् ). या चित्रकलापद्धतीचा पुरस्कार प्रथम सेझाने या फ्रेंच चित्रकारानें केला. याची प्रथम मायूज या फ्रेंच चित्रकारानें चेष्टा केली, परंतु या चित्रकलापद्धतीचा प्रसार पुढें इंग्लंड, जर्मनी व अमेरिका यांमध्यें सर्वत्र झाला. ही पद्धति पूर्वकल्पनावादी (इंप्रेशनिझम्) चित्रकलापद्धतीच्या विरुद्ध प्रतिक्रिया म्हणून प्रचारांत आली. या पद्धतीमध्यें चित्राच्या आकृतीवरून केवळ डोळ्यांना दिसणाऱ्या वास्तवतेचा बोध व्हावा एवढेंच नव्हे तर त्यापासून चित्रकाराच्या मनांत ज्या भावना उत्पन्न होतात व जे संस्कार होतात त्यांचें ज्ञान व्हावें हा चित्राचा उद्देश असावा असें मानण्यांत येतें. सेझाने यानें त्रिपरिमाणात्मक चित्रें काढून निसर्गींतील आंतरवास्तवता व तालबद्धता चित्रिण्याचा प्रयत्न केला. तो केवळ नैसर्गिक दृश्यांवरच अवलंबून असे. परंतु अनेक त्रिपरिमाणात्मक चित्रकार अमूर्त व स्वेच्छाकल्पित घटना किंवा आकृतींचीं चित्रें काढूं लागले, त्यामुळें त्यांचीं चित्रें म्हणजे एक प्रकारच्या दृश्य संगीताचें स्वरूप पावलीं. पाब्लो पिकासो या चित्रकारामध्यें नैसर्गिक दृश्यांकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ति विशेष दिसून येते, व त्यानंतर रंगसंगतीकडे विशेष लक्ष देणाऱ्या फ्रेंच 'ऑर्फिस्ट' संप्रदायामध्यें तर ही फारच पुढें गेलेली दिसून येते. या पद्धतीचे बरेच चित्रकार फ्रान्समध्यें होऊन गेले. इंग्लंडमध्यें रॉजर फ्राय, डंकन ग्रांट, विंढाम ल्युइ, वगैरे या पद्धतीचे पुरस्कर्ते आढळतात.

**घनी** ( मृ. १६६८ )—एक फारशी कवि. मिर्झा महंमुद ताहीर हें त्याचें मूळ नांव होतें. त्याला बहुतेक घैनी काश्मिरी असें म्हणत असत; कारण तो काश्मीरचा रहिवासी होता. त्यानें 'दिवाण घनी' नांवाचें एक काव्य केलें आहे. मरणाच्या वेळीं तो अगदीं तरुण होता. अठरा वर्षेंपर्यंत त्याची कवित्वाबद्दल ख्याति झाली होती. कवितेंत तो कधीं कधीं ताहीर असेंहि आपलें नांव घालीत असे.

**घर**—वैदिक वाङ्मयांत गृह हा शब्द बऱ्याच वेळां एकवचनी व त्यापेक्षां अधिक वेळां अनेकवचनी आला असून त्यानें वेदकालीन आर्यांच्या गृहरचनेचा बोध होतो. घरामध्यें मोठ्या थोरल्या कुटुंबाचाच समावेश होतो असें नसून गुरेंढोरें व मेंढ्या यांचेंहि तें रात्रीं आश्रयस्थान असे. अनेकवचनी प्रयोगावरून घराला पुष्कळशा खोल्या असाव्यात, तें चांगलें बंदहि करितां येत असावें. दाराचा (द्वार, द्वार्) उल्लेख पुष्कळ वेळां आला असून या द्वारावरूनच घराला दुरोण हें नांव मिळालें. प्रत्येक घरांत अग्नि नेहमीं प्रदीप्त असे. त्या वेळच्या गृहरचनेविषयीं फारशी माहिती मिळत नाहीं. कदाचित् दगडाचा उपयोग न करतां मेगॅस्थेनीजच्या वेळेप्रमाणें लांकडाचा उपयोग करीत असावेत. घराच्या संबंधानें हविर्धान ( यज्ञीय हविर्द्रव्य ठेवण्याची जागा ); अग्निशाला ( अग्नीची जागा ); पत्नीनाम सदन ( गृहिणीची खोली ); आणि सदस् ( बसण्याची खोली ) हे शब्द आले आहेत. हे शब्द जरी यज्ञसंबंधीं असले तरी ते घराचे भाग असल्याचा त्यांच्या नांवावरून बोध होतो. शिंकी किंवा लोंबतीं भांडीं ( शिक्य ) यांचाहि उल्लेख आहे. घराच्या भिंती पुऱ्या करण्याकरितां वेतकामाचाहि ( इट ) उपयोग करीत असल्याचा उल्लेख आहे. घराच्या बाजूंना पक्ष असें म्हणत. चौकटीसह दरवाजाला 'आता' हें नांव आहे.

सर्व देशांत निरनिराळ्या काळांत अगदीं खोपटापासून भव्य राजवाड्यापर्यंत घरांचे सर्व प्रकार तयार होत गेलेले आहेत. थंडी, वारा, पाऊस, ऊन, इ. पासून फक्त संरक्षण ही अगदीं सामान्य कल्पना ठेवून आजहि असंख्य लोक खोपट्यांतून राहतच आहेत. त्याच्याउलट गृहरचनेंत शिल्पाचा उत्कृष्ट विकास झालेलाहि कित्येक ठिकाणीं दिसेल. भटक्ये भिकारी सोडून दिल्यास प्रत्येकाला घर हें असतेंच. समाज जसजसा सुधारत जातो तसतशा प्रमाणांत घरांच्या बाबतींतहि फरक पडत जातोच. औद्योगिक क्षेत्रांतून कामकऱ्यांना, मजुरांना राहण्यासाठीं जवळपास सोयीचीं घरें बांधून देण्याची पद्धति सरकारी कायद्यामुळें अमलांत आलेली दिसेल. रेल्वे-कामगार, गिरणी-कामगार, कारखान्यांतील मजूर यांच्या राहण्याची व्यवस्था मालकांना करावी लागते.

युद्धाच्या काळांत मोठाल्या शहरांतून घरांचा फार तुटवडा पडतो. त्या वेळीं सरकार घरें बांधण्याची, आहेत तींच घरें भाडेकऱ्यांना ठराविक प्रमाणांत भाड्यानें देण्याची व्यवस्था करीत असतें. घरें बांधून देणाऱ्या सहकारी संस्थाहि असतात.

इंग्लंडमध्यें राहत्या घरांचा तुटवडा औद्योगिक क्रांति झाली तेव्हांपासून भासूं लागला. आणि हा प्रश्न सोडविण्याकरितां मोठाल्या वस्तीच्या औद्योगिक कारखान्याच्या शहरानजीक लहान लहान खेडीं वसविण्यास सुरुवात झाली. या उपाययोजनेमुळें शहरांतील दाट वस्ती, आणि दाटीदाटीनें बांधलेल्या

इमारती आणि त्यामुळें उत्पन्न होणारी आरोग्यविघातक परिस्थिति यांमधून मार्ग काढण्यांत आला. हीं नवीं खेडीं कशीं पद्धतशीर बांधावीं आणि पूर्वीच्या शहरांत कशी सुधारणा करावी हे दोन महत्त्वाचे प्रश्न सरकारपुढे होते. १८७४ पर्यंत इमारतीच्या बांधकामासंबंधींचे सर्व कायदे निर्बंधक स्वरूपाचे होते. १८९० सालीं हौसिंग ऑफ दि वर्किंग क्लासेस ॲक्ट हा कायदा झाला, व १९०९ सालीं हौसिंग ॲंड टाउन प्लॅनिंग ॲक्ट करण्यांत आला. आणि तेव्हांपासून टाउन प्लॅनिंगची योजना अमलांत येऊं लागली. उद्याननगरें ( गार्डन सिटीज् ) यापूर्वीच अस्तित्वांत आलीं होतीं.

१९१४ ते १९१८ सालीं पहिल्या महायुद्धाच्या वेळीं नवीं घरें बांधण्याचें काम अजीबात बंद पडले. १९१९ सालीं असा कायदा करण्यांत आला कीं, प्रत्येक जिल्ह्यांतील स्थानिक *अधिकाऱ्यांनीं त्या भागांतील मजुरांच्या राहण्याच्या सोयी* कराव्या. नव्या इमारतींचे नकाशे आरोग्यखात्यानें स्थानिक अधिकाऱ्याकडे पाठविले. परंतु पैशाचा व मजुरांचा तोटा पडल्यामुळें फारशा नव्या इमारती बांधतां आल्या नाहींत. तथापि ऐषआरामाच्या इमारती ( लक्झरी बिल्डिंग्ज ) बांधूं नयेत असें नियंत्रण सरकारनें घातलें. १९२५ सालीं कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारारूढ झाल्यावर मागील सर्व कायदे एकत्र करून नवा हौसिंग ॲक्ट करण्यांत आला व स्टील हौसचा नमुना तयार करून १९२५ सालीं अशीं घरें बांधून देण्याचें काम सरकारनें हातीं घेतलें. त्या कामाकरतां १९२५ सालीं ८६,५०,००० पौंड मंजूर करण्यांत आले. घाणेरडी वस्ती नाहींशी करण्याबाबत सरकारनें १९३३ ते १९३८ पर्यंत फार प्रयत्न केले. चांगलीं घरें बांधण्यासाठीं सरकारनें लोकांना कर्जेहि दिलें.

दुसऱ्या महायुद्धानंतर तर घराचा प्रश्न फार तीव्रतेनें पुढें आला. युद्धकालांत बरींच घरें पडलीं, जळलीं व पार धुळीस मिळालीं. मोठाल्या शहरांतून निर्वासितांची वस्तीहि वाढली. तेव्हां सरकारनें अनेक योजना आंखल्या. मालांवर नियंत्रण ठेवलें. नवीन घरें तयार केलीं. तथापि सर्वांची सोय झालीच नाहीं. त्यामुळें गृहहीन लोकांमध्यें बंडखोर वृत्ति उत्पन्न झाली. सरकारला तिला शस्त्रप्रतिकारानें तोंड द्यावें लागलें.

ही जी इंग्लंडमधील स्थिति तीच इकडे हिंदुस्थानांत दिसेल. त्यांतून पाकिस्तान व मुसलमानी संस्थानें यांतून हिंद संघराज्यांत आलेल्या निर्वासितांच्या राहण्याची तरतूद करण्याची मोठी जबाबदारी सरकारवर पडली आहे. तात्पुरत्या छावण्या टाकल्या आहेत. चाळी बांधणें चालू आहे. तथापि सर्व लोक चांगल्या प्रकारें घरांतून नांदूं लागण्यास पुष्कळ अवधि लागेल.

**घरफोडी**—इंग्रजी कायद्यांत या गुन्ह्याची व्याख्या अशी आहे कीं, एखाद्या घरांत किंवा इतर कोणत्याहि इमारतींत गुन्हा करण्याकरितां तें घर फोडून आंत शिरणें. घर फोडणें याचा कायदेशीर अर्थ असा आहे कीं, घराला लावलेलें कुलूप फोडून घरांत शिरणें, किंवा घराची खिडकी मोडून किंवा घराच्या कोणत्याहि भागाची मोडतोड करून घरांत शिरणें. या गुन्ह्याला कमाल शिक्षा चौदा वर्षें सक्त मजुरी आहे. रात्रीं नऊ वाजल्यासून सकाळीं सहा वाजेपर्यंत केलेल्या घरफोडीच्या गुन्ह्याला रात्रीची घरफोडी ( बर्ग्लेरी ) म्हणतात. अशा गुन्ह्यांचा अंतर्भाव आपल्याकडे इंडियन पिनल कोडांत केलेला आहे. ( इंडियन पिनल कोड ४५३।४५६ कलमें पहा ).

रात्रीची घरफोडी—या गुन्ह्याची व्याख्या अशी आहे कीं, दुसऱ्याच्या घरांत रात्रीच्या वेळीं मोठा गुन्हा करण्याच्या हेतूनें घरफोडीचा गुन्हा करून घरांत शिरणें. हा गुन्हा होण्याकरितां घर फोडणें आणि घरांत शिरणें हीं दोन्ही कृत्यें व्हावीं लागतात. घर फोडून घरांत शिरणें हीं कृत्यें रात्रीं केलीं तर त्याला 'बर्ग्लेरी' म्हणतात आणि रात्र या शब्दाची कालमर्यादा इंग्लंडच्या कायद्यानें रात्रीं नऊ वाजल्यापासून सकाळीं सहा वाजेपर्यंत, अशी ठरविली आहे. या गुन्ह्याला कमाल शिक्षा हयातीपर्यंत सक्त मजुरीची कैद ही सांगितली आहे. इंडियन पिनल कोडामध्यें या गुन्ह्याला, ( कलम ४४६ ) लहानमोठा गुन्हा असेल त्या मानानें, (अशा घरफोडीला) कमजास्त शिक्षा असून जास्तींत जास्त शिक्षा जन्मठेप काळें पाणी ही आहे ( कलमें ४५६ ते ४६० ).

**घर्षण**—( फ्रिक्शन ). जेव्हां एखादा पदार्थ दुसऱ्या पदार्थावरून चलन पावतो किंवा चलन पावण्याच्या प्रवृत्तींत असतो तेव्हां त्या ठिकाणीं घर्षणशक्तीचें कार्य होत असतें. घर्षणशक्ति ही नेहमीं गतीस प्रतिबंध करीत असते. जेव्हां घर्षणशक्तीमुळें गतीस पूर्ण प्रतिबंध होतो तेव्हां तीस स्थिर अथवा स्थितिघर्षण ( स्टॅटिक फ्रिक्शन ) असें म्हणतात. जेव्हां एक वस्तु दुसऱ्या वस्तूवरून घसरते तेव्हां त्या शक्तीस गतिघर्षण ( कायनेटिक फ्रिक्शन ) असें म्हणतात. स्थितिघर्षणाची किंमत शून्यापासून कमाल मर्यादेपर्यंत कोणतीहि असूं शकते व जेव्हां ही कमाल मर्यादा गांठली जाते तेव्हां घसरण्याची क्रिया सुरू होते. यावरून या कमाल मर्यादेस घर्षणमर्यादा असें म्हणतात. ज्या दोन पदार्थांच्या पृष्ठभागांचा संयोग होतो त्या पृष्ठभागांशीं असलेल्या लंबाच्या किंवा काटकोनांत असलेल्या दाबाच्या प्रमाणांत घर्षणशक्ति असते व ही घर्षणशक्ति आणि काटकोनांतील दाब यांमधील प्रमाणास घर्षणगुणक ( कोएफिशंट फ्रिक्शन) असें म्हणतात. घर्षणशक्ति ही घासणाऱ्या पृष्ठभागाच्या क्षेत्रावर

अवलंबून नसते व जेव्हां गति उत्पन्न होते तेव्हां अगदीं मंद प्रमाणांत असलेली गति सोडली तर घर्षणशक्ति ही घसरण्याच्या गतीवरहि अवलंबून नसते.

**घसा**— तोंडाची पोकळी आणि कंठनालिका यांच्या मध्यभागीं जी एक स्नायूंची पिशवी असते तिला घसा असें म्हणतात. ही नसराळ्याच्या आकाराची असून ही चार इंच लांब असते. घशाला सुजणें, आंत गांठी येणें, वगैरे विकार होतात. घशांतील गांठींमुळें श्वासोच्छ्वासाला त्रास होतो. घसा पोळणें (स्काल्ड) हा रोग लहान मुलांना फार होतो.

**घळसासी, गोपाळाचार्य** (१८१७-१८९७)— एक महाराष्ट्रीय संस्कृतपंडित व धर्मशास्त्रज्ञ. हे प्रथम विश्रामबाग पाठशाळेंत अध्यापक होते. पुढें ग्वाल्हेरीस जाऊन राहिले. यांनीं पुनर्विवाह, परदेशगमन, इ. प्रकरणीं निषेधपर निर्णय दिले आहेत. यांना सरकारकडून 'महामहोपाध्याय' पदवी मिळाली होती. यांची शिष्यशाखा मोठी होती. यांनीं शेखर-भागवत-कुलदेवतादि बारा भूषणग्रंथ, सदाचारचंद्रिका, इ. ग्रंथरचना केली.

**घाट**—१. दक्षिण हिंदुस्थानच्या पूर्व व पश्चिम या दोन्ही बाजूंस विशाल तटासारखे थेट दक्षिणेपर्यंत जाऊन एकमेकांस मिळणारे पूर्वघाट व सह्याद्रि नांवाच्या दोन पर्वतराजी आहेत. पूर्वघाट हे तुटक तुटक आहेत व ते आणि समुद्र यांच्या दरम्यानची पट्टी बरीच रुंद असल्यानें व देशाच्या इतर भागांतूनहि तिकडे जाण्या-येण्यास सोप्या वाटा असल्यानें इकडील संस्कृतीचा प्रसार तिकडे होण्यास संधि मिळे. सह्याद्रि व समुद्र यांच्यामधील पट्टी अरुंद व तिच्या माथ्यावरील प्रदेशांशीं दळणवळण कमी; यामुळें येथील लोकांची संस्कृति स्वतंत्र असे. पश्चिम घाट (सह्याद्रि) फार उंच व एकसारखा असल्यानें देशबाजूच्या बहुतेक सर्व नद्या पूर्ववाहिनी झाल्या आहेत. दक्षिणेंत जेथें या दोन पर्वतराजी भेटतात तेथील पठार २ हजारपासून ३ हजार फुटांपर्यंत उंच आहे. ह्यांतील प्रसिद्ध पर्वत नीलगिरि आहे. पूर्वघाटावर झाडी फार कमी असून पाऊस ४० इंच पडतो. तर पश्चिम घाटांत पाऊस १०० ते ३०० इंच पडतो. या सह्याद्रि पर्वतांवर झाडी फार आहे. खालीं (३) पाहा.

२. नदीचें पाणी घेणें सुलभ जावें, नदींतून वर खालीं जातां येतां यावें यासाठीं नदीच्या कांठावर दगडी पायऱ्या ज्या बांधलेल्या असतात त्याला घाट म्हणतात. घाटांचें महत्त्व महाराष्ट्रांतच फार आहे. उत्तर हिंदुस्थानांत गंगा, यमुना, वगैरे पवित्र नद्यांना उंच उंच घाट आहेत तर महाराष्ट्रांतील नद्यांना जे ठिकठिकाणीं घाट बांधलेले आहेत ते अगदीं कमी उंच म्हणजे सपाट असे दिसतील. या घाटांचा उपयोग स्नानसंध्यादि नित्यकर्मे उरकणें, धुणें, भांडीं घासणें, नावांचे धक्के म्हणून असणें, अशा कित्येक कामीं होतो. पूर्वी घाट बांधणें हें एक पुण्यकर्म समजत. त्यांतून काशी, नाशिक, पैठण, इ. सारख्या पवित्र क्षेत्रीं घाट बांधणें हें तर अत्यंत पुण्यप्रद मानीत. या घाटांवर देवळें व ओऱ्या असतात. त्यामुळें एक विशेष महत्त्व त्यांना येतें. या घाटांचा उपयोग गांवकऱ्यांना अनेक प्रकारें होतो. कित्येक जुन्या घाटांवर शिलालेख असतात.

३. पर्वत-डोंगर ओलांडून जावयाच्या रस्त्यालाहि घाट म्हणतात. देशावरून कोंकणांत जावयाचें म्हणजे मध्यंतरीं सह्याद्रि पर्वत लागतो. कुलाबा व ठाणें जिल्ह्याची एक सरहद्द सह्याद्रि पर्वतानेंच आंखली गेली आहे. या पर्वतावरून पलीकडे येण्याकरितां जे मार्ग आहेत त्यांस घाट असें म्हणतात. असे हे घाट ठिकठिकाणीं आहेत. पेशवाई गेल्यानंतर इ. स. १८२६ त सरकारनें या रस्त्यांची मोजणी केली. महाबळेश्वरपासून राजमाचीपर्यंत जे घाट आहेत त्यांचीं नांवें:—

पारघाट—महाडच्या आग्नेयीस सुमारें १५ मैलांवर किनेश्वरजवळ आहे. हा केवळ पायरस्ता असून येथून महाबळेश्वरास जातां येतें. इ. स. १८२६ मध्यें वंजारी लोक या मार्गानें कोंकणांतून धान्य व मीठ नेत असत, अशी माहिती मिळते.

फिट्झजेरल्ड घाट—पारघाटाच्या उत्तरेस अर्ध्या मैलावर कापडें खुर्द या खेड्याजवळ हा घाट आहे. साताऱ्यास जाणाऱ्या मार्गावर हा घाट आहे. येथून व्यापार बराच चालतो. महाडहून वांई व नहर येथें आणि वांई व नहरहून महाड येथें दरवर्षी व्यापाराकरितां पुष्कळ माल येतो. कापडें येथें दस्तुरी होती.

ढवळा आणि कामठा घाट—फिट्झजेरल्ड घाटाच्या उत्तरेस सुमारें ५॥ मैलांवर आहेत. हे फक्त पायरस्ते असून यांचा कोणी फारसा उपयोग करीत नाहीं. या मार्गानें भोर संस्थानांतून वांई येथें जातां येतें.

वरंधा घाट—कामठा खिंडीच्या उत्तरेस पांच मैलांवर वरंधा नांवाच्या खेड्याजवळ एक घाट आहे. या घाटांतून हिरडोशी भोर या गांवावरून पुण्यास रस्ता जातो. इ. स. १८६७ मध्यें हा रस्ता तयार झाला. या घाटांतून बराच व्यापार होतो. वरंधा घाटाच्या उत्तरेस पाव मैलावर माझेरीजवळ एक घाट आहे. पायरस्त्याप्रमाणेंच याचा उपयोग होतो.

गोप्या घाट—उंबर्डे घाटाच्या उत्तरेस चार मैलांवर शिवथरजवळ गोंदे-पुणें रस्त्यावर हा घाट आहे.

आंबेनाळ घाट—गोप्या घाटाच्या उत्तरेस एक मैल आंबे-शिवथरजवळ हा घाट आहे. येथून पुण्यास जाण्यास मार्ग आहे. परंतु व्यापाराकरितां याचा कोणी उपयोग करीत नाहीं.

मळ्या घाट— आंबेनाळ घाटाच्या उत्तरेस एक मैलावर वाकी बुद्रुख खेडयाजवळ हा घाट आहे. येथून पुण्यास जाण्यास मार्ग आहे.

शेवत्या घाट—मळ्या घाटाच्या उत्तरेस अर्ध्या मैलावर हा घाट आहे. येथून भोर संस्थानांतील पांगारा व तोरणा या गांवांवरून पुण्यास जाण्यास मार्ग आहे.

कावळ्या घाट—शेवत्या घाटाच्या उत्तरेस सहा मैलांवर हा घाट आहे. येथून फक्त पायरस्ता आहे.

कुंभ घाट— कावळ्या घाटाच्या उत्तरेस आठ मैलांवर आहे. मशीदवाडी रस्त्यांतून हा रस्ता जातो. फक्त पायरस्ता आहे.

लिंग घाट— कुंभ घाटाच्या उत्तरेस चार मैलांवर लिंग घाट आहे. येथून ओझीं लादलेलीं जनावरें येऊं शकतात.

निसणी घाट— लिंग घाटाच्या उत्तरेस दोन मैलांवर हा घाट आहे. हा फक्त पायरस्ता असून चढ अतिशय आहे.

ताम्हाणे, देवस्थळी व थिव घाट— निसणी घाटाच्या उत्तरेस सहा मैलांवर, माणगांवच्या ईशान्येस १४ मैलांवर असलेल्या विळे खेडयाच्या सरहद्दींत हे घाट आहेत. हे फक्त पायरस्ते आहेत.

पिंपरी घाट—ताम्हाणे घाटाच्या उत्तरेस चार मैलांवर पिंपरी घाट आहे. येथून ओझीं लादलेलीं जनावरें येऊं शकतात. हा घाट फार वापरण्यांत आहे.

या घाटांपैकीं फिट्झजेरल्ड घाट, वरंधा घाट, पिंपरी घाट, आंबोली घाट, तळ घाट, बोर घाट, नाणे घाट, कसुर घाट, वगैरे घाटांतून बैलांवरून व्यापार होत असे. बाकीचे बहुतेक घाट फक्त पायरस्ते होते.

ठाणे जिल्ह्याच्या पूर्वेकडील सरहद्दीवर ११५ मैल सह्याद्रि पर्वत आहे. या भागावर असलेले घाट खालीं लिहिल्याप्रमाणें:—

आंबोली घाट—यानें त्रिंबकहून मोखाडयास जातां येतें. घाट सोपा आहे. चंद्रे मेट आणि हुंबे मेट हे दोन मार्ग त्रिंबकहून मोखाडयास जाण्याकरितां आहेत. चंद्रे मेट सोपा आहे. हुंबे मेट हा फक्त पायरस्ता आहे.

गोंदे घाट— त्रिंबकहून जव्हारला जाण्याची वाट. जव्हार संस्थानातील बराच व्यापार या घाटांतून होत असे.

शीर घाट— त्रिंबकहून वसईस जाण्याकरितां हा घाट होता. हल्लीं येथून गाडया जाऊं शकतात. वंजारी लोक बैलांवरून नाशिक येथून भिवंडी व वाडा येथें माल नेत असत.

तळ घाट— कसारा आणि इगतपुरी यांच्या दरम्यान हा खडी घातलेला रस्ता आहे. इ. स. १८२६ मध्यें हा सर्वांत सोपा रस्ता होता. बैलगाडया येथून जात असत. हल्लीं रेल्वे झाल्यामुळें या मार्गावरून व्यापार कमी होतो.

पिंपरी घाट—नाशिकहून वसई किंवा कल्याण येथें जाण्यास हा घाट फार सोयीस्कर होता.

चोंढे-मेंढे घाट—अहमदनगर जिल्ह्यांतील अकोला व राजूर गांवांहून शहापूर व भिवंडी येथें जाण्याकरितां याचा उपयोग होत असे. या मार्गानें धनगर लोक कोंकणांत मेंढरें व बकरीं विकावयास घेऊन येत.

सादे घाट—अकोला तालुक्यांतून मुरबाड तालुक्यांत या घाटानें उतरतां येत असे. हा अतिशय कठिण रस्ता होता. दरोडेखोरांच्या टोळ्या कोंकणांत दरोडे घालण्याकरितां याचा उपयोग करीत.

निसणी घाट— मुरबाड तालुक्यांतून जुन्नर तालुक्यांत जाण्याकरितां हा आहे. हाहि फार अवघड आहे. पायरस्ता म्हणून देखील कोणी हल्लीं हा फारसा उपयोगांत आणीत नाहीं.

माळसेज घाट— अहमदनगरहून कल्याणास जातांना लागणारा घाट. येथून हत्ती, उंट जाऊं शकत असत.

भोरांडे घाट— मुरबाड तालुक्यांतून जुन्नर तालुक्यांत जाण्याकरितां तळघाट आणि बोरघाट यांच्या खालोखाल या घाटाचा उपयोग होत असे.

पलु घाट—कल्याण ते जुन्नर पायरस्ता.

कुटे घाट— मुरबाड तालुक्यांतून खेड तालुक्यांत जाण्याकरितां हा आहे. हा फार अवघड असून फक्त कोळीच याचा उपयोग करतात.

गोवेली घाट— मुरबाड तालुक्यांतून खेड तालुक्यांत जातो. हा अवघड पायरस्ता आहे.

अवापे घाट—हा पायरस्ता असून, मुरबाड तालुक्यांतून खेड तालुक्यांत जातो.

शिदगड घाट— वरीलप्रमाणेंच आहे.

भीमाशंकर— देशावरून पनवेलपर्यंत जाणारा रस्ता. पूर्वी या घाटानें गूळ वगैरे कोंकणांत येत असे.

कसुर घाट— हा सुस्थितींत आहे.

राजमाची घाट— यास कोंकण-दरवाजा म्हणत.

**घाटगे घराणें**—मराठे सरदारांतील एक प्रमुख घराणें. मूळ गांव खटाव. प्रथम मलवडीचे देशमुख असून नंतर यांना माण प्रांताची सरदेशमुखी मिळाली. यांच्यांत नागोजी घाटगे यानें बरेंच शौर्य गाजवून 'झुंजारराव' हा किताब मिळविला. सर्जेराव हाहि विजापूरकरांकडून मिळालेला किताब आहे. सखाराम ऊर्फ सर्जेराव घाटगे याचें चरित्र स्वतंत्र दिलें आहे. कागल जहागिरी घाटगे घराण्याकडे आहे.

**घाणेल**—(फ्युझेल ऑइल). साखर आणि धान्यसत्त्व (स्टार्च) ह्यांपासून तयार केलेल्या मद्यार्काला (अल्कोहोलला) शुद्ध

करतांना मिळणारा हा दुर्गंधी द्रवरूप पदार्थ आहे. ह्याला स्वतःला वाईट वास येत असला तरी रासायनिक क्रियेनें ह्याच्यापासून फळांतल्यासारखीं कृत्रिम सुगंधी द्रव्यें तयार करतां येतात. त्यांत मुख्यतः केलिलमचें ( ॲमिल अल्कोहोल्स ) असतात.

**घातगणित**—( लॉगॅरिथम ). आपण वापरतों हे अंक दहाच्या घातामध्यें लिहितां येतात.

$१०^{२} = १००$

१०० ही संख्या १० चा द्वितीय घात आहे.

$२७.८१ = १०^{१.४४४२}$ प्रत्येक संख्येचे हे घात गणित करून काढतात व त्यांचीं छापलेलीं कोष्टकें मिळतात. त्या कोष्टकांच्या साहाय्यानें गुणाकार, भागाकार, वर्ग, वर्गमूळ वगैरे थोड्या श्रमांत करतां येतात.

$$\frac{२७.८१}{३.५७८} = \frac{१०^{१.४४४२}}{१०^{.५५३७}} = १०^{.८९०५} = ७.७७१.$$

$१०^{२} = १००$ यांत १०० ही संख्या, १० हा पाया ( base ) व २ हा घात आहे. घात १०० = २ ( log १०० = २ ) जर $अ^{क्ष} = स^{१०}$ असें असेल तर $घा_{अ}\, स^{१०} = क्ष$; साधारणपणें व्यवहाराकरितां १० हा पाया धरतात, परंतु तात्त्विक गणितांत—

$$e = १ + \frac{१}{१} + \frac{१}{१ \times २} + \frac{१}{१.२.३} \cdots \text{ अनंत } =$$
२.७१८२८१८२८५.

**घातसिद्धान्त**—( एक्स्पोनेन्शिअल थिअरम )—

$अ^{क्ष} = न$ ह्या समीकरणांत क्ष हा न चा घातांक आणि अ हा त्याचा पाया. सर्वसाधारणपणें १० व नेपियरचा e ( ई ) हे घातांकांत पाया म्हणून घेतात.

$$ई^{क्ष} = १ + क्ष + \frac{क्ष^{२}}{१ \times २} + \frac{क्ष^{३}}{१ \times २ \times ३} + \cdots$$

$$\frac{क्ष^{न}}{१ \times २ \times ३ \cdots \times न \ldots} + \text{ इत्यादि.}$$

हा घातसिद्धान्त. क्ष = १ घ्यावा म्हणजे—

$$e = ई = १ + १ + \frac{१}{१ \times २} + \frac{१}{१ \times २ \times ३} +$$

$$\frac{१}{१ \times २ \times ३ \times ४} \cdots \frac{१}{१ \times २ \cdots \times ३ \times न} + \ldots \text{इत्यादि.}$$

ई (e) ही संख्या पूर्णांक किंवा अपूर्णांकांच्या साहाय्यानें बरोबर मांडतां येत नाहीं. पांच दशांशस्थळांपर्यंत ई = २.७१८२८.



**घानची**—घांची. मुंबई इलाख्यांतील एक तेली जात. हें घाणी या शब्दापासून ज्ञातिनाम बनलेलें दिसतें. गुजराथेंतील शहरें व मोठालीं खेडीं यांमध्यें हे लोक आढळतात. यांचीं आडनांवें रजपुत आहेत. हे मुख्यत्वेंकरून तेली आहेत; कांहीं धान्य व भाजीपाला विकतात व कांहीं शेतकरीहि आहेत.

**घाम**—धर्मग्रंथींपासून होणाऱ्या स्रावास घाम असें म्हणतात. या धर्मग्रंथी शरीराच्या कातडींत असतात. मनुष्याच्या शरीरांतून २४ तासांत दोन पौंड घाम बाहेर पडतो असा अंदाज आहे. या घर्मस्रावाचें नियमन कांहीं विशिष्ट मज्जातंतूकडून होत असतें व त्यास कमी जास्त उत्तेजन मिळेल त्याप्रमाणें ही क्रिया घडत असते. कांहीं औषधांच्या योगानें या मज्जातंतूंस बधिर केलें असतां घर्मस्राव कमी होतो. मनुष्याच्या घामास एक विशिष्ट तऱ्हेचा वास येतो, तो खारट असतो व त्याचें विशिष्टगुरुत्व १.००५ इतकें असतें. यामध्यें मुख्यतः पाण्याचा अंश असून कित्येक लवणें व चरबी व शरीरांतून बाहेर पडणारा मळ आणि मूत्रक्षारा( युरीया )चा कांहीं अंश असतो. या स्रावामुळें शरीरांतील मल बाहेर पडून जातो. तापांत घाम येऊन ताप कमी होण्यासाठीं घामाचीं औषधें देतात.

**घामाची पूड**—( फेनॅसेटिन ). हा एक पांढरा स्फटिकमय रासायनिक पदार्थ असून ताप उतरण्याकरितां याचा उपयोग करण्यांत येतो. हा कर्बाम्ला( कॉर्बोलिक ॲसिड )पासून तयार करतात.

**घामोळें**—या रोगामध्यें शरीराच्या चामडीवर पुटकुळ्या व फोड उठतात व खाज सुटूं लागते. हा विकार गोऱ्या लोकांस उष्णकटिबंधामध्यें विशेषेंकरून होतो. याकरितां फार व्यायाम करणें, गरम पेय पिणें, व मद्यप्राशन करणें या गोष्टी टाळाव्यात.

**घायपात**—ही वनस्पति मूळची दक्षिण अमेरिकेंतील होय. साधारणतः उष्ण प्रदेशांत ही आढळते. हिला जमीन कोरडी व खडकाळ लागते. हिच्या बऱ्याच जाती आहेत. कुंतल जातीचा उपयोग कुंपणासाठीं करतात. यापासून दोर ( वाख ) काढतात. रामचन्सी केवडा म्हणून एक जात आहे. तिचा वाख चांगला निघतो. दोराखेरीज याचा औषधी उपयोगहि आहे. घायपाताचा कागदहि करतात. या झाडाची पूर्ण वाढ होण्यास फार वर्षें लागतात.

**घायमारी**—हीं झाडें ओलसर जमिनींत होतात व यांची उंची साधारण दोन हात असते. आकार पानफुटीसारखाच असतो. याच्या पाल्याचा रस काढून जखमेवर लावल्यास जखम लवकर भरून येते. रक्तातिसारावरहि रस देतात.

**घार**—हा ससाण्याच्या वर्गांतील पक्षी आहे. ससाण्यापेक्षां याची शेपटी लांब असून तिच्या दोन शाखा असतात. तसेंच

याचे पंख लांब असून प्राय आंखूड असतात. याची चोंच व नखें कमी तीक्ष्ण असतात. हे युरोप, उत्तर आफ्रिका, सीरिया व आशियामायनर यांमध्यें आढळतात. यांची एक जात हिंदुस्थानांत असून ते बऱ्याच घाणेरड्या वस्तू खाऊन साफ करतात. आकाशांत भराऱ्या मारतांना एकदम खालीं येऊन मेलेले उंदीर, साप, पांखरें वगैरे उचलून नेतात. इतर पदार्थांवरहि झडप घालून केव्हांच ते पळवितात. घारीची एक जात काळी व दुसरी पांढरट पिवळी असते. दुसरीला 'ब्राह्मणी घार' म्हणतात. ही बहुधा पाण्याच्या ठिकाणीं असते.

**घारगड किल्ला**— मुंबई, नाशिक जिल्हा, त्र्यंबकेश्वराच्या पूर्वेस ६ मैलांवर समुद्रसपाटीपासून ३५७२ फूट उंचीवरील किल्ला. खालच्या भागाची चढण सोपी आहे. माथ्यावर जागा थोडी आहे. वर पाणी विपुल असून दोन दरवाजे व कांहीं घरें आहेत. हा किल्ला त्र्यंबकेश्वराबरोबर जे १७ किल्ले ब्रिटिशांच्या स्वाधीन झाले त्यांपैकीं एक होय.

**घारापुरीचीं लेणीं**—मुंबई, अपोलो बंदराच्या ईशान्येस सहा-सात मैलांवर हीं लेणीं आहेत. घारापुरी बेट असून त्यावर थोडी आगरी वगैरे लोकांची वस्ती आहे. मुंबईहून लहान आगबोटी घारापुरीला जातात. या बेटाला 'एलेफंटा' हें नांव राजघाटाजवळ पूर्वीं असलेल्या मोठ्या हत्तीवरून मिळालेलें दिसतें. हा भंगलेला हत्ती आतां मुंबईस राणीच्या बागेंत आहे. याला 'श्रीपुरी' असेंहि जुनें नांव होतें. हें बेट इ. स. दहाव्या शतकापर्यंत मौर्य राजांकडे होतें; पुढें चालुक्य, राष्ट्रकूट, यादव व मुसलमान याप्रमाणें सत्तांतर झालें. १५३४ त पोर्तुगीजांकडे गेल्यावर त्यांनीं या ठिकाणची फार नासधूस केली. शिवाजीच्या काळांत तें मराठ्यांकडे जें आलें तें १७७४ त ब्रिटिश घेईपर्यंत होतें.

लेणीं इ. स. ३ ऱ्या शतकापासून ७ व्या शतकापर्यंत तयार झालीं असावींत. घारापुरीचें शिल्प शैवसंप्रदायी दिसतें. शिवकथा त्यांत प्रतिमित केलेल्या आहेत. ताण्डवनृत्य, अंधकासुरवध, शिवपार्वती–विवाह, गंगावतरण वगैरे दृश्यें फार सुंदर आहेत. मोठ्या लेण्यांतील महेशाचें दालन व त्यांतील तीन तोंडांची शिवमूर्ति जागतिक शिल्पकलेंत प्रसिद्ध आहे.

त्रिमूर्ति

**घाशीराम कोतवाल**—उत्तर पेशवाईतील एक कोतवाल. हा कनोजी ब्राह्मण असून मूळ औरंगाबादचा राहणारा. पण नोकरी किंवा व्यापार करून आपलें नशीब काढण्याकरितां हा पुण्यास आला होता. गोड वर्तन आणि हुषारी यांमुळें लवकरच ह्याचा पुण्याच्या दरबारांत प्रवेश झाला व लवकरच बढतीला चढून १८७२ मध्यें पुणें शहराचा कोतवाल झाला. तो लायख व कार्यक्षम अधिकारी होता, यांत शंका नाहीं. कोतवाली (पोलीस) खातें सुधारून वाढविण्यांत त्यानें अतिशय परिश्रम घेतले व नजरबाज (गुप्त-पोलीस) लोक ठेवून पुण्यांतील अनैतिक वर्तनास व फंदफितुरीस त्यानें पुष्कळच आळा घातला. पण त्यामुळेंच तो अनेक व्यसनी, फंदी व वजनदार मंडळींच्या डोळ्यांत खुपूं लागला.

१७९१ च्या ऑगस्टअखेर श्रावणमासची दक्षिणा आटोपल्यानंतर पस्तीस द्राविडी ब्राह्मण घाशीरामाच्या बागेत गेले. तेथे त्यांनीं माळ्याच्या परवानगीशिवाय कांहीं कणसें तोडिलीं. त्यावरून तंटा होऊन माळ्यानें घाशीरामाकडे तक्रार नेली. तेव्हां कोतवालानें २५ प्यादे पाठवून ब्राह्मणांना पकडून स्वतःच्या (भवानी पेठेंतील) वाड्यांत भुयारांत कोंडून ठेवलें. पुढें कामाच्या गडबडीमुळें त्यांच्याकडे कोणाचें लक्ष न गेल्यामुळें त्यांतील निम्मे गुदमरून मेले. नंतर मानाजी फाकडे यानें नेट धरल्यामुळें घाशीरामची चौकशी झाली. खुद्द पेशव्याकडे तक्रार गेली. तेव्हां अय्याशास्त्री द्रविड, न्यायाधीश ह्यांनीं चौकशी करून घाशीरामास देहान्त

शिक्षा दिली. ह्याची धिंड काढली व भवानी पेठेच्या पलीकडे त्याला नेऊन सोडला. तेथें जमलेल्या हजार तेलंगी ब्राह्मणांनीं दगड उचलून मस्तकावर घालून (त्यास) जीवें मारला. भवानी पेठेंत घाशीरामाचा मोठा बाग व तळीं होतीं. तेथें असलेल्या या जागांच्या खुणा अद्यापि 'घाशीरामाचें तळें व बाग' म्हणून दाखविण्यांत येतात.

**घांसदाणा**—या नांवाखालीं मोंगलांच्या मुलुखांतून पैसा गोळा करण्याची चाल मराठ्यांनीं इ. स. १६९२ च्या सुमारास काढली. घांसदाण्याची रक्कम सरकारांत भरावयाची नसून तो पैसा गोळा करणाऱ्या लष्करी अधिकाऱ्यानें आपल्या लष्कराच्या चरितार्थाकडे लावावयाचा असे. घोडे, बैल, वगैरे जनावरांच्यासाठीं गवत, वैरण, वगैरे (घांस) आणि माणसांसाठीं धान्य, रसद (दाणा) वगैरे शत्रूंच्या मुलुखांतून गोळा करून लष्कराचें पोट परभारें–सरकारचा पैका खर्च न होतां–भरलें जावें अशी ही योजना असे.

**घासी**— द्राविड वंशांतील ही जात दिसते. यांची मुख्य वस्ती बिहार, ओरिसा व मध्यप्रांत यांतून आहे. मध्यप्रांतांत यांची संख्या चार हजारांवर आहे. हे अत्यंत खालच्या दर्जाचे आहेत. ह्यांच्या धंद्यांवरून कांहीं वर्ग पडले आहेत. उदा., १ उडिया–हे कातडीं स्वच्छ करतात. २ डिगकुचिया–हे गुरांस खच्ची करतात. ३ डोलवाहो–हे डोली वाहतात. ४ नगाराची–हे नगारा वाजवितात. यांच्या कुलांचीं नांवें पशुपक्षी, झाडें व निर्जीव पदार्थ यांचीं आहेत. स्वकुलांत विवाह निषिद्ध आहे.

**घिबर्टी, लॉरेन्झो** (१३७८–१४५५)— हा इटालियन शिल्पकार प्रथम रंगकाम करीत असे; पुढें फ्लॉरेन्स शहरांतील बाप्तिस्मा देण्याच्या इमारतीचे ब्राँझचे दरवाजे त्यानें बनाविले. हें काम पुरें करण्यास त्याला सतत एकवीस वर्षे खपावें लागलें; पण तें इतकें उत्कृष्ट झालें कीं, तसेंच दुसरें काम त्यास देण्यांत आलें. या दरवाजांबद्दल मिचेलॅंजेलोनें असे प्रशंसोद्गार काढले कीं, हे दरवाजे प्रत्यक्ष नंदनवनाच्या प्रवेशद्वाराला शोभण्याइतके सुरेख झाले आहेत.

**घियासुद्दिन तुघ्लक** (राज्य. १३२०–२५)—एक दिल्लीचा बादशहा. प्रथम हा पंजाबचा सुभेदार होता. मुबारकचा खून करून दिल्लीच्या तख्तावर आलेल्या खुश्रवखानानें केलेलीं अधार्मिक कृत्यें यास सहन न होऊन यानें त्याचा पराभव केला; व आपण दिल्लीच्या गादीवर आला. गादीवर येतांच यानें रस्ते, धर्मशाळा, विहिरी, वगैरे बांधून लोकहिताचीं अनेक कामें केलीं. जमीनमहसुलाची व्यवस्था नीट लावली व राज्यकारभारास स्थैर्य आणलें. पण हिंदूंच्या बाबतींत याचें धोरण अन्यायाचें होतें. वरंगळच्या प्रतापरुद्रदेव काकतीयाचा पराभव करून यानें वरंगळ आपल्या ताब्यांत घेतलें व त्यास सुलतानपूर असें नांव ठेवलें. तुघ्लकाबाद नांवाचें एक ऐश्वर्यसंपन्न शहर यानें वसवलें. याचा युवराज महम्मद यास याच्या गादीवर येण्याची फार हांव सुटली होती. तेव्हा त्यानें कपटानें याला ठार केलें.

**घियासुद्दिन दामघानी** (मृ. १३४४)—दामघानी हा महम्मद तुघ्लकाच्या सैन्यांत एक साधा सैनिक होता. मदुरेस बंड होऊन त्यांत तेथील राजा फिरुझशहा हा मारला गेला. ही संधि साधून यानें मदुरेचें राज्य हस्तगत केलें. मदुरेच्या राज्याचा संस्थापक अहसनशहा याच्या मुलीशीं लग्न लावून यानें मदुरेच्या राजघराण्याशीं आपला रक्तसंबंध जोडला. द्वारावतीपुरचा ऐशीं वर्षांचा राजा तिसरा वीरबल्लाळ याजवर स्वारी करून यानें त्यास पकडलें व त्याचें कातडें काढून व त्यांत कोंडा भरून तें शव मदुरेच्या भिंतीवर टांगून ठेवलें असें सांगतात. हा अतिशय क्रूर असून यानें हिंदूंचा फार छळ केला.

**घिसाडी**—धंद्यावरून बनलेली महाराष्ट्रांतील एक जात. घिसणें–घासणें या शब्दावरून नांवाची व्युत्पत्ति लावण्यांत येते. बहुतेक हे लोखंडी काम करणारे फिरते लोक असतात. माता चालविणें वगैरे किरकोळ कामें यांच्या बायकाच करतात. यांच्यांत पोटजाती नाहींत. मराठ्यांप्रमाणेंच यांचीं नांवें व आडनांवें असतात. आपण गुजराथेंतून आलों असें हे सांगतात. व त्यांच्या भाषेंतहि गुजराथी भाषेचें मिश्रण दिसतें. राहणी मराठ्यांप्रमाणेंच असते. घिसाड्यांत भांडणें फार होतात. गुन्ह्यांचा निकाल गोतपंचायतीनें केला जातो.

**घुंगरू**—हे पितळेचे व पोकळ असून त्यांत खडा खेळता असतो. वरच्या बाजूस कडी बसविलेली असते; याचा आकार करवंदाएवढा असतो. हे दोरींत ओंविलेले असतात. पावलाच्या वरच्या बाजूस घोट्याशीं दुहेरी पुरेल इतकी लांब घुंगरूंची गुंफण करून नाचाच्या वेळीं दोनहि पायांत नाचणारी व्यक्ति हे घुंगरू बांधते व तालावर मधुर झुणझुण् आवाज होईल अशा बेतानें पावलें टाकते.

**घुंवरटी**— हीं एक प्रकारचीं मच्छरें असून यांचा दंश जनावरांस व मनुष्यांस फार घातक व दुःखदायक असतो. केंबरें पाहा.

**घुबड**—हा एक पक्ष्यांचा वर्ग आहे. हे रात्रीं संचार करतात व मांसाहारी आहेत. यांचें डोकें मोठें असून डोळे बटबटीत असतात व त्यामुळें त्यांस रात्रींचें दिसतें. यांची चोंच आंखूड असून बांकदार असते व पंजे मजबूत असून

कान मोठे व ऐकण्यास तीक्ष्ण असतात. हे फार जलद व आवाज न करतां उडतात. हे आपली उपजीविका उंदीर, पांखरें, किडे, वगैरेवर करतात. दिवसां ते झाडाच्या ढोलींत किंवा फटींत बसून राहतात. यांच्या अनेक जाती असून त्या निरनिराळ्या देशांत राहतात. आर्क्टिक प्रदेशांतील यांच्या दोन जाती दिवसांहि संचार करतात.

ग्रीक लोकांत पालास अथिनी या देवतेस घुबड प्रिय असे. आपल्याकडे हा पक्षी फार अशुभ व कुरूपतेचें प्रतीक समजतात. घुबड घरावर बसलें किंवा ओरडलें तर तें दुश्चिन्ह मानतात. पिंगळा ही घुबडाचीच लहान जात आहे.

**घुमट**—एखाद्या इमारतीच्या किंवा एखाद्या भागाच्या माथ्यावर जी गोलाकार छपराची रचना करण्यांत येते तीस घुमट म्हणतात. अशा तऱ्हेचे घुमट बायझंटाइन व पुनरुज्जीवनकालीन शिल्पांत सर्वत्र आढळतात. सर्वांत उत्तम घुमट रोममधील रोटंडा अथवा पँथिऑन या इमारतीवरील आहे. याखेरीज कॉन्स्टँटिनोपल येथील सेंट सोफिया या मंदिरावरील, फ्लॉरेन्स येथील सँटामराया देवळावरील, रोम येथील सेंट पीटरच्या देवळावरील घुमट हेहि पाहण्यासारखे आहेत. हिंदुस्थानांत मुसलमानी शिल्प आल्यापासून घुमटच पाहावयास मिळतात. ताजमहालवरील घुमट अत्यंत सुंदर आहे व विजापूर येथील गोल घुंबज हा तर त्यांत होणाऱ्या प्रतिध्वनींच्या चमत्कारामुळें जगद्विख्यात आहे.

**घुले, सदाशिवभट्ट रामकृष्णभट्ट** ( १७७१–१८५४ )–एक सुप्रसिद्ध पंडित व वैयाकरण. व्याकरणशास्त्रावरील वादांत यांनीं जय मिळविल्यामुळें अमृतराव पेशव्यांनीं 'वैयाकरणकेसरी' ही पदवी देऊन यांचा गौरव केला. नागोजीभट्टांची परंपरा नागपुरास प्रसृत करण्याचें श्रेय यांनाच आहे. नागपुरासच यांना अंधत्व आलें. 'शब्देन्दुशेखरा'वरील टीका 'सदाशिवभट्टी' व 'पतितोद्धारमीमांसा' हे ग्रंथ यांच्या अलौकिक बुद्धिमत्तेची साक्ष देतात.

**घुले, सीतारामशास्त्री हरिराम** ( १८२८–१९२५ )—एक महाराष्ट्रीय संस्कृत पंडित व सप्तशतीवरील 'दशोद्धार', 'शेखरविवृत्तिसंग्रह' (शब्देन्दुशेखरटीका) व गेरणी सूत्रावरील 'गजसूत्रवृत्ति' या टीकाग्रंथांचे हे कर्ते म्हणून प्रसिद्ध आहेत. काशी व नागपूर येथें यांचें अध्ययन झालें. व्याकरण व मंत्रशास्त्र यांत हे निपुण होते. सन १९१८ मध्यें यांना महामहोपाध्याय ही पदवी देण्यांत येऊन यांचा गौरव करण्यांत आला. संस्कृत कवनें सहजासहजीं रचण्यांत यांचा हातखंडा असे. वरील सदाशिवभट्ट घुल्यांचे हे नातू होत.

**घूस**—हा मूषक जातीचा सस्तन प्राणी आहे. याच्या करडी व काळी अशा दोन जाती आहेत. यांपैकीं पहिली प्रथम चीनमध्यें उत्पन्न होऊन सगळ्या जुन्या जगांत पसरली आहे. काळी जात बहुतेक नष्ट झाली आहे. करडी घूस काळीपेक्षां मोठी असते व तिचें शेपूट आंखूड असून ती फार भयंकर असते. यांची उत्पत्ति फार जलद होते. घुशी दिवसां गटारें, मोऱ्या यांतून वसतात व रात्रीं घराच्या भिंती पोखरतात व धान्याचा नास करतात.

**घृताम्ल**—लोण्यापासून प्रथम हें तयार केल्यामुळें घृताम्ल (ब्युटिरिक ॲसिड) असें नांव पडलें आहे. प्राण्यांच्या घामांतहि तें सांपडतें. हा द्रवरूप पदार्थ असून ह्याला नासलेल्या लोण्यासारखी घाण येते. आतां साखरेच्या किंवा तत्सदृश पदार्थांच्या आसवनापासून ( फर्मेंटेशन ) हें अम्ल तयार करतां येतें.

घृतेथक ( ब्युटिरिक इथर ) घृताम्लापासूनच तयार करतात. त्याला अननसासारखी चव आणि वास असल्यामुळें मिठाईत व सुगंधी द्रव्यांत ह्याचा उपयोग करतात.

**घेंट**— बेल्जममधील एक शहर. येथें १८१६ सालीं स्थापन झालेले एक विद्यापीठ आहे. कापड आणि जर यांविषयीं हें शहर पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. इतर उद्योगधंदे म्हणजे साखर शुद्ध करणें, दोरे, फिती, पोलादी यंत्रें, कागद, तंबाखू, इ. तयार करण्याचे होत. यंत्रांचे मोठे कारखानेहि आहेत. फुलें आणि बिया यांचा मोठा व्यापार चालतो. येथील कालव्यांतून नावा चालतात. मोठाल्या गोद्याहि आहेत. लो. सं. १६४,३७३.

सातव्या शतकापासून या गांवाचा उल्लेख इतिहासांत येतो. नॉर्मन लोकांना प्रतिरोध करण्यासाठीं ९ व्या शतकांत येथें एक किल्ला बांधला. फ्लँडर्सच्या काउंटच्या अमलांत हें शहर चांगलें भरभराटलें. कांहीं काळ हें नेदर्लंड्स राष्ट्रांत समाविष्ट असे.

**घेवडा**—वाटाणा वगैरेसारख्या शेंगा येणाऱ्या अनेक प्रकारच्या झाडांस व त्यांच्या शेंगांस व बियांस हें नांव देण्यांत येतें. याच्या अनेक जाती आहेत. मूळ हीं झाडें आशिया

खंडांत उत्पन्न झाली. साधा घेवडा शेतांत किंवा बागेंत लावण्यांत येतो व त्याचा मनुष्यें व जनावरें यांच्या खाण्याकरितां उपयोग करण्यांत येतो. याचे प्रकारहि पुष्कळ आहेत. याला जमीन चांगली लागते. हे फार पौष्टिक असतात. यांमध्यें शेंकडा ५० टक्के पचण्यासारखें कर्बउम्नयुक्त द्रव्य असतें व २५ टक्के नत्रयुक्त द्रव्य असतें. हें झाड एकवर्षायु असून २ ते ४ फूट उंच वाढतें. याचीं फुलें सुंदर व सुवासिक असतात. रुंद घेवडा, फ्रेंच घेवडा किंवा श्रावण घेवडा, चौधारी घेवडा, वगैरेंच्या भाज्या सर्वपरिचित आहेत.

घेवड्याचे वेल असतात. ते कित्येक एक वर्ष व कित्येक अनेक वर्षें टिकणारे असतात. कित्येकांचे वेल ४।५ फूट वाढणारे असतात; तर कित्येक जाती एखाद्या झाडावर चढविल्या असतां सर्व झाड व्यापून टाकतात. या वेलास शेंगा येतात; त्या २ ते १२ इंच लांब व ½ ते ४ इंच रुंद असतात. त्यांत १ ते १२ पर्यंत दाणे असतात. दाणे उग्रट गोडसर असतात.

**घोग्रा**—ही नदी तिबेटांत उगम पावून कर्नाली या नांवानें नेपाळमधून वाहते. सीशापाणी येथून ही डोंगर फोडून गिरवा नांव पावते व कर्नाली म्हणून हिचा एक भाग तेथूनच वाहतो. सुहेली, दहावार, शरयू वगैरे नद्या हिला मिळतात व ब्रह्मघाटापासून हिला घोग्रा व शरयू हीं दोन नांवें दिलीं जातात. पुढें गोंदा व फैजाबाद यांच्या सरहद्दीवरून व अयोध्येपासून वस्ती, गोरखपूर, फैजाबाद, अझमगड, बलीया यांच्या हद्दीवरून ही वाहते व शेवटीं गंगेला जाऊन मिळते. ब्रह्मघाट, फैजाबाद, अयोध्या, तांदा, बऱ्हज, घोग्रा व रेवलगंज हीं हिच्या तीरावरील व्यापाराचीं लहान-मोठीं ठिकाणें आहेत.

**घोडदळ**— घोड्यावर बसून लढणाऱ्या सैनिकांचें सैन्य. हा सैन्याचा एक महत्त्वाचा भाग असून फार प्राचीन काळापासून अस्तित्वांत आहे. यांच्याजवळ बंदुका, मशिनगन, वगैरेहि असतात. त्यांच्या साहाय्यानें ते पहिला हल्ला झाल्यानंतर घोड्याखालीं उतरून लढावें लागल्यास तसें करतात. तथापि त्यांचा बंदुकांचा मारा पायदळाइतका परिणामकारक नसतो. कारण त्यांतील कांहीं लोकांस घोडे धरून उभें राहावें लागतें. अलीकडे घोडदळाचें मुख्य महत्त्व संरक्षण, टेहेळणी व पाठलाग यांमध्यें मानण्यांत येतें. ब्रिटिश सैन्यांत एका रेजिमेंटमध्यें एकेका मेजर किंवा सीनियर कॅप्टनच्या हाताखालीं तीन पथकें (स्काड्रन) असतात व प्रत्येक स्काड्रनमध्यें कॅप्टन किंवा सबाल्टर्नच्या हाताखालीं एक एक अशा चार तुकड्या (ट्रुप्स) असतात. या तुकड्यांच्या पुन्हां पोटतुकड्या असून त्यांच्यावर बिनसनदी अधिकारी असतात.

अलीकडे मोटार, सायकली, वगैरे यांत्रिक वाहतुकीचीं साधनें उपलब्ध झालीं असल्यामुळें घोडदळाचें महत्त्व कमी किंवा अजीबात नाहींसें झालें आहे, व त्याऐवजीं मोटार-सायकलचीं पथकें उभारण्यांत आलीं आहेत.

वेदकालींहि सैन्यांत घोडदळाचा विभाग असे. पुराणकाळांतील चतुरंगदलांत अश्वदल एक असे. महाभारतांतील शल्यपर्वांत घोडेस्वारांच्या हल्ल्याचें वर्णन आहे. हर्षाच्या अश्वशाळेंत परदेशांतील घोडे असत. मोंगल सैन्यांत दोन लाख घोडेस्वार असत.

मराठ्यांच्या अमदानींत घोडदळांत पागा व शिलेदार असे दोन भाग असत. पागा म्हणजे खासगत घोडदळ व शिलेदारींत शिलेदार स्वतःचे घोडेस्वार ठेवून ते लढाईच्या प्रसंगीं राजाच्या सैन्यांत सामील करीत. शिवाजीचें घोडदळ एक लाख पांच हजारांचें होतें. १७५० पर्यंत मराठ्यांचें घोडदळ हिंदुस्थानांत फार प्रभावी असे. पुढें पाश्चात्यांचा तोफखाना येऊन याचें महत्त्व कमी झालें.

**घोडेस्वारपथक**—(स्काड्रन). पागेच्या अथवा घोडदळाच्या रेजिमेंट नांवाच्या भागाचा मुख्य विभाग. प्रत्येक रेजिमेंटमध्यें एक हेडक्वार्टर्स विभाग व तीन पथकें असतात. एका पथकामध्यें एक हेडक्वार्टर्स स्काड्रन, तीन तरवार बाळगणारी ट्रुप्स आणि एक हॉचकिस तोफेची तुकडी असते. प्रत्येक पथकामध्यें ६ अधिकारी आणि १४६ इतर स्वार असतात. स्कॉड्रन हा शब्द आरमारांत व विमानदलांतहि वापरतात.

**घोडनदी**—मुंबई, पुणें जिल्हा, शिरूर तालुक्याचें मुख्य ठिकाण. येथें बरा व्यापार चालतो. व्यापारी बहुतेक मारवाडी आहेत. पूर्वी इंग्रजांच्या घोडेस्वारांचा रिसाला असे. त्यामुळें गांव बऱ्यापैकीं वसलें आहे. येथें मामलेदार व मुनसफ कचेऱ्या आहेत. पुणें-नगर रस्त्यावर हा महत्त्वाचा टप्पा आहे. घोडनदी जवळच आहे. लो. सं. ६,१२४.

**घोडबंदर**— मुंबई उपनगराचा एक भाग व बंदर. हें जकातीचें महत्त्वाचें नाकें आहे. आयात माल-कापड, तांदूळ, गूळ, लोणी, ताग, लांकूड, वगैरे. निर्यात माल-तांदुळ, चुना, दगड, नारळ, मीठ, मासे, वगैरे. १६७२ मध्यें शिवाजी येथें आला होता. १७३७ त हा गांव पोर्तुगीजांपासून मराठ्यांनीं घेतला. व्यापार आगरी, कोळी, मुसलमान व ख्रिस्ती यांच्या हातीं आहे.

**घोडमाशी**—या एक प्रकारच्या पीडाकारक माशा आहेत. यांच्यापैकीं मादी मनुष्य, घोडे, गुरेंढोरें, वगैरेंच्या शरीरांवर बसून आपल्या तोंडानें त्यांच्या शरीरांतील रक्त शोषण करते व व त्यांस उपद्रव देते.

**घोडमासा**—( हिपोकँपस ). हे एका जातीचे सुमारें नऊ

इंच लांबीचे लहानसे मासे आहेत. याचा आकार लहानशा घोड्यासारखा दिसतो. ते उभे पोहतात.

**घोडा**— हा सस्तन वर्गांतील अश्व ( एक्विडि ) या कुलांतील सखुर जातींतील एक प्राणी आहे. याच्या खुरास गेळीं नसून तो अखंड असतो. याच्या मानेवर आयाळ असते व याची शेपटी सपाट व रुंद असते. याला खालच्या व वरच्या दोन्ही जबड्यांत दांत असतात. याच जातींत गाढव व झीब्रा यांचा समावेश होतो. अमेरिकेमध्यें कोलंबस जाण्यापूर्वी घोडे नव्हते; पण जुन्या जगांत प्राचीन कालापासून त्यांचें अस्तित्व होतें. सर्वांत उत्तम जातीचे घोडे अरबस्तानांत उत्पन्न होतात. ते चपल, धीट व दमदार असतात. इंग्लंडमध्यें जातिवंत घोड्यांची पैदास पद्धतशीरपणें करण्यांत येते. फ्लँडर्स या देशांतील घोडेहि उत्कृष्ट असतात. ज्या घोड्यांत अरब रक्त जास्त प्रमाणांत असेल तो अधिक जातिवंत समजला जातो. घोडी अकरा महिने व कांहीं दिवस सचर असते व वयाच्या सोळा ते अठरा वर्षांपर्यंत प्रसूत होत राहते. घोड्याचें आयुष्य सामान्यतः वीस ते तीस वर्षें असतें. घोड्याचें वय त्याच्या दांतांवरील खुणांनीं सागतां येतें, पण नऊ वर्षांपुढें वयाचा नक्की अंदाज करतां येत नाहीं. इतिहासामध्यें अलेक्झांडरचा घोडा बुकेफालस, प्रतापसिंहाचा घोडा चैतक, वगैरे प्रसिद्ध आहेत.

घोडा हें जनावर मनुष्यप्राण्याच्या उपयोगी फार प्राचीन कालापासून पडत आहे. याची धन्यावर फार प्रीति वसते. त्याला चांगला समजहि असतो. वाहन म्हणून घोड्याचा नवीन यांत्रिक वाहनें येईपर्यंत फार उपयोग असे. युद्धांत घोड्याचें फारच महत्त्व आहे ( घोडदळ पहा ). मागील कित्येक वर्षांपासून घोड्यांच्या शर्यती सुरू होऊन शर्यतीसाठीं घोडे तयार करण्याचें एक शास्त्रच निघालें आहे.

ऋग्वेदापासून वैदिक वाङ्मयांत अश्व हा शब्द 'घोडा' या अर्थी नेहमीं योजिलेला आढळतो. घोड्याला आणखी दुसरीं पुष्कळ नांवें आहेत. अत्य–धांवणारा; अर्वत्–जलद; वाजिन्–ओढण्यामध्यें मजबूत; सप्ति–पळणारा; आणि हय–वेगवान्, घोडीला अश्वी, अत्या, अर्वती, वडवा, इत्यादि बरींच नांवें आहेत. निरनिराळ्या रंगांचे घोडे निरनिराळ्या नांवांनीं संबोधितात:–करडा (हरित, हरि ); तांबूस ( अरुण, अरुष, पिशंग, रोहित ); तपकिरी ( श्याव ); पांढरा ( श्वेत), इत्यादि. पांढऱ्या घोड्याला काळे कान असले म्हणजे तो फार किंमतवान् असतो, असें अथर्ववेदांत वर्णन आहे. घोड्यांची किंमत फार असूनहि ते पूर्वीं कमी होते असें नाहीं, कारण दानस्तुतींत ४०० घोडे दिल्याचें वर्णन आहे. कारणप्रसंगीं त्यांच्यावर सोन्यामोत्यांचे दागिने चढवीत असत. रथ ओढण्याकडे घोड्याच उपयोगांत आणीत असत. कारण त्या चपल व खात्रीच्या असत. त्यांचा गाड्या ओढण्याकडेहि उपयोग करीत असत, पण तो क्वचितच. युद्धांत घोड्यावर बसत असत किंवा नाहीं याचा जरी उल्लेख नाहीं तरी दुसऱ्या कारणाकरितां घोड्यांचा उपयोग होत असे.

अरबी घोडा

घोड्यांना पागेंत बांधून चारा-पाणी देत असत; त्यांना बाहेरहि चरावयाला सोडीत असत. परंतु त्या वेळेला त्यांच्या पायांना खोडा घालीत असत. शर्यतीनंतर त्यांना पाणी पाजीत असत. त्यांच्या मोतद्दारांना अश्वपाल, अश्वप, अश्वपति, म्हणत असत. घोडे केव्हां केव्हां खची करीत ( वध्रि ). याशिवाय लगाम ( रश्मयः ), काढणी ( अश्वाभिदानी ), चाबूक ( अश्वाजनि ), यांचा उल्लेख आहे. सिंधु नदीकांठचे आणि सरस्वतीच्या कांठचे घोडे फार मौल्यवान् असत. मराठ्यांच्या अमदानींत भीमथडी तट्टांनीं अटकेपार मजल मारली होती. कोतवाली घोडे मिरवणुकींत फार शोभिवंत दिसत.

**घोडें**—मुंबई, पुणें जिल्हा, खेड तालुका. खेडच्या उत्तरेस २५ मैलांवर असलेलें एक खेडें. खेड तालुक्यांतील आंबेगांव पेट्याचें हें मुख्य ठिकाण आहे. येथें आठवड्याचा बाजार भरतो. गांवांत एक मशीद आहे. तींतील खांबावर फारसी भाषेंत, कोणी पीर महंमदानें ही मशीद १५८० सालीं बांधली अशा अर्थाचे दोन लेख आहेत. या गांवांत हरिश्चंद्राचें देवस्थान असून दरसाल मोठी जत्रा भरते. लो. सं. ४,७४२.

**घोडेघांस** ( विलायती गवत )— लसूण घांस. या झाडास लॅटिनमध्यें मेडिकागो साटिव्हा, व इंग्रजींत ल्युसेर्न म्हणतात.

हें गवत आशिया खंडाच्या पश्चिम समशीतोष्ण कटिबंधांत व अफगाणिस्तान आणि बलुचिस्तान देशांत सर्वत्र होतें. याचा जनावरांस चाऱ्याप्रमाणें उपयोग करितात. याची अलीकडे हिंदुस्थानांत बहुतेक सर्वत्र खेडयापाडयांत सुद्धां लागवड करतात. हें घोडयांना व इतर जनावरांना बेतानें दिलें असतां उत्तम वैरणीचें काम भागवतें.

**घोड्याची गाडी**—हिंदुस्थानांतील प्राचीन घोडयांच्या गाडयांना रथ म्हणत. हे बहुधा युद्धांत वापरीत; किंवा राजेरजवाडे त्यांचा उपयोग करीत. यांना दोन चाकें असत. ॲसीरियन, ग्रीक, रोमन, वगैरे प्राचीन लोक अशाच रथ–गाडया वापरीत.

खिस्ती शकारंभीं ह्या रथ–गाड्या प्रचारांत आल्या. घोडयांकडून ओढल्या जाणाऱ्या व वर आच्छादन असलेल्या, जलदगतीनें जाणाऱ्या चार चाकी गाडयांस इंग्रजींत 'कोच' म्हणतात. या प्रकारची गाडी इंग्लंडमध्यें सोळाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास प्रचारांत आली. त्यापूर्वीं हंगेरींत ती सुरू होती. प्रथम ही श्रीमंत लोकच वापरीत असत. हिला दोन, चार, सहा, किंवा आठ घोडे असत. भाडयाचे कोच प्रथम लंडनमध्यें १६२५ त सुरु झाले. टप्प्याचे कोच याच सुमारास सुरू झाले. यांची गति प्रथम केवळ तासीं ३ ते ४ मैल असे. यानंतर मँचेस्टरच्या व्यापाऱ्यांनीं जलद चालणारे कोच सुरू केले. १७८४ मध्यें इंग्लंडमध्यें टपालचे कोच सुरू करण्यास बाथ येथील पामरनें सुचविलें व रेलवे सुरू होईपर्यंत हेंच प्रवासाचें मुख्य साधन होतें.

डॉगकार्ट ( कुत्रागाडी ) ही दुचाकी गाडी आहे. हें नांव पडण्याचें कारण आरंभीं शिकारी लोक अशा गाडया वापरीत व त्यांत मागें कुत्रीं असत. कधीं कधीं या प्रकारच्या गाडयांना एकाहून अधिक घोडे जुंपलेले असत. फ्रेंच डॉगकार्टलाच फक्त चार चाकें असतात.

डॉग कार्ट

ब्रोघाम्

व्हिक्टोरिआ

'बगी' गाडी ही अमेरिकेंतील असून ही अगदीं हलकी, एका माणसाला बसण्याजोगी पण चार चाकी असते.

'व्हिक्टोरिया' गाडी अशीच हलकी असते. हिला कमानी ( स्प्रिंग ) असतात. आत दोघांचीच जागा असून गाडीवान पुढें उंच जागीं बसतो. हिला काढतें घालतें आच्छादन ( टॉप ) हि असतें.

'फैटण' आणि 'ब्रोघॅम' गाड्यांना चार चाकें असून दोन घोडे जोडण्यांत येतात. 'बारुश' आणि 'लॅंडो' याहि दोन घोडयांच्याच गाड्या होत.

**घोड्यांची शर्यत**—हा एक प्रकारचा सोडतीचाच खेळ आहे. तथापि घोड्यांना तयार करण्यांत यांत एक प्रकारची चढाओढ आहे. इंग्लंडमध्यें १२ व्या शतकापर्यंत याचा मागोवा लागतो. दुसऱ्या चार्लसच्या कारकीर्दींत तर या खेळास ऊत आला होता. आतां बहुतेक सर्व सुधारलेल्या समजणाऱ्या देशांतून या शर्यती होतात. हिंदुस्थानांत मुंबई, पुणें, कलकत्ता व मद्रास या मोठ्या ठिकाणीं सरकारी नियंत्रणाखालीं व कांहीं संस्थानी राजधान्यांतून चालू आहेत. सरकारला ही उत्पन्नाची मोठी बाब आहे. फ्लॅट-रेसिंग, स्टीपल रेसिंग, हर्डल रेसिंग, ट्रॉटिंग मॅचेस यांसारखे या शर्यतीचे कांहीं प्रकार आहेत. शर्यतीच्या घोड्यावर बसणाऱ्याला जॉकी म्हणतात. यांच्या परीक्षा असतात. जॉकीक्लबकडून यांची शिफारस व्हावी लागते. या खेळांत पैजा लावण्याची घातुक प्रथा आहे, त्यामुळें याला व्यसनाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. तेव्हां ही शर्यत बंद करण्याचा हिंदुस्थानांतील प्रांतिक सरकारांचा विचार चालला आहे.

**घोणस**— ( रसेल्स व्हायपर ). एक विषारी सापाची जात. या जातीच्या सापाचा वर्ण पिंगट तांबूस असतो. अंग काळसर असतें. अंगावर शंकरपाळ्यासारखे खवले असून भोंवतीं पांढरी कड असते. याचें डोकें लहान असून चापटकें असतें. याची लांबी साधारणपणें चार फूट असते. हे सुस्त दिसतात. रागावून श्वासोछ्वास करूं लागले म्हणजे हे मोठमोठ्यानें आवाज करितात.

**घोरपड**— हा पालीच्या वर्गांतील प्राणी असून उष्ण कटिबंधांत राहतो. याची लांबी सुमारें चार फूट असून फळें, झाडपाला वगैरेंवर उपजीविका करतो. यास झाडांवर चांगलें चढतां

येतें व पोहतांहि येतें. याचा रंग काळसर, हिरवट असतो. याचें मांस फार रुचकर असतें. याचीं अंडीं उन्हानें उबून फुटतात. खडकामध्यें व कड्यावरून चढण्याच्या कामीं घोरपडीचा उपयोग केल्याच्या गोष्टी इतिहासामध्यें आढळतात. तानाजीनें कोंडाणा किल्ला घोरपडीच्या साहाय्यानें घेतल्याची आख्यायिका प्रसिद्ध आहे. हिचें मांस व तेल औषधी असतें.

**घोरपडी**—मुंबई, पुणें जिल्हा. पुणें कॅटोन्मेंटांत घोरपडीचा समावेश होतो. मद्रास-सदर्न मराठा रेल्वेचें हें पुण्यापासून दुसरें स्टेशन आहे. या ठिकाणीं लष्करी छावणी आहे. १८४२ त प्रथम येथें बराकी बांधण्यांत आल्या. लो. सं. २०८५.

**घोरपडे घराणें**— एक प्रमुख मराठे घराणें. घोरपड्यांचें मूळ आडनांव भोंसले आहे. बहामनी राज्यांत कोंकणांतील एक किल्ला घोरपडीच्या साहाय्यानें घेतला म्हणून घोरपडे नांव पडलें. विजापूरच्या राज्यांत यांना देशमुखी वतन असे. कापशीकर, मुधोळकर, गुत्तीकर, दत्तवाडकर, इ. मराठे घोरपड्यांचीं कित्येक घराणीं आहेत. पण इचलकरंजीकर घराणें फक्त ब्राह्मण सरदारांचें आहे. कापशीकर घोरपड्यांना 'हिंदुराव' व 'अमीर-उल्-उमराव' हे किताब आहेत. कोल्हापूर प्रांताची यांची देशमुखी व सरदेशमुखी विजापूरकरांपासूनची आहे. यांना नऊकस घोरपडे म्हणतात. संताजी घोरपडे हा प्रसिद्ध सेनापति याच घराण्यांतील होय. गुत्तीकर घोरपडे घराण्याचा मूळपुरुष संताजी घोरपड्याचा भाऊ बहिरजी होय. मुरारराव घोरपडे याच घराण्यांतील आहे. सोंडूर संस्थान या घोरपडेवंशांत आजपावेतों चालत होतें.

**घोरी घराणें**—अफगाणिस्तानांतील एक राजघराणें. गझनी घराण्यानंतर ११५७ त घोरी घराणें उदयास आलें. घोरचा सुलतान अल्लाउद्दिन हा या घराण्यांतील पहिला राजा म्हणतां येईल. राज्य मिळण्यापूर्वी हा कर्तबगार होता. पण पुढें ख्याली-खुशालींत दिवस घालवूं लागला. तेव्हां कांहीं दिवस याला सेल्जुकच्या सुलतानानें कैद केलें होतें. अल्लाउद्दिनानंतर त्याचे दोघे पुतणे ग्यासुद्दिन व शहाबुद्दिन यांनीं एकमतानें राज्य केलें. शहाबुद्दिनानें महंमद हें नांव घेऊन हिंदुस्थानाकडे दृष्टि वळविली. त्याने गझनवीच्या महंमदाप्रमाणें हिंदुस्थानवर ११७६ ते १२०६ पर्यंत अनेक स्वाऱ्या करून हिंदुस्थानांत मुसलमानी संस्कृति कायम केली. कनोजचा जयचंद हा त्याचा साहाय्यक होता. महंमदानें हिंदूंचीं देवस्थानें फोडलीं व पुष्कळ हत्या केली. शेवटीं पंजाबांत गक्कर लोकांनीं त्याचा खून केला. ( १२०६ ). त्याचें राज्य पंजाब ते बाबिलोन व ऑक्सस नदीपासून आर्मझ सामुद्रधुनीपर्यंत पसरलें होतें. पण त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या घराण्यांत राज्य न राहतां खिवाच्या शहांकडे तें गेलें.

**घोष, अरविंद** ( १८७२- )—एक हिंदु योगी व राजकारणी पुरुष. यांचा जन्म कलकत्ता येथें १५ ऑगस्ट १८७२ रोजीं झाला. यांचें शिक्षण दार्जीलिंग व इंग्लंडमध्यें झालें. १८९० मध्यें आय्. सी. एस्. परीक्षेंत उत्तीर्ण झाले; पण घोड्यावर बसण्यामध्यें अनुत्तीर्ण झाले. १८९२ मध्यें यांनीं केंब्रिजमध्यें किंग्ज कॉलेजमध्यें प्रवेश करून पदवी घेतली. यानंतर १२ वर्षें त्यांनीं बडोदें संस्थानांत नोकरी केली. हे बडोदा कॉलेजचे कांहीं काल प्रिन्सिपॉल होते. १९०६ मध्यें ते कलकत्ता येथें राष्ट्रीय कॉलेजचे प्रिन्सिपॉल झाले. हे 'वंदे मातरम्' पत्राचे संपादक होते त्या वेळीं त्यांच्यावर खटला होऊन ते निर्दोषी सुटले. १९०७ सालापासून राष्ट्रीय चळवळींत यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला. १९०८ मध्यें यांच्यावर पुन्हां राजद्रोहाचा व कट केल्याचा आरोप ठेवून खटला करण्यांत आला, व हा खटला एक वर्ष चालल्यावर ते निर्दोषी ठरले. या वेळीं बॅ. चित्तरंजन दास यांनीं यांचा खटला चालविला होता. यांनीं 'कर्मयोगी' नांवाचें इंग्रजी व 'धर्म' या नांवाचें बंगाली साप्ताहिक चालविलें ( १९१० ). सध्यां हे पांडिचेरी येथें राहतात व तेथें योगमार्गाचें आचरण करतात. १९१४ ते १९२१ पर्यंत यांनीं 'आर्य' या नांवाचें एक तत्त्वज्ञानपर मासिक चालविलें होतें. यांचे योग, वेदान्त वगैरे विषयांवर अनेक ग्रंथ आहेत.

**घोष, वारींद्रकुमार** ( १८८०— )— एक बंगाली क्रांतिकारक. प्रसिद्ध योगी अरविंद घोष यांचे हे कनिष्ठ बंधु होत. हे बंगालमध्यें १९०८ सालीं जी क्रांतिकारक चळवळ झाली तिचे प्रवर्तक होते. यांचा जन्म १८८० सालीं इंग्लंडमध्यें झाला व त्यांचें सर्व शिक्षणहि तिकडेच झालें. हिंदुस्थानांत त्या वेळीं बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी वगैरे पुढाऱ्यांनीं स्वदेशी, बहिष्कार, वगैरे सनदशीर चळवळ चालविली होती, ती या तरुण व पाश्चात्य देशांत राहून शिक्षण घेतलेल्या कार्यकर्त्यास मिळमिळीत वाटून त्यानें रशियन अराजकांच्या धर्तीवर क्रांतिकारक चळवळीस प्रारंभ केला; व अत्याचारप्रवर्तक गुप्तमंडळ्या स्थापन केल्या. त्यानें डाक्का येथें 'अनुशीलन समिति' स्थापन करून लष्करी व शारीरिक शिक्षण देण्यास सुरवात केली. त्यानें 'युगांतर' या नांवाचें एक ज्वलज्जहाल वर्तमानपत्र सुरू केलें. त्याच्या पांच संपादकांस एका पाठोपाठ शिक्षा झाल्या व तें अखेरीस जप्त करण्यांत आलें. मुझफरपूर येथें बॉबचा स्फोट झाल्यानंतर यांस व यांच्या सहकाऱ्यांस अटक करण्यांत येऊन व त्यांच्यावर खटला करून त्यांस शिक्षा देण्यांत आल्या. त्यांमध्यें यांस व उल्हासकर दत्त यास फांशीची शिक्षा देण्यांत आली होती. ती पुढें रद्द करण्यांत येऊन काळ्यापाण्याची जन्मठेप शिक्षा देण्यांत आली व त्यांस अंदमानांत पाठविण्यांत आलें. शिक्षा भोगल्यानंतर परत स्वदेशांत येऊन आतां स्वस्थ राहिले आहेत.

**घोष, मोतिलाल** ( १८४५-१९२२ )— एक विख्यात बंगाली संपादक व पुढारी. कलकत्त्याची 'अमृतबझार पत्रिका' व 'इंडियन स्पिरिच्युअल मॅगेझिन' यांचे हे कार्यकुशल संपादक होते. शिशिरकुमार घोष या आपल्या बंधूच्यानंतर हे पत्रिकेचे संपादक झाले. संपादकाला जरूर असणारे हजरजबाबीपणा, निर्भयपणा, समयसूचकता यांसारखे गुण यांच्यांत पुरेपूर होते व त्यामुळेंच हे एक यशस्वी संपादक म्हणून लोकप्रिय झाले. 'अन्योक्ति' च्या शस्त्रानें प्रतिस्पर्ध्याला हे तेव्हांच चीत करून सोडीत. त्या वेळचे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांनीं कलकत्त्यास पदवीदानप्रसंगीं पाश्चात्यांच्या सत्यवक्तेपणाची स्तुति केली व पौर्वात्यांमध्यें या गुणाचा अभाव आहे असें जेव्हां प्रवचन झोडलें, त्या वेळीं पाश्चात्यांच्या सत्यवक्तेपणाचें प्रदर्शन करणारे हे गृहस्थ ( लॉर्ड कर्झन ) आपल्या 'प्रॉब्लेम्स ऑफ दि फार ईस्ट' या ग्रंथांत विपर्यस्त विधानें करून किती खोटें बोलतात, हें मोतीलालनीं लोकांना दाखवून दिलें.

खेळकर लेखनपद्धति, कोणाच्याहि मनाला न बोचणारा विनोद, दोषदिग्दर्शनाबरोबरच गुणग्रहण या यांच्या लेखनशैलीमुळें यांच्या विरोधकांच्याहि मनांत यांच्याबद्दल फार आदर असे. राज्यघटनेचें अभ्यासपूर्ण ज्ञान, अचूक मार्गदर्शन, आपल्या हक्कांची जागरूकता व राष्ट्रीय हिताची दृष्टि हे वृत्तपत्रकाराला जरूर असणारे गुण यांच्यांत होते.

**घोसाळ गड**—मुंबई, कुलाबा जिल्हा. हा रोह्याच्या दक्षिणेस ६ मैलांवर रेवदंड्याची खाडी व साळव्याची खाडी यांच्यामधील डोंगरावर आहे. भरतीचें पाणी पायथ्यापर्यंत येतें. उंची १,००० फूट आहे. तळें येथील किल्ला याच्या शेजारींच आहे. घोसाळें गांवांतून रस्ता जातो. किल्ल्यावर भवानी व गणपति यांचीं देवळें आहेत. पश्चिम भागास खेंकडा म्हणतात. सोळाव्या शतकांत हा गड निजामशाहींत होता. १६३० मध्यें तो विजापूरच्या अमलाखालीं शिद्दीच्या ताब्यांत होता. १६४८ त तो शिवाजीस मिळाला. १७३५ त तो बाजीरावानें घेतला व त्या सालाच्या तहांत तो मराठ्यांकडे आला. १८१८ त कर्नल प्रोथर यानें हा घेतला.

**घोसाळें**—एक फळवेल. शिराळें, पारोसें अशींहि नांवें आहेत. या वेलाचीं फुलें पिंवळीं असतात. फळें आंखूड ( ६ ते ९ इंच ) अगर लांब ( १२ ते १८ इंच ) असतात. फळाची भाजी, भजी व भरीत करितात. पानें औषधी असतात. वाळलेल्या फळांचा सांगाडा खाजविण्याकरितां अगर लांकडांस पॉलिश करण्यास उपयोगी पडतो. तो फार चिवट असतो.

**घोळ**—एक वनस्पति. हिच्या मोठी घोळ व चिलघोळ अशा दोन जाती आहेत. हिची महाराष्ट्रांत मुद्दाम लागण करीत नाहींत, पण उत्तर हिंदुस्थानांत करतात. तिकडे तिला 'कुलफा' असें नांव आहे. हिची भाजी करतात. घोळीची भाजी थंड असून आमांशादि उपद्रव उत्पन्न करणारी आहे.

---

## ङ

ङ—या वर्णाला आजचें स्वरूप प्राप्त होण्यास तीन अवस्थांतून जावें जागलें. बुद्धगया येथील स्तंभावर पहिली अवस्था दिसते. यांतील ङ चौकोनी कंसासारखा आहे. राजा यशोधर्माच्या वेळच्या मंदसोर लेखांत ( इ. स. ५३२ ) 'ङ्शो' या जोडाक्षरांत दुसऱ्या अवस्थेंतील ङ आहे. ङ वर्णाची तिसरी अवस्था उदयादित्याच्या वेळेच्या ( ११ वें शतक ) उज्जनीच्या लेखांत पाहावयास सांपडते.

---

## च

च—या वर्णाच्या तीन विकासावस्था आहेत. पहिली अशोकाच्या गिरनार लेखांत, दुसरी इ. स. पहिल्या शतकांतल्या मथुरेच्या लेखांत व तिसरी ११ व्या शतकांतल्या उज्जनीच्या लेखांत दिसून येते.

**चक्की**—व्यायामाचें एक साधन. ही अर्थातच जातें या अर्थाची चक्की नव्हे किंवा चुन्याच्या घाणीचीहि चक्की नव्हे. ही चक्की दगडाची केलेली असते. दगड घडून त्याचें गळ्यांत घालण्यासारखें चाक ( कडें ) करतात त्यास व्यायामपरिभाषेंत चक्की म्हणतात. चक्क्या निरनिराळ्या वजनांच्या व मापांच्या करतात. त्यामुळें त्यांचा उपयोग मेहनत करणारांच्या शक्तीप्रमाणें करतां येतो. चक्कीच्या व्यायामानें मानेचे स्नायू उत्तम प्रकारें तयार होतात, हा या व्यायामाचा विशेष आहे. शिवाय हात, पाठ, मांड्या, वगैरे भागांतील स्नायूंसहि या मेहनतीनें चांगला व्यायाम होतो. शिवाय पाठीच्या कण्यास तर चांगलीच मेहनत पडते. चक्की उचलणें, उचलून चालणें व धांवणें, बैठका मारणें, वगैरे याचे प्रकार आहेत.

**चक्रधर** ( ११९४-१२७३ )—महानुभाव पंथाचे हे आद्य संस्थापक होत. भडोचच्या मल्लदेव राजाचा प्रधान विशालदेव यास दत्तात्रेय प्रभूच्या वरप्रसादानें शके १११६ मध्यें हरिपालदेव नांवाचा एक पुत्र झाला. हरिपालदेव हा शूर असून यादवराय सिंघणाचा यानें दोन वेळां पराभव केला. शके ११४३ मध्यें हरिपालदेवानें इहलोक सोडला. याचें प्रेत स्मशानांत नेलें असतां इकडे द्वारकेंत कामाख्यानामक हठयोगिनीच्या दुराग्रहामुळें श्रीचांगदेव उर्फ चक्रपाणि यांनीं देहत्याग करून हरिपालदेवाच्या निर्जीव शरीरांत प्रवेश केला व हरिपालदेव जिवंत झाला. पुढें त्यांनीं रामयात्रेच्या निमित्तानें शके ११४५ मध्यें ऋद्धिपूर ( वऱ्हाड ) सोडून महानुभाव पंथानें मानलेले परमेश्वराचे चौथे अवतार गोविंदप्रभु ( पाहा ) यांच्याकडून ज्ञानशक्ति प्राप्त करून घेतली. त्यांनीं यांचें चक्रधर असें नांव ठेवलें. चक्रधरांनीं बारा वर्षें सातपुड्यांवर घालविल्यानंतर पस्तीस वर्षेंपर्यंत महाराष्ट्रांतील तत्कालीन परिस्थितीचें अवलोकन केलें. त्यांत त्यांना असें दिसून आलें कीं, धर्माचें स्थान कर्मकांडानें बळकावलें आहे. देवतांना पक्वान्नांचा नैवेद्य दाखवला असतां व ब्राह्मणभोजनें घातलीं असतां आपल्यास त्या देवता प्रसन्न होतील व मोक्षद्वार खुलें होईल, अशा तऱ्हेच्या भ्रामक समजुती जनतेंत पसरलेल्या होत्या. याचाच अर्थ जनता भोगांना चटावली होती. अशा स्थितींत दिशाभूल झालेल्या जनतेस मोक्षप्राप्तीचा खरा मार्ग दाखविण्यासाठीं चक्रधरांच्या मनानें ओढ घेतली व शके ११९० मध्यें पैठणला संन्यासदीक्षा घेऊन त्यांनीं महानुभाव पंथाची स्थापना केली.

शके ११९४ मध्यें नागदेव यांना आचार्यपदावर नेमून हे बद्रिकाश्रमीं गेले. यांनीं स्वतः कोणताच ग्रंथ लिहिला नाहीं. पण वेळोवेळीं झालेल्या त्यांच्या भाषणांवरून त्यांचें तत्त्वज्ञान केशवराज सूरि यांनीं आपल्या 'चक्रधरसिद्धान्त सूत्र पाठ' या ग्रंथांत स्थूलपणें मांडलें आहे. चक्रधरांचा सिद्धान्त असा कीं, मानवी जीविताचें ध्येय म्हणजे मोक्ष, आणि मोक्ष देणारा तो परमेश्वर. म्हणून मोक्ष मिळविण्यासाठीं प्रथम कांहींहि करून परमेश्वरास प्रसन्न करून घेतलें पाहिजे. मोक्ष मिळवण्याचा समाजांतील कोणत्याहि स्त्री-पुरुषास अधिकार आहे. समाजसेवेसारखें परोपकाराचें कार्य करूनहि परमेश्वर प्रसन्न होतो. परमेश्वराविषयीं ते म्हणतात कीं, परमेश्वर हा सौंदर्य, सौभाग्य, औदार्य, दया,

माया, इत्यादि सर्व गुणांनीं युक्त असून जीवांना ज्ञान देण्याकरितां त्यास साकार होऊन त्यांच्या सहवासांतच यावें लागतें. चक्रधरस्वामी स्वतःला परमेश्वरस्वरूपी समजत. तसेंच श्रीकृष्ण, दत्तात्रय, चक्रपाणि, व गोविंदप्रभु यांनाहि परमेश्वराचे अवतार मानीत. संन्याशांन्याकरितां चक्रधरांचे नियम अतिशय कडक आहेत. संन्याशानें पुत्र, मित्र, कलत्र, शिखा व सूत्र यांचा परित्याग करून निश्चयानें अरण्यवास पत्करावा व शरीराच्या सोपस्कारांचा त्याग करावा असें ते म्हणत.

महानुभाव पंथाची ध्वजा महाराष्ट्रापासून तों थेट पेशावरपर्यंत व अफगाणिस्तानांतहि गेली. पण चक्रधर स्वामीजींच्या पश्चात् ८०–९० वर्षांनीं महानुभाव पंथीयांच्या सांकेतिक लिपीमुळें त्यांचें वाङ्मय पुढें येऊं शकलें नाहीं. त्यामुळें या पंथाचीं अस्सल धर्मतत्त्वें बाजूस राहून या पंथाबद्दल गैरसमजुती रूढ झाल्या व त्यामुळें संतमंडळींत व विद्वानांत या पंथाबद्दल गैरसमज वाढले. परंतु आतां गेल्या पंचवीस वर्षांत महानुभाव पंथीय वाङ्मय उजेडांत येऊं लागल्यानें व त्याचा चांगला अभ्यास होत असल्यानें त्या पंथाचें खरें स्वरूप उघड होत आहे व विद्वान् लोकांत या पंथाबद्दल आदर निर्माण झाला आहे.

**चक्रपाणि व्यास, वर्धनस्थ** (१५८३–१६४३)— हा महानुभाव कवि मूळचा राजपुतान्यांतील असून नंतर वऱ्हाडांत ऋधपूर येथें स्थायिक झाला. हा सारस्वत ब्राह्मण असून याचें पूर्वाश्रमीचें नांव चाल्हण पंडित असें होतें. उपाध्यायाम्नांतील संतराज वर्धनस्थ (बीडकर) यांच्यापासून यानें शके १५०५ मध्यें महानुभाव पंथाची दीक्षा घेऊन हा आपणास चक्रपाणि व्यास असें म्हणवूं लागला. संस्कृतमधील समुदाय सूत्रपाठ, मराठींत पाठांच्या लापिका, सखळे, दृष्टांतस्थळ, लीलास्तोत्र, स्फुट श्लोक, वगैरे लिखाण यानें केलें.

**चक्रभ्रमी (कृमि)**—(रोटिफेरा). ही एक अति सूक्ष्म प्राण्यांची जात आहे. हे गोड्या व खाऱ्या पाण्यांत राहतात. यांच्या शरीराच्या पुढील भागाची रचना वाटोळ्या तबकडीसारखी असते व तीस कंप पावणारे तंतू असून ती पाहिजे तेव्हां उलटसुलट करतां येते. वरील तबकडीपासून निघालेल्या तंतूंच्या योगानें यास गति मिळते; व त्यांच्या योगानें अन्न तोंडांत घालतां येतें. यांचे नर व मादी असे स्वतंत्र विभाग असतात. परंतु नर आकारानें लहान असतो.

**चक्रवर्ती**—ह्या संस्कृत शब्दाचा अर्थ जगाचा राज्यकर्ता (सम्राट्) असा आहे. या शब्दाला प्राचीन संस्कृत वाङ्मयांत महत्त्व असून बौद्ध व जैन वाङ्मयांतहि हा शब्द बराच आढळतो. सार्वभौम म्हणजे सर्व पृथ्वीचा राजा असणें, ही कल्पना फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांतील राजकर्त्यांत प्रबळ असलेली दिसते. राज्याभिषेक होतांच आठहि दिशांतील राजे पराभूत करून नंतर अश्वमेध यज्ञ करण्याची महत्त्वाकांक्षा धरून तो करण्याचा परिपाठ सर्व पराक्रमी राजांनीं पाळलेला आढळतो. भागवत पुराण (४·१५, १६) वगैरेंमध्यें चक्रवर्ती राजांबद्दल उल्लेख असून मार्कंडेय पुराणांत अशा राजांचीं चिन्हें जीं चौदा महारत्नें त्यांची यादी पुढीलप्रमाणें दिली आहे—हत्ती, अश्व, रथ, पत्नी, बाण, कोष, माला, वस्त्र, वृक्ष, रत्न, छत्र, विमान, इत्यादि.

**चक्रवाक**—एक पक्षी. बहुतकरून आवाजावरून पडलेलें हें बदकाचें नांव असावें. हिंदींत त्याला चक्वा आणि इंग्रजींत ब्राह्मणी डक् असें म्हणतात. हें नांव ऋग्वेदांत आणि यजुर्वेदांतील अश्वमेधीय बळींच्या यादींत आलें आहे. हें नांव अथर्ववेदांत वैवाहिक प्रेमाचें व विश्वासाचें द्योतक आहे. तसेंच रोमन व ग्रीक वाङ्मयांत त्याचें हेंच स्वरूप दाखविलें आहे. संस्कृत काव्यांतून चक्रवाक-मिथुनासंबंधीं असा संकेत आढळतो कीं, रात्रीं त्यांचा वियोग होतो.

**चक्रवात**—(सायक्लोन). वातावरणांतील दाब व गति यांच्या विशिष्ट विभागणीला व्यापक अर्थानें म्हणतात. बंगाल उपसागरासारख्या उष्णकटिबंधांतील वावटळींनाहि संकुचितार्थानें चक्रवात किंवा आवर्त असें म्हणण्यांत येतें. चक्रवाताच्या भागांत मध्यकेंद्राकडे येत असतां हवेचा दाब कमी होत जातो. त्यामुळें मध्याकडे वादळाचा जास्त जोर असतो व तिकडे जहाज ओढलें जातें. उत्तर गोलार्धांत वारे घड्याळाच्या कांट्याच्या उलट दिशेनें मळसूत्राकारगतीनें मध्याकडे वाहतात व दक्षिण गोलार्धांत घड्याळाच्या कांट्याप्रमाणें वाहतात. हवेचा दाब कमी झाल्यामुळें ढग जमा होतात व पाऊस पडतो. उन्हाळ्यापेक्षां पावसाळ्यांत चक्रवात दुप्पट जोरानें वाहतात. त्यांच्या गतीचें मान निरनिराळ्या देशांत निरनिराळें असतें. अमेरिकन संयुक्त संस्थानांत ताशीं २६ मैल तर पश्चिम युरोपांत १६ मैल असतें. चक्रवाताच्या उलट स्थितीला प्रतिचक्रवात किंवा व्यावर्त म्हणतात. अशा आवर्त-व्यावर्तांच्या बातम्या काढण्याचेंच महत्त्वाचें काम हवामान खात्याचें असतें.

**चक्रव्यूह**—प्राचीन काळीं युद्धांत सैन्याचे गरुडव्यूह, क्रौंचव्यूह, चक्रव्यूह, वगैरे रचनाप्रकार असत. भारतीय युद्धांत पांडवांचा पराभव करण्यासाठीं द्रोणाचार्यांनीं जो सैन्याचा चक्रव्यूह बनविला त्यांत अभिमन्यु सांपडून ठार झाला ही कथा सर्वश्रुत असल्यानें सामान्यतः एका चक्रव्यूहाचेंच नांव माहीत आहे. ('चक्रव्यूह गुरु द्रोण। रचिता झाला अद्‌भुत॥'–पां. प्र. ४५·४) हा व्यूह चक्राकार वाटोळा असतो. अशा गुंतागुंतीच्या व बाहेर निघण्यास अवघड अशा कोणत्याहि रचनेस चक्रव्यूह म्हणण्याचा परिपाठ पडला आहे. मिसरी, क्रीट आणि सामिअन चक्रव्यूह

पाश्चात्य वाङ्मयांत आढळतात. क्रीटच्या चक्रव्यूहांत मिनोटोर राक्षस राहत असे. आजहि करमणुकीच्या खेळांतून चक्रव्यूह करतात व आंत शिरून बाहेर पडण्यास सांगतात. अनेक वेड्यावांकड्या वळणांमुळें सहज बाहेर येणें अशक्य असते.

**चक्राप्पा**—एक तेलगू कवि. हा नेलोर जिल्ह्यांतील मानार-पोलूरनजीकच्या तेट्टू गांवचा. हा रामभक्त असून वयाच्या सोळाव्या वर्षापासूनच कविता करूं लागला. कलहस्ती येथील जमीनदार बंगारू याचम्मा नायडू याच्या सांगण्यावरून यानें रामचंद्राच्या स्तुतिपर शंभर स्तोत्रें रचलीं व त्याबद्दल यास मेहनताना विचारतां यानें फक्त ८० शेर जोंधळे मागितले. याच्या एकंदर सद्वर्तनावर खुष होऊन बंगारूनें यास कांहीं वर्षासन करून दिलें. चक्राप्पानें बरेच लोकापयोगी ग्रंथ लिहिले. वयाच्या साठाव्या वर्षी तो मरण पावला.

**चक्राभास**—(सायक्लाइड). चक्रालद. जेव्हां एखादें वर्तुळ एका सरळ रेषेवर फिरतें तेव्हां त्या वर्तुळाच्या परिघावरील एखाद्या बिंदूनें काढलेली वक्ररेषा. एका बिंदूपासून दुसऱ्याकडे अत्यंत जलद उतरणारी ही वक्ररेषा असून, गुरुत्वाकर्षणामध्यें सांपडलेल्या एखाद्या कणाचा आंदोलन मार्गहि हाच आहे; मात्र त्याचीं आंदोलनें समकालावधिकच असलीं पाहिजेत; म्हणजे आंदोलनकाल झोक्याच्या लांबीवर अवलंबून असतां कामा नये. जर एक वर्तुळ दुसऱ्या वर्तुळावर बाहेरच्या बाजूनें फिरेल तर परिघावरील बिंदूची अपचक्राभास (एपिसायक्लाइड) रेषा होईल. आंतून फिरेल तर अतिचक्राभास (हायपोसायक्लाइड) रेषा होईल. जर तो बिंदु परिघावर नसेल तर ज्या रेषा होतील त्यांना त्रिच्छेद (ट्रोचॉइड) असें नांव आहे. यंत्राच्या चाकांचे दांते तयार करण्याच्या कामीं या वक्ररेषा ध्यानांत घ्याव्या लागतात.

**चँग-कै-शेक** (१८८८— )—चीन देशांतील प्रमुख राष्ट्रीय पुढारी. चीनमध्य १९११, १९१२ व १९१७ सालीं ज्या राज्यक्रांत्या झाल्या त्यांत त्यानें प्रत्यक्ष भाग घेतला होता. किओमिनटांग या चिनी राष्ट्रीय पक्षांत तो सामील झाला आणि त्यानें सनयत्-सेन याच्या हाताखालीं १९१७ पासून १९२२ पर्यंत नोकरी

केली. १९२३ मध्यें त्यानें मास्को मिलिटरी ॲकेडमी मध्यें प्रवेश केला आणि १९२४ सालीं कँटननजीक व्हाम्पु येथील चिनी लष्करी विद्यालयाचा तो प्रमुख अधिकारी झाला. तेथील लष्करी विद्यार्थ्यांचें त्यानें नमुनेदार सैन्य बनवलें आणि १९२५ सालीं त्या सैन्याच्या मदतीनें त्यानें दक्षिण चीनमधील बंडखोर सेनापतींचा पराभव केला. सनयत्-सेन मरण पावल्यावर किओमिनटांग या राष्ट्रीय पक्षाचा तो पुढारी झाला आणि कम्यूनिस्ट लोकांशीं सहकार्य करून चीन देशाचा जनरॅलिसिमो (प्रमुख सेनाधिकारी) या सर्वोच्च पदावर तो चढला. १९२६ सालीं त्यानें शांघाय हस्तगत केलें. १९२७ मार्च महिन्यांत तो कम्यूनिस्टांपासून फुटून निघाला आणि शांघाय येथें त्यानें कम्यूनिस्टांची कत्तल केली आणि पूर्वीच्या कम्यूनिस्ट किओमिनटांग सरकारला प्रतिस्पर्धी सरकार त्यानें नानकिंग येथें स्थापिलें. नंतर या दोन्ही सरकारांची एकी झाली आणि त्या सरकारचा जनरॅलिसिमो चॅंग-कै-शेक हाच कायम राहिला. पुढें त्यानें उत्तर चीन जिंकून घेण्याचा उपक्रम सुरू केला. १९२८ सालीं त्यानें मार्शल चँगत्सो-लीनचा पराभव केला, आणि सर्व चीन देश नानकिंग सरकारच्या अधिकाराखालीं आणला. नंतर चँग-कै-शेक मंत्रिमंडळाचा अध्यक्ष आणि प्रत्यक्ष सर्वाधिकारी (डिक्टेटर) बनला. तथापि कम्यूनिस्ट आणि कॅंटन येथील सरकार यांच्याबरोबर यादवी युद्ध चालूच राहिलें. १९३१ सालीं त्यानें आपल्या अधिकारपदाचा राजीनामा दिला. परंतु १९३२ सालीं त्याला पुन्हां त्याच अधिकारावर निवडण्यांत आलें. नंतर त्यानें कम्यूनिस्ट सैन्याशीं लढाई चालू ठेवली. मांचुरिया जपानी लोकांनीं व्यापला होता आणि शांघायवर हल्ला चढविला होता. त्यांच्याबरोबर तडजोड करण्याचा चॅंगनें प्रयत्न केला. १९३६ सालीं चँग सुइलिआँग या प्रतिस्पर्धी जनरलनें त्याला कैद केलें; पण लवकरच दोघांची तडजोड होऊन तो बंधमुक्त झाला. १९३७ च्या जुलै महिन्यांत जपाननें चीनबरोबर युद्ध सुरू केलें म्हणून चँग-कै-शेकनें आपल्या मुख्य प्रधान-पदाचा राजीनामा देऊन जनरॅलिसिमो या नात्यानें आपल्याला लष्करी कार्याला सर्वस्वीं वाहून घेतलें. १९३७ च्या डिसेंबर मध्यें नानकिंगचा पाडाव झाल्यावर पीछेहाट करून त्यानें चुंग-किंग येथें आपल्या सरकारचें मुख्य ठाणें केलें आणि जपानबरोबर युद्ध चालू ठेवण्याचा निश्चय कायम केला. त्यानें दुसऱ्या महायुद्धांत दोस्तांच्या मदतीनें चीनचें मोडकें तारूं फुटूं दिलें नाहीं. ही त्याची कर्तबगारी खरी. त्याची पत्नी मादाम चँग-कै-शेक हीहि चीनच्या राष्ट्रीय चळवळींत प्रत्यक्ष कार्यकर्ती आहे. १९४२ सालीं चँग-कै-शेक पत्नीसह हिंदुस्थानांत आला होता. चर्चिल आणि रूझवेल्ट यांच्याबरोबर युद्धासंबंधीं वाटाघाटी करण्यास तो चीनबाहेर जात असे. १९४५ च्या मे महिन्यांत त्यानें चीनचें अध्यक्षपद सोडलें, पण पुन्हां राष्ट्रानें त्यालाच

सर्वाधिकारित्व दिलें. पण नुकतेंच कम्यूनिस्टांनीं चँगचें सरकार उलथून पाडण्यासाठीं युद्ध आरंभलें आहे व यांत चँगला आपली सर्व सत्ता गमावून बसण्याची वेळ आली आहे.

**चँग-चौ-फू**—हें शहर चीनमधील फुकीन प्रांतांत आमॉयच्या वायव्येस ३६ मैलावर आहे. या प्रांतांतील रेशमाच्या कारखान्यांचें हें शहर केंद्र आहे. लोकसंख्या १०,००,००० आहे.

**चँगशा**—चीन, हुनान प्रांतांतील एक शहर व बंदर. लो. सं. ६,०६,९७२. या ठिकाणीं रेशिम, आगकाड्या व टिनचे पत्रे होतात.

**चघताईखान** (मृ. १२४१)—हा चेंगीझखानाच्या सर्व पुत्रांमध्यें अतिशय धार्मिक व गुणी पुत्र होता. बापाच्या मृत्युपत्रान्वयें ट्रॅन्सोक्सिआना, बल्ख, बदक्शान् आणि काशघर या प्रांतांची मालकी याच्याकडे आली होती (इ. स. १२२०). परंतु या प्रांतांची राज्यव्यवस्था करण्याचें काम आपल्या अधिकाऱ्यांकडे सोंपवून चघताई हा आपल्या आक्ताखान नामक थोरल्या भावाप्रमाणें स्वस्थ बसून राही. हिंदुस्थानांत मोंगल साम्राज्याची स्थापना करणाऱ्या वंशाचें नांव चघताईखानाच्या नांवावरूनच पडलें आहे.

**चच, चचनामा**—चच हा सिंध देशाचा एक ब्राह्मण राजा (५९७-६३७) होता. याच्या वंशाचा इतिहास ज्या फारसी बखरींत लिहिला आहे तो चचनामा होय. अरबांनीं आठव्या शतकांत सिंध जिंकला त्या वेळचीहि माहिती चचनाम्यांत आहे. चच याचें राज्यारोहण इ. स. ५९७ या वर्षी झालें. यानें एकंदर चाळीस वर्षें राज्य केलें. चच हा शूर होता. त्यानें सिंधुराज साहसीचें राज्य बळकाविलें होतें. हा साहसी-रायाचा प्रधान होता. साहसी मेल्यावर यानें त्याचें राज्य व राणी हीं हस्तगत केलीं. त्यानें उत्तर, पश्चिम व दक्षिण या दिशांस आपलें राज्य वाढविलें, व मुलतान आणि पर्वत हे प्रदेश जिंकून काश्मीर देशास आपली सदहद्द नेऊन भिडविली. या चचाचा मुलगा प्रख्यात दाहीर होय.

**चचा, हितवृंदावनदास** (जन्म १७०७)—एक हिंदी कवि. हा पुष्कर येथें राहणारा व जातीनें गौड ब्राह्मण असून कृष्णगडच्या बहादुरसिंहाच्या पदरीं असे. राजकुलांतील तंट्यांना कंटाळून हा वृंदावनास आला. राधावल्लभीय गोस्वामी हितरूपजींचा हा शिष्य होय. यानें एक लाखावर पद्यरचना केली असें म्हणतात. त्यांपैकीं २०,००० पद्येंच उपलब्ध आहेत. याच्या पद्यांतील भाषाशैली व अलंकारयोजना फार सुंदर आहे.

**चटया**—जमिनीवर आंथरण्याकरितां, लांकडी सामान झांकण्याकरितां, पडदे करून टांगण्याकरितां व इतर कित्येक कामाकरितां चटयांचा उपयोग केला जातो. विलायतेंत नारळीच्या झाडांच्या तंतूंपासून अनेक खरबरीत गालिचे तयार करण्यांत येतात. दारांत आंथरण्याच्या चटया बनविण्याकरितां वेत, निरनिराळे गवत व नारळीच्या झावळ्या इत्यादिकांच्या तंतूंचा उपयोग करण्यांत येतो. चटया एक किंवा अनेक रंगांच्या व आकारांच्या असतात. त्यांवर नांवेंहि लिहितात. विविध प्रकारच्या गवतांपासून रंगीबेरंगी व तऱ्हेतऱ्हेच्या चटया करण्याचा धंदा हिंदुस्थान, जपान, वगैरे पौरस्त्य देशांत अस्तित्वांत आहे.

मद्रास प्रांतांतील चटया बहुधा सुंदर व रंगीत असून त्यांत बरेंच कसब असतें. कलकत्त्याच्या चटया साध्या पण सुबक असतात. पश्चिम हिंदुस्थानांत चटया करण्याजोगीं गवतें पुष्कळ आहेत, परंतु त्या भागांतील लोक त्यांचा या कामीं उपयोग करीत नाहींत.

**चॅटरटन, थॉमस** (१७५२-१७७०)—एक इंग्रज कवि. ब्रिस्टन येथें एका गरीब कुटुंबांत हा जन्मला. आणि एका मोफत शाळेंत त्याचें शिक्षण झालें. पण लहानपणींच त्याची अकालप्रौढ बुद्धि दिसूं लागली, आणि वाचनाचा त्यास अत्यंत नाद लागला. विशेषतः जुने ग्रंथ आणि कागदपत्रें वाचण्याची त्याला फार आवड असे. प्रथम त्यानें जुने सांपडलेले लेख म्हणून आपणच स्वतः लिहिलेले लेख प्रसिद्ध केले. १७७० सालीं तो लंडन शहरीं गेला. तेथें पुस्तक विक्रेत्यांनीं त्याचें चांगलें स्वागत केलें. त्यामुळें मोठ्या आकांक्षा बाळगून त्यानें अनेक निबंध, उपरोधिक लेख आणि पत्रें लिहून प्रसिद्धीकरितां दिलीं; परंतु त्यांचा मोबदला त्याला चांगला भरपूर मिळाला नाहीं. त्यामुळें अन्नावांचून त्याची उपासमार होऊं लागली. याप्रमाणें कांहीं दिवस हालांत काढल्यावर त्यानें विषप्रयोगानें आत्महत्या केली. त्याच्या कविता प्रसिद्ध आहेत त्या—'दि ट्रॅजेडी ऑफ एला', 'दि बॅटल ऑफ हेस्टिंग्ज', 'दि ब्रिस्टो ट्रॅजेडी', इत्यादि.

**चट्टोपाध्याय, कमलादेवी** (१९०३-        )—एक राजकारणी हिंदी महिला. यांचें शिक्षण केंब्रिज व लंडन विश्वविद्यालयांत झालें. यांनीं समाजशास्त्राचा अभ्यास केला होता. प्रथम यांनीं स्वतः अभिनय करून नाट्यकलेमध्यें सुधारणा करण्याची खटपट केली. १९२२ सालीं या कॉंग्रेस चळवळीस येऊन मिळाल्या व १९२६ मध्यें या कौन्सिलच्या निवडणुकीस उभ्या राहिल्या. अशा तऱ्हेनें राजकीय निवडणुकींत भाग घेणारी हिंदुस्थानांत ही पहिलीच स्त्री होय. यांनीं शैक्षणिक व सामाजिक सुधारणा करण्याच्या कामीं पुष्कळच खटपट केली. अखिल भारतीय महिला परिषदेच्या त्या प्रारंभापासून संचालक चिटणीस १९३० पर्यंत होत्या. यांनीं कॉंग्रेसच्या सत्याग्रह-चळवळींत प्रामुख्यानें भाग घेतला. मुंबईंत त्यांनीं अगदीं प्रथम सत्याग्रह

केला. १९३० ते १९३४ यादरम्यान त्यांना अनेक वेळां शिक्षा झाल्या. बालविवाहाविरुद्ध यांनीं चळवळ करून शारदा कायद्याचा पुरस्कार केला. या कट्टर समाजवादी आहेत. यांनीं अखिल भारतीय कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्षाची स्थापना केली व त्या पक्षाच्या अखिल भारतीय कार्यकारी मंडळाच्या त्या सभासद आहेत. ग्रामोद्योगामध्येंहि काम करण्याची यांना फार हौस आहे. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या त्या कांहीं काळ सभासद होत्या. तरुणांच्या चळवळींच्याहि त्या पुढारी आहेत. कॉंग्रेसचें ध्येय स्वातंत्र्य असावें याकरितां त्यांनीं पुष्कळ खटपट केली. यांचें वास्तव्य मंगलोर येथें असतें. यांनीं प्रसिद्ध कलावंत हरींद्रनाथ चट्टोपाध्याय यांच्याबरोबर विवाह केला होता; परंतु पुढें घटस्फोट घेतला. अद्यापि या राजकारणांत भाग घेत असतात. याचा विशेष कल समाजवादाकडे आहे.

**चँट्रे, सर फ्रान्सिस** (१७८१-१८४२)—एक इंग्रज शिल्पकार. याचें सर्वांत प्रसिद्ध चित्र 'स्लीपिंग चिल्ड्रेन' (निद्रिस्त मुलें) हें लिचफिल्ड कॅथेड्रलमध्यें आहे. त्यानें बनविलेला लेडी लुइझा रसेल हिचा पुतळा वोबर्न ॲबेमध्यें; विल्यम पिटचा ब्रॉन्झ पुतळा लंडनमधील हॅनोव्हर स्क्वेअरमध्यें; वॉशिंग्टनचा पुतळा बोस्टन शहरांत स्टेट्स हाउसमध्यें; हॉर्नर, कॅनिंग व सर जे. मालकम या तिघांचे पुतळे वेस्टमिन्स्टर-ॲबेमध्यें; ३ ऱ्या जॉर्जचा पुतळा गिल्ड हॉलमध्यें; आणि ४ थ्या जॉर्जचा पुतळा ट्रॅफल्गार स्क्वेअरमध्यें आहे. त्यानें रॉयल ॲकेडमी या संस्थेला १,५००० पौंड देणगी ब्रिटिश कलावंतांचीं चित्रें व पुतळे विकत घेण्याकरितां दिली.

**चॅड सरोवर**—हें गोड्या पाण्याचें सरोवर मध्य आफ्रिकेंत आहे. त्याचें क्षेत्रफळ सुमारें ७,००० चौ. मैल आहे. या सरोवराच्या कांठांवर आणि सरोवरांत जीं पुष्कळ बेटें आहेत, त्या बेटांवर अगदीं दाट वस्ती आहे.

**चंडीदास**—या बंगाली कवीचा जन्म वीरभूम जिल्ह्यांतील छटना या गांवीं झाला. हा जातीनें ब्राह्मण असून रामी नांवाच्या एका परटिणीवर याचें प्रेम जडलें. त्या वेळच्या कट्टर सनातन्यांना हें अर्थात् न आवडल्यानें त्यांनी याच्यावर बहिष्कार टाकला. रामीच्या प्रेमांतून याला सोडविण्याचे झालेले सर्व प्रयत्न निष्फळ ठरले आणि चंडीदासाचें निःस्वार्थी व पवित्र प्रेमच शेवटीं अजिंक्य ठरलें. याच्या राधाकृष्णप्रेमावरील काव्यांत याच्या हृदयांतील प्रेमभावना प्रतिबिंबित झालेली आहे.

**चंडेश्वर २ रा** (मृ. १३१४)—एक बंगाली पंडित. स्मृति-रत्नाकर, कृत्य-चिंतामणि, राजनीति-रत्नाकर, शिववाक्यावली, दानवाक्यावली व शैवमानसोल्लास या सुप्रसिद्ध ग्रंथांचा हा कर्ता आहे. याच्या स्मृति-रत्नाकर या ग्रंथाचे सात विभाग असून तो व्यवहारांत अनेक दृष्टींनीं उपयुक्त ठरला आहे. चंडेश्वर हा वीरेश्वराचा पुत्र असून हरिसिंहदेवाचा मंत्री होता. यानें आपणास 'महाराजाधिराज' असें बिरुद लावलें आहे. हा युद्धमंत्री व न्यायाधीशहि असून यानें नेपाळ प्रांत जिंकला. त्या वेळच्या बंगाली ग्रंथकारांत याला फार मान असे.

**चंडोल**— हे पक्षी जमिनीवरील झुडुपांमध्यें राहतात. हे आपली उपजीविका किडे, अंडीं, वगैरेवर करतात. हे आपलीं घरटीं जमिनीवर बांधतात व वर्षांतून दोनदां अंडीं घालतात. हे सामान्यतः रानाजवळच्या शेतामध्यें आढळतात. चंडोल उंच आकाशांत फिरतांना गात असतो व याचें गाणें कर्णमधुर लागतें, म्हणून आंग्ल कवींनीं याच्यावर किती तरी काव्यें रचिलीं आहेत. शेले कवीचें 'चंडोलस्तोत्र' इंग्रजी वाङ्मयांतील अत्युत्कृष्ट कविता समजली जाते.

**चढाऊ देशभक्ति**—(जिंगोइझम). हें नांव लंडनमध्यें १८७८ सालीं गायिल्या गेलेल्या एका गीतावरून पडलें आहे; तें गीत ("We don't want to fight, yet, by Jingo, if we do") मॅक्डर्मॉट यानें लंडनमधील अनेक गायनमंदिरांमध्यें गायिलें होतें. त्या सालीं रशियानें तुर्कस्तानच्या समुद्रांत अतिक्रमण केल्यामुळें तुर्कस्तानच्या मदतीला ब्रिटिश आरमार पाठवण्यांत आलें. त्या प्रसंगानें सदर गीत लोकप्रिय झालें होतें. स्वदेशाचें संरक्षण करणें, हेंच सामान्यतः देशभक्तांचें कर्तव्य असलें तरी कांहीं प्रसंगीं चढाई करणें हीहि देशभक्तिच आहे, हें प्रतिपादन सदर गीतांत केलें असल्यामुळें अशा चढाऊ देशभक्तीला 'जिंगोइझम' किंवा आक्रमक साम्राज्यवाद हें नांव रूढ झालें आहे.

**चतर्जी, अतुलचंद्र** (१८७४- )—हिंदुस्थानचे एक वरिष्ठ अधिकारी. यांचें शिक्षण कलकत्ता व इंग्लंडमध्यें झालें. हे आय. सी. एस्. मध्यें पहिले आले होते. १८९७ मध्यें हे संयुक्त प्रांतांत नोकरीस लागले व यांनीं अनेक हुद्यांवर कामें केलीं. विशेषतः १९०७-८ मध्यें यांनीं युक्तप्रांताची औद्योगिक पाहणी केली. १९१९ मध्यें वॉशिंग्टन येथें व १९२१ मध्यें जिनिव्हा येथें हे सार्वराष्ट्रीय कामगार परिषदेस हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि म्हणून गेले होते व १९२७ सालीं हे या परिषदेचे अध्यक्ष होते. १९२५ मध्यें राष्ट्रसंघाच्या असेंब्लीस प्रतिनिधि म्हणून गेले होते. १९३३ मध्यें हे सार्वराष्ट्रीय कामगार कार्यालयाच्या चालक मंडळाचे अध्यक्ष होते. १९२५ ते १९३१ पर्यंत साम्राज्य आर्थिक समितीचे सभासद, १९३० मध्यें आरमार परिषदेस हिंदुस्थानचे प्रतिनिधि, व १९२१ मध्यें हिंदुस्थान सरकारचे औद्योगिक मंत्री होते. १९२१ ते १९२४-मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद; १९२५ ते १९३१-लंडनमध्यें हिंदुस्थानचे

हायकमिशनर; व १९३२ मध्यें ओटावा परिषदेस हिंदुस्थानच्या प्रतिनिधि मंडळाचे पुढारी होते. पुढें इंडिया कौन्सिलचे सभासद होते. १९३८–४६ पर्यंत मध्यवर्ती अफू मंडळाचे अध्यक्ष होते.

**चतर्जी, योगेशचंद्र**—(१८९५– ) एक हिंदी क्रांतिकारक. यांचें शिक्षण कोमिल्ला येथील कॉलेजांत झालें. तेथें असतांनाच त्यांनीं क्रांतिकारक दलांत प्रवेश केला. १९१६ मध्यें त्यांस प्रथम अटक करण्यांत आली व तीन महिने स्थानबद्ध करून ठेवल्यानंतर १८१८ च्या कायद्याखालीं त्यांस नजरबंदींत टेवण्यांत आलें. पण १९२० सालीं त्यांची सुटका झाली. त्यानंतर त्यांनीं ‘ हिंदुस्थान रिपाब्लिकन असोसिएशन ’ काढली व येथपासून पुढें यांच्या क्रांतिकारक चळवळीची खूपच वाढ झाली. यांतूनच काकोरी कटाचा उद्‌भव झाला. यामुळें यांस ‘ काकोरी राजबंदी ’ असें सर्वत्र संबोधण्यांत येतें.

यांस १९२४ सालींच प्रथम स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें होतें. काकोरी कटाच्या खटल्याच्या वेळीं यांस तुरुंगांतूनच आरोपी म्हणून आणण्यांत आलें होतें. यांस प्रथम दहा वर्षांची शिक्षा झाली, पण ती वाढवून काळ्या पाण्याची करण्यांत आली. यांनीं राजबंद्यांना तुरुंगांत चांगली वागणूक मिळावी म्हणून तुरुंगांतच दोन वेळां उपवास केला. १९३७ सालीं संयुक्त सरकारनें यांची विनशर्त सुटका केली.

**चतर्जी, रामानंद** ( १८६५—१९४३ )— एक बंगाली देशभक्त व संपादक. यांनीं युनिव्हर्सिटीच्या सर्व परीक्षांमध्यें उत्तम यश व शिष्यवृत्ती मिळविल्या. १८८७ मध्यें ते पदवीधर झाले. ते पहिल्या वर्गांत पहिले आले होते. १८८७ ते १८९५ पर्यंत ते कलकत्ता येथील सिटी कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक होते. १८९५ ते १९०६ पर्यंत ते अलाहाबाद येथें कायस्थ पाठशाळेचे प्रिन्सिपॉल होते. अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे ते ऑनररी फेलो होते. ते कांहीं काल संयुक्त प्रांतांतील अँग्लो–इंडियन टेंपरन्स असोसिएशनचे अध्यक्ष होते. तसेंच संयुक्त प्रांतीय दुय्यम शिक्षण सुधारणासमितीचे सभासद होते. साधारण ब्राह्मो समाजाचे ते अध्यक्ष होते. दुसी, प्रदीप, धर्मबंधु यांचे ते संपादक होते. त्या वेळीं यांनीं वर्तमानपत्रांत तीन रंगी चित्रें नेहमीं देण्याची प्रथा पाडली. १९२६ सालीं राष्ट्संघा-( लीग ऑफ नेशन्स )च्या सर्व बैठकींस उपस्थित होण्याकरितां निमंत्रण केलेलें हें एकमेव हिंदी प्रतिनिधि होते. १९३२ मध्यें प्रधानमंत्र्यांनीं दिलेल्या जातीय निवाड्यास यांनीं तीव्र विरोध केला व जिवांत जीव असे तों या निवाड्याचा निषेधच करीन व मृत्यूनंतरहि भरतखंडास स्वातंत्र्य मिळाल्याशिवाय माझ्या आत्म्यास शांति मिळणार नाहीं असें घोषित केलें. मॉडर्न रिव्ह्यू व प्रवासी यांचे हे विद्वान् व यशस्वी संपादक होते. त्यांचा ‘ मॉडर्न रिव्ह्यू ’ हिंदुस्थानांतील इंग्रजी मासिकांत अग्रणी असे. त्यांतील संपादकीय स्फुटें फार मननीय व मुत्सद्दीपणाचीं असत. यांनीं इतरहि कांहीं ग्रंथरचना केली आहे.

**चतर्जी, डॉ. शरच्चंद्र** ( १८७६–१९३८ )—एक विख्यात बंगाली कादंबरीकार. सतराव्या वर्षांच यांनीं लेखन करण्यास सुरुवात केली. परंतु रवींद्रनाथांच्या लिखाणाइतका दर्जा आपल्याहि लिखाणाचा असावा या हव्यासामुळें यांनीं आपलें लिखाण प्रथम प्रसिद्धच करूं दिलें नाहीं. घरची परिस्थिति अडचणीची असल्यामुळें घरास कंटाळून हे ब्रह्मदेशांत रंगून येथें आपल्या काकांच्या आश्रयास कांहीं काल जाऊन राहिले. यानंतर अकौंट्स ऑफिसमध्यें यांनीं कांहीं दिवस कारकुनाची नोकरीहि केली. याच कालांत मिल, शॉपेनहॉवर यांसारख्या लेखकांचीं पुस्तकें यांनीं अभ्यासिलीं. रवींद्रनाथांच्या वाङ्मयाचेंहि या कालांत यांनीं अध्ययन केलें. कलकत्त्यास या वेळीं यांच्या कांहीं बालमित्रांनीं ‘ यमुना ’ नांवाचें पत्र काढलें होतें, त्यांत यांनीं आपली पहिली गोष्ट प्रसिद्ध केली. ही गोष्ट प्रसिद्ध झाल्या वेळीं स्वतः रवींद्रनाथांनींच आपली नसल्याचें सांगितलें तेव्हांच या गोष्टीचे लेखक शरच्चंद्र चतर्जी हे होत अशी लोकांची खात्री पटली. इतकी रवींद्रनाथांच्या लिखाणाची छाप यांच्या लिखाणावर पडली होती. ‘ परिणीता ’, ‘ चंद्रनाथ ’ व ‘ चरित्रहीन, ’ ‘श्रीकान्त’, ‘दत्ता,’ ‘गृहदाह’, इ. यांच्या अत्युत्कृष्ट कादंबऱ्या व ग्रंथ ‘ यमुना ’ पत्रांतूनच प्रसिद्ध झाले. यानंतर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें ब्रह्मदेशाहून हे कलकत्त्यास आले. यांची ‘पाथेर देवी’ ही कादंबरी अत्यंत लोकप्रिय झाली. परंतु त्यांतील राजकीय भावनादर्शनामुळें बंगाल सरकारनें ती जप्त केली. या कादंबरीचें भाषांतर मराठींत ‘ भारती ’ या नांवानें केलेलें आहे. बडी दिदी, देवदास व काशीनाथ यांसारख्या बोलपट–कथा लिहून या क्षेत्रांतील आपली पात्रता यांनीं सिद्ध केली आहे. प्रत्येक गोष्टीचा खोलवर विचार करून हे लिखाण करीत. स्वभावचित्रण करण्यांत यांची लेखणी एखाद्या कुशल चित्रकाराप्रमाणें चाले. बंगाली वाङ्मयांतील लिखाणाचें जुनें तंत्र बाजूस ठेवून नव्या तंत्राचा अवलंब यांनीं केला. अज्ञान व दलित असा बहुजनसमाज व पतिता स्त्रिया यांच्या असहाय्य परिस्थितीचें दर्शन आपल्या लेखनद्वारां यांनीं लोकांना घडवलें. यांच्या इतके मोठ्या प्रमाणांत लिखाण करणारे लेखक अगदींच थोडे. यांनीं बहुतेक सर्व ग्रंथ बंगाली भाषेंतच लिहिलेले आहेत.

( १ ) विराज बौ, ( २ ) बिंदूर छेले, ( ३ ) पंडित महाशय, ( ४ ) निष्कृति, ( ५ ) नवविधान, (६) शुभदा, (७) श्रीकान्त, ( ८ ) गृहदाह, ( ९ ) अरक्षणीय, ( १० ) पल्लीसमाज यां-

सारखीं अनेक पुस्तकें लिहून वाङ्मयाच्या प्रत्येक दालनांतील आपलें कलाकौशल्य यांनीं प्रगट केलें आहे.

**चतुर**—कालवे, विहिरी, डबकीं वगैरे ठिकाणच्या पाण्यावर तांबडया, निळया, काळया किंवा पिवळया रंगाचे, भराभर घिरट्या घालणारे हे कीटक होत. यांचे चारी पंख सारखे पसरलेले असतात, व ते अंगाच्या मानानें बरेच मोठे असतात. हे कीटक-भक्षक प्राणी असल्यामुळें पाण्याच्या आसपास सांपडणाऱ्या डांस, माशा, पतंग, यांसारख्या कीटकांवर यांची उपजीविका चालते. यांचीं अंडीं पाण्यांत एखाद्या गवताच्या काडीवर घातलेलीं असतात.

**चतुर सावाजी**—सतराव्या शतकांतील एक चतुर पुरुष. याचें नांव साबाजी अनंत चतुर होतें. शहाजीच्या वेळीं हा झाला व शहाजी आणि मुरार जगदेव यांच्या विरुद्ध पक्षास हा होता. याला शहाजीची भरभराट पाहवली नाहीं, म्हणून तो मोंगलांस मिळाला, वगैरे माहिती बखरींत आढळते. कांहीं बखरकार म्हणतात कीं, हा अकबराच्या दरबारीं होता तर दुसरे हा विजापूरच्या किंवा निजामशाही दरबारीं होता असें लिहितात. यानें जमिनीची मोजणी करून उत्कृष्ट धारेबंदी अमलांत आणिली. याची मोजणीची काठी सात हातांची होती. यानें ओसाड जमिनी कौल देऊन लागवडीस आणल्या, रयतेस तगाई व जनावरें दिलीं. याच्या चतुरपणाच्या अनेक गोष्टी प्रसिद्ध आहेत. याच्या नांवावर कांहीं काव्येंहि घातलीं आहेत.

**चतुरसिंग भोसले** (मृ. १८१८)— हा साताऱ्च्या धाकट्या शाहूमहाराजाचा भाऊ. इ. स. १७९८ मध्यें शाहूपासून साताऱ्चा किल्ला घेण्यासाठीं बाजीरावानें पाठविलेलें परशुरामभाऊचें सैन्य अचानक आलें व त्यानें साताऱ्चा किल्ला ताब्यांत घेतला. तेव्हां चतुरसिंगानें पळून जाऊन कोल्हापूरकरांच्या मदतीनें छापा घातला. रास्त्यांच्या फौजेचा यानें पूर्ण नाश केला. या त्याच्या धाडसामुळें याला बरेच अनुयायी मिळाले. यशवंतराव होळकर दक्षिणेंत आला तेव्हां हा कांहीं काळपर्यंत त्यास सामील झाला होता. पुढें यानें हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत नोकरी केली. हा कांहीं दिवस नागपूरच्या रघूजी भोसल्याकडे होता. त्यानें त्यास दरमहा १५,००० रु. नेमणूक करून दिली होती.

अमृतरावाच्या पुत्रास पेशवाईचीं वस्त्रें देण्याच्या कामीं यानें बरीच खटपट केली होती. असेंच येथें झालेल्या इंग्रजांच्या लढाईंत हा मोठ्या शौर्यानें लढला. स. १८१२ त त्रिंबकजी डेंगळे यानें याला विश्वासघातानें कैद करून कोंकणांत रायगडानजीक कांगोरीच्या किल्ल्यांत ठेवलें. तेथेंच हा मरण पावला. मराठेशाहीच्या अखेरीस झालेल्या पराक्रमी पुरुषांपैकीं हा एक होय.

**चतुर्थ**—हे लोक मुख्यत्वें महाराष्ट्राच्या दक्षिण भागांत आढळतात. हे दिगंबर पंथाचे जैन आहेत. यांचा परंपरागत धंदा शेतीचा आहे. मिरजनजीक नंदीमठाचे जैन श्रीस्वामी हे सर्व चतुर्थ लोकांचे गुरु असून व्यावहारिक व धार्मिक बाबींत यांचा अधिकार चतुर्थ मानतात.

**चतुर्भुजदास**—एक हिंदी कवि. हा विठ्ठलनाथाच्या पुष्टिमार्गी आठ 'अष्टछाप' कवींपैकीं असून द्वादशयश, भक्तिप्रताप, हितजुको मंगल, व इतर स्फुट पद्यें यानें लिहिलीं.

**चतुर्मुख**—एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें लोह, पारा, गंधक, अभ्रक व सुवर्णभस्म हीं असून तीं कोरफडीच्या रसांत खलतात. हें औषध क्षयामध्यें वापरण्याचा फार प्रघात आहे. अन्नपचन न होणें, तोंडाला पाणी सुटणें, पोटांत थोडेंसें दुखणें, पचनशक्ति कमी असणें, इत्यादि लक्षणें असतांना हें औषध चांगलें उपयोगी पडतें. खोकला, गळ्यांत चिकटा बसणें, घसा बसणें, रोगी अतिशय क्षीण होणें, तहान लागणे, हातापायाची आग होणें, वारंवार घाम येणें, इत्यादि लक्षणांवर याचा चांगला उपयोग होतो. ।· ते १ गुंज, दूध-खडीसाखरेबरोबर देतात.

**चतुर्वेदी, जगन्नाथप्रसाद कालीप्रसाद** (१८७५- )—एक हिंदी कवि, विनोदी लेखक, वृत्तपत्रकार व सार्वजनिक कार्यकर्ते. यांनीं प्रथम 'भारत-मित्र' या पत्रांतून लेख व कविता लिहिण्यास सुरुवात केली. 'संसारचक्र' ही कादंबरीहि यांनीं याच कालांत लिहिली. हे 'हितवार्ता' चे कांहीं दिवस सहसंपादक होते.

भावपूर्ण, रसाळ व बोचक परंतु विनोदी लिखाणांबद्दल हे सुप्रसिद्ध आहेत. (१) बसन्त मालती, (२) गद्यपद्यमाला, (३) स्वदेशी आंदोलन, (४) हिंदी लिंगविचार, (५) मधुर मीलन (नाटक), यांसारखीं अनेक गद्यपद्यात्मक पुस्तकें यांनीं लिहिलीं.

लाहोर व बिहार येथील हिंदी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मानहि यांना मिळाला आहे.

**चतुर्हस्त प्राणी**—(क्वाड्रुमाना). ही संज्ञा क्युवीए व इतर शास्त्रज्ञ लेमूर मर्कटसारख्या ज्या प्राण्यांच्या पायांस बोटें असतात त्यांस लावीत असत व मनुष्यप्राण्यास ते बायमाना अथवा द्विहस्त सस्तनप्राणी म्हणून वेगळे समजत असत. परंतु अर्वाचीन प्राणिशास्त्रज्ञ मनुष्याला लेमूर मर्कट वगैरे प्राथमिक अवस्थेंतील प्राण्यांच्याच वर्गांत अंतर्भूत करतात व त्यांत मनुष्यप्राण्याचें एक स्वतंत्र कुल आहे, एवढें मानतात.

**चतुष्क**—(क्वाटरनिऑन्स). सर विल्यम रोवन हॅमिल्टननें शोधून काढलेली गणितपद्धति. क्वाटरनिऑन्सचें स्वरूप बैजिक आहे, किंवा ती त्रिमान (लांबी, रुंदी, उंची) भूमितीसारखी पद्धति आहे, असें म्हणतां येईल. सरल (प्लेन) भूमितींत आरंभस्थानापासून क्ष, य बिंदूंपर्यंत काढलेली चलनाभिज्या (व्हेक्टर) क्ष + इय नें दाखवितात. ह्या धर्तीवर हॅमिल्टन क्ष, य, श ह्या बिंदूंपर्यंत काढलेली चलनाभिज्या इक्ष + जय + कश नें दर्शवितो. इक्ष, जय, कश ह्यांतील इ, ज, क या चलनाभिज्या तीन अक्षांच्या दिशेनें काढलेल्या एकम् (युनिट) चलनाभिज्या आहेत. इक्ष, जय, कश या चलनाभिज्यांची मिळवणी समांतरभुज चौकोनाच्या नियमानें करून वरील चलनाभिज्या येते. इ, ज, क हे –१ चे वर्गमूळ आहेत.

भूमिति व पदार्थविज्ञानशास्त्र यांत ही पद्धति महत्त्वाच्या सूचना देते. हॅमिल्टन व पी. जे. टेट हे ह्या पद्धतीला अतिशय महत्त्व देतात. परंतु केल्व्हिनला तिचा फारसा उपयोग नाहीं असें वाटतें. विद्युत् व लोहचुंबकशास्त्रांत क्लार्क मॅक्स्वेलनें ह्या पद्धतीची परिभाषा वापरली आहे. यापेक्षां हिचा जास्त उपयोग नाहीं. आधुनिक पदार्थविज्ञानसंशोधनांत ही पद्धति फारच थोडी उपयोगाची आहे असें दिसून आलें.

**चंद घराणें**— कुमाऊन येथें तेराव्या शतकाच्या आरंभापासून चंद घराण्यानें राज्य करण्यास सुरुवात केली ती सोळाव्या शतकाच्या पहिल्या दशकापर्यंत, असें तत्कालीन ताम्रपटादि लेखांवरून दिसतें. यांतील राजांच्या नांवाच्या शेवटीं चंद (चंद्र) येतें. पंधरा राजांचीं नांवें ओळीनें सांपडतात. हें घराणें कुमाऊन येथें तीनशें वर्षें राज्य करीत होतें.

**चंदगड**— मुंबई, बेळगांव जिल्हा. बेळगांवच्या पश्चिमेस २२ मैलांवर चंदगड पेट्याचें हें मुख्य ठिकाण आहे. येथें एक पडकी मातीची गढी आहे. १७२४ सालीं सावंतवाडीच्या फोंड सावंताचा पुत्र नागसावंत यानें चंदगड पेटा लुटला होता. पुढें १७५० सालीं पेशव्याचें व सदाशिवरावभाऊचें भांडण झाल्यावरून सदाशिवरावानें कोल्हापूर सरकारच्या पेशवेपदाचा मान मिळवून चंदगड, पारगड आणि काळानंदीगड हे किल्ले व सालिना ५,००० रु. उत्पन्नाचा मुलूख हीं आपणांस कोल्हापूर सरकाराकडून मिळविलीं होतीं.

**चंदन** (अठराव्या शतकाचा उत्तरार्ध)—एक हिंदुस्थानी कवि. गौड राजा केशरी याच्या पदरीं हा असून फारशी भाषतील एक मान्यवर शाहीर म्हणून प्रसिद्ध होता. 'कल्लोळ तरंगिणी', 'शृंगारसागर', 'काव्याभरण', वगैरे तेरा ग्रंथ यानें लिहिले. फारशी भाषेंत यानें लिहिलेला 'दिवाने संदल' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. यांशिवाय याच्या कांहीं कविताहि प्रसिद्ध आहेत.

**चंदन**—[वर्ग–सान्तालासी, जाति–सान्तालम्]. पूर्वेकडील देशांत होणारें हें सुगंधी झाड आहे. विशेषतः म्हैसूर, कुर्ग व मलबार इकडे चांगला चंदन होतो. पांढरें, तांबडें, पिवळें असे त्याचे प्रकार आहेत. मलयपर्वतावरील चंदन फार सुवासिक म्हणून जुनी ख्याति आहे. हिंदुस्थानांत सुगंध व शीतलता देण्याच्या कामीं चंदनाचा प्राचीन काळापासून उपयोग होत आहे. कनोज, लखनौ, जौनपूर यांसारख्या ठिकाणीं चंदनी तेल काढण्याचे जुने कारखाने आहेत. म्हैसूर सरकारचा म्हैसूरला मोठा कारखाना आहे. म्हैसूर संस्थानांत चंदनाची लागवड सर्वांत जास्त प्रमाणांत आहे. चंदन हें फार औषधी आहे. उष्णतेच्या विकारांवर चंदनी तेल फार गुणकारी म्हणून प्रसिद्ध आहे. चंदनाच्या लांकडाच्या पेटया, फण्या, मूर्ती, वगैरे कित्येक वस्तू तयार होतात.

**चंदन-वंदन**—साताऱ्याच्या ईशान्येस १० मैलांवर असलेले दोन किल्ले. यांपैकीं वंदन हा अधिक मजबूत व मुख्य आहे. चंदन हा वंदन किल्ल्यापासून अर्ध्या मैलावर आहे. हे किल्ले ११९० त पन्हाळ्याच्या राजानें बांधले असावेत व १६०० च्या सुमारास विजापूरच्या इब्राहिम आदिलशहानें यांची दुरुस्ती केली असावी. इ. स. १६७३ त हे किल्ले शिवाजीनें घेतले. १७०१ मध्यें औरंगजेबानें व १७०८ मध्यें शाहूनें यांचा ताबा घेतला. वंदन हा विस्तृत असून त्यावर बरेंच सैन्य राहत असावें. येथें एके काळीं विजापूरच्या एका परगण्याचें ठाणें होतें.

**चंदभाट**—बाराव्या शतकांतील एक हिंदी भाट–कवि. याला चंदवरदाई असेंहि नांव आहे. हा पृथ्वीराज चव्हाण याच्या पदरीं होता व पृथ्वीराजाबरोबर महंमद घोरीच्या कैदेंत मरण पावला. यानें पृथ्वीराज रासो नांवाचा जो प्रसिद्ध काव्यग्रंथ रचिला आहे त्यांत तत्कालीन माहिती व हिंदु-मुसलमानांतील युद्धें दिलीं आहेत. हा ग्रंथ पुढें भर पडून वाढला. आज यांतील पद्यसंख्या सव्वा लक्षावर आहे. हिंदींत याला महाकाव्याची योग्यता प्राप्त झाली आहे.

**चंदरभान** (मृ. १६६२)—एक हिंदुस्थानी ग्रंथकार. पतियाळा संस्थानांत दारा शुकोहच्या पदरीं असलेला हा एक ब्राह्मण मुनशी असून याचें उपनांव राजोरा असें आहे. यास वीस मुलगे व एक मुलगी अशीं एकवीस अपत्यें होतीं. फार्सी भाषेंत यानें 'गुलदस्त', 'तुहफतउल–अनवार', 'तुहफत्–उल्–फस्हा', 'जम्मा–उल्–फक्रा' हे ग्रंथ लिहिले असून 'ब्राह्मण' या टोपण नांवाखालीं याचें कांहीं काव्यहि प्रसिद्ध आहे. गुरुप्रसाद याचा हा शिष्य असून जालंदरी देवीचा उपासक होता.

**चंदावरकर, सर नारायण गणेश** (१८५५–१९२३)—एक हिंदी पुढारी. यांचें शिक्षण मुंबई येथें झालें. १८७९ मध्यें एल्एल्. बी. होऊन यांनीं वकिली सुरू केली. पुढें ते मुंबई

हायकोर्टाचे न्यायाधीश झाले. हे मुंबई विद्यापीठाचे कांहीं दिवस कुलगुरु होते. १९०० सालीं ते राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. कांहीं दिवस ते इंदूर येथें दिवाण म्हणून गेले होते, परंतु राजीनामा देऊन तेथून ते परत आले. ते मुंबई कायदेमंडळाचे कांहीं वर्षे अध्यक्ष होते. यांच्यावर इंग्रज सरकारचा विश्वास असून त्यांचें सरकारांत चांगलें वजन असे. यांस रौलट ॲक्टानंतर बसविलेल्या कमिटीवर सभासद नेमण्यांत आलें होतें. हे प्रथमपासून वर्तमानपत्रांत लिहीत असत. त्यांनीं कांहीं दिवस इंदुप्रकाश पत्र चालविलें होतें. १८९९ पर्यंत ते फेरोजशहा मेथा यांचे सहकारी म्हणून राजकारणांत भाग घेत असत. पुढें न्यायाधीश झाल्यामुळें ते लोकपक्षापासून दूर झाले. सामाजिक सुधारणेमध्यें यांचीं मतें बरींच प्रागतिक होतीं व आचरणांत हे फार नेमस्त होते. हे प्रार्थनासमाजिष्ट होते व भक्तिसंप्रदायावर यांचा विश्वास असे.

**चंदासाहेब**—अर्काटचा एक नबाब. याचें नांव हुसेन दोस्तखान असून हा अर्काटचा नबाब दोस्त अल्ली याचा जांवई होता. हा फ्रेंचांना मदत करी, यामुळें फ्रेंचहि उलट त्याच्या बाजूनें लढत. रघोजी भोसल्यानें त्रिचनापल्लीवर स्वारी करून चंदासाहेबास कैद केलें व साताऱ्यास पाठविलें. तेथें तो सात वर्षे कैदेंत होता. पुढें खंडणी भरून सुटला. नंतर फ्रेंच व निजामाचा नातू मुजफ्फरजंग यांच्या मदतीनें पुन्हां अर्काटचा नबाब बनला. पण इंग्रजांनीं खऱ्या वारसाची बाजू घेऊन फ्रेंच व चंदासाहेब यांचा पराभव केला. हा पळून जात असतां तंजावरचा सेनापति मानाजी जगताप यानें त्याला ठार केलें. (१७५२).

**चंदूलाल नारायणदास** (१७६६-१८४५)— हैद्राबाद संस्थानचे एक मुख्य प्रधान व दानशूर गृहस्थ. 'राजा चंदूलाल' या नांवानें हे ओळखले जात असत. चुलते राय नानकराम यांच्या हाताखालींच हैद्राबाद संस्थानच्या नोकरींत यांचा प्रथम प्रवेश झाला व राय नानकराम यांच्या पश्चात् करोडगिरीवरील मुख्याच्या जागेवर यांची नेमणूक करण्यांत आली. यानंतर हैद्राबादचा त्या वेळचा मुख्य प्रधान मीर आलम याच्या विश्वासू मदतनिसांपैकीं हे एक होते. सन १८०६ मध्यें पेशकार व फडणीस खात्याचे मंत्री नेमण्यांत आले. मीर आलम या दिवाणानंतर नबाब मुनिउल्मुल्क हे जरी दिवाण होते तरी पेशकार या नात्यानें चंदूलाल यांच्याकडेच राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें होतीं. नबाब मुनिउल्मुल्क यांच्या पश्चात् तर दिवाणपदावर यांचीच नेमणूक करण्यांत आली. पस्तीस वर्षे दिवाणपदाची कामगिरी उत्तम प्रकारें बजावून १८४३ त यांनीं आपल्या प्रधानकीचा राजीनामा दिला. या वेळीं निजामानें यांना एक कोटी रुपयांची देणगी, कित्येक जहागिरी गांव व तीस हजार रुपये मासिक पेन्शन चालू केलें. धर्मनिष्ठ व दानशूर म्हणून हे प्रसिद्ध आहेत.

**चंदेरी**— मध्य हिंदुस्थान, ग्वाल्हेर संस्थानाच्या नरवर जिल्ह्यांतील शहर. यांत चंदेरी किल्ला आहे. याच्याभोंवतीं दाट झाडी असलेल्या टेंकड्या आहेत. एके काळीं हें फार भरभराटीचें शहर होतें. किल्ल्याच्या पायथ्याशीं किरतसागर नांवाचा तलाव आहे. इ. स. १४९० त हा किल्ला माळव्याच्या घैसुद्दिनच्या ताब्यांत असून याच्यावर शेरखान नांवाचा किल्लेदार होता. या किल्लेदाराच्या मुलानें किल्ल्याच्या दक्षिणेकडील टेंकडींतून एक रस्ता खोदला आहे. या किल्ल्यापासून ९ मैलांवर जमीनदोस्त झालेलें जुनें चंदेरी शहर आहे.

**चंदेरीगड**—मुंबई, पनवेल तालुक्यांत पनवेलच्या नैर्ऋत्येस १० मैलांवर तामसई नांवाच्या खेड्यांत मलंगगड व पेबचा किल्ला यांच्या दरम्यान हा किल्ला बांधलेला आहे. यास सध्यां तटबंदी वगैरे कांहीं नसून सर्वत्र पडझड झालेली आहे.

**चंदेल्ल घराणें**—हें रजपूत राजघराणें बुंदेलखंडावर राज्य करीत होतें. त्या वेळीं बुंदेलखंडास जेजाकभुक्ति असें नांव होतें. नवव्या शतकापासून तेराव्या शतकाच्या आरंभापर्यंत यांचें राज्य होतें. महोबा ही त्यांची राजधानी असून कलिंजर हा त्यांचा एक चांगला गड असे. या घराण्यांत धंग (दहाव्या शतकाचा उत्तरार्ध) आणि कीर्तिवर्मा (मु. १०६०) हे दोन मोठे पराक्रमी राजे होऊन गेले. गझनीच्या मुसलमानी स्वाऱ्यांचा प्रतिकार करण्यास धंग झटला व कीर्तिवर्म्यानें चेदीचा बलिष्ठ राजा कर्ण याचा पराभव केला. यानंतरचे राजे आपल्या शेजाऱ्यांशीं लढून हतबल झाले व बाराव्या शतकाच्या अखेरीस मुसलमानांना शरण गेले. १२०३ सालीं कलिंजर मुसलमानांनीं जिंकलें तेव्हांपासून हें घराणें नामशेष झालें. बुंदेलखंडांत चंदेल्ल राजांनीं बांधलेलीं देवळें व पाटबंधाऱ्यांचीं कामें पुष्कळ दिसतील.

**चंद्र**— आकाशाकडे सहज नजर टाकली असतां असें वाटतें कीं, सूर्य आणि चंद्र यांचा आकार सारखाच आहे. परंतु ती डोळ्यांची फसवणूक आहे. सूर्यापेक्षां चंद्र किती तरी पटीनें लहान आहे. परंतु तो पृथ्वीच्या जास्त जवळ असल्याकारणानें आपणाला तसें वाटतें इतकेंच. चंद्राचा व्यास अवघा २१६० मैल असून तो पृथ्वीपासून २,३९,००० मैलांवर आहे. चंद्र हा पृथ्वीला सर्वांत जवळचा ग्रह होय. चंद्राची पृथ्वीभोंवतीं प्रदक्षिणा २७ दिवस ७ तास ४३ मिनिटें व १४ सेकंद एवढ्या वेळांत पुरी होते. चंद्र पश्चिमेकडून पूर्वेकडे जात असतो आणि इतर सर्व ग्रहहि पश्चिमेकडून पूर्वेकडे जात असतात. पण आपणाला दिसतें मात्र उलट. याचें कारण

पृथ्वीची स्वतःची दैनंदिन गति हें होय. याच गतीमुळें सूर्योदय-सूर्यास्त, चंद्रोदय-चंद्रास्त, वगैरे गोष्टी घडतात.

चंद्राची नेहमीं एकच बाजू आपणाला दिसते. दुसरी बाजू अद्यापि कोणीहि कधींहि पाहिली नाहीं आणि ती दिसणेंहि शक्य नाहीं.

चंद्राच्या कला—प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत आणि पौर्णिमेपासून प्रतिपदेपर्यंत ज्या कला बदलतात त्याविषयीं निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळ्या कल्पना बसविलेल्या होत्या. बाबिलोनियन असें समजत कीं, चंद्राला एक काळी व एक पांढरी अशा दोन बाजू आहेत आणि त्या क्रमाक्रमानें दिसतात.

परंतु असा प्रकार कांहीं नसून चंद्र हा एक पृथ्वीचाच भाग आहे. तसेंच तो ज्या साहित्यानें पृथ्वी बनलेली आहे, त्या साहित्याचाच आहे. चंद्राला स्वयंप्रकाश नाहीं तर त्याचा प्रकाश म्हणजे सूर्याच्या प्रकाशाचें पृथ्वीवरून दिसणारें परावर्तन होय. आणि त्याचा जेवढा भाग सूर्यप्रकाशाच्या उजेडांत येतो तेवढाच भाग पृथ्वीवरून दिसतो. अमावस्येला पृथ्वी व सूर्य यांच्यामध्यें चंद्र आल्यानें चंद्राचा उजेड असलेला पृष्ठभाग दिसत नाहीं. परंतु तृतीया, सप्तमी, दशमी या दिवशीं क्रमाक्रमानें चंद्रप्रकाश पृथ्वीवर जास्त जास्त पडत जातो. आणि पौर्णिमेला तो पूर्ण प्रकाशमान होतो. ही स्थिति शुक्लपक्षांत असते. आणि पौर्णिमेपासून अमावास्येपर्यंत चतुर्दशी, अष्टमी, एकादशी याप्रमाणें वद्यपक्ष सुरू होऊन शेवटीं अमावस्येला चंद्र परत पुनः पहिल्या जागीं येतो.

चंद्रावरील डाग—चंद्रावर निरनिराळ्या प्रकारचे डाग दिसतात. आणि या डागांचें साहश्य—१ माणसाचा चेहरा, २ खेकड्याचें तोंड, ३ पुस्तक वाचणारी मुलगी, ४ गाढव, ५ एक चांगली स्त्री, वगैरेशीं नुसत्या डोळ्यांनीं दिसतें. परंतु दुर्बीण लावल्यानंतर चंद्रावर निराळींच दृश्यें दिसतात. कांहीं पर्वत दिसतात; आणि जो सपाट प्रदेश दिसतो ते महासागर असावेत. तसेंच जीं वाटोळीं वाटोळीं भोंकें दिसतात तीं निद्रिस्त ज्वालामुखीचीं तोंडें आहेत.

चंद्रावरील पर्वतांच्या उंची—पृथ्वीपेक्षां चंद्र लहान आहे. आणि त्याच मानानें चंद्रावरील पर्वतहि लहान आहेत. चंद्रावरील पर्वतांपैकीं सर्वांत उंचांत उंच पर्वत २६,६९१ फूट उंच असून सर्वांत लहान पर्वताची उंची ३,५०० फूट आहे. या पर्वतांमधून ज्या निरनिराळ्या घड्या दिसतात त्या एका मागोमाग शेंकडों मैल पसरलेल्या असून त्यांची रुंदी जास्तींत जास्त दोन मैलांपर्यंत आहे व खोली एक मैलापर्यंत आहे. चंद्रावर जे निद्रिस्त ज्वालामुखी आहेत त्यांतून तेजोमय किरण बाहेर पडत असतात आणि ते केव्हांहि दिसतात, याचें कारण अद्यापि शास्त्रज्ञांना उमगलें नाहीं. अर्थात् चंद्रावर वनस्पतिजीवन नाहीं आणि मानवी जीवन तर मुळींच नाहीं. निर्जीव, निर्जन, आणि ओसाड प्रदेश असलेले फक्त पर्वत व दऱ्याखोरीं असलेला असा हा उपग्रह आहे.

चंद्रामुळें प्रवाह उत्पन्न होतात—गॅलिलीओ आणि केप्लर यांनीं सूर्य आणि चंद्र यांच्यामुळें प्रवाह उत्पन्न होतात असें नुसतें सांगितलें, परंतु न्यूटन आणि लाप्लास यांनीं त्याला पूर्ण शास्त्रीय स्वरूप दिलें. चंद्रामुळें प्रवाह उत्पन्न होतात आणि महासागराचें पाणी त्यामुळें खेळतें राहतें. सूर्यापेक्षां चंद्र पृथ्वीच्या जास्त जवळ असल्यामुळें त्याचें आकर्षण जास्त प्रभावी ठरतें. प्रत्यक्ष असें दिसून आलें आहे कीं, महासागरामधील पाणी चंद्राच्या गुरुत्वाकर्षणानें सूर्याच्या गुरुत्कर्षणापेक्षां तिप्पट जोरानें खेचलें जातें.

चंद्र कसा बनला ?—वायुमय अवस्थेंत जेव्हां पृथ्वी फिरूं लागली, तेव्हां तिचा आकार बदलत गेला आणि चंद्र निर्माण झाला. पृथ्वी वायुरूप अवस्थेंतून घनरूप अवस्थेंत येतांना जे प्रचंड महासागर निर्माण झाले, त्या जागीं असलेला घनभाग चंद्राबरोबर दूर अंतरावर निघून गेला. आणि आज तो चंद्रावर दिसत आहे.

ग्रहणें—सूर्य, चंद्र आणि पृथ्वी हे ज्या वेळीं एका रेषेंत येतात, त्या वेळीं सूर्यग्रहण लागतें. परंतु सूर्य आणि चंद्र यामध्यें जेव्हां पृथ्वी येते, त्या वेळीं चंद्र पृथ्वीवरील लोकांना दिसत नाहीं आणि हेंच चंद्रग्रहण होय. (ग्रहणें पहा).

भुत्याचंद्र—चंद्र हा कित्येक वेळेला तांबडसर, करडा अगर भुत्या रंगाचा दिसतो. हें चंद्राचें भूत या नांवानें ओळखलें जातें. असें भूत दिसण्याचें कारण चंद्रावर पडणारे सूर्यकिरण

**चंद्रशेखर** ( १८७१–१९३७ )— एक अर्वाचीन मराठी कवि. हे मूळचे नाशिकचे, शुक्ल यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे ब्राह्मण असून यांचें संपूर्ण नांव वामन शिवराम गोऱ्हे असें होतें. प्रथम वडोद्यास यांनीं दिवाण कचेरींत व नंतर चीफ मेडिकल ऑफिसरच्या कचेरींत कारकुनाची नोकरी धरली. मात्र आयुष्याच्या अखेरच्या काळांत वडोदें संस्थानचे 'राजकवि' होण्याचा मान यांना लाभला.

अगदीं लहानपणींच यांना कविता करण्याचा नाद लागला. 'कोकिळ' ही यांची कविता पुण्याच्या 'करमणूक' पत्रांत ता. १८ मे १८९५ रोजीं प्रसिद्ध झाली. ही यांची पहिलीच प्रसिद्ध झालेली कविता होय.

यांच्या काव्यांतलि गुण म्हणजे विलक्षण सफाई, प्रसाद व माधुर्य या दृष्टींनीं केलेली शब्दांची अचूक निवड, निर्दोष वृत्तरचना, गोड अनुप्रास व स्वाभाविक यमकें हे होत. प्रासंगिक व रूपांतरित अशा कविता यांनीं बऱ्याच लिहिल्या. 'काय हो चमत्कार,' व 'उघड गुपित' हीं दोनच प्रेमकाव्यें यांनीं लिहिलीं. 'गोदागौरव' व 'सोमनाथ' हीं यांचीं दोन खंडकाव्यें अपूर्णावस्थेंतच आहेत.

भारतगौरव ग्रंथमालेनें यांच्या संपूर्ण काव्याचा संग्रह प्रसिद्ध केला आहे.

**चंद्रशेखर वाजपेयी** ( ज. १७९८ )—हे एक हिंदी कवि जोधपूरच्या नरेंद्रसिंहाचे आश्रित होते. यांच्या वडिलांचें नांव माणिराम असें होतें. विवेकविलास, हरिभक्तिविलास, रसिकविनोद, ताजक–ज्योतिष, नखशिख, वगैरे ग्रंथ यांचेच होत. हम्मीरहठानें यांचें सगळीकडे नांव झालें. हिंदी भाषेवरील यांचें प्रभुत्व वाखाणण्याजोगें आहे.

**चंद्रसेन जाधव** (मृ.१७५१)—एक मराठा सेनापति धनाजी जाधवाचा हा मुलगा. धनाजीच्या पश्चात् याचें कर्तृत्व ओळखून शाहूनें यास सेनापतिपद दिलें. पुढें बाळाजी विश्वनाथ यास शाहूनें आश्रय दिला हें सहन न होऊन हा जेऊरच्या लढाईनंतर उघडपणें ताराबाईच्या पक्षास मिळाला. दमाजी थोरात व कोल्हापूरचा संभाजी यांना यानें शाहूविरुद्ध मदत दिली. चंद्रसेनाकरवीं संभाजीनें शाहूविरुद्ध निजामाशीं संधान बांधलें. एकंदरींत हा हट्टी, अहंमन्य पण धडाडीने पुढें जाणारा असा होता. तथापि याच्या हातून स्वराज्याची कांहीं सेवा झाली नाहीं.

**चंद्रहास**—एक पौराणिक राजा. हा केरलाधिपति सुधार्मिक राजाचा पुत्र, सुंदर व सर्वलक्षणयुक्त असूनहि त्याचा जन्म मूळ नक्षत्रावर झाला होता व त्याच्या पायास सहावी अंगुली होती. त्यामुळें हा जन्मतांच त्याच्या पित्यास शत्रूंनीं ठार मारलें. मातेनें सहगमन केल्यामुळें हा निराश्रित बनला. तथापि त्याच्या दाईनें त्याला कौंतलाकापुरींत वाढविलें; पण तीहि लवकरच मरण पावली. पुढें चंद्रहास भिक्षेवर निर्वाह करीत असतां दुष्टबुद्धि प्रधानाच्या घरीं आला; पण चंद्रहास पुढें राजा होणार असें भविष्य कळल्यावरून दुष्टबुद्धीनें त्याला ठार मारण्याचा अनेकदां प्रयत्न केला, पण सुदैवानें सर्व संकटांतून निभावून आणि प्रत्यक्ष दुष्टबुद्धीच्या विषयानामक कन्येशीं विवाह होऊन चंद्रहास अखेर राजपद पावला. युधिष्ठिराच्या अश्वमेधास यानें बरेंच साहाय्य दिलें.

**चंद्रात्मज** ( सु. १७६५ )— मराठींतील हा एक अप्रसिद्ध कवि. यानें लिहिलेलीं उद्योगपर्व व गोकर्णमाहात्म्य हीं दोन प्रकरणें उपलब्ध आहेत. उद्योगपर्व बारा अध्यायांत असून त्यांत सुमारें २,००० ओवीसंख्या आहे व गोकर्णमाहात्म्यांत एकंदर ६४ श्लोक आहेत.

**चंद्रावती(ली)**— मुंबई, पालनपूर संस्थान, अबूच्या पहाडापासून दक्षिणेस १२ मैलांवरील ठिकाण. येथें पूर्वी एक प्राचीन शहर असून त्याचा परिघ १८ मैल होता. चंद्रावती हें एकदां व्यापाराचें धार्मिक ठिकाण म्हणून प्रसिद्ध होतें. या शहराची भरभराट ७ व्या शतकापासून १५ व्या शतकाच्या आरंभापर्यंत सारखी चालली होती. अहमदाबादचें चीट व रेशीम प्रसिद्ध होण्याला येथील रंगारी व कोष्टी बरेच कारणीभूत झाले.

**चॅनल बेटें**—हा द्वीपसमूह इंग्लिश खाडीमध्यें ब्रिटनच्या मालकीचा असून त्यांत जर्सी, गर्नसी, आल्डरने, सर्क, वगैरे बेटें आहेत. या बेटाला इंपीरिअल पार्लमेंटचे सर्व कायदे लागू नसतात. जे कायदे लागू करावयाचे त्यांत या बेटांचा स्पष्ट निर्देश करावा लागतो. या बेटांवरील लोकांना बहुतेक सर्व करांची माफी आहे. तथापि ब्रि. प्रजाजनांचे सर्व हक्क त्यांना उपभोगतां येतात. या बेटांचा कारभार तेथील स्थानिक संस्थांच्या हातीं आहे. त्यांना स्टेट्स ( राज्यें ) म्हणतात. स्टेट्समधील कांहीं सभासद इंग्लंडचा राजा नेमतो, कांहीं सभासद लोकनियुक्त असतात, आणि कांहीं सभासद अधिकारपरत्वें असतात. या बेटांना मोठा खर्च करून भक्कम तटबंदी केलेली आहे. जे नॉर्मन प्रांत इंग्लंडच्या ताब्यांत होते त्यांपैकीं आतां एवढाच प्रदेश अवशेष राहिला आहे. क्षे. फ. ९५ चौ. मैल व लोकसंख्या ९०,२३० आहे. १९४० सालीं जर्मन सैन्यानें हीं बेटें काबीज केलीं होतीं.

**चन्नपट्टण**—म्हैसूर, बंगळूर जिल्ह्यांतील चन्नपट्टण तालुक्याचें मुख्य शहर आहे. हें रेल्वे स्टेशन असून बंगळूर शहरापासून ३५ मैल आहे. इ. स. च्या १४ व्या शतकांत तेलगू लोकांतील जें बनाजिग घराणें उदयास आलें होतें, त्यांतील जगदेवराय

नांवाच्या पुरुषास स. १५७७ त पराक्रमाचें बक्षीस म्हणून हा प्रांत मिळाला; तेव्हां जगदेवरायानें येथें आपली राजधानी आणली व सन १५८० त एक किल्ला बांधला. या ठिकाणीं बनजिग घराण्यांतील पुरुषांनीं सन १६८० पर्यंत राज्य केलें. नंतर तें म्हैसूरच्या ताब्यांत गेलें. यांत लाखेचीं भांडीं, मुलांचे खेळ, पोलादी तारा आणि बांगड्यांचे कारखाने आहेत.

**चन्नबसव**—लिंगायत धर्माचा संस्थापक जो बसव त्याचा हा भाचा. याच्या आईचें नांव नागलंबिका. यानें आपल्या मामानें स्थापन केलेला वीरशैव संप्रदाय चांगला वाढविला.

इ. स. १५८५ मध्यें विरूपाक्षी या कवीनें कानडी भाषेंत 'चन्नबसव' नांवाचें एक पुराण रचलें. लिंगायतांचा हा एक महत्त्वाचा पुराणग्रंथ आहे. यांत चन्नबसवानें सिद्धरामास लिंगायत धर्माचें महत्त्व अनेक उदाहरणें देऊन पटवून दिलें व शेवटीं त्यास लिंगायत धर्माची दीक्षा दिली.

या पुराणांत चन्नबसवाच्या जन्माची हकीकत पुढें दिल्याप्रमाणें सांगितली आहे: जैन, बौद्ध, चार्वाक, इत्यादि पंथीयांच्या वाढत्या संख्याबलामुळें भरतखंडांत शिवोपासना कमी होत चालली होती; ती वाढविण्यासाठीं शंकर, पार्वती, कार्तिकस्वामी व नंदी यांनीं अवतार घेण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें माडिराज ब्राह्मणाच्या मदांबी नामक स्त्रीच्या पोटीं पार्वती व नंदी हे जन्मास आले. पार्वतीचें या अवतारीं नांव नागलंबिका व नंदीचें नांव बसव असें होतें.

एके दिवशीं या नागलंबिकेनें जंगमाची (गुरूची) पूजा करून प्रसाद खाऊन शिवाचें ध्यान केलें असतां शिव प्रसन्न होऊन त्यांनीं तुझ्या पोटीं वीरशैव लिंगायत धर्माचा प्रसार करणारा महात्मा चन्नबसव हा जन्मास येईल असा आशीर्वाद दिला. हा चन्नबसव कार्तिक स्वामींचाच अवतार होय. शिवानेंहि जंगमाच्या रूपानें पृथ्वीवर अवतार घेतला. असा एकंदर मुख्य कथाभाग आहे.

**चन्नम्मा**—एक शूर कर्नाटकी महिला. ही धारवाड जवळील कित्तूर गांवची असल्यानें कित्तूर चन्नम्मा या नांवानें प्रसिद्ध आहे. शिवाजीस हिनें पकडून नेलें होतें असें सांगतात. हिच्यावर शाहिरांनीं पोवाडे रचिले आहेत.

**चंपतराय**—महोबा येथील एक राजा. चंदेरीच्या राजाचा हा आप्त होता. जहांगीर मरण पावल्यावर सर्व बुंदेले राजांनीं एकत्र येऊन दिल्लीपतीचें सार्वभौमत्व झुगारून देण्याचें ठरवलें. शहाजहानानें या अरिष्टाचा मोड करण्याची कामगिरी बाकीखान, खानजहान लोदी, महाबदखान, वगैरे सरदारांवर सोंपवली होती. परंतु बुंदेले राजांनीं या सर्वांना पाणी पाजून अखेर बादशहास तह करण्यास भाग पाडलें. या लढायांत चंपतरायनें चांगलाच पराक्रम गाजवला व त्याबद्दल यास कोंच परगणा जहागीर मिळाला व उमरावांतहि जागा मिळाली. यानंतर औरंगजेबानें यास १२,००० स्वारांची मनसबदारी दिली, परंतु पुढें बादशहाकडून अपमान झाल्यानें यानें बादशहाविरुद्ध युद्ध पुकारलें व त्यांत हा ठार झाला. याचाच पुत्र छत्रसाल बुंदेला होय.

**चॅपमन, जॉर्ज** (१५५९-१६३४)—एक इंग्रज कवि. त्याचें शिक्षण ऑक्सफर्ड येथें झालें. त्यानें ईलियड या महाकाव्याचें भाषांतर करून तें संपूर्ण महाकाव्य १६११ मध्यें प्रसिद्ध केलें. १६१४ मध्यें त्यानें केलेलें ओडेसी या काव्याचें भाषांतर प्रसिद्ध झालें, आणि त्याच सालीं 'बॅटल् ऑफ दि फ्रॉग्ज् ॲन्ड माइस' (बेडूक आणि उंदीर यांची लढाई) हें पुस्तक आणि होमरकालीन कवितासंग्रह (होमेरिक हिम्स) प्रसिद्ध झाला. हेसियड कवीच्या 'वर्क्स ॲन्ड डेज्' (काम आणि दिवस) याचें भाषांतर त्यानें केलें. आणि इतर अनेक अभिजात (क्लासिक) कवींच्या कांहीं कवितांचें भाषांतर केलें. त्यानें नाटकें पुष्कळ लिहिलीं, पण तीं बहुतेक सर्व आतां लोक विसरले आहेत. चॅपमनची मुख्य प्रसिद्धि होमर कवीच्या ईलियडच्या भाषांतराबद्दल आहे. त्याच्या सुखान्त नाटकांपैकीं 'ऑल फूल्स' (सर्व मूर्ख) हें नाटक सर्वांत उत्तम आहे.

**चंपानेर**—मुंबई, पंचमहाल जिल्ह्यांतील एक गांव. १४८४ त सुलतान महंमद बेगडानें हें ठिकाण हस्तगत करून घेतलें. व त्यानें तेथें बरीच सुधारणा केली. १५३६ पर्यंत चंपानेर गुजराथची राजधानी होती. १५३५ त हुमायूननें गुजराथच्या बहादूरशहाचा पराभव केल्यापासून चंपानेरचें महत्त्व कमी होत गेलें. १८५३ त ब्रिटिश सत्तेखालीं तें आल्यावर तेथें वस्ती वाढवून ऊर्जितावस्था आणण्याकरितां प्रयत्न झाले, पण ते निष्फळ ठरले.

**चंपारण**—बिहार, तिरहूत विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,५५३ चौ. मैल. यांत मळीचें मैदान पुष्कळ आहे व सोमेश्वर नांवाचा २,८८४ फूट उंचीचा पर्वत आहे. गंडकी नदीनें याचे दोन भाग पाडले आहेत. उत्तरेकडे तांदूळ व दक्षिणेकडे इतर धान्यें होतात. जिल्ह्याच्या मध्यभागांतून ४३ तळ्यांची एक रांग गेली आहे. जंगलांत हिंस्र पशू आहेत. पाऊस सु. ५५ इंच पडतो. लो. सं. २३,९७,५६९. ठारू नांवाची एक डोंगरी जात आहे. ती चांगली उद्योगी आहे. जिल्ह्यांत जाडेंभरडें कापड, चादरी, मातीचीं भांडीं होतात. साखरेचे कारखाने आहेत. निळीचे मळे आहेत. नेपाळाकडे जाणारा रस्ता या जिल्ह्यांतून आहे. नद्यांतून नावा जातात.

चरित्रें हीं युरोपांत जुनींच आहेत. तिकडे सतराव्या शतकापासून चरित्रवाङ्मयाची मोठी वाढ होत गेली. बॉस्वेलनें लिहिलेलें जॉन्सनचें चरित्र, साउदेचें नेल्सनचरित्र, मोर्लेचें ग्लॅडस्टनचरित्र यांसारखीं चरित्रें वाङ्मयाचीं भूषणें होत. चरित्रकोशहि बरेच तयार झाले आहेत व होत आहेत. 'डिक्शनरी ऑफ नॅशनल बायॉग्रफी' सारखे कोश फार महत्त्वाचे आहेत.

आपल्याकडे देवादिकांचीं व साधुसंतांचीं चरित्रें लिहिण्याचा फार प्रघात होता. पुराणांतून किती तरी चरित्रें आहेत. शिवाय भक्तिविजय, संतविजय, हरिविजय, रामविजय हीं स्वतंत्र चरित्रेंच म्हणतां येतील. आज मराठींत लहान लहान चरित्रें पुष्कळच आहेत. आधुनिक काळांतील खंडात्मक चरित्रें म्हणजे लो. टिळक, सयाजीराव गायकवाड, मंडलिक यांचीं होत. चित्रावशास्त्री यांनीं प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन असा त्रिखंडात्मक चरित्रकोश संपादून प्रसिद्ध केला आहे. रा. ब. सरदेसाई यांनीं शहाजी, शिवाजी, संभाजी, राजाराम, शाहू, इ. ऐतिहासिक चरित्रें नव्यानें लिहून मराठी रियासतीची दुसरी आवृत्ति काढली आहे. आत्मचरित्रें (पाहा) हा चरित्र वाङ्मयाचाच एक भाग आहे.

**चर्चिल, विन्स्टन लिओनार्ड स्पेन्सर** (१८७४- )— एक विख्यात इंग्रज राजकारणी पुरुष व ब्रिटनचा माजी पंतप्रधान. हा लॉर्ड रॅंडॉल्फ याचा मुलगा. याचें शिक्षण हॅरो आणि सँढर्स्ट येथें झालें. तो १८९५ मध्यें सैन्यांत शिरला; आणि क्युबावर स्पॅनिश सैन्यानें जी स्वारी केली तींत त्यानें भाग घेतला होता. तसेंच हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील युद्धांत, आणि १८९८ मध्यें सुदानवरील स्वारींत हा होता. बोअर युद्धांत त्यानें चांगली कामगिरी बजावली, पण बोअर लोकांनीं त्याला कैद केलें; तथापि चार्चिलनें त्या कैदेंतून मोठ्या आश्चर्यकारक रीतीनें आपली सुटका करून घेतली. १९०० सालीं तो कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षातर्फे पार्लमेंटचा सभासद झाला. तथापि कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षानें आपली व्यापारी करांची सुधारणा (टॅरिफ–रिफॉर्म) जाहीर केली तेव्हां चार्चिल कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष सोडून लिबरल पक्षांत सामील झाला. १९०५ सालीं वसाहती खात्याचा अंडर सेक्रेटरी, १९०८ मध्यें ट्रेडबोर्डाचा प्रेसिडेंट, १९१० मध्यें होम सेक्रेटरी, १९११ सालीं फर्स्ट लॉर्ड ऑफ ॲडमिरल्टी झाला. १९०८ मध्यें त्यानें लेबर एक्स्चेंज ॲक्ट आणि स्वेटेड इंडस्ट्रीज ॲक्ट मंजूर करून घेतले. १९१० मध्यें त्यानें तुरुंगव्यवस्थेंत अनेक सुधारणा केल्या. १९११ मध्यें 'सिडने स्ट्रीट सीज्' या दंग्याच्या वेळीं पोलिसांना मदत म्हणून यानें लष्कर पाठवलें. तेव्हां त्याबद्दल चर्चिलवर फार टीका झाली. १९१४ मध्यें त्यानें वार्षिक बजेटांत आरमारी खर्चाचा आंकडा पूर्वी कधींहि नव्हता इतका अतिशय मोठा दाखवला. १९१५ मध्यें त्यानें फर्स्ट लॉर्ड ऑफ ॲडमिरल्टी या जागेचा राजीनामा दिला. पुढें संयुक्त प्रधानमंडळांत त्यानें जागा पत्करली. पण १९१५ च्या नोव्हेंबरांत त्या जागेचा राजीनामा देऊन पहिल्या महायुद्धांत तो प्रत्यक्ष लढाईवर गेला. १९१७ मध्यें तो मिनिस्टर ऑफ म्यूनिशन्स (लष्करी साहित्यमंत्री), नंतर १९१९ मध्यें युद्धमंत्री (वॉर ॲन्ड एअर सेक्रेटरी), आणि १९२१ मध्यें वसाहतींचा सेक्रेटरी झाला. १९२२ मध्यें आयर्लंडबरोबर चालू असलेल्या तडजोडीच्या बैठकींत त्यानें प्रमुख भाग घेतला. पहिल्या महायुद्धाचा विस्तृत इतिहास चर्चिलनें लिहिला; त्यापैकीं 'Aftermath' हें पुस्तक १९२९ सालीं प्रसिद्ध झालें. शिवाय मार्लबरो आणि इतर कांहीं ग्रंथ चर्चिलनें प्रसिद्ध केले.

दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर १९४० च्या मे महिन्यांत या युद्धांतील आणीबाणीच्या वेळीं चार्चिल मुख्य प्रधान झाला व त्याच सालीं ऑक्टोबर महिन्यांत त्याला कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचा पुढारी नेमण्यांत आलें. अमेरिकेला आपल्या बाजूस ओढण्याचा चार्चिलचा शहाणपणा नांवाजण्यासारखा आहे. १९४१ ऑगस्टमध्यें चार्चिल आणि प्रेसिडेंट रूझवेल्ट यांची समुद्रावर मुलाखत झाली. १९४२ जून महिन्यांत चर्चिलने प्रेसिडेंट रूझवेल्टची दुसऱ्यांदां मुलाखत घेतली. त्यानें १९४२ ऑगस्टमध्यें कायरो व मॉस्को शहरांना भेट दिली. १९४३ जानेवारींत चर्चिल आणि रूझवेल्ट यांची कासाब्लांका येथें जी १० दिवस मुलाखत झाली, ती फार महत्त्वाची होती. १९४३ डिसेंबरमध्यें रूझवेल्ट, चॅंग-कै-शेक, स्टॅलिन आणि चर्चिल यांच्या मुलाखती झाल्या. १९४५ फेब्रुवारींत याल्टा येथें चर्चिल, रूझवेल्ट व स्टॅलिन यांची मुलाखत झाली.

ता. ८ मे १९४५ रोजीं चर्चिलनें पार्लमेंटमध्यें शत्रुसैन्य पूर्ण शरण आल्याचें जाहीर केलें. त्याच सालीं जुलै महिन्यांत पार्लमेंटची नवी निवडणूक होऊन मजूरपक्ष फार मोठ्या बहुमतानें निवडून आला म्हणून चर्चिल प्रधानमंडळानें राजीनामा दिला. दुसऱ्या महायुद्धांत चार्चिलच्या मुत्सद्देगिरीमुळेंच दोस्तांना विजय मिळाला यांत शंका नाहीं.

त्याची टीका कडक असते. पण तींत डावपेंच नसतात. तो एक शिपाईगडी वृत्तीचा मुत्सद्दी आहे. युद्धकालांत चर्चिलनें केलेलीं भाषणें युद्धकार्याला अतिशय उत्तेजन देणारीं म्हणून प्रसिद्ध आहेत. स्वदेशहिताच्या प्रश्नांत तो विरुद्ध पक्षाला नेहमीं पाठिंबाच देत असतो.

**चर्पटीनाथ**—नवनाथांपैकीं एक. सुदर्शन व लीलावती यांचा हा मुलगा. हा एकदां पाण्यांत बुडत असतांना गोरक्ष-

नायानें याला वांचविलें व तेव्हांपासून हा त्याचा शिष्य बनला. पुढें हा मोठा योगी झाला.

**चर्मण्वती**—चंबळा नदीचें प्राचीन नांव. ही अपर कुंतिराष्ट्राच्या दक्षिणेस असून, रंतिदेव राजाच्या यज्ञांत जे पशु मृत झाले, त्यांच्या चर्मराशीपासून जो रक्तप्रवाह निघाला त्या योगानें उत्पन्न झाली म्हणून हें नांव हिला पडलें (म. भा., शांतिपर्व, अ. २९).

**चर्मपत्र**—एक लेखनसाधन म्हणून प्राचीन काळीं चामड्याचा उपयोग करीत. हिंदुस्थानांतील ताडपत्रें, भूर्जपत्रें यांप्रमाणेंच पाश्चात्य देशांत चर्मपत्रें टिकाऊ लेखनासाठीं वापरीत. शेळयामेंढ्या व इतर जनावरें यांचीं कातडीं या कामासाठीं चांगलीं कमावीत. इंग्रजींतील चर्मपत्रवाचक 'पार्चमेंट' हा शब्द आशिया मायनरमधील जुन्या परगॅमस शहराच्या नांवावरून पडला आहे (परगॅमेना चार्टा). ख्रि. पू. दुसऱ्या शतकांत हें शहर चर्मपत्रांसाठीं प्रसिद्ध असे. पुढें कागद निघाल्यापासून चर्मपत्रादि लेखनसाहित्य मागें पडून नामशेषहि झालें. आज महत्त्वाचे करार लिहिण्याच्या कामींच फक्त याचा उपयोग करतात.

**चलन**—देशांत चालू असणाऱ्या पैशालाच हें नांव आहे. मालाच्या खरेदीसाठीं सुलभ रीतीनें देण्याघेण्यांत उपयोगी पडेल अशी चलनी वस्तु म्हणजे पैसा होय. हा ज्यापासून तयार करतात तो पदार्थ लोकांनीं स्वीकारण्याजोगा, टिकाऊ, हलका, एकसारखा व सहज ओळखतां येणारा असा असावा लागतो. सोनें, चांदी, तांबें व निकल या धातूंचींच मुख्य नाणीं असतात. कागदी चलनहि काढण्यात येतें. पैसा हा ज्याप्रमाणें विनिमयाचें साधन आहे त्याचप्रमाणें मूल्यमापनाचेंहि साधन आहे. गेल्या महायुद्धापूर्वी युरोप-अमेरिका व वसाहती यांमधून सोनें हें मूल्याचें प्रमाण धरण्यांत येई, पण नंतर तशी स्थिति राहिली नाहीं. कारण सोन्याचा भाव फार चढला. आंतील धातूवर ज्याचें मूल्य अवलंबून आहे असा पैसा प्रचारांत असेल तेव्हां 'खोटा पैसा खऱ्याचें उच्चाटन करतो' हा ग्रॅशॅमचा सिद्धान्त प्रत्ययाला येतो. तेव्हां पैसा ही एक व्यापारी वस्तु असून तिचें मूल्य मागणी-पुरवठ्यावरून ठरत असतें. मोठाल्या राष्ट्रांतून चलनांची व्यवस्था व नियंत्रण सरकारनियुक्त पेढ्यांमार्फत होत असतें.

चलनपद्धतीचे तीन प्रकार आहेत: एक, द्वि व तुलनात्मक चलनपद्धति. एकचलनपद्धतींत मुख्य नाणें सोनें किंवा रुपें यांपैकीं एका धातूचें असतें. द्विचलनपद्धतींत सोनें आणि रुपें या दोन्ही धातूंचीं नाणीं कायदेशीर चलन म्हणून असतात. तुलनात्मक पद्धतींत दोन्ही धातूंचीं नाणीं तोलून त्यांचें बाजारभावाप्रमाणें जें मूल्य होईल त्या प्रमाणांत स्वीकार होतो. नाण्यांसंबंधींचें विवेचन नाणकशास्त्रांत केलेलें सांपडेल.

**चलनवाढ**—मालाच्या किंमती चढत गेल्या म्हणजे चलनाची वाढ होत असते. पहिल्या महायुद्धानंतर अनेक राष्ट्रांतून अशी चलनवाढ झाली. जर्मनींत नोटांची संख्या इतकी फुगली कीं, जर्मन मार्कला किंमतच राहिली नाहीं. एक लाख कोटी मार्कची किंमत एक सोन्याच्या मार्कबरोबर ठरविण्यांत आली. तथापि १९२० च्या आर्थिक संकटानंतर अशा चलनवाढीचा उपयोग धंद्यांच्या वाढीला करून घेण्यांत आला. गेल्या युद्धकालांत हिंदुस्थाननें आपला वाढलेला खर्च भागविण्यासाठीं जवळजवळ एक हजार कोटी रुपयांची चलनवाढ केली. १९४६–४७ च्या तोंडमिळवणीसाठीं पुन्हां १९॥ कोटी रुपयांची चलनवाढ केली. १९४७–४८ च्या अंदाजपत्रकांत येणारी तूटहि ५१ कोटींची नवी चलनवाढ करून भरून काढण्यांत आली. चलनवाढ करूनच तूट भरून काढण्याचें सरकारी धोरण फार घातुक आहे, असें कांहीं तज्ज्ञ अर्थशास्त्रज्ञ सांगतात.

**चवळी**— या वेलाची लागवड हिंदुस्थानांत उष्ण भागांत करतात. हें खरीप पीक असून बहुतकरून तें शेतांत नुसतें न पेरतां बाजरीसारख्या पिकाबरोबर दुय्यम पीक म्हणून पेरतात.

चवळ्या गोड असतात. त्यांच्या शेंगांची भाजी करतात. चवळ्या सारक, वृष्य, थकवा दूर करणाऱ्या व रुचिकारक असून कफ आणि पित्त दोषांना नाहींशा करतात.

**चष्टन क्षत्रप** (१२५–१३०)—एक क्षत्रप राजा. गौतमीपुत्र शातकर्णीनें नहपानाचें राज्य याला दिलें. यानें आपल्या पराक्रमांवर नहपान क्षत्रपानें घालवलेला सर्व मुलूख परत मिळविला. यामुळें यास महाक्षत्रप असेंहि म्हटलें आहे. याच्या वंशजांनाहि हेंच बिरुद लावलेलें आहे.

**चष्मे**—दृष्टींतील दोष सुधारण्यासाठीं केलेली दर्शन-भिंगाची योजना. बाह्यगोल भिंगांचा व्यवहारांत उपयोग करण्याबाबतचें श्रेय आद्य आंग्ल संशोधक रॉजर बेकन याला देण्यांत येतें, पण तें निर्विवाद म्हणतां येणार नाहीं. असलीं भिंगें १४ व्या शतकाच्या प्रारंभीं प्रचारांत होतीं खरीं; पण त्यांचा संबंध बेकनशीं जोडतां येत नाहीं. बाह्यगोल भिंगाचें ज्ञान फार प्राचीन काळापासून माणसाला होतें, असें निमरूडच्या उत्खननावरून सिद्ध होतें. पण त्यांचा उपयोग दृष्टि सुधारण्यासाठीं त्या वेळीं होत असेल असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं.

अठराव्या शतकापासून प्रकाशवक्रीभवनाच्या सिद्धान्तानुसार चष्मे तयार होऊं लागले. स्फटिकशिला घासून विशिष्ट प्रकाशगुणधर्मांच्या कांचा (लेन्स) बनवीत. दूरदृष्टीच्या दोषासाठीं

चोकजवळच्या डोंगरांत पुष्कळ कोरीव लेणीं आहेत. यांत गोंड व हो लोकांची वस्ती फार आहे. हे लोक शेतकीवर आपली उपजीविका करतात. लो. सं. २१,२६६. उत्पन्न १,१३,०८० रुपये आहे. हें १९४७ सालीं मध्यप्रांतांत विलीन झालें.

**चांचेगिरी**—चांचेगिरी म्हणजे समुद्रावर केलेली लुटालूट व चोरी या प्रकारचा गुन्हा होय. इंग्लंडांत या गुन्ह्याची पूर्वी चौकशी ॲडमिरल्टी कोर्टात ज्यूरीशिवाय पण दिवाणी कायद्याप्रमाणें होत असे. पण हल्लीं चांचेगिरीचा गुन्हा करणाऱ्या इसमांची चौकशी असाइज कोर्टाकडून होते. युरोपच्या इतिहासांत व्हिकिंग्ज, बुकॅनियर्स, डचबगर्स ऑफ दि सी, इंग्लिश सी डॉग्ज, वगैरे चांचे लोक प्रसिद्ध असून कॅ. ॲव्हेरी, कॅ. किड, बार्थोलोम्यू रॉबर्ट्स, वगैरे प्रसिद्ध पुरुष या चांच्यांत होऊन गेले. मलबार किनाऱ्यावर युरोपियनांच्या चांचेगिरीचा फार उपद्रव असे. अरब वगैरे मुसलमानहि चांचेगिरींत निष्णात होते. आंग्रे यांच्या सामर्थ्यामुळें या किनाऱ्यावरील ही चांचेगिरी बहुतेक बंद पडली होती. जकात-चोरी पहा.

**चातुर्मास्य**—या शब्दाचा अर्थ 'चार महिन्यांचा' असा आहे व हा शब्द एक याग अशा अर्थानें तैत्तिरीय संहितेंत वापरलेला आहे. हा याग चार चार महिन्यांच्या तीन ऋतूंत वैदिक वर्ष विभागलेलें असे त्या ऋतूंच्या आरंभीं होत असे. नंतर आषाढ शुक्ल एकादशीपासून अथवा पौर्णिमेपासून कार्तिक शुक्ल एकादशीपर्यंत अथवा पौर्णिमेपर्यंत होणाऱ्या चार महिन्यांस चातुर्मास्य अशी संज्ञा पडली. चातुर्मास्याच्या आरंभीं जी एकादशी असते तिला शयनी एकादशी म्हणतात आणि समातीला जी एकादशी असते तिला प्रबोधिनी म्हणतात. मनुष्याचें वर्ष म्हणजे देवांची एक अहोरात्र. दक्षिणायन ही देवांची रात्र व उदगयन हा दिवस होय. उदगयन कर्कसंक्रांतीला होत असतें व कर्कसंक्रांति आषाढ महिन्यांतच असते. शयन म्हणजे झोंप घेणें. देव आषाढ शुद्ध एकादशीला झोंप घेतात, म्हणून तिला शयनी असें नांव पडलें आहे; आणि कार्तिक शुद्ध एकादशीला उठतात, म्हणून तिला प्रबोधिनी हें नांव पडलें आहे. देवांची रात्र म्हणजे मनुष्यांचे ६ महिने आहेत.

देव चातुर्मास्यामध्यें निद्रा घेत असतात, तेव्हां असुरांपासून रक्षण होण्याविषयीं आपण फारच सावध असलें पाहिजे. तेव्हां चातुर्मास्यामध्यें कांहीं तरी व्रतें केल्याशिवाय राहूं नये असें धर्मशास्त्र सांगतें. निर्णयसिंधु, धर्मसिंधु वगैरे ग्रंथांतून चातुर्मास्यासंबंधीं विशेष व्रतेंहि कथन केलीं आहेत.

**चातुर्वर्ण्य**—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार वर्णांचा संयोग, संघ व त्यांचीं धर्मान्वित कर्तव्यें म्हणजे चातुर्वर्ण्य. ऋग्वेदकालीं चार वर्ण होते; चातुर्वर्ण्य नव्हतें. ऋग्वेदपूर्वकालीं ब्राह्मणांचा एकच वर्ण होता; नंतर ह्या शुक्ल वर्णाचा मिलाफ रक्तवर्ण क्षत्रियांशीं झाला; मागाहून पीतवर्ण वैश्य ह्या दोन वर्णांना भेटले व त्रैवर्णिकांचा संघ निर्माण झाला. परंतु त्रैवर्णिकांचें शास्त्र कधीं काळीं असल्याचें दिसत नाहीं. शूद्रांशीं ह्या तीन वर्णांची अगदीं शेवटीं गांठ पडली म्हणूनच अलंकारिक भाषेंत शूद्रांची उत्पत्ति पायापासून झाल्याचें वर्णिलें आहे. हे चारी समाज स्वतंत्र होते; चातुर्वर्ण्यानें ते एकत्र गोंवले गेले. चारी वर्णांच्या चालीरीती वेगवेगळ्या होत्या. ह्यास्तव शास्त्रकारांना जातिधर्म अबाधित ठेवावे लागले. ब्राह्मणांची उत्पत्ति सप्तर्षींपासून आहे तर क्षत्रियांची मनूपासून आहे. ब्राह्मणांचा श्रौत धर्म आणि क्षत्रियांचा परंपरागत अथवा स्मार्त धर्म अशी स्मृतिपूर्वकालीं स्थिति होती. वायुपुराणांत वैश्यांची उत्पत्तिसुद्धां क्षत्रियांप्रमाणें मनूपासून झाल्याचें सांगितलें आहे. चार वर्ण एकत्र झाले तेव्हां धंद्यांची वांटणी झाली. पुरोहितांचें कर्म ब्राह्मणांकडे आलें; राजकारण क्षत्रियांनीं आपल्या अंगावर घेतलें; कृषिकर्म वैश्यांनीं संभाळलें; व पोषणाची जबाबदारी पत्करून त्रैवर्णिकांनीं भृत्यकर्म शूद्रांवर सोंपविलें. त्रैवर्णिकांना धार्मिक बाबी सारख्याच होत्या. ह्या तीनहि वर्णांचा स्वतःचा धर्म होता. तशी स्थिति शूद्रांची नव्हती. त्यांना धर्म नसल्यामुळें शुश्रूषा म्हणजे द्विजांनीं सांगितलेला धर्म ऐकणें—स्वतः अध्ययन करणें नव्हे—हाच त्यांचा धर्म झाला. शुश्रूषा शब्दाचाच पुढें सेवा असा अर्थ झाला. सेवा म्हणजे शुश्रूषा.

**चांदणीकेदार**—हा राग कल्याणथाटांतून निघतो. या रागाच्या आरोहांत ऋषभ व गांधार असत्प्राय आहेत. व अवरोहांत गांधार असल्यानें याची जाति औडुव-षाडव आहे. वादी मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर मानितात. तीव्र मध्यमाचा प्रयोग शुद्धकेदार रागापेक्षां यांत जास्त होतो. कोमल निषाद स्वर अवरोहांत धैवतासंगतीं केव्हां केव्हां घेण्यांत येतो. या रागांत हमीर राग मिश्र झालेला दृष्टीस पडतो. हा राग यावनिक व आधुनिक आहे. हा एक केदारप्रकार आहे.

**चांदबिबी** ( सु. १५४७-१५९९ )—एक शूर मुसलमान राणी. ही विजापूरचा बादशहा अल्ली आदिलशहा याची पत्नी व अहमदनगरचा हुसेन निजामशहा याची कन्या होती. हिचें लग्न १५६४ सालीं झालें. लग्नानंतर ती नवऱ्याचा राज्यकारभार पाहत असे. तो मेल्यानंतर ( १५८० ) पुतण्याच्या वतीनें ती कारभार करूं लागली. त्या वेळीं विजापूरचें राज्य साऱ्या दक्षिणेंत मोठें होतें. ती न्यायनिठुर व दक्ष असल्यानें प्रजेस प्रिय झाली होती. पण कांहीं कारस्थानी मुत्सद्यांनीं तिला कैद करून ठेविलें ( १५८२ ); पण तिच्यावांचून कारभार नीट चालेना

तेव्हां तिला मोकळें केलें. तिनें विजापूरचें शत्रूंपासून रक्षण केलें. इकडे निजामशाहींत अंदाधुंदी व राज्यक्रांति माजून राहिली व मोंगली फौजा अहमदनगरावर चालून आल्या तेव्हां चांद-बिबीला विजापुराहून बोलावून आणली. तिनें आल्यावर राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं व अहमदनगरच्या किल्ल्यास पडलेला वेढा उठविला. पण पुन्हां अकबरानें मोठें सैन्य पाठ-विलें ( १५९९ ). तेव्हां तिनें तह करून बालराजाला जुन्नरास नेण्याचा विचार केला. पण तिच्या एका सरदारानेंच तिचा खून केला.

**चांदमारी मैदान**—बंदुकीनें नेम मारण्याचा सराव करण्या-करितां जें मैदान अथवा मोकळी जागा राखून ठेवण्यांत येते तीस हें नांव देण्यांत येतें. अशा ठिकाणीं तोफा किंवा बंदुका यांनीं नेम मारण्याचा अभ्यास करण्यांत येतो. पूर्वी चांदमारीचें मैदान म्हणजे एक फक्त बंदुकीच्या गोळ्या अडविण्याकरितां रचलेला मातीचा ढीग असे. याच्या दोन्ही बाजूंस मार्क मोजणाऱ्यांकरितां आडोसे असत व या दोन आडोशांच्या दर-म्यान दोन चौकोनी लक्ष्यें अथवा चांद ठेवलेले असत. यानंतर अतिशय त्वरेनें उडणाऱ्या बंदुका प्रचारांत आल्यावर लोखंडाचें लक्ष्य निरुपयोगी वाटूं लागलें; कारण त्याचा तुकडा उडण्याचा संभव असे. याकरितां अलीकडे लांकडी चौकटीवर कापड बसवून लक्ष्य तयार करण्यांत येतें. यानंतर अलीकडे प्रचारांत आलेलीं नवीन लक्ष्यें उपयोगांत आणण्यांत येऊं लागलीं. हें नवीन लक्ष्य आडोशांच्या बाजूला असण्याऐवजीं त्याच्या माथ्यावर ठेवण्यांत येतें. लहान बंदुकांनीं सराव करावयाचा असतां लहान मैदानांचा उपयोग करण्यांत येतो. किंवा घराच्या आवारांतच हा अभ्यास करतां येतो. तथापि अशा वेळींहि लक्ष्याचें अंतर पंधरा यार्डांहून कमी नसावें व साधारणपणें २६ यार्ड असावें. मोकळ्या मैदानांत हें अंतर १०० यार्डपर्यंत ठेवण्यांत येतें. विद्यार्थ्यांस शिकविण्या-करितां ३२ यार्डांचें अंतर सामान्यतः ठेवण्यांत येतें. तोफांचे नेम मारण्याकरितां बरेंच मोठें मैदान लागतें. व ज्या ठिकाणीं दलदल वगैरे असेल अशीं ठिकाणें या कामाकरितां पसंत करण्यांत येतात.

**चांदवड**—मुंबई, नाशिक जिल्हा. नाशिकच्या ईशान्येस ४० मैलांवर व लासलगांव स्टेशनपासून उत्तरेस १४ मैलांवर आग्रा रस्त्यावर ६०० ते १,००० फूट उंचीच्या एका टेंकड्यांच्या रांगेच्या पायथ्याशीं हें गांव वसलेलें आहे. येथें मल्हारराव होळ-करानें एक टांकसाळ घातली होती.

वऱ्हाड व नाशिक यांच्या वाटेवर हें असल्यामुळें येथें फार मोठा व्यापार चालत असे. गांवाच्या ईशान्येस रेणुकादेवीचें देऊळ आहे. व पूर्वेस एक कालिकादेवीचें देऊळ आहे. येथें एक बादशाही मशीद असून तींत फारसी शिलालेख आहे. पौष शुद्ध पौर्णिमेस येथें खंडोबाची जत्रा भरते.

**चांद सुलतान** ( १७०६–३८ )—देवगडचा एक गोंड राजा. मोंगल साम्राज्य याच्या वेळीं विस्कळीत झालें होतें. त्याचा फायदा घेऊन यानें मोंगलांचा बराचसा मुलूख व वर्धा जिल्ह्यांतील पवनार हें ठाणें आपल्या वर्चस्वाखालीं आणलें. या वेळीं नागपूर व आसपासचा प्रदेश यांस बरेंच महत्त्व आलें. होतें. कान्होजीशीं झालेल्या तंट्यानंतर रघूजी याजकडे आला असतां यानें त्यास आश्रय दिला.

**चांदा**—मध्यप्रांत, नागपूर भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ९,२०५ चौ. मैल. गोदा, वर्धा, वैनगंगा, इ. नद्या यांतून जातात. वैनगंगेच्या पश्चिमेस असणाऱ्या टेंकड्यांवर बरेंच जंगल आहे. पाऊस सु. ५१ इंच पडतो. जिल्ह्यांत चांदा व वरोडा हीं शहरें व २,५८४ खेडीं आहेत. गोंडांची वस्ती बरीच आहे. जिल्ह्यांत कोळशाच्या खाणी आहेत. तांबें आणि लोखंडहि सांपडतें. चांदा, चिमूर व आरमोरी हीं व्यापारी ठिकाणें आहेत. कापड व रेशीम तयार होतें. रेशमी धोतरजोड्याविषयीं चांदा प्रसिद्ध आहे. लो. सं. ८,७३,२८४.

चांदा भागांत वाकाटक राजघराणें चौथ्या शतकापासून बाराव्या शतकापर्यंत नांदत होतें. त्यानंतर गोंड राजे आले. हीरसाहा राजानें चांद्याचा किल्ला बांधला. अकबराच्या वेळचा कर्णसाहा हा स्वतंत्र राजा होता. १७५१ त मराठ्यांनीं हा प्रदेश जिंकून घेतला. गोंड राजाचे वंशज अद्यापि चांद्यास आहेत. चांदा हें मुख्य ठिकाण असून तेथें कांहीं उद्योगधंदे व कारखाने आहेत. अचलेश्वर देवस्थान मोठें आहे. शहरा-भोंवतीं तट आहे व तेथें रामाळें नांवाचें मोठें तळें आहे. शहरांत गोंड राजांच्या छत्र्या आहेत. शहराबाहेर लालपेठेंत मोठमोठ्या देवतामूर्ती आहेत. येथें नक्षीकाम चांगलें होतें. लो. सं. १८,०००.

**चांदी**—रुपें पहा.

**चांदी-सोन्याचीं भांडीं**—चांदी-सोन्याचीं ताटें, वाट्या, वगैरे भांडीं फार प्राचीन काळापासून वापरण्यांत येत आहेत. त्यांतहि चांदीपेक्षां सोन्याच्या वस्तू अधिक प्राचीन आढळतात. कारण सोनें मऊ असून काम करण्यास सुलभ असतें व तें प्रथम-पासून शुद्ध स्थितींत मिळत आलें आहे. त्या मानानें चांदी कठिण असून ती शुद्ध स्थितींत फारशी मिळत नाहीं.

भरतखंडांत वैदिक कालपासून सोन्यारुप्यांचीं भांडीं वगैरे वस्तू वापरीत असल्याचे पुरावे यज्ञयागांतून व इतर समारंभांतून व पुराणादि ग्रंथांतून आढळतात; व ही कला भरतखंडांत पुष्कळच प्रगति पावलेली होती.

ग्रीसमध्यें फिडियस व मेंटॉर या दोघांचीं नांवें सोन्याच्या वस्तू करणारे कारागीर म्हणून आढळतात. रोमन लोक स्वतः जरी रुक्ष व साध्या राहणीचे होते तरी त्यांनीं ग्रीक कारागिरीचा भरपूर उपयोग करून घेतला व तेवढी संपत्ति त्यांच्याजवळ होती. चौथ्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत रोमन साम्राज्याचें वैभव बायझंटिअम येथें होतें. तेथें ही कला चांगली उत्कर्ष पावत होती. अकराव्या शतकामध्यें फ्रान्समधील टूर्स येथील व इंग्लंडमधील एलाय येथील खिस्त मंदिरें हीं या कलेचीं पुरस्कर्ती बनलीं. तेराव्या शतकामध्यें सुवर्णकारांचे संघ बनूं लागले आणि सोन्या-चांदीचीं भांडीं धार्मिक कामाऐवजीं रोजच्या व्यवहारांतहि येऊं लागलीं. आठव्या हेन्रीनें अशा भांड्यांचा चांगला संग्रह केला होता. हॉलबीनसारखा कलाकारहि सोन्याच्या पेल्यांच्या आदर्शाकृति काढण्याकडे लक्ष देऊं लागला. आतां यंत्रांच्या साहाय्यानें भांडीं तयार होऊं लागल्यामुळें कलाकार केवळ चित्र काढून देतो व त्याप्रमाणें कारागीर निरनिराळ्या वस्तू तयार करतात.

**चांदूर**—वऱ्हाड, उमरावती जिल्ह्याचा आग्नेयेकडील तालुका. क्षेत्रफळ ८५५ चौ. मैल.

चांदूर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून १८९५ सालीं कापसाचा बाजार बसला. येथें सरकी काढण्याचे व रुई दाबण्याचे कारखाने आहेत. येथील बागेत संत्रीं चांगल्या प्रकारचीं होतात. जुना गांव रेल्वेस्टेशनच्या दक्षिणेस एक मैल आहे. इ. स. च्या सहाव्या शतकांत वाकाटक राजांच्या शिलालेखांत उल्लेखलेलें ' चंद्रपूर ' हेंच असावें असें म्हणतात.

**चांदूर बाजार**—वऱ्हाड, उमरावती जिल्हा, एलिचपूर तालुक्यांतील एक गांव. उमरावतीच्या उत्तरेस २२ मैल व एलिचपूरच्या पूर्वेस १४ मैल हें गांव आहे. एलिचपूरचा नबाब नामदार खान याच्या ताब्यांत सुमारें ९५ वर्षांपूर्वीं हा जहागिरीचा गांव होता. त्या वेळीं त्यानें येथें बाजार बसविला. त्या वेळेपासून हा गांव प्रसिद्ध आहे. अलीकडे या बाजाराचें महत्त्व कमी झालें आहे. मध्यप्रांताची सीमा येथून आठ मैलांवर आहे. बाजार चांगला बांधलेला असून दिवे, पाण्याचीं टांकीं, सामान ठेवण्याकरितां जागा, वगैरे व्यवस्था चांगली आहे.

**चांद्रमास**—शुक्लप्रतिपदेपासून अमावास्येपर्यंतचा काल. हा मुख्य चांद्रमास असून पौर्णिमान्त मासाला गौणचांद्रमास म्हणतात. बारा चांद्रमासांचे ३५४ दिवस होतात. सौरवर्ष ३६५¼ दिवसांचें असतें. तेव्हां हा फरक अधिकमासानें भरून काढतात. हिंदुस्थानांत मलबार व बंगाल सोडून सर्वत्र चांद्रमान चालतें.

**चांद्रवर्ष**—दोन चांद्रपक्षांचा एक चांद्रमास होतो व अशा बारा चांद्रमासांचें एक चांद्रवर्ष होतें. नर्मदा नदीच्या उत्तरेकडील हिंदु लोकांचा चांद्रमास पौर्णिमान्त असतो. परंतु नर्मदेच्या दक्षिणेकडील लोकांप्रमाणें उत्तर हिंदुस्थानांतील लोकांतहि आरंभीं चांद्रमास अमान्तच असला पाहिजे. कारण अद्यापहि उत्तर हिंदुस्थानांत वर्षाचा व अधिक महिन्याचा आरंभ शुद्ध प्रतिपदेपासूनच धरण्यांत येत असतो; व दक्षिण हिंदुस्थानांतील लोकांप्रमाणें तेहि अमावास्येकरितां ३० चाच आंकडा लिहीत असतात. मुसलमानांच्या चांद्रमासाचा आरंभहि चंद्रदर्शनापासून म्हणजे बहुधा शुद्ध द्वितीयेपासूनच होत असतो. आपणां हिंदु लोकांत मास, पक्ष व तिथि यांची गणना चांद्रमानाप्रमाणेंच होते. परंतु सौरवर्षापेक्षां चांद्रवर्षांत १० दिवस, ५३ घटिका, ३० पळें व ६ विपळें कमी असल्यामुळें सौरमानांत व चांद्रमानांत ३२ महिन्यांमध्यें एका महिन्याचा फरक पडतो. तो भरून काढून व चांद्रमानाची सौरमानाशीं सांगड घालून चांद्रमासाचा व ऋतूंचा संबंध कायम राखण्याकरितां अधिकमास व क्षयमास धरण्याची पद्धत सुरू केली गेली. या योजनेमुळें मुसलमानांच्या चांद्रवर्षांतील वाटेल तो महिना जसा वाटेल त्या ऋतूंत येऊं शकतो व १०० सौरवर्षांत त्याच्या चांद्रवर्षांचीं जशीं अजमासें ३ वर्षें २४ दिवस व ९ घटिका वाढतात, तसा कांहीं प्रकार आपल्या हिंदु चांद्रसौरवर्षांत होत नाहीं. बंगाल, पंजाब, मलबार वगैरे कांहीं प्रांतांत शुद्ध सौर-गणना प्रचलित आहे; पण श्राद्धव्रतादि हिंदु धर्मकार्यें तिथीच्या अनुरोधानेंच होत असल्यामुळें तेथेंहि पंचांगांत सौर दिवसाबरोबरच चांद्र महिने, पक्ष, तिथी, वगैरे नमूद करण्याची व्यवस्था करावी लागते.

**चांद्रायण**—यथोचित कर्म न घडल्यास देहदंडरूप असें हें प्रायश्चित्त आहे. याचे यवमध्य व पिपीलिकामध्य असे दोन प्रकार आहेत. शुक्लपक्षांतील प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत दररोज भोजनांत एक एक घांस (प्रतिपदेस एक, द्वितीयेस दोन असे) वाढवून कृष्णपक्षांतील प्रतिपदेपासून दररोज एक एक घांस कमी घेत घेत अमावास्येस उपोषण करणें यास यवमध्यचांद्रायण असें म्हणतात. आणि कृष्णपक्षांतील प्रतिपदेस एक एक घांस याप्रमाणे आरंभ करून अमावास्येपर्यंत वाढविणें व पुन्हां प्रतिपदेपासून एक एक घांस कमी करीत येऊन पौर्णिमेस उपवास करणें यास पिपीलिकामध्यचांद्रायण असें म्हणतात.

**चान्सरी कोर्ट**—पूर्वीं इंग्लंडमध्यें पार्लमेंटच्या खालोखाल हें सर्वांत वरिष्ठ कोर्ट असे. १८७३ पासून हायकोर्ट ऑफ जस्टिस या वरिष्ठ न्यायालयाचा चान्सरी कोर्ट हा एक विभाग बनविण्यांत आला. या कोर्टांत लॉर्ड चॅन्सेलर हा अध्यक्ष व त्याच्या जोडीला पांच न्यायाधीश असतात. या कोर्टांत विशेषतः पुढील बाबतींतले दावे चालतात-मयताच्या इस्टेटीची व्यवस्था

पाहणें, भागीदारी ( पार्टनरशिप्स ), गहाण, ट्रस्ट इस्टेटी, दस्तऐवज दुरुस्त करणें किंवा रद्द करणें, स्थावर मिळकतीबद्दलचे करार, अज्ञानांचें पालकत्व आणि त्यांच्या इस्टेटीची व्यवस्था.

**चापेकर, नारायण गोविंद** ( १८६९-   )—एक संस्कृत व मराठी पंडित, धर्मशास्त्र व समाजशास्त्र यांचे अभ्यासक व संशोधक. यांचा जन्म मुंबईस झाला. तेथेंच एलएल्. बी. झाल्यावर चार वर्षे यांनीं ठाण्यास वकिली केली. त्यानंतर सन १९२५ पर्यंत हे न्यायखात्यांत मुनसफ होते व शेवटीं फर्स्टक्लास सब्‌जज्जच्या जागेवर होते. १९३१ पासून पंधरा वर्षे औंध संस्थानांत मुख्य न्यायाधीश म्हणून होते.

सन १९२७ पासून पुढें दहा वर्षे हे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष असून, त्या कालांत त्यांनीं म. सा. परिषदेला बरेंच स्थैर्य व महत्त्व प्राप्त करून दिलें. १९३४ सालीं ते बडोद्यास भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. ते जात्या विवेचक व संशोधक असून त्यांनीं ग्रामसंस्थेचा सूक्ष्म अभ्यास केलेला आहे. त्याचें उदाहरण म्हणून 'आमचा गांव–बदलापूर' हा त्यांनीं लिहिलेला मोठा ग्रंथ सांगतां येईल. यांनीं आपलें आत्मचरित्र 'जीवनकथा' नांवाचें लिहिलें आहे. ( १ ) पैसा, ( २ ) वैदिक निबंध, ( ३ ) पेशवाईच्या सावलींत, ( ४ ) रजःकण, ( ५ ) चित्पावन, ( ६ ) तर्पण, इ. ग्रंथ यांचा विविध विषयांचा दीर्घ व्यासंग दाखवितात.

**चाफळ**—हें गांव सातारा जिल्ह्यांत मांड नदीच्या तीरावर असून उंब्रजच्या पश्चिमेस ६ मैल आहे. हें सह्याद्रीच्या अरुंद खोऱ्यांत आहे. या खोऱ्यास चाफळ खोरें असेंच नांव आहे. हें गांव रामदासस्वामी यांच्या बंधूंच्या वंशजांस इनाम आहे. चाफळस्वामींचा येथें वाडा आहे. वाड्याच्या मध्यभागीं रामदासस्वामींनीं स्थापिलेलें श्रीरामाचें व मारुतीचें देऊळ आहे. रामनवमीस येथें यात्रा भरते. चाफळास श्रीरामाची स्थापना समर्थांनीं शके १५७१ ( सन १६४९ ) त केली. चाफळच्या जवळच एका कोसावर शिंगणवाडा असून येथें शिवाजी राजे यांना समर्थांनीं अनुग्रह दिला ( १६४९ ) असें सांगतात.

**चाफाजी टिळेकर**—नारायणराव पेशव्याचा एक स्वामिभक्त हुजऱ्या. नारायणरावाच्या खुनाच्या वेळीं त्याला वांचवण्यासाठीं हा त्याच्या अंगावर पडला असतां मारला गेला.

**चापेकर, दामोदर हरि** ( १८७०-१८९८ )— एक महाराष्ट्रीय क्रांतिकारक. यांचे वडील कीर्तनकार होते व दामोदर हरि हे त्यांच्या पाठीमागें उभे राहून साथ करीत व स्वतःहि कीर्तन करीत असत. हे सनातन वृत्तीचे असून त्या वेळच्या सुधारकांवर यांचा मोठा कटाक्ष असे. यांनीं एक व्यायामशाळा चालविली होती व हिंदुधर्मरक्षणार्थ एक मंडळ काढलें होतें. ते शिवाजी–उत्सवांत व गणपति–उत्सवांत स्वतः रचलेलीं पदें म्हणून दाखवीत असत. पुण्यास पहिल्या प्लेगच्या सांथींत सरकारी अधिकाऱ्यांची तपासणी फारच जाचक असे. त्या वेळीं तपासणी अधिकारी असलेला रॅंडसाहेब हा फार अप्रिय झाला होता. याकरितां त्याचा खून करण्याचा बेत चापेकर त्रिवर्ग बंधूंनीं आपल्या कांहीं मित्रांच्या साहाय्यानें केला. २२ जून १८९७ या दिवशीं गव्हर्नरच्या बंगल्यावरून एका पार्टीहून परत येतांना गणेशखिंडींत रॅंड व आयर्स्ट यांचे खून करण्यांत आले. त्याबद्दल दामोदर व त्याचा एक भाऊ बाळकृष्ण यांस फांशीची शिक्षा झाली. त्यांचा एक मित्र द्रविड यानें वीस हजार रुपयांच्या आमिषास भुलून त्यांचें नांव सरकारांत कळविल्यामुळें हा चापेकर बंधूंचा कट उघडकीस आला. याकरितां तिसरा चापेकर बंधु वासुदेव यानें रानडे याच्या साहाय्यानें द्रविड बंधूंचा खून करून त्यास मित्रद्रोहाचें प्रायश्चित्त दिलें. याकरितां वासुदेव व रानडे यांसहि फांशीची शिक्षा झाली. दामोदर चापेकर हे लोकमान्यांपासून भगवद्गीता मागून घेऊन ती हातांत धरून १८-४-९८ रोजीं फांसावर चढले. त्यानंतर १८९९ सालीं मे महिन्यांत ८, १० व १२ तारखांस वासुदेव, रानडे व बाळकृष्ण यांस फांशी देण्यांत आलें.

**चांभार**—कातड्याचा धंदा करणारी एक जात. संस्कृत चर्मकार या शब्दापासून चमार, चांभार हे शब्द बनले आहेत. एकंदर हिंदुस्थानांत सुमारें सव्वा कोटी चांभारवस्ती आहे. त्यांपैकीं ६० लाखांवर संयुक्त प्रांतांत व सुमारें तीन-चार लाख मुंबई इलाख्यांत आहे. बुद्धपूर्वकालांत या धंद्याला कमीपणा आलेला नव्हता. चांभारांत सर्व धर्मांचे लोक आहेत. कातडीं न कमावतां त्यापासून जिन्नस तयार करणारे ते मोची. ते आपणांस उच्च समजतात. चांभारांत पुष्कळ जाती आहेत. हे लोक इतर अस्पृश्यांपेक्षां जास्त स्वच्छ व नीटस असतात. जुन्या जमान्यांत चांभार हा एक बलुतेदार असे.

**चांभारलेणीं**—मुंबई, नाशिक जिल्हा, नाशिकच्या दक्षिणेस ५ मैलांवर असलेल्या एका ६०० फूट उंच टेकडीमध्यें हीं लेणीं खोदलेलीं आहेत. हीं लेणीं जैन आहेत. हीं टेकडीच्या पायथ्यापासून ४५० फूट उंचीवर असून नैऋत्य बाजूस आहेत. कांहीं भाग चढून गेल्यावर १७३ पायऱ्यांचा रस्ता लागतो. मध्यंतरीं उजव्या बाजूस दोन टांकीं आहेत. या पायऱ्या चढून गेल्यावर लेणीं लागतात. हीं लेणीं इ. स. ११-१२ व्या शतकांतील असावींत.

**चामखीळ**—ह्या रोगांत साध्या त्वचेवर किंवा श्लेष्मल त्वचेवर मांसार्बुदासारखा विस्फोट अगर ग्रंथि उत्पन्न होते. ह्यांपैकीं कांहीं तऱ्हा मुलांच्या किंवा तरुण माणसांच्या हातांवर

ग्रीसमध्यें फिडियस व मेंटॉर या दोघांचीं नांवें सोन्याच्या वस्तू करणारे कारागीर म्हणून आढळतात. रोमन लोक स्वतः जरी रुक्ष व साध्या राहणीचे होते तरी त्यांनीं ग्रीक कारागिरीचा भरपूर उपयोग करून घेतला व तेवढी संपत्ति त्यांच्याजवळ होती. चौथ्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत रोमन साम्राज्याचें वैभव बायझंटिअम येथें होतें. तेथें ही कला चांगली उत्कर्ष पावत होती. अकराव्या शतकामध्यें फ्रान्समधील टूर्स येथील व इंग्लंडमधील एलाय येथील ख्रिस्त मंदिरें हीं या कलेचीं पुरस्कर्तीं बनलीं. तेराव्या शतकामध्यें सुवर्णकारांचे संघ बनूं लागले आणि सोन्या-चांदीचीं भांडीं धार्मिक कामाऐवजीं रोजच्या व्यवहारांतहि येऊं लागलीं. आठव्या हेन्रीनें अशा भांड्यांचा चांगला संग्रह केला होता. हॉलबीनसारखा कलाकारहि सोन्याच्या पेल्यांच्या आदर्शाकृति काढण्याकडे लक्ष देऊं लागला. आतां यंत्रांच्या साहाय्यानें भांडीं तयार होऊं लागल्यामुळें कलाकार केवळ चित्र काढून देतो व त्याप्रमाणें कारागीर निरनिराळ्या वस्तू तयार करतात.

**चांदूर**— वऱ्हाड, उमरावती जिल्ह्याचा आग्नेयेकडील तालुका. क्षेत्रफळ ८५५ चौ. मैल.

चांदूर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून १८९५ सालीं कापसाचा बाजार बसला. येथें सरकी काढण्याचे व रुई दाबण्याचे कारखाने आहेत. येथील बागेंत संत्रीं चांगल्या प्रकारचीं होतात. जुना गांव रेल्वेस्टेशनच्या दक्षिणेस एक मैल आहे. इ. स. च्या सहाव्या शतकांत वाकाटक राजांच्या शिलालेखांत उल्लेखलेलें ‘ चंद्रपूर ’ हेंच असावें असें म्हणतात.

**चांदूर बाजार**—वऱ्हाड, उमरावती जिल्हा, एलिचपूर तालुक्यांतील एक गांव. उमरावतीच्या उत्तरेस २२ मैल व एलिचपूरच्या पूर्वेस १४ मैल हें गांव आहे. एलिचपूरचा नबाब नामदार खान याच्या ताब्यांत सुमारें ९५ वर्षांपूर्वीं हा जहागिरीचा गांव होता. त्या वेळीं त्यानें येथे बाजार वसविला. त्या वेळेपासून हा गांव प्रसिद्ध आहे. अलीकडे या बाजाराचें महत्त्व कमी झालें आहे. मध्यप्रांताची सीमा येथून आठ मैलांवर आहे. बाजार चांगला बांधलेला असून दिवे, पाण्याचीं टांकीं, सामान ठेवण्याकरितां जागा, वगैरे व्यवस्था चांगली आहे.

**चांद्रमास**—शुक्लप्रतिपदेपासून अमावास्येपर्यंतचा काल. हा मुख्य चांद्रमास असून पौर्णिमान्त मासाला गौणचांद्रमास म्हणतात. बारा चांद्रमासांचे ३५४ दिवस होतात. सौरवर्ष ३६५¼ दिवसांचें असतें. तेव्हां हा फरक अधिकमासानें भरून काढतात. हिंदुस्थानांत मलबार व बंगाल सोडून सर्वत्र चांद्रमान चालतें.

**चांद्रवर्ष**— दोन चांद्रपक्षांचा एक चांद्रमास होतो व अशा बारा चांद्रमासांचें एक चांद्रवर्ष होतें. नर्मदा नदीच्या उत्तरेकडील हिंदु लोकांचा चांद्रमास पौर्णिमान्त असतो. परंतु नर्मदेच्या दक्षिणेकडील लोकांप्रमाणें उत्तर हिंदुस्थानांतील लोकांतहि आरंभीं चांद्रमास अमान्तच असला पाहिजे. कारण अद्यापहि उत्तर हिंदुस्थानांत वर्षाचा व अधिक महिन्याचा आरंभ शुद्ध प्रतिपदेपासूनच धरण्यांत येत असतो; व दक्षिण हिंदुस्थानांतील लोकांप्रमाणे तेहि अमावास्येकरितां ३० चाच आंकडा लिहीत असतात. मुसलमानांच्या चांद्रमासाचा आरंभहि चंद्रदर्शनापासून म्हणजे बहुधा शुद्ध द्वितीयेपासूनच होत असतो. आपणां हिंदु लोकांत मास, पक्ष व तिथि यांची गणना चांद्रमानाप्रमाणेंच होते. परंतु सौरवर्षापेक्षां चांद्रवर्षांत १० दिवस, ५३ घटिका, ३० पळें व ६ विपळें कमी असल्यामुळें सौरमानांत व चांद्रमानांत ३२ महिन्यांमध्यें एका महिन्याचा फरक पडतो. तो भरून काढून व चांद्रमानाची सौरमानाशीं सांगड घालून चांद्रमासाचा व ऋतूंचा संबंध कायम राखण्याकरितां अधिकमास व क्षयमास धरण्याची पद्धत सुरू केली गेली. या योजनेमुळें मुसलमानांच्या चांद्रवर्षांतील वाटेल तो महिना जसा वाटेल त्या ऋतूंत येऊं शकतो व १०० सौरवर्षांत त्याच्या चांद्रवर्षांचीं जशीं अजमासें ३ वर्षें २४ दिवस व ९ घटिका वाढतात, तसा कांहीं प्रकार आपल्या हिंदु चांद्रसौरवर्षांत होत नाहीं. बंगाल, पंजाब, मलबार वगैरे कांहीं प्रांतांत शुद्ध सौर-गणना प्रचलित आहे; पण श्राद्धव्रतादि हिंदु धर्मकार्यें तिथीच्या अनुरोधानेंच होत असल्यामुळें तेथेंहि पंचांगांत सौर दिवसाबरोबरच चांद्र महिने, पक्ष, तिथी, वगैरे नमूद करण्याची व्यवस्था करावी लागते.

**चांद्रायण**—यथोचित कर्म न घडल्यास देहदंडरूप असें हें प्रायश्चित्त आहे. याचे यवमध्य व पिपीलिकामध्य असे दोन प्रकार आहेत. शुक्लपक्षांतील प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत दररोज भोजनांत एक एक घांस ( प्रतिपदेस एक, द्वितीयेस दोन असे ) वाढवून कृष्णपक्षांतील प्रतिपदेपासून दररोज एक एक घांस कमी घेत घेत अमावास्येस उपोषण करणें यास यवमध्यचांद्रायण असें म्हणतात. आणि कृष्णपक्षांतील प्रतिपदेस एक एक घांस याप्रमाणें आरंभ करून अमावास्येपर्यंत वाढविणें व पुन्हां प्रतिपदेपासून एक एक घांस कमी करीत येऊन पौर्णिमेस उपवास करणें यास पिपीलिकामध्यचांद्रायण असें म्हणतात.

**चान्सरी कोर्ट**—पूर्वी इंग्लंडमध्यें पार्लमेंटच्या खालोखाल हें सर्वांत वरिष्ठ कोर्ट असे. १८७३ पासून हायकोर्ट ऑफ जस्टिस या वरिष्ठ न्यायालयाचा चान्सरी कोर्ट हा एक विभाग बनविण्यांत आला. या कोर्टांत लॉर्ड चॅन्सेलर हा अध्यक्ष व त्याच्या जोडीला पांच न्यायाधीश असतात. या कोर्टांत विशेषतः पुढील बाबतींतले दावे चालतात-मयताच्या इस्टेटीची व्यवस्था

पाहणें, भागीदारी ( पार्टनरशिप्स ), गहाण, ट्रस्ट इस्टेटी, दस्तऐवज दुरुस्त करणें किंवा रद्द करणें, स्थावर मिळकतीबद्दलचे करार, अज्ञानांचें पालकत्व आणि त्यांच्या इस्टेटीची व्यवस्था.

**चापेकर, नारायण गोविंद** ( १८६९- )—एक संस्कृत व मराठी पंडित, धर्मशास्त्र व समाजशास्त्र यांचे अभ्यासक व संशोधक. यांचा जन्म मुंबईस झाला. तेथेंच एल्एल्. बी. झाल्यावर चार वर्षे यांनीं ठाण्यास वकिली केली. त्यानंतर सन १९२५ पर्यंत हे न्यायखात्यांत मुनसफ होते व शेवटीं फर्स्टक्लास सब्जज्जच्या जागेवर होते. १९३१ पासून पंधरा वर्षे औंध संस्थानांत मुख्य न्यायाधीश म्हणून होते.

सन १९२७ पासून पुढें दहा वर्षे हे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष असून, त्या कालांत त्यांनीं म. सा. परिषदेला बरेंच स्थैर्य व महत्त्व प्राप्त करून दिलें. १९३४ सालीं ते बडोद्यास भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. ते जात्या विवेचक व संशोधक असून त्यांनीं ग्रामसंस्थेचा सूक्ष्म अभ्यास केलेला आहे. त्याचें उदाहरण म्हणून 'आमचा गांव-बदलापूर' हा त्यांनीं लिहिलेला मोठा ग्रंथ सांगतां येईल. यांनीं आपलें आत्मचरित्र 'जीवनकथा' नांवाचें लिहिलें आहे. ( १ ) पैसा, ( २ ) वैदिक निबंध, ( ३ ) पेशवाईच्या सावलींत, ( ४ ) रजःकण, ( ५ ) चित्पावन, ( ६ ) तर्पण, इ. ग्रंथ यांचा विविध विषयांचा दीर्घ व्यासंग दाखवितात.

**चाफळ**—हें गांव सातारा जिल्ह्यांत मांड नदीच्या तीरावर असून उंब्रजच्या पश्चिमेस ६ मैल आहे. हें सह्याद्रीच्या अरुंद खोऱ्यांत आहे. या खोऱ्यास चाफळ खोरें असेंच नांव आहे. हें गांव रामदासस्वामी यांच्या बंधूंच्या वंशजांस इनाम आहे. चाफळस्वामींचा येथें वाडा आहे. वाड्याच्या मध्यभागीं रामदासस्वामींनीं स्थापिलेलें श्रीरामाचें व मारुतीचें देऊळ आहे. रामनवमीस येथें यात्रा भरते. चाफळास श्रीरामाची स्थापना समर्थांनीं शके १५७१ ( सन १६४९ ) त केली. चाफळच्या जवळच एका कोसावर शिंगणवाडा असून येथें शिवाजी राजे यांना समर्थांनीं अनुग्रह दिला ( १६४९ ) असें सांगतात.

**चाफाजी टिळेकर**—नारायणराव पेशव्याचा एक स्वामिभक्त हुजऱ्या. नारायणरावाच्या खुनाच्या वेळीं त्याला वांचवण्यासाठीं हा त्याच्या अंगावर पडला असतां मारला गेला.

**चापेकर, दामोदर हरि** ( १८७०-१८९८ )— एक महाराष्ट्रीय क्रांतिकारक. यांचे वडील कीर्तनकार होते व दामोदर हरि हे त्यांच्या पाठीमागें उभे राहून साथ करीत व स्वतःहि कीर्तन करीत असत. हे सनातन वृत्तीचे असून त्या वेळच्या सुधारकांवर यांचा मोठा कटाक्ष असे. यांनीं एक व्यायामशाळा चालविली होती व हिंदुधर्मरक्षणार्थ एक मंडळ



काढलें होतें. ते शिवाजी-उत्सवांत व गणपति-उत्सवांत स्वतः रचलेलीं पदें म्हणून दाखवीत असत. पुण्यास पहिल्या प्लेगच्या सांथींत सरकारी अधिकाऱ्यांची तपासणी फारच जाचक असे. त्या वेळीं तपासणी अधिकारी असलेला रँडसाहेब हा फार अप्रिय झाला होता. याकरितां त्याचा खून करण्याचा बेत चापेकर त्रिवर्ग बंधूंनीं आपल्या कांहीं मित्रांच्या साहाय्यानें केला. २२ जून १८९७ या दिवशीं गव्हर्नरच्या बंगल्यावरून एका पार्टीहून परत येतांना गणेशखिंडींत रँड व आयर्स्ट यांचे खून करण्यांत आले. त्याबद्दल दामोदर व त्याचा एक भाऊ बाळकृष्ण यांस फांशीची शिक्षा झाली. त्यांचा एक मित्र द्रविड यानें वीस हजार रुपयांच्या आमिषास भुलून त्यांचें नांव सरकारांत कळविल्यामुळें हा चापेकर बंधूंचा कट उघडकीस आला. याकरितां तिसरा चापेकर बंधु वासुदेव यानें रानडे याच्या साहाय्यानें द्रविड बंधूंचा खून करून त्यास मित्रद्रोहाचें प्रायश्चित्त दिलें. याकरितां वासुदेव व रानडे यांसहि फांशीची शिक्षा झाली. दामोदर चापेकर हे लोकमान्यांपासून भगवद्गीता मागून घेऊन ती हातांत धरून १८-४-९८ रोजीं फांसावर चढले. त्यानंतर १८९९ सालीं मे महिन्यांत ८, १० व १२ तारखांस वासुदेव, रानडे व बाळकृष्ण यांस फांशी देण्यांत आलें.

**चांभार**—कातड्याचा धंदा करणारी एक जात. संस्कृत चर्मकार या शब्दापासून चमार, चांभार हे शब्द बनले आहेत. एकंदर हिंदुस्थानांत सुमारें सव्वा कोटी चांभारवस्ती आहे. त्यांपैकीं ६० लाखांवर संयुक्त प्रांतांत व सुमारें तीन-चार लाख मुंबई इलाख्यांत आहे. बुद्धपूर्वकालांत या धंद्याला कमीपणा आलेला नव्हता. चांभारांत सर्व धर्मांचे लोक आहेत. कातडीं न कमावतां त्यापासून जिन्नस तयार करणारे ते मोची. ते आपणांस उच्च समजतात. चांभारांत पुष्कळ जाती आहेत. हे लोक इतर अस्पृश्यांपेक्षां जास्त स्वच्छ व नीटस असतात. जुन्या जमान्यांत चांभार हा एक बलुतेदार असे.

**चांभारलेणीं**—मुंबई, नाशिक जिल्हा, नाशिकच्या दक्षिणेस ५ मैलांवर असलेल्या एका ६०० फूट उंच टेकडीमध्यें हीं लेणीं खोदलेलीं आहेत. हीं लेणीं जैन आहेत. हीं टेकडीच्या पायथ्यापासून ४५० फूट उंचीवर असून नैर्ऋत्य बाजूस आहेत. कांहीं भाग चढून गेल्यावर १७३ पायऱ्यांचा रस्ता लागतो. मध्यंतरीं उजव्या बाजूस दोन टांकीं आहेत. या पायऱ्या चढून गेल्यावर लेणीं लागतात. हीं लेणीं इ. स. ११-१२ व्या शतकांतील असावींत.

**चामखीळ**—ह्या रोगांत साध्या त्वचेवर किंवा श्लेष्मल त्वचेवर मांसार्बुदासारखा विस्फोट अगर ग्रंथि उत्पन्न होते. ह्यांपैकीं कांहीं तऱ्हा मुलांच्या किंवा तरुण माणसांच्या हातांवर

आढळतात. दुसरे लोंबत्या जातीचे चामखीळ नाजूक कातडी-च्या मुलांना हनुवटीवर अगर मानेच्या ठिकाणीं किंवा मोठ्या माणसांना डोक्यावर होतात. ते झाले म्हणजे एखाद्या पिका-प्रमाणें एकदम वरेचसे होतात व एकदम नाहींसेहि होतात. हे येण्याची प्रवृत्ति कांहीं कुटुंबांत नैसर्गिकच असते.

चामखिळांत रक्ताचा पुरवठा भरपूर असल्यामुळें ते चाकूनें खरडून काढले तरी पुनः वाढतात. कारण शाखा त्वचेच्या सपाटीबरोबर जरी कापल्या तरी मधल्या धमनींतून रक्तप्रवाह चालू राहतो. म्हणून कातरीनें हे चामखीळ जरी कातरले तरी या रक्तवाहिन्यांस तापल्या तारेनें चटका देणारें औषध लावावें किंवा तीव्रतेनें आकुंचन करणारें औषध लावावें. तीव्र ॲसेटिक ॲसिड किवा कॅर्बोलिक ॲसिड त्या जागीं जपून लावावें. हीं औषधें लावल्यानें चामखीळ लहान होऊन गळतो.

**चामडें**—चर्मन् याचा चामडें ह्या अर्थानें वेदांत व तदुत्तर ग्रंथांत उल्लेख आला आहे. गोचर्मांचा उपयोग धनुष्याची दोरी, गोफण व लगाम करण्याकडे होत असे. विशेषतः या चर्मांचा उपयोग दगडांनीं ज्या फलकांवर सोमवल्ली कुटली जात असे त्या फलकावर टाकण्याकरितां होत असे. कदाचित् पिशव्या करण्याकडे या चर्मांचा उपयोग होत असावा. चर्मण्य हा शब्द ऐतरेय ब्राह्मणांत 'कमावलेल्या कातड्याचा जिन्नस' या अर्थानें आलेला आहे. या कलेची सविस्तर हकिकत उपलब्ध नाहीं. पण शतपथ ब्राह्मणांत खुंट्यांनीं ( शंकुभिः ) चामडें ताणण्याचा उल्लेख केला आहे. त्याचप्रमाचें ऋग्वेदामध्यें कातडें ओलें कर-ण्याचा उल्लेख सांपडतो. चामडें कमावण्याची कला ऋग्वेद कालांत सुद्धां लोकांना ठाऊक होती; कारण त्या ग्रंथांत चर्माणि ( कमा-वलेली कातडीं ) हा शब्द आलेला आहे.

मृग आणि अज ह्या दोन्ही प्राण्यांच्या कातड्याला अजिन हा शब्द लावितात. कातड्याचा उपयोग कपड्याकडे होत असे. हें शतपथ ब्राह्मणांत जें 'चर्मांच्छादित' ( अजिनवासिन् ) असें विशेषण आहे त्यावरून, आणि वाजसनेयि संहितेंत चामडें सांधणें, कमाविणें हे धंदे करणाऱ्यांचा जो उल्लेख आहे त्यावरून सिद्ध होतें. मरुत् हे देखील मृगचर्म वापरीत असत असें दिसतें, आणि ऋग्वेदकालीन मुनी देखील अजिनें उपयोगांत आणीत असत.

चामडें तयार करण्याकरितां बैल, गाय, घोडा, बकरें, मेंढ्या, हरण वगैरे प्राण्यांचीं कातडीं उपयोगांत आणतात. अशा कातड्यांत बहुधा दोन थर असतात एक बहिस्त्वचा ( Epidermis ) व दुसरी अन्तस्त्वचा ( Corium ). अन्त-स्त्वचा ही जाड असून खरी कातडी होय व हिचेच कमावून चामडें बनविण्यांत येतें. रासायनिकदृष्ट्या या कातडींचें जिले-टिनशीं साम्य असतें. चामडें कमविण्यापूर्वीं कातड्यावरील केंस काढून टाकण्याकरितां बऱ्याच कृती कराव्या लागतात.

१. भिजवणें—पहिल्याप्रथम कातडीं चांगलीं भिजून नरम व्हावीं लागतात. याकरितां तीं जंतुनाशक द्रव्य घातलेल्या पाण्यांत भिजत घालून ठेवतात.

२. चुना देणें—यानंतर त्या कातडीवरील केंस बहुधा चुन्याच्या साहाय्यानें काढण्यांत येतात. या कृतींत भिजलेलीं कातडीं चुन्याच्या पाण्याच्या हौदांत बुडवून ठेवतात. या ठिकाणीं केंस मोकळे होतात. या चुन्याच्या पाण्यांत कॉस्टिक अल्कली किंवा चुन्याचीं गंधकिदें, सोडा, किंवा सोमल मिसळण्यांत येतो. यामुळें केंस सुटण्याची क्रिया त्वरित होते. या पाण्यांतून काढल्यावर बोथट चाकूनें खरवडून केंस काढून टाकण्यांत येतात. यानंतर या कातड्यांतील चुना काढण्याकरितां तीं शेणखळ्यांत बुडवून ठेवावीं लागतात. या शेणखळ्यांत कबूतरें, कोंबड्या, कुत्रीं, वगैरेंची विष्ठा घालण्यांत येतें. चामडें विशेष नरम करावयाचें असल्यास या शेणखळ्यांत एखादें अम्ल( ॲसिड )हि घालण्यांत आलेलें असतें; म्हणजे सर्व चुना साफ निघतो.

३. कमाविणें—ओक, बाभूळ, तरवड, वगैरेंच्या सालींपासून टॅनिन किंवा टॅनिक ॲसिड मिळतें. या टॅनिनमध्यें कातड्या-मधील जिलेटिनयुक्त तंतूंशीं मिसळून त्याचा एक अद्राव्य व स्थिर पदार्थ बनविण्याचा गुण असतो. हा पदार्थ म्हणजेच चामडें होय. हें चामडें वाळलें म्हणजे नरम व लवचिक राहते.

मऊ व उत्तम प्रकारचें चामडें बहुतेक सुमाक झाडाच्या पाल्यापासून निघणाऱ्या टॅनिनच्या साहाय्यानें कमाव-ण्यांत येतें. ही कमावण्याची क्रिया योग्य प्रकारें करण्यास बराच वेळ लागतो. स्फट ( ॲल्युमिनियम ) व क्रुम (क्रोमियम) या धातूंच्या लवणांच्या साहाय्यानें कातडीं कमविण्याची एक पद्धति आहे हीस टॅाइंग म्हणतात. पांढरीं चामडीं करण्या-करितां तुरटीची पद्धति उपयोजतात. दुसऱ्या पद्धतींत क्रुमस्फट ( क्रोम ॲलम ) किंवा क्रुमगंधकित ( क्रोमियम सल्फेट ) थोडा सोडा घालून वापरण्यांत येतें व हा द्रव कातड्यांच्या पिशव्या करून त्यांत ओतून तीं टांगून ठेवण्यांत येतात. नंतर तीं कांहीं दिवस एकावर एक रचून ठेवण्यांत येतात व शेवटीं एखाद्या क्षाराच्या पाण्यानें धुऊन त्यांतील अम्लाचा अंश पूर्णपणें काढून टाकण्यांत येतो. यानंतर तीं साबण व तेल यांच्या मिश्रणांत बुडवण्यांत येतात; म्हणजे तीं पूर्णपणें कमावलीं जातात.

या पद्धतीनें पूर्वींची पद्धति मागें पडली आहे. कारण या पद्धतीनें वेळ थोडा लागतो. व हें तयार झालेलें चामडें बळकट असून वाफ किंवा उष्णता यास दाद देत नाहीं.

शमॉय चामडें अथवा धुण्याचें चामडें- हें हरणें, मेंढ्या, वगैरेंच्या कातड्यांपासून करतात. हीं कातडीं तेलांत बुडविण्यांत येतात. बैल किंवा गाईच्या कातड्यापासून अशाच पद्धतीनें चफ चामडें तयार करतात.

चामड्यामध्यें लवचिकपणा व पाण्यास दाद न देण्याचा गुण आणावयाचा असेल तर आणखी एक क्रिया करावी लागते. बुटाच्या वरचें चामडें, खोगीर, पट्टे, वगैरेकरितां असें चामडें लागतें. या क्रियेंत कातडें चरबी, तेल किंवा मेण, वगैरे-मध्यें बुडवावें लागतें व तें खरडून, घासून वगैरे साफ करावें लागतें. त्यामुळें तें दिसावयासहि अधिक चांगलें दिसतें. बुटांच्या वगैरे चामड्यांस यानंतर तेल व मस किंवा इतर रंग यांच्या मिश्रणानें घासून त्यांवर रंग चढविण्यांत येतो. पेटंट लेदर करण्याकरितां रोगण व रंग यांचीं वरचेवर पुटें द्यावीं लागतात. मोरोक्को चामडें बकऱ्याच्या कातड्यापासून सुमाकनें कमावून तयार करतात. नंतर त्यावर दूध व चलक यांच्या मिश्रणानें जिल्हई आणतात. नंतर अकीकाच्या रुळावर घासून तकाकी आणतात.

कृत्रिम चामडें कापडावर राळ वगैरेंचें रोगण चढवून व नंतर रंग देऊन व उठावदार करून तयार करण्यांत येतें.

**चामरस** ( सु. १४३० )—एक कानडी कवि. यानें लिंगायत धर्म स्वीकारून प्रभुलिंगलीला नांवाचा एक कानडी ग्रंथ लिहिला. तो सर्वत्र लोकादरास पात्र झाला. याच्या सरस काव्यामुळें यास राजाश्रय व मानमान्यता दोन्हीहि प्राप्त झालीं. आपला आश्रयदाता प्रौढ देवराय याच्या विनंतीवरून हा व याचा प्रतिस्पर्धी कुमार व्यास यांनीं कानडींत महाभारत लिहिलें. त्यांत याचें काव्यच सरस ठरल्यानें कुमार व्यासानें मत्सरानें आपल्या बायकोकरवीं याच्या काव्याचा नाश केला म्हणतात.

**चामालारी**—हिमालय पर्वतांत हें शिखर असून भूतान आणि तिबेट या देशांच्या मधील सरहद्दीवर पश्चिम टोंकाला आहे. त्याची उंची २३,९४० फूट आहे.

**चामुंड** ( सु. १००० )— हा सोळंखी किंवा चालुक्य वंशांतील राजा मूळराजाचा पुत्र होय. त्यानें आपलें राज्य मोठ्या शहाणपणानें व नीतीनें चालविलें आणि राज्यसंपत्ति व कीर्ति वाढवून राज्याचें चांगल्या प्रकारें रक्षण केलें. त्याच्याच कारकीर्दींत गझनीच्या महंमदानें सोमनाथपट्टणावर स्वारी केली. चामुंडरायाची त्याजबरोबर लढण्याची तयारी नसल्यामुळें तो राजधानी मुलाच्या हवालीं करून अरण्यांत निघून गेला.

**चार** ( चारोळ्या )—हें एक मोठें झाड आहे. कोंकण, नागपूर प्रांत व मलबार या भागांत हीं झाडें पुष्कळ आहेत. या झाडास लहान फळें येतात. त्याच्या बियांत तुरीएवढे तांबूस रंगाचे दाणे असतात. त्यास चारोळ्या म्हणतात. चारोळ्या मिठाईत व पक्वान्नांत घालतात. चारोळ्यांचें तेल निघतें. तें बदामाच्या तेलासारखें थंड आहे.

**चारण**—या जातीची लोकसंख्या सुमारें पाऊण लाख आहे. मुख्य वस्ती मुंबई इलाखा व राजपुताना यांतून आहे. मुंबई इलाख्यांत कच्छ, काठेवाड, गुजराथ, सिंध व राजपुताना यांत हे लोक आहेत. चारण हे गाढवें पाळणें व मडकीं करणें हीं कुंभारांचीं कामें पूर्वी करीत असत. गुरें पाळणें, रजपूत व काठी यांचे पोवाडे गाणें व भीक मागणें हे यांचे मूळचे धंदे होत. हल्लीं हे गुराखी, व्यापारी, कापडवाले व शेतकरी आहेत. भाट लोकांप्रमाणेंच पूर्वी हे वचनाबद्दल जामीन राहत असत व वचनभंग केल्यास त्रागा करण्याची धमकी घालून ते वचन पाळावयाला भाग पाडीत असत. हे लोक हिंदु धर्माच्या वेग-वेगळ्या पंथांचे असून अंबा व भवानी देवीचे उपासक आहेत.

**चारा**—पाळीव जनावरांचें वनस्पतिखाद्य. स्वाभाविक चारा म्हणजे गवत होय. या गवताचीं कुरणें दर गांवांत पूर्वी राखून ठेवलेलीं असत. सरकारहि कांहीं जंगल गुरांसाठीं मोकळें ठेवी. गुरांची वाढ चांगली होण्यासाठीं त्यांना वेगवेगळा चारा द्यावा लागतो व तीं पिकें मुद्दाम काढावीं लागतात. पाश्चात्य देशांत याविषयीं गवळी-शेतकरी फार काळजी घेतात. आपल्याकडे मुख्य चाऱ्याचीं पिकें पुढीलप्रमाणें आहेत:— सुंडिया ज्वारी, खोंडी ज्वारी, शाळू, निळवा, सॉरघम ( अमेरिकन ज्वारी ), इम्फी ( ज्वारीची परदेशी जात ), मका, रिआनाल ल्यूरिअन्स ( आफ्रिकन चारा ), बफेलो ग्रास ( सिंहली चारा ), गिनिग्रास, वाटाणा, वाल, चवळी, मेथी, लसूणघास, बरसीम ( ईजिप्त-कडील जात ), इ. इ.

**चारुमति**— ही सम्राट अशोकाची मुलगी व देवपाल क्षत्रियाची पत्नी. आपल्या बापाबरोबर ही नेपाळांत यात्रेस म्हणून गेली व तेथेंच संन्यासिनी होऊन मठांत राहूं लागली. आपल्या नवऱ्याच्या स्मरणार्थ नेपाळांत हिनें देवपटना नांवाचें शहर वसवलें.

**चारुरूपदर्शक**—( कॅलीडोस्कोप ). सर डेव्हिड ब्रेस्टर यानें इ. स. १८१६ च्या सुमारास हें एक खेळणें तयार केलें. या खेळण्यांत एका नळींत दोन आरसे बसविलेले असतात. त्यांमध्यें ६०° अंशांचा कोन असतो. या नळीचीं तोंडें कांचेनें बंद केलेलीं असतात. त्यांत निरनिराळे रंगीत कांचेचे तुकडे ठेवले म्हणजे या दोन आरशांच्या साहाय्यानें परावर्तन होऊन या तुकड्यांच्या फार सुंदर आकृती बनलेल्या दृष्टीस पडतात.

**चार्टिझम**—( सनदेसाठीं चळवळ ). ही राजकीय चळवळ ग्रेटब्रिटनमधील आहे. सरकारच्या वाईट कारभारामुळें व पार्लमेंटांत प्रतिनिधी बरोबर निवडले जात नसल्यामुळें लोकांचे हाल होतात, असें या चार्टिस्ट लोकांचें म्हणणें होतें. १८३८ सालीं त्यांनीं एक 'लोकसनद' तयार केली व तिच्या मान्यतेसाठीं चळवळ सुरू केली. त्या सनदेंत सर्व लोकांचे प्रतिनिधी नीट निवडून जाण्यासंबंधीं सहा कलमें होतीं. सरकारच्या सत्तेपुढें या लोकांचें कांहीं न चालून १८४८ नंतर ही चळवळ थंडावली.

**चार्लमांट, अर्ल ऑफ** (१७२८-१७९९)—एक आयरिश मुत्सद्दी. हा लहानपणापासूनच विद्याव्यासंगी असल्यामुळें लंडनमध्यें व डब्लिनमध्यें जे विद्वान् गृहस्थ असत त्यांचा व याचा चांगला स्नेह असे. जॉन्सन, बर्क, गोल्डस्मिथ यांच्याशींहि त्याचा चांगला परिचय असे. आयर्लंडमध्यें निरनिराळ्या अधिकाराच्या जागा पत्करून त्यांत आपलें प्रावीण्य व्यक्त केलें, म्हणून त्याला अर्ल ही पदवी १७६३ मध्यें अर्पण करण्यांत आली. त्या वेळीं आयर्लंडमध्यें स्वातंत्र्याची चळवळ सुरू झालेली होती. याच वेळीं अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धाची सुरवात झाली; म्हणून आयर्लंडमधील इंग्लिश सैन्य तिकडे पाठविलें, तेव्हां आयर्लंडमध्यें स्वतंत्र स्वयंसैनिकपथकें उभारलीं व ६०,००० सैन्य गोळा झालें. या सैनिकांचा पुढारी चार्लमांट होता. १७९२ सालीं त्यानें आपल्या गव्हर्नरीचा राजीनामा देऊन 'व्हिग् क्लब'ची स्थापना केली. पण १७९८ च्या टोनच्या बंडामुळें त्याच्या मनावर भयंकर परिणाम होऊन तो मरण पावला.

**चार्लस, पहिला** (१६००-१६४९)—हा इंग्लंड, स्कॉटलंड आणि आयर्लंड यांचा राजा १ ला जेम्स याचा २ रा पुत्र असून १६२५ मध्यें सिंहासनावरूढ झाला. त्याच्या कारकीर्दीतलें पहिलें पार्लमेंट करांना संमति देण्याऐवजीं राजाविरुद्ध तक्रारी करण्यावर भर देऊं लागलें म्हणून तें पार्लमेंट त्यानें बरखास्त केलें. पुढील वर्षी (१६२६) त्यानें नवें पार्लमेंट भरवलें, पण लवकरच तेंहि रद्द केलें. पण १६२८ मध्यें चार्लसला नवें पार्लमेंट बोलावणें भाग पडलें. या पार्लमेंटनें करवसुलीला मान्यता दिली, पण 'पिटिशन ऑफ राइट' (हक्कांचा अर्ज) तयार केला. म्हणून राजानें तें पार्लमेंट बरखास्त केलें आणि पार्लमेंटशिवाय एकट्यानें राज्यकारभार चालवण्याचें ठरवलें. या एकतंत्री राज्यकारभारांत स्ट्रॅफर्ड आणि लॉड या मुख्य मंत्र्यांनीं त्याला पाठिंबा दिला. त्यांच्या मदतीनें चार्लसनें पार्लमेंट बोलावल्याशिवाय ११ वर्षें राज्यकारभार केला. १६३७ मध्यें जॉन हॅम्प्डन यानें राजाच्या अनियंत्रित कारभाराला उघड विरोध करण्याचें ठरवून राजानें बसवलेला 'शिपमनी' नांवाचा कर देण्याचें नाकारलें. तथापि राजाविरुद्ध बंडाला पहिली सुरुवात स्कॉटलंडमध्यें झाली. १६३६ मध्यें राजानें आपल्या हुकमानें एक नवें बुक ऑफ कॅनन्स या नांवाचें ख्रिस्ती धर्माचें पुस्तक स्कॉटलंडमध्यें सुरू केलें. ही अँग्लिकन धर्मपंथाची ईश्वरोपासना स्कॉटलंडमध्यें अनेक दंग्यांना कारणीभूत झाली. आणि राजाच्या या धार्मिक धोरणाला विरोध करण्याचा ठराव (कॉव्हेनंट) १६३८ सालीं स्कॉटिश लोकांनीं केला. स्कॉटलंडमधील हें बंड मोडण्याकरिता चार्लसनें आपली इंग्रज फौज स्कॉटलंडमध्यें धाडली. परंतु स्कॉटिश कॉव्हेनंटर्सच्या सैन्यानें राजाच्या फौजेचा पराभव केला. १६४० सालीं चार्लसनें पार्लमेंट पुनः भरवलें. हेंच सुप्रसिद्ध लॉग पार्लमेंट होय. या पार्लमेंटनें चार्लस राजाबरोबर यादवी युद्ध सुरू केलें. स्ट्रॅफर्ड आणि लॉड यांच्यावर खटला चालवून त्यांना फांशीं दिलें. यादवी युद्धांत नेस्बीच्या लढाईंत (१६४५) चार्लस राजाच्या पक्षाचा पूर्ण पराभव झाला. आणि चार्लस स्कॉटलंडमध्यें पळून जाऊन नेवार्क येथील स्कॉटिश सैन्याच्या स्वाधीन झाला (१६४६). पार्लमेंटनें स्कॉटिश अधिकाऱ्यांशीं तडजोडीचीं बोलणीं करून चार्लस राजाला आपल्या ताब्यांत घेतलें. पार्लमेंटांत 'इंडिपेंडंट्स' या नांवाचा एक 'स्वतंत्र' जहाल पक्ष होता. त्या पक्षाचा पुढारी क्रॉम्वेल यानें आपल्या सैन्याच्या मदतीनें सर्व कारभार आपल्या हातीं घेतला. चार्लस राजाची, आपल्या प्रजेचा द्रोह केल्याचा त्यावर आरोप ठेवून न्यायालयीन चौकशी केली; आणि न्यायाधिशांनीं चार्लसला मरणाची शिक्षा सांगितली. तेव्हां चार्लस राजाचा ता. ३० जानेवारी १६४९ रोजीं शिरच्छेद करण्यांत आला.

**चार्लस, दुसरा** (१६३०-१६८५)—हा १ ल्या चार्लसचा मुलगा. बाप मारला गेला त्या वेळीं, हा दि हेग येथें आश्रयार्थ होता आणि तेथें त्यानें लगेच राजा ही पदवी धारण केली. १६५१ मध्यें त्याला स्कून येथें राजमुकुट अर्पण करण्यांत आला, परंतु त्याच सालीं त्याचा क्रॉम्वेलच्या सैन्यानें वूर्सेस्टर येथें पराभव केला म्हणून तो फ्रान्समध्यें पळून गेला. क्रॉम्वेल मरण पावल्यानंतर जनरल मंक यानें राजाची पुनःस्थापना (रेस्टोरेशन) बिनविरोध घडवून आणली आणि याप्रमाणें २ रा चार्लस सिंहासनारूढ झाला. आपल्या कारकीर्दीच्या आरंभीं कांहीं वर्षें या राजानें चॅन्सेलर लॉर्ड क्लॅरेन्डन याच्या सल्ल्यानें आपला राज्यकारभार धूर्तपणानें आणि तडजोडीच्या वृत्तीनें चालवला. परंतु चार्लसच्या आळशी, उधळ्या आणि व्यसनी स्वभावामुळें राजा आणि राष्ट्र दोघांवरहि संकटें येऊं लागलीं. राजानें डंकर्क बंदर फ्रेंचांना विकलें, आणि हॉलंडबरोबर युद्ध सुरू केलें. डच आरमार थेम्स नदीमध्यें शिरलें, आणि त्यानें

ब्रिटिश जहाजें नष्ट केलीं. १८६५ सालीं लंडन शहरांत प्लेगची फार मोठी सांथ पसरली, आणि पुढील सालीं त्याच शहरांत फार मोठी आग लागली. चार्लसचा बेसुमार खर्च चालू असल्यामुळें तो फ्रान्सचा राजा १४ वा लुई याचा जणुं पेन्शनर बनला. १६७९ मध्यें 'हेबिअस कॉर्पस ॲक्ट' मंजूर करण्यांत आला; पण पार्लमेंटनें राजाला इतका जोराचा विरोध सुरू केला कीं, राजानें पार्लमेंट बरखास्त केलें. १६८० मध्यें नवें पार्लमेंट भरलें, पण वरील कारणास्तव तेंहि रद्द करण्यांत आलें. पुढील वर्षी ऑक्सफर्ड येथें पुन्हां पार्लमेंट भरलें. अखेर चार्लसनें आपल्या चापाप्रमाणें पार्लमेंट रद्द केलें, आणि पार्लमेंटशिवाय आपला एकतंत्री कारभार सुरू केला. यानंतर त्याला रक्तज मूर्छा येऊं लागल्या, आणि त्यांतच त्याचा अंत झाला. मरणापूर्वी त्यानें रोमन कॅथॉलिक पंथाची दीक्षा घेतली.

**चार्लस, पांचवा** (१५००–१५५८)— स्पेनचा एक राजा व 'पवित्र रोमन' सम्राट्. त्याला आईकडून स्पेनचें राज्य व बापाकडून नेदर्लंड्स् व आजोबाकडून ऑस्ट्रियन जहागिरी मिळाल्या. याच्या सुमारें चाळीस वर्षांच्या कारकीर्दींत याचा युरोपवर मोठा दरारा असे. यानें अनेक युद्धें केलीं व जिंकलीं. तथापि प्रॉटेस्टंट चळवळ त्याला दडपतां आली नाहीं. मरणापूर्वी २ वर्षें यानें आपली गादी मुलाला दिली व एका गांवीं जाऊन राहिला.

**चार्ली चाप्लीन** (१८८९- )—एक जगद्विख्यात सिनेमा नट. सबंध नांव चार्लस स्पेन्सर चाप्लीन आहे. याचें घराणें लंडनचें. आई नटी तर बाप गवयी. तेव्हां याच्या शिक्षणाची काळजी कोण घेतो? पोटासाठींहि लहानपणापासून नाटककंपन्यांत नोकरी करावी लागली व त्यामुळेंच त्याच व्यवसायांत त्याचें दैव उघडलें. १९१३ सालीं हा प्रथम चित्रपटांत काम करूं लागला. हास्यरसप्रधान चित्रनाट्यांत त्याचीं कामें उत्कृष्ट वठत. त्याचा 'किड्' (कारटें) हा चित्रपट फारच गाजला. नंतर त्यानें स्वतःची चित्रपट कंपनी काढली व पहिल्या प्रतीचा दिग्दर्शकहि बनला. त्याच्या विनोदाच्या भूमिका चिरस्मरणीय होऊन राहिल्या आहेत. मनुष्यस्वभावाचें यथार्थ ज्ञान करून घेऊन त्यावर त्यानें आपली कला सुंदर उभारली आहे. त्याचा विनोद दुःखमिश्रित आहे व तो मनाला चटका लावतो; पण तो नुसता उथळ नसून हेतुपूर्ण आहे. चार्लीचा वेषहि हास्यकारक असतो; पण त्यांतहि बराच अर्थ आहे. त्याला मूकचित्रपट फार पसंत आहे, कारण त्यांत कलेला—अभिनयाला—पुष्कळ वाव आहे.

**चार्वाक**—एक प्राचीन नास्तिकवादी. याचा जन्म अवंति प्रदेशान्तर्गत शंखोद्धार नामक शहरीं युधिष्ठिर शक ६६१ (इ. स. पू. २४३९) वैशाख पौर्णिमेस झाला. चार्वाकाचीं मतें पुढीलप्रमाणें आहेत:—सृष्टीचा कर्ता कोणी आहे हें सिद्ध करतां येत नाहीं. तो नाहीं असेंच धरून चालावें. पृथ्वी, आप, तेज आणि वायु या चार तत्त्वांपासून आपोआप सृष्टीची रचना झाली. यांचा संयोगवियोग हेंच सृष्टीच्या उत्पत्तीचें व नाशाचें कारण आहे. प्राण्यास पुनर्जन्म नाहीं. मृत्यु हाच मोक्ष आहे. जोंपर्यंत देहांत प्राण आहे, तोंपर्यंत सर्व प्रकारचीं सुखें भोगावीं. "ऋणं कृत्वा घृतं पिबेत्" हें याचें वचन सुप्रसिद्ध आहे. याचा मृत्यु. यु. श. ७२७ या वर्षी झाला.

**चालक**—(इं. डायरेक्टर). भागीदारांच्या संस्थेंत संस्थेची सर्व जबाबदारी पत्करून संस्थेचा कारभार चालविण्यासाठीं एक चालक मंडळ (बोर्ड ऑफ डायरेक्टर्स) साधारण सभेनें निवडलेलें असतें. चालकांची लायकी व संख्या संस्थेच्या घटनानियमांत घातलेली असते. तसेंच त्यांची मुदतहि दिलेली असते. संस्थेचा व्यवस्थापक या चालक मंडळाच्या हुकुमाप्रमाणें चालतो. चालक मंडळांतील एक अध्यक्ष निवडला जातो व कधीं कधीं एखाद्याला कारभारी चालक (मॅनेजिंग डायरेक्टर) करतात.

**चालणें**— सर्व प्रकारच्या व्यायामांत चालण्याचा व्यायाम हा अगदीं साहजिकच होणारा आहे. चालतांना मोठ्या स्नायूंची हालचाल होऊन त्यामुळें शरीरांत रुधिराभिसरण चांगलें होतें. जलद चालण्यानें दीर्घश्वसन सहजरीत्या होऊं लागतें व शरीरांत जास्त प्रमाणांत प्राणवायु घेतला जातो. प्राणवायु जास्त घेतल्यानें रक्ताची शुद्धि चांगली होते. जलद चालण्यानें घाम येऊन शरीरांतील मळ बाहेर टाकला जातो. चालण्यानें पचन चांगलें होऊन भूक लागते. गांवाबाहेर मोकळ्या हवेंत चाललें तर स्वच्छ हवा व सूर्यप्रकाश शरीरास मिळून आरोग्य सुधारतें. व्यायाम म्हणून चालावयाचें तें ताशीं साडेतीन मैलांच्या वेगानें चालावें. रोज निदान तीनचार मैल तरी चाललें पाहिजे. चालतांना शरीरांतील स्नायू सैल ठेवावे व दोन्ही हात मोकळेपणानें हालूं द्यावेत.

खेळांमध्येंहि चालणें हा एक प्रकार येतो. हा खेळ इटलींत जास्त रूढ आहे. इंग्लंडमध्यें लंडन ते ब्रायटनपर्यंत चालण्याच्या शर्यती दरसाल लागतात. 'हायकिंग' (रानावनांतून सहल) चा प्रकार १९३१ पासून फार रूढ झाल्यानें चालण्याच्या खेळाकडे लोकांचें फार लक्ष लागलें आहे. जर्मनींत सहल करण्याची पद्धति फार जुनी व लोकप्रिय आहे.

**चालुक्य घराणें**—हें सोमवंशी रजपुतांचें घराणें उत्तरेकडून आलें असावें. या घराण्यांतील पहिला राजा पुलकेशी यानें अश्वमेध करून वैदिक धर्माची प्रतिष्ठा वाढविली. याची राजधानी वातापी (बदामी) होती. हा इ. स. ५६७ त

धारल्यावर त्याचा मुलगा कीर्तिवर्मा गादीवर आला. याचें राज्य महाराष्ट्र आणि कोंकण प्रांतांवर होतें. याचा पुतण्या दुसरा पुलकेशी हा सर्वांत श्रेष्ठ राजपुरुष होय. यानें कांचीच्या पल्लवांना जिंकून नर्मदेपासून रामेश्वरापर्यंत साम्राज्य वाढविलें. कनोजच्या हर्षवर्धनाचा नर्मदेवर पराभव केला (६२०). पूर्व-किनाऱ्यावरील वेंगी या ठिकाणीं आपला एक भाऊ विष्णुवर्धन यास राज्य दिलें (हेंच पूर्वचालुक्य होत). पुलकेशीची राजधानी नाशिक असावी. इराणची वकिलात याच्या दरबारीं आली होती (त्यासंबंधी चित्र अजंठा येथें आढळतें). चिनी प्रवासी हिवेनश्वंग याच्या वेळीं दक्षिणेंत आला होता व त्यानें पुल-केशीच्या ऐश्वर्याचें चांगलें वर्णन लिहून ठेवलें आहे. या पुलकेशीनंतर विक्रमादित्य, व विनयादित्य हेहि पराक्रमी सम्राट् होऊन गेले. शेवटचा राजा कीर्तिवर्मा याला दंतिदुर्ग राष्ट्रकूटानें जिंकलें. यानंतर या पश्चिम चालुक्यांचें साम्राज्य म्हणून राहिलें नाहीं.

पूर्वेकडील म्हणजे वेंगीचें चालुक्य घराणें इ. स. ६०५ पासून १०७८ पर्यंत नांदत होतें. हें राज्य पूर्वकिनाऱ्यावर गोदा आणि कृष्णा यांच्या दुआबांत वसलें होतें. या घराण्यांत २६ राजे होऊन गेले. या राजांना कलिंगचे गंग, दक्षिणेकडील चोल आणि पल्लव, व पश्चिमेचे राष्ट्रकूट यांच्याशीं सतत झगडावें लागत होतें. १४ वा राजा भीम यानें १०८ लढाया मारल्या व तितकींच देवळें बांधलीं, अशी आख्यायिका आहे. यांची राज्यव्यवस्था पश्चिमेकडील चालुक्यांप्रमाणेंच होती. चालुक्य घराण्यांतील शेवटच्या राजाचा दौहित्र यानें चोल घराणें स्थापून हें बुडविलें.

गुजराथचें चालुक्य घराणें सोळंखी या नांवानेंहि ओळखिलें जातें. या घराण्याचा मूळपुरुष हा कल्याणीच्या चालुक्य वंशां-तील असून यानें ९४१ मध्यें गुजरात जिंकला. याची गादी अनहिलवाडास होती. या घराण्याचें ऐश्वर्य मोठें होतें. त्यामुळें गझनीचा महंमद सोमनाथावर चालून आला (१०२४). या घराण्यांत भीम आणि कर्ण हे पराक्रमी राजे होऊन गेले. सिद्ध-राज जयसिंह हा कर्णाचा मुलगा त्याच्यामागून गादीवर आला. या राजांच्या कारकीर्दीत जैन धर्म गुजराथेंत फार वाढला; बऱ्याच इमारती व देवळें बांधिलीं गेलीं. दुसरा भीम राजा (११७८–१२४१) याचें पृथ्वीराज चव्हाण याशीं फार वैर होतें. याच्या कारकीर्दीत वाघेल सरदारांचें प्राबल्य होऊन याच्या मृत्यूनंतर त्यांनीं सोळंखी घराणें बुडविलें.

धोलकाचें वाघेल घराणें चालुक्य वंशीयच होय. यानें इ. स. १२१९ ते १३०४ पर्यंत गुजराथेंत राज्य केलें. अनहिलवाडचा राजा कुमारपाल याचा मावसभाऊ अर्णराज हा या वंशाचा मूळपुरुष होय. याचा मुलगा लवणप्रसाद भीम चालुक्याचा प्रधान होता. यानें १२१९ त धोलक्यास राज्य स्थापिलें. याचा मुलगा वीरधवल फार शूर व न्यायी होता. याच्या कारकीर्दीत जैन दिवाणांचें फार प्राबल्य झालें होतें. या घराण्यांतील शेवट-चा राजा कर्णदेव याचें राज्य अल्लाउद्दीन खिलजीनें घेतलें (१३०४). 'करणवाघेला' पाहा. या वाघेल्यावरूनच वाघेल-खंड असें प्रदेशाला नांव पडलें. रेवा संस्थानचा राजवंश वाघेला रजपूत आहे.

कल्याणीचें चालुक्य घराणें तैलपानें राष्ट्रकूटांचा पराभव करून स्थापिलें (९७४). या घराण्यांतील राजांनीं शेजारील राजांबरोबर अनेक लढाया केल्या. ११ व्या शतकांत राजराज चोल यानें हें घराणें बुडविलें होतें. पण सोमेश्वर चालुक्यानें स्वपराक्रमानें राज्य परत मिळविलें. पुढें विक्रमांक हा प्रख्यात राजा होऊन गेला. बिल्हण कवीनें याच्यावर एक काव्य रचिलें आहे. १२०० च्या सुमारास होयसळ व यादव हीं घराणीं पुढें येऊन चालुक्य नामशेष झाले.

**चालुक्य विक्रम शक**—कल्याणपूर (निजामच्या राज्यां-तील कल्याणी) येथील चालुक्य (सोळंखी) राजा विक्रमादित्य (सहावा) यानें आपल्या राज्यांत शालिवाहन शकाच्याऐवजीं आपल्या नांवाचा नवीन शक सुरू केला होता. हा शक माळव्यां-तील विक्रम संवताहून निराळा आहे हें दाखविण्याकरितां शिलालेखांत त्यास 'चालुक्य विक्रमकाल', 'चालुक्य विक्रम-वर्ष', 'वीर विक्रमकाल', 'विक्रमकाल' व 'विक्रमवर्ष' अशीं निरनिराळीं नांवें दिलेलीं आढळतात. या शकाचा आरंभ उप-र्युक्त राजाच्या राज्याभिषेकाच्या वर्षापासून झाला असें मान-ण्यांत येतें. या शकाचा वर्षारंभ चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून होतो. तो सुमारें १०० वर्षें प्रचारांत होता व त्याचा शेवटचा लेख विक्रम शक ९४ मधील आहे.

**चालून जाणें**—अंगावर चालून जाणें किंवा 'ॲसाल्ट' या शब्दाचा कायद्यांत अर्थ असा आहे कीं, एखाद्या इसमाने दुसऱ्या इसमाला हत्यारानें किंवा हत्याराशिवाय इतर प्रकारें शारीरिक दुखापत करण्याचा प्रयत्न करणें. जर एका इसमानें दुसऱ्याला मारण्याकरितां हात वर उचलला, आणि मारीन म्हणून बोलला, किंवा एखादें हत्यार किंवा काठी मारण्याकरितां उगारली तर तो कायद्यानें गुन्हा होतो. या गुन्ह्यांत प्रत्यक्ष मारण्याची किंवा दुखापत करण्याची क्रिया व्हावी लागत नाहीं. दुखापतीच्या गुन्ह्यांत (बॅटरी) सदर गुन्ह्याचा अंतर्भाव होतो; पण उलटपक्षीं या गुन्ह्यांत दुखापतीच्या गुन्ह्याचा अंतर्भाव होत नाहीं (इंडियन पिनल कोड, कलम ३५१).

**चाल्हण पंडित** (१५ वें शतक)—एक महानुभाव कवि व 'सत्त्वानुवाद', 'ज्ञानप्रकाश,' व 'शास्त्रसंबोधिनी टीका' या तीन सुप्रसिद्ध ग्रंथांचा कर्ता. यास चाल्हेराज असेंहि म्हणत. याचा शिष्यसंप्रदाय बराच मोठा असून याच्या नृसिंह नामक शिष्यानें केलेल्या अमूल्य ग्रंथनिर्मितीमुळें यास बरेंच महत्त्व आलें आहे. चाल्हणानें किंवा चाल्हणाच्या नांवावर त्याच्या नृसिंह नामक शिष्यानें रचलेली श्रीमद्भगवद्गीता-टीका 'चाल्हण संकेत' किंवा 'संकेत गीता' या नांवांनीं प्रसिद्ध आहे.

**चावंड**—जुन्नरच्या ईशान्येस १० मैलांवर व नाणे घाटाच्या नैर्ऋत्येस १० मैलांवर हा किल्ला आहे. या किल्ल्याची तटबंदी १८२० मध्यें इंग्रजांनीं पाडून टाकली. खालच्या बाजूस चावंडाबाईचें देवालय आहे. १४८७ मध्यें अहमदनगरची निजामशाही स्थापन करणारा मालिक अहमद यानें हा घेतला होता. दुसरा बुऱ्हाण निजामशहा याचा अज्ञान मुलगा बहादुरशहा यास इ. स. १५९४ मध्यें या किल्ल्यांत कैदेंत ठेवलें होतें. १६३७ मध्यें हा किल्ला मोंगलांस दिला. १८१८ मध्यें इंग्रजांनीं तोफा डागून हा किल्ला घेतला.

**चावडा**—गुजराथेंतील अनहिलवाडपट्टणचें एक घराणें. या रजपूत घराण्याचा संस्थापक वनराज यानें ७४६ च्या सुमारास अनहिलपूर वसवून तेथें राजधानी केली. वनराजानंतर योगराज, रत्नादित्य, वीरसिंह, व खेमराज असे राजे होऊन गेले. खेमराजाच्या मागून गादीवर आलेला (८८१) भूयड यानें गुजराथचा समुद्रकिनारा काबीज केला. शेवटचा राजा सामंतसिंह याला मूळराज सोळंखीनें पदच्युत केलें. चावडा राजे शिवोपासक होते.

**चावडी**—प्रत्येक गांवाला, गांवाच्या समाईक उपयोगाकरितां, बहुतकरून एखादी सार्वजनिक इमारत बांधलेली असते व तिला चावडी असें म्हणतात. ग्रामप्रतिनिधींची सभा, किंवा पंचायत गांवच्या चावडींत भरते. येथें हरएक बाबीचा विचार होण्यासाठीं, गांवचे लोक पंचांसहित जमतात, आणि नंतर तत्संबंधीं भवति न भवति होते. जेथें चावडी नसते तेथें, हा जमाव गांवांतील कोणत्या तरी एखाद्या देवालयांत जमतो किंवा जेथें असें देऊळहि नसतें तेथें, पाटलाच्या घरीं अथवा अन्य संभावित गृहस्थाच्या मकाणांत, गांवची सर्व शिष्ट मंडळी एकत्र जमते.

इंग्रजी अमदानींत चावडीचा वापर राहिला नाहीं. नुसतें नांव उरलें. आज पोलिसाच्या 'गेटा'चा कांहीं उपयोग चावडीसारखा होतो. ग्रामपंचायती नीट पुन्हां चालू लागतील तर पंचायतीची कचेरी चावडीसारखी होईल.

**चावुंडराय**—'चावुंडराय पुराण' अथवा 'त्रिषष्ठिलक्षण-महापुराण' या कानडी गद्य ग्रंथाचा कर्ता. हा एक कानडी कवि असून जैन धर्माचा निष्ठावंत अनुयायी होता. तसेंच हा शूर असून म्हैसूरच्या गंगराजांपैकीं चौथ्या राजमल्लाचा मंत्री व सेनापतिहि होता. श्रवणबेळगोळ येथें यानें गोमटेश्वराचा प्रचंड दगडी पुतळा उभारला (इ. स. ९८६). या पुतळ्याच्या खालीं 'श्री चावुण्डारायें करवियलें' अशीं मराठी अक्षरें आहेत.

**चास**—हा काक वर्गांतील एक पक्षी आहे. चाप, तास किंवा नीलकंठ अशींहि नांवें आहेत. याचा आकार सामान्यतः कबूतराएवढा असतो. याचा रंग तांबडसर पिंगट असून पंख चकचकीत निळे असतात व त्यांवर काळे पट्टे असतात. उत्तर अमेरिकेंतील या पक्ष्यांचा रंग अतिशय तेजस्वी निळा असतो. आपल्याकडे याचें दर्शन शुभ मानतात. दसऱ्याच्या दिवशीं चास दिसावा म्हणून कांहीं लोक रानावनांतून हिंडत जातात.

**चासकमान**—मुंबई, पुणें जिल्हा, खेडच्या वायव्येस ६ मैलांवर भीमा नदीच्या दक्षिण तीरावर हें एक व्यापाराचें गांव आहे. खेडच्या उत्तरेस चौदा मैलांवर चास-नरोडी म्हणून गांव आहे. येथें चास नांवाचीं जवळजवळच दोन गांवें असल्यामुळें त्यांना ओळखण्याकरितां चास-कमान आणि चास-नरोडी अशीं नांवें दिलीं आहेत. पेशव्यांच्या अमदानींत हा गांव जरा पुढें आलेला होता. थोरला बाजीराव याची बायको चासच्या जोशी घराण्यांतील होती. तिनें गांवाचें सौंदर्य वाढविण्याकरितां बराच पैसा खर्च केला असें सांगतात. भीमा नदीवर तिनें घाट बांधला असून गांवाच्या पश्चिमेस नदीकांठीं सोमेश्वर महादेवाचें देऊळ तिनेंच बांधलेलें आहे.

**चॉसर** (१३४०-१४००)—एक प्राचीन इंग्रजी कवि. १९ वर्षांचा असतांनाच हा फ्रान्सच्या रणभूमीवर गेला व तेथें कैद झाला; पण इंग्लंडच्या राजानें खंडणी भरून त्याला सोडवून आणलें. इंग्लंडला परत आल्यावर त्याला कायमची पेन्शन देण्यांत आली. परदेशच्या राजाशीं राजकीय व व्यापारी बाबतींत तह अगर करार करण्यासाठीं त्याची योजना होत असे. तो कांहीं दिवस लंडन बंदरांत घेतल्या जाणाऱ्या जकातीचा कंट्रोलर व केंटमधील जस्टिस ऑफ पीसहि होता.

चॉसरला फ्रेंच, इंग्लिश व इटालियन भाषांचें चांगलें ज्ञान होतें. एलिझाबेथ राणीच्या वेळीं नाट्यकलेंत जी सुधारणा झाली तिचा आरंभ चॉसरपासून झाला असें म्हटलें तरी चालेल. त्याचें सर्वांत उत्तम पुस्तक 'क्यांटरबरी टेल्स' हें आहे. हें पुस्तक चॉसरच्या विद्वत्तेची साक्ष देतें, एवढेंच नव्हे तर त्याच्या युगाची आधुनिक वाचकाला योग्य कल्पनाहि त्यावरून होते.

**चाहमान** (**चव्हाण**)—हें राजपुतान्यांतील जुनें राजघराणें सांबरचें होय. हें गुहिलोटाबरोबरच उदयास आलें. मूळपुरुष सामंतासिंग यानें आठव्या शतकांत राज्य स्थापिलें. या घराण्यांतील गूवक आणि वाक्प्रति हे शूर, तर सिंहराज आणि विग्रहराज हे दानशूर होते. प्रख्यात पृथ्वीराज चव्हाण (पाहा) याच घराण्यांतील होय. सांप्रत बुंदी, कोटा, सिरोही, वगैरे राजघराणीं चाहमानवंशीयच आहेत. पृथ्वीराजानंतर या घराण्यात धर्माभिमान व शौर्य टिकलें नाहीं.

**चाळिसगांव**—मुंबई, पूर्व खानदेश जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ५०९ चौ. मैल. लो. सं. १,२९,३०८. यांत एक मोठें शहर चाळिसगांव व १३३ खेडीं आहेत. चाळिसगांव हा जिल्ह्याच्या अगदीं दक्षिणेकडे सातमाळ पर्वताच्या पायथ्याशीं आहे. याच्या उत्तर भागांत गिरणा नदी पश्चिमेकडून पूर्वेकडे वाहते. गिरणेच्या कांठची जमीन काळी आहे. तथापि पिकास साधारणच आहे.

चाळिसगांवास आगगाडी झाल्यापासून व्यापाराची वाढ झाली. कापूस व कापड यांच्या गिरण्या झाल्या. येथून धुळयास रेल्वेचा फांटा गेला आहे. येथील किल्ला अगदीं पडून गेला आहे. लो. सं. २२,१२२.

**चिआस्टोलाइट**—अँडालुसाइट धातूचा एक प्रकार. पाटीचे दगड व रूपांतरक्षम खडक यांमध्यें हा सांपडतो. हा स्फटसिकित (सिलिकेट ऑफ अॅल्युमिना) असून क्रूसाप्रमाणे कांहीं विचित्र दिसतो. वज्रतुंडाशेजारीं हा पुष्कळ ठिकाणीं व मोठ्या प्रमाणांत दक्षिण ऑस्ट्रेलियांत बिंचौरी येथें आढळतो.

**चिकटपणा**—(व्हिस्कॉसिटी). एखाद्या वस्तूचे विभाग केले असतां ते विभाग एकमेकांपासून दूर होत असतांना त्यांच्या गतीमध्यें कांहीं प्रमाणांत जें एक प्रकारचें अंतर्गत घर्षण होत असतें त्यास चिकटपणा असें म्हणतात. द्रवपदार्थांमध्यें चिकटपणा या गुणधर्मास फार महत्त्व आहे. द्रव पदार्थांच्या अंगीं स्थितिस्थापकतेचा धर्म नसतो म्हणजे ते टणक नसतात व त्यापासून चिकटपणा हा अगदीं स्वतंत्र गुणधर्म आहे. एखाद्या स्थितिस्थापक पदार्थाचा आपण आकार बदलूं लागल्यास त्या पदार्थाकडून जो प्रतिबंध होतो तो ज्या प्रमाणांत आपण तो बदल घडवून आणूं इच्छितों त्या बदलावर अथवा आकारअंतरावर अवलंबून असतो. परंतु चिकटपणा हा ज्या प्रमाणांत अथवा ज्या गतीनें आपण आकारांतर घडवून आणूं इच्छितों त्या आकारांतराच्या गतीच्या प्रमाणावर अवलंबून असतो. पेट्रोलियम, तेलें व इतर चिकट पदार्थ यांचा चिकटपणा मोजण्याचें एक यंत्रहि (व्हिस्कॉमीटर) निघालें आहे.

**चिकणमाती**—(मार्ल). ही एक प्रकारची माती असून तीमध्यें खटकर्बित (कॅल्शियम कार्बोनेट) व माती यांचें निरनिराळें प्रमाण असतें. हिचा मुख्य उपयोग जमिनीचा पोत सुधारण्याच्या कामीं होतो. परंतु अलीकडे चुन्याचा उपयोग अधिकाधिक होऊं लागल्यामुळें त्याचा परिणाम त्वरित होतो व त्याची विभागणीहि सूक्ष्म तऱ्हेनें करतां येतें. यामुळें अलीकडे चिकणमातीचा उपयोग कमी प्रमाणांत करण्यांत येऊं लागला आहे.

**चिकू**—एक फळझाड. याचीं झाडें मोठीं होत असून बागांतून लावितात. पानें बकुळीसारखीं व फळें अंजिराएवढीं तपकिरी रंगाचीं असतात. युरोपियन लोकांना याची विशेष आवड आहे. कडकीवर हीं औषधी आहेत.

**चिकू वर्ग**—[सापोटासिई]. या वर्गांतील झाडें, हिंदुस्थान, आफ्रिका व अमेरिका यांमध्यें आढळतात. या वर्गांतील पॅलॅक्विअम् किंवा इसोनांड्रा गट्टा या झाडांपासून बाजारांत मिळणारा गटापर्चा (पाहा) नांवाचा पदार्थ मिळतो.

**चिकोडी**—मुंबई, बेळगांव जिल्ह्याचा वायव्येकडील एक तालुका. क्षे. फ. ४९४ चौ. मै. व लो. सं. २,२१,४५१. यांत एक शहर व ९७ खेडीं आहेत. जिल्ह्यांतील इतर भागांपेक्षां याची लोकवस्ती दाट आहे. याची तंबाखू, ऊंस, फळें व भाजीपाला या जिनसांकरितां प्रसिद्धि आहे. दरवर्षी ३२ इंच पाऊस पडतो.

तालुक्याचे मुख्य ठिकाण चिकोडी हें व्यापाराकरितां प्रसिद्ध आहे. १७९० त कॅप्टन मूरच्या म्हणण्याप्रमाणें हें एक मोठें शहर होतें. त्या वेळेस तेथें उत्तम द्राक्षें होत असत. हल्लीं कापड व भांडीं होतात. लो. सं. १०,०७०.

**चिकोरी**—[वर्ग-कांपोझिटी]. हीं एका जातीचीं झाडें आहेत. मुख्यतः एंडिवे (एंडिव्हिया) व चिकोरी (इंटिबस) हे प्रमुख आहेत. हें बहुवर्षायु रोप आहे. याची उंची २ ते ३ फूट असते. या झाडांचीं पानें सोलून त्यांची कोशिंबीर करतात. परंतु या झाडाचा महत्त्वाचा भाग म्हणजे त्याचें मूळ होय. हें लांब, मांसल व दुधाळ असतें. हें भाजून याची पूड करून ती कॉफीमध्यें मिसळण्यांत येते.

**चिक्कदेव** (१६७२-१७०४)—म्हैसूर संस्थानांतील केंपदेव राजाचा हा पुतण्या. चिक्कदेव हा कानडी व संस्कृत भाषेंतील एक ग्रंथकार असून 'चिक्कदेवराजविन्नप', 'गीत गोपाळ', 'भारत', 'शेषधर्म', 'भागवत' हे त्याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. लिंगायत धर्माचा त्याग करून यानें वैष्णव धर्म स्वीकारला. तंजावरच्या व्यंकोजी भोसल्याकडून यानें बंगळूर विकत घेतलें. शिवाय यानें आणखीहि कांहीं मुलूख मिळविला. जमीन

महसुलाच्या व टपालाच्या व्यवस्थेंत यानें सुधारणा घडवून आणल्या. हा एक संगीतज्ञहि होता.

**चिकी**—ब्रिटिश गोंद. चिकी अथवा डेक्स्ट्राइन हें मंद अम्ल मिसळलेल्या पिष्ट सत्त्वास उष्णता देऊन तयार करण्यांत येतें. याचा मुख्य उपयोग विणकामांत करण्यांत येतो. परंतु फोटोग्राफर वगैरे लोकहि चिकटविण्याच्या कामीं हिचा उपयोग करतात. चिकी तयार करण्याकरितां दोन औंस पिष्ट सत्त्व घेऊन तें सहा औंस उकळत्या पाण्यांत घालून विद्रुत करावें. नंतर तें निवूं द्यावें. निवतांना त्यांत संरक्षक म्हणून एक औंस मिथिलेटेड स्पिरिट मिसळण्यांत यावें.

**चिक्कुपाध्याय**—एक कानडी कवि. यानें 'कमलाचल-माहात्म्य', 'हस्तिगिरि-माहात्म्य', इत्यादि अठ्ठावीस ग्रंथ लिहिले. याचें मूळ नांव लक्ष्मीपति असें होतें. म्हैसूरच्या चिक्कदेव राजाचा हा मंत्री असून गुणी जनांचा चहाता, उदार, चतुर व विद्वान् होता. जुन्या कानडी ग्रंथकारांत यानेंच सर्वांच्या-पेक्षां जास्त ग्रंथनिर्मिति केली आहे. सतराव्या शतकाच्या अखेरीस हा होऊन गेला.

**चिखल**—(शाडू माती). जो एखाद्या खनिज पदार्थाचा अथवा खडकाचा भाग ओला असतांना एखाद्या पृष्ठभागावर ठेवला असतां त्यास चिकटून राहतो त्यास चिखल असें म्हणतात. फार बारीक वाळू ओली केली असतां अशी होते, परंतु ती सुकली कीं गळून जाऊन तिची पूड होते. परंतु खरा किंवा वास्तविक चिखल वाळला असतां आकसून आकुंचन पावून घट्ट बनतो व त्यास चिरा पडतात. चिखलाचे गुण त्यांत असलेल्या खनिज द्रव्यांवर, त्यांतील रव्यांवर अवलंबून असतात. केओलिन, अभ्रक व हरित (क्लोराइट) यांचे सूक्ष्मकण घेऊन बन-विलेला चिखल चांगला होतो. चिकणपणा व ओला असतांना जो आकार दिलेला तो वाळल्यानंतरहि तसाच राहणें हे चिखलाचे मुख्य गुण आहेत. चिनी मातीचा (पोर्सेलिनचा) चिखल, केओलिनचा चिखल किंवा चिनी माती, हे अल्कमूस्फटिक (अल्कली फेल्स्पार) वज्रतुंडा (ग्रानाइट) मध्यें कुजल्या-पासून उत्पन्न होतात व हे शुभ्र मातीचे चिखल होत. उज्जसस्फट सिकितेत (हायड्रस अल्युमिनम सिलिकेट) हा रासायनिकदृष्ट्या असतो व त्यांत ४७ टक्के सिकती वाळू (सिलिका) असते. कुंभाराची माती किंवा चिलमीची माती या शुद्ध माती असतात, पण त्यांत सिकतेचें प्रमाण अधिक असण्याचा संभव असतो. अग्नीष्टकांच्या माती (फायरक्ले-आगमाती) मध्यें वितळणारे पदार्थ नसल्यामुळें ती अगदीं वेगळी असते. पुळणवट (लोम) ही वालुकामिश्रित असते; चिकणमाती (मार्ल) ही खटमिश्रित असते व तीव्र अम्ल पडलें असतां वायु बाहेर टाकते व बुडबुडे येतात. 'बोल' ही लोहमय असते व 'लिथोमार्ग' आणि गेरू यादि याच जातीच्या असतात.

**चिखलदरा**—वऱ्हाडांतील उमरावती जिल्ह्याच्या मेळघाट तालुक्यांतील एक हवा खाण्याचें प्रसिद्ध ठिकाण. हें सातपुडा पर्वताच्या ५ मैल लांब, ¾ मैल रुंद व समुद्रसपाटीपासून ३,६६४ फूट उंच अशा एका पठारावर वसलें आहे. हें एलिच-पुराहून २० मैल अंतरावर आहे. चिखलदरा व एलिचपूर यांच्या दरम्यान घरंग येथें प्रवासी लोकांस उतरण्याकरितां एक बंगला आहे. १८३९ पासून याची चांगल्या हवेबद्दल प्रसिद्धि आहे. वऱ्हाडांतील प्रमुख अधिकारी उन्हाळ्यांत कांहीं दिवस येथें राहावयास येतात. येथील हवा समशीतोष्ण, थंड व प्रकृतीस मानवेल अशी आहे. येथील देखावा सुंदर आहे. येथील खासगी बगीच्यांत कॉफी उत्तम होते.

**चिखल्या ताप**—(मड् फीव्हर). हा रोग घोड्यास होतो. घोड्याच्या शरीराचे जे भाग नेहमीं ओले किंवा आर्द्र हवेशीं संबद्ध असतात त्या भागावरील कातडीस सूज येऊन अथवा तिचा दाह होऊन हा रोग उत्पन्न होतो. शिकारी लोकांच्या घोड्यास हा फार होतो. घोड्यास गरम पाण्यानें धुतलें असतां हा रोग होण्याचा संभव असतो. याच्या उलट ज्या घोड्याचे खूर कापलेले असतील अशा घोड्याच्या अंगावर पडलेला चिखल तसाच वाळूं दिल्यास त्यास या रोगाची सहसा बाधा होत नाहीं.

**चिंगलपट**—मद्रास इलाखा, पूर्व किनाऱ्यावरील एक जिल्हा. क्षे. फ. २,०७४ चौ. मैल. यांत नागलापुरम् पर्वत; पालर, अरणी, अड्यार, इ. नद्या; व पुलीकत आणि एण्णोर हीं सरोवरें आहेत. जिल्हा बहुतेक सपाट आहे. पाऊस ४५ इंच पडतो. मुख्य पीक तांदूळ व रागी. जिल्ह्यांत तळीं, कालवे व पाट अनेक असल्यानें शेती चांगली आहे. सुती व रेशमी कापड होतें. कातडीं व कागद यांचे कारखाने, गिंडी येथें सिगारेटचा कारखाना, निळीच्या व तेलाच्या गिरण्या यांसारखे उद्योगधंदे आहेत. शिक्षणांत जिल्हा पुढारलेला आहे. १९४१ त लो. सं. १८,२३,९५५ होती. भाषा तेलगू व तामीळ या दोन्ही चालतात. आठव्या शतकांत पल्लव, नंतर पश्चिम गंग, नंतर राष्ट्रकूट आणि चोल या घराण्यांची या प्रदेशावर सत्ता होती. चौदाव्या शतकांत हा विजयानगरच्या साम्राज्यांत समाविष्ट होता व पुढें मुसलमानांकडे गेला. १८०१ पासून इंग्रजी राज्यांत मोडला जाऊं लागला.

चिंगलपट शहर मद्रासच्या ईशान्येस ३६ मैलांवर आहे. लो. सं. सुमारें पंधरा हजार. येथील किल्ला विजयानगरचा प्रधान

तिम्मारराज यानें बांधला. येथें एक मोठा तलाव आहे. येथें शेतकी कॉलेज, अध्यापन महाविद्यालय व हायस्कुलें आहेत.

**चिंच**--महाराष्ट्रांत चोहोंकडे पाहावयास मिळणारा हा वड, पिंपळ यांच्याप्रमाणें वृक्ष होय. या झाडाची उंची अजमासें ३०

ते ६० फुटांपर्यंत असून याचा घेर १५०-२०० फुटांपर्यंत असतो. या झाडाला चैत्र-वैशाखांत फुलें येऊन हिवाळ्यांत फळें येतात. तुळशीच्या लग्नानंतर चिंच खाण्यास योग्य झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. हें फळ शेंगाप्रमाणें चपटें असून त्याची लांबी ६ ते ९ इंचांपावेतों असते. पदार्थाला आंबटपणा आणण्यासाठीं चिंच वापरतात. चिंचोक्याचा उपयोग खळीकरितां करतात. चिंचेचें लांकूड चिवट असल्यानें उंसाचे घाणे (चरक) याचेच बनवतात. चिंचेचें झाड ८० वर्षें टिकतें. या झाडाच्या तीन जाती आहेतः आंबट, गोड, व तांबडी. शिवाय गोरख चिंच नांवाची हिची आणखी एक जात आहे.

**चिचगड जमीनदारी**--मध्यप्रांत, भंडारा जिल्हा, साकोळा तहशिलीच्या आग्नेयीस नांदगांव संस्थान व चांदा जिल्हा यांच्या सरहद्दीवर ही वसलेली असून हिचें क्षेत्रफळ २४० चौ. मैल आहे. बराच भाग डोंगराळ असून येथें जंगल आहे. जमीनदार हळबी आहेत. हे पूर्वी संयुक्त प्रांतांतील रजपूत असून एकदां यांच्या घराण्यांतील एका रूपवती मुलीला एका मुसलमान राजानें मागणी घातली. तेव्हां ते पळून येऊन चांदा येथील गोंड राजाच्या आश्रयास येऊन राहिले. याच घराण्यांतील नरसिंग ठाकूर हा वीरसाहा नांवाच्या गोंड राजाच्या अमलाखालीं (इ. स. १६४७-७२) ५०० घोडेस्वारांचा नायक झाला होता आणि याच वेळीं त्यास चिचगड्च्या इस्टेटीपैकीं कांहीं भाग इनाम मिळाला होता. या जमीनदारींत एकंदर ८४ खेडीं असून त्यांपैकीं ११ गांवांत वस्ती नाहीं. सुमारें १६० चौ. मैल जंगल आहे. इस्टेटीचें उत्पन्न सुमारें ३०,००० रु. आहे. चिचगड येथें शाळा, पोलिस ठाणें व पोस्ट कचेरी आहे. कसारी येथें इमारती लांकडाचा मोठा बाजार भरतो.

**चिंचवड**— मुंबई, पुणें जिल्हा, हवेली तालुक्यांत पवना नदीवर हें गांव वसलें आहे. येथें मोरया गोसाव्यांची समाधि आहे. त्यांचे वंशज देवघराणें येथें जुन्या वाड्यांत आहे. येथील देवस्थान सरकारनें नेमलेल्या विश्वस्तांच्या देखरेखीखालीं असतें. दरवर्षीं मार्गशीर्ष महिन्यांत येथें मोठा उत्सव होत असतो.

या देवस्थानास शिवाजी, संभाजी, राजाराम व थोरला शाहू यांनीं अनेक इनामे दिलीं आहेत. येथील देवास चिंचवड हे इनाम म्हणून प्रथम शिवाजीने दिलें. शाहूनें त्याशिवाय वाकड (जि. पुणें) हें गांव इनाम दिलें (१७०९).

**चिचुंद्री**—ही 'कीटकभक्षक' प्राण्यांत मोडते. चिचुंद्री उंदराप्रमाणें दिसली तरी शरीरानें उंदरापेक्षां लहान असते. तिचें तोंड जास्त लांबट असतें व डोळे बारीक असून उंदराप्रमाणें वर आलेले नसतात. चिचुंद्री उंदराप्रमाणें जमिनींत बिळें करून राहते, व भक्ष्य शोधण्यास फक्त रात्रींच बाहेर पडते. ही झुरळ, विंचू, वगैरे किडे खाऊन आपली उपजीविका करिते. चिचुंद्री घरांतील किड्यांचा संहार करिते म्हणून घरांत असली तर चांगलीच. चिचुंद्री फार भित्री आहे. ती चुक्चुक् असा कर्कश आवाज करते व क्वचितच पाहावयास सांपडते.

**चिटणीस, चिटणिसी काम**—शिवाजीराजे गादीवर बसल्यानंतर त्यांनीं सरकारी अमलदारांचे जे कानूजाबते तयार केले, त्यांत चिटणिसाकडे पुढील कामें असत: त्यानें सर्व राज्यांतील राजपत्रें लिहावीं; राजकारणपत्रें आलीं असतील त्यांस उत्तरें लिहावीं; सनदा, दानपत्रें, महालकरी यांना हुकूम वगैरेंचीं पत्रेंहि लिहावीं; व हातरोखा म्हणजे छत्रपतींनीं स्वहस्तें लिहिलेलें पत्र व नाजुक पत्रें यांजवर मोर्तब करावें.

**चिटणीस घराणें**—सातारकर छत्रपतींचे चिटणीस, हे बाळाजी आवजीच्या वंशांतील होते. खंडोबा १७२६ त वारला. खंडोबास एकंदर सहा पुत्र होते. खंडोबानंतर त्याचा मेव्हणा गणेश रुक्मांगद हाच (मुलें लहान असल्यानें) चिटणिसी कारभार पाही. पुढे जिवाजी खंडेराव हा कांहीं दिवस काम पाहूं लागला. पुढें जिवाजीचा भाऊ गोविंदरावहि काम करूं लागला. गोविंदराव १७५८ त वारला. खंडोबाचा भाऊ निळोबा यास शाहूनें पेशव्यांची चिटणिशी सांगितली. त्याचा मुलगा आवजी व त्याचा महीपति हे नानासाहेब पेशव्यांचे चिटणीस होते. महीपतीचा भाऊ आनंदराव हा पानपतांत पडला. जिवाजी खंडो

१७४३ त वारला तेव्हां त्याचा पुत्र रामराव यास शाहूनें चिटणिशी सांगितली. यास सहा मुलें होतीं. वडील मल्हारराव हा प्रतापसिंह छत्रपतींचा चिटणीस होता. यानें छत्रपति घराण्यांतील राजपुरुषांच्या बखरी लिहिल्या आहेत. मल्हाररावाचा पुत्र बळवंत हाहि प्रतापसिंह राजाचा चिटणीस होता. त्याचा पुत्र खंडेराव चिटणीस हा आपल्या वयाच्या ९३ व्या वर्षी ( १९१७ ) वारला.

**चिटणीस, सर गंगाधर माधव** ( १८६३–१९२९ )—मध्यप्रांतांतील एक पुढारी. यांचें शिक्षण एका मिशन स्कूलमध्यें व मुंबई येथें एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें झालें. हे १८९१ मध्यें रायपुरास सरकारी वकील होते. १८९३ मध्यें प्रथम व्हाइसरॉयच्या इंपीरिअल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे समासद होते. नंतर १८९४–९५, १८९८–९९ व १९०७–८ मध्यें पुन्हां निवडून आले. ते १९०५ त जबलपुरास भरलेल्या मध्यप्रांत व वऱ्हाड प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष होते. १९१० मध्यें ते मोर्ले–मिंटो सुधारणेच्या कौन्सिलांत निवडून आले होते. १८९६ ते १९१८ पर्यंत ते नागपूर म्युंनिसिपालिटीचे अध्यक्ष होते. १८८९ पासून अखेरपर्यंत ते नागपूर जिल्हा बोर्डाचे लोकनियुक्त अध्यक्ष होते. १९२१ ते १९२५ पर्यंत मध्यप्रांत कायदे मंडळाचे अध्यक्ष होते. दोन वेळां ते प्रांतिक परिषदांचे स्वागताध्यक्ष होते.

हे कांहीं काल नागपूर लोकसभेचे अध्यक्ष होते. हे पहिल्या वर्गाचे ऑनररी मॅजिस्ट्रेट होते. १९०० मध्यें त्यांस लाहोर कॉंग्रेसकरिता अध्यक्ष म्हणून योजलें होतें; पण त्यांनीं आपल्या अल्प वयोमानामुळें तें पद नाकारलें. ते पुलगांव मिल कंपनीचे बरींच वर्षे अध्यक्ष होते. १९०२ मध्यें त्यांस राजे सातवे एडवर्ड यांच्या राज्यारोहण दरबारास इंग्लंडमधून आमंत्रण आलें होतें. तसेंच १९०३ व १९११ मधील दिल्ली दरबारासहि ते गेले होते. यांस सी. आय्. ई. व के. सी. आय्. ई. या पदव्या मिळाल्या होत्या. यांस हिंदुधर्मसभा महामंडळाकडून ‘ भारतभूषण ’ ही पदवी मिळाली होती. नागपुरांतील बहुतेक संस्थांशीं यांचा दातृत्वामुळें संबंध असे.

**चितळ**—( गॅझेल ). हा एक हरणांचा वर्ग असून यांत सुमारें पंचवीस जाती आहेत. हीं आफ्रिका, अरबस्तान व हिंदुस्थानांतील ओसाड वाळवंट यांतून आढळतात. यांचा रंग वाळूसारखा असून वर पांढरट काळसर ठिपके असतात. यांतील

**चितळ हरण**

नर व मादी या दोघांसहि शिंगें असतात व तीं वाटोळीं, काळीं व करवेदार असून सुमारें १२ इंच लांब वाढतात.

**चितळदुर्ग**—म्हैसूर संस्थान, एक जिल्हा. हा म्हैसूर संस्थानच्या उत्तरेस असून याचें क्षेत्रफळ ४,१५९ चौ. मै. आहे. हा जिल्हा वेदवती नामक सखल प्रदेशाचा एक भाग असून त्यांत तुंगभद्रा, वेदवती, हरिद्रा, वगैरे नद्या आहेत. या जिल्ह्याच्या मध्यभागांतील २० मैल रुंदीचा एक आडवा पट्टा पर्वत रांगांनीं व्यापिला आहे. याच पट्टयांत नाके भैरव ( ३,०२२ फूट), जतिंग रामेश्वर ( ३,४६९ फूट ), वगैरे शिखरें आहेत. या जिल्ह्यांत चितळदुर्ग येथें दरवर्षी २५ इंच पाऊस पडतो.

या तालुक्याचें क्षेत्रफळ ५३० चौरस मैल आहे. ह्यात चितळदुर्ग शहर व १६४ खेडीं आहेत. दक्षिणोत्तर खडकाळ टेकडयांच्या ओळीनें ह्या तालुक्याचे दोन समभाग पडलेले आहेत. ह्या टेकडीचा पूर्व व पश्चिमेकडील प्रांत सपाट असून जंगलविरहित आहे. पूर्वेपेक्षां पश्चिमेकडील प्रांतांत पाण्याचा चांगला पुरवठा असून भीमसमुद्र नावाचें तळें आहे.

**चिंतामणराव पटवर्धन** ( मृ. १८५१ )—सांगली संस्थानचे संस्थापक. आपल्या कर्तृत्वानें यांनीं चांगलेंच नांव मिळवलें. खर्ड्यांच्या लढाईच्या वेळीं हे हजर होते. यांच्याच वेळीं पटवर्धन घराण्यांत वांटण्या होऊन मिरज व सांगली हीं दोन पटवर्धन संस्थानें निर्माण झालीं.

**चिंतामणि, सर चिरवूरी यज्ञेश्वर** (१८८०-१९४१)—एक प्रागतिक हिंदी पुढारी. नॅशनल लिबरल फेडरेशनचे हे उपाध्यक्ष होते. हे इंग्लंडमध्यें पाठविलेल्या शिष्टमंडळांत प्रागतिक पक्षातर्फे प्रतिनिधि म्हणून गेले होते. १९१६ ते १९२३ पर्यंत व पुन्हां १९२७ पासून हे संयुक्त प्रांतीय कायदे मंडळांत होते. १९२१ ते १९२३ पर्यंत हे तेथील शिक्षणमंत्री होते. १९२९ सालीं हे भारतीय संस्थानी प्रजापरिषदेचे अध्यक्ष होते. १९३२ मध्यें इंडियन फ्रँचाइज कमिटीचे सभासद होते. हे अलाहाबाद येथील 'लीडर' पत्राचे १९०९ ते १९२० पर्यंत दुय्यय संपादक असून १९२४ मध्यें मुख्य संपादक झाले. १९१८-२० व १९२३-२९ मध्यें राष्ट्रीय प्रागतिक परिषदेचे मुख्य चिटणीस होते व १९२० व १९३१ या वर्षी अध्यक्ष होते. १९३० मध्यें ते विलायतेस गोलमेज परिषदेस सभासद म्हणून गेले होते. संयुक्त प्रांतीय प्रागतिक परिषदेचे ते अध्यक्ष होते. यांनीं हिंदी सामाजिक सुधारणांवर एक ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. १९३५ मध्यें ते अखिल भारतीय जातीय निवाडा-विरोधी परिषदेचे व अखिल भारतीय पत्रकारपरिषदेचे अध्यक्ष होते. यांनीं लखनौ व म्हैसूर विद्यापीठांत अनुक्रमें १९३२ व १९३५ सालीं पदवीदानसमारंभप्रसंगीं भाषणें केलीं.

**चिंतामणि कवि**—हा मोरोपंतांचा समकालीन होता. मराठी भाषेंत दिंडी वृत्तांतलें सुप्रसिद्ध ध्रुवाख्यान याचेंच आहे. हा नरहरिभक्त असून याच्या घरची वृत्ति ज्योतिषाची असावी. गणपतीवर याच्या ११०० आर्या आहेत. गोपीचंदाख्यान व सीतास्वयंवर यांचा कर्ता चिंतामणि हाच कीं काय हें निश्चित नाहीं.

**चिंतामणि दीक्षित**—सातारा येथील हा एक ज्योतिषी. शके १७१३ मध्यें यानें गोलानंद नांवाचा वेधयंत्राचा एक ग्रंथ लिहिला. पेशवाईच्या काळांत यास १२५ रु. दक्षिणा मिळत होती.

**चिंतामणि रघुनाथाचार्य** (१८२८-१८८०)—एक अर्वाचीन हिंदी ज्योतिषी. हे मद्रास येथील वेधशाळेंत हेड असिस्टंट होते. मि. पोगान, मद्रास येथील सरकारी ज्योतिषी, यांच्याबरोबर इ. स. १८६२ पासून याम्योत्तरलंघनदर्शन यंत्राच्या साहाय्यानें वेध घेऊन ताऱ्यांची यादी करण्याचें काम यांनीं सुरू केलें. इ. स. १८७२ त त्यांस रॉयल अॅस्ट्रॉनॉमिकल सोसायटीचे फेलो नेमिलें. इ. स. १८६८ तील ऑगस्ट महिन्यांत सूर्याचें खग्रासग्रहण होतें तेव्हां वेध घेण्याकरितां निजाम सरकारच्या राज्यांत वनपर्थी येथें त्यांस पाठविलें होतें. तसेंच इ. स. १८७१ च्या डिसेंबर महिन्यांत खग्रास सूर्यग्रहण पडलें तेव्हां कोईमतुर जिल्ह्यांत आवनशाई येथें वेध घेण्याकरितां त्यांस पाठविलें, दोन्ही ठिकाणीं हे यशस्वी होऊन आले. इ. स. १८६७ व १८७८ ह्या वर्षी ह्यांनीं दोन 'अनियत तेजस्क' तारे शोधून काढले. नवीन खस्थ पदार्थांचा शोध-लावणारे हेच पहिले हिंदी गृहस्थ होत.

**चितारी**—चित्रें काढण्याच्या धंद्यावरून स्वतंत्र बनलेली ही जात वऱ्हाड मध्यप्रांतांतच दिसते. इतर प्रांतांतून चितारी ही जात नसून धंदेवाईक वर्ग आहे. लांकडावर व भिंतीवर चित्रें काढणाऱ्या या जातीला हिंदी मुलुखांत चितर, मराठींत चितारी, उडिया मुलुखांत महाराणा व फलचढाई, आणि क्वचित् ठिकाणीं मोची व जिनगर म्हणतात.

हे लोक विश्वकर्म्याची पूजा करतात. जिनगर लोक स्वतःला रजपुतांचे वंशज समजतात व त्यांनीं रजपूत नांवेंहि आपणांस लाविलीं आहेत. या वर्गांत मराठी, तेलगू व हिंदुस्थानी जातींचे लोक आहेत. हे लोक अजून भिंतीवर लग्नमुंजीच्या वेळीं चित्रें काढतात. नागपुरांत अजून भिंतीवर चित्रें काढविण्याचा कांहीं मंडळींस शोक आहे; तेव्हां त्यांचीं चित्रें काढून देण्याचा यांचा धंदा चालतो.

**चिति**—चयन. एक श्रौतकर्म. हें कर्म अग्निष्टोमादि सप्तसोमसंस्थापैकीं कोणत्याहि यागाबरोबर करतात. यांतील मुख्य विधि म्हणजे मातीच्या विशिष्ट आकाराच्या इष्टका(विटा) तयार करून त्यांच्या थरांनीं विशिष्ट आकाराची उत्तरवेदी (हवन करावयाचें मुख्य आयतन) रचावयाची व गार्हपत्य आणि दक्षिणाग्नि हे याच विटांचे परंतु नेहमींच्या आकाराचेच रचावयाचे. हें अनुष्ठान ज्यास प्रथमच करावयाचें असेल त्यानें सहस्रचिति (दररोज २०० विटा प्रत्येक स्थलीं याप्रमाणें एक हजार विटांचे पांच थर) करावयाचा असतो. कामनापरत्वें या चितींचे श्येनचिति, कंकचिति, रथचक्रचिति, इ. निरनिराळे प्रकार तैत्तिरीय संहितेंत (कांड ५ प्रपाठक ६) दिले असून त्याचें विधानहि त्याच स्थलीं दिलें आहे. वरील चितींपैकीं जी चिति करावयाची असेल त्या आकाराचा विटांचा थर रचावयाचा. उदा., श्येनचिति करावयाची असल्यास श्येनाचा आकार विटांच्या थरास द्यावयाचा. ही श्येनचितिच नेहमीं करण्याचा परिपाठ आहे. चितीचें अनुष्ठान करणें असल्यास प्रथम वायव्यपशुनामक काम्य पशूचें अनुष्ठान करावयाचें असतें आणि त्रैधातवी नामक एक इष्टि करावयाची असते.

**चितोड**—हें शहर राजपुतान्याच्या उदेपूर संस्थानांतील चितोड जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून तें चितोड रेल्वे (उदेपूर चितोड-लाइन) स्टेशनापासून दोन मैलांवर आहे. याच्याजवळच चितोड नांवाचा प्रसिद्ध किल्ला आहे. या किल्ल्याला पूर्वी चित्रकोट म्हणत. हा किल्ला बाप्पारावळ यानें इ. स. ७३४

घारापुरी लेण्यांतील एक दालन (पृ. ७४६)

चिदंबरम्— शिवालयांतील स्तंभ मंडप (पृ. ७९६)

चितोड—

प्राचीन गुहांतून खडकांवर अशीं चित्रें काढलेलीं सांपडलेलीं

आहेत.मिसर (इजिप्त) देशात अशा चित्रलिपीचा प्रचार अगदीं परिणतावस्थेला पोंचला असून, चित्राच्या साहाय्यानें माणसांना सर्व कल्पनांची, विचारांची देवघेव करतां येत असे. पशुपक्ष्यांचीं चित्रें ते ते प्राणी दाखवीत, इतकेंच नव्हे तर त्यांचे गुणावगुणहि व्यक्त करीत. या चित्रलिपींत मोठी अर्थसूचकताहि असे. ही चित्रलिपि जशी कल्पनादर्शक तशी ध्वनिसूचकांहि असे. चित्रचिन्हापासून अचूक बोध व्हावा म्हणून त्याच्यापुढें एखादें निर्णायक चित्रहि काढीत. या मिसरी चित्रलिपीचे तीन वर्ग पडतात: (१) पहिली शुद्ध चित्रलिपि—स्पष्टवस्तू दाखविण्यासाठीं योजलेल्या आकृती व कांहीं गणिती आणि विशिष्ट चिन्हें. (२) या प्राचीन लिपीवरून हिअरेटिक किंवा पुरोहिती लिपि निघाली. या लिपींत चित्रांना वेगळें वळण लावून त्यांचा ग्रंथलेखनाकडे उपयोग केला. खि. पू. तीन हजार वर्षांचे असे ग्रंथ उपलब्ध आहेत. (३) डेमोटिक किंवा मिसरी मोडी हिअरेटिकापासूनच निघाली व तिचें वळण फारसें चित्रांसारखें राहिलें नाहीं. खि. पू. नवव्या शतकापासून व्यवहारांत या डेमोटिक लिपीचा प्रचार आहे.

या चित्रलिपीचा उलगडा अनेक शतकें झाला नाहीं. पण १७९९ सालीं एका फ्रेंच इंजिनियरला रोझेटा येथें एक शिलालेख सांपडला. या शिलेवर हिरोग्लायफिक, डेमोटिक व ग्रीक अशा तीन भाषांत एकच मजकूर असल्यानें १८२२ सालीं संशोधकांनीं या चित्रलिपीवर निर्णायक असा प्रकाश पाडला व प्राचीन ईजिप्तमधील वाङ्मयाचें वाचन करण्याची किल्ली उपलब्ध करून दिली.

चीन, बाबिलोन, मेक्सिको, हिटाइट देश यांतून चित्रलिपीच चालू होत्या. ब्राह्मी व तत्संभूत लिपी सोडल्यास इतर लिपींच्या मुळाशीं चित्रलिपिच आढळून येईल.

**चित्रलेखक तारायंत्र**—(टेलॅन्टोग्राफ). या तारायंत्राच्या साहाय्यानें एका जागेवरून दुसऱ्या जागीं चित्रें पाठवितां येतात. कॉर्न याच्या पद्धतीमध्यें दूर पाठवावयाचें चित्र एका शिशाच्या पातळ पत्र्यावर हाफटोन पद्धतीनें छापण्यांत येतें. हें छापण्याकरितां माशाच्या सरसासारखा एखादा विद्युद्रोधक पदार्थ वापरण्यांत येतो. हें चित्र एका पंचपात्रावर बसविण्यांत येतें. नंतर एका कांट्याच्या साहाय्यानें विद्युत्प्रवाह सुरू केला जातो. हा कांटा जेव्हां चित्रांतील सरस असणाऱ्या जागीं येतो तेव्हां विद्युत्प्रवाह बंद पडतो. याप्रमाणें तें पंचपात्र उभ्या व आडव्या दिशांनीं फिरवून त्याचा प्रत्येक भाग त्या कांट्याखालीं येईल अशी योजना करण्यांत येते. यामुळें विद्युत्प्रवाह मधून मधून सुरू होतो व मधून मधून थांबतो, आणि त्यामुळें ज्या ठिकाणीं तो विद्युत्प्रवाह पोंचविलेला असतो त्या ठिकाणीं तें चित्र काढण्यांत येतें. या दोन प्रेषक आणि ग्राहक यंत्रांच्या दरम्यान ईथरच्या लहरींचाहि वाहक म्हणून उपयोग करतां येणें शक्य असतें.

**चित्रसंग्रहालय**— सामान्य पदार्थसंग्रहालय किंवा अजबखाना यापासून चित्रसंग्रहालयें हीं भिन्न असून त्यांमध्यें फक्त चित्रांचाच संग्रह केलेला असतो. अशा संग्रहालयामध्यें गेलें असतां आपणांस अनेक निरनिराळ्या देशांतील एवढेंच नव्हे तर आपल्या देशांतीलहि अनेक निरनिराळ्या चित्रकारांचा चित्रसंग्रह दृष्टीस पडतो. अशा संग्रहामध्यें निरनिराळ्या पद्धतीनें चित्रित केलेलीं चित्रें तर ठेवलेलीं असतातच, पण निरनिराळ्या काळांतील चित्रेंहि बहुधा कालानुक्रमानें लावून ठेवलेलीं असतात. त्यामुळें मानवी विचारांचा व कल्पनांचा विकास कसकसा होत गेला आहे हेंहि पाहण्याची संधि आपणांस मिळते. अशा संग्रहालयांत सौंदर्य व कला या दृष्टींनीं रंगकाम, आकृति-विविधता, कल्पनाचातुर्य अथवा निर्माणकौशल्य दृष्टीस पडतें व त्याबरोबरच आपणांस गतकालीन थोर पुरुषांच्या भव्य आकृती, पोशाख, चर्या, सांप्रदायिक क्रिया, उपकरणीं, वगैरे अनेक गोष्टींचें ज्ञान होतें. परंतु या सर्वांपेक्षां मनोजाग्रति हा विशेष लाभ होय. याबरोबरच मनोविनोद व नेत्रांना आणि मनाला मिळणारें सुख या गोष्टीहि अशा संग्रहापासून सहज प्राप्त होतात. तसेंच समाजाच्या अभिरुचींना योग्य वळण लागून त्यांच्या ज्ञानाचा व विद्वत्तेचा विकास होतो.

अर्वाचीन कालांत बहुतेक देशांत राष्ट्रीय चित्रसंग्रहालयें स्थापन केलेलीं असतात. याखेरीज स्थानिक संस्था, देवळें, राजवाडे, वगैरेंमध्येंहि उत्कृष्ट चित्रसंग्रह पाहावयास सांपडतात.

इंग्लंडमधील ब्रिटिश नॅशनल गॅलरी हा चित्रसंग्रह फार अप्रतीम आहे. या संग्रहास पार्लमेंटकडून दरवर्षीं मोठी मदत

मिळते. याशिवाय मधून मधून मोठमोठे चित्रसंग्रह खरेदी करून ते यांत ठेवण्यांत येतात. यांतील कांहीं दुर्मिळ चित्रांच्या किंमतीहि अवाढव्य असतात.

बर्लिनमधील कैसर फ्रेडरिक चित्रसंग्रहहि फार प्रेक्षणीय असून त्यांत विशेषतः इटालियन चित्रकारांचीं चित्रें पाहावयास सांपडतात. याखेरीज ड्रेस्डेन व म्यूनिक येथेंहि मोठमोठे चित्रसंग्रह आहेत. व्हिएन्ना येथील चित्रसंग्रहात सुमारें दोन हजारच पण फार निवडक चित्रें आहेत. रशियांतील पीटर दि ग्रेट यानें स्थापन केलेला चित्रसंग्रहहि प्रसिद्ध आहे. सर्वांत फ्रेंच लोकांनीं लूव्ह या राजवाड्यांत ठेवलेला संग्रह फारच प्रेक्षणीय आहे. हा दोन शतकांपूर्वी सर्वांत मोठा संग्रह होता. इटालीमध्यें फ्लॉरेन्स येथील दोन राजवाड्यांत ठेवलेला संग्रहहि १५ व १६ या शतकांतील चित्रांचा सर्वांत मोठा संग्रह होय.

सामान्यतः प्रत्येक चित्रसंग्रहामध्यें कांहीं तरी वैशिष्ट्य असतें. व बहुतेक देश्यचित्रांचा भरणा त्या त्या संग्रहांत मोठा असतो. व त्या दृष्टीनें त्या त्या देशांतील कला अभ्यासण्याकरितां त्यांचा उपयोग होतो. युरोपमध्यें कांहीं स्थानिक संस्थांनीं केलेले चित्रसंग्रहहि नांवाजण्यासारखे आहेत. उदाहरणार्थ, इंग्लंडमध्यें लिव्हरपूल व ग्लासगो येथील संग्रह किंवा अमेरिकेंतील बोस्टन, न्यू यॉर्क, शिकागो, वॉशिंग्टन, वगैरे ठिकाणचे संग्रह पाहण्यालायक आहेत.

पोपच्या वाड्यामध्यें पुतळ्यांचा संग्रहच फार मोठा आहे, तरी कांहीं चित्रेंहि उत्तम आहेत. लंडनमधील हॅम्प्टन, विंडसर व केन्सिंग्टन या तीनहि राजवाड्यांतील संग्रह उत्तम असून प्रेक्षकांस पाहण्यास खुले असतात. मधून मधून चित्रप्रदर्शनें भरतात त्या वेळींहि कांहीं उत्तम चित्रें पाहावयास मिळतात.

हिंदुस्थानांत युरोपप्रमाणें फार मोठ्या प्रमाणावर केलेला असा चित्रसंग्रह नाहींच म्हटलें तरी चालेल. कांहीं संस्थानिक व राजेरजवाडे आपल्या राजधानीच्या ठिकाणीं असे संग्रह करतात; असा संग्रह बडोदें, औंध, व म्हैसूर येथें आढळतो.

मराठे साम्राज्याच्या काळीं साताऱ्यास कांहीं चित्रांचा संग्रह करण्याचा प्रयत्न झाला होता व उत्तर हिंदुस्थानांतून कांहीं चित्रें मधून मधून खरेदी करून आणण्यांत येत; पण फार मोठ्या प्रमाणावर असा संग्रह करण्याइतकें स्वास्थ्य मराठ्यांस कधींच लाभलें नाहीं.

सामान्यतः हिंदुस्थानांत पुढील कांहीं चित्रसंग्रहांचा निर्देश करतां येईल—१ इंडियन म्यूझियम, कलकत्ता; २ व्हिक्टोरिया आल्बर्ट म्यूझियम, मुंबई; ३ सोसायटी ऑफ ओरिएंटल आर्ट, कलकत्ता; ४ जे. जे. स्कूल ऑफ आर्ट, मुंबई; ५ मद्रास फाइन आर्ट सोसायटी, पदुकोट्टा; ६ भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें; व तंजावर येथील जुने राजवाडे, बनारस, बरद्वान, रामपूर वगैरे ठिकाणचे संस्थानिकांचे राजवाडे, व कांहीं कलकत्त्याचे खासगी संग्रह.

**चित्रसेन**—एक गंधर्व. हा अर्जुनाचा मित्र होता. यानें देवलोकामध्यें अर्जुनाला गांधर्वविद्या दिली. यानेंच उर्वशीला अर्जुनाकडे पाठविलें होतें. यानें घोषयात्रेच्या वेळीं दुर्योधनाचा पराभव करून त्यास बंधन केलें असतां अर्जुनानें त्यास सोडविलें.

याखेरीज एक अभीसार राजा, एक कर्णपुत्र, एक धृतराष्ट्रपुत्र, एक द्रुपदपुत्र, जरासंधाचा सेनापति, वगैरे चित्रसेन नांवाच्या व्यक्ती महाभारतांत आढळतात.

**चित्रळ संस्थान**—पाकिस्तान, वायव्य सरहद्दीवरील एक संस्थान. याचें क्षे. फ. ४,००० चौ. मैल. याच्यांत कशकार बाल किंवा उत्तर कशकार यांचा समावेश होतो. हा प्रांत तिरीच तुरीखो व खो या नद्यांच्या थडीवरील प्रदेशांनीं बनला आहे. याच्या उत्तरेस हिंदुकुश पर्वत असून पश्चिमेस बदकशान व काफिरिस्तान आहेत.

इ. स. ९०० च्या सुमारास या प्रदेशावर काबूलच्या जयपाल राजाचें राज्य होतें. व त्यांतील लोक बौद्धधर्माचे होते. सोळाव्या शतकांत रईस नांवाचा राजा राज्य करीत होता. पुढें संगीनअली या नांवाच्या गृहस्थाच्या चौघां मुलांपैकीं दोघांनीं रईस घराण्याचा नाश करून सर्व सत्ता आपल्या ताब्यांत घेतली; बाकी राहिलेल्या दोन मुलांचे वंशज सध्यांचे संस्थानिक होत. हाजी महमद मुझफर उल्मुल्क १९४३ सालीं गादीवर बसले. लोकसंख्या ५०,००० असून त्यांतील लोक खोवार भाषा बोलतात, व ते मुसलमानी धर्माचे आहेत.

या संस्थानचा नदीथडीवरील प्रदेश फार सुपीक आहे. यांत गहूं, जव, मका, तांदूळ या धान्यांचें पीक होतें. लोखंड व तांबें वगैरे धातू सांपडतात.

चित्रळ शहर संस्थानची राजधानी आहे. याची लोकसंख्या सु. ३,००० आहे. हें चित्रळ नदीच्या कांठीं आहे. हें बाजारचें ठिकाण असून येथें व्यापार चालतो.

**चित्राचे ठसे**— पुस्तकें, वृत्तपत्रें, इ.तून जीं चित्रें छापण्यांत येतात तीं चित्रांच्या ठशांवरून छापलेलीं असतात. जस्ताच्या किंवा तांब्याच्या पत्र्यावर कांचेप्रमाणें ऋण प्रतिमा फोटोपद्धतीनें काढून घेतात व हा पत्रा लांकडी ठोकळ्यावर बसवून ठसा करतात. रेखाचित्रांवरून तयार केलेल्या ठशाला रेखा ठसा (लाइन ब्लॉक) म्हणतात. 'हाफटोन ब्लॉक' मध्यें ऋण कांचेपुढें जाळी ठेवतात. या जाळीच्या रेषा ८५ ते २०० पर्यंत असतात. या जाळीमुळें पत्र्यावर नुसते ठिपके उठतात व ठिपक्यांचें रांगोळीप्रमाणें चित्र

दिसतें. चित्र अधिक रंगांत छापावयाचें झालें तर तितके निरनिराळे ठसे त्या त्या रंगाच्या ऋण कांचांवरून तयार करून त्या त्या रंगांत एकावर एक छापतात. 'तीन रंगी ठशां'त (थ्री कलर ब्लॉक्स) पिवळा, निळा व तांबडा या तीन रंगांचे ठसे असतात.

**चित्राश्म**—(पॉरफिरी). ज्या अग्निजन्य खडकामध्यें दुसऱ्या एखाद्या जातीच्या दगडांचे स्फटिक मधून मधून आढळून येतात व त्यांमुळें ज्यामध्यें ठिपके ठिपके असल्यासारखे दिसतात त्या खडकास ही संज्ञा देण्यांत येते. मूळ हें नांव एका जांभळट तांबड्या लाव्हाच्या बनलेल्या दगडास देण्यांत येत असे. यामध्यें लहान पांढरे, पिंवळट किंवा गुलाबी फेल्सपारचे स्फटिक गर्द गुलाबी पृष्ठभागामध्यें मधून मधून दृष्टीस पडत. हा रंग त्या दगडास मंजसिकित (मॅगेनीज सिलिकेट)च्या दगडामुळें येत असे. पुढें हें नांव अशाच तऱ्हेची रचना असलेल्या दुसऱ्या रंगाच्या दगडास लावण्यांत येऊं लागलें. अलीकडे भूस्तर-शास्त्रामध्यें हें नांव कोणत्याहि बारीक बारीक दगडांच्या थरां-मध्यें मध्येंच मोठाले निराळे अग्निजन्य दगडांचे स्फटिक दिसत असल्यास किंवा कांचेमध्येंहि अशा तऱ्हेचे स्फटिक दिसत असल्यास त्यांस लावतात.

**चिदंबर दीक्षित**—एक सिद्धपुरुष. हे गुर्लहोसूर येथें राहत असत. यांचा जन्म शके १६८० त झाला. यांना कांहीं अव-तारी पुरुष समजत. खुद्द पेशवे, रास्ते, गोखले, वगैरे संस्थानिक सरदार यांच्या सेवेस येऊन राहत. तेथें या सरदारांचे वाडे अद्यापि दिसतात. चिदंबर दीक्षितांची समाधि गुर्लहोसूरलाच आहे. यांनीं 'निजात्मबोध' ग्रंथ लिहिला आहे.

**चिदंबरम्**—मद्रास, दाक्षिण अर्काट जिल्ह्याच्या दाक्षिणे-कडील तालुका. क्षे. फ. ४०२ चौ. मैल. यांत दरवर्षी ५१ इंच पाऊस पडतो.

चिदंबर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण साउथ इंडियन रेल्वेचें स्टेशन आहे. १८७३ सालीं येथें म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. कर्नाटक युद्धांत हें एक महत्त्वाचें लष्करी नाकें होतें. १७५३ त हें फ्रेंचांनीं हस्तगत केलें. पुढें १७६० त मेजर मॉनसननें हें काबीज केलें. यानंतर हें हैद्राबादच्या ताब्यांत गेलें.

हें एक प्रसिद्ध तीर्थक्षेत्राचें ठिकाण असून येथें कनकसभा नांवाचें इ. स. ५ व्या शतकांतील महादेवाचें देवालय आहे. देवळांत सभामंडपाला १,००० खांब आहेत. येथें हिंदुस्थानातील पंचलिंगांपैकीं एक लिंग आहे. येथें दरवर्षी यात्रा भरते. रेशमी लुगडीं चांगलीं होतात. १९२९ सालीं येथें अन्नमलाई विद्या-पीठाची स्थापना झाली व तें विद्यापीठ आतां चांगलें चाललें आहे.

**चिंद्‌विन**—ब्रह्मदेश, उत्तर आणि दक्षिण असे दोन जिल्हे. उ. चिंदविनचें क्षे. फ. १५,१६३ चौ. मैल व द. चिं. चें ३,४८० चौ. मै. आहे. उ. चिंदविन प्रदेश डोंगराळ आहे. चिंदविन नदी जिल्ह्यांतून वाहते. खोऱ्यांत आणि डोंगराच्या उतारावर शेती करतात. मुख्य पीक तांदूळ होय. जंगल बरेंच आहे. जिल्ह्यांत आगगाडी नाहीं. जलमार्गानें वाहतूक होते. १८८८ पर्यंत चिंदविन जिल्हे एक होते.

**चिदानंद स्वामी** (मु. १७०८–१७८८)—सावंतवाडी संस्थानांतील एक संत कवि. हे दाभोळी मठाचे मठाधिकारी होते. वयाच्या ८० व्या वर्षी स्वामी समाधिस्थ झाले. तेंडली गावीं चागलांची राई म्हणून जी वाडी आहे तींत यांची समाधि आहे. संस्कृत गुरुगीतेवर 'स्वानंदलहरी' नामक प्राकृत ओंवीबद्ध टीकात्मक ग्रंथ स्वामींनीं लिहिला आहे.

**चिनडोंगर**—ब्रह्मदेशाच्या सरहद्दीवरील एक डोंगराळ प्रदेश. याचें क्षे. फ. ८,००० चौ. मै. आहे. हा प्रदेश डोंगर व दऱ्या यांनीं व्यापिला आहे. पावसाचें प्रमाण ५० ते १०० इंच आहे.

या प्रदेशांत ब्रह्मी, शान व नागा, वगैरे जाती आढळतात. परंतु बहुतेक भागांत मुख्यत्वेंकरून चिन लोकांचा भरणा अधिक आहे.

चिन प्रदेशांत तीन पोटविभाग असून या पोटविभागाचीं मुख्य ठिकाणें फलम, टिड्डिम, व हक हीं शहरें आहेत. उत्प-न्नाची मुख्य बाब म्हटली म्हणजे थाथमेडा कर आहे.

या प्रदेशांत तयार होऊन बाहेर जाणारे मुख्य जिन्नस म्हटले म्हणजे वेताच्या व बांबूच्या चटया, टोपल्या हे होत. यांशिवाय यांत कानांतील दागिने, बांगड्या, धातूचे मणी, वगैरे जिन्नस तयार होतात. कांहीं ठिकाणीं लोखंडी सामान तयार होतें. टेंकड्यांवर कापूस पिकतो व सुती कापड विणण्याचें काम सर्वत्र होतें. घरगुती बायका रेशमी कापड विणतात.

**चिन लोक**—हे आपली उत्पत्ति जगन्माता ली इच्या एका अंडयापासून झाली असें मानतात. हे पर्वतावरून राहतात. पूर्वी पुष्कळ वर्षे ते कोठेंहि स्थायिक राहत नसत, व बकऱ्या, कोंबडया, डुकरें इत्यादिकांचे कळप बाळगीत असत. हे जगन्माता ली व इतर दैवतें व पितर यांना पूज्य मानतात. ते मूर्तिपूजा करीत नाहींत. त्यांचे धार्मिक मंत्र वगैरे परंपरेनें आलेले आहेत. यांच्या निरनिराळ्या ४० जाती आहेत. हे आपलें पहिलें पीक किंवा झाडाचें प्रथम फळ देवतेला प्रथम अर्पण करतात. तसेंच ते वर्षादेवता (फ्रॉग सॉ) हिला बलि-दान देऊन शांत राखतात. ते देवालयें बांधीत नाहींत व मूर्तींची स्थापना करीत नाहींत. पण प्रत्येक गोष्टीला कोणी तरी

देवता कारण आहे असें मानतात. व ठेंच लागली तरी त्या ठिकाणीं भाताचें बलिदान करतात. यांच्यांत अगणित दैवतें मानलेलीं आहेत. त्यांच्यांतील तंटे, फिर्यादी वगैरे पूर्वी त्यांच्यांतील वृद्ध असे पंच तोडीत असत. हल्लीं ब्रिटिश अमदानींत सरकारनें नेमलेला मुख्य हें काम करतो. त्यांची राहणी अतिशय साधी असते.

**चिन-वँग-ताओ**—चीनमधील चिहली प्रांतांत हें बंदर आहे. या बंदरांतून मोठा व्यापार चालतो. कारण शेजारचीं ताकू व न्यूचँग हीं बंदरें मोठाल्या बोटी लागण्याच्या सोयीचीं नाहींत. हिंवाळ्यांत उत्तर चीनमधील सर्व व्यापार चिन-वँग-ताओ बंदरांतून चालतो. या बंदराचा तळ चिखलाचा व २५ फूट खोल आहे. या बंदरापासून पेकिंग, तिंत्सिन, मुक्डेन, वगैरे शहरें रेल्वेनें जोडलेलीं आहेत आणि या बंदरांत जहाजांची दुरुस्ती, माल सांठविणें वगैरेंच्या सर्व सोयी आहेत. लो. सं. २०,०००.

**चिनसुरा**—बंगाल, हुबळी जिल्ह्यांतील एक गांव. हें हुबळी नदीच्या उजव्या तीरावर वसलें आहे. सातव्या शतकाच्या पूर्वार्धापासून तों १८२५ पर्यंत हें डच लोकांच्या ताब्यांत होतें. पुढें इंग्रजांनीं डच लोकांना सुमात्रा देऊन हें आपल्या ताब्यांत घेतलें. पूर्वीं येथें लष्करांतील आजारी शिपाई राहत असत व इंग्लंडला जाणाऱ्या लष्करी फौजेचें हें एक ठाणें असे. १८७१ त तेथील ठाणें उठविण्यांत आलें.

**चिनाब**—ज्या पांच नद्यांमुळें पंजाब हें नांव पडलें, त्यांपैकीं चिनाब ही एक नदी होय. पंजाबांतील हिमालयाच्या लाहूल परगण्यांतून हिचा उगम चंद्रा व भागा नांवाच्या दोन प्रवाहांनीं होतो. ही पंजाबच्या चंबा संस्थानांतून व काश्मीरच्या पदर जिल्ह्यांतून वाहत जाते. हिला युनिअर, शुदी, मुत्ना, मारुवरद्वान, गालनलार, लिडरकोल, चिचलारी, अन्स आणि तावी या नद्या मिळतात. हिच्यावर पुष्कळ पूल बांधलेले आहेत. खांकीपासून हिचा मोठा कालवा काढला आहे. झेलम नदी झंग जिल्ह्याच्या त्रिमू शहराजवळ हिला मिळते; व पुढें सिंधूजवळ रावी व मद्रालजवळ सतलज नदी मिळते. या सर्व नद्यांच्या संगमास पंचनद म्हणतात. चिनाब नदींत वर्षभर लहान होड्या चालतात.

**चिनी वादळ**—(टायफून). चीनच्या समुद्रांत अक्षांश १०° उत्तर ते ५०° उत्तर या प्रदेशांत जून आणि नोव्हेंबर महिन्यांत जीं वादळें उठतात त्यांना हें नांव आहे. फिलिपाइन्सच्या पूर्वेकडे उगम पावून, चीनसमुद्राच्या किनाऱ्यावरून वाहत वायव्य दिशेला हीं वादळें जातात व पुन्हां वळून ईशान्येला जपान इ. देशांकडे फिरतात. या वादळाच्या केंद्रस्थानीं बिलकूल गडबड नसते हें आश्चर्य. या वादळांच्या प्रसंगीं जहाजांना धोका पोंचतोच; पण या वेळच्या भयंकर लाटांमुळें किनाऱ्यावरहि मोठें नुकसान होतें.

**चिन्नवीरण्णा**—एक तेलगू कवि. तेन्नाली येथील हा कवि कोंडवेडू येथील अन्नवेम्मारेडी राजाच्या वेळीं उदयास आला. ह्याला एक वडील बंधु पेद्दावीरण्णा नांवाचा होता. दोघे बंधू प्रत्यहीं दरबारांत जात असत. एकदां राजानें पेद्दावीरण्णास अशा अवघड विषयावर कवित्व करण्यास सांगितलें कीं, तशा विषयावर त्यापूर्वीं कोणाहि कवीनें कवित्व केलें नव्हतें. पेद्दानें थोडक्या अवधींत काव्य करण्याचें कबूल केलें. पुढें घरीं आल्यावर आपल्या बायकोकडून चिन्नाला ही हकीकत समजली. चिन्नानें देवीची प्रार्थना केली. तिनें चिन्नवीरण्णासाठीं पांच सर्गांचें उत्तम काव्य लिहिलें. शेवटच्या पांच ओळी बाकी राहिल्या. पुढें ते श्लोक पेद्दावीरण्णानें करून तें काव्य राजाला अर्पण केलें. त्या दिवसापासून चिन्नवीरण्णाची कवित्वाविषयीं चोहोंकडे ख्याति झाली.

**चिपळूण**— मुंबई, रत्नागिरी जिल्ह्यांतील मध्यवर्ती असा हा तालुका असून याचें क्षे. फ. ६७१ चौ. मै. आहे. यांत चिपळूण हें एक गांव व २१२ खेडीं आहेत. लो. सं. १,४१,८०५. हा तालुका समुद्रकिनाऱ्यापासून पश्चिमघाटापर्यंत पसरला असून यांतील बहुतेक प्रदेश डोंगराळ आहे. यांतील पावसाचें प्रमाण दर वर्षास १४१ इंच आहे. शेती हा मुख्य धंदा आहे. चिपळूण हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. हें चांगलें भरमराटींत असून येथें व्यापारहि बराच चालतो. सन १८७६ त येथें म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. हें कोंकणस्थ ब्राह्मणांचें मूलस्थान समजतात. येथून जवळच परशुराम क्षेत्र आहे. येथें परशुराम एज्युकेशन सोसायटी नांवाची एक शिक्षणसंस्था असून तिनें एक हायस्कूल चालविलें आहे.

**चिपळूणकर, कृष्णशास्त्री** (१८२४-१८७८)— एक महाराष्ट्रीय ग्रंथकार व पंडित. हे लहानपणापासून फार हुशार व बुद्धिमान् होते. प्रथम यांनीं वेदपठण व शास्त्राध्ययन केलें. यांचे गुरु मोरशास्त्री साठे यांना 'बृहस्पति' म्हणत. पुढें १८४८ च्या सुमारास आपल्या गुरूच्या सांगण्यावरून त्यांनीं आपल्या वयाच्या २५ व्या वर्षी इंग्रजीच्या अभ्यासास सुरुवात केली. नंतर कांहीं दिवस ट्रान्स्लेटर एक्झिबिशनर व नंतर पूना कॉलेजांत असिस्टंट प्रोफेसर होते. पुढें कांहीं दिवस 'दक्षिणा प्राइझ कमिटी'च्या सेक्रेटरीच्या जागीं काम केल्यावर 'रिपोर्टर ऑन दि नेटिव्ह प्रेस'च्या जागीं यांची नेमणूक झाली. हे उत्तम लेखक व वक्ते होते. यांचे मुख्य ग्रंथ आरबी भाषेंतील सुरस गोष्टी,

अनेक विद्यामूलतत्त्वसंग्रह, साक्रेटिसाचें चरित्र, रासेलस व व्याकरणावरील निबंध हे होत. हे उत्तम कवि होते. यांचीं पद्यरत्नावली व मेघदूत हीं काव्यें सर्वमान्य आहेत. अव्वल इंग्रजींत मराठी भाषेची सेवा ज्या पंडितांनीं केली त्यांत ते अग्रेसर होते. २० मे १८७८ रोजीं कृष्णशास्त्री मरण पावले. अलौकिक बुद्धिमत्ता, अभिजात रसिकता, व्यापक विचारसरणी, संस्कृत व इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व व बहुमानाची सरकारी नोकरी या कारणांमुळें शास्त्रीबुवांचा लौकिक जसा विद्वान्‌मंडळींत तसा बहुजनसमाजांतहि पहिल्या प्रतीचा होता.

**चिपळूणकर, विष्णु कृष्ण** ( १८५०–१८८२ )—आधुनिक महाराष्ट्राचे जनक व उत्कृष्ट लेखक. यांचा जन्म पुणें येथें २० मे १८५० रोजीं झाला. यांचें शिक्षण पुणें येथें झालें. पदवी घ्यावयास यांस पांच वर्षें लागलीं. त्यानंतर कांहीं वर्षें हे सरकारी शाळेत शिक्षक होते. १८७९ सालीं यांनीं नोकरी सोडून स्वतंत्र कार्यास प्रारंभ केला. १८७४ मध्येंच त्यांनीं 'निबंधमाला' मासिक सुरू केलें व त्यांतील लेखांनीं महाराष्ट्र हालवून सोडला. यांनीं न्यू इंग्लिश स्कूल, चित्रशाळा व किताबखाना या संस्था काढल्या; व केसरी आणि मराठा हीं वर्तमानपत्रें सुरू केलीं. हे असामान्य उद्योगी, करारी, बुद्धिमान् व बाणेदार पुरुष होते. यांनीं लोकांचा ओढा पाश्चात्य लोकांच्या अंधानुकरणाकडे लागलेला पाहून त्यांस त्यापासून परावृत्त केलें व आपलेपणाची स्मृति जागृत करून महाराष्ट्रास खडबडून जागें केलें; व सुशिक्षितांचें लक्ष लोकशिक्षण व लोकसेवा या श्रेष्ठ कर्तव्याकडे त्यांनीं ओढलें तेव्हां मराठी भाषेच्या सेवेंत व स्वदेशाच्या इतिहासांत त्यांचें मन अधिकाधिक रमूं लागलें. साधी राहणी, उदात्त विचार, स्वावलंबन, देशप्रीति, इत्यादि महाराष्ट्रीय सद्‌गुणांची जाणीव यांच्या लेखांनीं तरुण पिढीला दिली. यांना १७ एप्रिल १८८२ रोजीं अकालीं मृत्यु आला. महाराष्ट्रांतील तेजस्वी विचारांचा उगम यांच्या निबंधमालेंतून झाला. यांतील 'आमच्या देशाची स्थिति' हा निबंध जप्त झाला होता तो पण पुढें सुटला. यांचा देशाभिमान स्वयंस्फूर्त होता. त्याचा उगम इंग्रजी राज्याच्या अप्रीतींत झाला. जुन्या विद्येचा अनादर, हिंदु धर्माची निंदा, १८५७ चा स्वातंत्र्याचा अयशस्वी प्रयत्न यांची ताजी आठवण, या परिस्थितींत त्यांचा देशाभिमान वाढला व त्यास 'केसरी-मराठा' यांसारखीं फळें आलीं.

**चिपळ्या**—शिसू, साग किंवा रक्तचंदन ह्या लांकडांचे तीन बोटें रुंदीचे व टीचभर लांबीचे दोन तुकडे घेऊन ते आंतल्या अंगानें साफ व वरच्या बाजूनें गोल केलेले असतात, व त्यांस माशासारखा आकार दिलेला असतो. तोंडांत पितळेचे रुपयाएवढ्या आकाराचे दोन तुकडे एकावर एक खेळते बसविलेले असतात, व शेपटीकडील बाजूस, बारीक अशा तीन तीन घुंगरांचा झुबका बसविलेला असतो. प्रत्येक तुकड्याच्या गोल भागाकडे मध्यावर, बोट जाईल अशी अंगठी बसविलेली असते; ह्यामुळें हाताचा अंगठा एका तुकड्याच्या अंगठींत घालून व मधलें बोट दुसऱ्या तुकड्याच्या अंगठींत ठेवून हे दोनहि तुकडे एकमेकांवर व्यवस्थेनें आपटतां येतात, व त्या तुकड्यांच्या दिलेल्या पितळी तुकड्यांमुळें व दुसऱ्या टोंकाशीं लाविलेल्या घुंगरांच्या झुबक्यामुळें मधुर असा आवाज निघतो. ह्या चिपळ्यांचा उपयोग ताल धरण्याकडे होतो. भजन व हरिकीर्तन यांप्रसंगीं ह्यांचा उपयोग विशेषतः होतो.

**चिंपान्झी**— ही एक माकडाची जात असून पश्चिम आणि मध्य आफ्रिकेंत आढळते. 'चिंपान्झी' हें नांव स्थानिक असून 'अॅन्थ्रोपोपिथेकस ट्रोग्लोडाइटीज' ही या जातीची शास्त्रीय संज्ञा आहे. मनुष्यसदृशवर्गांतील हें माकड गोरिलाच्या जातींतच पडण्यासारखें आहे. याची जास्तींत जास्त उंची ५ फूट होते. हा प्राणी गोरिलासारखा बळकट मात्र नाहीं. याचे केंस काळे असतात. ओरँगप्रमाणें याच्या पुढील हातांवर केंस असतात; पण ओरँगला नसतात त्या ज्या गोष्टी याला असतात त्या म्हणजे याला एक जास्त पृष्ठमणकास्थि ( डॉर्सल व्हर्टेब्रा ) असून बरगड्यांची तेरावी जोडी असते. इतर माकडांपेक्षां हा जास्त ताठ चालतो. हा फळें खाऊन राहतो व फांद्यांची ढोली करून राहतो.

**चिमणाजी बल्लाळ ऊर्फ चिमाजी आप्पा पेशवे** ( मृ. १७४० )—पहिल्या बाजीराव पेशव्याचा भाऊ. याचा जन्म १७०८ च्या सुमारचा असावा. बापाबरोबर दमाजी थोराताच्या कैदेंत यानें कांहीं दिवस काढले. पेशव्यानें आप्पाची नेमणूक माळव्यांत मुलुखगिरी करण्यासाठीं केली. त्याच्या कर्तबगारीस येथूनच प्रारंभ झाला. १७२४ पासून १७३१ पर्यंत

तीन स्वाऱ्या करून सुभेदार राजा गिरधर व दयाबहादूर यांस ठार मारून माळवा हस्तगत केला. गुजराथेंत चौथाईचा अमल सुरू केला. त्रिंबकराव दाभाडयाचा बंदोबस्त करण्यास आप्पानें पेशव्यास चांगलीच मदत केली. सन १७३८ त तापीजवळ छावणी ठोकली व निजामाची हालचाल बंद पाडली. यानंतर महत्त्वाचें कार्य म्हणजे वसई प्रांत सर करण्याचें. या वसईच्या युद्धानें त्याची कीर्ति व त्याजविषयींचा आदर वाढला. निजामाशीं युद्ध झालें तेव्हां त्यांत आप्पाहि होताच. याच सालीं बाजीराव वारल्यानें नानासाहेबास साताऱ्यास नेऊन पेशवाईचीं वस्त्रें आप्पानें देवविलीं.

यानंतर त्याची प्रकृति ढासळली व तो पुण्यास १७४० च्या अखेरीस (पौश शु॥ १० शके १६६२) मरण पावला.

आप्पा फार विचारी, धोरणी, मनमिळाऊ, शूर व नीतिमान होता. शाहू व सरदारमंडळी बाजीरावाकडील काम आप्पाच्या मध्यस्थीनें करून घेत. नानासाहेब, रघुनाथराव, वगैरे मुलें आप्पाजवळ असत. हा बाजीरावास अनेक प्रकारचा योग्य सल्ला देऊन प्रपंचांत व मोहिमांवर चांगली मदत करीत असे. नानासाहेयाच्या चौरस बुद्धीला आप्पाच कारणीभूत होय. आप्पाचा मुलगा प्रसिद्ध सदाशिवराव भाऊ हा होय.

**चिमणाजी रघुनाथ पेशवे** (१७८४-१८३०)—धाकटा चिमाजी आप्पा. हा राघोबादादा आणि आनंदीबाई यांचा दुसरा मुलगा व बाजीरावाचा धाकटा भाऊ. राघोबा वारला तेव्हां आनंदीबाई याच्या वेळेस गरोदर होती. याचें बालपण आनंदवल्लीस गेलें. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर याला सवाई माधवरावाची बायको यशोदाबाई हिच्या मांडीवर दत्तक देण्यांत आलें, पण थोडयाच महिन्यांत पेशवेपदावरून खालीं यावें लागलें. बाजीरावाच्या कारकीर्दींत याला कांहीं अधिकार नव्हता. पेशवाई गेल्यावर हा इंग्रजांचें पेन्शन घेत काशीस राहिला. याची मुलगी द्वारकाबाई ही थत्त्यांकडे दिली होती; तिचा औरसवंश आहे.

**चिमणाजी दामोदर मोघे** (मु. मृ. १७३१)— पेशवाईतील एक मुत्सद्दी. हा कोंकणांत हरिहरेश्वराचा राहणारा असून ताराबाईच्या कारकीर्दींत उदयास आला. शाहू औरंगजेबाकडून सुटून महाराष्ट्रांत आला तेव्हां चिमणाजीस त्यानें मनुष्य पाठवून आपल्याकडे वळवून घेतलें, पण पुढें चिमणाजीचा शाहूशीं बेबनाव होऊन, तो कोल्हापूरच्या संभाजीकडे गेला; तेथें त्यानें कांहीं काळ मुख्य प्रधानकीचें काम केलें. चिमणाजी हा थोरल्या बाजीरावाच्या विरुद्ध पक्षास मिळाला होता. व डभईच्या लढाईंत त्रिंबकराव दाभाडेकडे होता. त्या लढाईंत त्याचा पाडाव झाल्यानें पेशव्यानें त्याचा सर्व सरंजाम जप्त केला व त्यास फक्त तीन गांवें जहागिरीदाखल ठेविलीं.

**चिमणाजी रघुनाथ सचीव** (१८३६-१८७१)— भोरचे एक राजे. हे आपल्या वयाच्या तिसऱ्या वर्षी गादीवर आले. हे अल्पवयी असल्यानें यांचें पालनपोषण व राज्यकारभार यांच्या मातोश्री गंगाबाई याच पाहत. सातारचें राज्य नष्ट झाल्यावर सन १८४८ त हे इंग्रजांचे मांडलिक झाले. आपल्या कारकीर्दींत यांनीं धरणें, नदीघाट, पाण्याच्या सोयी यांसारखीं लोकहिताचीं कामें करून प्रजेचा विश्वास संपादन केला. हे करारी, हौशी व उदार असून यांनीं दानधर्महि बराच केला.

**चिमणी**— हा पक्षी सर्वांच्या परिचयाचा असून सर्वत्र आढळतो. चिमण्या फार धीट असून घरांत व झाडांवर राहतात. उंदराप्रमाणेंच चिमणी उपद्रवी आहे; पण कळून येत नाहीं इतकेंच. शेतावरील पिकाचा नाश लवकर करतात. या कळपानें येतात. नर व मादी यांच्या रंगांत व आकारांत थोडा फरक असतो. यांना माणसांचें साहचर्य लागतें व त्यामुळें मुलांना प्रथम परिचय यांचाच होतो. चिऊताईच्या गोष्टी त्यांना आवडतात. चिमणीजातीच्या पक्ष्यांना चार बोटें असून त्यापैकीं पुढें तीन व मागें एक असतें.

**चिराईत वर्ग**— [जेंटिआनासिई]. किराईत पहा. अविभक्त पुष्पकोषयुक्त द्विदल वनस्पतींचा एक वर्ग. यामध्यें बहुतेक एकवर्षायु व बहुवर्षायु वानस्पतिक रोपें आहेत. यांचीं पानें बहुधा समोरासमोर व बहुतेक टोंकदार पण सबंध अशीं असतात. यांचीं फुलें पिवळीं, तांबडीं, निळीं किंवा पांढरीं असतात. हीं सर्व रोपें बहुतेक कडू असतात. या वर्गांत सुमारें ८०० जाती आहेत.

**चिलखत**—वेदकालांतहि चिलखतें होतीं. चिलखतास 'अत्का' हा शब्द ऋग्वेदांत आढळतो. दुसरा 'द्रापी' हा आढळतो. सायणाचार्यांच्या मतें द्रापी म्हणजे 'कवच' होय. 'वर्मन्' हा शब्दहि ऋग्वेदांत चिखलत या अर्थी असलेला आढळतो. तें कशाचें करीत असत हें अनिश्चित आहे; तथापि तें 'स्यूत' असे. पुढें अयस्, लोह, अथवा रजत् यांच्या चिलखतांचा उल्लेख आढळतो. हीं चिलखतें एखाद्या धातूचीं किंवा कातड्याचीं केलेलीं असावींत. भारतीय युद्धांत कवच घातलेल्या पदातींचेंहि वर्णन आहे. कवच म्हणजे चिखलत होय.

मुसलमानी अमलांत ढाल व चिखलत यांचा नेहमीं उपयोग करीत असत. मराठ्यांच्या अमलांतहि त्यांचा उपयोग सर्व योद्धे करीत असत. त्या काळीं कापूस, रेशीम, कातडें व लोखंडाच्या कड्या, इत्यादि पदार्थ चिलखत करण्याच्या कामीं वापरले

जांतं असत. शिवाजीनें अफझुलखानास मारलें त्या वेळीं त्याच्या अंगांत ' जरी कुडती ' चें चिलखत होतें.

लढाईंत ज्या घोड्यांवर किंवा हत्तींवर योद्धे बसत त्या

घोड्यांना व हत्तींनाहि कातड्याचें किंवा लोखंडाचें चिलखत घालण्याची चाल प्राचीन व मध्ययुगीन कालांत बहुतेक देशांत असे. योध्याच्या दर्जाप्रमाणें त्याचें चिलखतहि निरनिराळ्या वस्तूंचें असे. अगदीं सामान्य शिपायाच्या अंगांत आंत कापूस भरलेलें, तर जरा वरच्या अधिकाऱ्याच्या अंगांत आंत कातडें असलेलें चिलखत असे. कांहीं सबंध अंगाचीं असत तर कांहीं बिनबाह्यांचीं असत. रेशमाची लडी एकांत एक गुंतवून त्यांना सोनेरी तारांनीं वरील जाड कापडाशीं एकजीव करूनहि एखादें चिलखत बनवीत. शिवाजीची जरीची कुडती अशीच आहे.

मध्ययुगाच्या सुमारास चिलखतांत बरीच सुधारणा झाली. नॉर्मन लोकांनीं इंग्लंड जिंकलें त्या काळीं सरदाराचा लष्करी पोषाख म्हणजे एक चिलखत, शिरस्त्राण, ढाल व तरवार यांनीं युक्त असे. तत्कालीं चिलखत गुडघ्यापर्यंत असे व तें कातड्यावर अनेक कड्या शिवून केलेलें असे. त्यास नॉर्मन लोक हॉचर्क असें म्हणत असत. रिचर्ड दि लायन-हार्टेड हा नखशिखांत चिलखत वापरीत असे. पुढें बंदुकीचा उपयोग जास्त होऊं लागला व लष्करी डावपेंच व लांबच्या मजला मारणें ही युद्धांतील महत्त्वाची बाब होऊन बसली; त्यामुळें अवजड चिलखताची फारशी जरूरी भासूं लागली नाहीं.

अर्वाचीन युद्धांतून पूर्वीपैकीं फक्त शिरस्त्राण उरलें आहे. हीं धातूचीं शिरस्त्राणें सर्व लढाऊ सैनिक मागच्या महायुद्धांत वापरीत, व त्याबरोबर छातीचें संरक्षण करण्याची वीस पौंड वजनाची धातूची फळी ( ब्रेस्ट प्लेट ) असे. ही फळी खालीं ढुंगणापर्यंत देखील लांबवितां येई. त्यामुळें नाजुक भागांचें संरक्षण होई. तथापि असें अवजड चिलखत फार थोडे योद्धे वापरीत.

**चिलखती गाडी**— सर्व बाजूंनीं, बंदुकीच्या गोळ्या आंत शिरणार नाहींत अशा भक्कम पत्र्यांनीं मढविलेल्या व स्वयंप्रेरित अशा गाडीस चिलखती गाडी म्हणतात. अशा तऱ्हेच्या गाडीची कल्पना फार प्राचीन असून चिनी लोकांत प्राग् ऐतिहासिक कालांत अशा गाड्या उपयोगांत असत. अर्वाचीन काळच्या चिलखती गाड्या मजबूत एंजिन असलेल्या मोटार गाड्यांवर सर्व बाजूंनीं एंजिन व आंतील माणसांसकट सर्वभाग झांकला जाईल अशा रीतीनें लोखंडाचे बंदुकीच्या गोळीस दाद न देणारे पत्रे बसवून तयार करण्यांत येतात. अशा तऱ्हेच्या गाडीवर दोन मशीनगन्स बसविलेल्या असून त्यापासून मुद्दाम ठेवलेल्या फटींतून मारा करतां येतो.

**चिलखती जहाज**— जहाजाचें तोफेच्या माऱ्यापासून संरक्षण करण्यासाठीं त्याला पोलादी पट्टे भोंवताल्न लावतात. या पट्ट्यांची जाडी ३ ते १५ इंचांपर्यंत असते. १८५० पर्यंत ओतीव लोखंड वापरीत. पण पुढें पोलादाच्या पट्ट्या विशिष्ट रीतीनें भक्कम केलेल्या वापरूं लागले.

**चिली**— दक्षिण अमेरिकेंतील एक लोकसत्ताक राज्य. पॅसिफिक महासागराच्या कांठावर हिंदुस्थानांतील कोंकणपट्टीप्रमाणें याची सुमारें २,६०० मैल लांबीची पट्टीच आहे. रुंदी १०० मैलांच्यावर नाहीं. याच्या उत्तरेस पेरू देशाची सरहद्द आहे, दक्षिणेस थेट अमेरिकेच्या दक्षिण टोकापर्यंत चिली पसरला आहे. मॅगेलान्सच्या सामुद्रधुनीच्या पलीकडे असलेला टेराडेल फुएगोचा द्वीपसमुद्र चिलीमध्येंच समाविष्ट होतो. उत्तरेकडील भागांत अरण्यें आहेत. मध्यभाग सुपीक आहे. दक्षिणेकडील जमीन नापीक व ओसाड आहे. ॲंडीज पर्वताची रांग दक्षिणोत्तर जाते. क्षेत्रफळ २,९६,७१७ चौ. मैल. लो. सं. ५०,००,०००. पैकीं बहुतेक रोमन कॅथॉलिक आहेत. खनिज उत्पादनांत नत्र ( नायट्रेट ) हा मुख्य आहे. तांबें व इतर कांहीं धातूहि निघतात. लोकांचा मुख्य धंदा शेती. मुख्य नाणें पेसो हें आहे. दोन विद्यापीठें व एक राष्ट्रीय ग्रंथालय आहे. वीस ते पंचेचाळीस वयापर्यंत सर्व लोकांना लष्करी नोकरी सक्तीची आहे.

१५४० पर्यंत चिलीमध्यें आरौकॅनियम इंडियन लोक स्वातंत्र्य उपभोगीत होते. त्यानंतर सुमारें ३०० वर्षें चिली स्पेनकडे होता. १८१० मध्यें स्वतंत्र झाला. परंतु १८१८ पर्यंत ८।९ वर्षें त्याबद्दल त्याला लढावें लागलें. १८१८ मध्यें त्याचें स्वातंत्र्य मान्य करणें स्पेनला भाग पडलें. १९२९ मध्यें चिली आणि पेरू यांच्यांत टॅकना आणि अरिका या दोन भागांबाबत झगडा सुरू झाला. १९२९ मध्यें याबाबत तडजोडीचे प्रयत्न होऊन निकाल करण्यांत आला. या नव्या तडजोडीप्रमाणें टॅक्ना भाग पेरूला देण्यांत आला आणि अरिका भाग चिलीकडेच राहिला. १९३० नंतर मजुरांची अनेकदां दंगल झाली. १९४२ त चिलीनें जर्मनीचे व त्याच्या दोस्तांचे संबंध तोडून टाकले.

**चिलीम**—चिलीम सामान्यतः मातीची तयार करून भाजून पक्की करण्यांत येते. लांकडाच्या किंवा दगडाच्याहि चिलमी तयार करण्यांत येतात. तथापि मातीच्या चिलमी स्वस्त असून त्यांचाच प्रचार अद्यापिहि फार मोठ्या प्रमाणावर आढळतो. इंग्लंडमध्यें बारीक पांढऱ्या चिकणमातीच्या चिलमी तयार करण्यांत येतात. तसेंच मीरशॉम नांवाच्या एका दगडापासूनहि चिलमी तयार करण्यांत येतात. हा दगड मग्नयुक्त (मॅग्नेशियम) असून नरम व चिकट असतो व हातास तेलकट लागतो. निरनिराळ्या जातींच्या हीथ झाडांच्या मुळापासूनहि चिलीम तयार करण्यांत येते. तिला एखाद्या लांकडाचें पुढें बोंड (तोंड) बसविण्यांत येतें व मागें हस्तीदंत, अंबर किंवा एखाद्या हाडाचा तुकडा तोंडात धरण्याच्या जागीं बसविण्यांत येतो.

हुक्क्याच्या चिलमी निरनिराळ्या प्रकारच्या बनविण्यांत येतात. त्यांत मातीप्रमाणें धातूच्याहि चिलमी असतात. हुक्क्यास लांब नळी लावलेली असते व तींत पाण्यांतून धूर ओढून घेतला जातो. त्यामुळें त्यांतील अनिष्ट गुणधर्म धुरांत येत नाहींत.

**चीज**—हा दुधापासून केलेला महत्त्वाचा खाद्यपदार्थ आहे. दुधांत शेंकडा ३ किंवा ४ या प्रमाणांत दुग्धसत्त्व (केसीन) असतें तें यांत उतरतें. विरजलेल्या दुधांतून पाणी काढून टाकतात व तें घट्ट करतात; नंतर मीठ लावून दाबांत टाकतात. म्हणजे चीजच्या वड्या पडतात. या पदार्थाचे स्टिल्टन, चेशायर, चेडुर, विल्टशायर, वगैरे किती तरी प्रकार आहेत. अमेरिकेंत चीज करण्याचे मोठमोठे कारखाने आहेत. गाईच्या दुधाप्रमाणेंच शेळ्या-मेंढ्यांचेंहि दूध चीज करण्यास वापरतात. हा पदार्थ चांगला पौष्टिक आहे व तो सर्वत्र पाश्चात्यांच्या खाण्यांत आहे.

**चीट**— कालिको पहा.



**चीन**—आशिया खंडांतील अत्यंत जुनाट राष्ट्र. सर्व जगांत याच्याएवढा विस्तीर्ण देश नाहीं. याचें क्षेत्रफळ २९,०३,४७५. चौ. मै.. याचे २४ प्रांत पाडले आहेत. याशिवाय १५,७७,५१७ चौ. मैलांचा अंकित प्रदेश आहे. एकूण क्षेत्रफळ ४४,८०,९९२ चौ. मैल. यांत तिबेट व मंगोलिया यांचाहि समावेश होतो. परंतु हे दोन्ही देश बहुतेक पूर्ण स्वतंत्रच आहेत. (तिबेट व मंगोलिया पाहा). लोकसंख्या सुमारें ४६,००,००,०००.चीनमध्यें तीन मोठ्या नद्या आहेत. या नद्यांच्या मार्गानेंच आज शेंकडों वर्षें चीनचा व्यापार चालला आहे. यांगत्सीकियांग नदी ३२०० मैल लांब आहे. या नदीमुळें देशाचे दोन भागच पडले आहेत. हो हॅंग हो अथवा पीत नदी ही उत्तरेस आहे व सिकियांग ही दक्षिणेस आहे. बहुतेक देश सपाट मैदानांनीं भरलेला आहे. परंतु मध्येंच कांहीं डोंगराळ भाग आहे. एका पर्वतानें चीन व मंगोलिया यांस अलग अलग केलें आहे, तर दुसऱ्या एका पर्वतानें यांगत्सीकियांग व हो हॅंग हो यांचीं खोरीं एकमेकांपासून अलग केलीं आहेत. नानकिंग हें राजधानीचें ठिकाण आहे. गेल्या महायुद्धांत चुंगकिंग ही राजधानी केली होती. पेकिंग ही जुनी राजधानी अत्यंत मोठें शहर आहे. शांघाय, टिएन्स्टिन, कांगचौ (कॅन्टन) हीं आणखी तीन प्रसिद्ध शहरें चांगलीं व प्रमुख बंदरें आहेत. पाश्चात्य राष्ट्रांच्या चीनशीं झालेल्या तहान्वयें किती तरी बंदरें व कित्येक ठिकाणीं स्वतंत्र जागा व्यापाराकरितां खुल्या ठेवण्यांत आलेल्या आहेत व कित्येक पाश्चात्य राष्ट्रांना खास सवलती बऱ्याच मिळाल्या आहेत. १९२७ पासून या स्वतंत्र जागांपैकीं कांहीं चीनकडे परत करण्यांत आल्या आहेत आणि कित्येक परत होण्याबद्दल वाटाघाटी चालू आहेत. चीनमध्यें मुख्यत्वेंकरून तांदूळ व इतर धान्यें बरींच पिकतात; परंतु त्यांचा खप बहुतेक देशांतल्या देशांतच होतो. जावक होणारा माल म्हणजे मुख्यतः रेशीम व रेशमी कपडा. रौप्य चलनपद्धति असून टेल व डॉलर हीं नाणीं आहेत. देशांत बौद्ध, कन्फ्युशिअस, ताओ, वगैरे धर्मग्रंथ व त्यांचे मिश्रणात्मक भेद आहेत.

चीनमधील समाजाची पितृसत्ता व पितृपूजा या दोन तत्त्वांवर उभारणी झाली आहे. चीनचा पाश्चात्य संस्कृतीशीं जसजसा संपर्क अधिक येत चालला त्या त्या मानानें चीनमध्यें नवीन नवीन कल्पना उदयास येत चालल्या व प्राचीन चालीरीतींविरुद्ध नवीन पद्धतीनें शिकलेल्या लोकांनीं बंडें करण्यास सुरुवात केली. युरोपियन व अमेरिकन मिशनऱ्यांनीं चीनमध्यें पुष्कळ शिक्षणसंस्था काढल्या व त्यामुळें चीनमधील समाजाच्या मूलभूत तत्त्वावर आघात होऊं लागले. तरी पण एकंदरीनें चीनमधील मागासलेल्या समाजांत पूर्वीच्याच भावना अद्यापि

खिळून आहेत. अद्यापिहि बहुतेक चिनी लोक आपलें राष्ट्रीय पंचांगच वापरतात. चीनमध्यें मोफत व सक्तीचें शिक्षण, लष्करी शिक्षण, इत्यादि गोष्टी प्रचारांत आल्या आहेत. तथापि यांचा अमल फारसा होत असलेला आढळत नाहीं. स्त्रियांच्या सुधारणेसाठीं जी चळवळ १९१२ मध्यें सुरू करण्यांत आली ती जरी बरीच फैलावली असली तरी सामान्य जनता अद्यापिहि स्त्रियांच्या सुधारणेच्या बाबतींत उदासीनच आहे.

बौद्धधर्म— बौद्धधर्म चीन देशांत केव्हां सुरू झाला हें नक्की सांगतां येत नाहीं. तरी अशी दंतकथा आहे कीं, बादशहा मिंगती (इ.स. ५८–७६) याला स्वप्नांत सोन्याच्या रंगाचा मनुष्य दिसला; तेव्हां बादशहाच्या एका बंधूनें हा मनुष्य म्हणजे साक्षात् शाक्यमुनि बुद्ध असावा असें अनुमान काढलें. यावरून बौद्ध धर्माची माहिती चिनी लोकांस अगोदरपासून झाली असली पाहिजे असा तर्क चालतो. तरी इ. स. पूर्वी २१७ या वर्षी बौद्धधर्माचा शिरकाव चीन देशांत झाला असावा. कारण त्या वेळीं कांहीं शामन धर्मप्रसारकांना कैदेंत टाकलें होतें. पण एवढें खरें कीं, मिंगतीच्या स्वप्नापासून बौद्धधर्माला विशेष मान मिळूं लागला. इ. स. ६५ त १८ लोकांचें एक धर्ममंडळ पाठवून खोतानमध्यें या धर्माची माहिती मिळविली व ६७ त हें मंडळ बौद्धग्रंथ, मूर्ती व काश्यप मदंग नांवाचा भिक्षु यांसह परत आलें. चौथ्या शतकानंतर चिनी लोक भिक्षू होऊं लागले. पुष्कळ भिक्षू हिंदुस्थानांत जाऊं लागले. ४०१ सालीं कुमारजीव हा गावोसिंग बादशहाच्या दरबारीं येऊन राहिला. ४०५ सालीं हा आचार्य झाला व यानें बौद्धग्रंथावर टीका लिहिल्या. ५१० त बोधिधर्म (चिनी याला टामो नांवानें ओळखतात) हा कँटन शहरीं बौद्ध आचार्यांच्या पवित्र पात्रासह आला. हळूहळू बौद्धधर्माची छाप चांगली बसली. ११ व्या शतकाच्या नंतर बौद्धधर्म सुरळीत चालू झाला व सध्यां सर्व चीनभर त्याचा प्रसार झाला आहे. पहिल्या शतकांत कनिष्काच्या वेळेस महायान व हीनयान असे दोन प्रकार झाले. चीन देश पहिल्या प्रकारांत येतो. महायानांत मूलतत्त्वें कायम ठेवून इतर सुधारणा करण्यांत आली.

चीनमध्यें वरील देशी धर्मीयांखेरीज खिस्ती व मुसलमान बरेच आहेत. मुसलमानांची संख्या ४ कोटी ८० लक्ष आहे व त्यांच्या देशांत ४२,८०० वर मशिदी आहेत. रोमनकॅथॉलिक पंथ तीन शतकांपासून आहे. प्रॉटेस्टंट पंथ १८०७ सालापासूनचा आहे. प्रॉटेस्टंट मिशनऱ्यांची १९३४ सालीं १९ कॉलेजें आणि २६७ दुय्यम शाळा होत्या. चीनमध्यें ६ ते १२ वयापर्यंत मुलांना शिक्षण सक्तीचें आहे. १९४५ सालीं चीनमध्यें उच्च शिक्षणाच्या १४५ संस्था होत्या व त्यांतून सुमारें ८०,००० विद्यार्थी शिकत होते.

लष्करी नोकरी सर्वांना ठराविक वर्षे करावी लागते. त्यामुळें देशांत युद्धाच्या काळीं ५० लाखांपर्यंत राष्ट्रीय सेना उभारणें जड जात नाहीं.

चीन हा जगांतील अत्यंत जुनाट देश असून त्याच्या राज्यकर्त्यांत किती तरी घराणीं होऊन गेलीं आहेत. शेवटचें मांचू घराणें १९०२ सालापर्यंत होतें. १९०२ पासून चीन लोकसत्ताक झाला. १९२७ पर्यंत सर्व कारभार जुनी राजधानी पेकिन येथूनच चालत असे. परंतु १९२७ सालीं दक्षिण विभागांतील धुरीणांनीं नानकिंग हें राजधानीचें ठिकाण केलें. पण युद्धकाळांत राजधानी चुंगकिंगला नेण्यांत आली होती. राज्यकारभार चालविण्याकरितां ५ मंडळें निर्माण केलीं आहेत: आधिकारी, कायदेकारी, न्यायविषयक, शिक्षण आणि व्यवस्था व देखरेख. चँग–कै–शेक हा १९२८ सालीं अध्यक्ष म्हणून निवडला गेला. उत्तर भागांतील लोकांना ही दाक्षिणात्यांची व्यवस्था आवडली नाहीं व देशांतील यादवी संपली नाहीं व ती अद्यापहि चालूच आहे. नानकिंग सरकारनें बरीच सुधारणा केली; परंतु एकंदरींत सर्व ठिकाणीं संघटनात्मक कार्याचा जम बसला नाहीं व या अंतर्गत यादवीच्या परिस्थितीमुळें जपानचा देशांत जास्त शिरकाव झाला व जपाननें मांचुकोचें स्वतःच्या हातांतील बाहुलें असें एक नवीन राज्य निर्माण केलें (१९३२). जपाननें चीनवर सर्व बाजूंनीं चाल करून, अनेक शहरें वगैरे पाडाव केलीं. सर्व चीन जपानविरुद्ध एक झाला. व अद्ययावत् शस्त्रास्त्रसामुग्रीनें सज्ज अशी संयुक्त सेना व आघाडी निर्माण करून चँग–कै–शेकचे आधिपत्याखालीं जपानला प्रतिरोध केला. दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर १९४१ सालीं चीनच्या राष्ट्रीय सरकारनें दोस्तांची बाजू घेऊन जर्मनी–जपान–इटली यांशीं युद्ध पुकारलें व दोस्त राष्ट्रांचा १९४५ सालीं विजय झाल्यापासून चीन जपानच्या तावडींतून निसटला आहे. तथापि देशांत साम्यवादी (कम्युनिस्ट) पक्षाची बंडाळी जोरांत चालू आहेच, व हा पक्ष लवकरच अधिकारारूढ होईल अशी साधार भीति आहे.

चीनचें पहिलें ऐतिहासिक राजघराणें खि. पू. २२०५ मध्यें याओ शिम आणि यू यांनीं स्थापलेलें सिया घराणें होय. चौ घराणें खि. पू. ११२२ ते २५६ पर्यंत नांदलें. याच्या अमदानींत प्रख्यात तत्त्वज्ञानी कन्फ्यूशिअस आणि लाओत्सु होऊन गेले. इ. स. सातव्या ते दहाव्या शतकापर्यंत चीन हें सत्ता आणि संस्कृति यांच्या शिखरावर अधिष्ठित होतें. १२८० ते १३६८ पर्यंत कुबलाईखानाचें मोगल घराणें सत्ताधीश

चीन— मोंगोलियांतील किरघिजी लोकांचा तळ (पृ. ८०१)

चीन— नान्किग येथील सन-यत्-सेनची समाधि (पृ. ८०२)

होतें, पण त्याला मिंग घराण्यानें शह दिला. पण मिंगचें १६६४ त मांचूनें उच्चाटण केलें. १८३९–४२ या काळांत ग्रेट ब्रिटन आणि चीन यांमध्यें युद्ध होऊन हाँगकाँग ग्रेट-ब्रिटनला मिळालें. १८९५ त जपाननेंहि चीनचा पराभव केला. १९०० च्या बॉक्सर बंडांत चिनी सम्राज्ञीनें परकीयांविरुद्ध बंडवाल्यांना मदत देऊन त्यांना पेकिंग शहरांत कोंडून टाकलें तेव्हां युरोपियन आणि अमेरिकन सैन्यांनीं चाल करून त्यांना सोडविलें व चीनपासून जबरदस्त दंड वसूल केला. चीनचा पहिला राष्ट्रीय पुढारी सन्‌यत्‌-सेन होय. १९१२ सालीं चीन लोकसत्ताक राष्ट्र बनलें. पहिल्या जागतिक महायुद्धांत चीन दोस्तांच्या बाजूस होतें. १९२८ सालीं चँग–कै–शेकनें कुओमिन्टँग या राष्ट्रीय पक्षाची स्थापना करून नान्किंग येथें राजधानी हालविली. १९३१ सालीं जपाननें मांचूरिया चीनपासून घेऊन पुढें सहा वर्षांनीं तेथें स्वतंत्र राज्य निर्माण केलें. १९३७ सालीं जपाननें कांहीं कुरापत काढून चीनशीं युद्ध सुरू केलें. तें १९४५ पर्यंत चाललें होतेंच. दोस्तांच्या हरएक प्रकारच्या मदतीमुळेंच चीनचा बचाव झाला. नाहीं तर जपाननें चीनचे दहा प्रांत काबीज करून चीनच्या सरकारला पश्चिमेकडे कोपऱ्यांत ढकललें होतें.

पण दुसरें महायुद्ध संपल्यानंतर लवकरच चीनमधील कम्युनिस्ट पक्षानें मोठी उचल खाऊन राष्ट्रीय चिनी सरकार उलथून पाडण्याची मोहीम सुरू केली. पेपिंग, नानकिंग, शांघाय, हीं मोठीं शहरें काबीज केलीं. त्यांच्याशीं तहाचें बोलणें लावण्यासाठीं चॅग–कै–शेकनें अधिकारत्याग करून शांततावादी पक्षाला तहाची संधि दिली. पण तहाचीं बोलणीं फिसकटून माओत्सुंगच्या कम्युनिस्ट सरकारनें प्रदेश जिंकीत जाण्याचा सपाटा लाविला आहे.

चिनी भाषा— ही भाषा बोलण्याची भाषा व लिहिण्याची भाषा या दोन पृथक् सदरांखालीं पडते. पाश्चात्य भाषा व बऱ्याचशा प्राच्य भाषा यांत बोलण्याची व लिहिण्याची भाषा एकच असल्यामुळें असा फरक करण्याचें कारण पडत नाहीं. पण चीनमध्यें या दोन भाषा बऱ्याच भिन्न आहेत.

बोलण्याची भाषा ही सर्वत्र एक नसून तिचेहि अनेक पोटभेद आहेत. तथापि या सर्व पोटभाषा मूळ एकाच भाषेपासून निघाल्या आहेत. आणि शिवाय लिहिण्याची भाषा ही सर्वत्र एकच असल्यामुळें सर्व चिनी प्रांतांना एकत्र जोडणारें तें मोठेंच साधन आहे.

मंडारिन ही एक प्रमुख पोटभाषा आहे. हिची पेकिंगीज (पेकिंग राजधानीची भाषा) ही महत्त्वाची शाखा आहे. ही भाषा बहुतेक चिनी लोकांना येते. एवढेंच नव्हे तर सरकारी अधिकारी याच भाषेंत एकमेकांशीं बोलतात. कॅन्टनीज भाषा ऐतिहासिक व भाषाशास्त्रदृष्ट्या महत्त्वाची खरीच, पण तिला पेकिंगीज मार्गे टाकिते. चीनमधील सर्व पोटभाषा एकाक्षरी असून त्यांमध्यें फारसे वेगवेगळाले उच्चार नाहींत. कॅन्टनीजमध्यें आठशें-नऊशें उच्चार असून पेकिंगीजमध्यें ४२० पेक्षां जास्त उच्चार नाहींत. मोंगोलियनसंबंध व काळाची धांव यांचा परिणाम होऊन पेकिंगीजमधील उच्चार हळूहळू कमी होत गेले. पण या उच्चारदारिद्र्याचा असा परिणाम झाला कीं, निरनिराळ्या शब्दांचें काम एका उच्चारावर भागवावें लागत आहे. कधीं कधीं एकाच उच्चाराला दहा दहा अर्थ असतात. तेव्हां भाषणाचा अर्थ समजून घेणें फार कठीण जातें यांत शंका नाहीं. या अडचणीला तोड म्हणून अनेक युक्त्या लढविण्यांत आल्या आहेत.

चिनी वाङ्मय — चिनी वाङ्मयामध्यें आपणाला पुढील गोष्टी आढळून येतील :—(१) वाङ्मयास आरंभ अतिशय पुरातन काळीं झाला असून त्याची वाढ आजपर्यंत अव्याहतपणें होत आहे. (२) हें वाङ्मय सर्वांगपरिपूर्ण असून आपणाला या वाङ्मयामध्यें केवळ विषयच नव्हे तर प्रत्येक पोटविषयावर व त्यांतील प्रत्येक निरनिराळ्या मुद्यावर भरपूर लिखाण आढळून येईल, आणि यामुळें एकंदर वाङ्मयाची वाढ फारच अवाढव्य प्रमाणावर झालेली आपणास दिसून येईल. (३) चिनी इतिहासाची कितीहि कसून छाननी केली तरी त्यामध्यें आपणास सत्याचा विपर्यास केलेला क्वचितच आढळून येईल. (४) त्याप्रमाणेंच या वाङ्मयामध्यें फारच शुद्ध व उच्च ध्येय पुढें ठेवल्याचा प्रत्यय येऊन ग्राम्यता व अश्लीलता यांस अजीबात फांटा दिलेला दिसेल.

चिनी भाषेमध्यें चिनी वाङ्मयाचा इतिहास अद्याप कोणीं लिहिलेला नाहीं. परंतु चिनी ग्रंथकार वाङ्मयाचा आढावा काढण्याकरितां अथवा सूची करण्याकरितां या वाङ्मयाचे मुख्यतः चार भाग करतात. यांपैकीं पहिल्या भागांत वेदांगस्वरूपी वाङ्मयाचा अंतर्भाव होतो. या वर्गांत कन्फ्युशियस याचें धर्मशास्त्र, कोश, भाषाशास्त्र व व्युत्पत्ति वगैरे शब्दाभ्यासविषयक ग्रंथ यांचा समावेश होतो. दुसऱ्या भागामध्यें निरनिराळ्या प्रकारचे सरकारी, खाजगी वगैरे इतिहास, चरित्रात्मक, भूवर्णनात्मक व सूचीस्वरूपी ग्रंथ येतात. तत्त्वज्ञान, धर्म, कला व शास्त्रें, ज्ञानकोश व इतर विषयांवरील ग्रंथ तिसऱ्या भागांत येतात व चौथा भाग केवळ काव्याकरितां राखून ठेवलेला असतो.

**चीनची मोठी भिंत**—ही मोठी भिंत सुमारें १५०० मैल लांबीची उत्तर चीनमध्यें आहे. या भिंतीचें पश्चिम टोंक मध्यआशियांतील ओसाड मैदानांत असून पूर्व टोंक पेकिंगनजीक

समुद्राजवळ आहे. ही भिंत खि. पू. २१४ च्या सुमारास बांधण्यास सुरुवात झाली व १६४४ त पुरी झाली. अद्यापि शेंकडों मैल ही भिंत चांगल्या स्थितींत आहे. १०० यार्ड अंतरावर ४० फूट उंचीचे बुरूज आहेत. भिंत १५ ते २५ फूट लांब असून २० ते ३० फूट उंच आहे.

**चीर**—या झाडास इंग्रजींत पाइन म्हणतात. हा मोठा वृक्ष आहे. या झाडापासून राळ तयार करतात व त्यास गंडाविरोझा असें नांव आहे. डेहराडून येथील जंगलखात्याच्या सरकारी कारखान्यांत याचें टरपेन्टाइन तयार होतें. काळ्या राळेचा उपयोग साबण तयार करण्याकडे फार होतो.

**चीरो** (मृ. १९३६)—एक जगत्प्रसिद्ध हस्तसामुद्रिक. याचें बालपण आयर्लंडांत गेलें व शिक्षण लंडनमध्यें झालें. १८९३ सालीं तो अमेरिकेंत जाऊन राहिला. त्यानें एका हिंदु ब्राह्मणाकडून सामुद्रिकविद्या अवगत करून घेतली व तीवर अलोट कीर्ति व पैसा मिळविला. त्यानें ४० वर्षें युरोप आणि अमेरिका या खंडांत आपला फलज्योतिषी व्यवसाय मोठ्या सन्मानानें चालविला. त्याचीं भविष्यें खरीं ठरत. इंग्लंडचा राजा सातवा एडवर्ड, रशियाचा झार, ऑस्कर वाइल्ड, इ. च्या संबंधांत हा अनुभव आला. पण त्याच्यावर पैशाच्या अफरातफरीबद्दल खटले होऊन कांहीं काळ त्याला तुरुंगवासहि झाला होता. त्याचें खरें नांव जॉन ई वॉर्नर होतें. मृत्युसमयीं लोकांचा त्याच्यावरील विश्वास उडाला होता.

**चुकचि**—आर्क्टिक महासागर व बेरिंग समुद्र यांच्या किनाऱ्यावरील सैबेरियाच्या अगदीं पूर्वेकडील प्रदेशांत राहणाऱ्या मंगोल महावंशाचे लोक. हे उंच व सडपातळ असून यांचे चेहरे ओबडधोबड आहेत. ते अमुर नदीच्या कांठच्या प्रदेशांतून आले असावे असें म्हणतात. मानवशास्त्रदृष्ट्या ही जात म्हणजे मंगोल व अमेरिकेंतील इंडियन महावंश यांना जोडणारा दुवा म्हणतां येईल.

चुकचि लोकांत म्हातारे व पंगू यांना ठार मारण्याची चाल आहे. पुनर्जन्मावर त्यांचा विश्वास आहे; परंतु आकस्मिक मरणामुळेंच तो प्राप्त होतो असा त्यांचा समज आहे. व याकरितांच आईबापांना ठार मारणें हें मातृपितृप्रेमाचें चिन्ह मानलें जातें. हे लोक नांवाला खिस्ती संप्रदायाचे आहेत. परंतु बळी देण्याची चाल या लोकांत आहे. ते प्रेतांचें दहन करतात अथवा तीं गिधाडांकडून खाववितात.

**चुका**—[ वर्ग–पॉलिगोनासी. रूमेक्स असिटोसा ]. याचा देंठ उभा असतो. हीं रोपें दीड ते दोन फूट उंच वाढतात. याला थोडेशीं बाणासारख्या आकाराचीं पानें असतात. मेंढ्यांचा चुका ( आर. असिटोसेला ) जरा लहान असतो. लाकडी चुका ही निराळ्याच जातीची वनस्पति आहे ( ऑक्झालिस ). ही भाजी बारा मास होते. गुल्म, अग्निमांद्य, आमवात वगैरेवर चुका औषधी आहे. धोत्र्याच्या विषावर उतारा आहे.

**चुंगकिंग**— हें चीनमधील यांगत्सीकिआंग नदीवरील खुलें बंदर असून देशी व परदेशी मालाच्या व्यापाराचें मोठें केंद्र आहे. मोठाल्या बोटी या बंदरापर्यंत जाऊं शकत नाहींत, त्यामुळें जहाजांतून वाहतूक चालते. लो. सं. १०,२६,७९४ आहे. दुसऱ्या महायुद्धांत दहा वर्षें ही चीनची राजधानी होती.

**चुंग क्काई लुई, डॉ.**— एक चिनी शास्त्रज्ञ महिला. गेल्या महायुद्धांत हिनें अणुबाँबसंबंधीं प्रयोग करून कांहीं शोध लाविले. त्यामुळें अमेरिकेनें संयुक्त संस्थानांच्या कॉंग्रेसनें तिला अमेरिकेंतच राहण्याची विशेष परवानगी दिली. तिच्या संबंधीं मुद्दाम एक बिल पास करून घेण्यांत आलें; याचें कारण तिच्याजवळ अशी माहिती होती कीं, जी एखाद्या शत्रुराष्ट्रानें तिला उघड करण्यास लाविली तर मोठा अनर्थ होईल.

**चुटका**—( एपिग्रॅम ). चुटके हा एक चुरचुरीत काव्याचा प्रकार आहे. यांत विनोद, कोट्या किंवा एखाद्या कल्पनेला कुशलतेनें घातलेली सुंदर मुरड आढळून येते. यांत विरोधालंकार दिसतो व गंमत वाटते. ग्रीक लोकांना अशा चुटक्यांची फार आवड असे. तेव्हां त्यांचे अनेक संग्रह तयार झाल्यास नवल नाहीं. मार्शिअल ( सु. ३८–१०३ ) या ग्रीक कवीचीं अशा चुटक्यांचीं चौदा पुस्तकें असून त्यांत दहाबारा हजारांवर कविता सांपडतील. पुढें इंग्लंडमध्यें पोप कवीनें या काव्यप्रकाराचा चांगला अवलंब केला. बायरन आणि मूर यांनीं ही परंपरा चालू ठेविली, फ्रान्समध्यें मारोत व व्होल्टेर, जर्मनींत शिलर आणि गटे यांची याबाबतींत ख्याति आहे.

संस्कृतांत अशा प्रकारचीं अनेक सुभाषितें आहेत. मराठींत अर्वाचीन कवी नियतकालिकांतून कधीं कधीं असे कवितांचे चुटके प्रसिद्ध करतात.

**चुडा ( संस्थान )**—मुंबई इलाख्याच्या काठेवाड प्रदेशांतील एक संस्थान. याचें क्षे. फ. ७८ चौ. मैल. यांत एक गांव व १३ खेडीं यांचा समावेश होतो. हें तिसऱ्या दर्जाचें संस्थान असून वढवाण संस्थानाची एक शाखा आहे. १८०७ मध्यें इंग्रजांचा या संस्थानाशीं संबंध जडला. येथील राजास ठाकूर म्हणतात. आतां हें संस्थान काठेवाड संघराज्यांत विलीन झालें आहे.

चुडा संस्थानचें मुख्य ठिकाण चुडा हें भावनगर-वढवाण या आगगाडीच्या फांट्यावरील एक स्टेशन आहे.

**चुडा**—एक भंगी जात. चूडांत हिंदू ( सु. ८ लक्ष ), मुसलमान ( सु. ४॥ लक्ष ) व शीख ( सु. ५५ हजार ) असे

तीन धर्मपंथ आहेत. आतां बरेच ख्रिस्ती झाले आहेत. ते भंग्याचा धंदा करितात म्हणून हिंदु समाजांत त्यांचा दर्जा कनिष्ठ आहे. आजकाल शेतकीचा धंदाहि करूं लागले आहेत. त्यांच्यांत एका श्रेष्ठ आचार्याची उपासना करण्यांत येते. या आचार्याला बालाशहा, लालबेग, वाल्मिक वगैरे नांवें आहेत. यांच्यांत देवळें नसून एक घुमटाच्या आकाराचा मातीचा ढीग करितात व त्यांत पंत्या लावण्याकरितां कोनाडे ठेवितात. मृतांना पुरण्यांत येतें.

**चुडामण**—जाटांचा एक शूर पुढारी. औरंगजेबाच्या दक्षिणेंतील मोहिमेंत त्याच्या सैन्यांतील खजिना लुटून आग्र्यापासून चौदा कोसांवर असलेला भरतपूरचा किल्ला यानें या लुटींतील कांहीं भाग खर्च करून बांधला. भरतपूरचे हल्लींचे जाट राजे हे चूडामणचे वंशज होत. महंमदशहा व सय्यद अबदुल्लाखान या उभयतांमध्यें झालेल्या लढाईत चूडामण सय्यदाच्या बाजूस होता. मुलांशीं भांडण होऊन यानें १७२३ मध्यें आत्महत्या करून घेतली.

**चुनखडी**—प्राचीन महासागराच्या तळाशीं जे सेंद्रिय प्राण्यांचे अवशेष असतात त्यांच्या निक्षेपापासून जे खडक तयार होतात ते गाळाचे खडक होत. त्या खडकांच्या जातींतीलच चुनखडीचे खडक आहेत. पृथ्वीच्या पृष्ठभागावर हे खडक असंख्य आहेत. चुनखडींत खटकर्बित (कॅल्शियम कार्बोनेट) स्वाभाविकच असतो. शुद्ध चुनखडी पांढरी असते. पण तींत लोहसंयुक्तें किंवा इतर अशुद्धें मिसळलीं असलीं तर तिचा रंग तांबडा, हिरवा, निळा, इ. बनतो. खडू, डोलोमाईट (मॅग्नेशिया-चुनखडी), संगमरवर, इ. इमारतींना लागणाऱ्या वस्तू चुनखडीचे प्रकार होत.

**चुनडी**—(गार्नेट). हें एक खनिज द्रव्य असून तें लोह, खट, मग्न किंवा लोह, स्फट, क्रुम या मुख्य धातूंचें संयुक्त असतें. अलमंडाईन ही लोहस्फटयुक्त चुनडी असून तांबड्या रंगाची असते. ही अर्धपारदर्शक असल्यास हिची रत्नांत गणना करतात. तसेंच पायरोप ही मग्नयुक्त व स्फटयुक्त असून तिचीहि रत्नांत गणना करतात. ही बोव्हेमियांत आढळते. सिलोनमध्यें आढळणारा 'दालचिनीचा दगड' यास ग्रोसुलराइट म्हणतात. याचा रंग पिवळा किंवा तांबडसर पिंगट असून तो खटस्फटयुक्त असतो. युव्हरोव्हाइट ही खट-क्रुम यांची संयुक्त असून तिचा रंग पाचेसारखा हिरवा असतो. हा दगड कठिण असल्यामुळें याची रत्नांत गणना करतात.

**चुना**—चुनकळी किंवा खटप्राणिद (ऑक्साइड ऑफ कॅल्शियम) हें स्वतंत्रपणें सांपडत नसून क्षाराच्या रूपानें कर्बिक-गंधिक-स्फुरिक प्राणिदांशीं संयुक्त असलेल्या चुन्याचे मोठमोठे खडक किंवा पर्वतहि बनलेले आहेत. समुद्राच्या किंवा इतर पाण्यांत कर्ब किंवा गंधक यांच्याशीं मिसळलेला चुना सांपडेल. मातींतून आणि खनिजांतूनहि हा प्राणी असतो. आणि कांहीं जळशेवाल वनस्पती यांच्या काठिण अवयवांच्या घटनेला चुना अत्यावश्यक असतो. चुनखडी भाजून चुना तयार करतात. यावर पाणी टाकल्यास उष्णता आणि वाफ निघून चुना विरतो. चुन्याशीं हरा(क्लोरिन)चा संयोग होऊन विरंजक (ब्लीचिंग) पूड तयार होते. धातु-शोधन, शेतकी, कातडीं कमावणें, रसायन व औषधि या कामीं चुन्याचा फार उपयोग होतो. रंगासाठीं तर हा नेहेमीं वापरण्यांत येतो.

**चुनार**—संयुक्त प्रांत, मिर्झापूर जिल्ह्यांतील एक तहसील व शहर. या तहशिलींतून गंगा नदी वाहते व चुनार शहर गंगेच्या कांठींच आहे. लो. सं. सु. दहा हजार. येथील किल्ला फार जुना व प्रसिद्ध आहे. हा प्रथम पृथ्वीराजाच्या ताब्यांत होता व नंतर मुसलमानांकडे आला. हा हुमायून आणि अकबर यांनीं जिंकून घेतला होता. पुढें अयोध्येच्या नबाबाकडून बक्सारच्या लढाईनंतर तो इंग्लिशांकडे गेला. येथें त्रिंबकजी डेंगळे यास मरेपर्यंत कैदेंत ठेवलें होतें.

**चुंबकप्रेरणा**—(मॅग्नेटोमोटिव्ह फोर्स). ज्याप्रमाणें विद्युन्मंडलामध्यें विद्युत्गतिशक्ति असते त्याप्रमाणें चुंबकमंडलामध्यें जी शक्ति असते तीस चुंबकगतिशक्ति किंवा चुंबकप्रेरणा असें म्हणतात. ही एक चुंबकशक्तीची अंगभूत रेषा असते. ही शक्ति जेव्हां विद्युत्प्रवाहापासून उत्पन्न होते तेव्हां ती ॲम्पीअरमंडलामध्यें मोजतात. म्हणजे जितक्या ॲम्पीअर शक्तीचा विद्युत्प्रवाह असेल त्याला तितक्या वेळां त्याचा चुंबकमंडलाशीं संबंध येईल तितक्या अंकांनीं गुणिलें असतां ही चुंबकप्रेरणा येते. विद्युत्-मंडलामध्यें विद्युत्प्रवाह = विद्युत्गतिशक्ति ÷ प्रतिबंध किंवा किंवा विद्युत्रोधकता. याचप्रमाणें चुंबकमंडलामध्यें चुंबकप्रवाह= चुंबकगतिशक्ति ÷ प्रतिरोध.

**चुंबकमापक**—(मॅग्नेटोमीटर). पृथ्वीच्या चुंबकत्व शक्तीच्या घटकांपैकीं क्षितिजसमांतर घटकाची शक्ति मोजण्याच्या यंत्रास चुंबकमापक असें म्हणतात. यासंबंधीं प्रयोग केले असतां त्यामध्यें दोन प्रकारचें निरीक्षण करावें लागतें : (१) चुंबक दंड एखाद्या चुंबक सूचीजवळ नेला असतां त्या सूचीचें जें परिवर्तन होतें तें. (२) त्या चुंबक दंडाच्या हेलकाव्याचा काल.

**चुंबकशास्त्र**—ज्या वस्तूमध्यें चुंबकीय धर्म असतात त्या वस्तूस चुंबक असें म्हणतात. हे चुंबकीय धर्म कसे उत्पन्न होतात आणि चुंबकाचे धर्म कोणकोणते असतात या गोष्टींचा या शास्त्रांत अभ्यास केलेला असतो. सर्व पदार्थांमध्यें जोराची

चुंबकशक्ति प्रेरित केली असतां चुंबकीय गुणधर्म उत्पन्न होऊं शकतात. परंतु हे गुणधर्म विशेष अंशानें लोह, पोलाद, निकेल, कोबाल्ट, लोहचुंबकाश्म आणि ह्यूस्लरची मिश्र धातू म्हणजे तांबें, मॅंगॅनीज आणि अल्यूमिनम या तीन धातूंच्या मिश्रणानें बनविलेली मिश्र धातू यांमध्यें हे गुणधर्म बऱ्याच मोठ्या प्रमाणांत असतात. या सर्व पदार्थांस लोहचुंबकीय (फेरोमॅग्नेटिक) असें म्हणण्यांत येतें. इतर पदार्थांमध्यें हा चुंबकधर्म कमी प्रमाणांत असल्यामुळें त्यास क्षीणचुंबक (पॅरॅमॅग्नेटिक) असें म्हणण्यांत येतें. व ज्यांच्यामध्यें हवेपेक्षांहि चुंबकीय धर्म कमी असतो त्यास अचुंबकीय (डायमॅग्नेटिक) असें म्हणण्यांत येतें. आशियामायनरमधील मग्नेशिया नांवाच्या प्रदेशांत प्रथम नैसर्गिक लोहचुंबक अश्म अथवा दगड सांपडला म्हणून त्यास मॅग्नेटाइट हें नांव देण्यांत आलें.

प्रत्येक चुंबकास ध्रुव असतात म्हणजे त्या पदार्थांतील चुंबकीय धर्म विशेषतः त्याच्या टोंकाशीं आढळण्यांत येतो. व त्या टोंकास ध्रुव असें म्हणतात. हे दोन ध्रुव परस्पर विसदृश असतात. वास्तविक चुंबकधर्म चुंबकामध्यें या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सर्वत्र असतो. कारण एका चुंबकाचे दोन तुकडे केले असतां ते दोन स्वतंत्र चुंबक होतात. दोन चुंबक एकासमोर एक आणले असतां समान ध्रुव एकमेकांचें अपसारण करतात व विसदृश ध्रुव एकमेकांस आकर्षण करतात. एक चुंबक घेऊन तो अधांतरीं समपातळींत राहील अशा रीतीनें टांगण्यांत आला तर तो अशा स्थितींत स्थिर राहतो कीं, त्याचें एक टोंक उत्तर ध्रुवाकडे व दुसरें टोंक दक्षिण ध्रुवाकडे असतें. जो ध्रुव उत्तर दिशेकडे असतो त्यास उत्तर ध्रुव असें म्हणतात व दक्षिणेकडे असणाऱ्यास दक्षिण ध्रुव असें म्हणण्यांत येतें. चुंबकीय द्रव्य हें पोलादासारखें कठिण किंवा बिडासारखें नरम असूं शकतें. कठिण पोलादास चुंबकीय गुणधर्म देणें कठिण असतें. परंतु एकदां त्याच्यामध्यें तो गुणधर्म उत्पन्न झाला म्हणजे तो पुष्कळ दिवस टिकतो आणि तो नाहींसा करणेंहि तितकेंच कठिण असतें. अशा तऱ्हेचा पदार्थ कायमचे चुंबक तयार करण्याकरितां वापरण्यांत येतो. नरम लोखंडावर अथवा बिडावर चुंबकीय गुणधर्म लवकर प्रस्थापित करतां येतो; परंतु त्यावरील प्रेरणा काढून घेतल्यास लोखंडामधीलहि चुंबकत्व धर्म लवकर नाहींसा होतो. अशा तऱ्हेचे पदार्थ विद्युत्चुंबक करण्याकरितां व विद्युत्-शक्तीचें शक्त्यंतर करण्याकरितां वापरण्यांत येतात. ज्या पदार्थांमध्यें चुंबकधर्म असतो त्या पदार्थाच्या सभोंवतीं असलेल्या जागेस चुंबकीय क्षेत्र असें म्हणतात. त्या क्षेत्राची शक्ति त्यावर ठेवलेल्या एखाद्या चुंबकाच्या ध्रुवावर विशिष्ट बिंदूशीं जी शक्ति निर्माण होते तीवरून मोजण्यांत येते. चुंबकीय शक्तिरेषा या वक्र असतात व त्या विशिष्ट बिंदूच्या ठिकाणीं असणाऱ्या चुंबकशक्तीच्या दिशेनेंच जात असतात. चुंबकीय क्षेत्रांत एखादा नरम लोखंडाचा तुकडा ठेवला असतां त्यामध्यें चुंबकधर्म उत्पन्न होतो. या क्रियेस प्रवर्तन असें म्हणतात. चुंबकाप्रमाणेंच विद्युत्-प्रवाह आपल्याबरोबर चुंबकक्षेत्र निर्माण करतो.

**चुसान बेटें**—चीनच्या किनाऱ्यानजीक हा द्वीपसमूह आहे. त्यापैकीं चुसान हें सर्वांत मोठें बेट २१ मैल लांब आणि ६९११ मैल रुंद आहे. येथील लोकसंख्या २,५०,००० आहे. या बेटांतील मुख्य शहर टिंग–हे याची लोकसंख्या ३०,००० आहे. भात आणि चहा हीं येथील मुख्य पिकें आहेत. यांगत्सी कँग नदीच्या मुखाजवळ हें बेट असल्यामुळें चुसान बेटाला चीनचा किल्ला मानतात. म्हणून ब्रिटिशांनीं १८४०, १८४१ आणि १८६० सालीं या बेटाचा तात्पुरता ताबा घेतला होता. चुसानच्या पूर्वेस पू–टू या नांवाचें एक पवित्र बेट आहे. तेथें बौद्ध धर्माचीं देवळें, मठ, वगैरे असून तेथील सर्व वस्ती बौद्ध धर्मोपदेशकांची आहे.

**चेक**—ही हुंडीची विलायती पद्धत आहे. हिचे वेगवेगळे प्रकार असतात. धनीजोग (पेअेबल टु दि बेअरर) चेक कोणीहि पेढीवर जाऊन वटवूं शकतो. पण नामजोग (पेअेबल टु दि ऑर्डर) चेकवर ज्याच्या नांवानें तो काढला असेल त्याची सही लागते. रेखांकित (क्रॉस्ड) चेक ज्या पेढीचे असतील ती पेढी ज्याचा नांवाचा तो चेक असेल त्याच्या पेढीला पैसे देते व नंतर खातेदार आपल्या पेढीवरून हे चेकचे पैसे काढून घेतो. असा चेकचा व्यवहार व्यापाराला व मोठ्या देवघेवीला फार सोयीचा असतो. यामुळें चलन नाणीं व्यवहारांत फार कमी लागतात. पैसे सांभाळण्याचे, ते परगांवीं धाडण्याचे, त्याची पावती मिळण्याचे बरेच प्रश्न सहज सुटतात. चेकच्या बाबतींत लबाड्या होऊं नयेत म्हणून बऱ्याच सुधारणा झाल्या आहेत. एका यंत्रानें चेकवर अक्षरें दोन रंगांत काढतात; तीं पुसलीं जात नाहींत. चेकला अग्निरोधक कागदहि नवीन काढला आहे. हुंडी पाहा.

**चेकोव्ह, आन्तोन पाव्हलोव्हिश** (१८६०–१९०४)—एक रशियन कादंबरीकार आणि नाटककार. १८८० च्या मंदीच्या काळांतील अत्युत्कृष्ट लेखक म्हणून हा पुढें आला. प्रथम यानें विनोदी गोष्टी लिहिल्या. पण समाजांत परस्परांसंबंधीं अजाणतां कसे गैरसमज उत्पन्न होतात हें दाखविण्यासाठीं त्यानें कादंबऱ्या–नाटकें लिहिलीं. त्याच्या प्रसिद्ध कादंबऱ्या म्हणजे 'फिलॉसफी ॲट होम्' (घरचें तत्त्वज्ञान), 'सॉरो' (दुःख), 'इन् एक्झाइल' (परागंदा), 'डार्लिंग' (लाडकी), 'टेरिबल नाइट' (भयंकर रात्र), 'दि ब्लॅक मून ॲन्ड आदर

स्टोरीज्' (कृष्णचंद्र व इतर कथा) आणि 'दि किस् ॲन्ड आदर स्टोरीज्' (चुंबन व इतर कथा), इ.. त्याचीं नाटकें प्रसिद्ध आहेत तीं :—'दि सीगल', 'दि चेरीआर्चर्ड', 'दि स्वॉन सॉंग' (हंस गीत) आणि 'दि थ्री सिस्टर्स' (तीन बहिणी). चेकोव्ह याची मनोविश्लेषणात्मक लेखनपद्धति फार चांगली आहे. आणि त्याचें शब्दभांडार तर आश्चर्यकारक आहे. त्याचीं पात्रें वास्तववादी आहेत; तथापि त्याच्या लिखाणांत नैराश्यवाद दिसून येतो.

**चेटूक**—चेटकावरचा विश्वास फार प्राचीन काळापासूनचा आहे व अद्यापि खेड्यापाड्यांतून चेटकें करणारे आहेत असें समजतात. चेटकें करणाऱ्या बहुधा स्त्रिया असतात. त्यांना वाटेल तशीं रूपांतरें करतां येतात असें मानून त्यांची मदत घेणारे किंवा त्यांना टाळणारे थोडेथोडके नसतात. युरोपांत १५ *व्या शतकांपासून अशा चेटक्यांचा नायनाट करण्यांत येऊं* लागला व हजारों चेटकिणींना देहान्तशासन मिळालें. जोन ऑफ आर्कची गोष्ट प्रसिद्धच आहे. या बाबतींतला शेवटला खटला इंग्लंडमध्यें इ. स. १७१२ त होऊन जेन वेनहॅम नांवाच्या चेटकिणीला फांशीं देण्यांत आलें. मराठ्यांच्या अमदानींत चेटकें करणारांना कडक शासन होई. आजहि कोठें कोठें चेटक्या समजून लोकांनीं जीव घेतल्याच्या गोष्टी ऐकूं येतात. जादू, भुतें पाहा.

**चेट्टी**—(सं. श्रेष्ठी). चेट्टी म्हणजे व्यापारी. कित्येक तेलगू व तामीळ व्यापारी आपल्या नांवापुढें चेट्टी हें उपपद लावतात. मद्रास इलाख्यांत यांची वस्ती आहे, कांहीं ब्रह्मदेशांत आहेत. स्थानभिन्नत्वाप्रमाणें चेट्टींमध्यें पोटजाती बनल्या आहेत. त्रावणकोरकडे त्यांच्या ४ मुख्य पोटजाती आहेत: (१) कोट्टर, (२) परक्कायी, (३) एलूर, व (४) अत्तुंगळ. यांचे बरेचसे आचारविचार तामिळ शूद्रांच्याचसारखे आहेत.

**चेट्टी, राजा सर अन्नमलय चेट्टिनाड** (१८८१– )— एक प्रसिद्ध व्यापारी व सावकार. यांचा जन्म नट्टुकोट्टई जातींत झाला. १९१६ मध्यें हे मद्रास कायदेमंडळाचे सरकारनियुक्त सभासद झाले. हे तीन वेळां कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद निवडून आले. हे मुंबईच्या इंडियन मर्चंट्स चेंबरचे सभासद व इंपीरिअल बॅंकेचे गव्हर्नर होते. अन्नमलयनगर (चिदंबरम्) येथें यांनीं अन्नमलय विद्यापीठाची स्थापना वीस लाख रुपयांची देणगी देऊन करविली. यांस १९२९ मध्यें वंशपरंपरा राजा हा किताब मिळाला.

**चेट्टी, फिलॉमेना थंबू** (१९१३— )—फिडल वादनांत जगांत महत्त्व मिळवणारी पहिली हिंदी स्त्री. म्हैसूरच्या महाराजांचे खाजगी कारभारी राजसभाभूषण टी. थंबू चेट्टी यांची ही कन्या. प्रथम म्हैसूरच्या सिस्टर मॉरिस व नंतर स्कूल ऑफ म्यूझिकचे प्रो. पी. एच्. सान्द्रे यांच्याजवळ या वाद्य वाजविण्यास शिकल्या. यांचें पुढील शिक्षण पॅरिसच्या संगीत शाळेंत सुप्रसिद्ध रुमानियन वादक एनेस्को यांच्या हाताखालीं झालें. सन १९३५ मध्यें यांचा पहिला कार्यक्रम लंडनच्या एवोलियन हॉलमध्यें झाल्यावर या लोकांपुढें आल्या. लंडन व ऑक्सफर्ड येथें यांच्या वाद्यवादनाचे अनेक कार्यक्रम झाले व त्यानंतर या हिंदुस्थानांत आल्या.

**चेट्टी, सर आर्. के. षण्मुखम्** (१८९२– )—एक हिंदी पुढारी व अर्थशास्त्रज्ञ; तसेंच कोचीन संस्थानचे माजी दिवाण व मध्यवर्ती *असेंब्लीचे माजी अध्यक्ष* व हिंदी संघराज्याचे *माजी* अर्थमंत्री. यांचें शिक्षण मद्रास ख्रिश्चन कॉलेजमध्यें झालें. १९२० मध्यें हे कौन्सिलांत निवडून आले. १९२२ मध्यें हे *सुधारणामंत्र्याचे चिटणीस होते. मुंबई इलाख्यांतील आणि* संयुक्त प्रांतांतील मद्यपान निवारण करण्याच्या कामीं योजल्या जाणाऱ्या उपायांची चौकशी करण्याकरितां त्यांची सरकारकडून नेमणूक झाली. १९२३ *मध्यें* ते *असेंब्लींत* निवडून आले. १९२४ मध्यें ते इंग्लंडला हिंदुस्थान नॅशनल कन्व्हेन्शनचे सभासद म्हणून जाऊन आले. सप्टेंबर १९२६ मध्यें ते एम्पायर पार्लमेंटरी असोसिएशनच्या शिष्टमंडळावर हिंदी प्रतिनिधि म्हणून ऑस्ट्रेलियामध्यें जाऊन आले. मध्यवर्ती असेंब्लीमध्यें ते कॉंग्रेस पक्षाचे मुख्य प्रतोद होते. जून १९२८ मध्यें जिनिव्हा येथील इंटरनॅशनल लेबर कॉन्फरन्सला येथील कारखान्यांच्या मालकांतर्फे पाठविलेल्या हिंदी प्रतिनिधींचे सल्लागार होते. पुन्हां १९२९ सालीं याच कामाकरितां जिनिव्हा येथें प्रतिनिधि म्हणून गेले. सेंट्रल बॅंकिंग इन्कायरी कमिटीचे ते समासद होते. १९३० मध्यें ते पुन्हां मध्यवर्ती असेंब्लीमध्यें अविरोध निवडून आले व तिचे उपाध्यक्ष झाले. १९३२ मध्यें पुन्हां येथील कारखानदारांचे प्रतिनिधि म्हणून जिनिव्हा येथील इंटर नॅशनल लेबर कॉन्फरन्सला गेले. १९३२ सालीं भरलेल्या ओटावा परिषदेला ते हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि म्हणून गेले. मार्च १९३३ मध्यें ते मध्यवर्ती असेंब्लीचे सर्वानुमतें अध्यक्ष निवडून आले. नंतर १९३८–४१ पर्यंत कोचीन संस्थानचे दिवाण होते. १९४४ त ब्रेटनवुड्स कॉन्फरन्सला हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून गेले होते. १९४८ सालीं कांहीं काळ हिं. सरकारचे अर्थमंत्री होते.

**चेंडूफळी**—एक मैदानी देशी खेळ. दोन दगडांवर एक काठी ठेवून तिला चेंडूनें मारण्याचा हा खेळ आहे. दोन संघांपैकीं एका संघाचा गडी काठीलगत एका बाजूस व विरुद्ध संघाचे गडी दुसऱ्या बाजूस चेंडू किंवा काठी झेलण्यास उभे राहतात,

कोणी काठी किंवा चेंडू झेलला नाहीं तर त्या संघांतील एक गडी बाद होतो. जर झेलला तर दोन्ही संघांचा डाव समान झाला असें समजतात. फेंकणाऱ्याच्या चेंडूनें काठी न पडतां चेंडू झेलला गेला तर चेंडू फेंकणारा मरतो. चेंडू काठीस लागला नाहीं व झेलला गेलाहि नाहीं तर डाव समान झाला. एका संघांतील गड्यानें एकदां चेंडू फेकल्यानंतर दुसऱ्या संघांतील गड्यानें फेकावा. याप्रमाणें एका संघांत एक गडी शिल्लक उरेपर्यंत खेळतात.

**चेतसिंग** ( १७७०–१८१० )—काशीचा एक राजा. इ. १७७० त हा गादीवर बसला. १७७५ त ईस्ट इंडिया कंपनीनें अयोध्येपासून तोडून स्वतंत्र असे राज्य त्याला दिलें. पण हेस्टिंग्जनें याजकडून जुलूमजबरदस्तीनें पैसा काढण्याचा प्रयत्न केला होता. त्यानें चेतसिंगाकडून पन्नास लाख रु. दंड घेण्याचें ठरवून तो वसूल करण्यासाठीं तो स्वतः काशीस गेला; व चेतसिंगाच्या अडथळ्यास न जुमानतां त्यानें त्याला कैद केले. तेव्हां तेथे रण माजून कंपनीच्या दोन तुकड्यांना व त्यावरील अधिकाऱ्यांना चेतसिंगाच्या लोकांनीं कापून काढलें ( २० ऑगस्ट १७८१ ) व राजास सोडविलें. तेव्हां हेस्टिंग्ज हा चुनारच्या किल्ल्यांत दडून बसला. पुढें हेस्टिंग्ज व राजा यांमध्यें बऱ्याच चकमकी झाल्या. हेस्टिंग्जनें राजाचा बराच प्रांत काबीज केला; तेव्हां चेतसिंगानें शिंद्यांचा आश्रय घेतला. शिंद्यानें त्याला इंग्रजांच्या हवालीं केलें नाहीं. तथापि त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत शेवटपर्यंत राजकैदी म्हणून राहावें लागलें. तेथेंच तो मरण पावला.

**चेदि**—अर्वाचीन चंदेल. बुंदेलखंडाचा दक्षिण भाग व जबलपूर( रेवा )चा उत्तरभाग या दोहोंचा चेदि देशांत अन्तर्भाव होतो. हें एक प्राचीन राष्ट्र होतें. शिशुपालानंतर त्याचा मुलगा धृष्टकेतु हा चेदीचा राजा झाला. हा धृष्टकेतु एक अक्षौहिणी सैन्य घेऊन युधिष्ठिराकडे आला होता. पूर्वापार संदर्भावरून तो आग्नेयीस (इंद्रप्रस्थाच्या) होता असे दिसतें. यावरून विदर्भ देशाच्या बऱ्याच पूर्वेस किंवा ईशान्येस चेदि देश होता व त्याच्या पूर्वेस निषध देश होता असें दिसतें. चेदि देशाची राजधानी शुक्तिमती नामक होती.

**चेंबरलेन**—दि लॉर्ड ग्रेट चेंबरलेन ऑफ ग्रेट ब्रिटन हा इंग्लंडच्या राजाच्या अधिकाऱ्यांपैकीं ६ वा अधिकारी आहे. याचीं कामें राज्याभिषेकाच्या वेळीं राजाचा पोषाख करणें, आणि राजाजवळ हजर राहणें; तसेंच वेस्टमिन्स्टर राजवाड्याची काळजीपूर्वक व्यवस्था ठेवणें आणि लॉर्ड ही पदवी देण्याच्या वेळीं हजर राहणें, इत्यादि आहेत. लॉर्ड चेंबरलेन ऑफ दि हाउसहोल्ड ( खाजगी कारभारी ) याचा अधिकार राजघराण्यासंबंधींच्या सर्व कामांवर असतो. रॉयल थिएटर्समध्यें प्रयोग करणाऱ्या नाटक कंपन्यांवरहि त्याचाच अधिकार असतो. शिवाय नाटकांना लायसेन्स देणें, हें कामहि त्याच्याकडेच असतें.

**चेंबरलेन, आर्थर नेव्हिल** ( १८६९–१९४० )—हा ब्रिटिश मुत्सद्दी जोसेफ चेंबरलेन याचा दुसरा मुलगा. त्याचें शिक्षण बार्मिंगहॅम येथील मेसन कॉलेजमध्यें झालें. तो १९१६–१७ मध्यें नॅशनल सर्व्हिसचा डायरेक्टर जनरल होता. आणि १९२२–२३ मध्यें पोस्टमास्टर जनरल आणि १९२३ मध्यें आरोग्यमंत्री होता. १९२३ व १९३१ मध्यें तो चॅन्सेलर ऑफ दि एक्सचेकर ( फडणीस ) झाला. १९३७ सालीं बाल्डविननंतर कॉन्झर्वेटिव्ह पक्षानें त्याला मुख्य मंत्री निवडलें. आपल्या शांततावादी धोरणामुळें त्यानें जर्मनी आणि इटली यांना फार चढवून ठेवलें. शेवटीं त्यांचा वरचढपणा सांभाळणें अशक्य होऊन १९३९ सालीं त्यानें जर्मनीशीं युद्ध पुकारलें. पण त्याला या युद्धाला नीट तोंड देतां येईना. तेव्हां १९४० सालीं त्यानें राजीनामा दिला.

**चेंबरलेन, सर ऑस्टेन** ( १८६३–१९३७ )— हा जोसेफ चेंबरलेनचा थोरला मुलगा. त्याचें शिक्षण केंब्रिज येथील ट्रिनिटी कॉलेजमध्यें झालें. तो १८९२ मध्यें ईस्ट वूर्सेस्टर शायरतर्फे लिबरल युनियनिस्ट पक्षाचा सभासद म्हणून पार्लमेंटमध्यें निवडला गेला. तो १८९५ ते १९०० पर्यंत सिव्हिल लॉर्ड ऑफ ॲड्मिरल्टी, १९०० मध्यें ट्रेझरीचा फायनॅन्शिअल सेक्रेटरी, १९०२ सालीं पोस्टमास्टर जनरल आणि १९०३ मध्यें चॅन्सेलर ऑफ एक्सचेकर ( फडणीस ) झाला. पुढें १९१५ मध्यें कोॲलिशनिस्ट म्हणून अधिकारावर आला, आणि १९१५-१७–हिंदुस्थानचा स्टेट सेक्रेटरी, १९१८–१९–वॉर कॅबिनेटचा सभासद, १९१९–२१–चॅन्सेलर ऑफ एक्सचेकर आणि १९२१ मार्चमध्यें लॉर्ड प्रिव्ही सील आणि हाउस ऑफ कॉमन्सचा लीडर (नेता) झाला. संयुक्त प्रधानमंडळ बरखास्त झाल्यावर त्यानें आपलें अधिकारपद सोडलें; पण पुन्हां १९२४ मध्यें तो परराष्ट्रीय खात्याचा चिटणीस झाला. १९२५ मध्यें त्यानें ब्रिटनतर्फे लोकेर्नो पॅक्टवर सही केली. १९२६ सालचें नोबलपारितोषिक शांततास्थापनकार्यासाठीं त्याला देण्यांत आलें.

**चेंबरलेन, जोसेफ** ( १८३६–१९१४ )— एक ब्रिटिश मुत्सद्दी. हा १८७६ मध्यें बार्मिंगहॅमचा प्रतिनिधि म्हणून पार्लमेंटांत शिरला. ग्लॅडस्टनच्या प्रधानमंडळांत तो बोर्ड ऑफ ट्रेडचा अध्यक्ष आणि कॅबिनेट मिनिस्टर झाला, आणि त्यानें बँक करप्टसी ॲक्ट मंजूर करून घेतला. १८८६ मध्यें तो लोकल गव्हर्नमेंट बोर्डाचा अध्यक्ष होता. परंतु आयरिश धोरणाबाबत त्याचा ग्लॅडस्टनशी मतभेद झाल्यामुळें त्यानें आपल्या जागेचा

राजीनामा दिला. नंतर लिबरल युनिअनिस्ट पक्षाचा तो एक फार वजनदार पुढारी झाला. १८९५ ते १९०३ पर्यंत तो वसाहत-खात्याचा चिटणीस होता. परंतु पुढें आयात-निर्गतीवरील कराबाबत स्वतःचीं मतें स्वतंत्रपणें मांडतां यावीं म्हणून त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. तथापि या मतप्रचार-कार्यांत त्याला अपयश आलें; कारण त्या वेळीं राष्ट्रांतील बहुमताला त्याचें व्यापारसंरक्षणाचें (प्रोटेक्शन) धोरण मान्य झालें नाहीं. १९०६ मध्यें तो फार आजारी झाला आणि पुढें मरेपर्यंत त्याला कोणत्याहि सार्वजनिक कामांत भाग घेतां आला नाहीं.

**चेंबर्स, एफ्रेम** (मृ. १७४०)— संकीर्ण लेखन करणारा एक इंग्रज लेखक. त्याच्या विश्वकोश (सायक्लोपीडिआ) या ग्रंथाची पहिली आवृत्ति १७२८ मध्यें प्रसिद्ध झाली. नंतर या ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या त्याच्या हयातींत निघाल्या. याच सायक्लोपीडिआच्या आधारावर डॉ. आब्राहाम रीस यानें आपला सायक्लोपीडिया हा ग्रंथ रचला.

**चेंबर्स, रॉबर्ट** (१८०२-१८७१)— ऐतिहासिक आणि संकीर्ण लेख लिहिणारा एक स्कॉटिश लेखक. विल्यम अँड रॉबर्ट चेंबर्स या नांवाच्या ग्रंथप्रकाशन कंपनीची स्थापना ज्या दोन भावांनीं केली त्यांपैकीं हा धाकटा भाऊ. 'इलस्ट्रेशन्स ऑफ दि ऑथर ऑफ वेव्हरले', 'ट्रॅडिशन्स ऑफ एडिन्बर्ग' (१८२३), 'पाप्युलर ऱ्हाइम्स ऑफ स्कॉटलंड' (१८२७, स्कॉटलंडचीं लोकमान्य गीतें), 'पिक्चर ऑफ स्कॉटलंड' (१८२७, स्कॉटलंड-दर्शन), 'हिस्टरीज् ऑफ दि स्कॉटिश रिबेलियन्स' (स्कॉटिश बंडांचे इतिहास) हे त्याचे ग्रंथ त्वरित लोकप्रिय झाले. नंतर त्यानें 'स्कॉटिश बॅलड्स अँन्ड सॉंग्ज' (स्कॉटिश गाणीं व पोवाडे), 'बायॉग्रॉफिकल डिक्शनरी ऑफ एमिनंट मेन' (थोर पुरुषांचीं चरित्रें) या ग्रंथांचें संपादन केलें. १८३२ मध्यें त्यानें आपला भाऊ विल्यम याच्या मदतीनें 'चेंबर्स एडिन्बर्ग जर्नल' सुरू केलें. त्याचा अतिशय खप होऊं लागला. तसेंच त्यानें 'सायक्लोपीडिआ ऑफ इंग्लिश लिटरेचर' (इंग्रजी वाङ्मयाचा ज्ञानकोश), 'डोमेस्टिक ॲनल्स ऑफ स्कॉटलंड', 'एन्शट सी-मार्जिन्स', आणि 'बुक ऑफ डेज्' या पुस्तकांचें संपादन केलें. 'व्हेस्टिजेस ऑफ क्रिएशन्' या सुप्रसिद्ध ग्रंथाचा लेखक हाच होता. परंतु ही गोष्ट त्याच्या मृत्यूनंतरहि कांहीं वर्षें अज्ञात होती.

**चेमनिझ**— हें सॅक्सनीच्या लोकसत्ताक राज्यांतील मुख्य शहर व कारखान्यांचें केंद्र आहे. येथें पांढरे व छापील चिटाचें कापड, हातरुमाल, लोकरी व अर्धलोकरी कापड, गिंघम जातीचें रंगीत कापड यांचे कारखाने असून सुताच्या व इतर गिरण्या आहेत. शिवाय रंगकाम, छापील कापड, रंग उतरून शुभ्र



कापड करणें, रासायनिक द्रव्यें, पायमोजे वगैरे होझिअरी माल यांचे कारखाने असून यंत्रसामुग्री करण्याचा महत्त्वाचा धंदा आहे. लो. सं. (१९३९) ३,३४,५६३.

**चेम्सफर्ड, लॉर्ड फ्रेडरिक जॉन** (१८६८- )—एक ब्रिटिश अधिकारी. तो १९०५-१९०९-क्वीन्सलँडचा गव्हर्नर, आणि १९०९-१९१३-न्यू साउथ वेल्सचा गव्हर्नर होता. १९१६ सालीं त्याला हिंदुस्थानचा व्हाइसरॉय नेमण्यांत आलें. याच्या कारकीर्दींत पहिलें जागतिक महायुद्ध संपलें. १९२१ पर्यंत या जागेवर तो होता. याच्याच कारकीर्दींत सेक्रेटरी ऑफ स्टेट मॉंटेग्यू हिंदुस्थानांत येऊन गेला व नंतर या दोघांनीं हिंदुस्थानच्या राजकीय सुधारणांचा खर्डा तयार करून; तो पार्लमेंटनें मंजूर केल्यानंतर १९२० सालापासून त्याची अमलबजावणी केली. या सुधारणा फार महत्त्वाच्या होत्या.

**चेर घराणें**—हें *प्राचीन राजघराणें मलबार किनाऱ्यावर* राज्य करीत होतें. अशोककालीं पांड्य आणि चोल यांच्यासमवेत चेरांचा उल्लेख येतो. याची राजधानी वंजी किंवा करूर असावी व कोंकणाचा भागहि यांच्या राज्यांत समाविष्ट होत असावा. चेर आणि चोल यांच्यात नेहमीं सोयरीक होत असली तरी झगडे होतच. चेरांच्या देशाला तामीळमध्यें चेरळ किंवा केरळ म्हणत. शेंगुत्तुवन व त्याचा मुलगा गजबाहु हे मोठे पराक्रमी राजे होऊन गेले. शेवटचा राजा चेरमाण पेरुमाळ होय (सु. ८२५). चेरांचें आरमारहि होतें.

**चेरमाण पेरुमाळ** (मृत्यु ८३१)— चेर वंशांतील एक राजा. याच्या वेळीं अरबांनीं मलबारवर स्वाऱ्या केल्या व पांड्य राजानें याचें राज्य हिरावून घेतलें; तेव्हां यानें अरबांच्याबरोबर मक्केस जाऊन मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली. हा मुसलमान झाल्यावर याचें नांव अबदुल रहिमान सोमिनी असें होतें. मक्केसच हा वारला. मृत्यूपूर्वीं यानें एक मुसलमान मौलवी धर्मप्रचारासाठीं मलबारमध्यें पाठविला.

**चेरापुंजी**—आसामच्या खासी टेंकड्यांतील एक खेडें. यांत वर्षांत सरासरी ४५८ इंच पाऊस पडतो. याच्याइतका पाऊस जगांत दुसऱ्या कोणत्याहि ठिकाणीं पडत नाहीं. यांत सन १८६१ त ९०५ इंच पाऊस पडला होता व १८७६ त २४ तासांत ४१ इंच पडला होता. येथें उत्तम प्रकारच्या कोळशाची खाण आहे.

**चेरी**—[ प्रूनस सेरासस ]. हें फार शोभिवंत झाड आहे. याकरितां व त्याच्या फळांकरितां हें बगिचांतून लावण्यांत येतें. याच्या लागवडीस आणलेल्या बऱ्याच जाती आहेत. उदाहरणार्थ, तांबडी किंवा बागेंतील, तसेंच तांबडी बदामी (रेड हार्ट), पांढरी बदामी (व्हाइट हार्ट), काळी वगैरे. लागवड केलेल्या

झाडापेक्षां रानांतील झाडाचें फळ लहान असतें. हें झाड प्राचीन काळापासून माहीत आहे. प्लिनि हा प्राचीन ग्रंथकार हें प्रथम पांटस प्रांतांतील सेरासस येथून इटालींत खि. पू. ७० मध्यें ल्युकुलस याकडून आणण्यांत आलें असें म्हणतो. रोमन लोकांबरोबर याचा इ. स. ४६ मध्यें ब्रिटनमध्यें प्रवेश झाला. इंग्लंडमध्यें सध्यां या झाडाच्या निरनिराळ्या नांवांच्या सुमारें शंभर जाती लागवडींत आलेल्या आहेत. विशेषतः केंट परगण्यांतील या झाडांच्या बागा प्रसिद्ध आहेत. या झाडाचें लांकूड कठिण व घट्ट असतें, त्यामुळें कातारी व पेट्या वगैरे करणारे लोक त्याचा फार उपयोग करतात.

**चेरुमन**—मद्रास इलाख्यांतील एक शेतकरी जात. ही विशेषेंकरून मलबारांत आढळते. उत्तर मलबारांत यांना पुलयन म्हणतात. यांच्या चाळिसांवर पोटजाती आहेत; पैकीं कनकन, पुल, एर, टोळी व कुडात या मुख्य आहेत. ब्रिटिश राज्य सुरू होण्यापूर्वी वसुलाच्या बाकीबद्दल गुलाम देण्याची मलबारांत चाल होती. त्या वेळीं चेरुमन गुलाम म्हणून दिले जात असत. वरील जातींकडून ही जात अस्पृश्य गणली जाते. चेरुमन लोकांच्या घरांना चाळ (झोपडी) म्हणतात. चेरुमींचें कटिवस्त्र गुडघ्यापर्यंत देखील नसतें, व वक्षःस्थळ तर उघडेंच असतें. त्यांच्या हाताकानांत मोठमोठीं तांब्यापितळेचीं कडीं असतात.

**चेरो**— ही बिहारमधील जात बरीच प्रसिद्ध आहे. लो. सं. १९,३३७. छोटा नागपूर संस्थानांतहि यांची नऊ हजार वस्ती आहे. हे पूर्वी बिहारमध्यें सत्ताधीश होते, असें कांहीं संशोधक म्हणतात. यांच्या बांधकामाचे अवशेष अद्याप दिसतात. बुद्धगयेंतील एका शिलालेखांत फुदीचंद्राचें नांव आहे. हा चेरो होता. चेरो व सावर या दोघांसहि ब्राह्मण अपवित्र मानतात. मिथिला व मगध देशांत चेरो लोक आढळत नाहींत. आतां ते शहाबाद जिल्ह्यांत मात्र सांपडतात.

यांच्या चेहऱ्याची ठेवण हिंदु रक्ताच्या मिश्रणानें बरीच निवळली आहे. तरी पण यांच्या चेहऱ्यांत मोंगल ठेवण स्पष्ट आहे. यांचा रंग गव्हासारखा असतो. यांच्या गालावरचें हाड उंच असतें, डोळे तिरपे असतात, नाक रुंद व चपटें असतें, व तोंड मोठें व ओठ बाहेर आलेले असतात.

**चेलोटिस**—प्राणवायूचें उत्पादन अधिकाधिक आवश्यक होत चाललें आहे. पण प्रयोगशाळेंत प्राणवायु तयार करण्याची रीत त्रासाची, अधिक वेळाची व अधिक खर्चाची आहे. यासाठीं हवेंतून सरळ एकदम प्राणवायु काढून घेतां येण्याची युक्ति कॅलिफोर्निया विद्यापीठाच्या डॉ. कॉलव्हिन यांनीं शोधून काढली आहे. कर्ब (कार्बन), उज्ज (हैड्रोजन), नत्र (नैट्रोजन) आणि प्राण (ऑक्सिजन) यांच्यापासून एक धातुसदृश्य पदार्थ त्यांनीं बनविला आहे. त्याचा रंग तांबूस आहे. हा पदार्थ हवेंत तापवला कीं तो हवेंत प्राणवायु शोषून घेतो. पुन्हां बंद भांड्यांत तो तापवला कीं त्यांतला शोषून घेतलेला प्राणवायु बाहेर टाकला जातो. या पदार्थास त्यांनीं चेलोटिस असें नांव दिलें आहे.

**चेशायर**—हा परगणा इंग्लंडमध्यें समुद्रकांठाला आहे. याचें क्षे. फ. ६,५२,३८३ आणि लोकसंख्या १०,८७,६५५ आहे. येथील प्रदेश सपाट व सुपीक असून, येथें उत्तम कुरणें आहेत व त्यामुळें येथें चीझ फार मोठ्या प्रमाणांत तयार होतें. येथें मोठमोठ्या बागा आहेत आणि तेथून लिव्हरपूर, मँचेस्टर आणि इतर शहरांत माल जातो. खनिज मीठ आणि कोळसा येथें विपुल सांपडतो. कापसाच्या व कापडाच्या गिरण्या, जहाजें बांधण्याचे कारखाने येथें आहेत. येथें रेल्वे आणि कालवे पुष्कळ असून त्यामुळें वाहतुकीची सोय फार चांगली आहे. मर्सी, डी, वीव्हर या मुख्य नद्या आणि प्रमुख शहरें चेस्टर, मॅकल्सफील्ड, स्टॉकपोर्ट, बर्कनहेड आणि स्टेलीब्रिज हीं आहेत.

**चेसेलडेन, विल्यम** (१६८८–१७५२)—एक इंग्रज, शस्त्रवैद्य. विल्यम कौपर (१६६६–१७०९) च्या हाताखालीं लंडन येथें शरीरविज्ञान शिकला. व १७१३ त यानें 'ॲनाटॉमी ऑफ दि ह्युमन बॉडी' (मानवी शरीराचें विच्छेदन) हा ग्रंथ प्रसिद्ध केला. हा ग्रंथ फार लोकप्रिय होऊन त्याच्या तेरा आवृत्त्या निघाल्या. पुढें हा बडा सर्जन म्हणून निरनिराळ्या इस्पितळांवर नेमिला गेला. मूतखड्यावर पार्श्वशस्त्रक्रिया करण्यांत त्याची प्रसिद्धि होती. डोळ्यांतील बाहुलीवर शस्त्रक्रिया, कृत्रिम बाहुली बसवून कांहीं प्रकारचें अंधत्व बरें करणें, या विद्येमुळें नेत्रशस्त्रक्रियेच्या शास्त्रांत त्यानें बरीच प्रगति घडवून आणली. सर आयझॅक न्यूटनच्या शेवटच्या आजारांत चेसेलडेनचें औषध चालू होतें.

**चेस्ट नट**—[ वर्ग-फागासी ]. स्पेन देशांतील गोड चेस्ट नटचें झाड मोठें भव्य असून त्याचीं पानें मोठीं करवतीदार कडा असलेलीं सुंदर काळसर हिरवट रंगाचीं असतात. याच्या फळांत दोन किंवा अधिक बिया असतात व त्यांवर एक कांटेरी आवरण असतें. हें झाड अनेक शतकें जगतें. याचें लांकूड ओक लांकडासारखें दिसणारें पण कमी दर्जाचें असतें. अमेरिकेंतील या जातीच्या दोन झाडांचीं फळें खाण्यासारखीं असतात. आफ्रिकेमध्यें केप प्रांतांत रू कुलांतील एका वृक्षास चेस्ट नट म्हणतात. तें फार सुंदर असतें. मोरेटनबे चेस्ट नट या नांवाचें एक झाड आहे तें ऑस्ट्रेलियांतील कॅस्टानोस्पर्मम ऑस्ट्रेली म्हणून एका निराळ्याच जातीचें आहे; व त्याचीं फळें

चेस्ट नटसारखीं असतात. पाण्यांतील चेस्ट नट हें कल्टॉप नांवाचें झाड आहे. तसेंच हॉर्स चेस्ट नट हेंहि एक स्वतंत्र झाड आहे.

**चेस्टरटन, गिल्बर्थ कीथ** ( १८७४–१९३६ )— एक ब्रिटिश ग्रंथकार, वृत्तपत्रकार आणि टीकाकार. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते–'ग्रे विअर्डस अॅट प्ले', 'ब्राउनिंग', 'दि नेपोलिअन ऑफ नॉटिंगहिल', 'डिकन्स', 'दि मॅन हु वॉज थर्सडे', 'ट्रेमेंडस ट्रॅफल्स', 'व्हाट्स रॅंग विथ दि वर्ल्ड', 'दि क्राइम्स ऑफ इंग्लंड', 'आयरिश इंप्रेशन्स,' 'दि सुपरस्टिशन ऑफ डायव्होर्स', आणि 'व्हॉट आय सॉ इन् अमेरिका'.

याचे शेंमरावर ग्रंथ आहेत. 'टेपान्टो' ही त्याची कविता सर्वोत्कृष्ट समजतात. काव्यांतील विकार तिच्या अक्षरांत उठलेले आहेत. जुनी परंपरा रक्षण करण्यासाठीं त्यानें विडंबनाचा मार्ग पत्करला होता.

**चेस्टरफील्ड**—इंग्लंडच्या डर्बीशायरमधील चेस्टरफील्ड प्रतिनिधि विभागाचें चेस्टरफील्ड हें शहर असून म्युनिसिपालिटी विभाग आहे. येथें सेंट मेरी ऑलसेंट प्रार्थनामंदिर आहे. १८७९ सालीं स्टीफन्सनच्या स्मरणार्थ बांधलेल्या दिवाणखान्यांत मोफत वाचनालय, नाटकगृह आणि कलांचे व पदार्थविज्ञान-शास्त्राचे वर्ग आहेत. कापसाचे, रेशमाचे, तंबाखूचे, लोखंडाचे व पितळेचे कारखाने येथें आहेत. स्लेटपाटीच्या दगडाच्या, लोखंडाच्या व जस्ताच्या खाणी आहेत. शहराचें क्षे. फ. ८,४७२ एकर आहे. सॅक्सन लोकांनीं या शहराला चेस्टरफील्ड हें नांव दिलें. कापसाच्या व रेशमाच्या धंद्यामुळें हें शहर चांगलेंच ऊर्जितावस्थेस आलें आहे. लो. सं. ( १९४५ ) ६३,४३०.

**चेस्टरफील्ड, फिलिफ डॉरमर स्टॅनहोप** ( १६०४–१७७३ )—एक इंग्रज मुत्सद्दी व ग्रंथकार. याचें शिक्षण केंब्रिज-मध्यें ट्रिनिटि कॉलेजांत झालें; १७१५ त कॉमन्स सभेंत याला प्रवेश मिळाला. १७२६ त त्याला अर्ल ऑफ चेस्टरफील्ड ही पदवी मिळाली. १७२८ त याला वकील म्हणून हेगला पाठ-विलें. तेथून परत आल्यावर याला आयर्लंडच्या लॉर्ड लेफ्टनें-टची जागा देण्यांत आली. आपल्या कारकीर्दीत त्यानें परंपरागत चालू असलेली लांच खाण्याची पद्धत मोडून टाकिली व उद्योग-धंदे व शाळा स्थापिल्या. १७४६ मध्यें तो सेक्रेटरी ऑफ स्टेट या जागेवर आला आणि १७४८ त या जागेचा राजीनामा देऊन त्यानें पुढील आयुष्य वाचन व अध्ययन यांत घालविलें. त्यानें आपल्या मुलास लिहिलेलीं पत्रें फार प्रसिद्ध आहेत. तसेंच त्याचीं धर्मपुत्रास पत्रें म्हणून १८९० त प्रसिद्ध झालीं. त्याचा वाङ्मयांतील दर्जा त्याच्या पत्रांवरच अवलंबून आहे. ह्या पत्रांत त्याचें चातुर्य, विनोद, स्वभावचित्र रेखाटण्याची कला, सूक्ष्म-निरीक्षण व अनुमान हीं उत्तम दिसून येतात.

**चेहरा**—हा डोक्याचा पुढील भाग असून चऱ्याचश ज्ञानेंद्रियांचें स्थान आहे. चेहऱ्याची घडण ३२ दांत सोडले तर मुख्यतः १४ मुख्य हाडांपासून बनलेली आहे. डोक्याची कवटी कीं जिच्यामध्यें मेंदू असतो ती चेहऱ्याचा एक महत्त्वाचा भाग आहे. या १४ हाडांपैकीं फक्त खालचा जबडा हालवितां येतो. आणि तो कवटीच्या खालच्या भागाशीं जोडलेला असतो.

**चैतन्य** ( १४८५–१५२७ )—एक संप्रदायसंस्थापक साधु. याचा जन्म बंगाल्यांत नदिया येथें झाला. यानें तिकडे भक्ति-पंथ वाढविला. याला बंगाली लोक गौरांगप्रभु म्हणतात. चैतन्य श्रीकृष्णाचा पूर्णावतार आहे असें या संप्रदायाचे लोक समज-तात. हा वैष्णव संप्रदाय बंगाल्यांत प्रचलित आहे. या सांप्र-दायिकांचें उपास्यदैवत श्रीकृष्ण आहे. प्रेम-भक्तीस प्राधान्य दिलें जातें. भक्तीनें मोक्षप्राप्ति होते. जातिभेद किंवा लिंगभेद न मानतां कृष्णभक्ति केल्यानें मोक्ष मिळतो. कोणत्याहि धर्मा-च्या लोकांस कृष्ण नांवाच्या जपानें पावन करून घेता येतें, असें संप्रदायाचें मत असून त्याप्रमाणें मुसलमानांस देखील पावन करून ते हिंदूंत सामील करण्यांत आलें. संप्रदायाच्या अनेक शाखा आहेत व ग्रंथभांडार फार मोठें आहे. या संप्रदायाचे लोक गोपिचंदनाचा उभा टिळा लावतात.

**चैत्य**— संस्कृत 'चिता' या शब्दापासून हा बनला असल्यामुळें चितेसंबंधीं कांहींहि गोष्ट ( उदा. मृत मनुष्याच्या अस्थीवर उभारलेला चबुतरा किंवा ती जागा दर्शविणारें एखादें झाड ) असा या संज्ञेचा अर्थ होतो. प्राचीन काळच्या भारतीय वाङ्मयामध्यें, मग तें ब्राह्मणी, बौद्ध किंवा जैन कोणतेंहि असो, चैत्याचा सर्वत्र अर्थ वरच्याप्रमाणें होता. पुढें विशेषेंकरून बौद्धांत व जैनांत थोर मृतांच्या अवशेषांवर स्मारकें उभारण्याची चाल पडल्यामुळें त्यांच्याच वाङ्मयांत या शब्दाला विशेष महत्त्व व पावित्र्य झालें.

अर्वाचीन शिल्पकामांत चैत्य हा शब्द सामान्यतः एखाद्या बौद्ध किंवा जैन देवालयाला व कधीं कधीं बौद्ध शिल्पकलेच्या एका विशिष्ट प्रकाराला—लेण्यांतील दालनाला–योजितात. चैत्य दालनें हिंदुस्थानांत अनेक आहेत. हें एक खडकात कोरलेलें लेणें असून त्याला मूळ लांकडी छत असे; कांहीं अगदीं जुन्या लेण्यांतून तर बाजूस वरील लांकडी छताचा भार सहन करण्याकरितां लांकडी कमानी बसविलेल्या आढळतात. कार्ल्याच्या लेण्यांतील चैत्य उपलब्ध चैत्यांत सर्वांत मोठा आहे.

**चेमर्स, अलेक्झांडर** ( १७५९–१८३४ )—एक ब्रिटिश वृत्तपत्रकार, संपादक, आणि संकीर्ण लेखक. त्यानें ब्रिटिश एसेइस्ट ( निबंधकार, टॅटलरपासून ऑब्झर्व्हरपर्यंत ) हें पुस्तक संपादन करून प्रसिद्ध केलें. तसेंच त्यानें चॉसरपासून

कौपरपर्यंतच्या इंग्रज कवींच्या ग्रंथांचें आणि जॉन्सनच्या लाइव्हज् (चरित्र) या पुस्तकाचें संपादन १८१० मध्यें केलें. त्याचा फार मोठा ग्रंथ 'जनरल बायाग्रॉफिकल डिक्शनरी' (सामान्य चरित्रकोश) ३२ विभाग (१८१२-१८१७) हा होय.

**चोखा मेळा**— एक महाराष्ट्रीय संत. हा जातीनें महार असून पंढरपूरचा वारकरी व विठोबाचा भक्त होता. हा मंगळवेढ्याचा राहणारा. ज्ञानेश्वरानें जी तीर्थयात्रा केली त्या यात्रेंत बऱ्याचशा संतमंडळींबरोबर हा होता. मंगळवेढ्याच्या गांवकुसवाचें काम करीत असतां तें कोसळून पडून त्याखालीं हा शके १२६० च्या वैशाख वद्य पंचमीस वारला. तेथून त्याच्या अस्थी काढून पंढरपुरास नेल्या. हल्लीं याची समाधि पंढरीस नामदेवाच्या पायरीसमोर आहे. या समाधीचें दर्शन प्रथम घेतल्यावर विठोबाच्या दर्शनासाठीं वारकरी जातात. याचें कुटुंब वारकरी व कविता करणारें होतें. याचा 'विवेकदर्पण' नांवाचा एक छोटासा ग्रंथ आहे. याची व याच्या सोयरा नांवाच्या बायकोची कविता सोपी व रसाळ आहे. याचें काव्य अनंतभट नांवाच्या ब्राह्मणानें लिहून ठेवलें आहे.

**चोचो**— या झाडाचे वेल कांकडीच्या किंवा दोडक्याच्या वेलांसारखे असतात. दिसण्यांत याचीं फळें पेरूसारखीं असतात; पण पेरूपेक्षां ३।४ पट मोठीं होतात. त्यांवर कांकडीप्रमाणें बारीक कांटे असतात. चोचोची वरची साल सोलून दुध्या भोपळ्याच्या भाजीसारखी भाजी करतात. चोचीचा जाम अथवा मोरंबा परदेशांतून येथें विकण्यास येतो.

**चोंडा** (१५ व्या शतकाचा पूर्वार्ध)— भीष्मासारखा एक पितृभक्त रजपूत. मेवाडचा राजा लक्षसिंह उर्फ लाखा याचा हा मुलगा. यास मारवाडचा राठोड राणा रणमल्लाची मुलगी हंसाबाई ही सांगून आली होती, परंतु या वेळीं याचा बाप लक्षसिंह यासच हंसाबाईशीं लग्न करण्याची इच्छा झाली. रणमल्ल हंसाबाईस लक्षसिंहास देण्यास तयार नव्हता. कारण हंसाबाई लक्षसिंहास दिल्यास तिच्या मुलांस राज्य मिळालें नसतें. या वेळीं चोंडानें आपल्या बापाच्या इच्छेसाठीं म्हणून आपला राज्यावरील हक्क सोडला व तसें प्रतिज्ञापत्रहि लिहून दिलें. यानंतर हंसाबाईचें लग्न लक्षसिंहाशीं होऊन हंसाबाईस पुत्र झाला. त्याचें नांव मोकल असें ठेवण्यांत आलें. मोकलच्या संरक्षणाची जबाबदारी लक्षसिंहानें याच्याकडे सोंपवली असतां रणमल्लानें हा मोकलला ठार करूं इच्छितो अशी याजविरुद्ध लक्षसिंहाकडे कागाळी केली. नंतर हंसाबाईच्या इच्छेनें हा आपल्या भावांसह मेवाड सोडून मांडूच्या सुलतानाकडे जाऊन राहिला.

**चोपडें**—मुंबई, पूर्व खानदेश जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ३६८ चौ. मैल. लो. सं. ९७,७०९. या तालुक्यांत चोपडें व अडावद हीं दोन गांवें व ९४ खेडीं आहेत.

मुख्य नद्या म्हणजे तापी व तिला मिळणाऱ्या अनेर व गुली होत. यांतील जमीन काळीची असून सुपीक आहे. या तालुक्यांत दरवर्षी २५ इंच पाऊस पडतो.

चोपडें शहर तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें शहर फार जुनें असून तेथील मोडकळीस आलेल्या किल्ल्यावरून पुरातन हिंदु राजांच्या अमदानींत यास बरेंच महत्त्व असावें. १६ व्या शतकांत हें एक दाट लोकवस्ती असलेलें मोठें शहर असून येथें रामेश्वराचें देवालय होतें. १६७९ मध्यें हें शिवाजीनें लुटल्याचा उल्लेख आढळतो. लो. सं. २१,५४४. येथें कापूस व जवस यांचा व्यापार चालतो. बरेच सरकी काढण्याचे जिन आहेत.

**चोंभा**—एक प्राचीन मराठा कवि. याचें उषाहरण नांवाचें ओंवी छंदांत लिहिलेलें एक काव्य प्रसिद्ध आहे. 'चोंभा' हें पाळण्यांतलें नांव असल्यास 'शुंभ' नांवाचा आणि आडनांव असल्यास 'चतुर्वैदिक' शब्दाचा अपभ्रंश असावा असें राजवाडे सुचवितात.

ग्रंथाची भाषा बहुधा ज्ञानेश्वरासारखी आहे. काव्याच्या भागांस 'प्रसंग' असें म्हटलें आहे. ओंवीसंख्या १८८५ पर्यंत उपलब्ध आहे.

ग्रंथभाषेवरून शके १३०० च्या सुमाराचा हा कवि असावा असें मानितात. रंगनाथस्वामी निगडीकर, शेख महंमद, वगैरे कवींनीं आपल्या संतमालिकांत याला नमन केलें आहे.

**चोरी**—दुसऱ्याच्या मालकीची वस्तु (जंगम माल) त्याच्या संमतीवांचून आपल्या स्वतःच्या उपयोगाकरितां घेणें याला 'चोरी' म्हणतात. 'गुन्हा करण्याचा हेतु' या गुन्ह्यांत महत्त्वाचा भाग होय. म्हणून एखाद्याची सायकल किंवा घोडा थोडा वेळ वापरला व परत मालकाला दिला, तर तें कृत्य चोरी होत नाहीं. प्राचीन रोमन व इंग्रजी कायद्यांत चोरी हा गुन्हा नसे. दिवाणी काम चालून मालकाला चोरीस गेलेला माल किंवा त्याच्या दुप्पट किंवा चौपट किंमत चोराकडून मिळत असे. आयरिश, इस्लामी, इराणी, जपानी, ट्यूटन, स्लाव्ह, वगैरे लोकांत पूर्वी चोरीच्या गुन्ह्याला शरीरावयवच्छेदनाची व मरणाची शिक्षा असे. सांप्रतच्या इंग्रजी कायद्यांत चोरीला कमाल शिक्षा १४ वर्षे सक्तमजुरी आहे.

तस्कर हा शब्द ऋग्वेदांत व तदुत्तर वाङ्मयांत चोर या अर्थानें वारंवार आला आहे. ऋग्वेदांत तस्कराचें वर्णन 'तनूत्यज-वनर्गू'—अरण्यांत राहून आपला जीव धोक्यांत

घालणारा–असें दिलें आहे. ऋग्वेदाच्या एका उताऱ्यांत (६·५५,६) तस्कर किंवा स्तेन यांच्यावर कुत्रें भुंकल्याचा उल्लेख आहे. यावरून हे घरफोडेहि होते असें दिसतें. ऋग्वेदांतील एका (६·५४,१) ऋचेवरील भाष्यात सायणांनीं पूर्वी जनावरांचा माग काढणारे (पंजाबांतील खोजी लोकांप्रमाणें) लोक असत असें म्हटलें आहे. चोरांना करावयाची शिक्षा ती ज्याचा माल चोरला असेल त्याच्या मर्जीप्रमाणें होत असे. त्यांना खोडा घालीत असत असा उल्लेख आहे. पुढें (गौतमधर्मसूत्र ४३·४५, आपस्तंब धर्मसूत्र १·९·२५; ४·५) याहून जास्त कडक म्हणजे देहान्तशिक्षाहि केली जात असे. चोरीच्या गुन्ह्याची चौकशी कोणत्या प्रकारें होत असे हें समजण्यास ऋग्वेदांत आधार नाहीं. चोरीचा माल सांपडला तर तो ज्याचा त्याला परत मिळत असे.

स्मृतिग्रंथांत 'स्तेय' (चोरी) व 'साहस' (दरोडा) असे दोन पृथक् गुन्हे असून त्यांना शरीरावयवच्छेद व वध अशा कडक शिक्षा सांगितल्या आहेत. शिवाय चोरलेला माल मालकास परत देववीत, आणि सरकारची गुन्हेगारी चोराकडून वसूल करीत असत. मराठी रियासतींत अशाच शिक्षा असत. ब्रिटिश अमदानींत जास्तींत जास्त चौदा वर्षे सक्त मजुरीची कैद ही शिक्षा आहे. इंडियन पिनल कोडांत चोरीशीं सदृश असे गुन्हे (१) दरोडा (रॉबरी), (२) ठकबाजी (चीटिंग), (३) अपहार (मिस्अॅप्रोप्रिएशन), (४) विश्वासघात (ब्रीच ऑफ ट्रस्ट), व (५) अपक्रिया (मिस्चीफ) हे आहेत.

**चोरीचें वेड**—(क्लेप्टोमॅनिआ). कांहीं लोकांस चोरी करण्याची अतिशय तीव्र व दाबून टाकण्यास कठिण अशी इच्छा होते तीस चोरीचें वेड म्हणतां येईल. इंग्रजींत याला क्लेप्टोमॅनिआ नांव आहे. विशेषतः अतिशय मद्य पिणारे किंवा अफू, टॉक्सिन, वगैरेसारख्या मादक द्रव्यांचा उपयोग करणारे किंवा कांहीं मानसिक विकार झालेले अशा लोकांना सर्वसाधारण मनुष्यामध्यें ज्या नैतिक भावना असतात त्या इतक्या तीव्र नसल्यामुळें अशा तऱ्हेची प्रवृत्ति होते. हा रोग खरोखरच आहे किंवा नाहीं याची चांगली परीक्षा करणें अवश्य असतें व तसें ठरल्यास तो एक मानसिक विकार आहे असें समजून त्यावर उपचार केले पाहिजेत.

**चोल घराणें**— हें घराणें दहाव्या शतकाच्या आरंभापासून द. हिंदुस्थानांत उदयास आलें. परांतक चोल यानें पल्लव व पांड्य यांना जिंकलें व सीलोनवरहि स्वारी केली. त्याचा पुत्र राजराज (९८५) व नातू राजेंद्र (१०३५) हे फार पराक्रमी निघाले. त्यांनीं समकालीन राजांना जिंकून सबंध मद्रास प्रांत आपल्या ताब्यांत ठेवला. त्यांचें आरमार बलिष्ठ असल्यानें लखदीव-मालदीवसारखीं बेटें त्यांनीं घेतलीं व ब्रह्मदेशापर्यंतचा मुलूख आपल्या वर्चस्वाखालीं आणला. गंगैकोंड येथें त्यांची राजधानी होती. त्यांनीं वाडे, देवळें, तलाव, इ. अनेक वास्तू बांधल्या. तंजावरचें देऊळ शिल्पाच्या दृष्टीनें उत्कृष्ट आहे. याच घराण्यांत कुलोत्तुंग हा असाच पराक्रमी राजा झाला. त्याचा चालुक्यांशींहि आप्तसंबंध होता. त्यानें सुमारें ५० वर्षें राज्य केलें. त्यानें तेलगू आणि तामीळ या दोन्ही भाषांतील साहित्याचा उत्कर्ष करविला. जकाती बंद केल्या. चोलांचा राज्यकारभार नमुनेदार असे. जमिनीवर उत्पन्नाच्या $\frac{1}{6}$ कर असे. व्यापारी मालावरहि ठराविक पट्टी असे. चांगले रस्ते व पाटबंधारे सरकारी खर्चानें बांधीत. विशेष म्हणजे ग्रामपंचायती असत, राजराज आणि कुलोत्तुंग यांच्या मोहिमांमुळें राज्यांत फार पैसा आला व देश समृद्ध झाला. चोल राजे शैवधर्मीय होते.

**चोवीस परगणा**—बंगाल, एक जिल्हा. क्षे. फ. ३,६९६ चौ. मै., यांत २९४१ सुंदरबनाचा भाग येतो. जमीनदारी परगणे २४ असल्यानें हें नांव पडलें. कलकत्ता शहर या जिल्ह्यांत पडतें. यांतून हुगळी नदी गेलेली आहे व तिच्या दोन्ही किनाऱ्यांवर गिरण्या, कारखाने, देवळें, वाडे, इ. आहेत. भागीरथी व तिच्या उपनद्या यांतून नावा चालतात. पाऊस सुमारें ६२ इंच पडतो. लो. सं. (१९४१) ३५,३६,३८६. यांपैकीं $\frac{1}{4}$ वस्ती कलकत्त्यास आहे. तांदूळ व ताग हीं मुख्य पिकें होत. दक्षिण भाग जंगलमय आहे. कलकत्ता शहर जिल्ह्यांत असल्यानें यांत्रिक धंद्यांना फार महत्त्व आलें आहे. गोणपाट, कापड, कागद, साखर, कातडीं, दोर, तेल, विटा, इ. तयार करण्याचे पुष्कळ कारखाने चालले आहेत. रेल्वेरस्ता १५८ मैल लांबीचा या जिल्ह्यांतून गेला आहे. भागीरथीच्या नदीपासून काढलेले कालवे आहेत.

हा प्रदेश वंग राज्यांत मोडत असे. १० व्या शतकांत यावर सेन राजांची सत्ता होती. तेराव्या शतकापासून मुसलमानांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या. नंतर पोर्तुगीज आणि इंग्रज व्यापारासाठीं या ठिकाणीं आले. प्लासीच्या लढाईनंतर (१७५७) ईस्ट इंडिया कंपनी बंगालवर अधिकार गाजवूं लागली.

**चौकशी**—फौजदारी गुन्ह्याच्या न्यायनिर्णयाकरितां फौजदारी कोर्टांत न्यायाधिशासमोर जाहीरपणें जें काम चालतें त्याला चौकशी (ट्रायल) म्हणतात, आणि गुन्ह्याचा तपास लावण्याकरितां, आरोपी शोधून काढण्याकरितां, वगैरे पोलिसखात्याकडून जें काम होतें त्याला पूर्वचौकशी (इन्व्हेस्टिगेशन) म्हणतात. न्यायकोर्टांतील चौकशीच्या कामाचा क्रम पुढीलप्रमाणें असतो; कोर्टांत न्यायाधिशासमोर फिर्यादी व सर्व आरोपी हजर झाल्यावर फिर्यादीचा वकील किंवा सरकारी

वकील प्रथम खटल्याचें सामान्य स्वरूप सांगणारें भाषण करतो, आणि नंतर पुराव्याच्या साक्षीदारांची एकामागून एक जबानी घेतो. जबानी घेतांना प्रथम फिर्यादीचा वकील प्रश्न विचारून फिर्यादींत लिहिलेली हकीगत साक्षीदाराच्या तोंडून वदवितो. नंतर विरुद्ध पक्षाचा वकील त्या साक्षीदाराची उलटतपासणी प्रश्नरूपानें करतो. त्यांत फिर्यादीची हकीगत खोटी ठरविण्याचा किंवा साक्षीदार लबाड असल्याचें ठरविण्याचा त्याचा हेतु असतो. त्यानंतर फिर्यादीचा वकील खुलाशाचे पूरक प्रश्न विचारतो. याप्रमाणें सर्व साक्षीदारांच्या जबान्या झाल्यावर आरोपीचा जबाब लिहून घेतात. त्यानंतर आरोपीच्या साक्षीदारांच्या वरीलप्रमाणें जबान्या घेण्यांत येतात. नंतर दोन्ही बाजूंचे वकील पुरावा व कायदा या दोन्ही दृष्टींनीं आपापली बाजू न्यायाधिशाला सांगतात. ज्यूरीच्या किंवा असेसरांच्या मदतीनें चौकशी होत असल्यास न्यायाधीश त्यांना खटला समजावून सांगतो. नंतर ज्यूरी आपलें मत देते, व अखेर न्यायाधीश आपला निर्णय लिहून वाचून दाखवितो.

**चौगुला**—एक प्राचीन गांवकामगार. यासंबंधीं उल्लेख १३ व्या शतकापासून आढळतात. 'चौगुला ग्रामणी प्रोक्तः' असें राजव्यवहारकोशांत म्हटलें आहे. महाराष्ट्रांत चौगुला हा बहुशः मराठा असे व तो पाटलाचा मदतनीस असे. चौगुल्यांत गांवचौगुला, देशचौगुला, व जातचौगुला असे तीन प्रकार आहेत. चौगुला हा मुख्यतः पाटलाप्रमाणें गांवलावणी करणें, गांववसुली करणें व ती वसुली दिवाणांत भरणें अशीं कामें करणारा वतनी अधिकारी होता. मोठ्या चौगुल्याच्या हाताखालीं गुमास्ता असे. पाटलाप्रमाणें चौगुल्याचा स्वतंत्र शिराळशेट निघे. दिवाणांतून वस्त्रें मिळत. जातींतील प्रमुख व्यक्ति ती जातचौगुला. धनगर, कोळी, इ. जातींत चौगुले आढळतात.

**चौघडा**— या वाद्यांत एकंदर चार भांडीं असतात. तीं तांब्याचीं अथवा लोखंडाचीं असतात. त्यांचा आकार सामान्यतः फुलाच्या कुंड्यांसारखा कांहींसा असतो. एक मोठें व एक लहान अशी जोडी याप्रमाणें दोन जोड्या यांत असतात. मोठ्या भांड्याचें तोंड व्यासांत एक हातभर भरेल असें वाटोळें असतें; याची उंची बुडाच्या गर्भापासून सुमारें हातभर असते. धाकट्या भांड्याचें तोंडहि गोल असून त्याचा व्यास सुमारें दीड वीत असतो. हीं भांडीं चामड्यानें मढवितात, व तें चामडें वादीनें तळापर्यंत गुंफून ताठ बसवितात. मोठ्या भांड्यास नगारा व धाकट्यास टिमकी म्हणतात. स्वर चढवावा असें वाटल्यास कोळशाच्या निखाऱ्यावर हीं शेकवितात. हें वाद्य सुमारें दीड वीत लांब व अंगठ्याहून थोड्या जाड अशा दोन टिपऱ्या हातांत घेऊन मनुष्य वाजवितो. ह्यावर सनईशीं साथ करतात, तेव्हां निरनिराळ्या तालांच्या गती वाजविलेल्या ऐकूं येतात. दोन माणसें एकाच वेळीं वाजवीत असतात; त्यांपैकीं एक साध्या गतीच्या अनुरोधानें लय कायम ठेवून असतो व दुसरा सम, दुगण, वगैरे प्रकार दाखवितो. याप्रमाणें या वाद्यांत चार भांडीं लागतात म्हणून यास 'चौघडा' म्हणतात. जोड सनई, सूर, कर्णा, मोठी झांज व ही नगाऱ्याची जोडी ह्या सर्व मेळास व्यवहारांत 'चौघडा' असें म्हणतात. देवालयांत, लग्नसमारंभांत, उत्सवप्रसंगीं, राजेरजवाड्यांच्या स्वारींत, भिखणुकींत वगैरे प्रसंगीं ह्या वाजतांना दृष्टीस पडतो.

**चौडरस** (सु. १३००)—एक कानडी कवि व 'अभिनवदशकुमारचरित' या कानडी ग्रंथाचा कर्ता. हा पंढरीच्या विठ्ठलाचा भक्त होता. याचा 'अभिनवदशकुमारचरित' हा ग्रंथ दंडी कवीच्या संस्कृतमधील दशकुमारचरिताचें कानडींत चम्पूरूप भाषांतर आहे. या ग्रंथाच्या चौदाव्या आश्वासांत तत्कालीन पंढरीचें व आसपासच्या प्रदेशाचें वर्णन आढळून येतें.

**चौंडे, बाळकृष्ण मार्तंड** (१८७७- )—गोरक्षण चळवळीस वाहून घेतलेले महाराष्ट्रांतील एक सत्पुरुष. हे रामदासी संप्रदायाचा प्रसार करणारेहि आहेत. वयाच्या पंधराव्या वर्षापासून हे कीर्तन करूं लागले. व यानंतर काशीपासून रामेश्वरापर्यंत प्रवास करून कीर्तनद्वारां यांनीं भक्ति व गोसेवा यांचा प्रचार केला. वयाच्या २१ व्या वर्षी यांनीं श्रीसमर्थ संप्रदायाचा स्वीकार केला.

१९०५ सालापासून यांनीं आपलें आयुष्य गोवर्धनासाठीं वाहिलें व 'गोवर्धन' संस्थेचा पाया घातला. या कार्यासाठीं अनेक परप्रांतांत हिंडून यांनीं लोकजागृति केली. औंध, सांगली, कोल्हापूर, यांसारख्या संस्थानांत गोवधास चंदी करविली व गोविक्रय करण्यास प्रतिबंधक असे कायदे घडविण्याचे प्रयत्न केले. या कार्यासाठीं यांनीं अनेक स्त्री-पुरुष कीर्तनकार प्रचारक तयार करून त्यांकरवीं गोरक्षणाचा व गोवर्धनाचा प्रसार चोहोंकडे केला; तसेंच वांईस व पुण्यास गोवर्धनसंस्थेच्या शाखा चालविल्या.

गोरक्षणाकडे आर्थिक दृष्टीनेंहि हे पहातात. गायींच्या अवलादींत सुधारणा होऊन त्यांच्या दुधांत वाढ व्हावी, सशक्त बैलांचा पुरवठा व्हावा यासाठीं गाईचें योग्य रीतीनें संवर्धन व्हावें याच हेतूनें गोवर्धन संस्थेच्या पुरस्कारानें गोवर्धन डेअरी फार्म, लि., या कंपनीची स्थापना करण्यांत आलेली आहे. यांनीं कै. वल्लभदास मुरलीधरदास यांच्या एक लाख रुपयांच्या देणगींतून मुंबईस गोवर्धनवाडी खरेदी केली असून तिच्या उत्पन्नांतून गोरक्षणाचा प्रचारखर्च चालवला जातो. 'गो-ज्ञानकोश' तयार करून प्रसिद्ध करण्यासाठीं यांनीं खटपट चालविली आहे.

**चौथाई, चौथ**—एकंदर उत्पन्नाचा ¼ हिस्सा म्हणजे चौथ. हा मूळ शिवाजीनें मुसलमानांच्या राज्यांतून उघडपणें वसूल करण्याचा प्रघात पाडला. हा हक्क गांवकऱ्यांनीं निमूटपणें मराठ्यांच्या हवालीं केल्यास, मग मराठे त्या गांवास उपसर्ग देत नसत. शिवाजीनें आदिलशाहींतून तीन व कुतुबशाहींतून पांच लक्ष होन चौथाई सालीना घेण्याचा प्रघात पाडला. (१६६८) व दिल्लीच्या मोंगली साम्राज्यांतूनहि १६७१ पासून चौथाई हक्क वसूल करण्यास प्रारंभ केला. नंतर गोवेकर फिरंगी, बेदनूरकर, सोंधेकर व कर्नाटकचे पाळेगार, वगैरे संस्थानिकांकडूनहि शिवाजीनें हा हक्क वसूल केला. संस्थानिकानें चौथाई दिली म्हणजे त्याचें संरक्षण आपल्या पदरच्या फौजेनें शिवाजी करीत असे. शिवाजीच्यानंतरहि चौथ हा मराठ्यांचा एक कायमचाच हक्क होऊन बसला. व तो ते दिल्लीच्या बादशहाच्या परवान्याच्या आधारावर सर्व हिंदुस्थानांत निरनिराळ्या राजेरजवाड्यांपासून सामोपचारानें अथवा सक्तीनेंहि वसूल करीत असत. दिल्लीच्या महंमदशहानें तर शाहूराजास चौथाईची (सरदेशमुखीची व स्वराज्याची) सनद राजीखुषीनें आपणहोऊन दिली (१७१९). त्यांत दक्षिणेंतील साडेसहा सुभ्यांवर चौथाई वसूल करण्यास परवानगी होती व याबद्दल शाहूनें फौज ठेवून त्या सुभ्यांचें संरक्षण करावयाचें होतें. दक्षिणच्या सुभ्यांचें उत्पन्न सालिना अठरा कोट होतें. म्हणजे चौथाईचें मराठ्यांचें उत्पन्न साडेचार कोटींचें होतें. बादशहानें चौथाई कबूल करणें म्हणजे मराठ्यांच्या संरक्षणाखालीं जाणें असा अर्थ होतो. हैद्राबादच्या निजामानें या चौथ हक्काला सारखा विरोध केलेला आहे. मराठ्यांच्या साम्राज्याचा विस्तार या (तिन्ही) सनदांच्या आधारावर पुष्कळच झाला. 'आज चौथ सरदेशमुखीचा अमल बसतो. पुढें संस्थान आपलें होतें,' हें धोरण (शिवाजीनें बांधलेलें) चांगलें होतें. परंतु त्यास लागणारें पैशाचें, फौजेचें व एकीचें बळ पुढें पुढें मराठमंडळास राहिलें नसल्यानें तें त्यांच्या हातून अखेरपर्यंत उत्तम प्रकारें पार पडलें नाहीं.

**चौधरी**— पूर्वीं गांवांतील बारा बलुत्यांत चौधरी या नांवाचा एक हक्कदार असे. याचें मुख्य काम बाजारभावांत फारसा चढउतार होऊं न देतां रयतेस धान्याचा योग्य दरानें पुरवठा करणें हें होतें. दिल्लीस मुसलमान पातशाहींत तर सैन्यास अगर सरकारास गल्ला पुरविण्याचें कामहि याजकडेच सोंपवीत असत. ही चाल निजामाच्या राज्यांतहि होती. मराठी राज्यांत ही पद्धत प्रचारांत नव्हती. गांवांत धान्याची गोणी आल्यास तिची नोंद चौधरी करी व त्याच्या हुकुमाशिवाय ती फुटत नसे. गांवांतील धान्याची निर्गत होई, तीहि चौधऱ्याच्या देखरेखीखालीं व परवानगीनें होई. धान्याची आयात कमी झाल्यास व बाजारभाव वाढवावयाचा असल्यास व्यापाऱ्यांना चौधऱ्याच्या हुकुमाशिवाय (व चौधऱ्यास सरकारच्या हुकुमाशिवाय) तो वाढवितां येत नसे. अशा वेळीं बाहेरप्रातांतून धान्य आणून गांवास पुरविण्याची कामगिरीहि त्याला करावी लागे. हा चौधरीपणाचा हक्क सरकारांतून घेणें असल्यास सरकारास नजर (कर) द्यावी लागे. मोठमोठ्या शहरीं मक्त्यानेंहि हा अधिकार मिळत असे.

**चौधरी, बदरीनारायण गुरुचरणलाल** (१८५६–१९२४)—हिंदी व उर्दू वाङ्मयांतील एक सुप्रसिद्ध लेखक, कवि व नाटककार. मिरझापूर येथील एका ब्राह्मण कुटुंबांत यांचा जन्म झाला. यांचे वडील सुप्रसिद्ध काव्यरसज्ञ पं. रामानंद यांनीं यांना संस्कृतचें शिक्षण दिलें. संस्कृत वाङ्मयामुळे यांना काव्याचा अतिशय नाद लागला. पं. इंद्रनारायण शंगलू नांवाच्या चळवळ्या गृहस्थाशीं संबंध आल्यामुळें सभा, समाज, वर्तमानपत्रें यांसारख्या विषयांत यांना आवड निर्माण झाली. हिंदी भाषेंत 'प्रेमधन' या नांवानें व उर्दू भाषेंत 'अब्र' या नांवानें हे लिखाण करीत. 'आनंदकादंबिनी' व 'नागरी–नीरद' यांसारखीं मासिकें काढून व गद्य–पद्य ग्रंथ लिहून यांनीं आपले विचार लोकांपुढें मांडले. स्वतःच्या मनाच्या प्रसन्नतेसाठींच हे लिखाण करीत. कर्तृत्वशक्ति, रसज्ञता व लेखनसफाई हे गुण यांच्या लिखाणांत पुरेपूर दिसून येतात.

(१) भारतसौभाग्य नाटक, (२) भारत बधाई, (३) कजलि-कादंबिनी, (४) आर्याभिनंदन, वगैरे सुप्रसिद्ध पुस्तकें यांनीं लिहिलीं.

मिरझापुरांत सन १८७४ मध्यें यांनीं 'सद्धर्मसभा' व सन १८७५ मध्यें 'रसिक समाज' यांची स्थापना केली. सन १९१२ सालीं कलकत्ता येथें भरलेल्या तृतीय हिन्दी साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान यांना लाभला होता.

**चौबे जहागीर**—मध्य हिंदुस्थानांत बाघेलखंडांत ही सनदी जहागीर आहे. यांत पालदेव, पहरा, तरौन, भैसोंडा आणि कामटा राजौला अशा पांच ठिकाणीं जमीनदाऱ्या आहेत. याचें क्षे. फ. १२६ चौ. मैल आहे. यांच्यांत हिऱ्याच्या खाणीचा थोडासा भाग आहे व हिऱ्याच्या विक्रीपासून कांहीं उत्पन्न आहे. ही जहागीर जिझोटिया ब्राह्मणांकडे आहे व त्यांना चौबे ही संज्ञा आहे. ते शूर असल्यामुळें पन्नाचा राजा छत्रसाल याच्या अमलांत वैभवास चढले होते. या चौबे घराण्यात असा प्रघात आहे कीं, जर एखादा वतनदार निपुत्रिक मेला किंवा दत्तक घेतला नाहीं तर

त्या वतनाचे भाग करून कुटुंबांत दुसरीं जीं वतनें असतील त्यांत मिळवावे लागत.

**चौरंगीनाथ**—नवनाथांपैकीं एक. रुद्रपूरच्या भुलेश्वर राजाची ज्येष्ठ पत्नी गरोदर असतांना तिच्या सवतीनें तिला राजाकडून अरण्यांत सोडलें व तेथें ती प्रसूत होतांच तिच्या लहान अर्भकाचे हातपाय तोडून त्यास भुलेश्वराच्या वेशीपाशीं बांधून ठेवलें. यानंतर कांहीं दिवसांनीं मत्स्येंद्रनाथ तेथें आले असतां त्यांनीं तें दृश्य पाहिलें व त्यांच्या कृपेनें त्या मुलाचे हातपाय त्यास परत आले. हा मुलगा नंतर त्यांचा शिष्य झाला व चौरंगीनाथ नावानें प्रसिद्धि पावला.

**चौल ( चेऊल )**—मुंबई, कुलाबा जिल्ह्याच्या अलीबाग तालुक्यातील कुंडलीक नदीच्या मुखाजवळील बंदर. हें फार प्राचीन आहे. श्रीकृष्ण द्वारकेस राज्य करीत असतांना याचें नांव चंपावती ( उर्फ रेवती ) असें होतें. देवगिरीकर यादवांच्या ताब्यात हें होतें. नंतर मुसलमानांच्या ताब्यांत गेलें. त्यांच्या हातीं असतांना येथें पोर्तुगीज लोक सन १५०५ त प्रथम आले. सन १५१६ त पोर्तुगीजांनीं येथें वखार बांधली. सन १६०० त हें मोंगलांच्या ताब्यांत गेलें. सन १५८३ त हें बंदर तटबंदी केलेलें होतें व त्यांत व्यापार फार चालत होता. त्या वेळेस येथें अनेक कारखाने होते व त्यांत चांगले वाकबगार कारागीर असत. शिवछत्रपतींच्या ताब्यांत हें आल्यानंतर, त्यांनीं येथें आरमाराचें एक ठाणें वसविलें. मराठी राज्यांत हें एक व्यापारी बंदर म्हणून प्रसिद्ध होतें. इंग्रजी झाल्यानंतर येथील कोष्टी व दुसरे कारागीर मुंबईस जाऊन राहिले, मात्र त्याचे वंशज चौलीस नांवानें आज चौलास राहत आहेत.

**चौशु-जेन** ( १८८१–१९३६ )—एक प्रख्यात चिनी साहित्यिक. याचें टोपण नांव लु सन, लुसिन असें असून अर्वाचीन चिनी वाङ्मयांत याला फार उच्च स्थान आहे. हा साध्या भाषेंत लिहिणारा कथालेखक आहे. त्याची लेखनशैली मनोरम असून स्वभावचित्रें वास्तविक व वैशिष्ट्यपूर्ण असतात. इतकेंच नव्हे तर विद्यमान सामाजिक स्थितीचा नवसाक्षात्कार घडवून आणतात. 'दि बायाग्रफी ऑफ आह क्यू' ही त्याची अतिशय प्रसिद्ध कथा अनेक भाषांत भाषांतरली गेली आहे. 'कार्य करीत राहा' हा त्याचा नेहमीं संदेश असतो व चीनला स्वातंत्र्यप्राप्ति होण्याच्या कामीं त्याची टोंचणी कांहींशी कारण आहे.

**चौहान, चव्हाण**— ही जात विशेषेंकरून संयुक्त प्रांतांत आढळते. गॅझेटिअरवरून असें कळतें कीं, या जिल्ह्यात रजपूत चौहान पुष्कळ आहेत व त्यांमध्यें शेरकोट आणि हलडोर या दोन्ही वंशांतील लोकांचा समावेश होतो. चौहान लोकांचे तीन वर्ग आहेत. ते येणेप्रमाणें —( १ ) चौधरी, ( २ ) परधान, ( ३ ) खागी. यांमध्यें चौधरी ही जात सर्वांत श्रेष्ठ आहे. खागी चौहान लोक 'खागी' या वेगळ्याच जातीचे असावे. पुनर्विवाह करून भ्रष्ट झालेल्या रजपूत चौहानाशीं आमचा संबंध आहे असें खागी लोक म्हणतात. चौहान लोकांत 'खागी' म्हणून पोटजात आहे. त्याचप्रमाणें खागी लोकांत 'चौहान' नांवाची एक पोटजात आहे. यामुळें या दोन जातींत निकट संबंध असावा एवढें सिद्ध होतें.

**च्यवन**—एक प्राचीन ऋषि. अश्विनीकुमारांनीं त्यास पुनः सामर्थ्य व तारुण्य प्राप्त करून दिलें. शतपथ ब्राह्मणांत ( ४. १, ४, १ ) अशी एक कथा आहे कीं, च्यवनाचा, शर्यातिकन्या सुकन्या इच्याशीं विवाह झाला. भृगु अथवा अंगीरस असें दुसरेंहि च्यवन मुनीचें नांव आहे. ऋग्वेदांत च्यवनाचा जो एक उल्लेख आहे ( १०,६१,१–३ ) त्यावरून असें दिसतें कीं, इंद्रोपासक तुर्वयाण याच्याविरुद्ध च्यवन होता. अश्वीस हवि अर्पण केल्याबद्दल इंद्राचा च्यवनावर रोष झाला होता. सुकन्येच्या प्रार्थनेवरून अश्वीस यज्ञांतील विभाग मिळत असे, असें शतपथ ब्राह्मणावरून व्यक्त ( ४,१,५,१३ ) होतें. पुढें इंद्र व च्यवन यांचा समेट झाला असावा असें ऐतरेय ब्राह्मणावरून स्पष्ट होतें ( ८. २१. ४ ). महाभारतांत या च्यवनाची कथा आहे. ( आदि. अ. ४–६ ; वन अ. १. २१–१२५ ).

**च्यवनप्राशावलेह**— हा अवलेह अतिशय शक्तिवर्धक आहे. जीर्ण ज्वर, मोठ्या आजारानंतर येणारा अशक्तपणा, खोकला, धातुक्षय, थकवा येणें, इत्यादि लक्षणांवर अतिशय उपयुक्त. इतर औषधांबरोबर अनुपान म्हणूनहि वापरतां येतो. लहान मुलें, म्हातारीं माणसें, अशक्त माणसें यांना हें औषध विशेष लागू पडतें. या औषधाच्या सेवनानें च्यवन नांवाच्या म्हाताऱ्या ऋषीलाहि तारुण्य प्राप्त झालें म्हणून हें नांव पडलें असें सांगतात. १ ते २ चमचे दुधाबरोबर, सकाळ–संध्याकाळ घेतात.

**च्युतिकोण**—( डेव्हिएशन ऑफ दि कॉपस ). गलबतांतील होकायंत्राची सुई, जवळपास असणाऱ्या लोखंडाच्या योगानें आपली याम्योत्तर रेषा दर्शविणाऱ्या बिंदूपासून भ्रमण पावते. या भ्रमणाच्या कोनास च्युतिकोण म्हणतात. अशी च्युति पावूं नये म्हणून योजना केलेली असते. कठिण लोखंडामध्यें चुंबकशक्ति दीर्घकाल टिकते. परंतु नरम लोखंडांतील चुंबकशक्ति लवकर क्षीण होते किंवा त्यांत ती लवकर निर्माणहि होते ; व त्याच्या चुंबकस्थितींतहि जहाजाची गति जसजशी बदलत जाते तसतसा फरक होत जातो. होकायंत्रांतील सुईची चुंबकशक्ति स्थिर राहण्याकरितां होकायंत्राच्या आसपास

लोहचुंबक ठेवण्यांत येतात व चुंबकस्थितींत फरक होऊं नये याकरितां होकायंत्राजळ नरम लोखडाचे गोळे ठेवण्यांत येतात. अशाच तऱ्हेचे फरक विमानांतहि होतात व त्यांवर याच तऱ्हेचे उपाय करण्यांत येतात.

---

## छ

छ—या वर्णाच्या चार अवस्था आहेत : १ ली अशोकाच्या गिरनार लेखांत; २ री इ. स. १ ल्या व २ ऱ्या शतकांतील मथुरेच्या लेखांत; ३ री ११ व्या शतकांतील उज्जनी येथील लेखांत आढळते; व ४ थी तिसऱ्या अवस्थेपासून बनलेली आहे.

फारसी मितीकरितां खूण म्हणून पूर्वीच्या पत्रांतून छ सारखें अक्षर काढीत. उदा., पा॥ छ २७ रबिलावल.

**छट्टू**—हा पेशवाईअखेरीस पेंढाऱ्यांतील एक प्रमुख (पेंढारी नाईक) होता. त्या वेळीं करीमखान, वासीलमहंमद व छट्टू हे तीन प्रमुख पुढारी होते. हा जातीनें मेवाडी होता. करीमखान ग्वाल्हेरास शिंद्यांच्या अटकेत असतांना पेंढाऱ्यांचे आधिपत्य याच्याकडे आलें (१८१०). इ. स. १८१७ त इंग्रजांनीं माळव्यांतून पेंढारी हुसकावून लाविले व १८१८ त त्यांचा पुरा मोड केला. पण छट्टू हा इंग्रजांच्या हातीं लागेना व शरणहि येईना; म्हणून त्याचा सारखा पाठलाग सुरू झाला. त्या वेळीं तो पळत पळत अशीरगडाच्याजवळ जंगलांत शिरला असतां तेथें एका वाघाच्या मुखांत त्याची आहुति पडली.

**छत्तरपूर संस्थान**—मध्य हिंदुस्थान, जुन्या बुंदेलखंड एजन्सीमधील एक सनदी संस्थान. क्षे.फ. १,१४० चौ. मै., लो. सं. (१९४१) १,८४,७२०. यांत तीन शहरें व ३०८ खेडीं आहेत. यांत बुंदेलखंडी व तिच्या पोटभाषा चालतात. संस्थानांत फारसा व्यापार नाहीं. संस्थानचें उत्पन्न सुमारें पांच लाख आहे. १८ व्या शतकांत पन्ना संस्थानातील एका सरदारानें हें राज्य त्या संस्थानातीलच कांहीं मुलुखांवर स्थापिलें. पुढें ब्रिटिश सरकारनें १८०६ त त्यास मान्यता दिली. या संस्थानिकाला वंशपरंपरेची 'महाराजा' पदवी व ११ तोफांची सलामी आहे. हल्लींचे महाराज भवानीसिंग देवबहादूर १९३२ सालीं गादीवर बसले. संस्थानिक पोवार किंवा परमार वंशांतील आहेत. हें संस्थान आतां विंध्य प्रदेश संघांत सामील झालें आहे.

संस्थानांत खजुराहो देवळावरील शिल्प प्रेक्षणीय आहे. महोब्यांत चंदेल लोकांच्या वास्तूचे अवशेष आहेत. राजगड राजवाडा, गंगाव धरण, राणेह धबधबा व कांहीं तलाव हे पाहण्यालायक आहेत. छत्तरपूर शहर पन्नाच्या छत्रसालनें १७०७ मध्यें वसविलें. येथें गोसाव्यांचीं स्मारकें आहेत. लो. सं. सु. बारा हजार.



**छत्तारीचे नवाब, सर महंमद अहमद सैदखान** (१८८८– )—एक मुसलमान पुढारी. यांचें शिक्षण अलीगड एम्. ए. ओ. कॉलेजमध्यें झालें. १९२३ मध्यें हे अखिल भारतीय रजपूत मुसलमान परिषदेचे अध्यक्ष होते. हे संयुक्त प्रांत कायदेमंडळाचे १९२० ते २५ मध्यें सभासद होते. बुलंद शहर जिल्ह्याचे हे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष म्हणून निवडून आले. १९२३–२५ मध्यें संयुक्त प्रांतांत उद्योगधंदेमंत्री होते व १९२६ ते ३३ पर्यंत गृहमंत्री होते. जून १९२८ मध्यें हे तात्पुरते गव्हर्नर होते. पहिल्या व दुसऱ्या गोलमेज परिषदेचे हे सभासद होते. एप्रिल १९३३ मध्यें यांची पुन्हां गव्हर्नर म्हणून तात्पुरती नेमणूक झाली. कांहीं काळ हे दक्षिण हैद्राबादच्या निझाम सरकारच्या कौन्सिलचे अध्यक्ष होते.

***छत्तिसगड विभाग***—हा मध्यप्रांताच्या पूर्वेकडील एक विभाग असून याचें क्षे. फ. २७,७४२ चौ. मै. व लो. सं. ५५,९२,६२१ आहे. यांतून महानदी वाहत जाते. या विभागांत द्रुग, रायपूर व बिलासपूर या तीन जिल्ह्यांचा समावेश होतो. या विभागावर १८५० पर्यंत रतनपूरच्या हैहयवंशीय घराण्याचें राज्य होतें. यांतील लोक शेंकडा ९० हिंदू असून ८ वन्य आहेत व या लोकांस 'छत्तिसगडी' अशी संज्ञा आहे. यांची भाषा हिंदी आहे. या विभागाचा कमिशनर रायपूर येथें राहतो. यांत ७ गांवें व १०,१२८ खेडीं आहेत.

**छत्रसाल** (सु. १६५०–१७३३)—बुंदेलखंडाचा एक राजा. याच्या बापाचें नांव चंपतराय. बाप वारल्यावर कांहीं दिवसांनीं बुंदेल्यांचें स्वातंत्र्य कायम ठेवण्याचें काम त्यानें उचललें. याच सुमारास दक्षिणेंत शिवाजीने स्वराज्यस्थापनेचा प्रयत्न चालविला होता. छत्रसालनें शिवाजीची भेट भीमेच्या कांठीं घेतली. तेव्हां शिवाजीनें त्याला हिंदुराज्य स्थापण्याबद्दल प्रोत्साहन दिलें व एक तरवार बक्षीस दिली. नंतर छत्रसालने औरंगजेबाशीं फटकून वागण्याचा क्रम आरंभला. तेव्हां त्यानें त्याच्यावर फिदाईखान यास पाठविलें असतां छत्रसालनें त्याला पिटाळून लाविलें. याप्रमाणें छत्रसालचा पराक्रम पाहून जे इतर बुंदेले राजे मुसलमानांस मिळाले होते, तेहि छत्रसालास येऊन मिळाले. त्यांच्या साह्यानें त्यानें आपलें राज्य वाढविलें व सर्व बुंदेलखंड जिंकला. नुसते हिंदु राजेच नव्हत तर (आसपासचे) मुसलमान सरदारहि त्याचे मांडलिक बनले. तेव्हां औरंगजेबानें छत्रसालशीं मैत्रीचा तह केला. छत्रसालानें पन्ना येथें आपली राजधानी

केली. पुढें मराठ्यांनीं माळवा काबीज करून दिल्लीला शह देण्याचें काम चालू केलें, तेव्हां उघडपणें छत्रसाल त्यांना मिळाला (१७२९). म्हणून महंमदशहानें भरपूर सैन्य देऊन महंमदखान बंगश यास छत्रसालावर पाठविलें. छत्रसाल व त्याची दोन मुलें यांनीं जोरानें त्याला तोंड दिलें. परंतु बंगशची फौज अतिशय असल्यानें जैतपूर येथें त्याचा पराभव झाला व वृद्ध छत्रसाल जखमी झाला (१७२९).

या वेळीं थोरला बाजीराव माळव्यांत होता. त्याला छत्रसालानें मोठ्या विनवणीचें पत्र पाठविलें. तेव्हां बाजीराव तावडतोब धामोरा येथें छत्रसालाला भेटला. नंतर उभयतां बंगशवर चालून जाऊन त्यांनीं त्याचा जैतपूर येथें पुरा धुव्वा उडविला. या मदतीबद्दल छत्रसालनें बाजीरावास झांशी प्रांत दिला व बाजीरावास आपला तिसरा पुत्र मानून त्यानें आपल्या राज्याचा तिसरा हिस्सा (३३ लाखाची जहागीर) पुढें त्यास बक्षीस दिला.

**छत्राकृति वर्ग**—[अंब्रेलीफेरी]. हा एक वनस्पतींचा स्वतंत्र महत्त्वाचा वर्ग आहे. या वर्गांतील वनस्पतींस छत्रीसारखीं फुलें येतात. या वनस्पती बहुधा उत्तर गोलार्धांतील उत्तरेकडील प्रदेशांत होतात, व त्या बहुतेक (हेमलॉकसारख्या) फार विषारी असतात. कांहीं गाजरें वगैरेसारख्या गरदार असतात. कांहींपासून (बडीशेप वगैरे) सुगंधी द्रव्यें मिळतात, तर कांहींपासून (हिंग वगैरे) राळेसारखा निर्यास मिळतो.

**छत्री**—प्रथम छत्रीचा उपयोग ऊन लागूं नये म्हणून करीत; व उष्ण कटिबंधांतच ऊन व पाऊस यांच्या निवारणार्थ छत्रीचा विशेष प्रसार असे. नंतर छत्री (छत) हें राजचिन्ह होऊन बसलें. ब्रह्मदेशादि पूर्वराष्ट्रांत छत्री हें समाजांतील विशिष्ट दर्जाचें चिन्ह असे. मराठेशाहींत 'छत्रपति' ही सार्वभौम बहुमानाची पदवी धारण करण्यांत राजांना भूषण वाटे. छत्री घेण्याचा मान राजांकडून विशिष्ट लोकांना दिला जात असे.

ग्रीक व रोमन लोकांत बायकाच फक्त छत्र्या वापरीत. पुरुषानें छत्री वापरणें स्त्रैणपणाचें समजत. दक्षिण युरोपांत छत्र्या फार प्राचीन काळापासून प्रचारांत असत. पण इंग्लंडांत १७ व्या शतकापर्यंत छत्र्यांचें अस्तित्व भासत नव्हतें.

युरोपांत पहिल्या छत्र्या पौरस्त्य छत्र्यांबरहुकूम करण्यांत येत. त्यांना लांब दांडा असून बहुधा वेताच्या किंवा देवमाशाच्या हाडांच्या काड्या बसविलेल्या असत. कापड तेल्या रेशमाचें किंवा साधें असून तें फार जाड असे. नंतर तेलकापडाबद्दल जिंगहॅम वापरूं लागले. १८४८ त विल्यम सँगस्टननें छत्रीला आच्छादन म्हणून अल्पाकचा उपयोग करण्याचें पेटंट मिळविलें. छत्रीचें रेशमी कापड मुख्यतः लिऑन्स व क्रेफेल्ड या ठिकाणीं होतें. हल्लीं छत्र्यांच्या बाबतींत फारच सुधारणा व सोयी घडून आल्या आहेत.

**छत्री**—(मश्रुम). अळंबें पहा. कुत्रीसारखीं हीं अनेक प्रकारचीं लहानमोठीं झाडें आहेत. यांपैकीं कांहीं खाण्यासारखीं असतात. कांहीं विषारी असतात. यांचें शरीर तंतुमय असतें. यांपैकीं कांहींची खाण्याकरितां लागवड करण्यांत येते व तीं लोणच्यांत वगैरे घालण्यांत येतात.

**छत्रे, केरो लक्ष्मण** (१८२४-१८८४)—एक महाराष्ट्रीय गणित-ज्योतिषशास्त्रज्ञ. महाराष्ट्रांत इंग्रजी सत्ता आल्यावर पाश्चात्य विद्येंत निपुण अशी जी मंडळी झाली तींत केरोपंत हे नामांकित होते. मुंबईच्या दक्षिणेस १३ कोसांवर अष्टागर प्रांतांत नागांव या गांवीं यांचा जन्म झाला. यांचें इंग्रजी भाषेचें शिक्षण मुंबईस झालें. मुंबईस कुलाबा दांडीवर वेधशाळा इ. स. १८४० त झाली, तींत हे दुय्यम अधिकारी होते. नंतर पुण्यास नॉर्मल स्कुलांत दुय्यम प्रोफेसर झाले. कांहीं दिवस अहमदनगर येथें इंग्रजी शाळेंत हेडमास्तर होते. नंतर पुण्यास १८६५ मध्यें गणितशास्त्राचे प्रोफेसर झाले. १८७९ त ते सेवानिवृत्त झाले. यांचे ग्रंथ—ग्रहसाधनाचीं कोष्टकें व तिथिचिंतामणि. शिवाय मराठी शाळांत उपयोगी अशीं पदार्थविज्ञानशास्त्र आणि अंकगणित हीं दोन पुस्तकें त्यांनीं केलेलीं आहेत.

**छत्रे, विष्णु मोरेश्वर** (१८४०-१९०६)—महाराष्ट्रांतील पहिले सर्कसकार. यांचा जन्म तासगांवच्या पटवर्धनांचे आश्रित बसणीकर छत्र्यांच्या कुळांत झाला. लहानपणीं विष्णु फार उनाड असे. पशुपक्ष्यांशीं खेळण्याचा त्याला विलक्षण नाद असे. घोड्यावर बसण्यांतहि तो पटाईत होता. गाणें शिकण्याकरितां विष्णु ग्वाल्हेरला गेला व प्रसिद्ध गवई रहिमतखां यांचे वडील दादखां यांजजवळ राहिला व तेथेंच अश्वविद्या शिकला. मुंबईतील विल्सनसाहेबांची सर्कस पाहून आपण सर्कस काढावी असें विष्णुपंतांस वाटलें. इ. स. १८८३ त त्यांच्या सर्कशीस सुरुवात झाली. त्यांत घोड्यांचीं कामें फार अप्रतिम होत. पुढें सर्व हिंदुस्थानांत विष्णुपंतांच्या सर्कशीनें नांव मिळविलें. पण खुद्द त्यांना दारू व कलावंतिणी यांचें जबर व्यसन जडून आपले धाकटे बंधु काशीनाथपंत यांच्या हवालीं त्यांनीं सर्कस केली. सर्कस सोडल्यावर विष्णुपंतांचें राहिलेलें आयुष्य ऐषारामांत गेलें. इंदुरास मधुमेहाच्या विकारानें त्यांस देवाज्ञा झाली.

**छत्रे, सदाशिव काशीनाथ** (१७८८-१८३०)—एक महाराष्ट्र ग्रंथकार. यांस लोक बापू छत्रे म्हणत. यांची जन्मभूमि मुंबई, वाळुकेश्वरनजीक; यांचें संस्कृत व मराठी अध्ययन चांगलें झालें होतें व हे एका मिशनऱ्याजवळ इंग्रजीहि शिकले. मुंबई इलाख्यांत प्रथमतः शाळा स्थापन

करणें हें काम इंग्रज सरकारांतून सुरू करतांना कर्नल कौपर व जर्विस यांना मदत करणारे हेच होत. यांनीं कांहीं ग्रंथ इंग्रजींतून चांगल्या प्रकारें मराठींत उतरले. त्यांपैकीं मुख्य बाळमित्र, इसापनीति, आणि वेताळपंचविशी हे होत. रा. ब. दादोबा पांडुरंग यांनीं आपल्या मोठ्या व्याकरणाच्या प्रस्तावनेंत मराठी भाषेंतील गद्यात्मक ग्रंथाचे जनक अशी यांना पदवी दिली आहे. यांची भाषा फार सुबोध व रसाळ आहे.

**छंदःशास्त्र**— हें एक पद्यरचनाशास्त्र आहे. याला व्याकरणाचा एक भाग समजतात. यांत शब्दांवर आघात, अक्षरांची संख्या, पद्यरचनेचे नियम यांचें विवेचन असतें. ग्रीक आणि रोमन कवितेंतील मुख्य तत्त्व म्हणजे लघु आणि गुरु अक्षरांचा समन्वय होय. अक्षरांच्या किंवा मात्रांच्या मूल्यावर कविता अवलंबून असे. आधुनिक जर्मन, स्पॅनिश, इटालियन, वगैरे पाश्चात्य भाषांत कवितेंतील ओळींतील अक्षरें फक्त मोजतात; गणाप्रमाणें रचना करीत नाहींत. इंग्रजी पद्यांत आघातांवर लय अवलंबून असतो. इंग्रजी कवितेचे पांच मुख्य चरण ( मेझर ) आहेत.— आयँबिक ( ˘ — ), ट्रोकॅइक ( — ˘ ), ॲनॅपोएस्टिक ( ˘˘ – ), डॅक्टिलिक ( — ˘˘ ) व ॲंफिब्राइक. ( ˘ – ˘ ).

वेदांतील बहुतेक सर्व मंत्र छंदोबद्ध किंवा पादबद्ध असतात, म्हणजे ते मंत्रवृत्तांत रचलेले असतात आणि त्याला चरण असतात. कांहीं विशिष्ट वैदिक कर्मानुष्ठानें अमुक एक छंदांत वर्णिलेल्या मंत्रांनींच करावींत असें सांगितलेलें असतें. वेदांत मुख्यतः सात वृत्तें येतात. १ गायित्री, २ उष्णिक, ३ अनुष्टुप्, ४ बृहती, ५ पंक्ती, ६ त्रिष्टुप्, ७ जगती, अशीं सात वैदिक वृत्तें आहेत. वृत्तांवर अति प्राचीन असा ग्रंथ 'छंदोविवृत्ति' पिंगल मुनीनें लिहिला आहे. हाच वेदांग होय.

छंदःशास्त्राचा प्रथम अभ्यास पिंगलाचार्यांनें करून खालील सूत्रें किंवा सिद्धान्त काढले : (१) लघु अक्षराची एक व गुरु अक्षराच्या दोन मात्रा मानाव्या. (२) पद्याचे अक्षरछंद, अक्षरगणछंद, मात्रागणछंद व मात्राछंद असे चार प्रकार पाडावेत. (३) अक्षरछंदांचें नियमन अक्षरसंख्येनें करावें. (४) अक्षरगणछंदांचें नियमन 'मयरसतजभन' हे त्र्यक्षरी आठ गण व लघुगुरु अक्षरें यांनीं करावें. (५) मात्रागणछंदांचें नियमन 'भजसमन' या चतुर्मात्रिक पांच गणांनीं करावें. (६) मात्राछंदांचें नियमन मात्रा व त्र्यक्षरी गण यांनीं करावें.

पद्याचे वृत्त व जाति असे दोन प्रकार पडतात. या संस्कृत छंदःशास्त्राप्रमाणेंच मराठींत पद्यरचना होते. पण कै. माधवराव पटवर्धन यांनीं मराठी छंदोरचनेच्या बाबतींत नवे नियमन तयार केलें व कांहीं अर्वाचीन कवी त्याला अनुसरून काव्यरचना करतात.

**छप्पन देश**—पूर्वी भरतखंडांत छप्पन देश होते असें ग्रंथकार मानीत. दक्षिण हिंदुस्थानांत अशी एक जुनी कल्पना प्रचलित आहे कीं, हिंदुस्थानांत एकंदर छप्पन देश असून त्यांचे छप्पन राजे आहेत. या छप्पन देशांचीं नांवें पुढीलप्रमाणें आहेतः— १ अंग, २ अरुण, ३ अवंति, ४ आंदिर, ५ इलाड ( लाट ), ६ ओदिय, ७ करुप, ८ कलिंग, ९ कन्नड, १० कन्नाड, ११ काश, १२ काश्मीर, १३ कंभार, १४ कंबोज, १५ किडार, १६ कुरुकु, १७ कूडक, १८ कुंतल, १९ कुरु, २० कुलिंद, २१ कू(गुर्ज)र्चर, २२ केकय, २३ केरल, २४ कोंगन (कोंकण?), २५ कोल्ल ( कोळवण ), २६ कोसल, २७ शक, २८ शबर, २९ शाल्व, ३० सिंग(ह?)ल, ३१ सिंधु, ३२ शीन ( सेन ), ३३ शूरसेन, ३४ शोल ( चोल ), ३५ शोनक, ३६ दिराविड ( द्रविड ), ३७ तुळुव, ३८ तेंगन, ३९ निदद ( निषाद? ), ४० नेपाल, ४१ पप्पर, ४२ पल्लव, ४३ पांचाल, ४४ पाण्ड्य, ४५ पुलिंद, ४६ पोड ( पौण्ड्र? ), ४७ मगध, ४८ मत्स्य, ४९ मरात, ५० मल्याळ, ५१ मालव, ५२ यवन, ५३ युगन्द, ५४ वङ्ग, ४५ वङ्गाल ( बंगाल ), आणि ५६ विदर्भ.

**छप्पन्न भाषा**—जुन्या वाङ्मयांतून छप्पन भाषांचा उल्लेख नेहमीं येतो. या भाषांची यादी अशी—१ संस्कृत, २ गीर्वाण, ३ व्रज, ४ बाल, ५ चाल, ६ हिंदुस्थानी, ७ यवनी, ८ मुसलमानी, ९ तुर्की, १० मोंगली, ११ फारसी, १२ अरबी, १३ इराणी, १४ गुजराथी, १५ कच्छी, १६ हलाई, १७ सिंधी, १८ मुलतानी, १९ मारवाडी, २० चारणी, २१ काव्य गुजराथी, २२ खानदेशी, २३ बालेघाटी, २४ महाराष्ट्री, २५ पंजाबी, २६ पुर्वी, २७ बंगाली, २८ ओड्या, २९ नागरी, ३० कानडी, ३१ तैलंगी, ३२ कामाठी, ३३ कोमटी, ३४ द्राविडी, ३५ तामिळी, ३६ मद्रासी, ३७ मलबारी, ३८ लातीन, ३९ ग्रीक, ४० फ्रेंच, ४१ जर्मनी, ४२ रशियन, ४३ फिरंगी, ४४ यहुदी, ४५ गोवेकरी, ४६ कोंकणी, ४७ चिंगळी, ४८ सैलानी, ४९ काफरी, ५० हेटकरी, ५१ कातवडी, ५२ भल्ली, ५३ वडारी, ५४ वेलदारी, ५५ कोळी, आणि ५६ महारी.

**छप्पर**—ज्या प्रकारची इमारत असेल त्याप्रमाणें छप्पराचेहि प्रकार निरनिराळे असूं शकतात. सपाट छप्पर करावयाचें असलें म्हणजे तुळयांवर कड्या घालून त्यावर आच्छादन टाकतात. एकपाखी छपरामध्यें वासे तिरपे घालण्यांत येतात. दुपाखी छपरामध्यें पाठाळू घालून तिच्या दोन्ही बाजूंस तिरपे वासे

घालण्यांत येतात. जर या तिरप्या वाशास मध्यें आडव्या वाशानें जोडलें तर त्यास जोड वाशांचें छप्पर म्हणतात. १२ ते १८ फूट रुंदीच्या घरावर अशा तऱ्हेचें छप्पर घालतां येतें. याखेरीज दोन वाशांस जोडणारा आणखी एक वासा मध्यभागीं दिला तर त्यास कैंची ( ट्रस ) म्हणतात व त्या छप्परास कैंचीचें

कैंच्यांचे प्रकार

[ डावीकडून उजवीकडे एकाखालोखाल—१ व ५ एकखांबी कैंची. २ दुखांबी कैंची. ३ कैंचीचें छप्पर. ४–९ दुखांबी कैंचीचे प्रकार. १० उत्तर प्रकाशी छप्पर कैंची. ११ पन्याच्या छप्पराची कैंची. १२ लांब घईची कैंची. १३ धनुर्ज्या कैंची. ]

छप्पर म्हणतात. ३० फूट रुंदीच्या घरावर कैंची घालावयाची असल्यास आडव्या वाशाच्या मध्यापासून तिरप्या वाशाच्या जोडापर्यंत एक उभा खांब देण्यांत येतो व दोन तिरपे धीर त्याच मध्यापासून आडव्या वाशाच्या मध्यापर्यंत देण्यांत येतात. या मधल्या खांबास राजा खांब कैंची ( किंग पोस्ट ट्रस ) म्हणतात. असेच दोन खांब मध्यापासून कांहीं अंतरावर दिले व ते एका आडव्या धिरानें जोडले तर त्यास राणी खांब कैंची ( क्वीन पोस्ट ट्रस ) म्हणतात. अशाच तऱ्हेनें लांकडाऐवजीं लोखंडाचे मोठमोठे गज किंवा पट्टया वापरून अधिकाअधिक रुंद कैंच्यांची योजना करण्यांत येते.

छप्पूपाणी—लहान मुलींचा खेळ. डाव असणारी मुलगी बाकीच्यांस धरण्यास धांवते. आपणास धरते आहे असें वाटल्यावरून उभी असलेली मुलगी खालीं बसते व डाव असणारी मुलगी छप्पूपाणी म्हणून तिच्या डोक्यावर हात ठेवते. मग एखाद्या उभ्या असणाऱ्या मुलीनें तिला हात देऊन उठविण्याचा प्रयत्न करावा. अशा वेळीं किंवा इतर वेळीं जर डाव असणारी मुलगी एखादीस शिवली तर तिच्यावर डाव येतो.

छत्रा—राजपुतान्याच्या टोंक संस्थानच्या परगण्यांपैकीं एक परगणा. कांहीं राजकीय कारणाकरितां हें ठिकाण ग्वाल्हेर येथील रेसिडेंटच्या ताब्यांत आहे. याचें क्षेत्रफळ ३०८ चौ. मै. आहे. छत्रा परगणा पहिल्यानें खिची चव्हाण रजपुतानीं वसविला. या घराण्यांतील गुगल नांवाच्या रजपुतांनीं येथें एक किल्ला बांधला. इ. स. १८ व्या शतकाच्या शेवटीं हा प्रदेश यशवंतराव होळकर याच्या ताब्यांत गेला. इ. स. १८१६ त होळकरानें अमीरखान यास दिला व इ. स. १८१७ सालीं तहामध्यें इंग्रज सरकारनें याचा ताबा अमीरखानाकडे दिला. यांत गहूं, ज्वारी, मका, व खसखस होते. या प्रदेशांतून जी. आय्. पी. रेल्वेची एक शाखा गेलेली आहे.

छत्रा शहर—परगण्यांतलि मुख्य ठिकाण असून छत्रा स्टेशनापासून एक मैलावर आहे. यांत खिची लोकानीं. इ. स. च्या १५ व्या शतकांत बांधलेला एक भक्कम किल्ला आहे.

छळ—( टॉर्चर ). आरोपी इसमांकडून गुन्ह्यासंबंधींचा पुरावा मिळावा म्हणून त्यांचा सरकारी नोकरांनीं छळ करणें हा प्रकार कायदेविषयक इतिहासांत प्राचीन काळापासून आढळतो, आणि आतां पाश्चात्य देशांत तो पूर्णपणें बंद झालेला आहे. प्राचीन रोमन कायद्यांत हा प्रकार होता, आणि त्यानंतर मध्ययुगीन युरोपांतल्या कायदेपद्धतींतहि तो शिरला. इंग्लंडांतील कायद्यांत रोमन दिवाणी कायदा ( सिव्हिल कोड ) मान्य करण्यांत आला नसल्यामुळें इंग्लंडच्या कायद्यांत मात्र एकंदरीनें या छळाच्या प्रकारांना स्थान मिळालेलें नाहीं; व ही इंग्लंडला मोठी अभिमानाची गोष्ट समजतात. मात्र इंग्लंडांतहि एका गुन्ह्याच्या बाबतींत असला छळाचा प्रकार मान्य केलेला होता. तो प्रकार असा—मोठ्या गुन्ह्याच्या आरोपीनें, "माझ्या गुन्ह्याची चौकशी ईश्वरानें व माझ्या देशानें ( बाय गॉड ॲन्ड माय कंट्री ) करावी अशी माझी इच्छा आहे" हे शब्द उच्चारण्याचें नाकारल्यास त्या आरोपीला जड जड लोखंडी वजनें शरीरावर ठेवून त्याच्या भारानें ठार मारावें, असा कायदा होता. पण १७७२ सालीं हा अत्यंत क्रूरपणाचा कायद्यांतला नियम रद्द करण्यांत आला. चौथ्या एडवर्डच्या कारकीर्दींत आरोपीचा छळ करण्यास कायद्यानें मान्यता देण्यांत आली. पण इंग्लंडांतील सामान्य कोर्टांत हा प्रकार अमलांत येत नसे. पण प्रिव्ही कौन्सिल, आणि नंतर स्टार चेंबर कोर्ट या वरिष्ठ न्यायकोर्टांनें या प्रकाराचा अवलंब सरसहा केलेला आढळतो. दुसऱ्या चार्लस राजाच्या कारकीर्दींत ड्यूक ऑफ यॉर्क अधिकारावर असतांना

असलें छळांचे प्रकार पुष्कळ झाले. त्याच्यापूर्वी १७ व्या शतकांत राजकैदी आणि चेटक्या यांचा अशा प्रकारें छळ करीत असत व तो परमावधीला गेलेला होता. असा छळ करण्याची नेहमींचीं साधनें कैची (रॅक), खोडा (बूट), आणि अंगठ्याला लावण्याचा चाप, इ. असत.

हिंदुस्थानांत न्यायदानाला उशीर लागत नसल्यानें आरोपी फार दिवस न्यायनिर्णयाखेरीज राहत नसतो. कबुली जबाबाला छळ होत असे असें फारसें दिसत नाहीं. राजकीय कैद्यांना किल्ल्यावर टाकीत; तथापि त्यांना बऱ्याच सवलती देत.

**छातीची धडधड**—मनुष्याला जेव्हां आपल्या हृदयाच्या धडधडीची जाणीव होते अशा वेळीं हृदय फार जलद उडूं लागतें आणि त्यामुळें अस्वस्थता व बेचैन उत्पन्न होते. अति धडधड होऊं लागली म्हणजे कातडीचा रंग फिक्कट किंवा अधिक लाल होतो आणि घाम सुटतो. केव्हां केव्हां वेदना होऊं लागतात आणि हृदयाचा वरील भाग नाजूक वाटूं लागतो. कांहीं भावनावश लोकांमध्यें विशेष भावनांचा उद्वेग झाला असतां अशी अवस्था उत्पन्न होते. अतिश्रम, ताप, रक्तक्षय वगैरेंमुळेंहि धडधड होते.

**छापखाने**— मुद्रणशास्त्र, मुद्रणालयें पाहा.

**छायानट**—हा राग कल्याण थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोहावरोह सात स्वरांनीं होतो म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी ऋषभ आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर आहे. या रागांत दोनहि मध्यमांचा प्रयोग होतो. तीव्र मध्यम फक्त आरोहांतच घेतात, व शुद्ध मध्यम आरोहांत व अवरोहांत येतो. या रागांत निषाद व गांधार या स्वरांना अनुक्रमें आरोह व अवरोह यांत वक्रत्व आहे. अवरोहांत कोमल निषाद स्वराचा प्रयोग विवादी या नात्यानें केलेला दृष्टीस पडतो.

**छायायंत्र**—सूर्यप्रकाशांत सूर्याच्या छायेवरून दिवसमान मोजण्याचें यंत्र. (घड्याळ पाहा) एक तास व त्याचे विभाग पाडलेल्या पृष्ठभागावर पृथ्वीच्या आंसाशीं समांतर अशा रीतीनें शंकू उभा करितात. सूर्य जसजसा पश्चिमेकडे जातो तसतशी शंकूची छाया सूर्याच्या विरुद्ध बाजूस त्याच दिशेनें फिरत राहते. ती छाया ज्या आंकड्यांवर पडते त्यावरून वेळ काढतात. हें घड्याळ फार प्राचीन काळीं वापरांत होतें. उज्जनी व दिल्ली येथें अद्यापि भक्कम बांधकामाचें केलेलें जुनें छायायंत्र दिसून येईल.

**छिंदवाडा**—मध्यप्रांत, नागपूर विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ७,९२२ चौ. मैल. तीन पठारें मिळून हा जिल्हा बनला आहे. हवा थंड व निरोगी आहे. लो. सं. (१९४१) १०,३४,०४०. वन्य जाती शें. ३० आहेत. शें ७५ लोक शेतकीवर राहतात. जमीन रेताड आहे. गहूं, ज्वारी, तीळ, मका, इ. पीक येतें. जिल्ह्यांत कापड चांगलें निघतें. पूर्वीचे राजे गवळी होते; नंतर गोंडांनीं राज्य बळकावलें. भक्त बुलंद नांवाचा देवगडचा गोंड राजा मुसलमान झाला. त्यानें राज्याचा विस्तार वाढविला व नागपूर शहर वसविलें. पुढें राज्य मराठ्यांनीं घेतलें. १८१८ त हा मुलूख इंग्रजांकडे आला.

छिंदवाडा शहर पठारावर वसलें आहे. गांवचा संस्थापक कोणी रतन रघुवंशी होता. लो. सं. सु. पंधरा हजार. येथें कापड निघतें.

**छिंपा**—एक रंगारी जात. छिंपा व छिपी अशीं दुसरीं नांवें आहेत. यांच्यांत सर्व धर्मांचे लोक आहेत. हे लोक चिटें छापतात; व कपड्यांना मंजिष्ठाचा रंग देण्याचेंहि काम करतात. कांहीं कपडे धुणारे परीट आहेत. मुंबई इलाख्यांत गुजराथी भागांत सुमारें १५ हजार छिंपा आहेत. हे लोक वैष्णवधर्मी आहेत. यांच्यांत पुनर्विवाहाची चाल आहे. बाकीच्या चालीरीती वाण्यांच्याप्रमाणेंच आहेत.

**छीटकाम**—विणलेल्या कापडावर निरनिराळ्या तऱ्हेच्या आकृती किंवा चित्रें छापणें, या कलेस छापकाम अथवा छीटकाम म्हणतात. ही कला इंग्लंडमध्यें १६७६ सालीं आली. या कामांत सध्यां निरनिराळ्या आकृती खोदलेले छापणारे रूळ वापरण्यांत येतात व जितके रंग छापावयाचे असतील तितके निरनिराळे रूळ करून रंग छापण्यांत येतात. या निरनिराळ्या रंगांच्या रूळांखालून कापड गेलें म्हणजे त्या सर्व रंगांची मिळून होणारी आकृति उठते. या क्रियेमध्यें दोन पद्धती असतात. एका पद्धतींत कापडावर प्रथम एखादा रंगबंधक (मॉर्डंट) अथवा चिकट पदार्थाचा ठसा उठविण्यांत येतो व त्यानंतर त्या ठशावर रंग उठविण्यांत येतो. दुसऱ्या पद्धतींत कापडावर प्रथम रंगाचे ठसे उठविण्यांत येतात आणि ते मागाहून वाफेच्या साहाय्यानें पक्के करण्यांत येतात. या दुसऱ्या पद्धतींत वाटेल तितके रंग उठवितां येतात. हे रंग पक्के करण्याकरितां अल्युमिनम्, कथील, क्रोमियम किंवा लोखंडाचे रंगबंधक वापरण्यांत येतात.

उत्तर हिंदुस्थानांत छीटकाम पुष्कळ होतें. दुलया, परकर, अंगरखे, पडदे, इ. चें कापड छीटकाम केलेलें व सुबक असतें. पण हें सर्व हातानें केलेलें असतें. आतां यंत्राच्या साहाय्यानें वाटेल ती नक्षी लवकर काढतां येते व रंगहि विविध प्रकारचे भरतां येतात.

**छोटा उदेपूर**— मुंबई, रेवाकांठ संस्थानांतील एक संस्थान. याचें क्षेत्रफळ ८९० चौ. मैल. लो. सं. १,६२,१४५ आहे. या

संस्थानच्या भागांतून ओर्सिंग नदी वाहत जाते व दक्षिण सरहद्दीवरून नर्मदा वाहते. १४८४ त पावागड पडल्यानंतर लवकरच या संस्थानची स्थापना झाली. या संस्थानचें राजघराणें खिची चौहाण रजपूत आहेत. येथील राजास महारावळ म्हणतात. सध्यांचे महाराज श्रीनटवरसिंहजी १९२३ त गादीवर बसले, त्यांस ९ तोफांच्या सलामीचा मान आहे. कांहीं दिवस या संस्थानची राजधानी मोहन हें शहर होतें व म्हणून त्यास मोहन संस्थानहि म्हणतात. पुढें येथील संस्थानिक गायकवाडांचा मांडलिक झाला व स. १८२२ त इंग्रज सरकारास याचें राजकीय वर्चस्व मिळालें. यांत एक गांव व ३८३ खेडीं आहेत. यांत कापूस व तीळ यांचें पीक होतें. याच्यांत मँगॅनीज, लोखंड व संगमरवरी दगडाच्या खाणी आहेत. संस्थानचें उत्पन्न १७ लाख रु. आहे. या संस्थानिकाला बडोदें सरकारास इंग्रजांमार्फत सालिना ८९०८ रु. खंडणी द्यावी लागते. गड बोरियद हें संस्थान याला जोडलें आहे. त्याचें क्षेत्रफळ १२६ चौ. मै. असून लो. सं. १३,१२० आहे. हें संस्थान आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

**छोटा नागपूर**— हा बिहार प्रांताचा एक विभाग असून रांची हें याचें मुख्य ठिकाण आहे. यांत हजारीबाग, रांची, पलामौ, मानभूम व सिंगभूम या पांच जिल्ह्यांचा समावेश होतो. या विभागाचें क्षेत्रफळ २७,११२ चौ. मै. व लो. सं. ७५,१६,३४९ आहे.

या विभागांत १४ गांवें व २४,७५९ खेडीं आहेत. यांत कोळसे व अभ्रक हीं सांपडतात. पारसनाथ टेकडीवर जैन देवालयें असून तेथें हजारों यात्रेकरू तीर्थयात्रेस जातात.

---

## ज

**ज**—या वर्णाला चार अवस्थांतून जावें लागलें. १ ली गिरनारच्या लेखांत; २ री इ. स. २ च्या शतकांतल्या शक उषवदात याच्या नाशिक लेखांत; ३ री राजा दुर्गगणाच्या झाळपाटण येथील लेखांत (इ. स. ६८९); व शेवटची ११ व्या शतकांतल्या उज्जनीच्या लेखांत दिसून येते.

**जकात**—देशांत बाहेरून येणाऱ्या मालावर बसविलेला कर. खुल्या व्यापाराच्या तत्त्वामुळें इंग्लंडांत जकातीचा माल चहा, दारू, साखर यांसारख्या थोड्याच जिनसा असत. पुष्कळ देशांतून सर्वच मालावर जकात बसविलेली असते. हेतु असा की, देशांतील उद्योगधंदे वाढावेत. हिंदुस्थान सरकारचें या जकातीचें उत्पन्न १९४५-४६ सालीं पंचावन्न कोटी, पंचवीस लक्ष होतें. तें पुढें दुप्पटीनें वाढविण्याचें धोरण अंदाजपत्रकांत दिसून येत होतें.

इंग्रजी अमदानीपूर्वी मालाची ने-आण वाटेनें होई. तिच्यावर बसविलेल्या करास जकात म्हणत. जकात आपण बसवितों, तर सडका केल्या पाहिजेत किंवा वाटेनें सुरक्षितेची हमी घेतली पाहिजे ही जाणीव पूर्वी जागृत झाली होती असें वाटत नाहीं. कोणताहि माल जकातीवांचून सुटत नसे. पदार्थांप्रमाणें जनावरांवरहि जकात असे. इतर पदार्थांच्या विक्रीप्रमाणें मनुष्याच्या विक्रीवरहि जकात असे. कल्याण, भिवंडी, पुणें, जुन्नर यांसारख्या जकातसुभ्यांचें उत्पन्न चांगलें असे. पुणें सुभ्याचें उत्पन्न एक लाखापर्यंत गेलें होतें.

इंग्रजी अमदानींत १८५७ च्या क्रांतियुद्धापूर्वी ही जकात ५ टक्के असे. पुढें सरकारच्या उत्पन्नासाठीं ती १० ते २० पर्यंत माल पाहून वाढविण्यांत आली. पण लँकाशायर कारखानदारांच्या ओरडीमुळें १८८२ सालीं सर्व जकात बंद केली. पण उत्पन्नांत घट झाल्यामुळें १८८४ सालीं पुन्हां २ टक्के जकात ठेवावी लागली. १९४२ पासून २० टक्के अधिक कराची लादणी सुरू झाली. दारू, तेलें, मोटार गाड्या, सायकली, यंत्रें, साखर, तंबाकू, कापूस, रेशीम, कापड, धातू, खाद्यपदार्थ, इ. मालावर जकात आहे.

**जकात चोरी**— (स्मगलिंग). बाहेरून आंत येणारा व आंतून बाहेर जाणारा जो माल त्यावर जर जकात असेल तर ती चुकवून माल चोरून नेण्याची वहिवाट सर्वत्र व जुन्या काळापासून आहे. विशेषतः जेव्हां जकात भारी असते तेव्हां तर ही चोरी अधिक प्रमाणांत होते. दारू, तंबाकू, अफू, चहा, इ. माल या चोरींत प्रामुख्यानें आढळतो. या चोरीच्या गुन्ह्याला सरकारची कडक शिक्षा आहे. चांचेगिरी (पाहा) ही जकात चोरीच आहे.

**जकातवसुलीच्या मालाची कोठी**— (बाँडेड वेअर हाउस). यामध्यें ज्यावर जकात घ्यावयाची असते असा माल भरलेला असून तो सरकारच्या ताब्यांत असतो. ज्याच्यासाठीं तो माल असतो तो असें लिहून देतो कीं, मी जकात भरल्याखेरीज हा माल हालविणार नाहीं. मोठाल्या औषधांच्या कारखान्याशेजारीं अशा कोठ्या असतात व त्यावर सरकारी देखरेख असते.

**जकातीचा कायदा**—हिंदुस्थानांत (इंडियन टोल्स ॲक्ट). हा कायदा मूळ १८५१ सालीं अमलांत येऊन त्यांत १८७०, १८८८, १९०१, १९२० सालीं दुरुस्त्या झाल्या. सडका किंवा पूल यांवर जकात बसवण्याचा व जकातीचे दर ठरवण्याचा अधिकार प्रांतिक सरकारला दिलेला आहे, व जकाती वसूल

करण्याचें काम जिल्ह्याच्या कलेक्टरकडे देण्यांत येतें. या जकाती वसूल करण्याकरितां कलेक्टर जाहीर लिलांव करून जकातीच्या नाक्याचें काम लिलांवदाराला देतो. अशा अधिकृत लिलांवदारानें मागितलेली जकात देण्याचें कोणी इसम नाकारील, तर जकात-नाकेदारानें त्या इसमाचें वाहन, किंवा जनावर, किंवा जकातीच्या रकमेच्या किंमतीइतका माल अटकाव करून ठेवावा, आणि चोवीस तासांच्या आंत जकात वसूल झाली नाहीं तर ती तक्रार स्थानिक सरकारी अधिकाऱ्याकडे न्यावी, आणि अधिकाऱ्यानें आगाऊ जाहीर नोटीस प्रसिद्ध करून त्या मालाची जाहीर लिलांवानें विक्री करावी. कोणी गैरकायदा जकात वसूल करील तर त्या इसमाला सहा महिन्यांची कैद, किंवा दोनशें रुपये दंड होईल. या जकातीच्या उत्पन्नाचा पैसा सडका व पूल दुरुस्त राखण्याकडे किंवा नवे बांधण्याकडे खर्च केला पाहिजे (कलमें ११।१६।१८). जकातीचे दर जाहीर फलकावर लावले पाहिजेत.

**जॅक्सन, अँड्रू** (१७६७–१८४५)— अमेरिकन संयुक्त संस्थानांचा सातवा अध्यक्ष. इंग्लंडशीं झालेल्या युद्धांत यानें प्रत्यक्ष भाग घेतला होता व शौर्य गाजविलें होतें. एकदां १८२८ त व दुसऱ्यानें १८३२ त तो अध्यक्ष म्हणून निवडला गेला. त्याच्या अमदानींत लोकशाहीची वाढ झपाट्यानें झाली.

**जखमा**—शरीरावरचें कातडें फाटतें किंवा त्याच्या खालील भागास इजा झालेली असते तीस जखम म्हणतात. जखमेंतून कमीजास्त रक्त येत असतें. ठेंचाळणें, कापणें, वार लागणें, खरचटणें, इ. कारणांनीं जखमा होतात. विषारी जखमा शरीरांत विष गेल्यानें होतात. जखमांचीं तोंडें जर मिटून आंत सूक्ष्म जंतू जाण्यासारखी स्थिति नसेल तर जखम लवकर भरून येते. विषारी जखमेपासून ती क्षुद्र असली तरी कधीं कधीं मृत्यु येण्याचाहि संभव असतो. जखम झाल्याबरोबर प्रथम रक्त येण्याचें थांबवावें; त्यासाठीं तुटलेली शीर किंवा नाडी घट्ट बांधून टाकावी. नंतर जखम कढत पाण्यानें स्वच्छ धुऊन काढावी; धुतांना कांहीं जंतुघ्न औषधें (उदा. कॉर्बोलिक ॲसिड, बोरिक ॲसिड, आयोडिन) वापरावींत; नंतर स्वच्छ पातळ कपड्यानें जखम झांकून टाकावी. वरचेवर जखम सोडून धुवावी व तीवर औषधोपचार करावेत.

लोखंडापासून झालेली जखम कधीं कधीं धनुर्वातावर जाते व भाजण्यापासूनहि जिवाला अपाय होईल अशा जखमा होतात. तेव्हां त्यांची काळजी घ्यावी लागते. प्राथमिक उपचारानंतर मोठ्या जखमांवर इलाज तावडतोब चांगल्या डॉक्टराकडून करवावेत.

**जगजीवनदास** (१६८२–१७६१)—'सत्नामी' नामक हिंदु पंथाचा आद्य प्रवर्तक. हा चंदेल ठाकूर जातीचा होता. हा लखनौपासून ४० मैलांवर असलेल्या सरदह गांवीं जन्मला. तो सहा महिन्यांचा झाला, तेव्हां त्याच्या बापाचा गुरु विश्वेश्वरपुरी यानें आपली घोंगडी त्याच्यावर टाकतांच केशरी तिलक त्याच्या कपाळावर उठला. तो आपला गांव सोडून फारसा गेला नाहीं. जगजीवनदास मूळ कबीर पंथाचा होता असें म्हणतात, व त्यानें काढलेला पंथहि त्याच पंथासारखा व्यापक आहे. त्यानें आपल्या पंथाचा 'अघविनाश' नांवाचा पवित्र ग्रंथ पद्यात्मक रचला आहे. याशिवाय त्याचीं ज्ञानप्रकाश, महाप्रलय, प्रथमग्रंथ, इ. पुस्तकें आहेत.

**जगजीवनराम**—मध्यप्रांतांतील राजेउदाराम घराण्यांतील एक पुरुष. उद्धवरावाचा हा मुलगा. याची पत्नी रायचागन ही एक शूर स्त्री होऊन गेली. वाशिम येथें याचें वास्तव्य होतें. याचा मृत्यु सन १६५८ मध्यें झाला, असें तंजावरच्या शिलालेखावरून दिसून येतें.

**जगत्शेट** (अठराव्या शतकाचा पूर्वार्ध)— हा एक मारवाडी वाणी असून याचें मूळ नांव फत्तेचंद असें होतें. याची पेढी बंगालमध्यें असून तेथला सुभेदार अलिवर्दीखान हा बिहार प्रांताचा वसूल याच्या पेढीमार्फत दिल्लीस रवाना करीत असे. त्यामुळें याच्या पेढीस फार महत्त्व प्राप्त होऊन तिच्या शाखा सर्व बंगालभर दिल्लीपर्यंतहि पसरल्या. नंतर यास सन्मानदर्शक असा जगत्शेट हा किताब मिळाला. बंगालवरील स्वारींत मराठ्यांनीं याची पेढी लुटून भडीच कोट रुपयांची लूट मिळविली. हा अलिवर्दीखानाचा मदतनीस व सुजाउद्दौलाचा सल्लागार होता.

**जगत्सिंह गुहिलोत** (१६०७–१६५२)—उदेपूरचा एक महाराणा. हा कर्णसिंहाचा पुत्र होय. सन १६२८ मध्यें यास राज्याभिषेक झाला. जहांगीरनें याजवर स्वारी केली असतां यानें त्याला धैर्यानें तोंड दिलें व आपल्या राज्याचें रक्षण केलें. जगन्नाथ पंडितानें 'जगदाभरण' नांवाचें पन्नास श्लोकांचें एक संस्कृत काव्य याजवर रचून तें यास सन १६२७ च्या सुमारास अर्पण केलें. भारी किंमतीचे घोडे बाळगण्याचा यास नाद असे. हा उदार व दूरदर्शी होता.

**जगदीश तर्कालंकार** (मु. १६२५)—एक संस्कृत पंडित. प्रसिद्ध चैतन्याचा सासरा जो सनातनमिश्र त्याचा हा एक वंशज. रामभद्र सार्वभौम याचा हा गुरु होता. भवानंदसिद्धांतवागीशाच्या पाठशाळेंत यानें तर्कशास्त्राचा अभ्यास केला. (१) 'तत्त्वचिंतामणिदीधितिप्रकाशिका किंवा जागदीशी', (२) 'तत्त्वचिंतामणिमयूख', (३) 'तर्कामृत', (४)

'न्यायादर्श' अथवा 'न्यायसारावली', (५) 'शब्दशक्ति-प्रकाशिका', (६) 'द्रव्यभाष्यटीका' अथवा 'पदार्थतत्त्व-निर्णय', (७) 'काव्यप्रकाशरहस्य', (८) 'न्यायलीलावती-दीधिति व्याख्या' हे यानें लिहिलेले महत्त्वाचे ग्रंथ होत.

**जगदेवराव**—कुत्बशाहींतील एक सरदार. जमशीद कुत्ब-शहाच्या पश्चात् त्याच्या बेगमेनें आपल्या सुभान नांवाच्या अल्पवयी मुलास गादीवर बसविलें व सैफखान ऐनउलमुल्काकडे राज्यकारभार सोंपवला. तेव्हां जगदेवरावानें मोंधिरास कैदेंत असलेला जमशीदचा धाकटा भाऊ दौलतखान यास जमशीदची गादी मिळवून देण्याचें कारस्थान आरंभलें. हें कारस्थान हाणून पाडण्यासाठीं सैफखानानें जगदेवरावावर चाल केली व जगदेवरावास गोवळकोंड्यास कैद करून आणलें. पुढें सन १५५० मध्यें गोवळकोंड्याच्या गादीसाठीं खटपट करणाऱ्या इब्राहिमनें फंदफितुरी करून यास मुक्त केलें. तेव्हां यानें त्यास गोवळकोंड्याची गादी मिळवून देऊन आपण त्याचा वजीर झाला. परंतु दौलतखानास गोवळकोंड्याचे गादीवर आणण्याचे याचे बेत इब्राहिमला कळतांच जगदेवराव वऱ्हाडांत जाऊन इमादशहास मिळाला व त्यास खानदेश, वगैरे प्रदेश मिळवून दिले. पण पुढें इमादशहाशींहि याचें न पटल्यानें हा १५५८ च्या सुमारास जाळपोळ करीत एलगुंडल येथें आला. तेव्हां याचा मोड करण्यासाठीं कुत्बशहानें पाठवलेल्या मुस्तफा-खानानें याजवर चाल केली असतां याचा पराभव होऊन हा विजयनगरला पळून गेला.

शेवटीं रामरायाचा भाऊ व्यंकटाद्रि याच्या मदतीनें यानें कुत्बशहा व निजामशहा यांचा पराभव केला.

**जगदेवराव जाधव** (मृ. १६९९)— एक मराठा वीर. सिंदखेडच्या जाधव घराण्यांतील लखूजी जाधवाचा हा पणतू (लखूजी–बहादुरजी–दत्ताजी–जगदेव). हा बापाप्रमाणेंच फार शूर होता. १६७४–७५ सालच्या कर्नाटकांतील बाघिनगिरा किल्ल्याच्या वेढ्याच्या वेळीं हा पुढें आला. हा नंतर काबूलच्या मोहिमेवरहि गेला होता अशी माहिती मिळते. हा वेदांती व भाविक असून यानें १६९२ सालीं देऊळगांवराजे या ठिकाणीं बाळासाहेबांचें देऊळ बांधलें. या देवस्थानला आजहि एक लाखापर्यंत उत्पन्न आहे.

**जगद्धर** (१३५०)—एक सुप्रसिद्ध टीकाकार. भवभूतीच्या मालती–माधवावरील टीकेमुळें हा प्रसिद्धीस आला. भगवत्-गीताप्रदीप, रसदीपिका, देवीमाहात्म्यटीका, मेघदूतटीका, वासव-दत्ताटीका, तत्त्वदीपिनी, इ. टीका यानें लिहिल्या आहेत.

**जगन्नाथ** (सु. १६८५–१७७२)—एक मराठी कवि. हा वऱ्हाडचा राहणारा व जातीचा कोष्टी. याचें 'शशि-सेना काव्य' स्वतंत्र पद्धतीनें रचलेलें आहे. त्यांतील कथानक नवीन असून बायरन, स्कॉट, वगैरेंच्या पद्य-कथांची आठवण करून देतें. या काव्याशिवाय पौराणिक आख्यानांवर व वेदांत-विषयावरहि या कवीची बरीच रचना आहे.

**जगन्नाथ पंडित**—एक संस्कृत कवि. हा तैलंगी वेंगिनाडि नांवाच्या ब्राह्मणकुलांत जन्मला. याचा बाप पेरुभट्ट हा फार विद्वान् होता. त्यामुळें जगन्नाथाला आपल्या पित्यापासून सर्व शास्त्रांची माहिती झाली. पुढें वयांत येतांच कोणा तरी राजाचा आश्रय मिळावा या हेतूनें तो कर्नाटकच्या राजाकडे गेला, पण तेथें त्याची मान्यता झाली नाहीं. त्यामुळें तो जयपुरास जाऊन तेथें त्यानें संस्कृत शाळा काढली. पुढें तो शहाजहान बादशहा-कडे गेला व त्याला आपलें काव्यकौशल्य व अगाध ज्ञान पटवून देऊन त्याचा आश्रय मिळविला. त्याला बादशहानें पंडितराज ही पदवी दिली होती. दिल्ली दरबारांत एका घमेंडखोर काजीशीं पंडिताचा वाद होऊन त्यानें काजीचा पराभव केला व त्यामुळें शहाजहान त्याच्यावर फार संतुष्ट झाला. काजीशीं वाद करण्यासाठीं पंडितानें फारसी व ऊर्दू भाषांचा अभ्यास केला. मोंगल दरबारीं असतां एक यवनकन्या लवंगी हिच्यावर त्याचें प्रेम जडलें होतें व त्यानें तिच्या सहवासांत आपला काळ बराच सुखांत घालविला. पुढें त्यास उपरति झाली व तो काशीस गेला असतां तेथील पंडितांनीं त्यास लवंगीसह प्रायश्चित्त देऊन आपल्या जातींत घेण्याचें नाकारलें. तेव्हां त्यानें गंगेचें आराधन केलें व गंगेनें त्या दोघांना दर्शन देऊन त्याचा उद्धार केला अशी आख्यायिका आहे. ही 'गंगालहरी' फार प्रसिद्ध आहे.

ग्रंथः— (१) अमृतलहरी, (२) आसफविलास, (३) करुणालहरी, (४) चित्रमीमांसाखंडन, (५) जगदाभरण, (६) पीयूषलहरी, (७) प्राणाभरण, (८) भामिनीविलास, (९) मनोरमाकुचमर्दिनी, (१०) यमुनावर्णन, (११) लक्ष्मी-लहरी, (१२) सुधालहरी, (१३) रसगंगाधर (काव्यमाला).

**जगन्नाथ पुरुषोत्तमदास** (१८६६–१९३२)— एक हिंदी कवि. हे राहणारे काशीचे. यांनीं प्रथम ऊर्दूचा अभ्यास करून ऊर्दू कविता रचिल्या; पण पुढें हिंदी (व्रज) भाषेविषयीं आस्था वाटून तींतहि अनेक काव्यग्रंथ निर्माण केले. 'हिन्दोला', 'गंगावतरण', 'अष्टरत्नाकर', इ. त्यांचे ग्रंथ आहेत. 'रत्ना-कर' हें त्यांचें टोपण नांव होतें. 'साहित्यसुधानिधि' नांवाचें एक मासिक पुष्कळ वर्षें ते काढीत असत. १९२३ सालच्या हिंदी साहित्यसंमेलनाचे ते अध्यक्षहि होते.

**जगन्नाथ प्रसाद** (१८५९–१९४५)—एक हिंदी ग्रंथ-कार व कवि. हे मध्यप्रांतांतले असून सरकारी नोकरींत अगदीं लहान जागेपासून सेटलमेंट कमिशनरच्या हुद्यापर्यंत चढले

होते. यांनीं अनेक लोकोपयोगी कामेंहि केलीं. तथापि प्रभाकर व काव्यप्रभाकर हे त्यांचे ग्रंथ पांडित्यपूर्ण आहेत. ते उर्दू कविताहि सफाईनें करीत. यांनीं एक काव्याला वाहिलेलें मासिक चालविलें होतें.

**जगन्नाथ शंकरशेट मुर्कुटे** (१८०३—१८६५)—मुंबईंतील एक दानशूर व सार्वजनिक कार्यकर्ते. हे दैवज्ञ (सोनार) ज्ञातींतील असून यांच्या वडिलांनीं व्यापारांत अतोनात पैसा मिळविला होता. नाना शंकरशेट यांनीं मुंबईंत अनेक उपयुक्त संस्था काढल्या व चालविल्या. आपल्या लोकांमध्यें शिक्षणाचा प्रसार व्हावा यासाठीं त्यांचा फार प्रयत्न असे. बाँबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी, एल्फिन्स्टन कॉलेज व इन्स्टिटयूट, मुलींची शाळा, बाँबे असोसिएशन, रॉयल एशियाटिक सोसायटी, अग्रिहार्टिकल्चरल सोसायटी, व्हिक्टोरिया म्यूझियम, इ. संस्थांच्या चालकवर्गांत ते प्रमुख असत व त्यांनीं या संस्थांना बरेंच आर्थिक साहाय्यहि दिलें होतें. मुंबई कायदेमंडळाच्या पहिल्या सभासदांत ते एक होते (१८६१). यांच्या स्मरणार्थ मुंबई विद्यापीठांत मॅट्रिक परीक्षेंत पहिला व दुसरा येणाऱ्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ति ठेविलेली आहे. ज्यूरी, जे. पी., इ. संबंधीं हक्क त्यांनीं आपल्या लोकांना मिळवून दिले. सतीची चाल बंद करण्यासाठींहि प्रचार केला. मुंबई शहराची सुधारणा व वैभव यांचें कांहीं श्रेय नाना शंकर शेटना आहे.

**जगपालराव निंबाळकर** (मृ. १६३०)—एक मराठा सरदार. याची बहीण दीपाबाई ही मालोजी भोसल्यास दिली होती. फलटणच्या मालोजी निंबाळकराचा हा पुत्र. हा शूर असून यानें कोल्हापूरवर स्वारी केली होती व भातवडीच्या युद्धांत यानें आदिलशहास माघार घ्यावयास लावली. याला वणगोजी असेंहि म्हणत.

**जंगम**—ही लिंगायत गुरूंची जात आहे. प्रत्येक लिंगायताला गुरु हा असावाच लागतो. गुरुस्थल (विवाहित) आणि विरक्त (ब्रह्मचारी) असे या जंगमांचे दोन प्रमुख भेद आहेत. गुरुस्थल जंगमाकडे गृह्यसंस्कारांचें काम असतें. विरक्त जंगम वेदांतादि धार्मिक विषयांचें अध्ययन-अध्यापन करतात. दोघेहि मठवासी असतात. जंगमांत पांच संप्रदाय आहेत: (१) एकोरामाराध्य, (२) पंडिताराध्य, (३) मरुलाराध्य, (४) रेवणाराध्य व (५) विश्वाराध्य. लिंगायत असें मानतात कीं, या पांच संप्रदायांचे उत्पादक शिवाच्या पांच मुखांपासून उत्पन्न झाले होते, व यांनीं लिंगायत पंथाचा प्रसार करण्यांत फार मेहनत घेतली होती. गृहस्थाश्रमी लिंगायत जंगमांस फार पवित्र मानतात, व ते कोणत्या संप्रदायाचे आहेत याचा विचार न करतां सर्वांची पूजा करतात व धार्मिक विधी त्यांच्याकडून करवून घेतात. जंगमांची संख्या एक लाखावर आहे.

**जंगम मिळकत**—या प्रकारच्या मिळकतीला इंग्लंडच्या कायद्यांत मूव्हेबल किंवा चॅटल्स असेंहि म्हणतात. ही मिळकत इकडून तिकडे नेतां येते. उदा.—पैसा, जडजवाहीर, खुर्च्या-टेबलें, वस्त्रप्रावरण, भांडींकुंडीं, वगैरे. मिळकतीचा दुसरा प्रकार म्हणजे स्थावर मिळकत म्हणजे—जी मिळकत इकडे तिकडे हालवितां येत नाहीं; उदा.—जमीन व घरें. इंग्लंडच्या कायद्यांत स्थावर मिळकतीला 'खरी मालमत्ता' असें म्हणतात. पूर्वी वारसा वगैरे बाबतींत इंग्लंडांत स्थावर व जंगम मिळकतीसंबंधीं अगदीं निरनिराळे कायद्याचे नियम होते. पण अलीकडे या दोन्ही प्रकारच्या मिळकतींना कायद्याचे नियम शक्य तितके अधिक सारखे करण्यांत आले आहेत.

हिंदुस्थानांत हिंदु, मुसलमान, पारशी व ख्रिस्ती या सर्व जमातींच्या वारसाकायद्यांत स्थावर व जंगम दोन्ही प्रकारच्या मिळकतीला वारसाहक्काचे नियम सारखेच आहेत.

**जगमित्र, नागा** (*समाधिकाल १३३०*)—*एक मराठी कवि* व साधु. भक्तिविजयांत याची एक गोष्ट आली असून यानें लिहिलेले कांहीं अभंग व पदें सुप्रसिद्ध आहेत. याचें नांव नागेश असें असून उपनांव जगमित्र हें आहे. जोगाईच्या आंब्याजवळील परळी येथें याची समाधि आहे.

**जंगल**—अरण्य पाहा. देशांतील जंगलाचा योग्य उपयोग करणें व त्याचें नीट संरक्षण करणें हें एक नवीन शास्त्रच बनलें आहे. जंगलापासून लांकुड, फळें, इ. प्रत्यक्ष फायदा होतोच, पण इतर किती तरी फायदे होत असतात. हवेंतील उष्णतामान सारखें राहतें; पाहिजे तो ओलावा मिळतो; नद्या आणि ओढे यांतील पाणी संथपणें वाहण्यास मदत होते; पुरांमुळें येणारी आपत्ति कमी होते; सर्वत्र माळरानें किंवा मैदानें होत नाहींत; किंवा नदी-नाल्यांतून गाळ साचत नाहीं.

नवीन जंगल तयार करतांना दाट झाडें लावणें बरें असतें (एकरी ६,००० किंवा जास्तच). एकाच प्रकारचीं झाडें लावण्यापेक्षां अनेक जातींचीं लावावींत. बिया लावून झाडें तयार करण्यापेक्षां दोन-तीन वर्षांचे रोपे लावणें जास्त खर्चाचें वाटलें तरी फायदेशीर असतें. ओलसर हवेंत झाडें चांगलीं वाढतात, तसेंच कधीं लावणी न केलेली जमीन व नैसर्गिक पाण्याचा निचरा या गोष्टी झाडांना श्रेयस्कर होतात. जनावरें नासधूस करतात म्हणून कुंपण घालणें, रानगवत काढून टाकणें व अन्य प्रकारें झाडांची निगा राखणें जरूर असतें. शेजारच्या

तयार झालेल्या झाडांचें बीं पडून नवीन झाडें तयार होतात खरीं; पण मुद्दामहि झाडें लावावीं लागतात. झाडें लावण्याच्या पाळ्या, त्यांची कापणी, वाढ, इ. गोष्टींकडे लक्ष द्यावें लागतें. निरनिराळ्या झाडांचें आयुष्य निरनिराळें असतें. शंकुधारी (कोनिफर) वृक्षांचें आयुष्य साठ ते नव्वद वर्षें तर ओकवृक्ष दोनशें वर्षें जगतो.

वनरक्षणाकडे शास्त्रीय दृष्टीनें पाहण्याची प्रथा प्रथम जर्मनीनें पाडली. नंतर फ्रान्स, नॉर्वे, स्वीडन, डेन्मार्क, इटली यांनीं हें शास्त्र उचललें. ग्रेट ब्रिटन सर्वांत मागाहून आलें, तें सुद्धां हिंदुस्थानासाठीं जंगलअधिकारी तयार करण्याकरितां म्हणून.

जंगलशास्त्राचें शिक्षण देण्यासाठीं ऑक्सफोर्ड, केंब्रिज, एडिंबर्ग, ग्लासगो, डब्लिन, इ. ठिकाणीं विद्यालयें काढलीं, तथापि हिंदुस्थानांत डेराडून येथें हें शिक्षण जास्त व्यवस्थित दिलें जातें. हिंदुस्थान सरकारचें एक स्वतंत्र जंगल खातें आहे. आज जगांत सर्वत्र इमारती लांकडाला अतिशय मागणी असल्यानें त्यासाठीं तरी वनरक्षणाकडे सर्व राष्ट्रांचें लक्ष लागलें आहे.

जगांत निरनिराळ्या देशांतून जंगल किती आहे याची कल्पना पुढील तक्त्यावरून येईल—

एकंदर जमिनीच्या शेंकडा टक्क्यानें जंगलक्षेत्र—

| | | | |
|---|---|---|---|
| १ ऑस्ट्रिया | ३८ | ११ हिंदुस्थान | २० |
| २ बेल्जियम | १८ | १२ इटली | २० |
| ३ झेकोस्लोव्हाकिया | ३४ | १३ नेदरलंड्स | ८ |
| ४ डेन्मार्क | ९ | १४ नॉर्वे | २१ |
| ५ फिन्लंड | ७४ | १५ पोर्तुगाल | २२ |
| ६ फ्रान्स | १९ | १६ रुमानिया | २४ |
| ७ जर्मनी (ऑस्ट्रिया सोडून) | २४ | १७ सोव्हिएट रशिया | ४४ |
| ८ ग्रेट ब्रिटन | ६ | १८ स्पेन | १४ |
| ९ ग्रीस | १९ | १९ स्वीडन | ५५ |
| १० हंगेरी | १३ | २० स्वित्झर्लंड | २३ |

वरील तक्त्यावरून असें समजून येतें कीं, वीस देशांपैकीं फक्त आठ देशांतच हिंदुस्थानापेक्षां कमी जंगलक्षेत्र आहे. बेल्जियम, डेन्मार्क, फ्रान्स, ग्रेट ब्रिटन व नेदरलंड्स यांचें मोठ्या प्रमाणांत औद्योगीकरण झालेलें आहे.

तसेंच लोकसंख्येच्या मानानें जंगलांची काय स्थिति आहे याची कल्पना पुढील कोष्टकावरून येईल.

दर १,००,००० माणसांबरोबर चौरस मैलांत जंगलक्षेत्र—

| देश | चौ. मै. | देश | चौ. मै. |
|---|---|---|---|
| १ ऑस्ट्रिया | १,८४६ | ११ हिंदुस्थान | ८१३ |
| २ बेल्जियम | २७५ | १२ इटली | ४४७ |
| ३ झेकोस्लोव्हाकिया | १,२४९ | १३ नेदरलंड्स | ११६ |
| ४ डेन्मार्क | ४०१ | १४ नॉर्वे | ९,३४५ |
| ५ फिन्लंड | २६,९२० | १५ पोर्तुगाल | १,०१४ |
| ६ फ्रान्स | ९६२ | १६ रुमानिया | १,३६८ |
| ७ जर्मनी | ६२७ | १७ सोव्हिएट रशिया | २१,१०९ |
| ८ ग्रेट ब्रिटन | ११९ | १८ स्पेन | १,०४१ |
| ९ ग्रीस | १,२६७ | १९ स्वीडन | १४,७२३ |
| १० हंगेरी | ५१३ | २० स्वित्झर्लंड | ८५५ |

वरील कोष्टकावरून असें दिसेल कीं, फक्त पाच देशांतच लोकसंख्येच्या प्रत्येक एकमाना( युनिटा )बरोबर जंगलक्षेत्राचें प्रमाण हिंदुस्थानापेक्षां कमी आहे, परंतु हे पांचहि देश म्हणजे बेल्जियम, डेन्मार्क, ग्रेट ब्रिटन, इटली व नेदर्लंडस ह्यांचें फार मोठ्या प्रमाणावर औद्योगीकरण झालेलें आहे.

हिंदुस्थानांत १९४०–४१ सालीं सरकारच्या मालकीच्या जंगलांनीं १,२२,०२१ चौ. मैल क्षेत्र, म्हणजे एकंदर जमिनीच्या शेंकडा १४ टक्के क्षेत्र व्यापलें होतें. त्याच मुदतींत खाजगी मालकीच्या जंगलांनीं ५३,८२१ चौ. मैल क्षेत्र म्हणजे एकंदर क्षेत्राच्या शेंकडा ६ टक्के क्षेत्र व्यापलें होतें. अशा रीतीनें ब्रिटिश हिंदुस्थानांतील जंगलक्षेत्र १,७५,८४२ चौ. मैल म्हणजे एकंदर जमीनक्षेत्राच्या शेंकडा २० टक्के होतें.

सरकारी मालकीच्या १,२२,०२१ चौरस मैल जंगलापैकीं ८०,००० चौ. मैल अथवा ९·३ टक्के जंगलेंच फक्त व्यापारास योग्य अशीं आहेत.

सरकारी जंगलांचे चार प्रकार आहेतः—

(१) संरक्षणक्षम जंगलें. यांनीं पूर, झीज वगैरेंना प्रतिबंध होतो.

(२) इमारतीच्या लांकडांचीं जंगलें.

(३) लहान जंगलें. यांच्यापासून जळाऊ लांकूड, चारा, वैरण, वगैरे स्थानिक गरजा पुरविल्या जातात.

(४) कुरण जंगलें. गुरांना चारण्यासाठीं पुरेशा जंगलांच्या अभावीं जळाऊ लांकडाच्याऐवजीं शेणाचा उपयोग जळणास होतो, जमिनीची झीज होते, पिकें चांगलीं येत नाहींत, पूर येतात व गुरांना चरण्यासाठीं चांगल्या जागा मिळत नाहींत. जंगलांमुळें उद्योगधंद्यासाठीं अनेक प्रकारचा कच्चा माल मिळतो.

**जंगली जयगड**— मुंबई, सातारा जिल्हा, हिळवाक खेड्याच्या ईशान्येस ६ मैलांवर कोंकणच्या बाजूस झुकलेल्या एका डोंगरावर हा किल्ला आहे. किल्ला १८० फूट लांब व १५० फूट रुंद व चौकोनी आहे. यावरून देखावा फार सुंदर दिसतो. १८१० मध्यें ताई तेलणीनें या किल्ल्याचा आश्रय घेतला होता.

**जग्वार**—( अमेरिकन वाघ ). हा एक चित्त्यासारखा प्राणी

असून दक्षिण व मध्य अमेरिकेमध्यें आढळतो. याचा आकार चित्त्याएवढाच असून त्याचा रंग पिवळसर हरणासारखा असतो व त्याच्या अंगावर काळे ठिपके व वर्तुळें असतात. हा सहसा मनुष्याच्या अंगावर जात नाहीं. याचें कातडें मौल्यवान् असतें.

**जंघाशूल**— ( सायाटिका ). हा एक संधिविकार आहे. यामध्यें नितंबापासून मांडीमध्यें श्रोणी ( सायाटिक ) मज्जातंतूंच्या अनुरोधानें गुडघ्यापर्यंत वेदना होऊं लागतात. मांडी जड होते, व सतत वेदना होऊं लागतात व त्या हवामानांत जसजसा फरक पडेल किंवा चलनवलन होईल, विशेषतः मज्जातंतूंवर कमी-अधिक ताण पडेल, त्या मानानें कमीअधिक होतात. कटीर संधि किंवा कटीर रोगामध्येंहि हा रोग आनुषंगिक म्हणून होण्याचा संभव असतो.

**जंजिरा संस्थान**—मुंबई इलाखा, कोंकण भागांतील एक संस्थान. क्षे. फ. ३७९ चौ. मै. व लो. सं. (१९४१) १,१७,३८२. यांत २३६ गांवें आहेत. काठेवाडांतील जाफराबाद यांत येतें. या संस्थानला हबसाण असें हबशी अरबांवरून नांव पडलें आहे. हे हबशी लोक बहामनी राज्यांत नोकरीस असत. संस्थानांत मदगड नांवाचा पहाड व किल्ला आहे. डोंगरावर दाट रान व पायथ्याशीं दलदल सर्वत्र आहे. नारळी–पोफळीचीं आगरें पुष्कळ आहेत व तीं शोभिवंत दिसतात. कुंजरीचें खोरें देखा-व्याच्या दृष्टीनें फार सुंदर आहे. पाऊस सुमारें १०७ इंच पडतो. मुरूड हें राजधानीचें शहर आहे. त्या खालोखाल श्रीवर्धन आहे. शें. ८२ हिंदू व १७ मुसलमान आहेत. मुख्य पिकें भात, नागली, वरी, सुपारी व नारळ हीं होत. मिठागरें सरकारी आहेत. जंजिरा येथें कागद होतो. संस्थानचें उत्पन्न सुमारें साडेअकरा लाख आहे.

याकूत नांवाचा एक सिद्दी १४९३ च्या सुमारास हिंदु-स्थानांत येऊन त्यानें माहीम किल्ला घेतला. मोंगलांकडे जंजिरा आला तेव्हां सिद्दी खिरूलखाल त्यावर सुभेदार नेमला गेला. विजापूरकरांच्या अमदानींत जंजिरा हें आरमाराचें मुख्य ठिकाण केलें व जंजिरेकरांस बाणकोट ते नागोठाणापर्यंतचा सरंजाम दिला.

यानंतर मराठ्यांनीं जंजिऱ्यावर सारख्या स्वाऱ्या केल्या. मराठ्यांच्या इतिहासांत जंजिराप्रकरण स्वतंत्रच होईल इतकें तें मोठें आहे. परकीय व्यापाऱ्यांनीं जंजिरेकरांना मराठ्यांविरुद्ध फार मदत केली. संस्थानिक सुनी मुसलमान असून त्याला मुसलमानी धर्मप्रमाणें दत्तक घेण्याची परवानगी आहे. सध्यांचा नबाब १९२२ सालीं गादीवर आला. त्याचें नांव हिज हायनेस सिद्दी महंमदखान असें आहे.

मुरूड-जंजिरा व किल्ला राजपुरीच्या खाडीच्या मुखाशीं आहे. दोन मैलांवर एक दीपगृह आहे. जवळ कुड्याच्या डोंगरांत बौद्ध लेणीं आहेत. राजपुरी ही कोंकणच्या शिलाहारांची राज-धानी होती. मुसलमानी अमलांत चौलानंतर दंडाराजपुरीस महत्त्व आलें व ही व्यापारी उतारपेठ झाली.

१९४८ सालीं हें संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झालें.

**जझिया**—प्रत्येक डोक्यावर म्हणजे इसमावर जो कर बस-वतात, त्याला जझिया किंवा डोईपट्टी म्हणतात. या प्रकारचा 'कॅपिटल टॅक्स' कर इंग्लंडांत प्रथम १३७७ व १३८० सालीं बसवण्यांत आला; व १३८० सालीं त्यामुळें वॅट टायलरचें बंड झालें. नंतर १५१३ सालीं पुन्हां बसवण्यांत आला; १६६७ सालीं २ ऱ्या चार्लस राजानें हा कर बसवला, व तो १६९८ सालापर्यंत चालू होता व सदर सालीं ३ ऱ्या विल्यमनें तो बंद केला.

कुराणांत असें म्हटलें आहे कीं, "नास्तिकांशीं ते शरण येऊन जझिया देईपर्यंत लढा" (९–२९) व त्याप्रमाणें खुद्द महंमद पैगंबरानें हा कर मुसलमानेतरांजवळून प्रथम वसूल केला होता. हिंदुस्थानांतील बहुतेक मुसलमान राजांनीं जझिया कर हिंदूंपासून वसूल केला आहे. या करापायीं अनेक रीतींनें हिंदूंवर जुलूम होत असत. सर्वांत जास्त जुलूम औरंगजेबाच्या वेळीं झाला. त्यानें हा कर १६७९ पासून पुनः सुरू केला. साऱ्या हिंदूंनीं तो दिलाच पाहिजे, याबद्दल त्याचे सक्तीचे हुकूम असत. फक्त बायका, चौदा वर्षांखालचीं मुलें व गुलाम आणि सरकारी अधिकारी यांना माफी असे. हा कर कांहीं माणसांच्या

उत्पन्नावर प्रमाणशीर बसविलेला नसे; कसा तरी बसविला होता. दिल्ली येथील हिंदू लोकांनीं याबाबतींत त्याला अनेकदां अर्ज केले; परंतु त्यांचें म्हणणें त्यानें ऐकलें नाहीं; या बाबतींत शिवाजीनें त्याला १६७९ सालीं एक खरमरीत पत्र फारसींत लिहिलें होतें. व उदेपूरच्या राजसिंहानेंहि त्याचा हुकूम ऐकला नव्हता. कर देणाऱ्यांचे तीन वर्ग होते।

गरिबांवर उत्पन्नाच्या शेंकडा ६ टक्के, मध्यमांवर शेंकडा ६ पासून $\frac{3}{4}$ टक्के व श्रीमंतांवर दर हजारीं २॥ असा हा उलटा ( म्हणजे गरीब लोकांस अत्यंत जाचक ) दर होता.

**जटलंड**— डेन्मार्कच्या राज्याचा युरोप खंडांतील प्रदेशाचा हा एक विभाग आहे. याचें क्षे. फ. ११,४११ चौ. मै. व लो. सं. १७,२३,३०० आहे. हें द्वीपकल्प लुबेक व एल्ब नदीचें मुख यांमधील रेषेपासून उत्तरेकडे स्कॉ भूशिरापर्यंत २७० मैलपर्यंत पसरलेलें आहे, व अशा रीतीनें बाल्टिक व उत्तर समुद्र यांच्यामधील नैसर्गिक पूर्व-पश्चिम दळणवळण बंद केलें आहे. उत्तरेकडील भाग फक्त डॅनिश असून त्याला जटलंड म्हणतात.

पश्चिमेकडील महत्त्वाचें बंदर एस्बजर्ग होय. व्हायबोर्ग व जोरिंग हींच काय तीं देशांतील महत्त्वाचीं शहरें होत.

जटलंडमध्यें पहिल्या महायुद्धाच्या अमदानींत जी सुप्रसिद्ध आरमारी लढाई झाली त्यामुळें जटलंडला विशेष महत्त्व प्राप्त झालें.

**जटापाठ**—वेदपठणाचा एक प्रकार. ( क्रमपाठ, घनपाठ पाहा ). मूळपाठ–पवस्व वाजसातये विप्रस्य गृणतो वृधे। सोम रास्व सुवीर्यम्। –ऋ. अ. ६.

पवस्व वाजसातये वाजसातये पवस्व पवस्व वाजसातये। वाजसातये विप्रस्य विप्रस्य वाजसातये वाजसातये विप्रस्य। वाजसातये इति वाजसातये। विप्रस्य गृणतो गृणतो विप्रस्य गृणतः। गृणतो वृधे वृधे गृणतो गृणतो वृधे। वृधे इति वृधे। सोम रास्व रास्व सोम सोम रास्व। रास्व सुवीर्यं सुवीर्यं रास्व रास्व सुवीर्यं। सुवीर्यमिति सुवीर्यम्।

**जटामांसी**— ही बहुवर्षजीवी वनस्पति हिमालयांत गढवालापासून पूर्वेकडील प्रदेशांत व सिकीममध्यें १७,००० फुटांच्या उंचीवर होते. या वनस्पतीच्या तीन जाती आहेत: साधी, सुगंधी व सूक्ष्म जटामांसी. यांपैकीं सुगंधीच जास्त उपयोगी अशी मानली जाते. याचें कुडें करंगळीएवढें जाड असून त्याच्यावर लालसर, तपकिरी रंगाच्या तंतूंचें वेष्टण असतें. हें सुवासिक असून कडू असतें व याचें फार उपयोगी असें तेल निघतें. हिंदुस्थानांत जीं औषधी व सुगंधी तेलें तयार करतात त्यांत हें सुवासाकरितां टाकतात. यानें केंस वाढून काळे होतात. या वनस्पतीचा खप उदबत्त्या वगैरे सुगंधी पदार्थ तयार करण्यांत अतिशय आहे.

**जटायु**—विनता पुत्र जो अरुण, त्याच्या दोन पुत्रांपैकीं दुसरा. रावण सीतेला घेऊन जात असतां जटायु धांवला. रावणाचें व याचें युद्ध होऊन त्यांत याचे पंख छेदिले गेले व हा मरणोन्मुख होऊन भूमीवर पडला. यानें झालेलें सर्व वृत्त रामास सांगितलें व प्राण सोडला.

**जठर**— अन्नमार्गांतील हा सर्वांत अधिक फुगलेला नळीचा भाग असतो. ( उदर पाहा ). हा उदराच्या पोकळींतहि वरच्या भागांत असतो. हा गलद्वारापासून लघ्वन्तरापर्यंत पसरलेला असतो. याचा आकार व स्थिति त्यांतील अन्नांशावर, पचनक्रियेच्या अवस्थेवर, त्याच्या स्नायुभित्तींच्या वाढीवर, आणि जवळील इंद्रियांच्या स्थितीवर अवलंबून असतात. जठराची भिंत किंवा बाजू अनेक थरांची बनलेली असते व त्या थरांत पाचकग्रंथी असतात. त्यांमधून पाचकरस बाहेर पडून पचनाची क्रिया चालत असते. पाचकरसाचे मुख्य घटक उज्जहरिकाम्ल ( हायड्रोक्लोरिक ॲसिड ) पेप्सिन आणि निरनिराळीं हरिद् लवणें ( क्लोराइड ) असतात. या पाचकरसाचें मुख्य कार्य म्हणजे

**जठरांतील भाग**

१ छातीचे स्नायू. २ बरगड्या. ३ उजव्या फुप्फुसाची वरची, मधली व खालची पाळ. ४ डाव्या फुप्फुसाच्या पाळी. ५ हृदयाचें उजवें विवर. ६ डावें विवर. ७ उजवें हृत्पुट. ८ डावें हृत्पुट. ९ फुप्फुस-धमनी ( रोहिणी ). १० रोहिणेय. ११ अधोगामी बृहत्सिरा. १२ श्वासनलिका. १३ अन्ननलिका. १४ फुप्फुसावरण. १५ मध्यपटल. १६ यकृताची उजवी व डावी पाळ. १७ पित्तार्बुद. १८ जठर. १९ पक्वाशय. २० ऊर्ध्वगामी स्थूलांत्र. २१ सम ( व्यत्यस्त ) स्थूलांत्र. २२ अधोगामी स्थूलांत्र. २३ लघ्वांत्र. २४ उरोनलिका. २५ प्लीहा.

अंत्रांतील ओजस( प्रोटिन्स )द्रव्यांचें पेप्टोन्स (बलकमय द्रव्य) मध्यें रूपान्तर करणें हें आहे. पचनक्रियेवर मानसिक अवस्थेचा परिणाम होतो. तसेंच जठरास अनेक प्रकारचे रोग होण्याचा संभव असतो. उदा.-अपचन, अग्निमांद्य, गळू, इ.. बहुतेक व्रण होण्याचें हें स्थान आहे.

**जडत्व**—( इनर्शिआ ). पदार्थ स्थिर असेल तर तो गतिमान करण्यास शक्ति वापरावी लागेल. पदार्थ गतिमान असेल तर गति थांबविण्यास किंवा वाढविण्यास शक्ति उपयोगांत आणावी लागेल. द्रव्यावर शक्तीचा परिणाम होत नाहीं असें गृहीत धरलें तर स्थिर द्रव्य स्थिरच राहील; व सरळ रेषेंत सारख्या वेगानें एखादें द्रव्य जात असेल तर तें तसेंच जात राहील. या द्रव्याच्या गुणधर्मास जडत्व म्हणतात. न्यूटननें जे गतीचे तीन नियम मांडले, त्यांतील पहिला नियम जडत्वाचा आहे. हें जडत्व पदार्थांतील द्रव्यानें मोजतात.

**जडद्रव्य**—( मॅटर ). द्रव्यासंबंधीं एक उपपत्ति अशी देण्यांत येते कीं, कोणत्याहि द्रव्याचे अपरिमित असे भाग करतां येणें शक्य नाहीं. प्रत्येक द्रव्य हें ज्याचे अधिक भाग पाडतां येणें शक्य नाहीं अशा सूक्ष्म घटकांचें बनलेलें असतें. अशा घटकांस परमाणू ( ॲटम ) असें म्हणतात. ही उपपत्ति आरिस्टॉटलच्या मताविरुद्ध डेमॉक्रिटस यानें प्रतिपादन केली होती व तिचें वर्णन ल्युक्रेशिअस या कवीनें आपल्या काव्यांत केलें होतें. परंतु या उपपत्तीचा विनियोग रसायनशास्त्रामध्यें प्रथम जॉन डाल्टन या शास्त्रज्ञानें १८०३ मध्यें केला. बर्नुली व क्लॉसीयस यांस बऱ्याच कालापूर्वी अशी शंका आली होती कीं, वायूच्या अणूस गति असते. व या अणू (मोलेक्यूल) च्या गतीवरून त्या वायूची उष्णताशक्ति मोजतां येते. आणि या अणूंचें वायु ठेवलेल्या पात्राच्या कांठावर जे धक्के बसतात त्यामुळें वायूचा दाब उत्पन्न होतो. वायूच्या गतीचा सिद्धान्त प्रथम लॉर्ड मॅक्सवेल यानें इ. स. १८६० मध्यें निश्चितपणें पुढें मांडला. या उपपत्तीप्रमाणें वायूचें केवळ उष्णमान त्यांतील अणूंच्या मध्यमगतिशक्तीच्या प्रमाणांत असतें. यावरून पुढील समीकरण बसवितां येतें: ० श. ( सेंटीग्रेड ) उष्णमान व ७६० मिलिमीटर दाब असलेल्या कोणत्याहि पूर्ण वायूचा एका घनसेंटीमीटरमध्यें असलेल्या अणूंची संख्या $= २.७ \times १०^{१९}$; उज्जवायूच्या अणूंतील (२ परमाणू) द्रव्य $= ३.३२ \times १०^{-२४}$ ग्रॅम; उज्जवायूच्या अणूचा व्यास $= २ \times १०^{-८}$ सेंटीमीटर.

विद्युत्कणांचा शोध लागल्यापासून परमाणूंच्या रचनेसंबंधीं निरनिराळ्या उपपत्ती पुढें आल्या. विद्युत्कणावर ऋणविद्युताचा भार असतो. परंतु सामान्य परमाणू विद्युदुदासीन असतात. याकरितां प्रत्येक परमाणूमध्यें विद्युत्कणाशिवाय कांहीं धनविद्युद्भारयुक्त अंश असला पाहिजे. परमाणूविषयींच्या विद्युत्कणावर आधारलेल्या सर्व उपपत्तींमध्यें परमाणूची रचना विद्युत्कण आणि धनविद्युद्भारयुक्त अंश यांतील वैद्युतिक स्थितिस्थापक प्रेरणांवर अवलंबून असते, असें प्रतिपादन करण्यांत येतें. जर परमाणूचा कांहीं भाग गतिमान असेल तर ही विद्युत्स्थितिस्थापकता गत्यात्मक असते. रूदरफोर्ड यानें आल्फा किरणांच्या साहाय्यानें केलेल्या प्रयोगावरून असें निदर्शनास आणलें कीं, परमाणूमधील धनविद्युद्भारयुक्त अंश हा फार अल्प प्रमाणाचा असून त्याचा व्यास परमाणूपेक्षां फारच लहान असला पाहिजे. अलीकडे असें सर्वमान्य झालें आहे कीं, हा धनविद्युद्भारयुक्त अंश अथवा केंद्र हे सूक्ष्म कण असून त्याचा व्यास सुमारें $१०^{-१२}$ सेंटिमीटर इतका असतो व त्याच भागांत त्या परमाणूंतील सर्व द्रव्यांश असतो. यावर एन् विद्युत्कणाइतका व विरुद्ध शक्तीचा भार असतो. या ठिकाणीं एन् ही संख्या त्या द्रव्याची मॉसलेच्या श्रेणींतील अणुसंख्या दाखविते. सामान्यतः ह्या केंद्राभोंवतीं एन् विद्युत्कण असतात. परंतु योग्य परिस्थितीमध्यें त्यांपैकीं कांहीं विद्युत्कण वेगळे करतां येतात; किंवा कांहींची त्यांत भर घालतां येते. या विद्युत्कणांच्या संख्येवर व रचनेवर त्या अणूचें वजन, किरणविसर्जक बदल आणि आल्फा व बीटा किरणांवर होणारा परिणाम याखेरीज सर्व गुणधर्म अवलंबून असतात. विशेषतः त्यांतील रासायनिक व यांत्रिक गुणधर्म आणि दृक्शास्त्रीय आणि क्षकिरणवर्णपट हे त्यावर अवलंबून असतात. ज्या अर्थी विद्युत्कणांची रचना केंद्रावर असणाऱ्या भारावर अवलंबून असते त्या अर्थी हे गुणधर्म त्या द्रव्याच्या अणुसंख्येवर केवळ अवलंबून असतात. परंतु किंचित् द्रव्यावरहि अवलंबून असतात. रूदरफोर्ड आणि बोहर यांनीं आपल्यापुढें जो आदर्श परमाणु ठेवला होता त्यामध्यें असलेले विद्युत्कण आपल्या कक्षांमध्यें फार मोठ्या गतीनें फिरत आहेत असें गृहीत धरलें होतें. अशा रीतीनें परमाणूच्या वर्णपटाची उपपत्ति बरोबर लागते. रसायनशास्त्री सामान्यतः ल्यूइस आणि लँगमूर यांनीं वर्णन केलेला परमाणु पसंत करतात. या उपपत्तीमध्यें परमाणु हा स्थिर असून रासायनिक संयोग ही क्रिया एका परमाणूपासून कांहीं बाह्य-विद्युत्कण दुसऱ्या परमाणूमध्यें गेल्यामुळें किंवा दोन परमाणूंमध्यें बाह्य विद्युत्कणांची देवाणघेवाण झाल्यामुळें होते.

**जडभरत**—प्रियव्रत वंशोत्पन्न जो प्रसिद्ध ऋषभदेव राजर्षि त्याच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ भरत राजा. तो राज्य सोडून अरण्यांत तप करीत असतां हरिणबालकाच्या ममतेनें अंतकाळीं त्यास तोच ध्यास लागून हरिणजन्म प्राप्त झाला. नंतर

त्या योनींतून सुटल्यावर आंगिरस गोत्री एका ब्राह्मणाच्या स्त्रीच्या उदरीं तो जन्मास आला असतां त्यास पूर्वपुण्यानें मागचें स्मरण होतें. म्हणून आसक्तीस भिऊन त्यानें तेथें जड-चर्या अवलंबिली; म्हणून त्यास जडभरत असें नांव पडलें. भरत पहा.

**जडशक्ति**—एखाद्या पदार्थातील किंवा पदार्थांच्या घटनें-तील जी कार्यशक्ति असते तिला वास्तव अथवा जडशक्ति ( फिझिकल एनर्जी ) असें म्हणतात. जेव्हां एखाद्या प्रेरणेच्या अथवा शक्तीच्या विरुद्ध क्रिया करण्यांत येते तेव्हां त्यास कार्य असें म्हणतात, आणि त्याचें मापन त्या शक्तीचें प्रमाण आणि त्याविरुद्ध घडलेल्या क्रियेचें अंतर यांच्या गुणाकारावरून काढ-ण्यांत येते. यामुळें वास्तव शक्तीचें प्रमाण हे कार्याप्रमाणेंच त्याच मापानें मोजण्यांत येतें. म्हणजे त्याचें मूलमान फूट, पौंड व अर्ग हें असतें. वास्तव शक्ति ही दोन स्वरूपांत असते. संभाव्य ( पोटेन्शिअल ) शक्ति ही विशिष्ट पदार्थांच्या स्थितीमुळें त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली असते. उदा., घड्याळांतील वजनें किल्ली देऊन गुंडाळून ठेवलीं म्हणजे त्यांच्यामध्यें एक तऱ्हेची संभाव्य-शक्ति निर्माण करण्यांत येते व तिचा व्यय तें घड्याळ चालू राहण्यांत होत असतो. वांकविलेल्या कमानीमध्यें किंवा दाबलेल्या हवे-मध्येंहि अशीच संभाव्य शक्ति असते. दुसरी गतिशक्ति ( कायने-टिक एनर्जी )हि पदार्थामध्यें असलेल्या गतीमुळे उत्पन्न होते. उदा., बंदुकींतून सुटलेल्या गोळीमध्यें व वरून खालीं येणाऱ्या हातोड्यामध्यें गतिशक्ति असते. तसेंच ज्या वस्तू कंप पावत असतात त्यांच्यामध्येंहि अशा तऱ्हेची गतिशक्ति असते. यावरून वास्तव शक्ति ही यांत्रिक (संभाव्य व गतिमान), ध्वनि, उष्णता, प्रकाश, चुंबकीय, स्थिर वैद्युतिक, विद्युत् चुंब-कीय व रासायनिक यांपैकीं कोणत्याहि स्वरूपांत असूं शकते.

एका स्वरूपांत असलेल्या शक्तीचें दुसऱ्या स्वरूपांत रूपांतर करतां येतें. जेव्हां एखादा घड्याळाचा लंबक हालत असतो तेव्हां संभाव्य शक्तीचें रूपांतर गतिशक्तींत होत असतें. जेव्हां आपण हात एकमेकांवर चोळतों तेव्हां आपण यांत्रिक शक्तीचें उष्णतेमध्यें रूपांतर करतों. विजेनें चालणाऱ्या ट्राम गाडीमध्यें आपणास किती तरी प्रकारचीं रूपांतरें आढळून येतील. भट्टीमध्यें किंवा तापकामध्यें जळणांतील रासायनिक शक्तीचें उष्णतेंत रूपांतर होत असतें. या उष्णतेचें बाष्पचक्रा( टर्बाइन )मध्यें किंवा विद्युत् गतियंत्रा( डायनॅमो )मध्यें, गतिशक्तीमध्यें रूपांतर होतें. विद्युत् गति यंत्रांतून विद्युत्प्रवाह निघतो. व त्यांतील शक्तीचें रूपांतर गतीमध्यें होत असतें. हे शक्तीचें रूपांतर एका विशिष्ट नियमाप्रमाणें होत असतें. त्या सिद्धांतास शक्तिसातत्य ( कॉन्झर्व्हेशन ऑफ एनर्जी ) सिद्धांत म्हणतात. या सिद्धांता-प्रमाणें शक्ति केव्हांहि नष्ट होत नाहीं. व एका स्वरूपांतून शक्ति अदृश्य झाल्यास तितकीच शक्ति दुसऱ्या स्वरूपामध्यें प्रगट होते. रम्फर्ड, डेव्ही, आणि ज्यूल यांच्या प्रयोगामुळें यांत्रिक शक्ति आणि उष्णता यांमधील प्रमाण निश्चित करण्यांत आले. एका मूलमाना( युनिट )इतकी उष्णता उत्पन्न करण्याकरितां किती यांत्रिक कार्य करावें लागतें, हें ज्यूल यानें मोजून दाख-विलें. यासच ज्यूलचें मूल्य किंवा उष्णतेचें यांत्रिक सममूल्य असें म्हणतात. ज्यूल यानें असें दाखविलें कीं, एक पौंड पाण्याची उष्णता एक अंश ( फा. ) चढविण्याकरितां ७७२ फूट पौंड कार्य करावे लागतें. हा प्रयोग निरनिराळ्या प्रकारांनीं करून पाहण्यांत आला व आतां हें मूल्य ७७२ ऐवजीं ७७८ धरण्यांत येतें.

जरी शक्ति कधींहि नष्ट होत नाहीं किंवा ती वाढवितां येत नाहीं किंवा नवीन उत्पन्न करतां येत नाहीं तरी ती कांहीं अंशानें निरुपयोगी करतां येते. शक्तीच्या उपयोगित्वाप्रमाणें तिचें वर्गीकरण करतां येतें व यामध्यें असें दिसून येतें कीं, यांत्रिक शक्ति ही सर्वांत अधिक उपयोग करतां येण्यासारखी शक्ति आहे व अल्प उष्णमान असलेली उष्णताहि सर्वांत कमी उपयोग करतां येण्यासारखी शक्ति आहे. पाण्याच्या धबधब्यांचा उपयोग फार प्राचीन काळापासून सोयीस्कर ठिकाणीं व स्वस्त पडेल अशा ठिकाणीं दळण्याच्या चक्कीच्या कामीं उपयोग कर-ण्यांत आलेला आढळून येतो. उंचीवरून खालीं येणाऱ्या पाण्याचा किंवा उंचीवर असलेल्या पाण्याच्या सांठ्याचा विद्युत्-शक्ति तयार करण्याकडे उपयोग करण्यांत येतो. अलीकडे समुद्राच्या भरतीच्या पाण्याचा उपयोग यांत्रिक कार्यासाठीं करण्याचे प्रयोग चालू आहेत.

**जडावकाम**— या कलेमध्यें एका कठिण पदार्थामध्यें किंवा त्याच पदार्थामध्यें पण निरनिराळ्या रंगांचे तुकडे भरून एखादी आकृति किंवा चित्र बनविण्याचें काम करण्यांत येतें. या कामाचे अनेक प्रकार असतात. मुख्यतः लांकूड, हस्तिदंत, शिंपा, संगम-रवर किंवा इतर एखादा दगड किंवा धातु यांच्यापासून हें जडाव-काम करण्यांत येतें. लांकडाच्या जडावकामाच्या दोन पद्धती आहेत : ( १ ) प्रथम जी आकृति भरावयाची असेल ती आकृति लांकडामध्यें खोदून नंतर त्या त्या आकाराचे तुकडे नैसर्गिक किंवा कृत्रिम रीतीनें रंगविलेले लांकडाचे किंवा इतर पदार्थांचे त्या त्या खोबणींत भरावयाचे. ही प्राचीन पद्धति होय. ( २ ) दुसरी अर्वाचीन पद्धति-हीमध्यें एकच आकृति दोन पातळ निरनिराळ्या रंगांच्या लांकडाच्या फळ्यांत एकावर एक ठेवून खोदून काढतात व एका आकृतींतील कापून काढ-लेले एका रंगाचे तुकडे दुसऱ्या रंगाच्या आकृतींत भरतात.

अखेरीस अशा या फळ्या ज्या वस्तूस लावावयाच्या असतील त्यांवर सरस वगैरेनें जोडून देण्यांत येतात. जेथें मोठा पृष्ठभाग भरावयाचा असेल तेथें संगमरवराचें काम करतात. या कामाची 'निलो' नांवाची पद्धति आहे. तीमध्यें धातूमध्यें बारीक रेषा खोदून त्या चांदी, तांबें, शिसें व गंधक यांच्या मिश्रणानें भरुन काढतात. 'दमासीन' काम म्हणून एक प्रकार आहे. त्यामध्यें सोन्याची किंवा रुप्याची तार काढून ती लोखंड, पोलाद, किंवा कांसें यांच्यामध्यें भरतात. एखाद्या धातूच्या पऱ्यावर आपणांस पाहिजे असलेली आकृति खोदण्यांत येते. त्यापूर्वी या पऱ्यास एक अमोनिया, सोरा, व मोरचूद यांचा एकत्र केलेला द्रव लावण्यांत येतो. नंतर त्या खोदलेल्या रेषांत चांदी भरण्यांत येते.

जमिनींत किंवा भिंतींत केलेलें जडावकाम—(मोझाइक). अशा तऱ्हेची जमीन कांचेचे तुकडे, संगमरवरी दगडाचे तुकडे, किंवा इतर जातीचे रंगीत तुकडे यांची बनविण्यांत येते. हे तुकडे अशा तऱ्हेनें बसविण्यांत येतात कीं, त्यापासून एखादी रंगीत आकृति किंवा चित्र तयार व्हावें. या तऱ्हेचें काम भिंतीवर, कमानदार छतावर, किंवा फरशीवर अथवा एखाद्या इमारतीच्या भागांत करण्यांत येतें. युरोपमधील अभिजात युगामध्यें अशा तऱ्हेचें काम सर्वत्र करण्यांत येत असे. या कामाचे पाँपी व रोम येथील नमुने ब्रिटिश म्यूझियममध्यें ठेवलेले आहेत. मध्ययुगाच्या आरंभीं खिस्ती मंदिरांतून अशा कामाचा परिपाठ फार होता. बायझंटाइन साम्राज्याच्या काळांत या कामांतील बरेच कारागीर तयार झाले व त्यांनीं या कलेचा स्पेन व इटली यांमध्यें प्रसार केला. या कामाचे उत्कृष्ट नमुने चौथ्यापासून आठव्या शतकापर्यंत आढळतात. यानंतर चौदाव्या शतकांत थोडेंसें या कलेचें पुनरुज्जीवन झालेलें । आढळतें. परंतु यानंतर गिलाव्यांतील चित्रांचा प्रघात पडल्यामुळें ही पद्धति मागें पडली.

हिंदुस्थानांत दगडांतून, जमिनींतून व भिंतींतून इतर तुकडे (दगड, कांच, रत्नें इ. चे) जडविण्याची कला मोंगल अमदानींत दिसून येते. उत्तर हिंदुस्थानांत लोखंडी-पोलादी जिनसांवर सोन्या-रुप्याचे जडाव केलेले आढळतील. बिदरी भांडीं तर प्रख्यातच आहेत.

**जत**— मुंबई, विजापूर जिल्हा. हें संस्थान पूर्वी डेक्कन स्टेट्स एजन्सीमध्यें असे. १९४८ सालीं हें इतर संस्थानांबरोबर मुंबई प्रांतांत विलीन करण्यांत आलें. संस्थानचें एकंदर क्षेत्रफळ ९८०·८ चौ. मैल आहे. यांत ११९ गांवें आहेत. राजधानीचें शहर जत हेंच असून विद्यमान संस्थानिक श्रीमंत विजयसिंह रामराव उर्फ बाबासाहेब डफळे हे आहेत. संस्थानिकांना राज्यांतील मुलकी व फौजदारी बाबतींतील सर्व अधिकार असून इंग्रज सरकारास संस्थानाकडून सालिना ११,५४७ रु. खंडणी मिळे. संस्थानचें उत्पन्न सुमारें चार लक्ष रुपये आहे. लो. सं. १०,७,७३६.

संस्थानिक हे उच्चवर्गीय मराठे (क्षत्रिय) असून त्यांचें मूळचें आडनांव चव्हाण होतें; परंतु जतची जहागीर मिळाल्यानंतर त्यांना डफळे हे नांव मिळालें. याचें कारण त्यांचे पूर्वज हे मूळचे (जत संस्थानांतील) डफळापूर या गांवचे पाटील होत. सांप्रतहि डफळापूरची पाटिलकी संस्थानिकांचीच आहे.

संस्थानिकांचा मूळ पुरुष सटवोजीराव डफळापूरचा पाटील होता. त्याच्या शौर्यामुळें तो विजापूरच्या अलीआदिलशहाच्या नजरेस आल्यानें त्यानें त्याला नोकरींत घेऊन जत, करजगी, बारडोल, व हातवाड या चार परगण्यांचें देशमुखी वतन वंशपरंपरा जहागीर म्हणून दिलें; व त्याबद्दल सालिना ३,००० मोहरा खंडणी ठरविली (१६७२). सटवोजीनें जत ही आपली राजधानी केली. १७०४ ला त्याचा पुत्र कान्होजी वारला. त्यामुळें पुत्रशोकानें सटवोजी १७०६ त मृत्यु पावला. सटवोजीस दोन मुलगे. बाबाजी लढाईत मारला गेला. सटवोजीनंतर बाबाजीची बायको येसूबाई हिनें आपला वडील पुतण्या यशवंतराव यास गादीचे वारस केलें (१७४४). यशवंतरावाच्यामागें त्याचा पुत्र अमृतराव गादीवर आला.। तो १७९० त वारल्यावर त्याचा मुलगा कान्होजीराव गादीवर बसला. हा खर्ड्याच्या लढाईत हजर होता. सन १८१० त हा मरण पावला. कान्होजीच्यामागें त्याची वडील बायको रेणुकाबाई ही कारभार पहात होती. तिच्यांत व ईस्ट इंडिया कंपनींत ता. २२ एप्रिल १८२० रोजीं एक तह झाला. त्यामुळें जत संस्थान हें सातारकर छत्रपतींच्या अधिराज्याखालून निघून कंपनीच्या देखरेखीखालीं आलें. रेणुकाबाई १८२२ त वारली. तिच्यानंतर तिची सवत साळूबाई ही कारभार करूं लागली; पण ती थोड्याच महिन्यांत मरण पावली (१८२३). दोघी बायांना मुलें नसल्यानें यशवंतरावाचा नातू रामराव नारायण यास सातारकर छत्रपतींनीं वारसदार म्हणून संमति दिली. त्यानें १८३५ पर्यंत राज्य केलें. त्यालाहि संतति नव्हती. म्हणून त्याच्या बायकोनें अमृतराव यास दत्तक घेतलें (१८४२). अमृतराव यास १३ मे १८५५ त सर्व अधिकार मिळाला. अमृतराव हे १८९२ (जानेवारी) त निपुत्रिक वारले. त्यांच्या पत्नी लक्ष्मीबाई यांनीं रामराव यांना दत्तक घेतलें. त्यांनीं १९२९ पर्यंत राज्य केलें. नंतर सध्यांचे श्रीमंत विजयसिंहराव गादीवर आले. त्यांना हिंदी नाविकदलांत लेफ्टनंटचा हुद्दा आहे.

**जंतुनाशक द्रव्यें**—ज्यामुळें रोगजंतूंचा नाश होतो किंवा त्यांची वाढ होत नाहीं अशीं द्रव्यें (कार्बोलिक ॲसिड, आयोडिन, आयडोफॉर्म, परमँग्गॅनेट ऑफ पोटॅश, इ. औषधें) जंतुघ्न म्हणून साधारणतः वापरण्यांत असतात. लॉर्ड लिस्टर यानें शोधून काढलेल्या जंतुनाशक क्रियेमुळें शस्त्रक्रिया निर्धोक होऊं शकते. शस्त्रवैद्यानें आपले हात स्वच्छ ठेवणें व उपकरणीं जंतुविरहित करणें या गोष्टींमुळें जंतुनाशक औषधांची फारशी गरज पडत नाहीं. रसायन वैद्यकांत साल्वरसन, सोडियम हायड्रोक्लोराइड व ॲक्रिफ्लाव्हिन हीं जंतुनाशकें रक्तांत घालतात. शरीरांतील तंतुजालांना न दुखवितां आंतल्या व्याधींना मारक होणारीं द्रव्यें शोधून काढण्याचे प्रयोग चाललेले आहेत.

संडास, मोऱ्या, वगैरे ठिकाणीं जंतू उत्पन्न होऊं नयेत म्हणून फिनेल, व इतर जंतुघ्न औषधें वापरतात.

**जंतुनाशनक्रिया**—(पाश्चरायझेशन). जंतुनाशनक्रिया दोन प्रकारची असते. एक सामान्यतः कोणतीहि वस्तु उकळून किंवा उकळत्या पाण्यांत ठेवून ती जंतुविरहित करण्यांत येते. परंतु पाश्चरच्या जंतुनाशनक्रियेमध्यें एखाद्या द्रवाचें उष्णमान इतकें वाढविण्यांत येतें कीं, त्यामध्यें वानस्पतिक अथवा प्रतिबंध न करणारे सर्व जातींचे सूक्ष्म जंतू मरून जातात. या क्रियेचें महत्त्व सहज कळून येण्यासारखें आहे. कारण लहान मुलास जो क्षयाचा विकार होतो त्यांतील बरेंच प्रमाण दुधास घडलेल्या संस्कारामुळें उत्पन्न झालेलें असतें, असें दिसून आलेलें आहे. या जंतुनाशनक्रियेचे दोन प्रकार आहेत: एक दीर्घकालिक व दुसरी तात्कालिक. दीर्घकालिक पद्धतीमध्यें दूध १४५° फा. पासून १५०° फा. पर्यंत उष्णमानामध्यें अर्ध्या तासापासून एक तासापर्यंत बंद भांड्यामध्यें ठेवण्यांत येतें. त्यानंतर तें एका झांकलेल्या शीतकांत सोडण्यांत येऊन तेथें त्याचें उष्णमान ५०° फा. पर्यंत उतरण्यांत येतें. या पद्धतीमध्यें गरम झालेलें दूध एकदम थंड करणें ही क्रिया महत्त्वाची असते. या क्रियेमध्यें एकदम मोठ्या उष्णमानापासून थंड करण्यामध्यें जंतूवर परिणाम होतो असें नव्हे, परंतु जर एखादा जंतु जिवंत राहिला असेल तर त्याची वाढ होऊं शकत नाहीं. दुसऱ्या तात्कालिक पद्धतीमध्यें उष्णमान १६०° फा. पासून १८०° फा. असते. ही पद्धति लोणी काढण्याच्या क्रियेंत वापरतात. या पद्धतीमुळें दूध अधिक वेळ टिकतें, जंतूंचा नाश होतो, अनिष्ट द्रव्यें नाहींशीं होतात व लोणी किंवा मलई लवकर निघते. परंतु लोणी किंवा मलई कमी निघते, व कांहीं रासायनिक क्रिया होते, त्यामुळें दुधांतील स्निग्धता कमी होते. तसेंच शर्करांश घट्ट होतो, त्यांतील ओजस द्रव्यें पचावयास कठिण होतात, व चव निराळी लागते आणि जीवनसत्त्वें तर अजीबात नाहींशीं होतात.

**जन**—जन या शब्दाचा मनुष्य व्यक्ति हा अर्थ असून हा शब्द समुदायवाचकहि आहे. ऋग्वेदामध्यें व पुढील ग्रंथांत अनेक लोकांचा समुदाय किंवा जात अशा अर्थानें हा आलेला आहे. उदाहरणार्थ 'पंचजनाः' किंवा 'पंचजनासः' हा शब्द पांच जाती अशा अर्थानें वारंवार आलेला आहे. ऋग्वेदामध्यें एका ऋचेंत यदुवंशांतले लोक (यादव जन) व यदुः (यादवाः) हे समानार्थी शब्द आले आहेत. तसेंच राजा म्हणजे 'जनस्य गोपाः' म्हणजे लोकांचा रक्षिता असें म्हटलें असून राजा व जन यांचे वारंवार उल्लेख आलेले आहेत. भारतजन असाहि उल्लेख ऋग्वेदांत आलेला आहे. जन हा अनेक विश् मिळून झालेला असे ही गोष्ट बरीच संभवनीय आहे. या मतास ऋग्वेदांतील दुसऱ्या एका स्थलाचा आधार आहे. त्या स्थलीं विश् म्हणजे लढवय्ये लोकांचें पथक होतें असें उल्लेखिलें आहे. होमरच्या वेळीं व पूर्वीच्या जर्मन लोकांच्या काळीं नात्याच्या आधारावर लष्कराची रचना करीत, त्याप्रमाणेंच वेदकालींहि व्यवस्था होती असें वरील गोष्टीवरून म्हणतां येतें. पण अनेक ग्राम मिळून एक विश् होई हें म्हणणें निश्चयानें खरें म्हणतां येत नाहीं. तेव्हां वैदिक काळांत ग्राम, विश् व कुल किंवा गोत्र यांचे संबंध काय होते हें अनिश्चितच आहे. शिवाय ग्राम व विश् यांचे निश्चित अर्थ न कळल्यामुळें तर जास्तच घोंटाळा झालेला आहे. विश् याचा अर्थ जर स्थलविभाग असा घेतला तर ग्राम म्हणजे जिल्ह्याचा भाग असें मानतां येईल. पण विश् म्हणजे विशिष्ट नात्याचे लोक असा अर्थ घेतला तर एका एका ग्रामामध्यें निरनिराळीं 'विश्'चीं कुटुंबें असूं शकतील, किंवा एक ग्राम म्हणजे एक विश् असूं शकेल, किंवा एका विशचा भागहि असूं शकेल. तें कसेंहि असो, मूळ जी वैदिक काळांत व्यवस्था होती तीमध्यें पुढें राजकीय दृष्टीपेक्षां ब्राह्मण वर्णाला महत्त्व देण्याची जी वृत्ति उत्पन्न झाली तिजमुळें बरेच फेरबदल झाले असले पाहिजेत एवढें खरें. लोकांचे निरनिराळे दोन वर्ग कुल किंवा गोत्र या तत्त्वांवर ठरले जात. एका कुलामध्यें एकच कुटुंब असे व तें एकाच घरांत रहात असे, व त्या घरांत सर्व भाऊ अविभक्त पद्धतीनें किंवा सर्व मुलें आपल्या पित्याच्या आश्रयाखालीं रहात असत. गोत्रांत ज्यांचा एकच मूळ पुरुष मानिला जाई ते सर्व लोक समाविष्ट होत असत. गोत्र, विश् व जन या शब्दांची लॅटिन भाषेंतल्या जेन्स, कुरिआ व ट्राइब्स या शब्दांची व ग्रीक भाषेंतल्या तत्सदृश शब्दांशीं तुलना करतां येईल. या तीन जाती पारशी लोकांतहि विश्, झंतु व दस्यु या नांवांवरून दिसतात. विश् या पारशी लोकांमधील जातीवरून असेंहि सिद्ध होतें कीं, हिंदुस्थानांत विश् ही जन यांची विभागणी होती; तीमध्यें स्थलापेक्षां रक्तावरूनच नातें ठरलें

जात असे व हीच स्थिति टॅसिटसनें लिहिलेल्या जर्मानिया ग्रंथांत जी राज्यपद्धति वर्णिली आहे तींत दिसून येते. कोणत्या तरी रूपांत असलेली कुलव्यवस्था ही 'जन' याचा तिसरा घटकावयव होती असें ऋग्वेदांतील एका स्थलावरून दिसतें. कारण त्या ठिकाणीं गृहाची तुलना जन व विश् यांच्याशीं केलेली आहे. ऋग्वेदांत दुसऱ्या एका स्थळीं (७,८२१) कुलांतला यज्ञ (अध्वर) याची जन-यज्ञ किंवा विश्-यज्ञ यांशीं तुलना केली आहे. त्या वेळचे राज्यांतले प्रमुख समाजघटक गोत्र व जन हेच होत. विश् हा तिसरा स्वतंत्र घटक नसून पुढें ज्याला गोत्र म्हणूं लागले तोच जुन्या ग्रंथांत विश् या शब्दानें सूचित होत असावा. जन ही कल्पना अजूनहि आहे व ती सर्वत्र गृहीत आहे. पण विश् हे जनाचे भाग आतां नाहींत. हल्लीं निरनिराळे वर्ण हे जनाचे विभाग आहेत व हल्लीं वर्णांच्या ज्या अनेक पोटजाती झालेल्या आहेत त्यांना अंशतः मूळ आधार पूर्वींच्या गोत्रांचा आहे.

**जनक**—१. विदेहवंशीय राजांचें साधारण नांव. याचें कारण, यांचा मूळपुरुष केवळ पित्याच्याच देहापासून निर्माण झाला हेंच होय. वैवस्वत मनूचा ज्येष्ठपुत्र इक्ष्वाकु, याच्या शतपुत्रांतील द्वितीय पुत्र जो निमिराजा, त्यास वसिष्ठाचा शाप होऊन त्याचा देहपात झाला असतां ब्राह्मणांनीं त्याच्या देहाचें मंथन केलें व त्यांतून एक पुरुष निर्माण केला. त्याचें नांव (मिथि) जनक. तेथून मग तेंच नांव प्रत्येक पुरुषास चालू झालें.

२. सीतेचा पिता (पालक) हा विदेह राजा सदाचरणी व महाज्ञानी म्हणून प्रसिद्धीस आला. याला 'सीरध्वज' (नांगराचा ध्वज असलेला) असें म्हणत. याज्ञवल्क्य याचा गुरु होता. यज्ञभूमि नांगरीत असतां याला सीता सांपडली अशी कथा आहे.

जनकासंबंधीं पुष्कळ कथा आहेत. पण त्या एकाच जनक राजासंबंधीं दिसत नाहींत. याज्ञवल्क्य, आरुणेय, इ. शीं ब्रह्मज्ञानावर चर्चा करणारा ब्रह्मवेत्ता असा एक जनक आहे. एक इच्छामरणी जनक आहे; त्यानें स्वर्गाला न जातां यमलोकांतील दुःखार्तांचीं दुःखें आपल्या वास्तव्यानें कमी केलीं.

**जनकोजी शिंदे** (मृ. १७६१)— एक मराठा सरदार. जयाप्पा शिंद्याचा हा मुलगा. याच्या आईचें नांव सखूबाई. निजामशाहींतील व्यंकटराव निंबाळकराची बहीण काशीबाई ही यास दिली होती. जनकोजी लहानपणापासूनच मोहिमांवर जात असे. सन १७५० मध्यें अब्दालीशीं झालेल्या लढाईत यानें त्यांचा पराभव करून त्याच्या रणसाहित्याची चांगलीच नासधूस करून टाकली. सन १७५५ मध्यें ज्या दिवशीं



जयाप्पाचा खून झाला त्या दिवशीं यानें मेंढतें आपल्या ताब्यांत घेतलें व चुलता दत्ताजी याच्याबरोबर राहून मारवाड पादाक्रांत केलें. जनकोजी पेशव्यांशीं एकनिष्ठ असे. पानपतच्या युद्धांत भाऊसाहेबाजवळ जरिपटक्याखालीं हा लढत असतां मारला गेला किंवा कैद झाला. त्या वेळीं याचें वय सतरा असावें.

**जनजसवंत**—एक हिंदी कवि. पश्चिम खानदेश जिल्ह्यांत नंदुरबार तालुक्यांतील चोरठें येथें राहत असे. हा रामभक्त होता. गुरु तुळशीदासानें त्याला उपदेश देऊन प्रसादादाखल मारुतीची मूर्ति दिली. ही मूर्ति तळोदें तालुक्यातील कुकुरमुंडे या गांवीं अद्यापि आहे. तेथेंच या जनजसवंताचे वंशजहि राहत आहेत. बागलाणचा राजा प्रतापशहा याच्या जनार्दन नांवाच्या ब्राह्मण प्रधानाचा जसवंत हा पुत्र. मुल्हेरीस याचें पहिलें आयुष्य गेलें. पुढें यानें तीर्थयात्रा केल्या. गुजराथेंतील एका निर्जल प्रदेशांत यानें एक विहीर बांधून पाण्याची सोय केल्यानें याला जल (जन) जसवंत म्हणूं लागले. याचें सर्व कवित्व हिंदींत आहे. यानें स. १६१७ च्या सुमारास चोरठें येथें समाधि घेतली.

**जनमेजय**—या नांवाच्या अनेक प्राचीन व्यक्ती आढळतात. पौराणिक काळांत अर्जुनाचा पुत्र परीक्षित, त्या राजाचा हा पुत्र म्हणून प्रसिद्ध आहे. यानें हस्तिनापूर येथें बापाच्यामागें ८४ वर्षें राज्य केलें. त्या वेळेस कलियुगाचीं १७८ वर्षें झालीं होतीं. याच्याच कारकीर्दींत सर्पसत्र झालें.

**जनरल**— हा लष्करी हुद्दा कॉमवेलच्या वेळेपासून आला. ब्रिटिश लष्करांत 'जनरल' हा हुद्दा तीन दर्जांच्या निरनिराळ्या अधिकाऱ्यांना असतो. १ जनरल; २ लेफ्टनंट-जनरल आणि ३ मेजर-जनरल; यांपैकीं नुसता 'जनरल' हा दर्जा या तिघांत वरिष्ठ होय. व्यावहारिक बोलभाषेंत या तिघांनाहि नुसतें जनरलच म्हणतात; पण सरकारी कामकाजांत व कागदपत्रांत त्या त्या अधिकाऱ्याचें विशिष्ट नांव लिहितात. या तिहींशिवाय ब्रिगेडिअर-जनरल ही एक पदवी १९२० पर्यंत चालू होती. ती पुढें बंद करण्यांत आली. कांहीं विशिष्ट तात्पुरतें काम करणारांना ब्रिगेडिअर-जनरल म्हणत असत; हल्लीं अशा अधिकाऱ्यांना कर्नल-कमांडंट किंवा नुसतें कर्नल म्हणतात.

**जनस्थान**— द्वापारयुगांत नाशिकाला जनस्थान म्हणत. राम वनवासांत असतां या ठिकाणीं राहिला होता, म्हणून या स्थानाचें महत्त्व मानतात. रामायणांत जनस्थानाचें वर्णन आढळतें. या ठिकाणीं खरादि राक्षस राहत. १४ व्या शतकांतील जैन ग्रंथकार जिनप्रभसूरि जनस्थान हें नांव यज्ञस्थानावरून बनलें अशी व्युत्पत्ति देतो.

**जनानखाना**—श्रीमंत मुसलमान लोकांत बायकांसाठीं घराचा एक स्वतंत्र भाग राखून ठेवलेला असतो. तेथें अगदीं जवळच्या नातेवाईक पुरुषाखेरीज कोणाहि पुरुषानें पाऊल घालावयाचें नसतें. मुसलमानी राजांचे जनानखाने अनेक स्त्रिया, उपस्त्रिया व खोजे यांनीं भरलेले असत. तुर्कस्तानच्या सुलतानाचा कॉन्स्टँटिनोपल राजधानींत फार मोठा जनानखाना असे. १९२२ त तो सुलतान पदच्युत झाल्यानंतर रिकामा झाला. युरोपियन प्रवाशांनीं मोगल बादशहांच्या जनानखान्याचें आणि तेथील कृष्णकृत्यांचें वर्णन पुष्कळ ठिकाणीं केलेलें आढळेल.

**जनाबाई**—एक मराठी कवयित्री. ही विठ्ठलभक्त असून नामदेवाच्या घरीं दळण-कांडण, वगैरे कामें करण्याकरितां होती. ही चंद्रभागेच्या वाळवंटांत नामदेवाला सांपडली अशी दंतकथा आहे. पण हिच्या आई-बापाचा शोध लागला आहे. नामदेवाच्या कुटुंबांतील मंडळीबरोबर हीहि भक्तिमार्गांत शिरली व अभंग करूं लागली. हिनें भक्तिभावानें देव आपला इतका ऋणी केला होता म्हणून सांगतात कीं, तो हिला दळूं व कांडूं लागे, व हिच्या घरीं भोजन करी.

हिने लग्न मुळींच केलें नव्हतें. नामदेवानें स्वतः आपण व घरचीं तेरा माणसें मिळून चौदा जणांनीं अभंग लिहिले; त्या १४ माणसांशिवाय ही एक पंधरावी त्यांत होती. हिनें १२॥ कोटी अभंग रचिले असे तुकाराम म्हणतो. हिचें 'द्रौपदीवस्त्रहरण' प्रसिद्ध आहे. मुक्ताबाईप्रमाणेंच हिचे अभंग फारच प्रेमळ आहेत. हिचा समाधिकाल आषाढ वद्य १३ शके १२७२ असा दिला आहे.

**जनार्दनपंत हणमंते** (मृ. १७८३)— शिवाजीच्या अष्टप्रधानांपैकीं हा सुमंत. याचे वडील नारायणपंत शहाजीजवळ चिटणीस होते. हा शूर व मुत्सद्दी असून महत्त्वाच्या घडामोडींत शिवाजीस याचा सल्ला उपयोगी पडे. सिद्दी मसूदनें कर्नाटकांत शिवाजीस मुलूख दिला व मोंगलाशीं लढण्याकरितां त्याची मदत घेतली. शिवाजीच्या कर्नाटकाच्या स्वारींत हणमंतेबंधू बरोबर होते. या वेळीं मिळालेल्या मुलखाची व्यवस्था शिवाजीनें याजकडेच सोंपवली होती. दिलीरखान हा विजापूरच्या सर्जाखानास घेऊन कर्नाटकांतील कोप्पळगडावर चालून आला असतां यानें त्याला माघार घ्यावयास लावली. शिवाजीनें याला संभाजीवर देखरेख करण्यासाठीं पन्हाळ्यावर ठेविलें होतें. पुढें शिवाजी मरण पावल्यावर संभाजीनें यास कांहीं दिवस अटकेंत ठेवलें होतें. हा सन १६८३ मध्ये आपला थोरला भाऊ रघुनाथपंत याच्या मृत्यूनंतर एक महिन्यानें निवर्तला.

**जनार्दन बाजीराव पेशवे** (१७३५–१७५०)— थोरला बाजीराव याचा शेवटचा मुलगा. १७४० सालीं याची मुंज झाली. पुढें चार वर्षांनीं याचें लग्न रामाजी अनंत नाईक भिडे याच्या मुलीशीं झालें. याच्या पत्नीचें नांव सगुणा असें होतें. अल्पवयी असूनहि यानें कांहीं महत्त्वाच्या घडामोडींत भाग घेतल्याचें दिसून येतें.

**जनार्दन शिवराम**—मराठ्यांचा एक वकील. हा महाराष्ट्रीय ब्राह्मण दुसऱ्या माधवराव पेशव्याच्या कारकीर्दींत मद्रासच्या इंग्रजांकडे मराठ्यांतर्फें वकील होता. सन १७८० ते १७९१ या कालांत मद्रासेहून यानें पाठवलेल्या पत्रांत हैदर, टिपू, निजाम, दक्षिण हिंदुस्थानांतील फ्रेंच व इंग्रज, अर्काटचा नबाब यांच्या राजकारणांची अगदीं बारीक अशी माहिती दिसून येते.

**जनार्दनस्वामी**— एक मराठी संतकवि. हा देशस्थ आश्वलायन गोत्री ब्राह्मण खानदेशांतील चाळीसगांवचा देशपांडे होता. जन्म शके १४२६ त चाळीसगांवीं झाला. हा शांकरमतानुयायी असे. याची गणना साधुमंडळांत आहे. यास देवगडच्या किल्ल्यावर यवन किल्लेदाराच्या कारभारीपणाचें काम असे. गाणगापूर येथें जे नृसिंहसरस्वती होते, त्यांचा हा शिष्य होता. हल्लीं नृसिंहवाडीस जी नृसिंहसरस्वतींची आरती म्हणतात ती जनार्दनस्वामीनेंच रचलेली आहे. त्याचे अभंग व पदे उपलब्ध आहेत. याचा काल शके १४९७ च्या सुमारास झाला. प्रख्यात संतकवि एकनाथ याचा शिष्य होता. 'एकाजनार्दन' असें एकनाथाचें काव्यनाम प्रसिद्ध आहेच. दौलताबाद किल्ल्यावर जनार्दनस्वामीची समाधि दाखवितात.

**जनीजनार्दन** (मृत्यु शके १५२३)— एक मराठी कवि. याचें खरें नांव जनार्दन व उपनांव गोसावी होतें. हा एकनाथाप्रमाणें जनार्दनस्वामीचा शिष्य होता. हा मूळचा बीड येथील राहणारा व विजापूरच्या बादशहाच्या नोकरींत होता. पण दुष्काळांत दामाजीपंताप्रमाणेंच गोरगरियांना सरकारी कोठार लुटूं दिल्यामुळें यास नोकरीस मुकावे लागलें. यानें रामकृष्णचरित्रपर बरींच पदें केलीं आहेत. याची समाधि भूम (मोंगलाईंत) येथें आहे.

**जन्न** (सु. १२०९)—एक कानडी कवि. हा जैनधर्मी होता. याचा गुरु गंडविमुक्त रामचंद्र देवमुनि. यशोधरचरित, अनंतनाथपुराण व स्मरतंत्र हे याचे सुप्रसिद्ध ग्रंथ होत. होयसळांपैकीं वीरबल्लाळानें यास कविचक्रवर्ती अशी पदवी देऊन याच्या काव्यगुणांचा गौरव केला. याचें काव्य मधुर पण गांभीर्ययुक्त असें आहे. नरसिंह चोळाचा हा सेनापति व मंत्रीहि होता. हा आपणांस देशप्रभु (नाळप्रभु) जनार्दनदेव

असें म्हणवीत असे. औदार्याबद्दल प्रसिद्ध असून यानें बरींच जैन मंदिरें उभारलीं.

**जपान**— आशिया खंडाच्या पूर्वेकडील प्रशांत (पॅसिफिक) महासागरांतील बेटांचा देश. उत्तरेकडील क्युराइल व दक्षिणेकडील रियुकियु व यांच्यामध्यें असलेलीं मुख्य व मोठीं चार आणि इतर कित्येक बेटें यांत आहेत. जपानी भाषेंत जपानला निपोन असें म्हणतात. उत्तरेस कामश्चाटकाचें द्वीपकल्प व दक्षिणेस फोर्मोसा बेट यांच्या दरम्यान हा देश पसरला आहे. क्षेत्रफळ १,४७,३२७ चौरस मैल. लोकसंख्या (१९३९) ७,२८,७५,८००. दुसऱ्या महायुद्धापूर्वी जपानचें साम्राज्य जपानी बेटांबाहेर बरेंच असे. कोरिया, फोर्मोसा व साघलिन बेटाचा दक्षिणार्ध यांचा जपानी साम्राज्यांतच अंतर्भाव होई. याशिवाय उत्तर प्रशांत महासागरांत मार्शल, मरिआना व करोलाइन हीं बेटें पहिल्या महायुद्धानंतर जर्मनीकडून जपानकडे मँडेटनें आलीं. हीं लहान लहान सुमारें ६२५ बेटें आहेत. त्यांतलीं हीं तीन महत्त्वाचीं व मुख्य आहेत.

जपानची राजधानी टोकियो ही होनशू बेटावर आहे. होनशू हें मोठें महत्त्वाचें व मध्यवर्ती बेट आहे. होकाइडो अथवा येझो याजवर ऐनु (पाहा) नांवाच्या रानटी लोकांची वस्ती आहे. जपानचें जपान हें नांव निपोन ह्या जुन्या जपानी मूळ शब्दाचा अपभ्रंश आहे. त्याचा अर्थ 'प्रकाशप्रभव' असा आहे. जपानी लोक आपल्या देशाला 'उगवत्या सूर्याचा देश' असें म्हणतात. जपानी बेटें हीं बहुधा डोंगराळ आहेत. फुजियामा हें जपानचें एक धर्मक्षेत्र असून त्याची उंची सर्वांत जास्त (१२,३९५ फूट) आहे. ७ ते १० हजार उंचीचीं ज्वालामुखीचीं शिखरें आहेत. हवामान साधारण समशीतोष्ण व फेरबदल होणारें असून पर्जन्यवृष्टि विपुल होते. जपानच्या नद्या द्रुतगति असून वाहतुकीच्या कामाच्या नाहींत. ⅙ पेक्षांहि कमी जमीन शेती वगैरेंच्या कामीं येण्याजोगी आहे.

जपानमध्यें भूकंप ही एक सामान्य गोष्ट आहे. लहान-मोठा भूकंपाचा धक्का बहुधा कोठें ना कोठें तरी रोजच बसतो असें म्हटलें तरी चालेल. याप्रमाणें ही जपानी लोकांच्या अंगवळणीं पडलेली गोष्ट असली तरी एखादे वेळीं ती आपलें नैसर्गिक बल दाखविल्याशिवाय राहत नाहीं. १८९६ सालच्या भूकंपांत २६,००० माणसें मृत्युमुखीं पडलीं. १९२३ मध्यें टोकियोमध्यें झालेल्या भयंकर भूकंपानें १,५०,००० बळी घेतले व २२,५०,००,००० डॉलर्सची (७,००,००,००,००० रुपयांवर) मिळकत नष्ट केली.

जपानमधलीं महत्त्वाचीं सर्व शहरें होनशू बेटावर आहेत. तीं टोकियो, ओसाका, नागोया, कियोतो, कोबे आणि योकोहामा हीं होत.

जपानमध्यें जपानी लोक आपल्या बादशहाला प्रत्यक्ष सूर्यनारायणाचा वंशज मानतात. जपानी धर्मांत जपानी बादशहाला देवच म्हटलें आहे. जपानी धर्माला शिंतो असें नांव आहे. 'देवतांचा मार्ग' असा त्याच्या मूळ चिनी शब्दाचा अर्थ आहे. चीनमधील कॉन्फ्यूशिअन व बौद्ध मतें वगैरेंचा या धर्मावर बराच परिणाम झालेला आहे. जपानी लोक मंगोली वंशांतले आहेत व त्यांच्यांत मलायन वंशाचें मिश्रण झालेलें आहे. जपानी भाषा अगदीं स्वतंत्र आहे. या देशांतील संस्कृति जुन्या सामुराई संस्कृतीवर चिनी व पाश्चात्य संस्कृतीचे संस्कार होऊन बनली आहे. चीन–जपानचे सांस्कृतिक संबंध १५।१६ शें वर्षांहून जास्त काळचे आहेत. पाश्चात्यांच्या संस्कृतीशीं जपानचा संबंध १८६० पासूनच आला म्हटलें तरी चालेल. हल्लीं जपाननें बरेंचसें पाश्चात्यांचें अनुकरण केलें असलें तरी जपानची संस्कृति अद्यापहि पुष्कळशी आपला स्वतंत्रपणा व वैशिष्ट्य राखून आहे.

जपानी माणूस सामान्यतः आनंदी वृत्तीचा व शांत असतो. जपानी शिपाई तर जिवावर उदार होऊन निमूटपणें देश आणि राजा यांसाठीं लढत राहतो; त्याला चुकारपणा माहीत नाहीं. स्त्रियाहि निःस्वार्थी, विनयशील व घोरणी असतात. त्या तशाच पतिव्रता, गुणी व मायाळू असतात. पुरुषांप्रमाणें वेळप्रसंगीं शौर्यहि दाखवितात. पण जपानी लोक वेळप्रसंगीं एकदम एका टोंकापासून दुसऱ्या टोंकास जातात. सध्यांच दुसऱ्या महायुद्धानंतर जुनें वळण तावडतोब टाकून त्यांनीं पाश्चात्यांचें लोकशाही वळण त्यांतील दोषांसह घेतलेलें दिसतें. यापूर्वी ते सनातनी फॅसिस्ट पंथाचे कट्टर अनुयायी होते.

सर्व राष्ट्रच कलावंत म्हणतां येईल. लाख, माती, लांकूड, धातू, वगैरे साधनांनीं ते कलाकुसरीच्या गोष्टी तयार करतात. त्यांचीं सुंदर घरें व देवळें लांकडाचींच असतात. चित्रकला तर सर्वत्र दिसते; तिचे विषय नवीन नवीन असतात. घरांदारांतून चित्रें व नक्षी डोळ्यांत भरते. पडदे, पंखे, विणकाम, कुंभारकाम, खेळणीं, वगैरे वस्तू पाहिल्या म्हणजे जपान राष्ट्र व्यावहारिक कलेंत किती पुढें गेलें आहे हें पटतें.

अर्वाचीन पद्धतीचें शिक्षण जपानमध्यें १८७२ सालीं सुरू झालें. अमेरिकेच्या धर्तीवर शिक्षणपद्धति उभारली आहे. विविध प्रकारच्या शाळा व महाविद्यालयें आहेत. सहा विश्वविद्यालयें जपानांत आहेत. १९३५ सालीं ४,७६९ ग्रंथालयें असून त्यांत एकंदर सव्वा कोटींवर ग्रंथ होते.

जमिनीपासून उत्पादन श्रमपूर्णतत्त्वानें होतें. तांदूळ, चहा, तंबाकू, फळें, इ. होतात. रेशीम, कापड, कागद, कातडीं, खेळणीं, मातीचीं भांडीं, यंत्रें, इ. तयार करतात. सोनें, रुपें, शिसें, तांबें, जस्त, लोखंड, मीठ, पेट्रोलियम हीं खनिजें आहेत. जपानचीं लढाऊ आणि वाहतुकीचीं जहाजें पुष्कळ आहेत.

भाषा—जपानी लोकांच्या उत्पत्तीविषयीं आजवर रूढ असलेले सिद्धान्त जर खरे असतील तर जपानी व कोरियन भाषा यांमध्यें व त्याचप्रमाणें जपानी व चिनी भाषा यांमध्यें बरेंच साधर्म्य असावयास पाहिजे. परंतु ख्रिस्ती शकाच्या आरंभशकापासून जपानी व कोरियन लोक यांचें दुभाष्याशिवाय दळणवळण होत नसे म्हणतात. जपानी व कोरियन भाषांचें मूळ जर एकच असेल तर त्यापासून वरील दोन शाखा फार पुरातन काळींच भिन्न झाल्या असल्या पाहिजेत. जपानी व चिनी भाषांसंबंधीं पाहिलें तरी त्याहि परस्परांहून भिन्न आहेत असें दिसतें. जपानी भाषा ही चिनी वाङ्मय व शब्दसंपत्ति यांवरच पुष्ट झाली. आर्यन् व जपानी यांचें संभवस्थान एकच असलें पाहिजे असें सिद्ध करण्याचा केहिराहसारख्यांनीं प्रयत्न केला आहे.

लेखनाची कल्पना चीन देशांत जेव्हां निघाली तेव्हां वस्तूंचे आकार म्हणजे चित्र काढून विचार कळविण्यास सुरुवात झाली. म्हणूनच येथील लिपीस चित्रलिपि किंवा कल्पनालिपि असें म्हणतात. चिनी भाषा व लिपि अत्यंत अवघड आहे. जपानांत चिनी लिपि सुरू आहे. पण जपानी भाषा मात्र निराळी आहे. उदाहरणार्थ, 'सूर्य' हा शब्द चिनी व जपानी लोक एका अक्षरानेंच लिहितात; म्हणजे दोघांचीं अक्षरें एकच, पण चिनी लोक त्याचा उच्चार 'थाय्यीयो' असा करतात व जपानी लोक 'तिची' असा करतात. परस्परांचीं पत्रें वगैरे एकमेकांस वाचतां येतात; परंतु परस्परांजवळ बोलतां येत नाहीं. दोन्ही राष्ट्रांची लिपि एक असल्यामुळें १८९४ च्या चिनी–जपानी युद्धामध्यें गुप्त पत्रव्यवहार कोणालाच करतां येईना. चिनी लोकांची लिपि जपाननें घेतली त्यामुळें जपानी भाषेंतहि ऐंशीं हजार अक्षरें झालीं आहेत.

मूळ चित्रांत उत्तरोत्तर फरक पडून हल्लींचीं अक्षरें बनलीं आहेत. तरी मूळ चित्रांशीं त्यांचें बरेंच साम्य आहे. म्हणून ही लिपि चित्रांपासून उत्पन्न झाली यांत संशय नाहीं. चिनी लिपीचा जन्म होऊन दोन हजारांवर वर्षें होऊन गेलीं. ही लिपि अद्यापहि चीन, कोरिया, तिबेट, जपान व फोर्मोसा या देशांमध्यें सुरू आहे. ही लिपि अत्यंत अवघड आहे. जपानी लोकांनीं 'काता काना' (बालबोध) म्हणून ७३ अक्षरांची एक सोपी लिपि तयार केली आहे.

ह्या लिपीवर सर्व काम भागतें. तार करण्याच्या कामीं याच अक्षरांचा उपयोग तारायंत्राच्या खात्यांत करतात. स्त्रिया व मुलें प्रथम हींच अक्षरें शिकतात. एवढ्या अक्षरांच्या शिकण्यानें त्यांना वाचतां येतें. कारण सर्वांच्या सोयीसाठीं वर्तमानपत्रें व पुस्तकें चिनी लिपींत लिहून पुढें 'काता काना' लिहितात. 'काता काना' (बालबोध) व लिहिण्याची 'हिरा गाना' (मोडी) या अक्षरांची ओळख होण्यासाठीं मुलांना प्रथमतः या लिपीचे धडे देण्यांत येतात. जपानी भाषा उच्चारण्यास फार सोपी आहे. जोडाक्षरांची पद्धत जपानींत नाहीं.

वाङ्मय—जपानचें प्राचीन वाङ्मय इ. स. पांचव्या–सहाव्या शतकापासून सुरू झालेलें दिसतें; व हें धार्मिक गोष्टींविषयींच आहे. नवव्या शतकांत बौद्ध धर्म देशांत शिरल्यापासून वाङ्मयालाहि नवें वळण लागलें. अर्थात् ही चीनची उसनवारी होती; व हेंच वाङ्मय जपानचें अभिजात वाङ्मय समजण्यांत येत असून त्याचा मोठ्या निष्ठेनें पाठ देण्यांत येई. पण १७ व्या आणि पुढील शतकांत शिंतो धर्मांत सुधारणा होऊन तो शुद्ध स्वरूपांत दिसूं लागला. या धर्माच्या अनुयायांनीं आपलें स्वतंत्र जपानी वाङ्मय तयार करण्याचा मोठा प्रयत्न केला; पण तो यशस्वी झाला नाहीं. पुढें पाश्चात्य वाङ्मयाशीं जेव्हां संपर्क आला तेव्हां या वाङ्मयांत आधुनिकता येऊन नवें वळण लागत चाललें. प्रथम प्रथम या नवयुगीन वाङ्मयाबद्दल सुशिक्षितांकडूनहि आदर दाखविण्यांत येत असे व हळूहळू लोकांच्या मनावर त्याचा पगडा बसत चालला व आज जपानी वाङ्मयांत इतिहास, शास्त्र, भूगोल, धर्म, तत्त्वज्ञान, नाट्य व काव्य या व्यापक विषयांचा अंतर्भाव झालेला आहे. शब्दकोश आणि ज्ञानकोश यांसारखे संदर्भग्रंथ तयार झाले. तथापि नाटकांची जपान्यांना विशेष आवड असल्यामुळें नाट्यवाङ्मय चांगलें फोफावलें. याचा विशेष म्हणजे हें राष्ट्रीय प्रसंगांवरच आधारलेलें असतें. तसेंच कादंबरी वाङ्मयहि चांगलें पुष्ट व उत्कृष्ट आहे.

पहिल्या महायुद्धांत व नंतरहि जपानला धार्मिक वाङ्मय जास्त आवडूं लागलें. काग्वा टोयोहिको या ख्रिस्ती धर्मप्रचारकाने आपली छाप या काळांत बसविली. त्याचें लेखन सामाजिक न्यायासंबंधीं असे. टानिझाकी जुनिचिरो व नागाइ काफू यांनीं नव–अद्भुतरम्य संप्रदायाचें नेतृत्व पत्करून प्रकृतिवादा(नॅचरॅलिझम्)ला जोराचे आघात केले. त्यांनीं कला आणि खरें जीवन यांमध्यें सांगड घालून दिली. पण प्रकृतिवादाचें जास्त जोराचें खंडण मुशाकोजी सानिआत्सु, आरिशिमा टाकेओ व सातोमी टोन यांसारख्या नव–आदर्शवाद्यांनीं केलें आहे. हे लेखक उच्च व श्रीमान् कुळांतील आहेत हें विशेष होय. या संप्रदायांत मानवताधर्मा(ह्युमॅनिझम्)चें प्राबल्य दिसून येतें.

जपान—पवित्र फुजियामा पर्वत (पृ. ८३५)

जपान—टोकिओंतील 'गिंझा' रस्ता (पृ. ८३५)

याच कालांत नव-आदर्शवादाप्रमाणेंच नव-वास्तववादाचाहि चांगला उठाव झालेला आहे. या नववास्तववादाचे लेखक उत्तर-प्रकृतिवादी म्हणून गणले जातात. त्यांनीं प्राकृतिक वास्तवता पटवून दिली, व ऐक्य आणि तडजोड यांचें तत्त्वज्ञान त्यांनीं पुढें मांडलें. किकुची काना, अकुतागावा ऱ्युनोसुके, कुमे मावाओ, इ. या संप्रदायांतील प्रमुख होत.

यानंतर श्रमिक वर्गाचें वाङ्मय तयार होऊं लागलें. याचे पुरस्कर्ते कलावंत खास नाहींत. त्यांचें लिखाण निव्वळ समाजवादी व प्रचारकी पद्धतीचें आहे. कोबायाशी टाकिजी, हायाशी फुसाओ, किशी संजी प्रभृति लेखक या वर्गांत पडतात. अतिसंस्कारप्रधान ( अल्ट्रा इंप्रेशनिस्टिक ) प्रवृत्तीचा आणखी एक वाङ्मयप्रकार या वेळीं पुढें आला. योकोमित्सु रिइची हा या संप्रदायाचा पुढारी आहे. यांची एक विशिष्ट शैली आहे. चहूंदिशीं परिणाम करणारी भाषा हे वापरतात व जुन्या कथा लेखनतंत्राबद्दल अगदीं अनादर बाळगतात. १९३७ सालीं चीनशीं युद्धाला सुरुवात झाल्यावर युद्धवाङ्मयच फार निघूं लागलें.

इतिहास—हल्लींच्या जपानी राज्याचा इतिहास इ. स. पूर्वी सुमारें ६।७शें वर्षांपासूनचा आहे. हल्लींच्या राजघराण्याचा मूळपुरुष जिम्मू टेनो याच्या नेतृत्वाखालीं त्या वेळीं दक्षिणेकडील लोकांनीं जपानवर स्वारी केली व तो पादाक्रांत करून तेथें वसाहत केली. जपानी राज्य व जपानी धर्म या दोहोंची वाढ जपानी बादशहाभोंवतीं केंद्रित झालेली होती. निकट सान्निध्यामुळें चीनमधील संस्कृति व धर्म यांशीं नेहमीं संघर्ष होत असे व त्यामुळें चीनशीं यादवी जडली ती कायमचीच. बौद्ध धर्माचा प्रसार बराच झाला होता. कित्येक घराणीं ठिकठिकाणीं स्वतंत्रपणें उदयास येऊन स्वतंत्र सत्ता चालवीत आणि आपसांत लढाया करीत.

दुसऱ्या शतकाच्या अखेरीस म्हणजे इ. स. १९२ च्या सुमारास योरिटोमो नांवाच्या एका लष्करी गव्हर्नरनें या सर्व स्वतंत्र घराण्यांस कांबूंत आणलें व शोगन हें नांव धारण करून एक स्वतःचें घराणें सत्ताधिष्ठित केलें. परंतु जुन्या बादशहाशीं त्यानें विरोध न करतां सहकार्यानें कारभार चालविला व हीच प्रथा पुष्कळ दिवस म्हणजे १९ व्या शतकापावेतों चालू होती. १२७४ मध्यें चेंघिजखान यानें जपानवर स्वारी केली होती. १६ व्या व १७ व्या शतकांत जपानचा पाश्चिमात्यांशीं संबंध आला होता. परंतु तो इये यासू यानें वाढूं दिला नाहीं व पुढें २०० वर्षांच्या काळांत परकीयांना जपानमध्यें जाण्यास प्रतिबंधच होता. १८५२ मध्यें अमेरिकन आरमार घेऊन ॲडमिरल पेरी यानें जपानमध्यें प्रवेश केला व जपान आणि अमेरिका यांचा व्यापारी तह घडवून आणला आणि त्याच वेळीं वरील प्रतिबंधहि ढिला करण्यांत आला. १८६८ मध्यें वर उल्लेख केलेलें शोगन घराणें व त्याच्याकडे चाललेले अधिकार यांस जपानच्या बादशहानें निकालांत काढले. मुत्सोहिटो बादशहानें १८६७ ते १९१२ पावेतों राज्यकारभार केला. १९१२ ते १९२६ या काळांत योशिहिटो हा गादीवर होता व १९२६ पासून हिरोहिटो हा बादशहा आहे. चीनबरोबर शेकडों वर्षे जी यादवी चालू आहे त्यांत १८९४-९५ च्या युद्धांत जपाननें फोर्मोसा घेतलें. १९०४-०५ मध्यें प्रसिद्ध रूसो-जपानी युद्ध झालें व त्यांत जपानचा विजय होऊन त्यानें कारा फुटो ( साघलिन बेटाचा दक्षिणार्ध ) बेट आपल्या साम्राज्यांत सामील करून घेतलें.

१९०० मध्यें जपानला कोरिया मिळाला. १९०४ मध्यें चीनपासून लियाटंग, कात्रटंग, वगैरे मुलूख कांहीं करारानें मिळविला. १९१४ च्या महायुद्धांत जपान इंग्लंडच्या बाजूनें जर्मनीविरुद्ध लढला व पुष्कळ जर्मन मुलूख, वसाहती, वगैरे त्याच्या ताब्यांत आले. पॅसिफिकमधल्या बेटांवर जपानला राष्ट्रसंघाकडून मँडेट मिळालें. १९३१-३२ त चीनमधील मँचुरियावर स्वारी करून मंचुकुओ म्हणून एक स्वतःच्या बाजूची सत्ता स्थापन केली. १९३३ मध्यें चीननें जपानवर बहिष्कार पुकारल्यावरून जपाननें जेहोल प्रांतावर स्वारी केली. या वेळीं राष्ट्रसंघानें मध्येंच लुडबूड केल्यामुळें जपाननें राष्ट्रसंघांतून आपलें अंग काढून घेतलें. १९१४ मध्यें उत्तर चीनमध्यें जपानी लष्कराचा तळ पडला. यानंतर जपानमध्यें लष्करी हुकमतीचा वरपगडा होऊन एकतंत्री कारभार सुरू झाला. १९३७ मध्यें जपाननें खुद्द चीनवर स्वारी केली आणि शांघाय, नांकिंग व इतर कांहीं महत्त्वाचीं ठिकाणें काबीज केलीं. १९३८ मध्यें चीन-जपानमध्यें राजरोस युद्धच सुरू झालें. पण जपानच चीन देश पादाक्रांत करीत चालला होता.

दुसऱ्या महायुद्धांत १९४१ सालीं जपाननें अमेरिकेचें पर्ल बंदर आणि हवाई बेटें यांवर वैमानिक हल्ले केल्यानंतर जपानशीं दोस्त राष्ट्रांचें युद्ध सुरू झालें. जपाननें ब्रह्मदेश, मलाया व इंडोनेशियन बेटें जिंकून घेतलीं व हिंदुस्थानवर स्वारी करण्याचा त्याचा बेत होता. पण पश्चिम खंडात जर्मनी-इटली यांचा पाडाव झाल्यानंतर जपान जेव्हां लागलाच शरण येईना तेव्हां अमेरिकेनें १९४५ च्या ऑगस्ट महिन्यांत हिरोशिमो व नागासाकी यांवर ॲटम बॉंब टाकून तीं शहरें पार उध्वस्त केलीं. तेव्हां जपान तहाला कबूल झाला. त्यानंतर बादशहाची सर्व सत्ता काढून घेऊन अमेरिकेच्या देखरेखीखालीं लोकराज्य सुरू

केलें. जपानच्या वसाहती पार गेल्या व एवढ्या थोड्या काळांत सुधारलेला व पूर्ण समर्थ झालेला देश एकदम खची झाला.

आतां अमेरिकन वर्चस्वाखालीं जपानची जुनी संस्कृति व परंपरा पार गेली. लोकसत्ताक राज्यपद्धति सुरू करण्यांत आली आहे; त्यामुळें राजाला पूर्वीइतका देवाप्रमाणें मान राहिला नाहीं.

**जप्ती**—या शब्दाचा कायद्यांत अर्थ असा आहे कीं, एखादें अपकृत्य करणाऱ्या इसमाच्या जंगम् मालाची त्यानें केलेल्या अपकृत्यामुळे झालेल्या नुकसानीची भरपाई होण्याकरितां किंवा एखाद्या घरांत राहणाऱ्या भाडेकऱ्यानें भाडें न दिल्यास तें वसूल करण्याकरितां त्याचा जंगम माल ताब्यांत घेणें याला जप्ती असें म्हणतात. असा जप्त केलेला माल मूळ मालकाला त्या मालाच्या किंमतीच्या मानानें जामीन देऊन त्या वादाचा कोर्टांत निर्णय होईपर्यंत कोर्टाच्या हुकुमानें आपल्या ताब्यांत घेतां येतो. अशी जप्ती भाडें किंवा कर वसूल करण्याकरितां बहुधा करितात.

**जबरव्याजी कर्जाचा कायदा** — ( दि युझुरिअस लोन्स ॲक्ट १९१८ ). या कायद्याचा उद्देश, जबर व्याज असलेल्या पैक्याच्या किंवा ऐनजिनसी कर्जासंबंधींच्या दाव्यांत दिवाणी कोर्टाला जादा अधिकार देणें हा आहे. पैक्याच्या किंवा ऐन-जिनसी-कर्जाच्या दाव्यांत, दावा एकतर्फी चालू असला तरी, जर कोर्टाला असे खात्रीनें वाटेल कीं, ( अ ) व्याजाचा दर जबर आहे, आणि ( ब ) सदर दाव्याचा व्यवहार गैरवाजवी आहे तर कोर्टानें ( १ ) त्या व्यवहाराची मूळपासून पुन्हां चौकशी करावी, आणि जबर व्याज आकारलें गेलें असेल त्या व्याजापासून ऋणकोला मुक्त करावें; ( २ ) मागील व्यवहार बंद करून नवा व्यवहार सुरू केला असला तरी पुन्हां मागील जमा-खर्च कोर्टानें तपासावा आणि जबर व्याज आकारलें असेल त्यांतून ऋणकोला मुक्त करावें: ( ३ ) कर्जापोटीं तारण माल दिला असेल किंवा करार केला असेल तर तो माल किंवा त्याची किंमत ऋणकोला परत देववावी, व तो करार रद्द करावा, किंवा योग्य प्रकारें दुरुस्त करावा. अपवाद–जुना व्यवहार बंद करून नवा व्यवहार सुरू झाल्याला बारा वर्षांहून अधिक काळ झाला असेल त्या व्यवहाराची चौकशी कोर्टानें पुन्हां करूं नये ( कलम ३ ).

**जबरी संभोग**—एखाद्या स्त्रीशीं तिच्या इच्छेविरुद्ध बळ-जबरीनें केलेला संभोग. इंग्लंडांत कायद्यानें हा मोठा गुन्हा ठरला असून त्याला हयातभर सक्तमजुरी ही शिक्षा सांगि-तलेली आहे. १८८५ च्या कायद्यानें १३ वर्षें वयाच्या आंतील मुलींशीं असलें गैरवर्तन करणाराला वरीलप्रमाणेंच कडक शिक्षा सांगितली असून १६ वर्षें वयापर्यंतच्या मुलींशीं असलें कृत्य करणाराला दोन वर्षें सक्तमजुरीची शिक्षा आहे.

हिंदुस्थानांतहि अशाच स्वरूपाचा कायदा आहे ( इंडियन पिनल कोड कलम ३७६ पाहा ). या गुन्ह्याला १० वर्षें कैद व दंड, अशा दोन्ही शिक्षा आहेत.

**जबलपूर**—मध्यप्रांत, जबलपूर भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,९१९ चौ. मै. व लो. सं. ९,१०,६०३. नर्मदा नदी या जिल्ह्यांतून वाहते. नर्मदेच्या उत्तर-दक्षिणेस सपाट प्रदेश आहेत. विंध्याद्रि व सातपुडा हे पर्वत वायव्य आणि दक्षिण या दिशांस आहेत. झाडी पुष्कळ असून त्यांत वन्य प्राणीहि आहेत. पाऊस सरासरी ६० इंच पडतो.

कळचुरी चेदी राजघराणें जबलपुराहून जवळ असलेल्या तेवर ( त्रिपुर ) गांवचें आहे. इ. स. च्या आरंभीं हें उदयास आलें. इ. स. नऊ ते बारा शतकांपर्यंतचा या घराण्याचा इतिहास सांपडतो. इ. स. १७८१ त जबलपूर मराठ्यांकडे आलें. त्या-पूर्वीं तेथें गोंड राजे राज्य करीत होते. १८१८ त ब्रिटिश अमल सुरू झाला. जिल्ह्यांतील विजेराघोगड संस्थान, संस्थानिक १८५७ च्या क्रांतियुद्धांत सामील होते म्हणून, खालसा करून जिल्ह्याला जोडलें.

बाघेली ही हिंदी उपभाषा या जिल्ह्यांत बोलण्यांत येते. सिरोहा तहशिलींत लोखंडाच्या खाणी आहेत. इतर कोठें कोठें मँगेनीज, तांबें, चुनखडी, वगैरे सांपडतें.

शहर—हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण व आगगाड्यांचें मोठें सांधा–ठिकाण आहे. शहरापासून सुमारें सहा मैलांवरून नर्मदा नदी वाहत गेली आहे. हें शहर व्यवस्थित वसलें असून रस्ते रुंद आहेत व आसपास तळीं, बागा पुष्कळ आहेत. याची समुद्रसपाटीपासून उंची १३६० फूट आहे.

हा गांव व्यापारी दृष्टीनें बराच महत्त्वाचा आहे. शिवणी, मांडला व जबलपूर या तिन्ही जिल्ह्यांतील उत्पन्न होणारा बहु-तेक माल येथें येतो. येथें कापडाच्या गिरण्या, कौला–विटांचे कारखाने, दारूची भट्टी, बर्फाचा कारखाना, वगैरे आहेत.

येथें कमिशनर राहतो व जिल्ह्याच्या सर्व कचेऱ्या येथें आहेत. येथें उच्च शिक्षणाचें एक कॉलेजहि आहे व सात–आठ हायस्कुलें आहेत. तसेंच सात–आठ वर्तमानपत्रें व नियतकालिकें निघतात. केवळ स्त्रियांकरितां लेडी एल्जिन हॉस्पिटल आहे. येथें लष्करी तळ असतो व गेल्या महायुद्धांत दारूगोळा आणि इतर युद्ध-साहित्य तयार करण्याचे येथून जवळच कारखाने काढलेले होते. संगमरवरी खाणींविषयीं प्रसिद्ध असा भेडाघाट येथून ११ मैलांवर आहे.

जंबुकेश्वरम्—मद्रास इलाख्यांतील त्रिचनापल्ली जिल्ह्यांत श्रीरंगम् बेटावर हें प्रख्यात शिवालय आहे. सौंदर्य, शिल्पकला, आणि पुरातनपणा या बाबतींत जंबुकेश्वरम् प्रसिद्ध आहे. येथील शिवलिंग पंचतत्त्वांपैकीं एक असून एका आपतत्त्वानें तें परिवेष्टिलें आहे.

फर्ग्युसनच्या मतें या देवळाचा काळ सुमारें इ. स. १६०० हा असावा. तथापि तेथील एक शिलालेख इ.स. १४८० मधील दिसतो. पूर्वी म्हणजे ज्या वेळीं शैव–वैष्णव संप्रदायांत फारसा मत्सर नव्हता, त्या वेळीं वर्षांतून एक वेळ विष्णुमूर्ति या देवळाच्या आवारांत मोठ्या थाटानें आणीत; पण हल्लीं हा प्रकार शैव–वैष्णव पंथांतील तीव्र विरोधामुळें बंद पडला आहे.

जंबुद्वीप—पृथ्वीच्या सप्तमहाद्वीपांतील पहिलें. हें मेरूच्या आसमंताद्भागीं वर्तुलाकार असून याच्या मध्यभागीं मेरु आहे. याचा व्यास एक लक्ष योजनें आहे व यास तितक्याच रुंदीच्या क्षारसमुद्राचें वेष्टन आहे. येथील अधिपति स्वायंभू मनूचा राजाचा पुत्र अग्नीध्र होता. त्यास नऊ पुत्र होते, म्हणून त्यानें त्याचे वर्षसंज्ञक नऊ भाग करून एकेक वर्षाचें आधिपत्य एकेकास दिलें. या द्वीपांत शत योजनें लांबीच्या व तितक्याच रुंदीच्या म्हणजे दहाहजार योजनें क्षेत्रफळाच्या प्रमाणाचे सत्तावन सहस्र देश असून यास भारतांत सुदर्शनद्वीप असें म्हटलेलें आहे. भरतखंड जंबुद्वीपांत आहे याची आठवण पूर्वेतील मंत्रोच्चारावरून होते.

जंबूर—( इं. नाइस ). हा स्फटकमार, भूरातिक (फेल्स्पार) व अभ्रक यांचा बनलेला असून याचे पानांच्या पुडक्यासारखे थर असतात. बहुधा हे थर ढासळण्यासारखे असतात. हा एका दिशेनें वजतुंडा( वालुकामय प्रस्तर )सारखा असतो. पण याची रचना पानांच्या पुडक्यासारखी असल्यामुळें निराळी असते व दुसऱ्या दिशेनें अभ्रक–शिस्टसारखा असतो. या दगडाच्या थरांत कोणतेहि प्राण्यवशेष आढळत नाहींत. अनेक प्रदेशांत हाच मुख्य दगड आढळतो.

जंबूसर—मुंबई, भडोच जिल्ह्याचा उत्तरेकडील तालुका. क्षेत्रफळ ३८७ चौ. मैल. लो. सं. ८८,०२१. या तालुक्यांत एक गांव व ८२ खेडीं आहेत. मुख्य पिकें म्हटलीं म्हणजे ज्वारी, बाजरी, गहूं हीं असून डाळी, तंबाखू, कापूस, नीळ, इत्यादि पिकेंहि होतात.

तालुक्याचें मुख्य ठिकाण जंबूसर. हें भडोचपासून २७ मैल आहे. गांवाच्या उत्तरेस नागेश्वराचा सुंदर तलाव असून येथूनच गांवास पाणीपुरवठा होतो. म्युनिसिपालिटीची स्थापना इ. स. १८५६ त झाली. पूर्वी येथें बराच व्यापार चालत असे, परंतु रेल्वे झाल्यामुळें या भागांतील व्यापार बराच कमी झाला आहे. मराठे अमदानींत यावर मराठ्यांची सत्ता होती. लो. सं. १४,२०७.

जंबूस्वामी ( निर्वाण ख्रि. पू. ४६३ )—हा एक जैन धर्माधिकारी सुधर्मन् याच्यानंतर जैन धर्मपीठावर आला. काश्यप गोत्रीय ऋषभदत्त याचा हा मुलगा. याच्या आईचें नांव धारिणी. महावीराच्या या प्रमुख शिष्यानें एकंदर चव्वेचाळीस वर्षेंपर्यंत जैन धर्मप्रसाराचें व रक्षणाचें काम केलें. वयाच्या ८० व्या वर्षी म्हणजे महावीरानंतर चौसष्ट वर्षांनीं हा निर्वाणाप्रत गेला.

जमखंडी संस्थान—मुंबई, दक्षिण महाराष्ट्रांतील एक पटवर्धनी संस्थान. क्षे. फ. ५२४ चौ. मै.. लो. सं. (१९४१) १,२६,२७२. संस्थानांत ८८ गांवें आहेत. गहूं व कापूस हीं मुख्य पिकें होत. संस्थाननें पाण्यासाठीं बराच खर्च केला आहे. हातमाग बरेच आहेत. संस्थानांत प्राथमिक व दुय्यम शिक्षण मोफत आहे व पुण्याच्या सर परशुरामभाऊ कॉलेजांत संस्थानच्या ५० विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या दिल्या जातात. १९३२ सालीं प्रजेला राज्यकारभारांत कांहीं हक्क मिळाले. नंतर १९४१ व १९४७ सालीं अधिक मिळून शिवाय नवीन तरुण अधिपतींनीं लोकशाहीने सर्व अधिकार प्रजेला देण्याची तयारी दाखविली. पण पुढील सालींच इतर द. म. संस्थानांबरोबर हें संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झालें. संस्थानचें उत्पन्न सुमारें नऊ लाख आहे.

सर्व पटवर्धन संस्थानिकांचा मूळपुरुष हरभट होय. हा कोंकणांतून बाळाजी विश्वनाथाबरोबर आला. परशुरामभाऊ पटवर्धन या प्रख्यात सेनापतीच्या वंशांत जमखंडी संस्थान चालत आहे. १८२१ च्या इंग्रजांशीं झालेल्या तहाप्रमाणें सालीना २०८४० रु. ब्रिटिश सरकारास खंडणी द्यावी लागे. सध्यांचे संस्थानिक १९४७ सालीं गादीवर आले. त्यांचे वडील श्रीमंत शंकरराव आप्पासाहेब हे चांगले सुविद्य असून नरेंद्रमंडळाचे एक सभासद होते. आबासाहेब सर परशुरामभाऊ यांच्या कारकीर्दीत संस्थान चांगलें नांवारुपास आलें होतें. त्यांनीं संस्थानांत पुष्कळ सुधारणा केल्या.

जमखंडी हें राजधानीचें शहर व व्यापारी ठिकाण आहे. लो. सं. १३,०२९. गांवांत सरकारी हायस्कूल व वाचनालय आहे.

जमदग्नि—ऋचीकास गाधिकन्या सत्यवतीपासून झालेला पुत्र. याची स्त्री रेणुका. यास रेणुकेपासून परशुरामादि पांच पुत्र झाले. हा अतिशय कोपी म्हणून प्रसिद्ध असे. त्यावरून वाक्प्रचारहि पडले आहेत. एकदां बायकोला नदीवरून येण्यास उशीर लागला म्हणून यानें परशुरामाकडून तिला ठार मारविलें. पुढें याचा कोप अजीबात गेला; तो इतका कीं, सहस्रार्जुनाच्या पुत्रांनीं यास मारिलें असतांहि यास मुळींच राग आला नाहीं.

**जमरुड**— वायव्य सरहद्द प्रांत (प. पाकिस्तान). पेशावर जिल्ह्यापलीकडचा एक किल्ला व लष्करी छावणी. पेशावर शहराच्या पश्चिमेस दहा मैलांवर खायबर घाटाच्या तोंडाशींच हें गांव वसलें आहे. पेशावर ते जमरुड आगगाडी–फांटा आहे. १८३६ त रणजितसिंगाचा सेनापति हरिसिंग यानें हें जिंकून घेतलें; पण पुढील सालीं दोस्त महमदानें त्यावर हल्ला चढविण्यासाठीं एक अफगाण पलटण पाठविली. पण शेवटीं शीखांचाच मोठा जय झाला. १८७८–७९ च्या अफगाण युद्धांत व १८९७–९८ च्या टिऱ्हा मोहिमेंत लष्करीदृष्ट्या जमरुडला फार महत्त्व होतें.

**जमशीद**—थमौरसनंतरचा हा इराणी शहा (राजा) बराच प्रसिद्ध आहे. यानें पुष्कळ वर्षे राज्य करून लोकांची फार सुधारणा केली. त्यानें इराणी लोकांचे धर्मोपदेशक, योद्धे, व्यापारी, व शेतकरी असे चार वर्ग करून त्यांचे धंदे पृथक् ठरविले. यांपैकीं शेवटचा शेतकरी वर्ग नेसौडी या नांवानें प्रसिद्ध होता. या राजानें लोखंड, धातूच्या वस्तू, लोंकर, रेशीम व कापसाचें विणकाम व वेलबुट्टीकाम, इमारती बांधण्याकडे विटांचा व संगमरवरी दगडांचा उपयोग, जहाजें बांधण्याची कला, वैद्यकीचें ज्ञान, सुगंधी पदार्थांचा धंदा, वगैरे अनेक गोष्टींना सुरुवात करून उत्तेजन दिलें. त्यानें नोरूझ–नवरोज म्हणजे नवें वर्ष म्हणून नवीन वर्षगणनापद्धति सुरू केली. अशा रीतीनें अनेक कृत्यें करून त्यानें बरीच कीर्ति मिळविली; पण याचा परिणाम असा झाला कीं, पुढें तो मोठा गर्विष्ठ व उद्दाम बनला, व लोकांवर जुलूम करूं लागला. यामुळें प्रजेमध्यें असंतोष माजून बंड झालें व शेजारच्या राष्ट्राचा झोहॉक नामक राजा होता त्यानें प्रजापक्षाला मदत करून जमशीदचा लढाईंत पराभव केला, व इराणचें राज्य घेतलें. तेव्हां जमशीद पळून जाऊन कांहीं वर्षें लपून राहिला आणि पुन्हां परत येऊन त्यानें राज्य घेण्याचा प्रयत्न केला. पण झोहॉकनें त्याला पकडून त्याची कत्तल केली व अशा रीतीनें जमशीदचा दुःखकारक शेवट झाला. तथापि पूर्वकारकीर्दीतील सत्कृत्यामुळें त्याला अद्याप लोक फार मान देतात.

**जमशेटजी जिजिभाई, सर** (१७८३-१८५९)—एक मोठे पारशी व्यापारी व दानशूर गृहस्थ. यांचा जन्म मुंबईस झाला. आईबाप लहानपणींच निवर्तल्यामुळें फ्रामजी नसरवानजी यांनीं यांना लहानाचे मोठे केलें. फ्रामजी यांचा रिकाम्या बाटल्यांचा व्यापार होता. त्यामुळें हेहि बाटल्यांचा व्यापार करूं लागले व थोड्याच दिवसांत बाटलीवाला म्हणून प्रसिद्धीस आले. सन १७९९ मध्यें मेहरवानजी माणिकजी या आपल्या नातेवाइकाबरोबर हे त्याचे कारकून म्हणून चीनला जाऊन आले व परत मुंबईस आल्यावर पंचवीस हजार रुपये कर्ज काढून चीनशीं व्यापार सुरू केला. हे चौथ्या वेळीं चीनहून माल घेऊन परत येत असतां फ्रेंचांनीं यांचें जहाज पकडून यांना केप ऑफ गुड होपला कैदी म्हणून धरून आणलें. या वेळीं एका इंग्रज वकिलाच्या मेहेरबानीनें यांना सोडण्यांत आलें. हे मुंबईस परत आले ते अगदीं भणंग स्थितींतच. यांच्या या संकटसमयीं यांच्या अनेक सहकाऱ्यांनीं यांना मदत केली व यानंतर सन १८०७ मध्यें पुन्हा हे चीनची सफर करून येऊन मुंबईस वास्तव्य करून राहिले. मुंबईस अफू व कापूस यांच्या व्यापारांत हे पहिल्या प्रतीचे व्यापारी ठरले. एवढा मोठा व्यवहाराचा पसारा होता. तरी कोर्टकचेऱ्यांशी संबंध ठेवण्याचें यांनीं टाळलें. बहुतेक भांडणें हे आपसांतच मिटवीत.

यांचा धर्मादाय फार मोठा असे. धर्मशाळा, विहिरी, पूल यांसारखीं सार्वजनिक लोकहिताचीं कामें यांनीं केलीं; दुष्काळांत लोकांना साहाय्य केलें; इस्पितळें बांधून गरीब लोकांची औषधपाण्याची अडचण दूर केली; अशा अनेक प्रकारच्या दानधर्मांत यांनीं पंचवीस कोटींहून अधिक द्रव्य खर्च केलें. या यांच्या परोपकारी कृत्यामुळेंच सन १८४२ मध्यें सरकारनें सर ही पदवी देऊन यांचा गौरव केला. सन १८५६ मध्यें टाउन हॉलमध्ये यांचा पुतळा उभारण्यांत आला. महाराणी व्हिक्टोरिया यांनींहि सन १८५८ मध्यें मानाचें एक रत्नजडित पदक देऊन यांचा गौरव केला.

**जमाबंदी**— सरकारी किंवा संस्थाविषयक खर्च भागविण्यासाठीं पैसा जमा करतात त्यासंबंधींची सर्व व्यवस्था जमाबंदी खात्यांत येते. सरकारच्या खर्चाच्या बाबी पुष्कळच असतात. त्यासाठीं जमीनमहसुलाखेरीज इतर कांहीं जमेच्या बाजू पाहाव्या लागतात. प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर, जकाती, यांसारख्या साधनांनीं सरकारचें उत्पन्न वाढविण्यांत येत असतें. पेढ्यांप्रमाणें पैशाची देवघेव करूनहि उत्पन्नांत भर टाकतां येते. राष्ट्राचें बरेंचसें कर्ज, हुंड्या किंवा विनिमयलेख (बिल ऑफ एक्स्चेंज) विकण्याचा, विकत घेण्याचा व्यापार करून फेडतां येतें. भाग काढून संस्थांचें भांडवल उभें करण्याची पद्धत किंवा कर्जरोखे विकण्याची पद्धत सर्वत्र रूढ आहेच. सरकारी जमाबंदी खात्याचा वरिष्ठ फडणीस (फिनॅन्स मिनिस्टर) असतो. तो जमाखर्चाच्या तोंडमिळवणीकडे व उत्पन्नाच्या नवीन बाबी काढण्याकडे लक्ष देत असतो. फडणवीस पहा.

**जमालखान**—लष्करी पेशाची एक युरोपियन स्त्री. ही पेशवाईत होऊन गेली. ही मूळची फ्लॉरेन्स येथील असून तिनें मद्रास येथील जेम्स हाल नांवाच्या बॅरिस्टराबरोबर लग्न केलें होतें. पुढें तिनें निरनिराळ्या संस्थानांत जाऊन स्त्रियांचीं पलटणें तयार करण्याचा उद्योग चालविला. त्याप्रमाणें सवाई

माधवरावाच्या कारकीर्दींत ती पुण्यास आली (१७७८), पण तिनें कांहीं गुन्हा केल्यावरून सरकारनें तिला लोहगडास कैद करून ठेविलें. सात वर्षांनीं तिची सुटका फ्रेंच सेनापति पेरू याच्या मध्यस्थीनें झाली. ती १७९८ त मुंबईस वारली.

**जमीन**—१. पृथ्वी ही जमीन आणि पाणी यांची मिळून झालेली आहे. पृथ्वीचें एकंदर क्षेत्रफळ १९,६९,५०,००० चौ. मै. असून त्यांपैकीं ५,७५,१०,००० चौ. मैल जमीन व १३,९४,४०,००० चौ. मै. पाणी आहे. म्हणजे ३/४ पाणी व १/४ जमीन आहे. जमीन सारखी नसून विविध आकाराची आणि उंचीची आहे. तथापि जीवर मनुष्यप्राणी राहतो व आपली उपजीविका चालवितो त्या जमिनीवर विशिष्ट मालकी उत्पन्न होते. बहुतेक सर्व देशांतून बरीचशी जमीन खाजगी मालकीचीच असते; व त्यामुळें हक्काविषयीं तंटेबखेडे उत्पन्न होतात. हिंदुस्थान आणि आयर्लंड याबाबतींत पुढें आहेत व सरकारनें हे तंटे तोडण्यासाठीं बरेच कायदेहि केले आहेत. आज सुधारलेल्या जगांत फार मोठ्या जमिनीची मालकी नष्ट होत असून लहान लहान जमिनी पुष्कळांना मिळण्याकडे प्रवृत्ति आहे. सर्वत्र जमीन सरकारी होऊन सरकारनें कसण्यासाठीं ती भाड्यानें द्यावी असाहि एक समाजवादी सूर ऐकूं येतो.

२. पृथ्वीवरची माती निरनिराळ्या कारणांनीं तयार झालेली असते. अतिशय थंडी, दमट हवा, बर्फाच्या नद्यांचे प्रवाह, वगैरे गोष्टींनीं माती बदलते. चुना, वाळू, शाडू, इ. प्रकारची माती खडकांवर सांपडते तर पुळिणाची माती, गोटामाती (बोल्डर क्ले), वगैरे नद्यांनीं वाहून आणलेली असते. कांहीं मातींत खनिज द्रव्यें असतात, तर कांहीं खतांप्रमाणें चांगलें पीक देण्याच्या कामीं फार उपयुक्त असतात. चिकण माती, चुनखडी, वगैरे मातीचे महत्त्वाचे प्रकार आहेत.

**जमीन घसरा**—उंचावरील जमिनीचा मोठा भाग जेव्हां खालीं येतो तेव्हां म्हणतात. किनाऱ्यावरील जमिनीचा वरचा थर कठिण पण त्याखालचा मऊ असतो तेव्हां पाणझरे, लाटा, इ. मुळें खालचा मऊ थर झरून जातो व वरचा फुटतो किंवा कोसळून पडतो. या घसऱ्याचीं आणखीहि भूकंपादि कारणें आहेत.

**जमीनधारणपद्धत**—ज्याच्याकडे जमीन असते त्याचे तीवर कशा प्रकारचे हक्क असतात यासंबंधीं पाहूं जातां साधारणपणें हिंदुस्थानांत रयतवारी आणि जमीनदारी अशा दोन पद्धती अस्तित्वांत असल्याचें आढळेल. रयतवारींत जमिनीचा सारा रयत सरकारला प्रत्यक्ष देते. जमीनदारींत जमीनदार सारा भरतो. कांहीं रयतवारी पद्धतींत जमिनी गांवच्या जमातीकडे असतात, व गांवचा मुख्य असेल तो गांवाचा सारा देतो. इंग्लंडमध्यें स्वामित्वाची व लष्करी जहागिरीची अशा दोन पद्धती आहेत. पहिलींत जमिनीवर धारेकऱ्याची पूर्ण मालकी असते. पण ही पद्धत नॉर्मन स्वारीनंतर जाऊन लष्करी जहागिरीची (फ्यूडल) पद्धत आली. या पद्धतींत वरिष्ठाची कांहीं विशिष्ट सेवा करावी लागे; आतां तीबद्दल कांहीं खंड द्यावा लागतो.

शिवाजीच्या काळीं धारा देणाऱ्या देशविभागाला महाल असें नांव होतें. पाटील, कुलकर्णी, मोकाशी हे धारा वसूल करीत. धारा रोख किंवा धान्यरूपानें घेत. ही मलिकंबरी पद्धति झाली. रोख धारा घेण्याची तोडरमली पद्धति औरंगजेबानें संभाजीच्या वधानंतर काबीज केलेल्या मुलुखांत सुरू केली होती. उत्पन्नाच्या साधारणपणें २/५ धारा असे.

पेशवाईत महाराष्ट्रांत अव्वल, दुम आणि सीम म्हणजे उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे शेतजमिनीचे तीन वर्ग केलेले असत. शेतसारा बिघ्यामागें ६॥ रु. होता. सारा तीन हप्त्यांनीं द्यावयाचा असून कार्तिक, पौष व चैत्र हे हप्ते देण्याचे महिने असत; तथापि पेशवेरोजनिशींवरून व इतर कागदपत्रांवरून साऱ्याचा दर व हप्त्यांचे महिने सरसहा एकच होते असें दिसत नाहीं. मार्गशीर्ष, पौष व माघ हे हप्त्याचे महिने कुलाबा जिल्ह्यांत नागोठाण्याकडे असल्याचें पेशवे-रोजनिशींवरून दिसतें. शेतावर पट्ट्या बसविल्याचीं उदाहरणें आहेत. सरपट्टी बिघ्यावर बसविलेली असून सवाई पट्टी ऐनआकारावर बसविली आहे. दिडी पट्टीहि सवाई पट्टीप्रमाणेंच असावी. सरपट्टीचे दर बिघ्यास सव्वापाच आणे व साडेसात आणे याप्रमाणें निरनिराळे आहेत. उत्पन्नावरील करांत सरचार्ज, सुपरटॅक्स हल्लीं आहेत त्यांसारखीच शेताच्या उत्पन्नावरील ही सरपट्टी असावी. शेतसारा नक्तांत अगर ऐनजिनसी घेत असत.

ब्रिटिश अमदानींत कायमधाऱ्याची व बदलणाऱ्या धाऱ्याची असे दोन जमीनधारणपद्धतीचे प्रकार असत. कायमधाऱ्याची किंवा जमीनधारी पद्धत अजीबात नाहींशी करण्याचा आतां सरकारचा विचार आहे. इतर जमिनीवरला धारा साधारणपणें दर तीस वर्षांनीं पाहणी करून बदलला जातो. जमिनीची पाहणी आणि हक्कनोंदणी यासाठीं एक स्वतंत्र खातेंच आहे. त्यामुळें रयतेला आपल्या तक्रारी मिटवून घेतां येतात. दुष्काळ व इतर आपत्ती आल्यास तगाई, तकवी किंवा सूट मिळते. प्रांतिक स्वायत्तता आल्यापासून प्रांतिक सरकारांनीं जमिनीसंबंधीं बऱ्याच सुधारणा केल्या आहेत. तथापि जमीनदार आणि कुळें हे नवे वाद समाजवादाबरोबर उपस्थित झाले आहेत.

**जमीनीच्या वाढी-हानीचा कायदा**—(दि अल्युव्हिअन ॲंड डिल्युव्हिअन रेग्युलेशन, १८२५). या कायद्याचा उद्देश, नदीचे प्रवाह बदलल्यामुळें जादा जमीन किंवा बेट निर्माण

होतें, आणि नदीचा कांठ फुटून धुपून जाऊन जमीन कमी होते, त्यामुळें सदर जमिनीबाबतचे दावे कोर्टांत येतात, म्हणून अशा स्थितींत स्पष्ट कायदा करणें हा होता. जादा जमीन किंवा बेट वाढल्यास त्याबलद्दचा नियम असा कीं, नदीच्या दोन कांठांवरील जमीनमालकांची नदीचा कांठ ही हद्दीची सीमा मानण्याची वहिवाट असेल, तर नदीच्या एका कांठाला जमीन वाढली व दुसऱ्या कांठची जमीन वाहून गेली तरी नदीचा कांठ ही सीमा पुढेंहि मानली पाहिजे ( कलम २ ). नदीच्या किंवा समुद्राच्या कांठाला हळूहळू जमीन वाढली तर त्याकांठच्या जमिनीचा मालक तोच या वाढलेल्या जमिनीचा मालक मानला पाहिजे; आणि ही वाढलेली जमीन सरकारधारा आकारण्यास पात्र मानली पाहिजे; आणि खंडकरी कुळाकडून त्या वाढलेल्या जमिनीचा जादा खंड किंवा मक्ता देण्यास तें कूळ जबाबदार आहे, असें मानलें पाहिजे; एका मालकाच्या जमिनीमधून एकदम नदीचा प्रवाह शिरून ती जमीन दुभागली गेली, व एक भाग निराळ्या मालकाच्या जमिनीशीं संलग्न झाला, तरी सदर जमिनीचा भाग मूळच्या मालकाचाच आहे, असें मानलें पाहिजे ( कलम ४ ).

**जमीनीसंबंधीं कायदे**—जमिनीच्या मालकाला स्वतःच्या जमिनीचा उपभोग स्वतःच्या इच्छेप्रमाणें पाहिजे तसा घेतां येतो; त्यावर नियंत्रण एवढेंच असतें कीं, तसा उपभोग घेतांना इतरांच्या हक्कांवर अतिक्रमण होतां कामा नये. जमिनीचा कबजा त्याचा एकट्याचाच असतो, दुसऱ्या कोणीं अतिक्रमण केल्यास त्याला दिवाणी किंवा फौजदारी कोर्टांत इलाज करतां येतो. जमिनींतील खनिज द्रव्यांवर मालकी जमिनीच्या मालकाची असते. तसेंच त्याच्या जमिनीखालून बोगदा पाडण्यास मनाई करण्याचा त्याला हक्क असतो. खाण खणीत असतांना शेजाऱ्याच्या जमिनींतलें पाणी याच्या जमिनींत आलें तर त्याबद्दल नुकसानभरपाई मागतां येत नाहीं. सदर जमिनीवरून जाण्याचा वैमानिक मार्ग असेल, तर तो अतिक्रमणाचा गुन्हा किंवा अपकृत्य नव्हे. एरियल नॅव्हिगेशन ॲक्टानें कांहीं विशिष्ट भागांतून विमानें नेऊं नयेत, असें नियंत्रण घातलेलें असतें.

खाजगी मालकीच्या जमिनींत तळें असेल तर त्या पाण्यावर मालकी त्या जमिनीच्या मालकाचीच असते. जमिनींतून ओढा वाहत असेल तर त्या ओढ्याचा प्रवाह बंद करण्याचा किंवा तो खराब करण्याचा हक्क त्या मालकास नसतो. असा ओढा दोन जमीनमालकांच्या हद्दीवरून वाहत असेल, तर त्या ओढ्याच्या प्रवाहावर निम्मेनिम हक्क त्या दोघांना असतो. मात्र नदी वाहत असेल आणि नदीच्या पाण्यांतून नाविक वाहतूक होत असेल आणि भरतीओहोटीचें पाणी येत असेल तर त्या नदीच्या पात्रावर राजाचा हक्क असतो.

जमिनीच्या मालकानें त्या जमिनीवर कोणाचे वहिवाटीचे हक्क ( ईजमेंट्स ) असतील त्या हक्कांना बाध आणतां कामा नये. एखाद्या परक्या इसमाला त्याच्यापासून खंड किंवा कबुलायत न घेतां सदर जमिनीवर कबजावहिवाट सतत बारा वर्षें करूं दिली तर त्या जमिनीवर परक्या इसमाचा मालकी हक्क उत्पन्न होतो. हिंदुस्थानांतहि अशाच स्वरूपाचे कायदे आहेत.

**जमेका**—ब्रिटिश वेस्ट इंडीज बेटांतलें सर्वांत मोठें बेट. हें क्यूबापासून ९० मैलांवर कॅरिबिअन समुद्रांत आहे. १४९४ मध्यें कोलंबसानें याचा शोध लावला. १६५५ मध्यें स्पेनपासून इंग्रजांनीं घेतलें. डोंगराळ मुलूख–जास्तींत जास्त उंची ७३६० फुटांची–असला तरी अत्यंत सुपीक आहे व शेती ही चांगली भरभराटलेली आहे. कॉफी, ऊंस, केळीं, कोको, नारळ, इ. मुख्य पिकें होत. हवामान मध्यम व निरोगी आहे. या बेटाला भूकंप व वादळें यांचा वारंवार त्रास होतो. टर्क, कैको व केमन बेटें यांचा राज्यकारभार येथूनच चालतो. किंग्स्टन हें मोठें शहर व बंदर असून राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण आहे. क्षेत्रफळ ४,४५० चौ. मैल. बेटाची लांबी ४४ मैल. लो. सं. १२,४१४,२०.

**जॅमेसन, सर लीन्डर स्टार** ( १८५३–१९१७ )— एक दक्षिण आफ्रिकेंतील मुत्सद्दी. १८९१ सालीं ऱ्होडेशियाचा ॲड्मिनिस्ट्रेटर त्याला नेमिलें. पण चार वर्षांनीं त्यानें जोहान्सबर्गमधील युइटलंडर लोकांच्या बंडाला मदत करण्यासाठीं सैन्य घेऊन ट्रान्सवालवर मोहीम नेली. पण त्याला बोअर लोकांनीं शरण येण्यास लावून ब्रिटिश सरकारच्या स्वाधीन केलें. त्याची चौकशी होऊन १५ महिन्यांची त्यास शिक्षा मिळाली. १९०४–१९०८ या कालांत तो केप कॉलनीचा मुख्य मंत्री होता.

**जम्नोत्री**— संयुक्त प्रांत, टेहरी संस्थानांतील एक क्षेत्र. जम्नोत्रीचें हें देऊळ समुद्रसपाटीपासून १०,८०० फूट उंचीवर असून येथून चार मैलांवर यमुना नदीचा उगम आहे. जम्नोत्रीचा विशेष म्हणजे तेथील अद्भुत उष्ण जलप्रवाह हे होत. जम्नोत्रीच्या मंदिरासमोर दोन गुंफा आहेत. या गुंफांच्या खालून उष्ण झरे वाहत असल्यामुळें बाहेर कितीहि थंडी असली तरी या गुंफा चांगल्या गरम राहतात. जम्नोत्री येथील मंदिरांत गंगा, यमुना, सरस्वती यांच्या मूर्ती आहेत. जम्नोत्रीला जाण्याचा रस्ता फार वाईट असल्यामुळे इकडे येणाऱ्या यात्रेकरूंपैकीं बहुतेक सगळेच पायीं येणारे असतात.

**जम्मू**—काश्मीर संस्थानचा एक मोठा प्रांत. हा हिंदुस्थानालगत असून सर्व बाबतींत बहुतेक पंजाबसारखा आहे. याचें जहागिरी धरून क्षे. फ. १२,४३९ चौ. मै. आहे. प्रांताचें

मुख्य ठिकाण जम्मू आहे. येथील हवा पंजाबप्रमाणें उष्ण आहे. पावसाची सरासरी ४१ इंच आहे.

शहर—ही जम्मू प्रांताची राजधानी असून काश्मीरचे महाराज येथें हिंवाळ्यांत राहण्यास येतात. हें समुद्रसपाटीपासून १२०० फूट उंच आहे. तावी नदीच्या तीरीं हा गांव असून गांवाचें क्षे. फ. सुमारें एक चौ. मैल आहे. येथें रघुनाथजीचें देऊळ आहे. रेल्वेची सोय असूनहि गांव कांहीं म्हणण्यासारखा भरभराटीस आला नाहीं. लो. सं. ५०,३७९. काश्मीर पाहा.

**जयकर, डॉ. मुकुंद रामराव** (१८८०— )— एक हिंदी पुढारी व कायदेपंडित. यांनीं आर्यन एज्युकेशन सोसायटी या शिक्षणसंस्थेची स्थापना केली व तेथें हायस्कूलचे प्रिन्सिपॉल म्हणून ४ वर्षें काम केलें. नंतर मुंबई हायकोर्टांत बॅरिस्टर म्हणून काम करूं लागले. १९१६ पासून हे सार्वजनिक कामांत भाग घेऊं लागले. १९२३ मध्यें हे मुंबई कायदेमंडळांत निवडून आले. तेथें ते कौन्सिलमधील स्वराज्यपक्षाचे पुढारी होते. १९२५ मध्यें यांनीं राजीनामा दिला व १९२६ मध्यें ते मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून आले. तेथें १९२७ ते १९३० मध्यें ते राष्ट्रीय पक्षाचे दुय्यम पुढारी होते. हे गोलमेज परिषदेला प्रतिनिधि म्हणून गेले होते. ते फेडरल स्ट्रक्चर सब्-कमिटीचे सभासद होते. हे एक समाजसुधारक आहेत. १९१७ सालीं नाशिक येथे भरलेल्या सामाजिक परिषदेचे ते अध्यक्ष होते. भारतीय संगीतसमितीचे ते उपाध्यक्ष आहेत. ते इंग्लंडमधील प्रीव्ही कौन्सिलच्या कमिटीवर कांहीं वर्षें सभासद होते. नंतर त्यांची हिंदुस्थानांतील फेडरल कोर्टावर नेमणूक झाली. अपक्ष परिषदेंत व पुढारी परिषदेमध्यें त्यांनीं बराच प्रामुख्यानें भाग घेतला व डॉ. सप्रू यांच्याबरोबर सरकार व कॉंग्रेस यांमध्यें तडजोड घडवून आणण्याची खटपट केली. महाराष्ट्र विद्यापीठ समितीचे ते अध्यक्ष होते व १९४८ सालीं पुणें विद्यापीठ स्थापन झाल्यावर ते त्याचे पहिले कुलगुरु (व्हाइस चॅन्सेलर) नेमले गेले. हें नवें विद्यापीठ सुरळीत चालण्याविषयीं त्यांनीं बरीच मेहनत घेतली.

**जयगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्ह्यांत हें बंदर आहे. हें मुंबईपासून ९९ मैलांवर आहे. हें बंदर व्यापारास फार सोईचें आहे. कारण येथें पाणी दूरवर गेलें असून खोल आहे. व जहाजांना समुद्रापासून बिलकूल त्रास होत नाहीं. जयगड येथें एक किल्ला आहे, पण तो पडत चालला आहे. हा किल्ला मूळ हिंदू राजांनीं बांधला, पण संगमेश्वरच्या प्रसिद्ध चाचा नाइकानें आपल्या ताब्यांत घेतला. १७१३ सालीं हें जयगड बंदर मराठे सरदार आंग्रे ह्यांच्या ताब्यांत होतें. पण १८१८ सालीं तें इंग्रजांच्या ताब्यांत गेलें. ह्या ठिकाणीं १३ मैल लांबून दिसणारें एक दीपगृह आहे.

**जयगड किल्ला**—मुंबई, कोंकण. शास्त्री नदीच्या मुखाशीं समुद्रकिनाऱ्याला लागून दोनशें फूट उंच टेकडीवर हा किल्ला बांधलेला आहे. हा मुंबईच्या दक्षिणेस ९९ मैलांवर आहे. क्षेत्रफळ ४ एकर आहे. तट अद्याप बऱ्या स्थितींत आहे व पायथ्याशींहि विस्तृत क्षेत्रावर तटबंदी आहे. किल्ल्याचा बराच भाग शिवाजीनें बांधला. याच्यासमोर दोन मैलांवर विजयगड म्हणून लहानसा किल्ला आहे. त्याचें क्षेत्रफळ पाव एकर आहे व भोंवतीं खंदक आहे. जयगड विजापूरकरांनीं सोळाव्या शतकांत बांधला. त्यांच्यापासून एका नाइकानें घेतला, पुढें कान्होजी आंग्रे यानें तो सर केला. १७१३ त कान्होजी शाहूच्या पक्षास मिळाला व किल्ला त्याच्याकडेच राहिला. किल्ल्यांत दोन इमारती आहेत.

**जयचंद्र गढवाल** (११७०–११९३)—कनोजच्या सम्राटांपैकीं गोविंदचंद्राचा नातू व विजयचंद्राचा हा मुलगा. विजयचंद्राच्या वेळींच सम्राट्पदाचा मान अजमेरच्या चाहमानांकडे गेला होता. पृथ्वीराजाच्या वैमनस्याच्या पायीं यानें शहाबुद्दिन घोरीची मदत घेतली व त्यामुळें यवनाची सत्ता हिंदुस्थानांत आली. शहाबुद्दीननें याचा व पृथ्वीराजाचा दोघांचाहि नाश केला. जयचंद्रानें आपली मुलगी संयोगिता (संयुक्ता) हिचें स्वयंवर मांडलें होतें. त्या वेळीं पृथ्वीराजाखेरीज सर्व राजांना निमंत्रणें केलीं आणि पृथ्वीराजाचा एक पुतळा द्वारपाल म्हणून ठेवला. संयोगिता व पृथ्वीराज यांचें परस्परांवर अकृत्रिम प्रेम असल्यानें आयत्या वेळीं पृथ्वीराजानें आपल्या पराक्रमानें सर्व राजांच्या संघांतून आपल्या वधूचें हरण केलें. यानें राजसूय यज्ञ केला, त्यास पृथ्वीराजानें हरकत घेतली. नयचंद्रसूरीनें रंभामंजरी नांवाची नाटिका केली तींत हा नायक आहे. मुहम्मद घोरीशीं लढत असतां याचा हत्ती गंगेंत शिरला व हा बुडून मेला.

**जयचंद्र विद्यालंकार** (१८९८– )—एक सुप्रसिद्ध हिंदी इतिहासशास्त्रज्ञ व लेखक. हे गुरुकुल विश्वविद्यालया (कांगडी हरिद्वार)चे विद्यालंकार 'पदवीधर असून यांनीं (१) भारतीय इतिहास की रूपरेखा (२ खंड), (२) भारतभूमि और उसके निवासी, (३) भारतीय वाङ्मय के अमरत्व, (४) जातीय शिक्षा, वगैरे पुस्तकें लिहिलीं आहेत. यांनीं राजकारण, भूगोल यांसारख्या विषयांचाहि अभ्यास केलेला असून अनेक विद्यापीठांत इतिहासाचे प्राध्यापक म्हणून काम केलेलें आहे. भारतीय इतिहासपरिषद् स्थापणाऱ्यांपैकीं हे एक होत. हिंदी साहित्यसंमेलनानें यांच्या 'भारतीय इतिहास की रूपरेखा' या ग्रंथास रु. १२०० चें 'मंगलाप्रसाद' पारितोषिक देऊन यांच्या गुणांचा गौरव केला आहे.

**जयजयवती**—हा राग खमाज थाटांतील जन्य रागांपैकीं एक आहे. याच्या आरोहावरोहांत सातहि स्वर लागतात. म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय रात्रीच्या दुसऱ्या प्रहराचा शेवट समजतात. या रागांत दोन गांधार व दोन निषाद या स्वरांचा प्रयोग होतो. आरोहांत तीव्र गांधार व तीव्र निषाद हे स्वर लागतात. व अवरोहांत कोमल निषाद व कोमल गांधार हे स्वर लागतात. कोमल गांधार स्वर 'री ग री' या स्वरूपांतच दृष्टीस पडतो. तीव्र गांधार अवरोहांत घेतां येतो. हा मिश्र राग आहे. यांत गौड, बिलावल व सोरट हे राग मिसळलेले दृष्टीस पडतात. या रागांत मंद्र पंचम व मध्यम ऋषभ याची संगति रागवाचक आहे.

**जयत**—हा राग मारवा थाटांतून उत्पन्न होतो. त्याच्या आरोहावरोहांत मध्यम व निषाद हे दोन स्वर वर्ज्य आहेत, म्हणून याची जाति औडुव-औडुव आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गाण्याचा समय सायंकालयुक्त समजतात. यांत ऋषभ कोमल असल्यानें, देसकार, भूपाळी व जयत्कल्याण या रागांपासून हा निराळा होतो. कारण त्या रागांत ऋषभ स्वर तीव्र आहे, तसेंच कोमल ऋषभ लागणारे राग रेवा व बिभास, यांपासून हा निराळा होतो. याचें कारण या रागांत धैवत तीव्र आहे. त्या रागांत धैवत स्वर कोमल ठेविलेला आहे.

**जयतीर्थ**—मध्वाचार्यांच्या वैष्णव संप्रदायांतील एक प्रमुख पीठाधिपति व प्रसिद्ध ग्रंथकार. मूळचे हे पंढरपूरजवळील मंगळवेढ्याचे देशपांडे असून यांचें पूर्ण नांव धोंडो रघुनाथ देशपांडे असें आहे. हे सैन्यांत अधिकारी असतां एकदां पंढरपुरास आले होते त्या वेळीं मध्वाचार्यांचे चौथे शिष्य अक्षोभ्यतीर्थ यांचाहि मुक्काम पंढरपुरांत होता. याच वेळीं यांनीं आपला गृहस्थाश्रम सोडला व अक्षोभ्यतीर्थांपासून संन्यासधर्माची दीक्षा घेतली. संन्यास घेतल्यानंतर यांनीं शास्त्रादिकांचें अध्ययन केलें व मध्वाचार्यांच्या बहुतेक ग्रंथांवर व 'दशोपनिषद्भाष्यां'वर टीका लिहिल्या. शिवाय 'तत्त्वप्रकाशिका' व 'सुधा' (द्वैतवेदांतावरील अत्यंत मान्य असा ग्रंथ) हे दोन ग्रंथहि लिहिले. यांनीं आपल्या संप्रदायाचा प्रसार देशोदेशीं केला. आपल्या ग्रंथलेखनाचें काम यांनीं मरगोळच्या डोंगरावर केलें. मध्वाचार्यांनंतर ४९ वर्षांनीं हे पीठाधिपति झाले. पीठावर हे बावीस वर्षें होते. संन्यासदीक्षा घेतल्यावर यांना जयतीर्थ हें नांव प्राप्त झालें. मालखेड येथें यांनीं आपला देह ठेवला. यांच्या पीठाधिपत्याचा काल भांडारकरांच्या मतें सन १३२५–१३४७ हा आहे.

**जयत्कल्याण**—हा कल्याण थाटाचा जन्यराग आहे. ह्याच्या आरोहावरोहांत मध्यम व निषाद हे स्वर वर्ज्य आहेत, म्हणून ह्याची जाति औडुव-औडुव आहे. वादी स्वर पंचम असून संवादी ऋषभ आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर मानितात. ह्याच कल्याण थाटांतून निघणाऱ्या व मध्यम व निषाद हेच स्वर वर्ज्य असणाऱ्या भूपाळी रागापासून— 'वादी भेदाद्रागभेदः' या न्यायानें हा जयत्कल्याण राग निराळा होतो. या रागांतील पंचम आणि ऋषभ स्वरांची संगति फार मधुर लागते.

**जयदेव** (सु. ११ वें शतक)—हा प्रसिद्ध संस्कृत कवि जगन्नाथपुरी प्रांतांत उत्कल देशामध्यें बिंदु बिल्व या गांवीं जन्मला. याच्या बापाचें नांव श्रीभोजदेव व आईचें नांव राधादेवी अगर रमादेवी होतें. याच्या बायकोचें नांव पद्मावती होतें. हा परम कृष्णभक्त व महासाधु होता. वंगदेशाचा राजा लक्ष्मणसेन याच्या पदरीं जयदेव होता, असें एका शिलालेखांत वर्णन आलें आहे.

जयदेवाचा 'गीतगोविंद' हा एकच ग्रंथ प्रसिद्ध आहे. पण गीतगोविंद हें एकच काव्य जयदेवाचें नांव अजरामर करण्यास पुरें आहे. हें कृष्णाच्या बालपणाच्या चरित्रावर रचलेलें काव्य आहे.

**जयदेव पियूषवर्ष** (सु. १३ शतक)—न्यायशास्त्रावरील एक नामवंत ग्रंथकार. दरभंग्याच्या पूर्वेस कमला नदीच्या तीरावर असलेल्या सैसव गांवीं याचा जन्म झाला. याला पीयूषवर्ष हें उपपद होतें. हा न्यायशास्त्र व तर्कशास्त्र यांत निपुण असून यानें आपल्या गुणांनीं अनेक पंडितांना जिंकलें होतें. न्यायशास्त्रावर यानें 'तत्त्वचिंतामण्यालोक', 'द्रवपदार्थ' व 'लिलावतीविवेक' हे ग्रंथ लिहिले असून ते प्रमाण मानले जातात. याचा चुलता हरिमिश्र हाच याचा गुरु होता. याच्या पित्याचें नांव महादेव व आईचें नांव सुमित्रा.

**जयद्रथ**—सिंधुदेशाचा राजा वृद्धक्षत्र याचा पुत्र व धृतराष्ट्रकन्या दुःशीला हिचा पति. पांडव वनवासांत असतां एकदां यानें द्रौपदीस हरण करण्याचा प्रयत्न केला. त्यावरून पांडवांनीं त्याचे पांच पाट काढून जिवंत सोडून दिलें. पुढें यानें उग्र तप करून शंकरापासून 'अर्जुनेतर पांडवांचा युद्धांत पराभव करशील' असा वर मिळविला. याच वरामुळें यानें चक्रव्यूहांत अभिमन्यूचा वध करून इतर पांडवांचा पराभव केला. तेव्हां अर्जुनानें 'उद्यां सूर्यास्तापूर्वीं जयद्रथास मारीन' अशी घोर प्रतिज्ञा करून कृष्णाच्या साहाय्यानें ती तडीस नेली. जयद्रथाला सूर्यास्त झाला असें कृष्णानें खोटेंच भासवून त्याला अर्जुनाकडून मारविलें व त्याची प्रतिज्ञा पुरी करण्यास मदत केली. 'हा सूर्य व हा जयद्रथ!' ही म्हण या जयद्रथकथेवरूनच पडली आहे.

**जयपाल**—हा काबूलच्या शाही राजघराण्यांतील भीमपाल याचा मुलगा. याचें राज्य पंजाब व अफगाणिस्तान यांवर पसरलें

जयपूर—वेधशाळा (पृ. ८४६)

जयपूर—हवाईमहाल (पृ. ८४६)

जावा—बोरोबुदर येथील शिल्प (पृ. ८९१)

शहर— जयपुर संस्थानची राजधानी असून मुंबईपासून ६९९ मैल दूर आहे. हें सर्व राजपुतान्यांत मोठें व सुंदर शहर आहे. या शहराला हें नांव सवाई जयसिंगाच्या नांवावरून १७२८ सालीं मिळालें. हें शहर सुंदर रस्ते व इमारती यांबद्दल फार प्रसिद्ध आहे. या शहरांत विशेष पाहण्यासारखी इमारत म्हटली म्हणजे सवाई जयसिंगानें बांधलेली वेधशाळा व तेथील वेधयंत्रें होत. या शहरांतल्या कला व उद्योगधंदे म्हटले म्हणजे कपड्यास रंग देणें, संगमरवरी दगडावर काम करणें, सोन्याच्या मुलाम्याचें काम करणें. शहरांत शिक्षणसंस्था पुष्कळ आहेत. महाराजा कॉलेज, ओरिएन्टल कॉलेज, व संस्कृत कॉलेज हीं तीन कॉलेजें आहेत. रामनिवास नांवाच्या सार्वजनिक उद्यानामध्यें 'हाल' नांवाची इमारत आहे व तीमध्यें औद्योगिक वस्तूंचें व शिक्षणविषयक नमुन्यांचें पदार्थसंग्रहालय आहे. लो. सं १,७५,८१०.

**जयप्रकाश नारायण** (सु. १९०३– )—हिंदी कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्षाचे सुप्रसिद्ध पुढारी व निष्ठावंत क्रांतिकारक कार्यकर्ते. बिहारमधील सरण तालुक्यांतील सिताब्दियारा या गांवीं यांचा जन्म झाला. उच्च शिक्षणाची आवड असल्यामुळें हे सन १९२२ मध्यें शिक्षणासाठीं अमेरिकेस गेले. तेथें अनेक प्रकारचे कष्ट सोसून व पैसे मिळवून यांनीं आपलें शिक्षण तडीस नेलें. याच वेळीं आर्थिक विषमतेमुळें निर्माण होणाऱ्या भयंकर परिणामांचा कटु अनुभव आल्यामुळें शास्त्रीय विषयांतून यांचें लक्ष उडालें व मार्क्सच्या ग्रंथांच्या वाचनाची यांना आवड निर्माण झाली. यानंतर सन १९२९ मध्यें हे स्वदेशीं परतले ते समाजवादी विचारसरणी घेऊनच. हे हिंदुस्थानांत आल्यावर पं. जवाहरलाल नेहरू यांनीं यांची शेतकरी संघटनेच्या कार्याकडे नेमणूक केली. सन १९३० मध्यें कायदेभंगाच्या चळवळीच्या धामधुमीच्या काळांत कॉंग्रेसच्या चिटणिसांच्या गैरहजेरींत चिटणिसाची कामगिरी यांनीं यशस्वी रीतीनें पार पाडली. यानंतर यांची समाजवादी विचारसरणी वाढत जाऊन नाशिक तुरुंगांत असता सन १९३२–३३ मध्यें यांनीं सोशॅलिस्ट पक्ष स्थापन करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें या पक्षाची स्थापना केली. या पक्षाचें पहिलें अधिवेशन पाटणा येथें बनारस विद्यापीठाचे आचार्य नरेंद्रदेव यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आलें.

प्रसिद्धिपराङ्मुख म्हणून जरी यांची ख्याति असली तरी सन १९४२ च्या 'चले जाव' चळवळींत भूमिगत चळवळीचें नेतृत्व स्वीकारल्यामुळें हे लोकांच्या नजरेंत प्रामुख्यानें आले. मोठ्या प्रयत्नानें यांना पकडण्यांत येऊन लाहोरच्या किल्ल्यांत स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें होतें. १९४३ सालीं सुटल्यानंतर त्यांनीं समाजवादी पक्षाची नवीन संघटना करून १९४८ सालीं कॉंग्रेसचा संबंध सोडला. 'समाजवाद का' या नांवाचा एक अभ्यासपूर्ण इंग्रजी ग्रंथ यांनीं लिहिला असून तो अत्यंत लोकप्रिय झाला आहे.

**जयमल्ल**—एक रजपूत वीर. अकबरानें चितोडवर १५६७ त स्वारी केली असतां चितोडचा किल्ला लढविण्याचें काम या जयमल्लाकडे राणा उदयसिंगानें सोंपविलें होतें. हा बेदनोर येथील ठाकूर असून राठोड वंशांतील मोर्थ शाखेचा होता. ही शाखा मारवाडांत सर्वांत शूर गणली जाई. जयमल्ल चितोडचा सेनापति होता. त्याच्या हाताखालीं हजार लोक होते. परंतु अकबराचें अफाट सैन्य व त्याच्याजवळ तोफखाना असल्यानें शेवटीं त्याचा जय झाला. जयमल्लानें लढण्याची शिकस्त केली. अखेरीस अकबरानें स्वतः आपल्या संग्राम नांवाच्या बंदुकीनें नेम धरून जयमल्लास गोळीनें ठार केलें. चितोड येथें जोहार झाला व मग भग्न किल्ला अकबराच्या हातीं पडला. चितोड येथें जयमल्ल जेथें पडला ती जागा अद्यापि दाखविण्यांत येते.

**जयरामजांकित** (सु. १८०६)—भाषाप्रभुत्वाबद्दल सुप्रसिद्ध असलेल्या या मराठी कवीनें 'साधुलक्षण', 'पतिव्रता–स्तुति', 'साधु–माहात्म्य', 'सीतेचा धांवा', 'द्रौपदीचा धांवा', 'होरी–फाग', वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. यानें आपल्या काव्यांत बाजीरावाबद्दल स्तुतिस्तोत्रें गायिलीं आहेत. कांहीं हिंदी काव्यरचनाहि यानें केली आहे.

**जयरामदास दौलतराम** (१८९२– )—एक हिंदी पुढारी. १९१५ मध्यें हे एल्‌एल्. बी. झाले व यांनीं कराची येथें वकिली सुरू केली. १९१६ मध्यें त्यांनीं होमरूल चळवळीमध्यें भाग घेण्यास सुरवात केली. १९१९ च्या सत्याग्रहचळवळींत त्यांनीं भाग घेतला. १९१७ पासून ते ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे सभासद आहेत. १९१९–२० मध्यें ते 'भारतवासी' या पत्राचे संपादक होते. १९२०–२१ मध्यें त्यांनीं असहकारितेच्या चळवळींत भाग घेतला. १९२१ मध्यें ते 'हिंदु' व 'वंदे मातरम्' या पत्रांचे संपादक होते. यांस दोन वर्षें सक्तमजुरीची शिक्षा झाली. १९२५–१९२७ मध्यें हिंदुमहासभेचे मुख्य चिटणीस होते. १९२५–१९२६ मध्यें ते दिल्ली येथील 'हिंदुस्थान टाइम्स' या पत्राचे संपादक होते. १९२६ मध्यें ते मुंबई कायदेमंडळाचे सभासद झाले. परंतु अखिल भारतीय विदेशी वस्त्रबहिष्कार समितीचे मंत्री झाल्यामुळें त्यांनीं आपल्या जागेचा राजीनामा दिला. नंतर त्यांनीं मिठाच्या कायदेभंग-सत्याग्रहांत भाग घेतला. १६ एप्रिल १९३० रोजीं कराची येथें पोलिसांनीं गोळीबार केला तेव्हां लोकांस शांत करीत असता यांस जखम झाली.

एकंदर सत्याग्रहचळवळींत त्यांस ४ वेळां तुरुंगाची शिक्षा झाली. पुढें हे कॉंग्रेसचे प्रधान मंत्री होते. नंतर १९४७ सालीं हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यसंपादनानंतर हे बिहार प्रांताचे गव्हर्नर नेमले गेले. नंतर यांना मध्यवर्ती सरकारांत अन्नमंत्री करण्यांत आलें.

**जयराम न्यायपंचानन** ( सु. १७०० )—एक संस्कृत पंडित व तत्त्वज्ञ. रामभद्र सार्वभौमाचा हा शिष्य कृष्णनगरच्या राजा रामकृष्णाच्या पदरीं होता. तर्कशास्त्रांत हा निपुण होता, असें भीमसेन दीक्षितानें लिहिलेल्या 'अलंकारसारस्थिति' व 'एकषष्ठीय अलंकारप्रकाश' या ग्रंथांवरून दिसून येतें. 'तत्त्वचिंतामण्यालोकविवेक', 'तत्त्वचिंतामणि दीधति-गूढार्थ-विद्योतन', 'न्यायसिद्धान्तमाला' व 'शब्दार्थमाला' हे याचे सुप्रसिद्ध ग्रंथ होत. वैशेषिक तत्त्वज्ञानावर यानें (१) गुण–दीधिति–विकृति (२) न्याय–कुसुमांजलि–कारिकाव्याख्या, (३) पदार्थ–मणि–माला, हे ग्रंथ लिहिले असून या सर्वांत पदार्थ–मणि–माला हा त्याचा सरस ग्रंथ होय. मम्मटाच्या काव्यप्रकाशावर यानें 'काव्यप्रकाश–तिलक' या नांवानें टीका लिहिली आहे.

**जयरामस्वामी** ( वडगांवकर ) ( शके १५२१–१५९४ )—एक महाराष्ट्र संतकवि. हा कात्राबाज मांडवगणाच्या देशपांडे कुळांतला असून याचें उपनांव कस्तरे असें होतें. कृष्णा आप्पास्वामी याचे गुरु होते. दशमस्कंधटीका, रुक्मिणीस्वयंवर, सीतास्वयंवर व अपरोक्षानुभव हे जयरामस्वामीचे मुख्य ग्रंथ होत. यांखेरीज लहान लहान वेदान्तप्रकरणें, अभंग व पदें पुष्कळ आहेत.

**जयरामात्मज**—एक महाराष्ट्र संतकवि. हा गोसावीनंदनाच्या मागाहून होऊन गेला. यानें कोकिळगंगाधर, राघवचिद्घन, श्रीधर, अनंत यांचा आपल्या संतमालिकेंत उल्लेख केलेला आहे. संतमालिका, द्रौपदीचा धांवा, घडियाळें, अंबेची आरती, रासमंडळ, वगैरे याचे ग्रंथ आहेत.

**जयविजय**—विष्णूचे उभय द्वारपाल. हे सनकादिकांच्या शापानें वैकुंठांतून पतन पावून असुरयोनींत जन्मास आले होते. हिरण्याक्ष व हिरण्यकश्यप, रावण व कुंभकर्ण, शिशुपाल व वक्रदंत हीं रूपें यांनींच धारण केलीं होतीं, अशा भागवतांत कथा आहेत. गजेंद्रमोक्षाच्या कथेंतील गज आणि नक्र हे जयविजयच होते.

**जयशंकरप्रसाद देवीप्रसाद**—'प्रसाद' या नांवानें सुप्रसिद्ध असलेला हिंदी वाङ्मयांतील एक कवि, नाटककार, कादंबरीकार, लघुकथालेखक व टीकाकार. काशींतील एका प्रतिष्ठित घराण्यांत यांचा जन्म झाला. वयाच्या पंधराव्या वर्षापासून यांना कविता करण्याचा नाद लागला व 'भारतेन्दु' मध्यें यांची पहिली कविता प्रसिद्ध झाली. यानंतरचें यांचें वाङ्मय यांच्याच प्रेरणेनें निघालेल्या 'इन्दु' मासिकांतून प्रसिद्ध झालें.

आधुनिक हिंदींत छायावादाचे जनक हेच असून नियमक कविता करण्याची प्रथा हिंदींत यांनींच पाडली. नावीन्य व भावनाप्राधान्य हीं यांच्या लिखाणांतील वैशिष्ट्यें होत. हिंदी भाषेंत सर्वश्रेष्ठ नाटककार म्हणूनहि यांनीं लौकिक संपादन केला आहे. अनेक क्षेत्रांतील वैशिष्ट्यपूर्ण कामगिरीमुळें हिंदी 'रवींद्रनाथ' या नांवानेंहि हे ओळखले जातात.

(१) स्कंदगुप्त, (२) चंद्रगुप्त, (३) राजश्री, (४) काननकुसुम, (५) प्रतिध्वनि, (६) आंधी, (७) छाया, (८) चित्ताधार, (९) कंकाल, (१०) तितली, इत्यादि अनेक नाटकें यांनीं लिहिलीं आहेत.

**जयसवाल, डॉ. काशीप्रसाद** ( १८७१–१९४१ )—एक बिहार प्रांतीय प्राच्यविद्यासंशोधक. बिहार प्रांतांतील झालडा गांवीं यांचा जन्म झाला. ऑक्सफर्डच्या जीझस कॉलेजमधून इतिहास हा ऐच्छिक विषय घेऊन हे सन १९०९ मध्यें एम्. ए. झाले. यानंतर हे बॅरिस्टर होऊन हिंदुस्थानला परत आले.

युरोपमध्यें लाला हरदयाळ यांच्यासारख्या क्रांतिकारकांच्या संगतींत वावरल्यामुळें अलाहाबाद हायकोर्टानें यांना वकिलीची सनद देण्याचें नाकारलें. तेव्हां यांनीं कलकत्त्यास वकिली सुरू केली व सन १९१६ मध्यें पाटण्यास हायकोर्टाची स्थापना होतांच ते तिकडे गेले. व तेथेंच कायमचें वास्तव्य करून राहिले.

हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासावर यांनीं 'हिंदु पॉलिटी', 'हिस्टरी ऑफ इंडिया' यांसारखे उत्तमोत्तम ग्रंथ लिहिले. 'हिंदु कायद्याचा इतिहास व त्याचा मोठेपणा' या विषयावर यांनीं दिलेल्या टागोर लॉ लेक्चर्सवरून यांचा या क्षेत्रांतील अधिकार किती मोठा होता याची सहज कल्पना येते. ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकांतील इतिहासावर चांगला प्रकाश टाकणाऱ्या ओरिसामधील भुवनेश्वराजवळच्या हाथीगुंफेंतील लांचलचक शिलालेखांचा यांनीं सखोल अभ्यास करून त्याबद्दलचीं आपलीं मतें मांडलीं आहेत.

लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसायटीकडून मौर्यांच्या नाण्यांवर व्याख्यान देण्याकरितां यांना बोलावणें आलें होतें. सन १९३३ मध्यें बडोद्याच्या ऑल इंडिया ओरिएन्टल कॉन्फरन्सच्या अध्यक्षपदाचा मान यांना लाभला. गायकवाड सुवर्णमहोत्सवामधील यांचीं व्याख्यानेंहि विद्वत्ताप्रचुर अशींच झालीं. यांच्या प्राचीन इतिहाससंशोधनांत राष्ट्रीय दृष्टि असे.

**जयसिंह** (इ. स. आठवें शतक पूर्वार्ध)—सिंधच्या दाहीर राजाचा पुत्र. दाहीर मारला गेल्यावर यानें महंमद कासिमास तोंड देण्याचा प्रयत्न केला. परंतु याचें कांहीं न चालल्यानें यास बहामनाबादेहून चित्तूरकडे माघार घ्यावी लागली. महंमदाच्या जागेवर आलेल्या उमरनें यास मुसलमान धर्माची दीक्षा दिली. खलिपाची मनधरणी करूनहि उमरनंतरचा सुभेदार जुनैद यानें यावर स्वारी करून ठार केलें. याचा भाऊ छेच्च याचीहि तीच वाट लावण्यांत आली.

**जयसिंह (मीर्झा) कच्छवाह** (१६०९-१६६७)—मानसिंहाचा भाऊ जगत्सिंह याचा हा नातू व अंमेर (अंबर) येथील राणा. आठ वर्षांचा असतांना मोगल सैन्यांत अधिकारी झाला. १६२२ मध्यें गादी मिळाली. शहाजहान व औरंगजेब यांच्या दरबारीं यास फार मान असून हा मोठा मुत्सद्दी व राजनिष्ठ असल्यानें बादशहा याच्यावर सर्व महत्त्वाचीं कामें सोपवी. १६६३ सालीं हा शिवाजीच्या पारिपत्यासाठीं मोठें सैन्य घेऊन दक्षिणेंत आला व पुरंदरास तळ ठोकून राहिला. शिवाजीनें पडतें घेऊन त्याच्याशीं तह केला. या वेळीं जयसिंहानें शिवाजीस दिल्लीस नेण्याचें काम युक्तिप्रयुक्तीनें तडीस नेलें. पण पुढें विजापूरच्या मोहिमेंत अपयश आल्यानें बादशहाकडून याचा अपमान झाला. दक्षिणेंतून परत येत असतां बऱ्हाणपूर येथें हा मरण पावला. याला तुर्की, फारसी व ऊर्दू भाषा चांगल्या येत होत्या.

**जयसिंह (सवाई) कच्छवाह** (१६६९-१७४३)—अंबरच्या महासिंह कच्छवाहाचा हा मुलगा शूर व विद्वान् असून यानें आपल्या सद्गुणांनीं प्रजेकडून वाहवा मिळवली. आपल्या कारकीर्दीत यानें रस्ते, धर्मशाळा, विहिरी यांसारखीं जनहिताचीं कामें करून प्रजेचा विश्वास संपादन केला. हा विद्वानांचा चहाता असून यानें त्यांना आश्रय दिला होता. काशींतील भट्टकुलांपैकीं रत्नाकरभट्टानें लिहिलेला 'जयसिंहकल्पद्रुम' हा ग्रंथ, जगन्नाथ नांवाच्या पंडितानें लिहिलेला 'सिद्धांतसम्राट्' हा ग्रंथ व युक्लिडच्या भूमितीच्या पुस्तकांचा 'रेखागणित' नांवाचा ग्रंथ हे सर्व जयसिंहानें विद्वानांना दिलेल्या प्रोत्साहनाचेंच फल होय. यानें जयपुर, उज्जयिनी, इंद्रप्रस्थ व मथुरा येथें वेधशाळा स्थापून विद्वानांच्याकडून वेधविद्येंत पुष्कळ संशोधनकार्य करवून घेतलें. शिवाय हा स्वतःहि वेधविद्यापारंगत, गणितज्ञ, ज्योतिषज्ञ असून या शास्त्रांत नवीन शोध लावण्याकडे याची प्रवृत्ति होती. हा कांहीं काळ मोगलसेनापति व माळव्याचा सुभेदार असून थोरल्या बाजीरावास याचें फार साहाय्य असे. हा मराठ्यांचा मित्र म्हणून प्रसिद्ध आहे.

**जयसिंह चालुक्य** (सु. इ. स. ५००)—१. चालुक्यांचा हा मूळपुरुष. चालुक्यांची पहिली राजधानी इंदुकांति. या घराण्यापैकीं दुसऱ्या पुलकेशीनें बदामी येथें राज्य स्थापून पश्चिम चालुक्य घराणें सुरू केलें. पुलकेशीचा भाऊ कुब्ज विष्णुवर्धन यानें यानंतर वेंगी येथें राज्य स्थापलें व पूर्व चालुक्य घराण्याची प्रतिष्ठापना केली.

२. पुलकेशीचा दुसरा भाऊ. यानें गुजराथेंत चालुक्य शाखा सुरू केली. याला धराश्रय असेंहि दुसरें नांव आहे. याचा काल इं. स. ६७१-६९२ असा देतात.

**जयसिंह परमार**—१. (१०५५-१०५९)—माळव्याच्या परमारांपैकीं भोजानंतर राजा. हा फार शूर होता, असें शिलालेखावरून समजतें. अगदीं थोडींच वर्षे हा गादीवर होता असें दिसतें.

२. (सु. १२६८)—दुसऱ्या जयवर्म्यानंतर माळव्याचा एक परमार राजा. जयसिंह चौहान यानें याचा बऱ्याच वेळां पराभव केला.

३. (सु. १३०८-१३४२)—माळव्याच्या दुसऱ्या भोजानंतरचा राजा. याच्या अमदानीच्या अखेरीस माळवा मुसलमानांच्या ताब्यांत गेला.

**जयसिंह, सिद्धराज** (१०९३-११४२)—सोळंखी वंशांतील कर्णराजाचा पुत्र व एक गुजराथचा राजा. हा सर्व गुजराथच्या राजांमध्यें शूर असल्याची प्रसिद्धि आहे. यानें माळवा, सौराष्ट्र, इ. प्रांत जिंकले. बर्बरादि जंगली लोकांना यानें वठणीस आणलें. प्रसिद्ध जैन पंडित हेमचंद्र याच्या दरबारीं होता. श्रीपाल, वर्धमान, सागरचंद्र, वगैरे अनेक विद्वानांना याचा आश्रय असे. याच्यावर कवींनीं पुष्कळ स्तुतिस्तोत्रें रचिलीं आहेत. बारा वर्षे हा माळव्याशीं झगडत होता. माळव्यावरील स्वारींतून परत येतांना त्यानें बऱ्याच राजकन्यांशीं लग्नें लाविलीं. सिद्धपुरास रुद्रमाळेशिवाय एक महावीर स्वामींचें देऊळहि त्यानें बांधिलें. तेथून तो सोमनाथ, गिरनार व सिंहपूर येथील यात्रा करून पट्टणास परतला. त्यानें पुष्कळ तळीं, विहिरी, मंदिरें बगीचे, सदावर्ते, ज्योतिष–न्याय–पुराणादिकांच्या अभ्यासासाठीं शाळा स्थापन केल्या. त्यानें चंडिका देवीचीं १०८ देवळें बांधिलीं.

**जयस्तंभ**—प्राचीन काळीं लोखंडाच्या व दगडाच्या खांबांवर मजकूर लिहून ते खांब उभे करण्याची चाल असे. या प्रकारचे स्तंभ हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं आहेत. ते कांहीं लोखंडाचे, कांहीं दगडाचे असून त्यांवर लेख आहेत. दिल्ली, प्रयाग, नेपाळ, बेसनगर, इ. ठिकाणीं हे स्तंभ आढळतील. अशोकाच्या आदेशांनीं अंकित असे स्तंभ ठिकठिकाणीं

दिसतात. दिल्लीस कुतुबमिनारजवळ जो लोहस्तंभ आहे तो इ. स. चवथ्या शतकांतील असून त्यावर दुसरा चंद्रगुप्त (३७९–४१३) याच्याबद्दल उल्लेख आहे. हा लोहस्तंभ इतक्या वर्षे उभा आहे, पण त्यास मुळींच गंज चढला नाहीं. धारलाहि ११ व्या शतकांतील एक स्तंभ आहे. भेलसाजवळचा गरुडस्तंभ हेलिओडोरस या विधर्मी राजानें वैष्णव धर्म स्वीकारल्याचा पुरावा आहे. चितोडचा जयस्तंभ प्रसिद्धच आहे.

**जयापीड कर्कोटक** (मृ. ७८२)— काश्मीरचा एक राजा व प्रख्यात पराक्रमी ललितादित्याचा नातू. यानें कनोज, नेपाळ, वगैरे प्रांत जिंकले होते. हा जसा शूर तसा विद्वान् व विद्येचा चाहता होता. याच्या पदरीं क्षीरस्वामी, उद्भट, वामन, इ. नामांकित पंडित होते.

**जयाप्पा शिंदे** (मृत्यु १७५५)— एक मराठा सरदार. राणोजी शिंद्याचा हा पुत्र. यास चार मुली व एक मुलगा होता. मुलाचें नांव जनकोजी (पाहा). सन १७५० मध्यें दिल्लीच्या बादशहाला पेशव्यांच्या तर्फेनें मराठ्यांची मदत देण्याचा यानें करार केला. यामुळें मराठ्यांचें वर्चस्व बादशहाच्या दरबारांत वाढलें असतें. परंतु हें मराठ्यांचें वर्चस्व सहन न होणारा एक पक्ष मोंगल दरबारांत उत्पन्न होऊन त्यांतून पुढें पानपतचा समरप्रसंग निर्माण झाला. सुरजमल्ल व मल्हारराव यांच्या भांडणांत हा पडल्यानें याचें व होळकरांचें वैमनस्य आलें. परंतु सुरजमल्लाकडून यानें ६० लक्ष रुपये होळकरांना देऊन त्यांच्यांत तह घडवून आणला. सन १७५१ त फर्रुखबादच्या लढाईत यानें रोहिल्यांचा पराभव केला. सन १७५५ मध्यें जोधपूरच्या रामसिंगास त्याचा भाऊ विजेसिंग याजविरुद्ध मदत करण्यास हा गेला असतां विजेसिंगानें यावर मारेकरी घालून याचा खून केला.

**जरतार**— वेदकालापासून जे धंदे हिंदुस्थानांत अस्तित्वांत आहेत त्यांपैकींच हा एक होय. याचा ऐतिहासिक पुरावा महाभारतकालापासून मिळतो. राजसूय यज्ञाच्या वेळीं जरतारी वेष धारण करणाऱ्यांचीं वर्णनें महाभारतांत आलीं आहेत. यावरून यासंबंधींचा व्यवसाय इतिहासाच्या पुराव्यानें ४,००० वर्षांपासून चालू आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

जर करण्याची विद्या हिंदुस्थानांतच निर्माण झाली असें पाश्चात्य विद्वान् देखील कबूल करतात. ही विद्या हिंदुस्थानामधून बाहेर पडून ती बाबिलोन, टायर, बगदाद, दमास्कस, सैप्रस, व्हेनिस या मार्गानें फ्रान्समध्यें गेली. म्हणजे आफ्रिका व युरोप या खंडांत तिचा रिघाव झाला.

मुसलमान बादशहा विलासी असल्यामुळें त्यांच्या अमदानींत जरतारीच्या धंद्याला चांगलेंच उत्तेजन मिळालें. त्या वेळीं लखनौ, दिल्ली, कानपूर, बऱ्हाणपूर, बीड, जालना, पैठण, येवलें, सालेम मदुरा, व मद्रास हीं उत्तर व दाक्षिण भारतांतील शहरें जरतारीच्या धंद्याबद्दल प्रसिद्ध होतीं.

पाश्चात्यांच्याकडे 'जुना करार', ईलियड व ओडेसी या ग्रंथांतून जरतारी कपड्यांचे उल्लेख आढळतात. ख्रि. पू. ८८४ मध्यें असीरियांत ही कला चांगली नांवारूपास आलेली होती. त्यानंतर तिचा रिघाव असुरांचा पराभव इराणी लोकांनीं केल्यामुळें तिकडे झाला. शिकंदरानें ज्या वेळीं आर्यावर्तावर चाल केली त्या वेळीं प्रतिकारार्थ सज्ज असलेले भारतीय राजे भरजरीच्या वेषांत असल्याचें त्याला आढळलें.

जरीमध्यें सलमा, झीग, गोरा हे प्रकार आहेत. पण वस्तुतः यास जर म्हणत नाहींत. ही जर सध्यां पाश्चिमेकडील फ्रान्स, इटली, जर्मनी, ऑस्ट्रिया, हंगेरी, अमेरिका, झेकोस्लाव्हिया, तुर्कस्तान, जपान व सिलोन या देशांतून येते.

आपल्याकडेहि खरी जर तयार करण्याचे कारखाने मुंबई, मद्रास, अहमदाबाद, औरंगाबाद, बऱ्हाणपूर, बनारस, येवलें, सुरत, पुणें व पैठण ह्या शहरीं आहेत. त्याचप्रमाणें दिल्ली, लखनौ, कानपूर, अमृतसर, सुरत, मुंबई, वगैरे ठिकाणीं खोट्या जरीची निर्मिति कारखानदार लोक करीत असतात.

**जरत्कारु**— भृगकुलोत्पन्न एक ऋषि. यास संतति नसल्यानें अधोगति प्राप्त झालेल्या पितरांस उद्धरण्यासाठीं यानें जगत्कारु नांवाच्याच वासुकीच्या बहिणीशीं लग्न केलें. याचाच पुत्र आस्तिक ऋषि होय.

**जरदाळू**— या फळास लॅटिनमध्यें प्रुनस आर्मेनिआका, इंग्रजींत आप्रिकट, अशीं नांवें आहेत. हें एक साधारण उंचीचें झाड असून याची पश्चिम हिमालयांत लागवड करतात. हें फळ मूळचें चीन देशांतील असावें असें कांहीं विद्वानांचें मत आहे.

बदामासारखा या झाडापासून डिंक निघतो. त्याला बाजारांत 'चेरि गम' म्हणतात. बियांपासून काढलेल्या स्वच्छ तेलाचा जाळण्याकरितां व खाण्याकरितां उपयोग होतो. युरोपियन लोक ताजा जरदाळूंचा मोरंबा करतात व सुके जरदाळू स्वयंपाकांत उपयोगास आणतात. अफगाणिस्तानांतून व आसपासच्या डोंगरांतून पुष्कळसा जरदाळू हिंदुस्थानांत येतो.

**जरासंध**— पुरुकुलोत्पन्न अजमीर राजाच्या वंशांतील उपरिचर वसु राजाचा पौत्र व बृहद्रथ राजाच्या दोन पुत्रांतला एक. याचा जन्म दोन मातांपासून दोन शकलानें होऊन तीं शकलें जरा राक्षसीनें सांधिलीं, म्हणून यास असें नांव पडलें. हा मगध देशाचा अधिपति असून याच्या राजधानीचें नांव गिरिव्रज होतें. याच्या दोन कन्या अस्ति व प्राप्ति कंसास दिल्या

होत्या. कंसास कृष्णानें मारल्यामुळें यानें सतरा वेळां कृष्णाशीं युद्ध केलें. परंतु तितक्या वेळां याचा पराभवच झाला. यानें शतावधि राजे युद्धांत जिंकून व पशुवत् बद्ध करून तुरुंगांत ठेवले होते. शतवर्षे पूर्ण झाल्यावर त्यांस रुद्रयाग करून हा बळी देणार होता. राजांस बद्ध होऊन ८६ वर्षें झालीं असतां त्यांनीं गुप्त-रूपानें आपणांस सोडविण्यासाठीं कृष्णाकडे संदेश पाठविला. त्यावरून कृष्ण भीम व अर्जुन यांस घेऊन मगध देशास गेला. तेथें जरासंधाचें भीमाशीं १४ दिवस युद्ध झाल्यावर भीमानें जरासंधास फाडलें. तथापि तो पुनः सांधला जाऊन युद्धास सज्ज झाला. याप्रमाणें बरेच वेळां झाल्यावर कृष्णानें सुचविल्याप्रमाणें भीमानें उजवा भाग डावीकडे व डावा उजवीकडे टाकून देतांच जरासंध मृत्यु पावला.

**जरासंधी गोंद**—रबर आणि राळ यांपासून तयार करण्यात येणारा एक प्रकारचा नवा गोंद. हा अतिशय पक्का, चिवट व टिकाऊ असतो. यास डी गम असें म्हणतात. एका पुलाची एक १२५ फुटांची लांकडी कमान केवळ हा गोंद वापरून तयार करण्यांत आली. या कमानीला खिळे वगैरे वापरावे लागले नाहींत.

**जरीपटका**—मराठ्यांचें भगव्या झेंड्याशिवाय जरीपटका म्हणून दुसरें एक निशाण होतें. तें राजाराम छत्रपतीच्या कारकीर्दींत प्रचारांत आलें असावें. जरीपटक्याबरोबर नौबत असे. तिला साहेबी नौबत म्हणत. राजाराम जिंजीस गेल्यावर तेथें त्यानें जें प्रधानमंडळ नेमिलें त्यांत संभाजी घोरपड्यास सेनापतीचें पद दिलें होतें; त्या वेळीं जरीपटका निशाण त्याला दिलें. पुढें पेशव्यांच्या हातीं सर्व कारभार आल्यावर त्यांच्या खास हुजरातींत जरीपटका व साहेबी नौबत आली. ज्या ज्या वेळीं मोहिमेवर जाण्याचा प्रसंग येई त्या त्या वेळीं लढाईंत हा जरीपटक्याचा हत्ती मराठ्यांच्या सैन्याच्या आघाडीस असे. त्याचें रक्षण करण्यासाठीं अत्यंत शूर सरदारांची नेमणूक होत असे. शत्रूनें तो हस्तगत केल्यास तो परत मिळविण्यासाठीं मराठे सेनापति समयीं प्राणहि देई. पटवर्धन, त्र्यंबकराव मामा पेठे, हरिपंत तात्या फडके, परशुरामभाऊ पटवर्धन, वगैरे सरदारांच्या हवालीं जरीपटका नेहमीं करण्यांत येई. प्रस्तुत हा मराठ्यांचा जरीपटका नेपाळांत राणीपूर येथें पेशव्यांची गादी जेथें दु. बाजीरावाच्या व नानासाहेब (धोंडोपंत) पेशव्याच्या कुटुंबानें स्थापन केली होती, तेथेंच आहे असें म्हणतात.

**जर्मन, एडवर्ड** (१८६२–१९३६)—हा एक इंग्रज संगीत गीत-लेखक होता. त्यानें संगीत नाटकें लिहिलीं तीं—दि एमेरल्ड आइल (१९०१); मेरी इंग्लंड (१९०२); ए प्रिन्सेस् ऑफ केमसिंग्टन् (१९०३); आणि टॉम जोन्स (१९०७) हीं होत. त्यानें पुष्कळ संगीत पदें रचलीं आहेत व तो स्वतःहि गवई होता. त्याला १९२८ मध्यें नाइट ही पदवी देण्यांत आली.

**जर्मन भाषा**—जर्मनी देशांतील लोक जी भाषा बोलतात तिला जर्मन भाषा असें म्हणतात व ती जगांतील निरनिराळ्या प्रदेशांमध्यें संख्येनें कांहीं कोटी लोकांमध्येंहि प्रचलित आहे.

या भाषेच्या इतिहासाचे मुख्य तीन कालविभाग पडतात: (१) प्राचीन उच्च जर्मन, सन ११०० पर्यंत; (२) मध्य उच्च जर्मन, सन ११०० पासून १५०० पर्यंत; (३) नवीन उच्च जर्मन, सन १५०० पासून आतांपर्यंत चालू. हे कालविभाग सामान्यतः जे इंग्रजी भाषेचे कालविभाग पाडण्यांत येतात त्यांच्याशीं जुळते आहेत. यांतील उच्च हा शब्द केवळ भौगोलिक स्थानदर्शक आहे. या भाषेच्या इतिहासाच्या आद्य कालामध्यें दक्षिण जर्मनीमध्यें ज्या बोली प्रचलित होत्या त्या पहिल्या महायुद्धापूर्वीच्या कालांत विशेष प्रचलित असल्यामुळे व तो प्रदेश सामान्यतः उंच पर्वतमय असल्यामुळें उच्च जर्मन हें अभिधान पावल्या, व उत्तरेकडील प्रदेश सखल असल्यामुळें त्यांस नीच जर्मन हें नांव मिळालें. वास्तविक या सर्व कालामध्यें नीच जर्मन व उच्च जर्मन या दोन्हीहि प्रकारच्या भाषा प्रचलित होत्या. परंतु या कालांत जें वाङ्मय तयार झालें तें बहुतेक उच्च जर्मन भाषांत तयार झाल्यामुळें त्या कालास त्या भाषेचें नांव मिळालें. या निरनिराळ्या बोलींतील भाषिक वैशिष्ट्यामुळें भाषाशास्त्रज्ञ निरनिराळ्या काळांतील वाङ्मय कोणत्या वर्गांतील आहे हें ओळखूं शकतात. त्याप्रमाणेंच आजच्या जर्मन शेतकऱ्याच्या भाषेवरून तो कोणत्या प्रांतांतला आहे हें ताबडतोब ओळखतां येतें. अर्थात् अर्वाचीन काळच्या सर्व ठिकाणच्या एकपद्धतीच्या शिक्षणामुळें अलीकडे हा निरनिराळ्या बोलींतील फरक सुशिक्षित जनतेंत कमी कमी होत चाललेला आहे व सध्यांची सामान्यतः संभाषणाची भाषा एकाच प्रकारची बनत आहे. परंतु ती अंतर्गत व दळणवळण कमी असलेल्या भागांतून अजूनहि आपणास भिन्न प्रकारची दृष्टीस पडते; व आजहि दूरदूरच्या प्रांतांतील दोन जर्मन एकत्र आले असतां त्यांचें बोलणें परस्परांस समजत नाहीं, अशी स्थिति आढळून येते. सध्यांच्या मुद्रणाच्या जर्मन भाषेंत फारसा फरक आढळत नाहीं, परंतु बोलण्यामध्यें अद्यापिहि कांहीं विद्वानांच्या भाषणांत अशा कांहीं लकबा आढळतात कीं, त्यांवरून ते कोणत्या प्रांतांतील असून कोणती बोली बोलतात, हें सहज आढळून येतें. जर्मनीचो एक भाषा होण्यास कारण होणारा महत्त्वाचा ग्रंथ म्हटला म्हणजे ल्यूथरचें बायबलचें भाषांतर होय (१५३४). या कालापासूनच नवीन उच्च जर्मन भाषा प्रचारांत आली असें समजण्यांत येतें. या ग्रंथाचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर झाल्यामुळें त्याच भाषेचा

स्वीकार लोक प्रसाराच्या दृष्टीनें करूं लागले. पहिलें जर्मन व्याकरण १५४० मध्यें लिहिलें गेलें. त्यानंतर कोश झाले व भाषेस स्थिरता आली.

**जर्मन वाङ्मय** —जर्मन वाङ्मयाच्या आरंभींच्या कालांत म्हणजे नवव्या शतकांत प्रथम आपणांस उच्च व नीच जर्मन बोलींमध्यें बायबलमधील इव्हँजलिस्टमधील कांहीं भागांचें पद्यात्मक भाषांतर दृष्टीस पडतें. दहाव्या शतकांतील कांहीं मंत्रात्मक पद्यांमध्यें तत्कालीन लोकांच्या धार्मिक समजुतींवर चांगला प्रकाश पडतो. परंतु जुन्या वाङ्मयांतील शूरकथा, पशुकथा, दंतकथा, वगैरेंचा पुढील ख्रिस्ती सांप्रदायिकांनीं बहुतेक लोप केला. बाराव्या व तेराव्या शतकांमध्यें जर्मन काव्याची प्रगति ख्रिस्ती मठ किंवा धार्मिक विद्यालयें यांच्या आश्रयानें न होतां राजघराणीं व अमीरउमरावांचे गड–किल्ले यांच्या आधारानें होऊं लागली. या कालांतील पहिला कवि म्हटला म्हणजे हाइनरिक फॉं वेल्डेके हा होय. यानें एनेट हें वीरकाव्य लिहिलें. यापेक्षां दुसरें एक प्रसिद्ध नांव म्हटलें म्हणजे आर्थर राजासंबंधींच्या दंतकथांवर पर्झिव्हल नांवाचें काव्य रचणारा वोल्फ्रम फॉं एस्चेनबाक याचें होय. अशाच तऱ्हेचीं काव्यें शार्लेमेन, अलेक्झांडर दि ग्रेट व ट्रोजन युद्धांतील वीर, वगैरेंवर तत्कालीन इतर कवींनीं रचलीं आहेत. याच वेळीं प्रसिद्ध जर्मन राष्ट्रकाव्यें नीबेलुंजेनलीड आणि गुड्रुन हीं रचण्यांत आलीं. जर्मन वीणागीतें रचण्यामध्यें प्रमुख कवीचें नांव घ्यावयाचें तर वाल्थेर फॉ डेर व्हेगेलवाइड याचें घेतां येईल. तेराव्या शतकामध्यें उपदेशात्मक काव्यें रचण्याची प्रथा सुरू झाली. ऐतिहासिक काव्यांतील आद्य ग्रंथ पाहूं गेले असतां आपणांस लिंबुर्ग क्रॉनिकल (१३३६–१३९४) हा प्रथम दृष्टीस पडतो. याच सुमारास नुर्नबर्ग, फ्रँकफुर्ट, स्ट्रासबुर्ग, मेन्झ, वगैरे शहरांमध्यें निरनिराळ्या कवींनीं आपले संघ स्थापन केलेले आढळतात. या संघांस मीस्टरसंगेर (कविसंघ) असें म्हणत. चौदाव्या व पंधराव्या शतकांतील उत्तम काव्य पाहूं गेलें असतां स्वित्झर्लंड देशांतील लोकांनीं ऑस्ट्रिया व बर्गंडी यांच्यावर जे विजय मिळविले त्यांचे पोवाडे गाणारीं हाल्बसुटर आणि वेइट वेबर यांनीं रचलेलीं काव्यें आपल्या दृष्टीस पडतात. याच सुमारास मुद्रणकलेचा शोध लागल्यामुळें एकंदर वाङ्मयाच्या प्रगतीस जोराची चालना मिळाली व त्यामुळें जर्मनीमध्यें १४७० ते १५०० या कालांतच हजारों पुस्तकें मुद्रित झालीं. याच वेळीं १४९८ मध्यें रेइनेके व्हॉस हें पशुमहाकाव्य व इतर अशाच प्रकारचे ग्रंथ प्रसिद्ध झाले.

सोळाव्या शतकामध्यें ल्यूथरनें बायबलचें भाषांतर केल्यापासून वाङ्मयामध्यें एका नव्या युगास सुरुवात झाली. या वेळीं सांप्रदायिक सुधारणेवर भर होता व त्यामुळें अनेक ग्रंथकारांनीं सांप्रदायिक सुधारणेसंबंधीं ग्रंथांची रचना केली. त्यांत अर्थात् मार्टिन ल्यूथर हा प्रमुख असून झ्विंगिल (१४८४–१५३१), सेबास्टिअन फ्रँक (१५००–१५४५ ?), मेलँक्थन (१४९७–१५६०), उलरिच फॉं हुटन (१४८८–१५२३), इत्यादि ग्रंथकार येतात. या वेळीं इतिहासग्रंथांची रचना अधिक विस्तृत प्रमाणावर होऊं लागली. या कालांतील इतिहासकार म्हटले म्हणजे फ्रांक व सेबास्टिअन मन्स्टर हे होत. याच वेळीं त्स्चूडी यानें स्वित्झर्लंडची बखर व अव्हेंटिनस यानें बव्हेरियाची बखर लिहिली. तत्कालीन छोट्या उमरावांच्या आयुष्यक्रमाचें चित्र पाहावयाचें असल्यास आपणांस तें गोट्झ फॉ बर्लिखिंगेन याच्या आत्मचरित्रांत पाहावयास मिळेल. या कालांतील कवींमध्यें हान्स सॅक्स (१४९४–१५७६, हा एक नूर्नबर्गचा मोची होता. परंतु मीस्टर सॅंगरमध्यें सर्वश्रेष्ठ होता) व जोहान फिशार्ट यांचीं नांवें प्रामुख्यानें आढळतात व ते तत्कालीन कवींत श्रेष्ठ होते. या कालांत वाङ्मयाचीहि बरीच प्रगति झालेली दृष्टीस पडते. वर उल्लेखिलेला हॅन्स सॅक्स, जेकब आयरर (मृ. १६०५) हे या शाखेंतील प्रमुख ग्रंथकार होत. यांखेरीज विद्वत्तापूर्ण ग्रंथरचना करणारांमध्यें आपणांस ल्यूथर, कॅमेरेरिअस, कॉर्नेलियस ॲग्रिप्पा, पॅरासेल्सस, कोपर्निकस (ज्योतिषी), लिओन्हार्ड फुख्स (वनस्पतिशास्त्रज्ञ व वैद्यकशास्त्रज्ञ), कॉनरॅड, गेस्नेर (प्राणिशास्त्री व अभिजात वाङ्मयाभ्यासक) आणि ॲग्रिकोला (खनिजज्ञ), इत्यादि पंडित दृष्टीस पडतात.

सतराव्या शतकाच्या आरंभीं वाङ्मयास ओहोटीच लागलेली दृष्टीस पडते. या कालाला जर्मन वाङ्मयांत अनुकरणाचा काल म्हणतात. या शतकामध्यें मार्टिन ऑपिट्झ (१५९७–१६३९) याच्या पुढारीपणाखालीं एका नवीन काव्यसंप्रदायाचा उदय झाला. त्यास सायलेशियन संप्रदाय असें म्हणतात. या संप्रदायामध्यें सायमन डाख (१६०५–१६५९), फॉ त्सेसेन (१६१९–१६८९), योहान रिस्ट (१६०७–१६६७) व विशेष म्हणजे पॉल फ्लेमिंग (१६०९–१६४०) यांचा अंतर्भाव होतो. जर्मन नाट्यवाङ्मयाचा जनक ॲंड्रिअस ग्रिफिअस (१६१६–१६६४) याचाहि अन्तर्भाव याच संप्रदायांत करण्यांत येतो. यानंतर दुसरा सायलेशियन संप्रदाय म्हणून एक वाङ्मयप्रकार सुरू झाला. याचे पुढारी हॉफमन फॉं हाफमन्सवाल्डो (१६१८–१६७९) आणि लोहेन्स्टेन (१६३५–१६८३) हे होते. यांनीं वाङ्मयामध्यें कृत्रिमतेचा अगदीं कळस केला. या दोनहि सायलेशियन वाङ्मयसंप्रदायांस तत्कालीन राजकवि कॅनिट्झ (१६५४–१६९९) आणि वेसेर (१६५४–१७२९) यांनीं व इतर अनेक कवींनीं आपला विरोधच दाखविला. याच कालांत जर्मनींतील सर्वश्रेष्ठ स्तोत्रकार गेरहार्ट (१६०६–१६७६) हा होऊन गेला.

तसेंच केप्लर ( १५७१–१६३१ ) हा महान् शास्त्रज्ञ, पुफेनडॉर्फ ( १६३२–१६९४ ) हा प्रकाशक, आणि याकोब बोहमे ( १५७५–१६२४ ), हेहि याच कालांत होऊन गेले.

अठराव्या शतकामध्यें हालेर ( १७०८–१७७७ ) व हागेडॉर्न ( १७०८–१७५४ ) यांनीं पुन्हां काव्याचा पुनरुद्धार केला. गाटस्चेड ( १७००–१७६६ ) याच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या सॅक्सन संप्रदायास जर्मन काव्यास फ्रेंच काव्याच्या धर्तीवर न्यावयाचें होतें. त्यामुळें या संप्रदायामध्यें व झुरिच येथील स्विस संप्रदायामध्यें बरीच वादावादी झाली. या स्विस संप्रदायाचें नेतृत्व बोडमेर आणि ब्रेटिंगेर यांच्याकडे होतें व त्यांच्यापुढें इंग्रजी कवींचा आदर्श होता. जर्मन काव्याच्या अभिजात कालास क्लॉपस्टॉक ( १७२४–१८०३ ) आणि वाइलंड ( १७३३–१८१३ ) यांच्या लेखनापासून होतो. परंतु जर्मन वाङ्मयास नवी दिशा खरोखर गॉटोल्ड एफ्राहिम लेसिंग ( १७२९–१७८१ ) यानें लावली. यानें एका नवीन टीकायुगास प्रारंभ केला व फ्रेंच वाङ्मयाच्या वर्चस्वास जोराचा धक्का दिला. लेसिंगनंतर हर्डर हा एक मोठा ग्रंथकार ( १७४४–१८०३ ) होऊन गेला व यानें जगांतील वाङ्मयावर बराच महत्त्वाचा परिणाम घडवून आणला. विंकेलमन ( १७१७–१७६८ ) याच्या प्राचीन शिल्पकलेसंबंधींच्या संशोधनामुळें कलेसंबंधींच्या नवीन ज्ञानाचा उदय झाला. तसेंच हेन याच्या प्राचीन वाङ्मयाच्या संशोधनामुळें जर्मनीमध्यें अर्वाचीन पांडित्याचा पायंडा पडला. गॉटिंजेन संप्रदायामध्यें लेनोरे व इतर चमत्कारिक पोवाडे व गीतें यांचा कर्ता गॉटफ्रेड ऑगबर्गर ( १७४८–१७९४ ) आणि व्हॉस ( १७५१–१८२६ ) हे प्रमुख होते. व्हॉसनें होमरच्या काव्याचें भाषांतर केलें होतें व लुइसि हें एक सुंदर काव्य रचलें होतें.

यानंतर जर्मनीमध्यें मोठा धामधुमीचा काळ गेला. या कालाचें चित्र आपणांस गटे ( १७४९–१८३२ ) याच्या 'वेर्टरचीं दुःखें' या ग्रंथामध्यें आढळतें. शिलरच्या ( १७५९–१८०५ ) रॉबेर या काव्यामध्यें या कालांतील खळबळ अगदीं पराकोटीला गेलेली दिसते. शिलर हा गटेचा मित्र व सहलेखक होता. याच वेळीं होऊन गेलेले ग्रंथकार ज़ीन पॉल रिचर ( १७६३–१८२५ ) आणि युंगस्टिलिंग ( १७४०–१८१७ ) यांचे ग्रंथ अगदीं स्वतंत्र व निराळ्या तऱ्हेचे आहेत. या कालांतील शास्त्रज्ञ पाहूं गेले असतां आपणांस मोझेस मेंडेलसॉन ( १७२९–१७८६ ), सौंदर्यशास्त्राचा जनक ए. जी. बौमगार्टन ( १७१४–१७६२ ), व्युत्पत्तिशास्त्रज्ञ अडेलुंग, शिक्षणशास्त्रज्ञ पेस्टॉलॉझ्झी आणि बेसडौ व ब्लुमेनबाख, यूलर, वेगा, हर्शेल, इत्यादि नांवें प्रामुख्यानें दृष्टीस पडतात. अध्यात्मशास्त्रज्ञांमध्यें आपल्यापुढें प्रथम इमान्युअल कांट व त्यानंतर फिख्टे ( १७६२–१८१४ ), हेगेल ( १७७०–१८३१ ), आणि शेलिंग ( १७७५–१८५४ ) यांचीं नांवें आढळतात.

या कालाच्या सुमारास लोकांची अभिरुचि अद्भुत वाङ्मयाकडे वळलेली दृष्टीस पडते. या तऱ्हेच्या वाङ्मयाच्या संप्रदायांत प्रामुख्यानें विशेषतः नोव्हॅलिस या नांवानें प्रसिद्ध असलेला हार्डेनबर्ग ( १७७२–१८०१ ), लुडविग टाएके ( १७७३–१९५३ ), ला मोट्टे फौके, क्लेमेन्स ब्रेंटानो, हॉफमन, म्युशियस वेर्नेर, फॉ क्लीस्ट, इत्यादि ग्रंथकारांनीं रचना केलेली दिसून येते. तसेंच प्रसिद्ध दोन श्लेगेल हेहि याच कालांत होऊन गेले. यांपैकीं ऑगस्ट विल्हेल्म ( १७६७–१८४५ ) यानें शेक्सपिअरच्या नाटकांचीं भाषांतरें केलीं असून तीं अद्यापिहि प्रसिद्ध आहेत.

यानंतर नेपोलियननें युरोपमध्यें जीं युद्धें केलीं व जर्मन देशावर आक्रमण केलें त्यामुळें त्या देशांत जी स्वदेशाभिमानाची लाट पसरली तीमुळें देशभक्तिपर वाङ्मय बरेंचसें प्रसिद्ध झालें. अशा तऱ्हेच्या ग्रंथकारांत अर्न्स्ट मॉरिट्झ अर्न्डट् ( १७६९–१८६० ) आणि थिओडोर कोर्नेर ( १७२१–१८१३ ) यांस अग्रस्थान देण्यांत येतें. याच वेळीं लुडविक उह्लंड ( १७८७–१८७२ ) यानें पोवाड्यांची रचना केली व फ्रेडरिक सकर्ट ( १७८९–१८६६ ) यानें वीणागीतें रचिलीं. याच सुमारास सन १८३० मध्यें फ्रान्समध्यें क्रांति झाली. तिचे पडसाद आपणांस तत्कालीन जर्मन वाङ्मयामध्येंहि उठलेले आढळतात व त्यामुळें बरेंचसें राजकीय व सामाजिक जहाल विचार व्यक्त करणारें वाङ्मय प्रसिद्ध झालेलें दृष्टीस पडतें. अशा तऱ्हेची रचना करणारांमध्यें आपणांस विशेषेंकरून लुडविग बोर्ने ( १७८६–१८३७ ) व हेनरिक हेन ( १७९९–१८५६ ) यांचीं नांवें आढळून येतात व त्यांच्या लेखनांत उत्कृष्ट प्रकारची वक्रोक्ति व करुणरसात्मक रचना दृष्टीस पडते. या संप्रदायांतील विशेष परिचित असा ग्रंथकार पाहूं गेलें असतां कार्ल गटझकौ ( १८११–१८७८ ) हा लोकप्रिय नाट्यकार व कादंबरीकार असल्याचें आपणांस आढळून येतें. तसेंच कादंबरीकारांमध्यें फ्रेटॅग, स्पाएल हागेन, हेअसे, आउरबाख, फॅनी लेवाल्ड, हेकलँडर, रूटर, जेन्सेस, स्टॉर्म, रोसेगेर, इत्यादि लेखकांची रचना आपल्या दृष्टीस पडते. नेबुर व थिओडोर मॉम्सेन यांनीं रोमचा इतिहास लिहिला. लिओपोल्ड रांके यानें पोपांच्या इतिहासाची रचना केली. यांखेरीज इतरहि कांहीं इतिहासकार होऊन गेले. वार्न हागेन, फॉ एन्से, पेर्ट्झ, डेव्हिड एकफ, स्ट्रौस, इत्यादिकांनीं चरित्रग्रंथ लिहिले. बौर, व्लीक व एवाल्ड हे सांप्रदायिक लेखक म्हणून

प्रसिद्ध आहेत. याकोब आणि विल्हेल्म या ग्रिम बंधूंनीं व्युत्पत्तिशास्त्राच्या अभ्यासास गति दिली आणि प्राचीन काव्यांचा अभ्यास करून एक नवीन दालनच उघडलें. व्युत्पत्तिशास्त्रज्ञांमध्यें आपणांस बॉप, पॉट, श्लेगेर, स्टेन्थाल, आणि कार्ल ब्रुगमान यांचीं नांवें विशेष प्रामुख्यानें आढळतात. सृष्टिशास्त्रज्ञांमध्यें ओकेन, बरमीस्टर, कारूस, कोट्टा, लिबिग, हेल्महोल्टझ, विरचौ, श्लेडेन, ग्रिसेबॅक, व्होग्ट, बेसेल, ब्रेहा, हेकेल, वॅस्टिअन, इत्यादि व्यक्ती आपल्या नजरेसमोर येतात. तत्त्ववेत्त्यांमध्यें शॉपेनहॉवर, फ्युअरबाख, रोझेन क्रॉंझ, लोटझे, कुनो मिशर, फॉं हार्टमन, निटझश्चे, इत्यादि विद्वान् प्रसिद्ध आहेत.

फ्रेंच व जर्मन यांच्यामध्यें जें मोठें युद्ध झालें त्यानंतरच्या कालांतील कादंबरीकार म्हटले म्हणजे एबेर्स, डाह्न, गॉटश्चाल विलब्रांट, पॉल लिंडौ, बॅरनेस फॉं सुटनेर, अन्झेन ग्रुबर, फ्रान्झॉस, साकेर मॅसॉक, क्लारा वीबेग, थॉमस मॅन, इत्यादि होत. अर्वाचीन महत्त्वाचे जर्मन नाटककार पाहूं गेलें असतां आपणांस सुडरमान, हौप्टमान, हालबे, फुलडा, आणि श्नीट्झर हे आढळतांत. तसेंच वीणागीतें लिहिण्यामुळें प्रसिद्धि पावलेले कवी म्हटले म्हणजे लिलि एन क्रॉन, डेहमेल, बुस्से, आणि अग्नीस मीगेल हे होत. पहिल्या महायुद्धामुळें जर्मनीच्या वाङ्मयांत विशेषसा खळ पडला नसून त्या देशांत वाङ्मयरचना जोरानें चालूच होती; परंतु दुसऱ्या महायुद्धाचा मात्र परिणाम बराच अनिष्ट झाला असावा असें वाटतें.

**जर्मनी**—युरोपमधील एक संयुक्त संस्थानी राष्ट्र. यालाच ऑस्ट्रिआ जोडण्यांत आल्यापासून 'ग्रेटर जर्मनी' (बृहज्जर्मनी) असेंहि म्हणत. क्षेत्रफळ १,८०,९८५ चौरस मैल. लो. सं. सुमारें ६ कोटी. युरोपच्या ऐन मध्य भागाचा बराच प्रदेश यानें व्यापला आहे. याला उत्तरेकडे सुमारें १२०० मैलाचा समुद्रकिनारा आहे. दुसऱ्या महायुद्धापूर्वी बाल्टिक समुद्रांतील पुष्कळ बेटांचा समावेश जर्मनींत झालेला असे. पूर्व प्रशिया हा विभाग पोलिश कॉरिडोरच्या पट्टयानें मुख्य देशापासून अलग झालेला असून साम्प्रांतहि स्वयंनिर्णयानें जर्मनींतच सामील झाला होता. १९३४ मध्यें नाझी पक्षाचें सरकार स्थापन झालें व जर्मनीची पुनर्घटना करण्यांत आली. १९१८ पासूनच स्टेट चर्च बंद करण्यांत आलें. निम्म्याहून अधिक लोक लुथेरिअन प्रॉटेस्टंट आहेत व बाकीचे बहुतेक कॅथॉलिक आहेत. जर्मनी मुख्यतः कृषिप्रधानच आहे. व शेतीची वाढ व जोपासना चांगली आहे. द्राक्षांचे मळेहि पुष्कळ ठिकाणीं आहेत. जंगलाची व्यवस्था व संशोधन शास्त्रीय तत्त्वांनुसार चालू आहे. गहूं, राय व इतर धान्यें, तसेंच बटाटे, साखरेचे बीट, तंबाखू, द्राक्षें व इतर फळें हीं मुख्य पिकें आहेत. उत्तर समुद्रांत मच्छीमारीचा धंदा मोठा आहे. कित्येक भागांत कोळसा विपुल आहे आणि कित्येकांत अनेक धातूंच्या खाणी आहेत. त्यामुळें कित्येक भागांतील मोठमोठीं शहरें उद्योगधंदे–कारखाने यांचीं केंद्रें झालीं होतीं. लोखंड व पोलाद यांचे कारखाने अनेक होते. सॅक्सनमध्यें विशेषतः कापूस, लोंकर वगैरेच्या विणकामाच्या गिरण्या होत्या. बर्लिनमध्यें नानाप्रकारचीं विद्युत्संबंधीं यंत्रें व उपकरणीं होत. रंगविषयक संशोधन व उत्पादन अत्यंत श्रेष्ठ असे. इतरहि नानाविध उद्योगधंदे व कारखाने महायुद्धापूर्वी देशभर विखुरले होते.

जर्मनींत सर्वांना सामान्य शिक्षण असे. ६ ते १४ पर्यंतच्या मुलांना शाळेंत जाण्याची सक्ती असे. १९३९ सालीं पन्नास हजारांवर सरकारी प्राथमिक शाळा होत्या व त्यांत पाऊण कोटी मुलें शिकत होतीं. उच्च व दुय्यम शिक्षणाच्या शाळा व मुलींसाठीं आणि हुषार विद्यार्थ्यांसाठीं स्वतंत्र शाळा होत्या. मुलींचीं हायस्कुलें ७५६ होतीं व मुलांचीं १,५२६ होतीं. विशिष्ट शाळांमध्यें २१ आंधळ्यांच्या, ६१ बहिऱ्यांच्या, व ११६ अपक्व मेंदूच्या मुलांसाठीं होत्या. १० चांगलीं सुसज्ज यांत्रिक विद्यालयें होतीं. दुसऱ्या महायुद्धापूर्वीं सबंध जर्मनींत २५ विद्यापीठें असून त्यांत सुमारें ४४ हजार विद्यार्थी शिकत होते. महायुद्धानंतर बऱ्याचशा शिक्षणसंस्था, गिरण्या, कारखाने, धंदे वगैरेप्रमाणेंच बंद पडल्या. नवीन घडी बसण्याची लवकर आशा नाहीं.

प्राचीन काळीं जर्मनींत रानटी लोकांचीच वस्ती होती व कित्येक शतकें 'जर्मनी' या नांवाला भौगोलिक विभागदर्शनाशिवाय दुसरा कांहींच अर्थ नव्हता. इ. स. पांचव्या शतकांत क्लोव्हिस राजानें हा प्रदेश जिंकला. व पुढें शार्लमेन राजानें सॅक्सन लोकांना जिंकून बराच प्रदेश ताब्यांत ठेवला. त्या वेळीं देशामध्यें शेंकडों लहानमोठे स्वतंत्र संस्थानिक–राजे आपापल्या मनाप्रमाणें सत्ता गाजवीत होते. पवित्र (होली) रोमन साम्राज्याची त्यांच्यावर नाममात्र अधिसत्ता होती. १७ व्या शतकांत ३० वर्षांच्या दीर्घकालीन युद्धानें या प्रदेशाची धूळधाण झाली होती. १८१५ ते १८६६ च्या दरम्यान जर्मन संयुक्त संस्थानांचा एक गट करण्यांत आला होता; परंतु पुढें उत्तर जर्मनींत झालेल्या नवीन गटांत तो विलीन झाला. मात्र यांत बव्हेरिआ व दक्षिण संस्थानें समाविष्ट झालीं नाहींत. १८७१ त प्रशियाचा राजा यानें जर्मन साम्राज्याची घटना व स्थापना केली. व आपण बादशहा झाला. यांत ऑस्ट्रियाशिवाय सर्व प्रदेश एकत्र आला होता.

१९१४ ते १८ च्या पहिल्या जागतिक महायुद्धानें जर्मनीची भरभराट एकदम थांबली व जर्मन साम्राज्य अगदीं विस्कळित

व विदीर्ण झालें. साम्राज्यांतील सर्व प्रदेश आफ्रिकेंतील वसाहतींसह आजूबाजूच्या प्रदेशांत विभागण्यांत आले. याप्रमाणें आफ्रिकन वसाहतींशिवाय २७,२५२ चौरस मैलांचा प्रदेश जर्मनींतून काढला गेला. या महायुद्धानंतर जर्मनीनें हळूहळू पुन्हां स्थिरस्थावर करण्यास सुरुवात केली. १९२३ पासून सुधारणाविषयक योजना सुरू झाल्या. लोकार्नो पॅक्ट घडून येऊन लीग ऑफ् नेशन्स (राष्ट्रसंघ) यांत जर्मनीस जागा मिळाली. १९२५ मध्यें हिंडेन्बर्गच्या हातीं सूत्रें गेलीं व युद्धखंडणीची योजना कांहीं काळ चालली. महायुद्धानंतरच्या या खंडणीमुळें व युद्धजन्य इतर नानाविध आपदांनीं देश गांजून गेला होता.

१९२९ ते १९३३ असा हा विपरीत काळ गेल्यावर हिटलरचा व त्याच्या सोशॅलिस्ट नाझींचा उदय झाला. हिटलरच्या हातीं सर्व सूत्रें गेलीं. आर्थिक सुधारणा, खंडणीची नाकारणी, ज्यू-विरोध, स्वराष्ट्रास अग्रस्थान प्राप्त करून घेण्याची महत्त्वाकांक्षा, वगैरेमुळें तो लोकप्रिय होऊन १९३८ मध्यें त्याच्या यशोवैभवाचा कळस झाला व त्यानें या वेळीं ऑस्ट्रिया पादाक्रांत करून जर्मनीस जोडून टाकला व जर्मनीचा ग्रेटर जर्मनी बनविला. परंतु कालचक्र फिरतच होतें. १९४२ पासून चाललेल्या महायुद्धांत कांहीं काळ जर्मनीची सरशी झाल्याचा भास झाला तरी अखेरीस जर्मनीचा पूर्ण निःपात होऊन जर्मनी चार राष्ट्रांच्या पूर्णतया अधीन झाला. त्याला शस्त्रशास्त्रविहीन करण्यांत आलें व अद्याप त्याच्या व्यवस्थेची, तहाची, वगैरे पूर्णता व्हावयाचीच आहे.

रशिया, अमेरिका, इंग्लंड आणि फ्रान्स या चार प्रधान राष्ट्रांच्या ताब्यांत तूर्त हा ठेवला आहे. एका बाजूस रशिया व दुसऱ्या बाजूस इतर राष्ट्रें यांच्यांत जर्मनीच्या राज्यकारभारासंबंधीं तंटे चाललेच आहेत.

**जर्व्हेस (कॅन्टरबरीचा)** (११५०-१२१०)—हा एक इंग्रज दैनिकवृत्तकार (क्रॉनिक्लर) असून त्याचें महत्त्वाचें पुस्तक 'क्रॉनिका' आहे. शिवाय त्यानें 'जेस्टा रेग्यून' आणि 'माप्पा मुंडी' हीं इंग्लंडांतील परगण्यांच्या पाहणीबद्दलचीं पुस्तकें लिहिलीं आहेत.

**जर्व्हेस** (मृ. १२१८)—हाहि एक इंग्रज दैनिकवृत्तकार असून प्रथम त्यानें बोलोन येथें कांहीं काळ कायदा शिकवण्याचें काम केलें आणि ४ था ऑटो बादशहा याच्याकडे नोकरी केली. त्याचा एकच महत्त्वाचा ग्रंथ उपलब्ध आहे तो 'ओटिआ इंपेरिआलिआ' होय. त्यांत भूगोल, सृष्टीचा इतिहास, लोकभ्रम, इंग्लंडचा इतिहास व इंग्लंडच्या राजांची माहिती, वगैरे विविध विषयांची माहिती दिली आहे.

**जर्सी**—हें अमेरिकन संयुक्त संस्थानांतील न्यू जर्सी या संस्थानांत हडसन नदीवर न्यू यॉर्कच्यासमोर वसलेलें शहर आहे. येथें मोठमोठाले कारखाने आहेत ते म्हणजे कांच, ओतीव जिन्नस, पोलादी जिन्नस, दारू, साखर, रासायनिक औषधें, घड्याळें, तमाखू आणि मातीचीं भांडीं यांचे होत. या शहराची लो. सं. ३,०१,१७३ आहे.

**जर्सी बेट**—हें इंग्लिश खाडीमधील ब्रिटिशांच्या मालकीच्या बेटांपैकीं सर्वांत मोठें आणि अत्यंत महत्त्वाचें बेट आहे. फ्रान्सच्या वायव्य किनाऱ्यापासून १५ मैल अंतरावर हें बेट असून त्याचें क्षे.फ. ४,४८७ चौ. मै. आहे. या बेटाचा किनारा अतिशय खडकाळ असून तेथें बरींच आखातें आणि बंदरें आहेत. त्यांपैकीं सेंट ऑबीन आणि सेंट हेलियर हीं मुख्य बंदरें आहेत. या बेटांतील प्रदेश सुपीक आणि अरण्यमय असून हवा सौम्य आणि आरोग्यकारक आहे. येथील मुख्य पीक गहूं आहे; तसेंच द्राक्षें, पीच, लिंबें, पिअर आणि इतर जातींचीं फळें, भाजीपाला आणि बटाटे येथें होतात. जर्सी बेटांतल्या विशिष्ट जातीच्या गाई फार प्रसिद्ध आहेत. येथील हलक्या वर्गांतील लोक जुनी नॉर्मन-फ्रेंच भाषा बोलतात, आणि वरिष्ठ वर्गाचे लोक आणि न्यायकोर्टें यांची भाषा फ्रेंच आहे. जर्सी बेटाचा कारभार इंग्लंडच्या राजानें नेमलेला गव्हर्नर आणि एक बेलीफ यांच्या हातीं असतो. जर्सी बेटांत एक कायदेमंडळ असून त्याला स्टेट्स म्हणतात. येथील मुख्य शहर सेंट हेलियर असून बेटाची लो. सं. ५०,४६२ आहे. (चॅनल बेटें पाहा).

**जलकुक्कुट**—(सीगल्). पाण्यांत किंवा प्रत्यक्ष पाण्यावर राहणारे हे पक्षी होत. यांचीं बोटें एकमेकांस पातळ पडद्यांनीं जोडलेलीं असल्यामुळें यांना पाण्यावर तरंगतां येतें. यांच्या बसावयाच्या जागा म्हणजे मासे धरण्याकरितां जाळीं बांधतां यावीं म्हणून पुरलेले उंच खांब, वाळूचे ढीग, मचव्यांचीं शिडें, तसेंच खडक दाखविण्याकरितां त्या ठिकाणीं बांधून ठेवलेले बोयरे (व्हा) या होत. उडत उडतच ते आपलें भक्ष्य मिळवितात. बोटींबरोबर बरेंच लांबपर्यंत उडत जातात. यांचें भक्ष्य पाण्यावर तरंगत असणारे मांसाचे किंवा अन्नाचे तुकडे, मेलेला किंवा मरू घातलेला मासा किंवा अशाच प्रकारचे घाणेरडे पदार्थ होत. जलकुक्कुटांना बुडी मारतां येत नाहीं. जल-कुक्कुटाच्या पंखाचा रंग करडा असतो व बाकीच्या अंगाचा व विशेषतः खालच्या बाजूस पांढरा असतो. शेपटीचा रंग काळसर असतो. याचे पाय व चोंच तांबडी असते. एकंदर दोन जातींचे जलकुक्कुट आढळतात. यांची वीण पाण्याजवळच उंच टेकड्या असतात तेथें होते व त्या ठिकाणच्या गवतांत ते अंडीं घालतात.

**जलगतिशास्त्र**—हायड्रोडायनॅमिक्स ही एक गतिशास्त्राची शाखा असून या शाखेंत द्रव पदार्थासंबंधीं विचार केलेला असतो. या शास्त्रांत द्रव पदार्थास प्रेरणा मिळाली असतां त्या प्रेरणांमुळें त्या द्रव पदार्थास जी गति मिळते त्या गतीसंबंधीं सिद्धान्त काढलेले असतात. या शास्त्रामध्यें व्यापक अर्थानें जलस्थितिशास्त्र व जलगतिशास्त्र या दोहोंचाहि अन्तर्भाव होतो. या शास्त्रांतील जो गणिताचा भाग आहे तो असा एक प्रमाण-द्रव गृहीत धरून त्यावर बसविलेला आहे कीं, तो द्रव अगदीं साधा असून त्याचे सर्व गुणधर्म सर्व स्थितींत स्थिर असतात, व त्यामुळेंच कांहीं गणितानें सिद्धान्त काढणें शक्य होतें. अर्थात् हें प्रमाण अथवा काल्पनिक द्रव व प्रत्यक्ष सृष्टीमध्यें आढळणारे द्रव पदार्थ यांमध्यें बरीच भिन्नता असते. उदा., हा प्रमाण-द्रव सर्वत्र एकसारखा सतत व सर्वत्र एक स्वरूपाचा असतो, असें गृहीत धराण्यांत येतें. तसेंच त्याचा कोणताहि भाग ज्या पात्राच्या पृष्ठभागानें मर्यादित असतो तो पृष्ठभाग त्या द्रवास गति मिळाली तरी सतत त्याच स्वरूपांत कायम राहतो व त्या द्रवाच्या आकारांत बदल झाला तरी त्याचें सातत्य भंग पावत नाहीं. प्रत्यक्ष द्रव पदार्थाची घटना अणुमय असते आणि त्यांतील अणूंच्या रचनेमध्यें शेजारच्या अणूंच्या योगानें एकसारखें परस्पर मिश्रण चालू असतें. तथापि प्रत्यक्ष द्रव पदार्थ व वरील काल्पनिक प्रमाण-द्रव पदार्थ यांमध्यें जरी भेद असला तरी प्रमाण-द्रवावरून काढलेले द्रवांच्या स्थितिगतीसंबंधीं नियम व त्यांच्या स्वरूपाविषयीं काढलेले सिद्धान्त सामान्यतः व्यवहारांतील द्रवांच्या बाबतींतहि बहुतेक पूर्णांशानें लागू पडतात. प्रमाण-द्रवाच्या आकाराला म्हणजे स्वरूपाला स्थितिस्थापकता अथवा लवचिकपणा नसतो; पण त्याच्या परिमाणाला स्थितिस्थापकता असते. म्हणजे विशिष्ट परिस्थितींत हा द्रव अदापनीय असतो; म्हणजे कितीहि त्यावर दाब घातला तरी दबत नाहीं. म्हणजे आकारानें कमी होत नाहीं. पण प्रत्यक्ष व्यवहारांत दाबला जात नाहीं असा कोणताच द्रव पदार्थ आढळत नाहीं, तर बहुतेक द्रव पदार्थ किंचित् दाबले जातात.

आवर्त व अनावर्त गति—जर एखादा गोलाकृति द्रव पदार्थ एकदम घन स्थितींत गेला तर त्यास आवर्तगति मिळते व ती त्याच्या अक्षाभोंवतीं असते. हिला अणुगति अथवा आवर्तगति म्हणतात. जर ही आवर्तगति त्या द्रवाच्या प्रत्येक बिंदूशीं शून्य असेल तर तिला अनावर्तगति म्हणतात. आवर्तगति असतांना त्या द्रवाच्या प्रत्येक बिंदूची गति एकाच व अक्षाच्या दिशेनेंच असेल अशा तऱ्हेच्या रेषा काढतां येतात. अशा रेषांस आवर्त बिन्दुमाला (व्हॉर्टेक्सफिलामेंट) म्हणतात. या बिन्दुमालाचें एक बंद वर्तुल असतें किंवा त्या द्रवाच्या सीमेपर्यंत जातात. हेल्महोल्टझ यानें या आवर्त बिन्दुमालेचें अस्तित्व असतें व त्यांच्या स्वरूपांत किंवा आकारांत बदल झाला तरी त्या बिन्दुमाला नेहमीं त्याच द्रवाच्या बिंदूंच्या बनलेल्या असतात हें सिद्ध केलें. तसेंच त्यानें ही गोष्टहि सिद्ध केली कीं, एखाद्या पूर्ण द्रवामध्यें आवर्तगति उत्पन्नहि होऊं शकत नाहीं किंवा नष्टहि करतां येत नाहीं.

**जलचरप्रदर्शन**—(अक्वेरियम). कांचेच्या मोठाल्या पेट्यांतून किंवा विशिष्ट भांड्यांतून पाण्यांतील प्राणी-वनस्पती त्यांच्या मूळच्या स्थितींतल्याप्रमाणें ज्या ठिकाणीं ठेवले असतात तें स्थान. ज्याप्रमाणें भूचर प्राणी प्राणिसंग्रहालयांत सर्व तऱ्हेनें पाहतां येतात त्याप्रमाणेंच अशा जलचरप्रदर्शनांत जलसृष्टीचें हुबेहूब दर्शन होतें. माशांचे असंख्य प्रकार पाहावयास मिळतात व समुद्राच्या पोटांतील पाषाण-वनस्पती देखील दिसतात. नेपल्स, प्लायमाउथ, न्यू यॉर्क, एडिंबर्ग या ठिकाणीं अशीं जलचरसंग्रहालयें आहेत. हिंदुस्थानांत मद्रास येथें असें एक प्रदर्शन असून मुंबईसहि तयार होत आहे.

**जलतरंग**—एक वाद्य. पंधरापासून बावीसपर्यंत एकांत एक बसते असून सबंध चळत होईल असे कांशाचे, पितळेचे किंवा चिनी मातीचे पेले असतात; त्यांत पाणी घालून त्यांवर अनुक्रमें छडी मारीत गेल्यास सा, रे, ग, म, प, ध, नी, असें सप्तक तयार होईल असे ते मांडतात; व हातांत दीड वीत लांबीच्या दोन कळकाच्या छड्या घेऊन आपल्या इच्छित रागाच्या स्वरानुरोधानें त्या छड्या त्या पेल्यावर मारून त्या रागाची गत अथवा चीज वाजविली जाते.

**जलधर केदार**—हा राग बिलावल थाटांतून निघतो. या रागांत गांधार स्वर वर्ज्य आहे. म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर पंचम व संवादी ऋषभ आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर मानितात. केदार रागांत पूर्वांगांत ऋषभ स्वर दुर्बल असतो व उत्तरांगांत धैवत व निषाद हे स्वर दुर्बल ठेवितात. तसें ह्या रागांत करीत नाहींत. तसेंच केदार रागांत तीव्र मध्यमाचा प्रयोग होतो, तसा ह्या जलधर केदार रागांत नाहीं. अशा प्रकारें हे दोनहि राग एकमेकांपासून भिन्न राहूं शकतात. हा एक केदार प्रकार आहे.

**जलपैगुरी**—बंगाल, राजशाही विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,०५० चौ. मै. व लो. सं. १०,८९,५१३.

प्राचीन काळीं या भागांत प्राग्ज्योतिष अथवा कामरूप नांवाचें राज्य होतें. पुढें बंगालमधील पाल राजांनीं हा भाग घेतला. पुढें सेन राजांच्या ताब्यांत हा भाग गेला. नीलध्वज नांवाच्या सेन राजानें कुचबिहार संस्थानांत असलेलें कामतापुर वसविलें. पुढें हा भाग विश्वसिंगानें स्थापन केलेल्या कोच

राज्याचा झाला. या राज्याचा नाश झाल्यावर पश्चिमेकडील प्रदेश मोंगल राज्यांत सामील झाला. इ. स. १७६५ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीकडे या भागाचा दिवाणी कारभार आला.

दुआर भाग भोतियांच्या हातांत पडला होता, व ते १८६५ सालीं भूतानशीं युद्ध झाल्यानंतर हा भाग ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आला. येथील शें. ७७ लोक बंगालीची पोटभाषा रंगपुरी अथवा राजवंशी बोलतात. चहाच्या मळ्यावर बाहेरील लोक फार येत असल्यामुळें हिंदी, मेक, खासी, मुंडारी, संताळी, वगैरे भाषाहि प्रचलित आहेत. या प्रदेशाचें मुख्य पीक तांदूळ हें आहे. चहाची लागवड इ. स. १७८४ मध्यें सुरू झाली. यंत्रें, लोखंडी पत्रे या भागांत बाहेरून येतात. तांदूळ, ताग, चहा, तंबाखू, वगैरे बाहेर जातात. या जिल्ह्याचे दोन विभाग आहेत. जलपैगुरी आणि अलीपुर. जलपैगुरी जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून जरी लहानसेंच आहे तरी भरभराटीस येत आहे. ईस्टर्न बंगाल रेल्वे येथून जाते. इ. स. १८८५ मध्यें येथें म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. येथें सर्व कचेऱ्या, तुरुंग, दवाखाने, शाळा वगैरे आहेत.

**जलंब**—वऱ्हाड, बुलढाणें जिल्हा, खामगांव तालुका. हें खेडेगांव खामगांवच्या उत्तरेस ८ मैलांवर असून जी. आय्. पी. रेल्वेचें एक स्टेशन आहे. येथूनच खामगांवास जाण्याकरितां रेल्वेचा फांटा आहे.

**जलभ्रामक**—( टर्बाइन ). पाण्यानें चालणारें एक चक्र यंत्र. पाण्याला वजन आहे व तें जेवढ्या उंचीवरून पडूं शकेल त्या मानानें पाण्याची शक्तिहि वाढत जाते. म्हणजे पाण्याचा आकार व वजन एकच असलें तरी उंचीमुळें तितक्याच वजनापासून अधिक शक्ति मिळत असते. यामुळें पाण्याच्या चक्रामध्यें त्याची उंची व मिळणारें पाणी ( quantity ) यांना योग्य असे जलचक्राचे आकार बदलत असतात. पाण्याची उंची १०० फुटांहून अधिक झाली म्हणजे 'पेल्टन व्हील' नांवाचें जलभ्रामक वापरतात. त्यामध्यें एका चाकाच्या परिघावर उथळ वाटल्या बसविलेल्या असतात. यावर पाणी पडत जाऊन चाक फिरत राहतें.

**जलरंग**— रंगाची पूड पाण्यांत मिसळून व ती चिकटून राहावी याकरितां थोडा मध, गोंद किंवा ग्लिसरीन वापरून चित्रें काढण्याच्या पद्धतीस जलरंगपद्धति म्हणतात. पूर्वेकडे विशेषतः चीन व जपान यांमध्यें हीच पद्धति विशेष प्रचलित आहे. पश्चिम युरोपमध्यें मात्र या कलेला स्वतंत्र असें स्थान अलीकडेच मिळालें आहे. अलेक्झांडर व त्याचा पुत्र जे. आर्. कोझेन्स यांनीं या कलेला स्वतंत्र महत्त्व आणून दिलें. यांच्यामागून थोमन गिरटिन ( १७७५–१८०२ ) हा या कलेंतील निष्णात कलाकार होऊन गेला. जे. एस्. कॉटमन हा कांहीं बाबतींत गिरटिन याची बरोबरी करूं शकत होता. पुढें जलरंगसंस्था ( वॉटरकलर सोसायटी ) स्थापन झाल्यापासून या कलेचें आसन पूर्णपणें स्थिर झालें. डेव्हिड कॉक्स व पीटर डि विंट यांचीं चित्रें जोमदार आहेत. त्या मानानें बर्केट फॉस्टर व ए. डब्ल्यू. हंट यांचीं चित्रें जरा अतिरंजितच वाटतात. परंतु १८८० च्या सुमारास या कलेस पुन्हां मूळचा जोम प्राप्त झाला. या कालच्या कलाकारांत ए. डब्ल्यू. रिच, विल्सन स्टिअर, सर. सी. जे. होल्मस, मॅक्कोल, सर डी. वाय्. कॅमेरॉन व डेव्हिड मुरहेड हे आढळतात. चित्रकला पाहा.

**जलवायु**—हवेच्या झोतानें चांगल्या प्रज्वलित केलेल्या कोळशाच्या राशींतून पाण्याची वाफ सोडून तयार केलेला ज्वलनाच्या उपयोगी पडणारा हा वायु आहे. उजेडासाठीं हा कज्जल वायूशीं मिश्रण करतात.

**जलविद्युद्यंत्रशास्त्र**—( हायड्रो-इलेक्ट्रिक इंजिनियरिंग ). पाण्याच्या शक्तीनें वीज उत्पन्न करण्याच्या शास्त्रास जलविद्युद्यंत्रशास्त्र असें म्हणतात. उंचावरून खालीं पडतांना पाण्याकडून यांत्रिक कार्य करून घेतां येतें. याकरितां एखाद्या डोंगरावरील एखाद्या तलावाचा उपयोग करून घेण्यांत येतो. या तलावास फक्त एक किंवा दोन दारें ठेवून बाकीच्या पाणी बाहेर येण्याच्या सर्व वाटा बंद करण्यांत येतात, व या तलावांत पावसाचें सर्व पाणी धरण्यांत येतें. जर या तलावाची उंची भोंवतालच्या जागेपासून ३,००० फूट असेल तर त्या तलावांतून बाहेरील जमिनीवर पडणारें पाणी दर पौंडास ३,००० फूट पौंड काम करूं शकेल. या तलावाच्या दारांत मोठाले नळ बसविण्यांत येतात व तेथून पाणी खालीं आणून खालीं चक्रें ( टर्बाइन ) बसविलेलीं असतात त्यांवर सोडतात. ह्या नळ्या शक्य तितक्या सरळ व उभ्या मार्गानें खालीं आणण्यांत येतात. यामुळें नळांतील घर्षणानें होणारी झीज कमी होते. नळांतून पाणी खालीं आल्यावर तें चक्रांवर पडतें व तीं चक्रें फिरूं लागतात. या कामांत पाण्याच्या एकंदर शक्तीपैकीं सुमारें ८५ टक्के शक्ति उपयोगांत येते. चक्रांतून बाहेर पडणारें पाणी एखाद्या नदीमध्यें वगैरे सोडून देण्यांत येतें. हीं चक्रें उलटसुलट विद्युत्प्रवाह उत्पन्न करणाऱ्या विद्युत्पादक यंत्रास जोडलेलीं असतात. त्यांपासून तीन उपप्रवाहांचा ( फेजेस ) सुमारें ३,००० व्होल्ट शक्तीचा विद्युत्प्रवाह उत्पन्न होतो. या प्रवाहाचें नंतर परिवर्तकांच्या साहाय्यानें ३००० व्होल्टचें १,००,००० शक्तीच्या प्रवाहांत रूपांतर करण्यांत येतें.

या उच्चशक्तीच्या प्रवाहाचे अग्रबिंदू विद्युद्वाहक मार्गास जोडलेले असतात. हा मार्ग म्हणजे उंच पोलादी खांबांवर

उभारलेल्या सहा तांब्याच्या किंवा अॅल्युमिनिअमच्या तारा असतात. या तारांच्या मार्गानें ज्या ठिकाणीं वीज पाहिजे असेल त्या ठिकाणीं ती पोंचवितां येते. त्या ठिकाणीं पुन्हां या प्रवाहाचे १,००,००० व्होल्टपासून पाहिजे तितक्या शक्तीच्या प्रवाहांत रूपांतर करण्यांत येतें.

या शक्तीच्या बाबतींत हिंदुस्थान हें जगांतील पहिल्या श्रेणीच्या राष्ट्रांच्या पंक्तीला बसूं शकेल अशी आशा वाटत आहे. टाटा कंपनीनें तीन मोठ्या योजना पार पाडल्या असून २,४६,००० अश्वशक्तीची साधारण नेहमींची तरतूद तिनें केलेली आहे. मुंबई, ठाणें, कल्याण व पुणें या ठिकाणीं विद्युच्छक्तीचा पुरवठा कंपनीनें केलेला आहे. म्हैसूर, काश्मीर, मद्रास, संयुक्त-प्रांत व पंजाब या भागांतून या शक्तीचा पुरवठा आहे.

मुंबई प्रांतांत पश्चिम घाटांत लोणावळा, नीरा–मुळा व आंध्र खोरें या ठिकाणीं जलविद्युच्छक्तीचीं केंद्रें स्थापन झालीं आहेत. कोल्हापूरजवळ राधानगरी येथें एक केंद्र तयार होत आहे व फार मोठ्या प्रमाणावर जलविद्युच्छाक्ति निर्माण करण्याची कोयना धरणाची योजना सरकारनें केली आहे. म्हैसूर संस्थानांतील कावेरीच्या पाण्यापासून तयार केलेली वीज कोलारच्या सोन्याच्या खाणी, बंगळूर व इतर शहरें यांना पुरविली जाते. पायकारा या नीलगिरि जिल्ह्यांतील नदीपासून तयार केलेली वीज कोईंबतूर, एरोड, नेगापट्टम् व मदुरा या ठिकाणीं जाते. मेट्टूर धरणामुळें तयार होणारी वीज सालेम, त्रिचनापल्ली, तंजावर, उत्तर अर्काट, चित्तूर, इ. ठिकाणांना मिळते. हें धरण जगांतील मोठ्या धरणांपैकीं एक आहे. तिनेवल्ली जिल्ह्यांत पापनाशम्‌जवळ थांबरूमणी नदीवरचें धरण तिनेवल्ली, मदुरा, टेंकसी, कोइलपट्टी, इ. गांवांना वीज देते. काश्मीरांत बारामुळा येथील झेलम नदीपासून काढलेली वीज श्रीनगरला चांगली उपयोगी पडते. पंजाबांत उहल नदीपासून तयार झालेली वीज नॉर्थ वेस्टर्न रेल्वे व इतर लाहोर, अमृतसर, लुधियाना, इ. अनेक शहरांना मिळते. संयुक्त प्रांतांत गंगा नदीवर अनेक धरणें बांधून प्रांतांतील शेतकी आणि उद्योगधंदे यांना जलविद्युच्छक्तीचा पुरवठा केला आहे.

**जलव्याल**— (हायड्रा) १. ग्रीक पुराणांत या जलव्यालाची एक कथा आहे. कालियाला कृष्णानें जसा मारला तसा हेऱ्याक्लीजनें याला मारला.

२. अनेकहस्तपाद पाहा. हे प्राणी बहुतकरून पांढरक्या रंगाचे असतात. हे शरीरानें फार बारीक असतात. कांचेच्या भांड्यांत गोडें पाणी घेतलें असतां सूक्ष्मदर्शक भिंगांतून हे प्राणी एखाद्या पाणवेलीस चिकटलेले दिसतात. शरीराचें एक टोंक पाणवेलीस चिकटलेलें असतें. दुसऱ्या टोंकाच्या मध्यभागीं याचें तोंड असतें. तोंडाभोंवतीं चार किंवा चाराहून जास्त भुजा (टेन्टॅकल्स) असतात. ह्या भुजा व शरीर या प्राण्यास गोगलगाईप्रमाणें लहान–मोठ्या करतां येतात. या प्राण्याचें शरीर अथवा कांड व भुजा या आंतून पोकळ असतात. म्हणून यास रिक्तमध्य किंवा रिक्तोदर प्राणी म्हणतात. सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिल्यास शरीर पेशींच्या दोन थरांचें झालें आहे असें दिसून येईल. तिसऱ्या प्रकारचे दंशपेशीहि मधून मधून आढळतात. यांतून दंशतीर किंवा सूत्र लांब फेंकला जाऊन तो परत घेतला जातो. या पेशी भुजांवर फार असतात. यांचा या प्राण्यांना अन्न मिळविण्यास व शत्रूपासून संरक्षण करण्यास फार उपयोग होतो.

आपलें शरीर व शाखा अथवा भुजा वाटेल तशा वांकवून कमी-जास्त लांब करून हा प्राणी आपलें भक्ष्य पकडतो. हा प्राणी जरी कोणत्या ना कोणत्या पदार्थास चिकटलेला असतो तरी यास स्थलांतर करतां येतें. या प्राण्यांची उत्पत्ति शरीरास किंवा कांडास त्यांच्यासारखेंच टेंगळें फुटून पुढें तें स्वतंत्र होऊन होतें, किंवा अंडीं तयार होऊन त्यावर कवच येतें. असें अंडें पाण्याच्या बुडाशीं चिखलांत पडून राहून उन्हाळ्याच्या आरंभीं नवीन चिमुकला प्राणी पुन्हां बाहेर येतो. जलव्यालाचा कोणताहि भाग तुटून पडला तरी तो पुन्हां येतो.

**जलव्याली वर्ग**—( हायड्रोझोआ ). कोएलांटराटा ( रिक्तमध्य प्राणी ) या जातीच्या प्राण्यांचा हा एक पोटवर्ग आहे. यामध्यें हायड्रॉइड जातीचे प्राणी व लहान जेलीफिश, कांहीं प्रवाल

कीटकांच्या जाती व इतर कांहीं नष्ट प्राण्यांच्या जाती मोडतात. हे बहुतेक प्राणी समुद्रांत आढळणारे आहेत. परंतु गोड्या पाण्यांत आढळणारा एक जलव्याल ( हायड्रा ) मात्र आहे. यांचे रंग त्यांच्या अंतस्त्वचेमध्यें असणाऱ्या कांहीं शैवालामुळें उत्पन्न होतात व हें वनस्पती आणि प्राणी यांच्या एकत्र अस्तित्वाचें फार सुंदर उदाहरण आहे.

**जलशास्त्र**—( हायड्रॉलिक्स ). एखाद्या पाण्याच्या सांच्यामध्यें असलेल्या पाण्याच्या अंतर्गत गतीचे दोन प्रकार असूं शकतात. एक स्थिर स्वरूपाची प्रवाहरूप गति—या गतीमध्यें एका विशिष्ट बिंदूची गति स्थिर व सतत स्वरूपाची असते. दुसरी भोंवऱ्यासारखी किंवा खळवळ पावणारी गति—या गतीमध्यें विशिष्ट बिंदूची गति कोणत्याहि निश्चित नियमास अनुसरून नसते. स्थिरगतीमध्यें ज्या दिशेनें पाण्याचा प्रवाह वाहत असेल त्या दिशेतील प्रवाहरेषा आपणास एखादा रंगाचा थेंब पाण्यांत टाकला असतां रंगीत पाण्याच्या गतीस अनुसरून ठरवितां येते, व अशा रीतीनें आपण एकसारखी रंगीत द्रव्याची धार प्रवाहांत टाकीत राहिल्यास रंगीत पाण्याची रेषा आपणास स्थिर असल्यासारखी भासेल. जर मूळ प्रवाहाच्या गतींत कांहीं फरक झाला तर ही रंगीत रेषा मोडून तो रंग सर्व द्रव्यामध्यें एकदम मिसळून जाईल. पाणी वाहत असलें म्हणजे त्याच्या गतीमुळें त्यामध्यें एक शक्ति निर्माण झालेली असते. तसेंच पाण्यामध्यें त्याच्या दाबाच्या योगानें व त्याच्या उंचीच्या योगानेंहि शक्ति निर्माण झालेली असते. ही शक्ति गत्यात्मक ( कायनेटिक ) शक्ति, भारशक्ति आणि संभाव्य ( पोटेन्शिअल ) शक्ति या स्वरूपांत असते. यावरून दर सेकंदास **ग** गतीनें जाणाऱ्या दर चौरस फुटास **द** पौंड दाब असणाऱ्या व **ड** फूट उंची असलेल्या पाण्याच्या ठिकाणीं $\frac{ग^2}{२गु} + \frac{द}{व} + ड$ फूट पौंड इतकी शक्ति असेल; येथें **व** हें पाण्याचें एक घनंफुटाचें वजन होय, व **गु** ही गुरुत्वाकर्षणशक्ति होय.

प्रवाहरेषात्मक गतीमध्यें जेव्हां भितीशीं होणाऱ्या घर्षणामुळें किंवा भोंवरा उत्पन्न होण्यामुळें शक्तीचा त्रास होत नसेल त्या वेळीं बर्नोलीच्या सिद्धान्ताप्रमाणें पाण्याच्या अंगीं असलेली ही शक्ति स्थिर असते व $\frac{ग^2}{२गु} + \frac{द}{व} + ड$ इतकी असते व ही प्रवाहाच्या एका बिंदूपासून दुसऱ्या बिंदूपर्यंत स्थिर असते. या सारणीवरून एखाद्या छिद्रांतून पाणी बाहेर पडत असेल तर त्याच्या गतीचें मापन करतां येतें, व वरील सिद्धान्त बिनचूक आहे ही गोष्ट आपणास कारंज्यांतून उडणाऱ्या पाण्याची धार त्या पाण्याच्या मूळ सांठ्याच्या पातळीइतक्या उंचीपर्यंत जवळजवळ उडत राहते या गोष्टीवरून दिसून येते.

पाणी वाहत असतांना त्याच्या पातळीची मूळ उगमापासून उंची थोडीफार कमी होत जाते. असें आपणांस दिसून येतें. याचीं कारणें दोन आहेत: १ ज्या पात्रांतून पाणी वाहत असतें त्या पात्राच्या सर्व बाजूंनीं पाण्याशीं घर्षण होत असतें. जेव्हां एखाद्या नळींतून पाणी वाहतें तेव्हां नळीच्या सर्व बाजूंनीं पाण्याशीं घर्षण होत असतें. २ जेव्हां पाण्याच्या प्रवाहाचा आकार एकदम मोठा करण्यांत येतो तेव्हां त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या भोंवऱ्यामुळें पाण्याच्या उंचीच्या मानांत फरक होतो. उदा., जेव्हां एखाद्या उघड्या पडद्यांतून पाणी नळामध्यें शिरत असतें किंवा तें नळाच्या वाकणामधून जात असतें त्या वेळीं घर्षण होत असतें व वाकणांतून गेल्यानंतर वाकणामध्यें जें संकोचन झालें असतें त्याचा सरळ नळांत आल्यावर पुनः विस्तार होतो. अशा रीतीनें घर्षणामुळें होणाऱ्या पातळीचा कमीपणा किती होत असतो ही गोष्ट जेव्हां एखाद्या तलावांतून लांबवरून पाणी आणून एखाद्या शक्तिगृहास किंवा जलाशयास विशिष्ट प्रमाणांत पुरवायचें असेल त्या वेळीं कोणत्या आकाराच्या नळ्या वापरणें अवश्य असतें ही गोष्ट ठरविण्याकरितां माहीत असणें अवश्य असतें.

जलयंत्रशास्त्र याचे मुख्यतः तीन वर्ग पाडण्यांत येतात: ज्या ठिकाणीं ( १ ) यारी, पाळणे, वगैरे यंत्रें चालविण्याकरितां मागेंपुढें हालणारे दट्टे वापरण्यांत येतात तो. (२) जलचक्रें वगैरे यंत्रें कमी उंचीच्या प्रवाहाच्या ठिकाणीं किंवा कमी गतीचीं यंत्रें चालविण्याकरितां उपयोग करण्यांत येतो तो. ( ३ ) जलगतिचक्रें- हीं जेथें पाण्याचा उगम उंच असेल आणि जलद गतीनें फिरणारीं यंत्रें वापरावयाचीं असतील आणि नियमित गतीनें चालवावयाचीं असतील तेथें. जेव्हां शहरांत वगैरे पाण्याचा पुरवठा करावयाचा असतो किंवा पाण्यानें चालणाऱ्या यंत्रास पाणी पुरवावयाचें असतें तेव्हां पाण्याच्या दाबाची विशेष आवश्यकता असते. अशा वेळीं मूळ पाण्याचा उगम जरी फार उंच नसला तरी तेथून नळानें आणलेलें आवश्यक तें पाणी वाफेच्या यंत्रानें चालणाऱ्या, पुढेंमागें हालणाऱ्या प्लंजर पंप नांवाच्या यंत्रानें ७०० ते १६०० पौंड दर चौरस इंचास दाबाच्या प्रमाणांत पाहिजे तेथें पुरवितां येतें. अशा पंपानें मिळणाऱ्या पाण्याचा पुरवठा सतत एका प्रमाणांत मिळूं शकत नाहीं. याकरितां ही दाबाची शक्ति संचायका( ॲक्युम्युलेटर ) मध्यें सांठवून ठेवावी लागते. हा संचायक पुरवठा करणारे नळ आणि पंप यांच्या दरम्यान बसविलेला असतो. हा संचायक म्हणजे एक उभें पंचपात्र असून त्यावर एक वजनें ठेवलेला दांडा

बसविलेला असतो, व त्याच्या क्षेत्रफळावरून वरील वजनें कमी-जास्त करून दाबाचें प्रमाण सारखें ठेवण्यांत येतें. युद्धनौकांमध्यें मोठमोठ्या तोफा वळविण्याकरितां व खालींवर करण्याकरितां जलदाबाचीं यंत्रें योजावीं लागतात. अशा ठिकाणीं बाष्पसंचायक वापरण्यांत येतो.

यारी—(क्रेन). जेथें उच्च दाबाचें पाणी मिळूं शकत असेल त्या ठिकाणीं त्याचा जलयारी चालविण्याकरितां उपयोग करण्यांत येतो. अशा याऱ्यांचा लहान लहान कारखान्यांपासून तर गोद्यांमध्यें २५० टन वजन उचलण्याकरितांहि उपयोग करण्यांत येतो.

पाळणे—(हायड्रॉलिक लिफ्ट). पाण्याच्या दाबाचा उपयोग विशेषतः पाळणे चालविण्याकरितां व वजनें उचलण्याकरितां विशेष करण्यांत येतो. कारण त्या ठिकाणीं सतत गतीची आवश्यकता नसते आणि गतिहि मंद असते. पाण्याच्या उच्चालकाचें सामान्य स्वरूप असें असतें कीं, जमिनीमध्यें एक पाण्यानें भरलेलें मोठें पंचपात्र अथवा हौद तयार करण्यांत येतो. याची खोली आपल्याला वजन जितक्या उंचीवर न्यावयाचें असेल त्यापेक्षां थोडी अधिक असते, व त्याच्यावर एका दांड्यास जोडून उच्चालकाचा पाळणा बसविलेला असतो. या दांड्याच्या खालीं दाबाचें पाणी सोडण्यांत येतें व त्यामुळें पाळणा वर उचलला जातो. जेव्हां असा पाळणा पुष्कळ उंच उचलावयाचा असेल व पाळण्याचें आणि दांड्याचें वजन बरेंच असेल तेव्हां त्या वजनाचें समतोलन करावें लागतें. याकरितां पाळण्याच्या वरच्या बाजूस कप्प्या व सांखळ्यांच्या साहाय्यानें वजनें टांगलेलीं असतात. दुसऱ्या एक तऱ्हेचा पाळणा टांगता पाळणा म्हणून असतो. त्याचा दांडा लहान असून त्याची हालण्याची मर्यादाहि कमी असते. अशा ठिकाणीं पाळण्याचें वजन टांगलेल्या वजनांनीं तोलून धरण्यांत येतें. अशा तऱ्हेच्या पाळण्याला खर्च कमी येतो व याच्याकरितां वरीलप्रमाणें फार खोल विहीर खणावी लागत नाहीं. यामध्यें सांखळ्या तुटण्याचा धोका असतो. परंतु त्यास चांगले रोधक (ब्रेक) लावले असतां हा धोका कमी होतो. याची गति दर सेकंदास दोन फुटांपासून सहा फुटांपर्यंत असते.

दाबयंत्रें—(हायड्रॉलिक प्रेस). यांचा उपयोग कापसाचे गठ्ठे बांधण्याकरितां करण्यांत येतो. त्याप्रमाणेंच लोखंडाचे पत्रे वांकविण्याकरितां किंवा जाड पत्रे ठोकून एकत्र सांधण्याकरितांहि याचा उपयोग करतात. या दाबामध्यें एका पंपाच्या साहाय्यानें पाणी आंत सोडण्यांत येतें. यामध्यें पंपाच्या दट्टया (प्लंजर)चें क्षेत्र जर द धरलें व दाबयंत्राच्या पंचपात्राचें क्षेत्र दा धरलें तर घर्षणानें होणारी हानि सोडून दिल्यास, श ही शक्ति दट्टयावर लावल्यास $\frac{श}{द}$ इतका दाब पंचपात्राखालीं उत्पन्न होतो, व त्यामुळें आपणास प्रत्यक्ष दाबाची शक्ति $\frac{शदा}{द}$ इतकी मिळते, आणि दा ज्या मानानें मोठा असेल त्या मानानें ती अधिकाधिक वाढूं शकते.

कापसाचे गठ्ठे बांधणारें सामान्य दाबयंत्र पुढें दिल्याप्रमाणें असतें. यामध्यें एक टेबलासारखा पृष्ठभाग असतो व त्याला एक दांडा व पंचपात्र हीं जोडलेलीं असतात व त्यास दोन ते चार खांबांचा आधार असतो. दांड्याचें टोंक या टेबलाला जोडलेलें असून तें टेबल सरकतें असल्यामुळें वर उचललें जातें. टेबल आणि दाबाचा वरचा भाग यांमध्यें कापूस भरण्यांत येतो व खालचें टेबल उचलून तो दाबण्यांत येतो.

पाणचाक्या—अशा पाणचाक्या फक्त जेथें शक्तीचें प्रमाण कमी असेल आणि उंची कमी असेल व सतत गतीची फारशी आवश्यकता नसेल अशा ठिकाणीं वापरण्यांत येतात. पाण्याचा पुरवठा व उंची यांत फरक पडल्यास पाणचाक्यांची कार्यक्षमता कमी होते. यांचा आकार आणि वजन शक्तीच्या मानानें अधिक असल्यामुळें त्यांची गतिहि मंद असते. यांचे पाणी येण्याच्या प्रकाराप्रमाणें तीन प्रकार असतातः १ यांमध्यें चाकाच्या उंच भागाजवळून पाणी बादलींत पडून चाकास गति मिळते. २ यांचा आकार वरीलप्रमाणेंच असून पाणी चाकाच्या आंसाजवळ पडत असतें. ३ जेथें पाण्याची उंची तीन फुटांहूनहि कमी असेल अशा ठिकाणींहि खालच्या बाजूनें पाणी वाहणाऱ्या चाक्या योजण्यांत येतात व त्या पाण्याच्या प्रवाहाच्या गतीमुळें फिरत असतात.

जलशोथ—(ईडमा). या रोगामध्यें कातडीच्या खालील पेशीमधून स्राव होऊं लागतो. अशा प्रकारचा स्राव हृदावरणापासून झालेला अनेकवार पाहण्यांत येतो. तसेंच मूत्रपिंडास विकृति झाली असतां मूत्रवाहिनींतून अशा प्रकारचा स्राव होऊं लागतो. तसेंच डोळ्याच्या खालच्या बाजूस, पाठीच्या खालच्या बाजूस व पायांतून असा स्राव झाल्याचेंहि पाहण्यांत येतें.

जलसंत्रास—(हायड्रोफोबिआ). कुत्र्याच्या किंवा पिसाळलेल्या प्राण्याच्या दंशापासून हा रोग उत्पन्न होतो. याचीं पूर्वलक्षणें म्हणजे अस्वस्थता वाटणें, चिडखोरपणा व तिरसटल्यासारखें होऊं लागणें, आणि अस्वाभाविक व पचण्यास कठिण असेल तें खाण्याची वासना होणें, हीं होत. जसजसा हा विकार वाढत जातो ततसतसे डोळे लाल, चकाकित व भयंकर दिसूं लागतात. दुसऱ्या दिवसानंतर या रोगानें एखादा कुत्रा पिसाळला असल्यास त्याच्या स्वतःच्या शरीरावरील व गात्रावरील ताबा अजीबात सुटतो. त्यास खूप तहान लागते, व पाणी पिणें

कठिण वाटूं लागतें व काल्पनिक वस्तूवर तो झडप घालूं लागतो. त्याच्या स्वभावाप्रमाणें तो कमीअधिक चेष्टा करूं लागतो. चौथ्या किंवा पांचव्या दिवशीं असा कुत्रा मरून जातो. याच्या विषाचा निरोगी कातडीवर परिणाम कांहीं होत नाहीं. परंतु एकदां त्याचा शरीरांत प्रवेश झाला म्हणजे त्याची वाढ थांबविण्यास अद्यापि कोणताहि रामबाण उपाय सांपडला नाहीं. याकरितां यावर उपाय म्हणजे या रोगाची वाढ होण्यास शक्यतों प्रतिबंध करणें हाच होय. याकरितां जेथें दंशाची जखम झाली असेल तेथून विषाचा प्रसार होऊं नये म्हणून त्यावर एखादा बंद बांधणें, तेथील विष शोषून घेणें, किंवा ती जखम भाजून काढणें हे होत. जर एखाद्यास पिसाळलेला कुत्रा चावला तर वरील उपाय योजून त्याशिवाय अशा रोग्यास पाश्चूर संस्थेंत नेऊन त्या विषाचा प्रसार होणार नाहीं, असें उपचार करून घेणें आवश्यक आहे. कुत्रा चावलेल्या रोग्यांपैकीं शेंकडा १५ स जलसंत्रासाचा हा रोग होतो. व पाश्चूर उपाय न केलेला रोगी हटकून मृत्यु पावतो.

**जलस्तंभ**—(वॉटर स्पाउट). जमिनीवर एखादी वावटळ उठून ती समुद्रावरून जातांना समुद्राचें पाणी वर उचलून घेतें व त्यामुळें असें विलक्षण दृश्य दृष्टीस पडतें. एखाद्या आंसाभोंवतीं जोरानें फिरणाऱ्या या वावटळींत मध्यभागीं केंद्रोत्सारी शक्तीमुळें थोडी पोकळी राहते व ती उभी वावटळ नसराळ्याप्रमाणें दिसते. ही पोकळी समुद्राचें पाणी वर ओढून घेते व त्या पाण्यालाहि वावटळीप्रमाणें वरवर वाटोळें फिरावें लागतें.

**जलस्तंभक**— (ब्रेकवॉटर). जेव्हां नैसर्गिक बंदरांत किंवा समुद्रकिनाऱ्यावर लाटांपासून संरक्षण मिळत नाहीं, तेव्हां अशी दगडाची भिंत उभारतात. हा बंधारा बांधण्यासाठीं भरती, वारे, जलशक्ति, इ. गोष्टी लक्षांत घ्याव्या लागतात. असे जलस्तंभक फ्रान्समध्यें शेरबुर्ग व मार्सैये; येथें ग्रेटब्रिटनमध्यें प्लायमाउथ, पोर्टलंड आणि होलिहेड येथें; ईजिप्तमध्यें अलेक्झांड्रियांत; व उत्तर अमेरिकेंत डेलावेरमध्यें आहेत. कांहीं लहान बंदरांतून तरते जलस्तंभकहि बांधलेले असतात.

**जलस्थितिशास्त्र**—(हायड्रोस्टॅटिक्स). हे प्रवाही पदार्थांच्या स्थितीचें शास्त्र आहे. एखाद्या पृष्ठभागाला लागून द्रव पदार्थ स्थिर राहिल्यास तो द्रव त्या पृष्ठाच्या लंबांतच दाब उत्पन्न करतो. द्रवाच्या दोन भागांमध्यें काल्पनिक पृष्ठभाग मानल्यास त्यावरहि वरीलप्रमाणें त्या पृष्ठाच्या लंबरेषेंतच दाब बसतो; द्रव दुभागण्यास किंवा कापण्यास बिलकुल अडथळा आणीत नाहीं. एखाद्या बिंदूशीं द्रवाच्या दाबाचा जोर :—स्थिर द्रवांतलि व बिंदूशीं एक लहान पृष्ठभाग घातला आहे असें समजा. ह्या पृष्ठानें विभागलेले द्रवाचे भाग एकमेकांवर सारखे विरुद्ध दिशेनें दाब आणतात. हे दाब पृष्ठाला लंब असतात. ही दाबशक्ति **द** नें दाखविल्यास व पृष्ठाचें क्षेत्र **क्ष** समजल्यास $\frac{द}{क्ष}$ हा सरासरी पृष्ठभागावरील दाब होईल. क्ष → ० शून्यापर्यंत पोंचविल्यास $\frac{द}{क्ष}$ ची सीमा व बिंदूशीं असणारा दाब दाखवील. हा दाब सर्व दिशास सारखाच असतो.

पास्कलचा सिद्धान्त— द्रवाला दिलेला दाब स्थिर द्रवांतील एखाद्या बिंदूशीं जर दाब वाढविला, तर स्थैर्य (स्थिरता) कायम ठेवण्याकरितां सर्व बिंदूंचा तेवढ्याच मानानें वाढला पाहिजे. ब्रामाच्या दाबयंत्रांत हेंच तत्त्व आहे. स्थिर, जड द्रवाचे सारख्या दाबाचे पृष्ठभाग एकाच पातळींत असतात व म्हणून द्रवाचा अबद्ध उघडा (फ्री) पृष्ठभाग क्षितिजाशीं समांतर असतो. स्थिर पाण्याच्या उघड्या (वरच्या) पृष्ठभागावर वातावरणाचा दाब असतो. ह्या पृष्ठापासून १० फूट खोलीवर दर चौरस फुटावर ६२३ पौंड दाब वाढतो. ३४ फूट खोलीवर वातावरणाच्या दाबाच्या दुप्पट दाब असतो. पारा जड असल्यामुळें पाऱ्यामध्यें ३० इंच अथवा ७०० मिलिमीटर खोलीवर वरच्याइतका दाब येतो. नेहमींच्या वायुभारमापक यंत्रामध्यें नळीच्या आंतल्या पाऱ्याच्या उघड्या पृष्ठावर दाब जवळजवळ शून्य असतो. वातावरणाशीं संबंध असलेल्या पृष्ठापासून नळीतील पाऱ्याची उंची वातावरणाच्या दाबाचें मान दाखवितें. जलयंत्रशास्त्रामध्यें ह्याच दाब अमुक फूट पाण्याचा माथा आहे, हें दाखवून देतो.

आर्किमिडीजचा सिद्धान्त—द्रवांत बुडलेल्या अथवा द्रवावर तरंगत असलेल्या पदार्थावरील दाबाचा विचार करावयाचा असल्यास वरील सिद्धान्ताचें महत्त्व फार आहे. पूर्णपणें द्रवांत बुडलेल्या अथवा अंशतः बुडलेल्या पदार्थावरचा दाब पदार्थानें जितका द्रव बाजूस सारला असेल तितक्या द्रवाच्या वजनाएवढा होतो व तो प्लवकेंद्रा(सेंटर ऑफ ब्वायन्सी)मधून काढलेल्या उभ्या लंबरेषेच्या दिशेनें परिणाम करतो. नाव पाण्यावर तरंगते व विमान (बलून) वर चढतें, याचें कारण बाजूला सारलेल्या द्रवाच्या वजनापेक्षां पदार्थाचें वजन कमी असेल तर पदार्थ वर येईल, बुडणार नाहीं हें तत्त्व होय विशिष्टगुरुत्वें आर्किमिडीजच्या सिद्धान्तानुसार काढतात.

**जलक्षेपण यंत्र**— (इन्जेक्टर). या यंत्रामध्यें एका नळीच्या बारीक तोंडांतून जो वाफेचा फवारा जोरानें बाहेर पडतो त्याच्या गतिशक्तीचा उपयोग दुसऱ्या तरल (फ्लुइड) पदार्थास गति मिळण्याकरितां करण्यांत येतो. अशा यंत्राचा एक उपयोग म्हणजे तापक (बॉयलर) यंत्रामध्यें पाणी भरणें हा

होय. यासाठीं निरनिराळीं जलक्षेपण यंत्रें असतात. तापकांतून पाणी बाहेर काढण्याऱ्या यंत्रास बहिःक्षेपण (इजेक्टर) यंत्र म्हणतात.

**जलालाबाद**—या नांवाचा अफगाणिस्तानांतील एक प्रांत असून त्याच नांवाचें एक शहरहि आहे. पेशावर व हें शहर यांमध्यें खायबर घाट आहे. ही जागा बाबरनें पसंत केली व त्यानें या ठिकाणीं कांहीं बगीचे लाविले. परंतु हें शहर अकबरानें इ. स. १५६० मध्यें वसविलें. काबूलच्या धर्तीवर बांधलेलें हें एक छोटेखानी शहर आहे. येथें एक मुख्य बाजार आहे. या शहराच्या इतिहासासंबंधीं विशेष गोष्ट म्हटली म्हणजे पहिल्या अफगाण युद्धाच्या वेळीं स. १८४१ नोव्हेंबरपासून इ. स. १८४२ एप्रिलपर्यंत सर रॉबर्ट सेल यानें या शहराचा केलेला बचाव होय. जलालाबादचा प्रांत सुमारें ८० मैल लांब व ३५ मैल रुंद आहे. लष्करी महत्त्वाच्या दृष्टीनें जलालाबाद हें अफगाणिस्तानांतील एक महत्त्वाचें ठाणें आहे. कारण येथून लाघमन व कुनार खोऱ्यांच्या प्रवेशद्वारांवर नजर ठेवितां येते व येथून खायबर घाटाच्या उत्तरेस चित्रळ व हिंदुस्थान यांचे रस्ते, तसेंच काबूल-पेशावर रस्ता यांच्यावर ताबा ठेवितां येतो. प्रांताची लो. सं. सु. सहा लाख असून शहराची सात-आठ हजार आहे.

**जलालुद्दीन मुहंमद बल्खी** (१२०७-१२७३)—एक तुर्की पंथसंस्थापक. जातीचा सुफी मुसलमान असून बल्खचा रहिवासी होता. पुढें हा आपल्या बापासह तुर्कस्तानांत गेला. त्या वेळीं सेलजुक घराण्यांतील अल्लाउद्दीन हा राजा होता. तो जलालुद्दीनाचा शिष्य बनला. जलालचा गुरु शम्सुद्दीन म्हणून एक अवलिया होता. जलालचा पट्ट शिष्य व लेखक हिसाम म्हणून होता. जलालनें गुरूच्या स्मरणार्थ हिंडणाऱ्या दरवेशांचा एक पंथ स्थापिला. या पंथाला याचेंच नांव पडलें. हा पंथ अद्यापिहि तुर्कस्तानांत आहे. जलाल हा कवि होता. त्याच्या काव्यग्रंथाचें नांव मस्नवी असून त्यांत निरनिराळे विषय कथा, पौराणिक गोष्टी, वगैरेंचा संग्रह आहे. त्यांत प्रामुख्यानें सुफी तत्त्वज्ञान सांगितलेलें आहे. त्याचा दुसरा ग्रंथ दिवाण (काव्यग्रंथ) म्हणून आहे.

**जलालुद्दीन सयुती** (मृ. १५०६)—एक मिसरी कवि. हा ईजिप्त देशचा रहिवासी. यानें लहान मोठे सुमारें ४०० ग्रंथ लिहिले. त्यांत 'लुब्ब-उल्-लुबाब' हा ग्रंथ नांवाजण्यासारखा आहे. हें पुस्तक म्हणजे एक प्रकारचा ग्रंथकार-कोश आहे. याशिवाय 'काशफुस-सलसल-उन्-वसफुज-झलझल' या नांवाचा एक ग्रंथ त्यानें केला आहे. त्यांत इ. स. ७१३-१५०० पर्यंत झालेल्या एकंदर भूकंपांची माहिती दिलेली आहे.

**जलोत्सारक**—(ड्रेन ट्रॅप). हा विशेषतः जेथें कांहीं वस्तू तापविण्यासाठीं वाफ वापरावी लागते त्या ठिकाणीं वापरतात. अशा ठिकाणीं वाफेचें पाणी बरेंच होत असतें. तें पाणी जागेवरच राहील तर वाफेला जागा राहणार नाहीं. त्यासाठीं एका बंद भांड्यांत बॉल कॉकसारखी योजना केलेली असते. ठरलेल्या उंचीइतकें पाणी त्या भांड्यांत जमलें म्हणजे वाफेमुळें कॉक उघडून आंतील पाणी बाहेर निघून जातें. या सर्व व्यवस्थेला जलोत्सारक असें म्हणतात.

**जलोदर**—उदर. शरीराच्या पेशीमध्यें शरीरांतील द्रवरस सांचला असतां हा रोग होतो. शरीराच्या ज्या निरनिराळ्या भागांत हा रोग होतो त्या भागांप्रमाणें त्यास निरनिराळीं नांवें देण्यांत येतात. उदाहरणार्थ, सामान्यतः शरीरांत होणाऱ्या या रोगास जलत्वक् (अनासर्का) म्हणतात. जठरांत होणाऱ्या या रोगास उदर (असायटिस) असें म्हणतात. फुप्फुसांत होणाऱ्या रोगास वक्षोदक (हायड्रोथोरॅक्स) असें म्हणतात. व मेंदूंत होणाऱ्या रोगास जलशीर्ष (हायड्रोसेफॅलस) म्हणतात. हा रोग होण्याचें सामान्य कारण हृद्रोग होय. मूत्राशय किंवा यकृत् यास विकार झाला असतांहि हा रोग होतो.

**जलोदरारि**—एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें पिंपळी, मिरें, ताम्र, हळद व जयपाळाचें बीं हीं असून त्रिधारी निवडुंगाच्या भावना दिल्या असतात.

हें औषध अतिशय तीव्र रेचक आहे. पोट मोठें होणें, पोटांत पाणी सांठणें, पायाला सूज असणें, यकृत् व पान्थरी वाढणें, लघवीस कमी होणें, शौचाला न होणें, इत्यादि विकारांवर हें औषध देण्यांचा प्रघात आहे. जलोदरावर हें एक चांगल्यापैकीं औषध आहे. हें २ ते ६ गुंजा गरम पाणी किंवा दूध याबरोबर देतात.

**जलोद्धरण**—(साल्व्हेज). एखादें गलबत बुडत असतां किंवा त्याचा नाश होत असतां त्या गलबताचें, त्यावरील मालाचें किंवा मनुष्याचें संरक्षण करणें, किंवा एखादें गलबत समुद्रावर शत्रूपासून पकडून आणणें या गोष्टीस जलोद्धरण म्हणतात. तसेंच हें काम करीत असतां जे श्रम पडतात त्याबद्दल मिळावयाच्या बक्षिसासहि हाच शब्द लावतात. अशा तऱ्हेनें संरक्षण केलेल्या मालाची किंवा बक्षिसाची वांटणी पुढें दिल्याप्रमाणें करण्यांत येते. यापैकीं बराचसा भाग त्या गलबताकडून हें कार्य होतें त्या गलबताच्या मालकास देण्यांत येतो. कारण या कामांत बराच धोका व नुकसान होण्याचा संभव असतो. यानंतर गलबताच्या मुख्य अधिकाऱ्यास कांहीं विभाग मिळतो; कारण त्याच्या देखरेखीखालीं सर्व काम होतें व त्या सर्वांची जबाबदारी त्याच्यावर असते. यानंतर गलबतावरील

इतर अधिकारी व खलाशी यांची पाळी येते. सामान्यतः ही वांटणी श्रम आणि जबाबदारी यांच्या प्रमाणांत करण्यात येते. मात्र हें काम करण्याची जबाबदारी कायद्यानें ज्या लोकांवर असतें त्यांस हें बक्षीस मिळत नाहीं. हें बक्षीस सोडून देण्याचा करारहि कायदेशीर मानला जात नाहीं.

**जलोपचार**— (हायड्रोपथी). शुद्ध पाण्याचा शरीराच्या बाहेरून व आंतून उपयोग करून रोग बरे करण्याची ही एक पद्धति आहे. या पद्धतीचा पुरस्कार प्रसिद्ध ग्रीक वैद्य हिपोक्रॅटीस यानें केला होता. तिचें पुनरुज्जीवन सायलेशियामधील व्हिन्सेन्झ प्रीसनिट्झ यानें १८२९ मध्यें केलें. १८४२ मध्यें लंडन येथें एक जलचिकित्सा मंडळ स्थापन करण्यांत आलें. व यानंतर या चिकित्सा-पद्धतीचा प्रसार सर्वत्र झालेला दृष्टीस पडतो. ऊन आणि थंड पाण्याचीं स्नानें, थंड पट्ट्या व वाफारे हे बाह्योपचार असून आंतरोपचारांत ऊन आणि थंड पाणी पोटांत घेणें या गोष्टी येतात. ताप कमी करणें, वेदना शमविणें, सूज उतरविणें, वगैरे कामीं इतर वैद्यकीय उपचारांबरोबर या पद्धतींतील उपचारांचाहि चांगला उपयोग होतो.

**जव**—या झाडास लॅटिनमध्यें हॉर्डिअम व्हलगारे, इंग्रजींत बार्ली, संस्कृतमध्यें सक्तु, हिंदींत सत्तु, इत्यादि नांवें आहेत.

हें २ ते ३ फूट लांबीचें तृणधान्य पृथ्वीवरील समशीतोष्ण भागांत होतें. हिंदुस्थानांत हें झाड सपाटीच्या प्रदेशांत, त्याचप्रमाणें समुद्रसपाटीपासून १४,००० फूट उंचीच्या भागापर्यंत सांपडतें.

ऋग्वेदादि ग्रंथांत जवाचा उल्लेख आहे. यावरून फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत जवाची लागवड होत आहे हें सिद्ध होतें. सालोमनच्या वेळीं (इ. स. १०१५) जव हा महत्त्वाचा खाद्य पदार्थ होता असें बायबलावरून दिसतें. इंद्राला 'जवाचें पीक फळास आणणारा ईश्वर' असें म्हटलें आहे, व जन्म, विवाह आणि मृत्यु यांसंबंधींच्या धार्मिक विधींत जवाचा उपयोग हिंदू लोकांत करतात. 'ऐने-ई-अकबरी'त जव हें अफगाणिस्तान व काश्मीर येथील महत्त्वाचें पीक होय असें म्हटलें आहे.

जवाच्या भाकरी अथवा चपात्या करून खातात. हिंदुस्थानांतील पुष्कळ भागांत जवापासून दारू तयार करतात. त्याचप्रमाणें घोड्यांना व गुरांना घांसदाणा म्हणून जव देतात. औषधांत जवाचा फार उपयोग होतो. तें एक पित्ताची जळजळ किंवा सूज कमी करणारें (शामक) औषध आहे. रोग्यांना तें पथ्य म्हणून देतात.

**जवस**—[लॅटिन-लिनम् उसिटा टिसिमम्]. या पिकाची लागवड हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून होत आहे. हिंदुस्थानांत हें पीक फक्त बियांकरितां काढतात. आयर्लंड, बेल्जियम, रशिया, अमेरिका, वगैरे ठिकाणीं हें पीक याच्या देंठापासून निघणाऱ्या वाखाकरितां व बियांकरितां करतात. याच्या वाखापासून केलेला कपडा फारच मौल्यवान् व टिकाऊ असतो. या कपड्यास लिनन क्लॉथ असें म्हणतात.

सर्व हिंदुस्थानांत दरवर्षीं सरासरीनें तीस लक्ष एकरांवर क्षेत्र जवसाखालीं असतें. बियाचें तेल काढितात, पोटीस करितात व चटणी करून खातात. याची पेंड गुरांस खावयास घालतात; ती फार पौष्टिक असते.

**जवसाचें तेल**—(लिन्सीड ऑइल). जवसाच्या बियांपासून काढलेलें तेल हवेंत घट्ट होऊन रोगणासारखें तयार होतें. रंग, रोगण, शाई, 'लिनोलियम' कापड, इ. गोष्टी कच्च्या किंवा उकळलेल्या तेलापासून होतात. भाजलेल्या जागीं लावण्यासाठीं जें 'कॅरॉन' तेल असतें तें चुन्याची निवळी मिसळून करतात. गुरांस जुलाबासाठीं हें तेल पाजतात. वऱ्हाडकडे हें तेल स्वयंपाकांत वापरतात.

**जवादि मांजर**—हा एक मांसाहारी सस्तन प्राणी. आफ्रिका

व दक्षिण आशिया खंडांत आढळतो. याच्या वृषणग्रंथीमध्यें कस्तूरीसारखा एक सुगंधी पदार्थ जमा होतो. याचा आकार कोल्ह्याएवढा असतो. परंतु आशिया खंडामध्यें हे मांजराएवढे असतात. यांच्या कस्तूरीचा वास फार उग्र व मादक असतो. परंतु ती तेल वगैरे द्रव्यांत मिसळल्यास त्यास आल्हादकारक सुवास येतो.

**जवानबख्त मिर्झा**—पहिला (१७४९-१७८८)— हा शहाअलमे बादशहाचा वडील पुत्र. याला पानपतचें युद्ध झाल्यानंतर अहमदशहा अबदालीनें मोंगली साम्राज्याचा राजप्रतिनिधि नेमिलें होतें. त्यानें हा कारभार आपला बाप पुनः गादीवर स्थानापन्न होईपर्यंत (१७७१) चालविला. पुढें याचें व याच्या बापाचें न पटल्यानें हा दिल्लीहून लखनौस पळून गेला (१७८४). तेथें वॉरन हेस्टिंग्ज कंपनीच्या कांहीं कामाकरितां आला होता. जवानबख्त हा हेस्टिंग्जकडे गेला व त्याच्याबरोबर पुढें बनारसला कायमचा जाऊन राहिला. हेस्टिंग्जनें

वझिराकडून खटपट करवून याला दरसाल पांच लाख रु. ची नेमणूक करवून दिली. हा बनारस येथेंच मेला. याची कबर तेथेंच आहे. यानें केलेला 'बयाझ इनायते मुर्शिदझादा' नांवाचा एक ग्रंथ ब्रिटिश म्यूझिअम ( इंडिया हाउस ) मध्यें आहे.

दुसरा ( मृ. १८८४ )—दिल्लीचा शेवटचा बादशहा बहादुरशहा याचा सर्वांत धाकटा मुलगा होय. याला आपल्या बापाबरोबरच रंगून येथें राजकीय कैदी म्हणून ठेवण्यांत आलें होतें (१८५८). हा मरेपर्यंत तेथेंच होता. याची बेगम इमानी हिला इंग्रज सरकार दरमहा २५० रु. पोलिटिकल पेन्शन देत असे.

**जवाहीरमल्ल जाट** ( मृ. १७६८ )—यास जवाहीरसिंग असेंहि म्हणत. हा भरतपुरच्या सुरजमल्ल जाटाचा मुलगा. राज्यकारभारांत व युद्धकलांत निपुण होता. सन १७६३ मध्यें नजीबखानानें याचा बाप सुरजमल्ल यास मल्हाररावाच्या साहाय्यानें ठार केलें. त्याबद्दलचा सूड घेण्यासाठीं म्हणून यानें नजीबखानास दिल्लींत कोंडून त्याचा वध केला व आपल्या बापाच्या खुनाचा बदला घेतला. पुढें यानें अनेक युद्धें करून आपलें राज्य वाढवलें. मराठ्यांचीं ठाणीं उठवून नर्मदेपावेतों येण्याचा याचा बेत होता. जयपुरच्या माधवसिंगास आपल्या बाजूस वळवण्याचे याचे बेत निष्फळ ठरून उलट यालाच माधवसिंगाबरोबर जयपुरहद्दींत मावंदा येथें लढाई यावी लागली; पण तींत याचा विजय झाला. हा सन १७६८ मध्यें मारला गेला असावा.

**जव्हार**—मुंबई इलाख्यांत, ठाणें जिल्ह्यांत हें लहानसें संस्थान आहे. याचें क्षे. फ. ३०८ चौ. मै. व उत्पन्न ५½ लाख रु. आहे. लो. सं. ६५,१२६. पूर्वी या प्रदेशासच कोळवण म्हणत असत. संस्थानचा बहुतेक प्रदेश एक हजार फूट उंचीवरील सह्याद्रीचें पठार असून तो सर्वत्र टेकड्या, डोंगर आणि बारीकसारीक नाले व नद्या यांनीं व अरण्यानें व्याप्त आहे. संस्थानांत माळमाड कर्यात, हवेली व गंजाड या नांवाचे तीन महाल आहेत. खुद्द जव्हार येथें पाण्याचा तुटवडा पडे. त्यामुळें सूर्या नदीच्या पाण्याचा पुरवठा शहरास केला आहे. संस्थानची हवा मलेरियाची व तापसराईची आहे. येथें सालिना १२० इंचांपर्यंत पाऊस पडतो. बांधकामास लागणारा दगड विपुल आढळतो. लोकसंख्येपैकीं शें. ८४ वन्य जातींचे लोक (वारली, ठाकूर, काथोडी, वगैरे ) असून बाकीचे कोळी-कुणबी व इतर लोक आहेत. वारली, ठाकूर, वगैरे लोक गरीब असून शेती व मजुरी यांवर त्यांचा निर्वाह होतो. संस्थानिक हे महादेव कोळी जातीचे असल्यानें महादेव कोळी हे आपल्यास राजकोळी म्हणवितात.

मुख्य पीक, भात, नाचणी, व ताग असून सरकार आपल्या हुकमतीखालीं तंबाखूचा पेरा करवितें व पुढें ठराविक भावानें तंबाखू विकत घेतें.

मुसलमानी अमल ( दक्षिणेंत ) होण्यापूर्वी उत्तर कोंकणचा बराच भाग कोळी व वारली जहागिरदारांच्या ताब्यांत होता. जव्हार येथें पूर्वी वारली राजा होता. पापेरा अथवा जयबा नांवाचा एक कोळी थळघाटाजवळ मुकणें या गांवीं एक गढीबंद जमीनदार होता. तो एकदां पिंप्री येथें देवीच्या दर्शनास गेला असतां येथील पांच कोळी साधूंनीं त्याला राजा होशील असा आशीर्वाद दिला. त्यावर जयबानें कोळी लोक जमवून पेठ, धरमपूर, हीं गांवें काबीज करून काठेवाडांत घुसून तो तिकडे सात वर्षें राहिला. नंतर परत येऊन जव्हार येथें गेला व तेथील वारली राजास त्यानें बैलाच्या कातड्यानें व्यापली जाईल इतकी जमीन मागितली. ती राजानें कबूल केल्यावर त्यानें कातड्याच्या अगदीं बारीक तांती काढून त्यांच्या मोजणींत राजाचें सारें राज्य घेतलें व त्याला जव्हारपासून ६ कोसांवरील गंभीरगड व त्याच्या भोंवतालचा थोडासा प्रदेश जहागिरीदाखल दिला.

जयबाला दोन मुलें नेमशहा व होळकरराव या नांवाचीं होतीं. पैकीं नेमशहा हा जयबाच्या मागें राजा झाला.

राजे यशवंतराव ऊर्फ पतंगशहा विक्रमशहा हे आज संस्थानाधिपति आहेत. यांचा जन्म स. १९१७ सालीं झाला. यांचें शिक्षण विलायतेस झालें असून यांनीं राज्यकारभाराचेंहि प्रत्यक्ष शिक्षण घेतलें आहे. १९३८ सालीं यांना राज्याचे अधिकार मिळाले. संस्थानला न्यायमनसुब्याचे, दिवाणी व फौजदारी सर्व हक्क आहेत. संस्थानांत शिक्षण मोफत आहे. १९४८ सालीं हें संस्थान मुंबई प्रांतांत विलीन झालें.

गांव—ही संस्थानची राजधानी असून येथें पांचसहाशें घरांची वस्ती आहे. गांव समुद्रसपाटीपासून दीड हजार फूट उंचीच्या पठारावर असल्यानें हवा थंड व निरोगी आहे. हल्लींच्या संस्थानिकांनीं गांवाची पुष्कळ सुधारणा केली.

**जव्हेरी, कृष्णलाल मोहनलाल** ( १८६७– )—गुजराथी साहित्याचे भक्त, सार्वजनिक कार्यकर्ते व एक माजी न्यायाधीश. हे प्रथम मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत फारसीचे अध्यापक होते. त्यानंतर एल्‌एल्‌. बी. होऊन सन १८९३ ते १९०५ या कालांत हायकोर्टांत वकिली केली. नंतर स्मॉलकॉज जज्ज व हायकोर्ट जज्ज या जागा यांना मिळाल्या. सन १९२८ मध्यें सरकारी नोकरींतून हे निवृत्त झाले आणि याच वर्षी यांना 'दिवाणबहादूर' ही पदवी देण्यांत आली.

मुंबई विश्वविद्यालयांत सन १८९३ ते १९०५ पर्यंत हे फारसीचे परीक्षक होते. त्यानंतर सभासद या नात्यानें त्यांचा मुंबई विश्वविद्यालयाशीं अखंड संबंध आहे. सन १९२६ मध्यें मुंबईस भरलेल्या गुजराथी साहित्य संमेलनाचे हे स्वागताध्यक्ष होते. 'मॉडर्न रिव्ह्यू'त गुजराथी पुस्तकांवर हेंच परीक्षण

लिहितात. ऊर्दू, बंगाली व मराठी याहि भाषा यांना चांगल्या अवगत आहेत. यांनीं गुजराथी भाषेंत, (१) हैदरअली अने टिपू सुलतान, (२) मोहसीनीना नीतिवचनो, (३) गुजराथी साहित्यना मार्गसूचक स्तंभो, यांसारखे ग्रंथ लिहिले आहेत. तसेंच गुजराथी साहित्याचा इतिहास इंग्रजींत यांनीं लिहिला आहे.

**जशपुर संस्थान**— हें संस्थान मध्यप्रांतांत असून याचें क्षे. फ. १९५५ चौ. मैल आहे. लो. सं. २,२३,६१२. या संस्थानांतील हवा बरी आहे. घाटांवर ६७ इंच पाऊस पडतो. येथील जंगलांत साल, टेंबुरणी या मौल्यवान् झाडांचीं अरण्यें असून लाख, टसररेशीम, मधमाशीच्या पोळ्याचें मेण हेहि पदार्थ होतात. संस्थानास जंगलचें उत्पन्न बरेंच आहे. संस्थानचें एकंदर उत्पन्न साडेसहा लाख रु. आहे. आतां हें संस्थान मध्यप्रांतांत विलीन झालें आहे.

प्राचीन वास्तूंपैकीं फक्त खुरीया पठाराच्या एका अवघड सुळक्यावर बांधलेलें ‘ खुरीया राणीचें देऊळ ’ काय तें आहे. उच्च प्रदेशावरील कोरवा लोक या राणीचे वंशज आहेत असें म्हणतात. हें देऊळ बौद्ध धर्तीचें दिसत असून आंतील मूर्तिहि बुद्धाचीच दिसते. संस्थानिकांनीं संस्थानांतील पुष्कळशी पडित जमीन लागवडीस मोकळी करून दिली व ऊंस आणि गहूं यांच्या लागवडी सुरू झाल्यापासून बाहेरून फार लोक आले.

ओरअना, रौतिया, कोरवा, अहीर, नागवंशी, चिक, कोर, वगैरे अनेक जाती येथें राहत असून अलीकडे यांपैकीं पुष्कळ लोक बाटून ख्रिस्ती झाले आहेत. संस्थानची सामान्य भाषा छत्तीसगडीसारखी हिंदीचीच पोटभाषा आहे. या संस्थानांतील मुख्य घराणीं पुढील पांच इलाखदारांचीं आहेत—खुरीया (कोरवा), फर्सबहार (झोरागोंड), बंदरचुआ (कवार), आरा आणि खेर्तेदिह (रौतिया).

तांदुळाचेंच मुख्य पीक आहे. चराईचें दांडगें उत्पन्न आहे. इब नदीच्या कांठीं थोड्या प्रमाणावर सोनें सांपडतें. व इतरत्र लोखंडहि सांपडतें.

गांव— जशपुर संस्थानचें राजधानीचें गांव. यास जगदीशपूर असेंहि म्हणतात. येथें संस्थानिकाचा वाडा, शाळा, डाकबंगला, पोस्ट ऑफिस व तुरुंग आहे.

**जसदन संस्थान**—मुंबई इलाखा, काठेवाडांतील एक संस्थान. क्षेत्रफळ २९६ चौ. मै. यांत एकंदर १६ खेडीं आहेत. लो. सं. ३७,६७२. काठेवाडांतील तिसऱ्या दर्जाचें हें संस्थान आहे. पूर्वीच्या क्षत्रिय राजांपैकीं स्वामी चष्टन यापासून जसदन हा अपभ्रंश असावा. जुनागडच्या घोरींनीं येथें एक किल्ला बांधला होता; व त्यास घोरीगड म्हणत. संस्थानांत जसदन हे मुख्य ठिकाण आहे. संस्थानिक साकेतिया सूर्यवंशी क्षत्रिय आहेत. हल्लींचे राजे दरबार श्री. अलाखाचार हे १९१९ सालीं गादीवर आले.

१९२३ सालीं प्राथमिक शिक्षण मोफत देण्याची व्यवस्था संस्थानांत सुरू करण्यांत आली. खेडेगांवांतून शाळा उघडण्यासाठीं उत्तेजन दिलें जातें.

संस्थानांत एकंदर चार तलाव असून त्यांच्या योगानें अदमासें सव्वालाख एकर जमीन लागवडीखालीं येते. नव्या विहिरी खोदण्याच्या कामास सरकारांतून उत्तेजन देण्यांत येत आहे.

लहानसहान कज्जे कोर्टाच्या मदतीवांचून मिटविण्याच्या पद्धतीस संस्थानतर्फे उत्तेजन दिलें जात आहे. या योजनेमुळें पुष्कळ गरिबांचा कोर्टलढा लढण्यास लागणारा अनाठायी पैसा वांचत आहे. संस्थानांत मद्यविक्रीस बंदी करण्यांत आली आहे. संस्थानचें उत्पन्न सु. सहा लाख रु. आहे. आतां संस्थान सौराष्ट्र राज्यसंघांत सामील झालें आहे.

**जसद भस्म**— एक आयुर्वेदीय औषध. हें औषध डोळ्यांना अतिशय हितकारक आहे. ज्वरामध्यें अंगाचा होणारा दाह, गंडमाळा, घशाचे विकार, आंतड्याची सूज, मेह, पांडुरोग, इत्यादि विकारांवर या औषधाचा उत्तम उपयोग होतो. नाडीव्रण, भगंदर, दुष्टव्रण, प्रमेह, तहान फार लागणें, घशांतील गांठी सुजणें, अतिशय थकल्यासारखें वाटणें, इत्यादि विकारांवर हें भस्म उत्तम आहे. ॥ ते २ गुंजा साखर, मध, किंवा दूध यांबरोबर घेतात.

**जॅसमिन, जॅकीज** (१७९८–१८६४)— फ्रान्समधील एक प्रसिद्ध कवि. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते— ‘ लोऊ शालिवारी ’ (एक उपरोधिक काव्य); ‘ लावुग्लो द कास्तेल कुईय ’ (कॅस्टेल कुईची आंधळी मुलगी—हें एक उत्कृष्ट काव्य असून त्याचें लॉंगफेलो कवीनें इंग्रजींत भाषांतर केलें आहे); ‘ ला पापिलोतास द जासमीन ’ (जॅसमिनचे कुरळे कागद); आणि ‘ लोऊ दोऊ फ्राय बेसूसु ’ (दोन जुळे भाऊ, १८४७), हे होत.

**जसवंतसिंह, महाराणा** (१६३८–१६७८)— एक रजपूत सरदार. हा आपला बाप गजसिंह याच्या मृत्यूनंतर जोधपूरच्या गादीवर आला (१६३८). तेव्हांपासून स. १६५८ पर्यंत तो औरंगजेबाबरोबर दक्षिणेंत कामगिरीवर होता. स. १६३८ मध्यें शहाजहान आजारी पडला. तेव्हां त्याचा वडील पुत्र दारा हा सर्व राज्यकारभार पाहूं लागला. दारानें जसवंतसिंहास माळव्याचा सुभेदार नेमलें. पुढें औरंगजेब दारावर चालून गेला असतां दारानें जसवंतसिंहास त्याच्यावर पाठविलें. औरंगजेबानें त्याच्या सैन्यांतील मुसल-

मानांस फितुर करून घेतलें व त्याचा पराभव केला. पण शेवटीं जसवंतसिंह औरंगजेबाची फळी फोडून जोधपुरास निघून गेला (१६५८). या पराभूत पलायनाबद्दल त्याच्या राणीनें त्याची निर्भर्त्सना केली. तेव्हां त्यानें औरंगजेबाची खोड मोडण्याचें वचन तिला दिलें व त्याप्रमाणें तो नेहमीं औरंगजेबाच्या विरुद्ध वागे. औरंगजेबानें गादीवर बसल्यावर जयसिंहाकडून भीड घालून जसवंतसिंहास आपल्या बाजूस वळवून घेतलें. पण त्याचा अंतस्थ हेतु औरंगजेबाचा सूड उगविण्याचा होता. पुढें औरंगजेब आणि सुजा उभयतां बंधूंच्या सैन्याची खचवा येथें गांठ पडली. जसवंतसिंहानें आपल्या फौजेनिशीं अकस्मात् औरंगजेबावर उलटून सैन्याच्या पिछाडीवर हल्ला केला व त्याचा गोट लुटला. परंतु सुजा वेळेवर येऊन न मिळाल्यामुळें युद्ध टाळून मिळालेल्या लुटीसह तो आग्र्याकडे गेला. व दाराची वाट पहात बसला होता. दारास गादी मिळवून द्यावयाची असा त्याचा निश्चय होता. दारा वेळेवर आला नाहीं म्हणून जसवंतसिंह जोधपुरास निघून गेला व परत येऊन दारास भेटला. पण आतां कांहीं उपयोग नव्हता. सुजाचा पराभव करून औरंगजेब दारावर चालून आला होता. जयाची त्याला खात्री नव्हती म्हणून त्यानें जसवंतसिंहास निरोप पाठविला कीं, जर तूं आमच्या भाईबंदी तंट्यांतून अंग काढून स्वस्थ बसशील तर तुला गुजराथची सुभेदारी पुनः सांगतों. जसवंतसिंह या गोष्टीस कबूल झाला व शहाजादा मोअज्जमबरोबर शिवाजीवरील स्वारीस गेला.

जसवंतसिंहाच्या मनांत औरंगजेबाशीं इमानानें वागावें असें मुळींच नव्हतें. दक्षिणेंत पोंचतांच त्यानें शिवाजीबरोबर पत्रव्यवहार सुरू करून शाइस्तेखानाची फजिती करण्याचें आणि मोअज्झमला बादशहा बनविण्याचें कारस्थान शिजविलें (१६६३). शाइस्तेखानावर शिवाजीनें छापा घातल्या वेळीं याचा तळ जवळच होता. पण यानें दुर्लक्ष केलें. हें औरंगजेबास कळल्यावर त्यानें जसवंतसिंहास दखखनमधून काढलें व जयसिंगास तिकडे पाठविलें. त्या वेळेपासून उभतांच्या मनांत एकमेकांविषयीं अविश्वास उत्पन्न झाला. नंतर औरंगजेबानें त्यास गुजराथच्या सुभ्यावर पाठविलें. तिकडे जात असतां त्याला वाटेंत कळलें कीं, आपणास अधिकारावरून दूर करण्याकरितां बादशहानें हें कपट केलें आहे. त्याबरोबर तो परभारां जोधपुरास निघून गेला. जसवंतसिंह याप्रमाणें घरीं गेला तरी औरंगजेबाला त्याच्या सैन्याची व कारस्थानाची भीति वाटत होती. म्हणून त्याला दूर देशीं पाठवावें असें ठरवून काबूल येथील बंड मोडण्याकरितां त्याला काबूलच्या सुभेदारीवर नेमिलें.

जसवंतसिंह काबुलास गेल्यावर मागें त्याच्या कुलाचा विध्वंस करण्याचा औरंगजेबानें विचार केला. जसवंतसिंहाचा पुत्र पृथ्वीसिंह यास औरंगजेबानें दरबारीं बोलाविलें, व त्यास विषारी पोशाख देऊन त्याचा प्राण घेतला. हें वर्तमान जसवंतसिंहास कळतांच त्याची कंबर खचली. त्याच सुमारास त्याचे दुसरे दोघे पुत्र जगत्‌सिंह व दलथमन हे काबूलच्या कडक थंडीनें मेले. तेव्हां त्याच्या दुःखाची परमावधि होऊन तो त्या शोकामुळें स. १६६८ मध्यें वारला. यानंतर तेथून त्याचा कबिला व बाकीचीं मुलें परत निघालीं. त्यांना औरंगजेबानें जबरीनें दिल्लीस नेऊन मुसलमान करण्याचा प्रयत्न केला. पण राजकुटुंबाच्या अंगसंरक्षक रजपूत सरदारांनीं मोठ्या शौर्यानें औरंगजेबाच्याविरुद्ध जाऊन राजकुटुंबास जोधपुरास पोंहोंचविलें. औरंगजेब अगर त्याचे भाऊ यांचा पक्ष जसवंतसिंह हा घटकेंत धरी व सोडी याचें कारण त्यांचा विश्वासघात करावा असें नसून आपल्यांत मुसलमानांस हांकलून देण्याचें सामर्थ्य नाहीं तर त्यांच्यांत भेद उत्पन्न करून त्यांना निर्जीव करावें हें त्याचें धोरण होय. व याच हेतूनें त्यानें शिवाजीबरोबर शेवटपर्यंत मित्रत्वाचें नातें ठेविलें होतें.

**जस्टिन** (इ. स. दुसरें–तिसरें शतक)—हा रोमन इतिहासकार ॲन्टोनाइन्सच्या काळांत होऊन गेला असावा. हिस्टोरियेरम फिलिपि कॅरम लिंब्रि नांवाचें त्याचें एक पुस्तक आहे. हें पुस्तक म्हणजे पॉम्पीअसनें ऑगस्टसच्या काळीं लिहिलेल्या पुस्तकांतील महत्त्वाचा व मनोरंजक लेखसंग्रह होय, असें त्यानेंच आपल्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. जस्टिन यानें आपल्या पुस्तकांत मूळ ग्रंथाचें सार दिलें नसून निवडक उतारे दिले आहेत. या पुस्तकांत पुष्कळच महत्त्वाची माहिती मिळते. मध्ययुगांत याच्या पुस्तकाचा फैलाव बराच झाला होता.

**जस्टिनियन, दि ग्रेट** (४८३–५६५)—हा सुप्रसिद्ध व थोर रोमन बादशहा इलिरिकम प्रांतांत टॅरेशियम येथें जन्मला. त्याचा चुलता रोमचा बादशहा पहिला जास्टिन यानें त्याला दत्तक घेतल्यामुळें जस्टिनियन मोठ्या योग्यतेस चढून चुलता ५२७ मध्यें मरण पावल्यानंतर बादशहाहि झाला. पूर्ववयांत कॉन्स्टॅटिनोपल येथें राहून त्यानें उत्तम शिक्षण संपादन केलें होतें. त्याचें स. ५२३ मध्यें सुप्रसिद्ध थेओडोराबरोबर लग्न झालें होतें. राणी या नात्यानें ती सर्व राजकारणांत भाग घेत असे. त्यानें जुन्या रोमन साम्राज्याचे प्रांत परत मिळविले.

जस्टिनियनची सर्व कारकीर्द अनेक प्रकारच्या कार्यांत गेली. तो स्वतः हुषार, विद्वान्, विद्येचा पुरस्कर्ता व निरलस कार्यकर्ता होता. त्यानें एक कायद्याचा नवीन ग्रंथ 'कोड' करविला. तथापि 'दि ग्रेट' या पदवीला लागणारा उदारपणा, दूरदृष्टि वगैरे उच्च गुण त्याच्या अंगीं नव्हते.

**जस्त**—एक रासायनिक मूलद्रव्य. रंग निळसर पांढरा. अणुभारांक ६५·३७; वि. गु. ७. १००° ते १५०° सेंटि. उष्णमानांत हें नरम होतें व मग याचे पत्रे किंवा तारा करतात. हें अशोधित स्थितींत सांपडतें. औषधांत याचे पुष्कळ क्षार वापरतात. जस्ताचे पत्रे कित्येक गोष्टींना उपयोगी पडतात. चित्रें छापण्यासाठीं याचे ठसे करतात. मिश्र धातु करण्यास जस्त लागतें. याचा लोखंडावर मुलामा चढवितात, म्हणजे तें गंजत नाहीं. जर्मनी, संयुक्त संस्थानें (अमेरिका), फ्रान्स, इटली, बेल्जियम, स्पेन, स्वीडन, इ. देशात हा धातु सांपडतो. १९३९ सालीं जगांत सु. १६ लक्ष मेट्रिक टन जस्ताचें उत्पादन होतें. अमेरिका, जर्मनी व बेल्जियम हे उत्पन्नाच्या बाबतींतले अनुक्रमें पहिले तीन मोठे देश होत.

**जस्ताळ लोखंड**—(गॅल्व्हनाइझ्ड आयर्न). लोखंडाला जस्ताचा मुलामा देऊन हें तयार करतात. याचे पत्रे असतात. प्रथम लोखंडी पत्रा कमजोर तेजाबानें स्वच्छ करून घेतात व नंतर वितळविलेल्या जस्तामध्यें तो बुडवितात. या दोन धातूंचा नीट संयोग व्हावा म्हणून जस्ताच्या पाण्यांत नवसागर घातलेला असतो. ही युक्ति प्रथम १७४२ सालीं मालूअॅ नांवाच्या फ्रेंच रसायनशास्त्रज्ञानें शोधून काढली. अशा जस्ती लोखंडावर हवेचा किंवा पाण्याचा कांहीं परिणाम होत नाहीं.

**जस्ताळणी**—(शेरार्डायझिंग). ही एक लोखंडाच्या वस्तूस कल्हई करण्याची पद्धति आहे. ही शेरार्ड कौपर कोल्स यानें शोधून काढली. या पद्धतीमध्यें ज्या वस्तूवर कल्हई चढवावयाची असेल तीवर जस्ताची भुकटी चिकटवून ती वस्तु तीनशें शतमान (सेंटिग्रेड) उष्णतेपर्यंत तापविण्यांत येते. म्हणजे जस्त लोखंडाच्या पृष्ठभागाशीं संयुक्त होतें. आणि त्या वस्तूवर एक प्रकारचा मिश्र धातूचा थर बसलेला दिसून येतो व तो सध्यांच्या जस्ती पत्र्याप्रमाणें दिसतो.

**जस्सो संस्थान**—मध्य हिंदुस्थानांतील एक लहानसें संस्थान. क्षेत्रफळ ७२ चौ. मै.. लो. सं. ८,७२७. जहागीरदार हा बुंदेला रजपूत असून पन्ना संस्थानचा संस्थापक छत्रसाल याचा वंशज आहे. छत्रसाल मरण पावल्यावर जस्सो आणि बांधोरा या जहागिरी त्याचा चौथा पुत्र भारतीचंद यास मिळाल्या. भारतीचंदानें बांधोरा जहागीर आपला वडील मुलगा दुर्जनसिंग यास व जस्सो जहागीर आपला दुसरा मुलगा हरिसिंग यास दिली. दुर्जनसिंगानंतर त्याचा पुत्र मेदिनीसिंग हा गादीवर बसला. परंतु तो निपुत्रिक वारल्यामुळें बांधोरा जहागीर जस्सो जहागिरींत समाविष्ट झाली. या संस्थानांत एकंदर ६८ खेडीं आहेत. हें संस्थान आतां विंध्यप्रदेश संघांत सामील झालें आहे.

जशेश्वरीनगर याचा अपभ्रंश जस्सो आहे असें म्हणतात. एक विचित्र लिंग व सतीचे दगड जेस्सा गांवांत दिसतात. जैन व हिंदु संस्कृतीचे प्राचीम अवशेष येथें पुष्कळ आहेत.

**जहागीर, जहागीरदार**—राज्याच्या नोकराला एखाद्या प्रदेशांतील उत्पन्नाचा हिस्सा जो मुसलमानी अमदानींत तोडून दिला जाई त्यास जहागीर म्हणत. जहागिरीचे दोन प्रकार असत : पहिल्या प्रकारांत शेतजमीन तोडून देत अथवा सरकारसाऱ्यापैकीं कांहीं वसूल रोख रक्कम नेमून देत. फौज पदरीं बाळगून सरकारचाकरी करण्याकरितां एक देत व दुसरी त्या त्या व्यक्तीसाठीं अथवा कुटुंबासाठीं देत. पहिल्यास सरंजाम इनाम अथवा तैनात इनाम व दुसऱ्यास जात इनाम म्हणत. जात इनाम मोफत असे. त्यावर सरकारदेणें कांहींच नसे. सरंजाम जहागिरीस सरकारदेणें म्हणजे कांहीं तरी सरकारचाकरी (फौज ठेवून वगैरे) या प्रकारें द्यावें लागे.

महाराष्ट्रांत इंग्रज कंपनीनें आपलें वर्चस्व स्थापिलें त्या वेळीं महाराष्ट्रांतील जहागिरदारांची पुढीलप्रमाणें वर्गवारी व्यवस्था लावण्यांत आली. पहिल्या प्रतीच्या सरदारांत शिवाजीनें राज्य स्थापण्यापूर्वीं जे जहागीरदार होते त्यांची गणना केली. हे म्हणजे फलटणचे निंबाळकर, जतचे डफळे, वगैरे. दुसऱ्या प्रतीच्या सरदारांत शिवाजीनें व छत्रपतींनीं निर्माण केलेले अधिकारी (व त्यांचे वंशज) येतात. उदा., प्रधान, सचिव, प्रतिनिधि, वगैरे. तिसऱ्या प्रकारचे सरदार म्हणजे पेशव्यांनीं निर्माण केलेले; उदा., रास्ते, पटवर्धन, इ. होत.

**जहांगीर** (१६०५–१६२६)—एक मोंगल बादशहा. अकबरानंतर त्याचा वडील मुलगा हा नरुद्दीन महंमद जहांगीर बादशहा गाझी असें नांव धारण करून गादीवर आला. यास खुश्रू, पर्वीझ, खुर्रम व शहार्यार असे चार मुलगे होते. जहांगिरास अनेक बायका होत्या; त्या सर्वांत नूरजहानवर त्याचें अत्यंत प्रेम होतें. व तिच्या

सल्ल्यानेंच त्यानें बहुतेक राज्यकारभार केला. जहांगीर नांवाला मात्र राजा, राज्यकारभाराचीं सूत्रें नूरजहानच्या हातीं होतीं. बादशहानें तिचें नांवहि नाण्यावर खोदविलें होतें.

जहांगीरच्या कारकीर्दीतच सर टॉमस रो या इंग्लिश वकिलानें व्यापारासंबंधीं कांहीं सवलती मिळविल्या. त्या वेळीं मोंगल राज्याचा वसूल ५० कोटी रुपयांवर होता.

जहांगीरच्या कारकीर्दीत महत्त्वाच्या अशा कांहीं उलाढाली झाल्या नाहींत. त्यानें अकबराचेंच धोरण स्वीकारल्यामुळें त्याची कारकीर्द प्रजेस एकंदरीनें सुखावह गेली. जहांगिरास शिल्पकला, सृष्टिसौंदर्य व शिकार यांची आवड होती. युद्धकलेंतहि तो निपुण होता; पण मद्य व अफू यांच्या सेवनानें त्याचा स्वभाव अत्यंत लहरी, कित्येक प्रसंगीं तर अविचारी व क्रूर बनला होता. पण नूरजहानच्या सहवासानें त्याचा स्वभाव बराच शांत व सहनशील होत गेला.

जहांगीरचे शेवटचे दिवस अत्यंत हालअपेष्टांत गेले. त्यांचीं मुलें व नूरजहान यांच्यामध्यें राज्यकारभारासंबंधीं अनेक उलाढाली चालत. नूरजहानच्या मनांतून प्रथमतः खुर्रम यास राज्यपद मिळावें असें होतें. त्यासाठीं तिनें आपला भाऊ असफखान याची मुलगी मुम्ताज हिचें लग्नहि त्याच्याशीं करून दिलें होतें. पण पुढें खुर्रमनें खानखानानच्या नातीशींहि विवाह केला व अशाच इतर प्रतिकूल गोष्टी त्यानें केल्यामुळें तिनें पहिला नवरा जो शेरखान त्यापासून झालेली मुलगी राजपुत्र शहर्यार यास देऊन त्यास राज्यपद मिळवून देण्याची खटपट चालविली. असफखान, खानखानान हे खुर्रमच्या बाजूचे होते; महाबतखान हा जहांगीर व नूरजहान यांच्या बाजूस होता. त्यानें खुर्रमचा पराभव करून त्यास दक्षिणेंत पळवून लाविलें. पण लौकरच जहांगीर मरण पावल्यानें खुर्रमची बाजू बळकट झाली. व तो गादीवर बसला. (नूरजहान पाहा).

**जहांगीर रेडिमनी, सर कावसजी** (१८७९- )—एक हिंदी राजकारणी पुरुष. हे पारशी आहेत. यांचें शिक्षण सेंट झेविअर कॉलेज, मुंबई, व सेंट जॉन कॉलेज, केंब्रिज, येथें झालें. १९०४ ते १९२१ पर्यंत हे मुंबई कार्पोरेशनचे समासद होते व १९१९–२० मध्यें अध्यक्ष होते. बॉंबे इंप्रूव्हमेंट ट्रस्टचे ते सभासद होते. १९१७–१८ सालीं वॉर लोन कमिटीचे ते सेक्रेटरी होते. ते मुंबई कायदे मंडळाचे समासद होते. ते प्रथम कांहीं दिवस तात्पुरते व नंतर १९२३ ते १९२८ पर्यंत मुंबई सरकारच्या कार्यकारी मंडळाचे समासद होते. मुंबई शहरातर्फे ते मध्यवर्ती असेंब्लीमध्यें १९३० सालीं निवडून गेले. १९३०–३१–३२ मध्यें ते गोलमेज परिषदेचे समासद होते. १९३३ सालीं भरलेल्या लंडन येथील ‘ मॉनिटरी व इकॉनमिक ’ परिषदेत ते प्रतिनिधि म्हणून गेले होते. हे १९३४ मध्यें बॅरोनेट झाले. १९३६ त ते नॅशनल लिबरल फेडरेशनचे अध्यक्ष होते. लंडनला राज्यारोहण झाल्या वेळीं (१९३७ त) हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून उपस्थित होते.

**जहाजपक्षी**—(फ्रिगेट). हा पक्षी उष्ण प्रदेशांत आढळतो. याच्या पायांचीं बोटें सांधलेलीं असतात. हा पेलिकन पक्ष्यासारखा असतो. हा तीन फूट लांब असून याच्या लांबीच्या मानानें याचें शरीर बारीक असतें. हा उडतांना फार डौलदार दिसतो व जोरानें उडतो.

**जहाज फिरंगी** (मृ. १८०२)— हिंदुस्थानांतील एक युरोपियन लढवय्या. हा आयर्लंडांतील टिप्पेरेरीचा असून याचें खरें नांव जॉर्ज थामस असें होतें. हा हिंदुस्थानांत आला (१७८१–८२) त्या वेळीं खलाशी म्हणून एका गलबतावर होता. किनाऱ्यावर उतरल्यानंतर यानें दक्षिणेकडील पाळेगारांकडे नोकरी पत्करिली (.१७८२). पुढें ती नोकरी सोडून श्रीधन येथील बेगम सुमरूच्या पदरीं तो राहिला. पुढें बेगमच्या मुलीशीं लग्न केलें. थोड्या दिवसांनीं पदरीं बरेचसे लोक बाळगून सुमरूला सोडून लुटालूट करून कांहीं प्रांत (हरियाण भागांत) बळकाविला. त्यानें हंसी येथें आपलें मुख्य ठाणें करून तेथें एक किल्ला बांधला. रोहटकच्या दक्षिणेस १० मैलांवर दुसरा एक जॉर्जगड नांवाचा किल्ला बांधिला. त्यास जहाजगड म्हणत. १७९३ च्या सुमारास महादजी शिंद्याचा सरदार खंडेराव हरि याच्या पदरीं राहिला. याला शीखांविरुद्ध लढण्यास जावें लागे. पुढें पेरॉन हा याचा शत्रु झाला. त्याच्या सैन्यानें जहाजगडास वेढा घातला असतां याचा सेनापति हॉपकिन्स हा ठार झाला व याचा पुरा पराभव होऊन तो एकटाच पळून हंसीस गेला. तेथून तो अनुप शहरीं गेला. पुढें तो युरोपांत जाण्यास निघाला असतां गंगेच्या कांठीं बहरामपूर येथें मरण पावला. मरणसमयीं त्याचें वय ४६ वर्षांचें होतें. इंग्रजांचा झेंडा अटकेवर फडकविण्याची त्याची शेवटपर्यंत इच्छा होती; पण ई. इं. कंपनीच्या अधिकाऱ्यांचा त्याला पाठिंबा नव्हता.

**जहाज बांधणें**—नौकानयन पाहा. प्राथमिक अवस्थेंतील मनुष्यानें एखादा लांकडाचा ओंडा पाण्यावर तरंगतांना पाहिला असावा व त्यावरून त्याला तो लांकडाचा ओंडा थोडा पोखरून त्यांत बसून पाण्यावर तरंगण्याची व नंतर पोखरून केलेल्या होडीची कल्पना सुचली असावी. परंतु यानंतर जेव्हां तो चामड्याची होडी तयार करूं लागला तेव्हां त्याला खरी एखादी वस्तु तिच्या केवळ नैसर्गिक गुणामुळें नव्हे तर तिच्या आकारामुळें तरंगूं शकते या गोष्टीची खरी कल्पना आली असावी व त्याचमुळें त्याला पुढें गलबतें बांधण्याची विद्या अवगत झाली असावी. झाडांचीं कोंवळीं रोपें किंवा फोक वांकवून त्याचें टोपलीसारखें पात्र करून त्यावर कातड्याचें आच्छादन घालून पहिली नौका किंवा जहाज बनविण्यांत आलें असलें पाहिजे व ही गोष्ट खि. पू. १०,००० वर्षांच झाली असली पाहिजे. खि. पू. ४००० च्या सुमारास क्रीट बेटांत फळ्यांच्या लांब वल्हविण्यासारख्या होड्या तयार करून त्यांतून ईजिप्तमधून घोडे

आणीत असत. फिनिशिया देशांतील गलबतें जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीच्या पलीकडे जात असत; पण त्या केवळ उघड्या होड्या असत. फक्त त्यांचा पुढील व मागील भाग उंच असे व वादळी हवेमध्यें त्यांच्या बाजूहि कूड वगैरे बांधून उंच करण्यांत येत असत. त्या वेळीं होड्या बांधण्याकरितां फर, देवदार, सेडर, ओक, वगैरेचें लांकूड वापरण्यांत येत असे. बाबिलोनियांतील होड्या खि. पू. ११०० च्या सुमारास लव्हाळ्याच्या बांधून त्यांवर चामडें मढवून वर डांबराचा थर देऊन त्या जलाभेद्य करण्यांत येत असत. असुरियांतील त्याच काळच्या होड्या फळ्यांच्या तयार करीत असत व त्या फळ्या एकमेकांस लांकडी सुरसे मारून जोडीत असत किंवा क्वचित् लोखंडी खिळेहि ठोकीत. ईजिप्तमधील गलबतांची पुढची व मागची बाजू उंच असे. त्यांचा उपयोग बहुधा नदीमध्यें करीत व हिरोडोटसनें म्हटलें आहे कीं, हीं गलबतें बाभळीच्या जातीच्या लांकडाच्या फळ्यांची तयार केलेलीं असत. या फळ्या बहुधा लांब खिळ्यांनीं जोडण्यांत येत व मधील फटी पापायरसनें भरून काढीत. ईजिप्ती गलबतांचा विशेष म्हणजे त्यांस वर तोंडें जोडलेल्या दोन उंच डोलकाठ्या अशा आकाराच्या असत. व त्यामागील बाजूस दोऱ्या बांधून उभ्या करीत. या गलबतास एक मोठें चौकोनी शीड असे; परंतु तीं बहुतेक वल्ह्यांनीं चालविण्यांत येत असत. ग्रीक लोकांचें अगदीं सर्वपरिचित गलबत म्हणजे तीन शिडांचें (ट्रायरेम) हें असे. यावर सुमारें १७० वल्हीं असत व त्यांच्या तीन रांगा असत. या जहाजांस पुढच्या बाजूस एक मजला असे. व्यापारी जहाजें बहुधा पाइन झाडांचीं बांधीत व त्यांचें पठाण (तळचें लांकूड) ओक झाडाचें असे; कारण रात्रीचीं बहुधा हीं गलबतें ओढून किनाऱ्यावर आणीत असत. हीं गलबतें बांधण्याकरितां ब्राँझ, लोखंड, लांकूड यांचे सुरसे किंवा खिळे वापरीत. यांतील फटी ताग किंवा वाखानें भरून काढीत व पाण्याखालीं राहणारा भाग मेण किंवा डांबरानें माखून काढीत. रोमन लोकांनीं प्यूनिक युद्धांत बरींच वल्ह्यांचीं गलबतें युद्धाकरितां बांधलीं; परंतु त्यांच्याजवळ व्यापारी गलबतें फारशीं नसत. गलबतें बांधण्याच्या कामांत बहुतेक रोमचा पाडाव झाल्यानंतर फारशी प्रगति झाली नाहीं. त्यानंतर व्हेनिस, जिनोआ (इ. स. १००० त), वगैरे शहरांचा व्यापार वाढल्यानंतर या कामास चालना मिळाली. यांचीं गलबतें ग्रीक किंवा रोमन युद्धनौकांपेक्षां पुष्कळच चांगल्या प्रकारचीं असत. इसवी सनाच्या सोळाव्या शतकांत जिनोआ येथील लोक तीन डोलकाठ्यांचीं व सुमारें १,२०० ते १,५०० टन वहनशक्तीचीं जहाजें बांधीत. या गलबतांची माहिती इंग्लंडमधील लोकांस धर्मयुद्धाच्या काळीं झाली व तेथपासून इंग्लंडमध्यें गलबतें बांधण्याची कला वाढीस लागली. सोळाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास इंग्लंडमध्यें प्रसिद्ध असलेलें ग्रेट हॅरी हें गलबत सुमारें १,५०० टन वहनशक्तीचें होतें. ज्या गलबतांत बसून कोलंबसानें अमेरिका खंडाचा शोध लावला तें फक्त २३५ टनी होतें. या सफरीनंतर गलबतांत पुष्कळच सुधारणा झाली. गलबताच्या लांकडावर तांब्याचा पत्रा बसविण्याची पद्धति अमलांत येण्यापूर्वीं (१७६१) त्याऐवजीं फर लांकडाच्या फळ्या बसवीत व गलबताच्या तळास डांबर लावीत; व केंस, नमदा, किंवा घांसलेली कांच बसवीत. त्या वेळीं साधारण गलबताचें आयुष्य १२ वर्षांपेक्षां अधिक नसे. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत गलबतें बांधण्यांत पुष्कळच सुधारणा झाली.

सन १५४३ मध्येंच व्हेलास्कोडी गारासे यानें वाफेनें गलबतें चालविण्याचा प्रयत्न केला होता. त्यानंतर डेनिस पेपिन (१७०७), जॉफ्लायचा मार्किस (१७८३), अमेरिकेंतील जेम्स रेम्से (१७८६), मिलर व टेलर (१७८८) व सिमिंग्टन यांनीं या दिशेनें प्रयत्न केले; परंतु १८१२ मध्यें हेन्री बेल यानें बांधलेल्या कॉमेट नांवाच्या जहाजामुळेंच प्रथम व्यापारी लोकांस या गलबतांचें महत्त्व पटलें. यानंतर १८२२ मध्यें लोखंडी व १८७० मध्यें पोलादी पत्र्यांचीं गलबतें बांधण्यास सुरवात झाली.

गलबत बांधावयाचें झालें म्हणजे त्यांत माल किती न्यावयाचा, त्याचें वजन, त्याची गति व तें किती खोल पाण्यांत तरंगलें पाहिजे या गोष्टी प्रथम मालक निश्चित करून त्याप्रमाणें कारखान्यास हुकूम देतो. कांहीं गलबतें विशिष्ट उपयोगाकरितां बांधावयाचीं असतात. उदाहरणार्थ, मासे किंवा फळें नेणारीं गलबतें, दूरदूरच्या देशांत प्रवास करण्यासाठीं वगैरे गलबतें. हीं त्या त्या परिस्थितीस योग्य अशा पद्धतीनें बांधण्यांत येतात. सामान्यतः गलबताचा पहिला आराखडा (शिअर ड्राफ्ट) लॉइडच्या रजिस्टरवरून किंवा ब्रिटिश कार्पोरेशनच्या रजिस्टरवरून बनविण्यांत येतो. लांकडी गलबतें पूर्वीं तिरप्या चौकटींचीं बांधीत, तीच पद्धति अद्यापहि चालू आहे. दर चौरस इंचास ३० टनांचा दाब सहन करण्याचा पोलादी पत्रा गलबताकरितां वापरण्यांत येतो. कांहीं विशेष प्रकारच्या गलबतांत यापेक्षां अधिक मजबूत किंवा लवचिक पत्रा वापरण्यात येतो. गलबत बांधतांना माल ठेवण्याचे व यंत्राचे भाग निरनिराळे ठेवण्यांत येतात. व ते आडव्या पडद्यांनीं विभागलेले असतात. हे विभाजक पडदे जलाभेद्य असतात. असेच पडदे जहाजाच्या पुढील व मागील भागास बसविलेले असतात व तसेच मधल्या व पुढील तळमजल्यास असतात. असे पडदे प्रत्येक गलबतांत, विशेषतः युद्धनौकांत फार महत्त्वाचे असतात. यामुळें एका भागांत पाणी शिरलें तरी दुसऱ्या भागांत जात नाहीं. पाण्याच्या वरच्या भागांत अशा पडद्यांस जलाभेद्य दरवाजे बसविलेले असतात.

गलबताचा मुख्य पाया म्हणजे पठाण होय. हा एक पुढच्या टोंकापासून मागच्या टोंकापर्यंत पसरलेला जाड पत्रा असतो. यावर एक भागीं मुख्य मधली तुळई बसविलेली असते; या तुळईला दोहों बाजूंस आडवे पत्रे जोडलेले असतात. या आडव्या पत्र्यांस बाजूचे पत्रे जोडलेले असतात. ते सामान्यतः २४ पासून ३० इंच रुंदीचे असतात. हे पत्रे जहाज ज्या आकाराचें एकंदर बांधावयाचें असेल तो आकार त्या जहाजास मिळेल अशा आकाराचे असतात. यांच्या वरच्या टोंकांशीं आडवे दांडे (बीम) बसविलेले असतात; यांमुळें या आडव्या पत्र्यांस आधार मिळतो व त्यांचा आकार कायम राहतो; व या दांड्यांवर पत्रे बसवून मजला तयार करतां येतो. मोठ्या जहाजांत एकापेक्षां जास्त मजले असतात. त्यांत माल किंवा प्रवाशांची जागा असते. मधून मधून उभे खांब देऊन त्यांस आधार दिलेला असतो. या सर्व गलबतांच्या बाहेरून जाड पत्रे बसविलेले असतात (कवच). तसेंच ते प्रत्येक मजल्यास बसविलेले असतात. त्यामुळें त्याच्या आकारावर पाण्याच्या दाबाचा परिणाम होत नाहीं. याच पत्र्यामुळें गलबत पाण्यावर राहूं शकतें. या बाहेरच्या कवचाच्या आंतून पुन्हां कांहीं अंतरावर दुसरे तशाच आकाराचे पत्रे बसविलेले असतात. त्यामुळें गलबताचें बूड दुहेरी बनलेलें असतें व तें तितकें बिनधोक होतें. या दोन तळांच्या दरम्यान समतोलपणाकरितां पाणी किंवा जळणाचें तेल भरतात. गलबताचे सर्व नकाशे तयार झाले म्हणजे त्यांतील प्रत्येक पत्रा कोणत्या आकाराचा असावयाचा व त्यास जोडण्याकरितां छिद्रें कोठें ठेवावयाचीं यांच्या आकृती काढण्यांत येतात व याप्रमाणें गलबताचा पाया घालण्यापूर्वी सर्व पत्रे तयार करून ठेवण्यांत येतात.

तेलाच्या जहाजांत निरनिराळीं टांकीं बांधण्यांत येतात. अशाच तऱ्हेनें गाळ काढणारीं, दुसरीं गलबतें ओढणारीं, तिसरीं तारायंत्रांच्या तारा टाकणारीं, वगैरे जहाजें निरनिराळ्या प्रकारचीं बांधण्यांत येतात.

सध्यां विशिष्ट जहाज अमुक टनी जहाज आहे असें म्हणण्यांत येतें; त्याचे अर्थ निरनिराळे आहेत. मूळ हा वाक्प्रचार दारूचीं किती पिपें एका जहाजांत मावतील त्याप्रमाणें त्या जहाजास अमुक टनी जहाज म्हणत. परंतु याचे चार प्रकार आहेत: (१) ग्रॉस टनेज (ठोकळ मान)–हें गलबतांत जितकी जागा असेल तिला १०० नें भागून काढतात, म्हणजे १ टन = १०० घनफूट. (२) नेट टनेज (पक्कें मान)–यावरून विशिष्ट गलबतावर बंदराचा आकार बसवितात. हें वरील घनफळांतून यंत्रें व खलाशी राहण्याची जागा वजा करून काढतात. (३) डिस्प्लेसमेंट टनेज (वजन)–हें जहाज जेव्हां बंदरांत असेल तेव्हां मालासुद्धां जें त्याचें एकंदर वजन असेल त्यास म्हणतात. (४) डेडवेट टनेज (वहनशक्ति)–हें विशिष्ट जहाज त्यांतील माल, कोळसा, सामानसुमान वगैरे मिळून किती वजन नेऊं शकेल त्यावरून ठरवितात. गलबताच्या मध्यावरील पाण्याच्या वरील भागाच्या उंचीस फ्रीबोर्ड म्हणतात.

हिंदुस्थानांत वैदिक कालापासून नौकानयन आहे. तथापि नौका कशा बांधीत याविषयीं विस्तृत माहिती उपलब्ध नाहीं. 'युक्तिकल्पतरु' नांवाच्या संस्कृत ग्रंथांत नौकाबंधनाच्या कारागिरीविषयीं बरीच माहिती आहे. नौकांच्या लांकडाचे ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य-शूद्र असे चार प्रकार असत. नौकांच्या आकारांवरून त्यांना नांवें असत. नौकामंडन हें कसें असे याचें वर्णन आहे. प्राचीन शिल्प, नाणीं व चित्रें यांवरून त्या काळच्या नौकाची कल्पना येते. आंध्र नाण्यांवर दुशिडाचीं जहाजें चितारलेलीं दिसतील. मौर्यकालांतील जहाजांचें वर्णन मेग्यास्थिनीजनें लिहून ठेविलें आहे. त्या वेळच्या जहाजांची वहनशक्ति साधारणतः ७५ टन असावी. दक्षिण हिंदुस्थानांत चेर व चोल राजे आरमारांत प्रबल होते. मार्कोपोलोनें मलबार किनाऱ्यावरील बांध्यांच्या जहाजांचीं वर्णनें दिलीं आहेत. ३०० नावाडी लागत इतकीं मोठीं जहाजें त्यानें पाहिलीं होतीं. १६ व्या शतकांतील एक दाभोळी जहाज १५३ फूट लांब, ४२ फूट रुंद, ३१ फूट उंच व १२०० टन वहनशक्तीचें होतें, असें एका पोर्तुगीज बखरकारानें लिहिलें आहे. अकबराच्या कालीं नौकाबंधनाचीं प्रमुख केंद्रें म्हणजे बंगाल, काश्मीर व ठठ्ठा हीं असत. कॉन्स्टँटिनोपलच्या सुलतानास अलेक्झांड्रियाहून जहाज बांधून आणण्यापेक्षां आसामांतून आणणें जास्त स्वस्त पडे.

बंगालमध्यें हिंदूंचें समुद्रावर बरेंच वर्चस्व असे. जेसोरच्या प्रतापादित्याचे नौका बांधण्याचे कारखाने दुघली जहाज-घाट व चक्रश्री या ठिकाणीं असत. गौर हें त्या काळांत नांवाजलेलें नौकाबंधनाचें व व्यापाराचें केंद्र होतें. कारोमांडल किनाऱ्यावर मच्छलीपट्टणच्या उत्तरेस ४२ मैल असणारे नरसापूर व मदपोलम् या ठिकाणीं इंग्रज व्यापाऱ्यांचीं जहाजेंहि दुरुस्त होत. मराठ्यांच्या स्वाऱ्यांत कोंकण किनाऱ्यावर विजयदुर्ग, कुलाबा, अंजनवेल, रत्नागिरी, वगैरे बंदरांत लढाऊ जहाजेंहि बांधलीं जात. आंग्र्यांच्या गराबांना दोनच शिडें असत. गालिवात होड्या २५ शेर वजनाच्या असत; त्याला ४०।५० वल्हीं असत व वेग ताशीं चार मैल असे.

इंग्रजी मुलखांत मुंबईत लौजी हें पारशी घराणें जहाजें बांधण्यांत फार वाकबगार होतें. १७३६ ते १८३७ पर्यंत शंभर वर्षें सरकारी गोदींत वरिष्ठ जहाजबांधणी–अमलदार पारशी होते. मुंबईचें सागवान लांकूड जहाजाला ओक लांकडापेक्षां जास्त

चांगलें असा अनुभव आला. ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानांतच पुष्कळ जहाजें बांधवून घेतलीं. तथापि पुढें इंग्रज सरकारनें जहाज बांधण्याचा धंदा हिंदुस्थानांत वाढीला न लावतां उलट मारून टाकला.

आतां नुकतें दुसऱ्या महायुद्धांत व नंतर सरकारला हा धंदा सुरू करणेंच भाग पडलें. विजगापट्टण येथें जहाजें बांधण्यांत येत आहेत. सिंदिया स्टीम नॅव्हिगेशन कंपनीनें हिंदुस्थानांत बनविलेलीं जहाजें समुद्र-पर्यटणास उपयोजण्याची योजना करून ती अमलांतहि आणली.

१४ मार्च १९४८ रोजीं हिंदुस्थानांत तयार झालेली पहिली आगबोट 'जलउषा' ही विजगापट्टण येथें पं. नेहरूंच्या हस्तें पाण्यांत सोडली. हिचें वाहतूकसामर्थ्य ८००० टन आहे. सिंदिया कंपनीनें ही बांधली आहे. दुसरी अशीच ८००० टनांची सप्टेंबरांत तयार झाली. हिंदुस्थानला एकंदर व्यापारी जलवाहनाची गरज २०,००,००० टन आहे. सिंदिया कंपनीनें नौकाबंधनाचा धंदा आर्थिक दृष्टीनें परवडत नाहीं म्हणून आतां सोडला असून हिंदुस्थान सरकार आतां स्वतःच जहाजें बांधण्याची योजना करीत आहे.

**जहांदरशहा** ( १६६३–१७१३ )—एक मोंगल बादशहा. याचें मुईझउद्दीन हें नांव असून हा बहादुरशहाचा वडील मुलगा व औरंगजेबाचा नातू होय. १७१२ त बहादुरशहा वारल्यानंतर त्याच्या मुलांत गादीबद्दल तंटा लागला. अझीम-उश्शान जहानशहा व रफिउश्शान हे मारले गेल्यानंतर लाहोर येथें जहांदर गादीवर बसला. हा दुर्बळ, क्रूर, चैनी, उद्धट व राज्यकारभारांत अनभिज्ञ होता. त्यानें भावांच्या व चुलत्यांच्या सर्व मुलांना ठार केलें. एकदां तर त्यानें लालकुंवर नांवाच्या एका कंचनीला आपलें सारें राज्य अर्पण केलें. यानें सारे ९ महिने राज्य केलें. याला याचा पुतण्या फरुखसियर यानें आग्ऱ्याजवळ लढाईंत कैद करून ठार केलें.

**जहानआरा बेगम** ( १६१४–१६८० )—ही मुम्ताज बेगमच्या पोटीं झालेली शहाजहान बादशहाची मुलगी. ही विनोदी, उदार, विदुषी व सुंदर होती. ही दाराच्या बाजूची होती. त्यामुळें औरंगजेब तिचा द्वेष करी. शहाजहान कैदेंत असतांना हिनें आपलें सारें आयुष्य त्याच्या सेवेंत घालविलें. औरंगजेब तिचा द्वेष्टा असला तरी त्यानें तिचा इतमाम ( शहाजहानच्या मागेंहि ) कायम ठेवला. शहाजहान बादशहा असतांना दरबारांतील प्रत्येक उलाढालींत तो तिचें मत घेत असे व दरबारांत तिचें वजन पुष्कळ होतें. ती शेवटपर्यंत अविवाहित राहिली.

**जळगांव**— १. हें मुंबई इलाख्यांतील पूर्व खानदेश जिल्ह्याचें व जळगांव तालुक्याचें मुख्य ठिकाण. जी. आय्. पी. रेल्वेचें एक स्टेशन आहे. येथून अमळनेरला एक आगगाडीचा फांटा गेला आहे. या जिल्ह्यांत व गांवाच्या आसपास कापूस फार पिकतो. म्हणून हा गांव कापसाच्या व्यापाराची एक मोठी उतारपेठ असून यास व्यापारी महत्त्व फार आलें आहे. या जिल्ह्यांतील मुख्य पिकें कापूस, ज्वारी, मुईमूग, तीळ हीं आहेत. येथील म्युनिसिपालिटी १८६४ सालीं स्थापिली. लो. सं. ४८५९६.

येथें जिल्ह्याच्या कचेऱ्या, दवाखाने, शाळा, हायस्कुलें, वगैरे आहेत. एक कॉलेज आहे. दोन तीन कापडाच्या गिरण्या असून बरेच कापूस दाबण्याचे व सरकी काढण्याचे कारखाने आहेत. वऱ्हाडांत एक जळगांव असल्यानें याला जळगांव मेहरुण असें म्हणतात. मेहरुण हें खेडें जवळ दीड कोसावर असून तेथें एक मोठा तलाव आहे. त्याचेंच पाणी जळगांवला नेण्यांत आलें आहे. तालुक्याचें क्षे. फ. ३२० चौ. मै. असून त्यांत ९९ गांवें आहेत. लो. सं. १,३८,०१८.

२. वऱ्हाडांतील हा तालुका बुलढाणें जिल्ह्यांत आहे. तालुक्याचें मुख्य ठिकाण जळगांव याच नांवाचें असून तें नांदुरा स्टेशनापासून १६ मैलांवर आहे. ऐने–ई–अकबरीमध्यें ह्या गांवाचा नरनाळाच्या सरकारांतील परगण्याचें गांव म्हणून उल्लेख आहे. येथील लो. सं. दहा हजारांपर्यंत आहे. खानदेशांतील जळगांवाहून वेगळें दाखविण्यासाठीं याला जळगांव–जामोद म्हणतात.

हें कापसाच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण असून सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे येथें कारखाने आहेत. ही कापसाची उतारपेठ आहे. येथें विड्याच्या पानांचाहि मोठा व्यापार चालतो. गांवाच्या वायव्येस राजा भर्तृहरीचें देऊळ असून त्याप्रीत्यर्थ नागपंचमीस जत्रा भरते. या तालुक्यांत ८ इनाम गांवें व २१७ खालसा गांवें आहेत. येथील जमीन सुपीक आहे. बागबागाईतहि बरीच आहे. त्यामुळें या तालुक्यास पश्चिम वऱ्हाडची बाग असें म्हणतात.

**जळण**—कोणत्याहि कामाकरितां उष्णता उत्पन्न करावयाची असतां जे पदार्थ जाळून आपण उष्णता उत्पन्न करतों त्यांस जळण म्हणतां येईल. हें जळण घन, द्रव किंवा वायुरूप यांपैकीं कोणत्याहि अवस्थेंत असूं शकेल. घन जातीच्या जळणांत कर्ब व उज्ज हे स्वतंत्र किंवा संयुक्त अवस्थेंत असून हीं द्रव्यें जळणारीं असतात व न जळणारा राख या नांवाचा पदार्थ असतो. द्रव किंवा वायुरूप जळणांत बहुतेक जळणाराच भाग असून राखेचा अंश फारच थोडा असतो. घन जळणामध्यें जळणारें

द्रव्य बहुधा बाष्पभावी असतें व तें त्या पदार्थास निर्वात जागेंत उष्णता लागली म्हणजे बाहेर पडतें व खालीं लांकडें असलीं तर, कोळसा व दगडी कोळसा असला तर कोक शिल्लक राहतो. या दोहोंत राख व कर्ब असतो.

स्वाभाविक जळण म्हटलें म्हणजे लांकडें, दगडी कोळसा, कचरा, नैसर्गिक तेलें व नैसर्गिक वायू होत. मनुष्याचें स्वाभाविक जळण म्हणजे लांकूड होय. हें घरगुती व्यवहारांत अद्यापिहि वापरण्यांत येतें. कचरा हा अलीकडे अधिकाधिक उपयोगांत येऊं लागला आहे. दगडी कोळसा हें फार महत्त्वाचें नैसर्गिक जळण आहे. रॉकेल व पेट्रोल हीं नैसर्गिक तेलेंहि एक प्रकारचें नैसर्गिक जळण होय. मार्शगॅस हा एक वायुरूप नैसर्गिक जळण आहे. ( अनूपवायू पाहा ).

कृत्रिम जळणांचेहि घन, द्रवरूप व वायुरूप असे भेद करतां येतील. कृत्रिम घन जळणांपैकीं मुख्य म्हणजे साधा कोळसा, कोक, वगैरे. कोळसा लांकडें निर्वात जागेंत तापवून करतात. कोक दोन प्रकारचा असतो : एक गॅस कोक; हा गॅस फॅक्टरींत कोलगॅस काढून घेतल्यावर राहतो. दुसरा धातुविद्येच्या कामीं वापरावयाचा कोक; हा दगडी कोळशास खूप उष्णता देऊन मुद्दाम तयार करावा लागतो व तो धातुकामांत उपयोगांत येतो. याखेरीज एक कमी उष्णतामानावर कोक तयार करण्यांत येतो.

गॅस कोकचा उपयोग घरगुती कामाकरितां होतो, कारण तो लवकर पेटतो. दुसरा धातुकामाचा कोक तयार करण्याच्या दोन कृती आहेत. एक पोळ्यासारखी भट्टी करून किंवा दुसरी कोक भट्टी करून. पहिल्या पोळ्याच्या आकाराच्या भट्टीमध्यें डांबर, अमोनिया, वगैरे निघणारे उपपदार्थ मिळत नाहींत ते दुसऱ्या खास पद्धतींत मिळतात. त्यामुळें याच भट्टया अलीकडे विशेष प्रचारांत येत आहेत. दगडी कोळशाच्या भुकटीपासून डांबर वगैरे घालून विटा तयार करतात; त्याहि अलीकडे अधिकाधिक उपयोगांत येत आहेत.

कृत्रिम द्रव जळण हें नैसर्गिक तेलांचें व इतर पदार्थांचें ऊर्ध्वपातन करून तयार करण्यांत येतें. नैसर्गिक तेलांचें ऊर्ध्वपातन केलें असतां प्रथम हलकीं तेलें मिळतात व खालीं राहणारा भाग जळण म्हणून वापरण्यांत येतो. द्रव जळणामध्यें घन जळणापेक्षां अधिक फायदे आहेत. त्यांचें वजन ४० टक्क्यांनीं कमी असतें व आकार ३५ टक्क्यांनीं कमी असतो. हें जळण फेंकून घालावें लागत नाहीं. याची राख फारच थोडी पडते. हें लवकरच पेट घेतें व अधिक जलद उष्णता देतें. अलीकडे कोळशाऐवजीं तेलाचा उपयोग आगबोटी, विजेचे कारखाने व इतर उद्योगधंद्यांत अधिकाधिक करण्यांत येत आहे.

कृत्रिम वायुरूप जळणाचे पुष्कळ प्रकार अलीकडे दिव्यांच्या व उष्णता देण्याच्या कामीं उपयोगांत येत आहेत. यामध्यें साधा कोलगॅस ( कज्जलवायु ), कोकगॅस ( निर्धूम कज्जलवायु ), प्रोड्यूसरगॅस ( उत्पादक किंवा अंगारवायु ), वॉटरगॅस, ( जलवायु ), ऑइलगॅस ( तैलवायु ), वगैरे मोडतात. कोलगॅस हा उष्णता मिळण्याला फार महाग असतो. पण त्याचे इतर उपयोग आहेत. अलीकडे बऱ्याच धंद्यांत प्रोड्यूसरगॅस वापरला जातो. कित्येक विशेष कामांत वॉटरगॅसचा उपयोग करतात. ऑइलगॅस हा तेलांचें तीव्र उष्णमानांत ऊर्ध्वपातन करून करण्यांत येतो. हा बहुधा दिव्याकरितां वापरतात. या वायुरूप जळणांपासूनहि पुष्कळ फायदे आहेत. याचा व हवेचा पुरवठा नियंत्रित करतां येतो. हें पूर्णपणें जळतें व धूर होत नाहीं. याच्या योगानें पुष्कळच अधिक उष्णमान मिळूं शकतें. हें नळ्यांतून वाटेल तिकडे नेतां येतें.

**जळण विटा**— दगडी कोळशाची भुकटी घेऊन तीमध्यें कांहीं तरी चिकट पदार्थ मिसळून व साच्यामध्यें दाबून त्याच्या विटा पाडण्यांत येतात. या जळणाच्या कामीं वापरतात. या मंद गतीनें जळतात. भट्टया पेटविण्याकरितां वगैरे यांचा उपयोग करतात. प्रथम या फ्रान्समध्यें तयार होऊं लागल्या. सध्यां ह्या बहुतेक दक्षिण वेल्समध्यें होतात. आपल्याकडेहि कोळसे महाग झाले तेव्हां बदामी आकाराच्या कोळशाच्या अशा विटा बाजारांत येऊं लागल्या; पण या जळण्यास फार वेळ लागे व आंत विटकरीची किंवा मातीची भुकटीहि निघे. म्हणून याचा अद्यापि फारसा प्रचार झाला नाहीं.

**जळू**— हा वलयान्वित कृमींपैकीं एक रक्तशोषक प्राणी आहे. हा दलदलीच्या जागीं किंवा गोड्या पाण्याच्या डबक्यांत राहतो. याचा उपयोग वैद्य लोक फार पूर्वींपासून शरीरांतील दूषित रक्त शोषून घेण्याच्या कामीं करीत आले आहेत. याच्या तोंडामध्यें करवतीसारखे तीन जबडे असतात व त्यांच्या साह्यानें तो तीन शाखा असलेलें Y या आकाराचें एक क्षत पाडतो; त्या आकारामुळें तें बंद करण्यास कठीण असतें. यानें अशुद्ध रक्त पुरेसें शोषून घेतल्यावर याला क्षतापासून सोडवून घेतात व त्याचें शरीर पिळून किंवा मिठाच्या पाण्यांत ठेवून तें रक्त त्यास ओकून टाकावयास लावतात.

**जाई**—[ लॅ. जास्मिनम् ]. या वेलीचें मूलस्थान आशिया खंडांतील उष्ण देश आहे. फुलाच्या रंगावरून जाईचे दोन प्रकार होतील. एक पांढरी व एक पिवळी. या पुष्पाच्या सुगंधामुळें हें झाड फार प्राचीन काळापासून अरब लोकांना व आर्य लोकांना माहीत होतें असें दिसतें. जाईचा वेल मोठा होतो. जाईचीं फुलें पांढरीं असून सुकुमार, नाजूक व सुवासिक अशीं

असतात. जाईच्या पानांचा रस व्रणशोधक आहे, असें आर्य वैद्यकाचें मत आहे. जाई किंवा चमेली यांचीं सुवासिक तेलें तयार करतात.

**जाकोबाइट**—१. एक ख्रिस्ती पंथ. इ. स. ४५१ मध्यें चाल्सिडॉन येथें जी सभा भरली तीमध्यें मोनोफिझाइट यांचे अनेक पंथ बनले. यांपैकीं बऱ्याचशा पंथांचें सातव्या शतकामध्यें जेकब बर्डो यानें एकीकरण करून त्यांवर ॲंटिऑक येथें एका मुख्य धर्मोपदेशकाची स्थापना केली. यावरून या लोकांस जाकोबाइट असें म्हणूं लागले. सीरिया, मेसापोटेमिया, वगैरे प्रांतांतील जाकोबाइट पश्चिम सीरियांतील ॲंटिऑक पंथाचे विधी पाळतात व त्यांचा मुख्य धर्मोपदेशक ( पॅट्रिआर्क ) स्वतंत्र आहे. यांच्यापैकीं जे कॅथॉलिक आहेत तेहि तेच विधी पाळतात पण त्यांचा मुख्य धर्मोपदेशक स्वतंत्र आहे त्यास ॲंटिऑर्क सीरिअन पॅट्रिआर्क म्हणतात.

सतराव्या शतकामध्यें मलबारमधील सेंट थॉमसच्या अनुयायांपैकीं कांहीं ख्रिस्ती लोकांनीं खाल्डिक विधींचा अंगीकार केला व ते जाकोबाइट पंथांत शिरले. व हळूहळू त्यांनीं पश्चिम सीरियांतील ॲंटिऑक येथील विधींचें पालन करण्यास सुरुवात केली. यांच्यामध्येंहि बरीच फाटाफूट झाली. सध्यां त्यांच्यामध्ये दोन भेद आहेत : एक जाकोबाइट पॅट्रिआर्कची सत्ता मान्य करणारे व दुसरे त्यास विरोध करणारे.

२. इंग्लंडांत १६८८ त दुसऱ्या जेम्स राजाला पदच्युत केल्यानंतर जे त्याचे अनुयायी पुढील इंग्लंडच्या राजांना मानीत नसत त्यांना हें नांव देण्यांत येतें. स्कॉटलंड आणि आयर्लंड या भागांत यांची संख्या बरीच असे. पण १७४५ त यांची चळवळ कायमची दडपली गेली. पुढें कांहीं जण लेजिटिमिस्ट या नांवानें पुढें आले. ते अद्यापि पहिला चार्लस ज्या दिवशीं फांसावर गेला तो ३० जानेवारीचा दिवस पाळतात.

**जाकोबाबाद**—पाकिस्तान. सिंध प्रांतांत हा तालुका आहे. याचें क्षे. फ. ४६० चौ. मै. आहे. मुख्य शहर जाकोबाबाद असून ९८ खेडीं आहेत. या तालुक्याला बेगारी कालवा व डेझर्ट कालवा या दोन कालव्यांचे पाणी मिळतें.

जाकोबाबाद हें तालुक्याचें मुख्य ठिकाण. शहर जनरल जॉन जेकब यानें वसविलें आहे. तें दोन मैल लांब व एक मैल रुंद आहे. दिवाणी व फौजदारी कचेऱ्या, दवाखाना, तुरुंग व व्यापारी काफिल्यांकरितां सोयी आहेत. येथून धान्य, तूप व कातडीं यांचा मोठा व्यापार रेल्वेमार्गानें चालतो. येथील उष्णमान सर्व हिंदुस्थानांत अधिक असतें.

**जागल्या**— पूर्वी ग्रामसंस्थेंत जे अनेक वर्ग असत त्यांपैकीं जागल्यांचा एक वर्ग असे. कांहीं ठिकाणीं जागल्या हा बारा बलुतेदारांत धरण्यांत येतो. हा बहुधा महारासारख्या अस्पृश्य जातीचा असतो. याचें काम रात्रीं गस्त घालून गांवाला सावध ठेवणें, जाग राखणें हें असलें. एकनाथी भारुडांत जागल्यावर पदें आहेत. हाक्ये किंवा तराळ हेहि जागल्याप्रमाणें गस्त घालतात.

**जाट**—यांची मुख्य वस्ती पंजाबमध्यें असून तेथें हे शेतीचा धंदा करतात. एकंदर जाट लोकांची संख्या ( १९४१ ) २,०२,०७० आहे. पण हा आंकडा बरोबर वाटत नाहीं. जाट हिंदु, मुसलमान व शीख या तिन्ही धर्मांत आहेत. कनिंगहॅम व टॉड हे जाटांस इंडो सिथियन म्हणतात; तर महाभारतांत वाहीक लोकांचें वर्णन आहे, तें जाटांचेंच वर्णन असावें, असा विल्सनचा तर्क आहे. कांहीं लोक म्हणतात की, महाभारतांतील जरठ हेच जाट होत. रिस्लेच्या मतें जाट शब्द जथ ( जमा करणें ) यापासून निघाला आहे. निरनिराळ्या लढणाऱ्या लोकांच्या समूहाला जाट असें म्हणत असावेत असें तो म्हणतो. इतिहासांत जाटांचा उल्लेख प्रथम इ. स. ९१२ पूर्वी इब्नखुददिबमध्यें आढळतो. अरब लोक हिंदूंना जाट म्हणत, असें मुजमिल–उत्–तवारीखमध्यें लिहिलें आहे.

यांच्या चालीरीती गुजर व अहीर लोकांप्रमाणेंच आहेत. जाट स्वतःची उत्पत्ति दक्षयज्ञाचा विध्वंस करण्याकरितां महादेवानें जटेंतून जे दोन वीर निर्माण केले त्यांच्यापासून झाली असें सांगतात.

हे लोक लग्नें करण्यास ब्राह्मण उपाध्याय बोलावितात. मध्यप्रांतांतले जाट पक्षी खात नाहींत. हे दाढी व केंस कापीत नाहींत. मध्य पंजाबांत ते शीख धर्माचे आहेत. पश्चिम भागांत बहुतेक मुसलमान आहेत. पंजाबांत हे लोक शेती करतात व कांहीं जण सैन्यांत नोकरी करतात. काश्मीर संस्थानांत यांची संख्या पूर्वी दीड लाखापर्यंत असून तेथें ते मुसलमान, हिंदु व शीख या तिन्ही धर्मांचे आहेत.

**जातक**—बौद्ध वाङ्मयांतील एक विशिष्ट प्रकारचें साहित्य. त्यांत बोधिसत्त्वाच्या म्हणजे बुद्धाच्या अनेक पूर्वीच्या जन्मांच्या कथा सांगितल्या आहेत. जातक म्हणजे पूर्वजन्म. तिपिटक ग्रंथाचा जातक हा एक पोटभाग आहे.

धर्मतत्त्वांचा उपदेश सामान्य जनसमूहाला रुक्ष व कंटाळवाणा होऊं नये म्हणून मधून मधून गोष्टी सांगणें किंवा सर्व उपदेश गोष्टींच्या रूपानें करणें, ही सर्व धर्मप्रचारकांची युक्ति आहे. हिंदु धर्मांतील सर्व 'पुराण' वाङ्मयाचा हाच उद्देश आहे. बुद्धानेंहि स्वधर्मोपदेशांत हा प्रकार सुरू केला. बुद्धाचे अनेक पूर्वजन्म झाले होते; त्यांत राजा, व्यापारी, सरदार, अस्पृश्य किंवा हत्ती किंवा मानवेतर प्राण्याचे जन्म बुद्धानें घेतले

होते. पूर्वकालीन कोणतीहि एखादी गोष्ट घेऊन कथाविषयक एखादी स्पृहणीय व्यक्ति म्हणजे बुद्ध होय, असें सांगणें सोपें होतें. याप्रमाणें जातक कथांची उत्पत्ति झाली. 'जातक' हा बौद्धांच्या धार्मिक ग्रंथांपैकीं आहे. जातक ग्रंथ हा गाथांचा समुदाय असून त्याचे २२ निपात आहेत. हा ग्रंथ बहुतेक पद्यमय पण कांहीं ठिकाणीं गद्यमय आहे.

**जातकर्म**—हिंदु लोकांतील १६ संस्कारांपैकीं एक संस्कार. बालक जन्मास येतांच पित्यानें त्याचें मुखावलोकन करणें व गर्भाशयामध्यें बालकास जें गर्भांबुपान घडलें असेल त्या दोषाचें निरसन करणें हा जातकर्माचा उद्देश आहे. कुमार जन्मास आल्याचें वृत्त कळतांच पित्यानें स्नान करावें आणि (त्या बालकास दुसऱ्या कोणीं स्पर्श करावयाच्यापूर्वीं व त्याचें नालच्छेदन होण्यापूर्वीं) मध आणि तूप यांमध्यें सुवर्ण उगाळून तें बालकाकडून प्राशन करवावें. या प्राशनानें गर्भांबुपानाचा दोष नाहींसा होतो.

**जातमुचलका**—कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखादा इसम एखाद्या दिवाणी, फौजदारी, किंवा इतर कोर्टांत न्यायाधीशाला किंवा मॅजिस्ट्रेटला, त्या कोर्टांत नेमलेल्या वेळीं हजर राहण्याबद्दल किंवा शांतता राखण्याबद्दल, वगैरे जो लेख लिहून देतो, त्याला जातमुचलका म्हणतात.

**जातिफलादि गुटिका**—एक आयुर्वेदीय औषध. यांत जायफळ, सैंधव, कपर्दिक, सुंठ, अफू, धोत्र्याचें बीं, पिंपळी हीं औषधें असतात. जुनाट अतिसार, पोटांत कळ, वांति, कॉलऱ्यासारखे जुलाब, इत्यादि विकारांवर या औषधाचा स्तंभक म्हणून चांगला उपयोग होतो. रोगाच्या जीर्णावस्थेंत हें औषध दिल्यानें बरें वाटतें. १ ते २ गोळ्या ताक, मध, कुटजारिष्ट किंवा दाडीमावलेह यांत देतात.

**जाती**—जाती म्हणजे समान आचार–विचारांचे अगर संस्कृतीचे मानवसंघ. जात जन्मसिद्ध असते. जातीमध्येंच विवाहसंबंध होण्याचा निर्बंध असल्यामुळें जात टिकते म्हणजे तिचें स्वरूप कायम राहतें. हिंदुस्थानांतील जाती म्हणजे संस्कृतीच्या कमी-अधिक टप्प्यांवर स्थिर झालेले लोकसमूह. धंद्याचा परिणाम संस्कृतीवर होत असल्याकारणानें जातीचे धंदे निश्चित झाले. मूलतः कोणतीहि जात श्रेष्ठ अगर कनिष्ठ नाहीं. प्रत्येक जात आपणांस स्वतंत्र समजते. सर्व अन्तर्गत व्यवहारांत प्रत्येक जात स्वयंशासित असते. कर घेण्यापलीकडे राजसत्ता जातींच्या कारभारांत लक्ष घालीत नसे. राजसत्ता अल्पाधिकारी असे तेव्हां जातिसंस्था प्रबल असत. आतां राजसत्ता सर्वव्यापी होत चालली आहे. त्या मानानें जातिसत्ता संकुचित होत आहे. बहिष्कार ही जातीला देतां येण्यासारखी शिक्षा; परंतु ह्या बहिष्काराची भीति आतां कोणाला वाटण्याचें कारण नाहीं; बहिष्कारानें माणसाचें यत्किंचितहि नडत नाहीं. जातीजातींत उच्चनीचत्वाची कल्पना पावित्र्यविचारानें उत्पन्न केली. पावित्र्याधिक्यानें कांहीं जातींना इतर जाती श्रेष्ठ मानीत. असें होणें स्वाभाविक आहे. परंतु स्वतः श्रेष्ठ मानून इतरांची अवहेलना होऊं लागली तेव्हां समाजाची अधोगति झाली. तसेंच परिस्थितीनें उत्पन्न झालेल्या चालीरीतींना जात चिकटून राहूं लागली व त्या चालीरीतींना धर्माचें स्वरूप आलें तेव्हां सुधारणेचा मार्ग खुंटला. वडारी समाजांत स्त्रियांनीं चोळी घालतां कामा नये; घातली तर अधर्म होईल, ही कल्पना विघातक झाली. पेशवाईंत हीच चूक झाली. पेशव्यांनीं निःपक्षपातानें प्रत्येक जातीच्या चालीरीतींचें संरक्षण केलें; परंतु असत् चाली सोडून शिष्ट चाली स्वीकारण्याचा जातीला अधिकार आहे ही गोष्ट त्या वेळीं कोणाच्याच लक्षांत आली नाहीं व अजूनहि पुष्कळांना ही गोष्ट समजत नाहीं. म्हणून ते अस्पृश्यता निवारण्याला विरोध करतात. चार वर्णांच्या असंख्य जाती झाल्या हा समज चुकीचा आहे. उलट अनेक जातींना वर्णपद्धतीनें एकत्र आणलें. एका वर्णांत पुष्कळ जाती असतात. त्यांचा आपआपसांत रोटीबेटीव्यवहार होत नाहीं, हें ब्राह्मण वर्णावरून समजण्यासारखें आहे. ब्राह्मणांत शाकाहारी, मत्स्याहारी, मांसाहारी, अशा अनेक जाती आहेत. शिवाय त्यांच्यांतहि स्थलपरत्वें असंख्य पोटजाती निर्माण झाल्या आहेत. दळणवळणाचा अभाव हें एक जाती पडण्याचें कारण आहे. तथापि सांस्कृतिक दृष्ट्या चालीरीतींतील भेद हेंच जातिभेदांतील मुख्य कारण मानलें जातें. सांस्कृतिक ऐक्य व आचारधर्मांचा लोप ह्यांच्या योगानें जातिसंस्था दुर्बल झाल्यावांचून राहणार नाहीं. आज गीतेंत वर्णिलेला मानवधर्म सुटल्यामुळें जातिभेदाला विकृत स्वरूप आलें आहे. व्यक्ति, जात, राष्ट्र, व मानवजात ह्यांच्या संबंधानें जीं कर्तव्यें त्यांच्या अज्ञानामुळें जातिसंस्थेचे दोषच अनुभवास येतात.

हिंदुस्थानांत असंख्य जाती, पोटजाती आहेत हें अक्षरशः खरें आहे. कारण मुंबई इलाख्यांतच सुमारें ५०० जाती आढळतील. १८७१ सालची जेव्हां पहिली नीट खानेसुमारी झाली तेव्हां या सर्व जातींची यादी सरकारनें केली होती; पुढील खानेसुमारींतून जाती कमी नोंदण्याचें धोरण आलें. १९४१ च्या खानेसुमारींत नुसत्या 'ट्राइब्स' (गण–वर्ग) देण्यांत आल्या तरी त्यांची संख्या १७५ भरली.

महाराष्ट्रांतील जाती व पोटजाती (पहिल्या खानेसुमारीच्या वेळीं ही यादी केलेली होती) पुढीलप्रमाणें आहेत :—

१. ब्राह्मण—(१ देशस्थ, २ देवरुखे, ३ द्रविड, ४ गोवर्धन,

५ गुजराथी, ६ गौडसारस्वत, ७ गोळक, ८ जवळ, ९ कण्व, १० कनोज, ११ कोंकणस्थ, १२ कऱ्हाडे, १३ कास्त, १४ मारवाडी, १५ माध्यंदिन, १६ शेणवी, १७ मैलाणी, १८ तेलंग, १९ पळशे, २० तिळगुळ, २१ पाराशर, २२ विदूर ).

२. प्रभु—( १ ध्रुव, २ कायस्थ, ३ पाताणे, ४ वेल्हाळी ).

व्यापारी—

३. अगरवाले—( १ सच्चे, २ दसा, ३ विसा, ४ मराठे ).

४. भनगर. ५. ब्रह्मक्षेत्री. ६. किराड, ७. कोमटी—( १ जैन, २ रायपोळ, ३ वैश्य ). ८. लोहाणे. ९. तांबोळी. १०. लिंगायत. ११. गुजराथी वाणी—( १ मेश्री किंवा ब्राह्मण, २ श्रावक ). १२. मारवाडी वाणी—( १ ओसवाल, २ पोरवाल ). १३. वैश्य वाणी.

शेतकरी—

१४. चारी. १५. काची. १६. कुणबी. १७. मराठा. १८. माळी—( १ हाळदे, २ जिरे, ३ कड्ड, ४ लिंगायत, ५ फुल ).

कारागिरी—

१९. बढाई. २०. बेलदार-(१ परदेशी, २ मराठे ). २१. भडभुंजी-( १ परदेशी, २ मराठे ). २२. भावसार. २३. बुरूड—( १ जात, २ कानडी, ३ लिंगाईत, ४ मराठा, ५ परवारी, ६ तैलंग ). २४. चांभार—( १ दक्षिणी किंवा देशी, २ कोंकणी, ३ कटई, ४ मांगमोची, ५ बंगाली ). २५. परदेशी चांभार—( १ अहिरवे, २ जातवे, ३ कुळद, ४ जांगडे, ५ ढोर, ६ मद्रासी, ७ गुजराथी मोची ). २६. गौंडी—( १ गुजराथी, २ कामाठी, ३ परदेशी, ४ जात, ५ लिंगाईत ). २७. घिसाडी. २८. हलवाई—( १ अहीर, २ लिंगाईत, ३ मारवाडी, ४ शिंपी, ५ मराठे, ६ परदेशी, ७ तेली ). २९. जिनगर. ३०. काचारी—( १ मराठे, २ लिंगाईत ). ३१. कासार—( १ मराठा, २ जैन ). ३२. कातारी. ३३. खत्री—( १ सोमवंशी, २ सूर्यवंशी, ३ सुर्ती ). ३४. कोष्टी. ३५. कुंभार—( १ मराठी, २ परदेशी ). ३६. लखेरी. ३७. लोहार—( १ मराठी, २ पांचाळ ). ३८. लोणारी. ३९. निराळी—( १ चिलीवंत किंवा लिंगाईत, २ मराठे ). ४०. ओतारी. ४१. पाथरवट—( १ मराठा, २ कामाठी, ३ तैलंग ). ४२. राऊळ—( १ गोसावी, २ अकरमासे ). ४३. साळी—( १ मराठा, २ पद्म ). ४४. सनगर. ४५. शिंपी—(१ चतुर, २ कोंकणी, ३ मराठे, ४ नामदेव, ५ पंचम, ६ शेतवाल, ७ श्रावक किंवा जैन ). ४६. सोनार—(१ अहीर, २ लाड, ३ कोंकणी, ४ दैवज्ञ, ५ पांचाळ, ६ देशी ). ४७. सुलतनकर. ( आलितकर ). ४८. तांबट—( १ कोंकणी, २ पांचाळ, ३ गुजर ). ४९. तेली—( १ परदेशी, २ शनवार, ३ सोमवार, ४ लिंगाईत ). ५०. झारेकरी.

वाजंत्री—

५१. घडशी. ५२. गुरव ( नौकरी ).

५३. न्हावी—( १ गंगातीरकर, २ घाटी, ३ गुजराथी, ४ खानदेशी, ५ कुणबी, ६ मद्रासी, ७ मारवाडी, ८ परदेशी, ९ तैलंग, १० वायदेशी, ११ वाजंत्री ).

५४. परीट—( १ मराठी, २ कोंकणी, ३ परदेशी ).

मेंढपाळ वगैरे—

५५. धनगर. ५६. गौळी—( १ अहीर, २ कोंकणी, ३ मराठा, ४ नगरकर, ५ वजरकर ).

मासे मारणारे—

५७. भोई—( १ कड्ड, २ कामाठी, ३ मराठे ).

५८. कोळी—( १ चुंबळे, २ कोंकणे, ३ अकरमासे ).

मजूर—

५९. भंडारी—( १ कित्ते, २ शिंदे ). ६०. छपरबंद. ६१. कलाल. ६२. कामाठी. ६३. लोधी. ६४. रजपूत—( १ भारद्वाज, २ महिराव ). ६५. रादी—( १ पकपक, २ मतमत).

फिरस्ते—

६६. बेरड, भिल्ल. ६७. कैकाडी—( १ मराठे, २ कातकरी ).

६८. फांसेपारधी—( १ पारधी, २ फांसेपारधी, ३ वाघ्री ).

६९. कातकरी. ७०. ठाकर. ७१. वडारी—( १ गाडी, २ जाती, ३ माती ). ७२. वंजारी—( १ मरायी, २ कोंगाडी ).

हलके नोकर—

७३. रामोशी—( १ चव्हाण, २ जाधव ). ७४. ढोर. ७५. हलालखोर—(१ लालबेग, २ शेख ). ७६. महार—( १ अंधवण, २ डौळी, ३ लडवण, ४ पान, ५ सोमवंशी, ६ शिलवण, ७ सुर्ती ). ७७. मांग—( १ अकरमासे ).

भिक्षेकरी—

७८. गोंधळी—( १ कुंभार, २ कदंबराई, ३ रेणुराई, ४ करमासे ). ७९. आराधी. ८०. होलार. ८१. कोल्हाटी—( १ डुकर, २ पोत्रे, ३ पाल, ४ काम ). ८२. वैदू—( १ झोळीवाले, २ चटईवाले, ३ दाढीवाले). ८३. वासुदेव—(१ मराठा, २ कड्ड). ८४. मामटे, उचले. ८५. भराडी—(१ गोड, २ कड्ड). ८६. भाट—( १ मराठी, २ गुजराथी ). ८७. सुते. ८८. चित्रकथी. ८९. गोसावी. ९०. जंगम. ९१. जोगती. ९२. जोहारी. ९३. कानफाटे. ९४. मानभाव. ९५. पांगुळ. ९६. जोशी सरवडे. ९७. जोशी सहदेव. ९८. तिरमली. ९९. वाघेमुरळी. १००. वीर.

जैनांतहि पंचम (जैन), भाट, भंडारी, चतुर्थ, गांधी, जती, गुरव, कोष्टी, मानभाव, श्रावक, श्रीमाळी, यांसारखे भेद आहेत.

मुसलमानांतहि सय्यद, शेख, मोल, पठाण, वोहरी, मेमान, मोमीन, खोजा, फकीर, मालेक, असे भेद आहेत.

मोठ्या जातींची माहिती स्वतंत्रपणें लेखांतून दिली आहे.

**जाती-निर्बंध-निवारणाचा कायदा** (ऊर्फ १८५० चा धर्मस्वातंत्र्याचा कायदा)—जातिभ्रष्ट किंवा धर्मांतर झालेल्या इसमाला वारसा हक्काची मिळकत मिळत नाहीं, असा जुना हिंदु धर्मशास्त्रांतील नियम आहे. ब्रिटिश अमदानींत जातिभ्रष्ट होण्याचें मुख्य कारण आंतरजातीय विवाह म्हणजे निरनिराळ्या जातींच्या वधूवरांचे विवाह होऊं लागले. ख्रिस्ती व मुसलमानी धर्म स्वीकारण्याचाहि क्रम चालू होता, आणि ब्रिटिश राज्यकर्ते ख्रिस्ती धर्माचे असल्यामुळें ख्रिस्ती धर्म स्वीकारणाला वारसाहक्काची मिळकत मिळत नाहीं, हा राज्यकर्त्यांना मोठा अन्याय वाटूं लागला. तसेंच हिंदूंना कोणत्याहि जातीजातींत विवाह करण्यास अडचण नसावी, असें पाश्चात्य विद्याविभूषित सुधारक मताच्या विद्वान् पुढाऱ्यांना वाटूं लागून तसे कायदे करण्याबद्दल या पुढाऱ्यांनीं सरकारकडे मागणी केली. म्हणून 'जाति-निर्बंध निवारण' असें नांव देऊन कायदा करण्यांत आला. त्याचें महत्त्वाचें कलम येणेंप्रमाणें— धर्मांतर किंवा जातिभ्रष्टता हें वारसाहक्क न मिळण्याला, अगर मनुष्याच्या हातीं असलेली कोणतीहि मिळकत किंवा हक्क त्याच्या हातून नष्ट होण्याला योग्य असें कारण मानलें जाणार नाहीं (कलम १). मिशनऱ्यांचा कावा साधण्याकरितांच सरकारनें हा कायदा केला, असें डॉ. गौर म्हणतात.

**जातें**—कोणत्याहि पदार्थाची चिरडून पूड करण्याच्या पद्धतीला दळणें म्हणतात. दळण्याच्या साधनास जातें म्हणतात. यांत दोन तळ्या असतात. एक खालची व एक वरची. वरच्या तळीच्या मध्यभागीं एक छिद्र असतें त्यांतून दळण्याचा पदार्थ आंत घालण्यांत येतो. यास वैरणें म्हणतात. नंतर वरची तळी फिरवून तो पदार्थ दोन्ही तळ्यांच्या मध्यें चिरडून बारीक करण्यांत येतो. जात्याची वरची तळी हातानें किंवा यंत्राच्या साहाय्यानें फिरवण्यांत येते. कांहीं ठिकाणीं खालची तळी फिरणारी व वरची स्थिर अशी रचना केलेली असते. कांहीं जात्यांत तळ्या उभ्या ठेवून त्या फिरण्याची व्यवस्था केलेली असते.

दळण्याचे पदार्थ जसे असतील त्या मानानें जात्याची रचना केलेली असते. दगड बारीक करावयाचे असल्यास पोलादी जड जबड्यांची रचना केलेली असते. गारेची बारीक भुकटी करण्याकरितां हातोड्यांच्या रांगेसारखी रचना केलेली असते. धान्य भरडण्याकरितां सैल घरटाची किंवा लांकडाच्या घरट्याची योजना असते. ज्या मानानें जाड-बारीक भुकटी किंवा पीठ करावयाचें असेल त्या मानानें जातें सैल किंवा घट्ट बसवावयाचें असतें.

**जादम**—नर्मदेच्या खोऱ्यांत राहणाऱ्या यदुवंशीय क्षत्रियांची ही एक जात बनली आहे. ५६ कोट यादवांपैकीं सर्वांचा नाश झाल्यानंतर एकच बाई शिल्लक राहिली व तिचाच मुलगा पुढें मथुरेचा राजा झाला असें म्हणतात. यादवांचीं मुख्य घराणीं करौली संस्थानचीं व जैसलमीर संस्थानचीं राजघराणीं होत. जादम लोक मालगुजारी, कास्तकारी, शेतांत काम करणें, वगैरे धंदे करतात. रानडुक्कर व मासे खाण्यास यांस प्रतिबंध नाहीं. हे जिझोटिया व सनाढ्य ब्राह्मणांच्या हातची 'कची' रसोई खातात. ब्राह्मण लोक यांच्या हातचें पाणी धातुपात्रांतून पितात; मृत्तिकापात्रांतून पीत नाहींत. यांच्या भित्रेपणाबद्दल 'पत्ता खटका जादम सटका' अशी म्हण पडली आहे.

**जादू**—अस्वाभाविक रीतीनें कांहीं घटना घडवून आणणाऱ्या चमत्कारास जादू म्हणतात. मंत्रसामर्थ्यानें किंवा अतींद्रियशक्तीनें योगी किंवा दैवी पुरुष जे चमत्कार करतात त्यांचा व सामान्य जादुगारांच्या चमत्कारांचा वर्ग निरनिराळा मानला पाहिजे. तथापि हा विवेक राहत नसतो. प्राचीन काळापासून आपल्याकडच्याप्रमाणेंच ईजिप्त, ॲसीरिया, बाबिलोनिया, वगैरे राष्ट्रांतून जादूचे प्रयोग धार्मिक विधींत स्वीकारलेले होते. ग्रीक-रोमन लोकांनींहि यांचेंच अनुकरण केलें. यज्ञयाग, मंत्र-तंत्र, चिन्हें, ताईत, वगैरे गोष्टींना अलेक्झांड्रियांत इ. स. २ ऱ्या ते ४ थ्या शतकांत ऊत आला होता. मध्यकालीन युरोपांत ज्यू लोकांच्या द्वारें जादूटोण्याची प्रथा पुष्कळच होती. स्वास्थ्यासाठीं अद्यापिहि जादूच्या चमत्कारांतील विश्वासाप्रमाणें यज्ञ, मंत्र-तंत्र, गंडेदोरे, अंगारेधुपारे, इ. वर पुष्कळ बुद्धिवाद्यांचाहि विश्वास असतो. अडाणी लोकांत तर सर्रहा अशा चमत्कारांचीच माथेफिरूपणानें कास धरण्यांत येते. सर्व असंस्कृत समाजांतून जादूटोणे करण्यांत-करविण्यांत येत असतात. मोठ्या धार्मिक निष्ठेनें त्यांचें प्रतिपालन होतें व जादूगारांना किंवा जादू करणाऱ्या उपाध्यायांना आदरानें वागविलें जातें.

हातचलाखी करून जादूचे खेळ जे करण्यांत येतात, त्यांचा अतींद्रियशक्तीशीं संबंध नसतो. करमणुकीचा तो एक प्रकार समजतात.

**जादूचा कंदील**—(मॅजिक लॅन्टर्न). एखाद्या वस्तूची एका पडद्यावर प्रतिमा पाडण्यासाठीं उपयोगांत आणल्या जाणाऱ्या कंदिलास पूर्वी जादूचा कंदील म्हणत. यामध्यें एका कंदिलांत एक दिवा बसविलेला असतो व कांहीं भिंगें जोडलेलीं असतात व खेळास एक पडदा लागतो. या कंदिलांत बहुधा विजेच्या

दिव्याचा किंवा चुन्याच्या दिव्याचा (लाइमलाइट) उपयोग करतात. विजेचा प्रवाह सारखा राहावा म्हणून एका प्रतिबंधकाचा (रेझिस्टंट) उपयोग केलेला असतो. चुन्याचा दिवा चुन्याच्या कांडीवर प्राण व कोळशाचा वायु यांची ज्योत पाडून उत्पन्न करण्यांत येतो. चुन्याची कांडी पांढरी दिसेपर्यंत तापविण्यांत येते, म्हणजे तिचा अतिशय उज्ज्वल प्रकाश पडतो. एका तासास सुमारें तीन घनफूट गॅस जाळावा लागतो. कज्जलवायू (कोलगॅस) ऐवजीं उज्जवायु वापरता येतो. या दिव्याचा उपयोग पारदर्शक कांचेवरील चित्रांप्रमाणें अपारदर्शक चित्रेंहि दाखविण्याकरितां होतो (एपिडायास्कोप). हा सूक्ष्मदर्शक यंत्रास जोडला असतां सूक्ष्म वस्तूंचीहि प्रतिमा अनेक लोकांस एकदम दाखवितां येते.

**जाधव घराणीं**— १. माळेगांवकर— हें घराणें धनाजी जाधवाच्या शंभुसिंग नांवाच्या मुलापासून निघालें. धनाजीच्या दोन बायका. एकीचा मुलगा संभाजी व दुसरीचे चंद्रसेन व शंभुसिंग. धनाजीनंतर चंद्रसेनास शाहूनें सेनापति करून शंभुसिंगास त्याची मुतालकी दिली. पुढें चंद्रसेन शत्रूस मिळाला. शंभुसिंगहि त्याच्याबरोबर कांहीं दिवस होता. परंतु या दोघांत वितुष्ट येऊन शंभु हा शाहूकडे परत आला. त्यानें त्याचा मान करून त्यास कोल्हापूरच्या संभाजीवरील एका स्वारींत पाठविलें. तेथें त्यानें उत्तम कामगिरी केली. जंजिऱ्यावरील एका स्वारींत प्रतिनिधीबरोबर शंभूस पाठविलें होतें. नंतर शाहूनें त्याला माळेगांव हें इनाम करून दिलें (१७३२). हा १७६० त मेल्यावर त्याचा मुलगा अमरसिंह यानें माळेगांवास राहून दौलतीचा कारभार केला. यानें कवि मोरोपंत पराडकरास आपल्याबरोबर काशीयात्रेस नेलें होतें. हा १८१७ त मरण पावला. त्याचा मुलगा रत्नसिंह हा १८७६ त मेल्यावर (याला २० हजारांचें उत्पन्न होतें) त्याचा पुत्र अमरसिंह हा जहागिरीवर आला. तो १८७८ त वारला. त्यानंतर त्याचे दत्तक चिरंजीव शंभुसिंग हे जहागिरदार झाले. यांनीं चांगला लौकिक मिळविला. हल्लीं यांचा मुलगा जहांगिरीवर असतो.

२. वाघोलीकर—हें घराणें पिलाजी जाधवाच्या वंशजांचें होय. दमाजी थोराताच्या हातून बाळाजी विश्वनाथास पिलाजीनें सोडवून आणलें. हा पेशव्यांच्याबरोबर पुष्कळ मोहिमांत हजर असे. छत्रसालच्या वेळीं बाजीरावाबरोबर याने राजाला मदत केल्यामुळें याला सागर प्रांतीं पांच गांव इनाम मिळाले. पेशव्यांचा व या घराण्याचा घरोबा विशेष होता व फौज व जातसरंजाम, इ. स. १७१८ च्या सुमारास वाघोली वगैरे गांवांचा दीड लक्षाचा, प्रथम मिळाला. यास उत्तर हिंदुस्थानांतील महालांचें उत्पन्न लाखाचें होतें. एकूण फौजेस व जातीस अडीच लक्षांचा सरंजाम होता. पिलाजीस सटवाजी म्हणून मुलगा होता. त्याला सुभानजी व जोत्याजी या नांवाचे दोन पुत्र होते. जोत्याजीचा वंश जाधववाडीस आहे. सुभानजीचा वंश वाघोलीस नांदतो. त्याला संभाजी व मळोजी असे दोन पुत्र होते. संभाजीचा पुत्र पिलाजी व मळोजीचा पुत्र लक्ष्मणराव हे १८३२ त हयात होते. या दोघांस मिळून या सालअखेरीस कन्नड परगण्यांतून तेरा गांवांचे साडेचोवीस हजार व वाघोली परगण्यांच्या मोकाश्यांतून एक हजार तीनशें रु. इतकी रक्कम मिळत असे.

३. शिंदखेडकर—मोंगलाईंतील हें शिंदखेडचें घराणें आपणांस दौलताबादच्या यादव घराण्यापैकीं म्हणवितें. यांच्या कांहीं शाखा देऊळगांव, औरंगाबाद या भागांत आहेत. लुखजीस पैठण परगण्यांतील लासनेर गांव इनाम होतें. शिंदखेड हें दौलताबादजवळ असून पूर्वी मेहकर सरकारांत मोडत असे. लुखजीनें शिंदखेडच्या मूळच्या ढोणे देशमुखास ठार मारून तेथून देशमुखी मिळविली. लुखजी हा फौजबंद सरदार होता. त्यानें निजामशहाची चाकरी केली. निजामशहानें त्याला शिंदखेड, पडतुर, खेरडें, वगैरे प्रांत खाजगत खर्चास व त्याला पंचहजारी सरदार करून फौजेच्या सरंजामास, वैजापुर, गांडापुर, फुलंबर, कन्नड, पैठण, मेहकर, वगैरे महाल लावून दिले. त्याचा व निजामशहाचा फार घरोबा होता. त्याच्या बायकोनें एकदां शहाला ओवाळणी केली; तेव्हां त्यानें दौलताबाद सरकारची देशमुखी इनाम दिली. लुखजीकडे २७ महाल व ५२ चावड्यांचा अधिकार होता. लुखजीस चार पुत्र होते. त्यांनीं चार ठिकाणीं शाखा स्थापल्या. दत्ताजीनें अडगांव, अचलोजीनें मेहुणें, बहादुरजीनें किनगांव व राघोजीनें शिंदखेड येथें आपलें ठाणें दिलें. शिंदखेडचीच शाखा पुढें देऊळगांवास आली. लुखजी मेला तेव्हां याचें वय ८० होतें. पुढें भेतोजी उर्फ जगदेव (लुखजीचा भाऊ) यास मोंगलानें पंचहजारी केलें. त्याचा मुलगा बहादुर व नातू मानसिंग हेहि मोंगली मनसबदार होते. स. १६३३ च्या लढाईंत जगदेवानें मोंगलांतर्फे निजामशहाविरुद्ध पराक्रम गाजविला होता. त्यामुळें लुखजीची देशमुखी सनद व जहागीर जगदेवाला मिळाली व शिवाय रुस्तुमराव हा किताब मिळाला. लुखजीचा मुलगा बहादुर यास जगदेवानें दत्तक घेतलें होतें. त्याचें घराणें किनगांवराजा येथें नांदत आहे. मानसिंग रुस्तुमरावाची मुलगी शाहूस (औरंगजेबाच्या कैदेंत असतां) दिली होती, तिचें नांव अंबिकाबाई (माहेरचें राजसबाई).

लुखजीचा पुत्र अचलोजी दौलताबादच्या दंग्यांत मेला. त्याचा पुत्र संताजी (सुजनसिंह) व अचलोजीची बायको यांसह लुखजीची बायको म्हाळसाबाई शिवाजीकडे गेली. संताजी हा संभाजी (शिवाजीचा वडील भाऊ) बरोबर

कनकगिरीच्या लढाईंत ठार झाला. त्याचा मुलगा संभाजी शिवाजीच्या स्वराज्याच्या कार्यांत हातभार लावीत असे.

लुखजीचा वडील पुत्र दत्ताजी याची शाखा अडगांव येथें आहे. लुखजीचा सर्वांत धाकटा पुत्र राघोजी हा देऊळगांव येथें असे. या शाखेपैकीं दत्ताजी हा मोंगलांकडेच होता. त्यांच्यातर्फे लढतांना कर्नाटकांत हा स. १६६४ त मेला. याचा मुलगा जगदेव यानेंच देऊळगांव येथें बालाजीचें देवस्थान स्थापिलें. हा १६९९ त मरण पावला. जगदेवाला राघोजी म्हणून मुलगा होता. त्यास सातारकर राजाराम छत्रपति याची कन्या अंबिकाबाई दिली होती. आंदण म्हणून राजारामानें शिंदखेड, शिरपुर, मेहकर, वगैरे गांवांचे सरदेशमुखी हक्क जावयास दिले. साखरखेडें येथें निजाम व दिल्लीचा सरदार मुबारीज यांच्यांत जी लढाई झाली तींत राघोजी हा मुबारीजच्या बाजूनें लढतां लढतां मेला ( १७२४ ). पुढें निजामनें शिंदखेड व देऊळगांव येथें राघोजीच्या कुटुंबास पकडण्याचा प्रयत्न केला असतां, त्याची आई दुर्गा, बायको अंबिका व पुत्र मानसिंग तेथून निसटून साताऱ्यास शाहूच्या आश्रयास गेले. कांहीं दिवसांनीं शाहूनें निजामाची समजूत करून मानसिंगाची जहागीर सोडविली. शाहूच्या पश्चात् मानसिंग हा ताराबाईच्या पक्षास मिळाला व रामराजाच्या विरुद्ध कारस्थान करूं लागला. पुढें ( १७५१ ) ताराबाईचा व पेशव्यांचा तह झाल्यावर हा देऊळगांकडे निघून गेला. या शाखेंतलि अखेरचा प्रसिद्ध पुरुष बाजीराव होय. एकदां त्याची व इंग्रजांच्या तैनाती फौजेची लढाई होऊन कांहीं इंग्रजी अधिकारी मारले गेले. या भांडणांत आपला कांहीं संबंध नसून अरबांचा पगार थकल्यामुळे ते अरब इंग्रजांवर उलटले असें बाजीराव म्हणे. परंतु त्याचें म्हणणें न ऐकतां त्याचें सर्व वतन खालसा करून ( स. १८५१ ) त्याला मरेपर्यंत ( १८५९ ) दौलताबाद किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. त्याचा औरस मुलगा मानसिंग व लेकावळा रासोजी होता. या रासोजीनें बाजीरावाची निजामाकडील जहागीर खटपट करून सोडविली. त्याचें वजन सहन न होऊन मानसिंगाची आई अहल्याबाई व तिचे कारभारी यांनीं त्याला विषप्रयोग केला असें म्हणतात ( स. १८३९ ). एवढेंच नव्हे तर कारभाऱ्यांनीं मानसिंगासहि थोड्या दिवसांनीं विषप्रयोग केला (स. १८७८). मानसिंगाचा मुलगा बाजीराव हा स्त्रैण व व्यसनी होता; तो औरंगाबादेस एकाएकीं वारला ( १९०६ ). दत्ताजीराव( बाजीरावाचा पुतण्या ) व बाजीरावाचा पुत्र आनंदराव हे नंतर पुढें आले.

**जाधवराव**—सोलापूर जिल्ह्यांतील करमाळें तालुक्यांत असलेल्या निंबगांव येथें हें ब्राह्मण जहागिरदार घराणें आहे. हें मूळचें भालजी चिटगुप्याचें होतें. धनाजीचा मुलगा चंद्रसेन याच्या पदरीं सदाशिवराव म्हणून कारभारी होता, तो जाधवरावाबरोबर असतां एका लढाईंत मेला. त्याचा पुत्र माधवराव यानें निजामाकडे बरीच कामगिरी केल्यानें त्याला स. १७६८ त तीन गांवें मिळून पांच हजारांची जहागीर मिळाली. निजामाकडून पेशव्यांच्या दरबारीं हा वकील होता. पुढें यानें पेशव्यांची नोकरी पत्करिली. याच्यामार्फत मद्रासकर इंग्रज, तंजावर, गढवाल व सुरापुर या संस्थानांचीं पेशव्यांशीं बोलणीं-चालणीं होत असत. याला फौजसरंजाम कांहीं नव्हता. मात्र वकिलीच्या कामासाठीं हत्ती, हलकारे व जासूदजोड्या वगैरे सरंजाम याच्या पदरीं असे. निजामाकडून यास स. १७६९ त पंधरा हजारांची जातसरंजाम जहागीर मिळाली. निंबगांव, टाकळी, वडगांव, वाघोली, वगैरे मिळून ही पंधरा हजारांची जहागीर होती. पेशवे दरसाल तैनातीचे पांच हजार देत असत. बाजीराव पेशव्यानें यापैकीं बरीचशी जहागीर जप्त केली. माधवराव सन १७८६ च्या सुमारास वारला. मूळचे चंद्रसेन जाधवाच्या पदरचे म्हणून यांना जाधवराव हा किताब अद्यापपर्यंत चालू आहे.

**जॉन**—हा जीझस ख्राइस्टनें आपल्या धर्माच्या प्रसारकार्याकरितां पाठवलेल्या १२ प्रेषितांपैकीं एक होय. त्याला सेंट जॉन दि एव्हॅन्जेलिस्ट हें नांव असून त्यानें चौथें गॉस्पेल ( शुभवर्तमान ), तीन एपिसल्स (पत्रें ) आणि रिव्हेलेशन ( प्रकटीकरण ) हे ग्रंथ लिहिले. जॉन हा झेबेली आणि सालोम यांचा मुलगा आणि जेम्सचा भाऊ होय. जीझसनें त्याला बोलावण्यापूर्वी जॉन हा गॅलीला समुद्रावर आपला बाप व भाऊ आणि सायमन पीटर व अँड्र्यू यांच्याबरोबर मासे मारण्याचा धंदा करीत असे. पुढें जीझसच्या अनुयायांमध्यें जॉन, पीटर व जेम्स हे तिघेच जीझसच्या अधिक विश्वासास पात्र झाले, आणि जॉन हा जीझसचा आवडता पट्टशिष्य बनला.

**जॉन** ( ११६७-१२१६ )—या नांवाचा एकच राजा इंग्लंडांत झाला. हा दुसऱ्या हेन्रीचा सर्वांत धाकटा मुलगा पहिल्या रिचर्डनंतर ११९९ त गादीवर आला. तो अनियंत्रित राज्यकारभार करणारा, खुनी व जुलमी निघाला. हा अत्यंत अपयशी ठरला. फ्रान्सशीं युद्ध झालें त्यांत नार्मंडी प्रांत यानें गमावला; पोपशीं चांगला भांडला, पण शेवटीं त्याला शरण गेला; व सरदारांशीं वांकडें येऊन 'मॅग्नाचार्टा' ( महाधिकारपत्र ) ही प्रजेच्या हक्कांची सनद त्याला १२१५ त नाइलाजानें करून द्यावी लागली. आपली पहिली बायको टाकून एका फ्रेंच राजकन्येशीं त्यानें दुसरें लग्न केलें.

**जॉन डि ब्रिटो** ( १६४७–१६९३ )—हा एक साधु असून याचा जन्म लिस्बन येथें एका थोर कुळांत झाला होता. यानें येशूच्या मंडळीमध्यें प्रवेश केला, तेव्हां त्याला हिंदुस्थानांत धर्मप्रचार करण्यास पाठविण्यांत आलें. तेथें त्यानें आपल्या कामांत चांगलें यश मिळविलें. याच्या उपदेशामध्यें कॅथॉलिक धर्मामध्यें बहुपत्नीत्व वर्ज्य आहे असें ऐकून मोरावा येथील राजानें आपल्या पट्टराणीशिवाय इतर सर्व राण्यांचा त्याग केला. त्यांपैकीं एकीनें आपल्या चुलत्याजवळ म्हणजे त्या देशाच्या राजाजवळ ब्रिटोबद्दल तक्रार केली. तेव्हां त्यानें ब्रिटोस तुरुंगांत टाकलें व तेथून रामनाड येथें नेऊन त्याचा वध केला. त्याचा अंत उरिपूर येथें ४ फेब्रुवारी १६९३ रोजीं झाला. पोप बारावा पायस यानें त्यास २२ जून १९४७ रोजीं साधुमालिकेंत प्रविष्ट केलें.

**जॉन दि बॅप्टिस्ट**—एक ख्रिस्ती साधु. ख्रिस्ताची आई याच्या आईची बहीण लागत असे. 'मशीहा' (ख्रिस्त)च्या आगमनाचा प्रचार करीत हा बाप्तिस्मा देत फिरे. यानेंच ख्रिस्ताचा ईश्वरी अंश ओळखून त्याला बाप्तिस्मा दिला. पण हेरॉल्ड राजानें याला कैदेंत टाकून इ. स. २८ च्या सुमारास फांशीं दिलें. २४ जून हा याचा दिवस ख्रिस्ती लोक पाळतात.

**जानपद काव्य**—'ग्रामीण वाङ्मय' पाहा. नागरी जीवनाचा कंटाळा येऊनच कीं काय नागरी कवीच खेड्यांतील विषयांकडे वळले व 'भलरी', 'न्यारीचा वकूत' यांसारखीं कुणबाऊ वाटणारीं गाणीं लिहूं लागले. त्यांतील नावीन्यामुळें तीं कांहीं काळ रुचलीं. पण जे प्रत्यक्ष हें ग्रामीण जीवन कंठतात त्यांतील माणसेंच कवी होऊन पुढें आलीं पाहिजेत. श्री. ग. ल. ठोकळ आणि ग. ह. पाटील यांचीं गीतें जिव्हाळ्याचीं आहेत, तर चंद्रशेखरांचा 'किस्मतपूरचा जमीनदार' दत्तक वाटतो. अलीकडे कोळ्यांच्या किंवा दर्यावर्दी कामें करणाऱ्यांच्या तोंडचीं म्हणून दर्यागीतें लोकप्रिय होऊं पाहत आहेत. इतर अनेक ग्रामोद्योग असे आहेत कीं, त्यांना काव्यांच्या द्वारें झिलई देण्यांत आलेली नाहीं. यापुढें खेडोंपाडीं कवी निघतील तर तेंहि होईल.

**जॉन फ्रायर**—हिंदुस्थानचा एक युरोपियन प्रवासी. सन १६७३ मध्यें इंग्रज व डच यांमध्यें युद्ध सुरू असतांना हा ईस्ट इंडिया कंपनीचा डॉक्टर म्हणून हिंदुस्थानांत मच्छलिपट्टण येथें येऊन उतरला. नंतर हा सुरतेस गेला. सुरतेहून नंतर मुंबई, जुन्नर, कारवार, गोकर्ण या मार्गांनीं इराणांत गेला. सन १६८१ मध्यें हा युरोपला परतला. सुरतेस मुसलमान फकिरांचें उद्धट वर्तन, तसेंच शिवाजीस रायगडावर राज्याभिषेक झाला त्या समयींच्या आठवणी यानें लिहून ठेवल्या आहेत. शिवाजीच्या चरित्रावर प्रकाश पाडणारें त्याचें लेखन आहे.

**जॉनसन, अँड्रू** ( १८०८–१८७५ )—अमेरिकन संयुक्त संस्थानांचा सतरावा अध्यक्ष. लहानपणींच एका शिंप्याकडे नोकर राहिला. स. १८२६ मध्यें त्यानें लग्न केलें. याच्या बायकोचें शिक्षण याच्यापेक्षां अधिक असल्यामुळें तिनेंच त्याला शाळेंतील निरनिराळ्या विषयांचें शिक्षण दिलें. तो राहत असलेल्या टेनेसी प्रांतांत पुष्कळ शेतकरी राहत असून त्यांची दैन्यावस्था सुधारण्याकडे त्याचें लक्ष गेलें. त्यांचा पुढारी म्हणून तो प्रथम राजकारणांत शिरला. लवकरच तो ग्रीनव्हिल येथील मेयर होऊन पुढें प्रतिनिधिसभेचा व १८४१ त सेनेट सभेचा सभासद झाला. तेथें तो दहा वर्षें सभासद होता. नंतर तो गव्हर्नरच्या जागीं दोनदां निवडून आला. तो सार्वत्रिक शिक्षणाचा पुरस्कर्ता असून कामकरी वर्गासाठीं काँग्रेसमध्यें नेहमीं झगडत असे. स. १८६५ मध्यें प्रेसिडेंट लिंकनचा खून झाल्यावर याजकडे अध्यक्षाचें व युनियन सरकारच्या पुनर्घटनेचें अवघड काम आलें. त्या वेळीं प्रतिस्पर्धी युद्धमान पक्षाला कठोरपणें न वागवितां त्यानें लिंकनचेंच सौम्यपणाचें धोरण चालविलें. त्यांत निग्रोंच्या हक्कांचा प्रश्नच मुख्य महत्त्वाचा होता. स. १८६९ मध्यें अध्यक्षाची मुदत खलास होतांच तो मरेपर्यंत स्वस्थ घरीं बसला.

**जॉनसन, बेंजामिन** ( १५७२–१६३७ )—एक इंग्रज नाटककार, कवि व प्रभावी साहित्यिक. त्याचें शिक्षण केंब्रिजच्या सेंट जॉन्स कॉलेजमध्यें झाल्यावर त्यानें कांहीं काळ लंडनमध्यें गवंड्याचें काम व कांहीं काळ लष्करांत नोकरी केल्यावर ॲडमिरलच्या नाटककंपनींत नट व नाटककार अशीं दोन्ही कामें करूं लागला. १५९८ सालीं जॉन्सनचें एक उत्कृष्ट नाटक 'एव्हरी मॅन् इन् हिज ह्यूमर' ( रंगांत आलेला प्रत्येक माणूस ) ग्लोब थिएटरांत सुरू होऊन तें अतिशय लोकप्रिय झालें. त्यानंतर त्यानें 'एव्हरी मॅन आउट ऑफ हिज ह्यूमर' ( रंगांत नसलेला प्रत्येक माणूस ) व आणखी दोन सुखान्त नाटकें लिहिलीं, पण तीं यशस्वी झालीं नाहींत. म्हणून त्यानें दुःखान्त नाटकें लिहिण्यास सुरुवात करून 'दि सायलेंट वूमन' (मुग्ध स्त्री, १६०९ ), 'दि आल्केमिस्ट' ( किमयागार, १६१० ), 'बार्थोलोम्यू फेअर' (१६१४), 'दि डेव्हिल इज् ॲन् ॲस्' ( सैतान गाढव आहे, १६१६), 'दि स्टेपल ऑफ न्यूज' ( बातमीचा माल, १६२५ ), 'दि न्यू इन्' ( नवीन खाणावळ, १६२९ ), 'दि मॅग्नेटिक लेडी' ( आकर्षक स्त्री, १६३२ ), आणि 'टेल ऑफ ए टब' ( पिंपाची गोष्ट, १६३३ ) हीं नाटकें आणि पुष्कळ छद्मवेष–नाटकें (मास्क), तसेंच अनेक प्रकारच्या कविता व इंग्लिश व्याकरण, वगैरे विषयांवर पुस्तकें लिहिलीं. शेक्सपिअर वगळल्यास जॉन्सन हा तत्कालीन सर्वश्रेष्ठ लेखक हाय.

त्याचीं नाटकें हल्लीं क्वचित् वाचलीं जातात, व त्याच्या नाटकांचे प्रयोग बहुधा होतच नाहींत. तथापि इंग्रज विद्वानांत जॉन्सनला थोर मानतात, कारण त्याच्या सर्व प्रकारच्या लिखाणांत विक्षिप्तपणा किंवा वाष्कळपणा कोठेंहि नाहीं; उलट मारदस्तपणा, सत्यप्रियता आणि दिलदारपणा सर्वत्र दिसून येतो.

**जॉनसन, डॉ. सॅम्युएल** (१७०९–१७८४)— एक सुप्रसिद्ध इंग्रज ग्रंथकार व शब्दकोशकार. जॉन्सनचा बाप पुस्तकें विकणारा होता. त्याचा प्राथमिक विद्याभ्यास लिचफील्ड गांवीं झाला. त्याची बुद्धि अति चलाख व स्मरणशक्ति विलक्षण असल्यामुळें जें एकदां वाचलें किंवा ऐकिलें तें त्याच्या कायम लक्षांत राहत असे. १९ व्या वर्षी तो ऑक्सफोर्ड विद्यापीठाच्या पेंब्रोक कॉलेजांत राहिला. पण पुढें तीन वर्षांनीं खर्च न झेपल्यामुळें पदवी घेण्यापूर्वींच तो घरीं परत आला. तथापि लहानपणापासून बापाच्या दुकानांतले ग्रंथ वाचण्याचा नाद लागल्यामुळें जॉन्सला लॅटिन, ग्रीक, इटालियन या भाषांचेंसुद्धां इतकें ज्ञान झालें होतें कीं, त्याच्या कॉलेजांतील प्रोफेसर मंडळीहि अचंबा करीत.

याच सुमारास त्याचा बाप वारला. पुस्तकविक्रीचें दुकान चांगलें चालत नसल्यामुळें जॉन्सननें चरितार्थाकरितां एका शाळेंत नोकरी धरली, पण तेथें न जमल्यामुळें त्यानें बर्मिंगहॅम येथें जाऊन 'ॲबिसिनिया देशाची सफर' या नांवाच्या फ्रेंच ग्रंथाचें भाषांतर करून पांच पौंड मिळविले. बर्मिंगहॅम येथें असतांना जॉन्सनचा एका व्यापाऱ्याच्या एलिझाबेथ पोर्टर नांवाच्या विधवेशीं प्रेम जमून विवाह झाला. त्या वेळीं त्या बाईचें वय ४८ वर्षांचें होतें. लग्नसमयीं बायकोकडून आठशें पौंड त्यास मिळाले. त्या पैशावर जॉन्सननें एक स्वतःचें विद्यालय सुरू केलें. त्यांत इंग्लंडचा प्रसिद्ध नट गॅरिक हा एक विद्यार्थी होता. जॉन्सनच्या अंगीं शिक्षकाला लागणारे गुण नसल्यामुळें त्याचें विद्यालय लवकरच मोडलें. १७३७ मध्यें जॉन्सननें लेखणीवर चरितार्थ चालविण्याचें ठरवून तो गॅरिकसह लंडनला आला. येथें त्यानें फ्रेंच, इटालियन, लॅटिन, वगैरे ग्रंथांचीं भाषांतरें, नव्या ग्रंथांवर टीका, प्रसिद्ध पुरुषांचीं चरित्रें हें लेखन व जो जो उद्योग सांपडेल तो तो केला. तथापि लंडनमधील त्याचीं पहिलीं पंचवीस वर्षें विपत्तींतच गेलीं. कधीं कधीं तर त्याला दोन दोन दिवस अन्नावांचून काढावे लागले. कर्जामुळें दोनदां नाझरच्या शिपायानें पकडलें असतां त्याला त्याचा मित्र प्रख्यात कादंबरीकार रिचर्डसन यानें सोडविलें. जॉन्सननें लंडनमध्यें आल्यावर 'लंडन' व 'मानवी आशेचें वैफल्य' हीं दोन काव्यें, 'ऐरिन' नांवाचें नाटक, वगैरे ग्रंथरचना केली. व तेवढ्यानें त्याची प्रसिद्धि बरीच झाली. १७४७ सालीं जॉन्सनला लंडनमधील कित्येक पुस्तकवाल्यांनीं मिळून 'इंग्रजी भाषेचा कोश' तयार करण्यास सांगून १५७५ गिनी देण्याचें कबूल केलें. हा कोश ७।८ वर्षांत मोठ्या चिकाटीनें व परिश्रमपूर्वक त्यानें तडीस नेला. येथपासून त्याची संपत्ति व कीर्ति हीं वाढत जाऊन त्याचें पुढील आयुष्य बरेंच सुखाचें व स्वस्थतेंत गेलें. कोशानंतरचा त्याचा ग्रंथ प्रसिद्ध कादंबरी 'रासेलस' हा होय. १७६० सालापासून जॉन्सनची सांपत्तिक स्थिति चांगली सुधारली. तिसऱ्या जॉर्ज राजानें मंत्रिमंडळाच्या सल्ल्यावरून जॉन्सनच्या ग्रंथकर्तृत्वाबद्दल त्याला सालिना तीनशें पौंड वर्षासन सुरू केलें. येथपासून जॉन्सन तत्कालीन पंडितमंडळांत अग्रगण्य ठरून मोठमोठे विद्वान् व ग्रंथकार त्याच्याशीं शिष्याप्रमाणें वागूं लागले. जॉन्सनला वादविवादाची विशेष हौस असल्यामुळें याच सुमारास त्यानें एक 'क्लब' काढला. तो 'जॉन्सन्स क्लब' म्हणून ५०।६० वर्षें चालला होता. या क्लबांत जॉन्सनचे समकालीन बर्क, गिबन, गॅरिक, गोल्डस्मिथ, चित्रकार रेनॉल्ड्स, प्रख्यात वक्ता फॉक्स, भाषाभिज्ञ सर विल्यम जोन्स, वगैरे मंडळी असून ती दर आठवड्यास एकत्र जमत व तेथें त्यांचें जेवण व संभाषण दोन्ही बरोबर चालत. १७७७ सालीं म्हणजे वयाच्या ७० व्या वर्षी जॉन्सननें 'कविचरित्रें' हा ग्रंथ लिहिण्यास हातीं घेतला. त्यांत सॅव्हेज, कौले, ड्रायडन, पोप, ग्रे, मिल्टन, वगैरे दहा कवींचीं चरित्रें देऊन तो स. १७८१ त पुरा केला. यापुढील जॉन्सनच्या आयुष्याचीं वर्षें इष्टमित्रांचें वियोगदुःख व वार्धक्यक्लेश यांत जाऊन तो जलोदरानें १७८४ मध्यें मरण पावला. त्याचें शव वेस्टमिनिस्टरच्या विख्यात स्मशानभूमींत ठेवण्यांत आलें. आणि त्याचा पुतळा सेंट पॉल चर्चमध्यें अग्रभागीं स्थापिला आहे. त्याचा शिष्य बॉस्वेल यानें त्याचें जें सुंदर विस्तृत चरित्र लिहिलें आहे त्यावरून जॉन्सनची खरी परीक्षा होईल.

**जॉनस्टन, अलेक्झांडर कीथ**–१. (१८०४–१८७१)— एक स्कॉटिश भूगोलशास्त्रज्ञ. त्याचे महत्त्वाचे ग्रंथ आहेत ते — 'नॅशनल ॲटलास' (राष्ट्रीय नकाशा, १८४३), आणि 'ॲटलास ऑफ फिजिकल जिऑग्रफी' (प्राकृतिक भूगोलाचा नकाशा, १८४८) हे होत.

२. (१८४४–१८७९)–एक स्कॉटिश भूगोलशास्त्रज्ञ. रॉयल जिऑग्रॅफिकल सोसायटीनें पूर्व आफ्रिकेंत जी संशोधनार्थ सफर पाठविली होती, त्या सफरींत जॉन्स्टन होता, व तिकडेच बेहोबेहो या गांवीं तो अतिसाराच्या रोगानें वारला.

**जॉनस्टन, सर हेन्री हॅमिल्टन** (१८५८–१९२७)— एक ब्रिटिश प्रवासी आणि वरिष्ठ अधिकारी. १८८९ सालीं त्याला आफ्रिकेंतील न्यासा सरोवर आणि टांगानिका या

प्रदेशांत आफ्रिकन लेक्स कंपनी आणि अरब लोक यांच्यामध्यें समेट घडवून आणण्याकरितां पाठवण्यांत आलें. तेथें त्याच्या प्रयत्नांमुळें 'ब्रिटिश सेंट्रल आफ्रिका प्रोटेक्टरेट' स्थापण्यांत आलें, आणि त्या प्रांताचा कमिशनर आणि कॉन्सल जनरल म्हणून जॉन्स्टन १८९१ सालीं नेमला गेला. पुढें कांहीं काळ ट्यूनिसमध्यें कॉन्सल-जनरल, आणि १८९९ ते १९०१ त युगांडा आणि आसपासचा प्रदेश यांवर तो कमिशनर, कमांडर-इन-चीफ आणि कॉन्सल-जनरल होता. त्यानें अनेक प्रकारचीं भौगोलिक पुस्तकें प्रसिद्ध केलीं, व त्यानें ज्या कादंबऱ्या लिहिल्या त्यांत 'दि गे डॉंबिज' ही महत्त्वाची कादंबरी आहे.

**जानिसरी**—हें ऑटोमन साम्राज्याच्या काळांतील पायदळ सैन्य असून त्यापैकीं एक तुकडी तुर्की सुलतानाची खास संरक्षक सैन्य म्हणून असे. १३३० च्या सुमारास ही फौज प्रथम तयार करण्यांत आली. त्यानंतर त्या संरक्षक सैनिकांना कांहीं विशेष हक्क देण्यांत आले. पण हेच ह्या संरक्षक फौजेचे हक्क फार घातक झाले. पुढें त्या फौजेंत सुधारणा करण्याचे किंवा ती फौज काढून टाकण्याचे अनेक वेळां प्रयत्न करण्यांत आले. पण ते निष्फळ झाले. अखेर १८२६ च्या जूनमध्यें सुलतान २ रा महंमद यानें या बंडखोर जानिसरी फौजेचा मोड केला, व सैनिकांच्या राहण्याच्या बराकी जाळून टाकल्या. त्या आगींत ८,००० जानिसरी सैनिक जळून मेले. पुढें ही फौज रद्द करून तें नांवहि धारण करणें दोषार्ह ठरवण्यांत आलें. १५,००० जानिसरी सैनिकांना फांशीं दिलें. आणि २०,००० सैनिकांना हद्दपार करण्यांत आलें.

**जानी बेगम**—१. खानखानान अबदुल रहीमखान याची मुलगी. अकबर बादशहाचा मुलगा दानिएल याला दिली होती (१५९९).

२. दाराशुकोहची ही मुलगी औरंगजेबाचा पुत्र अजमशहा यास दिली होती. धारूर येथें अजमच्या गैरहजेरींत संभाजीच्या सैन्यानें जनानखान्यावर हल्ला चढवला असतां जानी बेगमनें अनिरुद्धसिंगाच्या मदतीनें मराठ्यांचा हा हल्ला मोठ्या पराक्रमानें परतवला. हिनें अनिरुद्धसिंगास त्याच्या पराक्रमाबद्दल खुष होऊन एक मौल्यवान् कंठा बक्षीस देऊन त्याचा गौरव केला.

**जानू भिंताडा**—हा एक पेशव्यांचा खिजमतगार असून मूळ पुरंदर तालुक्यांतील भिवंडी गांवचा राहणारा. पानपतावर मराठ्यांचा पराभव झाल्यानंतर सदाशिवरावभाऊची पत्नी पार्वतीबाई हिच्यावर दुर्धर प्रसंग आला असतां यानें तिजबरोबर राहून तिचें संरक्षण केलें. याचें घराणें अजूनहि भिवंडी गांवीं नांदतें आहे.

**जानेफळ**—वऱ्हाड, बुलढाणें जिल्हा, मेहकर तालुका. मेहकरच्या उत्तरेस सुमारें १० मैलांवर हें खेडेगांव आहे. लोकसंख्या सुमारें दोन हजार. गांवास गढी आहे. गांवाच्या मध्यभागीं एक दीपमाळ आहे. येथें मुकुंदराज नांवाच्या एका संताची जुनी समाधि आहे. येथील पाटिलकी शिंदखेडकर जाधवराव घराण्यांत पूर्वापार होती. येथें या जाधवांनीं एक गढी बांधली आहे. बुलढाणा जिल्हा होण्यापूर्वी या गांवींच जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें.

**जानोजी धुळप**—मराठ्यांचा एक आरमारी अधिकारी. यांचें मूळ नांव मोरे असें असून हरजीरावाचा हा मुलगा. आरमारावरील कामगिरींत हा प्रवीण असून याच्या कामगिरीबद्दल थोरला माधवराव पेशवा यानें यास अनेकवार बक्षिसें दिलीं आहेत. हैदरावरील स्वारींत सन १७६३ मध्यें यानें आरमार व फौज यांच्या साहाय्यानें होनावर बंदरांतून सोंध्यावर स्वारी केली. जमिनीवरील युद्धांतहि याची कामगिरी वाखाणण्याजोगी होती.

**जानोजी निंबाळकर** (मृ. १७६३)— एक मराठा सरदार. हा निजामच्या राज्यामधील रावरंभा निंबाळकर घराण्याचा मूळ पुरुष. याचा बाप, ज्याला शाहूनें १७०८ मध्यें सर लष्करपद दिलें तो सुलतानजी. हा पेशव्यांच्या राजकारणांत पेशव्यांच्या बाजूनें पुष्कळ पडत असे. निजामी राज्यांत सर्वांत मोठी मराठ्यांची जहागीर या रावरंभाचीच आहे. निजामउल्मुल्क मेल्यानंतर गाजीउद्दीन यास गादीवर बसवून मोंगलाई हाताखालीं आणण्याच्या नानासाहेब पेशव्याच्या मसलतीला याची अनुकूलता होती. विश्वासराव पेशव्यानें सिंदखेडची जी स्वारी निजामावर केली, तींत जानोजी हा निजामातर्फे हजर होता (१७५७).

**जानोजी भोसले** (मृ. १७७१)—नागपूरच्या रघूजी भोसल्यास जानोजी, साबाजी, मुधोजी व बिंबाजी असे चार पुत्र होते. जानोजी व साबाजी हे रघूजीस धाकट्या स्त्रीपासून झालेले व मुधोजी व बिंबाजी हे त्याच्या थोरल्या स्त्रीपासून झालेले होत. मरतेसमयीं रघूजीनें सर्वांत वडील जो जानोजी त्यास सेनासाहेब सुभ्याचा अधिकार चालविण्याबद्दल व त्याच्या लहान भावांस राज्याची वांटणी देण्याबद्दल सांगितलें. परंतु रघूजीच्या मृत्यूनंतर जानोजी व मुधोजी यांच्यामध्यें वांटणीबद्दल वाद सुरू झाले व दोघांमध्ये चकमकीहि झडल्या. पुढें हें प्रकरण नानासाहेब पेशव्यानें मिटविलें. त्यांत असें ठरलें कीं, सेनासाहेबपद जानोजीकडेच राहावें. मुधोजीस चंद्रपूर व छत्तीसगड देऊन त्यास सेनाधुरंधर असा किताब देण्यांत आला. परंतु अशी वांटणी होऊनहि हा तंटा मिटला नाहीं. जानोजी व मुधोजी यांची नांदगांव रहाट

येथें लढाई होऊन त्यांत मुधोजीचा मोड झाला. झालेल्या तहांत मुधोजीनें सर्व कारभार पाहावा असें ठरलें. सन १७६० त हा पानपतच्या लढाईवर गेला होता. राघोबानें ताराबाईस विनंति करून यास याच्या इच्छेप्रमाणें सन १७६१ मध्यें सेनासाहेब सुभ्याची सनद देवविली. हा पेशव्याविरुद्ध निजामास मिळाला होता. हा सरळ सांगून ऐकत नाहीं असें दिसतांच माधवराव पेशव्यानें निजामाशीं दोस्तीचा तह केला व मोंगलांचा दिवाण रुकनुद्दौला यासह याजवर स्वारी करून यास दर्यापूरच्या पूर्वेस खोलापूर येथें तह करावयास भाग पाडलें. सन १७६८ त माधवराव व राघोबा यांच्यामधील तंटयांत यानें राघोबाची बाजू घेतल्यानें माधवरावानें याजवर स्वारी करून यास ब्रह्मेश्वरनजीक कनकापूर येथें तह करावयास लावलें. शेवटीं यानें पेशव्यांच्यापुढें नमतें घेतलें. रघूजीच्या वेळेपासून भोसल्यांस मिळणारी बंगाल वगैरे प्रांतांची चौथाई बंगाल प्रांत इंग्रजांनीं घेतल्यापासून बंद झाली होती. ती पुन्हां भोसल्यांस मिळण्याबद्दल यानें वकिलांकडून व पत्रद्वारें केलेले प्रयत्न निष्फळ ठरले. यास मुलगा नसल्यानें यानें शेवटीं मुधोजीच्या मुलासच दत्तक घेतलें व त्यास सेनासाहेब सुभ्याचे अधिकार आपल्या पश्चात् देण्याबद्दल पेशव्यांना सांगितलें. वै. शु. १५ शक १६९२ या दिवशीं मौजे येरळ, परगणे नळदुर्ग येथें पोटशुळाच्या व्यथेनें हा मरण पावला.

**जानो विश्वनाथ**—(जनार्दन विश्वनाथ भट). बाळाजी विश्वनाथ पेशव्याचा हा भाऊ. याला जंजिऱ्याच्या नबाबानें गोणत्यांत घालून समुद्रांत बुडविलें ही समजूत चुकीची दिसते; कारण हा सन १७०६ पर्यंत तरी हयात होता, असें उपलब्ध कागदांवरून दिसतें. याची मुद्रा अशी होती—

श्रीपार्वतीकांतभक्तस्य विश्वनाथात्मजन्मनः।
जनार्दनस्य मुद्रेयं भाति लक्ष्मीगजान्विता॥

याची सून गोदूबाई ही पेशवाईअखेरपर्यंत होती.

**जॉन्स हॉपकिन्स युनिव्हर्सिटी**— अमेरिका, संयुक्त संस्थानांतील मेरीलॅंड संस्थानांतील विद्यापीठ. हें बाल्टिमोर शहरांत आहे. या शहरांतील जॉन हॉपकिन्स नांवाच्या व्यापाऱ्यानें या विद्यापीठाकरितां ३०,००,००० डॉलरची देणगी दिली. तिची स्थापना १८६७ सालीं होऊन सुरुवात १८७६ सालीं झाली. तत्त्वज्ञान आणि वैद्यक या शास्त्रांतील संशोधनांत या विद्यापीठाची मोठी कीर्ति आहे. यांत सुमारें चार हजार विद्यार्थी शिकतात व शिक्षकांची संख्या सु. आठशें आहे.

**जाफना**— हें सीलोन बेटांतील एक गांव आहे. येथील मूळचे रहिवासी तंबाखू उत्पन्न करून ती परदेशीं पाठवितात. येथें दर आठवड्यास आगबोट येत असल्यामुळें येथील व्यापारास



बरेंच उत्तेजन मिळालें आहे. १९०० सालीं येथें आगगाडी चालू करण्यांत आली. तेथील ताडाच्या झाडांपासून एक प्रकारचें सूत काढतात. लो. सं. ४५,७०८.

**जाफराबाद जहागीर**—मुंबई इलाख्यांत काठेवाडांतील एक जहागीर. ही जंजिऱ्याच्या नबाबांच्या अमलाखालीं जंजिरा संस्थान मुंबई प्रांतांत विलीन होईपावेतों होती. आता सौराष्ट्र-संघांत आहे. मुंबईपासून जाफराबाद हें १६५ मैल आहे. येथें दरवर्षी २५ इंच पाऊस पडतो.

येथील मुख्य पिकें बाजरी, कापूस व गहूं हीं होत. येथें इमारती बांधण्यास उपयोगी असे दगड पुष्कळ मिळतात व जाडेंभरडें कापडहि तयार होतें. जाफराबाद जहागिरीचें मुख्य शहर आहे. हें समुद्रकिनाऱ्यापासून एक मैलावर रणाई नदीच्या तीरावर आहे व ही नदी दळणवळणास फार सोयीची आहे. त्यामुळें या शहराचा व्यापार मोठ्या प्रमाणांत चालतो. या शहराचें नांव गुजराथच्या मुझफर नांवाच्या नबाबावरून पडलेलें आहे.

**जाफा**—हें पॅलेस्टाइन प्रांतांत जेरुशलेमच्या वायव्येस ३१ मैलांवर बंदर आहे. या बंदरांत फक्त लहान लहान जहाजें येऊं शकतात. जाफा शहरांतून नारिंगें, साबण, धान्य, ऑलिव्ह तेल व तीळ हा माल परदेशीं जातो. जाफापासून जेरुशलेमपर्यंत आगगाडीचा फांटा आहे. जाफा शहराची लो. सं. ९३,४४३ आहे. यापैकीं २६,२६० ज्यू आहेत. जाफा हा पॅलेस्टाइनच्या चार जिल्ह्यांपैकीं एक जिल्हा आहे.

**जॉफ्रॉय, इसिडोअर** (१८०५–१८६१)— एक फ्रेंच इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञ आणि सृष्टिशास्त्रज्ञ. हा खालील शास्त्रज्ञाचा मुलगा असून त्यानें आपल्या बापाच्या शास्त्रीय सिद्धान्तांचें जोरदार समर्थन केलें आहे. त्यानें अॅक्लीमटायझेशन सोसायटी ऑफ पॅरिस ही संस्था स्थापन केली.

**जॉफ्रॉय, सेंट हिलेर** (१७७२–१८४४)—एक फ्रेंच सृष्टिशास्त्रज्ञ. यानें आपल्या ग्रंथांत एक प्रमुख कल्पना मोठ्या विस्तारानें मांडली आहे ती अशी कीं, सर्व प्राण्यांच्या शरीररचनेमध्यें एक सर्वसामान्य पद्धति व एक मूळ नमुना दिसून येतो, आणि त्या मूळच्या नमुन्यांत थोडे पण विशिष्ट फरक होऊन निरनिराळ्या जातींचे प्राणी उत्पन्न झाले आहेत. जॉफ्रॉयच्या या मताला कूव्हियर या शास्त्रज्ञानें फार जोराचा विरोध केला.

**जॉफ्रे, जोसेफ जॅकोज** (१८५२–१९३१)—एक फ्रेंच मार्शल. त्याला १९११ सालीं जनरल स्टाफचा मुख्य नेमण्यांत आलें आणि १९१४ सालीं पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर जॉफ्रेला फ्रान्सच्या भूदलाचा जनरॅलिसिमो नेमण्यांत आलें.

त्याच्याकडे १९१६ डिसेंबरपर्यंत फ्रेंच सैन्याचें आधिपत्य होतें. नंतर त्याला दोस्त सैन्याचा मुख्य तंत्रसल्लागार ( चीफ टेक्निकल ॲडव्हायझर ) नेमण्यांत आलें होतें.

**जॉब**—प्राचीन हीब्रू काव्यांतील एक नायक. ख्रि. पू. ६ व्या शतकाच्या आरंभीं एझेकील या भविष्यवेत्त्यानें आपल्या ( जुन्या करारांतील ) पुस्तकांत नोहा, डॅनियल व जॉब यांचा फार पवित्र इसम असा उल्लेख केला आहे. नंतर ५ व्या शतकांत 'बुक ऑफ जॉब' हें पुस्तक लिहिलें गेलें. त्यांतील उपोद्घात व उपसंहार गद्य भाषेंत लिहिले असून बाकीचा सर्व भाग पद्यांत लिहिलेला आहे. या पुस्तकांतील २८ वें प्रकरण शहाणपणा या गुणाबद्दल असून फारच उत्कृष्ट आहे. या पुस्तकांत जॉब या सत्पुरुषाची कथा दिलेली आहे. पण कथा ऐतिहासिक सत्य असेल असें वाटत नाहीं. तथापि या कथेंत जें एक त्रिकालाबाधित सत्य सांगितलें आहे तें हें कीं, एखाद्या सत्पुरुषावर संकटें आलीं तर तीं संकटें त्याच्या पापकृत्याबद्दल शिक्षा आहे, असें न मानतां तीं संकटें त्या सत्पुरुषाची परीक्षा पाहण्याकरितां ईश्वर निर्माण करतो, आणि त्या कसोटीला तो मनुष्य उतरल्यास ईश्वर त्या सत्पुरुषावर अखेर दया करून त्याला सुस्थिति प्राप्त करून देतो.

**जांब**—हें नांव कांहीं ठिकाणीं पेरूस व काजूच्या फळास लावतात. परंतु याखेरीज जांब नांवाचें निराळें झाड आहे, व त्याच्या दोन जाती असून एकीस आंबट जांब व दुसरीस गोड ( मलाखी ) जांब असें म्हणतात. आंबट जांबाचें झाड उंच असतें व त्यास तांबड्या रंगाचीं फुलें येतात, व त्याचीं फळें पांढरीं व मोठीं असतात. मलाखी जांबाचें झाड बहुतकरून मलाका बेटांतून आलें असावें. हें झाड उंच वाढत नाहीं.

**जांबवान्**— जांबवंत. ब्रह्मदेवाच्या जांभईपासून उत्पन्न झालेला आस्वल. हा मोठा पराक्रमी होता व रामावतारीं यानें रामाला पुष्कळ साहाय्य केलें. हा कृष्णावतार होईपर्यंत होता असें वाटतें. याशीं कृष्णाचें स्यमंतक मण्याच्या प्रसंगानें युद्ध होऊन त्यानें आपली कन्या जांबवती कृष्णास दिली होती.

**जाबाल**— एक ऋषि. याचेंच सत्यकाम असें दुसरें नांव आहे. ऐतरेय ब्राह्मणांत ( ८·७ ) क्षत्रियांना होणाऱ्या राज्याभिषेकप्रसंगीं पठण करावयाच्या मंत्रासंबंधीं जाबालाने आपलें एक विशिष्ट मत दिल्याचा उल्लेख आहे.

**जाबाल शाखा**— शुक्लयजुर्वेदापैकीं वाजसनेयांच्या सतरा भेदांपैकीं जाबाल हा एक शाखाभेद असल्याचा उल्लेख चरणव्यूहांत आहे.

**जाबालोपनिषद्**— जाबालाच्या नांवावर एकंदर तीन उपनिषदें आहेत. एक जाबालदर्शनोपनिषद्, दुसरें बृहज्जाबालोपनिषद् व तिसरें जाबाल्युपनिषद्. पहिल्यामध्यें योगाभ्यासासंबंधीं माहिती असून दुसऱ्यांत प्रजापतीपासून उत्पन्न झालेल्या भुसुंडीनें भस्ममहिमा कथन केला आहे. तिसऱ्यांत जाबालीनें पैप्पलावीस भस्मधारणमाहात्म्य सांगितलें आहे.

**जाब्लोस्काव, पाल** ( १८४७–१८९४ ) —एक रशियन विद्युच्छास्त्रज्ञ. १८७१ सालीं त्याला रशियन सरकारनें तारायंत्रखात्यावर डायरेक्टर नेमलें होतें, परंतु १८७५ सालीं त्यानें या जागेचा राजीनामा देऊन विद्युद्दीपांत लक्ष घातलें. १८७६ सालीं तो पॅरिस शहरीं राहावयास गेला, व या वर्षाच्या अखेरीस त्यानें एक वैद्युतिक मेणबत्ती शोधून काढली. या मेणबत्तीस त्याचेंच नांव दिलें आहे. कांहीं काळपर्यंत या दिव्यांचा प्रसार झाला. परंतु याहिपेक्षां जास्त उपयुक्त अशा विद्युद्दीपाची युक्ति निघाल्यामुळें हे दिवे मागें पडले. जाब्लोस्काव यानें विद्युच्छास्त्रांत दुसरे कांहीं शोध लावले आहेत. परंतु तो रशियांत परत गेल्यावर दारिद्र्यांत मृत्यु पावला.

**जांभई रोग**—कोंबड्या, वगैरे पक्षांस हा रोग होतो. याचा उद्भव त्यांच्या श्वासनलिकेमध्यें एक प्रकारचे सूक्ष्म परोपजीवी जंतू ( फॅसिओला ट्रॅकिॲलिस ) उत्पन्न झाल्यामुळें होतो. यामध्यें पक्षी आपली चोंच एकसारखी उघडी ठेवीत असतात व खोकतात. एखाद्या पिसानें टर्पेन्टाइन लावून किंवा अन्नांत थोडें इप्समसॉल्ट घालून हे जंतू नाहींसे करतात.

**जांभा दगड**— ( लॅटेराइट ). उष्ण कटिबंधामध्यें कडक ऊन पडतें, व त्यानंतर पाऊस पडतो व अशा रीतीनें ही क्रिया एकामागून एक वरचेवर होत गेल्यानें निरनिराळ्या तऱ्हेच्या खडकांच्या वरील बाजूस एक प्रकारचा कठिण व खडबडीत कवचासारखा थर बनतो. त्यापासून जांभळा दगड तयार होतो. यामध्यें ॲल्युमिनम व उज्जप्राणिद ( हैड्रॉक्साइड ) असून कांहीं लोखंडाचा गंज असतो.

**जांभूळ**— हिंदुस्थानांत जांभळीचीं झाडें सर्वत्र होतात. हा वृक्ष फार उंच वाढतो. याच्या फळांचा रंग बाहेरून काळसर व आंतून तांबूस असतो. जांभूळ हें शरीरास हितकारक आहे. जांभळीची छाया फार थंड असून सुखदायक असते. जांभळीचें लांकूड फार चिवट असतें. हें लांकूड इमारतकामासहि उपयोगी पडतें. मधुमेह, आतिसार, पित्त, वगैरे विकारांवर जांभूळ फार गुणकारी आहे. याचा शिरका करतात.

**जांभेकर, बाळ गंगाधर** ( १८१०–१८४६ )— एक महाराष्ट्रीय पंडित व ग्रंथकार. राजापुराजवळ पोंभुर्लें गांवीं यांचा जन्म झाला. यांना इंग्रजी, संस्कृत, कानडी, फारशी, वगैरे भाषा येत असून भारतीय व पाश्चात्त्य ज्योतिष व इतर विद्या यांतहि हे निष्णात होते. स. १८२९ मध्यें एल्फिन्स्टन विद्यालयांत

गणितशास्त्र व ज्योतिष शिकविण्याला यांना नेमलें. मुंबईंतील जिऑग्रफिकल व रॉयल एशियाटिक सोसायटी या संस्थांच्या विद्यावृद्धीच्या प्रगतीला बाळशास्त्री यांनीं पुष्कळ मदत केली. यांनीं कित्येक ग्रंथ तयार केले, त्यांपैकीं बालव्याकरण, नीतिकथा, सारसंग्रह, भूगोलविद्या, इंग्लंड देशाचा इतिहास, एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानच्या इतिहासाचा संक्षेप, इत्यादि होत. 'दर्पण' नांवाचें साप्ताहिक पत्र यांनीं कित्येक वर्षें चालविलें. हें पत्र मराठी व इंग्रजी भाषांत होतें. 'दिग्दर्शन' नांवाचें मासिक पुस्तक यांच्याच आश्रयानें कांहीं वर्षें निघत होतें.

**जामखेड**—मुंबई, अहमदनगर जिल्ह्यांतील एक पेटा. क्षेत्रफळ ४६८ चौ. मैल. लो. सं. ६८,४८१. यांत एक गांव व ७५ खेडीं आहेत. जामखेड हें ठाण्याचें गांव असून तेथें सरकारी कचेऱ्या आहेत. जवळच रामेश्वर महादेवाचें स्थान आहे.

**जामगड**—वऱ्हाड, मेळघाट प्रांतांत एक लहानशी जहागीर. हा प्रदेश बहुतेक डोंगराळ असून शेतीचें उत्पन्न कमी येतें. येथील जहागीरदारास राजा म्हणतात. या भागांत शिक्षण फार कमी आहे. प्रख्यात तंट्या भिल्ल हा या मेळघाटांतच वावरत होता.

**जामदारखाना**—जामदारखाना म्हणजे राजाचें प्रावरणागार (वस्त्रें, व कपडेलत्ते यांची कोठी). हा कारखाना अठरा कारखान्यांपैकीं एक असे. जामदारखान्यावरील मुख्य अधिकाऱ्यास जामदार म्हणत. जामदार एकंदर कापड-शिलकी व खरेदी, वगैरेचा हिशेब ठेवी. कापड खरेदी करणें, रावल्यास सणगें लागतील तीं कारखान्यांतून काढून देणें हीं त्याचीं कामें असत. हे अठरा कारखान्यांचे नियम सातारचे प्रतापसिंह छत्रपति यांनीं तयार करविले होते. (इतिहाससंग्रह, पु. ६, अंक ७–९).

**जामनेर**—मुंबई, पूर्व खानदेश जिल्हा, एक तालुका. याचें क्षेत्रफळ ५२७ चौ. मै. असून त्यांत १५७ गांवें आहेत. लोकसंख्या १,१५,५८८ आहे. पाणीपुरवठा बरा असल्यानें तालुक्यांत बागाईत जमीन पुष्कळ आहे. हवा निरोगी आहे. अजंठ्याचा घाट जवळच आहे.

शहर कान्ह नदीवर असून पूर्वी गांवासभोंवतीं तट असे. भुईकोट किल्ला असल्यामुळें हें महत्त्वाचें ठिकाण होतें. पेशवाईत हे गांव रास्त्याकडे सरंजामादाखल होतें. पांचसात कोसांवर अजंठ्याचीं लेणीं आहेत. हल्लीं कापसाचा व्यापार येथें पुष्कळ चालतो. सरकी (कापसाची) काढण्याचे व गट्ठे बांधण्याचे कारखाने येथें आहेत. लो. सं. ९,०२५.

**जामराव कालवा**—सिंध प्रांतांतील हैदराबाद, थर व पारकर या जिल्ह्यांतून गेलेला एक कालवा. हा नार नदीचा असून त्यानें सरासरी १३० मैल लांब व १० मैल रुंद इतकी जमीन भिजते. कालव्याची एकंदर लांची ११७ मैल असून त्याचा एक फांटा ६३ मैल लांब आहे.

इ. स. १८९९ मध्यें हा कालवा सुरू करण्यांत आला. यास एकंदर खर्च साडेआठ कोट रुपये आला. कालवा होण्यापूर्वी पुष्कळ जमीन ओसाड होती; आतां पंजाब, कच्छ, जोधपूर, जैसलमीर, कोहिस्तान, वगैरे भागांतील लोकांनीं येथें वसाहत केली आहे.

**जामी** (१४१४–१४९२)—नुरुद्दीन अबदुर-रहमान बिन अहंमद. हा इराणी कवि व गूढतत्त्ववादी खोरासानमध्यें जाम येथें जन्माला आला. तो आपल्या कवितेंत जाम शब्दावर द्व्यर्थी कोटी करीत असे. एक जामी हें त्याचें नांव असून त्याचा दुसरा अर्थ दारूचा प्याला असा आहे. इराणांतील अभिजात असा हा शेवटचाच कवि होय. हा सुफी तत्त्वज्ञानी होता. त्याच्या तीन दिवाणांत भावपूर्ण व बोधपर लघुकाव्यें यांचा समावेश होतो. बहारिस्तान (वसंतोद्यान) हा त्याचा प्रमुख गद्य ग्रंथ होय. हफ्त औरंग (सात सिंहासनें) हें त्याचें एक अद्भुत काव्य आहे.

**जामीन**—जामीन हा शब्द फारशी असून या अर्थाचा संस्कृतमधील शब्द 'प्रतिभू' असा आहे. कायद्यामध्यें जामीनकी (ग्यारंटी) म्हणजे एका मनुष्यानें दुसऱ्या एखाद्या माणसाचें कर्जफेड किंवा इतर कांहीं कर्तव्य करणें असेल तें त्यानें न केल्यास, त्याबद्दल स्वतः कर्ज फेडण्याचा किंवा दंड देण्याचा करार करणें, असा अर्थ आहे. अशा करारांत मूळ धनको, दुसरा ऋणको आणि तिसरा जामीन असे तीन इसम नेहमीं असावे लागतात. शिवाय जामिनाला कर्जफेड करावी लागल्यासहि ऋणको कर्जमुक्त होत नाहीं. तर तो जामिनाला जबाबदार होतो. फौजदारी कायद्यांत आरोपी किंवा वॉरंट सुटलेला साक्षीदार हजर राहण्यासंबंधानेंहि जामीनकी घेतात व त्याला इंग्रजींत 'बेल' म्हणतात.

जामीन राहणें म्हणजे दुसऱ्याकरितां विनाकारण त्रास घेणें असल्यामुळें जामीनकीविषयीं हिंदूंच्या जुन्या कायदेकारांनीं प्रतिकूल वृत्ति दाखविली आहे; आणि व्यवहारांतहि 'जामीन कोणा राहूं नये' असा उपदेश रूढ आहे. मनुस्मृतींत जामीनकीसंबंधीं पुढील वचनें आहेत :—

प्रातिभाव्यं वृथादानमाक्षिकं सौरिकं च यत्।
दण्डं शुल्कावशेषं च न पुत्रो दातुमर्हति॥

× × ×

त्रयः परार्थे क्लिश्यन्ति साक्षिणः प्रतिभूः कुलं।
(मनु. अ. ८ श्लो १४९ व १६९)

ब्रिटिश अमदानींत जामीनकीबद्दलचा कायदा कराराच्या कायद्या( इंडियन कॉन्ट्रॅक्ट ॲक्ट )मध्यें आहे, आणि जामीनकी हाहि एक प्रकारचा करार असल्यामुळें सामान्य कराराप्रमाणेंच दोन किंवा अधिक वयांत आलेले व करार करण्यास पात्र असे पक्षकार लागतात व त्यांनीं उभयतांच्या संमतीनें योग्य मोबदला ठरवून जामीनकीचा करार करावा लागतो. आणि त्यांत कपट, लबाडी, गैरसमज, वगैरे गैरगोष्टी असल्यास तो करार रद्द करतां येतो. जामीन राहणाराची जबाबदारी सामान्यतः मूळ ऋणकोइतकी असते, आणि ऋणको आपली जबाबदारी पार पाडण्यास असमर्थ ठरल्यावर मग जामीनदाराला जबाबदार धरतां येतें. प्रचलित हिंदु कायद्यांतहि जामीनकीबद्दलचें बापाचें देणें फेडण्याची जबाबदारी मुलांवर पडत नाहीं. फौजदारी कायद्यांत १ जामीनाचे, व २ बिनजामीनाचे, असे गुन्ह्यांचे दोन वर्ग असतात. आणि बिनजामीनाच्या गुन्ह्यांतहि सबळ पुरावा नसल्यास आरोपीला जामीनावर खुलें करावें असा कायदा आहे ( क्रिमि. प्रोसीजर कलम ४९७ ).

हल्लीचा ब्रिटिश हिंदुस्थानांतील कायदा इंग्लंडच्या कायद्यासारखा असून इतर पाश्चात्य देशांतहि जामीनकीचा कायदा अशाच प्रकारचा आहे.

**जामोद**—वऱ्हाड, बुलढाणें जिल्हा; जळगांव तालुका. जळगांवच्या वायव्येस ६ मैलांवर हें गांव आहे. पूर्वी हा गांव विड्याच्या पानांकरितां फार प्रसिद्ध होता. गांवाच्या उत्तरेस महादेवाचें देवालय आहे. देवळाच्या दक्षिणेस एक पाण्याचा सांठा आहे. त्यांतील पाणी कधीं आटत नाहीं. येथें पीर पवलादशहाचा दरगा असून तो दिल्लीचा बादशहा अल्लाउद्दीन घोरी याच्या वेळेस बांधला आहे असें म्हणतात. हें ठिकाण मुसलमानी कारकीर्दींत फार महत्त्वाचें होतें. येथील किल्ला एलिचपुरच्या नवाबाच्या कारकीर्दींत बांधलेला आहे.

**जायफळ**—हा एका झाडाच्या ( मिरिस्टिका मोश्चाटा अथवा फ्रॅग्रान्स ) फळांतील गर आहेत. हें फळ सालीसकट सुपारीएवढें असतें. याच्याबाहेरून पिंवळसर मांसल भाग अथवा साल असून व तो दोन सारख्या भागांत उकलतो व त्याच्या आंत ज्यास आपण जायपत्री म्हणता तिचा थर असतो. याच्या आंत बी अथवा जायफळ असतें. याच्या बिया जायफळें म्हणून बाजारांत मिळतात. यावर पुन्हां एक कवची असते. ती फोडली म्हणजे खरें जायफळ मिळतें. हीं झाडें आशिया खंडांतील पूर्वेकडील ईस्ट इंडीज बेटांत होतात. अलीकडे वेस्ट इंडीज बेटांतहि यांची लागवड करण्यांत आली आहे.

याचा उपयोग महाराष्ट्रांत औषधांत व विड्यांत करतात. जायफळ जास्त खाल्ल्यास खाणाऱ्यास कैफ येतो. हें फळ औषधी दृष्टीनें वायुहारक, पाचक व उत्तेजक आहे. याशिवाय जायफळापासून जें तेल निघतें त्याचा सुगंधी तेलें करण्यासाठीं उपयोग करतात. झाड लावल्यापासून सात वर्षांनीं यास फळे लागून त्याचें उत्पन्न १५ वर्षेंपर्यंत वाढत असतें. चांगलें फळ पक्क लिंबाएवढें असूं शकतें.

**जॉर्ज टाउन**—अमेरिका, ब्रिटिश ग्वायनाची राजधानी व वसाहत सरकारचें ठिकाण. हें डेमेरॉरा नदीच्या मुखावर आहे. डच लोकांच्या ताब्यांत असतांना याचें नांव स्टॅब्रोक होतें व स. १८१२ मध्यें जॉर्ज टाउन असें नांव पडलें. या भागांतील हें फार छानदार शहर आहे. मुख्य इमारती म्हटल्या म्हणजे शहराच्या मध्यभागीं असलेल्या सार्वजनिक कचेऱ्या, न्यायकचेऱ्या, नगरमंडप, कित्येक छानदार प्रार्थनामंदिरें, विद्यागृहें, इस्पितळें, पदार्थसंग्रहालय, पुस्तकालय ह्या होत. येथील राज्यव्यवस्था मेयर व नगरकौन्सिल यांच्या ताब्यांत आहे. लोकसंख्या सुमारें ७५,००० आहे. लोखंडाचे कारखाने, कोरडी गोदी, तांदूळ, विड्या, साबण, धूट, चाकोलेट व बर्फ यांचे कारखाने येथें आहेत. हें शहर रेल्वे व बोटी यांनीं न्यू ॲम्स्टरडॅम व डेमेरॉराचा पश्चिम किनारा यांस जोडलेलें आहे.

**जॉर्ज राजे** (इंग्लंडचे )–पहिला जॉर्ज ( १६६०–१७२७)—हा जर्मनींतील हॅनोव्हर प्रांताच्या राजघराण्यांत जन्मला. त्याचा इंग्लंडच्या राजघराण्याशीं आप्तसंबंध होता. म्हणून ॲन राणी निर्वंश वारल्यावर तो इंग्लंडच्या गादीवर आला ( १७१४ ). त्याचें कौटुंबिक वर्तन प्रथमपासून आक्षेपार्ह होतें. अनेक उपस्त्रिया ठेवण्याची राजे लोकांची चाल असे, त्याप्रमाणें जॉर्जनेंहि उपस्त्रिया ठेवल्या होत्या. त्यामुळें त्याची राणी सोफिया वदचालीची निघाली व अखेर दोघांचा घटस्फोट झाला. जॉर्ज परदेशातच वाढल्यामुळें इंग्लंडच्या राज्यकारभाराची त्याला माहिती नव्हती, त्यामुळें तो राजा झाल्यावर प्रधानमंडळाची सत्ता वाढली. तथापि त्यानें एक मोठ्या शहाणपणाची गोष्ट केली, ती म्हणजे व्हिग पक्ष व वॉल्पोल यांच्या हातीं पूर्ण विश्वासानें सत्ता दिली. त्यामुळें त्याची सर्व कारकीर्द निर्विघ्नपणें पार पडली.

दुसरा जॉर्ज ( १६८३-१७६० )— पहिल्या जॉर्जचा मुलगा. बाप इंग्लंडचा राजा झाला त्या वेळीं हा एकतीस वर्षांचा होता. त्याचें बापाशीं पटत नसे. त्याचा विवाह स. १७०५ मध्यें अॅनसॅपचची कॅरोलाइन हिच्याशीं झाला. ती मोठी राजकारणी होती. बापलेकांच्या भांडणामुळें राज्यावर येतांच जॉर्जनें मुख्य प्रधान वॉल्पोल यास काढून टाकण्याचा प्रयत्न केला; पण वॉल्पोलचें महत्त्व जाणून राणीनें वॉल्पोललाच प्रधान ठेवण्याबद्दल राजाचें मन वळविलें. याची बुद्धिमत्ता अगदींच सामान्य प्रतीची होती; तथापि लायक व कर्तबगार कोण हें तो निवडीत असे व अशा माणसांचा सल्ला तो मानीत असे; यामुळें हा आपली राणी व वॉल्पोल यांच्या तंत्रानें वागे. स. १७३७ मध्यें कॅरोलाइनच्या मृत्यूमुळें लवकरच वॉल्पोल पदच्युत झाला. पुढें ऑस्ट्रियन-वारसायुद्ध सुरू झाल्यावर हॅनोव्हर प्रांताच्या रक्षणाकरितां जॉर्ज स्वतः युरोपांत लढाईवर गेला आणि तेथें इंग्रजांच्यापेक्षां हॅनोव्हेरियनांच्या हिताकडे अधिक लक्ष दिलें गेल्यामुळें जॉर्ज राजा इंग्लंडमध्यें अप्रिय झाला. मुख्य प्रधानहि राष्ट्राच्या इच्छेप्रमाणें नेमणें त्याला भाग पडलें.

तिसरा जॉर्ज ( १७३८-१८२० )—हा दुसऱ्या जॉर्जचा नातू दुसऱ्या जॉर्जनंतर गादीवर आला. व्हिग पक्षाचें वर्चस्व नष्ट करून स्वतःच्या हातीं अधिकारसूत्रें घेणें हें आयुष्याचें इतिकर्तव्य होय, अशी शिकवण त्याला त्याच्या आईची होती. स्वतः इंग्रजी भाषा जाणणारा व इंग्रजी राजकारणांत वाढलेला असल्यामुळें प्रजेचें ह्रद्गत जाणणारा होता. राज्यावर आल्यावर लवकरच त्यानें पार्लमेंटांत राजाच्या आज्ञेनुसार मतें देणारा असा ' किंग्ज फ्रेंड्स' हा पक्ष बनविला. तेव्हां संघर्ष उत्पन्न होऊं लागला. अशा स्थितींत दहा वर्षांत सात वेळां प्रधानमंडळ बदललें. अनियंत्रित सत्ताभिलाषी राजा व लोकसत्ताप्रेमी राष्ट्र यांमधील हें भांडण विकोपास गेलें असतें. पण जॉर्जच्या सुदैवानें अमेरिकेबरोबरच्या भांडणांत अमेरिकन वसाहतींवर कर बसविण्याचा अधिकार सांगण्यांत राजा व राष्ट्र यांचें ऐकमत्य झालें व जॉर्ज लोकप्रिय झाला. पुढें त्याचा प्रधान धाकटा पिट याच्या यशस्वी कारकीर्दीचें श्रेय जॉर्जला अनायासें मिळालें.

स. १७८८ मध्यें त्याच्या मेंदूंत विकार होऊन तो वेडा झाला. पण डॉ. विलिस याच्या उपायांनीं स. १७८९ त तो बरा झाला. फ्रेंच राज्यक्रांतीच्या सर्व राजकीय बाबी त्यानें पिटवर सोंपविल्या, पण आयरिश युनियननंतर पिटनें कॅथॉलिक लोकांवरील राजकीय नियंत्रणें दूर करण्याचें ठरविलें त्यास जॉर्जनें विरोध केला. व पिटचा राजीनामा स्वीकारून अॅडिंग्टन यास प्रधान नेमलें. कॅथॉलिक लोकांस कांहींहि हक्क द्यावयाचे नाहींत या अटीवर त्यानें पुनः पिटला, तो वारल्यावर फॉक्सला, व त्याच्यानंतर पोर्टलंडच्या ड्यूकला प्रधान नेमलें. इ. स. १८०४ मध्यें जॉर्जचें पुनः डोकें फिरलें. त्यांतून तो बरा झाला; पण पुन्हां १८११ मध्यें त्याला वेड लागलें व दृष्टिहि गेली व अशा स्थितींत ९।१० वर्षांनीं तो स. १८२० मध्यें वारला. जॉर्जला सोफिया राणीपासून नऊ मुलगे व सहा मुली झाल्या. त्याला वैवाहिक शांति व सुख उत्तम लाभलें.

चौथा जॉर्ज ( १७६२-१८३० )— हा तिसऱ्या जॉर्जचा थोरला मुलगा १८२० मध्यें राज्यावर आला. तो जात्या हुषार असून त्याला ग्रीक, लॅटिन यांचें चांगलें शिक्षण मिळालें होतें; शिवाय तो फ्रेंच, इटालियन व जर्मन बोलूं शके. गायन व इतर कला यांची अभिरुचि त्याला असे. प्रथम आईबापांच्या कडक शिस्तींत वाढून पुढें स्वैरवृत्तीनें चैनी करूं लागला व अखेर पक्का दुर्वर्तनी बनला. तो फार चैनी व उधळ्या असल्यामुळें कर्ज करी; परंतु व्हिग पक्षाची बाजू त्यानें धरल्यामुळें फॉक्स, शेरिडन, वगैरे पुढारी त्याला अनुकूल असत व पार्लमेंट त्याच्या कर्जफेडीकरितां रकमा मंजूर करीत असे. पण या सर्व गोष्टींमुळें बापाशीं त्याचें पक्कें वांकडें आलें होतें. तसेंच त्याच्या दुराचरणामुळें व उधळेपणामुळें सामान्य जनतेंत तो अत्यंत अप्रिय झाला होता; इतका कीं, रस्त्यांतून जातांना लोक त्याला हंसत व स. १८१७ मध्यें तर तो पार्लमेंटमध्यें जात असतांना लोकांनीं त्याच्या गाडीच्या तावदानें फोडलीं.

स. १७९५ त ब्रन्सविकची राज्यकन्या कॅरोलाइन हिच्याशीं जॉर्जचा विवाह झाला. १८२१ मध्यें गादीवर आल्यावर राज्याभिषेकादि समारंभांत राणीवर बहिष्कार घालण्याचें जॉर्जनें ठरविलें. विवाहानंतर पहिल्या अपत्यजन्माच्या वेळींच जॉर्जनें राणीवर दुराचरणाचा आरोप ठेवून तिला विभक्त ठेवली. स. १८१४--१८२० पर्यंत ती इटलींत राहिली. पण जॉर्ज राजा होतांच परत ती इंग्लंडांत आली व राज्याभिषेकादि समारंभांत सामील होण्याचा तिनें प्रयत्न केला. राजानें तिच्यावरील जारकर्माच्या आरोपाची चौकशी करून निकाल करण्याचें काम एका समितीकडे सोंपविलें व त्याचा निकाल जॉर्जला अनुकूल झाला. १८२१ त ही दुर्दैवी राणी मरण पावली व हें प्रकरण मिटलें. राज्यारोहणानंतर आयर्लंड व स्कॉटलंड या देशांस भेट देऊन जॉर्जनें तिकडे बरीच लोकप्रियता संपादिली. पण इंग्लंडमध्यें तो अखेरपर्यंत अप्रियच राहिला.

पांचवा जॉर्ज ( १८६५-१९३६ )— हे इंग्लंडचे राजे व हिंदुस्थानचे बादशहा राजे ७ वे एडवर्ड आणि राणी अलेक्झांड्रा यांचे द्वितीय चिरंजीव होत. त्यांनीं प्रथम आरमारांत अधिकाऱ्याचें काम करून अनेक देशांत प्रवास केला आणि १८९१ मध्यें कमांडर हा दर्जा मिळवला. १८९३ मध्यें त्यांचा

विवाह टेकऱ्या ड्यूकची कन्या प्रिन्सेस व्हिक्टोरिआ मेरी हिच्याबरोबर झाला. यांना ५ मुलगे आणि १ मुलगी झाली. १९०५ च्या हिंवाळ्यांत त्यांनीं हिंदुस्थानांत प्रवास केला. ७ वे एडवर्ड वारल्यावर (ता. ६ मे १९१०) हे बादशहा झाले. १९११ सालीं दिल्लीस राज्यारोहणाचा मोठा समारंभ झाला. १९१४ सालीं पहिलें महायुद्ध सुरू झालें तेव्हां यांनीं फार परिश्रम केले व प्रत्यक्ष रणांगणावरहि गेले होते. १९३१ सालच्या मंदाईच्या काळांत त्यांनीं आपल्या वांट्याचे दरसाल ५०,००० पौंड कमी करून घेतले. १९३५ त यांच्या राज्यारोहणाचा रौप्यमहोत्सव सर्व साम्राज्यांत साजरा झाला.

**जॉर्ज, हेन्री** (१८३९-१८९७)— एक अमेरिकन अर्थशास्त्रज्ञ आणि सामाजिक सुधारणा या विषयावरचा लेखक. त्यानें प्रथम वृतपत्रांचें संपादकत्व केलें. आणि १८७९ मध्यें आपला 'प्रोग्रेस ॲन्ड पॉव्हर्टी' (प्रगति आणि दारिद्र्य) हा ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथाचा फार खप झाला. या ग्रंथांत त्यानें संपत्ति, मजुरी आणि भांडवल यांबद्दल जीं जुनीं मतें होतीं त्यांवर हल्ला केला. त्याचे महत्त्वाचे ग्रंथ आहेत ते–'अवर लँड ॲन्ड लॅन्ड पॉलिसी' (आपली जमीन व तीसंबंधीं धोरण), 'सोशल प्रॉब्लेम्स' (सामाजिक प्रश्न), 'प्रॉपर्टी ॲन्ड लँड' (मालमत्ता व जमीन), आणि 'प्रोटेक्शन ॲन्ड फ्री ट्रेड' (संरक्षण व खुला व्यापार).

**जॉर्ज, संत**—हा इंग्लंडचा संरक्षक संत (पेट्रन सेंट) आहे. याच्या जन्माची माहिती अगदीं दुर्मिळ आहे. त्याच्यासंबंधीं अशी एक दंतकथा आहे कीं, एक राक्षस एका कुमारिकेला खाणार होता. इतक्यांत जॉर्जनें त्याला ठार मारलें. १२२२ मध्यें ऑक्सफोर्ड कौन्सिलनें अशी आज्ञा केली कीं, सेंट जॉर्जच्या स्मरणार्थ ता. २३ एप्रिल हा दिवस इंग्लंडमध्यें राष्ट्रीय सण मानला जावा. १३५० मध्यें त्याला ३ ऱ्या एडवर्ड राजानें ऑर्डर ऑफ गार्टरचा 'पेट्रन सेंट' केलें. पुढें कांहीं नाण्यांवर आणि पदकांवर या संताचा वरील पराक्रम रेखाटण्यांत आला.

**जॉर्ज सरोवरें**—जॉर्ज हें नांव पृथ्वीवरील अनेक सरोवराना आहे. त्यांपैकीं पुढील महत्त्वाचीं आहेत : (१) युगांडाच्या नैऋत्य भागांत एडवर्ड सरोवराला एका अरुंद कालव्यानें जोडलेलें सरोवर. याचें जुनें नांव अल्बर्ट एडवर्ड निआंझा. क्षे. फ. १५० चौ. मैल. (२) न्यू साउथ वेल्समध्यें एक खाऱ्या पाण्याचें सरोवर. हें ५५ मैल लांब आहे. (३) न्यू यॉर्क स्टेटमध्यें चॅपलेन सरोवराच्या दक्षिणेकडे व त्याला जोडून असलेलें सरोवर. लांबी ३३ मैल. यांत बरींच बेटें असून किनाऱ्यावर सुखनिवास बरेच आहेत.

**जॉर्जिया**—हें रशियांतील ट्रान्स कॉकेशियन सोशालिस्ट फेडरल सोव्हिएट रिपब्लिकपैकीं एक लोकसत्ताक राज्य. याचें क्षे. फ. २५,५१० चौ. मैल आणि लो. सं. ३५,४२,३०० आहे. याची राजधानी टिफ्लिस. मुख्य बंदरें पोटी व सुखुम हीं आहेत ; शिवाय जॉर्जियाला आजारियामधील बाटूम बंदराचा उपयोग करण्याचा हक्क आहे. जॉर्जिया प्रांतांत पशुपालन व शेती हे दोन मुख्य धंदे आहेत, आणि या दोन धंद्यांच्या वाढीस अद्याप क्षेत्र पुष्कळ आहे. धान्यें हें मुख्य पीक आहे ; तथापि फळबागाहि पुष्कळ आहेत ; आणि दारू तयार करणें हाहि महत्त्वाचा धंदा आहे. रेशीम तयार करणें व मधमाशा पाळणें हे धंदे मोठ्या प्रमाणांत चालू आहेत. येथें तांबें, शिसें, जस्त, लोखंड, अँटिमनी, मँगॅनीझ, दगडी कोळसा, नाफ्तेल हीं खनिज द्रव्यें सांपडतात. जॉर्जियांत ही खनिज संपत्ति विपुल असून त्यांत विशेषतः पेट्रोलियम सर्वांहून अधिक आहे. येथें जलविद्युत् निर्माण करणारें ठिकाण कुरा नदीवर (३६,००० अश्वशक्तीचें) असून, दुसरें मोठें ठिकाण आबाश येथें आहे. आणि शिवाय अशी वीज उत्पन्न करणारीं ठिकाणें नवीं तयार होत आहेत.

आगगाडी-रस्ता ९७० मैल असून त्यांत वाढ होत आहे. जॉर्जियन लोक दिसावयाला सुरेख ; विशेषतः स्त्रियांच्या सौंदर्याची प्रसिद्धि विशेष आहे. त्यांची भाषा कॉकेशियन भाषावंशाशीं साम्य असलेली पण स्वतंत्र आहे. त्या भाषेंत वाङ्मय ख्रिस्तीधर्म त्या देशांत झाला तेव्हांपासूनचें आहे, व त्यांत काव्याचा भरणा असून विशेषतः भावगीतें फार आहेत. जॉर्जियन बायबल आहे. अलेक्झांडर दि ग्रेट याची सत्ता या प्रांतावर होती, पण खि. पू. ३२४ त हा प्रांत स्वतंत्र झाला. ख्रिस्ती धर्मप्रसार ४ थ्या शतकांत सुरू झाला. पुढें कांहीं काळ अरबी खलीफांचा अमल या प्रांतावर होता, पण १० व्या शतकापासून १७९९ पर्यंत हा प्रांत स्वतंत्र राहिला, व त्या सालीं जॉर्जियाच्या राजानें हा रशियास जोडला. या पारतंत्र्याखालच्या काळ जॉर्जियन राष्ट्रीयत्वाला पूर्ण नष्ट करणार असें दिसूं लागलें. पण १९१७ च्या रशियन राज्यक्रान्तीनंतर १९१८ त जॉर्जियानें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें; व घटनासमितीनें १९१९ मध्यें स्वातंत्र्याचा कायदा (ॲक्ट ऑफ इन्डिपेंडन्स) मान्य केला, व त्याला १९२१ मध्यें दोस्त राष्ट्रांनीं मान्यता दिली. पण याच वर्षी बोल्शेव्हिक सैन्यानें जॉर्जियावर स्वारी करून तो प्रांत जिंकला, आणि आर्मेनिया, अझरबैजन व जॉर्जिया यांचें ट्रान्सकाकेशियन फेडरेशन बनवलें. हल्लीं जॉर्जियाची राज्यघटना सोव्हिएट रशियासारखी आहे. १९३६ मध्यें जॉर्जियाचें स्वतंत्र रिपब्लिक बनवून तें सोव्हियट युनियनला जोडण्यांत आलें.

**जॉर्जिया**--अमेरिकन संयुक्त संस्थानांतर्ले मूळच्या १३ पैकीं एक. क्षेत्रफळ ५८,८७६ चौ. मै. व लो. सं. ३१,२३,७२३. उत्तरेकडील भागांत ब्ल्यूरिज् पर्वत आहे. त्याची उंची ५,००० फूट आहे. टेनेसी वगैरे ५।६ मोठाल्या नद्या आहेत. अटलांटा हें मुख्य ठिकाण आहे. शेती हा प्रधान उद्योग आहे. सर्व प्रकारचीं फळें होतात. कापूस, तंबाखू वगैरेंचीं पिकें होतात. कोळसा, लोखंड, सोनें, रुपें, मॅगॅनीज, अल्युमिनम्, वगैरे खनिज संपत्ति विपुल आहे. अथेन्स येथें विद्यापीठ आहे. या संस्थानांत उन्हाळीं आहेत व वर्गीचे पुष्कळ आहेत.

**जॉर्जेट**—एक कापडाचा प्रकार. ज्याचे उभे व आडवे धागे वळीव असून वीण घट्ट असते अशा एका रेशमी कापडास हें नांव आहे. या कापडाचा पृष्ठभाग चिनतकाकीचा, कडकडीत व हातास खरखरीत लागतो. या कापडाला निरनिराळ्या तऱ्हेचे रंग देण्यांत येतात. यांतील कांहीं प्रकार पातळ व अर्धपारदर्शक असतात व ते वापरण्यास चांगले असतात. यास पुन्हां रंग द्यावयाचा असल्यास रंग कापडांत शिरण्याकरितां पुष्कळ वेळ कापड रंगांत ठेवावें लागतें. कापसाच्या सुतापासूनहि जॉर्जेट नांवाचें कापड तयार करण्यांत येतें. व तें धुतां येतें आणि त्यास वरचेवर इस्त्री करावी लागत नाहीं. हें कापड धुतांना आटतें. विशेषतः रंग देतांना तें हटकून आटतें. तथापि इस्त्री करतांना योग्य ताण दिल्यास त्यास पूर्वीप्रमाणें आकार येतो.

**जॉर्डन नदी**--ही पॅलेस्टाइन प्रांतांतील सर्वांत मोठी आणि जगांत अतिशय विख्यात असलेल्या नद्यांपैकीं एक नदी आहे. तिचा उगम अनेक जलप्रवाह मिळून झालेला असून नंतर ती टायबेरियस सरोवरांतून पुढें वाहत जाऊन अनेक वांकडींतिकडीं वळणें घेऊन ( वळणासह तिची लांबी २०० मै. आणि सरळ लांबी ७० मैल ) अखेर मृत समुद्रास ( डेड् सी ) मिळते. या नदींतील पाणी मातीनें गढूळलेलें असून त्या पाण्यांत लहान लहान जातीचे मासे विपुल आहेत. या नदीला हिंवाळ्यांत अनेक महापूर येतात. हा नदीप्रदेश अतिशय खोलगट आहे. समुद्रसपाटीच्या खालीं १,३१२ फूट मृत समुद्र असून या नदीच्या एकंदर खोलीची बेरीज २,३०० फूट आहे.

**जालंदर**—पूर्व पंजाब, जालंदर विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १३३४ चौ. मैल. लो. सं. ११,२७,१९०. हा जिल्हा बियास आणि सतलज या दोन नद्यांमध्यें आहे. हा प्रदेश सुपीक असून शीख लोक या भागास 'पंजाबची बाग' असें म्हणत असत. येथें पावसाची सरासरी २४ इंच आहे.

श्रीशंकरानें जालंदर राक्षसाचा पराभव या भागांत केला अशी एक कथा आहे. त्यावरून या भागास हें नांव मिळालें. इ. स. १०८८ च्या सुमारास इब्राहिमशहा घोरीनें हें शहर काबीज केलें. त्या वेळेपासून हा प्रदेश लाहोरच्या सुभ्यांत मोडत असून त्यावर मुसलमानी अमल होता.

सुती विणकामाचे हातमाग या जिल्ह्यांत बरेच चालतात. खुर्च्या वगैरे लांकडी सामान, येथें बरेंच तयार होतें. या जिल्ह्याचा बराच व्यापार शेतकीविषयकच आहे. गहूं, कापूस, सुती व रेशमी कापड, वगैरे पदार्थ येथून बाहेर जातात.

अकबराच्या कारकीर्दींत हा जिल्हा लाहोर सुभ्यांत मोडत होता. अकबरानंतरच्या मोंगल बादशहांनीं राजा तोडरमल यानें सुरू केलेली नगदी सारापद्धति बंद केली व जो कोणी जास्त पैसा देईल त्यास त्या भागांतील जमीन खंडानें देऊं लागले. शिखांच्या अमदानींत हें बंद झालें. व ज्यास जितकें जास्त मिळेल तितकें घेण्याची प्रवृत्ति होऊं लागली. महाराजा रणजितसिंगानें कांहीं सुधारणा करण्याचा प्रयत्न केला. इ. स. १८४६ मध्यें हा भाग ब्रिटिशांकडे आला.

जालंदर शहर हें नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवर स्टेशन असून मुंबईहून १२४७ मैल अंतरावर आहे. जालंदर दैत्याच्या पाठीवर हें शहर वसविलेलें आहे असें आपलीं पुराणें सांगतात. शहराच्या भोंवतालचा भाग पवित्र मानला जात असून त्याची यात्रा पुण्यफलदायक होते असेंहि सांगतात.

जालंदरला ब्रिटिश छावणी आहे. येथें स. १८६७ त म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. येथें बरींच हायस्कुलें व कॉलेजें आहेत. स्त्रियांसाठीं 'कन्या महाविद्यालय' नांवाची एक संस्था आहे. लो. सं. १,१०,९६९. पंजाबची १९४७ सालीं फाळणी झाली तेव्हां पूर्व पंजाब प्रांत हिंदी संघराज्यांत नवीन पडला व त्याची राजधानी जालंदर बनली.

**जालंदरनाथ**—नाथसंप्रदायांतील नऊ नाथांपैकीं एक. याबद्दल बरीच माहिती नवनाथकथासार ग्रंथांत धुंडीराजसुत मालु यानें दिली आहे. यास दत्तात्रेयापासून साक्षात् मंत्रोपदेश झाला होता व नाथपंथाच्या प्रसाराचें कार्य यानें बऱ्याच मोठ्या प्रमाणावर केलें असावें असें दिसतें. याचा कानिफा नांवाचा प्रसिद्ध शिष्य होता. बंगाल देशाचा राजा गोपीचंद याची आई मैनावती जालंदरनाथाची शिष्या झाल्यामुळें गोपीचंदानें यास लिदीच्या ढिगांत पुरलें. तेव्हां कानिफानें बऱ्याच दिवसांनंतर त्यास तेथून जिवंत उकरून काढलें व या चमत्कारामुळें गोपीचंद राजा पश्चात्ताप पावून याचा अनुयायी झाला. ही कथा सर्वत्र प्रसिद्ध असून अजूनहि कानफाटे लोक ती गाऊन दाखवितांना आढळतात. याची समाधि दौलताबादेजवळ रोझा येथें असून त्यास गैबीपीर असें म्हणतात. तेथें मुसलमान मुतवली असून तो त्या समाधीबद्दल ही जर्जरीजर्बक्ष या साधूची आहे असें सांगतो.

**जालना**—हैद्राबाद संस्थान, औरंगाबाद जिल्ह्यांतील अगदीं पूर्वेकडचा तालुका. याचें क्षेत्रफळ ७४४ चौ. मैल आहे. या तालुक्यांत दोन गांवें आणि २५० खेडीं आहेत. पैकीं ५२ खेडीं जहागीर आहेत. जमीन काळी असून उत्तरेकडे आणि पूर्वेकडे थोडी डोंगराळ आहे.

शहर—जालना तालुक्याचें मुख्य ठिकाण असून कुंडलिका नदीच्या दक्षिण तीरावर वसलेलें आहे. रामराजाच्या वेळीं जालना अस्तित्वांत आलें, अशी स्थानिक दंतकथा आहे. एका मुसलमान श्रीमंत कोष्टयानें त्याचें नांव जालना असें ठेवलें. इ. स. १६५९ त शिवाजीनें हें शहर लुटलें तेव्हां त्याला तेथें पुष्कळ लूट मिळाली. त्याला अडविण्यास शहाजादा शहाअलम व त्याचे सरदार यांनीं संगमनेरनजीक लढाई दिली. पण तींत मोंगलांना पुरा पराभव झाला. शिवाजीनें ती लूट आडवाटेनें रायगडास सुखरूप पोंचविली. पुढें राजारामानेंहि हें शहर इ. स. १७०० च्या सुमारास लुटलें. येथील एक मशीद व एक सराई हीं पाहण्यासारखीं आहेत. हिंदु देवळांमध्यें आनंदस्वामीचें देऊळ साधारण मोठें आहे. जालनांतील बागांत फळफळावळ पुष्कळ पिकते. ती सर्व मुंबई व इतर ठिकाणीं रवाना होते. जालनाचें लष्करी ठाणें स. १८२७ मध्यें बांधलें होतें. व त्या ठिकाणीं १९०३ पर्यंत निजामाची कांहीं फौज होती.

**जालवणकर, नारायणबोवा** (शके १७१५–१७९०)—एक महाराष्ट्रीय संतकवि. हे बालपणापासूनच चांगले वैराग्यसंपन्न होते. यांनीं गिरनारपर्वतावर बारा वर्षें राहून तीव्र तपश्चर्या केली. यांनीं मुमुक्षूचे सप्तसागर रचले आहेत ते येणेंप्रमाणें :— (१) ज्ञानसागर, (२) विज्ञानसागर, (३) बोधसागर, (४) कैवल्यसागर, (५) आनंदसागर, (६) शांतिसागर व (७) करुणासागर. नारायणबोवांचे हे ग्रंथ ओंवीबद्ध आहेत. यांची कविता फार साधी, सुलभ आणि अध्यात्मज्ञानमय आहे.

**जालौक मौर्य**—सम्राट अशोकाचा हा पुत्र. अशोकाच्या शेवटच्या दिवसांत ग्रीकांनीं हिंदुस्थानवर स्वाऱ्या केल्या असतां त्यांचा बंदोबस्त करण्याचें काम अशोकानें यास सांगितलें. यानें ग्रीकांना जिंकून हद्दपार केलें. कान्यकुब्जापर्यंत यानें विजय मिळवले. अशोकाच्या पश्चात् काश्मीर येथे स्वतंत्र राज्य स्थापून शालिशुकाच्या वेळीं हा काश्मीरच्या गादीवर बसला (खि. पू. २०७–२०६). हा राजकार्यकुशल होता.

**जालौन**—संयुक्त प्रांत, झांशी विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ १,५९१ चौ. मैल. हा जिल्हा ब्रिटिश बुंदेलखंडाच्या अगदीं उत्तरेकडचा प्रदेश आहे.

या जिल्ह्यांत चार तहसिली, ५ गांवें आणि ८३६ खेडीं आहेत. हिंदूंची वस्ती शेंकडा ९४ आहे. सर्व लोक पश्चिम हिंदी भाषा बोलतात. पोटभाषा बुंदेली आहे. लोकसंख्या ४,०२,३८४.

ज्वारी, गहूं, अरहर, बाजरी, हीं धान्यें येथें पिकतात. गळिताचीं धान्यें व कापूसदेखील येथें पिकतो. बुंदेलखंडांतील इतर भागांप्रमाणें जालौन जिल्ह्यांतहि शेतकीचा धंदा अनिश्चित आहे.

जालौन गांव तहसिलीचें मुख्य ठिकाण असून ओराईपासून १३ मैलांवर आहे. अठराव्या शतकांत जालौन हें त्या वेळीं असलेल्या मराठे राज्याची राजधानी होतें. अद्यापिहि येथील वजनदार लोक मराठी ब्राह्मणच असून पुष्कळांना इनामी जमीन आहे.

**जाल्हेन**—नामदेवाच्या पंजाबमधील अनुयायांपैकीं एक. नामदेवानें यास पंजाबहून पंढरपुरास आणून आपल्या भक्तमंडळींत हिंडवलें व नंतर यास भक्तिमार्ग व प्रेममार्ग यांचें शिक्षण देऊन त्यांचा प्रसार पंजाबमध्यें करण्यास सांगितलें.

**जावजी दादाजी चौधरी** (स. १८३९–१८९२)—आद्य महाराष्ट्रीय छापखानदार. जातीनें मराठे. जन्म मुंबईत. हे छापखान्याच्या धंद्यांत केवळ स्वपराक्रमानें उदयास आले. आरंभीं हे तीन रुपयांवर नोकर होते. तेच पुढें स्वतः मालक होऊन दरमहा चार चार हजार रु. पगार वांटूं लागले. १८६४ सालांत यांनीं स्वतंत्रपणें टाइप पाडून तो विकण्याचा धंदा आरंभिला. १८६९ त स्वतःचा छापखाना घातला, त्याचें नांव निर्णयसागर. नवीन सुंदर अनेक प्रकारचे टाइप करण्यांत आणि पुस्तकें सुबक छापण्यांत यांनीं मोठी कीर्ति मिळविली. संस्कृत, मराठी, हिंदी, गुजराथी व इंग्रजी भाषेंत महत्त्वाचीं शेंकडों पुस्तकें प्रसिद्ध करून वाङ्मयांत अमूल्य भर घातली. यांचा निर्णयसागर छापखाना अद्यापि चालला आहे.

**जावरा संस्थान**—मध्य हिंदुस्थान, पूर्वीच्या माळवा एजन्सींतील एक संस्थान. क्षे. फ. ६०२ चौ. मै.. जावरा गांव याचें मुख्य ठिकाण असून त्यापासून संस्थानास हें नांव मिळालें आहे. चंबळा आणि क्षिप्रा या नद्या या संस्थानांतून वाहतात. लो. सं. १,१६,९५३. या संस्थानांत हिंदू शेंकडा ७४, मुसलमान शेंकडा १९, जैन शेंकडा ४, आणि वन्यजातीय शेंकडा ३, या प्रमाणांत आहेत.

माळव्यांतील उत्कृष्ट जमीन या संस्थानांत आहे. ज्वारी, कापूस, मका, गहूं, वगैरे पिकें होतात. अफूची लागवड येथें फार पूर्वी फार होत असे. या संस्थानाच्या सात तहशिली आहेत. संस्थानचें उत्पन्न सुमारें १९ लाख रु. आहे.

जावरा ही संस्थानची राजधानी असून अजमीर-खांडवा रेल्वेचें स्टेशन आहे व मुंबईहून ४३२ मैल लांब आहे.

संस्थानिकाचा मूळपुरुष अबदुल गफूरखान हा १८०८ च्या सुमारास संस्थानचा नबाब झाला. हल्लींचे नबाब महंमद इफ्तिखार अलीखान हे १८९५ सालीं गादीवर आले. यांचें लष्करी शिक्षण झालें असून यांनीं महायुद्धांत चांगली कामगिरी बजावली आहे. हें संस्थान मध्य भारतीय संस्थान संघांत १९४८ त सामील झालें.

**जावळी**—मुंबई, सातारा जिल्ह्याचा उत्तरेकडील तालुका. याचें क्षे. फ. ४२३ चौ. मै.. यांत एकंदर २४९ गांवें असून याची लो. सं. ६४ हजारांपर्यंत आहे. तालुक्याचें मुख्य ठिकाण मेढें गांव असून तेथें पाऊस सरासरीनें ८१ इंच पडतो. याच तालुक्यांत महाबळेश्वर, प्रतापगड, वगैरे प्रसिद्ध ठिकाणें आहेत.

जावळी गांव प्रतापगडापासून पूर्वेस एका ओहोळाच्या कांठीं ३ मैल अंतरावर आहे. पूर्वी हें शिर्के नांवाच्या घराण्याकडे होतें. विजापूरचा राजा युसुफ आदिलशहा यानें मोरे नांवाच्या एका सरदारास शिर्क्यांवर पाठविलें. त्यानें हें खोरें काबीज करून शिर्के यास तेथून काढून लाविलें. त्यामुळें मोरे यांस 'चंद्रराव' ही पदवी बादशहानें दिली. या घराण्याच्या सात पिढ्यांनीं या प्रांतावर अमल गाजविला. प्रथम शिवाजीनें मोऱ्यास आपल्या बाजूस वळविण्याचा प्रयत्न केला, परंतु तो वळला नाहीं. त्यानें विजापूर सरकाराकडून शिवाजीस कैद करण्यास आलेल्या शामराज नांवाच्या इसमास जेव्हां वाट दिली तेव्हां शिवाजीनें त्यास शत्रु मानिलें व ठार केलें. शिवाजीनें 'देशमुखांचा जमाव बरोबर घेऊन जमावाच्या बळें युद्ध करून जावली घेतली' (जेधे शकावली). स. १६५६ मध्यें ही गोष्ट घडली.

**जावा**—(यवद्वीप). डच ईस्ट इंडीज बेटांतलें एक बेट. हें आकारमानानें तिसरें असून बोर्निओ व सुमात्रा यांच्यामध्यें आहे. क्षेत्रफळ ५०,००० चौरस मैल. उत्तर व पश्चिम भाग सोडून सर्व मुलूख डोंगराळ व ज्वालामुखींचा आहे. सिमेरूची उंची सर्वांत जास्त (१२,००० फूट) आहे. जमीन सुपीक आहे. अरण्यें फार मोठालीं आहेत. युरोपियन आणि चिनी लोकांची शेती बरीच आहे. कॉफी, रबर, तांदूळ, मसाल्याचे पदार्थ, साखर, चहा, वगैरेंचें उत्पादन बरेंच आहे. पेट्रोल, कथील, कोळसा, मीठ, वगैरे खनिज माल निघतो. बटेव्हिया मुख्य ठिकाण. लोकसंख्या ४,००,००,०००. बहुतेक सर्व मुसलमान व बौद्ध धर्मीय आहेत. सुमारें ६ लाख युरोपियन वस्ती आहे. बेटांत जुनाट अवशेष सांपडतात. राज्यकारभाराच्या दृष्टीनें मदुरा बेट जावाला जोडलें आहे; म्हणून जावा आणि मदुरा अशा जोडनांवानें उल्लेख येतो.

अकराव्या शतकापर्यंत जावाचा इतिहास अज्ञातच आहे. त्या शतकापासून ब्राह्मणी धर्माच्या हिंदूंचें वर्चस्व या प्रदेशावर बसलें. हिंदूंनीं येथें राज्यें स्थापून स्थानिक लोकांना हिंदु धर्मांत घेतलें. पुढें इ. स. १४७८ मध्यें मुसलमानांच्या यावर स्वाऱ्या होऊन सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं पोर्तुगीज येईपर्यंत मुसलमान सत्ताधीश होते. १५९५ त डचांनीं पोर्तुगीजांपासून सत्ता काबीज केली ती आतांपावेतों आहे. दोनतीन वर्षांपासून इंडोनेशियन लोकांचा डच साम्राज्याशीं स्वातंत्र्यासाठीं झगडा चालला आहे.

यवद्वीपांतील जुन्या ग्रंथांतील भाषा 'कवि' नांवाची असून या भाषेंत हिंदु पुराणें रचिलेलीं आहेत. आज हिंदु चालीरीती, कायदे, धर्म आणि संस्कृति हीं सारीं हिंदुच आढळतील. जावांतील जुनें मोठें हिंदु राज्य म्हणजे मयपहित होय. जावांत शालिवाहन शक चालत होता. जावांतील जुनी संस्कृति कशी पूर्णपणें भारतीयच होती याविषयीं विस्तृत विवेचन ज्ञानकोश, वि. १, प्रकरण ६ वें, (यावद्वीप संस्कृति) यांत सांपडेल.

यवद्वीपाचा हिंदुस्थानच्या इतिहासाशीं संबंध फार येतो. या द्वीपाचें भारतीयत्व त्याच्या शासनविषयक गोष्टींत दिसून येतें. तेथील राजघराण्याचे सिंहलद्वीपाच्या राजघराण्याशीं शरीरसंबंध व केव्हां केव्हां तन्निमित्त युद्धप्रसंगहि होत.

जावा बेटांत अनेक हिंदु राज्यें होतीं. त्यांत मयपहित संस्थान मोठें होतें व त्यानें पुढें इतर संस्थानेंहि बहुतेक आपल्या अंकित केलीं.

प्राचीन काळीं जावामध्यें वर्णानुक्रमानें पदवी मिळत असे; बलिद्वीपांत अजूनहि तशीच पद्धत आहे. येथील ग्रंथांची भाषा 'कवि' नांवाची असून तींत भारत-युद्ध, अर्जुनविवाह, इ. अनेक ग्रंथ आहेत. त्यांचे धर्मशास्त्रीय ग्रंथहि हिंदुच आहेत व आज ते महंमदानुयायी असले तरी कायदे हिंदूंचे पाळतात. तेथें हिंदु संस्कृतीचे अवशेष प्राचीन मंदिरें वगैरे रूपानें फार आढळतात. तेथील लोकांत अद्यापिहि जुनीं हिंदु दैवतें शिल्लक आहेत; व चालीरीतीहि हिंदूंप्रमाणें आहेत.

जावा बेटांत शालिवाहन शक चालतो व त्याविषयीं तेथें अनेक दंतकथा आढळतात. शालिवाहन शकारंभापूर्वीं दोन-तीन वर्षें आदिशक नांवाचा कोणी द्वीपविजेता येथें आला होता, अशी तेथें कल्पना आहे. या आदिशकाचा अशोकाशीं संबंध जोडण्यांत येतो. पंधराव्या शतकाच्या अखेरीस मुसलमानांनीं हें बेट जिंकलें.

जावा बेटांत गेलेल्या ब्राह्मणांनीं संस्कृत भाषा तेथें नेली. परंतु ती त्यांची बोलण्याची भाषा नव्हती. जावामध्यें आलेल्या भारतीयांची संख्या अल्प असल्यामुळें त्यांनीं आपल्या भाषेचा त्याग करून तेथील देश्य लौकिक भाषेचा स्वीकार केला असावा, असें वेबरसारख्या संशोधकांचें मत आहे. पंडित वाङ्मय संस्कृतमध्यें असल्यामुळें भारतीय पंडित प्राकृत भाषेस विशेष महत्त्व देत नसत.

जावानी भाषा— जावानी भाषा ही मलायी राष्ट्रापेक्षां एका जुन्या राष्ट्राची भाषा असून ती थोड्या कालापूर्वींच सर्व जावा बेटावर प्रचलित होती, ही गोष्ट मलायी लोकांसहि मान्य आहे. जावा अथवा यवद्वीप हें पूर्वीं एकाच राजाच्या सत्तेखालीं होतें. हे राजे सुसुपन वंशांतील असून त्यांस रतु अगोंग अथवा सुसुहनंग असें उपपद आहे. त्यांची राजधानी कुरिपन, सूर्यकर्त येथें असे. हें राष्ट्र बलाढ्य, धाडसी व दाट वस्तीचें असून मुसलमानांनीं खि. श. १४०० च्या सुमारास आपली सत्ता स्थापण्यापूर्वीं या राष्ट्राची पूर्वसमुद्रांत अप्रतिहत सत्ता असून त्यांनीं सुमात्रा, बोर्निओ व मोलक्कापर्यंत स्वाऱ्या करून विजय संपादन केले होते. युरोपीयांचा त्यांच्याशीं संबंध आला तेव्हां त्यांच्या सत्तेस उतरती कळा लागली होती; परंतु तेव्हां सुद्धां त्यांनीं मोलक्कामधील पोर्तुगीज सत्तेलाहि वरचेवर डळमळावयास लाविलें होतें.

जावामधील भाषांचे अन्तःप्रदेशस्थ भाषा व तीरप्रदेशस्थ भाषा असे दोन मुख्य वर्ग करतां येतील. तीरप्रदेशस्थ म्हणजे किनाऱ्यावरील प्रदेशांतील भाषा. या जास्त अपभ्रष्ट आहेत. परंतु अन्तःप्रदेशस्थ म्हणजे बेटाच्या मध्यभागीं असलेल्या प्रदेशांतील भाषा. या संस्कृत भाषेशीं फारच सदृश आहेत. त्या भाषांतून अगदीं साध्या पदार्थांनाहि संस्कृत शब्दच आढळतात. जो थोडा उच्चारामध्यें फरक आढळतो तो तेथील लिपीच्या अपूर्णत्वामुळें झालेला दिसतो.

जावा भाषेची मातृका-माला फारच चमत्कारिक असून तिचें देवनागरीशीं मुळींच साम्य नाहीं. या मालेंत २० वर्ण आहेत. ए, इ, उ, ओ हे चार स्वर आहेत. परंतु उच्चारांची संख्या बरीच मोठी आहे. हे वर्ण उजवीकडून डावीकडे लिहिले जातात.

जावा बेटाच्या अंतर्गत भागांत बरेच शिलालेख सांपडतात. असाच एक शिलालेख थुनबर्ग यास नीलपर्वताजवळ पदितुलिस येथें सांपडला होता. त्यामध्यें साडेआठ ओळी असून तो दोन फूट रुंदीच्या एका दगडी स्तंभावर खोदलेला होता. त्यांतील अक्षरें उजवीकडून डावीकडे लिहिलेलीं होतीं. परंतु तीं कोणासच लावतां आलीं नाहींत. जावा बेटांत असलेल्या बागेलेन आणि सुंदा या भाषा जावा भाषेहून अगदीं भिन्न आहेत. बागेलेन भाषेपासून मुळ भाषा निघाली असें म्हणतात. परंतु या बाबतींत फारसें कांहीं संशोधन झालेलें नाहीं.

जावानी वाङ्मय—जावा भाषेंतील वाङ्मय मलायी वाङ्मयाप्रमाणेंच आहे. आणि या वाङ्मयापासूनच मल्यु भाषेंतील वाङ्मय तयार झालें आहे. या भाषेंतील कुगविन अथवा चरित्रग्रंथ यामध्यें पौराणिक कथा व तद्देशीय वीरपुरुषांच्या कथा असतात व हे ग्रंथ अगदीं भारतीय पुराणांसारखे असतात. जावानी धर्मशास्त्र ग्रंथ अथवा कायद्याचे ग्रंथ फारच प्राचीन असून ते सर्व पूर्वद्वीपांत प्रसिद्ध आहेत.

जावामध्यें कांहीं ऐतिहासिक ग्रंथ आहेत; त्यांपैकीं कांहींचें संशोधन झाले आहे. त्यावरून ते अविश्वसनीय व निरुपयोगी असावेत असें वाटतें. पारमार्थिक व शास्त्रीय विषयांच्या बाबतींत तेथील भाषेत शब्द नसल्यामुळें त्या भाषेंत संस्कृत शब्दांची भर पडली व ते शब्द तेथील लोकांत परिचयाचे झाले.

यवद्वीपांतील भाषेंत संस्कृत शब्दांचा भरणा होऊन जी एक नवीन भाषा बनली तिचें नांव 'कवि' असें पडलें. पारमार्थिक शिक्षण व ग्रंथलेखन या कामीं कवि भाषेचा उपयोग केला जाई. कवि भाषा ही सामान्य लोकांस पवित्र वाटे; पुरोहितांना ती अगदीं सोपी व साधी अशी वाटत असल्यामुळें ते काव्यें लिहिण्यास तिचा उपयोग करीत.

रामायणाचें व इतर महाकाव्यांचीं रूपांतरें कविभाषेंत झालेलीं आढळतात. ज्या वेळीं जावामध्यें रामायणाचा प्रवेश झाला त्या वेळीं भरतखंडांतील रामायणास उत्तरकाण्ड जोडलें गेलें नसावें. जावामध्ये कविभाषेंतील रामायणाचें 'रोमो' या नांवाचें जावानी भाषेंतील रूपांतर अस्तित्वांत आहे. 'रोमो' हा ग्रंथ बहुधा मुसलमानी काळांतील असावा.

अगदीं अलीकडे कविभाषेंत 'अर्जुनविजय' या नांवाचा ग्रंथ झाला आहे; त्यांत उत्तरकाण्डांतील कथाभाग घेतलेला आहे. कविभाषेंतील महाभारताच्या पर्वांतील श्लोकसंख्या भारतीय महाभारताच्या श्लोकसंख्येहून निराळी आहे.

कविभाषेतील धार्मिक ग्रंथांतील दुसऱ्या प्रतीचें वाङ्मय हें अंशतः संस्कृत ग्रंथांच्या आधारें देश्य लोकांनीं व अंशतः भारतवर्षांतून तेथें गेलेल्या हिंदूंनीं रचिलेलें आहे.

भारतयुद्ध या ग्रंथांतील कथाभाग महाभारताच्या ६ ते ९ पर्वांवरून घेतलेला आहे. हा ग्रंथ कविवाङ्मयाच्या दुसऱ्या कालविभागांत मोडतो. यांत लौकिक भाषेचें मिश्रण आढळतें.

जावाच्या वाङ्मयांत अद्भुत वाङ्मयहि आहे. या अद्भुत कथांपैकीं कांहीं निव्वळ हिंदु, कांहीं मुसलमानी व कांहीं मिश्र स्वरूपाच्या आहेत.

हिंदुस्थानांत पुराणें व महाभारत यांतील कथांचा उत्तरकालीन वाङ्मयापासून तुटकपणा दिसतो. तसा या यवद्वीपांत दिसत नाहीं. उलट, येथें कथावाङ्मयस्वरूपाचें सातत्य दिसून येतें. कांहीं बाबतींत मराठी बखरी व 'बाबद' बखरी यांची तुलना करतां येईल.

जावा व बलि बेटांत नीतिविषयक पुष्कळ वाङ्मय आहे. देगुणाति हें एक उपदेशपर काव्य असून त्यांत राजधर्महि सांगितला आहे. 'इंद्रलोक' हा ग्रंथ राजनीति या विषयावर लिहिलेला आहे. इंद्रलोक हा एक मुत्सद्दी आचार्य होता.

जावाच्या वाङ्मयांत संस्कृत शब्द शिरले, व भारतीय वृत्तेंहि जावामध्यें गेलीं. 'अजरपिकतन्', 'अजिके नांग', वगैरे छंदःशास्त्रावरील ग्रंथ त्यांच्यांत झाले आहेत; 'नागरकृतागम' काव्यांत अनेक वृत्तें आलीं आहेत. त्यांतील नांवांवरून व लक्षणांवरून त्यांत भारतीय वृत्तें किती आहेत व नवीन येथें कशीं तयार झालीं याची कल्पना येते.

जावा येथें आपलें वैद्यक कितपत प्रसार पावलें होतें हें कळत नाहीं. 'अंगुलिप्रवेश' नांवाचा कामशास्त्रावरील एक ग्रंथ ऋषि संबिन्न याच्या नांवानें प्रसिद्ध आहे.

कलाकौशल्यावर निरनिराळे ग्रंथ असतील असें वाटतें. हत्यारें, आउतें याचा उपयोग सांगणाऱ्या ग्रंथाचें अस्तित्वहि दिसून येतें. 'पंगे लिंगे लिंग पदर्तन इ तरु' हा ग्रंथ अशाच प्रकारचा आहे.

'परारतन' व 'नागरकृतागम' या ग्रंथांत जावाच्या साम्राज्याखालीं कोणकोणते देश होते तें सांगितलें आहे. नागरकृतागमांत बरीच ऐतिहासिक माहिती आहे. तेथील राजघराणें, तेथील राजांचे परकीय राजांशीं संबंध, त्या राजांनीं केलेलीं सार्वजनिक कामें, वगैरे गोष्टींची माहिती या काव्यावरून होते. तसेंच परारतन ग्रंथांत एका मोठ्या श्राद्धसमारंभाचा उल्लेख आहे.

जावांतील प्राचीन अवशेष—जावामध्यें फार प्राचीन काळचे अवशेष फारसे सांपडत नाहींत. मधून मधून दगडी हत्यारांचे अवशेष दृष्टीस पडतात. हिंदु राजांचा अमल जावावर असतांना त्यांच्या अमदानींत जीं देवालयें व मठ बांधले गेले त्यांचे अवशेष मात्र पुष्कळ सांपडतात; त्यावरून तत्कालीन शिल्प किती उच्च दर्जाचें होतें, याची साक्ष पटते. पूर्व व मध्य जावामध्यें हिंदुपद्धतीचीं देवालयें दृष्टीस पडतात; पण या ठिकाणच्या देवालयांत फरक आढळतो. मदुरेंत एकहि हिंदु देवालय नाहीं. केंडल भागामध्यें जीं गांवें आहेत त्या गांवांचीं नांवें पाहिलीं असतां पूर्वी त्या ठिकाणीं शैवांचीं व बौद्धांचीं देवालयें होतीं असें वाटतें. बुद्धाचीं देवालयें आठव्या ते दहाव्या शतकाच्या दरम्यान बांधलीं गेलीं असावींत असा तर्क आहे. मध्य जावामधील देवालयांपेक्षां पूर्व जावांतील देवालयें नंतरचीं दिसतात. महाराजा धीरत आदित्यधर्मानें सात मजली विहार बांधल्याचा उल्लेख जो मेनंगकाघू शिलालेखांत आहे, तो विहार 'बोरोबुदर' होय असें कित्येक मानतात. ८४० सालच्या एका ताम्रपटांत डिएंग हा जावामधील एक पवित्र डोंगर होय असें म्हटलें आहे. जावामधील देवालयांची रचना चालुक्य तऱ्हेची आहे असें फर्ग्यूसननें म्हटलें आहे; पण इझरमननें फर्ग्यूसनचें म्हणणें चुकीचें आहे असें दाखवून देवालयांचा घाट द्राविडी पद्धतीचा आहे, असें स्पष्ट व सप्रमाण सिद्ध केलें आहे. डिएंग पठारावर शिव, दुर्गा, गणेश यांचीं देवालयें दृष्टीस पडतात. त्याचप्रमाणें चंडीअर्जुनी, चंडीश्रीखंडी, चंडी पंतदेवी, चंडीपरकेसिता यांचीं देवालयें आहेत. या पठाराच्या ईशान्येस दरवती व परकेसिता यांचीं देवालयें आहेत. पूर्वेस पडकीं देवालयें आहेत. वायव्येस पुष्कळ देवालयें असून त्यांत संचकीचें देवालय चांगलें आहे. दक्षिणेस चंडीमीमाचें उत्कृष्ट देवालय असून त्या देवळाचा आकार मनोऱ्यासारखा आहे. या एका देवळाची रचना चालुक्य पद्धतीची आहे. जावामध्यें जीं हिंदु देवालयें आहेत त्यांमध्यें बोरोबुदर देवालय हें सर्वांत भव्य व कलाकौशल्याच्या दृष्टीनें जगांतील अति प्रसिद्ध देवालयामध्यें मोडण्यासारखें आहे. हें केडू भागामध्यें प्रोगोच्या पश्चिमेस थोड्याफार अंतरावर आहे. हें देवालय एका डोंगरावर असून त्याकडे जाण्यासाठीं चार मोठे जिने चढावे लागतात. या देवालयाचें शिल्प अशा तऱ्हेचें केलें आहे कीं, तें पाहतांच मनुष्याचें मन संसारापासून परावृत्त व्हावें. पायथ्यापासून तों शिखरापर्यंत महायान पंथाचीं तत्त्वें खोदलेलीं आहेत. या देवालयांत जिकडे तिकडे बुद्धाच्या मूर्ती आहेत.

सुरकर्ता संस्थानांत प्रंबनन येथें हिंदु देवळें पुष्कळ आहेत. येथील देवालयांच्या समूहाभोंवतीं तिहेरी तट आहे. दुसऱ्या व तिसऱ्या तटाच्या मध्यें १५७ लहान लहान देवालयें आहेत. पश्चिमेकडील तटाच्या मध्यभागीं एक मोठें देवालय असून त्यामध्यें कालस्वरूपी शिव, गणेश, दुर्गा, इत्यादि देवतांच्या मूर्ती आहेत. दक्षिणेच्या बाजूला चतुर्मुख ब्रह्मदेवाचीं व उत्तर बाजूला विष्णूचीं देवालयें आहेत. याशिवाय चंडीसेवू, चंडीलंबग, इत्यादि पुष्कळच देवालयें आहेत. कांहीं कांहीं देवालयांवर लेख खोदलेले आढळतात.

पनचरम येथेंहि देवालयांचा समूह आहे. येथील मुख्य देवालय खोदकामाचा नमुना म्हणून प्रसिद्ध आहे. बाहेरच्या द्वारपालांच्या मूर्तींचा पोशाख चिनी शिल्पकलेचा अवशेष या नात्यानें प्रेक्षणीय आहे. चिनी लोकांचें या देशाशीं पुष्कळ

दळणवळण असल्यामुळें चिनी शिल्पाचे अवशेष येथें सांपडतात व त्याचा अभ्यास करणें मनोरंजक व उपयुक्त आहे.

**जाविद्खान**—मोंगलाईंतील एक खोजा सरदार. मराठी ऐतिहासिक कागदपत्रांत याचें नांव जावितखान असें येतें. हा मूळचा खोजा असून अहमदशहा (दिल्लीचा) व त्याची आई यांचा मोठा आवडता होता. त्यांनीं याला मोठा अधिकार देऊन व अमीर करून नबाब बहादूर ही पदवीहि दिली. पातशहावर असलेलें याचें वजन दरबारी मंडळींस पाहवेना. शेवटीं त्यांपैकीं नबाब सफरदरजंग यानें त्याला मेजवानीस बोलावून त्याचा खून करविला (ऑगस्ट १७५२).

**जासवंद**—[ लॅ. हिबिस्कस रोझा सायनेन्सिस ]. एक फुलझाड. हें सुमारें पुरुषभर वाढतें. या झाडाच्या पांढरी, तांबडी, भगवी अशा १८ जाती आहेत. जासवंदीचें झाड मूळचें चीन देशांतील असून हल्लीं सपाट प्रदेशांतील सर्व बगीच्यांत ही झाडें लावलेलीं आढळतात. या झाडाच्या सालीपासून धागा निघतो व याच्या फुलापासून रंग तयार होतात. फुलांचा व मुळ्याचा औषधाच्या कामीं उपयोग होतो.

**जासुंद**—[ ॲंटिआरिस टॉक्सिकॅरिआ ]. इंग्रजींत याला 'युपास' म्हणतात. जावा आणि फिलिपाइन बेटें यांतून हीं झाडें अतिशय होतात. ब्रह्मदेश, पश्चिमघाट व सिलोन यांमधील जंगलांतहि आढळतात. या झाडापासून पांढरी राळ निघते, तिचा विषारी बाण करण्याकडे उपयोग करतात. अंतर्सालीपासून केलेल्या वाखाचे दोर मजबूत होतात. बूड म्हणून झाडाचें थोडें खोड ठेवून झाडाची सबंध साल काढून तिचा धान्य भरून ठेवण्याकरितां (पोतीं तयार होत असल्यामुळें) उपयोग करतात; यावरून पश्चिम हिंदुस्थानांत या झाडांना 'पोत्यांचीं झाडें' असें म्हणतात. बिया तापहारक व आमांशप्रतिबंधकहि आहेत.

**जाहिरात**—विक्रीच्या मालाचा प्रसार करण्यासाठीं त्या मालाची माहिती देण्यांत येत असते. अन्नपदार्थ, कापडचोपड, गृहवस्तू, वाङ्मय, औषधें, इ. च्या जाहिराती असतातच, पण आगगाड्या, आगबोटी, पेढ्या, विमाकंपन्या, वगैरे मोठ्या उद्योगधंद्यांच्याहि जाहिराती देण्यांत येत असतात. वृत्तपत्रांतून, भिंतींवर कागद लावून, वाहनांतून फलक रंगवून, सिनेमा नाटकांच्या पडद्यांवर लिहून, रस्त्यांतून पत्रकें वांटून, इ. रीतीनें लोकांना माहिती देण्यांत येत असते. वर्तमानपत्रें आणि नियतकालिकें यांना अशा जाहिरातींपासून मोठी प्राप्ति असते. तेव्हां त्यांचें एक स्वतंत्र जाहिरातखातें ठेवलेलें असतें. जाहिराती देण्याचा धंदा करणारे दलाल व संस्थाहि असतात. जाहिरात कशी व कोठें दिली असतां मालाला बरीच मागणी येईल यासंबंधीं एक शास्त्रच पाश्चात्य देशांत तयार झालें आहे; व तें शिकविणाऱ्या शिक्षणसंस्थाहि पुष्कळ आहेत. आजचा व्यापारधंदा बराचसा जाहिरातींमुळें चालत असतो. तेव्हां प्रत्येक व्यवसायाला जाहिरात करावी लागते. वैद्यकी, वकिली, हिंवेशनिशी, वगैरे कांहीं भारदस्त धंदे जाहिरातींपासून अलिप्त ठेवलेले आहेत. पण ते तसे राहूं शकत नाहींत.

गेल्या महायुद्धापासून जाहिरातीच्या कलेंत फार सुधारणा झाल्या आहेत. चांगले साहित्यिक व कलावंत यांना जाहिरातीसाठीं राबविण्यांत येतें. विजेच्या साहाय्यानें प्रकाशद्वारां व विमानांच्या मदतीनें आकाशाच्या फलकावरहि जाहिराती उठविण्यांत येतात. जाहिरातींतून एखाद्या गोष्टीची जी माहिती देण्यांत येते ती प्रत्यक्ष न देतां कांहीं शैक्षणिक किंवा तात्त्विक भूमिका घेऊन देण्यांत येते. साबणाची जाहिरात करतांना जुन्या उत्कृष्ट चितांऱ्यांचीं चित्रें देण्यांत येतात तर कांहीं इकडची तिकडची गंमतीची ऐतिहासिक माहिती देण्यांत येते. सरकारदेखील लोकांनीं पैसे कर्जाऊ द्यावे किंवा विशिष्ट नियमांनीं वागावें म्हणून अशा जाहिराती वृत्तपत्रांतून देतें. जितका मोठा धंदा तितका मोठा खर्च जाहिरातीवर दरसाल होत असतो. सिनेमाच्या जाहिरातींचें उदाहरण डोळ्यापुढें आहेच. विलायतेंत एकेक संस्था दरसाल लाखों रुपये जाहिरातीसाठीं खर्च करते. या बाबतींत अमेरिका सर्व राष्ट्रांच्या पुढें आहे.

**जाळीचें (बुट्टीदार) कापड**—(टॅपेस्ट्री). दारावरील व भिंतीवरील पडदे, मौल्यवान् सामानावरील आच्छादनें, वगैरेकरितां उभ्या दोऱ्यामध्यें निरनिराळ्या प्रकारचें व रंगाचे, धोटा किंवा हातमाग यांशिवाय फक्त सुईनें दोरे भरून तयार केलेलें नक्षीदार कापड. ही कला फार जुन्या काळापासून अस्तित्वांत असलेली दृष्टीस पडते. अशा कामाचे नमुने ईजिप्त व ग्रीक संस्कृतीच्या काळांतहि आढळतात. तसेंच ईजिप्ती व रोमन पद्धतीचें मिश्रण असलेले नमुने ख्रिस्ती सनाच्या दुसऱ्या ते पांचव्या शतकापर्यंत आढळतात. सध्यां सर्व प्राथमिक अवस्थेतील लोकांमध्ये ही सुताचें हातांनीं विणून जाळीदार कापड बनविण्याची कला आढळून येते. पांचव्या ते नवव्या शतकामध्यें अशा तऱ्हेचें कापड फक्त ख्रिस्ती मठांतून आढळतें. परंतु पुढें या तऱ्हेचें कापड विणणाऱ्या कारागिरांचे संघ स्थापन होऊन या कलेची तेराव्या शतकापर्यंत पुष्कळ वाढ झाली. या कलेचें मुख्य ठिकाण उत्तर युरोप व विशेषतः आरास हें शहर होतें. तेथें या कलेची जोपासना चौदाव्या व पंधराव्या शतकांत झाली. त्यानंतर पंधराव्या व सोळाव्या शतकांत ती ब्रुसेल्स येथें वाढीस लागली. त्यानंतर सोळाव्या व सतराव्या शतकामध्यें मिडल्वर्ग

व डेल्फ्ट येथें, त्यानंतर मॉर्टलेक येथें व पुढें पॅरिसमध्यें या कलेस आतांपर्यंत आश्रयस्थान मिळालेलें दिसतें. या कलेला निरनिराळ्या देशांतील राजांनीं निरनिराळ्या वेळीं उत्तेजन दिलेलें आढळतें. या तऱ्हेचें कापड तयार करणारे कांहीं खाजगी कारखानेहि फ्रान्समध्यें व इंग्लंडमध्यें स्थापन झाले. फ्रान्समध्यें ओबुसन येथील, व इंग्लंडमधील हाइक्स, फुल्हॅम, विल्यम मॉरिस यांचे कारखाने प्रसिद्ध आहेत. जगांतील अतिशय प्रसिद्ध नक्षी कापडाचा नमुना म्हणजे व्हॅटिकन येथें असलेले 'प्रेषितांचीं कृत्यें' दाखविलेले प्रसंग होत. राफेलनें पोपसाठीं हे काढले. याचें फार झपाट्यानें सर्वत्र अनुकरण झालें. पाश्चात्य पदार्थ-संग्रहालयांतून असे उत्कृष्ट नमुने पाहण्यास ठेवलेले असतात.

**जिऑर्जिओन** (१४७७–१५११)— एक इटालिअन चित्रकार. यानें व्हेनिस येथील कित्येक मोठाल्या इमारतींवर रंगीत चित्रें काढलीं; पण त्यांपैकीं आतां बहुतेक नष्ट झालीं आहेत. त्यानें काढलेलीं चित्रें इटालिअन चित्रकलापद्धतीचे उत्कृष्ट नमुने आहेत. त्याचीं चित्रें थोडीं उपलब्ध आहेत तीं मिलन, लॉरेन्स, व्हेनिस, व्हिएन्ना आणि ड्रेस्डेन येथील चित्रसंग्रहालयांत ठेवलेलीं आहेत. इंग्लंडमध्यें 'नॅशनल गॅलरी' या चित्रसंग्रहांत त्याचें एक चित्र 'गोल्डन एज्' (सुवर्णयुग) हें असून हॅम्टन कोर्टमध्यें 'शेपर्ड' (धनगर) हें चित्र आहे.

**जिऊ महाला**—शिवाजी व अफजलखान यांच्या भेटीच्या प्रसंगांत जिऊ महाला हा शिवाजीचा अंगरक्षक असून खानाच्या मृत्यूनंतर त्याचा सरदार सय्यद बंदा हा शिवाजीवर जेव्हां चाल करून आला, तेव्हां जिऊचा यानेंच बंदा यास ठार केलें. जिऊचा हा महाबळेश्वराजवळील (सातारा जिल्ह्यांतील) कोंढवळें येथील रहिवासी. महाला म्हणजे न्हावी; म्हणजे जिऊचा हा जातीनें न्हावी होता. 'होता जिवा म्हणून वांचला शिवा' अशी एक म्हण अफजल–प्रकरणांतील वर सांगितलेल्या प्रसंगावरून पडली होती. हुकुमाची अमर्यादा केल्यामुळें शिवाजीनें पुढें जिऊचास कामावरून दूर करून देहांत शिक्षा दिल्याची हकीकत एका बखरींत आढळते.

**जिगणी**— मध्य हिंदुस्थान, जुन्या बुंदेलखंड एजन्सींतील एक छोटें सनदी संस्थान. क्षे.फ. २२ चौ. मै.. लो.सं. ४,७४५. येथील जहागीरदार बुंदेला रजपूत असून छत्रसाल राजाचा पुत्र राव पदमसिंग हा या जहागिरीचा संस्थापक होय. पूर्वी ही जहागीर बरीच मोठी होती. परंतु मराठ्यांच्या स्वाऱ्यांनीं व इतर कारणांमुळें बरीच कमी झाली आहे. हींत जिगणी हें मुख्य गांव आहे. हें संस्थान आतां मध्यभारत संघांत सामील झालें आहे.

**जिजाबाई**–१. (मु. १५९५–१६७४)—लुखजी जाधवाची मुलगी व मराठी राज्याचा संस्थापक शिवाजी याची आई. हिच्या आईचें नांव म्हाळसाबाई. जिजाबाई चार वर्षांची असतांना हिचें लग्न शहाजी भोसले याच्याशीं झालें. तिला संभाजी नांवाचा वडील मुलगा होता. संभाजीच्या लग्नानंतर शिवाजीचा जन्म झाला (स. १६३०). या सालीं शहाजीनें तुकाबाईशीं लग्न केलें. तेव्हांपासून हिचें नवऱ्याशीं बरें नव्हतें. पुढें जिजाबाईस तिचा चुलता जगदेवराज यानें घरीं नेलें. मध्यंतरीं मोंगलांनीं हिला पकडून पन्हाळ्यावर कैदेंत ठेवलें. पण पुढें जगदेवाच्या सांगण्यावरून सोडिलें. राजकारणाचें शिक्षण हिला शहाजीकडून मिळालें होतें. ही मानी, निश्चयी, धाडसी व स्वतंत्र वृत्तीची होती. शहाजीच्या सल्ल्यावरून ती शिवाजीसह पुणें येथें येऊन राहिली. हिनें शिवाजीस राजास आवश्यक असें शिक्षण दिलें. शिवाजीच्या मनांत राज्य स्थापन करण्याची कल्पना हिनेंच बिंबविली. जिजाबाईनेंच धार्मिक गोष्टींकडे त्याचें चित्त लाविलें. ही स्वतः शूर असून हिला लिहितां-वाचतां येत होतें. शहाजी कर्नाटकांत असतां ही पुण्याच्या जहागिरीची व्यवस्था पाहत असे. हिनें न्यायनिवाडेहि केले होते. बजाजी निंबाळकर जो मुसलमान झाला होता, त्याला शुद्ध करवून जिजाबाईनें शिवाजीची मुलगी सखूबाई बजाजीचा मुलगा महादजी यास दिली. महाबळेश्वरास ता. ६ जानेवारी १६६५ रोजीं जिजाबाईची तुला झाली होती. हिनें गोपाळ श्रीधर महाबळेश्वरकर यांचा उपदेश घेतला होता. स्वराज्य-स्थापनेचा हेतु जिजाबाईनें शिवाजीकडून पार पाडला. यामुळें शहाजीस आनंद झाला. पुढें थोडक्याच दिवसांत शहाजी वारला (१६६४). जिजाबाई सती जाण्यास निघाली, पण शिवाजीनें आग्रहानें हीस थांबविलें. शिवाजीनें हिच्या तैनातीसाठीं एक स्वतंत्र खातें ठेविलें होतें. प्रजेचा परामर्श शिवाजीपेक्षांहि ही जास्त घेत असे. ही शिवाजीच्या राज्याभिषेकानंतर १२ दिवसांनीं पांचाड गांवीं (१७ जून) दिवंगत झाली.

२. (मृ. १७७२)—ही कोल्हापूरकर पहिल्या संभाजीची बायको व ताराबाईची सून. या सासवा–सुनांचें वांकडें होतें. जिजाबाई फार हुशार, धोरणी व राजकारणी होती. संभाजी हिच्याच सल्ल्यानें वागे. ही स्वभावानें फार कडक व स्वकार्यसाधनार्थ वाटेल तें करण्यास, मागेंपुढें न पाहणारी होती. कोल्हापूरचें राज्य स्थापण्याचें बरेंच श्रेय हिला आहे. ही ताराबाईप्रमाणें हट्टी नसून प्रसंगीं तडजोड करून कार्य साधणारी होती. संभाजी निपुत्रिक मेल्यामुळें हिनें शिवाजी नांवाचा पुत्र दत्तक घेऊन राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. हिनें नानासाहेब पेशवे याच्याकडून कोल्हापूरचें राज्य राखीन, असें

वचन घेतलें होतें. या वचनामुळेंच पुढे दु. बाजीरावाच्या कारकीर्दीत कोल्हापूरकरांनीं पेशव्यांच्या राज्यांत अतिशय धुमाकूळ घातला असतां व कोल्हापूरचें राज्य नामशेष करण्याचें सामर्थ्य परशुरामभाऊसारख्या सेनापतीच्या अंगीं असतांहि तें राज्य खालसा करण्याचें पेशव्यांच्या मनांत आलें नाहीं. नानासाहेब पेशव्यांनीं या बाईस पुण्यास आणून तिचा सन्मान केला होता. हिच्याच भीतीनें रामराजास पानगांवला गुप्तपणें ठेवण्यांत आलें होतें. त्याला ठार मारण्यासाठीं तिनें एकदां बावड्यावर स्वारीहि केली. हिच्याच कारकीर्दीत इंग्रजांनीं मालवणचा किल्ला घेऊन कोल्हापूर दरबाराशीं तह केला. मालवण गेल्याबद्दल तिला फार वाईट वाटलें व तिनें तो परत घेण्याबद्दल सक्तीचे हुकूम सोडले होते. मराठेशाहींतील एक कर्तबगार स्त्री म्हणून हिचें नांव इतिहासज्ञ घेतील.

**जिंजी**—हा किल्ला मद्रास इलाख्यांत मद्रासच्या नैर्ऋत्येस ४० कोसांवर दक्षिण अर्काट प्रांतांत आहे. किल्ला राजगिरी, कृष्णगिरी व चंदरायदुर्ग अशा तीन टेंकड्या मिळून बनला आहे. त्यांत राजगिरी टेंकडी मुख्य व उंच आहे. तिन्ही बाजूंनीं सरळ उंच कडे आहेत व उत्तरेकडून एक लहानशी वाट आहे. किल्ल्याभोंवतीं तिहेरी मजबूत तट असून वर जाण्याची वाट मजबूत व अरुंद केली आहे. या तीन टेंकड्यांभोंवतीं त्याना एकमेकांना जोडून तटबंदी केलेली आहे. बाहेरून दगडांचा तट व आंतून विटांचा तट व मध्यें पहारेकरी वगैरेसाठीं जागा, अशी त्याची रचना आहे. किल्ल्यांत कित्येक सुंदर इमारतींचे अवशेष आहेत. त्यांत दोन देवळें, कल्याणमहाल व कोठारें वगैरे पाहण्यासारखीं आहेत. कल्याणमहालाच्या मधल्या चौकांत आठ मजली मनोऱ्यासारखी एक इमारत आहे. याशिवाय स्नानाचे चौरंग, तोफा व कैद्यांची विहीर वगैरे पाहण्यासारखीं आहेत. हा किल्ला विजयानगरच्या राजांच्या हातीं होता.

कर्नाटकच्या मोहिमेंत आदिलशहाच्या ताब्यांतून शिवाजीनें हा घेतला. व तेथें सुभा स्थापून रघुनाथपंत हणमंते यास तेथील सुभेदारी दिली आणि सात लाख होनांचा जिंजीचा सुभा व्यंकोजीस दूधभातास जहागीर दिली. राजाराम महाराष्ट्रांतून निघून येथें आल्यावर (१६८९ नवंबर) ७ वर्षें औरंगजेबानें किल्ल्यास वेढा देवविला. परंतु राजाराम त्याच्या हातीं लागला नाहीं. वेढ्याचें काम झुल्फिकरखानाकडे होतें. संताजीनें झुल्फिकरचा पराभव केला, तेव्हां त्यानें संताजीशीं तह केला व तो वांदिवाशकडे निघून गेला ( १६९३ जाने. ). त्याच्या सैन्याची इतकी हलाखी झाली कीं, बारा कोसांच्या मजलीस एक महिना लागला ( १६९३ सप्टेंबर ). झुल्फिकरनें बादशहाच्या आज्ञेवरून जिंजीस पुनः वेढा दिला. तेव्हां संताजीनें पुनः त्याच्यावर हल्ले करून त्याला इ. स. १६९६ च्या एप्रिलांत वेढा उठविणें भाग पाडिलें. पुढें पुनः औरंगजेबानें जिंजी घेण्याचा सक्तीचा हुकूम सोडल्यानें झुल्फिकरनें स. १६९७ च्या नोव्हेंबरांत वेढा दिला. शेवटीं राजाराम हा सर्व मंडळींसह किल्ल्यांतून निसटल्यावर ( डिसेंबर ) रिकामा किल्ला मोंगलांनीं घेतला. या वेढ्याचें महत्त्व तत्कालीन युरोपियन लोकांस फारच वाटत होतें. त्यांनीं त्याला ग्रीस देशांतील ट्रॉयच्या वेढ्याची उपमा दिली आहे. मराठे लोक या किल्ल्यास चंदी म्हणत.

**जिंद**—पूर्व पंजाब. हें जिंद निजामतीचें व तहशिलीचें मुख्य ठिकाण असून सदर्न पंजाब रेल्वेचें स्टेशन आहे. येथील लोकसंख्या जवळजवळ १०,००० आहे. हें पूर्वीं संस्थानच्या राजधानीचें ठिकाण होतें. अद्यापहि राज्यारोहणसमारंभ येथेंच होतो. कुरुक्षेत्रांत हें गांव वसलें असून पांडवांनीं या ठिकाणीं जयंती देवीचें देऊळ बांधलें असें म्हणतात. पुढें या देवळाभोंवतीं गांव वसला व त्यास जयंतपुरी हें नांव पडलें. ( त्याचाच जिंद हा अपभ्रंश होय ). १७५५ सालीं जिंदचा पहिला राजा गजपतिसिंग यानें हा गांव जिंकल्यापासून याचा अर्जित काळ आला. येथें प्राचीन देवळें पुष्कळ आहेत. येथील फत्तेगड किल्ला राजा गजपतिसिंग यानें बांधला. हल्लीं त्याचा तुरुंगाप्रमाणें उपयोग केला जातो. येथें स्थानिक व्यापार बराच आहे.

**जिंदगी**—कधीं कधीं नागरिकांची जिंदगी त्यांच्या स्वतःच्या खटपटीनें, पैशानें नव्हे तर एकंदर लोकसंख्येची वाढ, नगराची भरभराट, व्यापार, इ. गोष्टींमुळें किंमतीनें बरीच वाढते. ही विनाश्रम व मोफत झालेली जिंदगीच्या किंमतींतील वाढ मालकालाच केवळ फायदेशीर न ठेवतां तिचा कांहीं फायदा सर्व जनतेला ( जनतेच्या शासन-संस्थेला ) मिळाला पाहिजे, म्हणून कांहीं शासन-संस्था या जिंदगीवर उत्कर्ष-कर लादतात. याखेरीज जिंदगीवर कांहीं ठराविक करहि घरपट्टीप्रमाणें बसवितात. हा प्रातीवरील कराप्रमाणेंच असून माणसाच्या जिंदगीचें सालीना जें उत्पन्न असेल त्या मानानें हा बसविला जातो. मुंबई सरकारनें १९४६ सालापासून घरपट्टीबरोबर हा कर वसूल करण्याची योजना केली आहे.

**जिंद संस्थान**—पूर्व पंजाब, फुलकियान संस्थानांपैकीं एक. क्षे. फ. १,२८२ चौ. मैल व लो. सं. ३,६१,८१२. संग्रूर हें राजधानीचें ठिकाण आहे. बहुतेक प्रदेश सपाट आहे. पाऊस सरासरी दहाबारा इंच पडतो. हवा विशेषतः जिंद तहशिलींतील दमट व रोगट आहे.

फुलकियान घराण्याचा मूळपुरुष फूल याच्या वंशांतील गजपतिसिंग यानें इ. स. १७६३ त येथें स्वतंत्र गादी स्थापिली. तो दिल्लीच्या बादशहाचा मांडलिक होता. पुढें नाभा संस्थानचा

राजा व गजपति यांचें वांकडें येऊन दोघांत युद्ध सुरू झालें, गजपतीनें नाभ्याचा बराच मुलूख घेतला. बादशहानें जिंदवर स्वारी केली असतां सर्व फुलकियान राजे एक होऊन त्यांनीं बादशहाशीं टक्कर दिली. एकदां गजपतिसिंगास मोंगलांनीं कैदहि केलें होतें. त्याचा मुलगा बाघसिंग हा रणजितसिंगाचा मामा असून ब्रिटिश सरकार त्याला मानीत असे. शिखांविरुद्ध जिंदचे संस्थानिक इंग्रजांना मदत करीत, म्हणून इंग्रज सरकारहि त्यांना किताब व मुलुखांच्या देणग्या देई. १८५७ च्या व अफगाण युद्धांतहि जिंदचा राजा इंग्रजांच्या साहाय्याला असे. सध्यांचे महाराज राजबीरसिंग हे १९४८ सालीं गादीवर आले. संस्थानचें उत्पन्न सुमारें ४० लाख रु. आहे. हें संस्थान आतां पूर्व पंजाब संस्थानी संघांत सामील झालें आहे. जिंद निजामतींत, जिंद-तहसील आहे. मुख्य पिकें गहूं, कापूस, ऊंस, वगैरे असून लांकूड आणि धातू यांवर नक्षीकाम उत्तम होतें. संस्थानांतून आगगाडी जाते.

**जिद्दा**—हें अरबस्तानांतील हेजाझ या राज्याची राजधानी आहे. त्याची लो. सं. २०,००० आहे. हेद्जची यात्रा करणाऱ्या मुसलमान यात्रेकरूंना तांबड्या समुद्रांतील या बंदरावर उतरून तिकडे जावें लागतें. या बंदरांत पाण्याची खोली पुष्कळ आहे. तेथून कॉफी, गालिचे, धूप व मोतीशिंपा परदेशीं जातात. ब्रिटन आणि नेद्जचा राजा इब्नसौद यांच्यामध्यें शांततेचा व मैत्रीचा तह— जिद्दाचा तह १९२७ मध्यें झाला.

**जिनकीर्ति**—एक जैन ग्रंथकार. सोमसुंदरच्या पांच शिष्यांपैकीं जिनकीर्ति एक होता. चंपकश्रेष्ठी कथानक नांवाचें पुस्तक जिनकीर्तीनें लिहिलें असून वेबरनें त्याचें भाषांतर केलेलें आहे. 'धन्यशालिचरित्र' याचा कर्ता जिनकीर्तिच होता. याच्या हस्तलिखित प्रतीवर संवत् १४९७ ही जी मिति दिली आहे तीच बहुधा ग्रंथरचनेची असावी. शिवाय जिनकीर्तीनें संवत् १४९४ मध्यें 'नमस्कारतत्त्व' नामक ग्रंथ लिहून त्याजवर टीकाहि लिहिली. जिनकीर्तीचे 'दानकल्पद्रुम' व 'श्रीपालगोपालकथा' हे आणखी दोन ग्रंथ असावेत असें कांहीं संशोधक समजतात.

**जिनगर**—एक जात. यांची बहुतेक वस्ती मुंबई इलाख्यांत मराठी जिल्ह्यांतून आहे. घोड्यावरचीं जिनें करणारे ते जिनगर; म्हणून या लोकांना कांहीं वरिष्ठ जाती हलके समजतात. हे आपणांस सोमवंशी आर्यक्षत्रिय म्हणवितात. यांच्यांत दुसरा एक करजगार किंवा कारंजकार (कारंजीं करणारे) म्हणून वर्ग आहे. कारंजकार कातड्याचें काम करीत नाहींत. जिनगर व करजगार यांच्यांत रोटी-बेटीव्यवहार चालतो. जिनगरांत चित्रकार, सुतार, लोहार, कासार, वगैरेंचे धंदे चालतात. यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. पुण्याकडे कांहीं जिनगर कापडी बाहुल्या व चित्रें करतात. पण हा धंदा बहुतेक नाहींसा झाला आहे.

**जिनमित्र**—हा बौद्ध तत्त्वज्ञानी सन १०२५ च्या सुमारास बंगालचा राजा महिपाल याच्या कारकीर्दींत होऊन गेला. हा काश्मीरचा रहिवासी असून तिबेटांतील लोकांस संस्कृत ग्रंथांचें तिबेटी भाषेंत भाषांतर करण्याच्या कामीं मदत करण्यासाठीं दानशील, सर्वज्ञदेव या विद्वानांबरोबर तिकडे गेला. आपल्या 'न्यायबिंदुपिंडार्थ' या तर्कज्ञानावरील ग्रंथांत यानें धर्मकीर्तीच्या न्यायबिंदूचें विवरण केलें आहे. या ग्रंथाची मूळ संस्कृत प्रत उपलब्ध नाहीं, पण या ग्रंथाचें तिबेटी भाषेंतील भाषांतर मात्र उपलब्ध आहे.

**जिनराजदास, सी.** (१८७५- )—एक सिंहली पंडित व थिऑसॉफिकल सोसायटीचे अध्यक्ष. हे कलात्मक व रहस्यग्राही बुद्धीचे म्हणून जगप्रसिद्ध आहेत. हे चांगले कार्यकर्ते, ग्रंथकार व वक्ते आहेत. हे राहणारे सीलोनचे. सन १९०० मध्यें केंब्रिज विश्वविद्यालयांतून संस्कृत व भाषाशास्त्र हे विषय घेऊन एम्. ए. झाल्यावर इटलींतील पेव्हियाच्या विद्यापीठांत वाङ्मय व भौतिकशास्त्र यांचा यांनीं अभ्यास केला. त्यानंतर सिलोनला परत येऊन कोलंबोच्या आनंद कॉलेजचे हे व्हाइस प्रिन्सिपॉल झाले. इंग्रजी, फ्रेंच, इटालियन, स्पॅनिश, पोर्तुगीज यांसारख्या अनेक भाषा यांना येत असल्यानें सन १९०४ मध्यें थिऑसॉफिकल सोसायटीनें यांना अमेरिकेस आंतरराष्ट्रीय व्याख्याते म्हणून पाठवलें. इंग्लंडमध्यें श्री. कृष्णमूर्ति यांचे हे कांहीं दिवस संस्कृतचे शिक्षक होते. सन १९२१-२८ या कालांत थिऑसॉफिकल सोसायटीच्या आन्तरराष्ट्रीय उपाध्यक्षपदावर यांनीं काम केलें. बेझंटबाईच्या आजारीपणांत त्यांच्या जागीं अध्यक्ष म्हणून यांनीं काम केलें व सन १९४५ मध्यें डॉ. अरुंडेल यांच्या मृत्यूनंतर थिऑसॉफिकल सो. च्या अध्यक्षपदाचा मान यांच्याकडेच आला.

प्लेटो व उपनिषदें यांतील तत्त्वज्ञानाशीं हे सहमत होतात. हिंदी कला व संस्कृति यांचे हे अत्यंत अभिमानी असून या दोन्हींची ओळख आपल्या परदेशांतील वास्तव्यांत यांनीं तेथील लोकांना करून दिली आहे. कला, शास्त्र आणि तत्त्वज्ञान या विषयांवर त्यांनीं पन्नासावर ग्रंथ लिहिले आहेत.

**जिनविजयजी, मुनि** (१८८६- )—एक विद्वान् जैन साधु व संस्कृत-प्राकृत भाषांचे पंडित. मेवाडमधील उदेपूर राज्यांत रुपोहली येथील परमार वंशांत यांचा जन्म झाला. किसनसिंह असें मूळ नांव होतें. जैन साधूंच्या सहवासांत असतांना जैन मताचा पगडा यांच्या मनावर बसला, व हे जैन संन्यासी बनले. परंतु पुढें जैन साधूंची प्रतिबंधक

राहणी व आचार यांना न मानवल्यामुळें यांनीं वेष पालटून अध्ययन व अध्यापनकार्यास स्वतःस वाहून घेतलें. इंग्लंड, जर्मनी, वगैरेसारख्या देशांत अभ्यासाकरितां जाऊन यांनीं अपार ज्ञानाचा संचय केला. पुढें हे गुजरात विद्यापीठांत गेल्यावरच 'जैनतत्त्वसार', व 'विंशतित्रिवेणी' हे दोन ग्रंथ यांनीं लिहिले. प्राचीन साहित्य, इतिहास व धर्मग्रंथ यांवरील यांचा व्यासंग मोठा आहे. कांहीं दिवस डॉ. रवींद्रनाथ टागोरांच्या शान्तिनिकेतनांत जैन साहित्याच्या इतिहासाचे प्राध्यापक म्हणूनहि यांनीं काम केलें आहे. हल्लीं ते भारतीय विद्याभुवनांत असतात. (१) जैन सत्त्वसार, (२) कृपारस कोश, (३) प्राचीन जैन लेखसंग्रह, (४) पालि पाठावली, (५) प्राकृत कथासंग्रह, वगैरे ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**जिना, बॅ. महंमद अली** (१८७६-१९४८)— एक श्रेष्ठ मुसलमान पुढारी व पाकिस्तानचा जनक. यांचा जन्म कराची येथें झाला. यांचें शिक्षण प्रथम कराची येथें व नंतर इंग्लंडमध्यें झालें. यांनीं सर दिनशा पेटिट यांच्या मुलीबरोबर लग्न केलें. १९०६ मध्यें मुंबई हायकोर्टाचे ॲडव्होकेट झाले. त्याच वर्षी ते दादाभाई नौरोजी यांचे खासगी चिटणीस म्हणून काम करूं

लागले. १९१० मध्ये ते इंपीरिअल लेजिस्लेटिव्ह कौन्सिल (मध्यवर्ती कायदेमंडळा)चे सभासद झाले. परंतु १९१९ मध्यें रौलट कायदा मंजूर करण्यांत आल्यामुळें यांनीं राजीनामा दिला. १९२० मध्यें भरलेल्या मुस्लिम लीगच्या असाधारण अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. १९२३ ते २५ मध्यें ते सुधारणा चौकशी-समितीचे सभासद होते. १९२६-२७ मध्यें सँढर्स्ट कमिटीचे सभासद होते. मध्यवर्ती असेंब्लीमध्यें स्वतंत्र पक्षाचे ते पुढारी होते. गोलमेज परिषदेचे ते सभासद होते. १९३४ मध्ये मुस्लिम लीगचे अध्यक्ष झाले. १९३६ मध्यें त्यांनी सुधारलेल्या कौन्सिलांत निवडून येण्याकरितां सर्व देशांतील मुसलमानांमध्यें जोराची जागृति व चळवळ केली व मुसलमानांची मोठी संघटना केली. व त्यांच्या वजनानें आणि खटपटीनें ब्रिटिश सरकारला हिंदुस्थानची फाळणी करून पाकिस्तानचा प्रदेश मुसलमानांना स्वतंत्र राष्ट्र म्हणून हिंदुस्थानापासून तोडून द्यावा लागला. १९४७ सालीं ते या पाकिस्तानचे पहिले गव्हर्नर जनरल झाले. पण प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें व अंतर्बाह्य यादवीमुळें त्यांना पाकिस्तानची घडी नीट बसवितां आली नाहीं. तथापि हिंदुस्थानच्या अर्वाचीन पुरुषश्रेष्ठांपैकीं एक म्हणून त्यांचें नांव इतिहासांत राहील.

**जिनीव्हा**—१. हें सर्वांत मोठें सरोवर युरोपच्या मध्यभागीं आहे. याचें क्षे. फ. २२३ चौ. मै. असून याचा आकार चंद्रकोरीसारखा आहे. लांबी सुमारें ४०-४५ मै. आहे. याचीं पश्चिम व पूर्व टोकें अनुक्रमें जिनीव्हा व व्हॅले. यांत असून सर्व दक्षिण किनारा फ्रान्स देशांत मोडतो. याचें पाणी सर्व ठिकाणीं निळें आहे. सरोवरांत बांधलेल्या प्राचीन काळच्या घरांचे (सरोवरगृहांचे) अवशेष येथें विपुल सांपडतात. येथील सृष्टि-सौंदर्य अत्यंत रमणीय व आल्हादकारक आहे.

२. स्वित्झरलंड देशांतील एक शहर. येथें प्रॉटेस्टंट पंथाचें एक सुंदर देवालय आहे. या देवालयाजवळ शिलेखाना आहे. या शिलेखान्यांत अलीकडे ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय मांडलें आहे. येथील इमारती म्हटल्या म्हणजे व्हिक्टोरिया गायनशाळा, नाटकगृह, रशियन देवालय, वगैरे होत. येथें एक नवीन भव्य पदार्थ-संग्रहालय बांधलें आहे. तसेंच एक वेधशाळा असून घड्याळें, रसायनें, औषधें, व्यापार, ललितकला, वगैरे औद्योगिक शिक्षण देणाऱ्या शाळा आहेत. स्वित्झर्लंडला येणारे प्रवासी प्रथम येथें येतात. त्यामुळें व राष्ट्रसंघाचें केंद्र म्हणून हें आगगाड्यांचें जाळेंच झालें आहे. १९२० सालीं राष्ट्रसंघाची मुख्य कचेरी येथें उघडली गेली. तेव्हांपासून या शहराला जागतिक महत्त्व प्राप्त झालें. येथें एक विद्यापीठ आहे. लो सं. १,२४,४३१.

**जिनेश्वरसूरि**—एक जैन ग्रंथकार. याचा गुरु चंद्रकुलांतील वर्धमान नांवाचा होता. 'खरतरसाधुपरंपरा' यापासून निघाली. 'अष्टकवृत्ति' नांवाचा ग्रंथ त्यानें संवत् १०८० मध्यें रचिला. एका वाग्युद्धांत जय मिळाल्यावरून राजाकडून त्याला 'खरतर' ही पदवी मिळाली. पंचलिंगिप्रकरण, वीरचरित, लिलावतीकथा, कथानककोश हे ग्रंथ याचे होत. याचें मूळचें नांव शिवेश्वर असून बापाचें ब्राह्मणसोम होतें. दीक्षा घेतल्यावर जिनेश्वर हें नांव मिळालें.

**जिनोआ**—इटली, याच नांवाच्या प्रांताचें राजधानीचें शहर असून आर्चबिशपचें राहण्याचें ठिकाण आहे. येथें एक विश्वविद्यालय आहे. जिनोआचीं मध्ययुगांत बांधलेलीं प्रार्थनामंदिरें फार सुबक आहेत. येथें पॅलेझोरोझो व पॅलेझोबिआन्को हे दोन प्रसिद्ध राजवाडे आहेत. पहिल्यांत वाचनालयें आणि चित्रांचीं प्रदर्शनें आहेत. दुसरा तर कलाकौशल्याचा खजिनाच आहे. सन १४७१ मध्यें येथें एक विश्वविद्यालय स्थापिलें गेलें. टिआझाफेरारी ही व्यापारी पेठ आहे. येथील सडका रुंद असून

फार चांगल्या आहेत. कापूस कांतण्याचे आणि कातडीं कमावण्याचे धंदे सर्वत्र आहेत. कोळसा, कापूस आणि धान्य हीं परगांवाहून जिनोआस येतात. प्राचीन काळापासून जिनोआ हें व्यापारी बंदर आहे. लो. सं. ६,३४,६४६.

रोमन काळांत या बंदराची प्रसिद्धि होती. पुढें याच्या व व्हेनिसच्या चुरशीच्या गोष्टी सर्वश्रुत आहेत. पाश्चात्य वाङ्मयांत या दोन शहरांचीं नांवें सारखीं येतात.

**जिन्सीवाले, श्रीधर गणेश** ( १८५२–१९०३ )—एक महाराष्ट्रीय पंडित. यांचें बाळपण अत्यंत हालअपेष्टांत गेलें. स्वभाव फार करारी असे, तसेंच आचरणहि फार कर्मठ असे. स. १८७६ त हे एम्. ए. झाले. कांहीं वर्षें शिक्षकाचें काम करून हे विल्सन कॉलेजांत संस्कृतचे प्रोफेसर झाले. अधिकाऱ्यांचा व यांचा एका सामाजिक बाबतींत बेबनाव होऊन यांनीं १८९० सालीं राजीनामा दिला. पुढें राहिलेलें सारें आयुष्य त्यांनीं विद्याव्यासंगांत घालविलें. हे चांगले जहाल वक्ते होते. त्यांचीं व्याख्यानें देशभक्तिप्रेरित व माहितीनें खचलेलीं असत. चिपळूणकरांप्रमाणें महाराष्ट्रांत यांनीं राष्ट्रीय बाणा व आत्मविश्वास उत्पन्न केला.

**जिप्सम**—एक स्वच्छ, वर्णहीन, स्फटिकमय खनिज. २००° सें. उष्णतेला ह्यांतील ¾ पाणी जाऊन त्याचें प्लॅस्टर ऑफ पॅरिस होतें. ह्याच्या भुकटीचा खत म्हणूनहि उपयोग होतो. अगदीं बारीक जिप्सम म्हणजे अलाबास्टर होय. फ्रान्स, स्पेन, आणि उत्तर युरोप या भागांत जिप्सम पुष्कळ सांपडतें.

**जिप्सी**—युरोपांत नेहमीं टोळ्याटोळ्यांनीं राहून सदैव हिंडत राहणाऱ्या ज्या जाती आहेत, त्यांना जिप्सी म्हणतात. हे स्वतःला रोमानी म्हणवितात. पण फ्रान्समध्यें बोहेमियन, जर्मनींत झिग्युनेर व इटलींत झिंगारी असें यांना म्हणतात. घोड्याच्या गाड्यांवरून यांचा संसार; तंबू हीं यांचीं घरें; व गांवोगांवीं हिंडून गायन, नर्तन व वादन यांनीं लोकांची करमणूक करून उपजीविका करणें हें त्यांचें जीवन. ज्योतिष सांगणें, जंतरमंतर करून भोळ्या लोकांना फसविणें, चोऱ्या करणें, हेहि धंदे यांतील कांहीं जाती करतात. उत्तान शृंगाराचीं गीतें गाणें, सुरूप बायकांकडून भोळ्या लोकांना फसविणें, असलेहि प्रकार यांच्यांत चालतात. पंधराव्या शतकापासून जिप्सी युरोपांत बव्हेरिया, स्पेन, इटली यांमध्यें दिसतात. जिप्सींच्या टोळ्या अजूनहि थोड्या प्रमाणांत आढळतात. या टोळ्यांतील स्त्री-पुरुषांचे शरीरबांधे बळकट व आकर्षक असतात. तंग व बहुरंगी कपड्यांमुळें यांच्या शरीरसौंदर्यांत भरच पडते. केशरचना, वेषभूषा व दागिनेसुद्धां विपुल व विविध तऱ्हेचे असतात. यामुळें स्त्री-पुरुष आकर्षक दिसतात. हे लोक मुलें चोरतात अशी लोकांत जुनी समजूत आहे. यांची एकूण संख्या पांच लाख असावी. बाल्कन द्वीपकल्प, रुमानिया आणि रशिया यांतून जिप्सी फार आहेत. यांची भाषा हिंदुस्थानांतील बऱ्याच बोलभाषांप्रमाणें असून कांहीं शब्द हिंदी भाषांतीलच आहेत. तेव्हां हे लोक हिंदुस्थानांतूनच युरोपमध्यें गेले असावेत असें संशोधक मानतात.

जिप्सी लोक हिंदुस्थानांतून तिकडे गेले हें त्यांच्या भाषांच्या अभ्यासानें निश्चित झालें आहे. त्यांच्या भाषांत फारशी, तुर्की, ग्रीक, स्लाव्ह, इत्यादि भाषांतील शब्द आहेत, पण अरबी भाषेंतील नाहींत. यावरून त्यांचा प्रयाणमार्ग दृष्टीस पडतो. जिप्सींच्या एकसारख्या चाललेल्या स्थलांतरानें, त्यांच्या भाषांत होणाऱ्या भेसळीमुळें व हिंदुस्थानांतील भाषा बदलत जात असल्यामुळें, ते हिंदुस्थानांतील नक्की कोणत्या प्रदेशांतून बाहेर गेले, हें शोधून काढणें कठिण झालें आहे.

जिप्सी भाषांतील कित्येक नामांवरून व सर्वनामांवरून आपला व त्यांचा संबंध उघडकीस येतो. जिप्सींच्या सर्व पोटभाषांचा हिंदुस्थानांतील भाषांशीं संबंध आहे. संस्कृत भाषेंत असून हिंदुस्थानांतील अर्वाचीन भाषांत रूढ नसलेले असे कांहीं शब्दप्रयोग जिप्सी भाषांत आढळतात. जिप्सी भाषांच्या व्याकरणाचें हिंदुस्थानांतील भाषांच्या व्याकरणाशीं सादृश्य आढळून येतें. नामांचीं, सर्वनामांचीं व क्रियापदांचीं जिप्सी रूपें कांहीं अंशीं हिंदी रूपांसारखीं दिसतात.

जिप्सी लोकांचे पूर्वज दहाव्या शतकाच्या सुमारास हिंदुस्थानच्या बाहेर पडले व त्यांत जाट लोकांचा भरणा विशेष होता, असें कॅप्टन बर्टनचें मत आहे. त्यांचे धंदे म्हटले म्हणजे, जुनीं भांडीं नीट करणें, घोड्यांचा व्यापार करणें, भविष्य सांगणें, कोल्हाट्यांसारखे खेळ करणें, टोपल्या वगैरे विणणें व उचलेपणा करणें. हे मेलेलीं जनावरें खात, व त्यांचीं प्रेतें वाहत. पौरस्त्यांपेक्षां त्यांचे केंस अधिक दिवस टिकतात. भाषा मुख्यत्वेंकरून जाटांसारखी आहे.

हिंदुस्थानांत व इराणांतहि जिप्सींच्या फिरत्या टोळ्या आहेत. जाटांनीं खलीफांवर अनेक जय मिळविले होते. ११ व्या शतकांत महंमदानें त्यांचा मोड केल्यावर ते पश्चिमेकडे पळाले. अश्वविद्याविशारदत्व, संप्रदायराहित्य व चौरवृत्ति ह्या गुणांत त्यांचें युरोपीय जिप्सींशीं साम्य होतें. पण मेलेल्या डुकराचें मांस भक्षण करणें, वगैरे गोष्टी जाट करीत नसल्यामुळें मध्य हिंदुस्थान व हिंदुस्थानची उत्तरतम सरहद्द यांच्या दरम्यान सांपडणाऱ्या डोम लोकांसारख्या जातींत ते मिसळून गेले असावेत, असें अनुमान काढण्यांत आलें आहे. नाट किंवा नट ह्या हिंदुस्थानांतील भटकत फिरणाऱ्या लोकांचें जिप्सींशीं सादृश्य आहे. बंजाऱ्यांनाहि युरोपीय प्रवासी जिप्सी म्हणतात.

वंजारी व झिंगारी यांतील सादृश्यावरून व हिंदु लोकांत न सांपडणारे शब्द वंजाऱ्यांच्या भाषेंत आढळतात त्यावरून हे लोक म्हणजे युरोपांतील जिप्सींची एक शाखा असावी असा संशय व्यक्त झाला आहे. रोमान्मी भाषेंत झिंगन शब्द आहे. इराणांतील कातड्याचें काम करणारे जिप्सी लोक स्वतःला झिंगन म्हणवितात.

जिप्सी दंतकथांच्या स्वरूपावरून त्यांच्या कांहीं कथा हिंदुस्थानी विचारांचा त्यांच्या मनावर पगडा असतांच तयार झालेल्या दिसतात.

**जिबुटी**— एडनच्या आखातांतील हें बंदर फ्रेंच सोमालीलँड या प्रांताची राजधानी आहे. येथून आगगाडी रस्ता निघून ॲबिसिनियाची राजधानी आडिस-आबाबा यापर्यंत गेला आहे. जिबुटी शहराची लोकसंख्या सुमारें दहा हजार आहे.

**जिब्रान, खलील** ( १८८३-१९३१ )—एक अरब ग्रंथकार. याचा जन्म लेबॉनॉनमध्यें झाला तरी अमेरिकेंत तो वाढला. न्यू यॉर्कमध्यें सीरियन लेखकांचा तो पुढारी असे. त्याचे बरेच अरबी ग्रंथ आहेत. त्यानें इंग्रजी भाषेंतहि 'दि प्रॉफेट' (भविष्यज्ञानी-पैगंबर), 'सँड अँड फोम' (वाळू आणि फेंस), 'जीझस', 'दि सन् ऑफ मॅन' (मानवी पुत्र) यांसारखे ग्रंथ लिहिले. त्याच्या लेखनांत भावनिकता आणि प्रसाद आहे. सामाजिक आणि धार्मिक बाबतींत याचे विचार फार क्रांतिकारक आहेत. जिब्रान याचा चित्रकार म्हणूनहि लौकिक आहे.

**जिब्राल्टर**— युरोप, स्पेनच्या दक्षिण टोंकाशीं व भूमध्यसमुद्राच्या पश्चिम प्रवेशभागीं हें द्वीपकल्प, शहर व किल्ला आहे. जिब्राल्टरची दाक्षिणोत्तर लांबी तीन मैल असून रुंदी पाव ते पाऊण मैल आहे. येथील किल्ला ७४६ सालीं बांधला गेला. हें भूमध्यसमुद्राचें नाक आहे.

जिब्राल्टरची हवा निरोगी असून हिंवाळ्यांत समशीतोष्ण व उन्हाळ्यांत साधारण उष्ण असते. दरवर्षी साधारणतः ३४ इंच पाऊस पडतो. जिब्राल्टरचे रहिवासी मिश्र महावंशाचे आहेत. येथें शिक्षण ५ ते १४ वयापर्यंत सक्तीचें आहे. येथें व्यापार मुळींच नाहीं. येथील मुख्य धंदा म्हणजे येथून जाणाऱ्या आगबोटींना कोळसा पुरविणें हा होय. यामुळें हजारों लोकांना रोजगार मिळाला आहे.

२० व्या शतकाच्या आरंभीं जिब्राल्टरच्या संरक्षणाच्या साधनांत बरेच फरक करण्यांत आले. नव्या तऱ्हेच्या तोफा आणून त्या उंच ठिकाणीं ठेवण्यांत आल्या आहेत. येथें नवीन धक्का बांधल्यामुळें आरमारी ठाणें म्हणून त्याचें महत्त्व वाढलें आहे.

या जिब्राल्टरच्या खडकांवर इ. स. ७११ मध्यें मूर लोक राहत. १४ व्या शतकाच्या मध्यंतरीं किल्ला स्पेनच्या ताब्यांत गेला. स्पेनच्या ताब्यांत असतांना त्या किल्ल्याची तटबंदी इतकी मजबूत करण्यांत आली कीं, सर्व युरोपभर हा किल्ला अभेद्य मानला जात होता. स्पेनच्या वारसासंबंधीं झालेल्या ब्रिटन व स्पेन या दोन राष्ट्रांमधील युद्धांत हा किल्ला ब्रिटिशांच्या ताब्यांत गेला. स्पेननें हा किल्ला परत घेण्याचे प्रयत्न बरेच केले. पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. आतां ही ब्रिटिशांची राजवसाहत (क्राउन कॉलनी) आहे. यावर एक गव्हर्नर असतो. लो. सं. ( १९३१ ) २१,३७२.

**जिरॉंडिस्ट पक्ष**—( जिरॉंडिन ). हा पहिल्या फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळचा ( १७८९ ) फ्रान्समधील एक प्रमुख राजकीय पक्ष होता. जिरॉंडिन प्रदेशावरून हें नांव पडलें. या पक्षाचे पुढारी ब्रिसोत, व्हेर्ग्निओद, कॉन्दोरसेन, वगैरे होते. जिरॉंडिस्ट हे लोकशाही मताचे होते; तथापि केवळ उच्च ध्येयें प्रतिपादणारे असून त्यांच्यापाशीं प्रत्यक्ष व्यावहारिक योजनांचा व धोरणांचा अभाव होता. त्यामुळें हा जिरॉंडिस्ट पक्ष मार्च १७९२ ते जून १७९३ पर्यंतच अधिकारावर होता. पुढें पराभूत होऊन दुसऱ्या पक्षाच्या भक्ष्यस्थानीं पडला. रॉबेस्पीएर पक्षानें लवकरच जिरॉंडिस्ट पक्षाचे बरेचसे लोक गुन्हेगार ठरविले व त्यांच्यापैकीं २१ जणांना शिक्षा म्हणून ठार मारण्यांत आलें.

**जिराफ**—आफ्रिका खंडांत आढळणारा हा एक रवंथ करणारा प्राणी आहे. ओकापी (पाहा) व हा हे एकाच कुटुंबांतील प्राणी होत. हा सर्व प्राण्यांत उंच आहे. याची उंची १८ ते २० फुटांपर्यंत भरते. याच्या डोक्यावर शिंगांसारखे तीन उंचवटे असतात; पण त्यांवर कातडी असते. याचा रंग हरणासारखा असून अंगावर काळे ठिपके असतात. हे स्वभावानें गरीब व निरुपद्रवी असतात. हे ॲबिसीनियापासून ट्रान्सव्हॉलपर्यंत सर्वत्र आढळतात.

**जिरॉल्डस्, कँब्रेन्सिस** ( ११४६-१२२० )—एक वेल्श इतिहासकार. तो पेंब्रोकशायरमधील एका नॉर्मन सरदाराचा मुलगा होता. प्रिन्स जॉनचा सोबती म्हणून तो त्याच्याबरोबर ११८५ मध्यें आयर्लंडला गेला होता. व तेथें त्यानें आपल्या

'टोपोग्रॅफिका हिवर्ननिका' या पुस्तकाकरितां माहिती गोळा केली. नंतर त्यानें वेल्समध्यें तशीच माहिती मिळवून वरील प्रकारचा ग्रंथ लिहिला.

**जिरें (गोडें)**— बंगाल व आसामखेरीज इतर सर्व हिंदुस्थानांतील भागांत याची लागवड होते. उत्तम प्रकारचें जिरें माल्टा येथून येतें. जिरें युरोप खंडांतील लोकांस फार प्राचीन कालापासून माहीत आहे. १७ व्या शतकांत इंग्लंडमध्यें याचा उपयोग मसाल्यास करीत असत. जिऱ्यांत शेंकडा ३ ते ४ प्रमाणांत तेल असतें. युरोपमध्यें या तेलाचा मुख्य उपयोग मद्यें करण्यांत केला जातो. हिंदुस्थानांतहि जिऱ्याचा उपयोग औषधाकडे करतात. हें रक्तशोषक व दाहशामक आहे.

**जिर्कन**—(झिर्कोन). झिर्कोनियम सिलिकेट असलेलें रत्नासारखें कठिण खनिज. झिर्कोनियम हें काळी पूड किंवा धूसर स्फटिक या स्वरूपांत आढळतें. याचा शोध १७८९ सालीं लागला. सिलोनमधील शुभ्र आणि धूसर रंगाचें झिर्कोन आणि ह्याचाच लाल रंगाचा हियासिंथ ह्या नांवानें ओळखला जाणारा आणखी एक प्रकार, हीं प्रसिद्ध रत्नें आहेत. प्राणवायूशीं झिर्कोनियमची पूड मिश्रित होऊन झिर्कोनिया जो तयार होतो, त्याचा उपयोग दिव्याचें मॅन्टल तयार करण्याकडे होतो.

विजेच्या दिव्यांत कार्बन टंगस्टनची किंवा अशीच कशाची तरी बारीक तार असते. विजेचा प्रवाह सुरू झाला कीं या तारा तापतात. त्या पुरेशा तापल्या कीं त्यांच्यापासून प्रकाश मिळतो. एका नव्या वीज दिव्यांत झिर्कोनियम ही धातु वापरण्यांत येते. विजेचा प्रवाह वाहूं लागल्यावर ही पातळ होते व तो रस तापल्यावर प्रकाश मिळतो. पुष्कळदां तार जळून गेल्यानें विजेचे दिवे (ग्लोब) निकामी होतात. असा प्रसंग या दिव्यांमुळें येत नाहीं.

**जिलेटाइन**—शुद्ध सरसाचा एक प्रकार. हा पदार्थ रसाच्या जातीचा असून फार शुद्ध व स्वच्छ असतो. हें कातडीं, हाडें व इतर प्राणिज पदार्थ यांपासून तयार होतें. इसिंग्लास (पाहा) हा याचा शुद्ध प्रकार आहे. जिलेटाइनचे पांढरे तुकडे कांचेसारखे चकचकीत व फार स्वच्छ असतात. म्हणून त्याची किंमत सरसाच्या किंमतीपेक्षां ३-४ पट जास्त असते. ते बनविण्याची रीत अशी : मातीच्या पक्क्या भांड्यांत १२-१३ शेर जलद शिरका घालावा. एक भाग सिरकाम्ल (ॲसेटिक ॲसिड) व ७ भाग गोडें पाणी यांचें मिश्रण एकजीव करावें, म्हणजे जलद शिरका तयार होतो. जलद शिरका जेथें न मिळेल तेथें असा तयार केलेला शिरका वापरावा. ३० तोळे पालाश कर्बितांची (पोट्याश कॉर्बोनेटची) भुकटी घेऊन ढवळून एकजीव करावी. म्हणजे थोडा ऊत येतो. तो ऊत बंद झाल्यावर त्यांत ५ शेर चांगल्या सरसाचे तुकडे भिजत घालावे. एकवार ढवळून तो रस त्यांत दोन दिवस (४८ तास) भिजत ठेवावा. नंतर त्यांत न शोषलेला शिरका दुसऱ्या भांड्यांत ओतून काढावा. तो भिजलेला सरस एक लोखंडी तारेच्या चाळणींत ठेवावा. ती चाळणी भरलेल्या भांड्यांत बुडवून ठेवावी. म्हणजे त्यांतील पालाश शिरकेत (पोटॅश ॲसिटेट) नांवाचा खार त्या पाण्यांत उतरून तो सरस स्वच्छ होतो; तेंच जिलेटाइन होय.

**जिल्हई**—(झिलई). लांकडास जिल्हई द्यावयाची असली किंवा तकाकी आणावयाची असली तर फ्रेंच पॉलिश वापरण्यांत येतें. वस्तरा किंवा इतर हत्यार यास जिल्हई द्यावयाची असली किंवा धार लावावयाची असली तर ती एका फिरत्या चाकाच्या साहाय्यानें लावण्यांत येते. हें चाक लांकडाचें केलेलें असून त्यावर कथील व शिसें यांचें मिश्रण जोडण्यांत आलेलें असतें. इतर जिल्हईकामांत चामड्यानें मढविलेल्या चाकांचा किंवा कुरुंदाच्या भुकटीचा उपयोग करण्यांत येतो. दागिन्यांवर जिल्हई चढवावयाची असल्यास लोखंडाच्या गंजाचा तो पाण्यांत घालून उपयोग करतात. कांच, संगमरवरी दगड, किंवा ग्रॅनाइट दगड यांस पॉलिश करावयाचें असल्यास कथलाच्या किंवा शिशाच्या भुकटीचा उपयोग करतात. घरगुती सामानास तकाकी आणण्याकरितां लाख, गोंद, राळ, स्पिरिट, वगैरेचा उपयोग करण्यांत येतो.

मातीच्या भांड्यांच्या वरच्या अंगास त्यांतून इतर द्रव पदार्थ पाझरून जाऊं नयेत म्हणून एक कांचमय पदार्थाचें पुट चढविण्यांत येतें. याकरितां बहुधा गारेची भुकटी व शिशाचें प्राणिद यांच्या समभाग मिश्रणाचा उपयोग करतात.

**जिवबादादा बक्षी**— एक मराठेशाहींतील सरदार व शिंद्यांचा सेनापति. जातीनें सारस्वत. आडनांव केरीकर. महादजीच्या मृत्यूनंतर शिंद्यांच्या कारभारी मंडळींत हाच प्रमुख असून दौलतराव (वयानें लहान असल्यानें) याच्याच अनुरोधानें चाले. हा सन १७९५ मध्यें दौलतराव शिंद्याबरोबर खर्ड्याच्या लढाईंत होता. हा सन १७९६ मध्यें मरण पावला. याच्या पश्चात् याच्या मुलाकडे कांहीं दिवस बक्षीगिरी दौलतरावानें चालविली होती.

**जिवाशिवा**—एक मराठी कवि. हा पेशवाईंत होऊन गेला. पंढरपूरजवळील क्षेमावती गांवीं राहणारा. याच्या वडिलांचें नांव शिवराय. यानें मराठींत महाभारताचीं बारा पर्वें लिहिलीं.

**जीभ**—बहुतेक सपृष्ठ प्राण्यांच्या तोंडामध्यें जीभ हें इंद्रिय असतें. याचा उपयोग चव घेणें, बोलणें आणि अन्न गिळणें या तीन कामीं होतो. मनुष्यप्राण्यामध्यें जीभ ही खालच्या जबड्यांत बसविलेली असून तिचें एक टोंक मोकळें असतें. तिचा

वरील पृष्ठभाग बाह्यगोल असून मध्यभाग तंतुमय असतो. तिचा पुढील ⅔ भाग खरबरीत असून त्यावर बारीक पुटकुळ्या असतात; त्यामुळें रुचीचें ज्ञान होतें. मागील ⅓ भाग गुळगुळीत असून त्यावर कांहीं श्लेश्मल ग्रंथी असतात. जीभ ही अनेक स्नायूंची बनलेली असते. जिभेवर ज्या बारीक पुटकुळ्या असतात त्या तीन प्रकारच्या असतात: १ परित्यका (सरकम्व्हॅलेट), २ छत्रजीफॉर्म, आणि ३ केशवत् (फिलीफॉर्म). जिभेवर निरनिराळ्या अनेक ग्रंथी असून त्यांतून श्लेश्मा बाहेर येत असतो. हिला प्रत्येक अर्ध्यामध्यें तीन मुख्य मज्जातंतू जोडलेले असतात. यामुळें जिभेस रुचीचें ज्ञान होतें, व तिचा संकोच करतां येतो. जिभेचें टोंक व कडा यांस मध्यभागापेक्षां रुचीची संवेदना अधिक असते. जिभेचें स्पर्शज्ञानहि अतिशय तीक्ष्ण असतें.

**जीमूतवाहन** (बारावें शतक)-- एक संस्कृत ग्रंथकार. संस्कृत भाषेंत धर्मशास्त्रावर ग्रंथ-निर्मिति करणारा हा एक बंगाली पंडित असून राजा विश्वक्सेनाचा न्यायाधीश होता. याचा जन्म पारिभद्र घराण्यांत झाला. कालविवेक, व्यवहारमातृका व दायभाग हे याचे सुप्रसिद्ध ग्रंथ होत. याच्या दायभागावर रघुनंदनानें केलेली टीका सुप्रसिद्ध आहे. ज्योतिषशास्त्राचाहि यास नाद होता.

**जीर्णरक्तक्षय**— (पर्नीशिअस ॲनीमिया). मनुष्याच्या शरीरांतील रक्तामध्यें फार बिघाड झाला असतां त्यास हा विकार होतो आणि त्यापासून बहुतेक मृत्यु येतो. हा विकार बहुधा उतारवयामध्यें स्त्री व पुरुष या दोघांसहि होतो. रोगाचा प्रादुर्भाव झाल्यावर पहिल्याच झटक्यामध्यें मृत्यु येण्याचा संभव असतो. परंतु अनेकदां एक किंवा दोन वर्षें रोगी वांचतो व मध्यंतरीं त्यास सुधारणा झाल्यासारखें वाटतें. या रोगाचें मुख्य कारण आंतड्यामध्यें एखाद्या ठिकाणीं पू होणें हें असतें. या रोगांत तांबडे रक्तकण अगदीं कमी होतात; इतके कीं, एका घनमिलिमीटरमध्यें पांच लाख सुद्धां असत नाहींत. चांगल्या प्रकृतीच्या प्रौढ माणसांत पन्नास लाख तांबडे रक्तकण असतात. या रोगास उपाय म्हणून रोज अर्धा पौंड लीव्हर देतात. रक्तक्षय पाहा.

**जीवकचिंतामणि**— हा एक तामीळ भाषेंतील ग्रंथ असून त्यामध्यें जीवकचरित्र वर्णन केलें आहे. हा तिरुत्तक्कदेवर यानें लिहिला. जे जैन ग्रंथ प्रथम संस्कृतमध्यें होऊन नंतर प्रचलित देशी भाषांमध्यें आले त्यांपैकींच जीवकचिंतामणि हा एक ग्रंथ आहे. हा तामीळ भाषेंतील महाग्रंथ समजला जातो.

**जीवधन किल्ला**—१. मुंबई, पुणें जिल्हा. हा किल्ला नाणेघाटाच्या तोंडावर पुण्याच्या वायव्येस ६५ मैलांवर असून समुद्रसपाटीपासून ३,००० फूट उंच आहे. किल्ल्याच्या चारीं बाजूंस कडे तुटलेले आहेत. याची लांबी १ हजार व रुंदी ५०० यार्ड आहे. किल्ल्याचा चढाव एक मैलाचा पण फार अवघड आहे. वर कांहीं बौद्ध लोकांच्या वेळचीं कोरीव लेणीं आहेत. हा प्रथम १४८९ मध्यें अहमद निजामशहा यानें घेतला. १६३७ सालीं शहाजीनें मोंगलांना दिलेल्या पांच किल्ल्यांमध्यें हा किल्ला होता. मराठी राज्यांत या किल्ल्यावर राजकीय कैदी ठेवीत असत. हा सन १८२० त इंग्रजांनीं पाडून टाकला.

२. मुंबई, ठाणें जिल्हा. विरार स्टेशनच्या पूर्वेस एका मैलावर एका टेंकडीवर हा किल्ला बांधलेला आहे. हा आतां अगदीं पडीक स्थितींत आहे. किल्ल्यांत एक देवीचें देऊळ आहे.

**जीवनरस** —(प्रोटोप्लाझम). जीविशास्त्रामध्यें अतिशय गुंतागुंतीच्या व आस्थिर प्रवृत्तीच्या पण सर्व सेंद्रिय पदार्थांच्या घटनेस व जीवितास अत्यंत आवश्यक अथवा मूलभूत जो अंश त्यास जीवनरस असें म्हणतात. हा अनेक पदार्थांचें मिश्रण असून त्यांत विशेषतः ओजो द्रव्यें असतात. याचें रासायनिक पृथक्करण केलें असतां पुढील मूलद्रव्यें त्यामध्यें हमखास आढळून येतात: कर्ब, प्राण, उज्ज, नत्र, गंधक, स्फुर, हर, पालाश, सिंधु, खट, मग्न व लोह, श्वेतकल्क, मेद (स्नेह), कर्बोज्जितें, प्रोतें (ओजस द्रव्यें), पाणी, विलीन वायू व लवणायनें हे पदार्थ यांत असतात. हा अर्धवट तरल असून याची क्रिया द्रवरूप पदार्थासारखी असते. आणि तो प्रतिस्फटिक स्वरूपाचा असतो. याचें नेहमींच विघटन होऊन साध्या घटकामध्यें रूपांतर होत असतें व त्याच वेळीं साध्या घटकांचा संयोग होऊन संयुक्त पदार्थांचीहि घटना त्यामध्यें होत असते.

**जीवनरसायनशास्त्र**—याला बाराक्षारचिकित्सा असेहि म्हणतात. ही व होमिओपाथी एकच शास्त्र आहे अशी कांहीं लोकांची समजूत आहे. पण ती सर्वांशीं बरोबर नाहीं. आपल्या शरीरांत सांपडणाऱ्या बारा क्षारांपैकीं कांहीं क्षार कमी झाले म्हणजे रोग होतात व ते क्षार शरीरास पुरविले म्हणजे रोग बरे होतात, असा या शास्त्राचा सिद्धांत आहे. क्षारांच्या कमतरतेनें रोग होऊं शकतात हें मान्य होण्यासारखें आहे; पण सर्वच रोग त्या कारणानें होतात हें मान्य होण्यासारखें नाहीं.

या बारा क्षारांपैकीं कोणताहि क्षार औषध म्हणून निवडतांना हें शास्त्र होमिओपाथीप्रमाणें रोगलक्षणांशीं सदृश लक्षणें असणारा क्षार निवडतें. हें दोहोंत साम्य आहे. पण ज्या अर्थी रोगलक्षणसमुच्चयाचीं अनेक चित्रें ' व्यक्ती तितक्या प्रकृती.' या न्यायानें रोग्यांमध्यें पाहावयास सांपडतात, त्या अर्थी

त्या पद्धतींतील केवळ चारा क्षारांचें क्षेत्र अपुरें पडतें. त्याच्या मानानें होमिओपाथिक औषधांचें क्षेत्र फारच मोठें आहे. होमिओपाथिक औषधी गुणधर्मशास्त्रांत आज १२०० पेक्षां अधिक औषधें नमूद आहेत.

होमिओपाथिक औषधांप्रमाणें चारा क्षार-औषधें विभजनांनें सूक्ष्म केलेलीं असतात. पण होमिओपाथींत एका वेळेस एकच औषध देण्यावर जो कटाक्ष असतो तो या पद्धतींत नाहीं, हें दोहोंतील वैषम्य होय.

**जीवनसत्त्वें**—(व्हिटॅमिन्स). शरीरामध्यें रोजच्या अन्नापासून जरी ओजस् द्रव्यें, कर्बोज्जितें व स्नेह (प्रोटीन, कार्बोहायड्रेट व फॅट) यांचा भरपूर पुरवठा होत असला तरीसुद्धां प्रौढ मनुष्यांतील शक्ति व तरुणांची वाढ यांचें योग्य प्रमाण अनेकदां राहत नाहीं, असें आढळून येतें. याचें कारण अलीकडे असें दिसून आलें आहे कीं, या अन्नामध्यें कांहीं पदार्थांचें प्रमाण कमी असतें हें होय. असे पदार्थ म्हणजे जीवनसत्त्वें होत व तीं कच्च्या अन्नामध्यें, विशेषतः दुधामध्यें आणि शाक भाज्यांत आढळून येतात. यांची रासायनिक रचना अद्यापि अज्ञात आहे. यांचे मुख्यतः तीन प्रकार अद्यापपर्यंत आढळून आले आहेत व दिवसेंदिवस अधिकाधिक आढळून येत आहेत. १ चरबींत विरघळणारें ऊर्फ 'ए' जीवनसत्त्व–हें शरीराच्या वाढीस आवश्यक असतें. २ पाण्यांत विरघळणारें अथवा 'बी' जीवनसत्त्व–हें शरीराच्या वाढीस आवश्यक असून बेरीबेरीसारख्या रोगास प्रतिबंधक असतें. ३ पित्तरोगप्रतिबंधक अथवा 'सी' जीवनसत्त्व. याप्रमाणेंच एक 'ए' जीवनसत्त्वासारखेंच गुणधर्म असलेलें 'डी' नांवाचें जीवनसत्त्व आढळून आलें असून त्याचा उपयोग पित्ताश्मा व परोपजीवी रोगांवर अतिनील किरणांच्या क्रियेमुळें उत्पन्न होणाऱ्या परिणामासारखा परिणाम घडवून आणण्याच्या कामीं होतो व अशा प्रकारचे ह्यांत विशिष्ट गुणधर्म असतात. प्राण्यांची योग्य वाढ होण्याकरितां त्यांच्या शरीरांत निदान दोन प्रकारचीं जीवनसत्त्वें असणें आवश्यक असतें. पहिलें चरबींत विरघळणारें 'ए' जीवनसत्त्व–हें दूध, अंडीं आणि कांहीं झाडांच्या हिरव्या पानामध्यें असतें; आणि दुसरें पाण्यांत विरघळणारें 'बी' जीवनसत्त्व मांस, बटाटे, शेंगांतील दाणे किंवा द्विदल धान्यें यांमध्यें असतें. पहिल्या जीवनसत्त्वाचा मुलास होणाऱ्या अस्थिमार्दव (रिकेट्स) रोगावर विशेष परिणाम होत असल्याचें दिसून आलें आहे. आणखी एक 'ई' जीवनसत्त्व शोधलें गेलें असून तें लेटयूस भाजींत व गव्हाच्या तेलांत आढळतें. हें उत्पादक जीवनसत्त्व आहे. आरोग्यविज्ञान पाहा.

हीं सत्त्वें असलेल्या गोळ्या किंवा द्रवपदार्थ तयार करून ते ज्यांना अन्नांत तीं मिळत नाहींत त्यांना सहज पोटांत घेतां येतात. आजपर्यंत जीवनसत्त्वें संशोधिलीं गेलीं आहेत तीं येणेंप्रमाणें—

जीवनसत्त्व अ (A)—शरीराच्या वाढीसाठीं व प्रास्तारिक धातूंच्याहि वाढीसाठीं हें आवश्य असतें. रातांधळें या सत्त्वामुळें होत नाहीं. दूध, अंडीं, लोणी, माशांचीं तेलें, हिरव्या व वाळलेल्या भाज्या, टोमाटो, केळीं, मोसंबीं, इ. फळें यांमध्यें हें सत्त्व आढळतें.

जीवनसत्त्व ब ($B_1$)—मज्जातंतूंच्या कार्यांस याचा उपयोग आहे. हें नसल्यास बेरी-बेरी रोग होतो. धान्यें, कडधान्यें, कोंबडीचीं पिलें, ग्रंथिमांस, गोमांस, डुकराचें मास, मटन, इ. त हें सत्त्व आढळतें.

जीवनसत्त्व ब२ ($B_2$)— याला व्हिटॅमिन जी किंवा रिबोफ्लॅव्हिन असेंहि नांव आहे. कातड्याचें आरोग्य आणि वाढ यांसाठीं हें अवश्य आहे. लोण्याखेरीज दुधाचे पदार्थ व अनेक खाद्यें यांतून हें असतें.

निआसिन (तमाखुवीर्याम्ल)— शरीरांतील उणिवा हें भरून काढतें. चरबी नसलेलें मांस, कोंबडीचीं पिलें, यकृत्, हिरव्या पालेभाज्या, कडधान्यें व टोमाटूचा रस यांतून हें सत्त्व असतें.

जीवनसत्त्व सी (C)—हें हाडें मक्कम ठेवतें व दांतहि यामुळें चांगल्या स्थितींत राहतात. नाड्या देखील बळकट होतात व जखमा भरून येतात. हें सत्त्व संत्रीं, लिंबें, टोमाटू व हिरव्या पालेभाज्या यांत असतें.

जीवनसत्त्व ड (D)—हाडांचा वांकडेपणा, मुडदूस हे विकार या सत्त्वामुळें जातात. सूर्याच्या प्रकाशांत हें चांगल्या रीतीनें मिळतें. यांखेरीज दूध, अंड्याचा बलक, व माशांचीं तेलें यांत आढळतें.

जीवनसत्त्व ई (E)—याबद्दल अद्यापि फारशी माहिति नाहीं. जननक्रियेशीं याचा संबंध आहे. गव्हाचे मोड, अंडीं, वनस्पतितेलें व हिरवा पाला यांत हें आढळतें.

जीवनसत्त्व क (K)—साधारण रक्त घट्ट होण्यासाठीं याची आवश्यकता असते. हिरव्या पालेभाज्या, दूध व दुधाचे पदार्थ यांत हें सांपडतें.

अन्नांत जीवनसत्त्वें कायम राहण्यासाठीं स्वयंपाकामध्यें पुढील गोष्टींकडे लक्ष देणें जरूर आहे: सोडा घालून पालेभाज्या शिजवूं नयेत. पदार्थ शिजत असतांना ढवळूं नये. पदार्थ जितक्या लवकर उकळेल तितका पाहावा. जास्त वेळ चुलीवर पदार्थ राहूं देऊं नये. जीवनसत्त्वें अ, ब, किंवा क हीं ज्यांत बरींच असतील ते पदार्थ परतूं नयेत. शिजवितांना पाणी शक्य तितकें कमी घालावें. पदार्थ गाळण्यापूर्वीं निवूं द्यावा.

**जीवन्मुक्त**—एक मराठी संतकवि. निजामराज्यांत येके-हळ्ळीजवळ अन्वार गांवीं याचा मठ आहे. यास तिकडे मुक्तेश्वर म्हणतात. हा ज्ञानेश्वरसंप्रदायी होता. जीवन्मुक्ति, गीताप्रभाकर, जीवनमुक्तिवाक्य, वगैरे ग्रंथ यांनीं केले आहेत.

**जीवशास्त्र**—( बायॉलॉजी ). जिवंत प्राणी व जीव यांच्या शास्त्रास जीवशास्त्र असें म्हणतात. याचे वनस्पतिशास्त्र आणि प्राणिशास्त्र असे दोन मुख्य विभाग पाडण्यांत येतात. पहिल्या विभागांत वनस्पतींचा व दुसऱ्या विभागांत प्राण्यांचा विचार करण्यांत येतो. जीवशास्त्राचे मुख्यतः पुढील विभाग करण्यांत येतात: १ स्वरूपविज्ञान, २ इंद्रियविज्ञान, ३ गर्भ-विज्ञान, ४ वर्गीकरण, ५ परिस्थितिविज्ञान, ६ प्रसूतिविज्ञान व ७ जीवितत्त्वज्ञान.

१. स्वरूपविज्ञान—यामध्यें निरनिराळ्या प्राण्यांची रचना कशी असते या विषयाचा अभ्यास करण्यांत येतो. प्राण्यांचें विच्छेदन करून शारीरशास्त्राचा अभ्यास करण्यांत येतो. यानंतर संयुक्त सूक्ष्मयंत्रद्वारा त्यांच्या पेशींच्या रचनेचें पृथक्करण करून त्यांच्या शरीराचा अधिक अभ्यास करण्यांत येतो. यावरून असें दिसून येतें कीं, अत्यंत खालच्या दर्जाचे प्राणी सोडून दिल्यास बहुतेक प्राण्यांच्या पेशी गोलकांच्या ( सेल्स ) बनविलेल्या असतात. हे गोलक जीवनरसमय असून त्यांच्या चलनवलनापासून उत्पन्न होतात. अत्यंत खालच्या वर्गाचे प्राणी व वनस्पती केवळ एकपेशीमय असतात. या पेशींचें ज्ञान करून घ्यावयाच्या शाखेस पेशीविज्ञान ( सायटॉलजी ) असें म्हणतात.

२. इंद्रियविज्ञानामध्यें प्राण्यांच्या निरनिराळ्या इंद्रियांच्या क्रिया व कार्यें यांचा अभ्यास करण्यांत येतो. या सर्व क्रियांचा मुख्य हेतु विशिष्ट प्राण्याचें जीवनरक्षण करणें व त्याचें जाति-रक्षण करणें हें असतें.

३. गर्भविज्ञानामध्यें विशिष्ट प्राण्याची उत्पत्ति व वाढ कशी होत असते याचा शारीर व इंद्रियविज्ञान या दोन्ही दृष्टींनीं अभ्यास करण्यांत येतो.

४. वर्गीकरण (टॅक्सॉनॉमी) या विभागांत प्राण्यांचें त्यांच्या सादृश्यविसादृश्यावरून निरनिराळे वर्ग अथवा विभाग पाडण्यांत येतात.

५. परिस्थितिविज्ञान ( एकॉलॉजि, बॉयोनॉमिक्स ) यामध्यें निरनिराळे प्राणी आपापल्या सभोंवतालच्या परिस्थितीमध्यें व आपल्यासभोंवतीं असलेल्या प्राणिसृष्टीमध्यें कशा प्रकारचें वर्तन अथवा क्रिया करतात आणि आपणांस अनुरूप कसें करून घेतात या विषयाचा अभ्यास करण्यांत येतो.

६. प्रसूतिविद्येमध्यें विशिष्ट प्राण्याचा अथवा वनस्पतीचा भिन्न भिन्न कालीं व स्थलीं प्रसार कसकसा होत जातो या गोष्टीचा अभ्यास करण्यांत येतो व यावरून विशिष्ट प्राणी अथवा वनस्पती प्रथम कोणत्या स्थलीं अथवा कोणत्या कालीं उत्पन्न होऊन त्याचा प्रसार पुढें पुढें कसकसा होत गेला या गोष्टींचें ज्ञान होतें. विशिष्ट प्राणी अथवा वनस्पती कोणत्या कालीं अस्तित्वांत आल्या या गोष्टीचा अभ्यास निरनिराळ्या कालच्या भूस्तरांमध्यें त्यांचे जे प्रस्तरावशेष आढळून येतात त्यांवरून करण्यांत येतो. यावरून निरनिराळ्या प्राण्यांची व वनस्पतींचीहि प्राथमिक अवस्थेपासून कसकशी वाढ होत गेली याचें दिग्दर्शन करतां येतें. आणि विशिष्ट जातीच्या पूर्ववंशाचें प्रत्यक्ष ज्ञान मिळवितां येतें. उदा., आजकाल दिसणारा घोडा कोणकोणत्या पूर्वावस्थांमधून विकास पावला व त्याचे पूर्वज निरनिराळ्या कालीं कोणत्या अवस्थेंत होते हें आपणांस समजून येतें.

७. जीवितत्त्वज्ञान—जीवितत्त्वज्ञानामध्यें या निरनिराळ्या शाखांपासून मिळालेल्या ज्ञानाचा उपयोग करून कांहीं सामान्य तत्त्वें काढण्यांत येतात व सामान्यतः जीविताविषयींचे कांहीं प्रश्न सोडवितां येतात. अशा तऱ्हेचे दोन तात्त्विक प्रश्न म्हटले म्हणजे जीवोत्पत्ति आणि जीवजात्युत्पत्ति हे होत. यांपैकीं पहिल्या प्रश्नासंबंधीं अद्यापि निश्चित असें फारसें ज्ञान झालें नाहीं. परंतु जात्युत्पत्तीविषयीं मात्र सामान्यतः असें मानण्यांत येतें कीं, आज आढळणाऱ्या प्राण्यांच्या निरनिराळ्या जाती या एक तऱ्हेच्या विकासक्रियेनें निर्माण झालेल्या आहेत.

**जुआन फर्नांडेझ**— हा तीन बेटांचा समूह पॅसिफिक महासागरांत चिली देशाच्या मालकीचा आहे. जुआन फर्नांडेझ हें सर्वांत मोठें बेट १३ मैल लांब व ४ मैल रुंद असून येथील किनारा नौकानयनास चांगला आहे. अलेक्झांडर सेलकर्क याला १७०४–१७०९ मध्यें याच निर्जन बेटावर सोडण्यांत आलें होतें. दुसरीं दोन बेटें मास–आ–फ्यूरा आणि सांटाक्लेरा अद्याप निर्जन व दुर्गम्य आहेत. मास–आ–टेरा येथें वायरलेस स्टेशन आहे.

**जुई**— [ लॅटिन–जेसमिनम ऑरिक्युलेटम ]. जाईप्रमाणें जुईचाहि वेल असतो. जाईच्या फुलापेक्षां जुईचें फूल किंचित् लहान असतें. परंतु दोन्ही फुलांचा सुवास बहुतेक सारखाच असतो. जुईचे औषधी गुण बहुतेक जाईप्रमाणेंच आहेत.

**जुगार**— मनुष्यानें करमणुकीकरितां जे अनेक खेळ शोधून काढले त्यांत यदृच्छाधीन असलेले किंवा नशिबाचे खेळ ( गेम्स ऑफ चान्स ) हा प्रकार आहे. असल्या खेळांत यशाप-यश खेळणाराच्या कौशल्यावर अवलंबून नसतें, तर काकतालीय

न्यायवत् असतें. सोंगट्या, फासे, पत्ते हे बहुंशीं या जातीचे खेळ होत. या खेळांना उत्तेजन यावें म्हणून कांहीं पैसा, मालमत्ता पणास लावावी, ही प्रवृत्ति होते. अनायासें धनप्राप्ति व्हावी, अशी इच्छा माणसाला जात्याच असते. यशापयश यदृच्छाधीन किंवा ईशकृपेवर अवलंबून असतें, असा समज असतो आणि उलटपक्षीं अपयशी माणसाकडे कमीपणा किंवा दोष येत नसल्यामुळें त्यांत मानहानि वाटत नाहीं. शिवाय अपयशी माणसाला एकदम यश मिळून सर्व पारडें फिरण्याची आशा असते. जुगारीचे अनेक प्रकार आहेत. पण कोणत्याहि प्रकारांत गमावणारे जितकें द्रव्य घालवतात, त्यापेक्षां जिंकणाऱ्यांना नेहमीं कमीच मिळतें. जुगारीचे प्रकार: (१) घोड्यांच्या शर्यती, (२) फूटबॉलवरचें कूपन-बेटिंग, (३) क्रिकेटमधील बोलिंग, (४) पत्त्याचे ब्रिज वगैरे डाव, (५) नाण्यांच्या हेड-टेलची जिताजित, वगैरे.

ग्रीस देशांत होमरकालीं फाशांनीं, व रोमन लोकांत नाण्यांनीं (हेड-टेल) व फाशांनीं द्यूत खेळत. इस्रायल ज्यू लोक असल्यामुळें त्यांच्यांत बराच काळ हें व्यसन नव्हतें. इंग्लंडांत ८ व्या हेन्री राजानें फासे, पत्ते, गोट्या यांनीं जुगार खेळण्यास मनाई केली. २ ऱ्या चार्लस राजानें जुगार खेळून लबाडीनें पैसे मिळवील, त्याला त्या मिळविलेल्या पैशांच्या तिप्पट दंड अशी शिक्षा ठेवली. १८७५ च्या कायद्यानें जुगार खेळणाराला, व जुगार जेथें खेळतात अशा घरवाल्याला कमाल दंड ५०० पौंड किंवा सहा महिने कैद, अशी शिक्षा सांगितली. १९०६ सालचा स्ट्रीट बेटिंग ॲक्ट हा कायदा हल्लीं इंग्लंडांत लागू आहे. पैज पाहा.

वैदिक आर्योंत व परंपरेनें सर्व भारतीयांत द्यूताची आवड किती वाढली होती ही गोष्ट महाभारतांतील नलदमयंती व कौरव-पांडव यांच्या कथांवरून दिसते. पण स्मृतिग्रंथांत जुगारीला कायद्यानें प्रतिबंध केलेला दिसतो. द्यूताच्या गुन्ह्याला हात तोडणें, ही शिक्षा सांगितली आहे. शिवाय द्यूतांत बापाला झालेलें कर्ज फेडण्याची जबाबदारी पुत्रावर नाहीं, असा कायदा स्मृतिकारांनीं केला. मध्ययुगीन राज्यांत व मोगल-मराठे अमदानींत स्मृतिकायदाच लागू असल्यामुळें द्यूत, जुगार बंद असावीसें दिसतें. ब्रिटिश अमदानींत इंग्लंडांतील कायद्यासारखा कायदा होऊन जुगारीला बंदी झाली. पण घोड्यांच्या शर्यती व व्यापारांतील सट्टे पद्धति ही जुगार नव्हे, असें ठरलें (मुंबई रेसकोर्स लायसेन्सिंग ॲक्ट); कारण घोड्यांच्या शर्यतींत घोडा व जॉकी यांचें कलानैपुण्य, आणि सट्टेपद्धतींत व्यापाराची माहिती व अर्थशास्त्राचें ज्ञान लागतें. केवळ दैवाचा तो खेळ नसतो. पण नवीन स्वातंत्र्याच्या अमदानींत या जुगारालाहि आळा बसेल.

घोड्यांच्या शर्यतींबरोबर फासे खेळणें हा वेदकालीन आर्यांचा मुख्य खेळ होता; परंतु वाङ्मयांत ह्या खेळाचा पुष्कळ वेळा निर्देश केलेला असला तरी तो कोणत्या तऱ्हेनें खेळत असत ह्याचें बरोबर चित्र काढणें फार कठिण आहे. फासे 'बिभीतक' नांवाच्या कठीण कवचीच्या फळांचे केलेले असत. ह्या फाशांचा निर्देश ऋग्वेद आणि अथर्ववेद ह्या दोहोंतहि केलेला आढळतो. व्यावहारिक खेळांत पुढीलप्रमाणें खेळत असत असें दिसतें: एक जण खेळण्याच्या जागेवर फासे टाकून कांहीं दान घेत असे; नंतर दुसरा चारानें किंवा पांचानें भाग जाणारी संख्या होईल अशी त्या दानांत फासे टाकून भर घालण्याचा प्रयत्न करी. खेळणाऱ्यांमध्यें अजमास करण्याची शक्ति पाहिजे, ह्यावर जो पुढील ग्रंथांत (उदा. नलकथेंत) जोर दिलेला आढळतो त्यावरून हा खेळ असाच खेळत असावे असें वाटतें. जुगारामध्यें अतिशय नुकसान होत असे. जुगार खेळणारा आपलें धन (सर्व) आणि आपली बायको देखील गमावी. हें सर्व गमावलें म्हणून शोक करीत असल्याचें ऋग्वेदांत वर्णन आहे.

**जुजित्सु**—शस्त्राशिवाय स्वसंरक्षण करण्याची ही जपानी विद्या आहे. माणसाच्या शरीरांत अशीं कांहीं ठिकाणें किंवा कळी असतात कीं, ज्या प्रतिस्पर्ध्यानें दाबल्यास तो निर्बल होऊन जातो. यासाठीं अशा शारीरशास्त्राचा पद्धतशीर अभ्यास लागतो. म्हणून २० व्या शतकाच्या प्रारंभीं पाश्चात्य देशांत जपानी शिक्षक ठेवून या विद्येच्या शाळा काढण्यांत आल्या. पोलिसांना आणि सैनिकांनाहि द्वंद्वयुद्धांत स्वसंरक्षणाला फार उपयोगी म्हणून याचें शिक्षण कोठें कोठें देण्यांत येतें. जपानांत प्रथम मोठ्या प्रतिष्ठित वर्गाच्या लोकांनाच ही विद्या अवगत असे व पुढें राष्ट्रीय बलवर्धक योजनेंत तिला स्थान मिळालें व स्त्रियांनाहि तिचें शिक्षण मिळूं लागलें.

आपल्याकडील कुस्तीच्या डावांतूनहि या विद्येचें तत्त्व स्वीकारल्याचें दिसून येईल.

**जुझोतिया ब्राह्मण**—संयुक्त प्रांतांतील एक लहान जात. बुंदेलखंड व त्यानजीकचा भाग याला युधवती असें नांव असल्याचें समजतें. विष्णुधर्मपुराणांत (१) विंध्याद्रि व यमुना आणि (२) नर्मदा यांमधील प्रांतास 'युधदेश' हें नांव दिलेलें आहे. ह्या प्रांतांत 'जुझोतिया' ही जात आढळते. जुझारसिंग नांवाच्या एका जुन्या बुंदेलखंडाच्या राजानें यमुनेच्या उत्तर प्रांतांतून हे लोक बोलावून त्यांना हें नांव दिलें असें श्रीनगर येथें जातींसंबंधीं भरलेल्या सभेचें मत आहे.

**जुडा**—हा प्राचीन पॅलेस्टाइनचा एक जिल्हा असून याचे तीन स्वाभाविक भाग होतात: डोंगराळ प्रदेश, निम्न प्रदेश व निर्जन प्रदेश. प्राचीन हिब्रू राजसत्तेच्या वेळीं जुडा व इस्रायल

यांमध्यें वैर होतें. ख्रिस्ती धर्मस्थापनेच्या वेळेला येथें बरीच धामधूम सुरू होती. इ. स. ७० त जेरुसलेमबरोबरच ज्युडाचा ऱ्हास झाला.

**जुनागड संस्थान**—मुंबई इलाख्यांतील जुन्या काठेवाड एजन्सींतील एक संस्थान. याचें क्षे. फ. ३,३३६३/४ चौ. मै. व उत्पन्न १ कोटी ३५ लाख रु. आहे. या संस्थानांत गिरनार, दातार, लासोपावडी, वगैरे पर्वत असून त्यांतील गोरखनाथ नांवाचें शिखर सुमारें ३,६६६ फूट उंच आहे. भादर, हिरान, मच्छुंद्री, वेरावळ व सरस्वती या नद्या यांतून वाहत आहेत. पावसाची दरवर्षांची सरासरी ४०–४५ इंचांपर्यंत आहे. संस्थानची लो. सं. ६,७०,७१९ आहे; त्यांत शेंकडा ८२ हिंदू व बाकीचे मुसलमान आहेत. येथें तलाव बरेच असून सरदारखानानें जुनागड येथें बांधलेला मोहो तलाव सर्वांत मोठा आहे.

येथील संस्थानिकास नबाब हा किताब आहे. यास मुसलमानी कायद्याप्रमाणें दत्तक वगैरे घेण्याची सनद मिळालेली आहे. हल्लींचा नबाब हा येथील राजघराण्यांतील (मूळपुरुषापासून) नववा पुरुष असून त्याचें नांव महबतखान आहे. याचा जन्म १९०० मध्यें होऊन १९११ मध्यें हा गादीवर आला. वेरावळ बंदर व सोमनाथाचें पडकें देवालय याच संस्थानांत आहे.

कापूस, ज्वारी, गहूं, तांदूळ, गळिताचीं धान्यें, ऊंस, वगैरे पिकें येथें होतात. किनाऱ्यावर लहानमोठीं गलबतें लागण्याजोगीं पुष्कळ बंदरें आहेत. भेरायखाडी व सील या ठिकाणीं मोतीं व पोवळीं सांपडतात. वेरावळ, मांगरोळ, भेराय, धाराय, सील, वगैरे बंदरें आहेत. त्यांत वेरावळ मुख्य असून येथूनच सोरठकडे व काठेवाडच्या दक्षिणेकडील भागांत धान्य, इमारतीचें लांकूड, वगैरे माल जातो. पोस्टखात्याची सोय संस्थानानें आपली स्वतःची केलेली आहे. भावनगर–गोंडळ, जुनागड–पोरबंदर ही रेल्वे या संस्थानांतून गेली आहे. गिरनार टेकडीच्या आग्नेय भागांत मोठें जंगल असून त्यांत सिंह आहेत.

जुनागड संस्थान–काठेवाडांतील संस्थानांत पहिल्या प्रतीचें मानलें आहे. गायकवाडास व ब्रिटिश सरकारास मिळून सालीना ६५,६०४ रु. खंडणी या संस्थानास द्यावी लागे. तथापि काठेवाडांतलि निरनिराळ्या छोट्या संस्थानिकांकडून खंडणी म्हणून जुनागडच्या नबाबांस ९२,४२१ रु. सालीना मिळत. १४७२ सालीं अहमदाबादचा सुलतान महंमद बेगडा यानें हा प्रदेश जिंकीपर्यंत चूडासन रजपूत राजांकडे हा होता. पुढें मोंगलांच्या गुजराथ सुभ्यांत हे संस्थान मोडत असे. १७३५ त शेरखान काबी यानें सध्यांचे घराणें स्थापलें. १८०७ पासून ब्रिटिशांशीं संबंध आला. १९४७ सालीं येथील नबाबाने प्रजेला न विचारतां पाकिस्तानला संस्थान जोडण्याचा प्रयत्न केल्यावरून हिंदी संघराज्यानें हें आपल्या ताब्यांत घेऊन-प्रजेच्या संमतीनें सौराष्ट्र-संघांत सामील केलें.

शहर—ही जुनागड संस्थानची राजधानी. राजकोटच्या नैर्ऋत्येस ६० मैलांवर आहे. याची लोकसंख्या ५८,१११ आहे. शहरांत उमरकोट नांवाचा एक भाग आहे. त्यामध्यें त्याच्या खंदकांत व त्याच्या आसपास सर्वत्र जुनीं बौद्ध लेणीं आहेत. उमरकोट (जुना किल्ला) हें प्राचीन जुनागड होय. पूर्वी यास पुष्कळ वेळां वेढा पडलेला आहे. अशा वेळीं जुनागडचे राजे गिरनारच्या किल्ल्यांत आश्रय घेत असत. हल्लींच्या नवीन जुनागडास मुस्तफाबाद हें नांव आहे. हें शहर पाहण्यासारखें असून ऐतिहासिक व प्राचीनावशेषांच्या दृष्टीनें त्यास बरेंच महत्त्व आहे. हल्लीं येथें पुष्कळ सुंदर इमारती बांधिल्या आहेत. अशोकाचा (धर्माज्ञांचा) प्रख्यात शिलालेख येथेंच गिरनार टेंकडीच्या पायथ्याशीं सुरक्षित जागीं आहे.

**जुनो**—एक प्रमुख रोमन देवता. ही देवी स्त्रियांची प्रधान उपास्य देवता समजली जाते. ही सॅटर्नाची मुलगी, जोव्हची भगिनी व भार्या होय. प्लुटो, नेपच्यून, इ. तिचीं भावंडें होत. तिला मार्स, हिबी, वगैरे अपत्यें झालीं. मिनर्व्हा हीस जोव्हनें आपल्या मस्तकांतील मगजांतून निर्माण केलें. जुनो निद्रित असतां हर्क्युलिसला जोव्हनें तिच्या स्तनाशीं लाविलें. त्या वेळेस तिच्या स्तनांतून स्वर्गांत दुग्धाचा स्राव झाला. दुग्धाच्या रंगाचा जो तारकापथ आकाशांत दिसतो व ज्यास आपण आकाशगंगा म्हणतों तो या स्तनापासून उत्पन्न झाला अशी समजूत आहे. जुनोचें वर्णन रोमन लोकांनीं पुढीलप्रमाणे केलेलें आहे: ती सुवर्णसिंहासनावर बसलेली आहे, हातीं सुवर्ण राजदंड धरलेला आहे, त्यावर कोकिळ बसलेला आहे, मागें इरिस आपल्या इंद्रधनुष्याचे रंग पाडीत आहे व पार्श्वभागीं मयूर आहे.

**जुन्नर**—मुंबई, पुणें जिल्ह्यांतील एक तालुका. तालुक्याचें क्षेत्रफळ ५९१ चौ. मै. असून लो. सं. १,३९,०८८ आहे. त्यांत २ गांवें व १५८ खेडीं आहेत. हा तालुका मिनी व कुकडी खोऱ्यांत वसलेला असून तो पश्चिमेकडे डोंगराळ होत गेला आहे. पूर्वेकडील जमीन सुपीक असून मुख्य पीक बाजरीचें आहे. हवा कोरडी निरोगी आहे. दरसाल पावसाचें मान ३० इंच आहे.

जुन्नर हें तालुक्याचें ठाणें कुकडी नदीच्या दक्षिण थडीवर वसलेलें आहे. गांवाच्या आसपास बागबगीचे बरेच आहेत. हें गांव लोलिंबराज कवीच्या जन्माचें ठिकाण आहे. येथील लो. सं. ९,९५१ असून त्यांपैकीं बहुतेक लोक हिंदू आहेत.

हिंदूंच्या खालोखाल मुसलमानांची वस्ती आहे. येथें एक हायस्कूल आहे. गांवाभोंवतीं कोट आहे. हा गांव नाणेघाटाजवळ वसलेला असल्याकारणानें व्यापारी दृष्टीनें पूर्वी मोठ्या भरभराटीचा होता. नाणेघाटाच्या मार्गानें कोंकणांतून तांदूळ, बाजरी, नारळ, मीठ, वगैरे माल येथें येतो.

येथें कागद, पागोटीं, लुगडीं, कांबळीं तयार करितात. पूर्वीपासून जुन्नरी कागद प्रख्यात आहे. येथील कागद पुष्कळ ठिकाणीं वापरला जातो.

नारायणगांव, ओतूर, आळें, राजुरी, पिंपळवंडी, कळंब हीं तालुक्यांतील मोठीं गांवें आहेत. येथून थेट मुंबईशीं व्यापार चालतो.

येथें तीन हेमाडपंती देवालयें असून दुसरीं पंचलिंग, गणपति, पाताळेश्वर, वगैरे देवालयें आहेत. जुन्नरच्या पश्चिमेस सरासरी अर्ध्या मैलावर शिवनेरचा उंच डोंगर आहे. त्या डोंगरांत कांहीं बौद्धांचीं लेणीं आहेत. पहिल्या शतकांत क्षत्रप लोकांचें राज्य या प्रांतीं असतां जुन्नर ही त्यांची राजधानी होती. ११७० ते १३१८ मधील कालांत देवगिरीच्या यादवांच्या ताब्यांत हें गांव होतें. जिजाबाई ही कांहीं दिवस जुन्नरास (शिवनेरीवर) राहत होती. त्या वेळीं जुन्नर हें शहाजीच्या ताब्यांत होतें. स. १६३६ मध्यें शहाजीनें विजापूर सरकारच्या नोकरींत जाण्याचें नाकारलें व त्याबरोबरच जुन्नर व इतर किल्ले परत करण्याचें नाकारलें होतें. एवढेंच नव्हे तर १६४९ मध्यें शिवाजीनें जुन्नरच्या देशमुखीची मागणी दख्खनचा सुभा मुराद याच्याकडे केली होती.

शिवाजीनें जुन्नर हें प्रथम १६५६ त लुटलें; त्या वेळीं मराठ्यांनीं ११ हजार होन, २०० घोडे लूट नेली. पुन्हां १६५७ च्या मेमध्यें शिवाजीनें जुन्नर लुटून तीन लाख होन मिळविले. स. १६७० मध्यें शिवाजीनें शिवनेरी किल्ला घेण्याचा प्रयत्न केला; पण तो निष्फळ झाला. मात्र जुन्नर परगणा सर्व लुटून फस्त केला. स. १७१६ मध्यें शाहूनें शिवनेरी किल्ल्याकरितां मोंगलांजवळ मागणी केली. नानासाहेब पेशव्यांच्या वेळीं शिवनेर मराठ्यांना मिळालें.

**जुपिटर (जोव्ह)**— रोमन राष्ट्रांची प्रमुख देवता. द्यौस्पितर या इंडोयुरोपीय देवतानामाचा हा अपभ्रंश आहे. हा सॅटर्नचा पुत्र होता. जोव्हला प्लूटो व नेपच्यून असे दोघे बंधू होते. त्यांनीं सर्व पृथ्वीचें राज्य वांटून घेतलें. स्वर्ग जोव्हला मिळाला. नेपच्यूनला सागर प्रदेश दिला. प्लूटोला नरक मिळाला व पृथ्वी समाईक राहिली. याला जुनोसकट सात बायका होत्या. त्याला अपत्येंहि पुष्कळ झालीं. गरुड हा याचा आवडता पक्षी होय. जुपिटर सर्व सुरनरांचा शास्ता मानण्यांत येतो.

**जुबल**— पूर्व पंजाब, डोंगरी संस्थानांपैकीं एक संस्थान. क्षे. फ. २७४ चौ. मै.. लो. सं. २९,८०२. पूर्वी हें संस्थान सिरमुर संस्थानचें मांडलिक होतें. परंतु पहिल्या गुरखा लढाईनंतर तें स्वतंत्र झालें. तेथील संस्थानचा कारभार योग्य रीतीनें न पाहिल्यामुळें ब्रिटिश सरकारास संस्थानचे सर्व अधिकार इ. स. १८३२ मध्यें देण्यांत आले. परंतु १८४० सालीं राण्यास पश्चात्ताप झाला म्हणून त्याचे अधिकार त्यास परत देण्यांत आले. हल्लीं राणा भगतचंद हे गादीवर आहेत. संस्थानांत ८४ खेडीं असून सालीना उत्पन्न सुमारें ६,८२,००० रु. आहे. हें १९४८ सालीं हिमाचल प्रदेश संघांत घालण्यांत आलें.

**जुव्हेनल** (इ. स. ६०–१४०)—एक रोमन कवि व विडंबक लेखक. जुव्हेनल पूर्वी गुलाम असून त्याची गुलामगिरींतून सुटका झाली होती. मध्यम वयाचा होईपर्यंत त्यानें हौसेनें वक्तृत्वाचा अभ्यास केला. डोमिटिअनचा आवडता नट पारिस याजवर त्यानें पहिलें उपहासात्मक काव्य लिहिलें. या काव्यांत त्याला यश मिळाल्यामुळें त्यानें हाच व्यवसाय पुढें सतत चालू ठेवला. ज्या वेळीं त्यानें प्रगटपणें आपला प्रयत्न लोकांपुढें मांडला त्या वेळीं तो सर्वांस आवडून त्याची प्रसिद्धि झाली. पण त्याच्या पारिसवरील लेखामुळें राजाची त्याच्यावर अवकृपा झाली. लवकरच त्याला लष्करी कामाकरितां ईजिप्तमध्यें धाडण्यांत आलें. या वेळीं त्याचें ८० वर्षांचें वय होतें. तेथें त्यास अतिशय दुःख व त्रास होऊन तो मरण पावला. त्याच्या सर्व उपहासात्मक काव्यांचे सोळा भाग पडतात व ते पांच पुस्तकांत प्रसिद्ध केले आहेत. पहिल्या नवामध्यें रोममधील गुन्हे, दुर्गुण व मूर्खपणा यांवर अत्यंत कडक व भेदक शब्दांत टीका केली असून दुसरीं सात हीं निरनिराळ्या विषयांवर निबंधरूप आहेत.

**जूडीथ**—एक ज्यू वीर स्त्री. ती बेथूलिया या शहरांत राहत असे. या शहराला असीरियन जनरल होलोफर्नेस यानें वेढा दिला (ख्रि. पू. ७२५ चे सुमारास) त्या वेळीं तो जनरल जूडीथच्या सौंदर्यावर लुब्ध झाला; त्यामुळें त्याच्या तंबूंत तिला प्रवेश मिळाला. या संधीचा जूडीथनें फायदा घेऊन तो जनरल रात्रीं झोंपलेला असतांना तिनें त्याच्याच तरवारीनें त्याचा शिरच्छेद केला.

**जूरीन स्तरपद्धति**—(ज्युरॅसिक सिस्टिम). मध्यजीवक (मेसोझोइक) वर्गामध्यें त्रिवर्ग (ट्रिॲसिक) आणि क्रेटेशियस या दोन थरांच्या दरम्यान आढळणारी ही एक स्तरपद्धति आहे. यापूर्वी ब्रिटनमध्यें दोन विभाग करीत असत. त्यांपैकीं खालच्यास कर्कट (लिॲसिक) व वरच्यास ओलीटिक म्हणत.

यांपैकीं लिॲसिक ही संज्ञा अनेक देशांमध्यें ज्युरॅसिक थरांतील तीन थरांपैकीं सर्वांत खालच्या थरास देण्यांत येते. असे थर प्रथम ज्युरा पर्वतांत आढळून आल्यामुळें त्यांस हें नांव देण्यांत आलें. जर्मनीमध्यें या तीन थरांस खालून वर अनुक्रमें काळा, पिंगट व पांढरा ज्युरा थर असें म्हणतात. इंग्लंडमध्यें हे थर वार्सेट किनाऱ्यापासून यार्कशायरमधील फ्लिव्हलंड टेंकड्यांपर्यंत पसरलेले आढळतात. हे थर उष्ण पाणी असलेल्या उथळ समुद्रामध्यें बनले असावेत. या थरांत फार मोठ्या प्रमाणांत प्रास्तर युगाचे अवशेष आढळतात. ज्युरॅसिक कालाला सरपटणाऱ्या प्राण्यांचा काल म्हणतात.

इंग्लंडमधील खालच्या व मधल्या ज्युरॅसिक थरामध्यें चुनखडीच्या दगडाऐवजीं लोहकर्बित तयार झाल्यामुळें अतिशय मौल्यवान् अशा लोखंडाच्या खाणी सांपडतात. बात व पोर्टलंड येथील चुनखडीचे दगड इमारतींच्या कामीं वापरण्यांत येतात.

**जूल, जेम्स प्रेस्कॉट** ( १८१८–१८८९ )—एक इंग्रज पदार्थविज्ञानशास्त्र. जोन डाल्टन या शास्त्रज्ञाकडून त्याला रसायनशास्त्राचें थोडेंसें शिक्षण मिळालें. बाकीचें शिक्षण त्यानें आपलें आपण मिळविलें. शास्त्रीय प्रयोगांत अगदीं बरोबर व शक्य तितक्या सूक्ष्म प्रमाणांत मोजमापें घेतलीं पाहिजेत, हें त्यानें ओळखलें. व हें तत्त्व त्यानें आपल्या सर्व आयुष्यभर पाळिलें. त्यानें आपल्या वयाच्या १९ व्या वर्षीं एक चुंबकजन्य विद्युयंत्र तयार केलें. १८४० च्या सुमारास विद्युत्प्रवाह आणि उष्णता यांच्यांतील परस्परतुलनात्मक संबंध त्यानें सिद्ध केला. निरनिराळ्या द्रव्यांवर दाब आणला असतां किती उष्णता उत्पन्न होते याविषयीं प्रयोग करून नवीन माहिती त्यानें उपलब्ध केली. वाफेच्या यंत्रांतील वाफ थंड करण्याची एक उपयुक्त योजना त्यानें तयार केली व या योजनेचा वाफेच्या यंत्रांत फार उपयोग झाला आहे.

**जूलियन, फ्लेव्हिअर क्लॉडिअस** ( ३३१–३६३ )—एक रोमन बादशहा. याला कोणी 'आपोस्टेट' म्हणतात, व कोणी 'दि ग्रेट' म्हणतात. हा कॉन्स्टंटाइन दि ग्रेट याचा भाऊ जो जूलियस कॉन्स्टंटियस त्याचा मुलगा होय. जर्मन लोकांवर स्वारी करणाऱ्या रोमन फौजांचा हा सेनापति झाला व त्यानें जर्मनांचा पराभव करून त्यांना ऱ्हाइनपलीकडे हांकून लावलें. पुढें गॉल लोकांवर त्यानें मोठ्या हुशारीनें राज्यकारभार केला. म्हणून रोमन सैन्यानें रोमन बादशहा म्हणून जूलियनची निवड ३६० च्या मार्च महिन्यांत जाहीर केली. त्यानें जुन्या मूर्तिपूजक धर्माचा पुरस्कार करून खिस्ती धर्मप्रसाराला विरोध केला; तथापि खिस्ती लोकांचा छळ त्यानें केला नाहीं. पुढें ३६३ मध्यें त्यानें इराणी लोकांवर स्वारी करून त्यांचीं कित्येक शहरें काबीज केलीं, पण त्यांत तो जखमी झाला व मरण पावला. त्याचीं जाहीर भाषणें, पत्रें व उपहासगर्भ लिखाण आज उपलब्ध आहे. खिस्ती धर्मखंडनपर एक ग्रंथ त्यानें लिहिला, त्याचा कांहीं भाग उपलब्ध आहे.

**जूलियन शक**—जूलियस सीझरनें ही कालगणना खि. पू. ४६ त सुरू केली. त्या काळीं रोमन कालगणना ही सौरवर्षाच्या ९० दिवस पुढें जात असे. खि. पू. ४६ सालीं त्यानें ४५५ दिवसांचें वर्ष धरून सौरवर्षाशीं मिळवून घेतलें. हा शक कालक्रम दर्शविणारा नाहीं. निरनिराळ्या शकांची तुलना करतांना व खि. पू. वर्षांची गणना करतांना हा शक सोईचा आहे. या शकाचीं एकंदर ७,९८० वर्षे असून खिस्ती शकाचें पहिलें वर्ष हें जूलियन शकाचें ४७१४ वें वर्ष आहे.

**जेकब**—ज्यू लोकांचा शेवटचा पेट्रिआर्क (मूळपुरुष). अब्राहामचा मुलगा इझाक व त्याची पत्नी रेबेका यांचा हा मुलगा. रेबेकाला जेकब व एसाव अशीं दोन जुळीं मुलें झालीं. रेबेकाचें जेकबवर एसावपेक्षां अधिक प्रेम होतें. एकदां इझाकनें एसावला उत्तम प्रकारची शिकार मिळवून आपल्याला सुग्रास अन्न जेवावयास घालण्यास सांगितलें. रेबेकानें जेकबकडून इझाकास सुग्रास अन्न घालविलें व त्याचा उत्तम आशीर्वाद जेकबला मिळाला. यामुळें एसावला फार राग आला. व त्यानें जेकबला ठार मारण्याचा निश्चय केला. म्हणून आईच्या सांगण्यावरून जेकब हरन येथें आपल्या आजोळीं गेला. हरन येथें राहेल हिच्यावर त्याचें प्रेम जडलें, व त्यानें तिची ७ वर्षे सेवा केली, पण त्याचें फसवणुकीनें राहेलची थोरली बहीण लीआ हिच्याशीं लग्न करण्यांत आलें. जेकबवर परमेश्वराची कृपा असल्यानें त्याची संपत्ति दररोज वाढत चालली व त्यामुळें त्याच्या सासऱ्याला त्याच्याविषयीं अतोनात द्वेष उत्पन्न झाला; म्हणून जेकब आपल्या बायकांसह पळून गिलाट येथें गेला. तेथें असतांना एसाव हा सैन्यासह येत आहे असें कळल्यावरून त्याचें सख्य संपादण्याकरितां जेकबनें आपले दूत पाठविले व त्यामुळें या भावांचें पुनः सख्य जमलें. जेकबनंतर सुक्कोथ येथें गेला व तेथें त्यानें आपणांसाठीं घर व कळपासाठीं वाडे बांधले. तेथून तो शखेम येथें गेला. तेथें त्यानें हमोर जातीपासून कांहीं जमिनीचा भाग विकत घेऊन एक वेदी बांधली व तिचें नांव एल् अलोहे इस्रायल असें ठेवलें. नंतर जेकब हा बेथेल येथें आला व तेथें त्याला साक्षात्कार झाला. यामुळें जेकब यास इस्रायल हें नांव पडलें. बेथेल येथें त्याची बायको, त्याची दासी, इ. माणसें मरण पावलीं. त्यामुळें वैतागून तो हेब्रोन येथें आला. तेथें त्याच्या भावाचा व त्याचा पुनः खटका उडाला व जेकब हा ईजिप्तकडे जाण्यास निघाला. वाटेंत त्याला देवदर्शन होऊन

तुझ्यापासून मोठें राष्ट्र निर्माण होईल, असा त्यास आशीर्वाद मिळाला. ईजिप्तमध्यें आल्यावर त्यानें गोशेन येथें वस्ती केली. या ठिकाणीं तो आपल्या वयाच्या १४७ व्या वर्षी मरण पावला.

**जेंकिन्स, रिचर्ड**—नागपूरकर भोसल्याकडील इंग्रजांचा एक रेसिडेंट. नागपूर येथें वीस वर्षे (१८०७–१८२७) यानें रेसिडेंट म्हणून कारभार केला. दुसरा रघूजी याच्यापुढें याची डाळ शिजली नाहीं. तो १८१६ त वारल्यावर आप्पासाहेबाच्या कारकीर्दीत मात्र नागपूरवर इंग्रजी अमल सुरू झाला. बाजीरावाकडून आलेलीं सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें घेण्यासहि यानें बंदी केली होती. पण पुढें हें प्रकरण लढाईपर्यंत येऊन आप्पासाहेबास तह करणें भाग पडलें, व सीताबर्डीवर इंग्रज सैन्य राहूं लागलें. पुढें आप्पासाहेब इंग्रजांविरुद्ध कारस्थान करतो आहे असें पाहून जेंकिन्सनें त्याला कैद केलें. पुण्याच्या एल्फिन्स्टनप्रमाणेंच जेंकिन्सची कर्तबगारी ब्रिटिश इतिहासकार मानतात.

**जेगेनबौर, कार्ल** (१८२६–१९०३)— एक जर्मन शारीरशास्त्रज्ञ. त्यानें १८५९ मध्यें कंपॅरिटिव्ह–ॲनॅटमी (तुलनात्मक शारीरशास्त्र) या विषयावरचा आपला महत्त्वाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथांत विकासवादाचें दिग्दर्शन आढळतें. नंतर याच विषयावर त्यानें आणखी कांहीं ग्रंथ प्रसिद्ध केले.

**जेजाकभुक्ति**— (जिझोटी). जिझोटी ऊर्फ बुंदेलखंड येथें चंदेल्ल घराणें राज्य करीत होतें. या प्रांताचें दुसरें नांव जेजाकभुक्ति होतें. खजुराहो (छत्रपुर संस्थान), महोबा (हमीदपुर जिल्हा) व कालंजर (बांदा जिल्हा) हे भाग या राज्यांत प्रमुख होते. आग्रा, अयोध्या या प्रांतांतीलहि कांहीं भाग या मर्यादेंत मोडत असे. शिलालेखांतून जेजाक अथवा जेजा हें नांव येतें. हें राज्य मूळ गुप्तसाम्राज्यांत मोडत असे. त्याचा नाश झाल्यावर कोणी ब्राह्मण घराणें राज्य करीत असे. हर्षाच्या निधनानंतर हें घराणें स्वतंत्र झालें असावें व पुनः कनोजच्या यशोवर्म्यानें तें जिंकलें असावें. पुढें ९ व्या शतकापासून चंदेलांचा उदय झाला. येथील ब्राह्मणांना अद्यापि जझोटिया असें म्हणतात.

**जेजुरी**—पुणें जिल्ह्यांत सासवडच्या आग्नेयीस १० मैलांवर पुणें–साताऱ्याच्या जुन्या रस्त्यावर हें गांव आहे. हें एक मोठें यात्रेचें ठिकाण आहे. येथील लो. सं. तीन हजारांवर (म्युनि. २,९२९; गांव ५१०) आहे. येथें म्युनिसिपालिटीहि असून तिची सन १८६८ त यात्रेकरूंच्या सोयीकरितां स्थापना करण्यांत आली. येथें खंडोबा हें मुख्य दैवत आहे. हें महाराष्ट्राचें दैवत फार प्रसिद्ध आहे. त्याची मुख्य जत्रा चंपाषष्ठीस भरते. ह्या देवास बहिरोबा, मल्हारी, मार्तंड हींहि नांवें आहेत. येथील खंडोबाचीं दोन देवालयें उंच टेंकड्यांवर आहेत त्यांस कडेपठार म्हणतात. गांवाच्या दक्षिणेस बाजीराव पेशवे यांनीं बांधलेला एक मोठा तलाव आहे. जवळच्या एका विहिरीस मल्हारतीर्थ म्हणतात. तुकोजी होळकरानेंहि येथें एक तलाव बांधला आहे. गांवांत होळकरवाडा व छत्री, जानाई मंदिर, देवगीर गोसावी मठ हीं स्थानें आहेत.

औरंगजेब हें देऊळ विध्वंस करण्यास आला, त्या वेळीं एका मगदाडांतून एकदम गांधीलमाशांचा घोळका बाहेर आला व त्यानें मुसलमानांवर हल्ला केला. त्यामुळें औरंगजेबाला देवळाचा उच्छेद करतां आला नाहीं व या प्रसंगानें त्याच्या मनांत ह्या देवाविषयीं भक्ति उत्पन्न झाली, अशी आख्यायिका आहे. गाभाऱ्यांत शिवलिंगाच्या मागच्या बाजूस मार्तण्ड, खंडेराव, व म्हाळसा ह्यांच्या सोन्या-चांदीच्या (तीन) मूर्ती होत्या. त्या कांहीं वर्षांपूर्वी चोरीस गेल्या. आतां मुलाम्याच्या नव्या बसविल्या आहेत. येथें मार्गशीर्ष शुद्ध चतुर्थी ते शुद्ध सप्तमी, पौष शुद्ध द्वादशी ते वद्य प्रतिपदा, माघ शुद्ध द्वादशी ते वद्य प्रतिपदा, व चैत्र शुद्ध द्वादशी ते वद्य प्रतिपदा असे चार सण पाळण्यांत येतात; ह्या वेळीं मोठ्या जत्रा भरतात. खंडोबास अर्पण केलेल्या मुलांमुलींस वाघ्या व मुरळी म्हणतात.

स. १६६२ मध्यें शहाजी व शिवाजी यांची भेट जेजुरी येथें (भेटीस बारा वर्षे होऊन गेल्यामुळें) देवळांत झाली होती. शाहू हा औरंगजेबाकडून सुटून साताऱ्यास जात असतां वाटेंत येथें राहिला होता त्या वेळीं त्यानें येथें बराच दानधर्महि केला. (१७०७). रघोजी आंग्र्यानें १८४५ सालीं येथील देवीची मूर्ति पळविली होती, ती पुनः परत आणून ठेवण्यांत आली. मद्रास व सदर्न मराठा रेल्वेचें हें एक स्टेशन आहे.

**जेंघिझखान** (११६०–१२२७)—एक मोंगल जगज्जेता. तातार लोकांच्या निरनिराळ्या जमातींबरोबर बराच काळ लढल्यानंतर तातार व मोंगल या दोन संयुक्त जमातींचा खान म्हणून जेंघिझला मान्य करण्यांत आलें. नंतर त्यानें सर्व जग जिंकण्याची परमेश्वराची आज्ञा मला झाली आहे असें प्रतिपादण्यास सुरवात केली. १२०९ मध्यें चीनमधील मोठी भिंत ओलांडून तो पलीकडे गेला आणि त्या वेळची राजधानी येन कीन (हल्लीं पेकिंग) वर हल्ला करून त्यानें ती घेतली आणि शहरांत लुटालूट केली. नंतर त्यानें तुर्कस्तानवर स्वारी ७०,००० सैन्यासह १२१८ मध्यें केली. बुखारा व समर्कंद हीं शहरें हल्ला करून काबीज केलीं. आणि लुटालूट करून जाळून टाकलीं. यापुढें सात वर्षे जेंघिझखानानें देश जिंकणें, लुटालूट करणें, जाळपोळ करणें हा उद्योग करून नीपर नदीच्या कांठापर्यंतचा प्रदेश पादाक्रांत आणि उध्वस्त केला. १२२५ मध्यें जरी तो ६० वर्षांहून अधिक म्हातारा झालेला होता, तरी त्यानें स्वतः आपल्या सर्व सैन्यासह वायव्य चीन प्रांतावर

स्वारी केली. येथें मोठी लढाई झाली. तींत तेथल्या राजाचा पूर्ण पराभव होऊन ३,००,००० सैन्य ठार झालें. जेंघिजखान मेल्यावर त्यानें जिंकलेला अवाढव्य प्रदेश त्याच्या चार मुलांनीं आपसांत वांटून घेतला.

**जेड, विल्यम** (१६९०–१७४९)-- एक मुद्रणशास्त्रज्ञ. यानें छापण्याच्या खिळ्यांचा कायम ठसा (स्टिरिओ टायपिंग) करण्याचा शोध लावला. १७२५ मध्यें छापण्याच्या कलेंतील ही महत्त्वाची सुधारणा त्यानें प्रत्यक्ष अमलांत आणली. १७४४ मध्यें 'सॅलुस्ट'ची स्टिरिओ–टाइप आवृत्ति त्यानें प्रसिद्ध केली.

**जेतपुर (देवळी)**—मुंबई इलाख्यामध्यें काठेवाड पोलिटिकल एजन्सींतील एक संस्थान. याचें क्षेत्रफळ १२० चौ. मै. असून लो. सं. ३५,१४५ आहे. त्यांत एकंदर २१ खेडीं असून संस्थानचें उत्पन्न सु. तीन लाख आहे. काठेवाडांतील चौथ्या दर्जाचें हें संस्थान आहे. जेतपुर या नांवाचा एक तालुकाच असून त्यांत एकंदर २० तालुकदाऱ्या आहेत. त्यांपैकीं चार मुख्य आहेत. हें संस्थान १९४८ सालीं सौराष्ट्र संघांत सामील झालें.

जेतपुर देवळी हें भादर नदीच्या कांठीं असून व्यापाराचें व भरभराटीचें शहर आहे. हें भावनगर–गोंडळ–जुनागड–पोरबंदर या आगगाडीचें एक स्टेशन आहे. जुनागडचा पहिला नवाब बाहदुरखान यानें वाला वीर यास जेतपुर गांव इनाम दिलें.

**जेताश्री**— हा राग पूर्वी थाटांतून उत्पन्न होतो. ह्याच्या आरोहांत ऋषभ व धैवत स्वर वर्ज्य आहेत, पण अवरोह सातहि स्वरांनीं होतो म्हणून ह्याची जाति औडुव–संपूर्ण आहे. वादी स्वर गांधार व संवादी निषाद आहे. गानसमय सायंकाल हा सर्वसंमत आहे. वराटी व देसकार ह्या रागांच्या छाया या रागांत दृष्टीस पडतात.

**जेधे**—भोर संस्थानांत मौजें कारी म्हणून एक इनाम गांव आहे. तेथील जहागीरदार जेधे या आडनांवाचे मराठे आहेत. हें घराणें त्या ठिकाणीं शिवाजीच्यापूर्वीपासून रोहिडखोऱ्याची व भोरखोऱ्याची देशमुखी करीत होतें. या घराण्यांतील कान्होजी व बाजी या दोन पुरुषांनीं शहाजी व शिवाजी यांना स्वराज्य-स्थापनेच्या कामीं मदत केली. जावळी–प्रकरण, अफजल–वध, वगैरे प्रसंगीं या जेध्यांनीं आपल्या जमावानिशीं शिवाजीस साहाय्य केलें. त्याबद्दल शिवाजीनें कान्होजीला तरवार बक्षीस दिली होती. संभाजीच्या वेळीं हे जेधे औरंगजेबास मिळाले, तेव्हां त्यानें सर्जाराऊ यास जरबेचें पत्र लिहिलें होतें. या जेध्यांकडे एक तत्कालीन शकावली सापडली आहे. ती जेधे शकावली म्हणून प्रसिद्ध आहे. शिवाजी, संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दींतील बहुतेक सर्व प्रमुख गोष्टी हिच्यांत नमूद केलेल्या आहेत.

**जेधे, केशवराव मारुतीराव** (१८९६– )—महाराष्ट्रांतील एक कॉंग्रेस पुढारी. यांचें शिक्षण पूना हायस्कूल व फर्ग्युसन कॉलेज यांमध्यें झालें. १९१८ पासून हे महाराष्ट्रांतील ब्राह्मणेतर पक्षांत पुढाकार घेऊं लागले. १९२३ मध्यें यांनीं तरुण मराठा पक्ष स्थापन केला. १९२३ त यांनीं 'शिवस्मारक' नांवाचें एक साप्ताहिक पत्र सुरू केलें. १९२४ मध्यें 'मजूर' नांवाचें दैनिक काढलें. हे पुणें शहर म्युनिसिपालिटींत निवडून आले व ज्योतिबा फुले यांचा पुतळा म्युनिसिपालिटींत बसविण्याबद्दल यांनीं खटपट केली. नंतर यांनीं जवळकर यांच्याबरोबर मुंबईमध्यें 'कैवारी' या नांवाचें एक साप्ताहिक पत्र सुरू केलें. १९२८ मध्यें जमीन–विभागणीसंबंधीं कायद्यास विरोध करण्याकरितां मुंबई इलाखा शेतकरी-परिषद भरविली होती. तिचे हे प्रवर्तक व चिटणीस होते. १९३३ मध्यें हे हरिजन सेवकसंघाचे पुणें शाखेचे अध्यक्ष झाले. त्याच वर्षी ते अमरावती येथें भरलेल्या शेतकरी पक्षाच्या परिषदेचे अध्यक्ष होते. यांनीं महाड व पर्वती येथील अस्पृश्यांच्या मंदिर-प्रवेश सत्याग्रहांत पुढाकार घेतला. १९३० आणि १९३२ च्या राजकीय सत्याग्रहचळवळींत यांस शिक्षा झाल्या. १९३५ मध्यें कॉंग्रेसचे अधिकृत उमेदवार म्हणून यांची मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवड झाली. यांस पुन्हां अटक व शिक्षा झाली. हे महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे कांहीं काळ अध्यक्ष होते. आतां कॉंग्रेस सोडून बहुजनसमाज पक्ष यांनीं काढला आहे व हे शेतकरी आणि कामकरी यांची संघटना करीत असतात.

**जेनलिस, स्टेफानी** (१७४६–१८३०)—एक फ्रेंच ग्रंथकर्ती. तिनें प्रथम शिक्षकाचा धंदा पत्करून अध्यापनांत नव्या पद्धती सुरू केल्या. तिनें पुष्कळ विषयांवर लिखाण केलें असून तिचीं सुमारें ९० पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. आणि त्यांमध्यें फ्रेंच भाषेंतल्या कांहीं अव्वल दर्जाच्या कादंबऱ्या आहेत. अखेरच्या दिवसांत तिनें आपल्या आठवणींचा फार मोठा ग्रंथ लिहिला. आणि त्या ग्रंथांत तिनें समकालीन लेखकांवर जागजागीं हल्ले चढविले आहेत.

**जेनस**—एक रोमन देवता. आपल्याकडील गणेशदेवतेप्रमाणें सर्व कार्यारंभीं याचें नांव घेण्यांत येतें. रोमन लोक यास फार पूज्य मानीत असत, आणि त्याचें नांव ख्रिस्ती सनाच्या पहिल्या महिन्याला (जानेवारी) देण्यांत आलें. जेनसला एक पुढें समोर पाहणारें व दुसरें मागें पाहणारें अशीं दोन मुखें असल्याचें लोक मानीत असत. सर्व दरवाजे तसेंच सर्व जाण्यायेण्याचे मार्ग त्याच्या देखरेखीखालीं आहेत अशी समजूत होती. ख्रिस्ती

सनाचा वर्षारंभदिन ऊर्फ 'न्यू इयर्स डे' हा सण जेनसच्या नांवानें पाळला जातो, व त्या दिवशीं ख्रिस्ती लोक एकमेकांना भेटी व देणग्या देतात.

**जेनसेन, जोहानिस**—हा सुप्रसिद्ध डॅनिश लेखक १८७३ सालीं जन्मला. आपल्या काव्य-कादंबऱ्यांतून कल्पनेच्या अत्युच्च भराऱ्या सुंदर भाषेंत मारतांना हा दिसतो. त्याचे लेखनविषय विविध आणि सर्वव्यापी असतात. त्याला नोबेल पारितोषिक मिळालें आहे.

**जेना**—जर्मनी, थुरिंगिआ संस्थानांतील विश्वविद्यालय असलेलें शहर. हें आगगाडीनें लायप्झिगपासून ५६ मैलांवर आहे. हें शहर चुनखडीच्या टेंकड्यांनीं वेढलेल्या एका रुंद खिंडींत वसलेलें असल्यामुळें त्याचा देखावा कांहींसा भयानक दिसतो. विश्वविद्यालयाशिवाय या ठिकाणचीं पाहण्यासारखीं स्थळें म्हणजे *सेंट मायकेलच्या देवळांतील ल्यूथरच्या ब्रॉन्झ धातूचा* पुतळा, विश्वविद्यालयांतील ग्रंथसंग्रहालयांत ठेवलेली एक सपक्ष सर्पाची विचित्र आकृति व विजेल नांवाच्या ज्योतिषशास्त्रज्ञाचें घर हीं होत. येथल्या विश्वविद्यालयाची स्थापना १५५७ त झालेली आहे. ता. १४ ऑक्टोबर १८०६ रोजीं त्या शहराजवळ नेपोलियननें प्राशियन सैन्यांचा पराभव केला. लो. सं. ५८,३७५.

**जेनेट**—ऊद किंवा जवादी मांजराच्या जातीचा हा एक सस्तन मांसाहारी प्राणी आहे. हा आकारानें मांजरासारखा पण जरा लांबट असून याचें तोंड लांबट व निमूळतें होत गेलेलें असतें. शेपूट लांब असतें. याच्या अंगावरील केंस सुंदर व मऊ असतात.

**जेन्नर, एडवर्ड** ( १७४९–१८२३ )— एक इंग्रज वैद्यकशास्त्रज्ञ. त्यानें १७७६ च्या सुमारास देवीच्या रोगाबद्दल शास्त्रीय संशोधनकार्य सुरू केल्या वेळीं तेथील शेतकरी वर्गामध्यें दुभत्या गाईंना ज्या देवी येत असत त्या देवींची लस त्या प्रकारच्या रोगाच्या भयंकर सांथीला प्रतिबंधक उपाय असते, अशी जी शेतकऱ्यांची समजूत होती, त्या समजुतीच्या आधारानें जेन्नरनें आपलें संशोधन सुरू केलें. यापुढें या बाबतींत अनेक प्रयोग करून त्यानें आपली माणसांना देवीची लस टोंचण्याची सुप्रसिद्ध योजना ( व्हक्सीन इनॉक्युलेशन ) तयार केली. त्यानें हा आपला शास्त्रीय शोध १७९८ सालीं जगाला जाहीर केला. त्यानें यावर कांहीं ग्रंथहि प्रसिद्ध केले.

**जेपाळ**— [ *वर्ग-युफोर्बिआसी* ]. *या वनस्पतीस इंग्रजींत* जालप व हिंदींत जमालगोटा म्हणतात. मेक्सिको, अँडीज पर्वत, दोड्डबेट्टा, मसूरी या ठिकाणीं व कोंकणांतहि हीं झाडें होतात. याचीं पानें मोगली एरंडाच्या पानासारखीं असतात व बीं एरंड्यांप्रमाणें असतें. या वेलीच्या बिया उर्फ जमालगोटा हें फार तीव्र जुलाबाचें औषध म्हणून त्याची ख्याति आहे. 'जेपाळाची मात्रा व वैकुंठींची यात्रा' अशी म्हण आहेच. विंचवाच्या विषावर जेपाळ पाण्यांत उगाळून लावितात.

**जेपाळ तेल**—( क्रोटन तेल ). क्रोटन टिग्लिनम नांवाच्या झाडांच्या बियांपासून हें तेल काढतात. हें फार तीव्र रेचक आहे व फार काळजीपूर्वक दिलें पाहिजे. हें मज्जातंतुमांवर उत्तेजक व प्रतिक्रियाकारक म्हणून देण्यांत येतें.

**जे. पी.**–( जस्टिस ऑफ दि पीस ). अशा गृहस्थांना मॅजिस्ट्रेटचे अधिकार असून शांतता राखण्याचें काम त्यांच्याकडे असतें. इंग्लंडमध्यें मोठ्या गुन्ह्यांची पूर्वचौकशी करण्याचें काम करणें, आणि हलक्या स्वरूपाचे फौजदारी खटले चालवून त्यांचा निर्णय करणें हीं कामें यांना करावीं लागतात. शिवाय *दारूच्या गुत्त्यांचे परवाने देणें यासारखीं कामें हेच करतात.* यांना सरकारी पगार मिळत नाहीं; सर्व कामें मोफत करावीं लागतात. जे. पी. गृहस्थांची नेमणूक राजा लॉर्ड चॅन्सेलर यांच्या सल्ल्याप्रमाणें आणि लॉर्ड लेफ्टनंट किंवा टाउन कौन्सिल यांच्या शिफारसीप्रमाणें करतो. हिंदुस्थानांतहि ब्रिटिश अमदानीपासून जे. पी. नेमण्याची पद्धत चालू आहे. मुंबईसारख्या मोठ्या शहरांतून असे अनेक जे. पी. सरकार नेमतें.

**जेफर्सन, थॉमस** ( १७४३–१८२६ )–अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचा तिसरा अध्यक्ष. १७७५ मध्यें प्रथम त्यानें काँग्रेसमध्यें प्रवेश केला. अमेरिकन संस्थानांचा स्वातंत्र्याचा जाहिरनामा यानें लिहिला होता. यावर तारीख ४ जुलै १७७६ रोजीं सह्या करण्यांत आल्या. १७७९ ते १७८१–हा व्हर्जिनिया संस्थानाचा गव्हर्नर होता. १७८४ मध्यें हा अमेरिकेतर्फे फ्रान्समध्यें वकील म्हणून नेमलेला होता. तेथून परत आल्यावर अध्यक्ष वॉशिंग्टन यानें त्यास सेक्रेटरी ऑफ स्टेट या हुद्यावर नेमलें. १७९७ मध्यें तो उपाध्यक्ष म्हणून निवडून आला व १८०० मध्यें अध्यक्ष झाला. याच्या कारकीर्दींतील एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे यानें फ्रान्सपासून लुईसियाना हें संस्थान विकत घेतलें व त्यामुळें संयुक्त संस्थानांच्या प्रदेशांत फार मोठी वाढ झाली. १८०९ मध्यें त्यानें सार्वजनिक काम सोडून दिलें व तो एकांतवासांत राहूं लागला. अमेरिकेमध्यें लोकपक्षाची ( रिपब्लिकन ) स्थापना झाल्यापासून तो त्या पक्षाचा पुढारी होता.

**जेमसन, सर लीन्डर स्टार** ( १८५३–१९१७ )— एक दक्षिण आफ्रिकेंतील मुत्सद्दी. त्याचा सेसिल ऱ्होड्स याच्याबरोबर विशेष परिचय होऊन त्याला १८९१ मध्यें ऱ्होडेशिया प्रांताचा ॲडमिनिस्ट्रेटर नेमण्यांत आलें. १८९५ डिसेंबर ता.

२९ रोजीं त्यानें कांहीं सैन्य बरोबर घेऊन मेफकिंगहून निघून ट्रान्सव्हाल प्रांतावर स्वारी केली. या हालचालींकडे सेसिल ऱ्होड्सनें दुर्लक्ष केलें. त्या वेळीं जोहान्सबर्गमध्यें यूटलंडर्स लोकांनीं बंड उभारलें होतें. त्यांना जेमसननें आपल्या फौजेनिशीं मदत केली. जेमसनची क्रूगर्स डॉर्प येथें एला बलिष्ठ बोअर फौजेशीं गांठ पडली आणि सन १८९६ जानेवारी ता. २ रोजीं जेमसनला शरण जाणें भाग पडलें. जेमसन व त्याचे अधिकारी यांना ब्रि. सरकारच्या ताब्यांत देण्यांत आलें आणि जेमसनला १५ महिने कैदेची शिक्षा झाली. पुढें १९०४–१९०८ पर्यंत तो केप कॉलनीचा मुख्य प्रधान होता.

**जेमीसन, जॉन** (१७५९–१८३८)—एक स्कॉटिश भाषाशास्त्रज्ञ. त्याची ज्यामुळें कीर्ति झाली आहे, तो ग्रंथ 'एटिमॉलॉजिकल डिक्शनरी ऑफ दि स्कॉटिश लँग्वेज' (१८०८–१८०९, पुरवणी १८२५– स्कॉटिश भाषेचा व्युत्पत्तिकोश) हा होय. हा ग्रंथ स्कॉटिश शब्द, वाक्प्रचार आणि प्राचीन वाङ्मय याचा अतिशय मोठा व उपयुक्त संग्रह आहे.

**जेम्स राजे**—पहिला जेम्स (१५६६–१६२५)—इंग्लंडचा एक राजा. हा मूळ स्कॉटलंडमधील सहावा जेम्स राजा असून इंग्लंडच्या एलिझाबेथ राणीनंतर गादीला औरस वारस नसल्यामुळें नजीकचा वारस म्हणून इंग्लंड व स्कॉटलंड या दोन देशांचा संयुक्त राजा झाला. हा स्कॉटलंडची राणी मेरी (क्वीन ऑफ स्कॉट्स) हिचा मुलगा होय. मेरीच्या संशयित दुर्वर्तनामुळें ती पदभ्रष्ट होऊन जेम्स हा एक वर्षाचा असतांना स्कॉटलंडचा राजा झाला. जेम्सला लॅटिन, फ्रेंच या भाषांचें चांगलें ज्ञान व प्रॉटेस्टंट धर्मपंथाचें उत्तम शिक्षण देण्यांत आलें होतें. वयांत आल्यावर त्यानें स्कॉटलंडांतील सरदारांची अरेरावी बंद करून सुव्यवस्थित राज्यकारभार सुरू केला. त्यानें उद्योगधंद्यास उत्तेजन दिलें व धर्मसत्तेस राजसत्तेच्या वर्चस्वाखालीं आणलें. त्याचीं राजकारणांत ध्येय गांठण्याचीं साधनें अयोग्य असल्यामुळें त्याचे गुण पुढील पिढीस विचित्र भासतात. वक्रराजनीतीचें शिक्षण त्याला मुळापासून मिळालें होते. शिवाय कुरूप शरीर, बडबड्या स्वभाव, स्कॉच स्नेह्यांवर देणग्यांचा वर्षाव, वगैरे गोष्टींमुळें तो इंग्लंडांत अप्रिय बनला व अनियंत्रित राज्यकारभाराच्या प्रयत्नामुळें राजपक्ष व पार्लमेंट पक्ष यांच्यामधील यादवी युद्धाचा त्यानें पाया घातला. जेम्सला ग्रंथकर्ता म्हणून प्रसिद्ध होण्याची मोठी इच्छा होती, म्हणून त्यानें बरेंच लिखाण लिहिलें. पण वाङ्मयदृष्टीनें तें सामान्य दर्जाचें होतें.

दुसरा जेम्स (१६३३–१७०१)—हा पहिल्या चार्लस राजाचा मुलगा १६८५ सालीं गादीवर आला. तो युद्धकलाकुशल होता. डच युद्धांत जय मिळवून त्यानें आरमारी लढाईंतलें कौशल्य व्यक्त केलें, पण त्याचें खाजगी वर्तन चांगलें नव्हतें. शिवाय तो उघडपणें रोमन कॅथॉलिकपंथी बनला. राज्यावर आल्यावर त्यानें कॅथॉलिकांवरील नियंत्रणें दूर करण्याचा व त्यांना अधिकाराच्या जागा देण्याचा क्रम सुरू केल्यामुळें राजकीय जुलूम व धार्मिक दुराग्रह यांनीं सर्व देशांत असंतोष माजला. त्याचें पर्यवसान स. १६८८ च्या राज्यक्रांतींत झालें. नंतर पळून जाऊन तो फ्रान्समध्यें राजाश्रयाखालीं राहिला. आयर्लंडमध्यें बंड उभारून, गेलेलें राजपद पुनः मिळविण्याचा त्यानें प्रयत्न केला, पण तो फसला. नंतर मरेपर्यंत तो मोठा साधुपुरुष बनून रोग बरे करण्याचे चमत्कार करीत फ्रान्समध्यें राहिला. त्याला बरीच संतति होती.

थोरला तोतया, जेम्स (१६८८–१७६६)—हा दुसऱ्या जेम्सचा मुलगा. बापानें राज्य गमावल्यावर फ्रान्सचा राजा चौदावा लुई याच्या मदतीनें त्यानें १७१५ सालीं राज्य परत मिळवण्याकरितां स्कॉटलंडमध्यें बंड केलें, पण तें फसलें. १७१८ सालीं जेम्सनें पोलंडच्या राजघराण्यांतील मेरिआ क्लेमेंटिनेशीं लग्न ठरविलें. पण फ्रेंच राजा लुई यानें त्यास विरोध केल्यावर दोघांनीं इटलींत पळून जाऊन विवाह लावला. पोपनें त्यांना इंग्लंडचे राजा-राणी म्हणून मान देऊन राहण्यास राजवाडा व खर्चाकरितां १२,००० क्राउन इतकी वार्षिक नेमणूक दिली. जेम्सचें बायकोशीं पटलें नाहीं, व तीहि लवकरच वारली.

**जेम्स, विल्यम** (१८४२–१९१०)—एक अमेरिकन मानसशास्त्रज्ञ आणि तत्त्ववेत्ता. हा हेन्री जेम्स या कादंबरीकाराचा भाऊ होय. तत्त्वज्ञान या विषयांतील अनुभववाद ऊर्फ प्रत्यक्षैकवाद (इम्पिरिसिझम) आणि कृत्यसाधकतावाद (प्रॅग्मॅटिझम्) या दोन एकांतिक तत्त्वप्रणालींचा तो अग्रगण्य पुरस्कर्ता होता. विकलनात्मक मानसशास्त्र (अॅनॅलिटिकल सायकॉलॉजी) या विषयांत जेम्सनें बरीच भर घातली आहे. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते– 'प्रिन्सिपल्स ऑफ सायकॉलॉजी' (मानसशास्त्राचीं तत्त्वें, १८९०); 'दि विल टु बिलीव्ह' (१८९७); 'ह्यूमन इम्मॉर्टॅलिटी' (मानवी अमरता, १८९८); 'दि व्हरायटीज् ऑफ रिलिजिअस एक्स्पीरिअन्स' (धार्मिक अनुभवाची विविधता, १९०२); 'प्राग्मॅटिझम्' (कृत्यसाधकतावाद, १९०७); 'दि मीनिंग ऑफ ट्रुथ' (सत्याचा अर्थ, १९०९); 'सम् प्रॉब्लेम्स ऑफ फिलॉसफी' (तत्त्वज्ञानांतील कांहीं प्रश्न, १९११).

**जेम्स, हेन्री** (१८४३–१९१६)—एक अमेरिकन कादंबरीकार आणि निबंधकार. त्याचें बहुतेक आयुष्य युरोप खंडांत व विशेषतः इंग्लंडांत गेलें. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते– 'डेसीमिलर'; 'ए पॅशनेट पिल्ग्रिम्'; 'रॉड्रिक् हडसन्';

जॉर्डन नदीवरचा देखावा (पृ. ८८७)

जेरुसलेम—उमरची मशीद (पृ. ९११)

'दि पोर्ट्रेट ऑफ ए लेडी'; 'टेल्स ऑफ थ्री सिटीज्'; 'दि ट्रॅजिक म्यूझ'; 'दि आदर हाउस'; 'दि विंग्ज् ऑफ ए डोव्ह'; 'दि गोल्डन बाउल'; इत्यादि.

**जेरॅनिअम वर्ग**— द्विदल वनस्पतींचा एक वर्ग. याच्या फळांत पांच पुटें किंवा पिशव्या असतात व त्यांस जोडून पांच सपाट बीजोधारक तंतू (स्टाइल) गर्माशयापासून फुटलेले असतात, व ते एका लांब निमुळत्या चोंचीसारख्या अवयवाशीं एकत्र जोडलेले असतात. त्यामुळें कांहीं जातींस बगळ्याची चोंच असें नांव देण्यांत येतें.

**जेरबोआ**—हा उंदीर वर्गांतील प्राणी आहे. हा आशिया, उत्तर आफ्रिका व उत्तर अमेरिका या खंडांत आढळतो. ईजिप्तमध्यें या प्राण्याची एक विशेष जात असून तिचे मागचे पाय फार लांब असतात.

**जेरुसलेम** — हें पॅलेस्टाइन प्रांतांतील मुख्य शहर व ख्रिस्ती, ज्यू व मुसलमान यांचें पवित्र धर्मस्थान आहे. हें शहर पठारावर वसलें असून त्याच्या चोहों बाजूंस डोंगरांच्या रांगा दूरवर पसरल्या आहेत. येथें सायलेशियन नामक खडू व शाडू पुष्कळ प्रमाणांत सांपडतो. लो. सं. १,५५,३१४; यापैकीं ९४,९४२ ज्यू आहेत. येथें १९२५ सालीं हिब्रू विद्यापीठ निघालें.

अतिप्राचीन काळापासून या शहरावर अनेकांचे हल्ले होऊन येथील देवालयें, इमारती, वगैरे उध्वस्त होत, पण तीं परत बांधलीं जात. असा क्रम इ. स. ६३७ पर्यंत चाललेला आढळतो. हें शहर ईजिप्शियन लोकांच्या ताब्यांत असतां जोशुआनें स्वारी करून जिंकून घेतलें. कालांतरानें हें इस्त्राइट लोकांच्या ताब्यांत गेलें. या लोकांचा पुढारी डेव्हिड यानें या शहराची बरीच डागडुजी करून नवीन इमारतीहि उठविल्या. जेहोव्हचें देवालयहि याच वेळीं बांधण्यांत आलें. डेव्हिडनंतर आलेल्या सालोमनच्या कारकीर्दीतहि या शहराची चांगली भरभराट झाली. त्याच्या मृत्यूनंतर मात्र राज्यांत बंडें उत्पन्न होऊन राज्य विभागलें व इस्त्राइट लोकांचें एकंदर सामर्थ्य कमी होत गेलें. यामुळें ईजिप्तचा राजा शिशक यास शहरावर स्वारी करून अफाट संपत्ति लुटून नेतां आली.

अलेक्झांडरनें हें शहर खि. पू. ३२२ मध्यें यहुदी लोकांचा पाडाव करून घेतलें, पण यहुदी लोक शरण आल्यामुळें त्यानें तें परत त्यांच्या स्वाधीन केलें. पुढें खि. पू. ३१२ मध्यें ईजिप्तचा पहिला टॉलेमी यानें हें शहर जिंकून त्याची तटबंदी मोडून टाकली व देवालयें जमीनदोस्त केलीं. सायमननें पुन्हां तटबंदी करून जेहोव्हचें देवालय बांधलें. खि. पू. १६८ या वर्षी अँटिओकस व एपिफेनिस या ग्रीक योद्ध्यांनीं हें शहर जिंकून त्याची तटबंदी पाडून टाकली व देवालयें नष्ट केलीं. पुढें अँटिओकसच्या एकंदर जुलमी कारकीर्दीला कंटाळून यहुदी लोकांनीं सायमन मॅकॅबीज या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं बंड उभारून तें शहर परत जिंकून घेतलें. नंतर मॅकॅबीज याच्या घराण्याकडेच जेरुसलेम १०० वर्षें होतें. इ. स. ६५ मध्यें या शहराकडे पोंपचें लक्ष वेधून त्यानें तें जिंकून रोमन साम्राज्यास जोडलें.

यानंतर इ. स. ९३२ च्या सुमारास बारकोबाच्या नेतृत्वाखालीं यहुदी लोकांनीं बंड उभारून हें शहर घेतलें; पण लवकरच रोमन सेनापति ज्यूलिअस् स्टेव्हीस यानें हें शहर जिंकून उध्वस्त केलें. तथापि पुढें हेड्रियननें हें शहर पुनः उत्तम बांधून सुशोभित केलें व त्यास एलिया कॅपिटोलिनिया हें नांव दिलें. हेड्रियननें यहुदी लोकांना मात्र जेरुसलेममध्यें राहण्यास पूर्ण प्रतिबंध केला. यानंतर या शहराची भरभराट सहाव्या शतकापर्यंत होत गेली. कॉन्स्टंटाइन बादशहा, सम्राज्ञी युडोसिआ व जस्टीनियन बादशहा या तिघांनीं या शहरांत अनेक सुंदर इमारती व देवालयें बांधवून या शहराची शोभा वृद्धिंगत केली.

यानंतर ६३७ मध्यें खलिफा उमर यानें हें शहर जिंकून आपल्या हुकमतीखालीं आणलें. तें इ. स. १०९९ पर्यंत मुसलमानांच्या ताब्यांत होतें. इ. स. १०९६ ते १२९१ पर्यंत मुसलमानांपासून आपलें पवित्र स्थान सोडविण्यासाठीं व ख्रिश्चन यात्रेकरूंचा होत असलेला छळ थांबविण्यासाठीं युरोपांतील इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, वगैरे ख्रिश्चन राष्ट्रांनीं संघटित चळवळ केली. ही चळवळ इतिहासांत 'क्रुसेड' (धर्मयुद्ध) म्हणून प्रसिद्ध आहे. अशीं युद्धें एकंदर आठ झालीं.

इ. स. १९१७ सालपर्यंत तें मुसलमानांकडे होतें. त्या सालीं तें ब्रिटिशांच्या हुकमतीखालीं आलें. त्या वेळेपासून त्या शहरास एक निराळेंच वळण लागलें. मुख्य मुख्य ठिकाणीं रेल्वेचा फांटा नेला असल्यानें येथें सुखसोयी वाढल्या. चांगल्यापैकीं इमारती उठल्या व अनेकधर्मीयांचीं मंडळें शांततेनें नांदून, शाळा, दवाखानें, वगैरे स्थापन होऊन लोकोपयोगी कार्यें लोक करूं लागले. प्रतिवर्षी हजारों यात्रेकरू जेरुसलेमला सुखानें जाऊं येऊं लागले. पण पॅलेस्टाइन हा प्रांत ज्यू लोक बळकावीत आहेत असें दिसून आल्यावर अरब लोकांनीं उचल खाल्ली. ज्यू आणि अरब या दोन समाजांत भयंकर वितुष्ट उत्पन्न झालें व ब्रिटिशांनीं १९४८ सालीं आपल्याला मँडेटखालीं मिळालेला अधिकार सोडला. तेव्हां आज जेरुसलेम शहराची स्थिति अगदीं विचित्र झाली आहे. पॅलेस्टाइन पाहा.

आजच्या जेरुसलेम शहराला आठ वेशी आहेत. जाफा आणि हें शहर यांना जोडणारा आगगाडीचा फांटा आहे. शहराच्या तटाबाहेर नवी वस्ती झाली आहे. गांवांत अनेक देवळें व मशिदी आहेत. व्यापार फार मोठा चालतो. मोत्यांचे दागिने

व लांकडावरचें नक्षीकाम फार सुंदर होतें. पुष्कळ शैक्षणिक व धार्मिक संस्था चालतात. असंख्य प्रवासी व यात्रेकरू येथें सारखे लोटत असतात. जगांतील अत्यंत प्राचीन व पवित्र शहरांपैकीं जेरुसलेम आहे, हें लक्षांत घेतल्यास याचें महत्त्व कळेल.

**जेरेमिहा** (मृ. खि. पू. ५८६)— जुना करार या ख्रिस्ती धर्मग्रंथांतील, थोर भविष्यवाद्यांपैकीं हा दुसरा भविष्यवादी (प्रॉफेट) होय. त्याला जोसेहा या राजाच्या कारकीर्दीत खि. पू. ६२९ मध्यें राजदरबारचा भविष्यवादी या जागेवर (प्रॉफेटिक ऑफिस) नेमण्यांत आलें. खि. पू. ५८६ मध्यें नेबूचॅडनेझर यानें जेरुसलेम शहर काबीज केलें. त्या वेळीं जेरेमिहा ह्यांत होता. त्यानें जुन्या करारांतील दोन पुस्तकें लिहिलीं आहेत. जेरेमिहानें डेटरॉनमी हें पुस्तक आणि कित्येक गीतें (साम्स) लिहिलीं, असें कांहीं टीकाकारांचें मत आहे.

**जेरोम, जीन लेऑ** (१८२४–१९०४)—एक फ्रेंच चित्रकार. त्याचें एक मोठें चित्र–'दि एज ऑफ ऑगस्टस अॅन्ड दि बर्थ ऑफ ख्राइस्ट' (ऑगस्टस युग आणि ख्रिस्तजन्म) हें १८५५ मध्यें फ्रेंच सरकारनें विकत घेतलें. नंतर त्यानें सीझर (१८५९), फ्राइन (१८६१), सॉक्रेटीस (१८६१), इ. चीं अशींच मोठालीं चित्रें काढलीं. मूर्तिकार म्हणूनहि त्यानें नांव मिळविलें.

**जेर्व्हिनस, जॉर्ज गॉटफ्रीड** (१८०५–१८७१)—एक जर्मन टीकाकार व ग्रंथकार. त्यानें इटालीला भेट देऊन 'हिस्ट्री ऑफ पोएटिक नॅशनल लिटरेचर ऑफ दि जर्मन्स' (जर्मनांच्या राष्ट्रीय पद्यवाङ्मयाचा इतिहास, १८३५–१८४२) हें पुस्तक प्रसिद्ध केलें. १८४९ मध्यें त्यानें आपल्या 'शेक्स्पिअर' या मोठ्या ग्रंथाचा पहिला भाग प्रसिद्ध केला. नंतर १८५३ मध्यें जर्मन पद्याचा इतिहास आणि १८५५ मध्यें १९ व्या शतकाचा इतिहास हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. त्याचा टीकात्मक निबंध 'हँडेल अँड शेक्स्पिअर' हा होय.

**जेली**—हा मोरंब्यासारखा विलायती प्रकार आहे. जेली मांसाचा व फळांचा करतात. कवठ, पेरू, इ. फळांचा रस काढून तो साखरेबरोबर शिजवून गोठविला असतां जेली तयार होते. फळें आंबट नसल्यास लिंबाचा रस घालतात.

**जेलीको, जॉन रशवर्थ** (१८५९–१९३५)— हा एक ब्रिटिश अॅडमिरल असून त्याला पुढें 'फर्स्ट अर्ल जेलीको ऑफ स्कापा' ही पदवी देण्यांत आली. त्यानें १८७२ सालीं आरमारांत प्रवेश केला आणि १८८२ मध्यें ईजिप्तमधील युद्धांत भाग घेतला. १८९८ पासून १९०१ पर्यंत तो चीनकडे कामगिरीवर गेला होता. पेकिंग येथील सैन्याला सोडवण्याचा प्रयत्न करीत असतां तो जखमी झाला. पुढें तो आरमारी खात्यांत चढत गेला.

१९१४ सालीं महायुद्ध सुरू झाल्यावर, स्कापा येथें असलेल्या ग्रँड फ्लीटचा मुख्य कमांडर या जागीं जेलिकोला नेमलें. १९१६ त जेलिकोला आरमारी खात्यांत 'फर्स्ट सी लॉर्ड' ही श्रेष्ठ जागा देण्यांत आली. नंतर लवकरच जेलीको १९१७ मध्यें सेवानिवृत्त झाला. १९१९ सालीं पहिलें महायुद्ध संपल्यानंतर ब्रि. राष्ट्रातर्फे त्याचें आभारप्रदर्शन होऊन त्याला ५०,००० पौंड देणगी देण्यांत आली. १९२० ते १९२४ पर्यंत तो न्यूझीलंडचा गव्हर्नर जनरल होता. त्यानें 'दि ग्रँड फ्लीट', आणि 'दि क्रायसीस ऑफ दि नेव्हल वॉर' (नाविक युद्धाचा शेवट) हीं दोन पुस्तकें लिहिलीं आहेत.

**जेव्हॉन्स, विल्यम स्टॅनले** (१८३५–१८८२)—एक इंग्रज अर्थशास्त्रज्ञ व तर्कशास्त्रज्ञ. विल्यमला १५ व्या वर्षी लंडन येथील युनिव्हर्सिटी कॉलेज स्कूलमध्यें घालण्यांत आलें. त्याचें कॉलेजचें शिक्षण दोन वर्षे झालें नाहीं तोंच त्याला ऑस्ट्रेलियांत नवीन स्थापन झालेल्या एका बॅंकेंत नाणकपरीक्षकाची जागा देण्यांत आली. पांच वर्षांनंतर (१८५९ सालीं) परत येऊन त्यानें लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजांत पुनः अभ्यास सुरू केला. व एम्. ए. झाला. पुढें भौतिक शास्त्रांचा व नीतिशास्त्रांचा अभ्यास त्यानें चालू ठेवला. त्याला मँचेस्टर येथील ओवेन्स कॉलेजमध्यें १८७६ मध्यें अर्थशास्त्राच्या प्रोफेसराची जागा मिळाली. पण लवकरच निद्रानाशक रोगानें व इतर आजारानें त्याची प्रकृति खालावल्यामुळें त्याची लंडनमधील युनिव्हर्सिटी कॉलेजांत नेमणूक झाली. ती त्याला आनंददायक वाटली. तथापि लंडनमध्येंहि त्याची प्रकृति अधिकाधिक खालावत गेल्यामुळें अखेर १८८० सालीं त्यानें राजीनामा दिला. पुढें १८८२ मध्यें हेस्टिंग्ज येथें स्नान करीत असतां तो बुडून मरण पावला.

अर्थशास्त्राच्या व्यावहारिक प्रश्नांवर उत्तम लेख लिहिणारा म्हणून जेव्हान्सची प्रसिद्धि मोठी आहे. सोन्याच्या भावाची भयंकर मंदी (१८६३), कोळशाचा प्रश्न (१८६५), पैसा आणि विनिमय व्यवस्था (१८७५), सरकार व मजूर यांमधील संबंध (१८८२), चलनपद्धति व जमाखर्च यांविषयीं विवेचन आणि सामाजिक सुधारणेच्या पद्धती, वगैरे विषयांवरील त्याचे निबंध व पुस्तकें हीं त्यांतील स्वतंत्र विचार व चटकदार लेखनपद्धति यांमुळें फार लोकप्रिय झालीं.

**जेसन**—हा ग्रीक दंतकथांत वर्णिलेला थेसली प्रांतांतील आयोलकॉसचा राजा होय. त्यानें मीडियाच्या मदतीनें गोल्डन फ्लीस (सोन्यासारखें मेंढ्याच्या लोकरीचें पीस) मिळविण्याचें अचाट कार्य पार पाडलें, आणि मीडियाशीं विवाह

करून तो आयोलकॉसला परत आला. परंतु त्याला आपलें राज्य सांभाळतां येईना. म्हणून तो कॉरिंथला पळून गेला. तेथें कांहीं काळानंतर त्यानें तेथील राजकन्या ग्लसी ( किंवा क्रूसा ) हिच्याशीं विवाह केला आणि मीडियाला व तिच्या मुलांना हांकून दिलें.

**जेसनेर, कोनार्ड** ( १५१६–१५६५ )—एक जर्मन-स्विस् सृष्टिशास्त्रज्ञ. त्याचा 'हिस्टोरिया ॲनिमॅलियम' हा ग्रंथ प्राणिशास्त्राचा पाया गणला पाहिजे. वनस्पतिशास्त्रांतहि फुलें आणि बीं-बियाणें यांच्या गुणधर्मानुसार वर्गीकरण करण्याची पद्धति ठरवणारा हाच आद्य संशोधक होय. त्याच्या 'बिब्लिओथेका युनिव्हर्सालिस' या पुस्तकांत सर्व ग्रीक, लॅटिन व हीब्रू लेखकांची सविस्तर यादी दिली आहे.

**ज़ेसरी**—नेसरी पाहा.

**जेसलमीर संस्थान**— राजपुताना संस्थानांतील अगदीं पश्चिमेकडील हें सर्वांत मोठें संस्थान आहे. याचें क्षे. फ. १५,९८० चौ. मैल असून एकंदर गांवें ४७२ आहेत. लो. सं. ९३,२४६. संस्थानचें उत्पन्न चार लाखांवर आहे. संस्थानी प्रजेंत शें. ७० हिंदू आहेत. संस्थानांत मारवाडी व सिंधी भाषा चालतात. हें संस्थान हिंदुस्थानांतील विशाल वालुकासागरापैकीं एक भाग असल्यामुळें बहुतेक सर्व प्रदेश वालुकामय असून ओसाड आहे. खेडीं दूर दूर अंतरावर वसलेलीं असून वस्ती फार विरळ आहे. साधारणपणें एखाद्या खाऱ्या विहिरीभोंवतीं झोंपड्या बांधून लोक राहतात. काकनी नांवाचा ओढा जेसलमिराच्या उत्तरेस १७ मैलांवर वाहत असून त्याच्याचपुढें भुजझील नांवाचा तलाव झाला आहे. यांत नद्या मुळींच नाहींत. पावसाळ्यांत मका पिकतो व तेंच काय तें मुख्य धान्य आहे. हवा कोरडी असून निरोगी आहे; परंतु उन्हाळा अतिशय कडक असतो. पाऊस फारच थोडा पडतो.

जेसलमीरचे संस्थानिक यादव वंशाचे रजपूत असून श्रीकृष्ण आपला मूळपुरुष आहे असें ते मानतात. श्रीकृष्णाचा काल झाल्यावर त्याच्या पुत्रांपैकीं दोघांनीं सिंधु नदीपलीकडे जाऊन मर्व्ह देशांत वसाहत केली. त्याच्या वंशापैकीं जयसाल यानें इ. स. ११५६ मध्यें जेसलमीर नांवाचें शहर वसविलें. तो सुमारें इ. स. ११६८ त मेला. त्याच्यानंतर गादीवर त्याचा पुत्र सलभान बसला. तो मुसलमानांबरोबर युद्ध करीत असतांना मेला. त्यानंतर बीजल, कैलान, चाचिकदेव, कर्ण, लाखुरसेन, पंपाल हे राजे झाले. पंपालनंतर त्याचा चुलता जयतसी राजा झाला. त्याच्यावर अल्लाउद्दीन खिलजी चालून आला. मुसलमानांनीं ८ वर्षें जेसलमिरास वेढा घातला होता. या वेढ्याच्या काळांत जयतसी मेला व त्यानंतरचा राजा मूळराज शेवटच्या लढाईंत मरण पावला. पुढें दुदू या भाटी राजानें जेसलमीर काबीज केलें. पुढें त्याच्यावर दिल्लीच्या शहानें स्वारी करून त्याचा पराभव करून मूळराजाच्या एका गरसी नांवाच्या पुतण्यास जेसलमीर दिलें ( १३०६ ). परंतु दुदूच्या मंडळीनें त्याचा खून केला. तेव्हां त्याचा भाऊ केहूर व त्याच्यानंतर हमीर हे गादीवर आले. त्याच्यानंतर कैलम, चाचीदेव, बरसी, जैत, नूनकर्ण व भीम हे राजे झाले. भीमाच्यामागें त्याच्या मुलाचा खून करून भीमाचा भाऊ मनोहरदास हा राजा झाला. तो मेल्यावर सावळसिंग गादीवर आला ( १६५१ ). सावळानंतर त्याचा पुत्र अमरसी राजा झाला; तो १७०२ सालीं मेला. तेव्हां जसवंत गादीवर आला. त्याच्या पश्चात् वडील मुलगा अरसीसिंग राजा झाला. जेसलमीरचा दुसरा मूळराजा याशीं इंग्रजांचा संबंध येऊन १८०८ त या दोघांचा तह झाला. यांत संस्थानास दत्तकाचा अधिकार मिळाला व खंडणीची माफी मिळाली. नंतर १८२० त मूळराज मेला. त्याच्यामागें त्याचा पुत्र गजसिंग गादीवर आला. तो १८४६ सालीं मेला. तो निपुत्रिक असल्यानें त्याच्या राणीनें पुतण्या रणजितसिंग यास दत्तक घेतलें. तोहि स. १८६४ त निपुत्रिकच मेला. तेव्हां त्याच्या धाकट्या भावास दत्तक घेऊन गादीवर बसविलें. त्याचें नांव बहिरीसाल. १८६५ सालीं बहिरीला राज्याभिषेक केला. तो १८९१ त मरण पावला. त्याच्यानंतर त्याच्या राणीनें लाठीच्या खुशालसिंगाचा पुत्र श्यामसिंग यास दत्तक घेऊन गादीवर बसविलें. येथील संस्थानिकास १५ तोफांचा सलामीचा मान आहे. हल्लींचे अधिपति महाराजाधिराज महारावळ श्री. सर जवाहिरसिंगजी बहादूर हे आहेत. १९४९ मध्यें हें संस्थान बृहत् राजस्थान संघांत सामील झालें आहे.

गांव— जेसलमीर संस्थानची राजधानी. याची लो. सं. सात हजारांवर आहे. गांवाभोंवतीं सुमारें ३ मैल परिघाचा व १० पासून १५ फूट उंचीचा व ५ फूट जाडीचा दगडी तट आहे. दक्षिणेस एका टेकडीवर किल्ला आहे. किल्ल्याची तटबंदी चांगली असून गांवच्या बाजूनेंच किल्ल्यांत जाण्याचा मार्ग आहे. किल्ल्यांतील जैनांचीं देवळें चांगलीं असून कांहींचें खोदकाम प्रेक्षणीय आहे. कांहीं देवळें १४०० वर्षांचीं जुनीं आहेत असें म्हणतात.

**जेसूइट**—( *येशूची संस्था* ). ही एक कॅथॉलिक पंथांतील धार्मिक संस्था असून तिची स्थापना १५३४ मध्यें सेंट-इग्नेशियस लोयोला यानें केली. हिला तिसरा पॉल या पोपनें १५४० मध्यें मान्यता दिली. या संस्थेचे समासद निर्धनता, ब्रह्मचर्य व आज्ञापालन या तीन गोष्टींचें व्रत धारण करतात व प्रतिज्ञानीं

बद्ध असतात. याशिवाय त्यांना पोपच्या आज्ञापालनाची विशेष प्रतिज्ञा करावी लागते व त्यांस संप्रदायांतील कोणत्याहि महत्त्वाच्या स्थानाचा स्वीकार करतां येत नाहीं. या संस्थेचा सामान्य उद्देश प्रत्येक गोष्टीमध्यें परमेश्वराचें महद्वैभव वाढविणें हा असतो. त्यांचें मुख्य कार्य म्हणजे पाखंडापासून रोमन कॅथॉलिक संप्रदायाचें रक्षण करणें, ज्या ज्या देशांत मिशन असेल त्या देशांत कॅथॉलिक संप्रदायाचा प्रसार करणें, व शिक्षणाचा प्रसार करणें, हें असतें.

या संस्थेमध्यें चार वर्ग असतात : १. सुशिक्षित फादर, अथवा जे पोपची आज्ञा पालन करण्याचें विशेष व्रत घेतात व ज्यांच्यामधून संस्थेचे प्रमुख व उच्च अधिकारी निवडले जातात. २. साहाय्यक अथवा मदतनीस-यांच्यामध्यें धर्मोपदेशकां-व्यतिरिक्त लोकांचाहि समावेश होतो. हे संस्थेचीं लहानसहान कामें करतात व संस्थेच्या आर्थिक व इतर कार्यांची व्यवस्था पाहतात. ३. अभ्यासू अथवा विद्यार्थी-हे धर्मोपदेशक होण्याची तयारी करीत असतात. ४. नवशिके अथवा जे संस्थेचे सभासद होण्याच्या दृष्टीनें विरक्त आचरणाचा अभ्यास करीत असतात.

या संस्थेत प्रवेश करणाऱ्या गृहस्थास दीर्घकाळ व मोठ्या चिकाटीनें शिक्षण घ्यावें लागतें. प्रथम दोन वर्षें नवशिके म्हणून राहावयाचें; त्यानंतर प्रतिज्ञा घ्यावी लागते; त्यानंतर अभिजात वाङ्मयाचा अभ्यास करावा लागतो; त्यानंतर तीन वर्षें तत्त्वज्ञानाचा व ४ वर्षें दैवतशास्त्राचा अभ्यास करावा लागतो. यानंतर एक वर्ष विरक्ततेचें शिक्षण घेण्यांत खर्च करावें लागतें. याशिवाय कांहीं विशिष्ट विषयांचा विशेष अभ्यास करावा लागतो.

जेसुइट हे कॅथॉलिक पंथांतील अतिशय प्रगत व विज्ञात असे शिक्षक समजले जातात. ते जेथें जेथें असतील तेथें शाळा व कॉलेजें स्थापन करतात. त्यांनीं अभिजात वाङ्मय शिकवि-ण्याच्या अगदीं नवीन व अतिशय यशस्वी पद्धती शोधून काढल्या आहेत. त्यांनीं शास्त्रीय क्षेत्रांत अनेक प्रकारचें विशेष कार्य केलेलें आहे. या संस्थेचीं जगामध्यें आज सुमारें २२० कॉलेजें आहेत. त्यांपैकीं हिंदुस्थानांत ११ आहेत; त्यांत मुंबईचें सेंट झेविअर कॉलेज हें मोडतें. १९४६ सालीं या संस्थेचे २८,०६२ सभासद होते व त्यांपैकीं १४६४ हिंदुस्थानांत काम करीत होते.

**जेसोर**—बंगाल इलाख्यांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,९२५ चौ. मैल.. हा जिल्हा हुगळी आणि मेघना या नद्यांमध्यें असून त्यांत पुष्कळ नद्या आहेत. सर्व जमीन मळीची आहे. या जिल्ह्यांत जंगल नाहीं.

सुमारें साडेचारशें वर्षांपूर्वी खांजा अली नांवाचा मनुष्य येथें येऊन त्यानें गौरच्या राजाजवळून एक जहागीर मिळविली. यानें १४५९ सालापर्यंत या भागांत राजाप्रमाणें सत्ता गाजविली. दुसरी एक दंतकथा आहे कीं, विक्रमादित्य नांवाचा राजा येथें राज्य करीत होता. त्यानें आपली राजधानी म्हणून यशोहर नांवाचें शहर वसविलें. त्याचा अपभ्रंश जेसोर झाला आहे. राजा मानसिंगानें (इ. स. १५८९ ते १६०६) विक्रमा-दित्याचा मुलगा प्रतापादित्य याचा पराभव केला. ज्या ठिकाणीं प्रतापादित्याचें राज्य होतें, त्या भागास जेसोर असें नांव पडलें.

प्रतापादित्याचा पराभव झाल्यावर ते परगणे महबतराय या मानसिंगाच्या सरदाराच्या हवालीं करण्यांत आले. याच्या-मागून कंदर्पराय व नंतर मनोहरराय (१६४९–१७०५) हा गादीवर बसला. या वंशाचा हाच मूळपुरुष समजला जातो.

*जिल्ह्याची लोकसंख्या* (१९४१) १८,२८,२१६ आहे. येथील हवा फार वाईट आहे. येथील लोकांची भाषा बंगाली आहे. लोकवस्ती शेंकडा ६१ मुसलमान व ३९ हिंदू अशी आहे. उत्तरेकडचा भाग सुपीक असून त्यांत भात, तंबाखू, ऊंस, वगैरे पिकें येतात. ताड–खजुराच्या झाडांपासून साखर तयार कर-तात. नद्यांच्या समुद्राजवळच्या भागांत भरती-ओहोटीचें पाणी येत असल्यामुळें होड्या बारा महिने चालू असतात व त्यांतून पुष्कळ व्यापार होतो.

जेसोर गांव भैरव नदीकांठीं असून ईस्टर्न बंगाल स्टेट रेल्वेचें हें एक स्टेशन आहे. १८६४ सालापासून येथें म्युनिसिपालिटी आहे. गांवांत जिल्ह्याच्या सर्व कचेऱ्या, दवाखाने, शाळा, वगैरे आहेत.

**जेहोव्हा**— हा इस्रायल लोकांचा देव आहे. कांहींच्या मतें जेहोव्हा हा शब्द 'हवह' (असणें) या धातूपासून निघाला आहे. प्राचीन इस्रायल जातीच्या इतिहासकारानें जी इस्राएल लोकांची हकीगत दिली आहे तीवरून मोझेसच्या पूर्वीच्या इस्राएल लोकांना हा देव माहीत नव्हता. पॅलेस्टाइनच्या दक्षिणेस एका पर्वतावर मोझेसला याचें दर्शन झालें. मोझेसनें या देवाचें महत्त्व इस्राएल लोकांना समजावून दिलें.

जेहोव्हा ही निसर्गदेवता आहे असें गृहीत धरून १९ व्या शतकांतील कांहीं विद्वानांनीं ही अग्निदेवता आहे असें प्रति-पादन केलें. मेघगर्जना हा जेहोव्हाचा शब्द, विद्युत् हे त्याचे बाण व इंद्रधनुष्य हें धनुष्य असें बायबलांत वर्णन आहे.

**जैंटिया**—खासी पाहा. हा मुलूख आसाम प्रांतांत आहे. ह्या मुलुखाचें क्षे. फ. ४८४ चौ. मै. आहे व लोकसंख्या लाखावर आहे. हे परगणे पूर्वीं एका देशी राजाच्या ताब्यांत होते व त्याचें राज्य जैंटिया डोंगरापासून आसामांतील कलंग नदीपर्यंत होतें.

हे जैंटिया राजे जरी खासी वंशांतले होते तरी त्यांच्यावर हिंदु धर्माची छाप पडली होती. १८२४ सालीं काचरवर ब्रह्मी लोकांनीं स्वारी केली त्या वेळीं जैंटिया राजानें इंग्रज सरकारशीं मित्रत्वाचा तह केला. पण इंग्रज सरकारास त्याचें अस्तित्व कांहीं प्रसंगीं सोईस्कर वाटलें नाहीं. तेव्हां १८३५ सालीं सिल्हेट प्रांतांतला मुलूख जैंटिया टेंकड्यांसुद्धां इंग्रजी राज्याला जोडला. ह्या मुलुखांत बऱ्याचशा जमिनींत तांदूळ होतो. ह्या भागांत पाऊस विपुल आहे. एकंदरींत येथील जमीन उत्तम असून फळझाडें लावल्यानें शेतकऱ्यास उत्पन्न चांगलें होतें. येथील लोक पुराणप्रिय, आळशी व बिनधाडसी आहेत.

**जैत्रपाळ यादव** (११९१–१२१०)— पांचव्या भिल्लम यादवाचा हा शूर पुत्र आपल्या बापाच्या पश्चात् गादीवर आला. 'समस्तभुवनाश्रयमहाराजाधिराज' असें बिरुद यानें धारण केलें होतें. हा वेद, मीमांसा व तर्कशास्त्र यात पारंगत होता. प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य याचा पुत्र लक्ष्मीधर व मराठी आद्य कवि मुकुंदराज हे याच्या पदरीं होते. प्रतापरुद्र काकतीयाच्या कारकीर्दींत सुरू झालेली लढाई यानें तशीच पुढें महादेव काकतीयाशीं चालू ठेवून त्यांत महादेवास ठार केलें व गणपतीस कैद केलें. पुढें यानें गणपति काकतीयास कांहीं अटींवर आंध्र देशाच्या गादीवर बसविलें.

**जैत्रसिंह गुहिलोत** (१२१२–१२५१)—पद्मसिंहानंतर हा मेवाडचा राजा झाला. जयतल, जयसिंह, जयसल, जयतूसिंह किंवा जितसिंह या नांवांनींहि हा ओळखला जाई. हा शूर योद्धा असून यानें अनेक राजे व मुसलमान यांच्याशीं लढाया देऊन विजय संपादन केले, असें चीरवा येथील शिलालेखांवरून दिसतें. नाडोलचा राजा उदयसिंग व माळव्याचा परमार याच्याशीं लढाया देऊन यानें त्यांचा पराभव केला. नागद्याच्या तसारक्ष योगराजाचा थोरला पुत्र पमराज भुतालाच्या लढाईत सुलतान शम्सुद्दिन अल्तमशाकडून मारला गेल्यावर यानें अल्तमशावर चाल करून नागोर येथें त्याचा पराभव केला. मेवाडची राजधानी नागदा व आहाड अशा दोन ठिकाणीं होती. नागदा अल्तमशानें उध्वस्त केल्यामुळें यानें चितोड ही राजधानी केली. सिंध प्रांतांतील लोकांशींहि याचीं युद्धें झालीं. दिल्लीचा सुलतान नासिरुद्दिन मुहम्मद याच्या भीतीनें पळून आलेला त्याचा पुत्र जलालुद्दिन यास यानें आश्रय दिला. 'श्रावकप्रतिक्रमणसूत्रचूर्णि' या ग्रंथावरून याचा अंत वि. सं. १३०९–१७ च्या सुमारास झाला असावा, असें दिसतें.

**जैन संप्रदाय**— जैन लोक आपला धर्म अनादि असला तरी कालमानाप्रमाणें कित्येक वेळां त्याचा ऱ्हास होत असून त्याचें पुनरुज्जीवन तीर्थंकरांकडून केलें जातें, असें मानतात. ऐतिहासिक दृष्ट्या पाहतां जैन धर्म भगवान् पार्श्वनाथानें इ. स. पूर्वी ८०० या कालांत स्थापन केला असावा व त्याचें दोषरहित पुनरुज्जीवन महावीरानें इ. स. पूर्वी सहाव्या शतकांत केलें असावें, असें दिसतें.

पार्श्व हा काशीचा राजा अश्वसेन व त्याची पत्नी वामा यांचा मुलगा. त्यानें मुख्यतः चार तत्त्वांचा प्रसार करून जैन धर्माचा पाया घातला. तीं तत्त्वें म्हणजे अहिंसा, अस्तेय, सत्य आणि अपरिग्रह हीं होत. परंतु कांहीं कालानें जैनधर्मानुयायांमध्यें ब्रह्मचर्याविषयीं बरीच सवलतीची वागणूक असल्याकारणानें महावीर यानें या चार तत्त्वांत ब्रह्मचर्य या तत्त्वाची भर घातली.

महावीर याचा जन्म बिहार प्रांतांतील वैशाली नगरीजवळ असलेला कुण्डग्राम या गांवीं झाला. तो बहुतेक इ. स. पूर्वी ६९९ वर्षें झाला असावा. त्याच्या पित्याचें नांव सिद्धार्थ व आईचें त्रिशला होतें. त्याला नंदिवर्धन नांवाचा एक वडील भाऊ होता. श्वेतांबर मतानुसार त्यानें यशोदा नांवाच्या राजकन्येबरोबर लग्न केलें असून त्यास प्रियदर्शना नांवाची एक मुलगी होती. मातापित्यांच्या मरणोत्तर महावीरानें आपल्या वडील भावाच्या संमतीनें जैन धर्माची दीक्षा घेतली. नंतर तो बारा वर्षेंपर्यंत नाना प्रकारचीं तपें करीत बिहार वगैरे प्रांतांतून हिंडत होता. एका वर्षानंतर त्यानें वस्त्रत्याग केला असा उल्लेख 'आचारांग' नांवाच्या जुन्या आगम ग्रंथांत सांपडतो. ह्यानंतर त्याला केवल ज्ञान प्राप्त झालें व त्यानें आपल्या नव्या धर्माचा प्रसार करण्यास सुरवात केली. प्रथमतः त्यानें गौतमादि गणधरांना जैन धर्माची दीक्षा दिली व जैन तीर्थांची स्थापना भक्कम पायावर केली. त्याला धर्मप्रसाराच्या कामीं त्याच्या आईचा भाऊ वैशाली नगरीचा राजा चेटक व मगधचा बलाढ्य राजा श्रेणीक ह्यांची मदत प्रामुख्यानें झाली असली पाहिजे. महावीर वयाच्या ७२ व्या वर्षीं 'पावा' नगरींत निर्वाणास गेला.

जैन धर्म बिहार प्रांतांत उत्पन्न झाला असून त्याचा प्रसार इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकापर्यंत बिहारच्या जवळपास इतकाच झाला असावा. पुढें मौर्य राजा चंद्रगुप्त हा मगधावर राज्य करीत असतां तेथें दुष्काळ पडला. व तो बारा वर्षेंपर्यंत होता. ह्या दुष्काळामुळें जैनधर्मीय बरेच मुनी भद्रबाहु आचार्यांसह दक्षिणेंत आले व तेथून दक्षिण हिंदुस्थानांत जैन धर्माचा प्रसार सुरू झाला. दुष्काळ संपल्यावर बरेच लोक परत मगध देशांत गेले. परंतु तेथें असलेल्या लोकांचा आचारविचार बराच बदललेला त्यांना दिसून आला. त्यांपैकीं कित्येक शुभ्र वस्त्र वापरूं लागले व ह्या मतभेदामुळेंच दिगंबर व श्वेतांबर असे जैन धर्माचे दोन पंथ पाडण्यांत आले.

दक्षिण हिंदुस्थानांतील जैन धर्माची वाढ प्रामुख्यानें दिगंबरांच्याकडूनच झाली असून अजूनहि त्या प्रांतांत दिगंबर लोकांचाच भरणा अधिक आहे. ह्या धर्मप्रसारास कुंदकुंद वगैरे आचार्यांचा प्रभावच मुख्यत्वें कारण झाला. राष्ट्रकूट राजा अमोघवर्ष यानें जैन ग्रंथकार जिनसेन ह्यास आश्रय दिला होता; व गंगराजाचा प्रधान चामुंडराय ह्याच्या पदरीं नेमिचंद्र हा प्रसिद्ध ग्रंथकार होता. बहुतेक राजांनीं जैन धर्मास आपुलकीच्या नात्यानें वागविल्याचें आढळून येतें. परंतु बाराव्या शतकानंतर शैव धर्माची स्थापना, ब्राह्मण धर्माची वाढ व मुसलमान लोकांच्या दक्षिणेवरील स्वाऱ्या, वगैरे अनेक कारणांमुळें जैन धर्मास उतरती कळा लागली.

उत्तर हिंदुस्थानांत जैन धर्माची वाढ अधिक झपाट्यानें व अधिक प्रमाणांत झाली. मथुरेजवळ सांपडलेल्या मूर्तींवरून तेथें इ. स. च्या दुसऱ्या शतकांत जैन लोकांचा बराच भरणा असावा असें वाटतें. तसेंच इ. स. च्या प्रारंभीं उज्जयिनीच्या आसपास जैन लोक असून नंतर त्यांचें मुख्य वसतिस्थान काठेवाड व गुजराथ बनून राहिलें. वल्लभीचा राजा ध्रुवसेन यानें जैन धर्मास बरीच मदत केली असावी. चावडा वंशाचा प्रस्थापक वनराज ह्याचा एक जैन धर्मगुरु होता. चालुक्य वंशाचे राजे हे जैन धर्मास बरेच अनुकूल असल्याचें दिसून येतें. त्यांतल्या त्यांत बाराव्या शतकांत राजा कुमारपाल यानें उघडपणें त्या धर्माचा स्वीकार प्रसिद्ध पंडित हेमचंद्र ह्याच्या उपदेशामुळें केला व त्याच्या कारकीर्दींत जैन धर्म बराच उन्नत स्थितीस पोहोंचला होता. त्यानंतर मुसलमान लोकांच्या स्वाऱ्यांमुळें उत्तर हिंदुस्थानांत देखील जैन धर्मास ओहोटी लागली व तो हल्लींच्या स्थितीस पोहोंचला आहे.

जैन धर्माची साहित्यसेवा देखील बरीच मोठी व नांवाजण्यासारखी आहे. जैनांचें बहुतेक प्राचीन वाङ्मय प्राकृत भाषांत असून त्यांची व्यापकताहि बरीच आहे. त्यांचे आगम ग्रंथ अर्धमागधी भाषेमध्यें लिहिले असून उपलब्ध स्थितींत त्यांमध्यें पंचेचाळीस निरनिराळ्या ग्रंथांचा समावेश होतो. त्यांमध्यें कित्येक फार प्राचीन व समजण्यास कठिण असून कित्येक अर्वाचीन कथात्मक आहेत. परंतु ह्या आगम ग्रंथांशिवायहि जैन ग्रंथकारांची वाङ्मयसेवा वाखाणण्याजोगी आढळून येते. त्यांच्यांत सिद्धसेन, दिवाकर व हरिभद्र यांसारखे प्रखर तर्कपंडित व जिनभद्रासारखे आगमास अधिक मान देणारे व व्याख्यानकुशल ग्रंथकार आहेत. हेमचंद्रासारखा सर्व कला व शास्त्रें यांत प्रावीण्य मिळविणारा ग्रंथकार विरळाच. कुंदकुंदासारखे लोकादरास पात्र झालेले ग्रंथकार व जिनसेनासारखे पुराणलेखकहि जैन धर्मांत होऊन गेले. कथा, पुराणें, नाटकें, काव्य, प्रबंध व इतर शास्त्रीय साहित्य यांत जैन लोकांचें प्रावीण्य दिसून येतें. जैन रामायण–महाभारत, कथाकोश, सामायिक पाठ, आत्मानुशासन, सुभाषितरत्नसंदोह, सागारधर्मामृत, इ. ग्रंथ याची साक्ष देतील. हें विविध साहित्य तितक्याच विविध भाषांमध्यें लिहिलेलें आढळून येतें. मध्ययुगांत जैन ग्रंथकार संस्कृत, महाराष्ट्री, शौरसेनी, अपभ्रंश, वगैरे भाषांचा उपयोग करीत असत.

हिंदी भाषेंत जैन वाङ्मय पुष्कळ आहे. मराठींतहि संस्कृत-प्राकृत ग्रंथांचीं भाषांतरें, चरित्रें व इतिहास निघाले आहेत. कानडी वाङ्मयांत तर जैनयुग निराळेंच आहे.

जैन धर्मांचीं मूलतत्त्वें कशीं व कोठून प्राप्त झालीं हे ठरविणें बरेंच कठीण आहे. त्याविषयीं दोन मतें प्रचलित आहेत. एकाप्रमाणें जैन धर्म हा आर्य धर्माचीच एक सुधारलेली व यज्ञयागादि क्रियाकांडास बाजूला सारून तयार केलेली आवृत्ति आहे, तर दुसऱ्या मताप्रमाणें हा धर्म हिंदुस्थानांतील आर्यपूर्वसंस्कृतीचाच एक अवशिष्ट भाग आर्य धर्माच्या तडाख्यांतून निभावून राहिला आहे असें मानतात.

जगांतील यच्चयावत् वस्तूंचा विचार व व्यवस्था हेंच तत्त्वज्ञानाचें मुख्य कार्य होय. त्याप्रमाणें जैन तत्त्वज्ञानानेंहि या व्यवस्थेकरितां प्रयत्न केला आहे. तत्त्वज्ञानाचा मुख्य प्रश्न म्हणजे हल्लींच्या हलाखीच्या स्थितींत असलेल्या जीवांस योग्य तो मार्ग दाखवून त्यांस शाश्वत सुखाप्रत पोंचविणें हा होय. याविषयीं जैन तत्त्ववेत्त्यांनीं आपला विचार सुव्यवस्थित मांडला आहे. प्रथमतः जीव हा आरंभापासून सुखादि गुणांनीं युक्त असा असून त्याचा जेव्हां अजीवाच्या एका विशिष्ट भागाशीं संबंध येतो तेव्हां त्यास आपणांस दिसून येणारी हलाखीची स्थिति प्राप्त होते. या विशिष्ट अशा पदार्थास कर्म हें नांव जैन तत्त्वज्ञानांत दिलेलें आहे.

जीव व अजीव यांचा संबंध प्रथमतः अनादि कालापासून असून त्याचें पुनरुज्जीवन जीवाच्या बऱ्यावाईट वागणुकीमुळें होतें. जीवाचे विकार ( कषाय ) व त्याच्या निरनिराळ्या क्रिया ह्यामुळें त्याच्यामध्यें कर्माचा प्रवेश होतो व त्याच्या मूळच्या गुणांचा लोप व विकृति होते. ह्या जीवप्रवेशास आश्रव म्हणतात. एकदां कर्म जीवास चिकटून बसलें म्हणजे त्यास 'बंध' म्हणतात. जैन धर्म–प्रस्थापकानें घालून दिलेल्या वागणुकीनें जेव्हां या कर्मांचा नाश होतो तेव्हां त्यास 'निर्जरा' म्हणतात व पुनरपि कर्म चिकटूं नये याविषयीं जेव्हां जीव स्वतःच्या विकारांचा व योगांचा ताबा घेतो तेव्हां त्यास 'संवर' म्हणतात. मोक्ष म्हणजे जीवाचें पुनः स्वाभाविक स्थितीस जाऊन पोहोंचणें होय.

ह्या संवर व निर्जरा तत्त्वांतच जैन धर्मांतील नीतिशास्त्राचा समावेश होतो. त्यांतील सर्वांत प्रमुख तत्त्व म्हणजे

अहिंसा हें होय. या तत्त्वावर त्यांनीं दिलेला भर पाहून कित्येकांच्या मतें हा धर्म ब्राह्मणधर्मांतील यज्ञयागांतील हिंसा थांबविण्यासाठींच केलेला प्रयत्न होय; व तें पुष्कळ अंशीं खरेंहि आहे. सत्य बोलणें, चोरी न करणें, शक्य तों बाह्य साधनांचा त्याग करणें व ब्रह्मचर्य पाळणें, वगैरे सर्वसामान्य तत्त्वांचाहि समावेश ह्यांत होतो. त्याशिवाय प्राचीन कालापासून जैन धर्मांत शारीरिक व मानसिक तपावर बराच भर दिला आहे. योगांतील ध्यान व समाधि, वगैरेहि गोष्टींचा त्यांच्या धर्मांत बराच प्रसार आहे.

इतर बाबतींत जैन धर्मांतील आचारविचार आर्य धर्मांतूनच प्रसवले असून त्यांच्यामध्यें थोड्याफार फरकाशिवाय विशेष कांहीं नाहीं. त्यांच्या पौराणिक गोष्टीहि ब्राह्मणधर्मांमधील गोष्टींवरून घेतल्या असून त्यांत किंचितसा फरक आढळून येतो. इतर शिल्पकला, वगैरे बाबतींत जैन धर्मानें हिंदुस्थानांतील प्राचीन संस्कृतींत बरीच भर पाडली आहे. एकंदरींत हिंदी संस्कृतींत या धर्माचें महत्त्व विचार करण्यासारखें आहे यांत संशय नाहीं.

१९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें पाहतां एकंदर हिंदुस्थानांत जैनांची संख्या १४,४९,२८६ असून सर्वांत जास्त संख्या राजपुतान्यांत (३,४१,७८८) आहे. त्याखालोखाल मुंबई प्रांत व पश्चिम हिंदुस्थान या भागांतून आहे.

**जैनेंद्र व्याकरण**—एक व्याकरणशाखा. जिनानें लहानपणींच इंद्राला याचें निरूपण केलें असें मानतात, म्हणून या व्याकरणाला दोघांचें नांव पडलें आहे. वस्तुतः हें व्याकरण देवनंदीनें लिहिलें आहे. या देवनंदीला पूज्यपाद असेंहि नांव आहे. तो दिगंबर जैन असल्यानें दिगंबर पंथाला या व्याकरणाचें मोठें भूषण वाटतें. प्रा. पाठक या व्याकरणाचा काल इ. स. ५ व्या शतकाचा उत्तरार्ध ठरवितात. यांत नवीन असें कांहींच नसून पाणिनी व वार्तिक यांचा हा गोषवारा म्हणतां येईल.

**जैमिनि**—हा व्यासाचा शिष्य होता. व्यासापाशीं यानें सामवेदाचें अध्ययन करून सामवेद लोकप्रिय करण्याचें कार्य केलें. तो स्वतः सामवेद शिकविण्याचें काम करीत असे. पण जैमिनीची खरी ख्याति पूर्वमीमांसामतस्थापक म्हणूनच आहे. खि. पू. शकापूर्वी या पूर्वमीमांसामताची प्राणप्रतिष्ठा जैमिनीनें केली. तत्पूर्वी सांख्य व योग या दोन मतांचें प्राबल्य होतें. त्यांहीं विसदृश असा हा तिसराच पंथ जैमिनीनें काढला.

पद्मपुराणांत जैमिनि व त्याचा संप्रदाय हा निरीश्वरवादी होता असें म्हटलें आहे. वास्तविक प्रकार त्याच्या उलट आहे. पूर्वमीमांसा हें दर्शन पूर्णपणें सेश्वरवादी आहे; पण वैदिक कर्माचें व यज्ञाचें महत्त्व काय हेंच या मीमांसासूत्रामध्यें आलें असल्याकारणानें व तात्त्विक आणि गहन विचारांचें यांत विवेचन नसल्यामुळें टीकाकारांची दिशाभूल झालेली आहे.

महाभारत व अश्वमेध लिहिणारा एक जैमिनि प्रसिद्ध आहे. त्याच्या कथा इतर पुराणांहून निराळ्या आहेत. हा जैमिनि खि. पू. पहिल्या शतकांतला असावा.

**जैमिनीकानडा**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. त्याचा आरोहावरोह सातहि स्वरांनीं होतो. म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय मध्यरात्रयुक्त मानितात. अडाणा रागापेक्षां त्यांत कानड्याचें अंग अधिक आहे. तथापि, अडाण्याप्रमाणें यांत तारस्थानाचा षड्ज प्रबल असतो. पूर्वांगांत सारंग रागाचें अंग ठेवावयाचें असतें, म्हणून गांधार स्वर वक्र करावा लागतो. हा एक यावनिक राग आहे.

**जोक्जाकर्ता**—ही डच ईस्ट इंडीजपैकीं जावा बेटाची रेसीडेन्सी आहे. प्रोगो व उपाक नद्यांच्यामधील भाग सोडून बाकी सर्व प्रदेश डोंगराळ आहे. क्षे. फ. १२०० चौ. मै. व लो. सं. १,३७,०००. येथें ऊंस, तांदूळ व नीळ यांची लागवड करतात. समुद्रकिनाऱ्यावर मीठ काढितात. कोळसा, संगमरवरी दगड व सोनें सांपडतें. येथील राजसत्ता सुलतान (डच सरकारचा मांडलिक) व पेकू आलम नांवाचा स्वतंत्र राजा यांजमध्यें विभागली आहे. येथील मुख्य शहरापासून बटेव्हिआ, समरांग, सुराकर्ता या ठिकाणीं उत्तम सांधे व आगगाडीचे रस्ते नेले आहेत. जोक्जाकर्ता या शहरांत रेसिडेंट, सुलतान व पेकू आलम राजा हे राहतात. सुराकर्ता व प्रम्बानन यांच्या सीमेजवळ व इतर ठिकाणीं हिंदु देवालयांच्या मोडक्या इमारती अद्यापि दिसतात.

**जोग, कृष्णाजी महादेव, (बाळाभाऊ)** (मृ. १९१०)—एक महाराष्ट्रीय नट. हे कोंकणांतील साखरवाडीचे राहणारे. इंग्रजी तीन इयत्तांपर्यंत शिक्षण झाल्यानंतर शाहूनगरवासी नाटक मंडळींत यांनीं प्रवेश केला. नाट्याचार्य गणपतराव जोशी यांचे हे सहकारी. यांच्याकडे स्त्रीभूमिका करण्याचें काम असून त्या बाबतींत त्यांनीं विलक्षण लौकिक संपादन केला होता. स्वराविर्भाव, अभिनय व कुलीनता हीं त्यांच्या कौशल्याचीं तीन अंगें होतीं. शरीराच्या सहजसौष्ठवाची देणगीहि यांना होती.

**जोग, विष्णुबुवा** (१८६४-१९२०)—एक मल्लविद्याविशारद, भागवतधर्मप्रचारक व धार्मिक ग्रंथकार. पुण्यांतील नगरकरांच्या तालमीचे वस्ताद पांडोबा यांचे हे बंधु होत. आपल्या बंधूंचे मल्लविद्येचे गुण यांच्यांतहि होते. तरुण असतांनाच अमृतानुभव, ज्ञानेश्वरी, वासुदेवमनन यांसारख्या ग्रंथांचें

अध्ययन यांनीं केलें. तरी त्यांच्या मनाला समाधान लाभेना. तेव्हां काशीस जाऊन तेथील श्रीकृष्णनंदस्वामींचें भाष्य यांनीं ऐकलें व आळंदीस श्रीज्ञानेश्वरमहाराजांजवळ अनुष्ठान केलें. तेव्हांपासून यांना शांति मिळाली. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथांवर यांची अलोट भक्ति असून यांवर त्यांनीं भाष्य व ग्रंथ-लेखन केलें. 'वारकरी शिक्षणसंस्था' या नांवानें वारकरी संप्रदायाचें शिक्षण देणारी संस्था यांनीं सुरू करून तीसाठीं यांनीं आर्थिक व शारीरिक श्रम खर्ची घातले. हरिपाठ (सार्थ), चांगदेवपासष्टी (सार्थ), अनुभवामृत (सार्थ), महिपतीनें निवडलेले ज्ञानेश्वरींतील वेंचे, वगैरे यांचे ग्रंथ आहेत.

**जोगा परमानंद**—हा ज्ञानेश्वराचा समकालीन संतकवि होता. याच्या ग्रंथाचें लेखन विसोबा खेचर करीत असे. हा बार्शी (सोलापूर जिल्हा)चा असून सूर्योपासक होता. नवलक्ष साळ्या असें याचें टोपण नांव होतें. याचें फुटकळ काव्य आढळलें आहे. याची समाधि बार्शीस असून तेथें मार्गशीर्ष व॥ ४ स उत्सव होतो.

**जोगिया**—हा राग भैरव थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य आहेत, व अवरोहांत गांधार वर्ज्य आहे; म्हणून याची जाति औडुव-षाडव आहे. याचा वादी स्वर षड्ज व संवादी मध्यम आहे. गानसमय प्रातःकाल उचित धरला आहे. या रागाच्या अवरोहांत पंचम अल्प ठेवितात. यांतील धैवत व मध्यम या स्वरांची संगति रक्तिदायक असते.

**जोगी**—या जातीची एकंदर लोकसंख्या अडीच लाखांवर आहे व ती हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व प्रदेशांत आढळते. कांहीं लोक मठ करून राहतात, व कांहीं फिरते असतात. यांचे कानफाटे व अवघड असे दोन वर्ग आहेत. कानफाटे गुरूकडून कान टोंचून त्यास १। रुपया दक्षिणा देतात व कानांत लांकडाच्या किंवा कांचेच्या बाळ्या घालतात. बाळी घालून कान दुभंगला तर तो मनुष्य निरुपयोगी झाला असें समजतात व त्यास जातीबाहेर टाकून त्याची समाधि देखील बांधीत नाहींत. प्रथम १२ वर्षें अवघड दीक्षा घेऊन मग त्यास कानफाटी दीक्षा देतात. कानफाट्यांतील मुख्यास दर्शनी म्हणतात. प्रथम सर्व क्षौर करून नंतर दीक्षा घेतात. अवघड लोक गळ्यांत काळ्या लोंकरीच्या दोऱ्यांत एक शिटी लटकावितात व सकाळीं, संध्याकाळीं व जेवण्यापूर्वी ती वाजवितात. तिला ते नाद किंवा पुंगी म्हणतात. हे द्वारका व बद्रीनारायण येथें जाऊन तप्त मुद्रा घेतात. बद्रीनारायणाहून तांब्याचें कडें व केदारनाथाहून लोखंडाचें कडें आणून दंडांत घालतात व पांढऱ्या दगडी मण्यांची माळ बलुचिस्तानांतल्या लासबेला संस्थानांतील हिंग्लज गांवाहून आणतात. हे आपलीं प्रेतें आसनमांडी घालून पुरतात व त्यावर समाधि बांधतात.

शिवरात्र हा यांचा मोठा सण आहे. नागपंचमीस हे नागाची पूजा करतात. अलीकडे यांपैकीं बऱ्याच लोकांनीं गृहस्थाश्रम पत्करला आहे, व आपली एक निराळी जातच बनविली आहे. तसेंच त्यांनीं निरनिराळे धंदेहि उचलले आहेत. कोणी मणिहारी म्हणजे फुटकळ विक्री करणारे आहेत, कोणी पाटविना म्हणजे तागाचे दोरे वळणारे आहेत, तर कोणी लंडैयामार म्हणजे कोल्हे मारुन त्यांचें मांस विकणारे आहेत. यांची खालच्या वर्गांत गणना आहे. कानफाटे पाहा.

सामान्य अर्थी जोगी म्हणजे फकीर वृत्तीचे लोक, असें मानण्यांत येतें. यांचे किती तरी भेद आहेत. उदा.—अघोरपंथ, अघोरमार्गी, अयाचित, अरण्य, अवघडपंथ, अवधूत अथवा दत्तात्रय अवधूत, आश्रम, इंद्र, कालबेला, खरखरमुंडा, खाकी, गोसावी, जती, जोगी, डफगाण डोईफोड्या, त्रिदंडी, दंडी, दंडीगाण, दिंडीगाण, दावल्मलीक, दिगंबर, नागडगोसावी, नाथपंथी, पांगूळ, पुरी, बाळसंतोष, बैरागी, भुत्या, भैरवजोगी, मेंडजोगी, वन, वासुदेव, शेवडा, संत, आनंद, उदाशी, कानफाट्या, गिरीपुरी, वन, मराडी, भारती, हंस, इ.

**जोगेश्वरी**—(सं. योगेश्वरी). ही देवता पार्वतीचेंच एक स्वरूप असून शिवस्वरूप काळभैरव याबरोबर जोगेश्वरीचा नामोच्चार होत असतो. जंजिरा संस्थानांत (हरि) हरेश्वर गांवीं काळभैरव-जोगेश्वरी देवस्थान आहे. देशावर हैद्राबाद संस्थानांत बीड जिल्ह्यांत अंबा-जोगाईचें प्रसिद्ध स्थान आहे. ही कांहीं ब्राह्मण जातींची कुलदेवता आहे. पुण्यांत तांबडी, काळी व पिवळी अशा तीन जोगेश्वरी ग्रामदेवता आहेत.

**जोगेश्वरी**—मुंबई इलाखा, ठाणें जिल्हा, साष्टी तालुका, एक लेणें. हें बी. बी. सी. आय्. रेल्वेच्या जोगेश्वरी स्टेशनच्या आग्नेयीस अर्ध्या मैलावर आहे. हे लेणें सातव्या शतकांतील आहे. पुढील भागीं २० फूट उंच व १८ फूट रुंद अशी मोठी कमान दिसते; तिच्या दोहों बाजूंला दालनें आहेत. त्यांत शिवमूर्ती कोरलेल्या आहेत. कमानींतून समोर गेल्यावर जें दालन लागतें तो लेण्याचा मुख्य भाग होय. भोंवतालीं खांब आहेत.

**जोडणीकाम**—(वेल्डिंग). निरनिराळ्या धातू त्यांच्या पावळ होण्याच्या परिस्थितीपर्यंत आणून त्या ठोकून तशाच एके ठिकाणीं जोडणें यालाच 'वेल्डिंग' किंवा जोडणीकाम असें नांव आहे. लोहार लोखंडाचे तुकडे पांढरे होईपर्यंत तापवून ठोकून एक करतो. तथापि हल्लीं गॅसच्या बत्तीनें अगर विजेनें निर्माण होणारी आग किंवा अतिशय मोठा विजेचा प्रवाह सोडल्यामुळें जी उष्णता

निर्माण होते तिचाहि उपयोग जोडणीमध्यें केला जातो. गॅस जळण्याला लागणारी हवा किंवा प्राणवायु हीं जर सारखीं असतील तर त्या वेळेस अतिशय उष्णता तेथें असूं शकते; व तीमध्यें सर्व धातू वितळूं शकतात. हीच योजना 'गॅस वेल्डिंग'मध्यें असते. तेथें एका टॉर्चमधून एका तोंडानें हवा व गॅस आंत येत असतात व ते पेटविले असतांना एक ज्योत उत्पन्न होते. गॅस व हवा यांचें योग्य किंवा हवें तसें मिश्रण करतां यावें, अशीहि योजना असते. जेव्हां दोन तुकडे जोडावयाचे असतील तेव्हां त्या दोन तुकड्यांच्या टोंकांवर गॅसची ज्योत सोडून ते वितळवितात. याच वेळेस त्याच जातीची एक सळई त्याच ज्योतींत तापत असते. या सळईचा रस या सांध्यावर पडून ते दोनहि एकमेकांत मिळून एकजीव होतात. गॅसच्या याच ज्योतीचा उपयोग धातूचे तुकडे पाडण्यासाठीं करतात. त्या वेळेस धातु वितळत असतां तीवर हवेचा झोत सोडला जातो, यामुळें वितळलेली धातु बाजूला पडून तुकडा पडतो. विजेनें जेव्हां वेल्डिंग करावयाचें असतें, त्या वेळेस विजेच्या दोन तारांपैकीं एक तार ज्या दोन वस्तू जोडावयाच्या असतील त्यांना जोडलेली असते व दुसरी तार त्याच धातूच्या सळईला जोडलेली असते. वेल्डिंग करावयाच्या वेळेस ही सळई त्या त्या जोडणी करण्याच्या जागेच्या धातूंना स्पर्श करून वर अगदीं थोडी उचलली जाते. येथें विजेचा प्रवाह इकडून तिकडे जातांना 'आर्क' अगर ज्योत उत्पन्न होते. तिच्याएवढी प्रखर उष्णता दुसरी कसलीहि असत नाहीं. त्यामुळें धातूंचा सांधा व सळई हीं दोन्ही वितळून जात असतात. वितळत्या सळईनें सांध्यावर लेप केला जातो व तो तेथें घट्ट बसतो. यालाच विद्युत् जोडणी (इलेक्ट्रिक वेल्डिंग) म्हणतात. मोठ्या प्रवाहाच्या योगानें वेल्डिंगमध्यें जे दोन तुकडे सांधावयाचे असतील ते एकमेकांजवळ आणून जोरानें दाबून त्यावर विजेचा फार मोठा प्रवाह सोडला जातो. त्यामुळें सांधा अतिशय तापून वितळण्याच्या परिस्थितींत येतो. या वेळेस जोराचा दाब दिल्यास दोनहि भाग एकमेकांत मिसळून एकरूप होतात.

**जोडी**— देशी मेहनतीच्या प्रकारांत जोडीची मेहनत जास्त प्रचलित आहे. जुन्या तऱ्हेच्या प्रत्येक व्यायामशाळेंत ही मेहनत करतात. दंड व बैठकीची मेहनत करतांना मध्यंतरीं ही मेहनत करण्याचा रिवाज आहे. दंड काढल्यामुळें हातांचे स्नायू भारावतात व दम लागतो. अशा वेळीं जड जोड्या फिरविल्यानें हाताचे स्नायू मोकळे होतात व लागलेला दम कमी होतो. नंतर बैठका मारून पुनः दंड काढतात. मेहनत करणाऱ्याच्या वयाच्या व शक्तीच्या मानानें जोड्या लहान-मोठ्या वापराव्या. पुष्कळ मंडळी आपल्या घरीं मेहनत करण्यासाठीं एखादी आपल्या बेताची जोडी घरीं ठेवतात. या मेहनतीनें हातांच्या, पाठीच्या व छातीच्या स्नायूंस चांगली मेहनत होते. शिवाय पायांसहि थोडीशी मेहनत होते.

**जोतिबाचा डोंगर**—मुंबई इलाखा, कोल्हापूर संस्थान. यास 'वाडी रत्नागिरी' असें एक नांव आहे. कोल्हापूर शहराच्या वायव्येस ९ मैलांवर पायथ्यापासून १,००० फूट उंचीचा हा एक डोंगर आहे. डोंगरावर दीड-दोन हजार लोकवस्तीचें एक खेडें आहे. खेड्याच्या मध्यभागीं केदारलिंग, केदारेश्वर आणि रामलिंग अशीं तीन जोतिबाचीं देवळें आहेत. पूर्वीचें देऊळ कोणीं नावजी सय यानें बांधलें असें म्हणतात. त्याच्या जागीं हल्लींचें असलेलें देऊळ राणोजी शिंदे यानें १७३० मध्यें बांधलें. केदारेश्वराचें दुसरें देऊळ १८०८ सालीं दौलतराव शिंदे यानें बांधलें व रामलिंगाचें देऊळ १७८० सालीं मालजी पन्हाळकर यानें बांधलें. या देवळाजवळ चोपदाईचें देऊळ असून गांवाबाहेर असलेलें यमाईचें देऊळ राणोजी शिंदे यानें बांधलेलें आहे. यमाईच्या देवळासमोर दोन तीर्थें असून त्यांपैकीं एक इ. स. १७४३ च्या सुमारास कोल्हापूरची राणी जिजाबाई हिनें बांधलें व दुसरें राणोजी शिंदे यानें बांधलें. जोतिबानें रत्नासुर नामक राक्षसाचा नाश केला म्हणून वाडीस रत्नागिरी असें नांव पडलें. चैत्री पौर्णिमेस या विजयाप्रीत्यर्थ दरवर्षी मोठी जत्रा भरते.

**जोत्याजी केसरकर**—संभाजीचा एक स्वामिभक्त सेवक. हा कोल्हापूर प्रांतांतील पुंजाळ गांवचा पाटील असून नेहमीं संभाजीच्या निकट असे. संभाजीच्या मृत्यूनंतर येसूबाईजवळ ती शाहूसह औरंगजेबाच्या कैदेंत असतांना हाच भरंवशाचा मनुष्य राहिला होता. याच्यामार्फत येसूबाई व शाहू हे राजारामाशीं पत्रव्यवहार करीत असत. शाहूचें लग्न करण्यांत (औरंगजेबाच्या कैदेंत) यानेंच पुढाकार घेतला होता. पुढें शाहू गादीवर आल्यानंतर त्यानें याला आपल्या सरदेशमुखीच्या कारभारावर मुख्य अधिकारी नेमिलें.

**जोधपुर संस्थान**—यास मारवाड असेंहि नांव असून हें राजपुतान्यांतील सर्वांत मोठें संस्थान आहे. याचें क्षे. फ. ३६,१२० चौ. मै. व लो. सं. २५,५५,९०४ आहे. संस्थानचें उत्पन्न २ कोटी १८ लक्षांचें आहे. या संस्थानचा बहुतेक सर्व प्रदेश ओसाड आणि वालुकामय आहे. अरवली डोंगराच्या आसपास म्हणजे संस्थानच्या ईशान्येस, पूर्वेस व आग्नेयीस कांहीं सुपीक जमीन आहे. उत्तर व वायव्य यांकडील भाग ओसाड व वालुकामय असून त्यास 'थळ' असें म्हणतात. या भागांत २००–३०० फूट खोल खणावें तेव्हां पाणी लागतें.

येथील हवा पावसाळ्यांत देखील कोरडी असते. उन्हाळ्यांत

उन्हाळा अति कडक असतो. रोगराई विशेषशी नसते. पाव-साची दरवर्षाची सरासरी १३ इंच आहे.

येथील राज्यकर्ते सोमवंशी राठोड जातीचे असून त्यांना महाराजाधिराज अशी पदवी आहे. स. ११९४ सालीं कनोजचा राजा जयचंद राठोड हा गंगेंत बुडून मरण पावला. नंतर १८ वर्षांनीं त्याचे दोन नातू शिवाजी व सैत्रम् मारवाडांत आले. तेथें त्यांनीं लहानसें राज्य स्थापिलें. शिवाजीच्या वंशजांनीं राज्याची मर्यादा पुष्कळ वाढविली. विरमदेव म्हणून एक पराक्रमी राजा झाला. त्याचा मुलगा चांद हा १४०२ मध्यें नागोर येथें मारला गेला. त्याचा मुलगा राव रणमल्ल हा मेवाडच्या लाखा राण्याचा दोस्त होता. लाखा मेल्यावर मेवाडचें राज्य आपल्या राज्यास जोडण्याची रणमल्लास इच्छा झाली. त्याची बहीण लाखा राण्यास दिली होती. परंतु राणा मुकुलजीचा भाऊ चंद्र ह्यानें रणमल्लाला ठार मारिलें आणि सर्व कुटुंबाचा नाश केला. रणमल्लाचा मुलगा जोधसिंग मात्र सुटून गेला. यानें महाप्रयासानें राठोड वंश तारिला. स. १४५९ त त्यानें जोधपुर शहराची स्थापना केली. तेंच शहर हल्लींच्या राजांची राजधानी आहे. जोधसिंह १४८९ त मरण पावला. त्याचा पुत्र सुरजमल्ल ह्यानें २७ वर्षें राज्य केलें. त्याच्यानंतर त्याचा नातू गंग हा राजा झाला. गंग १५३२ त मरण पावला. त्याचा मुलगा मालदेव हा राजकारस्थानी व धूर्त होता. मालदेवाकडे हुमायून बादशहा आश्रयास आला असतां त्यानें त्यास शत्रूप्रमाणें वागविलें. या अपराधाचें पूर्ण प्रायश्चित्त त्यास भोगावें लागलें. अकबर दिल्लीच्या तख्तावर आला. त्यानें १५६१ त मारवाडवर स्वारी केली. आणि मालदेवाचें बहुतेक राज्य दुसऱ्या इसमास दिलें. त्याचा मुलगा उदयसिंग यानें अकबराचें प्राबल्य जाणून मोंगलांचें स्वामित्व कबूल केलें. आपली बहीण जोधबाई अकबरास दिली. आणि बहुतेक मुलूख अकबरापासून परत मिळविला. उदयसिंग १५९५ त मरण पावल्यावर त्याचा मुलगा सूरसिंग गादीवर आला. तो १६२० त मरण पावला. त्याच्यानंतर त्याचा पुत्र गजसिंह जोधपूरचा राजा झाला. गुजराथेंत लढत असतां स. १६३८ त गजसिंह मारला गेला. गजसिंहानंतर त्याचा मुलगा जसवंतसिंह गादीवर आला. शहाजहानच्या मुलांत तंटे लागले, तेव्हां जसवंतसिंहानें दाराचा पक्ष घेतला. पण त्याचा पराजय झाला. तरी जसवंतसिंहासारख्या पराक्रमी सरदारास दुखवणें औरंगजेबास हितकर वाटलें नाहीं. त्यास त्यानें जवळ बोलावून सन्मानानें वागविलें. पण पुनरपि तो दारा व सुजा यांस मिळाला; आणि पराभव पावून जोधपुरास गेला. परंतु औरंगजेबानें त्यास माफी करून आपला पुत्र मोअज्ज़म ह्याजबरोबर दक्षिणेंत शिवाजीवर पाठविलें. तेथेंहि त्याचें विश्वासघातकी वर्तन दृष्टीस पडल्यावर त्यास काबूलच्या सुभ्यावर पाठविलें. आणि इकडे त्याच्या कुटुंबाचा औरंगजेबानें कपटानें व दुष्टपणें घात केला. त्या दुःखानें शेवटीं काबुलांत हा शूर राजा मरण पावला (स. १६७८). जसवंतसिंह पाहा.

जसवंतसिंहाचा बालपुत्र अजितसिंह जोधपूरचा राजा झाला. औरंगजेब मरण पावल्यावर त्यानें आपलें गेलेलें सर्व राज्य परत मिळवलें व बापाची जी वाताहत बादशहानें केली, तिचा भरपूर सूड घेतला. तो १७३१ त आपल्या दुष्ट पुत्राच्या हस्तें मारला गेला. हा पुत्र अभयसिंह होय. अभयसिंह सन १७५० त मरण पावला व त्याचा पुत्र रामसिंह गादीवर बसला. रामसिंहानें चुलता बख्तसिंह यास वाईट रीतीनें वागविल्यामुळें बख्तसिंहानें त्याचें राज्य घेतलें. तीन वर्षांनीं विषप्रयोगानें बख्तसिंह मरण पावला (१७५३). त्याचा पुत्र विजयसिंह गादीवर बसला. पण रामसिंहानें त्याच्याशीं लढून आपलें राज्य परत मिळविलें. ह्या दोघांच्या तंट्यांत मराठ्यांचा जोधपुरांत शिरकाव झाला. त्या भानगडींत जयाप्पा शिंद्याचा खून झाला. त्यामुळें मराठी फौजा चवताळून उठल्या. त्यांनीं जोधपूरच्या राज्याची वाट लाविली. रामसिंह जयपुरास स. १७७३ त मरण पावला. नंतर विजयसिंह गादीवर बसला. विजयसिंह नामधारी राजा होता. सर्व सत्ता मराठ्यांच्या ताब्यांत होती. त्यानें मराठ्यांच्या पाडावाची बरीच खटपट केली तरी तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. विजयसिंह १७९३ त मरण पावला. त्याचा पुत्र भीमसिंह इतर भावांस ठार मारून गादीवर बसला. पण दहा वर्षें झगडून आपलें राज्य घालविलें. स. १८०३ त तो मरण पावल्यानंतर त्याचा पुतण्या राजा मानसिंह यानें उदेपूरची राजकन्या कृष्णकुमारी हिची प्राप्ति करून घेण्याकरितां जयपूरच्या जगत्सिंहाबरोबर युद्ध केलें. स. १८१८ त मानसिंहाचा मुलगा चतुरसिंह ह्याजबरोबर इंग्रजांनीं तैनाती फौजेचा तह केला. पुढें १८३९ त इंग्रजांनीं जोधपूरच्या मुलखांत शिरून शांतता स्थापन केली.

नंतर तख्तसिंह नामक एका दूरच्या वंशजास इंग्रजांनीं जोधपूरच्या गादीवर बसविलें. १८७३ त तख्तसिंह मरण पावल्यावर त्याचा मुलगा जसवंतसिंह गादीवर बसला. ता १८९५ त वारल्यावर त्याचा मुलगा सरदारसिंह गादीवर आला. तो सन १९११ मध्यें मरण पावल्यावर त्याचा वडील मुलगा सुमेरसिंह गादीवर बसला. तो १९३८ त मरण पावला. तेव्हां त्याचा धाकटा भाऊ सध्यांचे महाराजा उमेदसिंह १९१८ सालीं गादीवर बसले. त्यांना व्हाइस मार्शल (एअर) ही पदवी आहे. हें संस्थान आतां बृहद्राजस्थान संघांत सामील झालें आहे.

या संस्थानांत शें. ८६ वस्ती हिंदूंची आहे. येथें मुख्यत्वें-

करून मारवाडी भाषा बोलतात. बाजरी, ज्वारी, मठ, मका, तीळ आणि कापूस हीं मुख्य पिकें होत. या प्रदेशांत मीठ बरेंच सांपडतें. सांभर तलावाजवळ मक्राण येथें संगमरवरी दगड सांपडतो. संस्थानांतून मीठ, जनावरें, कातडीं, हाडें, लोंकर, कापूस, गळिताचीं धान्यें, संगमरवरी दगड, कुरुंदाचा दगड, वगैरे बाहेर जातात. मारवाडी घोडे राजपुतान्यांत प्रख्यात आहेत.

शहर—संस्थानची राजधानी. १४५९ सालीं राव जोधान यानें हें शहर वसविलें. जुन्या शहराभोंवतीं तट असून त्यास चार वेशी आहेत. राजपुतान्यांतील सर्व किल्ल्यांत हा किल्ला प्रेक्षणीय आहे. किल्ल्यांतील मोतीमहाल, फत्तेमहाल, वगैरे इमारती पाहण्यासारख्या आहेत. जसवंत कॉलेज, दरबार हाय-स्कूल, रजपूत स्कूल व ह्युसन गर्ल्स स्कूल या मुख्य शिक्षणसंस्था आहेत. लो. सं. १,२६,८४२.

**जोधबाई**— अकबराची एक रजपूत राणी. ही जोधपुर (मारवाड)चा मालदेव याची मुलगी. हिचा भाऊ उदयसिंह यानें हिला अकबरास दिली. हिचें माहेरचें नांव जगद्घोषिणी ऊर्फ बालमती होतें. ही जोधपुरच्या राजघराण्यांतील असल्यानें हिला जोधबाई असें टोपण नांव मिळालें. अकबराचें तिच्यावर फार प्रेम होतें. त्यानें आग्र्यास तिच्यासाठीं एक स्वतंत्र महाल बांधला होता. अकबराच्या मरणानंतर, जहांगिराच्या कारकीर्दीत हिनें आग्रा येथें विष खाऊन आत्महत्या केली (१६१९). तिनें सोहागपुर नांवाचें एक गांव वसवून तेथें वाडा बांधविला होता. याच गांवीं तिचें दफन झालें.

वीलचा चरित्रकोश व ऐन-इ-अकबरी यांत असें लिहिलें आहे कीं, ही अकबराची बेगम नसून मिर्झा सेलीम (जहांगीर) याची बेगम होती व ती मालदेवाची मुलगी नसून उदय-सिंहाची होती. हिचें लग्न स. १५८५ त झालें. शहाजहान बादशहा हा हिचाच मुलगा. तो हिला लाहोर येथें १५९२ सालीं झाला. बहुधा नूरजहानच्या सवतीमत्सरामुळें हिनें आत्म-हत्या केली असावी. यावरून जोधपुरच्या दोन राजकन्या जोधबाई नांवानें होऊन गेल्या असाव्यात (एक अकबराची व दुसरी सेलीमची राणी) असें वाटतें.

**जोन ऑफ आर्क** (१४११–१४३१)—फ्रान्सच्या इतिहासांतील एक अद्वितीय शूर स्त्री. हिला रोमी असेंहि म्हणत. लहानपणापासून आईच्या धार्मिक शिकवणीमुळें तिच्या अंगीं धर्माभिमान व राष्ट्राभिमान तीव्र स्वरूपांत जागृत झाला होता. हिच्या अंगीं सामर्थ्यहि असामान्य होतें. अनेक साम र्थ्याचीं कामें करून तिनें आसपासच्या लोकांना थक्क करून सोडलें होतें; पण त्यायोगें तिचें अंतःकरण कठोर न बनतां उलट अत्यंत हळुवार झालें होतें. गरिबांसाठीं तिचा जीव तिळातिळ तुटत असे. आपलें जीवितसर्वस्व धर्मासाठीं व राष्ट्रासाठीं अर्पण करण्याचा तिनें संकल्प केला व विवाहादि मोहांत न पडण्याचें ठरविलें. यामुळें तिच्यावर अनुरक्त असलेल्या अनेक तरुणांची निराशा झाली.

या वेळीं फ्रान्सचा बराच भाग बर्गंडीच्या ड्यूकच्या साहाय्यानें इंग्लंडास मिळाला होता व जो उरला होता तोहि इंग्लंडच्या ६ व्या हेन्रीस फ्रान्सचा राजा ठरवून मिळवून देण्याचा प्रयत्न चालला होता. या वेळीं फ्रान्समध्यें बाजारबुणगे, पळपुटे व खुपमस्करी यांचा सुळसुळाट झालेला होता. यामुळें त्या देशाचें स्वातंत्र्य नष्टप्राय होऊं लागलें होतें. अशांत राष्ट्रांत बेकी व परस्पर अविश्वास माजून फ्रान्स देश पारतंत्र्यांत पडतो कीं काय अशी भीति उत्पन्न झाली होती. पण जोन ऑफ आर्कनें आपल्या असामान्य विभूतिमत्त्वानें फ्रेंचांतील क्षात्रतेज पुनरुद्दीपित केलें व फ्रान्सचें स्वातंत्र्य राखलें.

"तुम्ही स्वातंत्र्यप्राप्तीच्या मार्गास लागा. ईश्वर तुमचा पाठीराखा आहे", असा निरोप तिनें फ्रेंच राजपुत्रास पाठविला; पण त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. इतक्यांत इंग्र-जांनीं ऑर्लीन्सला वेढा दिला; तेव्हां तिनें फ्रेंच गव्हर्नरला असें कळविलें कीं, "आर्लीन्स शहर इंग्लिशांच्या ताब्यांतून सोडवून युवराजास र्‍हीम्स येथें राज्याभिषेक करण्याबद्दल मला ईश्वरी आज्ञा झाली आहे." तिच्या या उत्तेजनपर शब्दांनीं गव्हर्नरच्या अंतःकरणांतहि राष्ट्राभिमान जागृत झाला व त्यानें ताबडतोब तिच्याकडे सहा हजार सैनिक पाठवून तिला युवराजा-कडे जाण्यास परवानगी दिली. युवराजानें प्रथम तिची भेट घेण्याचें नाकारलें. पण तिच्याबरोबर आलेलें सैन्यच राष्ट्राभि-मानानें इतकें प्रेरित झालें होतें कीं, त्यास जोनची गांठ घेणें भाग पडलें. भेट झाल्यावर अनेक गोष्टींचा खुलासा झाला व युवराजाचें मन बदललें. त्यानें मग आणखी एक हजार सैन्य तिला दिलें. या सैन्यानिशीं इंग्रजांवर चाल करून तिनें त्यांच्या फौजेची दाणादाण उडविली (इ. स. १४२९). इंग्रजांना वेढा उठवून पळ काढावा लागला. यानंतर अवघ्या एका आठवड्याच्या आंतच तिनें इंग्रजांनीं पूर्वीं घेतलेलीं ठिकाणें एकामागून एक परत घेण्यास सुरुवात केली. एवढा जय मिळ-विल्यावर तिनें युवराजास र्‍हीम्स येथें राज्याभिषेक करविला.

येथपर्यंत जोनच्या यशाची चढती कमान होती. येथून पुढें तिच्या दुर्दैवास सुरुवात झाली. पूर्वीं गेलेले आणखी देश परत मिळवून देण्यासाठीं तिनें युद्ध चालविलें असतां ती बर्गंडीच्या ड्यूकच्या हातांत सांपडली. त्यानें तिला इंग्रजांना विकलें. पुढें इंग्रजांनीं इन्क्विझिशनमार्फत तिची चौकशी करविली व तीं

तिच्यावर पाखंडीपणाचा व चेटकीपणाचा आरोप ठेवण्यांत येऊन तिला मृत्यूची शिक्षा देण्यांत आली. ही शिक्षा क्षमेच्या याचनेवरून तिला माफ करण्यांत आली होती. पण पुनः कांहीं कारणांवरून ती माफी रद्द करण्यांत येऊन इ. स. १४३१ मे ३० रोजीं तिला भर रस्त्यांत जिवंत जाळण्यांत आलें.

आज फ्रेंच लोक तिला स्वातंत्र्यदेवता म्हणून मान देतात.

**जोन्स, इनिगो** (१५७३–१६५२)–एक ब्रिटिश शिल्पकार. त्याला बेन जॉन्सननें लिहिलेल्या छद्मवेष नाटकांच्या (मास्क) प्रयोगाकरितां पात्रांचे पोषाख आणि नाटकांतले देखावे तयार करण्याच्या कामावर नेमला होता. परंतु नाटककार बेन जॉन्सन आणि शिल्पकार जोन्स यांना सलोख्यानें एकत्र काम करतां येईना व त्यांचे वारंवार तंटे होऊं लागले. १६१० मध्यें हेन्री, प्रिन्स ऑफ वेल्स याच्याकडे जोन्सला, 'सर्व्हेयर ऑफ वर्क्स' या जागेवर नेमण्यांत आलें आणि १६१५ मध्यें तो सर्व्हेयर-जनरल झाला. त्यानें विंकन्स इन् चॅपेल आणि व्हाइट हॉलमधील बँक्वेटिंग हाउस (भोजनगृह) वगैरे अनेक सुप्रसिद्ध इमारतींचे नमुना-नकाशे तयार केले. सेन्टपॉल देवालयाचा जीर्णोद्धार करण्याच्या कामींहि त्यानें प्रमुख भाग घेतला होता.

**जोन्स, सर विल्यम्** (१७४६–१७९४)— एक नामांकित ब्रिटिश प्राच्यभाषापंडित व कायदेपंडित. याचें लहानपणचें शिक्षण हॅरो स्कूलमध्यें झालें. लहानपणापासून त्याला उत्कृष्ट स्मरणशक्तीची देणगी होती. १७६४ सालीं ऑक्सफर्ड कॉलेजांत त्यानें पदार्पण केलें. इ. स. १७६७ मध्यें प्राच्य काव्य-वाङ्मयावर चर्चात्मक लेख लिहिण्यास त्यानें सुरुवात केली. १७७० सालापासून त्यानें काव्याबरोबर कायद्याचाहि अभ्यास करून इ. स. १७७४ मध्यें वकिलीचीहि सनद काढली. इ. स. १७७२ मध्यें प्राच्य काव्यावर त्यानें एक उत्कृष्ट निबंध लिहून प्रसिद्ध केला. इ. स. १७७६ सालीं ग्रीक भाषेचा अभ्यास करून त्यानें इसीउस् या ग्रीक पंडिताच्या संभाषणांचें भाषांतर केलें. इ. स. १७८०–८१ या एका वर्षांतच त्यानें अरबस्तानांतील दहा नामांकित काव्यें भाषांतरित केलीं.

वाङ्मयक्षेत्राप्रमाणें कायद्याच्या क्षेत्रांतहि जोन्सनें यश संपादन केलें होतें. जामीनकीच्या कायद्यावर त्यानें एक चांगलासा निबंध लिहिला होता. इ. स. १७८३ मध्यें त्यास हिंदुस्थानांत फोर्ट विल्यम येथें श्रेष्ठ न्यायाधिशाची जागा मिळाली व नाइट हा किताबहि मिळाला. हिंदुस्थानांत आल्यावर (१७८३) नोकरींतून जो वेळ शिल्लक उरे तो त्यानें वाङ्मयाच्या व शास्त्रांच्या अध्ययनांत घालविला. इकडे त्यानें संस्कृतचाहि अभ्यास सुरू केला. संस्कृत भाषेसंबंधीं त्याचें फार चांगलें मत होतें. संस्कृत भाषा ग्रीक, लॅटिन अगर दुसऱ्या कोणत्याहि प्राचीन भाषेपेक्षां अधिक पूर्णत्वास पावली आहे असें त्याचें मत असे.

यानंतर त्यानें 'आशिया खंडांतील संशोधन' (एशियाटिक रीसर्चेस) या ग्रंथाचा पहिला भाग प्रसिद्ध केला. कालिदासाच्या शाकुंतल नाटकाचें व मनुस्मृतीचें भाषांतर केलें. प्राचीन भारतीय संस्कृतीचा योग्य तऱ्हेनें अभ्यास केलेले जे युरोपियन पंडित होऊन गेले त्यांत जोन्सला महत्त्वाचें स्थान दिलें पाहिजे. हिंदु संस्कृतीचा त्याच्या मनावर मोठा परिणाम घडला असून हिंदूंच्या एकंदर तत्त्वज्ञानाचा तो चहाता होता. संस्कृत वाङ्मयासंबंधीं तर त्यास अतिशय प्रेम व आपुलकी वाटे.

**जोन्स, हेन्री आर्थर** (१८५१–१९२९)—एक इंग्रज नाटककार. त्यानें 'दि सिल्व्हर किंग' हें अद्भुतरसप्रधान नाटक (मेलो ड्रामा) लिहिलें व लोकांचें लक्ष वेधलें. त्यानंतर त्यानें— 'सेन्ट्स ॲन्ड सिनर्स'; 'दि केस ऑफ रिबेलियस सुसन'; 'दि लायर्स'; 'मिसेस् डेन्स डिफेन्स' इ. नाटकें लिहिलीं. शिवाय त्यानें नाट्यकला आणि रंगभूमि यांवर ग्रंथ लिहिले आहेत. याच्या मुलीनें याचें चरित्र लिहिलें आहे.

**जोबत संस्थान**—मध्य हिंदुस्थान, एक सनदी संस्थान. क्षे. फ. १३१ चौ. मै.. हें संस्थान विंध्याद्रि पर्वतांत वसलें असून बहुतेक भागांत दाट जंगल आहे. सरासरी ३० इंच पाऊस या भागांत पडतो. संस्थान आतां मध्य भारत संघांत सामील झालें आहे.

पंधराव्या शतकांत अली-राजपूर राज्याचा संस्थापक आनंददेव याचा पणतू केसरदेव याच्याकडे हा भाग प्रथम आला असावा. ब्रिटिशांची सत्ता प्रस्थापित झाल्यावर हा भाग राणा सबळसिंगाच्या ताब्यांत आला. जोबतच्या संस्थानिकांना राणा ही पदवी आहे. येथील लोकसंख्या (१९४१) २०,९४५ असून येथें भिल्ल आणि भिलाल या वन्य जातींची वस्ती शेंकडा ८६ आहे. संस्थानचें एकंदर सालिना उत्पन्न सु. पाऊण लाख रु. आहे.

गांव—संस्थानांतील मुख्य शहर. बी. बी. सी. आय्. रेल्वेच्या रतलाम–गोध्रा शाखेच्या दोहद स्टेशनापासून हा गांव सुमारें ४० मैलांवर आहे. या गांवीं संस्थानिक राहतात. याच्या दक्षिणेस दोन मैलांवर घोर नांवाचें १,१५४ लोकवस्तीचें गांव असून तेथें संस्थानचा सर्व कारभार चालतो. घोर व जोबत हीं दोन मुख्य ठिकाणें असल्यावरून येथील लोक या संस्थानास घोर-जोबत असेंहि म्हणतात.

**जोरेस, जीन लिऑं** (१८५९–१९१४)—एक फ्रेंच समाजशास्त्रवेत्ता. फ्रेंच कायदेमंडळाचा हा लोकनियुक्त सभासद झाला होता. तो सोशॅलिस्ट पक्षाचा मुख्य पार्लमेंटरी पुढारी

असे. त्याच्या प्रो-ड्रेफ्यूज चळवळीमुळें त्याला फ्रान्समध्यें पुष्कळ शत्रू निर्माण झाले. आणि जेव्हां त्यानें आंतरराष्ट्रीय शांतता व आरमाराची छाटाछाट यांचा पुरस्कार करून तीन वर्षे लष्करी नोकरीच्या बिलाला विरोध केला, त्या वेळीं लोकमत त्याच्या विरुद्ध फारच खवळलें. त्यामुळें पहिलें महायुद्ध युरोपांत सुरू होण्याच्या सुमारास जोरेसचा खून करण्यांत आला. 'ल ह्यूमानिते' (मानवता) या नियतकालिकाचा तो व ब्रिआंद संपादक होते.

**जोशी**—१. गांवगाड्यांत अनेक हक्कदारांपैकीं ग्रामजोशी हा एक हक्कदार फार पूर्वीपासून आहे. याचें काम पंचांग पाहून गांवांतील लोकांस तिथि सांगणें, लग्नाचे व मुंजीचे व इतर धार्मिक कृत्यासाठीं मुहूर्त काढून देणें, जन्मलेल्या मुलांचीं नांवें ठेवणें, वगैरे असे. या कामासाठीं गांवांतून त्याला जी मिळकत मिळे, तिचें स्वरूप पुढीलप्रमाणें असे: प्रत्येक शेतकऱ्याकडून धान्यकापणीच्या वेळीं नियमित धान्य; गुढी पाडवा, दिवाळी, होळी, वगैरे सणांच्या प्रसंगीं दर घरांतून साधारण एक पैसा; सरकारांतून जोसकीच्या वृत्तीबद्दल इनाम जमीन. शिवाय सणावारी नक्त रक्कम थोडीफार मिळे. लग्नमुंजीच्या प्रसंगीं याला प्राप्ति होई. शूद्र वर्गांत लग्न लावण्याचें काम याचेंच असे. हा वर्ग बहुधा यजुर्वेदी ब्राह्मणांचा असतो. इतर हक्कांप्रमाणें जोसकीचे हक्क ब्राह्मणांखेरीज इतर वर्गांनींहि मिळविल्याची कागदपत्रांतून माहिती सांपडते.

२. एक जात. दक्षिण हिंदुस्थान, कोंकण व कानडा यांमध्यें हे मुख्यत्वेंकरून आढळतात. मराठे, धनगर, माळी, इत्यादि जातींचा यांमध्यें बराच भरणा असून हे फिरते भिकारी व सामुद्रिक असतात. यांच्या डमरूच्या आवाजावरून यांचीं बुडबुडकी, गिडबिडकी व कुडबुडे हीं नांवें पडलीं आहेत. त्यांना पिंगळे हेंहि नांव आहे. जोश्यांचें (१) खास जोशी व (२) अकरमाशे, असे दोन भाग असून त्यांमध्यें फक्त रोटीव्यवहार आहे; पण बेटीव्यवहार नाहीं. पंच पालवी हें त्यांचें देऊळ असून त्यांचा धर्म व चालीरीती मराठ्यांप्रमाणेंच आहेत. ते मांस खातात व दारू पितात. आपला दर्जा मराठ्यांबरोबर आहे असें ते म्हणतात; परंतु जोशी लोक महार-मांगांची भिक्षा घेत असल्यामुळें मराठे लोक त्यांना कमी दर्जाचे समजतात.

**जोशी, आण्णा मार्तंड** (१८४८-१८९८)—एक महाराष्ट्रीय नाटककार. हे आण्णासाहेब किर्लोस्करांचे समकालीन होते. इ. स. १८७१ मध्यें नोकरीकरितां ते मुंबईस गेले. तेथें ते पूर्वीच्याच कंपनीच्या नांवें कधीं कधीं हौशी मंडळी जमवून नाटकें करीत. संगीत सौभाग्य रमा, सं. सावित्री व सं. शिवछत्रपतिविजय अशीं यांचीं स्वतंत्र तीन नाटकें उपलब्ध आहेत. त्यांचे प्रयोग आर्य नाट्यकलोत्तेजक मंडळी मुंबईस करी. याखेरीज सं. मृच्छकटिक व उत्तररामचरित्र हीं नाटकें त्यांनीं रचिलीं असावींत. संगीत नाटकांच्या पहिल्या अमदानीचे जनक म्हणून डोंगरे-किर्लोस्करांबरोबर यांचेंहि नांव निघणें जरूर आहे.

**जोशी, डॉ. आनंदीबाई** (१८६५-१८८७)—पाश्चात्य उच्च वैद्यकीय शिक्षण घेतलेली पहिली महाराष्ट्रीय महिला. जन्म पुणें येथें. वडील केतकर, कल्याणचे इनामदार. लग्न ठाण्याचे पोस्टमास्तर गोपाळराव जोशी यांच्याशीं लागलें. गोपाळराव अति विक्षिप्त होते. तरी त्यांनीं आपल्या पत्नीस चांगलें शिक्षण देऊन डॉक्टरीण होण्यासाठीं लहान वयांत अमेरिकेस पाठविलें. तेथें आनंदीबाईनीं फार सच्छील वृत्तीनें राहून, कष्ट सोसून अभ्यास पुरा केला व एम्. डी. पदवी मिळविली. पण हिंदुस्थानांत परत येतांच क्षय लागून अकालीं वारल्या. श्री. काशीबाई कानिटकर यांनीं आनंदीबाईचें उत्कृष्ट चरित्र लिहिलें आहे.

**जोशी, गणेश कृष्ण** (१८६७-१९२२)—एक महाराष्ट्रीय नट. यांचें घराणें मूळचें आडिवरें (जिल्हा रत्नागिरी) येथील. लहानपणींच वडील निवर्तल्यामुळें व गरिबीमुळें यांच्या शिक्षणाची हेळसांड झाली. वयाच्या १० व्या वर्षींच ते मधुकरी मागण्याच्या त्रासाला कंटाळून कालेकरांच्या नाटक मंडळींत पळून गेले. आपल्या काम करण्याच्या कुशलतेनें त्यांनीं बरीच वाहवा मिळविली. पुढें १८८१ मध्यें त्या सुमारास स्थापन झालेल्या शाहूनगरवासी नाटकमंडळींत दाखल झाले. १८९१ मध्यें शाहूनगरवासी नाटक-मंडळीनें शेक्सपीयरचीं झुंझारराव, हॅम्लेट, तारा, वगैरे व इतर मंजुघोषा, मोचनगड, वीरकांत, वीरसेन, वगैरे नाटकें रंगभूमीवर आणलीं होतीं. १८९२ पासून मंडळीनें ऐतिहासिक नाटकें बसविण्यास सुरुवात केली व या प्रयत्नांत चांगलेंच यश आलें. राणा भीमदेव या नाटकांत गणपतराव भीमदेवाची भूमिका घेत असत. त्यांच्या वीररसान्वित पहाडी आवाजानें, सहजाभिनयानें व तद्रूपतेनें प्रेक्षकाच्या चित्तवृत्ती अगदीं थरारून जात. याच सुमारास 'तुकाराम' या धार्मिक नाटकाचा प्रयोग करण्यांत आला. या नाटकांतील भूमिका गणपतराव इतक्या यथायोग्य तऱ्हेनें करीत कीं, या २० व्या शतकांतील तुकारामाचें दर्शन घेण्याकरितां आजच्या तुकाराम बोलपटाप्रमाणेंच भाविक प्रेक्षकांच्या उड्या पडत. इतर नाटकांप्रमाणेंच त्राटिका, फाल्गुनराव व मानाजीराव या नाटकांतहि त्यांनीं चांगली कीर्ति मिळविली. बहिऱ्या प्रेक्षकालाहि नाट्याचा सर्व भाव व भाषा केवळ अभिनयानें समजूं शकेल इतक्या सूक्ष्म तऱ्हेनें व भिन्न भिन्न मनोवृत्तींनीं उचित असा अभिनय, मुद्राभिनय व अंगविक्षेप भावार्थ समजून करण्यांत त्यांच्या गुणांचें सार होतें. गॅरिकप्रमाणें हॅम्लेटमधील

भूमिकेच्या अप्रतिमपणाबद्दल युरोपियन लोकांनींहि त्यांची वाहवा केली होती. त्यांना नाट्यनैपुण्याची ईश्वरी देणगी होती.

**जोशी, गणेश वासुदेव** (सार्वजनिक काका) (१८२८–१८८०)—एक महाराष्ट्रीय देशभक्त व सार्वजनिक कार्यकर्ते. यांस सार्वजनिक काका या नांवानें ओळखीत असत. १४ व्या वर्षी हे सदर अमीन झाले. पुढें हायकोर्ट वकिलीची परीक्षा देऊन पुण्यास वकिली करूं लागले. १८६४ मध्यें यांनीं पुण्याची सार्वजनिक सभा स्थापन केली. शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याकरितां हे सारखी चळवळ करीत होते. यांनीं लवाद कोर्टांचीहि स्थापना केली. यांनीं मल्हारराव गायकवाड यांच्या खटल्याच्या वेळीं पुष्कळ परिश्रम केले. यांनीं बंडवाले वासुदेव बळवंत फडके यांचें वकीलपत्र घेतलें होतें. १८६९ सालीं यांनीं स्वदेशी वस्तू वापरण्याचा निश्चय केला. व तें व्रत आमरण पाळलें. यांचा स्वभाव फार मनमिळाऊ असून उत्साह दांडगा असे. यांनीं सार्वजनिक सभेकरितां एक वाडा खरेदी करून संस्थेस बक्षीस दिला. महाराष्ट्रांतील हे पहिले चळवळ्ये देशभक्त म्हणतां येतील. यांचा उद्योगाचा व्याप फार मोठा असे. देशांतील अनेक अडचणी दूर करण्यासाठीं यांनीं बऱ्याच खटपटी केल्या व आर्थिक झीज सोसली. लो. टिळकांना हे गुरु झाले असें समजण्यास हरकत नाहीं.

**जोशी, गणेश व्यंकटेश** (१८४९–१९११)—एक महाराष्ट्रीय अर्थशास्त्रज्ञ. यांचें शिक्षण प्रथम कोल्हापूर येथें होऊन नंतर एल्फिन्स्टन कॉलेजमधून हे पदवीधर झाले. लवकरच यांनीं शिक्षण–खात्यांत नोकरी धरली व आपल्या अंगच्या गुणांनीं एक चांगले शिक्षक म्हणून लौकिक मिळवून मोठ्या पदावर चढले. हे कांहीं काल पुणें येथील हायस्कूलचे हेडमास्तर होते. त्यांची आपल्या सहकाऱ्यांवर व विद्यार्थ्यांवर चांगली छाप असे. त्यांस अनेक विषयांची फार माहिती असे, आणि त्यांच्या शिकविण्याच्या पद्धतीविषयीं असें सांगतात कीं, भूगोलासारखा त्या वेळीं अगदीं रुक्ष समजला जाणारा विषयहि ते एखाद्या रसभरित काव्याप्रमाणें मनोरंजक करून शिकवीत. यांचा शिस्तीवर कटाक्ष असे. तथापि त्यांच्या विद्यार्थ्यांचें त्यांच्यावर प्रेम असून त्यांच्याबद्दल त्यांस फार आदरहि असे.

परंतु महाराष्ट्रांतील लोकांस त्यांचें शिक्षकापेक्षां राजकारणी म्हणून अधिक महत्त्व वाटे. त्यांनीं पेन्शन घेतल्यानंतरच उघडपणें सार्वजनिक आयुष्यांत व राजकारणांत भाग घेतला, ही गोष्ट खरी आहे. तथापि नोकरींत असतांनाच त्यांनीं अनेक सार्वजनिक प्रश्नांची माहिती गोळा करून त्यांचा फार खोल अभ्यास केला होता. प्रारंभापासून त्यांस आंकडे व माहिती गोळा करण्याचा नाद असे व पुढें पुढें त्यांची दृष्टि या बाबतींत अगदीं वाकबगार बनली. त्यांनीं जमीनधाऱ्याच्या प्रश्नाचा विशेष अभ्यास केला होता व या विषयावरील त्यांचीं 'टाइम्स ऑफ इंडिया'मधील G. V. J. या सहीचीं पत्रें फार महत्त्वाचीं असत. यांच्या तोंडांतून पाण्याच्या झऱ्याप्रमाणें आंकडे बाहेर पडत, असें वेन्हिसन यांनीं म्हटलें आहे. न्या. रानडे यांस हे आंकडेविषयक माहिती देऊन लेखनास मदत करीत असत. यांचे सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांत लेख येत असत. वेल्बी कमिशनपुढील (१८९७ सालीं) साक्षी तयार करण्यांत यांची पुष्कळांस मदत झाली. कॉंग्रेसच्या बाहेर असूनहि तिच्या कार्याकडे त्यांचें लक्ष असे. पुढें ते राष्ट्रीय पक्षास मिळाले. ते जिल्हा-प्रांतिक-परिषदेचे (धुळें १९०८) अध्यक्ष होते. ते नेहमीं जहाल व प्रागतिक पक्षांत समेट घडवून आणण्यास तयार असत. त्यांस सुधारलेल्या कौन्सिलांत बजेट–कमिटीवर निवडलें होतें. त्यांनीं कौन्सिलांत असतांना शिक्षणाच्या वाढीसाठीं ठराव मांडले होते.

**जोशी, नारायण मल्हार** (१८७९— )—सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे जुने कार्यकर्ते व एक मजूरपुढारी. यांचें शिक्षण पुणें येथें डेक्कन कॉलेजांत झालें. ८ वर्षे यांनीं सरकारी शिक्षण खात्यांत शिक्षक म्हणून नोकरी केली. १९०९ मध्यें हे भारत सेवक समाजामध्यें दाखल झाले. १९११ पासून ते मुंबईच्या सोशल सर्व्हिस लीगचे सेक्रेटरी होते. १९१७ ते १९२९ पर्यंत मुंबई इलाखा सोशल रीफॉर्म असोसिएशनचे सेक्रेटरी होते. १९१९ ते १९२९ पर्यंत ते डब्ल्यु. आय्. एन्. असोसिएशनचे चिटणीस होते. यांस १९१७ मध्यें मेसापोटेमियामध्यें व १९२० मध्यें वॉशिंग्टन येथें वृत्तपत्रप्रतिनिधि म्हणून पाठविण्यांत आलें होतें. १९१९ ते १९२३ मध्यें हे मुंबई कॉर्पोरेशनचे सभासद होते. इंटर नॅशनल लेबर कॉन्फरन्सला हे १९२२, १९२५ व १९२९ मध्यें प्रतिनिधि म्हणून गेले होते. यांची मध्यवर्ती असेंब्लीमध्यें १९२१, १९२४, १९२८, १९३१, व १९३५ मध्यें नेमणूक झाली होती. हिंदुस्थानांतील मजुरांची पाहणी करण्याकरितां नेमलेल्या रॉयल कमिशनवर त्यांची नेमणूक झाली होती. हे तिन्ही गोलमेज (१९३०–३१–३२) परिषदांस प्रतिनिधि म्हणून उपस्थित होते. हल्लीं हे स्वतंत्र राहून मजुरांच्या हितासाठीं झटतात.

**जोशी, पुरुषोत्तम बाळकृष्ण** (१८५६—१९३०)—एक मराठी कवि, सार्वजनिक कार्यकर्ते व इतिहाससंशोधक. मुंबईस यांचा जन्म झाला. मुंबई इलाख्याचें गॅझेटियर तयार करण्याच्या कामांत सर जेम्स कॅंबेल यांना यांची चांगलीच मदत झाली. जॉर्ज फॉरेस्ट, एडवर्ड्स, एन्थाव्हेन यांसारख्या विद्वान् संशोधक–लेखकांसहि त्यांनीं साहाय्य दिलें. मुंबईच्या

रॉयल एशियाटिक सोसायटीनें 'कँबेल मेडल' देऊन यांच्या संशोधनात्मक कार्याबद्दल यांचा गौरव केला.

(१) पद्यसुधा, (२) शिवदुःखाश्रुमार्जन, (३) आधुनिक कविताप्राप्ति, (४) काव्यरत्न पहिलें, (५) उत्तर कोंकणचा प्राचीन इतिहास, वगैरे पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत.

**जोशी, बारामतीकर**— हें घराणें मूळचें कोंकणांतील केळशी गांवचें. त्या घराण्यांतील केशव नाईक नांवाचा पुरुष काशीस जाऊन सावकारी करूं लागला. त्याला सदाशिव, कृष्ण व अंतोबा असे तीन पुत्र होते. केशव नाइकाचा वडील मुलगा सदाशिव हा बारामतीकरांचा मूळ पुरुष होय. तो व त्याचे मुलगे सावकारीचा धंदा करीत असत. त्याला गोविंद, महादबा ऊर्फ बाबूजी व आबूजी असे तीन पुत्र होते. बाळाजी विश्वनाथ पेशवे यानें आपली मुलगी भिऊबाई ही आबूजी यास दिली. ही मंडळी राजकारणांतहि पडत असत. माळव्याच्या कामगिरीवर यांची इ. स. १७३२ च्या वेळीं नेमणूक झाली होती. नाईक–पेशव्यांचें कांहीं दिवस वितुष्ट पडलें होतें. नानासाहेब पेशव्याला पेशवाई मिळूं नवे अशा खटपटींत बाबूजी नाईक होता. स. १७४३ त बारामतीस जहागिरी मिळवून तेथें नाईक राहूं लागले. स. १७५३ पेशवे–नाईक यांचा समेट झाला. थोरल्या माधवरावांना यांचें साहाय्य चांगलें असे. त्यांनींच रामचंद्र जाधवास निजामाकडून फोडून पेशव्यांकडे आणलें. राघोबाची मुलगी दुर्गाबाई ही बाबूजीच्या पांडुरंग नांवाच्या मुलास दिली होती. परशुरामभाऊ पटवर्धनांची मुलगी बाबूजीच्या चौथ्या मुलास दिली असून तो मुलगा लग्नाच्या १५ व्या दिवशीं वारला. नारायणरावाच्या वधानंतर बाबूजीनें राघोबादादाचा पक्ष सोडला. यानें बहुतेक पेशवाई समक्ष पाहिली होती. तो रसिक व गुणज्ञ होता. त्याच्याच पदरीं कवि मोरोपंत पराडकर हे होते. हा सन १७८० च्या सुमारास व याचा पुत्र पांडुरंगराव सन १७९४ त वारला. त्यानंतर या घराण्याची वाताहत झाली. या घराण्याच्या बावडेकर, मेढतकर, सातारकर व बारामतीकर अशा शाखा झाल्या.

**जोशी, (वीर) वामनराव गोपाळ (१८८१– )**— एक मराठी नाटककार व देशभक्त. हे १८९९ सालीं मॅट्रिक झाले. १९०८ सालीं यांच्यावर राजद्रोहाचा खटला झाला. १९०९ मध्यें हे गंगाधरराव देशपांडे यांच्याबरोबर 'राष्ट्रमत' वर्तमानपत्राचे संपादक होते. यांस १२१ अ कलमाखालीं दीड वर्षाची शिक्षा झाली. तेव्हां यांस लोकांनीं वीर ही पदवी दिली. अमरावती येथें यांनीं 'स्वतंत्र हिंदुस्थान' नांवाचें एक साप्ताहिक पत्र सुरू केलें. १९३० मध्यें हे वऱ्हाड प्रांतांत काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष झाले. त्याच वर्षी यांस पुन्हां १२४ अ कलमाखालीं राजद्रोहाच्या आरोपावरून दोन वर्षांची शिक्षा झाली. परंतु ९ महिन्यांनीं त्यांची दिल्ली कराराप्रमाणें सुटका झाली. हे एक नांवाजलेले मराठी नाटककार आहेत. यांनीं राक्षसी महत्त्वाकांक्षा, रणदुंदुभी, धर्मसिंहासन, वगैरे नाटकें लिहिलीं आहेत.

**जोशी, वामन मल्हार (१८८२–१९४३)**—एक महाराष्ट्रीय साहित्यिक व तत्त्वज्ञ. यांचा जन्म यांच्या आजोळीं म्हणजे तळें या गांवीं झाला. यांचे पूर्वज पुणें जिल्ह्यांतील रायरी गांवीं राहून तेथें भिक्षुकी करीत असल्यानें हे रायरीकर जोशी या नांवानें प्रसिद्ध आहेत. सन १९०० मध्यें नगर हायस्कूलमधून हे मॅट्रिक झाले. या परीक्षेंत मिळालेल्या शिष्यवृत्तीमुळें सन १९०४ मध्यें बी. ए. ची पदवी यांनीं मिळविली व सन १९०६ सालीं तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान हे विषय घेऊन हे एम्. ए. झाले.

सरकारी नोकरी करणें अगर खासगी संस्थांत प्राध्यापक होणें ही गोष्ट यांच्या मनाला रुचत नव्हती. त्यामुळें कलकत्ता काँग्रेसहून परत येतांच कोल्हापूरच्या समर्थ विद्यालयाचे हे आजीव सेवक झाले. याच वेळीं प्रो. विजापूरकरांच्या 'विश्ववृत्त' मासिकाच्या संपादकाचें कामहि हे करूं लागले. परंतु थोड्याच दिवसांत 'वैदिक धर्मांची तेजस्विता' हा पं. श्री. दा. सातवळेकर यांचा 'विश्ववृत्तां'तील लेख राजद्रोही ठरल्यानें संपादक या नात्यानें यांना तीन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा झाली. सन १९११ च्या ऑक्टोबरमध्यें हे तुरुंगांतून सुटून आले. त्या वेळीं समर्थ विद्यालय व 'विश्ववृत्त' बंद पडलें असल्यानें यांना उपजीविकेसाठीं दुसरा व्यवसाय पाहणें भाग पडलें. कांहीं दिवस आर्यभूषणमध्यें, कांहीं दिवस 'मराठा' या इंग्रजी साप्ताहिकाच्या संपादकीय खात्यांत, तर कांहीं दिवस मुंबईस अच्युतराव कोल्हटकरांच्या 'संदेश' या दैनिकांत यांनीं काम केलें. परंतु या धंद्यांत जरूर असणाऱ्या पक्षाभिनिवेशाचा अपुरेपणा व पैशाची कमतरता यांमुळें यांनीं या धंद्यास रामराम ठोकला व सन १९१८ च्या जूनमध्यें हे महिला विद्यापीठाच्या एरंडवण्याच्या महाविद्यालयांत प्राध्यापक म्हणून काम करूं लागले. स. १९२७ मध्यें हे महिलाश्रम हायस्कूलचे मुख्याध्यापक झाले. महिलाश्रम हायस्कूलसाठीं अनेक प्रयत्न करून यांनीं त्यास ऊर्जितावस्था प्राप्त करून दिली. पुढें १९४१ सालीं एरंडवणा महिला-विद्यालयाच्या प्रिन्सिपॉलच्या जागेवर यांची नेमणूक झाली.

यांचें लिखाण विचार–प्रधान असून त्यांत निर्मळ सत्याचा आविष्कार दृष्टीस पडतो. व्यवहारांत भिडस्त असले तरी सत्य-प्रतिपादनाच्या वेळीं हे कुणाचीहि मुर्वत ठेवीत नसत. आपल्या मतांइतकीच दुसऱ्याच्या मतांनाहि हे किंमत देत. जुन्या व नव्या मतांचा बुद्धिपूर्वक विचार करून त्यांतून सत्य हुडकून काढण्याची उदार वृत्ति यांच्याजवळ होती. वृत्तीनें अतिशय

सात्त्विक होते व वागणी फार साधी होती. मराठी वाङ्मयावर यांची एक स्वतंत्र छाप दृष्टीस पडते.

साक्रेटिसाचे संवाद, नीतिशास्त्रप्रवेश, यांसारखें तत्त्वज्ञानावरील वाङ्मय, 'विचारविहार', 'विचारविलास', 'विचारसौंदर्य' यांसारखे लेखसंग्रह, 'विस्तवाशीं खेळ' हें नाटक, 'रागिणी', 'आश्रमहरिणी', 'नलिनी', 'सुशिलेचा देव', 'इंदु काळे व सरला भोळे' यांसारख्या कादंबऱ्या व 'नवपुष्पकरंडक' यांसारख्या गोष्टी यांनीं लिहिल्या आहेत. ते एकदां महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे व परिषदेचे अध्यक्ष होते.

**जोशी, वासुदेव गणेश, (वासुकाका)** (१८५६-१९४४)—एक महाराष्ट्रीय सार्वजनिक कार्यकर्ते व छापखानदार. वांईजवळील धोम येथें यांचा जन्म झाला. वयाच्या चौदाव्या वर्षी हे पुण्यास आले असतांना विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्याशीं यांची ओळख झाली व थोड्याच दिवसांत हे त्यांच्या निबंधमालेची व्यवस्था पाहूं लागले. यानंतर चित्रशाळेची व्यवस्थाहि यांच्याकडेच आली. यापुढें चित्रशाळेला जें विस्तृत स्वरूप प्राप्त झालें त्याचें श्रेय यांनाच दिलें पाहिजे. याच चित्रशाळेंतून चित्रमयजगत्, शालापत्रक, महाराष्ट्र कृषीवल, ध्रुव यांसारखीं मासिकें निघत आहेत.

विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या पश्चात् लो. टिळकांचे एक सहकारी व सल्लागार म्हणून हे प्रसिद्धीस आले. संमति बिलाच्या क्रीडाभुवनांतील सभेच्या वेळीं यांना अटक झाली व पांच दिवस हे कैदेंत होते. सन १९०३ मध्यें ताईमहाराज प्रकरणीं लो. टिळकांना अटक झाल्यावर सुप्रसिद्ध सर्कसवाले विष्णुपंत छत्रे यांच्या विनंतीवरून हे त्यांच्यावरोबर चीन व जपान या देशांत हिंडून आले. या देशांत सर्कशीची आगाऊ व्यवस्था ठेवण्याचें काम यांनीं स्वतःच्या अंगावर घेऊन तें यशस्वी करून दाखविलें. जपानमध्यें यांची स्वामी रामतीर्थ यांच्याशीं ओळख झाली व स्वामी रामतीर्थांचीं अमेरिकेंतील सहा व्याख्यानें यांनीं पुस्तक रूपानें प्रसिद्ध केलीं.

जहाल राजकारणाकडे यांचा ओढा विशेष असे. राष्ट्रसभेच्या राजकारणांत निष्ठापूर्वक भाग घेऊन त्या निमित्तानें सर्व हिंदुस्थानभर हे हिंडले. मुळशी सत्याग्रह व सन १९३२ ची कायदेभंगाची चळवळ यांत यांनीं कारावास भोगलेला आहे. लो. टिळकांबरोबर हे विलायतेस गेले होते. त्यांच्या मृत्यूनंतर ते कॉंग्रेस पक्षांत शिरले व कॉंग्रेसच्या कार्यक्रमांत निष्ठेनें भाग घेऊं लागले. साधी राहणी व उच्च विचारसरणी यांचें वासुकाका म्हणजे एक मूर्तिमंत उदाहरण होय. यांनीं आपल्यामागें आपल्या मिळकतीचा देशकार्यासाठीं विश्वस्तनिधि (ट्रस्ट) करून ठेवला आहे.

**जोशीमठ**—संयुक्त प्रांत, गढवाल जिल्ह्यांतील एक खेडें. समुद्रसपाटीपासून ६,१०७ फूट उंचीवर हें पाचशें लोकवस्तीचें खेडें आहे. येथें बद्रीनाथाचा मुख्य पुजारी– यास रावळ म्हणतात– हिंवाळ्यांत येऊन राहतो. कारण बद्रीनाथ देवळाच्या वाटेवर बर्फ पडल्यामुळें तो रस्ता बंद होतो. या मठास ज्योतिर्मठ असेंहि म्हणतात. हा मठ शंकराचार्यांनीं स्थापिला व यांत त्यांचे पूजेचे शालिग्राम आहेत असें मानण्यांत येतें.

**जोसेफस, फ्लेव्हिअस** (इ. स. ३७-९५)—एक ज्यू इतिहासकार. ज्यू लोकांनीं रोमन सत्तेविरुद्ध अखेरचें बंड केलें, त्या वेळीं जोसेफसला गॅलिलीचा गव्हर्नर नेमण्यांत आलें; आणि त्यानें जोटापाटा हें तटबंदीचें शहर सर्व रोमन सैन्याच्या हल्ल्याविरुद्ध ४७ दिवस लढवलें, पण अखेर रोमन सैन्यानें त्या शहराचा पाडाव केला, आणि जोसेफसला कैद केलें. पुढें रोमन सैन्यानें जेरुसलेम शहराचा नाश केला (इ. स. ७०). त्या वेळीं जोसेफस तेथें हजर होता. नंतर तो टायटसबरोबर रोम शहरीं गेला. तेथें त्यानें ग्रीक भाषेंत, 'दि हिस्टरी ऑफ दि ज्यूइश वॉर'; 'दि अँटिक्विटीज ऑफ दि ज्यूज' (या पुस्तकांत ज्यू लोकांचा इतिहास अगदीं प्राचीन काळापासून नीरो बादशहाच्या काळापर्यंत दिलेला आहे.); 'ऑटोबायॉग्रफी' (या पुस्तकांत त्यानें आपली स्वतःची लष्करी जीवनविषयक हकीकत दिली आहे); आणि 'दि अँटिक्विटी ऑफ दि ज्यूइश पीपल्' हे ग्रंथ लिहिले.

**जोसेफाइन** (१७६३-१८१४)—नेपोलियनची पत्नी व फ्रेंच बादशाहीण. तिचा विवाह १७७९ सालीं व्हिकोम्ट अलेक्झांडर ब्यूहार्नेस नांवाच्या इसमाशीं होऊन तिला यूजेन व हॉर्टेन्स हीं दोन मुलें झालीं. नंतर १७९४ मध्यें तिच्या नवऱ्याला फ्रेंच-राज्यक्रांतीच्या बंडाळींत फांशीं देण्यांत आलें. पुढें नेपोलियननें तिच्याशीं १७९६ सालीं विवाह केला, आणि १८०४ मध्यें पुन्हां धार्मिक विधियुक्त विवाहसंस्कार केला. तथापि पुढें १८०९ सालीं नेपोलियननें तिच्याशीं घटस्फोट केला. त्यानंतर ती माल्मेसॉं येथील आपल्या सुंदर स्थळीं जाऊन राहिली. तिची बादशाहीण ही पदवी व तिचा २० लक्ष फ्रँक वार्षिक तनखा तिच्या हयातीपर्यंत चालू होता. तिची मुलगी हॉर्टेन्स ही हॉलंडची राणी झाली. ३ रा नेपोलियन या हॉलंडच्या राणीचा पुत्र होय.

**जोहानीझबर्ग**—दक्षिण अफ्रिका. हें ट्रान्सव्हालचें मुख्य शहर असून रँड खाणींतून काढलेल्या सोन्याच्या व्यापाराचें केंद्रस्थान आहे. हें दक्षिण आफ्रिकेचें व्यापाराचें ठिकाण आहे. समुद्रसपाटीपासून हें ५,७६४ फूट उंच आहे. पश्चिमेकडील भागांत बाजार चौक आहे. व दक्षिणेकडे सरकारी चौक आहे.

कमिशनर स्ट्रीट, मार्केट स्ट्रीट व प्रीटचर्ड स्ट्रीट या मुख्य व्यापारी सडका आहेत.

शहराच्या दक्षिणेस, पूर्वेस व पश्चिमेस सोन्याच्या खाणी आहेत. येथील हवा आरोग्यकारक आहे. येथें पाऊस २८ इंच पडतो. खास शहराचें क्षे. फ. ६ चौ. मैल आहे. स्थानिक राज्यकारभार लोकनियुक्त म्युनिसिपल मंडळाकडे असतो. गोऱ्या ब्रिटिश प्रजाजनांनाच फक्त मत देण्याचा अधिकार आहे. युरोपियन वस्ती २,८१,७०६ आहे. १९२१ सालीं एक विद्यापीठ स्थापलें गेलें आहे.

विटवॉटरस्रँड खडकांतून सोनें सांपडलें म्हणून हें शहर अस्तित्वांत आलें. १८८६ सालीं हें शहर वसलें व यास जोहानी क्षरिस्तिक अधिकाऱ्याचें नांव देण्यांत आलें. १८९५ सालीं येथील खनिखोदक कंपनीची भरभराट झाली. बंदरापासून शहरापर्यंत आगगाडी झाल्यामुळें सोन्याच्या खाणीच्या कामास चांगलीच ऊर्जित दशा आली.

**जोहार**—रजपूत लोकांत जोहाराची चाल असे. शत्रूपुढें चालेनासें झालें व आतां शत्रूस खात्रीनें यश मिळणार अशी वेळ आली म्हणजे हे रजपूत लोक आपल्या सर्व बायकांना (एखाद्या गुहेंत अगर खाईंत) एक मोठी चिता रचून तींत जिवंत जाळीत. अशा प्रसंगीं मुख्य पुढाकार राजपत्नी घेत असे. सर्वांची रक्षा झाल्यावर तेथील चिताभस्म कपाळास लावून व अंगांत एकजात केशरी रंगाचा पोषाख चढवून सर्व पुरुषमंडळी शत्रूवर तुटून पडत व स्वतःचा प्राण धारातीर्थी अर्पण करीत. रजपूत इतिहासांत असे प्रसंग अनेकदां आढळतात. चितोड किल्ल्यावर असे तीन प्रसंग घडून आले होते व त्यांत लाखों जीवांनीं अग्निकाष्ठें भक्षण केलीं. ज्या गुहेंत हा जोहार होत असे, ती गुहा अद्यापिहि दाखवितात. शंभर-सव्वाशें वर्षांपूर्वी तेथील सर्व अस्थी काढून उदेपूरच्या राण्यानें भागीरथींत टाकिल्या.

**जोहोर**—मलाया द्वीपकल्पाच्या दक्षिण टोकाशीं हें स्वतंत्र संस्थान आहे. १९१० सालीं सुद्धां हा प्रांत सुलतानच्या ताब्यांत होता. याचा समुद्रकिनारा २५० मैल आहे. याचें क्षे. फ. ७,३३० चौ. मैल आहे. येथील मुख्य नद्या म्हणजे मुअर, जोहोर, एंडो, व बाहुपाहट ह्या आहेत. सर्वांत उंच ठिकाण गौंत ओकिद (४,००० फूट) आहे. अबुबकर यानें बांधलेला राजवाडा येथें मुख्य पाहण्यासारखा आहे. बंदर महाराणी ही मूअर प्रांताची मुख्य जागा आहे. येथील हवा आरोग्यकारक आहे व वार्षिक पर्जन्य सुमारें ९७ इंच आहे. लो. सं. १९४० मध्यें ७,३७,५५० होती. पैकीं हिंदी लोक ७६,२३० होते. रबर, गॅंबिएर (कांत), मिरची, खोबरें, जस्त, वगैरे माल परदेशीं जातो. संस्थानचें उत्पन्न अडीच कोटी डॉलर आहे. संस्थानिक सुलतान सर इब्राहिम हे आहेत. १९४८ सालीं मलाया संस्थान संघांत हें सामील झालें.

**जौक** (१७८६–१८५३)—एक उर्दू कवि. याचें नांव शेख मुहम्मद इब्राहिम खाकानी असें होतें, व यास 'खाकानी हिंद' अशी पदवी होती. कवि गुलाम रसूलचा हा शिष्य. याच्या कविता उत्कृष्ट असल्यामुळें शेवटचा मोगल बादशहा बहादुरशहा यानें याला आपला गुरु केलें. पण त्याच्या चांगल्या कविता बादशहाच्या नांवावर खपूं लागल्या. याच्या कवितांतून उच्च विचार आणि भाषासौंदर्य दिसून येतें. प्रेमाबरोबर ईश्वरभक्तिहि त्यांत प्रतीत होते.

**जौनपुर**—हा संयुक्त प्रांतांतील बनारस विभागाच्या वायव्येकडील जिल्हा. त्याचें क्षे. फ. १,५५५ चौ. मै. आहे. या जिल्ह्यांतून गोमती नदी वाहत असून हीस पूर येण्याची पुष्कळ भीति असते.

प्राचीन काळीं भार, वगैरे वन्य जातींची वस्ती येथें होती. पुढें हिंदु राजांच्या वेळीं जाफराबाद वगैरे गांवें प्रसिद्ध होतीं. १०१९ सालीं गझनीच्या महंमदानें जो मुंज नांवाचा किल्ला काबीज केला तें हेंच जाफराबाद होय, असें म्हणतात. अकराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत येथें राठोडांचें राज्य होतें. ११९४ सालीं जयचंद मरण पावल्यावर मुसलमान या भागांत बनारसकडून शिरले व राठोड राजांनीं बांधलेल्या देवळांचा त्यांनीं नाश केला. १३२१ सालीं गियासुद्दीन तुघलकानें आपला मुलगा झाफरखान यास या भागाचा सुभेदार नेमलें.

जौनपुर हें शहर फिरोजशहा तुघलकानें १३५१ सालीं स्थापिलें. येथें शर्की नांवाचें एक मुसलमान घराणें राज्य करीत होतें. ज्या वेळीं बाबरानें इब्राहिम लोदी याचा पानपतच्या लढाईंत (१५२६) पराभव केला, त्या वेळीं जौनपुर आणि बिहार यांच्या सुभेदारानें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. मोंगल राज्य सुरू झाल्यावर अकबराच्या कारकीर्दीत (१५९९) जौनपुर मोंगल राज्यांत सामील झालें. पुढें १७२२ सालीं हा भाग अयोध्येच्या नबाबाकडे गेला. कांहीं वर्षांनंतर तो मन्साराम याकडे गेला आणि १७७५ सालीं ब्रिटिशांकडे आला.

या जिल्ह्यांत ७ गांवें व ३,१६९ खेडीं आहेत. लो. सं. १२,८७,४३९. हिंदूंची वस्ती शें. ९१ असून मुसलमान शें. ९ आहेत. शें. ८१ लोक पुरबिया हिंदी भाषा बोलतात. साळ, मात, मसूर, मका, गहूं, ज्वारी, वगैरे धान्यें येथें पिकतात. जिल्ह्याचें उत्पन्न वीस लाखांपर्यंत आहे.

शहर—हें जौनपुर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. यास जवानपूर-जमानपूर असेंहि कोणी म्हणतात. लो. सं. सु. ४०,०००.

मुख्य शहर गोमतीच्या तीरावर असून नदीवर अकबर बादशहाच्या वेळीं बांधलेला एक दगडी पूल आहे. शहरांत पूर्वीं होऊन गेलेल्या राजांनीं बांधिलेल्या मोठमोठ्या इमारती पुष्कळ आहेत. सोळाव्या शतकांत बांधलेला शहर-दरवाजा, १३७६ सालीं बांधलेली एक मशीद व इब्राहिमशहानें बांधलेलीं तुर्की पद्धतीचीं स्नानगृहें साधारण स्थितींत आहेत. भारतीय शिल्पाचे नमुने येथें चांगले पाहावयास सांपडतात. येथें गुलाबी अत्तर तयार होतें. पूर्वीं येथें कागद तयार करण्याचा व्यापार पुष्कळ चालत होता.

**जौनपुरी**—हा राग आसावरी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत गांधार वर्ज्य आहे व अवरोह सर्व स्वरांचा होतो, म्हणून याची जाति षाडवसंपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गायनवेला दिवसाचा दुसरा प्रहर मानितात. या रागाचें स्वरूप आसावरी रागासारखें दिसतें. या रागांत आसावरी व मधुमाद यांचें मिश्रण झालेलें भासतें. हा राग आधुनिक असून जौनपूरचा सुलतान हुसेन यानें हा राग प्रचारांत आणिला अशी समजूत आहे.

**जौहरी फाराबी** ( मृ. १००२ )—एक अरबी भाषाशास्त्रज्ञ. अबुनस्र इस्माईल बिन हम्माद असें याचें नांव होतें. हा जातीनें तुर्क असतांहि त्यानें अरबी भाषेंत इतकें प्रावीण्य मिळविलें कीं, त्याला इमाम-उल्-लुघात म्हणजे भाषाशास्त्रज्ञ अशी पदवी मिळाली. यानें एक मोठा अरबी शहाह-उल्-लुघात नांवाचा कोश तयार केला आहे. त्यामुळें यानंतर त्याला साहेब-उस्-शहाह् असें टोपण नांव पडलें. तसेंच तो तुर्कस्तानांतील फाराब गांवचा रहिवासी असल्यानें त्याला फाराबी असेंहि म्हणत. तो इ. स. ९९२ मध्यें मेला असें कांहीं ग्रंथकार मानतात.

**ज्यू लोक**—यांना इस्रेलाइट किंवा हीब्रू असेंहि म्हणतात. बायबलच्या प्राचीन काळांत हे पॅलेस्टाइनमध्यें राहत होते. बायबलच्या जुन्या करारांत यांचा जुना इतिहास सांपडतो. पृथ्वीच्या आरंभकालापासून नेबुचडनेझर यानें ख्रि. पू. ५८६ मध्यें जेरुसलेमचा नाश करी पावेतोंचा इतिहास त्यांत दिला आहे. ख्रि. पू. ९३० मध्यें पॅलेस्टाइनच्या उत्तर भागांतले इस्राएल व दक्षिण भागांतील जुडा प्रांतांतील जाती विभक्त झाल्या. ॲसीरियाचा राजा सार्गान यानें ख्रि. पू. ७२२ मध्यें उत्तरेकडील जातींना जिंकल्यापासून त्यांना इतिहास नाहीं. जुडांतील जातींनीं राजाला कारभार देऊन आपलें संरक्षण केलें. पण ख्रि. पू. ५८६ मध्यें नेबुचडनेझर यानें त्यांचें स्वातंत्र्य हरण केलें व [त्यां]ना बाबिलोनला नेलें. पुढें सायरसनें बाबिलोनचें राज्य [...] ज्यू लोक जेरुसलेमला परत आले व त्या वेळेपासून ज्यू [इ]तिहास सुरू होतो.

अलेक्झांडरच्या काळानंतर ज्यू लोक ईजिप्त व सीरिया यांना खंडणी भरीत असत. कांहीं ज्यू ईजिप्तमध्यें गेले व तेथें शास्त्रें आणि कला शिकले. ख्रि. पू. १७० मध्यें ॲंटिओकस एपिफेनीज यानें जेरुसलेममध्यें ज्यूंच्या धार्मिक आचारांना बंदी केली व ग्रीक धर्म त्यांच्यावर लादण्याचा प्रयत्न केला. ज्युडास मॅकॅबेअस व त्याचे भाऊ जोनाथन आणि सायमन यांनीं ख्रि. पू. १६९ मध्यें सिरियन लोकांवर विजय मिळविला व हें घराणें ख्रि. पू. ६३ सालीं पाँपे जेरुसलेम घेईपर्यंत तेथें नांदत होतें. ख्रि. पू. ३७ पासून हेरॉडचें घराणें अधिकारावर आलें.

हेरॉडनें ज्यूंसाठीं रोमन सरकारकडून रोमन नागरिकत्वाचे व इतर हक्क मिळविले. पण त्याच्या मृत्यूनंतर रोमन अधिकाऱ्यांनीं जेरुसलेमचा नाश करून ज्यूंना तेथून हांकलून लाविलें ( इ. स. ७० ). ज्यू लोकांचा बालेकिल्ला जें बेथर शहर तेंहि रोमनांनीं घेतलें. तेव्हां बरेचसे ज्यू अरबस्तानांत गेले. तेथें पुढें मुसलमानांनीं ते इस्लामी धर्म स्वीकारीत नाहींत म्हणून त्यांचा छळ आरंभिला. तेव्हां ते दुसरीकडे गेले. स्पेनमध्यें त्यांची पांडित्याबद्दल प्रसिद्धि असून त्यांना बरेंच धार्मिक स्वातंत्र्य असे.

चौथ्या शतकांत ख्रिस्ती धर्माची त्यांच्यावर बळजबरी होऊं लागली व नाकबूल असतील त्यांचा फार छळ होऊं लागला. त्यांना स्पेनमधून घालवून देण्यांत आलें. जिकडे जावें तिकडे त्यांना हाच कटु अनुभव येत गेला. फ्रान्समध्यें आठव्या नवव्या शतकांत ज्यूंना बरें वागविण्यांत येत असे. पण ( क्रुसेड धर्मयुद्ध ) सुरू झाल्यामुळें त्यांचा निःपात करण्यांत येऊं लागला.

इंग्लंडमध्यें पहिल्या विल्यमनें त्यांना चांगला आसरा दिला; पण ज्यू लोकांच्या सावकारीमुळें ते लोकांत अप्रिय होऊं लागले. १२५३ मध्यें तर त्यांची स्थिति फार वाईट झाली व त्यांना देशत्याग करण्याची पाळी आली. पुढें क्रॉमवेलनें त्यांना परत बोलाविलें व त्या वेळेपासून त्यांचा दर्जा सुधारत गेला. त्यांना सरकारी नोकरींत घेण्यांत येऊं लागलें व पार्लमेंटमध्येंहि त्यांचे प्रतिनिधि बसूं लागले. फ्रान्समध्यें राज्यक्रांतीपासून ज्यूंना नागरिकत्वाचे हक्क मिळाले व नेपोलियनने त्यांना धर्मस्वातंत्र्य मिळवून दिलें. जुन्या झारशाही अमलांत रशियांत त्यांचा फार छळ होई व आठ लाखांवर ज्यू बाहेर पडून अमेरिका व इतर युरोपचा भाग इकडे जाऊन राहिले. १९१७ च्या राज्यक्रांतींत बरेचसे ज्यू होते व पुढें त्यांना रशियांत धार्मिक स्वातंत्र्य प्राप्त झालें. १९१७ मध्यें ब्रिटननें पॅलेस्टाइन जिंकल्यापासून तेथें ज्यू राष्ट्र स्थापण्याची आशा निर्माण झाली व ती आतां थोडीफार सफलहि झाली. नुकतेंच त्यांचें स्वतंत्र राष्ट्र निर्माण होऊन त्याला कांहीं मोठ्या राष्ट्रांनीं मान्यताहि दिली आहे.

**ज्यू-राष्ट्रवाद**—( झिऑनिझम् ). पॅलेस्टाइनमध्यें ज्यू-राज्य स्थापण्याच्या चळवळीला हें नांव आहे. ही चळवळ मूळ रशियांत उत्पन्न होऊन तिचा पाया डॉ. थिओडोर हेर्झल या वृत्तपत्रकारानें १८९५ सालीं घातला, आणि १८९७ सालीं पहिली जागतिक ज्यू-परिषद ( झिऑनिस्ट वर्ल्ड कॉंग्रेस ) बेसले येथें भरविण्यांत आली, व तेथें "पॅलेस्टाइन हा ज्यू लोकांचा राष्ट्रीय मायदेश बनवणें", हा झिऑनी चळवळीचा उद्देश असल्याचें जाहीर करण्यांत आलें. या चळवळीला तुर्कस्तानची व बऱ्या युरोपीय राष्ट्रांची व विशेषतः ब्रिटन आणि जर्मनी यांची सहानुभूति मिळविण्याचा प्रयत्न डॉ. हेर्झलनें केला; पण तो सफल झाला नाहीं. पॅलेस्टाइनऐवजीं युगांडा ज्यूंनीं पत्करावा असें ब्रिटननें सुचविलें. परंतु १९०५ सालीं भरलेल्या झिऑनी कॉंग्रेसनें ती सूचना नाकारली. तथापि युगांडा पत्करण्याच्या मताचा एक पक्ष निघाला होता. हा पक्ष झिऑनी चळवळींतून फुटून बाहेर पडून पॅलेस्टाइनऐवजीं कोणताहि भूप्रदेश मिळेल तो पत्करण्यास तयार झाला. या पक्षाचा पुढारी इझरेल झँक्वुइल हा इंग्रजी लेखक बनला. पण हा पक्ष लवकरच नष्ट झाला. १९०४ सालीं डॉ. हेर्झलहि वारला. तथापि झिऑनी पक्षानें कॉंग्रेसचीं अधिवेशनें भरविण्याचा आणि पॅलेस्टाइनमध्यें थोडथोडया प्रमाणांत वसाहत करण्याचा क्रम चालू ठेवला. पहिल्या महायुद्धांत ग्रेट-ब्रिटनला ज्यू लोकांची मदत घेण्याची आतुरता लागल्यामुळें ब्रिटिश सरकारनें १९१७ सालीं 'बाल्फोर डिक्लेरेशन' द्वारें झिऑनी पक्षाच्या उद्देशांना मान्यता दिली. पुढें पहिलें महायुद्ध संपल्यावर राष्ट्रसंघाच्या हुकुमानें (मॅंडेट) पॅलेस्टाइन प्रांत ब्रिटिशांच्या ताब्यांत देण्यांत आला. नंतर मोठ्या प्रमाणावर पॅलेस्टाइनमध्यें वसाहती करण्यास झिऑनी पक्षानें सुरुवात केली, आणि तेथें ज्यू लोकांची सुमारें ४,८०,००० इतकी लोकसंख्या वाढली.

झिऑनी पक्षाचे १२,५०,००० सभासद असून ते सर्व जगभर बहुतेक देशांतून आहेत. झिऑनिस्ट ऑर्गनिझेशनचा आणि ज्युइश एजन्सीचा अध्यक्ष डॉ. विझमन हा आहे. रशियांतील क्रान्तीनंतर रशियांतून रशियन ज्यूंना नाहींसें करण्यांत आल्यामुळें झिऑनी चळवळीचें नुकसान झालें आहे. उलटपक्षीं अमेरिकेंतील ज्यू लोकांनीं आणि झिऑनीतर ज्यूंनींहि अलीकडे या चळवळीला पुष्कळ मदत केली आहे. १९३४ सालीं न्यू झिऑनिस्ट ऑर्गनिझेशन हा निराळा, पण अधिक जहाल पक्ष स्थापन झाला असून, या पक्षाची मागणी अशी आहे कीं, जॉर्डन नदीच्या दोन्ही बाजूंचा पॅलेस्टाइनचा प्रदेश हें ज्यू-राज्य आहे, असें त्वरित जाहीर करावें. इतरहि अनेक उपपक्ष निघाले आहेत; पण अरबांचें शत्रुत्व न करतां अरबांना अल्पसंख्य जमात म्हणून बहुसंख्य ज्यूंच्या पॅलेस्टाइन राज्यांत नांदूं द्यावें, असें सर्व पक्षांचें एकमत आहे.

१९४४ त पॅलेस्टाइनमध्यें ५,२८,७०२ ज्यू व १०,३३,३१४ मुसलमान होते. जर्मनी आणि इटली या देशांतून हिटलर-मुसोलोनी यांच्या अमदानींत ज्यूंची जेव्हां हकालपट्टी झाली तेव्हां पॅलेस्टाइनमध्यें आणखी बरेच ज्यू आले. महायुद्धानंतर ते पुन्हां परत आपापल्या ठिकाणीं न जातां पॅलेस्टाइनमध्येंच जास्त संख्या करावी व तें केवळ ज्यूराष्ट्र व्हावें या हेतूनें ज्यू लोक ब्रिटिश सरकारचे कायदे, धाकदपटशा यांना भीक न घालतां सत्याग्रह करून पॅलेस्टाइनमध्येंच राहण्यासाठीं लढा करूं लागले. ब्रिटिश अधिकाऱ्यांना त्यांनीं सतावून सोडलें. मोठ्या प्रमाणावर क्रांतियुद्ध सुरू झालें. ब्रिटिशांना अरबांची बाजू टाकतां येईना. तेव्हां त्यांनीं संयुक्त राष्ट्रसंघाला इशारा देऊन १९४८ च्या मे महिन्यांत पॅलेस्टाइनवरचा आपला—१९२२ पासून मॅंडेटनें आलेला—अधिकार काढून घेतला. तेव्हां ज्यू आणि अरब यांच्यांत पॅलेस्टाइनच्या स्वामित्वासाठीं जोराचा लढा सुरू झाला. राष्ट्रसंघानें तडजोड सुचविली; पण ती सर्वसंमत होईना. त्यानें नियुक्त केलेल्या बर्नाडोट या मध्यस्थाचा खून करण्यांत आला. हा प्रांत अरब आणि ज्यू या दोघांत वांटून देण्याची तडजोड पुढें आली आहे. आतां या नवीन ज्यू राष्ट्राला राष्ट्रसंघानें मान्यता दिली आहे. तेव्हां आज इतक्या शतकांनंतर ज्यूराष्ट्र निर्माण झालें आहे.

आज जगांत एकंदर दीड कोटी ज्यू आहेत. यापैकीं अमेरिकेंत सुमारें पंचेचाळीस लक्ष आहेत. रशियांत पंचवीस लक्ष व पोलंडमध्यें तितकेच आहेत. ज्यूंचा धर्म एकेश्वरी पंथाचा असून त्यांत संस्कार व तंत्रें फार आहेत. त्यांचीं देवळें ( सिनेगॉग ) वेगळीं असतात व व पंचांगहि निराळेंच आहे. तालमुद हा त्यांचा धर्मशास्त्रग्रंथ आहे. त्यांची भाषा हीब्रू आहे. हीब्रू भाषा—वाङ्मय पाहा.

**ज्येष्ठमध**—[ वर्ग लेग्युमिनोसी. जाति ग्लिसिरिझा ]. या वनस्पतीस संस्कृतमध्यें मधुक, यष्टिमधु व इंग्रजींत लिक्वोराइस म्हणतात. हिंदुस्थानांतील ज्येष्ठमधास आर्बस प्रिक्टोयस हें शास्त्रीय नांव आहे. हिंदुस्थानांत बहुतेक ठिकाणीं व दक्षिण युरोपांत ही वनस्पति विपुल होते. सातारा जिल्ह्यांतील माहुलीजवळच्या डोंगरावर हीं झाडें बरींच होतात. हीं उन्हाळ्यांत सुकून जातात. पाण्यांत होणारी एक जेष्ठमधाची जात आहे. तिला मधुलिका असें संस्कृत भाषेंत नांव आहे. या वनस्पतीच्या मुळास जेष्ठमध असें म्हणतात. जेष्ठमध गोड असतो. ज्येष्ठमधाच्या अर्काला शिरा म्हणतात. तो खोकल्यावर देतात. कफावर ज्येष्ठमध फार गुणकारी असतो.

दिसणारें अस्तित्व कळूं लागलें आहे. वर्णलेखविश्लेषणामुळें विश्वाची रचना कशी आहे, सूर्यांत काय पदार्थ आहेत, ताऱ्यांचे मार्ग कसकसे आहेत यांचें नवें ज्ञान होऊं लागलें आहे. आज हें शास्त्र वाढतें व महत्त्वाचें होऊन बसलें आहे.

**ज्वरांकुश**—एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें: पारा, गंधक, कज्जली, हिंगूळ व जयपाळ हीं असून दंतीमूळाच्या काढ्यांत खल करतात. अंग दुखणें, छाती व सांधे दुखणें, दांतखीळ बसणें, थोडासा खोकला असणें, ताप असणें, एकसारखें डोकें दुखणें, जेवण्याची इच्छा नसणें, इत्यादि विकारांवर हें औषध अप्रतिम आहे. थंडीतापावर व पाळीच्या तापावर या औषधाचा चांगला उपयोग होतो. ।· ते १ गुंज आल्याचा रस, गरम पाणी किंवा मध यांबरोबर देतात.

**ज्वलन**—१. (इग्निशन्)—प्राणवायू( ऑक्सिजन )बरोबर संयोग होण्याची क्रिया. ही क्रिया कांहीं विशिष्ट उष्णतामान आल्याशिवाय सुरू होत नाहीं. प्रत्येक जळाऊ पदार्थाचें ह्या क्रियेसाठीं स्वतःचें विशिष्ट उष्णतामान असतें. ही क्रिया होत असतांना ( किंवा पदार्थ जळत असतांना ) पुष्कळशी उष्णता तयार होते व हें उष्णतेचें प्रमाण त्या त्या पदार्थावर अवलंबून असतें.

२. ( कॉंबस्चन् )—ज्वालाग्राही पदार्थांचा प्राणवायूबरोबर संयोग. ज्वलन होतांना उष्णता आणि पुष्कळ वेळां प्रकाशहि निर्माण होतो. त्याचें नेहमींचें उदाहरण म्हणजे, कोळसा किंवा लांकडें जळणें ह्यांत कर्बा( कार्बन )चा हवेंतील प्राणवायू, ( ऑक्सिजन )बरोबर संयोग होऊन कर्बद्विप्राणिद( कार्बन डाय ऑक्साइड ) तयार होतो. प्राणवायूच्याऐवजीं हरवायू( क्लोरीन )च्या वातावरणांतहि कांहीं धातू, फॉस्फरस, गंधक वगैरे पदार्थ ह्या वायूशीं संयोग पावतात व त्याबरोबर उष्णताहि उत्पन्न होते. ह्या व अशा प्रकारच्या इतर संयोगांतहि ज्वलन ही संज्ञा वापरूं लागले आहेत. ज्वलन होतांना जी उष्णता निर्माण होते ती जळणाचा विशिष्ट गुण असल्यामुळें उद्योगधंद्यांत जळणाची निवड करतांना ह्या उष्णतेकडे लक्ष द्यावें लागतें.

**ज्वलनतत्त्व**—( फ्लाजिस्टन् ). हें ज्वालाग्राही पदार्थांतील तत्त्व असून पदार्थ जळूं लागला म्हणजे हें तत्त्व त्यांतून बाहेर निघून जातें, असा सिद्धान्त स्टालनें १६९७ सालीं पुढें मांडला. सुमारें एक शतकभर यावर शास्त्रज्ञांमध्यें वाद चालू होता. खनिज धातु भट्टींत घातली म्हणजे जळणांतील ज्वलनतत्त्व जळतांना बाहेर पडतें व तें खनिज धातूंत मिसळून शुद्ध धातु तयार होते. शुद्ध धातु तापवली म्हणजे त्यावर जो गंज चढतो तो सुद्धां त्या धातूंतील ज्वलनतत्त्व बाहेर निघून गेल्यामुळें होय. हें ज्वलनतत्त्व म्हणजे सध्यांच्या प्राणवायू( ऑक्सिजन )चा अभाव असें म्हणतां येईल. स्टालच्या ह्या सिद्धान्ताला लव्हॉयझरनें धक्का दिला आणि ज्वलनक्रियेची त्यानें नवीनच उपपत्ति मांडली.

**ज्वान्व्हील, जीन** ( १२२४–१३१९ )—एक फ्रेंच इतिहासकार. १२४८ मध्यें त्यानें नऊ शिलेदार ( नाइट्स ) आणि सातशें लढवय्ये-हत्यारी यांचें एक लढाऊ पथक तयार करून तें फ्रान्सचा राजा ९ वा लुई याच्याबरोबर पॅलेस्टाइन प्रांतांत मुसलमानांशीं पहिलें धर्मयुद्ध ( फर्स्ट क्रुसेड ) लढण्याकरितां दिलें. त्यानें लिहिलेला लुई संत याचा इतिहास मध्ययुगीन वाङ्मयांतील एक अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ असून त्याच्या छापील आवृत्त्या बऱ्याच वेळां निघाल्या आहेत.

**ज्वारी**-एक धान्य. ज्वारीला कांहीं भागांत जोंधळा म्हणतात. हिचें पीक मुंबई इलाख्यांत फार मोठ्या प्रमाणांत करितात. पावसाळा ( खरीप ) व उन्हाळा ( रब्बी ) ह्या दोन्ही हंगामांत हिची लागवड होऊं शकते. साधारण ३० ते ४० इंचांपर्यंत पाऊस असलेल्या क्षेत्रांत हिची लागवड करतात. जास्त पावसाळ्याच्या ठिकाणीं हें पीक चांगलें येत नाहीं म्हणून कोंकणांत ज्वारीची लागवड कोणी करीत नाहीं.

पावसाळी ज्वारीची पेरणी जून-जुलै महिन्यांत व रब्बीची पेरणी सप्टेंबर-ऑक्टोबरमध्यें करतात. पावसाळी पीक महाराष्ट्रांत ऑक्टोबर-नोव्हेंबर महिन्यांत तयार होतें. व गुजराथेंत तें डिसेंबर-जानेवारींत मिळतें. रब्बी पीक फेब्रुवारींत तयार होतें. उन्हाळ्यांतील ज्वारीचा कडबा पावसाळ्यांतील कडब्यापेक्षां बारीक व खाण्यास गोड असतो. त्यामुळें तो जनावरांस चांगला मानवतो.

ज्वारीची मळणीची पद्धत ठिकठिकाणीं निरनिराळी आहे. महाराष्ट्रांत बैलांच्या पायाखालीं कणसें तुडवून मळणी करतात, तर गुजराथेंत कणसांवरून गाड्या फिरवितात. मद्रासकडे दगडी रुळानें मळणी करतात. ज्वारीच्या पिकास पांखरांपासून जपणें अत्यंत आवश्यक असतें. एवढ्याकरितां दाणा तयार होऊं लागल्यापासून राखणीस आरंभ करितात.

जाती— ज्वारीच्या जाती अनेक आहेत. पण विशेष प्रसिद्ध पुढें दिल्याप्रमाणें आहेत.

खरीप किंवा पावसाळी लागवडीकरितां—

पेरियो, चपटी, सोलापुरी ( गुजराथ ), निळवी, अरगड, उतावळी ( पुणें ), गोडगाऱ्या, एलिचपुरी, गुडघी ( खानदेश ), फुलगार पिवळी व पांढरी ( कर्नाटक ), व गिडगाप ( सातारा ).

रब्बी किंवा उन्हाळी लागवडीकरितां—

शियाळो ( गुजराथ ), वेंद्री, दगडी, मालदांडी, डुकरी, ( दख्खन, सातारा व सोलापूर ).

निळवी व उतावळी या जातींपासून उत्तम वैरण मिळते. म्हणून या जाती वैरणीकरितांच पेरितात. गुजराथेंत सुंडिया जात वैरणीकरितां वापरतात. महाराष्ट्रांत वैरणीसाठीं हुंडी ही जात प्रामुख्यानें घेतात.

ज्वारीचें उत्पन्न जातीप्रमाणें कमीअधिक असतें. साधारण एकरीं ५०० ते १,००० पौंड उत्पन्न मिळतें. एकरीं वैरण २५,००० ते ३०,००० पौंड मिळते.

**ज्वालामुखी**—पृथ्वीच्या पोटांत कांहीं खोलीवर जी उष्णता व वाफ असते तीमुळें पृथ्वीचें कवच फुटून आंतून दगडाचा रस, धूर, राख, इ. बाहेर पडतात. ज्या वेळीं हा प्रकार होतो

तेव्हां मोठाले स्फोट होतात व पृथ्वी हादरते. पृथ्वीवर कोठें कोठें ज्वालामुखी पर्वत आहेत, यांची आतां पूर्ण माहिती झालेली आहे. कांहीं ज्वालामुखें आतां पार थंड आहेत; तर कांहीं अधूनमधून जिवंत होतात व ज्वालारस ओकतात. इटली आणि जपान यांतील ज्वालामुखें जागृत आहेत. व्हेसुव्हियस, एटना, स्ट्रामबोली यांचीं नांवें सुपरिचित आहेत. जपानमधील बंडाई-सन हा ज्वालमुखी १,००० वर्षांनंतर १८८८ त जागा झाला. महाराष्ट्र हा मृत ज्वालामुखीवर वसला आहे म्हणतात. ज्वालामुखी पर्वत बहुधा समुद्रालगत असतात. ॲन्डीज, जपान, जावादि अतिपूर्वेकडील प्रदेश, न्यू-गिनी, पॉलिनेशिया व न्यू झीलंड हा जगांतील प्रमुख ज्वालामुखींचा टापू आहे.

**ज्वालामुखी कांच**— (ऑब्सिडियन). ज्वालामुखींतून बाहेर पडणारा रस (लाव्हा) एकदम थंड झाल्यास हा प्रकार होतो. हंगेरी व यलास्टोन पार्क (अमेरिका) यांत या जाड कांचेचे मोठे ढीग सांपडतात. जुन्या काळीं या कांचेचीं उपकरणीं बनवीत.

**ज्वालामुखी रस**—ज्वालामुखीच्या तोंडांतून जो खडकाचा रस बाहेर पडतो व थंड झाल्यावर ज्यापासून अनेक प्रकारचे खडक बनतात त्यास 'लाव्हा' रस असें म्हणतात. या लाव्हा रसापासून बनणाऱ्या खडकांची रचना तो ज्या मानानें लवकर किंवा उशीरा थंड होईल व ज्या मानानें त्यांतील निरनिराळीं रासायनिक द्रव्यें विभक्त होऊन बाहेर पडतील त्यावर अवलंबून असते.

**ज्वालासदृश शिल्प**— (फ्लमबॉयंट). ही एक प्रकारची शिल्पपद्धति असून ती फ्रान्समध्यें चौदाव्यापासून सोळाव्या शतकापर्यंत रूढ होती. या पद्धतीमध्यें खिडक्या, दरवाजे, वगैरेवर एक प्रकारची लहरीदार व ज्वालांसारखी नक्षी करण्यांत येत असे. ही गॉथिक पद्धतीपासून निघाली असें म्हणतात.

# ∴ ∴ य. गो. जोशी-वाङ्मय-निधि ∴ ∴

मराठी वाङ्मयाबद्दल आपण नेहमीं तक्रार करतों. त्यास अनेक कारणेंही असतील; पण मराठी वाङ्मयसेवकांच्या जीवनाकडे आपण त्यांच्या वाङ्मयाइतक्या आस्थेनें पाहिलें नाहीं हा दोष थोड्याफार प्रमाणात आपणांकडेहि येतो.

मराठी वाङ्मयसेवकाला अद्याप म्हणावी तशी प्राप्ति होत नाहीं. स्वतःचें जीवन जाळून त्यांतून साहित्य निर्माण करणारे ज्ञानेश्वर-रामदास-तुकाराम—

इतिहासाचार्य राजवाडे, ज्ञानकोशकार केतकर, इतिहास-संशोधक आपटे, कवि केशवसुत, बालकवि, ना. वा. टिळक, संतवाङ्मयाचे अभ्यासक आजगांवकर, मामा वरेरकर, वगैरे वंदनीय व्यक्तींनीं आपलें जीवितकर्तव्य म्हणून ध्येयसेवा आणि वाङ्मयसेवा केली.

पण आपलें त्यांच्याविषयीं हळहळ दाखविण्यापलीकडे 'कांहीं तरी' करावयाचें राहून गेलें आहे.

असें 'कांहीं तरी' आपणां सर्वांच्या सहाय्यानें करावें अशी माझी आज कित्येक दिवसांची इच्छा आहे.

ती माझी इच्छा आजच्या दिवशीं मी जाहीर करीत आहें.

मराठी वाङ्मयसेवकांनीं केलेल्या साहित्यसेवेबद्दल अंशतः उतराई होण्याकरितां आजपासून जास्तींत जास्त पांच वर्षांत कमींत कमी एक लाख रुपये जमवून त्यांचें कमींत कमी येणारें व्याज दरसाल तीन हजार रुपये दरवर्षी एका साहित्य-सेवकाला "कृतज्ञता पारितोषिक" म्हणून देत जावें अशी माझी इच्छा आहे.

हें पारितोषिक साहित्यसेवकाला त्याच्या वयाच्या ४५ ते ५० व्या वर्षानंतर मिळावें. तें त्या वर्षांच्या त्याच्या एखाद्या पुस्तकाबद्दल न देतां त्यानें त्या वेळेपर्यंत जी साहित्यसेवा केली असेल त्याबद्दल उतराई होण्याकरितां जनताप्रेमानें द्यावयाचें आहे.

ही कल्पना मीं आतांपर्यंत अनेक वेळां लिहून-बोलून दाखविली आहे. पण आज प्रत्यक्ष हातीं घेत आहें व ती येत्या पांच वर्षांत पुरी करून दाखविण्याची माझी सदिच्छा आहे.

ही कल्पना म्हणजे एका 'लेखकाचें मनोराज्य' या दृष्टीनें अनेकांनीं तिजकडे पाहिलें. पण तें मनोराज्य मी सत्यसृष्टींत आणीन अशी मला खात्री वाटते. अर्थात् हें आपण सदिच्छा-पूर्वक जें घाल त्यावर अवलंबून आहे.

सहजासहजीं व थोड्याशा श्रमानेंहि सध्यांच्या काळीं हा माझा संकल्प पुरा होईल अशी मला आशा वाटते. तें शक्य न झालें तर दारोदारीं आणि गांवोगांवीं फिरून ही रक्कम गोळा करण्याचा मीं संकल्प केला आहे.

या जमणाऱ्या निधीला "य. गो. जोशी-वाङ्मय-निधि" हें नांव मीं हेतुपुरस्सर दिलें आहे. जमल्यास पैसा लोकांचा व नांव माझें अशी स्वार्थी भूमिका यांत अंतःकरणपूर्वक नाहीं.

मला माझ्या नांवाची असलेली प्रतिष्ठा कायम ठेवावयाची असल्यास मीं एकनिष्ठेनें ही सेवा करावी येवढ्याकरितांच मीं आपलें नांव 'इरेला' टाकलें आहे.

थोडासा पैसा जमा होतांच "निधि" रजिस्टर करून योग्य ती व्यवस्था होईल.

मला वाङ्मयावर मिळालेल्या रकमेपैकीं सुरवातीची देणगी म्हणून १००१ रुपये मी या निधीला देत आहें.

माझी सद्भावना आणि निधीची कल्पना आपणांला पटल्यास व माझ्या प्रामाणिकपणावर आपला विश्वास असल्यास या निधीला आपण हस्तें-परहस्तें मदत करावी अशी विनंति आहे.

मुंबई,
२५-१-१९४७

आपला कृपाभिलाषी,
**यशवंत गोपाळ जोशी**

---

वाङ्मयनिधीची ही योजना ता. २५-१-४७ रोजीं मुंबई साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपदावरून मीं जाहीर केली. बहुतेक वर्तमान-पत्रांच्या संपादकांनीं या निधीस प्रसिद्धि दिली. 'केसरी'चे संपादकांनीं तत्परतेनें या निधीवर स्फुट लिहिलें, तर दैनिक 'लोकमान्य (मुंबई)'नें या निधीवर अग्रलेख लिहून मला उपकृत केलें. माझे अनेक ज्ञात आणि अज्ञात मित्र मला उत्साह देत आहेत; पण त्याचबरोबर या योजनेशींच प्रामाणिक मतभेद असलेले असेही माझे अनेक मित्र आहेत. कुणाला निधीला मीं माझें नांव दिलें आहे हें पसंत नाहीं तर या योजनेनें मराठी वाङ्मयाचें नफानुकसान काय होईल याबद्दल कित्येक साशंक आहेत. पण हें कार्य पुरें करावयाचें मीं ठरविलें आहे. ज्येष्ठ बंधूसमान मजवर लोभ करणारे पुण्याचे सुप्रसिद्ध धोंडूमामा साठे व द. बा. फाटक, (पायोनियर डाइंग हाउस, पुणें) यांनीं शक्य तों मदत करण्याचें मला आश्वासन दिलें आहे. **निधीचे आतांपर्यंत सुमारें ८००० रुपये** जमा झाले आहेत. या निधीस आपले शक्त्यनुसार हातभार लावणें व हा निधि शक्य तितक्या लौकर पुरा करणें हें प्रत्येक वाङ्मयप्रेमी माणसाचें कर्तव्य आहे.

वाङ्मयनिधि-कचेरी,
६२३/१५ सदाशिव, पुणें २

सर्वांचा कृपाभिलाषी,
**यशवंत गोपाळ जोशी**